# संपादकीय निवेदन

## अनंतपारं किल शब्दशास्त्रम् ।

बारा वर्षे चाललेला महाराष्ट्रीय ज्ञानकोश पुरा होत आला असता त्याच्या संपादकवर्गानें ज्ञानकोशासारखेंच संघशक्तीनें पार पडणारें दुसरें एखादें बिकट परंतु अत्यंत आवश्यक काम अंगावर घ्यावें अशाबद्दल ज्या खासगी आणि जाहीर सूचना आल्या त्यांपैकीं श्री सरदार मेहेंदळे, प्रो पोतदार, श्री द वि आपटे प्रभृति मंडळींनीं केसरींतून प्रसिद्ध केलेली ( २३-११-१९२६ ) बृहत्कोशाची सूचना महत्त्वाची होती ती सूचना ज्ञानकोशमंडळाला पटून त्या संस्थेनें हें शब्दकोशाचें कार्य केलें असतें तर ती संस्था अखंड टिकून जास्त स्पृहणीय व अनुकरणीय होती व तें आम्हाला इष्टच होतें पण त्या मंडळामार्फत हें बृहत्कोशाचें अत्यावश्यक कार्य होत नाहीं असें पाहून प्रस्तुत शब्दकोशाच्या संपादकवर्गानें ता १ एप्रिल १९२८ पासून स्वतंत्रपणें आणि उघड रीतीनें या कार्यास आपणाला वाहून घेतलें

शब्दकोशरचनेला थोडा आरंभ यापूर्वीच म्हणजे शके १८४९ च्या दसऱ्यापासून झाला होता त्या शुभदिनीं ज्ञानदेवींतील ‘ ॐ नमो जी आद्या । ’ या पहिल्या ओंवींतील पहिला शब्द पहिल्या शब्दपत्रावर उतरण्यात आला व अशा रीतीनें या कार्याचें पुण्याहवाचन झालें १९२८ सालच्या उत्तरार्धांत रीतसर कंपनीची उभारणी करून प्रत्यक्ष संपादन आणि प्रचार कार्याला जोरानें आणि जोमानें सुरवात झाली ग्रांथिक, ग्रांतिक, पारिभाषिक व धंदेवाईक शब्द जमा करण्यासाठीं संपादकवर्गानें जसजसे प्रयत्न केले याची समग्र माहिती वेळोवेळीं वृत्तपत्रांतून प्रसिद्ध करण्यात आलेलीच आहे व शेवटच्या खंडात ती थोडक्यात नमूदहि करण्यात येईल सुमारें पंचवीस संस्था व दीडशें व्यक्ती यांचा विशेष हातभार शब्दसंग्रहाच्या अवघड कामाला लागल्यामुळेंच इतक्या लवकर हा प्रथमखंड प्रसिद्ध होत आहे

भाषेंतील एकूणएक सर्व शब्दांची प्रथम सूची तयार करून नंतर एकेक शब्दाची व्याकरण, अर्थ, अवतरण, व्युत्पत्ति, प्रचार इ० दृष्टींनीं माहिती गोळा करावयाची व नंतरच प्रकाशनास आरंभ व्हावयाचा, अशी आधुनिक कोशशास्त्रीय पद्धत संपादकांना पूर्ण अवगत आहे पण आपल्या महाराष्ट्रांतील थोड्याशा अर्धशिक्षित पांढरपेशा जनतेच्या सांपत्तिक बळावर अवलंबून वरील तऱ्हेच्या सर्वांगपरिपूर्ण पण २५ वर्षांपेक्षांहि अधिक काल लागणाऱ्या प्राथमिक प्रयत्नाला हात घालणें अशक्य होतें बरें, या दीर्घकालाच्या प्राथमिक आरंभानंतर प्रकाशनसंस्काराची दुसरी पंचवीस वर्षांची पायरी चढणें तर त्यापेक्षांहि अवघड होतें, असें अव्याहत दोन पिढ्या काम चालून हा संपूर्ण शब्दकोश बाहेर पडणार तोंच तिसऱ्या पिढीला तो अपुरा वाटणार ! तेव्हा, आपल्यामध्यें भाषाशास्त्रज्ञ विद्वानांचा असणारा तुटवडा व जे थोडे असतील त्यांची सहकारिता लाभण्याची अशक्यता, चांगल्या सुशिक्षितामध्येंहि असा मराठी-मराठी बृहत्कोशाच्या उपयुक्ततेसंबंधीं असलेली साशंकवृत्ति, बहुसंख्याक साक्षर जनतेची धार्मिक किंवा ललितवाङ्मयाकडेच विशेष ओढवून घेणारी प्रवृत्ति, व सरकार विद्यापीठें, संस्थानिक आणि धनिक यांच्या ठिकाणीं लागेल तितका पैसा खर्च करून अशीं राष्ट्रोपयोगी कामें घडवून आणण्याच्या सुबुद्धीच्या जागृतीचा प्रस्तुतकालीं अभाव अशा बिकट परिस्थितींत शक्य तितक्या थोड्या अवधींत शक्य तितकी मेहनत आणि मदत घेऊन व आधुनिक शास्त्रीय पद्धतीचा यावच्छक्य अवलंब करून तयार केलेला कोश लोकांपुढें ठेवणें हेंच इतिकर्तव्य ठरविणें आम्हांस भाग होतें व तेंच आम्ही प्रस्तुत करीत आहों एका पिढीला जरी हा कोश पुरला तरी वावगें नाहीं या कोशाच्या उणीवा पुढल्या पिढीनें भरून काढून नवीन सुधारलेली आवृत्ति प्रसिद्ध करावी शिवाय केव्हांहि किती हि प्रयत्न केला तरी सर्वांश पूर्ण असा कोश होणें अशक्य मराठी भाषा झपाट्यानें दररोज वाढत व बदलत आहे अनेक समाज उद्योग, विद्या शास्त्रें आणि संस्कृति यांची सारखी घालमेल चालली आहे तेव्हां अंतर्बाह्य परिस्थिति लक्षांत घेऊन पाहतां यापेक्षां अधिक पूर्ण कोश तयार होणें आज शक्य नाहीं हें दिसून येईल असो

पण या कोशाच्या मानीव अपुरेपणाचें समर्थन केलें असलें तरी याच्या सिद्धीला सर्व तात्त्विक आणि शास्त्रीय साधनांचा उपयोग केलेला दिसून येईल जुनी शास्त्री पद्धत व नवी शास्त्रीय पद्धत यांचा मेळ घालून याची रचना केली आहे हा कोश रचण्यासाठीं काय काय गोष्टी केल्या याचें सविस्तर विवेचन शेवटच्या खंडातील प्रस्तावनेंत येईलच मराठी भाषा व वाङ्मयाला यामुळें काय महत्त्व येणार आहे याची कल्पना खऱ्या विद्वानांना येईलच यांतील उणीवांची तीव्र जाणीव इतरापेक्षां संपादकांना अधिक आहे व अनुकूल परिस्थिति लाभल्यास त्या पूर्ण भरून काढण्यासहि ते समर्थ आहेत यापेक्षां अधिक प्रस्तावाची जरूरी नाहीं

या कोशाच्या संपादनास अनेकांचें कमीअधिक प्रमाणानें मोठें साहाय्य झालें आहे व ग्रंथ संपूर्ण होईपर्यंत अधिक व्हावयाचेंहि आहे त्यांचे नांवनिशीवार कृतज्ञतापूर्वक आभार मानण्याचें स्थान शेवटच्या खंड असल्यानें येथें त्या सर्वांचे एकत्र मोघम आभार मानीत आहों याबद्दल कोणाचा रोष किंवा गैरसमज होणार नाहीं अशी आशा आहे

शेवटीं, केवळ कल्पावस्थेंतच कोश असतांना त्याचें विशेष महत्त्व पटून ज्यांनीं त्यासाठीं दहा हजार रुपये देण्याची मंजूर केली व हा खंड ज्यांच्या या मदतीमुळें इतक्या लवकर प्रसिद्ध होत आहे त्या श्रीमंत सयाजीरावमहाराज गायकवाड यांचा आभारपूर्वक उल्लेख केल्यावांचून राहवत नाहीं हा कोश त्यांनाच अर्पण होणें योग्य होतें व तसा योगहि आलेला आहे

आतां यापुढचे पांच खंड या साहाय्यकांच्या मदतीनें, दरसहा महिन्यांनीं एक एक असे बाहेर पडतील अशी आशा आहे

यशवंत रामकृष्ण दाते

# रचनापरिचय

**अक्षरानुक्रम**—कोशातील शब्दाक्षरानुक्रम कसा ठेवावा, यासबंधीं पूर्वीचे कोश काढून व काहीं विद्वानांशीं विचारविनिमय करून एक प्रश्नपत्रिका काढून ती अनेक विद्वान् आणि भाषाकोविद यांकडे पाठविण्यात आली होती त्यांच्याकडून आलेल्या सूचनांचा जाहीर विचार केल्यानंतरच पुढील पद्धति अवलंबिण्यात आली

कोशांतील शब्दांचा आद्याक्षरानुक्रम मराठी वर्णमालेप्रमाणेंच ठेवण्यात आला आहे म्हणजे अं. क्ष व ज्ञ यांना स्वतंत्र स्थानें दिलीं आहेत शब्दांतील सानुस्वार अक्षरापुढें व्यंजन असल्यास ते शब्द अनुक्रम लावताना अनुस्वार नाहीं असें समजून लावले आहेत परसवर्णाप्रमाणें अनुक्रम धरला नाहीं उदा० **इंगळा, इंगा** हे शब्द '**इग**'नें आरंभ होणाऱ्या शब्दांतच घेतले आहेत '**इंध**'च्या पुढें लावले नाहींत या क्रमामध्यें सानुनासिक व निरनुनासिक शब्द जवळ जवळ आल्यास बहुधा प्रथम निरनुनासिक शब्द घेऊन नंतर सानुनासिक घेण्यात आला आहे उदा० **उचट, उंचट** विसर्गाच्या बाबतींतहि विसर्ग नाहीं असें धरून शब्दानुक्रम लाविला आहे उदा० **उप.–काल–पान** नंतर **उपा** शब्द घेतला आहे **अॅ ऑ** हीं अक्षरें अ, आ सारखींच धरलेलीं आहेत संस्कृत तत्सम शब्द संस्कृत रूपाप्रमाणें दिले आहेत उदा० **आह्लाद,** यांत ह प्रथम आहे **अरि, आपत्ति** येथें अंत्यस्वर ऱ्हस्व आहे

**शब्दांचीं अनेक रूपें**—एका शब्दाचीं दोन किंवा अधिक रूपें जेव्हां असतील तेव्हां शब्दाचा जेवढा भाग या सर्व रूपांना सामान्य आहे तेवढा ठेवून त्यापुढें वैकल्पिक भाग दिले आहेत उदा० **अफिमी–म्या** (अफिमी, अफिम्या), **अप्रयोजक–जिक, उडवणें–विणें** केव्हां केव्हां वैकल्पिक अक्षर कंसात दाखविलें आहे उदा० **अपक(ख)रा**

**पोटांतील शब्द**—सामासिक शब्दांतील उत्तरपदें, तसेंच वाक्प्रचारांत शब्दांना लागणारीं क्रियापदें हीं मूळ शब्दाबद्दल पोकळ टिंब (०) देऊन पुढें लिहिलीं आहेत उदा **अमृत** शब्दाच्या पोटांत **०फळ, ०महाल** इ० उत्तरपदें व **आंकडा** शब्दामध्यें **०वळणें, ०मोडणें** हीं क्रियापदें दिलीं आहेत ज्या ठिकाणीं मूळ शब्दाला दुसरा शब्द लागताना सामान्यरूप किंवा बदल होतो त्या ठिकाणीं जेथून बदल होतो तें रूप – देऊन लिहिलें आहे उदा० **ईश्वर** शब्दाच्या पोटांत '**–राचा लाल**' (ईश्वराचा लाल), **अनागोंदीच्या** पोटांत '**–चा राजा**' असें लिहिलें आहे असे शब्द किंवा वाक्प्रचार या प्रकारें लिहिल्यानें कळण्यास कठिण पडतील असें जेथें वाटलें तेथें ते संबंध लिहिले आहेत

**हवाले**—जेथें शब्द दोन तीन प्रकारांनीं उच्चारिले जातात तेथें साधारणतः एकाच शब्दाचें विवरण केलें असून बाकींच्या पुढें त्या शब्दाचा हवाला दिला आहे उदा० **अनस्ता–अनास्था** पहा **अ** आणि **आ** यांनीं आरंभ होणारे शब्द क्वचित् एकाच ठिकाणीं पण बहुधा असे एकमेकांचे हवाले देऊन लिहिले आहेत साधारणतः शब्दार्थ अपभ्रष्टरूपापुढें न देता शिष्ट रूपापुढें देण्याचा प्रघात ठेवला आहे

**गाळलेले शब्द**—जुन्या कोशांतून किंवा परंपरेनें जे चुकीचे शब्द आलेले आहेत किंवा मुद्रणदोषामुळें भलतेच शब्द बनले आहेत ते बहुधा गाळण्याचा क्रम अवलंबिला आहे उदा० हुणावनी (हमकोश–बीजप्ररोहण+अवनी –ज्ञा १८१०) असले बद्दल असले, उपेक्षेबद्दल उपणे इ० काहीं शब्दार्थहि चुकीचे जे आले ते बदलले आहेत पूर्वींच्या ग्रंथकाराच्या काल्पनिक अर्थाचीहि शहानिशा करून व्युत्पत्तिदृष्ट्या पटणारे अर्थ तेवढेच ठेवले आहेत

**प्रांतिक-परकी शब्द**—प्रांतिक बोलींतील अगदीं रूढ व विशेष परिचयाचे तेवढेच शब्द घेतले आहेत थोड्याफार फरकानें इकडलाच शब्द असेल तर तो स्वतंत्र घेतला नाहीं इंग्रजी शब्दहि जास्त प्रचारांतले तेवढेच घेतले आहेत शास्त्रीय परिभाषा देखील लक्षनिविष्ट जी आढळते तीच संगृहीत करण्यात आली आहे नवीन परिभाषा पुरवणीविभागात देण्याचा विचार आहे

**अवतरणें**—अवतरणें होता होईतों जुनीं व कालानुक्रमानें देण्यात आलीं आहेत पण ज्ञानेश्वरीसारख्या फार परिचित ग्रंथातील अवतरणांपुढें अज्ञात पण परिचययोग्य ग्रंथांतील अवतरणें वगळलीं जाऊं नयेत म्हणून कोठें कोठें त्यांना प्राधान्य दिलेलें आढळेल एका शब्दाला विविध अवतरणें सहज देतां येण्यासारखीं असूनहि स्थलसंकोचास्तव तसें करण्याचा मोह आवरलेला दिसून येईल तथापि चांगलीं अवतरणें निवडण्याचा प्रयत्न केला आहे

**व्युत्पत्ति**—एका शब्दाचे अनेक अर्थ असतां ते व्युत्पत्तिदृष्ट्या वेगवेगळाले फोडून स्वतंत्र शब्दापुढें देण्यात आले आहेत उदा आप=सुळक्याध (सं अर्श) आर्प=ऋषीसंबंधी (सं ऋषि) आन (सं अन्य), आन (आण) उबर (उमर), उबर (शूद्र), इ० बहुतेक शब्दांची व्युत्पत्ति काहीं निश्चित, काहीं संभाव्य तर काहीं संशयित दिलेली आढळेल काहीं संस्कृत शब्दांचे मूळ धातूहि दाखविले आहेत कोठें कोठें पाश्चात्य शब्दांशींहि तुलना केली आहे द्राविडी शब्दांपासून काहीं मराठी शब्द कसे साधले आहेत हें दाखविण्याचा यांत केलेला प्रयत्न व्युत्पत्तिपंडितांना नवीन वाटेल एकदा व्युत्पत्ति दिली असल्यास पुन्हां ती साधित किंवा सामासिक शब्दांपुढें पुनरुक्ति टाळण्यासाठीं दिलेली नाहीं

---

# प्रस्तावना

## कोशरचनाशास्त्र व कोशवाङ्मय

**शब्दकोश**—हा शब्द शब्द+कोश या दोन शब्दांचा समास होऊन बनलेला आहे यावरून एखाद्या भाषेतील शब्दाचा संग्रह असा बोध होतो यातील पहिला अवयव शब्द हा तृतीय गणातील शप् धातूपासून झालेला दिसतो यापासुन शब्दायते असा नामधातु बनतो याचा अर्थ प्रथम ध्वनि, आवाज असा असून पुढें अर्थयुक्त ध्वनि असा झाला अशा अर्थयुक्त ध्वनींचा म्हणजे शब्दांचा जो संग्रह तो शब्दकोश होय कोश हा शब्द कुक्षि किंवा कोष्ठ या शब्दांतील कुश् किंवा कुष् धातूपासुन निघाला असून त्याचे अर्थ पात्र, पेटी, संग्रहस्थान, शब्दकोश इत्यादि आढळतात आरंभीं हा शब्द कोश याच स्वरूपात आढळतो, पण पुढें पुढें कोश व कोष अशीं दोन्ही रूपें आढळतात कोश शब्दाचा कळा अथवा बीजपेटिका ( पुष्पकोश, बीजकोश ) असाहि अर्थ आहे, आणि त्याच अर्थी व तत्सदृश हिब्रू व ग्रीक भाषांत अनुक्रमें गुकाग व कोकॉस असे शब्द आढळतात, व याच ग्रीक शब्दावरून पुढें कोकून म्हणजे रेशमाच्या किड्याचा कोश हा इंग्रजी शब्द निघाला आहे असो सध्या कोश अथवा शब्दकोश यानें एखाद्या भाषेतील शब्दांचा संग्रह असा बोध होतो

**कोशाची कल्पना**—भरतखंडामध्यें शब्दकोशाची कल्पना फार प्राचीन काळींच उद्भूत झालेली दिसून येते भाषेतील शब्दांचा एकत्र संग्रह करण्याची ही कल्पना आपणास प्रथम वेदांगग्रंथामध्यें आढळणाऱ्या ' निघण्टु ' या ग्रंथात दृष्टीस पडते वास्तविक 'निघण्टु' हा शब्दसंग्रह शब्दकोश ह्या संज्ञेस पात्र नाहीं त्यास केवळ शब्दमालिका हें नाव अन्वर्थक होईल असा शब्दसंग्रह करण्याची आवश्यकता जेव्हा एखादा विषय दुर्बोध होऊ लागतो किंवा एखादा विषय दुसऱ्यास शिकवावयाचा असतो त्यावेळीं उत्पन्न होते जोंपर्यंत एखाद्या विषयाची परंपरा मूळापासुन फारशी दूर गेलेली नसेल व त्या विषयाचें अध्ययन चालू असेल तेव्हां त्यावर टीका, भाष्यें, टिप्पणी किंवा कठिण शब्दांवरील अर्थबोधक टीपा यांची आवश्यकता नसते परंतु जसजसें ग्रंथकर्ता व वाचक किंवा अभ्यासक यामधील अंतर वाढू लागतें तसतशी या उपसाहित्याची गरज भासू लागते त्याप्रमाणेंच एखाद्या भाषेचें स्वरूप हळू हळू बदलत जात असतां जेव्हा अशी स्थिति प्राप्त होते कीं एका स्वरूपातील भाषा अथवा शब्द उत्तरकालीन भाषेपासुन व शब्दांपासून विशेष पृथक्त्व पावून दुर्बोध होतात तेव्हां भाषेतील पूर्वस्वरूपातील शब्दांच्या अर्थाचें ज्ञान निश्चित होण्याकरितां त्या स्वरूपातील शब्दांवर टिप्पणी किंवा निर्वचन लिहिणें जरूर होतें व असें निर्वचन करण्याकरितां त्या स्वरूपातील शब्दांचा–निदान दुर्बोध शब्दांचा–संग्रह करणें जरूर पडतें तेव्हां शब्दकोशाची प्रथमावस्था म्हणूनच कठिण व दुर्बोध शब्दांचा संग्रह ही होय अशाच रीतीनें वेदाभ्यासकांच्या उपयोगार्थ प्रथम दुर्बोध व आर्ष शब्द व वचनें यांचा संग्रह करण्यात आला तथापि आरंभीं यावर स्वतंत्र भाष्याची जरूर वाटत नव्हती, कारण वेदाभ्यासाची परंपरा अव्याहत चालू होती व अध्यापकास केवळ या यादीवरून आपलें अध्यापनाचें कार्य करतां येत असे परंतु कालांतरानें या शब्दयादीवर लिखित टिपणें तयार झालीं निरुक्ताचा उगम प्रथम या कालीं झाला असला पाहिजे व यानंतर त्यावरील भाष्याची परंपरा सुरू झाली असावी

**पाश्चात्त्य**—ग्रीसमध्येंहि आपणास अशीच स्थिति आढळते ग्रीसमध्यें आरंभीं होमरचे ग्रंथ एवढेच काय ते विशेष ज्ञान देणारे ग्रंथ होत व तेथील विद्यालयात होमरच्याच ग्रंथाचें अध्ययन करीत असत त्यामुळें व्याकरण व इतर शास्त्रांचा उदयहि होमरच्या ग्रंथाच्या अभ्यासामुळेंच झालेला आपणास दिसून येतो भरतखंडात ज्याप्रमाणें वेद हे सर्व विद्यांचा उगम आहेत त्याप्रमाणेंच ग्रीसमध्यें होमरचे ग्रंथ हेच सर्व विद्यांच्या मुळाशीं आहेत शिवाय वेदांचा धर्माशीं संबंध असल्यामुळें त्यांचा अभ्यास भरतखंडामध्यें विशेष आस्थापूर्वक व परिश्रमपूर्वक होत असे आणि त्यामुळेंच व्याकरणाचा अभ्यास भरतखंडात ग्रीसपेक्षां प्राचीनकाळींच सुरू होऊन त्या शास्त्रात भरतखंडाची फार प्राचीनकाळींच अत्यंत प्रगति झाली होती, व ज्याप्रमाणें वेदाचे उपग्रंथ म्हणून निघण्टु तयार झाले त्याप्रमाणें ग्रीसमध्यें पेरिक्लीजच्या कालीं होमरच्या ग्रंथावर ग्लोस्साइ=ग्लॉसरीज=शब्दटिप्पणी तयार झाल्या ( ख्रिपू ७०० ते ६०० ) या बाबतींत दोन्ही देशांत विद्येची वाढ एकाच दिशेनें चाललेली आपणास आढळून येते परंतु यापुढें भरतखंडात वेदांचा अभ्यास पुरोहितवर्गांतच चालू राहिल्यामुळें त्या अभ्यासात सायण किंवा महीधरापर्यंत फारशी प्रगति आपणास झालेली दिसत नाहीं उलट होमरचे ग्रंथ हे लौकिक असल्यामुळें पेरिक्लीजपासून अलेक्झांडरच्या काळापर्यंतच होमरच्या ग्रंथाच्या अभ्यासात आपणांस बरीच वाढ झालेली दृष्टीस पडते

भरतखंडामध्यें धार्मिक वृत्तीचें प्राबल्य विशेष झाल्यामुळें व प्रत्येक गोष्टीस वेदग्रंथात आधार पहावयाच्या प्रवृत्तीमुळें या ग्रंथाचा ऐतिहासिक दृष्टीनें अभ्यास करण्याची प्रवृत्ति नष्ट झाली व शब्दाच्या व भाषेच्याच अभ्यासाकडे अधिक लक्ष लागून व्याकरणशास्त्राची मात्र फार झपाट्यानें वाढ झाली व या बाबतींत मात्र भारतीय पंडितानीं ग्रीक पंडितावर ताण केली

त्यामुळें आरंभीं, आपणास सध्या उपलब्ध असलेल्या निघण्टुप्रमाणें, दुसरेहि शब्दसंग्रह अस्तित्वात असणें शक्य आहे तथापि ऋग्वेदाच्या निघण्टूच्या उत्कृष्टतेमुळें त्याची परंपरा कायम राहिली असावी व बाकीचे लुप्त झाले असावे त्याचप्रमाणें ऋग्वेदाप्रमाणेंच इतर संहिताचेहि निघण्टुग्रंथ कदाचित् प्रथम तयार झाले असतील पण ऋग्वेदसंहितेला जें महत्त्व आहे व त्या संहितेचा अभ्यास जो अधिक सूक्ष्मपणें व मोठ्या प्रमाणावर करण्याची परंपरा दिसून येते तीमुळें त्या संहितेच्या निघण्टूसच महत्त्व येऊन बाकीचे लुप्त झाले असावे व त्याचाच अभ्यास परंपरेनें चालू राहिला असावा

**निघण्टु**—या ' निघण्टु ' ग्रंथाचा कर्ता कोण असावा याबद्दल काहींच निश्चितपणें सांगता येत नाहीं प्रत्यक्ष ' निघण्टु ' मध्यें तत्कर्तृत्वबोधक असें गमक काहींच नाहीं व त्याबद्दल केवळ कल्पनेवरच विसंबून रहावें लागतें महाभारताच्या मोक्षधर्म पर्वामध्यें ( ३४२, ८६–८७ ) पुढील दोन श्लोक आढळतात –' वृषोहि भगवान् धर्मः ख्यातो लोकेषु भारत । निघण्टुकपदाख्याने विद्धि मां वृषमुत्तमम् । कपिर्वराहः श्रेष्ठश्च धर्मश्च वृष उच्यते । तस्मात् वृषाकपिं प्राह कश्यपो मां प्रजापतिः ।" या श्लोकामध्यें ' निघंटु ' चा कर्ता महर्षि कश्यप होता असें म्हटलें आहे परंतु या उल्लेखास ऐतिहासिक महत्त्व काहींचेंहि देता येत नाहीं असाहि संभव आहे कीं, प्रस्तुत ' निघंटु ' हा शब्दसंग्रह एकाच वेळीं बनलेला नसून त्यामध्यें अनेक वेळा भर पडलेली असावी व सध्याचें उपलब्ध स्वरूप हें त्याचें अंतिमस्वरूप असावें या संग्रहाचे पाच अध्याय आहेत पहिल्या अध्यायात भौतिक वस्तूंचीं नावें दिलीं आहेत उदा० पृथिवी, हिरण्य उषा, इ० सतरा विषयाचीं नावें आहेत दुसऱ्या अध्यायात मनुष्य, त्याचे निरनिराळे अवयव व मनुष्यसंबद्ध संपत्ति, राग युद्ध वगैरे गोष्टींचीं नावें असून त्यात बावीस विषय आहेत उदा० कर्मनामानि, अपत्यनामानि, बाहुनामानि, धननामानि इ० तिसऱ्या अध्यायात गुणधर्म अथवा भाववाचक शब्दाचा संग्रह आहे यात तीस विषय आहेत उदा० बहुनामानि, ह्रस्वनामानि, सुखनामानि रूपनामानि इ० या पहिल्या तीन अध्यायास ' नैघण्टुककाण्ड ' असें नाव आहे व त्यात समानार्थक शब्दाचा संग्रह केला आहे चौथ्या अध्यायास 'नैगमकाण्ड ' असें नाव असून त्यात वेदांतील अनेकार्थवाचक व कठिण शब्दांचा संग्रह आहे व पाचव्या अध्यायास ' दैवतकाण्ड ' असें नाव असून त्यात निरनिराळ्या देवतांचीं नावें दिलेलीं आहेत

**यास्क-निरुक्त**—या निघण्टूवर यास्काचें निरुक्त या नावाचें भाष्य उपलब्ध आहे यास्काचार्याबद्दल आपणास फारशी माहिती उपलब्ध नाहीं तैत्तिरीय संहितेच्या काण्डानुक्रमात ( ५ ३ ) त्यास पैंगि असें संबोधिलें आहे व वैशंपायनानें ती संहिता प्रथम यास्कास देऊन यास्कानें तित्तिरीस दिली असें म्हटलें आहे पिंगऋषीचा उल्लेख आश्वलायन श्रौतसूत्रात ( १२ १२ ) आढळतो व तो आंगिरस होता असें तेथें म्हटलें आहे तेव्हा यास्क आंगिरसगोत्रांतील असावा परंतु त्याच ठिकाणीं भृगुवंशामध्यें यस्क ऋषीचा उल्लेख असून त्याचा वंशज यास्क होता असें म्हटलें आहे त्याप्रमाणेंच महाभारत मोक्षधर्मपर्वामध्यें 'यास्को मामृषिरव्यग्रोऽनेक यज्ञेषु गीतवान् । शिपिविष्ट इतिह्यस्माद् गुह्य नामधरो ह्यहम् ॥ स्तुत्वा मां शिपिविष्टेति यास्क ऋषिरुदारधीः । मत्प्रसादादधो नष्टं निरुक्तमधिजग्मवान् ॥ ' ( ३४२ ७०–७१ ) याप्रमाणें यास्काचार्याचा निरुक्तकार म्हणून उल्लेख आहे निरुक्ताच्या शेवटीं नमः पारस्कराय नमो यास्काय' असें म्हटलेलें आढळतें यावरून यास्क हा निरुक्ताचा कर्ता ही गोष्ट जी आपणास परंपरागत माहीत आहे ती महाभारतकालापासून निर्विवाद आहे असें स्पष्ट होतें आता यास्कास पारस्कर म्हटलें आहे व पाणिनीनें ' पारस्करप्रभृतीनि संज्ञायाम् ' ( ६ १ १५७ ) असें एका सूत्रांत ग्रथित केलें आहे व त्यावरील पतंजलीच्या भाष्यांत ' पारस्करो देश इति ' असें स्पष्टीकरण दिलें आहे यावरून यास्क हा पारस्करदेशीय असावा असें दिसतें तसेंच शतपथ ब्राह्मणातील वंशक्रमामध्यें ' भारद्वाजाच्चासुरायणाच्च यास्काच्च ' व बृहदारण्यकांतील वंशक्रमामध्यें ' जातूकर्ण्य आसुरायणाच्च यास्काच्च ' असा उल्लेख आहे परंतु हे सर्व उल्लेख निरुक्तकार यास्काबद्दलच आहेत काय याबद्दल अनिश्चितता आहे त्यामुळें यास्काबद्दल किंवा त्याचा देश काल, गोत्र इत्यादीबद्दल आपणास निश्चित कांहींच सांगता येत नाहीं निरुक्ताशिवाय दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथांत कर्तृत्व यास्काकडे आढळत नाहीं मात्र पिंगलाच्या छंदःसूत्रामध्यें ' उरोबृहती यास्कस्य ' म्हणून यास्कानीं उरोबृहती हें नाव एका छंदास दिल्याचा उल्लेख आढळतो तेव्हा यास्काचा छंदःशास्त्रावर ग्रंथ होता किंवा काय अशी शंका येते पण यास प्रत्यंतर पुरावा दुसरा कांहीं आढळत नाहीं यास्कानें वेदांतील निरनिराळ्या शब्दांवर अर्थविवेचक व व्युत्पत्तिदर्शक टीपा दिलेल्या असून तसदर्थबोधक अवतरणेंहि दिलेलीं आहेत, परंतु यास्काचार्याचें निरुक्त हेंच पहिलें निरुक्त नसून यास्काचार्यापूर्वीहि अनेक निरुक्तकार होऊन गेलेले असावेत यद्द यास्काचार्यांनीं आपल्या निरुक्तामध्यें पूर्वीच्या निर्वचनकाराचाच केवळ नव्हे तर निरनिराळ्या

भाषाशास्त्रविषयक अभ्यासकाच्या संप्रदायाचा उल्लेख घेतलेला आपणास आढळून येतो यास्काचार्यांनी नैरुक्ता ( १ १२,२. १४, १६ इ० ) म्हणून व्युत्पत्तिशास्त्रज्ञाच्या संप्रदायाचा उल्लेख केलेला आहे तसेंच वैय्याकरणा ( १ १२, ९ ५, ) म्हणून व्याकरणशास्त्रज्ञाच्या संप्रदायाचा, पूर्वयाज्ञिका ( ७ २३, ), याज्ञिका ( ५ ११, ७ ४ इ० ) म्हणून यज्ञसंस्थेच्या अभ्यासकाच्या संप्रदायांचा, ऐतिहासिका ( २ १६, १२ १ इ० ) म्हणून कथाभ्यासकाचा व नैदाना ( ६ ९, ७ १२ ) म्हणून आद्यकारणशोधकाच्या संप्रदायाचा उल्लेख केलेला आहे यावरून पूर्वी शब्दाचा अनेक अंगानीं अभ्यास होत असून यास्काचार्य हे अशाच एका अभ्यासकाच्या संप्रदायातून तयार झालेले पंडित असले पाहिजेत यास्काचार्यांनीं वरील संप्रदायाप्रमाणेंच पूर्वीच्या अनेक विवेचकाचा किंवा आचार्यांचा उल्लेख आपल्या ग्रंथात केलेला आपणास आढळून येतो उदा० आग्रयण ( १० ८ ), आमायण ( १ ९, ६ १३, ), आचार्या ( ७ २२ ), औदुंबरायण ( १ १ ), औपमन्यव ( १ १,२ २ ), और्णवाभ ( २ २६, ६. १३ ) कात्थक्य ( ८ ५, ६ ), कौत्स ( १ १५ ), क्रौष्टुकी ( ८ २ ), गार्ग्य ( १ ३, १२ ), गालव ( ४ ३ ) चर्मशिरस् ( ३ १५ ), तैटिकी ( ४ ३, ५ २७ ), वार्ष्यायणि ( १ २ ) शतवलाक्ष ( ११ ६ ), शाकटायन ( १ ३, १२ ), शाकपूणि ( २ ८, ३ ११ ), शाकल्य ( ६ २८ ), स्थौलाष्टीवि ( ७ १४, १० १ ) याप्रमाणें निरनिराळ्या पण्डिताचे अथवा त्याच्या संप्रदायाचे उल्लेख निरुक्तात आढळतात

**व्युत्पत्तिशास्त्र**—तसेंच यास्कानें जें देवताचें त्याच्या प्रभावानुसार पृथ्वीवरील, अंतरिक्षातील व स्वर्गातील असें वर्गीकरण केलें आहे तेंहि इतरत्र आढळणाऱ्या पुराणाभ्यासकापेक्षा विशेष आहे तसेंच त्यानें समानार्थक व अनेकार्थक शब्दाचें जें विवेचन केलें आहे तेंहि शास्त्रशुद्ध आहे व विशिष्ट शब्दांचा विशिष्ट अर्थ निश्चित करीत असता आपल्या विवेचनास त्यानें उदाहरणें देऊन पुष्टि आणली आहे, एवढेंच नव्हे तर शब्दाचा अर्थ निश्चित करण्याकरिता व्युत्पत्तीचें महत्त्व किती आहे हें त्यानें पुढें दिल्याप्रमाणें दिग्दर्शित केलें आहे —१ वैदिक ऋचाचा अर्थ समजण्याकरिता व्युत्पत्तिज्ञान अवश्य आहे २ व्युत्पत्ति ही व्याकरणास पूरक आहे ३ व्युत्पत्ति ही संहितेचा पदपाठ करण्याच्या कामीं व सामासिक शब्दाचें पृथक्करण करण्याच्या कामीं अवश्य आहे ४ विशिष्ट मंत्राची मूळ देवता शोधून काढून यज्ञाची पूर्तता करण्याच्या कामीं व्युत्पत्तीचें ज्ञान आवश्यक आहे ५ तसेंच व्युत्पत्ति हें शास्त्र असून त्याचा अभ्यास करणें आवश्यक आहे याप्रमाणें यास्काचार्यांनीं व्युत्पत्तिज्ञानाचें महत्त्व दिग्दर्शित केलें आहे [अथापीदमन्तरेण मन्त्रेष्वर्थप्रत्ययो न विद्यते । । तदिदं विद्यास्थानं व्याकरणस्य कार्त्स्न्यं स्वार्थसाधकं च । । अथापीदमन्तरेण पदविभागो न विद्यते । । दैवतेनाबहुलिङ्गज्ञा अत्र स्म इति । . । नि १ १५–१७ ]

वरील विवेचनावरून यास्ककालीं शब्दाचा अभ्यास करण्याचें शास्त्र कोठपर्यंत वाढलें होतें हें आपणास कळून येईल यास्काचार्यांचा काल खिस्तपूर्व ७०० पासून ५०० पर्यंत धरावयास हरकत नाहीं असें पाश्चात्य पंडिताचें मत आहे तथापि यास्क पाणिनीपूर्व असला पाहिजे व पाणिनीचा काल जर रा राजवाडे याच्या मताप्रमाणें खि पू ७०० च्या पूर्वी असेल तर यास्काचार्य खि पू १००० च्या पूर्वी होऊन गेले असले पाहिजेत

**निरुक्तभाष्यें**—यानतर आपणास यास्काचार्यांच्या निरुक्तावर निरनिराळ्या टीका अथवा भाष्यें झालेलीं आढळतात त्यातील प्रमुख भाष्यकार म्हणजे उग्र स्कंदस्वामी व दुर्गाचार्य हे होत यापैकीं दुर्गाचार्य हा १३ व्या शतकात होऊन गेला असावा यानें निरुक्तातील सर्व वचनें आपल्या भाष्यात घेऊन त्याचें विस्तृत विवेचन केलें आहे

इ स पंधराव्या किंवा सोळाव्या शतकात रंगपुरी येथें होऊन गेलेल्या यज्ञेश्वरपुत्र देवराजयज्वा नावाच्या अत्रिगोत्रोत्पन्न पंडितानें नैघण्टुक काडावर एक टीका लिहिली आहे त्यानें त्या टीकेच्या उपोद्घातात असें म्हटलें आहे कीं, यास्कानें आपल्या निरुक्तामध्यें नैगमकाण्ड व दैवतकाण्ड यातील प्रत्येक शब्दावर भाष्य केलें आहे व तत्पुष्ट्यर्थ अवतरणें दिलीं आहेत, परंतु नैघण्टुक काडातील एकदर १३४१ शब्दापैकीं फक्त काहीं शब्दावरच भाष्य केलें आहे व उतारे दिले आहेत यानतर स्कंद स्वामीनें यास्काचार्यांनीं केवळ सामान्यत विवेचन केलेल्या काहीं शब्दाची विस्तृत चर्चा केली आहे ( नै १ ८, ३,१२, ३, २९ ) परंतु बरेच शब्द चर्चा करावयाचे राहिलेले आहेत व सांप्रत कलियुगात वेदाभ्यासाची परंपरा त्रुटित होऊं लागली असून केवळ कोशावरून पुरेसा बोध होणें अशक्य आहे व प्रथामध्यें लेखकप्रमादामुळें व पाठभेदामुळें शब्द गळण्याचा अथवा विकृत होण्याचा संभव आहे, याकरिता शुद्ध पाठ प्रचलित रहावा व अभ्यास सुलभ व्हावा म्हणून त्यानें यास्क व स्कंदस्वामी यानीं सोडलेल्या शब्दावरहि भाष्य लिहून व अवतरणें देऊन चर्चा केली आहे व ही चर्चा यास्कानीं इतस्तत विवेचन केलेल्या सुमारें १५० शब्दावरील टीपा व स्कंदस्वामीनें विवचिलेले सुमारें २०० शब्द याचें साहाय्य घेऊन व इतरानींहि निरनिराळ्या प्रसंगानुसार इतर शब्दाचें जें विवेचन केलें आहे तें आधारास घेऊन साक्षेपानें केली आहे व पाठ कायम केले आहेत खेरीज त्याच्या कुलामध्यें जी अध्ययनाची परंपरा अत्रुटित चालू होती तिचेंहि साहाय्य त्यास झालें आहे व त्यानें अनेक हस्तलिखित

प्रतींचें, वेंकटाचार्यपुत्र माधव यानें भाष्य केलेल्या नामानुक्रमणी, आख्यातानुक्रमणी स्वरानुक्रमणी, निपातानुक्रमणी, निर्वचना नुक्रमणी इत्यादि अनुक्रमणींचें साहाय्य घेतल्याचें नमूद केलें आहे तसेंच यानें आपल्या आधारग्रथात निरुक्त, स्कन्दस्वामिकृत निरुक्तटीका, स्कन्दस्वामि-भट्टस्वामि-राहुदेव-श्रीनिवास-माधवदेव-उवटभट्ट-भास्करमिश्र-भरतस्वाम्यादि विरचित वेदभाष्यें, पाणिनीय व्याकरण, विशेषत उणादि, त्याची वृत्ति, क्षीरस्वामि-अनंताचार्यादिकृत निघण्टुव्याख्या, भोजराजीय व्याकरण, अमल नयतीय, निखिलपदसंस्कार याचा उल्लेख केला आहे

देवराजयज्वानें केवळ नैघण्टुक काण्डावरच टीका लिहिली आहे तथापि त्यानें ऋग्वेदामधीलहि अवतरणें सर्व शब्दास दिलेलीं नाहींत व 'वचन शोधावयाचें आहे' ('निगमो अन्वेषणीय') ही पुस्ती त्यास अनेक शब्दास जोडावी लागली आहे तथापि त्यानें बऱ्याच विस्तृत प्रमाणावर वैदिक वाङ्मयाचा आपल्या टीकालेखनात उपयोग केला आहे.

**निघण्टु व संस्कृत भाषाकोश**--वैदिक निघण्टु व पुढील संस्कृत भाषेचे कोश यांची तुलना केली असतां फक्त 'महाव्युत्पत्ति' या बौद्ध कोशासारख्या काहीं कोशांचेंच वरील निघण्टूशीं साम्य दिसतें परंतु उत्तरकालीन कोश व निघण्टु यामध्यें फार अतर असून त्यांचा निघण्टूशीं फारसा सबंध असावा असें वाटत नाहीं त्याप्रमाणें जसे वैदिक निघण्टु हे विशिष्ट ग्रथाशीं सबद्ध असे आढळतात व विशिष्ट ग्रथातीलच शब्दाचा सग्रह करतात (अथर्वनिघण्टु निगमपरिशिष्ट इ०) तसे संस्कृत कोश हे विशिष्ट ग्रथाशीं सबद्ध असलेले आढळत नाहींत जरी काहीं शब्दाचे अर्थ विशिष्ट ग्रथातील वचनास अनुसरून दिलेले आढळतात तरी विशिष्ट ग्रथातील शब्दास अनुसरूनच एखादा कोश झालेला आहे, असें आढळत नाहीं तथापि हे कोश म्हणजे केवळ शब्दांच्या याद्याच नसून त्यात इतरहि माहिती उध्दृत केलेली मधून मधून आढळते निघण्टूमध्यें नामें व अव्ययें, याप्रमाणेंच धातूहि सगृहीत केलेले आढळतात परंतु कोशामध्यें फक्त नामें व अव्ययें याचाच सग्रह केलेला दिसून येतो यावरून नामपारायण आणि धातुपारायण अथवा कोश आणि धातुपाठ अशी विभागणी पूर्वीच झालेली असावी असें दिसून येतें निघण्टूची रचना गद्य असून कोशांची रचना पद्यमय असते व बहुधा ती अनुष्टुप् छदात आढळते मधून मधून आर्याहि दिसून येतात, व अभिधानरत्नमाला या कोशात तर अनेक प्रकारचीं वृत्तें आढळतात तसेंच निघण्टूची रचना वैदिक शब्दांचा अर्थनिश्चय करण्याकरितां केलेली आढळते तर कोशाचा मुख्य उद्देश जरी शब्दार्थांचेंच विवरण करण्याचा असला तरी पुष्कळशा कोशात केवळ महत्त्वाचे अथवा क्वचित योजले जाणारे शब्द सगृहीत केलेले असून त्याचा उपयोग मुख्यत कवींकरिताच असावा उदा० 'कवीना हित काम्यया' (धनंजय) 'कवीना सुखदेतवे' (धरणीकोश) 'कृपामुपत्य सता कवीना' (महेश्वर), 'कवे शीघ्रकवित्वाय' (शीघ्रबोधिनी) 'कविकण्ठभूषणार्थं' (हलायुध), 'सचित्तीना भूषण सत्कवीना' (वैजयंति) इ० अभिधानकोशाचें ज्ञान हें एक काव्याभ्यासाचें अग समजलें जात असे याप्रमाणें कोश हे निघण्टूहून रचना, स्वरूप व हेतु या तिन्ही बाबतींत भिन्न होते असें दिसून येतें तसेंच त्यामध्यें कालाचेंहि बरेंच अतर दृष्टीस पडतें अमरकोश तयार झाल्यानतर पूर्वीचे कोश बहुतेक सर्व मागें पडून नष्टप्राय झाले असाव, व अमरकोशापूर्वीच्या कोशाचा आपणास कोठें कोठें आलेल्या उल्लेखावरून व त्यांच्या अपरिपक्व स्वरूपावरून मात्र बोध होतो (शाश्वत-हलायुध)

संस्कृत भाषेंत पूर्वी शब्दकोशास कोश अभिधानकोश नाममाला, नामपारायण (धातुपारायण याच्या उलट) व निघण्टु (निघण्टु निघण्ट, जैन प्राकृत निग्घण्ट) इत्यादि नावें आढळतात सायणाचार्यांनीं आपल्या ऋग्वेदभाष्यांत एका ठिकाणीं निघण्टु शब्दानें एकार्थवाचक शब्दाच्या समूहाचा बोध होतो असें म्हटलें आहे 'एकार्थवाचिना पर्यायशब्दानां सघो यत्र प्रायेणोपदिश्यते तत्र निघण्टु शब्द प्रसिद्ध, तादृशेषु अमरसिंह-वैजयन्ती-हलायुधादिषु दश निघण्टव इति व्यवहारात्। (ऋग्वेद-गणपत कृष्णाजी प्रत सायणभाष्य-उपोद्घात पृ २२)

निघण्टु शब्द दक्षिणेकडे विशेष प्रचारात आहे व वैजयन्ती कोशाचा कर्ता आपल्या कोशास प्रशस्तीमध्यें वैजयन्तीनिघण्टु असें म्हणतो व साप्रतहि दक्षिणेकडे ग्रथाच्या यादीमध्यें सर्व कोश निघण्टु या सदराखालीं नमूद केलेले आढळतात परंतु निघण्टु शब्दानें वैदिक कोशाचा बोध होतो व सध्या निघण्टु हा शब्द विशेषेकरून वैद्यकीय कोशास लावलेला आढळतो उदाहरणार्थ धन्वन्तरिनिघण्टु, निघण्टुशेष, राजनिघण्टु इ०

संस्कृत शब्दकोशामध्यें मुख्यत आपणास दोन वर्ग आढळून येतात --एक एकार्थवाचक किंवा समानार्थवाचक शब्दाचा म्हणजे ज्या शब्दाचा एकच किंवा सारखा अर्थ आहे असे शब्द एकत्र देणारा व दुसरा अनेकार्थवाचक किंवा नानार्थवाचक म्हणजे ज्या एकाच शब्दाचे अनेक अर्थ होतात ते सर्व अर्थ एकत्र देणारा तथापि अशा तऱ्हेचे अगदीं एकमेकापासून स्वतत्र असे कोश फारसे उपलब्ध नाहींत व पहिल्या प्रकारच्या बहुतेक महत्त्वाच्या कोशात (अमर, वैजयन्ती) नानार्थवाचक शब्दहि एखाद्या

प्रकरणात किंवा परिशिष्टरूपानें दिलेले आढळतात हेमचंद्रानें मात्र पहिल्या प्रकारच्या शब्दाचा संग्रह ' अभिधानचिंतामणि ' या कोशात व दुसऱ्या प्रकारच्या शब्दाचा संग्रह ' अनेकार्थसंग्रह ' या नावानें स्वतंत्र केला आहे

**अमरपूर्व कोशकार**—आता अमरसिंहापूर्वी कोणते कोशकार होऊन गेले तें पाहू अमरसिंह आपल्या कोशाच्या प्रशस्तींत पूर्वीच्या कोशकाराचा उल्लेख करीत नाहीं तर केवळ 'समाहृत्यान्यतन्त्राणि' असें म्हणतो म्हणजे पूर्वीच्या कोशाचा यानें उपयोग केला होता एवढेंच दिग्दर्शित करतो तथापि अमरकोशावरील टीकेमध्यें काहीं जुन्या कोशकाराचीं नावें आपल्यास आढळतात या जुन्या कोशकारापैकीं कात्य हा सर्वांत जुना असावा याच्या कोशाचें नाव ' नाममाला ' (हें कदाचित सर्वसामान्य नावहि असू शकेल ) असें होतें कारण काव्यालंकारवृत्ति ( १ ३, ६ ) व काव्यानुशासन ( ६ १६ ) यामध्यें जें " नाममालाप्रतीक ' उल्लेखिलेलें आढळतें तें कात्याचें असावें असें मख कवीच्या आधारावरून महेंद्रसूरीनें विधान केलें आहे अमरसिंहापूर्वी होऊन गेलेला कात्यायन व हा कात्य हे एकच असावे कात्य आणि कात्यायन याचा अर्थ कोशकार एकच देतात तसेंच क्षीरस्वामीनें आपल्या टीकेमध्यें मुनि म्हणून ज्याचा उल्लेख केलेला आहे तो कात्य किंवा कात्यायनच असावा असें प्रो झकारिया म्हणतात परंतु रा कृ गो ओक आपल्या क्षीरस्वामीकृत टीकायुक्त अमरकोशाच्या प्रतींत मुनि हा व्याडि असावा असें मत देतात

" धन्वंतरिनिघण्टु " या वैद्यकीय कोशाचा कर्ता धन्वंतरि हाहि अमरसिंहापूर्वी होऊन गेलेला असावा. कारण धन्वंतरीच्या चुका अमरसिंहानें दाखविल्या आहेत असें क्षीरस्वामी आपल्या टीकेंत म्हणतो तसेंच क्षीरस्वामीनें वारंवार उल्लेख केलेला भागुरि हाहि त्याच्या मताप्रमाणें अमरसिंहापूर्वी होऊन गेला असावा हलायुधानें भागुरीचा प्रमाण म्हणून उल्लेख केलेला आहे ( १ २ ) याच्या कोशाचें नाव " त्रिकांड " होतें, असें रायमुकुट म्हणतो व त्रिकांड नावाच्या ग्रंथाचा उल्लेख अमरामध्यें आढळतो प्रत्यक्ष अमरकोशाचाहि त्रिकांड अथवा त्रिकांडी या नावानें उल्लेख केलेला दृष्टीस पडतो ( उदा पुरुषोत्तम–त्रिकांडशेष ) अमरसिंहानें आपली त्रिकांडात्मक वर्गीकरणपद्धति कदाचित् भागुरीपासून घेतली असावी ऑफ्रेटच्या म्हणण्याप्रमाणें भागुरीचा त्रिकांडकोश दक्षिणहिंदुस्थानात अद्यापि उपलब्ध आहे ( ऑफ्रेट संस्कृत ग्रंथ यादी २ ४७९० ). तसेंच रति अथवा रतिदेव आणि रभस अथवा रभसपाल हेहि अमरसिंहापूर्वी होऊन गेलेले असावे, असें म्हणतात

कोल्ब्रुक व विल्सन यांच्या म्हणण्याप्रमाणें अमरसिंहानें आपल्या आधारग्रंथात रभस याचा उल्लेख केला असावा. वररुचि या वैय्याकरण व कोशकाराचाहि अंतर्भाव काहीं टीकाकार अमरसिंहाच्या आधारग्रंथात करतात व रायमुकुट याच्या म्हणण्या प्रमाणें " लिंगविशेषविधि " या वररुचीच्या तंत्राचा उल्लेख तन्त्र या शब्दात अभिप्रेत असावा परंतु प्रत्यक्ष अमरानें याचा उपयोग क्वचित् केला असेल हा स्वतंत्र प्रश्न आहे

वाचस्पति हाहि एक प्राचीन कोशकार असावा याचा उल्लेख पुरुषोत्तमदेवानें आपल्या " हारावली "च्या अखेरीस केला आहे तसेंच हेमचंद्रानें आपल्या अभिधानचिंतामणीवरील टीकेच्या आरंभीं केला आहे वाचस्पतीचा आधार यादवप्रकाशानें आपल्या " वैजयंती " कोशाकरिताहि घेतला असावा त्यातील अनेक अवतरणावरून हा कोश वैजयंती कोश वगळून इतर सर्व कोशापेक्षा मोठा व अधिक माहितीनें भरलेला असा असावा

विक्रमादित्य ( कदाचित् साहसाक ) व वोपालित ( बोपालित ? षट्कोशसंग्रहात गोपालित असें रूप आढळतें याचा आधार हलायुधानें घेतलेला आहे ) हेहि दोन जुने कोशकार दिसतात

व्याडि हाहि नि संशय एक प्राचीन कोशकार असावा. याचा " लिंगानुशासन " या नावाचा एक ग्रंथ असून त्याचा अभिधानचिंतामणि टीकेच्या प्रस्तावनेमध्यें हेमचंद्रानें एक महत्त्वाचा आधारग्रंथ म्हणून उल्लेख केला आहे पुरुषोत्तमदेवानें आपल्या हारावली कोशाच्या अखेरीसहि याचा निर्देश केला आहे आणि वैजयतीकार यादवप्रकाश यानेंहि बहुधा याचा उपयोग केला असावा व्याडि व विंध्यवासी हे बहुधा एकच असावे ह्याचा ग्रंथ बराच मोठा असावा यास बौद्धधर्माचें चागलें ज्ञान असावें, हें त्यानें चौतीस जातकाचा उल्लेख केला आहे यावरून दृष्टीस पडतें

दुर्ग हाहि एक जुना कोशकार दिसतो याचा दुर्ग या नावाशीं नहमीं घोटाळा करण्यात येतो

उत्पलिनी, शब्दार्णव व समारार्णव या कोशाचा उल्लेख हारावली व मेदिनी कोशात आढळतो उत्पलमाला म्हणजेच उत्पलिनीकोश असावा काममूत्रावरील आपल्या टीकेमध्यें यशोधर, अभिधानकोश म्हणून उत्पलमालादि असें निवचन करतो उत्पलमाला हा कोश दक्षिणहिंदुस्थानांत अद्यापि अस्तित्वात असावा असें ऑफ्रेटच्या यादीवरून दिसतें ( ९६१ ४१०९ )

हारावलींत खालील श्लोक आढळून येतो ( ७ २७१, मुंबई १८८९ द्वादशकोशसंग्रह २७३ ) " शब्दार्णव उत्पलिनी ससारावर्त इत्यपि । कोशा वाचस्पतिव्याडिविक्रमादित्यनिर्मिता ॥ " याचा अर्थ असा लावता येईल कीं, शब्दार्णव हा वाचस्पतीचा, उत्पलिनी व्याडीचा व ससारावर्त विक्रमादित्याचा होय उत्पलिनी हा व्याडीचा आहे याबद्दल अमरटीकाचा पुरावा

आढळतो आपल्या काव्यकल्पलतावृत्तिपरिमलात दोन् ठिकाणीं उत्पलिनींतील अवतरणें घेताना तो 'व्याडिकृतोत्पलिनीमध्यात्' असे शब्द घालतो याविरुद्ध अमरावर टीका करतांना (५ २) रायमुकुट हा उत्पलिनी व व्याडि यांचा भिन्न संबंध दाखवितो. 'त्रिकाण्डोत्पलिन्यादीनि नाममात्रतन्त्राणि व्याडिवररुच्यादिप्रणितानि लिंगमात्रतन्त्राणि।' तथापि लिंगानुशासन हें व्याडिकृत आहे अशी काहीं खरीखोटी समजूत प्रचलित आहे, तिला उद्देशून रायमुकुटानें असें लिहिण्याचा संभव आहे

शब्दार्णव हें वाचस्पतिकोशाचें दुसरें नाव आहे याला पुरावा असा देतां येईल कीं, अमर १, १, २२ वर टीका करताना रायमुकुट 'सौरिर्श्रीवत्स दैत्यारिविष्वक्सेनजनार्दना ॥' हे शब्द शब्दार्णवांतील असल्याचें लिहितो परंतु रामनाथ आपल्या त्रिकाण्डविवेकात तेच शब्द वाचस्पतिकोशातील अवतरण म्हणून देतो

**कोशरचना**—प्रस्तुत उपलब्ध असलेल्या कोशांकडे वळण्यापूर्वी कोशरचनेसंबंधी जरूर ती माहिती सांगितली पाहिजे. कोशाचा उपयोग करण्यापूर्वी त्यांची–विशेषत नानार्थकोशाची–रचना कशी असते हें समजावून घेणें अगत्याचें आहे बहुश त्या त्या कोशातील विषयाचा अनुक्रम व त्यातील शब्दांचे लिंग वगैरे संबंधीं माहिती प्रस्तावनेंत म्हणजे परिभाषांतून देण्याची कोशकाराची वहिवाट आहे शब्दकोश समजण्यास या परिभाषांचा उपयोग किल्लीसारखा होत असतो

समानार्थ अथवा एकार्थ कोश बहुधा विषयवारी रचलेले असतात यांतील पुष्कळ भागांची तुलना ल्हान ल्हान कोशा बरोबर करतां येईल उदा अमरसिंह आपला शब्दकोश तीन काण्डांत विभागतो प्रत्येक कांडात पुन्हां वर्ग केलेले असतात पहि ल्या कांडात स्वर्ग, देवता, देवशत्रु जलचर व जलवनस्पतींकरिता शब्द सांगितलेले आहेत दुसरें कांड सर्वांत मोठें आहे त्यात पृथ्वी, चार वर्ण व त्यांचीं कर्मे यासंबंधीं शब्द दिले आहेत तिसरें सामान्य कांड त्यात विशेषेंकरून मिश्रशब्द, व तीन परिशिष्टें आहेत दुसऱ्या सर्व एका कोशातून हाच किंवा अगदीं याचसारखा अनुक्रम आढळतो विशेष सांगण्यासारखें इतकेंच कीं, ज्या विषयाला अमरानें भडीच कांहि खर्ची घातले आहेत त्यालाच हलायुधानें अभिधानरत्नमालेंत चार, यादवानें वैजयंतींत पांच व हेमचंद्रानें अभिधानचिंतामणींत सहा अशीं कांडि खर्ची घातलीं आहेत

एकार्थवाचक शब्दाचा अनुक्रम वर्णानुसार देण्याची पद्धति आढळत नाहीं फक्त नानार्थकोशातून ही पद्धति आढळते ती सुद्धा जुन्या काळांत नाहींच तथापि यात कांहीं कमीपणा आहे असें नाहीं कारण कोशाचा उपयोग अर्थप्रतिपादनाकडे नव्हे-तर महत्त्वाच्या व विरळ सापडणाऱ्या शब्दाचे समूह तोंडपाठ करण्याच्या कामीं होत असे शिवाय केवळ विषयवारी रचने व्यतिरिक्त आणखी एक बाह्यस्वरूपावरून व अत्यंत प्राचीनकाळापासून प्रचारात असलेलें असें रचनातत्त्वहि आढळून येतें तें असें कीं, एकार्थ किंवा अनेकार्थ शब्दाच्या स्पष्टीकरणाचा विस्तार जसा असेल त्याप्रमाणें म्हणजे मुख्य विषयाला लागणाऱ्या समानार्थक शब्दाची संख्या किंवा एका शब्दाचे जे निरनिराळे अर्थ असतील त्यांची संख्या किंवा थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे विषयविवेचनाचा विस्तार जसा असेल त्याप्रमाणें–त्यांचा अनुक्रम ठरत असे उदा हारावलींत स्पष्टीकरणाच्या विस्तारानुरूप शब्दाचा अनुक्रम दिलेला आहे प्रथम पूर्ण श्लोकांचीं स्पष्टीकरणें नंतर अर्धश्लोकाचीं व नंतर पादस्पष्टीकरणें (द्वादशकोशग्रंत ७) प्राकृत कोश 'पाइअलच्छी (इ स ९७२) यांत सुद्धा याप्रमाणेंच म्हणजे प्रथम 'एक गाहा, नंतर गाहद्ध व नंतर गाहाचलण,'-विस्तारचीं स्पष्टीकरणें अनुक्रमानें दिलीं आहेत

नानार्थकोशातूनहि विषयविस्तारानुरूप अनुक्रम धरण्याची पद्धति यापेक्षा अधिक प्रमाणात आढळते सर्वांत मोठीं वर्गनें प्रथम व नंतर ल्हान ल्हान असा नियम आढळतो उदा शाश्वत कोश अनेकार्थध्वनिमंजरी, हारावलींतील नानार्थकोशविभाग व अजयकोश (यात ३,४ श्लोकाचीं वर्गनें सुद्धा आढळतात) याचे विरुद्ध धरणीकोशात ल्हान वर्गनें आधीं दिलेलीं आहेत 'पादे पादद्वये श्लोकरनेकार्थसमुच्चय ।' जे कोशकार अनेकार्थशब्द अर्थसंख्येच्या अनुक्रमानें देतात, त्याना तसें करण्यात असा एक फायदा मिळतो कीं, जे शब्द अर्थानें, व्युत्पत्तीनें अगर दुसऱ्या काहीं कारणानें परस्पराशीं संबद्ध असतात ते सर्व एका ठिकाणीं आणता येतात उदा शाश्वत १४६ 'हुताशने निशानाथ सहस्रकिरणे तथा। तमोनुद समौ द्वौ विरोचनतमोपहौ ॥' याचे उलट अमरानें अत्यव्यंजनानुसार शब्दाचा अनुक्रम लावल्यानें त्याला तमोनुद, विरोचन व तमोपह हे शब्द तीन निरनिराळ्या जागीं वर्णाचे लागले आहेत धरणीकोशासंबंधीं सांगतांना त्याच्या प्रस्तावनेंतील सातवा श्लोक येथें दिला म्हणजे पुरे या श्लोकात विपर्यासाचा स्पष्ट निर्देश आहे 'क्वचिदेषां विपर्यासो लिंगार्थस्यानुरोधत । यथेह भोगिभोगिन्योर्यथा विवररन्ध्रयो ।' अक्षरसंख्येनुसार शब्दानुक्रम ज्यात दिलेला आहे अशा यादवकृत वैजयंतीच्या नानार्थविभागात विषम विस्ताराचे (विषमाक्षरा) अनेकार्थ शब्द पाच निरनिराळ्या विभागात घातले आहेत (पान २६९, २७२ २७४, २७६, २८०, उदा 'वृक्षेऽद्रौ शिखरैगनगागमा ' २७०, २)

कोशातील एकार्थवाचक शब्द अथवा नानार्थवाचक शब्दाचे अर्थ ज्यावेळीं अमुक एका श्लोकविभागांत घालावयाचे असतात त्यावेळीं जागा शिल्लक असल्यास ती खालीलसारख्या शब्दांनीं भरून काढतात 'मत, मता, मतम्, स्यात्, भवेत्, उच्यते, इति कथ्यते सद्भिः, प्राहु सन्त, प्रचक्षते प्राज्ञा वगैरे ज्या शब्दाचा अर्थ द्यावयाचा त्याला 'शब्द' 'ध्वनि,' 'आख्या,' असा शब्द जोडतात, उदा उणा. सू १३० २ वर उज्ज्वलदत्त –" मा शब्द ", शाश्वत ६६ प्रतिसरध्वनि, ३६ करणाख्या शाश्वत व हलायुध याच्या ग्रंथात हें वारंवार आढळून येतें एकार्थवाचक शब्द किंवा अर्थ याची सख्या नमूद करण्याचाहि एक प्रकार दृष्टीस पडतो, उदा 'त्रय' अमर ३ ३,१४९,१९४ शाश्वत, २०० हलायुध १,६६,१४९ पञ्चस्वर्थेषु शाश्वत ६६ 'हरयो दश' हला ५ ७० वगैरे शाश्वत व हलायुधामध्यें अनेक उदाहरणें सापडतात अनेक कोशकारांना एका शब्दाचा अर्थ देण्याकरिता सबंध वाक्येंच्यावाक्यें लागतात उदा शाश्वत १२१, हलायुध १,९० या पाल्हाळपद्धतीचे अवशेष अर्वाचीनांच्या ग्रंथातूनहि दिसून येतात सामान्यत असा नियम बांधता येईल कीं, शब्दार्थ देण्यात जितका पाल्हाळ अधिक तितका तो कोशकार अधिक प्राचीन असला पाहिजे

अमरसिंहप्रमुख अनेक कोशकारांनीं विवेचनाची मर्यादा अमुक एक श्लोकविभागावर ठरवावयाची हें तत्त्व सोडून देऊन विषयाची मांडणी थोडक्यात कशी करता येईल याकडेच लक्ष दिलेलें आहे व तसें करण्यात त्याना यशहि आलेलें आहे यादव व हेमचंद्र हे पादपूरणार्थक शब्द कमी करून टाकण्याचे बाबतींत सर्वांत पुढें गेलेले आहेत सक्षेप करण्याचें एक मोठें साधन म्हणजे समानार्थक शब्द व शब्दार्थ एका समासात देणें हें होय उदा " आकाशविहायसी " (अमर), " पवित्र कुशपूतयो " (शाश्वत), दवदावौ (हलायुध) नानार्थकोशातून एकशेषद्वद्व समास फार दृष्टीस पडतो ज्या शब्दाचे दोन अर्थ असतील ते प्रथमेच्या द्विवचनात, तीन अगर अधिक अर्थ असतील ते प्रथमेच्या अनेकवचनात व त्या शब्दाचे अर्थ त्या त्या विभक्तिवचनासहित द्वद्वसमासात घातलेले असतात " गणा प्रमथसख्यौघा ग्रावाणौ पर्वतोपलौ " (वैजयतीच्या नानार्थविभागातून) शाश्वत (५९५–६२७) वगैरेंतून हे एकशेष पुष्कळच आढळतात अमरानें शब्द व अर्थ याशिवाय त्याचीं लिंगेंहि दिलेलीं आहेत त्यानें पूर्वपद्धति सोडून देऊन जेथें एखाद्या शब्दाचे सर्व अर्थ एकलिंगीच असतील त्या ठिकाणींच फक्त एकशेषाचा उपयोग केलेला आहे उदा० " सुरमत्स्यावनिमिषौ " किंवा " खश्रावणौ नभसी ' असें न म्हणता " नभ ख श्रावणो नभ " (शाश्वत ६३० प्रमाणें शब्दाची पुनरावृत्ति) असें म्हटलें आहे याशिवाय समानार्थवाचक शब्द जेव्हा एकलिंगी असतील तेव्हाच त्याचा समास केला जातो. उदा " स्वर्गनाकत्रिदिवत्रिदशालया " (सर्व पुल्लिंगी शब्द) याविषयीं आणखी जास्तीकमी माहिती अमरकोशाच्या टीकाकारांनीं दिलेली आढळते

एका शब्दाचे अनेक अर्थ निरनिराळे न सागतां समासपद्धतीनें सांगितल्यामुळें चुका व गैरसमजुती याना जागा रहात असे उदा हे समास पहा " (सुधा) गङ्गेष्टिकास्नुहीमूर्वापीयूषेषु, " –(शाश्वत), " (वली) मध्यमरसोर्मिजीर्णत्वग्गृहदारुषु " –(वैजयती), " (निमित्त) हेतुचिह्नागन्तुदैवादेशपर्वसु " –(निका) यापैकीं पहिल्या समासात गङ्गेष्टिका हा एक शब्द कीं गगा व इष्टिका (वीट) असे दोन शब्द समजावयाचे याबद्दल सशय राहतो तथापि ही समासपद्धति त्याज्यहि समजत असत असें आपणास प्राचीन काळींहि आढळतें अजयकोशातील प्रस्तावनेंत ग्रंथकर्त्यानें असें म्हटलें आहे कीं, " तीन अर्थांपर्यंतच मी द्वंद्वसमास करून बहुवचन लिहिलें आहे चार अगर अधिक अर्थांचा समास केलेला नाहीं " (" त्रिष्वेव बहुवचन कृत न चतुरादिषु । ") यावरून अजय जेव्हा सुधागङ्गेष्टिकाचूर्णस्नुहीषु " असें लिहितो तेव्हा त्या ठिकाणीं गङ्गा व इष्टिका असे निरनिराळे शब्द घेतां येत नाहींत हें उघड आहे असो

जे शब्द समानार्थक नाहींत ते एकमेकांपासून वेगळे करता यावेत व त्यांचा अनेकार्थाप्रमाणें अर्थ लावूं नये म्हणून दोन साधनांचा उपयोग करीत अशा ठिकाणीं अथ (अथो) व तु (आणि पुनर्) हीं अव्ययें योजीत ज्या शब्दाच्या पूर्वी अथ असेल किंवा ज्याच्या मागून तु येईल तो शब्द पूर्वशब्दाबरोबर घेता कामा नये " त्वन्तायादि न पूर्वभाक् " (अमर), " न पूर्व शब्दभागथपुनस्त्वन्तमथादित " (वैजयती), ' त्वन्तायादि न पूर्वगौ ' (हेमचंद्र) एका विषयाला ठराविक जागा पुरत नसेल म्हणजे त्या विषयाचा आरंभ व समाप्ति श्लोकाच्या पादारंभावरोबर अथवा पादसमाप्तीवरोबर जुळत असेल तर तेथें स्वाभाविकपणें विरामचिन्ह असतेंच तशींच अथ व तु हीं एक तऱ्हेचीं कृत्रिम विरामचिन्हें होत. ही पद्धत कदाचित् अमरसिंहानें प्रथमच उपयोगात आणली असेल

नानार्थकोशातून असा एक नियम आढळतो कीं, अनेकार्थवाचक शब्द प्रथम व त्यानंतर त्याचे अर्थ दिलेले असतात विश्वकोशाच्या प्रस्तावनेंत (२०) असें म्हटलें आहे –" नानार्थे प्रथमान्तोऽत्र सर्वत्रादौ प्रदर्शित । सप्तम्यन्तेषु शब्देषु वर्तमान मुनिभिर् ।" मेदिनीकोशाची (११) परिभाषा जवळ जवळ याच शब्दात दिलेली आहे अनेकार्थसमुच्चय (२) हेमचंद्र लिहितो –" उद्देश्यवचन पूर्व पश्चादर्थप्रकाशनम् । ' पण " विधौ भूपे प्रजापति " असा प्रयोग करीत (मेदिनीकोशात मुर्धा हा

आढळतो, ३ ३,१६७ ) नतर फक्त "प्रजापतिर्विधौ भूपे" ( विश्वकोश ) असें आढळतें अमरकोशात व वैजयतींत हा नियम आढळत नाहीं तथापि या व इतर कोशातून अनेकार्थवाचक शब्द वर्णानुक्रमानें लावल्यानें असल्या चुका होत नाहींत नतरच्या कोशकारानीं–उदा हेमचद्रानें–वर्णनपध्दतींत अधिक सक्षिप्तता आणली इतकेंच नव्हे तर गैरसमजुती राहू नयेत म्हणून विशिष्ट साधनें उपयोगात आणिलीं तशातूनहि नवीनानीं त्यांचा अर्थ लावण्यात चुका केल्या आहेत, त्याचीं कारणें परिभाषाकडे दुर्लक्ष, टीकाचा अभाव व सदोष हस्तलिखितें व प्रकाशनें हींच असलीं पाहिजेत नतरच्या कोशकारानीं जुने कोश वापरताना चुका केल्या असणें सभवनीय व साहजिक आहे त्याचें टीकात्मक परीक्षण पुढें होणें जरूर आहे मध्या हें काम होणेंच मुष्किलीचें आहे कारण कांहीं कांहीं महत्त्वाच्या कोशाचें विश्वासाई पध्दतीनें प्रकाशनहि अजून झालेलें नाहीं

नानार्थशब्दकोशाचीं वरील वर्णनात आलेलीं अशीं कांहीं विशिष्ट लक्षणें थोडक्यात सागितलीं पाहिजेत वर्णनपद्धती विषयीं सागावयाचें म्हणजे अगदीं प्राचीन प्रथान अनेकार्थवाचक शब्द व त्याचे अर्थ एकमेकाजवळ प्रथमाविभक्तींत ( किंवा 'विदु कृष्णा पिप्पली द्रौपदीमपि ' शाश्वत २८ अशा ठिकाणीं द्वितीयेंत ) ठेवीत असत असें वाटतें असें करताना अनेकार्थवाचक शब्दाची पुनरुक्ति करण्याची चाल होती उदा "वल शक्तिर्वल सैन्य बल स्थौल्यम्' वगैरे शाश्वतात(६२८–६३५) अशी पुनरुक्ति पुष्कळच आढळते इतर ठिकाणींहि असली शब्दावृत्ति अथवा पुनरुक्तता फार येते उदा प्राचीन असलेल्या अनेकार्थध्वनिमजरींत तिचा उपयोग केलेला आहे अनेकार्थवाचकाची पुनरुक्ति अनेकार्थवाचक अमुकच शब्द होय हें दाखविण्याकरिता करीत हें उघड आहे ज्या प्रथानुन अनेकार्थवाचक शब्द व त्याचे अर्थ प्रथमाविभक्तींत एकमेकाजवळ दिलेले असतात व शब्दाचा अनुक्रम वर्णानुरूप वगैरेहि नसतो अशा प्रथात या गोष्टीची जरूरी भासते शाश्वतानें ( ६३२ ) जर "क्षीरमम्बु पय क्षीरम्" असें न लिहिता "क्षीरमम्बु पय " इतकेच लिहिलें असतें तर कोशकाराच्या मनात कोणत्या शब्दाचें स्पष्टीकरण करावयाचें हातें याविषयीं सशय उत्पन्न झाला असता परतु हा प्रश्न अमरकोशांतील " वणिक्पथ पुर वेदो निगम " या उदाहरणाच्या बाबतींत सभवतच नाहीं येथें निगम हा अनेकार्थवाचक शब्द होय कारण अमर हा अन्त्यव्यजनानुसार शब्दानुक्रम देतो व वरील अवतरण " म–मन्त " विभागां तील आहे तथापि अनेकार्थवाचक शब्द निरनिराळ्या रूपात म्हणजे निरनिराळ्या लिंगी वगैरे असताना त्याचे अर्थ सोप्या रीतीनें सागावयाचे असल्यास ही युक्ति अवलबिता येते उदा 'सहा मास सहो वलम् ।" ( शाश्वत ), "सहो वल सहा मार्ग '(अमर) अर्वाचीन कोशकार फक्त लिंगभेद दाखविण्यापुरताच शब्दावृत्तीचा उपयोग करतात उदा महेश्वराचा विश्वकोश २३ ' स्पष्टाय लिंगभेदाय क्वाप्यत्र पुनरुक्तता।" त्याचप्रमाणें धरणीदास " स्पष्टाय लिंगभेदाय क्वचिदावृत्तिरिष्यते।" अजयपालाचे शब्द या पेक्षाहि निश्चित स्वरूपाचे आहेत " विना लिंगविशेषेण नैवात्र पुनरुक्तता ' तसेंच मेदिनीकार " शब्दावृत्तिर्न दोषाय लिंगैक्ये "

अनेकार्थवाचक शब्द व त्याचे अर्थ जवळ जवळ देणें हीच सर्वांत जुनी वर्णनपद्धति समजली पाहिजे, कारण ती सर्वांत स्वाभाविक आहे तथापि उपलब्ध असलेल्या अति प्राचीन कोशातून अर्थवाचक शब्द पुष्कळदा सप्तमींत दिलेले आढळतात या पध्दतींत अर्थ अधिक स्पष्ट होतो यात शका नाहीं व अनेकार्थवाचक शब्दाची पुनरावृत्ति ( प्रथमेचीं रूपें निरनिराळीं असतील तेवढ्या बाबतींत सोडून ) करण्याचें कारणहि रहात नाहीं असें असतानाहि प्रथमेचीं समानरूपेंहि जेथें पुनरुच्चारित आढळतात ( उदा ' परिग्रह परिजने शपथच परिग्रह ।" शाश्वत ३१ ) तेथें त्याना पूर्वपद्धतीच्या शिल्लक अवशेषांवांचून दुसरी किंमत देता येत नाहीं नतरच्या कोशकारानीं अनेकार्थवाचक शब्द प्रथमेंत व त्याचे अर्थ सप्तमींत असा नियम केलेला आढळतो ( विश्व २२६, मधु रेश–"नानार्थे प्रथमान्त स्यात्सप्तम्यन्ते तु वर्तते ।" ) अजयपालानें हा नियम कडक रीतीनें पाळला आहे, हेमचद्रानें तसा पाळ लेला नाहीं, अयात त्यामुळेंच केवळ त्याच्या अनेकार्थकोशास कमीपणा आलेला आहे असें नाहीं

शब्दरचना करताना कांहीं तत्त्वें–बहुतेक सर्व तत्त्वें–एकाच वेळीं पाळलीं आढळतात एकार्थशब्दकोशांतून आढळणारा जो विषयविस्तारानुरूप शब्दानुक्रम त्याविषयीं पूर्वी लिहिलेंच आहे या व्यतिरिक्त आणखी खालील तत्त्वें नमूद करतां येतील

वर्णानुक्रमानें रचना करणें, मग ती अन्त्यव्यजनानुसार असो, प्रथमवर्णास ( स्वर अथवा व्यजनास ) अनुसरून असो किंवा एकाच वेळीं अन्त्यव्यजन व प्रथम वर्ण या दोहोंनुसार असो सर्वांत जुनी पद्धति अन्त्यव्यजनानुसार रचना करण्याची होय अमरकोशातील नानार्थवर्गांत ( ३.३ ) हे एकच तत्त्व अनुसरलेलें आढळतें

याठिकाणीं लक्षात घेण्यासारखी अशी एक गोष्ट आहे कीं, कांहीं कोशकार मध्ययुगीन वर्णमालेस प्रमाण मानतात म्हणजे क्ष हें महमीच्या वर्णमालेच्या शेवटीं आणलेलें एक निराळें अक्षर समजतात उदा त्रिकाण्डशेष व मंखकोश यांतून 'अक्ष' सारखे शब्द ' षान्त ' खालीं न पाहतां ते ' क्षान्त ' नंतरच्या एका निराळ्या सदराखालीं ' क्षान्त ' वर्गांत शोधिले पाहिजेत

प्रथमवर्णानुसार शब्दरचना वैजयन्ती, देशीनाममाला व अजयकोश ( यात क्ष नें आरंभ झालेले शब्द शेवटीं आहेत ) यातून आढळते एकाच वेळीं अंत्य व्यंजन व प्रथम वर्ण या दोहींनुसार शब्दरचना—उदा त्रिकाण्डशेषातील नानार्थवर्ग, अनेकार्थ समह व मेदिनीकोश यातून आढळते वर्णानुक्रमानें शब्दरचना करण्याचे बाबतींत भारतीय त्यावेळीं फारसे पुढें गेलेले दिसत नाहींत म्हणून प्रथमाक्षरानुसार शब्दरचना करताना त्याचे पुढील स्वर किंवा व्यंजनें याजकडे लक्ष दिलें जात नाहीं उदा अजयकोशात एकामागून एक " गो, गौर, गुरु, गुण, ग्रहण, गर्भ, ग्राह, गव्य, गोघा, " असे शब्द येतात फक्त अनेकार्थसमह, देशीनामाला व मेदिनीकोश एवढेच या बाबतींत अपवाद आहेत या कोशातून स्वरक्रमाकडे म्हणजे प्रथम व्यंजनापुढें जोडून अगर निराळ्या येणाऱ्या स्वराकडेहि लक्ष पुरविलेले आढळतें उदा अनेकार्थसंग्रहात ( २ १७४–१७८ ) 'त्' नें सपणारे व 'प्' नें आरंभ होणारे शब्द खालील क्रमानें दिलेले आहेत –पक्ति, पङ्क्ति, पत्ति, प्राप्ति, पित्सत, पीत, पीति, प्रीति, पुस्त, प्लुत, पूर्त, पृषत्, प्रेत, पोत प्रोत

शब्दाच्या अक्षरसंख्येनुसार त्याचा अनुक्रम ठेवण्याचाहि प्रघात फार आढळतो अमरकोशात हा नाहीं याविषयीं लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी कीं, शेवटचें व्यंजन असणाऱ्या शब्दात तें व्यंजन विश्व व मेदिनीकोश ( धरणीकोशाहि ) पूर्ण अक्षरा प्रमाणें धरतात उदा ककुभ् ( विश्व ) त्र्यक्षरी शब्दाखालीं सापडतो व यक्षराट् चतुरक्षराखालीं सापडतो

वैजयतींत अक्षरसंख्या व प्रथमवर्ण शिवाय करून लिंग हेंहि एक आणखी रचनातत्त्व मानलें आहे

विश्वप्रकाशात अन्त्यव्यंजन व अक्षरसंख्या याशिवाय शब्दाचें प्रत्यय लागून जें रूप तयार झालें असेल त्यासहि अनुसरून शब्दरचना केली आहे

लिंगनिर्देश —अनेक कोशातून अर्थाबरोबरच लिंगहि दाखविलेलें असतें म्हणजे नामानुशासन व लिंगानुशासन एकत्र केलेलीं असतात उदा अमरसिंहाच्या कोशाचें नाव 'नामलिंगानुशासन' म्हणजे नाम व लिंग याचें अनुशासन ( नामाच्या लिंगाचें अनुशासन नव्हे ) असें आहे कित्येक कोशकार लिंगाचा अतर्भाव नामाबरोबरच न करता त्याचा निराळा विभाग करून ( लिंगभेद किंवा लिंगसंग्रह असा ) ग्रथाच्या शेवटीं जोडतात ज्या कोशातून लिंगानुसार शब्दरचना केलेली आहे असेहि कोश पूर्वी होते उदा वैजयतीचा नानार्थविभाग हीं कोशाच्या रूपात दिलेलीं लिंगानुशासनेंच होत अशीं उदाहरणें बोपालित याचा कोश, अमरमाला व रत्नकोश याचीं देता येतील

लिंगनिर्देश कोणत्या पध्दतीनें केलेला आहे यासबधीं कोशाच्या परिभाषातून माहिती दिलेली असते महत्त्वाच्या परिभाषा अमरकोश, वैजयन्ती, व मेदिनीकोश या कोशाच्या होत तदनुसार लिंग हें रूपभेदानें अथवा लिंगविशेषविधीनें ( म्हणजे स्पष्ट लिंगनिर्देश करून ) दाखविलें जातें साधारणमानानें व्याकरणाच्या रूपावरून ( म्हणजे बहुतेक प्रथमेच्या एकवचनावरून ) "प्रायशो रूपभेदेन" लिंग ओळखलें जातें नानार्थकोशातून अनेकार्थवाचक शब्दाचे निरनिराळ्या लिंगीं निरनिराळे अर्थ जेथें असतील तेथें त्या शब्दाची पुनरावृत्ति करतात उदा विश्व " मित्र सुहृदि मित्रोऽर्के" किंवा "पुमान्, ना, पुंसि, नरि, स्त्री, स्त्रियाम्, योषिति, नपुंसके, क्लीब, षढे" इ० शब्दानीं लिंगाचा स्पष्ट निर्देश करतात वैजयतींत पण ( षढ, षड ), क्ली ( क्लीब ), नपुम ( नपुसक ) अशीं संक्षिप्त रूपें आढळतात ज्या शब्दाला अमुक एक लिंग निषिद्ध सांगितलें असेल तेथें तो शब्द इतरलिंगी असतो ( 'निषिध्दलिंग शेषार्थम्' ) उदा वज्रमस्त्री' म्हणजे वज्र हें पुल्लिंगी व नपुसकलिंगी आहे जेथें द्वयो' म्हटलें असेल तेथें पुल्लिंगी किंवा स्त्रीलिंगी समजावयाचें, अर्थात् द्विहीन किंवा द्वयहीन म्हणजे नपुसकलिंगी

तीनलिंगी शब्द ( उ स्फुलिंग, मडल वगैरे नामें व विशेषणें ) त्रिषु अशा शब्दानें निर्देशितात ज्या कोशातून लिंगभेद रूपभेदानें दर्शविला जातो तेथें 'त्रिषु' याच्यापुढें लिंगेषु न समजता अर्थेषु' समजावयाचें असतें ( तुल शाश्वत १०१,१८५, हलायु ५,६० ) ' त्रिलिंग्या त्रिष्विति पदम्' हा नियम अमरानें पूर्वीच्या कोशकाराच्या पद्धतीला विरुद्ध म्हणून प्रथमच केला असावा वैजयतींत जे शब्द "स्वतो न वाच्यवशात" त्रिलिंगी आहेत ( उदा मण्डल ) त्याच्यामध्यें व विशेषणांमध्यें भेद दाखविला आहे पहिल्याला त्रिलिंग व दुसऱ्याला वाच्यलिंग असें म्हणतात ( परिभाषा ७ ) "त्रिष्वित्युक्तिर्वाच्यलिंगे त्रयीशब्दस्त्रिलिंगके।" उ 'त्रिलिंग' मण्डलम् २६२,१३०, "त्रयीस्फुलिंगा" ११,६१ (अमर–त्रिषुस्फुलिंगा) "जीव' प्राणे त्रयी, ना तु जन्तावात्मनि गीष्पतौ, त्रिषु जीवति" २३२,६६ ) इतर अनेक कोशात विशेषणात्मक शब्दाना ' त्रिलिंग ' व ' वाच्यलिंग ' दोन्ही लावतात याशिवाय अन्यलिंग, अर्थवलिंग, भेद्यगामिन, अन्यवत्, अभिधेयवत्, वाच्यवत् वगैरेहि लावतात

**अमरकोश**—अमरसिंह या ग्रथकर्त्याच्या नावावरून तो रजपूत असावा ग्रथाचें खरें नाव 'नामलिंगानुशासन' असून त्याला त्रिकाड अथवा त्रिकाण्डी सुद्धा म्हणतात यात १५०० श्लोक असून बहुतेक अनुष्टुप् छदात आहेत तीन काडापैकीं प्रत्य काचे वर्ग केलेले आहेत

अमर हा निःसंशय बौद्ध होता. मंगलाचरणावरून हें स्पष्ट होतें (बुद्धाचा स्पष्ट निर्देश बौद्धेतरांनां न दुखविण्याकरितांच केला नमावा). बुद्धाचीं नावें ब्राह्मणी देवतांच्या नांवांच्या अगोदर दिलेलीं आहेत यावरूनहि हेंच सिद्ध होतें. बाकी व्याडीप्रमाणें याखेरीज फारसें बौद्धनिदर्शक अमरांत नाहीं. अशी एक आख्यायिकाहि आहे कीं, शंकराचार्यांच्या काळीं बौद्धांचा जो छळ झाला त्यांत अमरकोशासहित त्याचे सर्व ग्रंथ यांचा नाश करण्यांत आला.

अमरकोशाचा काल निश्चित करणें–विशेषत. तो आपल्य. पूर्वीच्या ग्रथकारांचीं नावें देत नाहीं म्हणून–फार अवघड आहे. या प्रश्नासंबंधीं अनेकांनीं लिहिलें आहे कृष्णाजी गोविंद ओक यांनीं आपल्या प्रस्तावनेंत 'द्वौ द्वौ माघादिमासौस्यादृतुस्तैरयनं त्रिभि' या कालवर्गांतील श्लोकावरून क्षीरस्वामीनें 'माघाद्युपक्रमस्ततोयनारम्भात्' असें विवेचन केलें आहे व उत्तरायन माघांत होत असे असें सांगितलें आहे, तसेंच "हेमन्तादि वत्सरस्यारंभ." या क्षीरस्वामीच्या विधानावरून अमरसिंह पंधरा सोळाशें वर्षांपूर्वी होऊन गेला असावा असें म्हटलें आहे. रासच दुसरें प्रमाण त्यांनीं असें दिलें आहे कीं, अमर हा चंद्रगोमीच्या व्याकरणाचा अनुयायी नसून पाणिनीच्या व्याकरणास अनुसरतो म्हणून तो चंद्रगोमीच्या पूर्वी होऊन गेला असावा. अर्थात् अमरसिंहाचा काल इ. स. चवथें शतक होय यासंबंधीं प्रो. झकरिया म्हणतातः

दंतकथेनुसार विक्रमादित्य नांवाच्या राजाच्या दरबारांत नऊ रत्नें होतीं. अमरसिंह, कालिदास व वराहमिहिर हीं त्यांत होतीं. यापैकीं वराहमिहिर हा सहाव्या शतकांतील आहे. म्हणून अमरकोशहि ५५० च्या सुमारास झाला असावा. अर्थात ही दंतकथा किती विश्वासार्ह आहे, त्याच्यावरच सर्व अवलंबून आहे गया येथील ९४८ सालच्या लेखांत विक्रमादित्याच्या दरबारांतील नऊ रत्नांपैकीं जो अमरदेव त्यानें गयेला एका बुद्ध मूर्तीची स्थापना केली व एक देऊळ बांधलें असा उल्लेख आहे म्हणतात. त्यांत अमरसिंहाला अमरदेव म्हटलें आहे तसें इतरत्र कोठेंहि म्हटलेलें आढळून येत नाहीं त्यांतून जरी हा लेख खरा व त्याचें भाषांतर खरें मानलें तरी त्यावरून फार तर ९४८ सालीं लोक काय समजत होते याचा बोध होऊं शकेल

अमरकोशाचें चिनी भाषेंत ५५० च्या सुमारास भाषांतर झालेलें होतें अशी एक समजूत होती. बुनयु नंजिओ यानें ही चुकीची आहे असें दाखविलें आहे एवंच वराहमिहिर व अमरसिंह हे समकालीन होते या अनिश्चित दंतकथेपासून फारसा बोध होत नाहीं. अमरसिंहाचें महत्त्व जाणून व त्याजविषयीं आदरभाव असल्यामुळें नंतरच्या लोकांनीं त्याला प्राचीन काळीं घातलें असावें हें मात्र शक्य आहे. कारण त्याच्या ग्रंथांतून तशा काळाचीं चिन्हें दिसत नाहींत. ज्याचा काळ कांहींसा खात्रीनें अनुमानिता येतो असा जो हलायुधाचा प्राचीन कोश तो अमरकोशापेक्षां पुष्कळच प्राचीन असल्याचें स्पष्ट दिसतें. बाकी भारतीय वाङ्मयात साधी व क्लिष्ट रचनापद्धति एकाच वेळीं प्रचलित असलेली आढळून येते, हें विसरून चालणार नाहीं.

वैय्याकरण ग्रंथकारांत ज्याप्रमाणें पाणिनी त्याचप्रमाणें जवळ जवळ कोशकारांमध्यें अमर समजतात त्याच्या पूर्वीचे ग्रंथ (कदाचित शाश्वत सोडून?) नाहींसे झालेले दिसतात अमरकोशाचा हिंदुस्थानात व इतरत्र हिंदुस्थानाबाहेरहि प्रसार झालेला आढळतो. या कोशाच्या अनेक पुरातन हस्तलिखितें सगळीकडे आढळतात. ग्रंथकर्ता बहुतेक उत्तरहिंदुस्थानांतील असल्यामुळें त्या प्रांतात त्याचा ग्रंथ विशेष प्रचलित आला. ११८५ सालच्या नेपाळांत सांपडलेल्या एका हस्तलिखितात प्रत्येक कांडाच्या शेवटचे श्लोक गाळलेले आढळतात नेपाळांतील कीर्तिचंद्रानें केलेल्या अमरकोशाच्या तिबेटी भाषांतराचाहि येथें उल्लेख करणें जरूर आहे. बोथलिंगनें त्याची प्रस्तावना व पहिल्या स्वर्गवर्गांतील दहा श्लोक जर्मन भाषांतरासहित दिलेले आहेत अमरकोशाची नक्कल मागाहून पुष्कळ झाली कांहीं कोश तर अमरकोशाच्याच वाढविलेल्या आवृत्त्या आहेत. मोग्गलानाचा "अभिधानप्पदीपिका" हे अमरकोशाचेंच एक निराळें स्वरूप होय. अग्निपुराणांतील कोशविभाग (अध्याय ३५९–३६६)–अमरकोशांतल्या प्रमाणेंच वर्गानुक्रम असणारा–हा अमरकोशांतूनच घेतलेला असावा.

**अमरकोशावरील टीका**—प्राचीन कोशकारांनीं स्वत च आपल्या ग्रंथावर टीका लिहिल्या असतील हें म्हणणें मान्य होण्यासारखें नाहीं. तसें असतें तर उदा. अमर २.९,५८ येथील पादबंधनमूचे जागीं "यादवं धनम्" असा पाठभेद आला नसता, व पेशीकोश हा समास मानणें अथवा पेशी व कोश असे दोन शब्द मानणें (अमर २.५,३८) अशा प्रकारचा नंतरच्या टीकाकारांत मतभेद राहिला नसता. तथापि अमरकोशावरील टीका एकंदरींत महत्त्वाच्या होत. स्वत. कोशकारानीं स्पष्टार्थक लिहिण्याची खबरदारी घेतली असली तरी कांहीं कांहीं ठिकाणीं त्याच्या सांगण्यांत अस्पष्टपणा राहतोच. एकार्थकोशांत एका अर्थाचे शब्द कोठपर्यंत समजावयाचे यासंबंधीं शंका राहूं शकते, व अनेकार्थकोशात कोणता शब्द अनेकार्थवाचक आहे यासंबंधीं व त्यापेक्षांहि सुद्ध अनेकार्थवाचक शब्दाइतकेच अनेक अर्थ असणारे त्याचे अर्थ कसकसे समजावयाचे यासंबंधीं शंका राहते

अमरकोशावरील सुमारें ५० टीकांची नावें उपलब्ध आहेत टीकाकार भट्ट क्षीरस्वामी हा दाक्षिणात्य असावा, "स्वामिन्" या उपाधीवरून हा पुष्कळ जुना असणें शक्य आहे व राजतरंगिणींतील (४ ४८९) काश्मीरच्या जयापीड राजाच्या कारकीर्दींत ( ८ व्या शतकांत ) राहणारा जो शब्दवियोपाध्याय 'क्षीर' तो व हा एकच असें एक मत आहे क्षीरस्वामीनें भोज उद्धृत केला आहे व गणरत्नमहोदधीचा कर्ता वर्धमान ( इ स. ११४० ) यानें क्षीरस्वामीमधील अवतरणें दिलीं आहेत, म्हणून त्या दोघामध्यें ( अकरावें शतक ) क्षीरस्वामीचा काल असावा असें ऑफ्रेक्ट म्हणतो त्याच्या टीकेचें नाव 'अमरकोशोद्घाटन' असें आहे व रायमुकुटाच्या टीकेप्रमाणें अवतरणानीं भरून काढलेली नाहीं तथापि ही मुल्यवान आहे अमरकोशासह ही टीका कृ गो ओक यानीं संपादिली आहे या टीकेंत कात्य, मुनि, भागुरि, माला अथवा मालाकार, निघण्टु, शाश्वत, अमरमाल, अभिधानकार, अभिधानशेष, अनेकार्थ, श्रीहर्ष, दुर्ग, भोज, रुद्र या कोशाचा अथवा कोशकाराचा उल्लेख व उपाध्याय, गौड, भोज, आचार्या, नारायण इत्यादि टीकाचा उल्लेख आढळतो या ग्रथाच्या शेवटीं क्षीरस्वामीनें उल्लेखिलेल्या सुमारें २४० ग्रथाची यादी व टीकेंतील व मूळातील शब्दाच्या सुची दिल्या आहेत त्या महत्त्वाच्या आहेत

सुभूति ( सुभूतिचद्र ) या बौद्ध टीकाकाराचा काल अनिश्चित आहे तथापि तो रायमुकुटाच्या आधींचा आहे कारण रायमुकुटानें याचे उल्लेख केले आहेत सुभूतीच्या 'कामधेनु' नावाच्या या टीकेचें तिबेटी भाषातर उपलब्ध आहे चद्र व्याकरणाची पूर्ति करणारे व त्यावर टीका करणारे जे बौद्ध पूर्णचद्र व रत्नमति, त्याचे ग्रथ इतर काहीं ग्रथाबरोबर या टीकेंत उल्लेखिले आहेत

पूर्वीच्या दहा टीकाचा साराश आपल्या 'टीकासर्वस्वात' देणारा ( दशटीकाविद् ) सर्वानद वन्द्यघटीय हा सुद्धा रायमुकुटाच्या पूर्वीचा असून दक्षिणहिंदुस्थानचा होता

बृहस्पति रायमुकुटमणीची 'अमरकोश पजिका पदचद्रिका ही टीका विस्तृत व विद्वत्तापूर्ण आहे आपल्या प्रस्तावनेंत हा स्वत स गोविंदाचा मुलगा व बगालमधील राढाचा रहिवाशी असल्याचें लिहितो व आपली टीका पूर्वीच्या सोळा टीकाचें सार असल्याचें सागतो टीकेतील एका ज्योतिषशास्त्रविषयक उल्लेखावरून (१ ४,२१) टीकेचा काल इ स १४३१ निघतो या टीकेचा उल्लेख रायमुकुटी ( टीका ) असा सुद्धा केलेला आढळतो तदनुसार तिचा कर्ता 'रायमुकुटीकार' यानावानें उल्लेखिला जातो रायमुकुटानें २७० ग्रथ व ग्रथकाराचा उल्लेख केला आहे

भट्टोजी दीक्षिताचा मुलगा भानुजी दीक्षित ( १७ वें शतक ) याच्या 'व्याख्यासुधा' अथवा 'रामाश्रमी' नामक टीकेची एक शिलाप्रेसची प्रत ( स्कॅट-शेड्डी एम डी ३५-१९० ) आढळते पडित शिवदत्तानें प्रकाशित केलेली (मुबई १८८९ ) व उत्तम छापलेली एक प्रत आहे तींतील विशेषेकरून अवतरणें बिनचूक नाहींत, परतु यातील दोन सुची-दुसरी टीकेंतील शब्दाची आहे-फार उपयुक्त आहेत याखेरीज पुढील टीकाचा ऑफ्रेक्टच्या ग्रथ सूचींत उल्लेख आढळतो

टीका -अमरविवेक-महेश्वर, बृहद्वृत्ति, व्याख्याप्रदीप-अच्युत उपाध्याय, क्रियाकलाप-आशाधर, काशिका-काशीनाथ, अमरकोशोद्घाटन-क्षीरस्वामिन्, बालबोधिनी-गोस्वामी, कौमुदी-नयनानदशर्मन् व रामचद्रशर्मन, अमरकोशपजिका अ० पदार्थकौमुदी-नारायणशर्मन्, अमरकोशमाला-परमानद ( सुचित्र ), अमरकोशपजिका-बृहस्पति, गुरुबालप्रबोधिनी-भानु दीक्षित, बुधमनोहरा-महादेव, पदचद्रिका-रायमुकुट, कामधेनु-सुभूतिचद्र, शब्दार्थसंदीपिका-नारायण विद्याविनोद, सुबोधिनी-नीलकंठशर्मन्, मुग्धबोधिनी-भरतसेन, व्याख्यासुधा अ० सुबोधिनी-भानुजी दीक्षित, सारसुदरी-मथुरेश विद्यालकार, अमरपद पारिजात-मल्लिनाथ, विद्वन्मनोहरा अ० बुधमनोहरा-महादेवतीर्थ ( वर पहा ), अमरकोशविवेक-महेश्वर ( वर पहा ), त्रिकाडचिंतामणि-रघुनाथ चक्रवर्ती, त्रिकाडविवेक-रामनाथ, वैयाकरणकौमुदी-रामप्रसाद, प्रदीपमजरी-रामेश्वरशर्मन्, पदमजरी-लोकनाथ, व्याख्यामृत-श्रीकर आचार्य, टीकासर्वस्व-सर्वानद बृहदमरकोश-उल्लेख रायमुकुट पुढील ग्रंथकारानींहि अमरकोशावर टीका लिहिल्या आहेत अप्पय्य दीक्षित, मजु भट्ट, रगाचार्य, रामकृष्ण दीक्षित, लिंगयसूरि, ( लिंगभट्ट ? ), वेंकटाचार्य, श्रीकर, उल्लेख उज्ज्वलदत्त व रायमुकुट, सुदरशर्मन्, राघवेंद्र, रामशर्मन्, रामस्वामी, रामाश्रम ( भानुजी ), लक्ष्मणशास्त्री, श्रीधर

**अमरकोशावर फार उपयोगी पडणारे इतर कोश**—पुरुषोत्तमदेवाचे शब्दकोश—पुरुषोत्तमदेवानें अनेक व्याकरण व कोशविषयक ग्रथ लिहिले आहेत त्यापैकीं या ठिकाणीं विशेषेकरून त्रिकाडशेष व हारावलीचा विचार करावयाचा आहे

पुरुषोत्तमदेवाचा काल पूर्णपणें निश्चित करतां येत नाहीं बुहल्लरच्या म्हणण्याप्रमाणें पुरुषोत्तमदेव सुमारें १०६३ किंवा ११ व्या शतकांतील असावा. आनदराम बरुआ यांच्या म्हणण्याप्रमाणें लक्ष्मणसेन राजाचा प्रधान हलायुध याचा हा व तो समकालीन, म्हणून १२ व्या शतकाच्या उत्तरार्धापूर्वी हा असू शकणार नाही हा बगाली होता याविषयीं शका दिसत नाहीं बुहल्लरनें याला जैन

म्हटले आहे तें बरोबर नाहीं स्वत चे समकालीन व सहकारी म्हणून पुरुषोत्तम आपल्या हारावलीच्या प्रशस्तींत धृतिसिंह आणि जनमेजय यांचीं नावें व त्याच ठिकाणीं आपले आधार ग्रंथ म्हणून 'शब्दार्णव', उत्पलिनी' (त्रिकाण्डशेषाच्या शेवटीं सुद्धा) व 'ससारावर्त' हीं नावें देता

त्रिकाण्डशेष हें अमरकोशाचें परिशिष्ट आहे, हें त्याच्या नावावरून उघड होतें यात १०५० श्लोक असून त्यात अमरात व नेहमीं न येणाऱ्या शब्दाची फार महत्त्वाची व एकदर चित्ताकर्षक स्वरूपाची अशी यादी आहे विषयरचना अगदीं अमरकोशासारखीच आहे मात्र नानार्थवर्गात अमरापेक्षाहि सुधारणा करून वर्णानुक्रमानेंहि शब्दरचना केली आहे (स्वरकायादिकान्तक्रमात्) विशेष लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे काहीं क्वचित् आढळणारीं बुद्ध नावें, प्रज्ञापारमिता नावाच्या बौद्ध ग्रथाचें नाव व बौद्ध सस्कृतातील अनेक शब्द यात आले आहेत हें ज्ञान यानें वडिलापासून घेतलें असण्याचा सभव आहे आणखी विशेष म्हणजे रिंचोली=आठ वगैरे सारखे फक्त प्राकृतात आढळणारे कित्येक शब्द आपल्या कोशात यानें दिले आहेत

हारावलींत २७० श्लोक असून तिचे दोन भाग—एकार्थ व अनेकार्थ असे—पडतात दुसऱ्या भागात फक्त ४५ श्लोक आहेत व १२६ अनेकार्थवाचक शब्द अर्थासहित दिले आहेत एकार्थविभागातील विषय बहुतेक त्रिकाण्डशेषातील प्रमाणेंच आहेत परतु हारावलींत आणखी बरच क्वचित आढळणारे शब्द दिले आहेत हा ग्रथ तयार करण्याकरतां पुरुषोत्तमदेवाला १२ वर्षे लाग त्यानें लिहिलें आहे याचा अर्थ क्वचित आढणारे शब्द शोधण्याकरिता त्यानें १२ वर्षे ग्रथवाचनात घालविलीं असा समजता येईल याचा एक एकाक्षरकोश व एक द्विरूपकोश अथवा शब्दभेदप्रकाश असे आणखी दोन कोश प्रसिद्ध आहेत

शाश्वतकोश —शाश्वताचा 'अनेकार्थसमुच्चय" हा ८०४ श्लोकाचा असून त्यात १८०० शब्दाचे अर्थ दिले आहेत शाश्वतकोशाची रचना व वर्णनपद्धति प्राथमिक स्वरूपाची असल्याचें वर सागितलेंच आहे शाश्वताचा काल अनिश्चित आहे कोशाच्या प्राथमिक स्वरूपावरून हा बराच प्राचीन असावासें दिसतें परतु नतरच्या कोशातून सुद्धा शाश्वतात दिसून येणारीं विशिष्ट लक्षणें थोडयाफार प्रमाणात दिसून येतात शाश्वत हा सर्वांत जुना म्हणजे अमराच्याहि पूर्वीचा असावा शाश्वतानें आपल्या प्रशस्तींत (५ ८०६–७) आपले सहकारी म्हणून दिलेल्या चार व्यक्ती (खुदुल, विद्याविलास, महाबल, वराह) माहीत झाल्या तर त्याचा काल निश्चित होईल

त्याच किंवा दुसऱ्या शाश्वताच्या नावावर एक औषधीवनस्पतींचा कोश सरस्वतीनिघटु नावाचा—कोल्बो (१८६५ व १८८४) येथे प्रसिध्द झाला आहे

अनेकार्थध्वनिमजरि —काश्मीरच्या महाक्षपणकानें केलेल्या अनेकार्थ अथवा नानार्थध्वनिमजरीचा शाश्वतकोशाशीं जरी फार जवळचा सबध असला तरी ती त्यातील केवळ वेंचे घेऊन लिहिली आहे असें नाहीं शाश्वतात नसलेले अनेक शब्द व अर्थ यांत आहेत याची रचना हुबेहूब शाश्वताप्रमाणें आहे एक अनेकार्थवाचक अव्ययाचें प्रकरण मात्र गाळलें आहे त्याऐवजीं काहीं काहीं हस्तलिखितातून शेवटीं तर परिशिष्ट एकाक्षरनिघटु म्हणून मुख्य ग्रथाच्या तीन विभागाना (श्लोकाधिकार, अर्धश्लोकाधिकार व पादाधिकार) जोडलेले आढळतात

उपलब्ध ग्रथ सदोष आहे हस्तलिखिताच्या वर्णनावरून निरनिराळया प्रतींतील ग्रथविस्तार इतका भिन्न आहे कीं त्या एकाच ग्रथाच्या निरनिराळ्या आवृत्ति असाव्यात असें वाटतें याशिवाय हाच किंवा यासारखाच एक ग्रंथ गर्दसिंह अथवा दुर्गसिंह याच्या नावावर आहे

महाक्षपणकाचा काल तूर्त निश्चित करतां येत नाहीं जुन्या टीकाकाराना (रायमुकुटासुध्दा) याचा ग्रथ माहीत असल्याचें दिसत नाहीं कदाचित हा महाक्षपणक व उणादिसूत्राचा टीकाकार क्षपणक हे एकच असतील

विषय व विस्तार या बाबतींत शाश्वतकोशाशीं बरोबरी करणार अजयपाल व धरणीदास यांचे दोन नानार्थकोश छापलेले नाहींत

अजयपाल —याच्या नानार्थसग्रहात सुमारें १७३० शब्द आहेत त्यापैकीं बहुतेक शब्द शाश्वतात आलेले आहेत यांची रचना वर्णानुक्रमानें अक्षरसख्येकडे लक्ष न देतांना व वर्णविस्तारानुरूप केली आहे प्रत्येक प्रकरणाच्या शेवटीं अव्ययें दिलीं आहेत इतर ठिकाणच्या प्रमाणें त्यांचें स्वतत्र प्रकरण करून शेवटीं जोडलें नाहीं शब्दांचे अर्थ देण्याची अजयाची पद्धति फार कौशल्याची आहे पूर्वीच्या कोशग्रथांत ज्याप्रमाणें गैरसमजुती होण्यास जागा राहते तशी राहू नये म्हणून यानें खबरदारी घेतली आहे

अजयपालाचा काल सुमारें ११०० च्या नतरचा नसावा कारण वर्धमानाच्या गणरत्नमहोदधींत (११४० त रचलेल्या) याचा उल्लेख सापडतो हेमचंद्र व त्याचा शिष्य महेंद्रसूरि यांनाहि याची माहिती असावी असें दिसतें रायमुकुट याचा उल्लेख वारवार करतो

धरणीकोश —धरणीदासाच्या अनेकार्थसाराचा उल्लेख बहुधा धरणीकोश अथवा नुसता धरणी ( मेदिनी पहा ) असा केलेला आढळतो याची रचना अन्त्यव्यंजन व अक्षरसंख्येनुसार केलेली आहे "क्षान्त" शब्द "हान्त" शब्दाच्या नंतर दिले आहेत रायमुकुटानें याचा उल्लेख केलेला असून याचीं हस्तलिखितें फार दुर्मिळ आहेत ग्रंथकर्ता बुइल्सनच्या म्हणण्याप्रमाणें कनोजचा ब्राह्मण असून वब्रआनें त्याला तेराव्या शतकात घातलं आहे

हलायुध —जुन्या कोशांपैकीं हलायुधाच्या अभिधानरत्नमालेचाच काल काय तो काहींसा निश्चयपूर्वक अनुमानिता येतो डॉ भांडारकरांशीं जुळणाऱ्या लुडविग हेलरच्या या बाबतींतील काळजीपूर्वक संशोधनानुसार हलायुध १०व्या शतकाच्या मध्यास झाला असावा त्यानें तीन ग्रंथ लिहिले अभिधानरत्नमाला, कविरहस्य व मृतसंजीवनी यांपैकीं कोश सर्वांत पूर्वीचा असावा कविरहस्य हें ९५० त मान्यखेटच्या तिसऱ्या कृष्णराजाच्या दरबारीं व मृतसंजीवनी धारचा मुंजवाक्पति याच्या दरबारीं लिहिली गेली हलायुध आपल्या पूर्वीचे म्हणून अमरदत्त वररुचि व भागुरि आणि वोपालित यांचीं नावें देतो "इयममरदत्त वररुचि भागुरि वोपालितादि शास्त्रेभ्य । अभिधानरत्नमाला कविकण्ठविभूषणार्थमुद्ध्रियते ' ॥ १२ ॥ पूर्वीच्या कोशांतून यानें पुष्कळ भाग शब्दश घेतले असणें संभवनीय आहे ३५८ श्लोकांतील दुसरी ओळ अभिधानचिंतामणीच्या टीकेंत हेमचंद्रानें म्हटल्याप्रमाणें भागुरीची आहे अभिधानरत्नमालेचें स्वरूप जुनें दिसतें शब्द व अर्थ सोप्या पद्धतीनें व पाल्हाळिकपणें दिलेले आहेत लिंगें स्पष्ट पणें पुल्लिंगी वगैरे शब्दांनीं सांगितलेलीं नाहींत फक्त रूपभेद मात्र दर्शविला आहे मोठ्या कोशाच्या आरंभीं येणारी परिभाषाहि नाहीं यांत सुमारें ९०० श्लोक आहेत ( अमरकोश याच्या जवळ जवळ दुप्पट आहे ) व त्याचीं पांच कांडें केलीं आहेत —स्वर्ग, भूमि, पाताळ, सामान्य व अनेकार्थकांड आजड टीकाकारानें वर्ग मानिले आहेत

हलायुधकोशाची ऑफ्रेक्टनें ( लंडन १८६१, ग्लॉसरीसह ) प्रकाशित केलेली प्रत उत्तम आहे पद्कोशसंग्रहांत ( बनारस १८७३ ) दुसरी एक प्रत आहे याची तिलक नावाची एक टीका बुल्हरनें आपल्या गुजराथ हस्तलिखिताच्या कॅटलॉगांत उल्लेखिली आहे ( ३ पृ ३४ ) स्वत स त्रिभुवनपालाचा मुलगा व डाल्यणिपृथ्वीपाल ( डाल्णि ? ) चा नातू म्हणविणाऱ्या श्रीमदाजडाची ( श्रीमहाजडाची ? ) टीका आहे या टीकेंत भागुरि शाश्वत, अमरकोश, क्षीरस्वामी, बुद्धिसागर, विश्वप्रकाश, शब्दभेद भोज व अमरमाला इतक्याचा उल्लेख आहे अभिधानचिंतामणीच्या सारोद्धारांत पुन्हा पुन्हा उल्लेखिलेली हलायुधटीका व आजडाची टीका या कदाचित एकच असतील टेलर ( कॅ १ ३९७ ) व रिस्ल ( इ ऑ ४ १७ ) यांनीं हलायुधाच्या एका कानडी टीकेचा उल्लेख केलेला आहे

यादव —हलायुधाच्या अभिधानरत्नमालेपेक्षा सुमारें शंभर वर्षांनीं अलीकडील यादवप्रकाशाची वैजयन्ती होय यापेक्षां अधिक खात्रीचा काल निश्चित करता येत नाहीं यादव हा दंतकथेवरून रामानुजाचा समकालीन प्रथम शिक्षक नंतर शिष्य होता कांचीपुरम् जवळील एका खेड्यांत याचा जन्म झाला होता व हा कांचीपुरम् येथेंच वैष्णवसंन्यासी होऊन मेला हलायुध कोश व पुढें वर्णिलेला धनंजयकोश याच्याप्रमाणें वैजयंती ही दक्षिण हिंदुस्थानांतील होती

आपण कोणत्या मूळ ग्रंथाचा आधार घेतला याविषयीं यादवानें काहीं सांगितलेलें नाहीं तथापि बहुश त्याच्या आधीं हलायुध व वाचस्पति आणि व्याडि हेहि होऊन गेले असावेत

अभिधानरत्नमाला व वैजयंती यांच्या कालामध्यें फारसें अंतर नसलें तरी दुसऱ्यानें पहिल्याच्यापुढें पुष्कळच प्रगति केलेली आढळते शब्दांचे अर्थ, रचना व लिंगनिर्देश बिनचूक असून कौशल्यानें मांडले आहेत ग्रंथ लावण्याची रीत परिभाषेंत सांगितली आहे, त्यासंबंधीं पर उल्लेख आगच आहे

वैजयंतीचा विस्तार बराच मोठा आहे या बाबतींत तिची इतर विषय देणाऱ्या सर्व जुन्या—व कदाचित नव्याहि—कोशांवर ताण आहे वैजयंतींतील आठ कांडांपैकीं १–४त एकार्थवाचक शब्द व ५–८ त नानार्थवाचक शब्द आहेत प्रथाने शेवटीं अव्ययांचें एक प्रकरण, एक लिंगसंग्रह व पर्यायप्रयोगन्यायप्रदर्शनाध्याय नावाचा एक नानार्थवाचक शब्दांचा संग्रह आहे

धनंजय —के बी पाठक व डा० भांडारकर यांनीं धनंजयकृत नाममाला ही प्राचीन कोशांपैकीं आहे असें सांगितलें नसतें तर तिचा येथें निर्देश करण्याचेंहि कारण नव्हतें या ग्रंथाच्या पहिल्या परिच्छेदाच्या शेवटीं दोन श्लोक आहेत त्यांत धनंजय स्वत एक कवि व द्विसंधानकाव्याचा कर्ता म्हणवितो हें काव्य—याचें दुसरें नाव राघवपांडवीय—काव्यमालेंत ( १८९५ ) छापलें आहे व गणरत्नमहोदधींत ( ११४० सीसं ) यांतील चार अवतरणें सांपडतात यावरून धनंजय कवि—अथवा नाममालेचा कर्ता—जास्तीत जास्त बाराव्या शतकाच्या आरंभींचा असावा डॉ भांडारकरांच्या म्हणण्याप्रमाणें कविराज (सुमारें १०००) यानें राघवपांडवीयाची पहिली नक्कल केली असल्यामुळें तो कविराजाच्या पूर्वीचा असावा पाठकांच्या म्हणण्याप्रमाणें धनंजयाला पुनर्भाग निश्चित म्हणत असत व राघवपांडवीयाची रचना त्यानें इ स ११२३ नंतर एकदम केली या शिवाय आर दा एका प्रशस्तीमध्यें राजेंमगो

)

धनजयाची स्तुति केलली आहे कर्लने म्हटल्याप्रमाणे हा राजशेखर व नाटककार राजशेखर एकच असल्यास धनजयाचा काल पुष्कळच मागे न्यावा लागेल

धनजय हा दिगबर जैन असुन कर्नाटकचा रहिवासी होता नाममालची–हिचेच नाव निघण्टमसय–अनेक सस्करणे झाली त्यात एकार्थवाचक शब्दांचे २०० श्लोक आहत रचना थोडी चमत्कारिक आहे तथापि बुट्ल्सन याला कोणत्याहि विशिष्ट पध्दतीने न बाधलला समानार्थक शब्दाचा हा अगदी ल्हान गर आहे असे म्हणतो, ते थोडे अतिशयोक्तीचे आह मूळ नाममालेच्या शवटी पाच श्लोकांची प्रशस्ति आहे त्यात स्वत च्या काव्यांशिवाय अकलक व पूज्यपाद यांची नाव ता उल्लेखितो शिवाय नाममाला " शतद्वय श्लोकानाम् " आहे असेहि ता स्पष्ट म्हणतो (' प्रमाणमकलकस्य पूज्यपादस्य लक्षणम् । द्विसधानकवे काव्य रत्नत्रयम पश्चिमम् ॥ ३ ॥ कवधनजयस्यय सत्कवीना शिरोमणे । प्रमाण नाममालेति श्लोका नाच शतद्वयम् ॥४॥ ") म्हणून ही छापील प्रत बहुतेक मूळच्या ग्रथाचीच असावी परतु काही हस्तलिखितातून नानार्थवाचक शब्दांचाहि एक ५० श्लोकाचा दुसरा परिच्छेद आढळतो त्यात पहिल्या परिच्छेदास शब्दसकीर्णप्ररूपण व दुसऱ्यास शब्दसकीर्णस्वरूपनिरूपण असे म्हटले आहे ( उदा प्रो याकोबीकडे असलेल्या एका हस्तलिखितात ) दुसऱ्या हस्तलिखितात ( उदा इंडिया ऑफिसमधील ) निराळीच नावे आहेत बर्नेलने थाडक्यात वर्णिलेल्या एका हस्तलिखितात ग्रथाचे तीन परिच्छेद केले आहेत टेलरच्या कॅटलागात कानडी टीकेसहित असलेल्या हस्तलिखिताचा निर्देश आहे

धनजयाचा टीकाकारांनी उल्लेख फार कमी कलेला आढळतो रायमुकुटाने एकदा व हेमाद्रीने रघुवशदर्पणात काही वेळा याचा उल्लेख केला आहे

धनजयाच्या नाममालेमध्ये सामासिक शब्द मुख्य शब्दाजवळच देण्याचा–इतर कोशात न आढळणारा–विशेष प्रकार आढळतो उदा " कुभिनीलोर्वराचोर्वी जगतीगौर्वसुधरा ॥६॥ तत्पर्यायधर शैलस्तत्पर्यायपतिर्नृप । तत्पर्यायरुहा वृक्ष शब्दमन्यच याजयेत् ॥ ७ ॥ ॥ तत्पर्यायचरा ज्ञेया हरिर्वलिमुख कपि । वानरा प्लवगश्चैव गोलागूलाऽथ मर्कट ॥ १२ ॥ कान्तारमन्वी दुर्ग तच्चर स्याद्वनेचर ॥१३॥ शर वन कुश नीर तोय जीवनमत्रिपम् । तत्पर्यायचरामत्स्यस्तत्पर्यायप्रदाघन । तत्पर्यायोद्भव पद्म तत्पर्यायधरोम्बुधि ॥ १६ ॥ "

महेश्वर —महश्वरकवीचा विश्वप्रकाश नामक २२४० श्लोकाचा नानार्थकोश ग्रथकर्त्याच्याच उल्लेखावरून 1111 त रचिला गेला मूळ कोशाला २३ श्लोकाची प्रस्तावना असुन त्यात महेश्वराने आपल पूर्वज व उपयाग कलेले ग्रथ याविषयी माहिती दिली आह वैद्याच्या कुळात याचा जन्म झाला होता व चरकतत्रावर टीका लिहिणारा व साहसाङ्कराजाच्या दरबारी राजवैद्य असलेल्या हरिचद्राचा हा मुलगा होता महेश्वराने स्वत हि एक साहसाङ्कचरित लिहिले आहे (साहसाङ्कचरित, प्रस्तावना ५ १२ ) पूर्वजा पैकी गाधीपुरच्या राजाच्या दरबारचा वैद्य कृष्ण, दामादर, मल्हण, व त्याचा पुतण्या कशव (कृष्ण) यांची नावे सागितली आहेत शेवटचा मुलगा श्रीब्रह्म हाच महेश्वराचा बाप होय ग्रथाच्या शवटी ग्रथकर्त्याला सकलवैद्यराजचक्रराजशेखर ' अशी ( किंवा अशासारखी ) पदवी लावलेली आढळत

आपल्या पूर्वी होऊन गलेल्यापैकी महश्वराने भोगींद, कात्यायन साहसाक वाचस्पति, व्याडि, विश्वरूप, अमरमगल •शुभाग वोपालित, व भागुरि याचा उल्लख कलेला आह ' भोगीन्द्र कात्यायन साहसाक वाचस्पति व्याडिपुर सराणा । सविश्व रूपामरमगलाना शुभाग वोपालित भागुराणा । कोशावकाशाल्पकप्रभाव सभावितानर्घ्यगुण स एष ॥ '

प्रस्तावनेनतर ग्रथाचा मुख्य भाग–मुखखड–सुरू होतो ( विश्वप्रकाश प्रस्तावना ५ १४ ) शब्दरचनेसबधी वर सागितलेच आहे मुखखडाच्या शेवटी नानार्थअव्यये आहेत नतर आणखी थोडे श्लोक आहेत त्यातील शेवटच्या श्लोकात ग्रथाचा काल दिला आहे " रामानलव्योमरूपै शककालेभिलक्षित ( १०३३ ) । कोश विश्वप्रकाशाख्य निरमाच्छ्रीमहेश्वर ॥ "

वल्लभगणींने सारोद्धारात एका छत विश्वगीकचा उल्लेख कला आहे त्या टिकाणी दिलेल्या अवतरणावरून असे दिसते की, या टीकेत शब्दार्थ स्पष्ट करण्याकरिता वाङ्मयातून उदाहरणे दिली आहेत उदा मोहमिच्छन्ति मूर्च्छायामविषायाच सूरय " या स्थळी मूर्छेचे उदाहरण ( कुमारसभव ४ १ ) व अविषाचे ( =विषयय ) भर्तृहरींतील न मुचाम कामानहह गहना माह-महिमा ' असे दिले आहे

मख —११३५ ते ११४५ च्या सुमारास श्रीकण्ठचरित लिहिणारा काश्मीरी मख व अनेकार्थकोशाचा कर्ता मख हे एकच असल्यास मखचा काल १२ व्या शतकात पडल हे दोघ एकच याविषयी जवळ जवळ शका नाहींच काही झाले तरी हा मख ११५० च्या फारसा अलीकडचा असणे शक्य नाही कारण हेमचद्राचा शिष्य हमचद्रसूरि हा त्याचा उल्लेख वारंवार करतो

मखकोशात सुमारे १००० श्लोक आहेत रचनेत सागण्यासारखा विशेष असा काही नाही अनेकार्थ व त्यांची स्पष्टी करणे यापैकी काही कवळ मखातच सापडणारी आहेत परतु साधारणपणे अमराचा नानार्थवर्ग व शाश्वत याच्यातील विषयच

यात आहेत. या दोहोंचा उल्लेख तो आपल्या प्रमाणग्रंथात करतोहि याशिवाय भागुरि, कात्य, हलायुध, दुर्ग व धन्वंतरीचा निघंटु हे याचे आणखी प्रमाणग्रंथ होत

मखकोशाला इतके महत्त्व येण्याला त्याची एक टीका कारणीभूत झालेली आहे तिचा पहिला दोनतृतीयांशच भाग उपलब्ध आहे हिचा कर्ता स्वतः मखच असावा यात त्याने शब्दार्थांचे विवरण वाङ्मयातील उदाहरणे देऊन केले आहे त्याला हे बहुतेक बाबतींत चांगले साधले आहे ज्या बाबतीत त्याला उदाहरण माहीत नसेल त्यावेळी तो आपले अज्ञान स्पष्टपणे कबूल करून "उदाहरणम-वेष्यम्" असे सांगतो

काश्मीरच्या बाहेर मखकोश फारसा प्रसिद्ध नाही स्तुतिकुसुमांजलीच्या व युधिष्ठिरविजय काव्याच्या आपल्या टीकात राजानक रत्नकंठ याने व अनेकार्थसंग्रहाच्या टीकेत महेंद्राने याचा वारंवार उल्लेख केला आहे स्तुतिकुसुमांजली टीका १ ४, २ १४, ५ १२ या ठिकाणी मखातील अवतरणे वरीवर दिली असल्यामुळे मखाने आणखी एक एकार्थकोशसुद्धा रचिला असावा असे वाटते

हेमचंद्राचे शब्दकोश —( १०८८-११७२ ) हे भारतीय कोशशास्त्राच्या दृष्टीने फार महत्त्वाचे आहेत हेमचंद्राच्या व्याकरणाप्रमाणेच त्याचे शब्दकोशहि भारतीय संशोधनाचे व्यापक व पूर्ण स्वरूप दर्शवितात हेमकोश फार चांगल्या स्वरूपात आज उपलब्ध आहेत आज उपलब्ध नसलेल्या साधनांचा हेमचंद्राने उपयोग केलेला होता व आज उपलब्ध असलेल्या हस्तलिखितांपेक्षा त्याचे वेळची हस्तलिखिते अधिक विश्वासलायक होती याशिवाय त्याच्या कोशावर त्याने स्वतः, त्याच्या शिष्यांनी अगर नंतरच्यांनी टीकाहि लिहिलेल्या आहेत व्याकरणशास्त्राच्या इतिहासाला ज्याप्रमाणे हेमचंद्राच्या शब्दानुशासनाच्या टीकांचे महत्त्व आहे त्याप्रमाणेच शब्दकोशशास्त्राला या टीकांचे महत्त्व आहे

हेमचंद्राने चार शब्दकोश लिहिले आहेत एक एकार्थ "अभिधानचिंतामणिनाममाला," दुसरा अनेकार्थ "अनेकार्थ संग्रह," तिसरा अत्यंत महत्त्वाचा प्राकृत शब्दकोश "देशीनाममाला अथवा रत्नावलि" व चौथा 'निघंटुशेष'. देशीनाममालेच्या शेवटी म्हटल्याप्रमाणे 'वायरणसेसलेसो' ( ८ ) हे चारी कोश त्याच्या व्याकरणाचे परिशिष्ट म्हणूनच समजावयाचे कोशाचा व त्यावरील टीकांचा काळ कोणता यासंबंधी बुल्हरच्या म्हणण्याला अनुसरून खालील गोष्टी सांगता येतील—व्याकरणाची रचना समाप्त झाल्यावर व राजा जयसिंहाचे मरणाच्या अगोदर ( ११४१ ते ११४३ चे दरम्यान ) बहुतेक एकार्थकोश व अनेकार्थ कोश तयार झाले असावेत जयसिंहाचा मृत्यु ( ११४३ ) व राजा कुमारपालाशी हेमचंद्राचा परिचय झाला ती वेळ ( सुमारे ११५८ ) या दोहोंच्यामधील काळात प्राकृत कोश व निघंटुकोश यांची रचना झाली अभिधानचिंतामणीची परिशिष्टे ("शेषा") याच काळात तयार झाली असणे शक्य आहे यांचे स्वतंत्र नाव शेषाख्यनाममाला अथवा शेषसंग्रह असे आढळते व ही अभिधानचिंतामणीलाच जोडलेली, टीकेच्या कित्येक हस्तलिखितांतून आढळतात यावरून ही अभिधानचिंतामणीबरोबरच म्हणजे हेमचंद्राच्या आयुष्याच्या शेवटी शेवटी रचिली असावीत अभिधानचिंतामणीची टीका हा निःसंशय हेमचंद्राचा शेवटचा ग्रंथ होय अनेकार्थसंग्रहाची टीका त्याच्या एका शिष्याने लिहिलेली आहे

अभिधानचिंतामणि सहा कांडांचा असून त्यात १५४२ श्लोक आहेत प्रस्तावनेत ( १–२३ ) ग्रंथकाराने आपल्या नामसंग्रहात कोणकोणत्या प्रकारचे शब्द ( रूढ, यौगिक व मिश्र ) दिले आहेत त्याविषयी सविस्तर लिहिले आहे रूपभेद दाखविला आहे परंतु अमर वगैरेप्रमाणे लिंगभेद हेमचंद्राने दाखविलेला नाही "लिंगं तु ज्ञेय लिंगानुशासनात" ( १९ ) असे म्हणून आपल्या ( स्वोपज्ञ ) लिंगानुशासना'वर हवाला दिला आहे ही गोष्ट हेमचंद्राच्या इतर कोशासहि लागू आहेच प्रस्तावनेच्या शेवटच्या चार श्लोकात प्रत्येक कांडाची विषयसूची दिली आहे पहिल्या कांडात जैनांच्या अधिदेवतांचे साग्र वर्णन, दुसऱ्यात राहिलेल्या ब्राह्मण देवांचे वर्णन, तिसऱ्यात मनुष्ये, चौथ्यात पशु पाचव्यात पाताळवासी, सहाव्यात भाववाचके, लिंगे व अव्यये यांचे वर्णन आहे प्रस्तावनेची समाप्ति संक्षिप्त परिभाषांनी केली आहे "स्वन्तायादि न पूर्वगौ".

ज्या ग्रंथांचा साधनाप्रमाणे उपयोग केला असेल त्याचेविषयी हेमचंद्राने एका शब्दानेहि उल्लेख केलेला नाही तथापि अमरकोशाशिवाय हलायुधकोश व वैजयन्ती या बाबतीत उपकारक झाली असावी

अभिधानचिंतामणीतील उतारे घेऊन शुभशीलगणीने ( १५ व्या शतकाचा उत्तरार्ध ) एक 'पंचवर्गनामसंग्रह' म्हणून ग्रंथ तयार केला हा ग्रंथ अभिधानचिंतामणीचेच एक तऱ्हेचे रूपांतर असावे असे दिसते प्रयत्नांनी अडगच्छा दारकीर्तीत ( १५५६–१६०५ ) होऊन गेला साधु सुंदरगणीच्या शब्दरत्नाकरात ( १७ व्या शतकाचा आरंभ ) अभिधानचिंतामणीप्रमाणेच विषयविभाग आहेत, व त्याच्याशी याचा अगदी जवळचा संबंध आहे

अभिधानचिंतामणीच्या टीका अनेक आहेत—पहिली हेमचंद्राची स्वतःची या टीकेच्या ( विवृतीच्या ) प्रस्तावना श्लोकात व्याडि, धनपाल व वाचस्पति यांना प्रमाण मानले आहे या टीकेत ज्या ग्रंथांचा व ग्रंथकारांचा उल्लेख केला

त्यांचा संग्रह बोथलिंगनें आपल्या अभिधानचिंतामणीच्या प्रतीत केला आहे हेम सूरीच्या टीकेचा एक सारांश ( अवचूरी, अव चूर्णिका ) एका हस्तलिखितांत असावा असें वाटतें

दुसरी एक टीका वाचनाचार्य श्रीवल्लभ ( श्रीवल्लभगणी ) याची योधपुरचा राजा सूरसिंह याच्या कारकीर्दीत ( १६११ त ) लिहिलेली 'सारोद्धार' ही टीकाकाराच्या स्वतःच्या म्हणण्याप्रमाणें 'नामनिर्णय' नावाच्या एका मोठ्या ग्रंथाचा सारांश आहे 'निरणायि मया नाम्ना निर्णयो नामनिर्णय' तिच्या सारावरून हें स्पष्ट दिसतें १६३० त झालेली देवसागरगणींची 'व्युत्पत्तिरत्नाकर' नावाची एक टीका आहे

अभिधानचिंतामणीचे 'शेष' ( शेषसंग्रह परिशिष्ट ) बोथलिंगनें आपल्या अभिधानचिंतामणीच्या प्रतीत शेवटीं ( पृ ४२१–४३ मध्यें ) दिले आहेत अभिधानसंग्रहांतहि ते छापले आहेत आफ्रेक्टच्या म्हणण्याप्रमाणें वल्लभगणीनें रामदासमाळेच्या अभिधानचिंतामणीच्या प्रतीत ( पृ ३१९–३१ ) व अभिधानसंग्रहात ( २ न ११ ) एका जिनदेवमुनीश्वरानें अभिधानचिंतामणीचे काढलेले वेंचे ( शिलोंछ ) छापले आहेत

अनेकार्थसंग्रहात ७ कांडें व १८२९ श्लोक आहेत पहिल्या सहा कांडांत मरा अनेकार्थसंग्रहाचा भाग असून त्यांत एक-दोन–तीन–चार–पांच व सहा अक्षरी शब्द ( नामें व विशेषणें ) ओळीनें दिले आहेत शेवटच्या कांडांत अनेकार्थअव्ययें असून तें षट्काण्डाच्या शेषाप्रमाणें आहे त्याचें नांव हस्तलिखितांतूनहि 'अनेकार्थसंग्रह' असें आढळतें

अभिधानचिंतामणीच्या प्रस्तावनेंतल्याप्रमाणें याहि कोशाच्या साधनीभूत झालेल्या ग्रंथांचा उल्लेख याच्या प्रस्तावनेंत नाहीं विश्वकोश हें बहुतेक मुख्य साधन असावें हमें नेमका सांगतां येत नाहीं व अनेकार्थसंग्रहांत जो निकट संबंध दिसून येतो तो दोघांनींहि एकच जुन्या साधनाचा उपयोग केल्यामुळे उत्पन्न झाला असेल अनेकार्थसंग्रह हा शब्दरचनेशिवाय इतर बाबतींत विश्वकोशाची हुबेहुब प्रतिकृति आहे व म्हणून तो नंतर कधीं तरी अभिधानचिंतामणीला पुरवणी म्हणून तयार केला असावा या निरनिराळ्या विलक्षण विधानाचें वैयर्थ्य गोल्डस्टकरनें ( १८५० तच आपल्या संस्कृत डिक्शनरी पृ २१५ त ) आपल्या कोशाच्या प्रस्तावनेंत असें दाखविलें आहे कीं, हे उपर्युक्त अनेकार्थकोश सगळे सारखे आहेत परंतु एक नव्हत

अनेकार्थसंग्रहांत ३९०० शब्द थोडक्यांत परंतु स्पष्टपणें सांगितले आहेत शब्दरचनाहि उत्तम आहे हेमचंद्रानें अक्षरसंख्याच केवळ नव्हे तर आद्याक्षर व अन्त्याक्षर शिवाय प्रथम व्यंजनापुढचा स्वर या सर्वांचा विचार वर्णानुक्रमरचनेंत केला आहे

या कोशावर 'अनेकार्थकैरवाकरकौमुदी' नावाची टीका आहे हेमचंद्रानें स्वतः लिहिल्याप्रमाणें हिचा आरंभ आहे 'नित्यानेकार्थसंग्रहे वक्ष्ये टीकाम् ।' टीकेला आरंभ करून दुसरा श्लोक पुरा होण्याच्या पूर्वीच त्याला मृत्यूनें गाठलें असावें हेंहि असंभवनीय नाहीं हस्तलिखितांत २ ऱ्या, ३ ऱ्या व ७ कांडाच्या शेवटीं आढळणाऱ्या प्रशस्तींत महेंद्रसूरि नावाचा त्याचा शिष्य स्वतः टीकेचा कर्ता अथवा प्रकाशक म्हणविणारे आपल्या गुरूनें स्वमुखानें सांगितलेल्या अर्थानुसार लिहून त्याच्या नावानेंच ही टीका प्रसिद्ध केल्याचें तो लिहितो यापेक्षां अधिक सूक्ष्म माहिती लागत नाहीं टीकेचे आधार प्रस्तावनेंत सांगितले आहेत ते –विश्वप्रकाश, शाश्वत, रभस, अमरसिंह मंख व्याडि, धनपाल भागुरि, वाचस्पति, यादव, व धन्वंतरिनिघंटु बाकी या यादीवर फारसा भरवसा ठेवण्याचें कारण नाहीं

निघंटुशेष —हा वनस्पतिशब्दकोश ३९६ श्लोकांचा असून त्याच्या नावावरून हा अभिधानचिंतामणींतील ज्याला 'शेष' लिहिले नाहींत असा वनस्पतिकोषाचें ( श्लो ११३१–१२०१ ) परिशिष्टच होय या पुस्तकाचीं सहा कांडें आहेत व त्यांत ओळीनें वृक्ष, गुल्म, लता, शाक तृण व धान्य असे विषय आहेत कमळाच्या जाती ( ३ ३०३–३१ ) व कडधान्यकांड अभिधानचिंतामणींतील त्या त्या भागाशीं ( ११६० पुढें, ११६८ पुढें ) तंतोतंत जुळतें डॉ भाऊ दाजींच्या तोंडी सांगण्यावरून बुल्हरनें म्हटल्याप्रमाणें मात्र रत्नविभाग निघंटुशेषाच्या उपलब्ध प्रतींत सांपडत नाहींत या प्रतींत ( अभिधानसंग्रह २ न ९ ) पहिल्या कांडाच्या प्रारंभीं एक मोठा व इतर कांडांत लहान लहान खंड पडलेले आढळून येतात पीटर्सनच्या ५ व्या रिपोर्टांत पृ २३ वर हेमचंद्राच्या मरणानंतर सुमारें ५० वर्षांनीं लिहिलेलें निघंटुशेषाचें हस्तलिखित उल्लेखिलें आहे या हस्तलिखिताच्या आधारानें मुंबई प्रतीपेक्षां अधिक शुद्ध व संपूर्ण नवी प्रत काढणें अशक्य नाहीं निघंटुशेषावर टीका नसावीसें दिसतें

मेदिनीकराचा नानार्थशब्दकोश —याचा मेदिनीकोश अथवा मेदिनी या नावानें उल्लेख करितात कलकत्ता आवृत्ती प्रमाणें हा २३०० श्लोकांचा आहे ग्रंथकर्ता स्वतःस प्राणकर ( पङ्गुकर ? ) म्हणवितो त्याच्याविषयीं अधिक माहिती नाहीं भांडारकराच्या हिशोबानें ( मालतीमाधवाच्या [ १८७६ ] प्रस्तावनेंतील पृ १३ ) मेदिनीकराचा काळ १४ व्या शतकाच्या अखेरचा असावा

मेदिनीचा आरंभ परिभाषानी होतो, त्यात मुख्यत लिंगनिर्देश कसा केला आहे यासबंधी वर्णन दिलें आहे मुख्य कोशाचे वर्ग केले आहेत ( कान्तवर्ग वगैरे ) शब्दरचना उत्तम आहे अनेकार्थसमुद्राच्या रचनेहून फारसा फरक नाहीं शेवटच्या श्लोकात साधनीभूत ग्रथाची व कोशकारांची यादी आहे या यादींत अनेक कोशकाराचा उलेख आहे म्हणून ती येथें उध्दृत करतों - 'उत्पलिनी शब्दार्णव ससारावर्ते नाममालाख्याम्। भागुरि वररुचि शाश्वत वोपालित रतिदेव हरकोपान्॥ अमर शुभाक हलायुध गोवर्धन रभसपालकृतकोपान्। रुद्रामरदत्ताजयगगाधरधरणिकोशाश्च ॥ २ ॥ हारावल्यभिधान त्रिकाडशेषच रत्नमालाच। अपि बहुदोप विश्वप्रकाशकोषच सुविचार्य ॥ ३॥ वाग्भट माधव वाचस्पति धनञ्जयादितापालाख्यान्। अपि विश्वरूप विक्रमादित्य नामलिंगानि सुविचार्य ॥ ४ ॥ कात्यायनवामनचद्रगोमिरचितानि लिंगशास्त्राणि। पाणिनिपदानुशासनपुराणकाव्यादिकच मुनिरूप्य ॥ ५॥ प्रख्यात गाथाकोश प्रणयन विख्यात कोशेन्नाय। मेदिनिकरेण कोश प्राणग्रसूनुना रुचित ॥ ६ ॥' यात विश्वप्रकाश कोश आहे परतु त्याला 'बहुदोप' असें विशेषण लावलें आहे ति ात शब्दरचना सोपी व लिंगनिर्देश बिनचूक नाहीं म्हणूनच हें विशेषण लावलें असावें तथापि विश्वाचा उपयोग मेदिनीकरानें चागलाच करून घ्यावयास कमी केलें नाहीं इतकेंच नव्हे तर हा 'बहुदोप' विश्वच त्याचा मुख्य आधार असणें सभवनीय आहे याशी मेदिनीकर स्वतत्रपणें पाठभेद देतो हेंहि सागितलें पाहिजे उदा हा कुन्तालचा अर्थ चपक असा देतो, तर महेश्वर लागल असा देता असो

मेदिनीची एक टीका आहे म्हणत त परतु त्यासबधीं सविस्तर माहिती अजून मिळाली नाहीं

**अलीकडील शब्दकोश**—मेदिनीची गणना यातच व्हावयाची त्याशिवाय आणखी काहीं येथें सागावयाचे आहेत त्यापैकीं काहींचा काल निश्चित आहे ह शब्दकोश जुन्या कोशातीलच विषय परतु अधिक शुद्ध रूपात देतात म्हणून याचा उपयोग जुने अशुद्ध हस्तलिखितातून मिळालेले शब्दकोश शुद्ध करण्याकडे होतो

केशवाचा कल्पद्रु ( शब्दकल्पद्रु ) —अ नामकल्पद्रुम हा तीन स्कधाचा एकार्थशब्दकोश भरपूर माहितीचा असून मल्लिनाथ व दिनकर ( १३८५ त लिहिणारा ) या टीकाकारानीहि याचा उल्लेख केला आहे

महीपाचा शब्दरत्नाकर —या कोशाच्या नानार्थविभागाचें नाव नानार्थ किंवा अनेकार्थतिलक असें असून त्याचा काल १३७४ दिला आहे

नानार्थरत्नमाला —याचा कर्ता इरुगप दण्डाधिनाथ उर्फ भास्कर हा १४ व्या शतकाच्या उत्तरार्धात विजयानगरच्या दुसऱ्या हरिहराच्या कारकीर्दीत होऊन गला याचें नाव निरुपम अथवा मिरुग असेंहि दिलेलें आढळतें याचा कोश बहुतेक वैजयंतीवर उभारलेला असावा

जटाधराचें अभिधानतत्र (नामलिंगानुशासन) —ही एक तऱ्हेची अमरकोशाचीच वाढविलेली आवृत्ति आहे कर्ता चाटि अथवा चट्टग्रामचा ( चितागाग—बगाल ) होता ऑफ्रेस्टच्या म्हणण्याप्रमाणें हा रायमुकुटाच्या पूर्वीचा असावा

रूपचद —याची लहानशी रूपमजरी नाममाला ही १५८८ त रचिली गेली याच सुमारास पुडरीक विठ्ठलानें शीघ्रबोधिनीनाममाला रचिली

हर्षकीर्तीची शारदीयाख्या नाममाला —ही १६ व्या शतकाच्या अखेरीस तयार झाली हा ग्रथ पन्नकोशसग्रहात शिळाप्रेसवर छापला आहे यात प्रथम शारदेचीं नावें दिलीं आहेत, त्यावरूनच याचें नाव वरीलप्रमाणें असावें हा श्रीमालापुरीचा जैन रहिवासी होता "श्रीमालापुरीयकान्द्रय तपागच्छाधिप पूज्यपादसूरि श्रीप्रभुचद्रकीर्तिगुरुवर्तेया पदानुग्रहात् मुमावाभिजनोचिता लघुतरा श्रीनाममालामिमा चक्रे पाठक हर्षकीर्तिरखिला श्वेताबर ग्रामणी ॥"

अप्पय्यदीक्षिताची नामसग्रहमाला ( सुमारें १६ वें शतक ) —हा एकार्थकोश असुन यावरील टीकेंत जुन्या कोशातील अनेक अवतरणें दिलीं आहेत

पद्मनाभाचा भूरिप्रयोग —यात एक लहान एकार्थकोश व मोठा अनेकार्थकोश असे कोश असून अमरकोशाचा टीकाकार नारायणशर्मन् या ग्रथकर्त्याचा उल्लेख करतो

रामेश्वराची शब्दमाला —ही भूरिप्रयोगासारखीच आहे काल माहीत नाहीं

वेणीदत्ताचा पचतत्त्वप्रकाश —हा १५४४ त झाला याची शिळाप्रेस पद्यकोशसग्रहात आहे यात बरेच अर्वाचीन शब्द आहेत उदा "आराद्रयन्त्रपल्याण ॥ जीन ॥ तरवारिम्नीनमार्गे कृपाण कोपमदिर। तलवार। दिल्लीपति सार्वभौमोधीशोभूपपुरदर। पातिसाह शाककर्ता। सार्वभौमस्य" याचे भूमिभानु, जलभानु, तजोभानु, वायुभानु, आकाशभानु असे पाच भाग असून त्यात मनुष्यमरीचि, शैलमरीचि, दिक्पालमरीचि शब्दमरीचि अशीं पोट प्रकरणें आहेत याचा काल क्षितिगगन तुरगधाणिसख्यक वर्षे ( १७०१ ) शुचिधवल सुषष्ठ्या भानुवारेच हस्ते।' असा दिला आहे ग्रथकर्त्यानें आपलें वर्णन 'श्रीयाज्ञिकवशावतस नीलकठात्मज जगज्जीवनसूनु वेणीदत्त' असें दिलें आहे

मथुरेश विद्यालंकार —याची शब्दरत्नावलि ही वरुआच्या म्हणण्याप्रमाणें अलीकडील सर्व कोशांत उत्तम असून १६६६ त रचली असावी

अथेन्सचा डेमेट्रिऑस गॅलनास याची १७८६–१८३३ च्या दरम्यान रचलेली संस्कृत एकार्थशब्दसूची (ग्लॉसरी) यासंबधीं वेबरनें माहिती दिली आहे व तदनुसार एकार्थकोश रचण्याची भारतीय पद्धति व युरोपियन शास्त्राच्या आकांक्षा यांचा मेळ या सूचींत घातला गेला आहे यांत मुख्य शब्द प्रथम पष्ठी विभक्तींत दिला असून त्याचे समानार्थक शब्द (सुमारें २५०००) त्यापुढें प्रथमेंत दिले आहेत गॅलनासच्या प्रस्तावनेनुसार ही सूची त्याच्या एखाद्या ब्राह्मण मित्रानें तयार केली असा वीसें वाटतें वेबरनें याचे कांहीं उतारे दिले आहेत बोथलिंगच्या लहान शब्दकोशांत या कोशांतील अवतरणें घेतलीं आहेत यांत कांहीं कांहीं ठिकाणीं मूळ साधनें सदोष असल्यामुळें अथवा तीं वापरण्यांत चूक झाल्यानें चुका झालेल्या आहेत

**विशिष्ट विषयाचे शब्दकोश**—या प्रकारच्या शब्दकोशाच्या जाती व त्यांतील मुख्य ग्रंथ पुढें दिले आहेत

एकाक्षरकोश —या तऱ्हेच्या कोशांतून एकाक्षरी नामें ख, गा, भ वगैरे सारखीं किंवा समुसारखीं अव्ययें अथवा निर निराळ्या अर्थानें वापरलीं जाणारीं कांहीं गूढार्थव्यंजक वर्ण किंवा अक्षरें दिलेलीं असतात यामुळें या कोशाचा तंत्रवाङ्मयाच्या मातृकाकोशाशीं संबंध लागतो असे कांहीं ग्रंथ खालीं दिले आहेत

पुरुषोत्तमदेवाचा एकाक्षरकोश —हा द्वादशकोशसंग्रहांत शिळाप्रेसवर व अभिधानसंग्रहांत (१ न ४) व मुंबईस सदाशिव बजाबा अमरापुरकर शास्त्री यांनीं १८७४ मध्यें छापला आहे याची श्लोकसंख्या ३८ असून वर्णानुक्रमांत ह नंतर क्ष घेतला आहे अशाच नावाचा एकाक्षराभिधान अथवा चन्द्रनिघंटु वररुचीच्या नावावर प्रसिद्ध आहे

'संस्कृत कोशकुसुम' मध्यें छापलेली विश्वशंभूची 'एकाक्षरनूतननाममाला' ११५ श्लोकांची आहे वल्लभगणीनें या ग्रंथकर्त्याचा उल्लेख वारंवार केला आहे याशिवाय अधिक माहिती नाहीं सुधाकलशाची एकाक्षरनाममालिका ही १४ व्या शतकांतील व भरतसेनाचा एकवर्णार्थसंग्रह हा १८ व्या शतकांतील आहे

मातृकाकोशांपैकीं द्वादशकोशसंग्रहांत शिळाप्रेसवर छापलेला महीदासाचा मातृकानिघंट उल्लेखता येईल

द्वादशकोशसंग्रहांतील महादेवाचा अव्ययकोश हा या प्रकारचा असा एकच स्वतंत्र दिसतो मोठ्या कोशांतून—एकार्थ व अनेकार्थ कोशांतून—अव्ययासंबधीं विभाग असतोच

द्विरूपकोश (शब्दभेद) —या लेखनपद्धतीविषयक सूचींपैकीं सर्वांत महत्त्वाचा व बहुतेक सर्वांत जुना म्हणजे महेश्वराचा शब्दभेदप्रकाश होय अभिधानसंग्रहांत (१ न ५०) पुरुषोत्तमदेवाचा द्विरूपकोश छापला आहे त्यांत ७५ श्लोक आहेत द्वादशकोश संग्रहांत याचीच एक निराळी प्रत ५७॥ श्लोकांची व एक द्विरूपकोश ५५॥ श्लोकांचा निनावी छापला आहे आणखी येथें निर्देश करण्यासारखे कोश म्हणजे भारतसेनाचा द्विरूपध्वनिसंग्रह व कचग विल्हणकवीचा निरूप कोश हे होत

उणादिकोश —शिवरामाचा लक्ष्मीनिवासाभिधान कोश (१८ व्या शतकांतील) षट्कोशसंग्रहांत प्रसिद्ध झालेला आहे यानें आपल्या प्रस्तावनेंत "नानाविधत्वगामिन्यां याथै शब्देंदुशेखर मनोरमाया व्याख्याना सोऽयं लिखितोमया" असें म्हटलें आहे. व स्वतःची माहिती शेवटीं 'श्रीमत्त्रिपाठ्युपनामक त्रिलोकचंद्रात्मजकृष्णरामसूनु शिवरामकृतौ' अशी दिली आहे रामशर्मनच्या उणादिकोशासंबंधीं ऑफ्रेक्टनें आपल्या उज्ज्वलदत्ताच्या प्रस्तावनेंत (पृ २१) लिहिलें आहे शुभशीलगणीची उणादिनाममाला १५ व्या शतकाच्या उत्तरार्धांतील आहे रामगोविंदच्या शब्दार्णवतरीचें वर्णन एगलिंगनें दिलें आहे (कॅ पृ २४५) कालिदासाच्या नानार्थशब्दरत्नकोशावर निचुलयोगीन्द्रानें टीका लिहिली असून इंडियन अँटिक्वरींतील (१ ३४१) वर्णनावरून तो कोश याच सदराखालीं यईलसें दिसतें

**वैद्यशास्त्रविषयक वनस्पतिकोश**—या कोशांतून वनस्पति पशु अन्नें, सर्व तऱ्हेच्या औषधी यांचीं वर्णनें—म्हणजे जवळ जवळ औषधीविद्याच—दिलेलीं असतात व यांचें विशिष्ट नाव म्हणजे निघण्टु सर्वांत जुना म्हणजे धन्वंतरीनिघण्टु याचीं ९ प्रकरणें आहेत आणि क्षीरस्वामीच्या म्हणण्याप्रमाणें हा अमरकोशाच्या आधींचा आहे आनंदाश्रमग्रंथावलींत (न ३३) हा महत्त्वाचा कोश छापला आहे शाश्वताचा या सदराखालीं येणारा एक कोश व हेमचंद्राचा निघण्टुशेष यासंबधीं वर लिहिलेंच आहे एका अज्ञात ग्रंथकर्त्याची मल्लिनाथानें उल्लेखिलेली अभिधानरत्नमाला (षड्रसनिघण्टु), १३७४ त रचलेला मदनपालाचा मदनविनोद, ऑफ्रेक्टच्या म्हणण्याप्रमाणें यापेक्षा अलीकडचा असलेला नरहरीचा राजनिघण्टु चक्रपाणिदासाची शब्दचंद्रिका व १६७७ त झालेला शिवदत्ताचा शिवप्रकाशटीकेसहित असलेला शिवकोश नावाचा नानार्थकोश इतक्यांचा येथें आणखी निर्देश करण्यासारखा आहे

ज्योतिष व ज्योतिषशास्त्रविषयक कोशांपैकीं हरिदत्ताचा गणितनाममाला (द्वादशकोशसंग्रहांत शिळाप्रेसवर छापलेली) वेदांगरायाचा १६४३ त रचलेला इराणी–अरबी–संस्कृत पारसीप्रकाश व वज्रभूषणाचा त्याच सुमारास रचलेला पारसीविनोद यांचा उल्लेख करता येईल

क्षेमेंद्राच्या लोकप्रकाशावर बुल्हरनें काश्मीररिपोर्टांत (पृ ७५) लिहिलें आहे कोशवाङ्मयात याचें स्थान विशिष्ट रूपाचें असून वेबरच्या मतें तो १७ व्या शतकांतील आहे

**कोशसंग्रह**—अमरकोश-त्रिकांडशेष-हारावली-मेदिनी याचा संग्रह कोलब्रुकच्या प्रयत्नानें (कलकत्ता १८०७) छापला गेला. ही प्रत फार सदोष आहे सदाशिव बजाबाशास्त्री अमरापुरकर यांनीं कोशचतुष्टय (त्रिकांड, मेदिनी, हारावली, एकाक्षरी (मुंबई १८५४) या चार कोशाच्या संग्रहाची शिळाप्रेस प्रत छापली आहे 'सङ्गनकोशयुग्मम्' (कराची १८६७) यात विश्वशंभु व महाक्षपणक याचे कोश आहेत बनारसचे शिळाप्रेसमधले 'पड्कोशसंग्रह' व 'द्वादशकोशसंग्रह' हे त्यापेक्षा महत्त्वाचे आहेत यापैकीं पहिले १८७३ (संवत् १९३०) साली प्रकाशित असून त्यात हेमचंद्राचे एकार्थ व अनेकार्थ कोश, शिवरामाचा उणादिकोश, पद्मनत्त्वप्रकाश, शारदीनाममाला आणि विश्व आणि हलायुध हे आहेत विश्वाचें प्रकाशन अगदींच सरासरी आहे परंतु दुसरी प्रत उपलब्ध नसल्यामुळें त्याशिवाय चालणार नाहीं द्वादशकोशसंग्रहात (१८७३ संवत् १९२९) मेदिनी, एकाक्षर कोश (पुरुषोत्तमाचा), दान द्विरूपकोश, त्रिकांडशेष, अनेकार्थध्वनिमञ्जरी, हारावली, धनंजयकोश, वररुचिकोश, गणितनाममाला, मातृकाकोश (महीधराचा) व महादेवाचा अव्ययकोश इतके आहेत

आनंदराम बरुआच्या नानार्थसंग्रहात (संस्कृत भाषेचें व्याकरण ग्रंथ ३, भाग १, कलकत्ता १८८४) महत्त्वाच्या अनेकार्थ-कोशातील कोशसाधनें एके ठिकाणीं केलेलीं आहेत त्यात अमर, हलायुध, त्रिकांडशेष व हारावलींतील नानार्थविभाग व अनेकार्थसंग्रह, विश्वकोश, मेदिनी व आणखी काहीं लहान कोश आहेत बरुआनें नानार्थवाचक शब्द वर्णानुक्रमानें—हल्लींच्या पद्धतीप्रमाणें—लावले आहेत प्रत्येक शब्दाखालीं अनेकार्थकोशातील शब्दश अवतरणें दिलीं आहेत पुस्तकाच्या शेवटीं महेश्वराचा 'शब्दभेद प्रकाश' जोडला आहे हा 'नानार्थसंग्रह' संदर्भग्रंथ म्हणून उपयोगी आहे बाकी तितक्या काळजीपूर्वक तयार केलेला नसल्यामुळें पूर्ण विश्वासार्ह नाहीं

अभिधानसंग्रह या प्राचीन कोशसंग्रहाचे दोन विभाग बाहेर पडले आहेत (मुंबई १८८९, १८९६) त्यातील पहिल्या भागात अमरकोश, पुरुषोत्तमाचे त्रिकांडशेष, हारावली, एकाक्षरी व द्विरूप, व हेमचंद्रकोश व टीका आहेत दुसऱ्या भागात विश्वकोश आणि शब्दभेदप्रकाश हे आहेत 'संस्कृत कोशवाङ्मयाचे मूलग्रंथ' ही सर्वांत महत्त्वाची ग्रंथमाला असून तिच्या पहिल्या विभागात (१८९३) हेमचंद्राच्या अनेकार्थसंग्रहाचें महेंद्राच्या टीकेंतील पुष्कळ उतारे देऊन प्रो झकारियानें प्रकाशन केलें आहे दुसऱ्या विभागात (१८९५) हेमचंद्राची उणादि गणविवृति प्रकाशित केलेली आहे तिसऱ्या विभागात मंखकोश यावयाचा आहे

याखेरीज ऑफ्रेस्टच्या ग्रंथसूचीवरून केलेली एकंदर संस्कृत कोशाची यादी शेवटीं दिली आहे

याप्रमाणें संस्कृत वाङ्मयातील कोशभांडाराचें थोडक्यात समालोचन केलें यावरून आपणास हें स्पष्ट होतें कीं संस्कृत शब्दकोश हे कवीस अथवा ग्रंथकारास योग्य शब्द सुचविण्याकरिता किंवा एकाच शब्दाचे श्लेषादि उपयोगाकरिता अनेकार्थ सुचविण्याकरिता उपयुक्त होत अर्थात् टीकाकार या कोशाचा अर्थ लावण्याच्या कामींहि उपयोग करीत हें त्यांनीं आपल्या टीकात वारंवार कोशाचे आधार दिले आहेत यावरून दृष्टीस पडतें परंतु भाषेंतील सर्व शब्दाचा संदर्भसुलभसंग्रह करून त्या शब्दाचे अर्थ व्युत्पत्ति वगैरे देऊन स्पष्टीकरण करण्याचें काम या कोशाकडून होत नव्हतें व ही कोशकाराची दृष्टीहि नव्हती वर्णानुक्रमरचनेच्या बाबतींत नानार्थ किंवा अनेकार्थ कोशानीं काहीं प्रगति केलेली दिसून येते या कोशात विशिष्ट अक्षर शेवटीं असलेले शब्द वर्णानुक्रमानें लावून त्यामध्यें पुन्हा त्यातील अक्षरसंख्येनुसार एकापुढें एक लावलेले आढळतात व हे लावताना काहीं कोशकारानीं आद्य अक्षर व काहींनीं आद्य अक्षर व त्या पुढील स्वर एवढे लक्षात घेतलेले आढळतात पण पुढील अक्षराकडे कोणीच लक्ष दिलेलें आढळत नाहीं सामासिक मुख्य शब्द शब्दाच्या पोटात देण्याचा प्रयत्न एका कोशकारानेंच (धनंजय) केलेला आढळतो व्युत्पत्ति वगैरे स्पष्टीकरण करण्याचें काम टीकाकाराचें समजण्यात येई व कोश हा मुखोद्गत करावयाचा असल्यामुळें तो पद्यात्मक आणि संक्षिप्त करण्याकडे प्रवृत्ति असे काहीं कोशावरील टीकात अर्थ स्पष्टीकरणार्थ अवतरणें घेतलेलीं आढळतात पण या सर्वांचा अंतर्भाव करून संदर्भसुलभ कोशरचना करण्याकडे पूर्वीच्या ग्रंथकाराचें लक्ष्य गेलें नव्हतें, व हें कार्य पाश्चात्त्याचा संबंध आल्यानंतर आपल्याकडे होऊं लागले आणि अर्वाचीन संपूर्ण कोशाची कल्पना आपण पाश्चात्त्याकडूनच घेतली तेव्हा या कोशरचना शास्त्रामध्यें पाश्चात्त्यराष्ट्रात कशी प्रगति होत गेली त्याचें आतां अवलोकन करूं

**पाश्चात्त्य कोश, उगम**—पाश्चात्त्य देशामध्यें कोशरचनापद्धतीचा विकास कसा झाला याचें आपणास ज्ञान करून घ्यावयाचें झाल्यास आपणास परिचित अशी जी इंग्रजी भाषा तीमध्यें कोशरचनेची परिणति कशी झाली हें पाहिलें असता पुरें होईल सर्व युरोपप्रमाणें इंग्लंडमध्येंहि ग्रीक व लॅटिन या भाषाचें वर्चस्व दीर्घकालपर्यंत होतें विशेषत धार्मिक ग्रंथाची भाषा लॅटिन असल्यामुळें व पुस्तकलेखनाचें काम बहुधा धर्मोपदेशकाकडेच असल्यामुळें बहुतेक ग्रंथ धार्मिक विषयावर व लॅटिनमध्येंच लिहिले जात व त्याचा अभ्यासहि बहुधा नवशिक धर्माध्यापकच करीत असत या अभ्यासकास जेव्हा एखाद्या ग्रंथातील लॅटिन शब्दाचा

अर्थ समजण्यास अडचण पडे किंवा कठिण वाटे तेव्हां त्या शब्दाचा अर्थ कळल्यावर ते आपल्या पुस्तकामध्ये तो अर्थ बाजूस लिहून ठेवीत असत हा अर्थ लॅटिन भाषेतील दुसऱ्या सोप्या शब्दाच्या रूपानें किंवा देशी भाषेतील शब्दामध्ये लिहिलेला असे अशा तऱ्हेनें लॅटिन ग्रंथातील शब्दावर ग्रंथातल्याग्रंथातच प्रथम टिप्पणी लिहिल्या जात पुढें अशा टीपांचा उपयोग इतरांहि ग्रंथ वाचतांना व्हावा म्हणून या टीपा स्वतंत्र कागदावर लिहिल्या जाऊं लागल्या व अशा तऱ्हेनें लॅटिन शब्दाचे सुलभ अर्थ देणाऱ्या यादी याद्या तयार झाल्या

कालांतरानें या याद्या एकत्र करून त्यांचा उपयोग आपलें लॅटिन शब्दांचें ज्ञान वाढविण्याकडे व विद्यार्थ्यांस लॅटिन शिकविण्याकडे करण्याची कल्पना कोणाला तरी सुचली असावी, व अशा याद्या एकत्र करतांना त्यातील शब्द शोधून काढणें सोपें जावें म्हणून प्रथम सर्व याद्यांतील A अक्षरानें आरंभ होणारे शब्द एकत्र आणून नंतर B अक्षरानें आरंभ होणारे शब्द, नंतर C आद्याक्षर असणारे शब्द अशा रीतीनें आद्यवर्णानुक्रमानें रचलेली एक यादी त्यानें तयार केली असावी यानंतर आणखी एखाद्या लेखकानें अशा अनेक याद्यांचा संग्रह करून त्या एकत्र करण्याची खटपट केली असावी, व ती करतांना पहिल्या दोन वर्णांच्या अनुक्रमानें तिची रचना केली असावी।

या वरील तिन्ही स्वरूपांतील याद्या आपणास इंग्लंडमध्यें पहावयास सांपडतात उदा लीडन येथील शब्दयादींतील शब्द जसे निरनिराळ्या ग्रंथांतील टीपा उपलब्ध झाल्या तसेच भरभर एकत्र केलेले आढळतात एपिनॉल शब्दयादीमधील शब्द अनेक याद्या एकत्र करून जमविलेले व आद्यवर्णानुक्रमानें लावलेले आढळतात या यादींत ' A "अक्षरांत ५५० शब्द दिलेले आहेत व कोणताहि एक शब्द हुडकून काढण्यास हे ५५० शब्द डोळ्यांखालून घालावे लागतात कॉर्पस ग्लॉसरी नांवाच्या तिसऱ्या यादीमध्यें Aa, Ab Ac, अशा तऱ्हेनें पहिल्या दोन वर्णानुक्रमानें शब्द लावलेले आढळतात दहाव्या शतकांतील एका यादींत तिसऱ्या वर्णापर्यंत अनुक्रम लक्षांत घेऊन शब्द लाविलेले आढळतात ही यादी ब्रिटिश म्युझियममध्यें उपलब्ध आहे ( एच् ए आर् एल् ३३७६ ) या बाबतींत यापुढें मात्र प्रगति झालेली आढळत नाहीं वरील याद्यांपैकीं कॉर्पस यादी ही आठव्या शतकांतील असून एपिनॉल व लीडन या तीपेक्षां जुन्या आहेत, म्हणजे इंग्रजी कोशरचनेचा आरंभ ख्रिस्त शकाच्या सातव्या शतकांत जातो

**पहिले इंग्रजी कोश**—या याद्यांत प्रथम प्रथम लॅटिन शब्दाचा लॅटिन भाषेमध्येंच अर्थ देण्याची प्रवृत्ति विशेष दिसून येते परंतु हळू हळू ही प्रवृत्ति कमी होत जाऊन इंग्रजी भाषेमध्यें अर्थ देण्याची प्रवृत्ति वाढत चाललेली आढळते मध्यंतरीं नॉर्मन विजयामुळें फ्रेंच भाषेचा पगडा इंग्रजी भाषेवर पडून इंग्रजी भाषेचा प्रगति खुंटल्यासारखी झाली होती परंतु चौदाव्या शतकाचे अखेरीस इंग्रजी भाषा पुन्हा प्रगतीच्या मार्गास लागली याच सुमारास छापण्याची कलाहि वाढीस लागली होती व पंधराव्या शतकांत आपणास एक पंचवीसशें शब्दांचा पूर्णपणें वर्णानुक्रमानें लाविलेला इंग्रजी कोश आढळतो पंधराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारासच ' मेड्युलाग्रमॅटिकस ' नांवाचा पहिला लॅटिन-इंग्रजी शब्दकोश तयार झाला आतापर्यंत तयार झालेले सर्व शब्दकोश अर्थात लॅटिन शब्दांचे इंग्रजींत अर्थ देणारे लॅटिन-इंग्रजी कोश होते व या कोशांना नांवेंहि निरनिराळ्या प्रकारचीं असत आपल्या शब्दकोशाला डिक्शनरी हें नांव प्रथम सर टॉमस इलियट यानें दिलें

जरी वर्णानुक्रमरचनापद्धति रूढ होत चालली होती तथापि विषयवार शब्दरचनापद्धति पूर्णपणें लोप पावली होती असें नाहीं उदा० १५५४ सालीं ज विथॉल्स् यानें प्रसिद्ध केलेल्या शब्दकोशामध्यें शब्दांचा अनुक्रम विषयवारीनें असून ते पुढें दिलेल्या सारख्या कांहीं मथळ्याखालीं दिलेले आढळतात —आकाश, राशी ग्रह, काल ऋतु वारे, जगाचे विभाग, पक्षी, मासे, गलवत धातु सर्प, कीटक, सरपटणारे प्राणी, चतुष्पाद प्राणी वगैरे पहिला इंग्रजी-लॅटिन शब्दकोश जॉफ्रे या वैय्याकरणानें इ स १४४० मध्यें लिहिला त्यामध्यें १० हजार शब्द असून त्याचें नांव ' प्रॉम्टोरियम ' असें होतें याच्या पुढें अनेक आवृत्ती निघाल्या व त्याची पहिली छापील प्रत १४९९ मध्यें प्रसिद्ध झालेली आढळते यानंतर नांव घेण्यासारखे इंग्रजी कोश म्हटले म्हणजे विल्यम हॉर्मन याचा ' व्हल्गॅरिया ' ( १५१९ ) नांवाचा कोश व रिचर्ड हॉवलेट याचा ' ॲबिसिडेरियम ' ( १५५२ ) आणि जॉन बॅरेट याचा ' अल्व्हेरी ( १५७३ ) हे होत यातील पहिल्या कोशांत वाक्प्रचार व म्हणी असून त्याची रचना विषयवारी आहे दुसऱ्या कोशांत मात्र इंग्रजी शब्दांचे लॅटिनबरोबर इंग्रजींतहि अर्थ दिलेले आढळतात याच सुमारास पीटर लेव्हिन्स ( १५७० ) यानें ' इंग्लिश ऱ्हायमिंग डिक्शनरी ' नांवाचा शब्दांच्या अन्त्याक्षरानुक्रमानें लाविलेला यमक कोश तयार केला

वरील सर्व कोशांत आपणास लॅटिन भाषेस विशेष महत्त्व दिलेलें आढळतें याच सुमारास इंग्रजी राजघराण्याचा संबंध फ्रेंच राजघराण्याशीं आल्यामुळें ( आठव्या हेन्रीची बहीण मेरी हिचें लग्न फ्रान्सच्या बाराव्या लुईशीं झाल्यामुळें ) इंग्रजी फ्रेंच कोशहि तयार झाले त्याचप्रमाणें या सुमारास इटॅलियन-इंग्लिश कोश ( जान फ्लोरिओ १५९९ ) व स्पॅनिश-इंग्लिश कोश

(रिचर्ड पर्सिव्हल १५९९) हाहि प्रसिद्ध झाले. याचीच परिणति म्हणजे १६१७ मध्यें जॉन मिन्सो यानें एक बहुभाषाकोश तयार केला. यामध्यें इंग्रजी, वेल्श, लो डच, हाय डच, फ्रेंच इटॅलियन, स्पॅनिश, पोर्तुगीज ग्रीक, लॅटिन, हिब्रू इतक्या भाषांचा अंतर्भाव केलेला आढळतो. तथापि अद्यापपर्यंत या निरनिराळ्या कोशामध्यें जरी त्या वेळच्या इंग्रजी भाषेंतील शब्दांचा संग्रह आढळून येतो तथापि इंग्रजी भाषेचें स्वतंत्र ज्ञान होण्यास इंग्रजी भाषेचा स्वतंत्र कोश असण्याची भावना प्रदीप्त झालेली दिसत नव्हती. त्या वेळच्या विद्यापुनरुज्जीवनाच्या काळातील पंडितास ही कल्पना बाष्कळ वाटत असे व १९ व्या शतकातीलहि कांहीं पंडितास ती तशीच वाटत होती. तथापि या काळात विद्येच्या प्रसाराबरोबर पुष्कळच लॅटिन, ग्रीक, हिब्रू, अरबी या भाषांतील पंडिती शब्द इंग्रजी भाषेंत प्रविष्ट झाले होते व त्यांचें शुद्ध स्वरूप व अर्थ स्पष्ट करण्याची मात्र आवश्यकता सर्वांस भासूं लागली होती. त्यामुळें अशा कठिण शब्दांचे कोश १७ व्या शतकात प्रथम तयार होऊं लागले. असा १२० पृष्ठांचा एक कोश रॉबर्ट कॉड्रे नावाच्या शाळा मास्तरानें १६०४ मध्यें प्रसिद्ध केला. त्यात ३००० कठिण शब्द वर्णानुक्रमानें लावलेले आढळतात. या कोशाच्या १६१२ पर्यंत ३ आवृत्ती निघाल्या. असाच एक कोश डॉ. जॉन बुलोकर यानें १६१६ मध्यें प्रसिद्ध केला. याच्याहि १६८४ पर्यंत अनेक आवृत्ती निघत होत्या. तथापि 'दि इंग्लिश डिक्शनरी' असें नाव धारण करणारा पहिला शब्दकोश १६२३ मध्यें हेन्री कॉकेरॅम यानें प्रसिद्ध केला. याचे तीन भाग असून पहिल्या भागात कठिण शब्दांचे अर्थ दिले आहेत व दुसऱ्या भागात सोप्या शब्दांना कठिण प्रतिशब्द दिले आहेत. याचा उद्देश लेखकाला प्रौढ शब्दयोजना करण्यास सुलभ पडावें हा होता. तिसऱ्या भागात देव-देवता, स्त्री-पुरुष, राक्षस, युद्धें, पक्षी, पशु, वनस्पती, दगड, झाडें, कृमि, मासे वगैरेबद्दल माहिती असून ऐतिहासिक व पौराणिक उतारे दिले आहेत. या कोशाच्याहि पुढें अनेक आवृत्ती निघाल्या. असाच तऱ्हेचा हिब्रू, ग्रीक, लॅटिन वगैरे भाषांतील जे शब्द इंग्रजींत आले होते त्यांचा कोश १६५६ मध्यें टॉमस ब्लाउंड यानें प्रसिद्ध केला.

**व्युत्पत्तिकोश**—परंतु अद्यापपर्यंत इंग्रजी शब्दकोशामध्यें सर्व इंग्रजी शब्द आले पाहिजेत ही कल्पना कोणास सुचली नसावी किंवा निदान ती कोणीहि अमलात आणली नव्हती हें मात्र खरें. अशा तऱ्हेचा प्रयत्न प्रथम नॅथॅनियल बेली नावाच्या इंग्रज गृहस्थानें करून आपली "युनिव्हर्सल इटिमॉलॉजिकल इंग्लिश डिक्शनरी" १७२१ त प्रसिद्ध केली. या कोशात शब्दांचे केवळ अर्थच स्पष्ट केलेले नसून त्यांची व्युत्पत्तीहि दिलेली होती. या कोशाच्या पुढील वीस वर्षांत दहा आवृत्ती निघाल्या. याचेंच अनुकरण पुढें डाइक आणि पार्डन (१७३५) बी. एन्. डिफो (१७३५) आणि बेंजामिन मार्टिन (१७४९) यांनीं केलें.

**जॉन्सनकोश**—अठराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास इंग्रजी भाषेचा एक अधिकृत कोश असावा अशी कल्पना अनेक विद्वान लोकांच्या मनात घोळूं लागली. ही कल्पना इंग्लंडबाहेरहि याच सुमारास उद्भूत झालेली दिसते, व इटली व फ्रान्स या देशामध्यें याच कार्याकरिता विद्यापीठें (अॅकेडमीज) स्थापन करण्यात आलीं होतीं. इंग्लंडमध्यें अशा तऱ्हेची अॅकेडमी नव्हती. तथापि त्या देशातील विद्वानांनीं ही कल्पना पार पाडली. अशा तऱ्हेच्या कोशाची कल्पना प्रथम अलेक्झँडर पोपपुढें मांडण्यात आली होती व त्यास ती पसंत होती. परंतु तो १७४४ त मृत्यु पावल्यानंतर ही कल्पना सॅम्युअल जॉन्सन यापुढें मांडण्यात आली व १७४७ मध्यें लंडनमधील ५।६ प्रकाशकांनीं ३ वर्षात असा कोश १५०० गिनीज घेऊन देण्याचा करार त्याजपाशीं केला. तथापि प्रत्यक्ष त्या कार्यास तिप्पट काल लागला, व ठरलेली रकमहि कधींच उडून गेली. अखेरीस १७५५ मध्यें प्रसिद्ध जॉन्सनचा कोश दोन भागांत बाहेर पडला. या कोशाचें वैशिष्ट्य म्हणजे शब्दाचा अर्थ स्पष्ट करण्याकरितां वापरलेलीं अवतरणें होत. या कोशामुळें इंग्रजी भाषेंतील कोशरचनेस मोठें महत्त्व प्राप्त झालें. शब्दातील कोणत्या अवयवावर जोर द्यावयाचा हें देण्याची पद्धत बेलीनेंच आपल्या कोशात समाविष्ट केली होती. परंतु अद्याप शब्दाचा प्रत्यक्ष उच्चार कसा करावयाचा ही गोष्ट कोशामध्यें दिग्दर्शित केली जात नव्हती. तें कार्य डॉ. विल्यम केन्रिक यानें प्रथम आपल्या न्यू डिक्शनरी (१७७३) या कोशात केलें, व तेंच कार्य जॉन वॉकर यानें १७९१ मध्यें पूर्ण केलें.

एकोणिसाव्या शतकाच्या प्रथम पादापर्यंत जॉन्सनचा कोश हाच आधारभूत मानला जात असे व यालाच पुरवणी म्हणून अनेक लहान लहान कोश प्रसिद्ध करण्यात येत होते. इ. स. १८१८ मध्यें टॉड-जॉन्सन नावाची या कोशाची दुसरी वाढविलेली आवृत्ति आर्चडिकन टॉड यानें प्रसिद्ध केली. याच सुमारास इंग्रजी कोशामध्यें दोन महत्त्वाच्या कोशांची भर पडली. त्यांपैकीं एक नोहा वेब्स्टर याचा अमेरिकन कोश व दुसरा डॉ. चार्लस रिचर्डसन याचा इंग्रजी कोश होय. वेब्स्टर याचा इंग्लंडातील कोश हा सध्या एक अधिकृत कोश समजला जातो. परंतु त्याच्या पहिल्या आवृत्तींत मनःकल्पित व्युत्पत्ती फार दिलेल्या होत्या, त्या अलीकडे अधिक शास्त्रशुद्ध केलेल्या आढळतात. रिचर्डसन यानें अवतरणें देण्याचें महत्त्व ओळखून अनेक अवतरणें शोधून आपल्या कोशात समाविष्ट केलीं, व इ. स. १३०० पासून प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांतील अवतरणें त्यानें प्रथमच प्रकाशांत आणलीं. याचा उद्देश अवतरणांवरूनच शब्दाचा अर्थ वाचकांनीं समजून घ्यावा असा होता, परंतु कित्येकहि अवतरणें दिली

तरी तीं पुरेशीं होत नाहींत व वाचकांस त्यांतून अर्थ धुंडाळून काढणें दुरापास्त होतें. तथापि अवतरणांच्या दृष्टीनें हा कोश अत्यंत महत्त्वाचा आहे.

**विविध प्रकारचे कोश**—परंतु हे सर्व भाषेंतील शब्दांच्या संबंधीं झाले. परंतु ज्ञानाची वाढ जसजशी झपाट्यानें होऊं लागली तसतशी पदार्थांचीं किंवा कांहीं व्यक्तींचीं, स्थानांचीं नांवें वगैरेहि शब्दच असून इतर शब्दांप्रमाणें त्यांचा अर्थ देण्याची जरूरी जास्त भासूं लागली त्यामुळें कोशांमध्यें बराचसा अशा शब्दांचा भरणा केला जाऊं लागला. कालांतरानें स्वतंत्र विषयांकरितां स्वतंत्र संदर्भग्रंथ होऊं लागले व अशा तऱ्हेच्या स्वतंत्र ग्रंथांची वाढ पुष्कळच झाली. व हल्लीं तर शब्दकोशापेक्षां या इतर कोशांचीच संख्या व आकारहि फार वाढत गेले आहेत. सध्यां आपणांस चरित्रकोश, ऐतिहासिककोश व वास्तविक किंवा काल्पनिक निरनिराळ्या देशांसंबंधीं व व्यक्तींसंबंधीं विशिष्ट अथवा सामान्य गोष्टी, धंदे वगैरेंचे कोश आढळतात. याचें मोठें उदाहरण म्हणजे इंग्रजी राष्ट्रीयचरित्रकोश हा ग्रंथ होय तसेंच विशिष्ट देशासंबंधीं किंवा ग्रंथांसंबंधीं संदर्भग्रंथकोश; सर्व जग किंवा विशिष्ट देश, प्रांत, शहर, ग्राम, किल्ले, मठ वगैरेंचे स्थलकोश; तत्त्वज्ञानकोश; वाग्बलकोश; गणितकोश; सृष्टिशास्त्रकोश; प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, पक्षी, वृक्ष, वनस्पती, पुष्पें इ.चे कोश, रसायन, भूस्तर, खनिजोदन इ. शास्त्रांचे कोश; वास्तुसौंदर्य, चित्रकला, गायन इ.चे कोश; औषधि, शस्त्रक्रिया, शारीर, चिकित्सा, इंद्रियविज्ञान, राजकारण, दिवाणी-फौजदारी, धार्मिक इ. कायदे, राजनीति व समाजनीति यांचीं शास्त्रें, शेती, मुद्रणयंत्रयंत्र, व्यापार, नौकानयन, अश्वशास्त्र, युद्धशास्त्र, यंत्रशास्त्र, हस्तव्यवसाय इ. कला, यांचे कोश तयार होत आहेत तसेंच पुराणवस्तु, शक, सन, वंशवृक्ष, राजनीति, शब्दसंक्षेप, औषधांच्या सारणी, नामसंक्षेप इ. अनेक तऱ्हेचे कोश निरनिराळ्या भाषांतून तयार होत आहेत. व सर्व शास्त्रें, विद्या, कला इ. ची माहिती देणारे ज्ञानकोशहि बाहेर पडत आहेत. परंतु हे सर्व कोश स्वतंत्र असून आपणांस सध्यां फक्त शब्दकोशाविषयींच विचार कर्तव्य आहे. शब्दकोश व ज्ञानकोश यांमध्यें हा मोठा फरक आहे कीं, ज्ञानकोशामध्यें विशिष्ट शब्दानें प्रतीत होणाऱ्या विषयाची पूर्ण *माहिती द्यावयाची असते तर शब्दकोशामध्यें केवळ त्या शब्दाची माहिती द्यावयाची असते.* तथापि इंग्रजी भाषेंतील सेंचरी डिक्शनरीप्रमाणें कांहीं कोश शब्दकोश व ज्ञानकोश यांच्या संयुक्त स्वरूपाचेहि तयार होऊं लागले आहेत.

गरजेप्रमाणें कोशांचें स्वरूपहि निरनिराळ्या प्रकारचें असावें असें वाटूं लागतें. उदाहरणार्थ, जेव्हां एखाद्या शब्दाचा आपणांस पूर्णतः अभ्यास करावयाचा असतो किंवा एखाद्या शब्दाचा अथवा वाक्यांशाचा अर्थ निश्चित करण्याच्या कामीं शंका उत्पन्न होते तेथें मोठ्या कोशाचा उपयोग होतो. परंतु विशिष्ट तऱ्हेच्या अभ्यासास विशिष्ट कोश जास्त उपयोगी पडतात. उदा. एका शब्दास अनेक पर्यायशब्द पाहिजे असतील तर समानार्थ कोश जास्त उपयोगी पडेल. तसेंच वरचेवर कोश पहावयाचा असता किंवा एखाद्या अपरिचित भाषेंतील मजकुराचें भाषांतर करावयाचें असेल तर लहान कोश जास्त उपयुक्त ठरतो. कारण त्यातून शब्द लौकर शोधून काढता येतो. आणि त्यांत अर्थहि थोडक्यात दिलेले असतात. कांहीं कोश अनेक भाषांमध्यें असतात. उदा. कांहीं कोशांमध्यें एका भाषेंतील शब्दाचा अर्थ दुसऱ्या भाषेंतील शब्दामध्यें दिलेला असतो. अशा तऱ्हेच्या कांहीं कोशांमध्यें—उदा. जालच्या नाविक कोशांत–समुद्रपर्यटणासंबंधीं अनेक भाषांतील शब्दांचा संग्रह असून त्यांचा अर्थ फ्रेंच भाषेंत दिला आहे तसेंच एका लॅटिन कोशामध्यें ( Clepini Octoglotton ) लॅटिन शब्दाचे लॅटिनमध्यें व इतर सात भाषांमध्यें अर्थ दिले आहेत पॉथिएरच्या अनामी कोशांत अनामी शब्द चिनी लिपीमध्यें लिहून त्याचे चिनी व अनामी उच्चार दिले असून अर्थ फ्रेंच भाषेंत दिला आहे. अशा तऱ्हेचे व्युत्पत्तिकोश, परभाषाकोश, उपभाषाकोश, गुप्तभाषाकोश, ग्राम्य शब्दकोश, असंस्कृत शब्दकोश, अशुद्धप्रयोगकोश, निवडक शब्दकोश, वृत्तकोश, शब्दोच्चारकोश, शब्दमातृकाकोश, वक्तृत्वकोश, काव्यकोश, कायदेकोश, गानकोश, विशेषनामकोश, विशिष्टग्रंथकारकोश, नामकोश, क्रियापदकोश, अव्ययकोश, द्विरूपकोश, कठिण शब्दकोश इ. अनेक प्रकारचे कोश अलीकडे तयार होऊं लागले आहेत. एका कोशामध्यें (फिक्) तर इंडो-युरोपियन लोक जेव्हां एकत्र होते त्यावेळीं ते जी भाषा बोलत असावे अशी कल्पना करता येते अशा शब्दाचा संग्रह करण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. तसेंच एकानें ( पॉट ) इंडो-युरोपियन धातूंचाहि ( १८२६, पृष्ठें ५१४० ) तुलनात्मक कोश तयार केला आहे.

**अभिजातकोश**—कोशासंबंधीं प्राथमिक कल्पना अशी होती कीं, कोशकारानें अभिजात शब्दाचाच संग्रह करून त्यांचा अभियुक्त उपयोग तेवढाच दिग्दर्शित करावा. निदान तत्कालीन भाषेमध्यें अभिजात शब्द कोणते व त्याचा योग्य अर्थानें उपयोग कसा करावा हें दिग्दर्शित करणें हें कोशकाराचें काम समजलें जात होतें; म्हणजे कोशकारानें शब्दाची निवड करून शुद्ध स्वरूप देऊन त्यांचा योग्य उपयोग कोणता यासंबंधीं अधिकारपूर्वक सर्व प्रश्नाचा निर्णय करून त्या वेळच्या लोकाभिरुचीप्रमाणें भाषेचें स्वरूप निश्चित करावयाचें असे. या उद्देशास अनुसरून इटलीमध्यें सोळाव्या शतकांत "ॲकेडेमिया डेलाक्रुस्का" नांवाचें विद्यापीठ स्थापन करून इटॅलियन भाषेचें स्वरूप शुद्ध करण्याचा प्रयत्न करण्यात आला; आणि त्या संस्थेमार्फत १६१२ मध्यें त्या

भाषेचा अभिजात कोश प्रसिद्ध करण्यात आला. फ्रान्समध्येहि फ्रेंच ॲकॅडेमी स्थापून इ. सन १६९४ मध्यें जो फ्रेंच भाषेचा कोश प्रसिद्ध करण्यात आला त्याचाहि उद्देश हाच होता. अशा तऱ्हेचा इंग्रजी भाषेचा कोश करण्याची कल्पना अठराव्या शतकाच्या आरंभीं उत्पन्न झाली व त्या वेळच्या विद्वानांची-विशेषत अलेक्झांडर पोपसारख्या कवींची-अशी कल्पना होती कीं, इंग्रजी भाषेची त्या वेळीं पूर्ण वाढ झाल्ली असून जर एखाद्या कोशाच्या रूपानें तिचें स्वरूप निश्चित केलें गेलें नाहीं तर तिच्या अवनतीस लवकरच प्रारंभ होईल व ज्याअर्थी इंग्लंडमध्यें ॲकॅडमीसारखी संस्था नव्हती त्या अर्थी ज्या प्रथकाराची भाषा प्रमाणभूत मानण्यात येत असे अशा प्रथकारानेंच हें काम करणें अवश्य होतें. तेव्हा हें काम सॅम्युअल जॉन्सन याजकडे आलें व त्यानें १७५५ मध्यें आपला कोश दोन भागात प्रसिद्ध केला हें वर सांगितलेंच आहे. तो जरी अनेक दृष्टींनीं चांगला होता तरी त्या वेळच्या भाषेचें अभिजात स्वरूप निश्चित करण्याच्या कामीं तो समर्थ नव्हता. एखाद्या भाषेच्या स्वाभाविक वाढीला नियंत्रण घालता येईल या कल्पनेवर जॉन्सनचा स्वतःचाहि विश्वास नव्हता. तथापि त्याचा कोश पुढें एक शतकभर तरी प्रमाणभूत मानला जात असे. वरील समजुती विरुद्ध पहिली घोषणा डीन ट्रेंच यानें फिलॉलॉजिकल सोसायटीपुढें १८५७ सालीं "सध्याच्या इंग्रजी कोशातील काहीं दोष" अशा अर्थाचा एक निबंध वाचून केली. त्याचें म्हणणें असें होतें कीं, कोश म्हणजे केवळ भाषेंतील शब्दांचा संग्रह असावा. कोश-काराचें काम शब्दांची निवड करून त्यातील चांगले शब्द शोधून काढणें हें नव्हे. त्याचें काम केवळ भाषेंतील बरेवाईट सर्व शब्द एकत्र करून व्यवस्थित मांडण्याचें आहे, मग त्यातील काहीं शब्द त्यास पसंत असोत वा नसोत. तो भाषेचा टीकाकार नसून इतिहासकार होय! याचा थोडक्यात अर्थ असा कीं, कोशाचें ध्येय जें भाषेचें अभिजात स्वरूप दिग्दर्शित करावयाचें तें बदलून त्याच्या जागीं शास्त्रीय व व्युत्पत्तिदर्शक ध्येय ठेवावयाचें हा होय. जर्मनीमध्यें हें काम जेकब व व्हिल्हेल्म ग्रिम या बंधुद्वयानें जर्मन भाषेच्या बाबतींत यापूर्वीच केलें होतें व त्यांच्या कोशाचा पहिला भाग १८५४ मध्यें प्रसिद्ध झाला होता. थोडक्यात सांगावयाचें म्हणजे एखाद्या भाषेचा कोश करावयाचा म्हणजे त्या भाषेंतील प्रचलित अथवा लुप्त सर्व शब्द व त्यांचे अर्थ आणि उपयोग यांचा संग्रह करावयाचा अशी समजूत आहे. हें करीत असताना विशिष्ट शब्दाचा अभिजात उपयोग कोणता हें केवळ अप्रत्यक्ष रीतीनें दर्शविण्यास हरकत नाहीं. परंतु तें कोशकाराचें मुख्य काम नव्हे. हल्लींच्या समजुतीप्रमाणें अभिजात कोश ही कल्पना बाष्कळपणाची नसली तरी अशक्य मात्र मानली जाते.

**नवीन ऑक्सफोर्डकोश**—वर सांगितल्याप्रमाणें एकोणिसाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास वेस्ट मिन्स्टर येथील डीन डॉ. ट्रेंच यानें लंडन येथील फिलॉलॉजिकल सोसायटी(भाषाशास्त्रमंडळ)पुढें इंग्रजी कोशातील काहीं दोष या विषयावर दोन निबंध वाचले. त्यात विशेषतः त्यानें उपलब्ध कोशात शब्दांचा इतिहास सापडत नाहीं हें दिग्दर्शित केलें व विशिष्ट शब्द प्रथम केव्हा प्रचारात आला, त्याचा कोणता अर्थ प्रथम रूढ होता व त्यातून निरनिराळ्या अर्थांची वाढ कशी होत गेली व विशिष्ट शब्द केव्हा लुप्त झाला हें उपलब्ध कोशातून मुळींच आढळून येत नाहीं, व लुप्त शब्द तर बहुधा कोशातून गाळलेलेच असतात. तेव्हा अशा तऱ्हेचा शब्दांचा इतिहास देणारा कोश या सस्थेनें हातीं घ्यावा अशी त्यानें सूचना केली. यातूनच पुढें वर्णन केलेला 'ए न्यु इंग्लिश डिक्शनरी ऑन हिस्टॉरिकल प्रिन्सिपल्स' किंवा 'ऑक्सफर्ड इंग्लिश डिक्शनरी' या नावाचा कोश तयार झाला. फिलॉलॉजिकल सोसायटीनें प्रथम सामान्य कोशाच्या कल्पनेचा विचार करून अखेरीस ७ जानेवारी १८५८ रोजीं संपूर्ण नवीन इंग्रजी कोश करण्यासंबंधीं ठराव केला. या ठरावाप्रमाणें कोलरिज आणि फर्निव्हल याजकडे या कोशाच्या प्रकाशनाची व्यवस्था ठरविण्याचें काम सोंपविलें व पुढें नोव्हेंबर १८५९ मध्यें कोलरिज याची संपादक म्हणून नेमणूक केली. त्यानें १८६० मध्यें दोन वर्षांत आपण पहिला भाग प्रसिद्ध करूं असें प्रसिद्ध केलें. प्रथम त्यानें कोशाकरिता जें खणाळें तयार केलें होतें त्यात ६० हजार चिठ्या मावतील इतकी व्यवस्था होती. परंतु प्रत्यक्ष कोश तयार होताना भाषेंतील अगदीं कमी महत्त्वाच्या अक्षरासमुद्धा त्यापेक्षा जास्त चिठ्या लागल्या. कोलरिज १८६१ मध्यें मरण पावल्यानंतर संपादकीय काम फर्निव्हल याजकडे आलें व त्यास प्रथम कच्ची माहिती गोळा करण्याचेंच काम बरेच दिवस चालू ठेवलें पाहिजे असें वाटू लागलें, व माहिती जमविण्याचें व स्वयंसेवक, उपसंपादक नेमण्याचें काम त्यानें चालू ठेवलें. यानंतर या डिक्शनरीसंबंधीं वरींच वर्षेपर्यंत फारशी माहिती उपलब्ध नाहीं. पुढें कोशसंपादनाचें काम डॉ. जे. ए. एच. मरे याजकडे आलें. त्यानें १८७९ मध्यें फिलॉलॉजिकल सोसायटी तर्फे क्लॅरेंडनप्रेसबरोबर कोश छापण्याचा करार केला. या वेळची कोशाची कल्पना सध्या प्रसिद्ध झालेल्या कोशाच्या सुमारें निम्म्या इतकी होती. प्रत्यक्ष कोशाच्या छपाईस सुरवात १८८२ मध्यें झाली आणि पहिल्या प्रथाचा पहिला भाग १ फेब्रुआरी १८८४ मध्यें बाहेर पडला व पहिला ग्रंथ १८८८ मध्यें प्रसिद्ध झाला. त्यावेळीं सर्व कोश सुमारें ११ वर्षांत बाहेर पडेल असा डॉ. मरे याचा अदाज होता. परंतु प्रत्यक्ष हा कोश पुरा होण्यास १९२८ सन उजाडला! म्हणजे कोश छापावा असा मूळ ठराव १८५८ मध्यें करण्यात आल्यानंतर ७० वर्षांनीं हा कोश प्रत्यक्ष बाहेर पडला!

या कोशाचें स्वरूप —या कोशामध्यें ४१४८२५ शब्द आहेत त्यांपैकीं २४०१६५ मुख्य शब्द असून ६७१०५ दुय्यम प्रतीचे शब्द, ४७८०० विशेष संयुक्तशब्द, ५९७०५ सामान्य संयुक्त शब्द आहेत यांत सुमारें ५००००० शब्दांच्या व्याख्या असून १८२७३०६ अवतरणें आहेत या कोशांत सुमारें १२ शतकांत प्रचलित असलेल्या शब्दांचा समावेश केलेला आहे. या कोशांत प्रत्येक पानांत सुमारें ११२ ओळींचे तीन रकाने आहेत असे एकंदर रकाने ४६४६४ असून ते एकापुढें एक मांडल्यास त्यांची लांबी ९ मैल होईल व त्यांतील ओळी एकापुढें एक मांडल्यास त्यांची लांबी १७८ मैल होईल व या ओळींत सुमारें ५ कोटी शब्दसंख्या असून २२ कोटी अक्षरसंख्या आहे यांतील २४०१६५ मुख्य शब्दांपैकीं १७७९७० प्रचलित असून ५२४६४ लुप्त आहेत व ९७३१ परकीय आहेत ‘ एस् ’ या अक्षरांत सर्वांत जास्त म्हणजे ५७४७८ शब्द आहेत यानंतर ‘ पी ’ ३७६८९ व ‘ सी ’ मध्यें २९२९५ आहेत या कामांत शब्द जमविण्याच्या कामीं सुमारें ४०००० स्वयंसेवक लोकांचे श्रम खर्ची पडले आहेत इ स १८५७ मध्यें शब्दसंग्रहाचें काम सुरू झाल्याबरोबरच ७६ स्वयंसेवक मदत करण्यास पुढें आलेले दिसून येतात ही संख्या पुढें १८८१ मध्यें ८००, तर अखेरीस दीडहजार जवळ गेलेली आढळते यांत फक्त मुख्य शब्दसंग्राहकांचाच अंतर्भाव केलेला आहे या शिवाय किरकोळ मदत करणारे असंख्य लोक होते या लोकांमध्यें अमेरिकेपासून व्हिएन्नापर्यंत सर्व प्रदेशांतील लोक आढळतात थॉमस ऑस्टिन, आर जे व्हिटवेल, व टी हेंडरसन यांसारख्या लोकांनीं लाखों अवतरणांच्या चिठ्या करून पाठविल्या काहींनीं शास्त्रीय व पारिभाषिक शब्द लिहून पाठविले. ए क्यारेंड नांवाचा गृहस्थ तर हॉलंडमध्यें राहून अनेक वर्षें प्रुफें तपासण्याचें काम करीत होता याखेरीज प्रत्यक्ष उपसंपादकाचें कामहि विनामूल्य करणारे अनेक लोक होते तसेंच प्रुफें तपासणारे व संदर्भ तपासणारेहि अनेक स्वयंसेवक ठिकठिकाणीं काम करीत असलेले आढळतात या कोशाच्या संपादक वर्गांत पुढील नांवें आढळतात –डॉ जे ए एच् मरे ( १८३७–१९१५ ), हेनरी ब्राडले ( १८४५–१९२३ ), विल्यम क्रेग व चार्लस ओनियन्स. ह्या कोशाचा पहिला भाग १८८४ मध्यें बाहेर पडल्यामुळें त्यावेळीं भाषेमध्यें प्रचलित नसलेले अनेक शब्द आज इंग्रजी भाषेंत रूढ झालेले आहेत त्या वेळीं अपेंडिसाइटिस ( आन्त्रपुच्छदाह ) हा रोग किंवा ॲव्हिएशन अथवा विमान विद्या हे शब्द अज्ञात होते, त्यामुळें हा कोश पुरा झाला नाहीं तोंच त्यास पुरवणीची जरूर भासूं लागली व अशा तऱ्हेची पुरवणी तयार करण्याचें काम चालू असून प्रत्येक शब्दाचा सर्वांत जुन्यांत जुना उल्लेख शोधून काढण्याचें काम चालू आहे या कोशाचा विशेष हा आहे कीं, प्रत्येक शब्दाचा प्राचीनतम उल्लेख दाखविणारें अवतरण प्रथम दिलेलें असून नंतर त्या शब्दाच्या रूपांत किंवा अर्थांत कसकसा फेरफार होत गेला आहे हें निरनिराळ्या काळच्या ग्रंथांतील अवतरणें देऊन दाखविलेलें आहे यामुळें या कोशांत प्रत्येक शब्दाचा इतिहास आपणास पहावयास सांपडतो, व आजची शब्दकोशाबद्दलची सर्वांत परिणत कल्पना म्हणजे प्रत्येक शब्दाचा इतिहास देणें हीच होय

**संपूर्ण कोशाच्या अडचणी,** शब्दसंग्रह —तथापि वर सांगितलेलीं कोशाचीं निरनिराळीं अंगें पूर्णपणें उपयोगांत आणणें व्यवहारांत जवळ जवळ अशक्य होतें, व त्यामुळें सोईप्रमाणें आपलें क्षेत्र आखून घ्यावें लागतें आपल्याला ज्या भाषेचा कोश करावयाचा त्या भाषेचा आरंभकाल कोणता धरावयाचा किंवा शब्दसंग्रहास आद्य मर्यादा कोणती घालावयाची हें कोशकारास स्वतःच निश्चित करून घ्यावें लागतें कारण विशिष्ट कालापूर्वीचे शब्द साधनांच्या अभावीं संगृहीत करणेंच अशक्य असतें उदाहरणार्थ मराठी भाषेंतील जुनें वाङ्मय अद्यापि प्रकाशांत यावयाचेंच आहे महानुभावी वाङ्मयप्रकाशनास आतां कोठें आरंभ होत आहे तसेंच अनेक संतकवींचे ग्रंथ अद्यापि अनुपलब्ध असून उपलब्ध हस्तलिखित ग्रंथांचेंहि योग्य प्रकाशन किंवा सूचीकरण झालें नाहीं तसेंच प्राचीन किंवा अर्वाचीन लिखाणामध्यें आढळणारे एकूण एक सर्व शब्द कोणत्याहि संपूर्ण म्हणविल्या जाणाऱ्या कोशांतहि अंतर्भूत करणें अशक्य होतें एखाद्या भाषेंतील वाङ्मयामध्यें किंवा ग्रंथामध्यें आढळणारे बरेचसे शब्द कोशरचनेच्या दृष्टीनें त्या भाषेंतील शब्द म्हणून धरतां येत नाहींत तसेंच काहीं शब्द कोशकाराच्या दृष्टीनेंहि त्या विशिष्ट भाषेच्या कक्षेबाहेरील समजले जाण्याचा संभव आहे इंग्रजी किंवा मराठी भाषेच्या बाबतींत ही गोष्ट आपणास विशेष स्पष्टपणें दिसून येते

सध्यां इंग्रजी बोलणाऱ्या लोकांच्या भाषणांत आढळणाऱ्या अनेक शब्दांभोंवतीं कोशकाराच्या दृष्टीनें तेजोमेघाप्रमाणें एक अस्पष्ट धुकें पसरलेलें असतें विशिष्ट शब्द कोशांत समाविष्ट करावे किंवा नाहीं याबद्दल त्याला नेहमीं संशय उत्पन्न होत असतो उदा सृष्टिशास्त्रांतील लॅटिन भाषेवरून बनविलेल्या हजारों संज्ञा, प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, इ शास्त्रांतील वर्गीकरण विषयक रोज नवीन नवीन उत्पन्न होणारीं लॅटिन नांवें, रासायनिक संयुक्त द्रव्यें, खनिज पदार्थ इ चीं नांवें, अर्धवट रूढ झालेले परकीय भाषांतील शब्द, निरनिराळ्या पोटभाषांतील किंवा बोलींतील शब्द, ग्राम्य शब्द, व्यापारी लोकांत रूढ असलेले सांकेतिक शब्द, विशेषनामें, वगैरे अनेक शब्दांचे असे प्रकार आहेत कीं, जे सर्वत पूर्ण म्हटल्या जाणाऱ्या कोशामध्येंहि समाविष्ट होण्याचें कारण नाहीं याखेरीज इतर सर्व शब्दांचा मात्र कोशांत समावेश झाला पाहिजे परंतु या कोशामध्यें विभागणीची रेषा कोठें मारावी याबद्दल नेहमीं मतभेदच राहण्याचा संभव आहे

यानंतर प्रत्यक्ष शब्दसंकलनाचें कार्य करताना ज्या अनेक अडचणी येतात व ज्यामुळें कोणत्याहि कार्यकर्त्याच्या क्षेत्रास मर्यादा उत्पन्न होतात त्या निराळ्याच हें कार्य एकट्या दुकट्याचें नसून त्यात अनेकांचें सहकार्य अवश्य लागतें व तें ज्या प्रमाणात मिळेल त्या प्रमाणात शब्दसंग्रहाचें कार्य पूर्ण किंवा अपूर्ण राहतें कोशाचें शब्दसाहित्य जमविण्याच्या कामीं किती अडचणी येतात व बाहेरून सहकार्य कमें नियमितच मिळतें याचें एक उदाहरण देण्यासारखें आहे ईस्ट इंडिया कंपनीच्या ‘ कोर्ट ऑफ डायरेक्टर्स ’ यांच्या आज्ञेनें एच् एच् विल्सन यानें एक हिंदुस्थानातील निरनिराळ्या प्रांतात व भाषात न्याय आणि जमावंदी खा यात वापरल्या जाणाऱ्या पारिभाषिक शब्दांचा कोश इ स १८५५ मध्यें प्रसिद्ध केला तो तयार करीत असता शब्द जमविण्याच्या कामीं त्यास काय अडचणी आल्या त्या त्यानें प्रस्तावनेंत नमूद करून ठेवल्या आहेत तो म्हणतो –या कामीं हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागात जे कंपनीचे नोकर आहेत, त्यांचें साहाय्य मिळाल्याशिवाय असा कोश होणें शक्य नाहीं असें दृष्टीस पडल्यावर हिंदुस्थानसरकारकडे असा हुकूम पाठविण्यात आला कीं त्यांनीं निरनिराळ्या इलाख्यातील कामदारास या कामीं साहाय्य करण्याकरिता हुकूम काढावे या कामदारास कामाची दिशा समजावी म्हणून एक वर्णानुक्रमानें रचलेल्या छापील यादीच्या शेंकडों प्रती हिंदुस्थानात निरनिराळ्या कामदारास वाटण्याकरिता पाठविण्यात आल्या आणि त्यास त्या याद्या त्या त्या ठिकाणीं प्रचारात असलेले अधिक शब्द मधून मधून घालून पूर्ण करून व शुद्ध अर्थ व स्पष्टीकरणें देऊन परत पाठविण्यास सांगण्यात आलें या याद्या अशा तऱ्हेनें छापण्यात आल्या होत्या कीं, त्यात मध्यंतरी नवीन शब्द, स्पष्टीकरणें व मूळ शब्दाचे अर्थ देण्यास पुरेशी जागा सोडली होती या याद्या सहा महिन्यांनीं भरून परत येतील अशी अपेक्षा होती

परतु सहा महिन्यापेक्षाहि अधिक काळ वाट पाहून झाल्यावर बंगाल व मद्रास प्रांतातून कांहीं याद्या परत आल्या, मुंबई इलाख्यातून एकहि यादी परत आली नाहीं परतु ज्या याद्या आल्या त्यापैकीं बऱ्याच कोऱ्याच परत आल्या व कांहींनीं तर पानेंहि कापलीं नव्हतीं कांहींमध्यें अगदीं सामान्य शब्द मधून मधून घातले होते कांहीं याद्या ज्या देशी मुन्सफ, अमीन, सदर अमीन, डेप्युटी कलेक्टर वगैरे सारख्या कामदाराना देण्यात आल्या होत्या त्यांनीं कांहीं शब्द भरून पाठविले हे बहुतेक कंपनीच्या सनदी नोकराखेरीज होते परतु यानंहि पुष्कळाना मूळ उद्देश न समजल्यामुळें कांहीं तरी शब्दांचा भरणा केलेला आढळून आला व कांहींनीं तर शेक्सपिअरच्या हिंदुस्थानी कोशासारख्या कोशातीलच शब्द उतरून दिले

एकदरीत कंपनीच्या सनदी नोकरांचा सार्वजनिक कार्य करण्याचा उत्साह व भाषाशास्त्रीय विद्वत्ता यास ही गोष्ट मुळींच भूषणावह नाहीं असे उद्गार शेवटीं विल्सन यानीं काढले आहेत तेव्हा सरकारी व इंग्लंड मधून हुकूम सुटून होणाऱ्या प्रयत्नाची जर ही दशा तर खासगी रीतीनें कार्य करणाऱ्याच्या मार्गांत किती अडचणी असतील याचा विचार वाचकांनींच करावा !

कोशात शब्देतिहास —ट्रेंचनें आपल्या निबंधात दुसरी एक गोष्ट विशेष प्रामुख्यानें नमूद केली होती ती म्हणजे ‘ अर्वाचीन शास्त्रीय दृष्टीनें तयार होणाऱ्या कोशामध्यें केवळ शब्दाची नुसती नोंद करून भागणार नाहीं, तर ती नोंद ऐतिहासिक पाहिजे ’ प्रत्येक शब्दाच्या रूपाची वाढ कशकशी होत गेली हें कोशामध्यें नमूद होणें जरूर आहे पूर्वींच्या कोशात प्रत्येक शब्दाच्या धात्वर्थापासून त्यांनी व्युत्पत्ति लावण्याचा प्रघात असे व त्याचे इतर अर्थ पुढें ऐतिहासिक क्रमाकडे दुर्लक्ष करून कोणत्या तरी क्रमानें दिलेले असत परतु *व्युत्पत्तिशास्त्रज्ञाला भाषेमध्यें प्रत्येक शब्द, त्याचें प्रत्येक रूप व अर्थ हीं प्रथम केव्हा आढळतात,* तसेंच तो शब्द लुप्त झाला असल्यास तो केव्हा लुप्त झाला व त्या शब्दाच्या रूपामध्यें किंवा अर्थामध्यें फरक कसकसा होत गेला या सर्व गोष्टींचा इतिहास हवा असतो त्यामुळें त्याची अशी अपेक्षा असते कीं, कोशकारानें विशिष्ट शब्दाचा जो अर्थ सर्वांत कालदृष्ट्या प्रथम आढळेल तो प्रथम देऊन पुढील अर्थ कालानुक्रमानें दिले पाहिजेत थोडक्यात सांगावयाचें म्हणजे कोशातील प्रत्येक शब्दावरचा लेख म्हणजे त्या शब्दाचें पूर्ण चरित्र असलें पाहिजे व त्याचे निरनिराळे अर्थ प्रथम प्रचारात कसकसे येत गेले किंवा ते किती काल अस्तित्वात राहिले व केव्हा लुप्त झाले तें सर्व नमूद व्हावयास पाहिजे परतु प्रत्यक्ष व्यवहारात याहि बाबतींत विशिष्ट मर्यादेपर्यंतच कार्य करता येणें शक्य असतें व निरनिराळ्या कालच्या लेखाचा अभाव हा या गोष्टींतील मुख्य अडचण होय तसेंच कांहीं शब्दांच्या इतिहासाचें महत्त्व इतकें अल्प असतें कीं, तो जुळविण्याच्या कामीं लागणारा वेळ व स्यळ हाचा अपव्ययच होतो

कोशात अवतरणें —कोशातील शब्दाचे अर्थ ऐतिहासिक दृष्टीनें द्यावयाचे म्हणजे त्या मानानें अवतरणाची संख्या वाढविणे जरूर होतें अवतरणाचें अर्थनिश्चयाच्या कामीं प्रतीत होणारें महत्त्व निदर्शनास आणण्याचें श्रेय इंग्रजी भाषेच्या बाबतींत डॉ जॉन्सन यास आहे, व त्याच्या कोशाचा सर्वांत हाच भाग जास्त महत्त्वाचा आहे डॉ चार्ल्स रिचर्डसन यानें आपल्या कोशात ( न्यू डिक्शनरी ऑफ इंग्लिश लँग्वेज, १८३५–३६ ) अवतरणें अधिक प्रमाणात उपयोगात आणलीं व त्याचा कोश म्हणजे अवतरणांचा संग्रह असा मानिला जातो तथापि अवतरणाचा उपयोग अद्यापर्यंत केवळ विशिष्ट अर्थास प्रत्यंतर पुरावा म्हणून करण्यात येत असे ऐतिहासिक पुरावा म्हणून त्याकडे पाहण्याची प्रवृत्ति नव्हती आणि म्हणून हीं अवतरणें बहुधा असम

ग्रंथकाराच्या ग्रंथातून घेतलेलीं असत परंतु ऐतिहासिक दृष्टीनें शब्दार्थ विवेचन करावयाचें म्हणजे सर्व वाङ्मयांतून अशीं उदाहरणें निवडलीं पाहिजेत व जर अवतरणाची निवड व रचना व्यवस्थितपणें करता आली तर शब्दाचा व्याख्यारूप अर्थ देण्याचें काम बरेंचसें हलकें होईल, अर्थात् अशा वेळीं प्रत्येक शब्दाचें सर्वांत जुन्यांत जुनें अवतरण प्रथम देऊन शेवटीं सर्वांत अर्वाचीन अवतरण दिलें पाहिजे व विशेष महत्त्वाच्या शब्दांच्या बाबतींत निरनिराळ्या कालांतील अवतरणें देणें अवश्य होईल व ऐतिहासिक दृष्टीनें उपयुक्त असलेलें अवतरण वाङ्मयदृष्टीनें निरुपयोगी असलें तरी गाळून चालावयाचें नाहीं अर्थात् जेथें उत्कृष्ट ग्रंथकाराचें तितक्याच महत्त्वाचें अवतरण उपलब्ध असेल तेथें वर्तमानपत्रासारख्या कमी दर्जाच्या लिखाणांतील अवतरण गाळण्यास हरकत नाहीं मात्र हीं अवतरणें देताना तीं शब्दाच्या ज्या स्वरूपात असतील त्याच स्वरूपात त्याचा काल, स्थल, (ग्रंथकार, ग्रंथनाम, विभाग, पृष्ठ, आवृत्ति इ ) पूर्णपणें देऊन नमूद केलीं पाहिजेत

अवतरणें देण्याच्या कामांत तीं जमविण्याचा एक मोठा प्रश्न आहेच, परंतु त्याखेरीज त्यामुळें कोशाचा वाढणारा आकार हीहि एक अडचणीची बाब आहे तेव्हां जीं अगदीं जरूरच असतील तेवढ्या अवतरणांस प्रथम स्थान देऊन केवळ पद्धतीच्या दृष्टीनें घालावीं लागणारीं अवतरणें जितकीं कमी करता येतील तितकीं करावीं तथापि कितीहि अवतरणें घातलीं तरी कोशात नमूद केलेल्या आद्य अवतरणापेक्षां पूर्वीचें किंवा शेवटच्या अवतरणानंतरचें सापडणारच नाहीं असें केव्हांहि म्हणतां याव-याचें नाहीं म्हणजे अवतरणाच्या अभावावरून आपणांस कोणतेंच अनुमान काढतां येणार नाहीं

व्युत्पत्तीचें महत्त्व —शब्दकोशाचें एक महत्त्वाचें उपांग म्हणजे शब्दांची व्युत्पत्ति होय अलीकडे व्युत्पत्तिशास्त्राची वाढ झपाट्यानें होत आहे यामुळें विशिष्ट भाषेमध्यें एखादा शब्द प्रविष्ट झाल्यानंतर त्याच्या स्वरूपांत पडणारा फरक आणि त्यापूर्वी त्याचें स्वरूप कसकसें बनत गेलें या दोन गोष्टींतील संबंध ही एक महत्त्वाची बाब मानली जाऊं लागली आहे दुसऱ्या शब्दांत सांगा-वयाचें म्हणजे शब्दाची व्युत्पत्ति म्हणजे तो शब्द भाषेंत समाविष्ट होण्यापूर्वीच्या त्याच्या स्वरूपाचा इतिहास होय व्युत्पत्तिज्ञाना-मुळें विशिष्ट शब्दाशीं संबद्ध असलेल्या इतर शब्दांशीं त्याचें असलेलें नातें निश्चित करता येतें आणि एकाच स्वरूपाच्या परंतु भिन्न मार्गानें व्युत्पादित शब्दामध्यें फरक स्पष्ट करतां येतो यामुळें शब्दाचा वास्तविक इतिहास आपणास उपलब्ध होतो अलीकडील महत्त्वाच्या कोशामध्यें ह्या अंगास विशेष महत्त्व दिलें जातें शब्दाचा मूळ धातु किंवा उगम दाखविण्याबरोबरच त्या शब्दाच्या स्वरूपात किंवा उच्चारात फरक किंवा अपभ्रंश कसकसे होत गेले किंवा चुकीनें त्याचे संबंध भलत्याच शब्दाशीं जोडले गेले असल्यास ते कसे जोडले गेले हें दाखविता येतें यामुळें शब्दांच्या बाबतींत अनेक महत्त्वाचे शोध व उपयुक्त माहिती कोशकाराला प्रकाशात आणता येते

अर्थात् वरील सर्व अंगांचा अंशत हि परामर्श घेणें हें नवीन ऑक्सफोर्ड कोश ज्या परिस्थितींत निर्माण झाला तशी परिस्थिति असल्यासच शक्य होतें या कार्यास लागणारे परिश्रम बरेच मोठे असून अशा रीतीनें तयार होणाऱ्या कोशाचा आकारहि फार मोठा होणें अपरिहार्य आहे परंतु अशा तऱ्हेच्या एका मोठ्या कोशामध्यें एखाद्या भाषेतील शब्दाचा इतिहास पूर्णपणें नमूद करून ठेवला गेल्यास त्यावरून आपल्या निरनिराळ्या गरजाप्रमाणें लहान लहान कोश निर्माण करणें फार सुलभ होतें एखाद्या भाषेच्या ज्ञानकोशामध्येंहि निदान शब्दाचा अर्थ देण्याच्या बाबतीमध्यें वरील पद्धति अनुसरणें इष्ट आहे

कोशाचें साहित्यसंशोधन —अशा तऱ्हेनें सर्वांगपरिपूर्ण कोश तयार करावयाचा म्हणजे त्याला लागणारें साहित्य प्रथम गोळा केलें पाहिजे आणि हें साहित्य गोळा करावयाचें म्हणजे भाषेंतील सर्व लिखाण तपासून पाहिलें पाहिजे याकरिता वाङ्मयाचे किंवा लेखनाचे सर्व प्रकार संशोधिले पाहिजेत व भाषेच्या वाढींतील प्रत्येक कालखंडातील लिखाण आपणास उपलब्ध असलें पाहिजे अशा रीतीनें अनेक ग्रंथ, चोपडीं, नियतकालिकें वर्तमानपत्रें, बखरी, कागदपत्र वगैरे हजारों कागद वाचून काढून त्यातील अवतरणें घेतलीं पाहिजेत ऑक्सफोर्ड कोशात अशीं अवतरणें लक्षावधि आहेत अर्थात् हें काम एकट्यादुकट्या व्यक्तीचें नसून याला अनेक लेखकांचें साहाय्य पाहिजे यामुळें असा कोश करावयाचा म्हणजे पूर्वी जेथें १०।१२ उपसंपादक पुरत असत तेथें आता शेंकडों अपुरे पडूं लागतात एवंच शेंकडों किंवा हजारों लोकांनीं हातभार लावल्याशिवाय कोणत्याहि भाषेचा संपूर्ण स्वरूपाचा कोश होणें शक्य नाहीं ऑक्सफोर्ड कोशामध्यें अशा तऱ्हेचें साहाय्य त्यास किती मिळालें हें वर दिलेंच आहे तथापि या कोशातहि दुय्यम किंवा तिय्यम दर्जाच्या ग्रंथकाराच्या ग्रंथातील अवतरणें बरींचशीं घेतलेलीं दिसतात, त्याऐवजीं त्या जागीं पहिल्या प्रतीच्या ग्रंथातील अवतरणें त्याच अर्थाचीं घेतां आलीं असतीं तसेंच या कोशातील अर्थ सेंचरीकोशातील अर्थाइतके चांगले व स्पष्ट दिलेले दिसत नाहींत असें कांहीं टीकाकारांचें मत आहे तथापि ‘या कोशात समाविष्ट केलेल्या वाङ्मयाची व्यापकता, शब्दाच्या उगमाचा काळजीपूर्वक लावलेला छडा व कालनिदर्शन, तसेंच त्याच्या स्वरूपात आणि अर्थांत

पडलेला निरनिराळ्या काळीं फरक एकदरींत इंग्रजी भाषेच्या स्वरूपाचें पूर्णपणें केलेलें दिग्दर्शन या गोष्टींतच ऑक्सफोर्ड कोशाचें महत्त्व आहे ' हें क्राटेली रिव्यूनें केलेलें त्याचें वर्णन सर्वथा योग्य आहे

**जर्मनकोश**—जेकब आणि बुइल्हेल्म ग्रिम यानीं सपादिलेला जर्मन कोशहि याच पद्धतीनें तयार केलेला आहे जर्मनी मध्यें ही कल्पना प्रथम लिब्निट्स व दुसऱ्या कांहीं अठराव्या शतकातील पंडितास सुचली होती परंतु ग्रिमपासूना हा कोश करण्याची प्रवृत्ति व्युत्पत्तिशास्त्राच्या वाढलेल्या अभ्यासामुळें झाली यानीं पधराव्या शतकाच्या अखेरीपासून आजतागायतचे शब्द आपल्या कोशात समाविष्ट केले आहेत, व त्याची व्युत्पत्ति आणि इतिहास देऊन पोटभापातील व बोलींतील त्याचीं रूपेंहि दिलीं आहेत व त्याचा उपयोग अनेक अवतरणें देऊन दिग्दर्शित केला आहे या कोशाचा पहिला भाग १८५४ साली प्रसिद्ध झाला तथापि या कोशात शब्दाचे उच्चार दिलेले नाहींत व हा ऑक्सफोर्ड कोशाइतका व्युत्पत्तिदृष्ट्या पद्धतशीरहि नाही या कोशाचे एकदर नऊ भाग व दहाव्याचा कांहीं अंश म्हणजे सर्व कोशाचा पाचपष्ठांश भाग प्रसिद्ध व्हावयास पाऊणशें वर्षे लागलीं ऑक्सफोर्डकोशाच्या मानानें या भागाची एकंदर पृष्ठें सुमारें ११००० भरतील

**फ्रेंचकोश**—ई लित्रे यानें सपादिलेला फ्रेंच भाषेचा कोशहि महत्त्वाचा असला तरी तितका पद्धतशीर रीतीनें तयार झालेला नाहीं यात प्रथम सर्वांत मूळचा अर्थ देऊन पुढील अर्थ ऐतिहासिक म्हणण्यापेक्षा तर्कशास्त्रदृष्ट्या एकापुढें एक येणारे असे ओळीनें माडले आहेत त्यातील अवतरणेंहि केवळ वाङ्मयदृष्ट्या महत्त्वाचीं आहेत पुष्कळ ठिकाणीं तर त्याचा अभावच दिसतो सोळाव्या शतकाच्या पूर्वीच्या शब्दाचा इतिहास देताना मात्र ऐतिहासिक पद्धति वापरली आहे एकट्या मनुष्यानें केलेला असा हा सर्वांत मोठा कोश म्हणता येईल हा प्रसिद्ध करण्यास १८६३ पासून १८७२ पर्यंत नऊ वर्षे लागलीं

**लॅटिनकोश**—बर्लिन, गॉटिंजेन, म्युनिच व व्हिएना येथील जर्मन ॲकेडमींनीं तयार केलेला लॅटिन कोश हा कोश रचनेच्या बाबतींतील सहकार्याचा एक उत्कृष्ट नमुना आहे या कोशामध्यें दुसऱ्या शतकापर्यंतच्या लॅटिन ग्रंथकाराच्या ग्रंथातील प्रत्येक शब्दाचा अर्थ स्पष्ट करणारीं अवतरणें संगृहीत केलीं आहेत व सातव्या शतकापर्यंतच्या ग्रंथकाराच्या ग्रंथातील महत्त्वाचे उतारे घेतले आहेत व या साहित्याच्या साहाय्यानें लॅटिन भाषेचा नवा कोश तयार करावयाचा आहे

**नेदर्लंडांतील भाषेचा कोश**—या कोशाच्या कार्यास आरंभ १८५०–१ मध्यें झाला व पहिला भाग १८६४ मध्यें प्रसिद्ध झाला एकदर ६१ वर्षांत अवघा भाग प्रसिद्ध झाले व त्यात डच भाषेंतील शब्दापैकीं सुमारें चारपचमाश शब्दाचा संग्रह केला गेला या कोशाचीं ऑक्सफोर्डकोशाच्या मानानें सुमारें ६७०० पृष्ठें होतील

**अमेरिकनकोश**—वर उल्लेखिलेल्या मोठमोठ्या कोशामध्यें पंडिताची व सामान्यत लोकाची गरज भागविणें हा मुख्य हेतु दृष्टीस पडतो तथापि लोकाच्या आवडीकडे दृष्टि दिल्यास त्यास शब्दकोश व ज्ञानकोश याचें स्वरूप एकत्र केलेला कोश अधिक आवडतो असें दिसतें अशा तऱ्हेच्या कोशाचें उदाहरण म्हणजे पायरी लारूस यानें केलेल्या फ्रेंच कोशाचें होय यामध्यें शब्द व त्याच्या व्याख्या देऊन शिवाय विशेषनामें, चरित्रें, भौगोलिक, ऐतिहासिक व इतर लेख दिलेले आहेत वास्तविक या इतर गोष्टींचा शब्दकोशाशीं कांहींहि संबध नाहीं परंतु त्यात अनेक दोष असले तरी सुद्धा तो फार लोकप्रिय आहे असें दिसून येतें अमेरिकेमध्यें प्रो डब्ल्यु डी व्हिट्नेनें यानें तयार केलेला सेंचरीकोशहि याच प्रकारचा आहे याचे सहा भाग असून पृष्ठ संख्या सात हजारावर आहे यामध्यें शब्दाची व्युत्पत्ति दिली असली तरी प्रत्येक शब्दाचा इतिहास दिला नाहीं यामध्यें बरे-चसे शास्त्रीय व पारिभाषिक शब्द संगृहीत केले असून अवतरणेंहि भरपूर दिलीं आहेत या कोशात शब्दाचे अर्थ विस्तृततेनें व स्पष्टपणें दिलेले असून या बाबतींत ऑक्सफोर्ड कोशापेक्षाहि हा कोश अधिक महत्त्वाचा आहे असें ब्रिटानिका म्हणतो परंतु या कोशात विशेषनामें गाळलेलीं आहेत या कोशाच्या सपादनातहि अनेक पंडितानीं सहकार्य केलें आहे ऑक्सफोर्ड कोशानंतर इंग्रजीभाषेंतील विशेष महत्त्वाचा असा हाच कोश होय

**कोशाचे प्रकार**—एकदर भाषेची व वाङ्मयाची जसजशी वाढ होत जाते तसतसा त्याचा अभ्यासहि विशेष रीतीनें व विशिष्ट प्रयोजनाकरिता होऊ लागतो व त्यामुळें विशिष्ट संदर्भासाठीं व निरनिराळ्या उपयोगासाठीं विविध प्रकारची कोशरचना जरूरीची वाटू लागल्यामुळें साहाजिकच त्याचे वेगवेगळे प्रकार आढळतात या निरनिराळ्या प्रकाराचें सामान्य दिग्दर्शन पूर्वी केलेंच आहे आता या प्रकारापैकीं कांहीं कोशाची माहिती पुढें दिली आहे

ग्रंथ–ग्रंथकाराचे कोश —एखाद्या प्रख्यात ग्रंथकाराचे अनेक ग्रंथ असून त्याचा अभ्यास करणें महत्त्वाचें मानिलें जातें अशा वेळीं फक्त त्याच ग्रंथकाराच्या ग्रंथात आढळणाऱ्या शब्दाचें अथवा भाषा व वाक्प्रचाराचें स्पष्टीकरण करणारे कोश तयार होत असतात उदा लर्ड स्पेन्सनें केलेला मध्ययुगीन रोमान्स ग्रंथकाराचा कोश (१९१३), ए न्यु शेक्सपीरियन डिक्शनरी ( कीनलिफ कृत, १९१० ), प्रसिद्ध ग्रंथकारकोशमालेंतील डिकन्स ( फिलिप्प ), थॉमस हार्डी ( सॅक्सेल्बी ), थॅकरे ( मज ), ओस्कार

वाइल्ड (मेसन), इ कोश बायबलचेहि अनेक कोश आढळतात (उदा स्मिथकृत, १८८४), तसेंच निरनिराळया ग्रंथाची माहिती देणाराहि कोश उपयुक्त वाटतो उदा हेलेन रक्स वेलरनें १९२३ त 'दी रीडर्स डायजेस्ट ऑफ बुक्स' असा एक कोश रचला आहे यात निरनिराळया ग्रथाचे साराश दिले आहेत 'डिक्शनरी ऑफ युरोपियन लिटरेचर' (युरोपीय साहित्यकोश) या सारखे व्यापक माहितीचेहि कोश दिसतील लॅरी मॅग्नस यानें सपादिलेल्या या कोशात युरोपखडांतील महत्त्वाच्या ग्रंथा विषयीं माहिती दिली आहे मराठींतहि ज्ञानेश्वरी, तुकारामगाथा, याच्या शेवटीं शब्दकोश दिलेले असतात त्याचा त्या त्या ग्रथापुरता उपयोग होतो मराठी वैदिक कोश हा अशा प्रकारचाच कोश आहे

चरित्रकोश—या कोशांची व्याप्ति वाटेल तितकी लहान किंवा मोठी असू शकते एखाद्या विशिष्ट काळातील किंवा प्रथातील व्यक्तींपासून तों सार्वकालिक, सार्वराष्ट्रीय व्यक्तींपर्यंत या कोशात माहिती दिलेली आढळते डिक्शनरी ऑफ नॅशनल बायॉग्रफी (राष्ट्रीय चरित्रकोश) यात इग्रजी गृहस्थांची चरित्रें असून याचे अनेक विभाग आहेत चेंबर्स बायॉग्राफिकल डिक्शनरींत सर्व प्रमुख व्यक्तींचीं चरित्रें आहेत, तर 'डिक्शनरी ऑफ नोटेड नेम्स ऑफ फिक्शन' या व्हीलरच्या कोशात काद बऱ्यातून आढळणाऱ्या पात्राची माहिती आढळेल तथापि व्यापक जागतिक चरित्रकोश करण्याकडे आजकाल विशेष प्रवृत्ति दिसून येते उदा थाटकिन्सकृत, 'दि युनिव्हर्सल बायॉग्राफिकल डिक्शनरी,', कॅक्रेमकृत 'टेझरी ऑफ मॉडर्न बायॉग्रफी' यात १९ व्या शतकातील प्रसिध्द वाङ्मयसेवकाचीं चरित्रें आहेत आपल्याकडेहि पूर्वीचे र भा गोडबोलेकृत प्राचीन व अर्वाचीन कोश असून वैदिक-पौराणिक चरित्रकोश (चित्राव), आधुनिक मराठी वाङ्मयसेवक (खानोलकर) इ चरित्रपरकोश सध्या तयार होऊ लागले आहेत

द्वैभाषिक कोश —एका भाषेंतील शब्दाचा अर्थ दुसऱ्या भाषेंत सागणारा कोश तो द्वैभाषिककोश उदा इग्रजीचे मराठी, कानडी, गुजराथी, हिंदी इ देशी भाषात अर्थ देणारे कोश, पाश्चात्त्य देशातील प्रमुख भाषातून दुसऱ्या भाषातील शब्दाचे अर्थ देणारे अनेक कोश आहेत किंबहुना जगातील बहुतेक भाषाचे कोश युरोपियन भाषांतून आहेत, असें निर्विवाद म्हणण्यास हरकत नाही विल्सन, मोनियर विल्यम्स इ चे सस्कृत–इग्रजी कोश व अनेक देशी भाषाचे इंग्रजींतील कोश याच सदरात येतात. युरोपीय भाषाचे परस्पर अर्थ देणारे अनेक कोश आहेत पण अलीकडे शास्त्रीय ज्ञानाची विशेष वाढ झाल्यानें नवीन नवीन शास्त्रीय सज्ञा निरनिराळया भाषात तयार होतात त्याचे परकीय भाषात अर्थ देणारे कोश होणें आवश्यक होतें अशा तऱ्हेचे विशेषत परकीय भाषेंतील पारिभाषिक सज्ञाकोश मुद्दाम तयार करण्यात येतात उदा आर्थेवेजर स्मायली याचे जर्मन, फ्रेंच, डच, इटॅलियन या भाषातील जीवशास्त्रीय परिभाषेचे कोश इग्रजींत केलेले आहेत व्यापारासाठींहि असे कोश लागतात अशा वाईचचा इग्रजी–जर्मन व जर्मन–इग्रजी कोश असून १९०७ त त्याची दुसरी आवृत्ति निघाली टॉल्हॉन्सेन याचा एक फ्रेंच, जर्मन, इग्रजी भाषातील यात्रिक शब्दकोश आहे

शास्त्रीय परिभाषाकोश —शास्त्रीय ज्ञानाची वाढ झाल्यापासून त्याचा अभ्यास सर्वत्र फैलावला आहे तेव्हा शास्त्रातील सज्ञा, प्रमेयें आणि सूत्रें याची स्पष्ट माहिती देणारे कोश साहजिकच तयार झाले त्यापैकीं काहींचीं नावें द्यावयाचीं झाल्यास हेंडरसनचा 'डिक्शनरी ऑफ सायन्टिफिक टर्म्स' तसाच १९२८ सालातील 'दि सायन्टिफिक एन्सायक्लोपिडिया ऑफ फार्म्युलाज' इ सागता येतील गुदस्ता बडोदें सरकारनें 'श्रीसयाजी शासनशब्दकल्पतरु' या नावाचा राजव्यवहारातील शब्दाचा (निरनिराळया आठ भाषातील) कोश प्रसिद्ध केला आहे, हा अशा तऱ्हेच्या कोशामध्यें फार महत्त्वाचा आहे या कोशात शासनविषयक इग्रजी शब्दाला योग्य असे गुजराथी, मराठी, सस्कृत, उर्दू, फारसी, हिंदी, बगाली या भाषातील प्रति शब्द देऊन शेवटच्या रकान्यात त्यांतील सर्वांत योग्य असा व सर्व भरतखडभर वापरता आईल असा शब्द प्रथम देऊन नतर दुसऱ्या, तिसऱ्या प्रतीचे शब्द एकासाठीं एक दिले आहेत या कोशामुळें भरतखडात शासनशास्त्रविषयक एक परिभाषा रूढ होण्यास मदत होऊन निरनिराळया प्रातातील देशी भाषातीलहि परिभाषाकोश सहज तयार होणार आहेत व अनेक भाषातील शब्द एकापुढें एक माडल्यामुळें योग्य शब्दाची निवड करण्यास फार मोठें क्षेत्र निर्माण झालें आहे प्रसिद्ध झालेला या कोशाचा भाग प्रयत्नवजा असून यापश्चाहि याची रचना व्यापक दृष्टीची ठेवण्यात आली आहे हिंदुस्थानात या दिशेनें नागरी प्रचारणी सभा प्रभृतीकडून प्रयत्न होत आहेत द्वैभाषिक शास्त्रीय परिभाषाकोशासबधानें वर माहिती आलेलीच आहे

भाषाविषयक कोश—भाषेची व्युत्पत्ति, रचना, घटना, समानार्थक शब्द, वाक्प्रचार यांची माहिती देणारे कोश या सदरात येतात इग्रजी शब्द आणि भाषणसप्रदाय यांचा समृद्ध करणारा पीटर रॉजेट याचा 'थेसॉरस' कोश प्रसिद्ध असून १९२१ सालापर्यंत त्याच्या २९ आवृत्ती निघाल्या मराठींत याचें राजकोश नांवाचें रूपातर चालू होतें, परंतु पुढें सपादकाच्या मृत्यूमुळें तें बद पडलें रॉजेटसारखाच दुसरा फॅवचा इग्रजी समानार्थक शब्दाचा कोश आहे (१८८२) व 'सिनिनिमिस ॲन्टिनॉनिमी'

हा मिचेलचा व्युत्पत्तिकोश १९१८ सालातील आहे 'ए कॉम्प्रिहेन्सिव्ह गाइड टु गुड इंग्लिश' (कॅप) यात वाक्प्रचाराचा योग्य उपयोग दाखविला आहे

म्हणींचा कोश —भाषाभ्यासात वाक्प्रचार व म्हणीहि येतात यांचेहि कोश बरेच आढळतात उदा ब्रुअरचा 'डिक्शनरी ऑफ फ्रेझेस ॲंड फेबल्स' हा कोश याच्या बऱ्याच आवृत्ती निघाल्या आहेत त्याचेंच दुसरें एक निरनिराळ्या गोष्टींचा, नाटकांतील पात्रांचा, कथानकांचा व व्यक्तींचा संदर्भ सांगणारें हॅंडबुक आहे आपल्याकडेहि म्हणींचे काहीं जुने तसेच आपटे व भिडे यांचे नवे कोश आढळतात

विशिष्ट विषयवार कोश —अभ्यासाचे अनेक विषय झाल्यामुळें त्या त्या विषयाचा अभ्यास करणाऱ्यांना उपयुक्त असे त्या त्या विषयाचे स्वतंत्र कोश होऊं लागतात उदा ऐतिहासिक, रासायनिक, औद्योगिक, पदार्थविज्ञानविषयक, प्राणिशास्त्रीय इ कोश यातच बाल्डविनचा तत्त्वज्ञान व मानसशास्त्र यावरील कोश (३ भाग, १९०१) येतो 'हयात अल् हयवान' या अरबी बऱ्याच जुन्या प्राणिशास्त्रीय कोशाचें इग्रजी भाषांतर ले कर्नल जयकर यांनीं अवल इग्रजींत केलेलें आहे जॉर्ज वाटचा हिंदुस्थानांतील औद्योगिक द्रव्यांचा कोश (१८८९ सालीं रचलेला) ६ भागात असून व्यापारीदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा आहे ग्लेझब्रुकचा 'डिक्शनरी ऑफ अप्लाइड फिजिक्स' हा पाच भागाचा पदार्थविज्ञानाचा व्यावहारिक कोश १९२३ त बाहेर पडला काहीं कोशात अनेक विषयांची माहिती दिलेली असते, ते एका प्रकारें ज्ञानकोशच होत उदा बाल्फोरचा 'एन्सायक्लोपीडिया ऑफ इंडिया अँड ईस्टर्न अँड सदर्न एशिया' (औद्योगिक, व्यापारी व शास्त्रीय) हा ज्ञानकोश ३ भागाचा आहे असाच थॉन लायन्नरीनें (१८४८ त) काढलेला एक राजकीय भौगोलिक माहितीचा ज्ञानकोश आहे

उपभाषाकोश —भाषेच्या वाढत्या अभ्यासाबरोबर तिच्यामध्यें अंतर्भूत होणाऱ्या उपभाषांचेहि कोश आवश्यक होतात 'चेंबर्स स्कॉट डायलेक्ट डिक्शनरी' (१९११) अशासारखे प्रांतिक भाषाकोश त्या त्या भाषाभ्यासाला उपयुक्त वाटतात आपल्याकडे गोमांतकी (कोंकणी) भाषेचे कोश आहेत

सर्वसंग्रहकोश किंवा ज्ञानकोश —ज्ञान अतिशय वाढल्याकारणानें तें सर्व मुखोद्गत किंवा डोक्यांत असणें शक्य नसतें, तेव्हां त्याचा थोडक्यात संग्रह एकेठिकाणीं हाताशीं असावा असें लेखकांना व विद्वानांना वाटू लागतें व ही गरज भागविलीहि जाते, म्हणजे विविध माहितीचा संग्रह करणारे कोश तयार होतात याच्याच मोठ्या स्वरूपाला ज्ञानकोश म्हणतात मोठाल्या ज्ञानकोशांची माहिती सर्वांना आहेच असे लहान कोश म्हणजे इतिहास–भूगोल–चरित्रविषयक सर्व माहितीचा ब्रिटनचा कोश (४ भाग), सर रिचर्ड फिलिप्सचा 'मिलियन ऑफ फॅक्टस', जर्मनवरून भाषांतर केलेला सटलशिप–सॅंडिस यांचा 'डिक्शनरी ऑफ क्लासिकल ॲंटिक्विटीज' हा कोश (१८९१) इ आपल्याकडे असे कोश गेल्या शतकात झाले तारानाथ तर्कवाचस्पति यांचा १० भागात असलेला 'वाचस्पत्य कोश,' राधाकान्तदेव बहादुर यांचा 'शब्दकल्पद्रुम' (कलकत्ता शके १८०८) हे मोठे संस्कृत कोश ज्ञानकोशाच्या स्वरूपाचेच असून भारतीय पाण्डित्यास भूषणभूत आहेत

याप्रमाणें पाश्चात्य राष्ट्रांमध्यें विशेषत इंग्रजी भाषेमध्यें शब्दांच्या टिप्पणी व यादीपासून हळूहळू सर्वांगपरिपूर्ण कोश करण्याकडे कसकशी प्रवृत्ति होत गेली व कोशरचनाविषयक कल्पनांची वाढ कशी झाली यांचें थोडक्यात समालोचन केलें आहे यावरून आजची भाषाविषयक संपूर्ण कोशाची कल्पना म्हणजे भाषेंतील प्रचलित अथवा लुप्त असलेल्या प्रत्येक शब्दाचें चरित्र त्याचीं निरनिराळ्या काळचीं निरनिराळीं रूपें त्याचे निरनिराळ्या काळीं बदलत गेलेले अर्थ वगैरे आधारासह देणें, मूळ तो शब्द कोणत्या भाषेंतून व कोणत्या स्वरूपातून आला हें दाखविणें इत्यादि सर्वांगांची परिस्फुटता करून देणें हा असून ऑक्सफोर्ड कोश हें त्याचें उदाहरण आहे ही गोष्ट निर्दिष्ट केली आहे तसेंच राष्ट्रांचे निरनिराळे व्यवहार जसे व्यापक होत जातात व ज्ञानाची वाढ जसजशी विविध अंगांनीं होते तसतसे शब्दकोशाबरोबरच इतर अनेक ज्ञानांगांचें सदभ्रुलभ स्पष्टीकरण करणारे अनेक कोश तयार होऊं लागतात व अनेक भाषांचा जसें संनिकर्ष होतो तसें द्वैभाषिक त्रैभाषिक अगर बहुभाषिक कोश कसे तयार होतात त्यांचीहि काहीं उदाहरणें वर दिलीं आहेत इंग्रजी वगैरे यूरोपीय भाषांतून असे अनेक प्रकारचे असंख्य कोश दरवर्षी प्रसिद्ध होत आहेत यापेक्षा या कोशाच्या निरनिराळ्या प्रकारांचें दिग्दर्शन करण्यास येथें अवकाश नाहीं आता आपल्या मराठी भाषेच्या कोशासंबंधीं आपल्याकडे काय कल्पना दिग्दर्शित झाल्या आहेत व कोशरचनेच्या बाबतींत आजपर्यंत कोणकोणते प्रयत्न झाले आहेत त्यांचें थोडक्यात समालोचन करूं

कै वि का राजवाडे यांनीं सरस्वतीमंदिर मासिकात (शके १८२७ श्रावण, पृ १–१४,) 'राष्ट्रीय मराठी कोश' म्हणून एक लेख लिहिला होता त्यात त्यांनीं आपली संपूर्ण मराठी कोशाची कल्पना नमूद करून ठेवली आहे तिचा येथें सारांशानें उद्धार करून विचार करणें अस्थानीं होणार नाहीं

'संपूर्ण व राष्ट्रीय मराठी कोश रचणाराने खालील गोष्टी विचारांत घेण्यासारख्या आहेत. (१) भाषेत रूढ झालेल्या नव्या व जुन्या, लुप्त व प्रचलित, ग्राम्य व सभ्य, राष्ट्रीय व प्रांतिक, एकोणएक शब्दाचे संक्षिप्त, समर्पक व अव्याप्त्यतिव्याप्त्यसंभवादिदोषरहित अर्थ दिले पाहिजेत. (२) मराठी शब्दांतील अक्षरांचे उच्चार योग्य संकेत ठरवून द्यावे. (३) कोणता शब्द कोणत्या भाषेतून आला तें संकेतानें दाखवावें हें काम कोशकाराला सुलभ व्हावयाला मराठीची समग्र व्युत्पत्ति अगोदर तयार झाली पाहिजे. (४) रूढ होऊन पडल्यामुळें जे सामासिक शब्द एका शब्दासारखे भासतात त्यांखेरीज इतर असंख्य सामासिक शब्द देऊं नयेत. (५) सहितशब्द देऊं नये. तें व्याकरणाचें काम आहे. (६) नामरूपें व धातुरूपें देऊं नयेत. तें व्याकरणाचें काम आहे. (७) ग्रंथनामें, थोर पुरुषांची नांवें, प्रसिद्ध स्थलांचीं नांवें, पौराणिक पुरुषांचीं व स्थलांचीं नांवें, वनस्पतींचीं, धातूंचीं, द्रव्यांचीं, माशांचीं, दगडांचीं वगैरे पारिभाषिक नांवें भाषाकोशांत देऊं नये. व्यावहारिक नांवें तेवढीं द्यावी. ग्रंथकोश, महन्नाममाला, स्थलकोश, पुराणकोश, वनस्पतिकोश, रसायनकोश, प्राणिकोश, मच्छकोश, पक्षिकोश, द्रव्यकोश वगैरे कोश स्वतंत्र असतात. भाषाकोशात इतर शास्त्रांतल्या व विषयांतल्या विशेषनामांचा संग्रह अप्रस्तुत व अनवस्थ होय. (८) छंदःशास्त्र, व्याकरणशास्त्र, उच्चारशास्त्र कोशांत देण्याची जरूर नाहीं. (९) वाच्यार्थाव्यतिरिक्त लक्ष्यार्थ व व्यंग्यार्थ कोशात देऊं नयेत. जे लक्ष्यार्थक शब्द वाच्यार्थक शब्दाच्या स्थितीला आले ते अवश्य द्यावे. (१०) शब्दांचा उपयोग दाखविण्याकरितां ग्रंथांतील वाक्याचा उद्धार कोशात करूं नये. हें काम कोशाचें नाहीं. साहित्यशास्त्राचें आहे. (११) भाषेत जो शब्द नाहीं तो कोशकारानें नवीन बनवून घालूं नये भाषेंत जो शब्द आहे तो कोशकारानें वगळूं नये. (१२) सभ्य शब्दाचा ग्राम्य उच्चार निराळा शब्द मानूं नये. परंतु ग्राम्य शब्द रूढ झाल्यास निराळा स्वतंत्र शब्द मानावा. (१३) परधर्मीयांनीं परदेशस्थांनी व पतितांनीं स्वभाषेतील किंवा परभाषेतील भ्रष्ट केलेले शब्द कोणत्याहि राष्ट्रीय कोशात घेण्यास योग्य नाहींत '

याप्रमाणें कै. राजवाडे यांनीं राष्ट्रीय कोशाचीं लक्षणें सांगितलीं आहेत त्यांतील कांहीं लक्षणें सर्वमान्य असून कांहीं मात्र अर्वाचीन दृष्टीच्या कोशकारांस मान्य होण्यासारखीं नाहींत; उदाहरणार्थ अवतरणें हीं आजकाल प्रत्येक कोशास आवश्यक समजलीं जातात व निरनिराळ्या अर्थांचें स्पष्ट ज्ञान होण्यास–विशेषतः जे अर्थ लुप्त झाले असतील त्यांच्या बाबतींत तर–त्याचा अत्यंत उपयोग होतो. ' संस्कृत कोशात कोशकार ग्रंथोद्धाराचें काम करीत नाहीं. कोशाचा टीकाकार करतो. ' असें कै. राजवाडे यांनीं आपल्या विधानाचें समर्थन केलें आहे व त्याला चार कारणें दाखविलीं आहेत. (१) व्याकरण, छंद, अलंकार, कोश यांचे प्रांत भिन्न आहेत असें ते समजतात (२) सूत्रपद्धति त्यांच्या हाडींमासीं खिळली आहे. त्यामुळें वायफळ व विस्तृत लिहिण्याला अवकाश नसतो (३) बहुतेक सर्व कोश वृत्तरूप आहेत. (४) कोश विद्यार्थ्यांकडून तोंडपाठ करून घ्यावयाचे असतात.' परंतु संस्कृत कोशाचें जें प्रयोजन तत्कालीन लोक समजत असत त्यांत व सध्यां जे निरनिराळ्या भाषांचे कोश होत असतात त्यांच्या प्रयोजनांत फरक आहे व संस्कृत कोशकारांचा भाषेतील सर्व शब्दांचा संग्रह करण्याचा आग्रह नसे आणि त्यावेळीं भाषेचें क्षेत्रहि मर्यादित असून कोश तोंडपाठ करणें ही गोष्ट त्यावेळीं जशी सुलभ व शक्य होती तशी ती आता वाढत्या भाषांच्या बाबतींत राहिली नाहीं त्यांत प्रत्यहीं नवीन नवीन शब्द निर्माण होत आहेत आणि ज्ञानाचा संग्रह तर इतका वाढत आहे कीं, पाठ करावयाच्या गोष्टींमध्यें कोशाचा समावेश होणें अशक्य आहे. ' राष्ट्रीय कोश अगडबंब असलाच पाहिजे अशी युरोपियन कल्पना आहे. वेब्स्टरच्या इंग्रजी कोशाला अमरकोशाची बरोबरी करता येईल कीं नाहीं याची शंकाच आहे ' अशीहि त्यांनीं टीका केली आहे पण वाढत्या भाषेबरोबर कोशाच्या आकारांत वाढ होणें जरूर असून अमरकोश व वेब्स्टरकोश यांचे काल व प्रयोजनें इतकीं भिन्न आहेत कीं त्यांची तुलना करणेंच योग्य होणार नाहीं. तसेंच ' व्युत्पत्ति वगैरे अप्रस्तुत प्रकरणांचें निष्कारण प्रदर्शन करण्यांतच कोशाचें सर्वस्व आहे असें युरोपियन कोशकाराचें मत दिसतें तें अशास्त्र आहे. व रानातून आणलेल्या औषधींचा काढा करण्याचें काम चालू असता त्या औषधींच्या उत्पत्तीचें, वृद्धीचें, संकराचें व रंगाचें बारीक वर्णन एखाद्या काकूबाईपुढें करणारे वैद्यराज जितके अप्रयोजक तितकेच हे युरोपियन कोशकार होत ', अशी टीका त्यांनीं केली आहे तीहि आज कोणास मान्य होणार नाहीं. त्यांचें म्हणणें ' शब्दाची व्युत्पत्ति, रचना, समास, रूपें वगैरे बाबींचा विचार करण्याचें काम व्याकरणाचें आहे. त्यात कोशकारानीं हात घालण्याचें प्रयोजन नाहीं. ' परंतु सध्या आपण भाषेची निरनिराळ्या अंगानें होणारी वाढ लक्ष्यांत घेतली तर संदर्भसुलभ व प्रत्येक शब्दाचा थोडक्यात इतिहास देणारा कोश म्हणजेच सर्वांगपरिपूर्ण कोश होय हीच कल्पना मान्य होत चाललेली दिसते व पूर्वीच्या संस्कृत कोशांची योग्यता कितीहि मोठी असली तरी वाचकास एखादा संस्कृत ग्रंथ वाचीत असता एखाद्या शब्दाचा अर्थ ज्ञातव्य असेल तर तो अमरकोशापेक्षा आपटे किंवा मोनियर विल्यम्स यांच्याच शब्दकोशाकडे प्रथम धांव घेईल हें विसरून चालावयाचें नाहीं.

**मराठी कोश**—इतर कोशाप्रमाणें मराठीचेहि एकभाषिक ( मराठी–मराठी ) व द्वैभाषिक ( मराठी–इंग्रजी, इंग्रजी–मराठी, कानडी–मराठी इ. ) असे दोन प्रकार पडतील. एकभाषिककोश द्वैभाषिकांपेक्षा संख्येनें फार थोडे आहेत. यांचें वर्णन

कारण ज्ञानाच्या प्राथमिक अवस्थेंत स्वतःची भाषा शिकण्याला स्वभाषेचे कोश वापरण्याची फारशी जरूरी भासत नसे, केवळ ज्ञानेश्वरी, महानुभावी ग्रंथ, मोरोपंती काव्य इत्यादिकांचा अभ्यास करणाला अशी शब्दार्थांची फोड करणाऱ्या कोशाची एखादे वेळेस जरूरी भासत असेल, पण पूर्वी धार्मिक ग्रंथाचा परिचय गुरुमुखानें होत असल्यानें अभ्यासकाला स्वतः कोश शोधण्याची गरजच पडत नसे. असो, सांगावयाचा मुद्दा असा कीं, ज्याची जी स्वभाषा नाहीं त्याला ती शिकण्यासाठीं, विशेषतः परभाषक राज्यकर्त्यांसाठीं द्वैभाषिक कोशाची अत्यंत जरूरी असते व त्यामुळें असे कोश एकसारखे तयार होत असतात. मुसुलमानी अमदानींत फारसी संस्कृत कोश झाले व शिवकालांत राजव्यवहार कोश तयार झाला ही गोष्ट याच प्रवृत्तीची द्योतक आहे. इंग्रज राज्यकर्त्यांनीं मिशनऱ्यांकडून असे द्वैभाषिक कोश देशी भाषा समजण्यासाठीं मोठ्या खर्चानें व प्रयत्नानें तयार करविले. मिशनऱ्यांनाहि येशूचा धर्म वाढविण्यासाठीं देशी भाषांतून बायबल व प्रवचन भाषांतरण्याची असत, त्यांना स्वतः धर्मोपदेशासाठीं या भाषा शिकाव्या लागत, तेव्हां देशी भाषांचे इंग्रजी कोश फार लवकर प्रसिद्ध झाले. त्यांच्या दोन दोन, तीन तीन आवृत्तीहि निघाल्या, व उपलब्ध कोशांत तेच मोठे व प्रमाणभूत ठरले. पण त्यावरच आजपर्यंत आपणास अवलंबून बसावें लागलें आहे ही आपल्याला अतिशय लाजिरवाणी गोष्ट आहे यांत शंका नाहीं.

**एकभाषिक मराठी कोश** ब्रिटिश अमदानीपूर्वी —मराठी भाषा साधारणपणें प्रौढवाङ्मयीन भाषा होण्याचा काळ म्हणजे यादवकाळ होय. या काळांत कांहीं शुद्ध मराठी कोश—अर्थात् संस्कृतच्या धर्तीवर—नाथपंथीय, महानुभावी व हेमाद्री संप्रदायी पंडितांनीं केलेले असावेत. महानुभाव ग्रंथकारांनीं रचलेला एक मध्यमकालीन मराठी शब्दांचा कोश कै. वि. का. राजवाडे यांच्या पहाण्यांत होता असें ते लिहितात (राष्ट्रीय मराठी कोश—सरस्वतीमंदिर, श्रावण, १८२७). हा गद्य कोश असून यातील शब्दार्थ सुबोध असल्यानें ते सांगतात. बहुधा हा महानुभावी ग्रंथांवरील टिप्पणींचा संग्रह असावा. यानंतरचा एक ज्ञानेश्वरीकोश राजवाड्यांना मिळाला होता तो तीनशें—सवातीनशें वर्षांचा जुना. असून त्यांत ज्ञानेश्वरींतील दुर्बोध शब्द अकारविल्यानें दिलेले आहेत व त्यांचे प्रतिशब्द अर्वाचीन मराठींत आहेत. पण विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे यांत दोनचार ठिकाणीं याहून प्राचीन कोशाचा हवाला दिलेला आढळतो, असें ते लिहितात. पण या कोशांचा सध्या कांहीं मागमूस नाहीं. असे कांहीं प्राचीन मराठी कोश त्यावेळीं खात्रीनें असावेत असें बाराव्या शतकांतील मराठी भाषेच्या प्रौढ स्थितीवरून वाटतें. तथापि हे सर्व ल्हानसहान व विशिष्ट मर्यादेचे व उपयोगाचे असावेत.

**महाराष्ट्र भाषेचा कोश**, ब्रिटिश अमदानी —या अमदानींत म्हणजे १९ व्या शतकारंभापासून आजतागायत कोश या मोठ्या नांवाला शोभणारा पहिला एकभाषिक कोश म्हणजे शास्त्रीमंडळीनीं केलेला *'महाराष्ट्र भाषेचा कोश'* होय. या कोशाचा प्रथम भाग (अ—न) इ. स. १८२९ त मुंबई शिक्षामंडळीच्या शिळाछापखान्यांत छापला आहे. याचे संपादक (१) जगन्नाथशास्त्री क्रमवंत, (२) बाळशास्त्री घगवे, (३) गंगाधरशास्त्री फडके, (४) रामचंद्रशास्त्री जानवेकर, (५) सखाराम जोशी, (६) दाजीशास्त्री शुक्ल आणि (७) परशुरामपंत गोडबोले हे (मुंबईचे शिक्षामंडळीचे आश्रित पंडित) असून यांनीं शिक्षामंडळीचे (बाँबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी) आज्ञेवरून हा रचिला.

या कोशाला आधारभूत झालेले ग्रंथ दिले नाहींत. 'महाराष्ट्र भाषा म्हणजे महाराष्ट्रदेशीं राहणारे जे देशस्थ ब्राह्मणादिक लोक त्यांची बोलायाची प्राकृत भाषा' याप्रमाणें या कोशकारांनीं मराठी भाषेची व्याख्या केली आहे व कोशाचें कारण पुढीलप्रमाणें दिलें आहे —'आजपर्यंत ह्या भाषेवर कोश, व्याकरण करावयास कोणी प्रवृत्त झाला नाहीं हें मनांत आणून सर्व लोकांचे कल्याणार्थ राजकार्यधुरंधर प्रजापालनैकरत आनरबल मौंट स्टुवर्ट एल्फिन्स्टनसाहेब पातण आणि गवर्नर यांनीं मुंबईंतील शिक्षाशाळामंडळीस आज्ञा करून हा ग्रंथ बाळशास्त्री घगवे, गंगाधरशास्त्री फडके, सखाराम जोशी, दाजी शास्त्री शुक्ल आणि परशुरामपंत गोडबोले यांचे हातून करावयास आरंभिला. पुढें त्यांचेच हातून प्रतापसिंह परमकारुणिक आनरबल जनराल सिरजान मालकमसाहेब बहादुर पातण आणि गव्हर्नर यांनीं शेवटास नेला.' कोशांत घेतलेल्या शब्दांबद्दल 'जितका लोकांचा व्यवहार आढळांत आला तितक्याचें बुद्धीनें आकलन करून' असा उल्लेख कोशकारांनीं केला आहे. प्रांतिक पोटभाषा व त्यांतील शब्द यांची फोड पुढीलप्रमाणें केली आहे — 'महाराष्ट्रदेशाचा मध्यभाग म्हटला असतां प्राय पुणें प्रांत होतो, अत-एव पुणें प्रांतीं जे शब्द प्रसिद्ध आहेत ते प्राय सर्व महाराष्ट्रदेशभर प्रसिद्ध असें समजून ते शब्द प्रांतांचे खुणेवांचून लिहिले आहेत.' बाकीचे प्रांतिक शब्द जे घेतले आहेत त्या प्रांतांचीं नावें व मर्यादा कोशकारांनीं खालीलप्रमाणें दिलीं आहेत —(१) देश (गंगथडी धरून पंढरपुरच्या आसपासचा प्रदेश), (२) कोंकण (मुंबईपासून बाणकोटचे खाडीपावेतों), (३) राजापूर (बाणकोटच खाडीपासून मालवणपर्यंत), ४ वाडी (सावंतवाडीच्या आसपासचा प्रांत). प्रयोगाचा उल्लेख नावानें न करितां सर्व प्रयोक्त्यांचा सामान्यत्वें ग्रंथीं या नावांना संक्षेप 'ग्र' असा वापरला आहे. उदा. 'अतुरी' या शब्दापुढें 'ग्र' असा संक्षेप आहे.

व्यवहारांत क्वचित येणाऱ्या संस्कृत शब्दांचा समावेश केला नाहीं. 'ज्या' ऐवजीं ह्या कोशकारांनीं 'जा' असें रूप सर्रास वापरलें आहे. उदा. 'म्हणून जा अर्थाचा वाचक शब्द या भाषेंत प्रसिध्द नाहीं तो अर्थ प्रतिपादायाचा असतां त्याविषयीं संस्कृत शब्द योजितात.'

फारसी, अरबी वगैरे मुसल्मानी भाषेंतील शब्दांवर कोशकारांचा विशेष कटाक्ष आहे. त्यांच्यामतें हे शब्द मराठी भाषेंत 'राजकीय व्यवहाराचे अनुरोधानें आले, म्हणून राजकीय व्यवहारींच ... शोभतात. इतर साधारण व्यवहारीं सरासरी ते बरे दिसतात, परंतु शास्त्रीय व्यवहारादिकेंकरीं प्रौढ म्हणून जी भाषा तींत तर अगदींच शोभत नाहींत, याकरितां प्रौढ भाषेंत ते शब्द घेऊं नयेत.'

या कोशाची आंतररचना अशी.—'अ' मध्येंच 'अं' चा समावेश संस्कृतप्रमाणें केला आहे. पण 'क्ष, ज्ञ' हीं वस्तुतः जोड अक्षरें परंतु लोकव्यवहारानुसार हे वर्ग पृथक् मानून या क्रमानें लिहिले.

ह्, ह्म, ह्न, ह्ल हीं अक्षरें संस्कृत शब्दांत असतां हकारादिक. आणि प्राकृत शब्दांत असतां 'न'कार 'म'कारादिक असतात ही व्यवस्था धरून तद्विशिष्ट शब्द यथाक्रमानुरोधानें त्या त्या स्थानीं लिहिले आहेत.

कोंकणी, राजापुरी, वाडी अशा तीन पोटभाषा, वनस्पती, प्राणी, खाद्य वगैरेंचे थोडे थोडे शब्द यांत आहेत. कांहीं संतकवींच्या काव्यांतील शब्द तुरळक आढळतात. व्युत्पत्ति मुळींच दिली नाहीं (क्वचित दहा-बारा ठिकाणीं आढळते). ग्रंथांचा उल्लेख किंवा त्यांतील अवतरणें दिलीं नाहींत. ऐतिहासिक शब्द नाहींत; इंग्रजी रूढ शब्द नाहींत (आज जे रूढ आहेत ते त्यावेळीं रूढ नव्हते). इंग्रजी शास्त्रांतील नवीन पारिभाषिक शब्द तेव्हा रूढ नसल्यानें आलेले नाहींत. शब्दाचे अर्थ व्याख्याकारानें पंडिती भाषेंत दिले असल्याकारणानें ते क्लिष्ट व बोजड झाले आहेत.

कै. राजवाडे यावद्दल जगन्नाथशास्त्री क्रमवंतास दोष देतात; पण मोलस्वर्थच्या इंग्रजी-मराठी कोशाच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत या कोशाच्या रचनेचा जो खुलासा आहे त्यावरून असें दिसतें कीं, शास्त्री मंडळी केवळ युरोपियन पंडितांच्या सांगण्याप्रमाणें त्यांना मदत करीत होती.

**हंसकोश**—हा कोश म्हणजे महाराष्ट्रभाषेच्या कवितांतील कठिण व निवडक शब्दांचा कोश. हा रघुनाथ भास्कर गोडबोले या प्रसिद्ध कोशकारानें सन १८६३ त रचला. याला आधारग्रंथ विवेकसिंधु, परमामृत, ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, एकनाथी भागवत, रुक्मिणीस्वयंवर, मुक्तेश्वर, दासबोध, आगमसार, पंचिका, सदाचार, वाक्यवृत्ति, रामविजय, शिवलीलामृत, मोरोपंत-आर्या, वामन-श्लोक, इ. जुने वेदांतपर काव्यग्रंथ होत. यामुळें ते ग्रंथ वाचण्यास याचा फार उपयोग व्हावा हें साहाजिक आहे. या कोशाची रचना थोडक्यांत अशी·—१ एकुण शब्दसंख्या सात हजार आहे. २ मराठी कवितेंतील शब्दास लागणारे प्रत्यय, विशेषणें, अव्ययें, क्रियापदविचार, अर्थ (विध्यर्थ वगैरे), यमकें, छंद, कविरूढी, संस्कृत-प्राकृत शब्दांचा मराठींतील अपभ्रंश, कवितेबद्दलचे कांहीं नियम इ. उपयुक्त टिपणें प्रस्तावनेंत दिलीं आहेत. ३ मराठी भाषेंतील किंवा व्यवहारांतील शब्द नाहींत. ४ व्युत्पत्ति न देतां फक्त शब्दाचें मूळ (सं, प्रा.) तेवढें दाखविलें आहे. ५ अत्यंत आवश्यक अवतरणें दिलीं आहेत, बाकी नुसते स्थलोल्लेख आहेत, ६ "अ" मध्यें "अं" घातला आहे; क्ष व ज्ञ स्वतंत्र ठेविले आहेत. ७ बहुतेक वेदांतग्रंथांतील शब्द असल्यानें संस्कृत शब्दाचा भरणा जास्त आहे ८ कांहीं ठिकाणीं संस्कृत शब्द तोडण्यांत चूक झाली आहे. उ. 'जय जय देव श्रीगुरो । अकल्पनाख्य कल्पतरो । स्वसंविद्द्रुमबीजप्ररो-। हणावनी ॥' अशी ज्ञानेश्वरींत (१८.१०) एक ओवी आहे तींतील हणावनी हा शब्द स्वतंत्र धरून कोशकारानें 'हणावनी' म्हणजे 'आवड' असा अर्थ दिला आहे अशा कांहीं चुका आढळतात.' यांतील कांहीं शब्दाचे अर्थेंहि चुकीचे आढळतात. तसेंच 'अ' नें आरंभ होणारे शब्द 'आ' मध्यें व 'आ' नें आरंभ होणारे कांहीं शब्द 'अ' मध्यें असें जें झालेलें दिसतें तें अशुद्ध पोथ्यांच्या प्रतींमुळें समजावें.

**रत्नकोश**—कर्ता बाळकृष्ण मल्हार बीडकर. हा १८६९ त छापलेला आहे. हा कोश केवळ मराठी शाळांतील विद्यार्थ्यांच्या उपयोगी पडावा म्हणून केला असल्यामुळें यांत फक्त मराठी क्रमिक सहा पुस्तकांतील शब्दांचा संग्रह केला आहे. विशिष्ट वर्गांसाठीं विशिष्ट मर्यादेचे कोश होण्यास सुरवात झाली होती हें या व मागील हंसकोश यावरून दिसून येतें.

**मराठी भाषेचा नवीन कोश**—यालाच राजवाडे सुबह कोश म्हणतात. हा १८७० त रघुनाथ भास्कर गोडबोले यांनीं, मुंबई सरकारच्या विद्याखात्याच्या हुकुमावरून छापला आहे. विद्यार्थ्यांना उपयोगी पडावा एवढीच व्याप्ति यांत ठेविली आहे. याचा मुख्य आधार म्हणजे शास्त्र्यांचा कोश. त्यांच्यातील 'ज्यांचा नेहमींच्या भाषणांत उपयोग नाहीं असे फार अपभ्रंश जे शास्त्रीय संस्कृत शब्द व ज्यांचा अर्थ सहज मनांत येतो असे साधारण शब्द गाळून' हा कोश केला आहे. तसेंच हंसकोशहि यांत सामील केला आहे. शिवाय अरबी, फारसी, व्यावहारिक शब्द यांत दिले आहेत. यांत पोटभाषेंतील शब्द नाहींत, व्युत्पत्ति नाहीं, अवतरणें किंवा त्यांचे उल्लेख नाहींत

**शुद्ध मराठी कोश**—सन १८९१ वर्षी विष्णु रामचंद्र बापट व बाळकृष्ण विष्णु पंडित प्रकाशक गोंधळेकर, जगद्धितेच्छु छापखाना, पुणें याला मोल्स्वर्थ, गोडबोले, इत्यादिकांच्या कोशाचें साहाय्य घेतलें असावें असें वाटतें यात मूळ शब्दाची व्युत्पत्ति समग्र न देता शब्दाच्या मूळ भाषेचें नाव तेवढेंच दिलें आहे शास्त्रीय पारिभाषिक, पशुपक्षी व वनस्पतिविषयक वगैरे शब्द यात आले आहेत ज्ञानेश्वरी वगैरे जुन्या ग्रंथातील शब्द व रूढ इंग्रजी शब्द दिलेले नाहींत हा कोश निव्वळ शालोपयोगी वाटतो

**नामजोशी कोश**—हा समग्र अप्रसिद्ध असून याचा उपयोग प्रस्तुत कोशास मात्र करता आला लो टिळकांचे परमस्नेही व १९ व्या शतकाच्या उत्तरार्धातील अनेक विधायक चळवळींचे उत्पादक माधवराव नामजोशी यांनीं मोठ्या 'मराठी मराठी' कोशाची उणीव जाणून हा कोश तयार करण्यास आरंभ केला व कामाची पहिली पायरी म्हणून मोल्स्वर्थच्या मराठी-इंग्रजी कोशाचें संपूर्ण शब्दश भाषांतर करून घेतलें, व त्यात इंग्रजी कोशाची भर घातली याशिवाय दोतरी मासिक, निबंधमाला, शिल्पविद्या, मोरोपंत, वामनादि काव्यग्रंथ वाचून त्यातील अवतरणें घेतलीं आणखी अनेक ग्रंथ वाचून व धंदे, कला, उपभाषा इत्यादींची भर यात घालून प्रस्तुत कोशाप्रमाणें हा मोठा मराठी कोश रचण्याचा त्याचा फार स्तुत्य व अवाढव्य प्रयत्न इतर चळवळींप्रमाणें त्यांच्या अकाली मृत्यूमुळें अपुरा राहिला लो टिळकांचे ज्येष्ठ चिरंजीव रा रामचंद्र बळवंत टिळक यानी याची संपूर्ण प्रत आम्हास उपयोगास दिली याबद्दल त्याचे आभार मानले पाहिजेत

**मराठी शब्दरत्नाकर**—अथवा मराठी शब्दाचा मराठींत अर्थ देणारा कोश (इ स १९२२ आवृत्ति १ ली, १९३२ आवृत्ति दुसरी) सुप्रसिद्ध वाल्मासिक 'आनंद' याचे संपादक व अनेक विषयावरील लेखक वासुदेव गोविंद आपटे यानीं हा कोश रचिला पोथ्या, कागदपत्रे पहात असता त्यात अपपाठ व चुकीचे अर्थ आढळले म्हणून १९०८ पासून त्यानीं या कोशास आरंभ केला ५१७ वर्षे एकटयानींच काम केलें डॉ भांडारकर, रा ब महाजनी, गणपतराव आगाशे, हरिभाऊ आपटे, जोगळेकर, दी वि साडगावकर वगैरे मंडळींचा सल्ला घेतला, तुकाराम तात्यांच्या दप्तर चाळलें, नतर अलीकडील शब्द गोळा केले. काहीं संत वाङ्मय, लावण्या, पोवाडे व शास्त्रीकोश, मोल्स्वर्थ-कँडीकोश, गोडबोल्याचा हसकोश व मराठी भाषेचा नवीन कोश हे कोश त्यानीं आधारास घेतलेले दिसतात जुन्या संतवाङ्मयातील एकूणएक कठिण शब्द घेण्याचा प्रयत्न केलेला नाहीं फक्त काहीं ढोबळ शब्द घेतले आहेत व हसकोशाप्रमाणें त्याचा अर्थ दिला आहे प्रादेशिक, सख्यावाचक औषधें, वनस्पती, प्राणी, खाद्य इ० शब्द यात नाहींत व्युत्पत्तीकडेहि फारसें लक्ष दिलें नाहीं परिशिष्टात राजवाडे वगैरेंनीं सुचविलेल्या २००० शब्दांच्या व्युत्पत्ती दिल्या आहेत अवतरणें नाहींत काहीं ठिकाणीं—बहुधा हसकोशातील—त्रुमता स्थलनिर्देश आहे ऐतिहासिक कागदपत्रातील अपरिचित शब्द अजीबात गाळले आहेत 'मराठी भाषेची शब्दसपत्ति' नावाचा एक निबंध कोशाला जोडला आहे, त्यातील काहीं विधानें जरी वादग्रस्त असलीं तरी तो परिश्रमपूर्वक लिहिला आहे एवढें खरें वाक्प्रचार व म्हणी फारच कमी आहेत इंग्रजी रूढ शब्द घेतले आहेत उ इंजिनियर, इंजिन, टवल, तिकीट कोट, बूट इ ज्या देशी किंवा मराठी प्रातिक पोटभाषेच्या शब्दाचा निर्णय करता आला नाहीं त्याचें मूळ प्राकृत असें दिलें आहे मात्र परभाषाचा ( इंग्रजी, अरबी, कानडी गुजराथी, तामिळ तेलुगु पारसी, हिंदी, उर्दू एवढयाचा ) उल्लेख केला आहे इंग्रजी शास्त्रीय शब्दाना मराठी पारिभाषिक शब्द नाहींत शब्दाचा अर्थ बहुधा एका ( फार तर तीन ) प्रतिशब्दावर भागविला आहे याची पहिली आवृत्ति फार झपाटयानें खपली पण विद्यार्थ्याकरिता 'शब्दार्थचंद्रिका' म्हणून काटलेली छोटी आवृत्ति मात्र पडून राहिली दुसरी बहुधा श्री लेलेशास्त्री याजकडून सुधारून घेतलेली प्रसिद्ध झाली आहे पण तींत प्रातिक शब्द गाळले आहेत जोड संस्कृत शब्द गाळले आहेत एकदर तीन खड केलें आहेत (१) अ ते न, (२) प ते प व (३) र ते ज्ञ शिवाय एक पुरवणी ( ३८ पानें ), एक परिशिष्ट, ( विशेषत राजवाडे याच्या व्युत्पत्तींच्या शब्दाचें, २१ पानें ) व प्राकृत ग्रंथातील जुन्या मराठी भाषेचें स्थूल नियमाचें दुसरें परिशिष्ट ( ६ पानें ) दिलें आहे

**मराठी भाषेचा वाक्प्रकाश**—संपादक गोपाळ बाबाजी जोशी महाडकर हा कोश शालोपयोगी कोशात मोठा आहे याची व्याप्ति फार मर्यादित आहे

**मराठी भाषेचा सरस्वतीकोश**—( सन १९३० ) संपादक विद्याधर वामन भिडे, प्रकाशक चित्रशाळा, पुणें. हा कोश शब्दरत्नाकराहून मोठा आहे आरंभी जें मोठा संपूर्ण कोश करण्याचें धोरण आखलें होतें तें लगेच सोडून दिलेलें दिसतें मोल्स्वर्थच्या कोशातीलहि सर्व शब्द यात घेतलेले नाहींत संस्कृत शब्दानें मराठींत न येणारे सर्व अर्थ देऊन उगाच जास्त जागा अडविली आहे अशिक्षित लोकाच्या तोंडचे शब्द वरचेवर घेतले आहेत याचप्रमाणें जर प्रातिक भाषातील घेतले असते तर चागलें होतें कहीं ठिकाणीं व्युत्पत्ति जी उघड आहे ती दिली आहे पण इतर शब्दाच्या बाबतींत मुळींच प्रयत्नहि केला नाहीं अर्थ स्पष्टीकरणार्थ लहान लहान उदाहरणें कोशकारानीं स्वत बनवून दिलीं आहेत थोडीशी पूर्वीच्या कोशातून जशींच्या तशींच,

वेळीं स्थिरोळ फरक करून घेतलीं आहेत अनुकरणवाचक शब्द फारच थोडे दिले आहेत, सतकवींनी आपल्या काव्यात योजिलेले परंतु सध्या प्रचारात नसलेले असे शब्द पहिल्या ७१ पानापर्यंत देऊन पुढें प्रकाशकाच्या सांगण्यावरून ते गाळले आहेत बखरी, ऐतिहासिक कागदपत्र यातील शब्द घेतले नाहीत धंद्याचे व शास्त्रीय शब्दहि समाविष्ट केले नाहीत 'मराठी भाषेची उत्पत्ति' या नावाचा एक छोटासा निबंध जोडला आहे त्यात ऐतिहासिक बाबतीत पुष्कळच चुका आहेत कोशास परिशिष्टें जोडलीं आहेत त्यात काव्यातील वृत्तें, ज्योतिषविषयक माहिती व हिंदूंचे सण ही माहिती दिली आहे हा कोश असावा तसा पूर्ण नाहीं अशी तक्रार गैरवाजवी नाहीं

याखेरीज काहीं शालेपयोगी कोश आहेत पण ते येथें उल्लेखिण्याजोगे महत्त्वाचे नाहींत शब्दरत्नाकर किंवा सरस्वती कोश तयार झाले ती वेळ राजवाड्यांच्या योजनेप्रमाणें मोठा 'राष्ट्रीय मराठी कोश' करण्याचीच वास्तविक होती पण एवढें मोठें अवघड कार्य शिरावर घेण्यास कोणी व्यक्ति किंवा संस्था तयार न झाल्या यामुळें असे लहान लहान कोश कमेतरी बाहेर पडून पुढें मोठा कोश निघून त्याच्याचा मार्गहि थोडा अडवून टाकला

**द्वैभाषिक मराठी कोश,** ब्रिटिश अमदानीपूर्वी—हेमाद्रीच्या खुद्दशावरील टीकेंत कित्येक संस्कृत शब्दाना मराठी पर्याय दिलेले आढळतात तेव्हा मराठी जाणणाऱ्यासाठींच हा प्रयत्न असला पाहिजे हें उघड आहे यावरून द्वैभाषिक कोशाचें अस्तित्व शक ११९० पर्यंत मागें जातें १३ ते १६ व्या शतकात महाराष्ट्रात जेव्हा मुसल्मानी अमल होता तेव्हां राजा-प्रजा याना परस्परांची भाषा कळण्यासाठीं फारसी-मराठी व मराठी-फारसी कोश तयार झाले असले पाहिजेत लोकांच्या बोलण्यातहि हाटबाजार, हुद्दावुरूज, पाथीकिताब, चीजवस्त इ समानार्थक मराठी-फारसी सामासिक शब्द आलेले होते एवढ मुसलमानी अमलात मराठीचें फारसीकरण तर पुढे मराठी अमदानींत फारसीचें मराठीकरण चालू होतें राजव्यवहारकोश हा दुसऱ्या प्रकारचें उदाहरण म्हणून सांगता येईल सरकारी अधिकाऱ्याजवळ असे द्वैभाषिक हस्तलिखित कोश असत यापैकीं काहीं इतिहाससंशोधकाना सापडलेले आहेत फारसी, इंग्रजी, कानडी, तामिळ, पोर्तुगीज इ भाषातील शब्दाचे कोश पेशवे व त्याचे सरदार याच्या दप्तरखान्यात असत, याच्या उलट पोर्तुगीज, फ्रेंच, इंग्रज, डच इ सरकाराच्या दप्तरात मराठी शब्दाचे कोश असत

आता यापुढें द्वैभाषिक कोशाच्या संस्कृत, इंग्रजी, कानडी, फारसी इ काहीं प्रकाराचें थोडक्यात अवलोकन करू—

**संस्कृत**—मराठशाच्या अमदानींत अमरकोशाचें मराठी भाषांतर झालेलें राजवाडे याना मिळालें होतें ब्रिटिश अमदानीपूर्वी काहीं संस्कृत-प्राकृत कोश संस्कृताच्या अध्ययनासाठीं तयार झाले असतील यात शंका नाहीं पण ते याज्ञवल्क्य पंडिताच्या घरोघरी असावेत ब्रिटिश अमदानींतील पहिला कोश म्हणजे अनंतशास्त्री तळेकर यानीं सरकाराकरिता तयार केलेला संस्कृत-प्राकृत शब्दकोश (१८५३) होय यात अमरकोशातील शब्द वर्णानुक्रमानें घेऊन प्रत्येक शब्दाचा अर्थ मराठींत दिला आहे प्रस्तावनेंत लिंगपरिभाषा दिली आहे प्रथम शब्द, पुढें व्याकरण, नंतर अर्थ दिला आहे उदाहरणें दिलीं आहेत पण तीं फारच थोडीं यातील शब्दसंख्या सुमारें पाचसहा हजार असेल

यानंतरचा म्हणजे माधवचंद्रोबा याचा 'शब्दरत्नाकर' होय हा १८७० त मुंबई येथे प्रसिद्ध झाला हा आकारानें बराच मोठा असून आज उपलब्ध असणाऱ्या संस्कृत-प्राकृत कोशात सर्वांत मोठा म्हणता येईल यांत वैद्यक शास्त्रांतील परिभाषा विस्तारानें विवेचिली आहे यानतर मोरो आपाजी गोडबोले व गोपाळ शिवाजी वेलकर यानीं संपादिलेला एक 'संस्कृत व प्राकृत कोश (१८७०) आढळतो याचें स्वरूप शालोपयोगीच आहे यात 'अमरकोश त्रिकांडशेष, मेदिनी, हारावली व एकाक्षरी कोशातील कांहीं प्रयास व शाळेकडील मराठी क्रमिक सहा पुस्तकें व नवनीत आणि हितोपदेश यातील शब्द घेतले आहेत 'बाबा पदमनजी, वा गो आपटे इ काहीं मडळींचे कोश आहेत पण ते लहान असून नवीन श्रमाचे नाहींत लोकशिक्षणाचे संपादक के जनार्दन विनायक ओक याचा 'गीर्वाण लघुकोश' ग्रंथ उल्लेखिण्यायोग्य महत्त्वाचा आहे संपादकांनी स्वत श्रम करून नवीन धर्तीवर हा तयार केला (शके १८३७) या कोशाचे एकदर ३ भाग आहेत पहिल्यांत भाषांतरीज सर्व शब्द आहेत दुसऱ्यात धातु आहेत तिसऱ्यात विशेषनाम आहेत यात देव-गंधर्व-यक्षादि नावें गाळलीं आहेत चार परिशिष्टें आहेत पैकीं पहिल्यांत न्याय दुसऱ्यांत अलंकार, तिसऱ्यात वृत्त व चौथ्यात ज्योतिष (नक्षत्र वगैरे) दिले आहेत अवतरणें न देतां स्थलनिर्देश दिले आहेत सामान्यत पचतंत्र, रघुवंश, गीता, मनुस्मृति इ ग्रंथातील आधार पहिल्यानें व ते न मिळाल्यास रामायण, भारत, उपनिषदें वगैरे वरील ग्रंथांतील आधार दिले आहेत काव्यग्रंथांतील उताऱ्यांच्यापुढें प्रथम कांड, स्कंध किंवा पर्व, नंतर अध्याय-आकारा आकडा दिला आहे धातूंच्यापाशीं उपसर्ग देऊन त्या उपसर्गांमुळें होणारे धातूचे अर्थ

दिले आहेत कोश कसा वापरावा याबद्दलचे २० नियम प्रस्तावनेंत दिले आहेत तसेंच धातूचे अनुबंध व त्यांचीं कार्यें उध्दृत केलीं आहेत

**इंग्रजी**—यात इतर द्वैभाषिक कोशाप्रमाणें उलटसुलट (म्हणजे मराठी–इंग्रजी व इंग्रजी–मराठी) असे प्रकार पडतील ब्रिटिश अमदानी महाराष्ट्रात सुरू होण्यापूर्वीच श्रीरामपूर येथें क्यारे नांवाच्या मिशनऱ्यानें १८१० त एक मराठी शब्दांची यादी प्रसिद्ध केली हाच क्यारचा कोश होय यांत मराठी शब्द मोडी लिपींत देऊन अर्थ इंग्रजींत दिले आहेत यानंतर मुब-ईस कर्नल केनेडी यानें १८२४ त मराठी–इंग्रजी व इंग्रजी–मराठी असा एक लहान कोश प्रसिद्ध केला

**केनेडी कोश**—या कोशाचे आधारग्रंथ म्हणजे अमरकोशाचें भाषांतर (एका ब्राह्मणानें करून दिलेलें), सरकारी कागदपत्रांतून व अर्जांवरून केनेडी यांना आढळून आलेले शब्द, याशिवाय आर्थिनजवळ कॅप्टन वॉर्ड् या लष्करी अमल-दारासाठीं त्याच्या दोन मुन्शींनीं तयार करून दिलेल्या कोशाचे दोन हस्तलेख, हे होत याला मराठी भाषा किंवा तिच्या वाङ्म-याचें मुळींच ज्ञान नव्हतें असें दिसतें कारण तो प्रस्तावनेंत म्हणतो कीं, ही सुमती बोली आहे, हींत ग्रंथ मुळींच नाहींत व ही बोलणारे लोक शेतकरी असल्यानें शास्त्र, धर्म इत्यादींच्या कल्पना दुसऱ्या भाषेंतील उसन्या आहेत ! कारण ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, एकनाथ वगैरे मागील काळांतील कवी जरी ठाऊक नसले तरी होनाजी, निदान त्याच्यावेळीं जिवत असलेला प्रभाकर शाहीरसुद्धा माहीत नसावा हें मोठें आश्चर्य आहे' त्याच्या कोशांत घोडागाडी, शेतवाडी, नोकरचाकर असले शब्द आढळत नाहींत त्यास "मराठी भाषेंत एकहि सामाजिक शब्द नाहीं," असें म्हणण्याचा मूर्खपणाचा हक्कच आहे 'मराठी भाषा शिकणाऱ्या पाश्चात्यासाठीं हा कोश तयार केला' असल्यानें व तोहि एका लष्करी गड्यानें केला असल्यामुळें असा हास्या-स्पद होणें साहजिकच आहे

**मोलस्वर्थ कोश**—(मराठी–इंग्रजी) संपादक जे टी. मोल्स्वर्थ व कँडी प्रकाशक यांचे एज्युकेशन सोसायटी (मुंबई शिक्षामंडळी) याची पहिली आवृत्ति १८३१ मधील असून शास्त्र्याचा कोश व ही आवृत्ति बरोबरच तयार होत होती पण तो मराठी–मराठी कोश प्रथम (१८२९ त) बाहेर पडला कोशाला आधारभूत असे पुढील ग्रंथ घेतल्याचा उल्लेख आहे — विल्सन–संस्कृत–इंग्रजी डिक्शनरी, जल डी रीड–कोंकणी शब्द (हस्तलिखित), डॉ केरेचा कोश, बापूदेव–ज्योतिषविषयक संस्कृत शब्द, गणेश मनोहर–वाक्प्रचार व म्हणी, साइक्स–वनस्पति शब्द, स्टीव्हन्सन–शेतकी शब्द पहिल्या आवृत्तीचें काम करण्यास सहा वर्षें लागलीं हा तयार करण्याला सर्वस्वी सरकारची मदत असल्यानें खेडोपाड्यातून सरकारी हुकुमानें शब्द जमविण्यात आले पण प्राचीन काव्यांतले शब्द मात्र फारसे घेतले नाहींत शास्त्र्यांनी सांगितलेला अर्थ ऐकून इंग्रजींत तो उतरावयाचा या मानगडींत समजण्यात, ऐकण्यात, लिहिण्यात अशा बऱ्याच चुका होणें साहजिक होतें

यांत साधित शब्द, शब्दांचे वाक्प्रचार व म्हणी त्या त्या शब्दाखालीं दिले आहेत व्युत्पत्तिदर्शक अरबी, फारसी, उर्दू, हिंदी शब्द वगैरे फारसी लिपींत लिहून पुढें अर्थ इंग्रजींत दिला आहे दुसऱ्या आवृत्तींत प्रांतिक पोटभाषेंतील व देशी शब्दांचा भरणा पहिल्यापेक्षा थोडा जास्त आहे यांत अवतरणें थोडीं असून ग्रंथातील अवतरणाचा स्थलोल्लेख नाहीं दुसरीमध्यें पहिलींतील अनावश्यक संस्कृत शब्द गाळले आहेत दुसरी आवृत्ति इ स १८५७ मध्यें प्रसिद्ध झाली असून तींतील शब्दसंख्या ६० हजार आहे पहिलींत ४० हजार शब्द होते इंग्रजी अपभ्रष्ट शब्द जे पुष्कळ प्रचारात होते त्यांपैकीं काहीं घेतले आहेत, पण रेग, सरगारी, प्रभुमर, कलक्टर असे सोडले आहेत व्युत्पत्ति जेथें सहज आढळली तेथें दिली आहे अशिष्ट शब्दहि दिले आहेत कारण खालच्या वर्गांतील लोकांच्या तोंडीं ते पुष्कळ आढळतात शब्दाचा अर्थ देताना प्रथम धात्वर्थ आणि जुना अर्थ व मग त्याचे लाक्षणिक वगैरे इतर अर्थ दिले आहेत मराठी मूळ शब्द २० हजार असावेत व मग साधारणत पुढें साधितरूपानें किंवा लाक्षणिक रूपानें त्याचा पुष्कळ विस्तार झाला असावा असल्या प्रकारचे जितके जमविले तितके शब्द दिले आहेत

महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं ब्राह्मण लोक नेमून त्यांच्याकडून त्या त्या ठिकाणचे शब्द गोळा केले, ते पुष्कळ होते त्यांतील द्विरुक्तीचे, बिनकामाचे इ शब्द गाळून एकंदर शब्द २५ हजार झाले नंतर त्यावर निरनिराळे संस्कार होऊन (क्रियापदें, विशेषणें, साधितशब्द, सामासिक शब्द इ) त्यांची संख्या ४० हजार झाली ही संख्या पहिल्या आवृत्तींत होती दुसरींत ६० हजार झाली शब्द तपासणीसाठीं ३ वेळा शब्दांची छाननी होई प्रथम शब्दाचें व्याकरण, अर्थ प्रांत वगैरे ठरवीत नंतर त्याचे आधार, अवतरणें, म्हणी, वाक्प्रचार घेत आणि शेवटीं सर्व प्रकारचा मजकूर जुळवून जर्नल तेथें लिहून काढीत या कोश रचण्याचा खरा हेतु ख्रिस्ती धर्मप्रसार (प्रोपगेशन ऑफ दि गॉस्पेल) साठीं संपादकांचे तीन वर्गे केले होते हा अवाढव्य कोश रचण्याला जवळ जवळ ७५ वर्षें झालीं आहेत तरी याला अद्याप एकमेवाद्वितीयत्वाचा मान असून तो लपविलेला नाहीं हा कोश निघून आज जवळ जवळ ७५ वर्षें झालीं आहेत कारण इतका मोठा मराठी कोश उपलब्धच नाहीं या कोशाच्या काहीं संक्षिप्त आवृत्ती पुढें झाल्या, व त्यांपैकीं महत्त्वाची म्हणजे बाबा पदमनजींनीं काढलेली होय हा सर्व देशी भाषांच्या कोशांत उत्तम आहे असें एच् एच् विल्सन यानें म्हटलें आहे

**बाबा पद्मनजी कोश**—( पहिली आ. सन १८६३, दु. आ. १८७५ ) याला कांहीं सरकारी मदत होती. दुसऱ्या आवृत्तींत ३१ हजार शब्द म्हणजे पहिलीपेक्षां २ हजार जास्त आहेत. यांतील शब्दक्रम शब्दांच्या मुळाप्रमाणें लाविला आहे, म्हणजे एका मुळापासून उत्पन्न झालेले साधित किंवा संयुक्त शब्द एका गुच्छांत गुंफिले आहेत. ही रचना शब्द पाहण्यास अवकाश न लागावा व अडचण न पडावी अशा बेतानें वर्णानुक्रमाला जितकी अनुसरून करवेल तितकी केली आहे. तथापि ही सर्व प्रकारें शब्दांच्या धातुस धरून आहे असें समजूं नये, म्हणजे प्रत्येक गुच्छाच्या आरंभीं जो शब्द आहे तो त्यांतील शब्दांचें मूळ आहे असें सर्वदा समजूं नये. कित्येक शब्द सजातीय, कित्येक एकमेकांचे सधर्मी, कांहीं संयुक्त व कांहीं मिश्र आहेत. तरी त्या सर्वांचा परस्परांशीं मूळ धातूच्या योगें संबंध असल्यामुळें त्यांचा एकच गुच्छ बांधावा लागला. या व्यवस्थेनें व्युत्पत्ति शिकणारास थोडाफार लाभ होईल ( मोलस्वर्थनें हीच पद्धत स्वीकारली आहे ). या खेरीज १८५१ सालीं एच. ए. कॅनन यानें एक ' मराठी इंग्लिश व्होकॅब्युलरी ' म्हणून लहानसा कोश व १८९६ मध्यें अबाजी कान्हेरे यानें एक कोश प्रसिद्ध केला त्यांत मराठी शब्दांचे मराठींत व इंग्रजींत अर्थ दिले आहेत. शालोपयोगी मराठी-इंग्रजी कोश बरेच झाले आहेत. आतां महत्त्वाच्या इंग्रजी-मराठी कोशाकडे वळूं.

**कँडीकोश**—( इंग्रजी-मराठी ) हा मुंबई सरकारच्या मदतीनें मेजर कँडीनें १८४७ त प्रसिद्ध केला. याला प्रथम मोलस्वर्थचें साहाय्य होतें. याची रचना अशी :—जॉन्सनचा इंग्रजी कोश–टॉडनें प्रसिद्ध केलेला–प्रथम उतरून घेऊन त्यापुढें मोलस्वर्थनें आपल्या मराठी-इंग्रजी कोशांतील मराठी शब्द निवडून ते घालून हा कोश तयार केला आहे. क्रियापदाचा अर्थ देतांना तेथें सर्व प्रकारचा अर्थ दिला आहे. नंतर त्याच क्रियापदाचीं धातुसाधितें, नामें, विशेषणें, क्रियाविशेषणें इ. चा अर्थ देतांना प्रथम वरील क्रियापदाचा निरनिराळ्या प्रकारच्या अर्थांचा संबंध देऊन नंतर जरूरीपुरता संक्षिप्त अर्थ दिलेला आहे, त्यामुळें जागेची बचत झाली आहे.

समानार्थक शब्दांपैकीं जो विशेष प्रचारांत आहे त्या ठिकाणीं सर्व निरनिराळ्या तऱ्हेचे त्याचे अर्थ देऊन पुढील निरनिराळ्या समानार्थक शब्दांचा अर्थ देतांना त्या पहिल्या शब्दाचा संदर्भ दिला आहे, यामुळेंहि बरीच जागा वाचली आहे.

इंग्रजी भाषेंत मराठी भाषेंतल्या पुष्कळशा वाक्प्रचारांना आणि बोलींतील शब्दांना समानार्थक वाक्प्रचार व शब्द मुदलांतच आढळत नाहींत. परंतु मराठी भाषेचा अभ्यास करणाऱ्या इंग्रज विद्यार्थ्यांना या मराठींतील खाचाखोंचाचा पूर्ण परिचय व्हावा म्हणून त्यांची इंग्रजींत भाषांतर करून सोय केली आहे. मोलस्वर्थच्या मनांत प्रथम थेसॉरस ( समानार्थक शब्दकोश ) च्या धर्तीवर हा कोश करावयाचा होता, परंतु तें न जमल्यानें सांप्रतच्या स्वरूपांत कोश तयार केला आहे. तथापि कोशाचें थेसॉरसचें स्वरूप बरेंचसें कायम राहिलें आहे. त्यामुळें ज्या इंग्रजाला थोडेंफार तरी पूर्वींच मराठीचें ज्ञान असेल त्यालाच हा कोश उपयोगी पडेल. नाहीं तर भलत्याच अर्थांचा ( श्लेषार्थांचा ) शब्द भलत्याच ठिकाणीं योजण्यांत येण्याचा संभव आहे. यांत आरंभीं इंग्रजी आणि मराठी भाषेमधील समान व असमान अशा निरनिराळ्या गोष्टी, प्रकार यांवर एक उत्कृष्ट निबंध रे. डॉ. स्टिव्हन्सन यानें लिहिला आहे.

**रानडेकोश**—( दि ट्वेन्टीएथ सेंचरी इंग्लिश मराठी डिक्शनरी ) कँडीच्या कोशाला मागें टाकणारा हा कोश प्रो. एन. बी. रानडे यांनीं १९०३–१९१६ या अवधींत सुमारें २००० पृष्ठांत प्रसिद्ध केला. या सुमारें १८ वर्षें चाललेल्या कामाला पाऊण लाख रुपयांपर्यंत खर्च आला. हिंदुस्थान व मुंबई सरकार, संस्थानें व धनिक यांच्याकडून मोठ्या देणग्या मिळाल्या होत्या म्हणून एका माणसाच्यानें हें काम शक्य झालें. गेल्या ५० वर्षांतील पाश्चात्य वाङ्मयग्रंथ, शास्त्रीय ग्रंथ, मीमांसा व कायदा, वैद्यक, इंजिनिअरिंग यांतील विद्वान व मराठी भाषापंडित व सुतार, लोहार इ. धंदेवाले या सर्वांच्या साहाय्यानें हा कोश केला. ५ वर्षें हा अभ्यास केला. डॉ. मरे याचा इंग्रजी मोठा कोश हा मुख्य आधार. खेरीज साधे वाक्प्रचार व म्हणींचे, वैद्यकाचे, व्यापाराचे, शास्त्रीय परिभाषेचे, कायद्याचे, ऐतिहासिक, भाषाशास्त्रीय वगैरे निरनिराळ्या प्रकारचे कोश, लॅटिन व्याकरण इ. ग्रंथ आधारास घेतले. तसेंच मोलस्वर्थकँडी व शास्त्री ( यांचा महाराष्ट्र भाषेचा ) यांचे कोश आणि गेल्या ५० वर्षांत निरनिराळ्या विषयांचीं प्रसिद्ध झालेलीं मराठी पुस्तकें व प्राचीन संस्कृत ( शास्त्रीय ) ग्रंथ घेतले. यांत वाङ्मय, शास्त्र व इतर धंद्यांचेहि शब्द आहेत. मराठी शास्त्रीयपरिभाषा घेतली आहे, त्यासाठीं नागरी प्रचारिणी सभेच्या एतद्विषयक कोशाचें साहाय्य घेतलें आहे. इंग्रजी शब्दशास्त्राचा अभ्यास संपादकानें केला होता. पदार्थविज्ञान व रसायन यांतले बहुतेक शब्द बडोद्याच्या कलाभुवनमध्यें रूढ असलेले घेतले आहेत. नाविक शब्द प्रत्यक्ष गोद्यांत जाऊन मजुरांच्या तोंडचे घेतले आहेत. इंग्रजी खलांतील शब्दांना एक संस्कृत व एक मराठी असे प्रतिशब्द दिले आहेत.

**फारसी**—मराठ्यांच्या अमदानींत काहीं फारसी कोशवजा याद्या कशा हाताशीं असत हें मागें सांगितलेंच आहे पण ब्रिटिश अमदानींत फारसीचा मराठींत कोश करण्यास कोण सरसावणार ? पण आनंदाची गोष्ट ही कीं खासगी एकट्याच्या प्रयत्नानें एक फारसी–मराठी कोश नुकताच तयार झाला आहे प्रो माधव त्र्यंबक पटवर्धन यांनीं भारत इ स मंडळाच्या साहाय्यानें शके १८४७ त हा फार्शी–मराठी कोश प्रसिद्ध केला याला आवश्यकतेसाठीं आधार म्हणून बहुतेक मराठींतील ऐतिहासिक लिखाण घेऊन हा इतिहासवाचनाला–किंबहुना संशोधनाला–उपयुक्त असा कोश तयार केला आहे यांत फारसी, अरबी, तुर्की, शब्दांचे मराठी उच्चार दिले आहेत ऐतिहासिक साधनांतील अवतरणें व त्यांचीं ठिकाणेंहि दिलीं आहेत शेवटीं फार्शी–अरबी शब्दाचें मूळ फारसी अक्षरांत दिलें आहे दंततालव्य अक्षरांच्यासाठीं उच्चाराच्या सोयीसाठीं चिन्ह दिलें आहे शब्दाची व्युत्पत्ति दिलेली आहे उपोद्घातांत फारशीचा मराठीवर झालेल्या निरनिराळ्या रूपाचा परिणाम दिला आहे त्यांत फारशींतून मराठींत आलेले व्याकरणविशेष व शब्दसिद्धि हीं दोन टिपणें महत्त्वाचीं आहेत एकंदरींत मराठी वाङ्मयाभ्यासाला हा कोश फार उपयुक्त आहे तेव्हां या कोशाची भर मराठींत महत्त्वाची समजण्यास हरकत नाहीं वाडाच्या सवाईमाधवरावाच्या रोजनिशीस ( भाग ४ ) शेवटीं एक फारसी शब्दांची सार्थ यादी जोडलेली आहे

**बंगाली**—अर्वाचीन कथात्मक गद्य वाङ्मयांत बंगालीच्या मराठींत भाषांतर–रूपांतर पावलेल्या ग्रंथांचा भराच समावेश झालेला आहे बंगालीचा अभ्यास बरेच महाराष्ट्रीय लेखक करूं लागले आहेत त्यामुळें बंगाली–मराठी कोशाची गरज भासणें साहजिक होतें ती गरज भागविण्याचें पहिलें श्रेय श्री वा गो आपटे यांना आहे यांचा 'बंगाली–मराठी कोश' हा लहानसाच कोश असून तो शके १८४७ त प्रसिद्ध झाला मराठींतल्याप्रमाणेंच बंगालींत संस्कृतचा भरणा जास्त आहे तेव्हां तत्सम, तद्भव शब्द यांत आहेत बंगाली वाक्प्रचार दिले आहेत प्रथम बंगाली शब्द देवनागरींत, मग व्याकरण, नंतर अर्थ असा क्रम आहे भिन्न अर्थानें आलेले संस्कृत शब्द दिले आहेत, मूळ अर्थानें आलेले दिले नाहींत

**कानडी**—कानडी व मराठी भाषा जवळजवळ असल्यानें एका भाषेसंबंधींचें ज्ञान दुसऱ्या भाषेंत सापडणें साहजिक आहे तेव्हां कानडी शब्दांचा अर्थ सांगणारे काहीं लहान लहान ग्रंथ आढळणें शक्य आहे तसाच पुढील मराठी कानडी कोश ( मराठी व कानडी भाषेचें परिज्ञान )–कर्ता नारायण मोरेश्वर सप्रे ( १३०० फसली साल ) हा एक लहान ग्रंथ आहे यांत नेहमीं प्रचारांत येणारे कानडी शब्द दिले आहेत देवनागरी मूळाक्षरें व लिपी देऊन तिच्यासाठीं कानडी दिली आहे प्रथम मराठी व त्याच्यापुढें तद्वाचक कानडी शब्द, दोन्ही देवनागरींत दिले आहेत जात, धंदा, आप्त, अवयव, जनावरें, पक्षी, कीटक, वृक्ष–वेली, भाज्या, फळें, धान्य, रसपदार्थ, रंग, किराणामाल, इमारत, भांडीं, लाकडी सामान, हत्यारें, भोजन पदार्थ, वाद्यें, दागिने, वस्त्रें, कापड, व्यसनें, शेतकी, धातू व नाणीं, कुंभारी सामान, चांभारी सामान, खेळ, रोग, वजन–मापें, स्टेशनरी सामान, किरकोळ क्रियापदें इ संगृहीत केलेलीं आहेत

**पोर्तुगीज**—मराठीची पोटभाषा गोमंतकी (कोंकणी) हिचा संबंध पोर्तुगीज भाषेशीं असल्यानें असे कोश तयार होणें क्रमप्राप्तच आहे 'महाराष्ट्र–पोर्तुगेज कोश' ( १८७९ ) संपादक सुयाजी आनंदराव राजादिक्ष दळवी ( नवीन गोवा ), हा मोलस्वर्थच्या मराठी–इंग्रजी कोशावरहुकूम मराठी–पोर्तुगीज कोश करावा या उद्देशानें संपादकानें हातीं घेतला त्याचें काम १५ वर्षे चाललें होतें धातुसाधित नामें, गांवांतील ग्रामस्थांचे व्यवहारोपयोगी शब्द, तसेंच ग्राममंडळांच्या व्यवहारोपयोगांतील शब्द, एकूण शब्दसंख्या ५४००० होईल असा अंदाज होता हा कोश गोव्याच्या सरकारच्या खर्चानें छापला आहे पण हा पुरा झाला नसून फक्त 'अ–थ' पर्यंतचा भाग काय तो प्रसिद्ध झाला आहे

**कोंकणी पोर्तुगीज कोश ( १८९३ )**—दाल्गादोकृत याचा प्रथम देवनागरींत कोंकणी शब्द, मग व्याकरण व पोर्तुगीजमध्यें अर्थ, शेवटीं व्युत्पत्ति असा क्रम आहे यांत सुमारें १९०० शब्द आहेत उपलब्ध कोंकणी कोशांत हाच मोठा आहे

**हिंदी**–हिंदी ही राष्ट्रभाषा होऊं पहात असल्यानें ती भाषा शिकण्याची पुष्कळांना जरूरी भासते काहीं शाळांतून ही भाषा आवश्यक म्हणून शिकविली जाते पण हिंदी–मराठी मोठा कोश अद्याप व्हावयाचा आहे पुढील एक लहान कोश नुकताच तयार झाला आहे 'हिंदी मराठी कोश' नारायण तमाजी कातगडे उर्फ पुंडलिक यांनीं १९२८ त हा तयार केला व तो अजमीर सस्तासाहित्यमंडळानें प्रसिद्ध केला हा कामचलाऊ कोश म्हणून बरा आहे

**गुजराती–मराठी**—गुजराथी–मराठी किंवा मराठी–गुजराथी असा कोश अद्यापि तयार झालेला नाहीं मुंबईसारख्या शहरांत या दोन्ही भाषा शेजारीं शेजारीं आज इतक्या दिवस रहात असतां असे कोश तयार झाले नाहींत हें आश्चर्य होय, पण या दोन्ही भाषा परस्परांस शिकण्यास फार सुलभ असल्यामुळें व इंग्रजी या भाषेच्या सामान्य माध्यमामुळें कदाचित् असा प्रकार घडला असावा हीच गोष्ट इतर देशी भाषांच्या बाबतींतहि लागू आहे याखेरीज इतर भाषांच्या मराठी द्वैभाषिक कोशासंबंधीं विवेचन स्थलाभावीं टाळलें आहे

**विविध प्रकारचे मराठी कोश**—कोशाचे कसे कसे प्रकार असतात हें सांगून पाश्चात्य कोशांचीं काहीं उदाहरणें पूर्वीं दिलीं आहेत तसेच काहीं प्रकार मराठींतहि आढळतात

**सर्व विषयांचे विश्वकोश**--एन्सायक्लोपीडियांप्रमाणें एकदर सर्वच विषयाची थोडीफार माहिती देणारे कोश मराटीत महाराष्ट्रीय ज्ञानकोशापूर्वी जरी झालेले नव्हते तरी ते करण्याचा प्रयत्न चालू होता १८७८ साली जनार्दन हरि आठल्ये यानीं ' विद्यामाला ' नावाचा विश्वकोश छापण्यास सुरवात केली होती पण त्याची मजल २०० पृष्ठांपुढें गेली नाहीं बडोद्याचे सावारे यानींहि ' विद्याकल्पतरु ' रचण्यास हातीं घेतला पण हाहि प्रयत्न सिद्धीस गेला नाहीं फक्त ' महाराष्ट्रीय ज्ञानकोश ' हा २३ भागाचा व सुमारें ११००० पृष्ठाचा विश्वकोश १९२८ त पुरा झाला

**धातु-व्युत्पत्तिकोश**--या क्षेत्रात मराठीचा पहिला प्रयत्न म्हणजे ' विग्रहकोश ' होय हा वेदशास्त्रसपन्न गोपाळ शास्त्री घटि यानीं रचिला ( १८६७ ) हा शिळाछापाचा आहे यात अमरकोशातील शब्दाचा विग्रह देऊन त्याची मराठींत फोड केली आहे उदा ' नगर-नगा सत्यस्मिनिति नगर=नानाविध वृक्ष आहत जाचे ठायीं तें ' ' दुकूल-दुष्ट कुलनीति दुकूल= दुष्ट शरीरावयवाचें आच्छादन करितें जें तें ' विग्रहानतर धातु दिला असुन पुढे शब्दार्थ मराठींत सांगितला आहे यातील बरेच विग्रह पटणार नाहींत हें खरें पण प्रयत्न प्रशसनीय आहे यापूर्वी दोन वर्षे विष्णु परशुराम पडित यानीं ' सस्कृत आणि महाराष्ट्र धातुकोश ' तयार केला होता यात सस्कृत धातूचा सागोपाग विचार आहे असेंच दुसरें पुस्तक जनार्दन हरि आठल्ये व विनायकशास्त्री आगाशे याचें ' शब्दसिद्धिनिबध ' होय हें १८७५ त मुबईसरकारच्या विद्याखात्यानें प्रसिद्ध केलें यात ' प्राकृत भाषेत ज्याचीं वारवार रूपें घेतात असे सस्कृत धातु ७७३ घेतले आहेत ' १८७८ साली प्रभाकर रामचद्र पडित यानीं ' अपभ्रष्ट-दर्पणिका ' हें पुस्तक लिहून मराठी व्युत्पत्तिशास्त्रात चागली भर टाकली यामध्यें शब्द अपभ्रष्ट कसा होतो यावद्दल नियम देऊन सस्कृत, फारसी इ शब्दापासुन मराठींत अपभ्रष्ट शब्द कसे आले आहेत याची अकारविल्हानें यादी दिली आहे यावर निवधमालेंत विस्तृत टीका आली आहे

**व्युत्पत्तिप्रदीप** ( आवृ ७ वी, १९०८ )--सपादक गोविंद शकर बापट मराठी भाषेंतील सस्कृतापासुन निघालेल्या शब्दाची व्युत्पत्ति यात सागितली आहे प्रस्तावनेंत व्याकरणविषयक नियम दिले आहेत तसेंच धातूस लागणारे उपसर्ग दिले आहेत अरबी व फारसी शब्दाची यादी शेवटीं जोडली आहे तत्सम, तद्भव रूपापभ्रश वगैरेच्या व्याख्या व उदाहरणें दिलीं आहेत शब्दावरील व्याकरणविषयक विशेष अर्थाच्या टीपा खालीं दिल्या आहेत देशी नाममालेंतील व सस्कृत नाटकाच्या बाल भाषेंतील शब्दाची यादी एका स्वतत्र परिशिष्टात दिली आहे सस्कृत, झेंद, ग्रीक, लॅटिन या भाषात समान उच्चाराचे व एकार्थवाचक ( थोड्या फार फरकानें ) जे शब्द आहेत त्याचें एक कोष्टक दिलें आहे, शेवटीं सर्व शब्दाची सूची दिली आहे याप्रमाणें हा छोटासा व्युत्पत्तिकोश सर्वांगपरिपूर्ण म्हणता येईल श्री य ग फफे यानीं ' व्युत्पत्तिदीपिका ' नावाचें धालेप योगी जें पुस्तक केलें आहे तें शिक्षकाना अत्यत उपयुक्त वाटल कै वि का राजवाडे यानीं एक ' मराठी धातुकोश ' कच्च्या स्वरूपात तयार करुन ठवला असून तो धुळेकराजवळ आहे त्यात सुमारें २००० मराठी धातूची व्युत्पत्ति लावण्याचा प्रयत्न केला आहे प्रस्तुत कोशाला तो जोडण्याची परवानगी धुळेकरानीं दिली नाहीं, तेव्हां आता तो कधीं बाहेर पडेल तो पहा ! आमच्या पाहण्यात ज्या या कोशाच्या पत्रिका आल्या त्यात फक्त पूर्व तयारी केली असून सपादकीय टिपणें लिहावयाचें काम व्हावयाचें राहिलें आहे

**विशिष्ट शब्द-म्हणी-वाक्प्रचार-याचे कोश**--असे लहान सहान कोश अनेक तयार होतात व त्याचा काहीं वेळा चागला उपयोगहि असतो विशेषत लेखकाना त्वरित समानार्थक शब्द पाहण्यास किंवा काहीं सख्यावाचक शब्दांतील अवयवार्थाची फोड ( उदा पचप्राण, षट्कर्मे, इ ) होण्यास ते उपयोगी पडतात असा पहिला प्रयत्न बाबापदमनजीनीं १८६० त ' शब्दरत्नावली ' रचून केला यात मोलस्वर्थ-कँडी याच्या मराठी-इग्रजी व इग्रजी-मराठी कोशातील निवडक शब्द उतरून घेतले आहेत या पुस्तकाचे दोन भाग आहेत पहिल्या भागात मोलस्वर्थ कोशातील किंत्येक चमत्कारिक, पारिभाषिक व ज्याच्या पोटात बहुत उपविषय किंवा व्याख्या आहेत असे काहीं शब्द निवडून घेतले आहेत व दुसऱ्या भागात कँडीकृत कोशा तील ज्या महाराष्ट्रशब्दास बहुत उपशब्द आहेत ते त्या शब्दासहित निवडून घेतले आहेत थोडक्यात हा रॉजटच्या थेसॉरससारखा एक लहान कोश आहे रॉजेटच्या कोशाबरहुकूम तयार करण्यात येणारा ' राजकोश ' दोन भाग निघून सपादक श्री अनंत सीताराम काळेले याच्या मृत्यूमुळें बद पडला ( १९३० ) वाक्प्रचार-म्हणींचे कोश बरेच आहेत ' मराठी भाषेंतील म्हणी रत्नमाला ' ( सोवळकर ), ' मराठी म्हणींचा कोश ' ( देशपांडे-तारखेडकर ) ' मराठी व्यवहारातील म्हणी ' ( छत्रे ), ' मराठी भाषेचे सप्रदाय व म्हणी ' ( वा गो आपटे ) ' मराठी वाक्प्रचार व म्हणी ' ( वि वा भिडे ) इ वरींच पुस्तकें म्हणीसबधीं आहेत कॅ मॅनवरिंगनें मराठी म्हणींचें इग्रजी भाषातर केलें आहे ( १८९९ ) त्यात म्हणींचें वेगवेगळ्या-धदे, शरीरावयव इ विषयानुसार वर्गीकरण केलें आहे, हें पुस्तक विशेष महत्त्वाचें वाटल सदाशिव विश्वनाथ याचें ' सर्व देशातील निवडक म्हणी ' देणारें एक पुस्तक आहे रघुनाथ दवनी मुळ्ये यांचा ' हिंदुस्थानातील सख्यावाचक दुर्बोध कोश ' हाहि या विशिष्ट सदरात येईल

**चरित्र व ऐतिहासिक कोश**--रघुनाथ भास्कर गोडबोले या मराठींतील धुरधर लेखकानें ' भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश ' व ' भरतखडाचा अर्वाचीन कोश ' हे दोन मोठे कोश रचून चरित्रपर कोशाचा चागला पाया घातला या कोशातील काहीं माहिती चमत्कारिक व चुकीची वाटली तरी विशेषत पुराणांतील व्यक्तींची एकत्रित माहिती पाहण्याच्या कामीं त्यांचा फार उपयोग होतो, म्हणूनच पहिल्या कोशाची दुसरी आवृत्ति काढणें चित्रशाळेला जरूरीचें वाटलें या कोशाच्या

धर्तीवरच पण वैदिक व्यक्तींची जास्त माहिती घालून विद्यानिधि चित्रावशास्त्री यांनी चरित्रकोश (भाग १) नुकताच प्रसिध्द केला साहित्यसेवकांची चरित्रें देणारे कोशहि तयार होत आहेत (ग दे खानोलकरकृत ' अर्वाचीन वाङ्मयसेवक ') तथापि अनेक क्षेत्रातून काम केलेल्या व करणाऱ्या थोर व्यक्तींची चरित्रें संगृहीत करणारे कोश अद्याप व्हावयाचेच आहेत इतिहासाचें विविध मराठी साहित्य अभ्यासताना जे अनेक अरबी, फारसी, परकीय, सांकेतिक इ शब्द येतात त्याचे अर्थ देणारा ' फार्सी-मराठी कोशा ' पेक्षा व्यापक असा कोश महाराष्ट्र शब्दकोशाचे एक संपादक श्री आबा चांदोरकर यांनी लिहून तयार केला आहे पण तो अप्रसिध्द आहे त्याचा उपयोग महाराष्ट्र शब्दकोशाच्या कामीं केलेला आहे

**शास्त्रीय व पारिभाषिक कोश**—आपल्याकडे भौतिक शास्त्रावरचें वाङ्मय विपुल नसल्यानें त्यावरचे कोशहि फार अल्प असणार वनस्पतीसारख्या काहीं थोडया शास्त्रावरचे व काहीं शास्त्रीय परिभाषेचे कोश आढळतात उदा मेजर कीर्तिकर याचा छोटा वनस्पतिकोश (संस्कृत-मराठी), वनस्पतिविषयक कोश, सयाजी वैज्ञानिक शब्दसंग्रह विद्युत्कोश, महाराष्ट्र साहित्य पत्रिकेंत प्रसिद्ध झालेल्या काहीं याद्या, इ शास्त्रीय ग्रंथाच्या शेवटीं किंवा आरंभीं बहुधा परिभाषा दिलेली असते राजव्यवहारशास्त्रातील जुना परिभाषाकोश म्हणजे शके १५९६-९७ मध्यें रघुनाथ पंडितानें शिवाजीच्या आज्ञेवरून रचिलेला ' राजव्यवहारकोश ' होय यात शिवकालीन रूढ दरबारी मुसलमानी शब्दांना जुने संस्कृत प्रतिशब्द दिलेले आहेत रचना अमर कोशाच्या धर्तीवर वर्गवार आहे राज, कार्यस्थान, भोग्य, शस्त्र, चतुरंग, सामंत, दुर्ग, लेखन, जनपद व पण्य असे शब्दांचे दहा वर्ग पाडिले आहेत असा अर्वाचीन व मोठया प्रमाणावर प्रयत्न बडोदें सरकारनें ' श्री सयाजीशासनशब्दकल्पतरु ' हा राजव्यवहारातील शब्दांना अनेक भाषांतील प्रतिशब्द सुचवून त्यातून उत्कृष्ट सर्वमान्य शब्द निवडण्याला मदत होईल अशा रीतीनें तयार केला आहे (१९३१) यासबंधीं उल्लेख पूर्वी आलाच आहे हा उपयोगात आणल्यानें बरेच परकीय शब्द-आज जे निरुपाय म्हणून वापरावे लागतात ते-जातील व भाषा शुद्ध होईल

**सूची-कोश**—सूचीग्रंथ हे एकप्रकारचे कोशच होत कारण कोशाप्रमाणें त्याचा उपयोग सुलभसंदर्भाला होत असतो अशा सूचींत महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळाकरिता रा यशवंत रामकृष्ण दाते यांनी संपादन केलेली ' महाराष्ट्रीय वाङ्मयसूची ' पहिल्या दर्जाची ठरेल १८१० ते १९१६ पर्यंतच्या शंभर वर्षांतील प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची व सुमारें १२०-१२५ महत्त्वाच्या मासिकातील लेखांची यात नोंद आहे एवढा मोठा साहित्यावरचा सूचिग्रंथ इतर कोणत्याहि भारतीय भाषांत नाहीं, ही मराठी भाषेला भूषणावह अशी गोष्ट आहे बाळकृष्ण बाबाजी करकरे व गोपाळ बाळकृष्ण वैद्य यांनी १८९६ त केलेला ' स्थलनामकोश ' हा भौगोलिक स्थळांची माहिती होण्याला फार उपयोगी आहे यात पृथ्वीवरील बहुतेक मोठीं शहरें, नद्या, पर्वत, बंदरें इ उल्लेखित असून हिंदुस्थान आणि मुंबई इलाखा यातील अधिक स्थलांची माहिती आहे पण नकाशाच्या पुस्तकाच्या शेवटीं असलेल्या सूचीप्रमाणें हा कोश वाटतो कै गो का चांदोरकर यांनी राजवाडेखंड १-८, १०-१२, १५-१९, यातील स्थळांच्या उल्लेखांची एक स्थलसूची केलेली आहे या ऐतिहासिक साधनापुरती ती पुरी आहे पण आजचें सर्व ऐतिहासिक लिखाण पाहता ती फार अपुरी वाटेल तेव्हा सर्व उपलब्ध ऐतिहासिक ग्रंथातील स्थळांची सूची तयार होण्याची फार जरुरी भासते याच गो का चांदोरकरांनी संपादन केलेली मराठी कविकाव्यसूचि ही शतकवाङ्मयग्रंथाची एक उत्तम निर्देशिका आहे या सूचींत मुद्रित व अमुद्रित अनेक मराठी कवींच्या काव्याचा निर्देश केलेला असून काहीं कवींची परंपराहि दिलेली आहे त्यामुळें विशिष्ट काव्याचा कर्ता किंवा विशिष्ट कवीचे ग्रंथ व ग्रंथकाराचा परस्परसंबंध हीं शोधून पाहण्यास हें सुलभ साधन झालें आहे

**भारतीय व भारतीयेतर भाषांचे कोश**—यांप्रमाणें मराठी भाषेंत आढळणाऱ्या कोशांचें थोडक्यात समालोचन केलें आहे यापक्षा विस्तृत विवेचनास येथें अवकाश नाहीं आता आपणास परिचित अशा भारतीय व भारतीयेतर भाषांच्या कोशांचें विहंगमावलोकन करू त्यात आपल्या निकटच्या भाषा म्हणजे गुजराथी व कानडी या होत म्हणून त्यांस आद्यस्थान देऊ

**गुजराथी कोश**—मराठी भाषेच्या निकटच्या आणि स्वतंत्रस्थानीं असलेल्या गुजराथी भाषेंतील कोशवाङ्मयाकडे आपण जर दृष्टिक्षेप केला तर आपणास थोडासा तुलनात्मक व उद्बोधक विचार करता येईल इंग्रजी अमदानीमध्यें देशी भाषांच्या अभ्यासामध्यें प्रगति होऊ लागली तेव्हा गुजराथी कोश तयार होऊ लागले कवि नर्मदाशंकर यानें १८९१ मध्यें गुजराथी कोश (नर्मकोश) रचण्याचें काम हातीं घेतलें आणि १२ वर्षांत एकट्यानें तें पूर्ण केलें हा कोशास जॉन्सनच्या कोशाप्रमाणें महत्त्व देण्यात येतें यानेंच १८७० मध्यें कथाकोश ' नावाचा एक कोश रचला होता, तो सध्यां (१९३२ सालीं) बे देरासरी याचा ' पौराणिक कथाकोश ' पाच भागामध्यें प्रसिद्ध झालेला असून महाभारत, रामायण आणि पुराणें यांतील व्यक्तींची माहिती देण्याच्या कामीं आधारभूत समजला जात आहे यानंतर आपणास निरनिराळ्या वर्षी पुढें दिल्याप्रमाणें कोश प्रसिध्द झालेले आढळतात -रा ब छगनलाल संदरामकृत ' गुजराथी शब्दस्मृदलाचे कोश ' (इ स १८७५), यामध्यें शब्दांची व्युत्पत्ति दिलेली आहे रा प्रभाकर रामचंद्रशास्त्रीकृत ' अपभ्रष्ट शब्दप्रकाश ' (इ स १८८०), रा सा ललुभाई प्राणवल्लभदास पारेख कृत ' शब्दार्थभेद , (१८९१) दलाल विठ्ठल राजारामकृत ' गुजराती शब्दार्थसिंधु ', रा ब गोविंदभाई देसाईकृत ' प्रातिक शब्दसंग्रह ', भोगीलाल भिखाभाई गांधीकृत ' रूढप्रयोगकोश ', कवि हिराचंद कहानजीकृत ' कोशावली ' इ कोश निरनिराळ्या उद्देशानें रचलेले आढळतात

गुजराथ व्हर्नाक्युलर सोसायटीनें 'गुजरातीभाषानो कोश' आरंभिलेला असून 'अभर' पर्यंतचा भाग प्रसिद्ध झाला आहे, परंतु तो पुष्कळच अंशीं अपूर्ण आहे. पटेल गुलालदास यानें 'गुजराथी शब्दकोश' नांवाचा एक कोश रचला आहे. जीवनलाल अमरशी मेहेताकृत 'शब्दार्थचिंतामणी' (१९२५) हा एकंदरींत बरा कोश आहे. गुजराथ विद्यापीठानें केलेला 'सार्थ गुजराथी कोश' (१९३०) हा ह्या दिशेनें केलेला एक शास्त्रशुद्ध प्रयत्न आहे. परंतु त्यांत शब्दसिद्धि, व्युत्पत्ति इ. यांमध्यें न्यूनता आहे. गुजराथ व्हर्नाक्युलर सोसायटीनें अमीर मिय्या शहरी यांजकडून 'गुजराती-फारसी-अरबी' कोश दोन भागांत तयार केला आहे.

सांप्रत गोंडळ राज्यातर्फे 'गोमंडळ कोश' या नावाचा एक मोठा कोश तयार करण्याचें काम चालू आहे. यामध्यें शब्दाचें व्याकरण, व्युत्पत्ति, अवतरणें वगैरे यावयाचीं आहेत.

'संस्कृत-गुजराथी' कोशांमध्यें सवाईलाल छोटालाल वोरा याचा 'शब्दार्थचिंतामणी' (१९०५), तसाच गिरिजाशंकरशास्त्रीकृत 'संस्कृत गुजराथी शब्दादर्श' (१९३०) हे दोन कोश नमूद करण्यासारखे आहेत. पंडित गणेशदत्त शर्मा यानें 'गुजराथी-हिंदी शब्दकोश' तयार केला आहे. 'गुजराथी-इंग्रजी' कोशांमध्यें बेल्सरे याचा (सुमारें १९००) कोश महत्त्वाचा आहे. भगुभाई फत्तेचंद करभारी यांनींहि एक 'गुजराथी-इंग्रजी' कोश रचलेला आहे; याचीच संशोधित नवीन आवृत्ति भानुसुखराम व भरतराम मेहेता यांनीं १९२५ त प्रसिद्ध केली आहे. 'इंग्रजी-गुजराथी' कोशांमध्यें दि. ब. अंबालाल साकरलाल देसाई यांचा कोश शिष्ट व आधारभूत समजला जातो. त्यापूर्वी राणीना याचा एक कोश प्रसिद्ध झाला होता. त्यानंतर व्यास व पटेल यांनींहि एक 'इंग्रजी-गुजराथी' कोश प्रसिद्ध केला आहे.

विश्वनाथ मगनलाल भट्ट यांनीं गुजराथ व्हर्नाक्युलर सोसायटीकरितां एक पारिभाषिक शब्दाचा कोश दोन भागांत प्रसिद्ध केला आहे. ठक्कर देवजी गोवर्धनदास यांनीं एक 'गुजराथी-बंगाली' कोश (१९२८) तयार केला आहे. करीमअली नानजी यांनीं एक 'कच्छी-गुजराथी-इंग्रजी' भाषेचा कोश रचला आहे.

वैद्य बापालाल गवेडदास यांनीं 'निघण्टु आदर्श' या नावाचा दोन भागांमध्यें एक 'वनस्पतिकोश' रचला आहे.

अद्यापपर्यंत 'गुजराथी-मराठी' अगर 'मराठी-गुजराथी' शब्दकोश तयार करण्याकडे कोणी लक्ष दिलेलें आढळत नाहीं. तसेंच 'हिंदी-गुजराथी' अगर 'गुजराथी-बंगाली' शब्दकोश तयार व्हावयाचे आहेत. निरनिराळ्या प्रांतांतील परस्पर दळणवळण जसजसें वाढत जाईल तसतसे देशी भाषामधील कोश तयार होत जातील.

**कानडी**—शब्दस्मृति-नागवर्माकृत (१२ वें शतक), कानडी पद्यात्मक व्याकरणग्रंथ; वस्तुकोश-नागवर्माकृत (१२ वें शतक) संस्कृत कानडी कोश, यात अमरकोशाचा उल्लेख आहे; शब्दमणिदर्पण-केशिराजकृत (१३ वें शतक), हा प्रमाणभूत व्याकरणग्रंथ आहे, हा डॉ. किटेलनें १८७२ त प्रसिध्द केला, कर्णाटक शब्दानुशासनम्-भट्टाकलंकदेवकृत (१६०४), हा संस्कृत ग्रंथ कानडी व्याकरणावर आहे यात ५९२ सूत्रें असून त्यांना वृत्ति व व्याख्या संस्कृतांतच जोडिल्या आहेत, यांत प्रमुख कानडी लेखकांचे उतारे व त्याचे उल्लेख आहेत; कविकंठाहार (१६१०)-समानार्थक शब्दाचा छंदोबध्द कोशग्रंथ, अमरकोशव्याख्यान-नाचिराचिकृत (१३ वें शतक), अमरकोशावरील एक टीकाग्रंथ, कर्नाटक शब्दसार (१३५०), १४१६ शब्दांचा पद्यकोश; अभिनव-निघंटु (१३९८)-अभिनवमंगराजकृत, संस्कृत शब्दाचा कानडींत अर्थ; चतुरास्यनिघंटु (१३५०)-बोम्मरसकृत, समानार्थक शब्द १३० खंडात दिले आहेत; कब्बिगर कै-पिडी (१४६०)-लिंगकृत, ९९ पद्यातील समानार्थक शब्दकोश. कर्नाटक शब्द-मंजरी (१४८०)-तोटद आर्यकृत, तद्भव व कानडी शब्दांचा कोश, कर्नाटक संजीवन (१६ वें शतक)-शब्दकोश; नानार्थरत्नाकर-देवोत्तमकृत, संकृत पद्यमय शब्दकोश, रेव्ह. रीव्ह-इंग्लिश कर्नाटक व कर्नाटक इंग्लिश कोश, मद्रास, १८२४-३२, दुसरी आवृत्ति १८५८; रेव्ह किटेल-कन्नड इंग्लिश डिक्शनरी, मंगळूर, १८९४, हाच कोश आज प्रमाण समजला जातो. यांत संस्कृत (तद्भव) व द्राविडी असे शब्द वेगळे दाखविलेले आहेत.

**हिंदी**—ॲडॅम-हिंदी डिक्शनरी, कलकत्ता; नागरीप्रचारिणी सभा-हिंदी शब्दसागर, ६ भाग (बनारस १९२८); थॉमसन (दिल्ली, १८८६), मथुराप्रसाद मिश्र-इंग्रजी, ऊर्दु व हिंदी (बनारस, १८६५) **हिंदुस्थानी**—टेलर-हिंदुस्थानी-इंग्रजी कोश २ भाग (कलकत्ता, १८०८), शेक्सपीयर-आवृ २, (१८२०); डंकन फोर्ब्स-आवृ. २, (लंडन १८५७), फॅलन, बनारस १८७६. **सिंधी**—ईस्टविक-मुंबई, १८४३; कॅ. स्टॅक-मुंबई, १८५५

**पंजाबी**—स्टार्की, १८५०; लुधियाना मिशन-लुधियाना, १८५४-६०. **काश्मिरी**—एलमस्लाय-लंडन, १८७२ **पुश्तु**—डॉर्न-सेंटपीटर्सबर्ग, १८४५; रॅव्हर्टी-लंडन, १८६०, १८६७.

**बंगाली**—डॉ. केरी-बंगाली भाषेचा कोश, (१८१५-२५), फॉस्टर-बंगाली कोश, कलकत्ता, १७९९-१८०२; रोझारियो-१८३७; रेव्ह कृष्णमोहन बानर्जी-बंगाली ज्ञानकोश-विद्याकल्पद्रुम १३ भाग, सुरवात १८४६; सुबलचंद्रमित्र-बंगाली-बंगाली कोश, कलकत्ता १९०९; आदिया-शब्दबुधि, कलकत्ता, १८५४; वा. गो. आपटे, बंगाली-मराठी कोश, शके १८४७. **पाली**—मोग्गल्न थेरो (१२ वें शतक) कृत अभिधानप्पदीपिका, कोलंबोप्रेस, १८६५; क्लो-कोलंबो १८२४; चाइल्डर्स-लंडन, १८७२-७५ **भूतानी**—श्रोटर-श्रीरामपुर, १८२६. **आसामी**—मिसेस कटर-सदपुर, १८४०; ब्रॉन्सन-लंडन, १८७६,

६१७ पानें **उरिया**—मोहनप्रसाद ठाकूर, श्रीरामपुर, १८११; सटन–कटक, १८४१–४८ (३ भाग) **खासिया**—रॉबर्ट्स–कलकत्ता, १८७५

**मलयाळी**—बेली–कोट्टयम, १८४६, गुंडर्ट–मंगळूर, १८७१ **तामिळ**—रेव्ह पर्सिव्हलनें इंग्रजी–तामिळ कोश केला आहे (१९००), चूळामणि निगड्डु–मंडलपुरुषकृत (इ स ८७५ चा सुमार), डॉ रोटलर–डिक्शनरी ऑफ दि तामिळ अँड इंग्लिश लँग्वेजेस, १८३४, मद्रास जाफना बुक सोसायटी–जाफना, १८४२, ५८५०० शब्द, विन्स्लो–मद्रास, १८६२, ९९२ पानें, ६७४५२ शब्द **तुळू**—रेव्ह मॅनर–तुळु इंग्लिश डिक्शनरी, १८८६ मंगळूर **तेलगू**—आन्ध्रशब्दचिंतामणि (११ वें शतक)—ननयभट्टकृत, तेलगू भाषेचें संस्कृत व्याकरण, आंध्रनामसंग्रह–लक्ष्मणकविकृत, तेलगू शब्दकोश यात बहुतेक तेलगू शब्द दिले आहेत कॅंपबेल–डिक्शनरी ऑफ दि तेलगू लँग्वेज, १८२१, मद्रास, ब्राऊन–तेलगू–इंग्लिश डिक्शनरी, १८५२, मद्रास

**ठगी**—स्लीमन, कलकत्ता, १८३०, ६८० रामोशी शब्द **जिप्सी**—पसपती–कॉन्स्टॅंटिनोपल, १८७०, स्मार्ट आणि क्रॉफ्टन–लंडन, १८७५

**आशिया खंड–सिंहली**—क्लो–सिंहली–इंग्लिश डिक्शनरी, कोलंबो, १८२१,१८८२ **इंडोचिनी**—लेडन–ब्रह्मी, मलायी व थई भाषाचा तौलनिक शब्दसंग्रह, श्रीरामपुर, १८१० **आनामी**—कॅथोलिक मिशनऱ्यांनीं सर्व पौरस्त्य भाषांत या भाषेचा विशेष अभ्यास केला ऱ्होड्स–(पोर्तुगीज आणि लॅटिन) रोमाई (१६५१) या पाद्र्याचा कोश आज अपुरा वाटला तरी फार महत्त्वाचा आहे याची लिपि लॅटिन आहे यानंतर बरेच चांगले कोश झाले उ पॉथियर (चिनी, आनामी, फ्रें लॅ)–पॅरिस, १८६७. **ब्रह्मी**—जुडसन–रंगून, १८९६, २ भाग, ९६८ पानें ब्रह्मी प्रदेशातील काहीं भाषाचा तौलनिक शब्दसंग्रह, डॉ. बुचॅनन–एशियाटिक रिसर्चेस व्हा ५; फिनेची पॉकेट डिक्शनरी, १९१७ **कांबोज**—आयमोनियर–सायगाव, १८७४ **करेण**—सौ–कौ–द्दू (करण) टव्हाय, १८४७ **मलाया**—डेव्हिड हीक्स यानें मल्यु–डच कोश प्रथम केला याचें लॅटिन भाषांतर १६३१ त झालें या भाषेचे कोश लॅटिन, डच, इंग्लिश व फ्रेंच भाषेंत असून सर्वांत जास्त कोश डच आहेत **मलाया द्वीपसमूहांतील भाषा**—बटक, बुगिस, डाइक, जाव्हानीज, मकासर, सुंदा, फोर्मोसा या भाषाचे कोश युरोपियनांनीं केलेले असून ते बहुतेक डच आहेत

**हीब्रू**—हीब्रूकोशासंबंधीं स्थानिक भाषेंत प्रयत्न नवव्या शतकापासून चालू आहेत इब्नगन्हकनें दहाव्या शतकांत लिहिलेला मोठा कोश १८५५ त एडिंबरो येथें फिलिपोवस्कीनें छापला काहीं जुने कोश होते पण ते उपलब्ध नाहींत लॅटिन, इंग्रजी, डच इ भाषांतून हीब्रू कोश आहेत **खाल्डी, असुरी, समारिटन, सिरिॲक**—या भाषाचे कोश प्रसिद्ध झालेले आहेत सिरिॲक भाषेचा कोश फार जुना म्हणजे जोशुआ बिन अली यानें ८८५ च्या सुमारास केला हाफमननें याचा काहीं भाग छापला आहे (१८७४) ब्रिटिश म्युझियममध्यें एलिआस शिनया याचा सिरियाक–अरबी कोश १००९ मध्यें लिहिलेला ठेविला आहे याचें लॅटिन भाषांतर १६३६ त राम येथें प्रसिद्ध झालें **अरबी**—अरबांनीं केलेले आपले कोश पुष्कळ आणि फार मोठे आहेत लेन आपल्या अरबी–इंग्लिश कोशाच्या प्रस्तावनेंत ३० कोशाचीं नांवें देतो पहिला 'ऐन' अल्खलीलच्या आठव्या शतकांतील आहे बहुतेक पाश्चात्त्य व प्राच्य भाषांत अरबी कोश झालेले आहेत इंग्रजींतील पहिला प्रसिद्ध म्हणजे लेनचा (१८६३–९३) होय यासाठीं लेन सात वर्षें कायरोला जाऊन राहिला होता व तेथें त्यानें अरबी भाषेचा अभ्यास करून बरीच जुनीं अरबी लिखाणें जमा केलीं अलीकडचा कोश न्यूमनचा आहे हा लंडन येथें १८७२ त प्रसिद्ध झाला सालमोनेच्या कोशांत सुमारें सव्वा लाख अरबी शब्द आहेत **आर्मेनियन**—मेक्थिारकृत, व्हेनिस, १७४९–१७६९, २ भाग, औचरकृत, व्हेनिस १८३६–३७ २ भाग. **तुर्की**—रेडहाऊस, लंडन, १८५६, इतर पाश्चात्त्य भाषांतून बरेच आहेत

**फारसी**—रिचर्डसन–पर्शियन आणि अरेबिक डिक्शनरी, अयोध्येचा राजा गाझीउद्दीन हैदर यानें हफ्त कुल्झुम नांवाचा कोश ७ भागांत १८२२ त लखनौ येथें प्रसिद्ध केला बहुतेक पाश्चात्त्य व काहीं भारतीय भाषांत फारसी कोश झाले आहेत प्रो पटवर्धन याचा फार्सी–मराठी कोश बंगालींत १८१८ त जयगोपाळानें फारसी कोश श्रीरामपुर येथें प्रसिद्ध केला एफ स्टेनगॅस–पर्शिअन–इंग्लिश डिक्शनरी (दु आ १९३०) **पहलवी**—वेस्ट–मुंबई, १८७४ **अवेस्ता**—प्रो जस्टी–अवेस्ताकोश (जर्मन), १८६४, कागा–(गुजराथी) मुंबई, १९००

**आंग्लोइंडियन**—व्हिटवर्थ ॲन ॲंग्लो इंडियन डिक्शनरी यात इंग्रजींत उपयोजिले जाणारे हिंदी भाषांतील शब्द व इंग्रजी शिवाय इतर भारतीयेतर शब्दांना हिंदुस्थानात कोणता विशिष्ट अर्थ आला आहे तेंहि दिलें आहे (१८८५), फेनन्याद्दि अगा एक इंग्रजी भाषेंत आलेल्या परकीय शब्दाचा कोश आहे त्यांत कारकून, जमादार, गोसाई हुक्का, चिनीम, हूली (होळी), हुडी इ शब्द घेतले आहेत

**चिनी**—चिनी लोकांनीं आपल्या भाषेंत केलेले कोश असंख्य असून त्यांपैकीं पुष्कळांच्या शाहुचीहि निघाल्या आहेत हु शिनचा श्वो वन हा कोश खि पू १५० त प्रसिद्ध झाला त्यांत ५४० मूळ शब्दांखालीं अगदी १०,००० शब्द (वर्ण) आहेत याचे १२ भाग आहेत त्यानंतर ५३० भागांतील कुये वांग्चा 'यु पियन' कोशांत ५४२ मूळ शब्द आहेत १७११ त वाङ्मयीन वाक्प्रचाराचा एक कोश जो झाला त्याचे १३० भाग आहेत १७१६ त कांगी राजाच्या आश्रयाखालीं ४० भागाचा एक कोश झाला त्यांत ४९०३० शब्द आहेत हाच कोश चीनमध्यें आधारभूत समजला जातो लॅटिन, इंग्रजी व

फ्रेंच भाषांत चिनी कोश झालेले आहेत. या भाषेवर जितके पाश्चात्य कोश आहेत तितके इतर भाषेवर क्वचित आढळतील. लोब्स-चीडच्या चिनी-इंग्रजी कोशांत मूळ शब्दांच्या क्रमानें मांडणी केली आहे.

**जपानी**—स्थानिक कोश फार थोडे आहेत. बहुतेक पाश्चात्य भाषांतून युरोपियनांनीं केलेले आढळतील. जपानी-इंग्रजी कोश हेप्बर्नचा आहे.

**फिलिप्पाइन्स**—बिकोल, विगय, इबनाक, इलोकन, पंपंग, तगल इ. भाषांचे कोश आहेत.

**उत्तर आणि मध्य आशिया**—तुर्किश, काल्मुक, बुरत, जगताई, मांचू, मोंगोल, ओस्टिअक, समोयेद, तार्तार, तिबेटी, तुंगुसियन, उइगुर इ. भाषांचे कोश आढळतात. पैकीं मांचू व तिबेटी कोश फार महत्त्वाचे आहेत. बहुतेक कोश जर्मन व रशियन आहेत. एच. ए. जस्चकी यानें केलेला तिबेटी-इंग्रजी कोश आहे. यांत तिबेटी उपभाषांचाहि उल्लेख आहे. नुकताच डॉ. दनेरनें एक मोठा तिबेटी-इंग्रजी कोश रचिला आहे. तो व्युत्पत्तिदृष्ट्या महत्त्वाचा आहे.

**कोरिया**—या भाषेचे कोश कोरिया, चिनी, जपानी व रशियन भाषांतून आहेत.

**आफ्रिका**—इजिप्शियन्, कॉप्टिक, एथिओपिक, आम्हारिक, पूर्व किनाऱ्यावरील, मालागासी, दक्षिण आफ्रिका, पश्चिम आफ्रिका, मध्य आफ्रिका व बर्बर या भाषांतले कोश फ्रेंच, जर्मन आणि इंग्लिश लोकांनीं केलेले आहेत.

**ऑस्ट्रेलिया, पॉलिनेशिया**—यांतील भाषांचे कोश इंग्रजांनीं केलेले आहेत.

**अमेरिका**—यांतील अनेक स्थानिक भाषांचे (युरोपीय भाषांवरीज) कोश उपलब्ध आहेत. उदा. एस्किमो, ओटोमी, मय, ग्वारनी, आयमारा इ. भाषांचे कोश. इतर कोशांप्रमाणेंच हे सर्व युरोपियन प्रयत्नांनीं झालेले आहेत हें सांगावयास नकोच.

मागें वर्णन केलेल्या कोशासुद्धां ऑफ्रेटच्या सूचींत आढळणाऱ्या सर्व संस्कृत कोशाची यादी पुढें दिली आहे. यांत उ. =उल्लेख असें समजावें.

१ अकारादि निघण्टु २ अगस्त्यनिघण्टु. ३ अनादिकोश. ४ अनेकाक्षरकोश. ५ अनेकार्थ. ६ अनेकार्थकोश-हेमचंद्र ७ अनेकार्थतिलक, नानार्थरत्नतिलक-महिप. ८ अनेकार्थदीपिका-उ. मल्लीनाथ, (किरातार्जुनीय) ११.५९. ९ अनेकार्थ-ध्वनिमंजरी-गदसिंह, तसेंच-महाक्षपणक. १० अनेकार्थनाममाला. ११ अनेकार्थशेष-हेमचंद्र. १२ अनेकार्थसंग्रह-हेमचंद्र (टीका-अनेकार्थकैरवाकरकौमुदी-महेंद्रसूरि). १३ अनेकार्थसंग्रह-अर्वाचीन. १४ अनेकार्थसमुच्चय-शाश्वत. १५ अभिधानचिंतामणि अथवा अभिधानचिंतामणिनाममाला-हेमचंद्र (टीका-अवचूरी, नामसारोध्दार, व्युत्पत्तिरत्नाकर-देवसागरगणि, महेंद्रसूरि, श्रीवल्लभ, नाम्नाम् सारोद्धार-वल्लभगणि-अभिधानचिंतामणी शेषसंग्रह, शेषनाममाला, शेषसंग्रहसारोध्दार, वृहदभिधान चिंतामणि). १६ अभिधानतंत्र अथवा नामलिंगानुशासन-जटाधर. १७ अभिधानमंजरी १८ अभिधानमाला उ.-रायमुकुट व भट्टोजी. १९ अभिधानरत्नमाला-हलायुध (टीका-आजड) २० अमरकोश अथवा नामलिंगानुशासन अथवा त्रिकांड-अमरसिंह. २१ अमरदत्त (कोशकार)-उ. हलायुध, मेदिनीकर, रायमुकुट, भानुजी. २२अमरमंगल-उ. महेश्वर, केशव. २३ अमरमाला-उ. क्षीरस्वामी, वर्धमान, रायमुकुट, भरतसेन, भानुजी. २४ अमरशेष-उ. देवण्ण (स्मृतिचंद्रिका), त्रिकाण्डशेष-पुरुषोत्तम. २५ अर्धनारीश्वर (कोशकार)-उ. चारित्रवर्धन (रघुवंश). २६ असालतिप्रकाश (काश्मीरचा राजा असालति याच्या आज्ञेनें झालेला कोश). २७ उम-(कोशकार), हेमचंद्रावर टीका. २८ उत्पलमाला अथवा उत्पलिनी-उत्पल. उ.-पुरुषोत्तमदेव (हारावली), मेदिनीकोश, मल्लिनाथ, रायमुकुट, शिवराम (वासवदत्ता), भानुजी. २९ एकवर्णार्थसंग्रह-भरतसेन. ३० एकाक्षरकोश -पुरुषोत्तमदेव, महाक्षपणक, महीधर, वररुचि. ३१ एकाक्षरनाममाला (अमरकृत?)-अमरकात, वररुचि, सुधाकलश, हिरण्यनाभ, विश्वशंभु. ३२ एकाक्षरनाममालिका-विश्वशंभु ३३ एकाक्षरनिघण्टु -इरगप दण्डाधिनाथ, वररुचि, शातवीर, देशिकेंद्र, सदाचार्य. ३४ एकाक्षरमाला. ३५ एकाक्षरनिघण्टुमाला-उ. -हेमाद्रि (रघुवंश). ३६ एकाक्षरमाधवनिघण्टु ३७ एकाक्षरमातृकाकोश. ३८ एकाक्षरमालिका-अमरसिंह (?), विश्वशंभुमुनि. ३९ एकाक्षररत्नमाला. ४० एकाक्षराभिधान-(वररुचिकृत). ४१ एकाक्षराभिधानमाला-उ. पद्मनाभदत्त. ४२ एकाक्षरीकोश-माधव. ४३ एकार्थनाममाला व द्व्यर्थनाममाला-सौभरि. ४४ ऐंद्रनिघण्टु-वररुचि. ४५ औणादिकपदार्णव-पेद्दभट्ट

४६ कल्पद्रु (नाममाला)-केशव. ४७ कविजनशेवधि-आदिनाथ कवि ४८ कविजीवन-धर्मराज. ४९ कविदीपिका निघण्टु-विक्रमादित्यराज ५० कविसेवादिनिघण्टु ५१ कात्य-उ क्षीरस्वामी, हेमचंद्र, केशव, महेश्वर, रायमुकुट, भानुजी. ५२ कात्य (कोशकार)-उ. मंख. ५३ कोशकल्पतरु-विश्वनाथ ५४ कोशसंग्रह-राधाकृष्ण ५५ कोशसार-उ शिवराम (वासवदत्ता). ५६ क्रियानिघण्टु-भट्टमल्ल. ५७ गणनिघण्टु ५८ गणमंजरी-निर्हेक कविवल्लभ. ५९ गाथाकोशवल्ली. ६० गीर्वाणभाषाभूषण-त्रिविक्रमाचार्य ६१ गोवर्धनकोश-उ. मेदिनीकर. ६२ चंद्रकोश-उ. भट्टोजी. ६३ चन्द्रनंदन (कोशकार)-उ. क्षीरस्वामी (अमरकोश). ६४ जैमिनीनिघण्टु. ६५ तारपाल (कोशकार)-उ. मेदिनीकर, रायमुकुट, भानुजी. ६६ त्रिकांडशेष अथवा अमरशेष-पुरुषोत्तमदेव-उ. मेदिनीकर, रघुनंदन, उज्ज्वलदत्त, मल्लिनाथ, शिवदत्त इ. ६७ त्रिरूपकोश-कचणविल्हणकवि. ६८ त्रिलिंगनिर्णयोदाहरण अथवा रत्नकोश ६९ त्रिविक्रम (कोशकार)-उ. हेमाद्रि, दिनकर ('रघुवंश'). ७० दामोदर (कोशकार)-उ. रायमुकुट. ७१ द्रव्यगुणविचार (कोश?)-रत्नाकर (सूचीपत्र). ७२ द्वंद्वादिकोश. ७३ द्विरूपकोश-(उ. रायमुकुट) पुरुषोत्तमदेव, हर्ष,

महेश्वर ७४ द्विरूपध्वनिसंग्रह–भरतसेन ७५ धक्षरनाममाला–सौभरि ७६ अर्थकोश–पुरुषोत्तमदेव ७७ धन्वंतरिनिघण्टु–वैद्यक ७८ धरणिकोश–धरणीदास–उ मेदिनीकर, रायमुकुट, उज्ज्वलदत्त, गदसिंह व आणखी ७९ धातुकोश (कविकल्पद्रुम)–वोपदेव ८० धातुपारायण–जूमरनन्दिन्, पूर्णचंद्र, हेमचंद्र ८१ नक्षत्रकोश ८२ नक्षत्रनिघण्टु ८३ नक्षत्राभिधान ८४ नानार्थकोश –शाश्वत, हेमचंद्र ८५ नानार्थध्वनिमंजरी–गदसिंह अथवा दुर्गसिंह ८६ नानार्थपदपेटिका–सर्वज्ञसुजन ८७ नानार्थमंजरी ८८ नानार्थरत्नतिलक (अनेकार्थतिलक पहा) ८९ नानार्थरत्नमाला–इरुगप दंडाधिनाथ अथवा दंडिनाथ, दंडेश अथवा (भास्कर दरिद्र कालीन) टीका–वधभ ९० नानार्थरत्नाकर ९१ नानार्थशब्दकोश–मयुरेश (शब्दरत्नावली पहा) ९२ नानार्थशब्दरत्न–कालिदास, टीका–तरला –निचुल कवि योगिचंद्र ९३ नानार्थशब्दानुशासन–मंडनमिश्र ९४ नानार्थसंग्रह–अजयपाल उ–गणरत्नमहोदधि, मेदिनीकर उज्ज्वलदत्त, रायमुकुट, शिवदास ९५ नानार्थसंग्रह–हरिश्चंद्र ९६ नामनिघण्टु (वैदिक)–माधव–उ देवराज ९७ नामनिधान–सर्वज्ञनारायण–उ रायमुकुट भानुजी ९८ नामप्रपंच–उ रायमुकुट ९९ नाममातृकानिघण्टु–वरदराजाचार्य १०० नाममाला–दंडिन् १०१ नाममाला–उ क्षीरस्वामी (अमरकोश) वामन हेमचंद्र मेदिनीकर १०२ नाममाला (वर्णानुक्रम चित्रकोश) १०३ नाममाला–धनंजय (धनंजयनिघण्टु) धनंजयकोश, प्रमाणनाममालानिघण्टुसमय (दोन भाग–एकार्थ व नानार्थ), धनंजयनाममाला १०४ नाममाला–साधु १०५ नाममाला–हर्षकीर्ति (शारदीयाख्यानाममाला) १०६ नाममाला-कोश १०७ नाममालिका–भोज महिप १०८ नामलिंगाख्या कौमुदी–रामकृष्ण सूचीपत्र १०९ नामलिंगानुशासन–अमरसिंह ११० नामसंग्रह–भानुचंद्र १११ नामसंग्रहनिघण्टु–भार्गवाचार्य ११२ नामसंग्रहमाला–अप्पय्यदीक्षित ११३ नामसारोद्धार–हेमचंद्र (अभिनवचिंतामणीवर टीका) ११४ नामावली–गोवर्धन (?) –धनंजय ११५ निघण्टुशेष–हेमचंद्र ११६ निर्दैक कविवल्लभ–गणमंजरी ११७ निजविनोद–महादेव वेदान्ती ११८ नीलकण्ठकोश–(अमरकोश टीका पहा) ११९ नैघण्टुकैका ध्याय–वाल्हिकेयमिश्र १२० न्यायकोश

१२१ पंचतत्त्वप्रकाश–वेणीदत्त १२२ पंचरूपकोश १२३ पदचंद्रिका–मयूर १२४ पदमंजरी–कविवल्लभ, मल्लटकवि, १२५ पदार्थकौमुदीकोश १२६ पदार्थकौमुदीसारकोश १२७ पदार्थभास्कर १२८ पद्मकोश–प्रयागदास १२९ पर्यायपदमंजरी–हम्मीरमिश्र १३० पर्यायरत्नमाला महेश्वरमिश्र १३१ पर्यायार्णव–नीलकंठमिश्र १३२ प्रयुक्तपदमंजरी–ईश्वरकृष्णकालिदास १३३ बालप्रबोधिका–नत्किरकवि १३४ बीजकोश १३५ बीजनिघण्टु १३६ बृहद्रत्नाकर–वामनभट्ट १३७ भागुरि–उ क्षीरस्वामी, हलायुध, महेश्वर, हेमचंद्र, केशव महिप, मेदिनीकर, रायमुकुट, मल्लिनाथ १३८ भारतमाला १३९ भावप्रकाशनिघण्टु १४० भुवनप्रदीपिका–सार्वभौममिश्र १४१ भूरिप्रयोग–पद्मनाभदत्त–उ नारायणशर्मन्, रंगनाथ, भट्टोजी १४२ मातृकाकोश–चतुर्भुज शिष्य १४३ मातृकानिघण्टु–मातृकाक्षरनिघण्टु–महीधर १४४ मात्राकोशभारविका १४५ माधवकोश–उ मेदिनीकर १४६ मानमंजरी (संकृत व भाषाकोश)–नंदकवि १४७ मालतीमाला–उ मल्लिनाथ रामानंद (काशीखंड) १४८ मुक्तावली–उ रंगनाथ १४९ मुग्धबोध (इ स १३१४) १५० मुनि–व्याडि[2] किंवा कात्यायन[2] १५१ मेदिनीकोश अथवा नानार्थकोश–मेदिनीकर–उ शिवकोश, असालतिकोश भूरिप्रयोग १५२ यादवकोश–यादवप्रकाश (वैजयंती पहा) १५३ रघुनंदनकोश–(स्मृतितत्त्वावरील कोश) १५४ रत्नकोश–उ मल्लिनाथ, रायमुकुट, गदसिंह, शिवराम (वासवदत्ता) भानुजी, रत्नकोश–कालिदास १५५ रत्नप्रकाश –उ मल्लिनाथ (शिशुपाल वध १२,१६) १५६ रत्नमाला–माधव–उ रायमुकुट १५७ राज कोशनिघण्टु–राजव्यवहारकोश–रघुनाथपंडित १५८ राधाकृष्ण कोश–राधाकृष्ण १५९ रुद्रकोश–रुद्र–उ मल्लिनाथ, मेदिनीकर १६० रूपभेदप्रकाश (शब्दभेदप्रकाश पहा) १६१ रूपरत्नाकर –उ रायमुकुट भानुजी १६२ लघुनिघण्टुसार–केशव १६३ लघ्वमर १६४ लिंगभट्टीय–भानुदीक्षित १६५ लिंगानुशासन १६६ वररुचिकोश–उ हलायुध मेदिनीकर (एकाक्षरकोश एकाक्षर निघण्टु एकाक्षरनाममाला, एकाक्षराभिधान, ऐन्द्रनिघण्टु) १६७ वर्णनिघण्टु (प्रश्नशास्त्र) १६८ वर्णप्रकाश–कविकर्णपूर १६९ वस्तुकोश १७० वाचस्पति (कोशकार)–उ हेमचंद्र महेश्वर, केशव, रायमुकुट, भट्टोजी भानुजी, पुरुषोत्तमदेव, मेदिनीकर सुंदर गणि १७१ वामननिघण्टु–वामन १७२ विक्रमादित्यकोश (हारावली)–उ मेदिनीकर सुंदरगणि भानुजी १७३ विचित्रनाम माला १७४ विबुधोपदेश १७५ विश्वनिघण्टु–विश्वकवि, परमेश्वरभट्ट (?) १७६ विश्वकोश–विश्वप्रकाश–महेश्वर, रत्नाकर, वाचस्पति १७७ विश्वमेदिनी–वाचस्पतिमिश्र, सारस्वतमिश्र १७८ विश्वप्रकाश–वाचस्पति, महेश्वर १७९ विश्वरूप (कोशकार)–उ महेश्वर, मेदिनीकर भट्टोजी १८० विश्वलोचन–उ विश्वप्रकाश (?) १८१ वेदनिघण्टु–पिंगलाचार्य (?) १८२ वैजयन्ती–यादव कोश–यादवभट्ट–उ हेमचंद्र, मल्लिनाथ देवण्ण

१८३ शब्दकल्पद्रु–केशव १८४ शब्दकल्पद्रुम–राधाकांतदेव १८५ शब्दकल्पद्रुम –व्यासकेशव १८६ शब्दकौस्तुभ–भट्टोजी १८७ शब्दचंद्रिका–चाणकवि १८८ शब्दचिंतामणि–व्यास विट्ठलाचार्य १८९ शब्दतरंगिणी–उ उज्ज्वलदत्त

अगोद(ध)र—क्रिवि. विवक्षित मियेच्या किंवा कालापूर्वी, आधीं, पहिल्यादा ०चा,-रील-वि पूर्वीचा, पहिला, प्रथमचा, मागचा [स अग्रतर किंवा आदौकर-आदोगार-अगोदर, सिं अगमरो]

अगोस्ती—स्त्री (विप्र) अगुस्ती पहा (अगावरील) शहारे, काटा ०येणें-घाटणें-'तिच्या (घोडीच्या) अगास अगोस्ती येऊन ती अग झाडते '—अश्व १५७ [स अग+उत्+स्था]

अग्गड—अगड पहा

अग्गत(द)—(गो) अगत्य पहा टाम, मुद्दाम 'हो कागद तेणि माका अग्गत दिलेसा '

अग्न—पु स्त्री अग्नि, आग, विस्तव 'अग्न गृहासी लागला। आणि सावकाश निजेला॥' —दा ११ ३ ७, 'वाच्यायनादी मोधा आली। जैशी अग्न परनळली।' —ऐपो १०. [स अग्नि]

अग्नि—पु १ विस्तव, आग, अनळ २ पचमहाभूतातील एक देवता ३ जठराग्नि (ल) भूक ४ आग्नेयी दिशा व तिचा अधिपति ५ यज्ञीय देवता, गार्हपत्य आहवनीय व दक्षिणाग्नि असे तीन त्रेताग्नि व सभ्य आणि आवसथ्य मिळून पचाग्नि ६ तीन सख्येचा वाचक ७ चित्रकादि जठराग्नि प्रदीप्त करणाऱ्या वनस्पती [स] ०घेणें-दारूगोळ्याचा मार सहन करणें ०देणें-प्रेत जाळणें, उत्तरक्रिया करणें ०चा पाऊस पडणें-अग्निवर्षाव होणें, एकदम अनेक सक्टें-जुलूम कोसळणें, गुदरणें ०आराधना-शत्रूची गावंवेडी, शेतें-भातें जाळणें —ख २०९९ ०कण-पु विस्तवाची ठिणगी, स्फुलिंग फुणगी ०कमळ-न योगशास्त्रांतील एक सज्ञा भुवयाच्यामध्यें अग्निनामक कमळ आहे तें विद्युद्वर्ण असून त्याला दोन पाकळ्या आहत ते 'ह' 'क्ष' हीं बीजचिन्हें आहेत —विउ १ ५३ ०कार्य-न उपनयनानतर बटूनें ब्रह्मचारी धर्माप्रमाणें करावयाचा होम अग्नि-उपासना ०काष्ठ-न निखारा, पेटलेलें लाकूड, विस्तव ०काष्ठ भक्षणें-१ अग्निप्रवेश करणें अग्नींत उडी टाकून मरणें 'अर्जुन म्हणे हेचि दापर। जरी मोडोनि पडेल मेत। तरी मी अग्निकाष्ठें भक्षीन सत्य।' —ह ३२ १६९ २ सती जाणें 'आपला पति मृत झाल्याची खबर कानीं पडताच तिनें अग्निकाष्ठें भक्षण करण्याचा निश्चय केला ' ०काष्ठ ॲसिड-(पायरोलिग्निअस ॲसिड) हें लाकडातून कच्च्या स्वरूपात निघतें —सेंपू २ ४२ ०कुंड-न होमाच्या वेळीं अग्नि ठेवण्या करितां केलेला खड्डा, पात्र, वेदी ०कुमार-पु अजीर्ण, कॉलरा, वातजन्य रोग यावरील पारा, गधक बचनाग टाकणखार वगैरेचें केलेलें औषध रसायन —योर १ ५०२ ०क्रीडा-स्त्री दारूकाम, आतषबाजी,' दारूगोळ्याचा भडिमार, फटाके दारू उडविणें ०स्राव-पु तप्तलोहस्तभ, शिक्षेचा एक प्राचीन प्रकार नरक यातनांपैकीं एक, यम लोकींची एक शिक्षा 'तप्तभूमीवरी चाल विती। अग्निस्रावातहि कवळविती॥' ०चक्र-न १ षट्चक्रांपैकीं एक, अग्निकमळ पहा —एभा १२ ३३५ २ शकुन, फलज्योतिष यांतील एक सज्ञा, शातिकर्मासाठीं अग्नि कोठें आहे हें पहावयाचें चक्र शुद्ध प्रतिपदेपासून चालू तिथीपर्यंत मोजून त्या सख्येंत एक मिळवावा व रविवारापासून चालू वारापर्यंतची सख्या मिळवावी व त्या सख्येस ४ नी भागावें बाकी शून्य किंवा तीन उरल्यास अग्नि पृथ्वीवर असून शुभ होय, २ उरल्यास अग्नि पाताळीं व १ उरल्यास अग्नि स्वर्गलोकीं होय, हे दोन्ही अग्नि शातिकर्मास अशुभ होत —धर्मि २८४ [स] ०ज खड्क-पृथ्वीच्या पोटा तील अग्नीनें आतील पदार्थांचा रस होऊन त्यापासून बनणारा खडक, लाव्हा —भू ७८ ०ज्वाला-स्त्री अग्निशिखा, ज्योत, जाळ ०तीर्थ-न तीर्थ पहा ०दिव्य-न दिव्य पहा ०नाश-पु श्रौत स्मार्त अग्नि विझून जाणें, अग्निहोत्रातील अग्नि नष्ट होणें, (याबद्दल प्रायश्चित्त घ्यावें लागतें) ०नौका-स्त्री आग बोट, वाफर, स्टीमर ०पंचक-न फलज्योतिषातील एक योग, हा घातक असून त्यात अग्नीपासून भय असतें यासारखेंच चौरप०, मृत्युप०, राजप० वगैरे योग आहेत शुद्ध प्रतिपदेपासून चालू तिथीपर्यंत मोजून त्यामध्यें चालू लग्न मिळवून त्या सख्येस नवानीं भागून बाकी दोन राहिल्यास तें अग्निपचक होय हें सर्व गृहकर्मास वर्ज्य मानितात —मुमा [स] ०परीक्षा-स्त्री अग्नि दिव्य पहा ०पात्र-न (शिपी) इस्त्री यत्र, कपडा सडकडीत करण्याचें यत्र, इस्तरी पहा ०पुट-न रसायन, औषधें, मात्रा वगैरे करण्यास त्याना अग्नीची आच देऊन जो सस्कार करितात तें. ०प्रद-वि पाचक, अग्निवर्धक, अग्निदीपक ०प्रवेश-पु १ स्वत स आग्रत घेणें २ सती जाणें, अग्निकाष्ठ भक्षणें पहा 'पुनवत्या क्रिया विशेष। तिहिं न करावा अग्निप्रवेश॥' ०बाण-पु, दारूनें वर उडवावयाचा बाण, दारूचा बाण, अग्न्यस्त्र ०मणी-पु एक काल्पनिक रत्न, सूर्यमणि, रविकांत सूर्यकांत मणी पहा ०मांद्य-न अपचनाचा रोग, जठराग्नि प्रदीप्त नसणें, भूक न लागणें ०मापक-पु न अत्युष्णतामान मोजण्याचें यत्र, पायरॉमीटर ०मुख-न १ हिंग एक भाग, वेखड २ भाग, पिंपळी ३ भाग, सुठ ४ भाग, ओवा ५ भाग हिरडेदळ ६ भाग, चित्रकमूळ ७ भाग व कोष्ठ ८ भाग यांचें चूर्ण हें अग्निमाद्यावर देतात —योर १ ४९३ २ देव ३ ब्राह्मण ०यंत्र-न १ बदूक, तोफ 'यांच्या अग्नियत्रांच्याची तारीफ व्हायला वेळेनुसार चुकायची नाहीं ' —नि ८०८ २ दारूकाम आतषबाजी 'भरूनी रणतमाचें औषध। करूनी अग्नियत्र सन्नद्ध। छप्पापुढें अतिविनोद। एक प्रबुद्ध दाविती॥' —एरुस्व १५ ११७ ०रथ-पु आगगाडी ०रोहिणी-स्त्री काळपुळी पहा ०वर्ण-वि अग्नीसारखा तावडा लाल (रंग), रक्तकाति ०वर्धक-वि पाचक ०वर्धन-न पचन, जठराग्नीचें

उद्दीपन ०विच्छेद–पु अग्निनाश, पत्नी मृत झाली असता अथवा इतर कारणांनी अग्निहोत्र बद पडणें (याबद्दल प्रायश्चित्त सांगितलें आहे) ०वृद्धि–स्त्री अग्निवर्धन, पचनशक्तीची वाढ, जठराग्नि प्रदीप्त होणें, आहाराचें प्रमाण वाढविणें ०शस्त्र–न बदूक, तोफ वगैरे दारूनें उडणारें हत्यार ०शाला–स्त्री अग्न्यागार, अग्निगृह, अग्नि ठेवण्याची जागा, यज्ञशाळा, होमशाळा ०शिखा–स्त्री अग्नीची ज्वाळा, अग्निज्वाळा ०ष्टुत्–पु (स्रि) 'एंबर डेज'या इग्रजी शब्दाचा पर्याय, राखेचे दिवस, ज्याची दीक्षा होणार आहे त्याच्यासाठीं प्रार्थना करण्याचे दिवस 'उपोषणमडळाशिवाय या चर्चेच्या प्रार्थनासप्ताहात अग्निष्टुत्, अनुनय व कित्येक विशिष्ट दिव साच्या पूर्वी करावयाचीं प्रदोषोपोषणें सांगितलीं आहेत' –ना वा टिळक ३ म ३ [स अग्नि+स्तु] ०ष्टोम–पु सप्तसोमसस्था (यज्ञ) पैकीं एक, सोमयाग, यज्ञ ०ष्वात्त–पु अव पितृदेवता, ज्यास मत्राग्नि मिळालेला आहे असे, ज्यानीं जिवतपणीं अग्निहोत्र पाळलें नाहीं असे, मरीचीपुत्रापैकीं पितर, जिवतपणीं श्रौताग्नि ज्यानीं ठेवला नाहीं (अग्निष्टोमादि याग केले नाहींत) असे पितर (सायण) ०सेवा–स्त्री अग्नीची उपासना, पूजा ०स्थान–न अग्निकमळ चक्र पहा 'आस्ललेनी योगें । मध्यमा मध्यमार्गे । अग्निस्थानीनि निगे । ब्रह्मरध्रा ॥' –ज्ञा ८ ९४ ०होत्र–न १ श्रौता ग्नीची उपासना, सकाळसायकाळ अग्नीला होम देऊन अग्नि सतत राखण्याचें व्रत २ (थट्टेनें) धूम्रपान, विडी ओढणें ०होत्री–पु अग्निहोत्र पाळणारा, (थट्टा) तबाकू ओढण्याचें व्यसन असणारा ०स्नान–न (व) एक ताब्याभर पाण्यात स्नान करणें

**अग्न्यायतन**–न अग्निकुड [स अग्नि+आयतन]

**अग्न्युत्पात**–पु १ वणवा, आगधाड, अग्नीचा डोंब २ उल्का [स अग्नि+उत्पात]

**अग्या**–वि म्होरक्या, पुढारी (मुलाच्या खेळात) –पु पुढारीपण, पुढाकार ०घेणें–धरणें–पत्करणें. [स अग्र प्रा अग्ग, गु अगुवो, हिं–अगवा–ना, आगे, प अग्गे, सि अगोर]

**अग्या**–पु १ कावळा 'अग्या निगतेजसत्ता । अग्नितेज प्राशू जाता । तोंड जळे चवी चाखिता ।' –एभा ४ ८६ २ एक रानटी अंगाची आग करणारी वनस्पति (खाजकुयरी) [स अग्नि]

**अग्या(गे)री**–स्त्री अग्निपूजकाचा किंवा पारशाचा पवित्र अग्नि ज्या ठिकाणीं असतो ती जागा पारशाचें देऊळ [स अग्नि+अगार, प्रा अग्गिआर–अग्यारी]

**ॲग्यू**–पु हिंवतापाचा एक प्रकार [इ] ०मिक्श्चर–न या तापावरील औषध [इ]

**अग्र**–न १ टोंक, शेवट, कळस, बिंदू, शेंडा २ पुढचा भाग, अघाडी ३ दिशा ४ (समासात श्रेष्ठार्थी), पहिला, पुढचा, मुख्य, प्रधान [स] ०का–ज्या–स्त्री दिगंश, सूर्य, तारा किंवा इतर ग्रह हे क्षितिजाच्या ज्या बिंदूत उगवतात किंवा मावळतात तो बिंदु आणि क्षितिजावरील पूर्व किंवा पश्चिम बिंदू ह्याच्यामध्यें जो कंस होतो तो ०गण–वि श्रेष्ठ, प्रवीण, तरबेज 'रुक्मिणी अग्र गणी सत्क्रिया ।' –एरुस्व ६ ७०, 'चपळविशेषें अग्रगण ।' –दा १ ३ २२ [म अग्रगण्य] ०गण्य–वि श्रेष्ठ, प्रमुख, पुढें नेणारा अग्रगण्यु, अग्रण्य अशींहि रूपें आढळतात ०गामी–वि पुढें जाणारा, नेता, पुढारी अग्रगामिनी–स्त्री ०ज–वि प्रथम जन्मलेला–वडील भाऊ ०णी–वि मुख्य, नायक, म्होरक्या, मुखिया, मार्गदर्शक ०त–क्रिवि पुढें, अग्रभागीं ०धान्य–न जोंधळा, अरगडी, भात, बाजरी वगैरे खरीपाचें पीक खरीप पहा ०तलसंचर (पाद)–वि (नृत्य) नाचण्यास उभें असता पायाची टाच वर उच लून आंगठा जमीनीला टेंकून बाकीच्या बोटाचीं अग्रे वाकडीं करणें ०पूजा–स्त्री सभेंत विद्या, तप, वगैरेमुळें जो श्रेष्ठ असतो त्याची प्रथम करण्यात येणारी पूजा–मुख्य मानपान –मान–वरील पूजेचा मान- 'ज्यानी अग्रपूजेची मान्यता । त्या ब्रम्ह्यासि माझी काळ-सत्ता । ग्रासी सर्वथा ॥' –एभा १० ६१२ [स अग्र+पूजा] ०फूल–न वेणीच्या अग्रात गुतविलेलें सोन्याचें जोड फूल वेणी सोडली असता तिच्या मध्यभागीं हें दोन बाजूनीं दिसतें [अग्र+पुष्प] ०भाग–पु अग्र पहा १ पुढला भाग २ टोंक, शेवट, कळस, माथा, शिखर, शेंडा ०भोजन–न पहिल्याप्रथम जेवणें, आधीं जेवणें, प्रथम जेवण्याचा मान, सर्वांच्या आधीं जेवणास बसण्याचा मान [स अग्र+भुज्]. ०भोजी–वि अग्रभोजनाचा मान असणारा आधीं जेवणारा ०लेख–पु वर्तमानपत्रातील मुख्य लेख (लीडर), सपादकीय लेख [स अग्र+लेख] ०वन–न १ झाडाच्या फांदीला फुटणारी डिरी 'अर्धं कामु पसरे । अग्रवनें घेतीं धारें ।' –ज्ञा १५ १५८ २ अरण्याची सरहद्द [स अग्र+वन] ०वर्ण–पु श्रेष्ठ जात, (ल) ब्राह्मण 'त्याहीं मार्गी उत्तमता कैशी । अग्रवर्णासी प जन्म ॥' –एभा ७ ६३५ [स अग्र+वर्ण] ०वर्ती–वि अघाडी, पुढें असणारा–जाणारा (स्थळ व काल याना अनुसरून लावितात) [स अग्र+वृत्] ०वादी–पु १ वादी फिर्यादी, वादाचा प्रथम उपक्रम करणारा, प्रतिवादीच्या उलट २ आपल्या मताचा किंवा पक्षाचा जोरानें पुर स्कार करणारा [स अग्रवादिन्] ०सर–वि १ अग्रेसर, अग्रगण्य, पुढारी व्यवस्था पहाणारा, नेता २ प्रमाणात असलेल्या दोन संख्यापैकीं पहिली ३६ ४८ यातील ३६ –छअ १०४ ०स्कंध–पु खायाचें पुढच्या भागाचें माप (शिवणकाम) 'अग्रस्कंध व पाठ तोल हीं दोन्ही योग्य असता चॉडीकोट पाटींत फार रद्द असतो याचें कारण काय ?' –कप्र २५ ०हार–पु ब्राह्मणाना किंवा देवस्थानास निर्वाहासाठीं दिलेलें गाव, जमीन वगैरे इनाम, (अप)

अग्रहार 'वापी कूप आराम। अग्रहारें द्वन महाग्राम।'—ज्ञा १८ ९९ २ एक दुमाला एका कुटुंबाकडून जारत कुटुंबास निर्वाहार्थ जो गाव अगर जमीन देतात त्यास अग्रहार दुमाला म्हणतात —इनाम २८ [स अग्र+ह]

**अग्रा**—स्त्री अग्रका पहा समाशाचा कोटिकोन पूर्व किंवा पश्चिम समविंदूपासुन दृग्मंडलाचे पातापावेतों मोजला जातो त्यास अग्रा म्हणतात —सूर्य १७ [स ]

**अग्रार**—स्त्री अग्रहार पहा 'तीर्थी अर्पी जो अग्रारें।' —दा २ ७ १९ [स अग्रहार]

**अग्रांशु**—पु प्रकाशकिरणाचा शेवट, केंद्रविंदु [सं अग्र+अंशु=किरण]

**अग्रासन**—न. सभेंतील प्रमुख स्थान, मुख्यासन, अध्यक्षपद [स अग्र+आसन]

**अग्राह्य, अग्रहणीय**—वि घेण्यास अयोग्य, वाईट, वेंकी यदशीर, अमान्य, अधर्म्य, नालायक 'माँटेग्यु सुधारणा अग्राह्य आहे'—टि ३ ४२५ [स अ+ग्रह्]

**अग्रिम**—वि १ पुढचा, आधींचा २ पुढारी, मुख्य, प्रमुख वडील ३ अग्रज, वडील भाऊ ०**धान्य**—न अग्रधान्य पहा

**अग्रेचन**—अग्रवन पहा

**अग्रेसर**—अग्रसर पहा

**अग्रो(ग्रो)**—पु आग्रह पहा [स आग्रह]

**अग्रोदक**—न १ कोणाचाहि स्पर्श होण्यापूर्वी घेतलेलें पाणी २ तानें पाणी, स्वयंपाकासाठीं सोंवळ्यानें आणलेलें पाणी 'अग्रोदकाचा भरुन कलश पूजावया परमपुरुष।'—ह २४ १८२ [स अग्र+उदक]

**अग्न्य**—वि प्रमुख, श्रेष्ठ, नेता, पुढारी [स ]

**अघ**—न १ पाप 'म्हणोनि साडिले तो अघीं।'—ज्ञा ३ १२३ २ दोष, गुन्हा, अपराध [स] ०**गोवा**—पातकाचा घट, नड, गुता 'मद्रजनें तोचि निस्तरला अघगोवा २॥'—शिक १९ [गोंवणें]

**अघटघटी**—वि अशक्य गोष्ट घडवून आणणारी 'अघट घटी हरीची माया।'—एभा ७ ७४ [स अ+घट्+घट्]

**अघटमान**—वि न घडणारें असंभाव्य अशक्य 'हे चर्चा अघटमान पैं।' [स ]

**अघटित**—वि १ असामान्य, विलक्षण, चमत्कारिक, लोकोत्तर 'अघटित वाता। कोल्हे गेल तीर्था॥', 'हरिच्या दासा चिंता। अघटित हे वार्ता॥'—तुगा २३११ २ घोर, अति वाईट, भयंकर राक्षसी, आसुरी —न अतर्क्य, अभूतपूर्व गोष्ट-प्रसंग 'अघटित घडे कापसा॥ कापसानें कपाळ फुटे॥', 'कर्मी त्याचे अघटित।' —ऐतिहा १४५ [स] ०**घटना**—स्त्री विलक्षण गोष्ट, आश्चर्यकारक बनाव, प्रसंग, नवल [स] ०**घटी**—वि न घडणारें तें घडवून आणणारी 'ईश्वराची माया पूर्ण। अघटितघटी तिचें लक्षण॥'—एभा २३ ४२१ [स ] ०**विंदाण**—न विलक्षण किंवा आश्चर्यकारक गोष्ट, नवल, चमत्कार, करणी (काल, दैव, ईश्वर यांची) 'कोरडे कागद उदकीं राखणें। हें अघटित विंदान दाविलें॥'

**अघटी-टें**—आगटी पहा

**अघड**—वि न घडविलेलें, घडींव नसलेलें, ओबडधोबड (दगड, वस्तु इ०) [स अ+घट्] ०**ता**—वि न घडणारा, अशक्य 'तेथ परिवार वहुये। अघडता वरी॥—अमृ ९ ३८, 'हे असो मात अघडती।'—ज्ञा १ २३५, 'म्हणार हे उपदेशिली नीती। आम्हांस तव अघडती।' रास १ ६४०

**अघननघन-अघाननाघान-अघानीनाघानी**—अगननगन पहा

**अघमर्षण**—वि १ पापनाशक —न स्नानविधि व सध्या या कर्मांत प्राणस्थित पापपुरुषाचें उच्चाटण करण्यास हातात उदक घेऊन त्यावर नाकातील वायु सोडून त्या पाण्यानें जमीनीवर आघात करणें (म्हणजे पापपुरुषाचा नाश झाला ही भावना)•'येथींच्या अर्थी बुडी दऊन। जे सदा करिती अघमर्षण।' [स अघ+मृष्]

**अघरडा**—पु १ जीभ, नाक, चोंट, लेखणी इ० चें टोंक, झाडाचा शेंडा, (सामान्यत) शेवट, टोंक [स अग्र] २ अघाडा पहा

**अघव-वा, अघा**—वि १ अवघा-घें, पूर्ण, सर्व, एकंदर 'दवकी उदरींचा आठवा। निजध्यास वैराला वैरभावा। जनींवनीं अघवा। आठवा आठवा आठवत॥'—ह ३ ६०', 'ऐसेनी आपव चोहींकडे। वैसिलें जालें।—दाव २०३ 'होतिं अघवियाची विरहिणी।'—शिशु ७५४ [स अप्रवत्, प्रा अग्घव —अघव]

**अघ(घा)ळणें**—उक्रि पाण्यात खळवळणें, धुणें (वस्त्र इ०) [का आगळ, अगुळ=पाण्यांत बुडविणें, सं आ+गल् ?]

**अघळपघळ**—वि १ ऐसपैस, मोकळें, सैल, लावल्चक २ (ल) स्वतंत्र, अनिर्बंध, निष्कपट, मोकळ्या मनाचा —क्रिवि मोकळेपणानें, ऐसपैस रीतीनें, (बोलणें, बसणें) [स प्रगल्-पघळ द्वि किंवा का अगल=विस्तृत द्वि]

**अघळाअघळ**—स्त्री (पाण्यात) पुन्हां पुन्हां खळवळणें [अघळणें]

**अघा**—पु १ धनी, यजमान २ मुसलमान बादशहाचा खास खोजा ३ तुर्की राज्यातील सेनापति, मुख्याधिकारी इ० ची पदवी [स अग्र, तु आघा=श्रेष्ठ]

**अघाऊ**—अगाऊ पहा

**अघाड**—वि (चढ) उंच, मोटें [स अ+घट, किंवा तु अघा]

**अघाडा**—पु १ आपाढांत उत्पन्न होणारें एक औषधि झाड, पांढरा, रक्त व पाण असे तीन प्रकार, दतधावन, आम, व्रण यांवर

उपयोगी उची ४ ते सहा फूट दाढ्यावर रेषा व लव पानाची वरची बाजू नरम व खालची खडबडीत राख खताच्या उपयोगी क्षाराचा उपयोग धोबी लोक कपडे धुण्याकडे करतात २ वाय काच्या केसाची अग्रे. (क्रि० चाधणें–विंचरणें) [स अग्रजात प्रा अग्घाड, गु अघेडो ]

**अघाडी**—स्त्री १ पुढला भाग पिछाडीच्या उलट २ सैन्याचा पुढला भाग, विनी ' रोखिले अघाडी जेनारा । '–ऐपो ११८ ३ घोड्याच्या गळ्याला बांधावयाची पुढील दोरी, दवासन –क्रिवि पूर्वी, पुढें, अगोदर [स अग्र] ०घेणें–पुढें होणें, पुढाकार घेणें ०मारणें–१ पुढें जाणें. 'तोंपर्यंत काय जी अघाडी असेल ती मारली पाहिजे '–चंद्रगुप्त १२१ २ सैन्याची विनी कापणें ०साधणें–दुसऱ्याच्या आधीं जाऊन काम पुरें करणें

**अघाडीपिछाडी**—स्त्री १ घर, सैन्य इ० चा पुढला व मागला भाग २ घोड्याच्या डोक्याकडील व मागच्या पायाकडील बांधा वयाचे दोर, दवासन आणि पायबंद –क्रिवि पुढें मागें, पूर्वी नंतर [स अग्र+ पिच्छ द्विं ]

**अघात**—पु आघात (अप), संकट ' हरिनामें प्रल्हाद तरला। नाना अघातापासून सुटला ॥ '–दा ४ ३ १७. [स आघात ]

**अघेडा**—अघाडा पहा

**अघोट**—अगोट पहा

**अघोर**—वि १ अचाट, फार भयंकर, भीतिप्रद, अमंगळ, (वस्तु क्रिया, स्थान ) २ अकाळविकाळ, अक्राळविक्राळ ३ निष्का ळजी, बिनघोर, निर्भय, स्वस्थ, बेफिकीर ४ सौम्य, घोर नाहीं असा 'अघोरचक्षु अपतिघ्न्येधि ।'–ऋग् १० ८५ ४४ –अंतरपाट काढल्यानंतर ' ही वधू सौम्य दृष्टीची असावी ' असें म्हणतात –पु १ संकट, घोर ' माझी दुरिती त्वा जरा। आणि दर्हीच्या अघोरा दवडिलें॥'–कथा २ ५ १७७ २ शंकर यावरून अघोरपंथ निघाला 'या ते रुद्र शिवा तनूरघोरा पापकाशिनी। '–सैंग० रुद्र ३ एक नरक ' जो द्विजदेवाची वृत्ति हरी ते तिघे अघोरीं पचिजेति। ' –एभा २७ ३६३ ०अरण्य–न भयंकर अरण्य ०कर्म–न भयं कर, धाडसी किंवा अमंगळ काम ०जप–पु पिशाच मंत्राचा जप ०दंड–पु जबरदस्त दंड ०निद्रा–स्त्री गाढ झोंप ०पंथ–पु गोसाव्यांचा एक पंथ, हे लोक हातात नरकपाल घेणार व नरमांस भक्षण, मलभक्षण व इतर अघोर (अमंगळ) कृत्यें करणार असतात ०पंथी–वि वरील पंथाचे अनुयायी [स अघोर+पथिन्] ०मत-मार्ग–अघोरपंथ पहा –मार्गी–अघोरपंथी पहा ०योग– गी–पु अघोरपंथ व त्याच्या अनुयायांचा समाज शाच आगम आघोरयोगी। कैसे ते ऐकावे ॥ –दा ४ १ १३ [स ]

**अघोरी**—वि १ अघोरपंथी साहसादि कर्मे करणारा, स्नान सन्ध्यादि आचार न पाळता अव्यवस्थितपणें वागणारा ' राखेचा बोकाणा तोंडात भरून मेल्यासारखा पडतो, तिळाची पेंड कुजविली म्हणजे तिची विष्ठेसारखी घाण येते, ही नक्ली विष्ठा खाण्याची भीति घालून अघोरी पैसे उकळतो '–गाव १३३ २ तिरस्करणीय, निंद्य, त्याज्य भयंकर, दुष्ट, साहसी, अमंगळ [स अघोर ]

**अचकट, अचकटविचकट**—वि अश्लील, वाईट, घाणे रडे, वाह्यात, बीभत्स, शिनळ, चावट(भाषण, भाषण करणारा) ०उच्चारणें—अपशब्द, अश्लील वाक्यें उच्चारणें, जननेंद्रियावरून शिव्या देणें [स विच्=निराळें करणें, म विचकट द्वि ]

**अचकबोचक**—स्त्री गैरपद्धतीनें, अस्ताव्यस्तपणें, क्सेंतरी, अधूनमधून घेणें–उपटणें ( शतातील गवत वगैरे ) [बोचक द्वि ]

**अचकबोचक, अचकवचक**—क्रिवि अव्यवस्थितपणें, क्सेंतरी, अस्ताव्यस्त ( गवत काढणें घास घेणें ) शिवाय अचट वाचक पहा [बोचक वचक द्वि ]

**अचकय**—क्रिवि (गो ) अजगय हळच, नकळत [स अ+ जागृ म अजाग]

**अचकलदचकल**—न (व ) कोणतेंहि, वाईट, जाडेंभरडें अन्न, कांहींतरी अयोग्य खाद्य 'अचकलदचकल तुला पचणार नाहीं ' [अचकळ किंवा अचकुल द्वि ? ]

**अचकलेंविचकलें**—अचकलेंविचकलें पहा

**अचकळ**—वि पाणचट, पाचकळ [स अधं+कला ? ]

**अचकाविचका**—पु गाधळ, गुंतागुंत, चिवडाचिवड, अव्य वस्थितपणा (ल ) नाश, बिघाड, दुर्दशा विचका पहा [विचका द्वि ]

**अचकागचका**—पु १ अपस्मार, फेंफरें वगैरेंत शरीराला बसणारा हिसका २ एकाएकीं चमकीनें ओढणें, ढकलणें, टोसा देणें, धक्का मारणें (क्रि० देणें) ३ धसका, दहशत (क्रि० बसणें) ०खाण–बोलण्यात अडखळणें [अचका+गचका स आ+कृष्, प्रा अच्च, का अच्चग=घाबरें होणें द्वि ]

**अचकी**—स्त्री उचकी किंवा उचकी पहा (क्रि० देणें– येणें ).

**अचकी**–वि सर्व संपूर्ण असगी ठेवलीस (अचकी) अचकी रदनाग्रीं। '–गगावि ४६ [स आसाम म असगा–गी ]

**अचकुल**—वि (व ) १ नाजुक, हळुवार २ अशक्त, पुसका, राबून द्ररूड निरुपयोगी क्षुद्रकामी ( इंद्रिय, अंग, यंत्र वगैरे ) ३ मोडलेला, दुखावलेला नष्ट पशु [स अधिकरण ? ]

**अचंगळ**—वि कृपण भ्रष्ट वाईट चांगला नव्हे ता [अ+का चांगु=अंगे ? ]

**अचंचल**—वि १ न चळणारा न हलणारा दृढ स्थिर २ न बदलणारा, ठाम निश्चयाचा निश्चळ [स ]

दावो १. ३

**अचटबोचट**—क्रिवि कमीजास्त, विषम, अर्धमुर्ध, एकसारखें नव्हे उचसखल रीतीनें (कापणें, झाडणें, सारवणें, लावणें) अर्थेकवाचक पहा [ध्व ]

**अचडेंबचडें अचडंबचडं, अचडुबचडु**—न १ लाडकें मूल २ लाडें संबोधन, छबेला ! छबेली ! ' अचडुबचडु नामें आळ विरा ।' –अमृतक ५९, 'मास अचड ग बचड ! छकड ! ग ! ।' [स वत्स, प्रा वच्छ बच्च वच्च+ड द्वि बछड बचड द्वि ]

**अचतुर**—वि अकुशल बावळट, अडाणी, निर्बुद्ध, मंद [स]

**अचपळ**—वि १ खोडकर, उत्पाती चपळ 'अचपळ मन माझें नावर आवरीतां ।'–रा २ चपळ, तरतरीत उत्साही, हुषार ' अचपळ युग मृगीं बैसली प्रीति दृगीं ।' –दावि १५४ [स अ+चपल] ०पण–न खोडयाळपणा चपलपणा ' भरारी तो वारा अचपळपणें देश विकनी ।' –दावि २०९

**अचव**—पु घोडयाचा एक रंग –अश्वप २८.

**अचंबा**—पु १ आश्चर्य चमत्कार कौतुक, नवल २ आश्चर्याची गोष्ट नवलपरी [स अत्यद्भुत प्रा अच्चब्भुय–अचवअ–अचवा, हिं अचभा गु अचवो]

**अचंबीत**—वि आश्चर्यचकित विस्मित, थक्क –क्रिवि अचानक, एकाएकीं [ अचवा ]

**अचर**—वि स्थिर स्तब्ध, गतिरहित, अटळ, स्थावर [स अ+चर ]

**अचरट**—वि (मूळ आचारांचें जास्त स्तोम माजविणारा यावरून) वाह्यात भलतेंसलतें अज्ञातद्वा अयोग्य अनन्वित (भाषण, बोलणारा) ब्रात्य अर्वाचर बावळट मूर्खासारखें वर्तन करणारा 'बहिरें ऐके तरें (अळवाची भाजी) आजि अचरट मातें सांभारें ' [स आचारवत् किंवा अ=नाहीं+चर्=द्वाट=रानें ? ]

**अचरटपचरट**—वि १ कोरडें भरड रुक्ष वचव (अन्न) २ असंबद्ध पाल्हाळिक अमिश्र (भाषण बोलणारा) अरबटचरबट पहा [अचरट द्वि ]

**अचरा (च) चर**—अचरटपचरट पहा [ध्व ]

**अचर्च**—वि १ चर्चेचा–वादाचा विषय होऊ शकत नाहीं असा 'देवीं दवो म्हणती अचर्च तें ।' –ज्ञा ४ ६९ –पु (ल) नवरा (बायकोनें त्याचें नाव घेता किंवा चर्चा करिता कामा नये म्हणून) –मनको [स अ+चर्च् ]

**अचल**—वि १ स्थिर गतिरहित 'अचलु हा शाश्वत ।' –ज्ञा २ १४७ २ अभय अखंड 'बधु अचलिचें राज्य करितीं ।' –वगा ६६ ३ शांत थंड, अचंचल दमदार निश्चित हेतु असलेला –पु पर्वत टेकडी 'तें पापाचा अचलु पिटे ।' –ज्ञा ४ ५६ [स अ+चल] ०तारा–पु स्थिर तारका ०स्वर–पु (संगीत) आपल्या जागेवरून न ढळणारा (खालीवर न होणारा) स्वर हे दोन आहेत षड्ज व पंचम

**अचला**—पु हातरुमाल अचळ पहा [स अचल]

**अचला**—स्त्री पृथ्वी 'कपात भीष्मार्जुन दंतीं अचळेसि शत्रुगणातें ।'–मोभीष्म ३ ३० [स] ०गौर–स्त्री मकरसंक्रातीच्या दिवशीं बायका एका बाईस आसनावर बसवून तिला खाऊ पिऊ घालतात, मुळींच हालू देत नाहींत ती बाई

**अचलित**—वि स्थिर, स्थावर, ठाम, निश्चल, न हल्लेलें [स]

**अचळ**—वि १ अचल पहा २ न शिवलेला, न हालेला किंवा हालविलेला, उपयोग न कलेला, अस्पृष्ट(खाण्याचा पदार्थ इ) ३ (ल ) अक्षय थारी, शिल्लक –क्रिवि अलगत, अधांतर, दमानें, हळूहळू 'हे तोंगतोंड भाजें झालें आहे अचळ उचलून ठेव ' [स अचल]

**अचल, अचळ**—पु १ पदर, ओंचा 'नाहीं अचल सावरावा ठाव ।' –तुगा १११ 'लपविला छगन, अचळ पल्व मुखावरी घाली ।' –भज ३५ २ अचूळ आचूळ, स्तन, थान (गुराचें) ३ बारीक वस्त्र, हातरुमाल ' सर्वेचि निर्मळा आचळें दाटिल । सेवक जनीं ॥' –ऋ ८४ [स अचल]

**अचळपद**—न. अटळपद, मोक्ष [स ]

**अचळय**—क्रिवि (गो ) १अलगत, धक्का न लावतां २ (ल) सहज, कष्ट न पडता, अनायासानें 'ताका गिरेंस्तकाय अचळय मेळ्ळी ' [स अचल]

**अचळवी**—वि १ अचल, अचळ पहा ०वाण–नस्त्र सर्व तीला निर्वी सर्व मुलें जिवत आहेत अशा सुवासिनीस आधल्या दिवशीं विरजून ठेवलेलें व हात न लावलेलें असें दहीं पानासुद्धां, स्वत च्या मुलाच्या दीर्घायुष्यासाठीं वाण म्हणून देतात तें [स अचल+वायन ]

**अचळागौर**—स्त्री अचळवी वाण जिला यावयाचें ती तिची न्हाऊखाऊ घालून ओटी भरून पूजा करतात

**अचळाजी, अचळोवा**—पु आळशी मंद मद्द, लड्ड ऐदी लड्डू गुळाचा गणपति [स अचल]

**अचक्षु**—वि ज्याला डोळे नाहींत असा अधळा[स] ०दर्शन–न डोळे सोडून बाकीच्या इंद्रियांनीं व मनानें होणारें ज्ञान ०पण–न चक्षुरहित स्थिति अधत्व आधळेपणा 'जयाचेनि बळें । अचक्षुपण आधळें ॥ फिगानि वस्तु मिळे ।' –अमृ ७ १२०

**अचांगणें**—अक्रि उमेद हरारी वाढ नाहींशी होणें, कोमजणें, वाळणें अचांगी भरणें, आजारी होणें [ अ+का चांग ]

**अचागळी**—वि उणें, वाईट ' अचागळी अधिक शब्द। ऐवु उठिला वीर गद ॥ ' –एरुस्व ९ ४ [ अचगळ ]

**अचांगी**—स्त्री आजार दुर्बलता त्रास ०भरणें–होणें आजारी पडणें ' अचांगी भरली पोर मेला ' ०नें शिवी देणें बोलणें–तोंडानें वाईट बोलणें, शिव्या देणें [ अ+फा चांग ]

**अचांचल्य**—न स्थिरपणा, निश्चितपणा, अचलता [ स ]

**अचाट**—वि फार, अतिशय, विलक्षण, अफाट, लोकोत्तर, बेसुमार, अपरिमित, अतर्क्य, चमत्कारिक, फाजील, अनिर्बद्ध 'ते दोन्ही शब्द अचाट।'–ज्ञा १ १४७, 'लाटावरी अचाटलाटा।'–एभा २ ५४, 'रत्नमुक्तमाणीक राशी। शृंगारादि अचाट।'–नव ११ १०३, (क्रि० बोलणें, लिहिणें, करणें) शब्द० १ अचाट खाणें मसणात जाणें, २ अचाट बुद्धि खेळवावी बळेंच लक्ष्मी मेळवावी [स अत्यर्थ, प्रा अच्चत्थ अच्चट्ट–अचाट]

**अचाट**—वि चावट, फाजील, लुच्चा 'केलीं मुलें हीं अवघीं अचाटें।'–सारु१ ६७ [स अ+चाट=लबाड]

**अचानक**—क्रिवि १ एकदम अकल्पितपणें 'अचानक गनीम येऊन पडला' २ तडक, सरळ, विनहरकत 'त्या मार्गानें अचानक पुण्यास जाशील' ३ हळूच शब्द 'ही काचेची हंडी अचानक उचलून ठेव' ४ सहज, अनायासानें हा ग्रंथ मला अचानक मिळाला' ५ चोरून, गुप्तपणें 'हा कांहीं कांहीं अचानक खातोसें दिसतें' ६ अस्पृष्ट, अचळ, जशाच्या तशा, कमजास्त न होता याशिवाय या शब्दाचे आणखी बरेच शिथिलार्थ झालेले अर्थभेद आहेत [स अज्ञात ? हिं अचानक, अचानचक ]

**अचापल्य**—न स्थिरता, दृढता, अचचलता, सततपणा [स ]

**अचार**—पु आचार, लोणचें [ हिं गु आचार]

**अचाल**—स्त्री खोटी, खोळंबा, अडचण 'तुम्हीं अचाल असल्यास दोन दिवस माझी घोडी घेऊन जा' [अ+चाल=प्रगति]

**अचाव(वा)चा, अच्यावच्या**—क्रिवि १ बोलण्यास अयोग्य, निरर्थक, असंबद्ध, अद्वातद्वा, अचकटविचकट (भाषण) २ गैरशिस्त, एदीपणानें ( काम करणें ) ३ अव्यवस्थित कमीतरी 'तो अचावचा खातो' [ ध्व स अवाच्य+वाच्य ]

**अचिकित्सनीय**—वि असाध्य, उपायाबाहेर गेलेला ( रोग इ० ) [ स ]

**अचिंत**—वि चितारहित, काळजी नसलेला 'जैं अचिंता अनाथाचें मायपोट।'–ज्ञा ८ १९८ [स अ+चिंत्=विचार करणें]

**अचिंतित**—वि अकल्पित, ज्याचा विचार मनानेंहि आला नाहीं असें, अतर्कित, अभावित [ स ]

**अचिन्त्य**—वि विचाराच्या-कल्पनेच्या पलीकडील अतर्क्य 'हेतु जया विह। अचिंत्य जें।'–ज्ञा ८ ८८ [ स ]

**अचिद्**—न चेतना नसलेलें, जड (वस्तु, जग इ०) अज्ञान 'अचिदातेंनि नाशें। आलें जें चिन्मात्रशेषें।'–अनु ०२९ [स ]

**अचिन्ह**—न (गो ) दुश्चिन्ह, अशुभ गोष्ट [ म ]

**अचिर-अचिरात्**—क्रिवि अविलंबन लवकर, थोड्या वेळाने दिवसांत, थोड्या अवधीनें 'गुरुपरदाय कांहीं न पवे अचिरें।'–आगु ७१ [स ] ०काळ-पु थोडा अवधि वेळ ०स्थायी-वि लवकर नाश पावणारें, अल्पकालीन, क्षणभंगुर, पळपुटें, न टिकणारें **अचिरेंकरून**-क्रिवि लवकरच

**अचिरकाय**—स्त्री ( गो ) १ अवधान 'म्हाका तितलीशी अ० उरी ना' २ आठवण 'हावें तितली अ० घडी ना'

**अचीपची**—स्त्री ( गो ) सागरगोट्याप्रमाणें दगड झेलून खेळावयाचा एक खेळ, हा पाचसात खडयांनीं खेळतात [ स पच, पची द्वि ]

**अचुक**—अचूक पहा

**अचुंगळ**—वि अचगळ पहा

**अचुंबित**—वि १ नवीन, साजूक 'विशेष भक्तिप्रेम अचुंबित।' –एभा ११ ६८१, अचुंबित कल्पना गोष्ट=अगदीं नवीन कल्पना गोष्ट २ अपूर्व, अद्भुत 'पुढें अचुंबित निरूपण।'–एभा १० ४१३ ३ अचुक 'जो परिणामींचा निर्वाळा। अचुंबितु ये फळा।' –ज्ञा ५ ७ ४ स्पर्श न झालेलें, अस्पृष्ट 'जैसें वज्रकवच लेइजे। मग शस्त्राचा वर्षावो साहिजे। परी जैनेंसीं उरिजे। अचुंबिता।'–ज्ञा २ २३२ ५ निर्मळ, निर्लेप 'तें ज्ञान पावे निश्चित। जयामाजि अचुंबित। शांति असे॥' –ज्ञा ४ १८९ ६ निर्मळ 'तेणें श्रीकृष्णें स्तविली भक्ती। परम प्रीती अचुंबित॥'–एभा १९ ६४९ ७ सर्व, अगणित 'तुझ्या विभूती अचुंबिता। कृपेनें सांग॥'–एभा १६ २३४ ८ अनासक्त, निसंग 'परी अचुंबित वर्तणें। अचटमान कर्म करणें॥' –एभा ३ २९३ [ स अ+चुंबित=न चुंबिलेली, न भोगिलेली ]

**अचुंबित**—क्रिवि ( कों ) अकस्मात, अचंबीत [ अचंबा ]

**अचूक**—वि नेमकें, विनचूक, दोषरहित, निर्दोष 'अचुक येतल करवेना। म्हणून केलें तें सजेना।'–दा १० ७ ६ [स अच्युत, प्रा अचुक] ०संधान-न १ न चुकणारा नेम, क्रिया, गोष्ट 'अचुक मारुतीनें संधान। साहिता झाला असंख्य बाण॥' २ बरोबर घडणारा बेत, न चुकणारी सल्ला, मसलत **अचुकसंधानी**-वि बिनचूक कार्य करणारा

**अचेत**—वि अचेतन जड, चैतन्यरहित अचेत लोहधुर्वे चळे।'–एभा २ ७०० [ सं अचेतस् ]

**अचेतन**—वि १ निर्जीव, प्राणरहित, मृत, जड 'यांव सूत्रीं। अचेतन पुतळ्या नाचती यथीं।'–एरुस्व १३ ६४ २ बेशुद्ध मूर्च्छित [ स ] ०भार-(स्था ) निर्जीव वजन ( हेड लोड, पुस्तकें वगैरे )

**अचेए**—न ( पदा ) वातावरणांतील वायुघटकापैकीं एक मूलद्रव्य 'अर्गान'' –ज्ञाको अ ६१. [ सं ]

**अचैतन्य**—न बेशुद्धि, निर्बुद्धि, मूर्च्छा, निरुत्साहीपणा [सं]

**अचोज**—न आश्चर्य, नवल 'अचोज हा ब्रविया झाला। –निगा १६ [ स आ+चोद्य, प्रा. चोज्ज, म चोज ]

**अचोप्य**—वि चोखण्यास अयोग्य-अशक्य, अप्राशनीय [स]

**अच्कलेंविच्कलें**—क्रिवि १ अचक्टविचक्ट अव्यवस्थित, वाघात 'किती येक तीं अच्कलेंविच्कलेसी।'—दावि २८४ २ अचकुल पहा [विचकणें-विचकल द्वि किंवा अचकल द्वि]

**अचुकित**—क्रिवि (गो) अवस्मात, अकल्पितपणें 'म्हाका तों अचुकित वाटेर मेळ्ळॉ' [अवचित ?]

**अच्चावच्चा**—अचावचा पहा

**अच्छ**—वि १ विमल, स्वच्छ 'बहुधा समर्पिला बहु जन्म श्री राम अच्छविभवानें।'—मोभीष्म ३ ६४ [स] २ श्रेष्ठ, उत्कृष्ट, उत्तम —उद्गा ठीक! बरोबर! बरें! [हिं अच्छा]

**अच्छा**—क्रिवि (चि) अलीकडे, हल्लीं, आतांशां [आतांशां अप]

**अच्छा**—वि १ छान, सुंदर चांगलें —उद्गा उत्तम, बरें! ठीक! होय [स अच्छ, हिं]

**अच्छिद्र**—वि १ भोंकाशिवाय, व्यंगरहित २ पूर्ण [स]

**अच्छिन्न**—वि अखंड, सबंध न कापलेलें-विभागलेलें [सं]

**अच्छेखा, अच्छेखान**—वि (व ना) तिस्मारखान टेंभोजी (प्रमाणें), वरिष्ठ, मोठा 'तू नाहीं मोठा अच्छेखा आला त (तर) मी डरत नाहीं' [हिं अच्छा]

**अच्छेर**—पु अर्धाशेर (वजनी मापी) [स अर्ध+शेर, फा अध्=अर्धा] ०**पावशेर**—पु अव (कु) कच्चींवच्चीं

**अच्छेव**—पु (गो) उच्छाद, धामधूमिंगा, हैदोस, धुडगूस 'ह्या भुरग्याचे सामकों अच्छेव आयला!' [स उच्छेद]

**अच्युत**—पु १ परमेश्वर (विष्णु) —वि न पडणारा न ढळणारा, स्थिर अचल नाशरहित जसें अच्युतपदवी, अच्युताधिकार 'अच्चुतु मी अच्युतु।'—ज्ञा १८ ११५४ [स] ०**फळ**—न आंबा (फळ) [स चूतफल]

**अछंदस्क**—वि कवितावद्ध नसलेला (गद्य) [स]

**अछोडा**—पु (गु) कासरा (बैलाचा) दार, काढणी, चाबूक [प्रा अच्छोडिअ—अछोड म अगोड]

**अज**—वि अनादि नित्य जन्मरहित 'मीं अजुही परि संभवें। प्रकृतियोगें।'—ज्ञा ४ ४४ —पु १ ब्रह्मदेव शिव विष्णु चंद्र, कामदेव, सामान्यत ईश्वर २ श्रीरामाचा आजा ३ बोकड, बकरा [स अ+जन्=जन्मणें]

**अज**—शअ १ पासून, मुळें कडून २ अनेक सदरें वेगळाली व्हावीं आणि वेरजांचा ताळा पडावा म्हणून सदरवार वेरजांच्या एकंदर वेरजेची जी पंक्ति मांडतात ती [फा अज्]

**अज**—आज पहा

**अजकदीम**—क्रिवि पूर्वीपासून 'अजकदीम इनायत असे'—वाडमा १ ६५ [फा अज्+अर करीम=प्राचीन, जुना]

**अजक्रा**—वि अविक्रय (?) —शर [स अक्रय]

**अजंगम**—वि स्थावर, न हलणारें (घर, झाड इ०) 'अजंगमाची खाल काढविली।'—ज्ञा १३ २२७ [स]

**अजगय**—क्रिवि (गो) इतुवं, नक्कत [स अ+आए]

**अजगर**—पु एक प्रचंड साप, (कों) आर ह्या बकरीलाहि गिळतो म्हणतात म्हणून अज+गर (गिळ) हें नाव ह्या हिंदुस्थान, आफ्रिकेंतील दलदलीचे प्रदेश व अमेरिकेंतील उष्ण प्रदेशांत आढळतो ह्या फार सुस्त व हालचालीस मंद असतो विशेषत अमेरिकेंत १०० फूट लांबीचाहि आढळतो [स] —वि १ (ल) सुख दु खातीत (योगी) कर्मासंबंधीं कोहीं प्रयत्न न करणारा, केवळ ईश्वरावर भरवसा टेवणारा २ आळशी, मंद, जड ०अजगरस्वभाव—प्रकृति चाल-संप्रदाय, अजगरासारखा पडणें पसरणें निजणें चालणें पोसणें ०**वृत्ति**—स्त्री आपोआप येऊन पडलेली भिक्षा (खाण्याची) वृत्ति, आळशीपणाची वृत्ति, आळशीपणा, अंगातुकी करण्याचा स्वभाव, एदीपणा

**अजगूल**—वि (कों) १ अधू नजरेचा २ अचकुल पहा [अचकुल]

**अजगे**—क्रिवि (गो) वाजवीपेक्षा अधिक 'तुजेकडेन अजगें आसल्यार दी म्हाका'

**अजज**—पु घोड्याच्या पायाचा (खुराचा) रोग —अश्वप २७२

**अजंट**—वि (ना) अस्सल अस्सल, लफंगा, लबाड [हिं अजड=पूर्णपणें तयार]

**अजड**—वि १ चैतन्ययुक्त, जडच्या उलट 'तो जडाजडातें विरवितु।'—ज्ञा ८ ५७ २ मंद, मूर्ख नव्हे तो [स]

**अजडाश**—पु जडपणा नसणारा, पदार्थ, गोष्ट इ०, अमूर्त, निराकार वस्तु (ब्रह्म, आत्मा इ० संबंधीं योजतात) [स]

**अजतरफ-अजतर्फे**—शअ पासून, कडून, बाजूनें (जुन्या पत्रव्यवहारांत वरिष्ठाकडून खालील अधिकाऱ्यास योजितात)—पया ४०० [फा अज़्+तरफ़्]

**अजन्म-न्मा**—वि १ न जन्मलेला, ज्यास जन्म नाहीं असा (ल०) ब्रह्म, ईश्वर 'अजन्मा होता निजेला।'—दा २ शाश्वत, निरंतरचा [स]

**अजप**—अजव पहा

**अजपत्र**—न. अभिप्रायपत्र (?) —शर

**अजपा (जप)**—पु १ एका अहोरात्रांत माणसाचे २१६०० श्वासोच्छ्वास होतात त्यावर 'सोऽहं' हें बसवून जो सहज, आयासविरहित जप करावयाचा तो श्वासाबरोबर 'स' व उच्छ्वासाबरोबर 'अहं' (तें ब्रह्म मी आहें) म्हणावयाचें याला हंसमंत्र असेंहि म्हणतात येकवीस सहस्र स्वासें जपा। नेमून गेली ते अजपा।—दा १७ ५ १ (सामान्यत) श्वासोच्छ्वास 'पवन विजितसे अजि

पाल्वे । मृदु असू गतिनें अजपा ल्वे।' —मगधा—मक १६१ [स] ०गायत्री स्त्री, ०मंत्र—पु वरील जपालाच म्हणतात

**अजपूजाश्रीसरस्वती**—स्त्री श्रीसरस्वतीच्या पूजामंदिरांतून, (विजापूरचा दुसरा इब्राहीम आदिलशहा हा हिंदुधर्माला मान देणारा असून त्याला हिंदी गायनाची फार आवड होती व त्यासाठीं त्यानें राजवाड्यात सरस्वतीची मूर्ति स्थापिली होती त्या सरस्वतीच्या मंदिरात त्यानें राज्यकारभाराची कचेरी करून तेथून तो सर्व बाद शाही फर्मानें काढी म्हणून असल्या फर्मानाच्या डोक्यावर विवा समासात 'अजपूजा श्रीसरस्वती' हीं अक्षरें लिहिलीं जात)—भाद्वि सा ५१, ६८

**अजब**—वि आश्चर्यकारक, विलक्षण, चमत्कारिक उ —अजब ख्याल, अजब तऱ्हा इ० 'कल्पनाशक्तीनें कांहीं तरी दरखवी अजब चिजा काढल्याशिवाय आमच्या पाश्चात्याना चैन पडत नाहीं' —नि ४१६ [अर अजब] ०खाना—पु पदार्थसंग्रहालय म्युझियम, चमत्कारसंग्रह

**अजबाई**—स्त्री नवल, आश्चर्य चमत्कार अलौकिकपणा [अर अजब, हिं अजाइब]

**अजबाब, अज्बाब**—पु स्त्री १ मालमत्ता, जमीनजुमला, सामानसुमान, चीजवस्त, बरोबरचा सरजाम —शिदि २४७ 'जुन्या कमिटीकडून अजबाब सोंपून घेण्याचें काम सुरू होऊन तें सन १८८६ सालीं पुरें झालें' —जनि ३ २ युद्धसाहित्य युद्धसामुग्री असबाब पहा

**अजबायेस**—शब कारणानें 'अजबायेस बिमारी'=आजार-मुळें —पदमव ११४ [फा अज्+अर बाईस=कारण]

**अजबुनात-द-दी**—वि प्राचीन 'बाछाई तक्त दिल्ली अज बुनात जागा।'—पला ९ [फा अज्+बुनयाद=स्थापना, प्रारंभ]

**अजम**—वि १ श्रेष्ठ, थोर सन्मान्य राजश्री, पदवी (विशे षत मुसल्मान आणि ब्रिटिश लोक याना) 'अज्जम चापलेनसाहेब यांणीं' —मुव २३६ मुसल्मानी आणि पेशवाईंतील पत्रव्यवहारात कनिष्ठाकडून वरिष्ठास हा शब्द लाविला जात असे 'अजम अफझल खान महमदशाही' परंतु इग्रजी अमदानींत हा कनिष्ठास लावतात 'अजम पाटील कुळकर्णी' [अर अज्म् तु० —स अदेमन्=सूर्य श्रेष्ठ प्रा अज्जम—अजम ?] —पु १ सामर्थ्य जोर अभिमान २ निश्चय, विचार 'ऐसा समयास नवाब मौसुफ यानीं अजम केल्यास पातशाही दाब व बहुत कामें पडून देतील' —दिमरा १ ४९

अजमत—स्त्री व स्त्री, श्रेष्ठता, प्रभाव मोठेपणा प्रामाण्य करामत 'कांहीं एक अजमत दाव मना।'—भाअ १० म्ह० जेथें अजमत तेथें करामत [अर अज्मत्]. ०खान-पीर-पु जेजुरीची देवता, एकदां औरंगजेबानें जेजुरीचा खंडोबा फाडण्याचा प्रयत्न केला त्यावशीं असख्य भुंगे त्याच्या पाठीस लागल तेव्हां त्यानें एक रत्नजडित भुगा करून खंडोबास वाहिला तो भुगा पुढें उमाजी नाइकानें नेला, अशी आख्यायिका आहे

**अजमाव-वा**—पु १ प्रयोग, परीक्षा, कसोटी २ अजमास, अदाज हिशेब, गणती [फा अज्माइश्] —णें सक्रि १ प्रयत्न करणें, परीक्षा करणें 'शमनापरी समर्थ अजमाविलो' —सप्र ८ ३ ७३ २ अजमास पाहणें, हिशेब करणें, अदाज करणें

**अजमास, अज्मास**—पु (गो) १ अजमाव पहा 'अजमास घे आणि मागेपुढें सर' २ सालाची जमावदींनी ठराविक रकम, बजेट, जमाखर्चे अदाजपत्रकाचा तक्ता मामलेदारानें आपल्या ताब्यात जो प्रात आहे त्याचा वसूल कोणत्या रीतीनें करावा व दर एक गावची कमाल बेरीज किती व प्रातापैकीं दुमाले गाव किती व नक्त खर्च किती याविशीं वधारण करून जो कागद दरसाल हुजूर तयार होऊन मामलेदाराकडे पाठवीत त्यास अजमास म्हणतात— इनाम ५० —चित्रगुप्त ८८, —खरे २८१६ —पया ९१ [फा अज्माइश्, गु आजमायप] ०णें—उक्रि अदाज करणें, कल्पना बांधणें अजमासानें खोगीर खाणें—(क) अनुमानानें विधान करणें. अजमास पंचे दाहोदर्शे =अदाजी विधान

**अजमासी**—वि १ अदाजी, हिशेब करून काढलेला, गणती केलेला २ (गो) अदाज करण्यात हुशार, पटाईत 'अजमासी खरो केनाच चुकचोना'=बरोबर सागेल कधीं चुकणार नाहीं अजमासें—क्रिवि सरासरी [फा अज्माइश्]

**अजमेरीजोडा**—पु विशिष्ट मारवाडी जोडा, साधी घडण —घाट असलेला जोडा [अजमीर]

**अजमोदल**—न ओंव्याचें तेल, थायमॉल हें गजकर्ण, इसब वगैरेवर लावतात [अजमोदा]

**अजमोदा**—पु १ (या नावाच्या तीन वेगळ्या वनस्पती आहेत सामान्यत) ओंवा, ओंव्याचें झाड अगर त्याचा एक प्रकार, यास पाढऱ्या रंगाचीं फुलें येतात पान्डुरी, गजकर्ण, अतिसार, अजीर्ण वगैरेवर औषध म्हणून उपयोग —वगु १ ८ [स अज मादा हिं गु अजमाद क अज्मूद—अज्मोदा का अजमोदा, ते आजमौदा]

**अजय्य**—वि अजिक्य [स]

**अजर**—वि शाश्वत वृद्धपणा येत नाहीं असा, अविनाशी, क्षय न पावणारा ज्यास जरा प्राप्त होत नाहीं असा —देव [स]

**अजरख्तखानें**—क्रिवि. यांच्याकडून, यांच्या कचेरींतून [फा अज्=पासून+रख्तखाना=कचेरी+दे]

**अजरामर**—वि. अविनाशी, जरा व मृत्यू यांपासून अलिप्त, अमय [स अजर+अमर]

**अजरामरा (म्हा) मत्**—अमामन्दामत पहा

**अजरये**—अजूय पहा

**अजवला**—पु. काळी तुळस, वैनयती

**अजवस्त्र**—(वायकी) अजत्र पहा

**अजवान**—अजमोदा पहा [ हिं.अजवाइन ]

**अजशृंगी**—स्त्री. मेंढशिंगी, मेषशृंगी, काकडशिंगी, सह्याद्रि भागात ही वनस्पति आढळते रस दुधासारखा, कफ बाहेर काढणारी. [स ]

**अजसबब**—शअ. कारणानें 'अजसबब दूरीराह' =रस्त्याच्या लांबीमुळें. -पसमव ११२ [फा अज्+सबब्]

**अजस्र (स्त्र), अजास्त्र**—वि (ल )मोठा, विस्तृत, प्रचंड, जंगी, धिप्पाड, राक्षसी -पु अग्निहोत्राचा एक प्रकार ( यात तिन्ही कुंडातले अग्नि कायम ठेवतात-अजस्रपथ ) [स अजस्र= सतत, कायम निरंतर, शाश्वत ]

**अजस्रलय**—स्त्री. नृत्यातील माटी स्वदारी [स ]

**अजहत्**—पु प्रतिनिधि, गुमास्ता [अर वजाहत्=रूप, आदर] ०**दार**–पु बदली कामगार [फा] ०**सरदेशमुख**–सरदेशमुखाचा प्रतिनिधि ( मराठी राज्याचे व मुसलमानी राज्याचेहि सरदेशमुख छत्रपति होते त्यांनीं आपल्यातर्फे नेमलेला प्रतिनिधि )

**अजहत्स्वार्थलक्षणा, अजहल्लक्षणा**—स्त्री पदाचा जो शक्य अर्थ त्याचा त्याग न करता त्याहून काहीं अधिक विशेषार्थ घेतलेला असतो ती लक्षणा उ० 'पानपतावर एक लाख बांगडी फुटली '=एक लाख माणसें मेलीं, 'एक कप आण' =एक कपभर चहा आण, 'कावळ्यापासून दहीं रक्षण कर'=कावळे, मांजर वगैरे पासून, 'दोनशें भाले आले' इ० [स ]

**अजा**—स्त्री. १ शेळी बकरी २ माया, मोह भास 'अजाची ते अजामाया।' -एभा ७ ५८६ [स ] ०**कृपाणीयन्याय**–पु. शेळी जावयास व तिच्यावर तरवार पडण्यास एकच गाठ पडणें यावरून डाक्यावर तरवार लागली असता अथवा अगतिक अवस्था असेल तेव्हा योजितात वर्तमानपत्र–कर्त्याच्या डोक्यावर प्रेस–ॲक्टाची तरवार अजा–कृपाणीयन्यायानें टांगली आहे ' ०**ग (ल) ळ**–वि. १ बावळा, कर्तृत्वहीन मूर्ख [स अजा गल] २ निराधार निरर्थक ०**गळस्तन**–न ( शेळीच्या गळ्याजवळचा मांसल अवयव, याचा उपयोग नसतो म्हणून लक्षणेनें ) कर्तृत्वहीन, कुचकामाचा पुरुष, बैल इ० 'धर्मार्थ काममोक्षाणां यस्यैकोपि न विद्यते । अजागलस्तनस्यैव तस्य जन्म निरर्थकम् ॥' -सुभाषित ०**पुत्र**–पु. १ बोकड २ (ल ) गरीब माणूस 'अजापुत्रं बलिं दद्यात्=यज्ञात बोकडासच बळी देतात, तद्वतच गरीब निराश्रित माणसास लोक छळतात [स ] ०**पालक**–पु. १ धनगर २ मल्हारराव होळकर व त्याचे वंशज याना जुन्या कागदपत्रांतून लक्षणेनें हा शब्द लावितात [म ] ०**युद्ध**–न. बकरीं फार वेळ भांडत नाहींत तुमता आव आणतात, त्यावरून लक्षणेनें पोकळ धमकी -भांडण [स ]

**अजा**—पु. आईचा–बापाचा–बाप, आजा 'अज्यास नातू शिकवितो' [स आर्य, प्रा अज्ज] ०**गुरु**–पु गुरूचा गुरु, शिक्षकाचा शिक्षक

**अजाइब, अजायब**—पु. आश्चर्य, अजब पहा 'तुम्ही ऐसा गोष्टी करिता अज्याइब आहे' -रा १ ५२ [अर अजाइब् ]

**अजागळी**—स्त्री. मनस्वी खोडया, दाढगाई धिंगाणा, अर वाळी [स अजागल? प्रा अजुअ=अजुत+आवाली? ]

**अजाण**—वि १ अडाणी, नेणता, माहिती नसलेला, अन भ्यस्त २ उपकाराची जाणीव नसलेला, कृतघ्न, हराम ३ विचार न करणारा, मूर्ख, बुद्धिहीन [स अज्ञान, प्रा अजाण] ०**ता**–वि साधाभोळा, बावळा, मूर्ख ०**पणा**–पु अज्ञान, नेणतेपणा

**अजात**—वि १ उत्पन्न न झालेला, जन्म न पावलेला. काहीं सामा शब्द -अजातदंत–पर्ण–पुत्र–यौवन [स अ+जात]. ०**पक्ष**–वि पक्ष न फुटलेला 'जैसी अजातपक्षाचेनि जीवें । पक्षिणी निय ॥' -ज्ञा ६ ३३९ [स अजात+पक्ष] ०**भय**–वि कशाचीहि भीति शिवली नाहीं असा–माणूस काहीं सामा शब्द -अजात काम–क्रोध–लोभ–मोह–मद–मत्सर इ० ०**व्यवहार**–पु वयात न आलेला मुलगा, अज्ञान [स ]. ०**शत्रु**–वि १ ज्याला कोणी शत्रु नाहीं असा, शत्रुरहित, सात्त्विक २ गरीब, निरपराधी ३ पु युधिष्ठिर 'यजमानहि गुरुदेव द्विजभक्त अजातशत्रु तसाया।' -मोमभा २ २१ [स ] ०**सिद्ध**–वि स्वयंसिद्ध, स्वयंभु

**अजात**—वि १ अज्ञात जन्माचा किंवा ज्याच्या जन्माचा ठिकाण लागत नाहीं असा, अकुलीन, वाईट लौकिकाचा २ (व ) मोठा लुच्चा 'अजात दिसते स्वारी!' [स अज्ञात ]

**अजात**—वि मुक्त, स्वतंत्र 'तुम्हास माथां तळ घालोन अजात करूं असे ' -वाशाछ २१३ -क्रिवि अवाद, अलगत, कोठें किंवा कशाला न लागता [फा आझाद् ] ०**पत्र**–न मुक्तिपत्र, मोकळें केल्याचा दाखला

**अजातप्रकार**—न जेथें जातिभेद पाळीत नाहींत असा आचार, वागणूक पद्धति ( तुळजापूर, व्यंकटगिरि वगैरे ठिकाणीं असतो तसा) [स अ+जाति+प्रकार]

**अजाति**—वि १ जातिरहित, कुलहीन हा तों दिसे कृष्ण स्वयें अजाति।' -नरा २ ५७ २ वर्णातीत, कोणत्याहि वर्गात घालतां येत नाहीं असा 'तें वीर अनाम अजाती । परी अविद्या वर्गाचिय रातीं–। मार्गीं बोलावया श्रुती । खूण केली त ।' -ज्ञा १७ ३२९ [स अ+जाति ]

**अजादुजा**—वि मागापुढा, मी तू पणाचा आपपर ०**कार** भार–प्रकार–भाव–विचार–संबंध इ० [दुजा द्वि ]

**अजान**—स्त्री नमाजाच्या वेळचें बोलावणें, प्रार्थनेच्या वेळीं मिनारावरून होणारा पुकारा [अर अझान्]

**अजानबाहु**—वि आजानुबाहु पहा

**अजानवृक्ष**—पु आळंदीस ज्ञानोबाच्या देवळांत ज्ञानेश्वरानें लाविलेल्या काठीपासून वाढलेला वृक्ष, पृथ्वीवर हा अद्वितीय सम जतात 'वृक्ष अजाना देखुनि वदी जरि भावें।' —निमा १ ९४ [स अजात(?) =प्राचीन+वृक्ष?]

**अजाप**—(गो) अजब पहा 'मा वा अजाप दिसे'

**अजाया**—पु (कुण) वृद्ध माणूस, आजोबा

**अजायाद**—क्रिवि अचानक [अजीवाद अप]

**अजाम्ल**—न बेंग्रि ॲगिड हें अम्ल लोणी, खोबरल वगैरे पासून काढतात —सें २ [लॅ कॅप्रि=अजा, बकरी]

**अजायब**—अजब पहा

**अजार**—पु. रोग, विघाड, उपद्रव, पीडा, दुखणें, व्यथा आजार पहा 'त्यांणीं रयतेस काडीचा आजार द्यावया गरज नाहीं' —रा ८ २४ [फा आझार] —री—वि दुखणाईत व्याधिग्रस्त, रोगी, अजार असणारा

**अजास्र**—अजस्र पहा

**अजाहत**—१ वदली किंवा नायब, गावकामगार, प्रतिनिधि पाटील, कुलकर्णी, वतनी, गुमास्ता वगैरेस लावतात २ (?) अबाधित, अव्याहत 'माझी वृत्ति तीन पिढ्या अजाहत चालत आली' [अर वजाहत=सन्मान, दर्जा नायब किंवा प्रतिनिधि याला सन्मानानें हा हुद्दा लावितात]

**अजाक्षीर**—न बकरीचें दूध 'क्षीरसिंधूसी समर्पिलें अजा क्षीर।' [स]

**अजि**—उद्गा अहा! (पुरुषांना किंवा स्त्रियांना लावतात) 'सवोंपन प्रसंगीं, यासि म्हणेलचि सभेंत अजि तरंगी।' —मोभीष्म ३ २९, 'भूतशत्रुासि म्हणे मी सत्य व्हा सावधान अजि राया॥' —मोकर्ण १५ [स अयि हिं अजि–जी]

**अजि**—क्रिवि आज 'वधिलें पावाळ पूर्वे वीरनिधन मत न सांगते अजि तें॥' —मोकर्ण ३५ ३८ 'आणुनि धन गि दिलें दक्ष आम्हांसहि गावया अजि तें।' —मोसभा ११९ [स अद्य प्रा अज्ज, म आज]

**अजिंक्य**—वि न जिंकतां येणारा अजिंक्य, अजेय तु ता अजिंक या भरतुला।' —एरण्य ४ ३६ [स अ+जी=जिंकणें]

**अजिक्य**—अजिंक्य पहा ०पत्र–न अजितपत्र पहा

**अजिजी**—स्त्री दीनता, नम्रता नम्रपणाची आर्जव हांजी हांजी 'शिवी अजिजीनें दाखविलें पाहा त्यांनी मरदपणादून अजी वचन दिलें' —भा १५४ ०करणें–आर्जव करणें [अर आजिज्=नम्रपणा अजमव, फा मुन० ? अजि+अजि म अजी+अजी किंवा जी जी]

**अजिटन, अजिटंट**—पु एक लष्करी अधिकारी, वरिष्ठ अधिकारी किंवा सेनापति सांगेल ते हुकूम काढणें व रवाना करणें हें त्याचें काम [इ ॲडज्युटंट]

**अजित**—वि ज्याचा कोणी कधीं पराभव केला नाहीं असा (ईश्वर) 'अजित नाम वदे भलत्या मिसें। सकल पातक भस्म करी तसें।' —वामन [स] ०जाणें–एकाद्याला हार जाणें, एकाद्याचें वर्चस्व कबूल करणें, —तुकीचा प्रयोग, जिन ऐकर्जी अजित. 'मी कशाला कोणाला अजित जाऊं,' 'मी काय तुला अजित जाणार की काय?' ०होणें–(ना) मेयाकुटीस येणें, रडकुडीस येणें, नुकसान येणें, ०पत्र–न १ पूर्वीं पंडित वादविवाद करीत इतर पंडितास वादात जिंकण्याकरिता फिरत असत त्यावेळीं विशिष्ट व्यक्ति अजिंक्य ठरली असें लिहून दिलेलें पत्र, त्यावरून पुढें उलट अर्थ झाला, जितपत्र, वादांत किंवा खेळात पराभूत झाल्यानें लशी वहुली देणें २ उलट रयात हरलेल्या पक्षानें त्यावर आपला पराभव लिहून दिला तें पत्र. 'त्या गावच्या ब्राह्मणांनीं त्या विद्वानास अ० दिलें,' 'रामभट काशीस जाऊन अ० घेऊन आला' (याप्रमाणें हा शब्द हल्लीं वापरतात)

**अजितेंद्रिय**—वि ज्यानें, आपलीं इंद्रियें, मनोधर्म किंवा विकार हीं जिंकिलीं नाहींत असा, अविरक्त, अवैराग्यशील [स]

**अजिदिल्इखलास्**—अ शुद्ध प्रेम करणाऱ्याकडून, कनिष्ठा कडून वरिष्ठाला जाणाऱ्या पत्रातील मायना [फा अजि+दिल्+अर. इख्लास्=स्नेह]

**अजिन**—न बसण्यासाठीं किंवा पांघरण्यासाठीं (विशेषत हरणाचें) कातडें, मृगचर्म, कृष्णाजिन [स]

**अजिणापुरकी**—स्त्री (गो) भिंती भाण्वाई, (?) म्याड, नामर्द 'ताज्यान किते जाता? ती पैर्नी सामकी अजिणा पुरकी!' [स अजीर्ण प्रा अजिण्ण+ध्व पुरु?]

**अजिर**—न अंगण चौक, खुली जागा 'होय अशक सोस शत वाहे समराजिरीं सळसळतें।' —मोद्रोण ९ २३ [स]

**अजिसौव**—अजीमोव, यावरून, यापासून, यामार्गानें, (वरि ष्ठाकडून जाणाऱ्या पत्रातील मायना). 'अजसौव जनरल' —भेपायाव ४५ [अर सौब=मार्ग, बाजू तर्फ]

**अजी**—उद्गा अहो! अजि पहा.

**अजी**—स्त्री आईची-बापाची आई, सामान्यत वृद्ध, पोक्त बाइ असादि अर्थ दोनो स्त्रि० मायना अजी कावयाला दोनी =दादवान्द्या वेळीं अजीचें नातें लावावयाचें, पण कामाच्या वेळीं दूर राहावयाचें [स आर्यिका, प्रा अज्जिआ–अजी]

**अजीअजी करणें**—एकसारखी करणें, फार्जंद करणें अजिजी पहा [अजी+अजी किंवा फा अजिजी]

**अजी**—शब यापासून, यापुढें 'अर्जीपासून तुलर न वीज' –रा १५ २४८ क्रिवि पूर्णपणें, अगदीं, मुरलीं, मुळींच 'दिगी मोडवी अजी चोडवी' –पमूतवाल ८ [फा अस=पासून+ईन] ०नसणें–मुळींच नसणें, अगदीं नसणें, पूर्णपणें अभाव, (अजात= एकूण वेरनेत, नमणें) 'अर्जी ठवी नाहीं, तपशीर वोणोकडे पहावी' **अर्जी माफी**–स्त्री सवध सारा माफ असणारी जमीन **अर्जी वास्ते**–यावरिता, म्हणून –दग ६६ [फा अर्जी+वासिता] **अर्जी सवव, अजसवव**–यावरिता, म्हणून 'अजसवव दूरीराह,' –रस्त्याच्या लानीमुळें –पदमव ११२ **अर्जीसोर**–अजिसीव पहा. यामार्गे, यावरितां –फाप्रदसा २२ [अर सौव्=मार्ग]

**अजीज**—वि १ प्रिय, लाडका, प्यार २ वहुमूल्य, महाग, दुर्मिळ, उत्कृष्ट –पु आप्त [अर अज़ीज़=सन्मान्य, प्रिय]

**अज़ीज़**–वि १ दीन, लीन 'सरदार यागीं जाउन इंग्रेजास अजीज केलें' –रा १५ १०५ २ मोताद, महाग 'अनास अजीज जाहलों' –इए ५ १०३ [अर आजिज़्=दीन, दुर्बल]

**अजीजी**—अजिजी पहा

**अजीबाई**—स्त्री (आद) आजी, वृद्ध वाई (अजीसारखी), अजी पहा

**अजीयात (द्), अर्जीयात (द्)**—क्रिवि १ बिलकुल, अगदीं, सर्वस्वीं, निखालस, समूळ, मुळींच २ यापुढें, यानंतर 'अजी यात चेनापट्टणाकडे जाण्यास दिवसगत न लागावी'. –रा १० १६७ **अर्जीयात करणें, अजी वजा करणें**–मुळींच काढून टाकणें, तपशील काढून हिशेबात घेण्यापूर्वी अजांतून बाहेर काढणें [फा अर्ज़ीयाद्]

**अर्जी वाय(ये)स**—क्रिवि कारणानें, म्हणून, अजवायेस पहा 'अर्जी वायेस अजे ऐसी जे' –पदमव ११२ [फ अर्ज़ी बाइस्]

**अजीर्ण**—न १ अपचन विकार –वि न फाटलेलें, जुनें नसलेलें, खराब न झालेलें २ न पचलेलें, न जिरलेलें [स] ०ता–स्त्री अजीर्णाचा विकार, अपचन

**अजीर्णान्न**—पु १ अर्धवट पचन २ न पचलेलें अन्न [स]

**अजीर्णी**—स्त्री अपचनावर देण्यात येणारा काढा [स]

**अजीव**—वि जीवरहित, निर्जीव, (सजीवच्या उलट), (इ) ॲझो 'अजीव सृष्टि' [स तुल० ग्री इ ॲझो]

**अजीहूनी**—क्रिवि आजपासून 'तुज एसें भ्रमें अजीहूनी भतारासी।' –सप्र २ ३१ [स अद्य, म अजि+हून, हिं अजहूं]

**अजु**—क्रिवि अजून, अद्यापि 'अजु तें कृत्य न साधलें।' –दावि १८०, 'टोणपा चंदे तो अजु देवाला।' –दावि ३७७ [अजून पहा तु हनूज़]

**अजुक**—क्रिवि (व) उद्धक, आणखी, पुन्हा एकदां, अजून पहा

**अजुनि**—क्रिवि अद्याप, आतापावेतों, अजूनपर्यंत, अजून पहा

**अजुरदगी, अजुर्दगी, आजुर्दगी**—स्त्री खिन्नता, नाराजी, रुसणा, रुसवा 'या दिवसात कोणाची अजुर्दगी नसावी' –रा १० ६८ [फा आज़ुर्दगी]

**अजु (जू) रदा, अजुर्दा, आजुर्दा**—वि १ निष्काळजी, निरुत्साही, आस्थाहीन, अनुत्सुक, त्रासलेला, खिन्न, उदासीन २ दुःखी, कष्टी, श्रमी 'लष्करी एकही नाहीं अजुरदा।' –ऐपो ३५१ [फा आज़ुर्दा=दुःखी]

**अजु(जू)रदार, अजुर्दार**—पु अमुक मुदतींत पत्र पोहों चविण्यास भाड्यानें ठेवलेला माणूस, नोकर, मजूर, जासूद 'आमचे जासूद कासीद न पावले तर तुम्ही अजुर्दार करून पत्रें पाठविणें' –रा ३ १६३, –खरे ३०९१, 'आपली मुलगी व उमेदवार अजुर दार या दोघांनी मिळून चोरी केली असें त्याचे मनात पक्कें भरलें' –पाको ६६ [अर अजूरा=मजुरी फा.]

**अजु (जू) रदारी, अजु (जू) रा**—स्त्री १ मजुरी, वेतन 'कासीद पाठवावा त्यासी अजुरा पोचत नाहीं'. –रा ८ २१२ [अर अजूरा=मजुरी] २ (वा) त्रास, मेहनत, अजोरा पहा

**अजु (जू) देंपणा**—अजुर्दगी पहा

**अजु( जू )न्या**—अजुरदार पहा

**अजूग**—वि (कों.) उद्धट, अनादर करणारा, बेगुमान, माड दांड [स अ+युग्-जुग]

**अजूण-न, अजूनि-नीं, अजूनियां**—क्रिवि अद्यापि, आजपावेतों, आतांपर्यंत [स अद्यतन किंवा अद्य+पुन, प्रा अज्ज+ उण, हिं अजहू तुल० फा हनूज़] ०तरी–क्रिवि आता तरी, निदान यापुढें

**अजूळ**—न अ(आ)जोळ, आईच्या वापाचें घर [सं आर्या लय–आर्यकुल, प्रा अज्जउळ]

**अजेक**—स्त्री ममता (?) –मनको

**अजेगुरु**—अजागुरु पहा

**अजेचीर-वाण**—न नवऱ्या मुलीच्या आजीला वरपक्षाकडून लग्नाम यें दिलेलें मानाचें लुगडें किंवा अहेर [सं अजी+चीर=वस्त्र किंवा वाण]

**अजेय**—वि अजय्य, अजिंक्य [स]

**अजेसासरा-सासू**—सासऱ्या-सासूचा वाप किंवा आई आजेसासरा-सासू पहा

**अजोगी**—वि (कों) अव्हाळ किंवा ढेंगटपणा न करणारा, न गमणारा २ अचळवी पहा. [अ+जागावणें]

**अजोडा**—वि भग न जोडणारा, दोहीं न मिळविणारा [अ+जोडणें]

**अजोनी**—अजून पहा 'सुवेष पतिव्रता मुनिकामिनी। का जी अजोनी न दिसती ॥' –जेअ १८ २८

**अजोवा**—आजोबा पहा

**अजोरा**—पु गाय वगैरे जनावराचा गर्भ (क्रि टाकणें–पडणें–येणें) [स आ+जरायु=गर्भाशय]

**अजोरा**—पु कटकट, त्रास 'गप्प बसा राव, उगीच अजोरा का?' [फा आझुर्दा]

**अजोळ**—अगूळ पहा

**अज्यम**—अजम पहा

**अज्जी, अज्जीदात**—अर्जी पहा 'हे कायद अज्जी रद्द करणेंहि धोक्याचें काम झालें असतें' –इमू ३०४

**अज्तरीक मेहेरबानी**—कृपापूर्वक 'अज्तरीक मेहर्बानी, दर्खास्त करितात कीं व्याज माफ करावें' –पया ४०० [फा]

**अज्य**—न तूप 'कितीयेक तें आणिलीं अज्य तलें।' –राक १७७. [स आज्य]

**अज्या**—क्रिवि (ना) इकडे अयज्या पहा

**अज्याइब**—अजाइब पहा

**अज्ञा**—अज्ञाहे पहा ०**एखलास**–स्नेहपूर्वक पारच पाठविले असे, अज्ञा एख्लास धतला पाहिजे' –रा १० ११८ [अर इख्लास]

**अज्ञाहे**—क्रिवि रस्त्यानें, मार्गानें, पूर्वक, रीतीनें [फा अज्+राह्=रस्ता] ०**खानगी**–खाजगीच्या रीतीनें 'आम्हांकडे अज्ञाह खानगी सांगून पाठविलें होतें' –रा ५ ८५ ०**दोस्ती**–मैत्रीपूर्वक परंतु अज्ञाहे दोस्ती तुम्हांस गोष्गुजार करून ठेवतों हे निश्चित उत्तर येईल' –रा ५ १६४ ०**मेहेरबानगी**–क्रिवि कृपापूर्वक खत अज्ञाहे मेहेरबानगी पाठविलें तें पोहचून खुरी हासल जाहली' –रा १० २१२ ०**हरामजादगी**–बेइमानीनें तुम्ही अज्ञाह हराम जादगी स्वामींच्या पारपत्यकारासी रुजू न होऊन मोरोपंतासी रुजू होता' –रा ११ ४१

**अज्ञा मन्हमत**—क्रिवि कृपेनें कृपादत्त, बक्षीस हें वतन यास अज्ञा मन्हामत वतन करून दिलें असे –रा ८ ४७ [फा अज राह्+अर मर्हमत=कृपा]

**अज्ञा(जरा)वळ**—स्त्री लहान मुलीच्या गळ्यात(दृष्ट लागू नये म्हणून) घालण्याचा एक दागिना दृष्मण्याची माळ [वज्रा वळ पहा]

**अज्रूय**—क्रिवि रीतीनें रुईनें अज्रूय वाजवीच्या हक्क परस्तीच्या इन्साफाच्या रीतीनें इन्फिसाल करितील' –पअ ६१ [फा अज्+रू+ए=मुळें योगानें]

**अझ**—अज (पासून) पहा

**अझूण**—णी, अदून—अजून पहा

**अट**—स्त्री १ अडथळा, अडचण, अटकाव इत्यादि नड २ धाक पुढें जाऊ नये म्हणून चाकास लाविलेला दगड किंवा धुणा हाकी १ ४ उणी ३ (ल) ठरलेल्या गोष्टीविरुद्ध आचरण घडू नये म्हणून त्याबद्दल केलेला करार–शर्त देण्याघेण्याविषयीं कुळाकडून जो निर्बंध करून घेतात तो ४ हट्टीपणा, हेका, हट्ट दुराग्रह ५ घट्ट बसविलेला साधा उचकटण्याकरिता तरफेप्रमाणें लावलेला दगड, खिळा, पहार वगैरे, जोर ६ विण्याची किंवा सतारीची घोडी, सतारीच्या दांडी वरील हस्तिदंती पट्टी हिच्यावरून तारा खुंटीला अडकविलेल्या असतात ७ दोरीचा गुंता, गुतवण, पीळ, अढी ८ (ल) मनातील गाठ विपरीत ग्रह ९ हातमागाच्या परदशी नावाच्या पुढच्या पुढें बांधलेली, करकोच पाडलेली काठी–हिला विणावयाचे धाग्याचे पुंज निरनिराळे बांधलेले असतात १० गोट्या खेळताना हातास व बोटास जोर येण्यासाठीं आधाराला जमिनीवर टेंकलेला अंगठा, किंवा जेथें अंगठा टेंकला जातो ती जागा [प्रा का अड–इ=आडवा, अडथळा]

**अट**—स्त्री मोट वगैरे थांबल्यानंतर पाटांतून वाहणारें पाणी, (अटत अटत राहिलेलें जें पाणी) 'एवढ्या अटीनें वाफा भरेल, मोट उभी कर' [अटणें]

**अटअट**—स्त्री परिश्रम, त्रास अदाअढ, अटापिटा वगैरे पहा [स आर्त, प्रा अट्ट, का अट]

**अटक**—स्त्री अट पहा १ बंदी, अडथळा, अटकाव, प्रतिबंध, मर्यादा जया सोहमाव हा अटकु।' –ज्ञा ६ ११५ 'तुला कोठेंहि बंद अटक नाहीं' –नल१२० २ वचक धाक, दबदबा ३ कैद 'जवाहरलाल याना सरकारनें अटक केल्याबद्दल मिरवणूक निघाली' –केसरी ११ ४ १९३० **अटकेंत घालणें**–कैद करणें **अटकेंत पडणें**–कैदेंत पडणें ४ अडचण, नड, खोळंबा 'तरी उरलें असे एक। घोर अटक मनलागीं॥' –एभा ६ २६७ ५ (करार मोडल्याबद्दल) प्रायश्चित्त, दंड शिक्षा ६ कापड विणण्याच्या मागात ज्यावर फणी आपटते तें लाकूड–वीण घट्ट मजबूत व ठासून बसविण्याच्या कामीं याचा उपयोग होतो ७ गाडीचा वेग बंद करण्याकरिता केलेला चाप, धुणा ८ गाडीची साटी व तुंबे यांना जोडणारा दांडा ९ सिंधुनदाच्या काठचें एक गाव व तयीच सिंधुनदाच्या भागास दुर्लंघनीयतेमुळें मिळालेलें नाव असे साडाव दत आले अटक उतरून नऊ कोसावर।' –ऐपो १२१ **अटकेवर झेंडे लावणें**– (राघोबा दादानें अटकेपर्यंत मुलूख काबीज केल्यावरून) शतकृत्य करणें, मोठा दिग्विजय मिळविणें अटकेवर झेंडे ज्याला यापुढें आणिता कोठुनि भरारी (राघोबा)।' –विक १ सतारीचा घोडी अट –वि न गवसणारें हातीं न लागणारें बाप शत्रु मरणात्मक। मन मरणासीही अटक॥' –एभा २३ ७०३ २ कठिण अवघड 'निर्गुणाचा बोध अटक।' –एभा २७ २५१ ३ अशक्य अगम्य 'एसें नै काहीं एक। बोला बुद्धीसिद्धी अटक॥' –ज्ञा १८ १४२०, 'मायेनि हस्तें काय धर्गे। जें का अटक गुरुतरा॥' –मुवन ६ ३४ [प्रा का अड–अइ]

**अटकचटक-मटक**—स्त्री १ लीला, चेष्टा, खेळ, नखरा 'अटकचटक मटक दाउनि मन तुम्में मोहिलें रे ॥' –अमृत २३ ७५ २ एक खेळ, आटकमाटक पहा [अटक+चटक चटक द्वि तुल० या अटिंग=खेळणा, आटिकें=खेळ, गु अटकबाळु=चेष्टेखोर]

**अटकडी**—स्त्री १ माळवदाची तुळईवरील लहान तुळई २ छताच्या खालची तुळई, हिच्यावर नक्षी काढतात ३ खिडकीची दारें उघडीं राहण्याकरतां केलेली लोखंडी आकडी [का अड–अटक+कडी]

**अटकण**—न अडकण पहा

**अटकणें**—अक्रि अडकणें, थांबणें, गुतून पडणें, अटकाव, अड थळा होणें 'इतकें बोलून अटकला' –बाळ ७ १७३ [अटक]

**अटकर**—वि बांधेसूद, नीटनेटका, आटोपशीर, व्यवस्थित 'अटकर बांधा' –क्रिवि घट्ट, चापून चोपून, गच्च, आवळ [अटणें+कर प्रत्यय]

**अटकर**—वि हट्टी, हेकेखोर, अडखोर, अडेल [प्रा का अड]

**अटकविणें**—उक्रि थांबविणें, अडथळा करणें, प्रतिबंध करणें, अटक करणें [अटक]

**अटकळ**—स्त्री १ अजमास, अनुमान, अदाज, सुमार, तर्क, मत, कल्पना २ गणित किंवा इतर शास्त्रांतील नियम, सिद्धांत, रूढ किंवा लौकिकांतील चाल, रीत (कुस्ती, दांडपट्टा खेळण्याची, घोड्यावर बसण्याची किंवा कोणतीहि विद्या-कला पार पाडण्याची) [स अर्थ+कल्=मोजणें, सागणें हि अटकल, गु अटकल, सि अट्कल] ०णें-उक्रि १ ज्ञात होणें, माहीत होणें 'गुप्त करो सद रातकृत तत्काळ दहाजणास अटकळतें ॥' –मोआदि २८ १ २ अदाज करणें, कल्पना, तर्क करणें, निश्चित करणें बोलणें-सागणें किती आह तें मला अटकळत नाहीं' ०पंचविशी–स्त्री आधाराधाचून बांधलेला तर्क, अनुमान धपका, तर्क, अजमास, कल्पना, तगदमपट्टी ०बाज–वि अदाज करण्यात तरबेज ०बांधणें–कल्पना करणें

**अटकळणें**—अक्रि अडक(ख)ळणें पहा

**अटका**—पु एक ताम्याचें नाणें, अर्धा टका, अडका पहा म्ह० 'अटक्याची कोंबडी आणि टका फळणावळ' [सं अर्धक]

**अटका**—पु १ ग्रहण करण्याची शक्ति व्याप, आटोका २ अंदाज अजमास, हिशेब, गणना [सं अर्थ+कल्, म अटकळ]

**अटकाव(वा)**—पु १ अटक, अडथळा, प्रतिबंध, प्रतिरोध, विघ्न, अडकाठी २ कैद अटक 'त्याच्या अटकावापासून शोध लागेल' –दि २ २०१ [अटक] ०ण–णी–स्त्री अडथळा, हरकत

**अटकाविणें**—उक्रि अटकविणें, अटकाव करणें, थांबविणें [अटक–अटकाव]

**अटकाळ**—पु दुष्काळ, महर्गता, दुर्भिक्ष, चणचण (पाऊस, पाणी, धान्य वगैरेची) (क्रि० पडणें, होणें) [अटणें+काळ]

**अटकी**—स्त्री एक वनस्पति

**अटकी**—स्त्री अ(आ)ठकी, सागरगोट्याच्या खेळात आठ सागरगोट एकदम हातात घेऊन नववा झेलण्याचा डाव 'तुझ्यावर अटकी लागली' [स अष्टक प्रा अट्ठक म अठक]

**अटकीचा दगड**—पु शेताच्या सरहद्दीचा–बांधावरील दगड [अटक]

**अटकें**—न १ बैलावर लादलेल्या ओझ्याचा पडणीचा एका बाजूचा भाग २ तुकडा, अर्धे (विड्याच्या पानाचें, भाजीचें, फळाचें वगैरे) [स अर्धक]

**अटकें**—न अडथळा, अटकाव [अटक]

**अटकोल**—वि पान्हेचोर, पान्हा चोरणारी, हट्टी (गाय इ०) [अटखोर]

**अटखोर**—वि हट्टी, हेकेखोर, अनीवाज, आग्रही [अड–ट+खोर]

**अटंग-अटंगय**—वि (गो)अवाढव्य, अफाट, भयंकर, विस्तीर्ण, घनदाट, निबिड 'त्या अटंगय रानात तपाक चढिशी एक साधू नाका दिष्टी पडलो' [अथाग (अप) अटव्य ?]

**अटघाट**—पु स्त्री अटाघाट, अटाआट, वायफळ श्रम, अटा पिटा, घाटाघाट, काथ्याकूट 'सभेमध्यें आटघाट। समाधान कैचें।' –दा १९ २ ७ [स अर्थ+घात, प्रा अट्टघात, किंवा स आर्त+घट् ?]

**अटघोळणा**—पु त्रास उपद्रव छळणूक, गाजणूक, हाल्हाल. (क्रि० करणें, होणें) [स आर्त+घोलन, प्रा अट्टघोल्ण]

**अटण**—न भ्रमण, भटकणें, हिंडणें, 'समर्थे भरतखंडीं अटणें केलीं।' –सप्र ५८ ३ ५ [स अट्]

**अटणावळ**—स्त्री सोनें, चांदी अटविण्याची मजुरी [अटणें प्रा अट्ट= शुष्क होणें, सुकणें, का अट्टु=आटविणें, शुष्क करणें]

**अटणी**—स्त्री १ मूस 'जन्म कर्माची आटणी।' –दा ३ १ २ २ धातूंचें वितळणें, रस होणें ३ शोष, लुप्त होणें, सुकणें, वाळणें 'पर्जन्यानें पृथ्वीवर उदक जें वाढतें तें सूर्यानें शोषणरूप अटणी लाविली आहे त्यामुळें अटलें जातें' ४ दाव, धाक, जरब, प्रतिरोधन म्ह० १ दाळ घालावी दाटणींत लेक घालावी अटणींत २ वरण दाटणी आणि बायको अटणी ५ झिजणें, श्रम, यत्न 'तैशी लटिकियालागीं अटणी। विषयसाधनीं नरदेहा ॥' –एभा २ २२६ ६ क्लेश त्रास 'तेवीं आपलिया आटणिया। सुखें असतया प्राणिया ॥' –ज्ञा १७ २६१ ७ मिश्रण [अटणें]

**अटणी**—स्त्री १ गोणपाटाच्या मागातील ताण्याचे धागे खालीं वर होऊन मधून धोटा किंवा आड्या दोरा टाकण्यास जागा धरण्या करितां रुळासारखें वाटोळें लाकूड घालतात तें २ गोणपाटाच्या

मागातील धागे खालीं वर करणारी दोन दाडकीं, हीं व गोमटें मिळून ओवी किंवा चढी होते [ अड ]

**अटणूक**—स्त्री १ आटणें, कोरडें पडणें, दुर्भिक्ष, शोषण २ ( ल ) व्यापारात उतरती कळा, अवकळा, जातापाय [ अटणें ]

**अटणें**—अक्रि १ ( उष्णतेनें ) घट्ट होणें, कमी होणें ( दूध, रस वगैरे ) २ आवसणें, आखुड होणें, आकुंचन पावणें, आक्रसणें ( कापड इ० ) ३ कामास पडणें, खपणें, विवक्षित कार्याकडे विनियोग होणें 'दोन्ही अंगरख्यांचें कापड एका अंगरख्याला अटलें ' ( ल ) एकजीव एकरूप होणें ' मीचि होऊनि आटले । उपासिती । ' —ज्ञा ८ १२६ ४ सोनें, चांदी वगैरेचा रस होणें, वित ळणें ५ ऱ्हास-क्षय पावणें, खर्च होणें (मालमत्ता, समृद्ध वगैरेचा) ' तैसें तुकयाचें धनधान्य समस्त । अटोनि गेलें जेयचे तेथें ॥ ' ६ घट्ट होणें, मजबूत होणें ' नित्य मेहनत केली असता शरीर अटून घळकट होतें ' ७ नाश होणें, लुप्त होणें, शुष्क होणें, थाळणें नाहींसें होणें ' साहावी माझी ओवी । साहाही आटली । ' —तुगा ३८४८, 'दुहोत भलते सदा तरि न लेशही आटती ।'—केका ५८ ८ —अक्रि पोळघालणें, वळणें ' हें शुभ तिपदरी अटून आण ' ९ त्रास देणें, बेजार करणें, नि पात करणें, निकाल करणें- ' अटीन सकळ त्रिभुवन । जैसें प्रल्हादाकारणें सपूर्ण । श्रीनृसिंहें अटिलें ॥ ' १० अटविणें, वित ळणें (धातु) [ प्रा अट्ट, का. अट्टु ]

**अटणें**—अक्रि भ्रमण करणें, प्रवास करणें, फिरणें, भटकणें, हिंडणें. ' पुढें मृगयामिषें अटला । गंगातीरा पातला ॥ ' [ स अट्= भ्रमण करणें ]

**अटता काळ, अटता पाया**—पु ऱ्हासाचा, उतरता काळ, अवकाळ. ' धदा करिता नये यश । अटता काल यासि आला ॥ ' [अटणें+काळ, पाया]

**अटदार**—अटखोर पहा.

**अटन**—अटण पहा उ० देशाटन, तीर्थाटन, भिक्षाटन, इ० 'तीर्थे अटन विशेषें । हालि चालि करिते भिक्षुके । ' —रू २१

**अटप**—पु १ संकुचित करणें, थोडक्यात आणणें, आकुंचित पणा—स्थिति २ ताबा, वचक, अमल, दाब ३ व्यवस्थितपणा, सुट सुटितपणा, आटोप, आवर, उरक ४ आटपणें, गुंडाळणें बंद करणें मोडणें [ स आटोप ? का अट्टु ? ]

**अटपणें**—उक्रि १ एकत्र करणें गुरफटणें, आकुंचित करणें २ व्यवस्थित लावणें ( पुस्तकें, इत्यादि वगैरे ) ३ ताब्यात घेणें, हातात घेणें, गोळा करणें 'बापाची संपत्ति वडील भावानें अटपली ' वारा पुढचा आला, शीड लवकर आटप ' ४ उरकणें, झटपट करणें ' स्नान-सध्या अटपून पढावयास ये ' ५ गाठणें, मनल मारणें, मिळणें 'तू पुढें गेलास तरी मी धावत येऊन तुला अटपीन ' ६ सभा ळणें, व्यवस्थितपणें चालविणें उदा० ससार अटपणें ७ संपविणें, खलास करणें ' भाऊपानला गूळ अटपला ' ८ आवरणें, थांबविणें, मर्यादा घालणें, दाबणें ' धीर धरोनी आटप म्हणुनी धारपें मन साठीं ।' —केक ४१ —अक्रि १ मरणें, नाश पावणें 'पाच हजार फौज अटपली ' २ सुकणें, सपणें, नाहींसें होणें ' या तळ्यातील पाणी अटोपलें तेव्हां पक्षीदेखील गेले ' [ स आटोप ? ]

**अटपता, अटपशुद्ध, अटपसार**—वि बेताचा, सुटसुटीत, टुमदार, बाबेसूद, ऱ्हानसर, रोहस्वर, ( शरीर, इमारत, कपडा ) उ० अटपसार अंगरखा [अटपणें] **अटपता करणें-घेणें-धरणें**— १ थोडक्यात आवरणें, संकुचित करणें ( काम, धदा ) २ रेवटास नेणें, संपवीत आणणें

**अटपविणें**—उक्रि १ एकत्र, एके ठिकाणीं, जमा करणें, गुंडा ळणें २ उरकणें, संपविणें, विल्हेवाट लावणें, फन्ना करणें ( काम, खाद्यवस्तु वगैरे )

**अटपळ, अटफळ**—न पासोडीच्या दोन तुकडयांपैकीं प्रत्येक, कांबळ्याचा एक पा [ स अर्ध+पट ]

**अटपाअटप**—स्त्री अवराअवर, विल्हेवाट, निरवानिरव, वारा सार, विसकटलेल्या वस्तूंची जमवाजमव [ अटप द्वि ]

**अटपाट**—आटपाट, आटपाट पहा

**अटबाज**—वि हेकेखोर, हट्टी, मानी [अट+बाज] **अटबाजी**—स्त्री हेका, हट्ट

**अटरणें**—उक्रि १ अकसणें, आखडणें २ सुनघरणें, फुगणें, ताठणें अठरणें, अवटरणें पहा [ का अट्टु, म अटी, अडर ]

**अटरफटर**—न १ सटरफटर, रद्दी, ल्टरफ्टर ऐरफैल २ बडबड, वाचाळपणा, वटवट —वि अप्रस्तुत, निरुपयोगी [ स भ्र+स्फुट, प्रा फुट फुट द्वि ]

**अटवणें, अटविणें**—आटवणें पहा **अटवून टाकणें**— (मंत्रानें भूत, सर्प, वगैरेस ) बाधून टाकणें, रोधणें

**अटवल**—आटवळ पहा

**अटवळा**—पु शेताची राखण करण्यासाठीं किंवा धान्य उफण ण्यासाठीं किंवा कडबा वगैरे ठेवण्यासाठीं शेतावर बांधलेला माळा, अटोळा शिवाय अगाली, अटाळा पहा [ स अट्=गच्ची, माळा+ वलन ]

**अटवी**—स्त्री जगल, अरण्य, वन ' अटवियमाजीं जैसा । वन्हि रिघता सहसा ॥ ' —ज्ञा १८ १५२१ [स तुल० का अट=गति, ते अडवी, ' अड ' हा द्राविडी धातु व वी हा प्रत्यय ]

**अटव्य**—वि घोर, निबिड ( रान—अरण्य ) 'वनें अटव्यें उल्लंघून ।' —मुआदि २ ९० 'चोराच्या अटव्य रानातं नेऊन सांडा।' —रोज्यू १६२ —न अरण्य 'द्वितिय वर अटव्या राघवा पाठवावें ।' —राअ २८ [स अटवी ]

**अटस**—वि अडस, लठ्ठान, घट्ट, मजबूत (शरीर, बांधा). –क्रिवि आवळ, घट्ट, करकचून (बसणें, जुंपणें) [का अटु ध हिंदु=अटणें]

**ॲटहोम, ०पार्टी**—स्त्री मित्रमंडळींना छोटी मेजवानी, फराळ, उपहार यावेळीं पदार्थ मांडून ठेवलेले असतात पाहुण्यांनीं लागेल तें खावें गाणें, नाच, खेळ वगैरे करमणुकीचे प्रकारहि फराळा सोबत असतात 'त्याना या औपचारिक गोष्टी आवडतच नसत भेट ०चें नाव काढलें कीं अण्डरसनसाहेबांचें डोकें उठत असे' –नपुक २३ [इं]

**अटळ**—वि न टळणारा, चुकवितां येणार नाहीं असा, न चुकणारा [स अ+टळणें स अटल=स्थिर, भक्कम, का तळर्=हालणें, चळणें]

**अटा**—पु प्रतिबंध, अडथळा 'हृदय विकळ जेव्हां देहभावा करा कीं।' –राधा १४८ [का अडु, म अट]

**अटाअट**—स्त्री १ वाण, उणीव, टंचाई (पैसा, धान्य यांची) २ कोरडें पडणें, वाळून जाणें, शुष्कपणा (विहीरी, नद्या यांचा) अट अट पहा [अटणें]

**अटाई**—स्त्री १ अटविण्याची मजुरी २ शुष्कपणा, कोरडेपणा

**अटा-आट-घाट-पीटा-पिटी-पिट, अटाटी**—स्त्री १ छळ, गांजणूक, मारा, कापाकापी 'यादवांचेआ कटका भीतरीं। पारका आटाआटी केली थोरी॥'–शिशु ९८८ २ त्रास, भगीरथ प्रयत्न, खस्त दगदग ३ थकवा भागवटा, शीण [अटणें घाटणें, पिटणें लष्करचे लोक गांवीं उतरले असता तेथील लोकांकडून आटा (पीठ) फुकट मळून घेत तसेंच कुणकोंकडे तगाद्यास आलेल्या शिपा ईहि करी त्यावरून विनाकारण त्रास (सरकारी किंवा सावकारी) भाऊसत्र हिं अटा+म पीठ] **अटापीट पाडणें**–मेटाकुटीस आणणें

**अटांक**—वि (गो) टाक नसलेला [स अ+टंक]

**अटांगपटांग**—वि लांबलचक लवाबवडा 'अटांगपटांग बाता तेवढ्या पाहून घ्या' [पटांग (ण) द्वि]

**अटाट**—स्त्री श्रम, यातायात 'ग्रंथ पूर्ण लिहून झाल्यावर छापून काढायची अटाट पडली' –नि ६१० अटअट पहा [अट द्वि]

**अटाटा**—पु खल, गाजावाजा, बोभाटा 'आर्धी उमासारू बाईसारखी सच्छील बायको, त्यात त्या रुपयाचा इतका अटाटा झालेला आणि त्या कशा मागतील' –पकोघे [अट द्वि]

**अटाटी**—स्त्री कष्ट, श्रम, दगदग, हाल 'टाकिली अटाटी भोगावया?' –दावि ३५ [अट द्वि]

**अटानिमा**—पु त्रास, अटाअट पहा

**अटारणें अठारणें**—अक्रि अंबटरणें पहा

**अटाऱ्या घोळणें**—(व) सतावून सोडणें 'तुम्ही गेल्यावर आमच्या खूप अटाऱ्या घोळल्या त्यानें'

**अटारा**—पु १ श्रमाधिक्य, ढोर मेहनत, मेटाकुटीस येणें २ कष्टामुळें थकवा, ग्लानि येणें (क्रि० पडणें, पाडणें)

**अटारे(रो)टा**—पु १ सारा वसूल करणाऱ्या शिपायास (पीठ) रोटी वगैरे शिधा देण्याची रीत २ किरकोळ काम, हलकीं कामें (दळणकांडण, मोलमजुरी वगैरे) 'दादला मेल्यापासून मी अटारेटा करून पोट भरित्यें' ३ अटापिटा पहा [स अट=श्रम, हिं अटा+ रोटी]

**अटाला**—पु (क) घरचीं माणसें जनावरें, सरंजाम, लष्करी टाळाचें सामानसुमान, सरंजाम, मंडळी, अवजड सामान इ० –रा ४७२१

**अटाली**—स्त्री मनोरा, मोठा वाडा, गच्ची, माडी, अटाळा, माळा 'मोडिल्या गोपूर आटाळीं।'–मुवन ३५, 'आगाळयावरि लोकलाज त्यजुनि बाळा उभ्या टाकती'–शशिसेना 'वायांविहीं नामभरें अटाळ्या। पौरांगना वा नवितात टाळ्या॥' –साह्रह ५१० [स अट्ट, अट्टालक अट्टालिका, प्रा अट्टाल –य, ते अट्टालकमु–वेशीवरचा मजला, का अट=माळा, सिं अट्टलो, आटाले, इं ॲटिक=पोटमाळा]

**अटास**—(म) अट्टाहास, अट्टहास, प्रचंड उद्योग, अत्यंत परिश्रम, मेहनत, कष्ट, अटाअट [स अट्ट=मोठे, फार+आयास=कष्ट]

**अटाळा-ळी-ळें**—पु स्त्री न १ अटोळा, अटवळा, अटाली पहा 'माडया अटाळ्या आणि उच भिंती।' –साह्रह ७६८ २ (व) अडगळीचा माळा 'माडकी खाट अगाळ्यावर पडली असेल' [अटाली पहा]

**अटी**—स्त्री १ मोहरमात हातात घालावयाची पिळदार दोरी, सैली, सुताची किंवा रेशमाची लड, कळी २ अट–गोटीखेळ पहा ३ हट्ट अट 'देमी एका अर्थीं। रिती शिणती करटीं॥' –तुगा १७८४ ४ कष्ट, श्रम [अट, अग] **०टीचा सामना**–चुरशीचा सामना [अट+रा+सामना]

**अटीचा**—वि अटील, हेकेखोर, मानी 'विडकर खुर्दैकर आटींचे।' –ऐपो २२२ [अट] **०करार-चौली-खेळ**-पु जो हरेल त्यानें अमुक शिक्षा भोगावी किंवा दंड द्यावा असें ठरवून खेळ तात तो शर्तीचा खेळ **–ची चाकरी-काम**–स्त्री विशेष शर्तीवर करावयाची, चाकरी काम **अटीबाज-खोर**–वि मानी, अम्दार [का अड्ड म अट+फा बाज–खोर]

**ॲटीमनी**—स्त्री. अंज धातु सुरम्याची धातु याचा मुख्य उपयोग छापखान्यातील टाइप तयार करण्याकडे करतात [इं] **०क्रूड**–न एक होमिओपॅथिक औषध, सर्दी व मस्तकशूळावर उपयोगी [इं]

**अटील**—वि. हट्टी मानी, अटीचा [स अटल, म अट]

**अटीली**—अटाली पहा

**अटीव**—वि १ उकळून, आटवून घट्ट केलेलें (दूध, खीर वगैरे) २ वितळलेलें (सोनें) ३ ओतींव, वितळवून तयार केलेले 'अटींवा लोहाचे खार जैसे।'—ज्ञा १६ ३७९ ४ कुस्ती इ० परिश्रमानें घट्ट-मजबूत बनविलेलें, पिळदार (शरीर) 'जो आटींव जेटिया ऐसा।'—मुसभा ६ १५३ ५ संकुचित, अवुंचित, आवळून केलेलें [अटणें प्रा अट्ट, का अट्टु]

**अटीवाद**—पु. हेकेखोरपणाचा वाद, हट्टीपणानें भांडणें, हट्ट वाद पहा [अट+वाद]

**अटु**—आडु—डू पहा

**अटुकमटुक**—अटकमटक पहा

**अटुवें**—वि. संकुचित, धाकटें 'अटुवें हियें आवळी।।'—ज्ञा ६ ७७ [अटणें]

**अटुळणें**—आटुळणें पहा

**अटेंडन्स**—पु हजिरी 'अटेंडन्स अलावन्स'=हजेरी भत्ता [इं]

**अटेन्शन**—न (ड्रिल हुकूम) लक्ष, सावधान [इं]

**अटोका**—पु शक्तीची किंवा सामर्थ्याची मजल, इयत्ता, योग्यता, आकलनशक्ति, अवाका, झेप, पोंच [का एटकु=आगे क्यात येणें, एटिके=अटोका]

**अटोका(क)ट**—वि १ अत्यंत, शिवस्तीचा, वरच्या दर्जाचा, अमर्याद, अचाट, (सद्गुण, अत्युच्च गोष्टी इ) 'त्याचें अटोकाट ज्ञानहि लक्षात घेऊन,'—नि ५७६ २ अट्टल, बळकट, अतिशहाणा, योग्य, जहांबाज, प्रचंड ३ सर्व, समग्र, पूर्ण, एकूणएक (लहान थोर सर्व दर्जाचे) [स अट=उच्च+काष्ठा=सीमा, दिशा, प्रा अट्टकट्ठा स आ+कंठ?]

**अटोप-पें**—अटप, अटपणें पहा 'त्या गुप्त कल्पना कोणास कळाव्या। कोणें येऊन आनेपाव्या।।'—दा १९ ८ १८ —**अटोपता-सार**—अटपता—अटपसार पहा

**अटोपी**—वि (व्यवस्था करण्यात) हुशार, तरबेज, चपळ, चलाख [अटपणें]

**अटोफळी**—स्त्री आठ फळांचें वायन, प्रत्येक ब्राह्मणास आठ आठप्रमाणें ६४ फळांचें दान, अठफळी अष्टफळी [स अष्टफल]

**अटोमॅटिक**—वि १ आपोआप चालणारें होणारें, स्वयंसिद्ध 'अटोमॅटिक रिव्हॉल्व्हर' (पिमा)=अपोआप चालू होणारी २ अ कल्पित घडणारें केवळ यांत्रिक, बुद्धीच्या उपयोगाशिवाय [इं]

**अटोळा**—अटवळा, अगली पहा 'वदोनि अटोळीं निजला घोरत।'—दावि ३४७

**अटोळी**—स्त्री १ फणसासारख्या कांहीं (रातीक, आमूळ इ) फळांतील बी, अठळी आव्याच्या बायीलाहि म्हणतात २ पुढ पायांच्या घुपणातील दोन गोट्यांपैकी एक अंड [स अस्थि—अट्ठि—अष्ठि, प्रा अट्ठि=अपरिपक्व फ— अटी किंवा स अष्ठील, अष्ठिरिका=गोटी, गाठ, अट्ठिलिआ—अठळी]

**अट्टरणें**—अटरणें पहा **अट्टरणा पाडणें**—(माण) जनावरास रूप दमविणें

**अट्टल**—वि. १ निपुण, हुशार, निष्णात उ० अट्टल पोहणारा-धावणारा, लिहिणारा २ पक्का, वस्ताद, तरबेज, वेरकी, लबाड उ०—अट्टल चोर [सं हट्टचौरक=बाजारात चोरी करणारा, प्रा अट्टचोर, अट्ट (ल) चोर 'ल' स्वार्थी प्रत्यय —भाअ १८३५], अट्टल सोदा, वगैरे ३ अस्सल, खरा उ० अट्टलमित्र—स्नेही ४ स्थिर, अढळ, निश्चल [स अटल=स्थिर, अचंचल, प्रा अट्ट=निर्लज्ज, बेशरम, का आटआळी=खेळाडू,' हिं अटल, ब अन्टल]

**अट्ट(ट्टा)हास**—पु १ जोरानें, मोठ्यानें हसणें २ मोठा आवाज, स्वर, आक्रोश 'करि रुदन अट्टहासें।'—एभा२० २३१. 'अचेतन पडिलें शरीर प्रेत। जवळी स्त्री आली धावत। अट्टहासें शोक करित।'—ह ३३ २०८ [स अट्ट=मजला+हास] अटास पहा ०**धरणें**—महत्त्वाकांक्षा बाळगणें, हट्ट धरणें 'मराठेशाही बुडविण्याचा अट्टाहास धरून आपल्या अफाट सेनेसह महाराष्ट्रात तळ देऊन बसलेला बादशहा यावेळीं कोणती गोष्ट करीत होता?'—स्वप १३३

**अट्टा**—पु (वे) विहिरीच्या तळाशीं बांधकामाच्या खालीं बसविलेली चौकट

**अट्टाहास्य**—मोठा प्रयत्न, अट्टहास पहा 'चोरासाठीं रद बदल अट्टाहास्य। जळो जिणें दास्य बहुतांचें।।'—तुगा १८९४.

**अट्टी**—स्त्री. (कर्ना) वाहाणा, जोडे याचा तळ 'या माझ्या वाहाणा दोन अट्टीच्या आहेत [का]

**अट्टी**—स्त्री. (व) अट(१०) पहा 'अट्टी न उचलता मोगी मार'

**अट्टीखोर-बाज**—वि. अटखोर पहा

**अट्टीवाद**—पु. हट्ट, दुराग्रह, ठोक निश्चय अटीवाद पहा (क्रि० करणें, लावणें, धरणें)

**अठ**—क्रिवि (खा) इथें, येथें, अठें पहा

**अठंगुळा(ळें), अठंगूळ**—अठागुळें पहा

**अठताल**—पु कर्नाटक संगीतातील एक ताल याचे नानाप्रकार पाच आहेत ते असे १०,१२,१४,१८,२२ अष्टताल पहा

**अठतीस**—अडतीस पहा

**अठप (फ) ळें**—अटपळें पहा

**अठफळी** अटोफळी पहा

**अठरणें**—अटरणें पहा

**अठरा**—वि. १ एक संख्याविशेष, १८ २ (सांकेतिक) पुराणें (मुख्य पुराणांची संख्या १८ आहे) 'कृष्ण वर्णुनियां श्रेष्ठ। चौघे गर्जताती भाट। अठरा मागध उद्भट। वंशावळी वर्णिती।।'—एरुस्व ६ ७६ तो हा पटरीचा राणा। पुसा सद्दा चौं अठरा जणा।।'—तुगा २५२९ [स अष्टादशन्, प्रा अट्ठदह, अट्ठारस—इ, हिं अठारह,

**अटस**—वि अडस, लहान, घट्ट, मजबूत ( शरीर, बाधा ). –क्रिवि आवळ, घट्ट, करकचून ( बसणें, जुळणें ) [का अटु, अ हिसु=अटवणें ]

**ॲटहोम, ०पार्टी**—स्त्री मित्रमंडळींना छोटी मेजवानी, फराळ, उपहार यावेळीं पदार्थ मांडून ठेवलेले असतात पाहुण्यानीं लागेल तें खावें गाणें, नाच, खेळ वगैरे करमणुकीचे प्रकारहि फराळा सोबत असतात 'त्याना या औपचारिक गोष्टी आवडतच नसत ॲट ०चें नाव काढलें कीं आण्डरसनसाहेबाचें डोकें उठत असे –नपुक २३. [इं ]

**अटळ**—वि न टळणारा, चुकविता येणार नाहीं असा, न सुटणारा [स अ+टळणें सं अटल=स्थिर, मक्कम, का तळर्=हालणें, चळणें ]

**अटा**—पु प्रतिबंध, अडथळा 'हृदय विकळ जेव्हा देहभावा अटा की। ' –राधा १४८ [का अड्ड, म अट]

**अटाअट**—स्त्री १ वाण, उणीव, टचाई ( पैसा, धान्य याची) २ कोरडे पडणें, वाळून जाणें, शुष्कपणा (विहीरी, नद्या याचा) अट भट पहा [ अटणें ]

**अटाई**—स्त्री १ अटविण्याची मजुरी २ शुष्कपणा, कोरडेपणा **अटा–आट–घाट–पीटा–पिटी–पिट, अटाटी**—स्त्री १ छळ, गाजवणूक, नाश, कापाकापी 'यादवाचेआ कटका भीतरीं। पारका आटाआटी केली थोरी ॥'–शिशु ९८८ २ त्रास, भगीरथ प्रयत्न, खस्त दगदग ३ थकवा, भागवटा, शीण [ अटणें, घाटणें, पिटणें लष्करचे लोक गावीं उतरले असता तेथील लोकाकडून आटा ( पीठ ) फुकट मरून घेत, तसेंच ऋणकोकडे तगाद्यास आलेला शिपा ईहि करी त्यावरून विनाकारण त्रास (सरकारी किंवा सावकारी ) भातृसवृ हिं अटा+म पीठ] **अटापीट पाडणें**–मेहनतीस लावणें

**अटांक**—वि ( गो ) टांक नसलेला [ स अ+टक ]

**अटांगपटांग**—वि रावल्चक, लबाचवडा 'अटांगपटांग बाता तेवढ्या पाहून त्या ' [ पटांग ( ग) द्वि ]

**अटाट**—स्त्री श्रम, यातायात 'ग्रथ पूर्ण लिहून झाल्यावर छापून काढायची अटाट पडली ' –नि ६१० अटअट पहा [ अट द्वि ]

**अटाटा**—पु खल, गाजावाजा, बोभाटा 'आधीं उमासाहू बाईसारखी सच्छील बायको, त्यात त्या रुपयाचा इतका अटाटा झालेला आणि त्या कशा मागतील' –पकोंध [ अट द्वि ]

**अटाटी**—स्त्री कष्ट, श्रम, दगदग, हाल 'टाकिली अगाटी भोगावया ।' –दावि ३५ [ अट द्वि ]

**अटानिमा**—पु त्रास, अटाअट पहा

**अटारणें अठारणें**—उक्रि अवटरणें पहा

**अटारन्या घोळणें**—(व ) सतावून सोडणें 'तुम्हीं गेल्यावर आमच्या खूप अटारन्या घोळल्या त्यानें '

**अटारा**—पु १ काबाडकष्ट, ढोर मेहनत, मेटाकुटीस येणें २ कष्टामुळें थकवा, ग्लानि येणें ( क्रि० पडणें, पाडणें )

**अटारे(रो)टा**—पु १ सारा वसूल करणाऱ्या शिपायास (पीठ) रोटी वगैरे शिधा देण्याची रीत २ किरकोळ काम, हलकीं कामें (दळणकाडण, मोलमजुरी वगैरे) 'दादला मेल्यापासून मी अटारोटा करून पोट भरितें ' ३ अटापिटा पहा [ सं अन्न=अन्न, हिं अटा+रोटी ]

**अटाला**—पु (क ) घरचीं माणसें, जनावरें, खटला, लष्करी तळाचें सामानसुमान, सरंजाम, मंडळी, अवजड सामान इ० –रा ४७२१

**अटाली**—स्त्री मनोरा, मोठा वाडा, गच्ची, माडी, अटवळा, माळा 'मोडिल्या गोपुर आटाळीं।'–मुवन ३ ५, 'आटाळ्यावरि लोकलाज त्यजुनि बाळा उम्या ठाकती'–शशिसेना 'वाटाविहीं नामभरें अटाळ्या। पौरागना वाजविनात टाळ्या ॥' –सारुह ५ १७ [स अट्टाल, अट्टालक, अट्टालिका, प्रा अट्टाल –य, ते अट्टालमु–वेशीवरचा मजला, का अट्ट=माळा, सिं अट हलो, आटाले, इ ॲटिक=पोटमाळा ]

**अटास**—(प्र ) अट्टाहास, अग्हास, प्रचंड उद्योग, अत्यंत परिश्रम, मेहनत, कष्ट, अटापाट [स अत्=मोठे, फार+आयास=कष्ट]

**अटाळा–ळी–ळें**—पु स्त्री न १ अटोळा, अग्वळा, अटाली पहा 'माड्या अटाळ्या आणि उच भिंती।' –सारुह ७ ६८ २ (व ) अडगळीचा माळा 'मोडकी खाट अटाळ्यावर पडली असेल ' [ अटाली पहा ]

**अटी**—स्त्री १ मोहरमात हातात घालावयाची पिळदार दोरी, सैली, सुताची किंवा रेशमाची लड, कळी २ अट–गोटीखेळ पहा ३ हट्ट, अट 'ऐसी एका अटी। रिती शिणती करटीं ॥' –तुगा १७८४ ४कष्ट, श्रम [अट, अटा] **०तटीचा सामना**–कुस्तीचा सामना [ अट+तट+सामना ]

**अटीचा**—वि अटील हेकेखोर, मानी 'विडकर सुर्देकर आटीचे।' –ऐपो १२२ [अट] **०करार–चोली–खेळ**–पु जो हरेल त्यानें अमुक शिक्षा भोगावी किंवा दंड द्यावा असें ठरवून खेळतात तो शर्तीचा खेळ **–ची चाकरी–काम**–स्त्री विशेष शर्तीवर करावयाची, चाकरी काम **अटीबाज–खोर**–वि मानी, अटदार [का अड्ड म अट+फा बाज–खोर]

**ॲटीमनी**—स्त्री, अन धातु सुरम्याची धातु याचा मुख्य उपयोग छापखान्यातील टाईप तयार करण्याकडे करतात [ इं ] **०क्रूड**–न एक होमिओपॅथिक औषध, सर्दी व मस्तकशूळावर उपयोगी [ इं ]

**अटील**—वि. हट्टी, मानी, अटीचा [ स अटल, म अट]

**अटीली**—अटाली पहा

**अटीव**—वि १ उकडून, अटवून घट केलेलें (दूध, खीर वगैरे) २ वितळलेलें (सोनें) ३ ओतीव, वितळून तयार केलेलें 'अटीवा लोहाचे खाब जैसे।'—ज्ञा १६ ३७९ ४ कुस्ती इ० परिश्रमानें घट्ट-सणखून बनविलेलें, पिळदार (शरीर) 'जो आटीव जेठिया ऐसा।'—मुसभा ६ १५३ ५ सवुचित, अकुचित, आखुड केलेलें [अटणें प्रा अट्ट, का अट्टु]

**अटीवाद**—पु. हेकेखोरपणाचा वाद, हट्टीपणानें भाडणें, हट्ट वाद पहा [अट+वाद]

**अटु**—आटु-द पहा

**अटुक्मटुक**—अटकमटक पहा

**अटुवें**—वि. सवुचित, घाकटें 'अटुवें हियें आवडी॥'—ज्ञा ६ ७७ [अटणें]

**अटुळणें**—आटुळणें पहा

**अटेंडन्स**—पु हजिरी 'अटेंडन्स अलावन्स'=हजेरी भत्ता [इं]

**अटेन्शन**—न (ड्रिल हुकूम) लक्ष, सावधान [इं]

**अटोका**—पु शक्तीची किंवा सामर्थ्याची मजल, इयत्ता, योग्यता, आकलनशक्ति, अवाका, झेंप, पोंच [का एट्कु=आटो क्यात येणें, एट्किं=अटोका]

**अटोका(क)ट**—वि १ अत्यंत, शिकस्तीचा, वरच्या दर्जाचा, अमर्याद, अचाट, (सद्गुण, अत्युच्च गोष्टी इ) 'त्याचें अटोकाट ज्ञानहि लक्षात येऊन,'—नि ५७६ २ अढळ, बळकट, अतिशहाणा, योग्य, जहाबाज, प्रचंड ३ सर्व, समग्र, पूर्ण, एकूणएक (लहान थोर सर्व दर्जांचे) [स अट्ट=उच्च+काष्ठा=सीमा, दिशा, प्रा अट्टकट्ठा स आ+कंठ?]

**अटोप-णें**—अटप, अटपणें पहा 'त्या गुप्त कल्पना कोणास कळाव्या। कोणी येऊन आटोपाव्या॥'—रा ११ ८ १८ —**अटोपता-सार**—अटपता-अटपसार पहा

**अटोपी**—वि (व्यवस्था करण्यात) हुशार, तरबेज, चपळ, चलाख [अटपणें]

**अटोफळी**—स्त्री आठ फळांचें वायन, प्रत्येक ब्राह्मणास आठ आठप्रमाणें ६४ फळांचें दान, अठफळी, अष्टफळी [स अष्टफल]

**अटोमॅटिक**—वि १ आपोआप चालणारें होणारें, स्वयंसिद्ध 'अटोमॅटिक रिव्हॉल्व्हर' (विमा)=आपोआप चालू होणारी २ न कळत घडणारें, केवळ यांत्रिक बुद्धीच्या उपयोगाशिवाय [इं]

**अटोळा**—अटवळा, अगाली पहा 'वदोनि अटोळीं निजला घोरत।'—दावि ३४७

**अटोळी**—स्त्री १ फणसासारख्या काहीं (रातांबे, जांभूळ इ) फळांतील बी, अठळी आंब्याच्या कोयीलाहि म्हणतात २ पुरु पाच्या वृषणातील दोन गोट्यापैकीं एक, अंड [स अस्थि-अष्टि-अष्ठि प्रा अट्ठि=अपरिपक्व फळ अठी किंवा स अष्टीला, अष्टि-लिका=गोटी, गाठ, अट्ठिआ—अठळी]

**अट्टरणें**—अटरणें पहा. **अट्टरणा पाडणें**—(माण) जनावरास रुप दमविणें

**अट्टल**—वि. १ निपुण, हुशार, निष्णात उ० अट्टल पोहणारा-धावणारा, लिहिणारा २ पक्का, वस्ताद, तरबेज, बेरकी, लबाड उ०-अट्टल चोर [सं हट्टचौरक=बाजारात चोरी करणारा, प्रा अट्ट-चोर, अट्ट (ल) चोर 'ल' स्वार्थी प्रत्यय—भाअ १८३५], अट्टल सोदा, वगैरे ३ अस्सल, खरा उ० अट्टलमित्र—स्नेही ४ स्थिर, अढळ, निश्चल [स अटल=स्थिर, अचंचल, प्रा अट्ट=निर्लज्ज, बेशरम, का आटआळी=खेळाडू, हिं अटल, बं अटल]

**अट्ट(ट्टा)हास**—पु १ जोरानें, मोठ्यानें हसणें २ मोठा आवाज, स्वर, आक्रोश 'करि रुदन अट्टहासें।'—एभा३० २३१. 'अचेतन पडिलें शरीर प्रेत। जरठी स्त्री आर्ती धावत। अट्टहासें शोक करित।'—ह ३३ २०८ [स अट्ट=मजगा+हास] अटास पहा ०**धरणें**-महत्त्वाकांक्षा बाळगणें, हट्ट धरणें 'मराठेशाही बुडवि ण्याचा अट्टाहास धरून आपल्या अफाट सेनेसह महाराष्ट्रात तळ देऊन बसलेला बादशहा यावेळीं कोणती गोष्ट करीत होता?'—स्वप १३३

**अट्टा**—पु (वे) विहिरीच्या तळाशीं बांधकामाच्या खालीं बसविलेली चौकट

**अट्टाहास्य**—मोठा प्रयत्न, अट्टहास पहा 'चोरासाठीं रद बदल अट्टाहास्य। जळो जिणें दास्य घडुतांचें॥'—तुगा १८९४.

**अट्टी**—स्त्री. (कर्ना) वाहाणा, जोडे याचा तळ 'या माझ्या वाहाणा दोन अट्टीच्या आहेत [का]

**अट्टी**—स्त्री. (कु) अट (१०) पहा 'अट्टी न उचल्या गोटी मार'

**अट्टीखोर-बाज**—वि. अटखोर पहा

**अट्टीवाद**—पु. हट्ट दुराग्रह, ठोक निश्चय अगीवाद पहा (क्रि० करणें, लावणें, धरणें)

**अठ**—क्रिवि (खा) इथें, येथें, अठें पहा

**अठंगुळा(ळें), अठंगूळ**—अठागुळें पहा

**अठताल**—पु कर्नाटक संगीतातील एक ताल याचे प्रकार पाच आहेत, ते असे १०,१२,१४,१८,२२ अठ्ठताल पहा

**अठतीस**—अडतीस पहा

**अठप (फ) ळें**—अष्टपळें पहा

**अठफळी** अटोफळी पहा

**अठरणें**—अटरणें पहा

**अठरा**—वि. १ एक संख्याविशेष, १८ २ (सांकेतिक) पुराणें (मुख्य पुराणाची संख्या १८ आहे) 'हृष्ण वर्णियेलें वेद। चौपे गर्जती भाट। अठरा माथा दुद्धड। धराऊं वर्णिती॥'—एरुस्व ६ ७६ तो हा पर्वतीचा राणा। पुसा राहा चौ अठरा जणा॥'—तुगा २०३१ [स अष्टादश, प्रा अट्ठदह, अट्ठारस—ह. हिं अठारह,

पं.अटारा, यं आठार,उ अठर,गु अढार,सिं अडहं] ०अखाडे–अखाडा पहा ०उपधान्यें–न अव,सजगुरा, भादली, वरी, नाचणी, यरग, काग, खपले गहूं, मका, करडई, राजगिरा, मटकी, पावटा, मूग, वाल, कारळा, देवभात, सातू, अबाडी (दुसरी गणना) सजगुरा, नाचणी, चरी, मका, मटकी, राजगिरा, शिरस, पाढर फळी, जिरें, मेथी, वेणुबीज, देवभात, कमलबीज, पावड, अबाडी, भेंडीबीज, गोवारी, कुडयाचें बीज, यामध्यें कोठें कोठें खसखस व पांढरा राळा घालून ही संख्या विसावर नेण्यात येते ०उपपुराणें–उपपुराणें पहा ०उपजा(या)ती–स्त्री. अव अठरापगड जातीं प्रमाणें ज्या अठरा उपजाती आहेत त्या अशा , भिल, कोळी, मांग, अंत्यज, चांडाळ, पुल्कस, जिनगर, सल्तानगर, चर्मक, डोहर (ढोर), भाट, बुरुड, रजक, दागट, मोचेकरी, खाटिक, लोणारी व पैकाडी –स्वादि ६ ५ ३७–३८ ०कचेरी–स्त्री (म्हे) राज्य कारभारातील सर्व वरिष्ठ खातीं असणारी मोठी कचेरी, सेक्रेटॅरिएट ०कारखाने–पु अव १ राज्यकारभारातील खातीं (अ) उष्टर, कबुतर, जनान, जवाहीर, जामदार जिकीर, तालीम, तोफ, घटी, दफ्तर, दारू, दिवान, नगार, पील, फरास, वदी, मोदी व शिकार हे अठरा कारखाने (आ) तोप, पील, उष्टर, फरास, शिकार, रथ, जामदार, जवाहीर, जिराईत, नगार, दारू, वैद्य, लकड, इमारती, मुदबख, कुणबिणी, राजगत, पटी (इ) खजीना, दफ्तर, जामदार, पील, जिराईत, अबर, फरास, मुदबख, नगार, सरबत, आबदार, शिकार, तालीम, दारू, उष्टर, बकरे, तोप, सराफ या तीन व आणखीहि कित्येक निरनिराळ्या याद्या सापडतात हे सर्व कारखाने सरकारी असून त्यावर स्वतंत्र अधिकारी असत सर्वांवर खानगी कारभारी मुख्य असे 'त्याच्या अठरा कारखान्याच्या गल्या वका ।'–ऐपो १४२ २ (ल) मोठ्या संसाराच्या किंवा व्यवहाराच्या शाखा–खातीं [अठरा+फा कार्खाना] ०खूम–न. लोकांच्या अठरा जाती सर्व प्रकारचे लोक, अठरापगड जात 'या गावात एक मुकादम नाहीं, अठरा खुमाचे अठरा वेगळाले आहेत,' शिवाय –भाअ १८३४ ४७ [अर० कौम, फा खूम=जात,] ०गुणांचा खंडोबा–पु (ल.) १ सर्व (दुर्)गुणांनीं भरलेला, लुच्चा किंवा लबाड इसम, अट्टल सोदा

३ निविशयान (नार्वेजियन), ४ यम्रदोर ?, ५ ग्रेग (ग्रीक), ६ रखतार ?, ७ लतियान (लाटिन), ८ यहुदिन (ज्यू), ९ इंगरे (इग्रज), १० फरासीस (फ्रेंच), ११ कसनत्यान (शेटलंडियन केल्टिक ?), १२ विनेत (व्हेनेशियन), १३ दिनमार्क (डिन्मार्क), १४ उरुम (आयरिश किंवा रशियन), १५ रुमियान (रुमानियन किंवा रोमन), १६ तलियान (इटालियन), १७ सुवेस (स्विस), १८ प्रेमरयान (पोमेरॅनियन) –भाइ १८३५ दुसरी एक यादी–फिरंगी इंग्लिश, फ्रान्सीस, सिंध, पावलिस्त, मिस्त, ब्रम्हेय, डौन, डुप, माज, सुस्त, नाग, जर्मिनी, कालील, वाक, चीन, युवरेर, दौंडी –कोको याल दुसते युरोपियन येत नसून हिंदुस्तानाबाहेरील चिनी वगैरेहि लोक येतात 'वडिलाची अठराटोपीकरावर सलावत आहे'–विवि ८ ३ ५५ ०तत्त्वें–न. अव. महान् (बुद्धि), अहंकार, मन, दहा इंद्रियें आणि पंचतन्मात्रें –गीर १८५ ०धान्यें–न मुख्य धान्यें–गहू, साळ, तूर, जव, जोंधळा, वाटाणा, लाख, चणा, जवस, मसूर, मूग, राळा, तीळ, हरीक, कुळीथ, सावा, उडीद, चवळी ०धान्यांचें कडबोळें–न (भाजणी–अठरा धान्यें भाजून केलेल्या पिठाचा एक खाद्य पदार्थ) (ल) १ निरनिराळ्या प्रकारच्या गोष्टींचें मिश्रण २ अनौरस अपत्य, जारज ३ भिन्न जातींचा संकर, संकरजात, संकर जातींतील व्यक्ति ०पगडजात–स्त्री १ तांबट, पाथरवट, लोहार, सुतार, सोनार, कासार, कुंभार, देवळक (गुरव), धनगर, गौळी, लाडवाणी, जैन, कोष्टी, साळी, चितारी, माळी, तेली, रंगारी –स्वादि ६ ५ ३५ ३६ जशी युरोपियनात टोप्याची –अठरा टोप कर–तशी हिंदु लोकांची पगडया बांधण्याची तऱ्हा जातीजातींत वेगळी आहे, तेव्हा जितक्या जाती तितके पगडयाचे प्रकार, यावरून सर्व जाती किंवा जातींचे लोक, एकूणएक लोक २ अव्यवस्थित, मिश्र जनसमूह, नाना धर्मांचा जमाव 'या यात्रेंत अठरापगड जात मिळाली आहे, तेथें सोंवळें काय पुसता?' [अठरा+पगडी किंवा पगडा=फाशावरील संख्यावाचक चिन्ह] ०पद्में वानर–पु अव तरुणाचा जमाव, टोळी, सैन्य, वानरसेना (रामाला मदत करणारीं १८ पद्में वानरें होतीं) ०पर्वें–न अव महाभारताचीं मुख्य प्रकरणें –आदि, सभा, वन, विराट, उद्योग,

०वर्ण—पु अव अठरा (पगड) जाती याची एक याद अशी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, कुंभार, गवळी, तेली, पाचाल (सोनार सुतार, लोहार, तांबट, पाथरवट, हे पाच मिळून), कोष्टी, रंगारी, शिंपी, न्हावी, पारधी, महार, धनगर, परीट, मांग व चांभार ०विसवे (विश्वे)—वि अतिशय, बहुतेक परिपूर्ण, जास्त प्रमाणाचे विश्वा, विसवा पहा [ अठरा विसावा, वीस विसाव्याचा एक रुका, अठरा विसवे म्हणजे दोन विसवा कमी इतके, बहुतेक पूर्ण ] ०दारिद्र्य (दरिद्र)—न अतिशय गरिबी 'त्याच्या घरीं अठरा विश्वे दरिद्र आहे' 'अठराविश्वे दरिद्र पाणी वाहतें' ०विश्वे–पापपुण्य–चौकशी–मूर्ख–धर्म–रोग इ० वाक्प्रचार

**अठलोंग**—क्रिवि (खा) येथपर्यंत, (व) अठलोक. 'अठलोक आरता?' [स अत्र+रूप]

**अठव, अठवगिरी**—पुस्त्री आठवण, स्मृति, स्मरण, आठवण पहा 'अठव देई सूर्यनंदना।' (क्रि० देणें, होणें)

**अठवडकरी**—पु आठवड्याच्या आठवड्याला (आठ दिवसांनीं) व्याज मागणारा, पिळून काढणारा खिस्ती, सावकार [अठवडा+करी]

**अठवडा**—पु आठ दिवसाचा काल (रविवार ते रविवार दोन्ही दिवस धरून), महिन्याचा एकचतुर्थांश भाग, पंधरवड्याचा निम्मा [स अष्टावर्त–अष्टवासर–अष्टवार, प्रा अट्ठवाड, अठाह, म आठवडा, हिं अठवाड़ा, आठवारा, सिं अठिड़यो, ते अठवांड] —डा–ड्या–वि १ आठ दिवसांनीं तापानें आजारी पडणारा, कधीं बरा तर कधीं दुखणेकरी (चाकर, मूल, इ०) २ आठ दिवस दूध देऊन नंतर तें देण्याचें बंद करणारी (गाय, म्हैस)

**अठवडे पा(चा)ईक**—वि थोडे दिवस चालणारा किंवा टिकणारा, अठवड्याच्या मुदतीचा, (ल) थोड्या मुदतीचा, स्वकर्त्तृ कामावरून दूर होण्यासारखा (सरकारी कामगार, नोकर, इ०) [अठवडा+स पदाति, प्रा पाइक्क म पाईक=गावकामगार वाईक प्रत्यय]

**अठवण**—स्त्री ध्यान स्मरण, स्मृति, धारणा, धारणाशक्ति आठवण पहा 'पूर्व सुखाची अठवण दती। स्वर्गे कितीक विपिनीं॥' —मम ९

**अठवर**—वि १ अविवाहित विवाहाचें वय होऊन गेलें आहे असा, घोडनवरा–री (कातकरी लोक अजून हा शब्द वापरतात) 'फुल सूतळीचेआं राया अठवरा। माहेया खाड्याचा कांति गोवरा॥' —शिशु ७२७ २ निबर निबरट 'तुजवेची वन्दूणें बोलें। आगां आठवरपण आलें॥' —शिशु २०८ [स अष्टि, प्रा अट्ठी=अठळी, निबर, मोठा अट्ठ+वर तुल० अठवर्या]

**अठव्या**—वि आठव्या पहा

**अठविणे**—आठविणें पहा

**अठवें**—न एक वैली माप, निठवें, अर्धाशेर, पायलीचा ८ वा हिस्सा [आठ]

**अठसटि, अठसठ**—६८ संख्या, अडुसष्ट पहा 'अठसटि तीर्थांचा तोडह।' —शिशु १४

**अठ्ठत्तर**—वि ७८ संख्या, अठ्याहत्तर पहा [हिं]

**अठळी**—अठोळी पहा

**अठांगळें, अठांगुळें, अठांगूळ**—न गर्भाधानसंस्कार योग्य काळीं न्हावयाचा राहिल्यास गर्भाच्या आठव्या महिन्यात पुंसवन व सीमंतोन्नयन या दोन संस्कारासह गर्भाधान संस्कार करतात यातील सर्व विधि गर्भाधानाप्रमाणेंच (ऋतुशांतीसह) करावयाचा असतो, अष्टमागल्य पहा 'मग जीवाचेनि मेळें। विकरलेंपणाचें आठांगुळें केलें॥' —शिशु ९०, 'तुझ्या भयानें गाळीं आम्ही आगुळ कराया आठ॥' —होन ३९ [स अष्टाग–अट्ठग? अष्ट+अंगुल?]

**अठायीं**—क्रिवि १ अनाठायीं, भलत्या जागीं, एकीकडे 'अठायीं ठेकलिया नवनीत। मांजरा करीं चाटवीत॥' २ धोक्याच्या जागीं, शरीराच्या नाजूक, गुह्य भागीं (दिलेला ठोसा, धक्का इ०) [स अ+स्थान, प्रा ठाण–ठाय]

**अठाविसायुगीं**—क्रिवि अठ्ठाविसाव्या युगात (ल) कधींच नाहीं (चार युगाची एक अशा सात चौकड्या व्हावयाच्या, म्हणजे इतका लांबचा काळ, यावरून लक्षणेनें), कडच्या आदितवारीं

**अठिवेठी**—स्त्री येरझारा, जाये, जाणें–येणें [स अत्र, खा. अठी–येथें द्वि]

**अठी**—स्त्री कपाळावरील सुरकुती, अढी, वळी 'एक दृष्टी पाहता इसी। कपाळासी घालती अठी॥' २ मनातील गाठ किंवा विपरीत वाईट ग्रह ३ सैली, अटी (१) पहा ४ मिठी, ऐक्य [का. अड्ड] (क्रि० धरणें). ०घालणें १ कपाळ संकुचित करणें, नाखुशी–तिरस्कार दाखविणें २ आलिंगिणें, कवटाळणें ०कमरेस घालणें–कमरस विळखा घालणें, मिठी मारणें

**अठी**—स्त्री १ फळातील बी अठोळी, अठळी २ (ल) कठीण चिवट गोष्ट–मुद्दा–प्रसंग अवघड, भानगडीची बाब [स अष्टि, प्रा अट्ठी]

**अठी**—क्रिवि (खा व) इथें, येथें [स अत्र] ०तठी–क्रिवि इकडे तिकडे, येथें तेथें 'अठीतठी काय फिरतोस?' [स अत्र+तत्र]

**अठीं–अठें**—क्रिवि आठानीं गुणिलें असता 'एकी अठीं आठ' [आठ+इ, ए तृ०चे प्रत्यय]

**अठ्ठर**—क्रिवि (कु) पुष्कळ, भरपूर [म आढ्य, प्रा अड्ड, का अड्ड=सघन, पुष्कळ?]

**अठ्ठळ**—अठोळी पहा

**अठे**—क्रिवि (गा) अठी, एथें येथें [म यत्र]

**अठोक(प) परब्रह्म**—न (ब्रह्माचें एक गुणनाम) १ अगा मासिक, सिद्ध किंवा असाधित शब्दाला ही उपरोधिक सज्ञा लावि तात, मूढ शब्द २ (ल) मद्द, दगड, टोंण्या, ज्याला शिकवि ण्याचा काहीं उपयोग नाहीं असा, निसर्गसिद्ध बाळ! [अठोक =अघड, अजात+परब्रह्म]

**अठोनीवेठोनी**—वि १ पिळदार, पगीदार २ (ल) वेडा धाकडा, कमानदार 'अठोनी वठोनी बाधला मुडासा। फिरतसे म्हैसा जनामधीं ॥' –तुगा ३१७४ [अटीवेटी, अटी+वेष्टन, किंवा वेठ (=वेष्टन) द्वि]

**अठोपहार**—क्रिवि नेहमीं, सतत, कायम, अष्टौप्रहर पहा [आठ प्रहर स अष्टौप्रहर] •**बत्तीस घड्या**–निरंतर, कायमपणें, सारखें चालू

**अठोफळी**—अटोफळी (वाण) पहा

**अठोळा–ळी**—स्त्री अठळी, बी, अगोळी पहा

**अट्ठा**—पु १ फाशाच्या खेळात आठाचें दान २ पत्त्याच्या खेळात आठ चिन्हाचा पत्ता अठ्या [स अष्ट, म आठ]

**अट्ठावन–न्न**—वि ५८ ही सख्या [स अष्टपचाशत्–अष्ट पचाश प्रा अट्ठावन, सिं अठवजाह, हिं अठावन]

**अट्ठावीस**—वि २८ ही सख्या [स अष्टाविंशति, प्रा अट्ठा वीसइ–अट्ठावीस, सिं अट्ठावीह, हिं अठाईस]

**अट्ठीं**—क्रिवि (पटाच्या खेळात) आठव्या घरात अटीं पहा [आठ+इ]

**अट्ठेचाळ–चाळीस, अट्ठेताळ–ताळीस, अट्ठयेचाळ–चाळीस, अट्ठयेताळ–ताळीस**—वि ४८ ही सख्या [स अष्टचत्वारिंशत् प्रा अट्ठचत्तालीस, अट्ठतालीस, हिं अठतालीस, सिं अठेतालीह]

**अट्ठेहत्तर, अट्ठयाहत्तर, अट्ठयेत्तर**—वि ७८ ही सख्या [स अष्टसप्तति=प्रा अट्ठत्तरि अट्ठहत्तरि, हिं अठत्तर सिं अठ हतरी]

**अट्ठ्या**—पु गजिफा आणि पत्त्याच्या खेळातला आठ-चिन्हाचा पत्ता, अठ्ठा [आठ]

**अट्ठ्यायेंशीं–यशीं–अठ्याशीं**—वि ८८ ही सख्या, [स अष्टाशीति, प्रा अट्ठासीइ, अठासि हिं सिं –अठासी]

**अट्ठ्याण्णव**—वि ९८ ही सख्या [स अष्टनवति प्रा अट्ठाणउइ हिं अठाणवे, सिं अठानवे] २ (व) बदमाष, लबाड

**अड**—अ कमीपणा, उणेपणा, दुय्यमपणा, न्यूनता, गौणता दर्शविणारें उपपद हें लागून कित्येक सामासिक शब्द बनतात, जसें अडघोडा, अडधोतर, अडबंड, अडसर इ० अडच्या ऐवजीं कधींकधीं 'आड' असें रूप येतें सामान्यत देशावरील लोक अड असें योजितात, कोंकणात आड असें वापरतात तेव्हा अड आणि आड यांनीं आरंभ होणारे शब्द एकमेकात घुसडले जातात त्याकरितां इष्ट शब्द एकाठिकाणीं नसल्यास दुसऱ्याठिकाणीं सापडेल सूचना– सस्कृत अर्ध या शब्दापासून बनलेले व कानडी अड्ड (=अडवा, हट्ट, दुराग्रह) या शब्दापासून बनलेले सामासिक शब्द याचा घोंटाळा होऊ देऊं नये, म्हणून प्रथम अड–अर्ध पासून सभवलेले शब्द दिलेले आहेत, नंतर कानडी अड्ड पासून सावलेले शब्द घेतले आहेत काहीं शब्द या दोन्हीं वर्गांतहि पडतील, पण ते कोठेंतरी एका ठिकाणीं दिले आहेत ज्याचा सबंध या दोहीं अडशीं नाहीं किंवा जे महत्त्वाचे वाटले, ते स्वतंत्रच दिले आहेत [स अर्ध, प्रा अड्ड] •**कणी**–स्त्री तांदूळ, डाळ, इत्यादिकाची मोठी कणी, प्रसंगविशेषीं ही तांदूळ–डाळींतहि मोडते, फुटका, अर्धवट दाणा, कणी. 'कापुराचिआ भाजनियां। वाटीनि मौक्तिकाचिआ अडकणिया ॥' –शिशु ५९१ •**काष्टा**–पु धोतर वगैरेचा आखुड किंवा अपुरा मुडपा, काष्टा आडकाष्टा पहा. •**कुडतें**–न लहान कुडतें, कुडतें पहा. •**खंड**–पु तुकडा, अर्ध वट, अपुरा भाग 'मातीत माती नसून अडखड नसावेत' –मुण्या २६ •**खप्या**–वि १ अंगमेहनतीनें काहीं कामें करून पोट भरणारा मुलगा, पोऱ्या २ किरकोळ काम करणारा नोकर, आडकाम्या, बगल्या, दुसऱ्याच्या हाताखालीं काम करणारा. •**खोल**–न १ बांधून न काढलेली, सरासरी खणलेली विहीर, रेताड जमीनींत खणलेली व न बांधलेली विहीर २ केरकचरा टाकण्याची विहीर, खड्डा, होर लेली विहिर, अर्धीच खणून टाकलेली विहीर •**गडी**–पु काम करणाऱ्याच्या हाताखालचा गडी किंवा मजूर, मदतनीस, हस्तक, अड खप्या •**गांव**–पुन लहान खेडेंगाव, मोठी बाजार पेठ नसलेलें पण ज्याच्या जवळपास मोठे रहदारीचे रस्ते नाहींत असा भररस्त्या वर नसलेला गाव, खेडें, वाडी, गावठें गाव •**गोलमा**–अडकाम्या, पोरगा, गोलमा पहा •**गोण**–स्त्री बैल वगैरेवरून वाहून नेतात ती धान्याची लहान गोणी •**घर**–न मुख्य घराजवळ बांध लेलें लहानसें घर किंवा छप्पर, झोंपडें, सोपा, पडवी आउट हौस •**घोडा**–पु लहान घोडा, प्रसंग विशेषीं मोठ्या घोड्याचेंहि काम करणारा घोडा, तट्टू •**जात**–आडजात पहा •**जिना**–पु दुसरा लहान जिना, मागील जिना, चोर जिना •**जुना–जून**–वि अर्ध वट जुना, उपयोगानें काहींसा नादुरुस्त झालेला वापरलेला, निरु पयोगी •**दाणा**–पु घोड्यास खावयास हरभऱ्याव्यतिरिक्त, दिलेलें धान्य दाणा, (घोड्याचा दाणा म्हणजे हरभरा) •**दाळ**–स्त्री डाळीमधला मोठा किंवा जाडा चुरा, अडकणी •**धोतर**–न. लहान धोतर किंवा मोठा पंचा अडपंचा पहा •**नर**–स्त्री स्त्रीत्व नसणारी, स्त्री–इंद्रिय असून ऋतु प्राप्त होत नाहीं अशी •**पंचा**–पु अगदीं लहान पंचा, •**पडदणी**–स्त्री न्हाताना वेढून घेण्याची लहान पडदणी, वस्त्र, जुनेर •**पन्हळ**–पु अडनळ पहा

॰पेठ–स्त्री अडगार, छोटासा बाजारगाव ॰फळें–न अव अट फळें पहा ॰बंदर–न १ लहान किंवा विशेष व्यापारी महत्त्व नसलेलें बंदर २ गलबतांना तात्पुरतें नांगरण्याला पुरेसें, लहान, किंवा सुरक्षित नसणारें बंदर ॰वाण्या–पु वारपण गेलें पण अजून वाऱ्या झाला नाहीं असा जवान पोऱ्या तरणा बांड, सोळा सतरा वयाचा मुलगा, प्रौढपणा न आलेला माणूस ॰वायको–स्त्री बहुगी, नुकतीच वयात आलेली मुलगी (बारा तेरा वर्षांची), अर्धवट प्रौढ बायका ॰मुलगा–पु मुलगा, पोऱ्या, छोकरा, अल्पवयी ॰म्हातारा–पु म्हातारपणांत प्रवेश करणारा, जरा उतार वयाचा माणूस मध्यमवयस्क ॰शहर–न लहान शहर 'दक्षत जवळच शकेवर होतें आडशहरांतलें तें, किती मोठें असणार'' –मुद ३४ ॰साग–न नाटकांतील दुय्यम किंवा हलका नट, हलकें, गौण पात्र ॰स्वयंपाक–सैंपाक–पु चटण्या, कोशिंबिरी भाज्या वगैरे, मुख्य पदार्थांखेरीज इतर किरकोळ स्वयंपाक

**अड**—स्त्री १ अडथळा, अटकाव आडकाठी, प्रतिबंध २ दुराग्रह हट्ट, हेका ३ बोली, अट शर्त वगैरे इतर मर्त अर्थी अट पहा [का अड–ई=आड, अडविणें, आडवा येणें, अस्थला करणें विरुद्ध जाणें (तुल०) हिं अड=भांडण] ॰कट–कंठ–पु आडमार्ग आडवाट कठीण वाट 'यई प्राणायामानेंनि अडकठें। वरोता गा ॥' –ज्ञा ६ ५५ [आड+कट=वाट,+कंठ] ॰कथा–स्त्री १ उपकथा, सहज, ओघानें आलेली गोष्ट, प्रसंगोपातकथा 'आता असो हे आडकथा। दशरथा लागली अवस्था ॥' –कथा ३ ३ १६ २ विषयांतर, अवांतर कथा, आगंतुक गोष्ट ३ वाह्यात किंवा वाष्कळ भाषण ॰कर–वि १ हट्टी, हेकेखोर अटसार पहा २ अडून बसणारा, अडेल–(घोडा) ३ गच्च बसणारा, कठीण जड (कपडा इ०) [अड=अट+कर] ॰काठी–स्त्री आडकाठी पहा ॰काम–न १ दुसऱ्या कामाच्या आनुषंगिक काम मुख्य कामांत निघालेलें किरकोळ काम, बारीक काम, अडप झडप २ सडा, समार्जन, भाजी चिरणें इत्यादि स्वयंपाकाच्या अगमूल गौण कामें ॰काम–क्या–वि अडकामाच्या, किरकोळ कामाच्या उपयोगी बारीक सारीक कामें करणारा ॰कूट–न कुडण, कुपण कापाउंड आडकूट पहा [आड+कूड] ॰खर्च–पु समाराम नित्य लागणाऱ्या अन्नवस्त्रादि जरूरींच्या मुख्य खर्चांखेरीज (प्रसंगविशेषीं उद्भवणारा पानसुपारी स्यालीखुशाली वगैरे संबंधीं) किरकोळ खर्च किंवा जादा खर्च ॰खळ–खुळा–खूळ–पु स्त्री न १ अडथळा अटकाव, व्यत्यय अडचण, अडगळ. (क्रि० करणें घालणें लावणें) 'कर्मकर्म अव्यक्त मूर्ती। वैशापरी अडखळ ॥' –भवि १४ १५४ २ ठेंच लागण्या सारखी, अडथळा होण्याजोगी जागा [अडखळणें] ॰खाणें–द–घा–न जेवणाशिवाय फळफळावळ, मेवामिठाई, यासारखें दुय्यम खाणें, फराळ, उपहार, किरकोळ खाणें ॰खोर–वि अडेल, आग्रही, हेकेखोर, हट्टी, अटखोर ॰गल्ली–स्त्री बारीक बोळ, लहान गल्ली, मोठ्या रस्त्याला फुटणारा लहान रस्ता, निवळ वाट ॰गाळा–न (बे) बैलगाडीचा साटा [म गाळा किंवा का गळे=बेड, बांध] ॰गिरा(ऱ्हा)इक–की–वि दुकानदारापासून प्रत्यक्ष विकत न घेतलेला किंवा त्याला विकत न दिलेला ॰गिरा(ऱ्हा)इक–पु न दुकानदारापासून प्रत्यक्ष विकत न घेणारा माणूस, दुकानदार नसलेला, बिनउदमी ॰गोष्ट–अडकथा पहा ॰ग्राई (ह) क–की–अडगिराइक पहा ॰तट्टू–पु १ अडणारा, अडून राहणारा तट्टू अडेल तट्टू २ (ल) अडून बसणारा, तिरसटपणा, हेकेखोरपणा धरून सरळ न वागणारा, अडलड पहा ॰ताळा–पु १ अडथळा पहा 'कांहींच सद्गुरु नसे अडताळा ॥' –दावि ५ [अडथळा अप] २ हिशोबाचा पडताळा [अड+ताळा] (क्रि० घेणें, पाहणें) ॰नळ–पु १ रहाटगाडग्याच्या कोळंब्यापासून पाटथारोळ्यापर्यंत पाणी जाण्यास घातलेला दोन्ही तोंडें बंद असलेला व एका टोंकाच्या बाजूस पाणी पडण्यासाठीं भोंक असलेला लहान आडवा पन्हळ २ दार लावताना दारावर बसविण्याची चिमणी ३ पाण्याचा पाट चालू रहावा म्हणून मध्यें घातलेला लहान पन्हळ ॰पसारा–पु सटरफटर, अडगळ, फालतू वस्तु ॰भिंत–स्त्री आडवी भिंत, आडोसा 'अडभिंत तेथ लुगडें आहे।' –सप्र २.१२ ॰मार्ग–पु आडवाट ॰मिळकत–प्राप्ति–स्त्री जादा मिळकत–नफा, नेहमींच्या ठराविक प्राप्तीशिवाय मिळणारी अधिक मिळकत, नेहमींच्या प्राप्तीच्या मार्गाशिवाय इतर मार्गानें होणारी मिळकत ॰रान–न १ आडभाग, एकीकडची जागा–स्थळ, रस्त्यापासून दूरचा प्रदेश २ (ल०) वादविवादप्रसंगीं बोलण्याची, सरळ रीत सोडून धरलेली वाकडी रीत, विषयांतर, सरळ मार्ग मोडणें, आडरान पहा ॰वळण–णी–न राजरस्त्यात नसलेला, एका बाजूस असणारा प्रदेश, एकीकडचें, एकांत स्थळ –वि आडवळणात असलेला(गाव वगैरे) –क्रिवि मर्यादपलीकडे ऐन बाजूस एकीकडे ॰सट्टा–पु १ अनमान अदाज, वत (क्रि० पाहणें) २ टप्पा, पोहोंच, धाव, आवाका ३ (ना) अडचण [हिं अडसा, सिं अटिसटो, गु अडसटो] ॰सट्ट्यांत येणें–(व) अडचणींत येणें, कचाट्यात सापडणें ॰सर–पु आडसर पहा

**अड**—आड पहा

**अडऊं**—न अरण्य रान अटवी 'यागिया रीगना अडऊ। –शिशु १०९ [स अटवी, प्रा अडइ]

**अडक**—स्त्री न आडनाव कुलनाम घराण्याचें नाव [गु

**अडकई**—स्त्री (कु) एक औषधि वनस्पति

**अडकण**—न अडथळा किंवा अटकाव करणारी कोणतीहि वस्तु उ० धुणा गाडी थारविण्यासाठीं लावलेला दगड, दाराची खिट्टी, माळेची गाठ, अडसर, खिळा वगैरे [अडकणें]

शको १ ५

**अडकणी**—स्त्री अडक्वणें, थोपविणें, थावविणें, अडचण, अडथळा करणारी गोष्ट [अडकणें]

**अडकणें**—अक्रि गुतून राहणें, प्रतिबंध होणें, चिकटलें जाणें, पकडलें जाणें, कुंठितगति होणें, थाबविलें जाणें [अटक–अडक]

**अडकणें**—न पुरुषाचा एक सोन्याचा दागिना –ऐरापुविवि ४-६ [अडकण]

**अडकवण**—स्त्री ज्यामुळें अटकाव होतो ती वस्तु (गाठ, आकडा, घोडा, फासा इ०), अडकण [अडकणें]

**अडकविणें**—उक्रि थावविणें, थोपविणें, हरकत करणें, अटकाव करणें, प्रतिबंध करणें, बंद करणें [अडकणें]

**अडकळणें**—अडखळणें पहा

**अडका**—पु १ अर्धा रुका २ (सामान्यत) दाम, पैसा 'शिष्यास न लाविती साधन। न करविती इंद्रियें दमन। ऐसे गुरु अडक्याचे तीन। मिळाले तरी त्यजावे॥' –दा ५ २ २१ ३ रुपयाचा चतुर्थांश –बाळ्ळीकी स्त्री०–१ अडक्याची देवता (किंवा भवानी), सापिक्याचा शेंदूर, २ जळला तुमचा अडका माझा मूलच लाडका, ३ अडक्याची केली वाण, लोणच्याची केली धाण, ४ (व) अडक्याचें दिडकें, पैशाचे सव्वा शेर=ज्याला हिशेब करता येत नाहीं त्याची अशी समजूत करून देणें, ५ हातीं नाहीं अडका, बाजारात चालला धडका ४ जमीनीच्या मोजमापात अर्धा रुका (६५ चिचे विस्ताराची जमीन) [स अर्द रुरा, अर्द्धक] **अडक्याचा घोडा**–(ल) थोडक्या प्रयासानें व हलक्या मोलानें मिळणारी वस्तु

**अडका**—न (गोंडी) मडकें 'अडका ते ऊडका कोसाला अडका'

**अडकाअडकी**—स्त्री गुंतागुंत अटकाव, अडथळा, विघ्न [अडकणें]

**अडकाव-णी, विणें**—अटकाव-णी,–विणें पहा

**अडकित्ता**—पु १ सुपारी कातरण्याचें, कापण्याचें एक हत्यार–साधन, सरोता २ (ल) तावडीत किंवा प्रतिबंधात ठेवणारा माणूस वस्तु 'वडिलाचा अडकित्ता असावा'=आपल्यापेक्षा मोठ्या व वरिष्ठ लोकाची भीति धरून वागणूक ठेवावी, शिस्तींत रहावें [का अडकोत्तु (अडके=सुपारी कोट्टु=तासणें, कापणें), तुलु इडक्त्ति, ते अडकत्तु] **अडकित्त्यांत घालणें-धरणें**–अडचणींत, पेंचात धरणें, अनिष्ट स्थितींत अटकावून ठेवणें **अडकित्त्यांत सापडणें–पडणें**–मकरांत, पेंचात सापडणें–पडणें

**अडकूल**—न (व) पोहे भातकूल [स अंटे=शिजविलेले तांदूळ+कुट ?]

**अडकें**—न अडथळा, अडकाठी, प्रतिबंध, विघ्न त्रास [अडकणें]

**अडखळण**—स्त्री (अडखळ पहा) १ टेंचकादून पडण्यासारखी जागा–प्रसंग, अडथळा २ एखादी वस्तु पडू नये–सांडू नये म्हणून केलेली योजना (उ० दौतीचा ठोकळा, दाराची खिटी, खीळ, जोडवें पडू नये म्हणून केलेलें वलय, इ०) –णी–स्त्री टेंचकळणी, अडखळण पहा

**अडख(खु)ळणें**—अक्रि १ टेंचकादून थावणें, टेंचकळणें, धडपडणें, गतिरोध होणें, अडणें 'अडखुळलों म्हालों म्हणती ते पतिव्रते।' –वसा ८ २ जिव्हादोषामुळें बोलताना लागणें, अडणें, चाचरणें, चाचरणें, गुटमळणें 'तिनें भिऊन अडखळत आपलें वर्तमान सांगितलें' –पाव्ह ४८ ३ कामात कचरणें, घरसोड करणें, काकू करणें, नाचू करणें (अडचणींत) सापडणें, ४ गुंतणें, हात अडकणें [स अर्ध+स्खलन, का अड्डु+खळण]

**अडख(क)ळणें**—(कों) आटळणें पहा

**अडखळविणें**—उक्रि टेंचकाळावयास लावणें, गडबडविणें, अडखळायास लावणें (शब्दश व ल)

**अडगई**—स्त्री महाळुंग सोलून, शिजवून त्यात दहीं, हिंग, मीठ वगैरे घालून केलेलें रायतें, कोशिंबीर [?]

**अडगव-णी**—स्त्री रचना, लावालावी, व्यवस्था, यथायोग्य मांडणी [का अडकु=रचणें, लावणें]

**अडगवणी**—स्त्री (कों) भाताचें पीक तयार होऊन कापून वाळलें म्हणजे त्याचे भारे बांधून उडवी डाळतात ती कृति 'काल आमची अडगवणी संपली' [का अडकु=गंजी करणें, रचणें]

**अडगव(वि)णें**—सक्रि (कों) १ योग्य जागीं, जागच्या जागीं ठेवणें, व्यवस्था करणें २ कामधंद्याकडे उपयोगास लाविणें, उपयोगी लावणें ३ (ल) मरणोत्तर व्यवस्था करणें, विल्हेवाट लावणें 'म्हातारी एवढी अडगवली म्हणजे मी मोकळा होईन' ४ निवडणें [का अडकु=रचणें, नीट ठेवणें]

**अडगळ**—स्त्री निरुपयोगी, अडचण करणाऱ्या वस्तु–सामान, पसारा, परवड –पु (क) अडसर [स अर्गला, का अड्ड=आड+गळणें]

**अडगा**—वि (कर पुण) अडाणी, अशिक्षित, अज्ञ 'अडगा माणूस निरुपयोगी आहे', 'अशा अडग्यासारखा काय करतोस!'

**अडगाई**—भडगाई ? ०चाटाई–रघळपणा ? 'ऐसें लटिकेंचि अडगाई चाटाईनें बोलिला।' –पच ३ १५

**अडगुणवडगुण**—न (ग्रा) फाल्तुकवस्तु, सटरफटर सामान, अडगळ [अडगवणें]

**अडगुलंमडगुलं**—वि खेळकर–बोलकें(मूल) गाणें–'अडगुल मडगुल। सोन्याचं कडगुल। रुप्याचा वाळा। तान्ह्या बाळा। तीट' (अथ) किती बाळ खेळतं! किती बाळ बोलतं! हातांत सोन्याची कडीं, पायांत रुप्याचा वाळा घातला आहे बाळा! तुला दृष्ट होऊं नये म्हणून तीट लावतें –विज १२ १९१६ [का आडु=खेळ+गुळी=वर याप्रमाणें प्रत्यय मातु=बोल, भाषा+गार–कार]

**अडवण**—वि (ना )हटी, हेकेखोर, लवकर पठणीस न येणारा

**अडवाली**—स्त्री आडमार्ग –मनको [ अडगी ? ]

**अडच-चा**—क्रिवि गच्च मजबूत ,घट्ट,आवळून, अडून [अडणें]

**अडचण**—स्त्री १ अरुंदपणा, चिंचोळेपणा, जागेचा अभाव, आकुंचितपणा, संकोच २ गर्दी, दाटी यामुळे होणारा त्रास किंवा उपद्रव गैरसोय ३ सटरफटर, पाल्हाळ सामान, अडगळ ४ (ल ) पंचाईत, निकड, तारवळ, लगबगीचें –घाईचें काम, वेळ, स्थिति, संकट, त्रास, निरुपायदशा ५ वैगुण्य टंचाई [अडच] ०येणें-सुतक येणें, रज स्वला होणें, काहीं विघ्न येणें ०सांगणें-सबब, खेकटें, नड सांगणें, आपणास अडथळा करणाऱ्या गोष्टी सांगणें **अडच णीचें दु ख**—भलत्यान किंवा अवघड जागीं [ गुह्यमार्गी ] झालेलें दु ख, आजार, विकार **म्ह०** अ० आणि जावई वैद्य **अडचणीची वाट**—घोटाळ्याचा–अवघड रस्ता

**अडचणणें**—अक्रि गर्दी दाटी, अडचण होणें, चिमटलें जाणें २ तारांबळ होणें, ओढ, निकड, ताण लागणें [ अडचण ]

**अडचणूक**—स्त्री घोटाळा, गैरसोय, अडचण पहा ०मोडणें–नड, अडचण नाहींशी करणें, अडचण काढून टाकणें, विघ्न, संकट निवारणें

**अडचणें**—अक्रि १ आवळ, घट्ट होणें, दाटणें, अडस होणें, (कपडा, बांगडी ) २ आवळणें, आवळून बांधणें, थोडया जागेंत समाविष्ट करणें ( वस्तू ओझीं ) ३ ( ल ) अडचणींत सांपडणें, संकटांत असणें [ अडच ]

**अडची**—स्त्री गाय, म्हैस इत्यादिकांचें दूध काढण्याच्या वेळीं त्या हाल नयेत, लाथा मारू नयेत म्हणून त्यांना अडचण होण्या जोगे जे दोन दोहींकडे वासे बांधतात ते [ अडच ]

**अडचें( र्चें )**—क्रिवि ( अडचाच्या पाढयांत ) अडीच वेळा ' पंचवीस अडचें साडे बासष्ट ' [ अडीच ]

**ॲडजर्न**—सक्रि १ तहकूब करणें, लांबणीवर टाकणें २ नियमित काम अपुरें राहिल्यास सभा पुन बोलाविणें, दुसऱ्या बैठकी पर्यंत सभा तहकूब ठेवणें [ इं ] ०मेंट—स्त्री तहकुबी

**अडज्यूडंट**—अॅडिजन पहा [ इं ]

**अडंडळ**—वि अढळ, बिनधोक ' तरावया भवाब्धि प्रबळ । चरणाची नाव अडंडळ ॥ ' –एभा ५ ३७९ [ प्रा डिंडिर–स्खलित दुडळ=भ्रमित ]

**अडण**—न १ गाई–म्हशीची ओटी कास अडाण पहा [ तुल० इं अडर ]

**अडण**—स्त्री १ सुपाच्या कांठाला मजबुतीसाठीं लावलेली कामटी २ संकट अडचण ' धांवसी आडणीं ऐकोनिया धावा । म्हणवारें देवा भक्ताचिया ॥ ' –तुगा ८६८ –वि हटी, मायेफिल, स्वेच्छाचारी [ का अड्ड ]

**अडणा-णें**—पु न अडसर ' पण स्वर्गसुखाच्या मंदिराच्या दाराला हा कोर्टिंगचा एवढा अडणा नसता तर फारच चांगलें ' –सु १११ [ सं अर्गल, का अडने=आडवें ]

**अडणी**—स्त्री १ दिवा, भांडीं वगैरे जिन्नस ठेवण्याकरितां तिवई चौरंग ' अडणीवरि मोत्याचें ताट ॥ ' –सुदा ३४ २ दाराची बैठक तिवई ३ अडसर ४ लाकडी पाटास खालून लावलेले दोन लाकडी खूर ५ (वें)दाराची कडी ६ टेंका, आधार ' पायाळा घालोनि खोडणी । धनुष्यदंडाच्या अडणीं। उचलोनि दोघीं दोघीं जणीं । धरि श्रेणी आणिल्या ॥ ' –एरुस्व १२ २६ ७ सुपाची पुढील कामटी, अडणपहा ८ मर्यादा, सीमा, रगण ' इंद्रधनुष्याचिये अडणी–। मार्जी मेघ गगनरंगणीं । तैसें आवरिलें शार्ङ्गपाणी वैजयंतिया।' –ज्ञा११ ६०३. [ का अड्डणिगे=तिपाई] ०वरचा (शंख)–पु १ शंख, ( ल ) मूर्ख, अशिक्षित माणूस ' अशा तऱ्हेचे उद्गार अहो रात्र ०याच्या कानींकपाळीं पडल्यामुळें म्हणा पण शिकण्यासवरण्यात तो अडणीवरचाच झाला ' –यशंस्व २ उच्च स्थानावर–अधिकारावर असलेला बेअकली माणूस

**अडणूक**—स्त्री १ अडचण,अडथळा, हरकत ' परोपरीं सिका वर्णे । आडणुका सांगत जाणें ॥ ' –दा १९ १०.१५ २ अट, हट्ट, विरोध (क्रि० घेणें, धरणें) ३ अडवणूक, प्रतिबंध करणें. [प्रा अड्ड]

**अडणें**—अक्रि १ प्रतिबंध–अडथळा होणें,अडकला जाणें, वेढला जाणें, खोळंबून राहणें 'तरी मग सांग पां कैसेनि अडे। ' –ज्ञा ६ ४०१ २ आवळ, घट्ट बसणें, अडस होणें, जेमतेम जाणें ३ इनकार करणें, ना म्हणणें, नाकारणें, नडून किंवा रुसून बसणें, हट्ट धरून बसणें 'दोघांचें ( जहाल मवाळ पक्षाचें ) जें काहीं अडतें आहे तें काहीं हेतूबद्दल नव्हे, कृतीबद्दल आहे ' –टि ३ ७५१ ४ प्रसूतींत अडथळा येणें ५ दाटणें, संकटांत सांपडणें–पडणें, चिमटलें जाणें ६ चालता चालता थांबणें स्तब्ध राहणें पुढें पाऊल न टाकणें ( गाडी, घोडा इ ) ७ वेढणें अडविणें, व्यापणें ' सागरें क्वणें ठायीं नाहावें हें गगनचि आडे आघवें ॥ –ज्ञा ६ ११ **म्ह०** १ अडली गाय फटके खाय २ अडला नारायण गाढवाचे पाय धरी=प्रसंगीं श्रेष्ठ शहाण्या माणसास ( नारायणास )मूर्खाचे पाय धरण्याची पाळी येते [ का अड्ड ] **अडतें( ल )धरणें-पाहणें-मोजणें**—संकटांत पडले ल्यास मदत न करतां उलट आनंद मानणें, किंवा त्याच्या अड चणीचा फायदा घेणें एखाद्याला नडविणें **अडला नारायण**–अडचणींत सांपडलेला माणूस ( अडला नारायण गाढवाचे पाय धरी या म्हणीवरून ) **अडला भिडला**—संकटांत–अडचणींत पडलेला ग्रस्त अडल्या भिडल्यासी वेगीं पार पाडू । ' –दावि ४२८ (अडणें याच्या रूपापुढें भिडणें याचीं रूपें लागून पुष्कळ शब्द बनतात उ० 'अडलेंभिडलें काम असलें तर मला सांग ' ' अडलामिडला - कोण्ही आला तर त्याचा समाचार घ्यावा ')

**अडत**—स्त्री १ सराफी किंवा व्यापारी व्यवहारातला पत्र व्यवहार किंवा देवघेव २ त्या कामाबद्दल मिळणारा मोबदला, दलाली ३ एकाद्या मालकाचा माल विकण्याकरिता ठेवणें, विकून देणें इ० क्रिया, एजन्सी, मध्यस्थी ३ दस्तुरी, दुकानची पत्री ४ (कायदा) मुनीमपणा, गुमास्तेगिरी [म अड=बाजार, ते अडिति]

**अडताल**—पु एकताल,झंपाताल पहा [का अड सं० अट्टतालम्]

**अडती**—स्त्री १ प्रतिकार, अडवणूक, अडथळा, विरोध २ सतारीची–वीण्याची गाल्वा घोडी, चौकी ३ (वों)दाराची सिटी ०घालणें–मोडता घालणें [अडणें]

**अडतीस**—वि ३८ ही संख्या [स अष्टत्रिंशत्, प्रा अट्ठतीस]

**अडत्या**—पु कोणत्याहि व्यापारामध्यें, दर्यावर्दीची कामें करण्याकरितां, कारखान्यात तयार केलेला अगर कोठारांत साठविलेला माल खपविण्याकरितां, किंवा इतर व्यवहारात आपल्या तर्फे जबाबदारी आगावर घेऊन (अडत ठेवून) व्यवहार करणारा मध्यस्थ, दलाल गुमास्ता, एजट [म अडपति = बाजाराचा मोकदम ? अडत]

**अडथळणी**–(णूक)—स्त्री हरकत, अडथळा पहा !

**अडथळणें**—उक्रि प्रतिबंध–हरकत–अटकाव करणें, प्रत्यवाय, विघ्न आणणें, बंद पाडणें [अडथळा]

**अडथळा**—पु १ अटकाव, हरकत, अडचण, प्रतिबंध २ खोळंबा, खोटी, गुंता [अडणें (अड्ड) + स्थळ]

**अडदर-रा-रू**—पु धाक, भय, भीति 'तेथ दानवा अडदरू। नागार्जुनाचा दातारू॥' –शिशु ३६३, 'ते वेळीं स्वर्गालागीं आदर। का नरकाचा अडदरु॥' –ज्ञा १६ ३१-, 'घाई अडदर कासीं सुहाडा॥' –उषा १४०५ [स अ = मोठी + दर]

**अडदरी**—स्त्री खोल, अडचणीची, एकीकडची दरी, जागा 'दमभान तो पाहाडफत्तर। अडदरीं वागती पारधि तस्कर'॥–दावि ७६१ [अ (आ) ड + दरी]

**अडदल**—पु अडली, लष्करी कामगाराचा हुजऱ्या 'अडदलीच शिपाई' [इ ऑर्डर्ली]

**अडदांड-गा**—वि धसमुसळ्या, धटिंगण, दांडगा व अडाणी, बेमुवेत, रानवट [अड्ड + दंड]

**अडदावा**—पु गूळमिश्रित हरभऱ्याची डाळ (ही तगास खुराक म्हणून देतात) –मोको [हिं]

**अडन**—सक्र, अडचण, अडण २ पहा 'पडलिया सराग चिया अडनीं' –एभा ११४

**अडना**—अडणा पहा

**अडनाट-ड**—वि अडनीड अडनेड, अडनीट नीट किंवा बरोबर, हिशोबाच्या दृष्टीनें पूर्ण, नसलेला–दहा, वीस शंभर इ० ठाकठ गळयेचा–परिमाणाचा नसलेला, अधल्यामधल्याच सख्येचा–मर सोयीचा 'एक रुपया न होईल तें भान ने किंवा मणभर ने, अडनीड अरग पायली नेऊ नको' –क्रिवि धोईस्वर नाहीं, अधावेळीं, अनिश्चितपणें, धड इकडे नाहीं, धड तिकडे नाहीं अशा संदेहानें 'आंत तरी येग नाहींतर बाहेर तरी येग, मध्येच अडनीड बसूं नकोस' [सं अर्ध + नीत वा नेतृ ता निदूरू म नीट]

**अडनांव**—न. १ उपनाव, घराण्यानें–वशाचें नाव, कुलनाम, आडनाव पहा २ अयथार्थ नाव 'जैंभ जैं आगगू जाये। मग रसाना हें होये। आडनाव की॥' –अमृत ६.६२, 'तैसें श्रीगंगें जें मुख। तें अडनावामाज देख॥' –मुसभ ३६५, [म अर्धनाम? का शुनाव तु० का आडेगर ? अट= मोठें (श्रेष्ठ) + नाम ? सर (श्रेष्ठ) + नेम (नाव) 'हि अडक]

**अडनांवाचा**—वि केवळ नामधारी, फक्त नावापुरता म्हणजे त्याप्रमाणें कृति–पराक्रम नसलेला ब्राह्मण,' कारकून,' शिपाई इ० 'रामाजीपंत आडनावाचे कारकून परंतु कागदावर धड ओळ काहीं आन्ता येत नाहीं' 'नरत्न तोचि तृषि मौगल उदड आड नावाचीं।' –मोरो नलोपाख्यान

**अडनीट-ड,-नेड**—अडनाट पहा

**अडपझडप**—क्रिवि १ चोरूनमारून, अयोग्य किंवा भलत्याच प्रकारें, कपटानें, अनेक उपायांनीं, नाना तऱ्हेनें, हरएक युक्तीनें, (प्राप्ति, डल्ला मिळ(वि)णें) २ लपूनछपून, गुप्तपणें (शिंदळकी, व्यभिचार करणें) कांहीं नामांशीं विशेषणाप्रमाणें उपयोग होतो त्यावेळीं या शब्दाचे होणार अर्थ –१ अप्रत्यक्ष, अनिश्चित, जादा (नफा, खर्च) २ ल्हान, हलकीं, किरकोळ (कामें, उद्योग) ३ मखीण, मिश्र, अस्पष्ट (गोष्टी) बिनमाहितीचा, जमावातील, किर कोळ, अप्रसिद्ध (इसम, माणूस) 'काहीं अडपझडप सरदार विशाळगड राहून पळण्याच्या बेतात होता' –स्वप १७३ [झडप द्वि हिं अडपझप = गरज]

**अडपणें**—अक्रि अडचणींत पडणें, दगदगींत पडणें, अडवणें [का अड्ड]

**अडपतादडपता**—वि दरवरा करणारा, ताळ्यावर आणणारा, नियता, 'दाबात–धाकात–जरबेंत ठेवणारा (आईबाप, वडील माणूस) 'अडपती नाहीं सासू दडपता नाहीं भावा' [दडपता द्वि]

**अडपदडप**—स्त्री दाब, धाक, वचक

**अडपैजणें**—अडपणें पहा 'आणि सुखाचिया भरतीं। अड पैजना॥' –ज्ञा २ २९४ [अडपणें यात ज चा समावेश]

**अडप-(फ)-ळ-ळें**—अटपळ पहा

**अडफांटा**—पु अडथळा, विघ्न, हरकत, आडफाटा पहा [अड = आडवा + फाटा] ०काढणें–घेणें–फाडणें–(कार्याचा) बिघाड करणें

**अडवंक-ग, अडवंगा-गी, अडवांक**—वि १ नगाडा, वाकडातिकडा, टोवळ, भोपळमुर्ती, भोगळवार, आवड तोवड २ मूर्ख, स्वेच्छाचारी, अडमुठा, दुराग्रही, अडेल ( घोडा ) ३ टोवळ, आडमाप [स अर्ध्द + वक्र १ + भग = भम, हिं अडवगा, गु अडवग = हट्टी, मूर्ख ]

**अडवर्की**—स्त्री दाराची खीळ -शर, अग्वर्की पहा

**अडवंद**—पु कटिसूत्र,करदोडा 'नामिलें अडवद कौपिन माळा ।' –तुगा २८९७, 'कटीं अडवद कौपीन ॥' –दावि २४० [अड+वंध]

**अडंवर**—भवंडवर पहा [स आडवर]

**अडबाजार**—पु बाजाराच्या दिवसाखेरीज आडवारीं भरलेला बाजार, लहान, शिळा बाजार

**अडबेलें**—न गव्यात होणारा एक राग –मनको

**अडभंग**—अडवग पहा [अर्ध + भग = भग्न]

**अडभरी भरणें**—धुमाकूळ, धिंगाणा, दगा घालणें [का गाडु = खेळ मुलाच्या भरी भरणें ]

**अडमड—स्त्री अडमडा**—पु (कों )लहान मुलाची चळवळ, चुळबूळ, अगवला, खाण्करपणा –ड्या-वि चपळ, वळवळ्या ०णें-१ खोड्या करणें, चुळबूळ करणें ( लहान मुलावद्दल वापरतात) २ धडपडणें, ठेंचाळणें, त्रासान, सकटात असणें 'मरो राहा मेल्या सारखा अडमडत ' –नामू ९ [प्रा अडवडण=स्खलन का आडु माडु=खेळकर ]

**अडमाप**—न १ वाजवी, सरल, खऱ्या मापापक्षा कमी अगर जास्त असलेलें असें अधलेंमधलें माप ( सव्वातीन शेरी किंवा साडे तीन शेरी पायली हें अडमाप) २ दिडकें माप ३ (ल )खोटें माप –वि प्रमाणशीर–बद्ध नसलेलें, अडवक [स अर्ध किंवा का अड्ड= आडवेंतिडवें+मापन] **अडमापानें मोजणें**—वसुमार, गरदिम्त अदाज बाधणें, अपक्षा करणें, फाजील आशा धरणें

**ॲडमिनिस्ट्रेटर**—पु १ कारभारी, वहिवाटदार, (राज्य) कारभार चालविणारा, व्यवस्थापक २ (कायदा ) मयताच्या इस्टेटीची व्यवस्था पाहणारा ( अधिकारी इसम ) [ इ ]

**ॲडमिनिस्ट्रेशन**—न कारभार, व्यवस्था राज्यकारभार राजशासन [ इ ]

**ॲडमिरल**—पु १ आरमारावरचा मुख्याधिकारी 'जपानचे ॲडमिरल यानीं आपल्या जागचा राजीनामा दिला ' –क १७ ६ ३०

**ॲडमिशन**—न प्रवेश ( शाळात वगैर ) प्रवेश करण्याम मोकळीक [ इ ]

**अडमुठ**—स्त्री डोंगराळ शेतात, जेथें नागर चालत नाहीं तेथें मुठीनें धान्य परण्याचा प्रकार. [ आड+मूठ ]

**अडमु( मू )ठीं**—वि सुलभ, सहज अनायासें, न कष्टत 'तेंमें आम्हा तुम्हा नाहलें । जें आडमुठीं तत्त्व फावलें ॥' –ज्ञा ६ ४.

**अडमुर्सा, अडमुसा**—वि १ गुदमरण्याच्या स्थितीत असलेला, गुदमरून गेलेला, श्वास कोंडल्यामुळें व्याकूळ झालेला २ गठडी वळलेला ( तापामुळें ) (क्रि० पडणें, होणें ) [स अर्ध+मुद्र]

**अडमुसणें**—अक्रि १ गुदमरणें, घावरा होणें, जीव कोंडल्या सारखा होणें २ ( तापामुळें ) गठडी वळणें, अडमुशी होणें [स. [अर्ध+मुद्र ]

**अडमुळीं**—क्रिवि अकस्मात, – शर

**अडमूट(ठ)**—वि अडमुठा, अडमुठा, अडमुठ्या, अडमाट–इ हीं इतर रूपें १ अडाणी, अडदार, मूर्ख गाटवळ २ पोऱ्या, आड वाप्या [ स अर्ध+मूढ, का अडमुङ ]

**अडमूठ-ठा**—वि मुर्तीत न मावणारा, आटपशीर नमणारा, वेडावाकडा, बेजार, अवदाल [ अर्ध+मुष्टि ]

**अडमोरीं**—क्रिवि नाखूस तोंड करून, तोंड फिरवून, आडमोरा पहा ' शिवता नये म्हणून माजघरामधें अडमोरी बसलें । ' –पला ४४ [स अर्ध का अड्ड+मोहरा ( मुख )]

**अडल**—स्त्री अडचण प्रतिबंध, आडल पहा ' नानापुत्रा येया अडला । ' –उषा ३०, ' दिशा झालिया सानुकूल । मधील गले माया अडल । ' –मिम ३ ५१ [अड ]

**अडल**—स्त्री अडय, वदकाची एक जात [म अग्लि, प्रा अडिल ]

**अडलंड**—वि १ (प्रा ) प्रसगीं आडवा किंवा विरुद्ध बाजूचा होणारा, गरजेच्या वेळीं धोका देणारा सकटप्रसगीं सोडणारा, तोंडघशीं पाडणारा ( इसम, घोडा ) २ हेकट, हट्टी, कटकट्या, भांडखोर [ अड्ड+लड तुच्छतादर्शक प्रत्यय]

**अडला, अडलाऊ**—पु स्त्री न (बायकाचें) एक शस्त्र, विळी, कोयती (गो ) आदाळी 'कीं मदनाचा वळिया । अडलाऊ तो ॥' –शिशु २६४ (सामान्यत ) शस्त्र, आडाल पहा [स अड्ड=शस्त्र करणें ]

**अडलाआ, अडलाव**—पु सरक्षण,पाठीराखेपणा 'तू धर्मांचा कुढावा । तरि तगाचा अडलाआ करावा । ' –शिशु ४९१ [अ (आ) ड+लावणें ]

**अडली**—नाकर तैनातीतील मनुष्य, ऑडली (अप.) पहा.

**अडलेंपण**—न १ हट्ट ' जीव अति अडलेंपणें । जे मागे मज कारणें । ' –एभा १९ १०३ २ सकटात सापडणें 'जीव अत्यत अडलेंपणें । ईश्वरासि 'धावधाव' म्हणे । ' –एभा ११ १७०

**अडव**—न जगल अरण्य ' तरि वाघाचिय अडवें ॥ ' –ज्ञा १३ ७६२ [स अटवी, प्रा अडवी ]

**अडव**—न शेतात उपटून ठेवलेले हरभऱ्याचे ढाहर, रोपें, मुठींत मावेलशी (हरभऱ्याची) पेंडी [आच्या]

**अडय**–पु. १ अडचण, अटकाव, प्रतिबंध २ परीक्षा, कसोटी –सोहिमह [अडविणें]

**अडवंकी–गी**—स्त्री १ अडसर, खीळ 'नवद्वाराचिया चौचकीं। धाणूनि संयतांची आडवकी ॥' –ज्ञा १२ ५० २ अडथळा, अड काठी [का अड+वंकी=आकडा]

**अडवर–ठ**—न १ वीत सार्धवीत भरघड तुळई, तुळ ईच्या उपयोगी लाकूड, आडवें–मोठें लाकूड, आडवा साट २ आडवी तुळई लाट, गज ३ विणलेल्या कापडातील आडवे धागे, आडवीण ४ गोणीच्या दोन्ही तोंडामधील–बैलाच्या पाठीवरील पट्टी ५ गाडीची खरडी, उतरडीवरून जाताना घसरू नये म्हणून गाडीच्या मागच्या चाकांना घासण्यासारखी एक आडवी काठी टागतात ती. –पु नथेचा मधला भाग– त्यातील दोन मोत्यें [का अड्ड=आडवी+स वर्त–वट्ट–वट]

**अडवण**—स्त्री न १ अडवणूक अडथळा, हरकत प्रतिकार २ अडचण, अडथळा करणारी किंवा थारविणारी कोणतीहि वस्तु अडकण, आडकाठी, उटी

**अडवण**–स्त्री अडवी वीण, आडवीण, पूरण वाणा (उभवण किंवा ताणा याच्या उलट) [अड=आडवा+वीण]

**अडवणी**—स्त्री (नाविक) १ अव गलबताच्या दोन पळयांना जोडणार सरळ वठ किंवा आडव्या रांगा २ एकर समुद्राच्या पाण्याच्या झडीकरिता गलबताच्या दोहों बाजूस बांधलेली लाकडी साटी [का अड्ड+स वर्ति]

**अडवणूक, अडवाई**—स्त्री १ अडवण थोपविणें, थांबविणें, अडथळा, हरकत प्रतिबंध अटकाव २ (विप्र अडवणूक) बहि ष्कार, निःशस्त्र प्रतिकार सत्याग्रह 'अडवणुकीच्या मार्गानेंच सर कारास लोकांनीं वठणीवर आणलें पाहिजे ' –टि ३ १९९ [अडविणें]

**अडवण्या**—स्त्री अव ज्येष्ठा नक्षत्र व त्या नक्षत्रात पडणारा पाऊस [अड+ स वन–वण=पाणी]

**अडवण्या, अडवेंता**—वि थोपविणारा किंवा अडथळा करणारा, अडविणारा [अडविणें]

**अडवर्णाचा**—वि आडवर्णाचा पहा

**अडवा–वें**—वि १ उभा नव्हे तो तिर्यग् क्षितिजसमांतर पातळींतील २ रुंद (उभा=लांब याच्या उलट) 'तो अगानें अडवा आहे' ३ तिरपा, वांकडा, आड ५ विरुद्ध, प्रतिकूल, उलटा, नुकसानकारक असा 'त्याचें दैव अडवें आलें' ४ प्रतिबंध करणारा –क्रिवि बाजूनें, बाजूवर, सामोरा ०**करणें**–आड आणणें, करणें ०**टाकणें**–मध्यें येणें, अडथळा करणें ०**येणें**–१ गांठणें, भेटणें, मार्गांत येणें २ विरुद्ध जाणें, नावमेद करणें, प्रतिबंध करणें 'हा आडवा येईल कोण पाहो।' –शाद ८ २९ ३ (विप्र अडवें येणें) गर्भांतील मूल सरळ न येतां प्रसूतिद्वाराशीं वाकडे होणें, अडून राहणें म्ह० (ल) 'आडवें आलें असता कापून काढावें'=मार्गांत कोणी जबर दस्त अडथळा आणला तर त्याचा प्रथम नाश केलाच पाहिजे 'लोक म्हणती आडवें आलें। खाइन काढा ॥' –दा ३ १.४० ४ सामोरें जाणें, स्वागत करणें ०**घेणें**–१ दोषैकदृष्टीनें पाहणें, वाकडें घेणें, शंका घेणें २ खरडपट्टी काढणें (विप्र) आडवातिडवा घेणें ३ मुलाला पाजणें ०**जाणें**–१ रस्ता ओलांडून जाणें २ सामोरें जाणें ३ हरकत करणें ०**टाकणें**–ओलांडणें 'त्याचें घर आडवें टाकून जा' ०**झेलणें–झोकणें–टाकणें–देणें**–धोंडा, गोळा, वीट, धागर इ० वस्तु एका रांगेनें उभे राहिलेल्या लोकांच्या हातातून एकाकडून दुसऱ्याकडे अशा देणें, नेणें (अडवें) **नेसणें–लावून घेणें**–(बायकी) लहान वस्त्र, तात्पुरतें (स्नान किंवा वस्त्रांतर करताना) गुंडाळणें, वेढून घेणें, उभें घेणें ०**पडणें**–१ भाडणतंटा तोडण्यास मध्यें पडणें, तडजोड करू पहाणें २ लोटांगण घालणें, दयेची याचना करणें, उद्दिष्ट कार्य थांबविण्याविषयीं विनंति करणें ३ विघ्न–विरोध करणें ०**बोलणें**–१ मुद्दा सोडून बोलणें २ वाकडे बोलणें, लावून बोलणें, विरुद्ध बोलणें 'म्हणोनि घडलें बोलणें आडवें ॥' –दावि १३५ ०**लावणें**–१ परत पाठविणें २ वस्त्रां तर करताना किंवा स्नान करताना आखूड वस्त्र नेसणें, वस्त्र अपुरें व सैल नेसणें, उभें–आडवें नेसणें ३ वाकडा अर्थ घेणें, बोल लावणें, निर्भर्त्सना करणें, अडथळे उपस्थित करणें ०**होणें**–१ (जमीनीवर) अंग टाकून लोळणें–निजणें, कलंडणें २ (ल) खालीं पडणें, ३ रुष्ट होणें ४ आड येणें, मध्यें येणें **अडव्या अंगाचा–काठाचा–बांध्याचा–हाडाचा**–१ लठ्ठ २ उंचीपेक्षा जास्त रुंद, आडवा वाटलेला **अडव्या जिभेचा**—वाकडेंतिकडें बोलणारा, दुर्भाषण करणारा, भांडखोर **अडव्या सुडक्याची बायको–रांड**–अत्यंत दीन, दुर्बल (विधवेबद्दल किंवा एखाद्या बाईबद्दल बोल ताना ग्राम्य शिवी) 'तू लहान झालास तरी पुरुष आणि मी मोठी झाल्यें तरी अ० बायको, माझे हातून काय दरबारात बोलवेल ?' **अडव्या हातानें देणें (हातीं देणें)**–लांच देणें **अडव्या हातानें घेणें**–(ना) खरडपट्टी काढणें **अडव्यांत शिरणें**–१ वाम मार्गाचा अवलंब करणें, सरळ रस्ता सोडून जाणें २ वाकडें बोलणें, विषयांतर करणें

**अडवाअडव**—स्त्री १ एकदम जोरानें अडथळा करणें २ त्रास देऊन बजार करणें, तगादा, निकड लावणें

**अडवा उभा**—वि क्षितिजसमांतर व ऊर्ध्वाधर, अडवा व उभा, उंच व लांब पसरलेला व ताठउभा, वाकडा व सरळ

**अडवार**—आडवाट पहा

**अडवातिडवा**—वि वाकडातिकडा, कांहींसा तिरकस, बांकदार ०**फुटणें**–वाकडेंतिकडें, कुरूप व बेडौल वाढणें–होणें–बनणें (शरीर, झाड) [का आ+स तिर्यक्]

**अडवारा**—पु आडवारा पहा

**अडवाल-ळ, अडिवाळ**—वि. अडेल, हट्टी, हेकेखोर (मुलें) [क्रा अड्+वाल प्रत्यय तुल० मस्त-वाल]

**अडविणें**—सक्रि घोपविणें, घावविणें, हरकत, अडथळा, अट काव करणें, प्रतिबंध करणें. [अडणें]

**अडवी**—स्त्री. १ ल्हान अडणा, आडरिवी, गज, गराद (दाराचा-खिडकीचा) २ अडवा, अडवें पहा [भट्टवा] **०पालखी**—स्त्री रस्त्याच्या दोन्ही बाजूंना पालखीच्या दांडयाचीं टोकें करून पालखी आडवी नेण्याचा मान हा मान शृंगेरीच्या शंकराचार्यांचा आहे

**अडवी**—स्त्री अटवी, रान, आडमार्ग, अरण्य 'भातयु आतुडे आडवीं। मग आटघतां जेवीं हारवी॥'—ज्ञा १३ १०५ [स अटवी]

**अडवीज**—वि. (गो) बेसर रिकामटेकडा. 'तू भोगी राव, तों पडला अडवीज'.

**अडवें**—न (वों) (विप्र) उडवें, उडवी पहा

**अडवेंउभें**—न वाकडया मसलती-बेत, लबाडीचे डाव, कुवडें [आडवा+उभा] **अडवें पाणी**—न (शेतवागायतींना) नद्या, विहिरी, तळीं इ०चें पाणी-पावसाचें नव्हे अडव्या पाण्याचा-नें असेहि प्रयोग प्रचारात आढळतात

**अडवेळ**—स्त्री १ मुख्य वेळ सोडून दुसरा समय, अवेळ २ सूर्यास्तापूर्वी घटिका दोन घटिका दिवस, सध्याकाळीं मुलें जेवतात तो काळ

**ॲडव्हान्स**—पु पैसे-रकम अगाऊ देणें, आगप तसलमात, उचल [इ]

**ॲडव्होकेट**—पु. वकील [इ]

**अडशेरी, अडिशी**—स्त्री १ अडीच शेराचें माप-वजन, (पूर्वी पाच शेराची पायली असे त्याचा अर्धा. २ (हल्लीं) अधोली, अर्धीपायली ३ नोकरास दररोज किंवा महिन्याच्या महिन्याला दिलें जाणारें धान्य, मासिक वेतन, मजूरी (एका दिवसाच्या २॥ शेर वजनाचा शिधा, भत्ता यावरून) [अडीच+शेर स अर्धतृतीय, अडीच]

**अडस**—वि १ अडच-च, घट, गच, आवळ, मजबूत बसणारी (खुंटी, खिळा वगैरे) २ (ज्यात खिळा वगैरे गच बसतो असें) बारीक चिवळ (भोंक, बीळ, छिद्र वगैरे) ३ आटोपशीर. 'तेणें पलंग धरिया अडस।' —उषा २९, 'स्वरूपाची अडस ठेवण।' —प्र १०५ ४ अडथळा करणारें 'न सगे तयाचा अतिसा। प्रयोसी तेज आडसो। घालितासी का॥' —ज्ञा १३ ६३३. [का अडसु=कोंबणें, खेंचणें] —सी, **०खोर-हट्ट**—वि हट्टी, दुराग्रही, अडेल-तट्टू

**अडसट**—अडसट पहा

**अडसटणें**—सक्रि (क) अदाज करणें, कच्चा खडा काढणें, अदमास पाहणें, अडसण पहा

**अडसण**—न पाखडलेलें किंवा पाखडण्याकरिता सुपात ठेवलेलें धान्य [वे का अडि-अडृ=माती+सण्=फेंकणें?].

**अडसण**—न सत्याळ गाईम्हशीची धार काढण्यासाठीं तिच्या भोंवतीं बांधलेल्या अडव्या काठ्या, अडवी [अडचण]

**अडसणी**—स्त्री (गो) आच्छादन. 'त्ये तेर अडसणी घालून दवर'—त्याच्यावर आच्छादन घालून ठेव [अडोसा]

**अडसणें**—सक्रि सुपानें पाखडणें निवडणें, निवड करणें 'आड मोती शुद्ध करी वो साजणी।' —तुगा २६१ [अडसण]

**अडसणें**—सक्रि १ फाया तोडणें छाटणें, खडसणें २ आवळणें घट्ट बांधणें, करणें —अक्रि ३ रुसून बसणें अडून रहाणें, हट्ट धरणें ४ आड बसणें, लपणें, आश्रय करणें 'आडसुनि अंधारीं। खद्योत दीप्तिदि धरी'—अमृ ७ २. ५(व) मानास चढणें, ताठणें, गर्व धरणें 'इतका भडसू नको एवढयातच' [अडस]

**अडसणें**—अक्रि भडचणें पहा

**अडसंधी**—स्त्री १ जाघ (मांडीच्या मुळाशीं असणारा भाग), (क) काख, कानाच्या मागील जागा इ० शरीरावरच्या अडचणीच्या जागापैकीं २ अडचणीची जागा ३ रिकामा वेळ ४ सकट आपत्ति ५ (गो) अग्गळ [अड+संधि]

**अडसभडस**—वि १ काहींतरी चरबट रूक्ष 'साधुसत अडस भडस। न खाती का प्रश्न। दावि २७३ २ यथेष्ट भरपूर [भडस द्वि]

**अडसर**—पु आडसर पहा

**अडसष्ट**—वि ६८ ही सख्या [स अष्टषष्टि, प्रा. अडसट्ठी, हिं अडसठ]

**अडसांगड-डी**—स्त्री. १ ल्हान सांगड ताफा-तर 'मोठें विस्तीर्ण पात्र तें सुखाउद्वला यानें अडसांगडीनें रिकामें यावें जावें—भाव ६४ २ पोहणाऱ्याकरिता केलेला (दोन जोडलेले भोपळे इ०चा) ताफा [स अर्ध+सांगड]

**अडसांगडी-ड्या**—वि अडसांगड चालविणारा २ सांगड न घेता पोहणारा

**अडसांगडीं**—क्रिवि सांगड न घेता सांगडीवाचून, (उतरणें-जाणें-पोहणें)

**अडसाळ**—न (वे) कुळवाचें आडवें लाकूड (का)

**अडसुडी**—पु (कर) गुळव्याच्या हाताखालीं काम करणारा

**अडसून खडसून**—क्रिवि हडसून खडसून, दाटून दवकावून, स्पष्टपणें, बजावून [हडसणें-खडसणें]

**अडसो**—अडस पहा

**अडहतेर-हत्यार**—न किरकोळ शस्त्र, (बंदूक, तोफ या सारख्या अग्न्यास्त्रांखेरीज इतर कोणत्याहि हत्याराला हें नाव कोणी लावितात तरवार, बंदूक इ० खेरीज खजीर, कटयार, पेशकब्ज वगैरे) [सं अर्ध+हत्यार]

**अडहतेरी-हत्यारी**—वि अडहत्यार वाळगणारा ( पूर्वीच्या फौजेंत सरकारी शिपायांखेरीज अस निराळे शिपाई लोक असत )

**अडळ-ळू**—पु ( नागव्यांनी हातात धरण्याची ) नागव्यांच्या कमणीची मुर्गी—दांडा [म हूमी=रागाची वडी ?—वा अडू—अड =अडवा ]

**अडळ**—पु १ अडल पहा २ गाव मन्त ३ पृथक्पणा ४ विकल्प [ अड ]

**अडळ**—पु शोध, आडळ पहा

**अडळ**—पु एक सुमुहूर्त [ ? ]

**अडळ**—पु परिमळ ?—शर

**अडळणें**—अकि अडखळणे [ अड—ल ]

**अडाअड**—स्त्री मार्ग अन्थळा, म्वोळवा, अडचण, अटकाव —गागा १०२२ ( क्रि० करणें—घालणें—होणें ) [ अड+अड ]

**अडाअड**—अडाडी पहा

**अडांख**—पु अज रेघ, हिशवाच्या कागदावरील आडव्या बरून ओढलेली रेघ अज पहा [ अड+अंक ] ०ताळा—बेरीज बरोबर आहे की नाहीं हे पाहण्याची रीत प्रथम आडव्या रका न्यांतील रकमांची बेरीज करून ती उभ्या रकान्यांतील रकमांच्या बरजेशी बरोबर आहे किंवा नाहीं हें ताडून पाहणें

**अडाखा**—पु १ मेळ, ताळा, ठोकताळा २ धोरण, युक्ति ३ एक ताळा पाहण्याची रीत ( रकान्यांतील सर्व रकमांच्या बरजें तून शेवटच्या रकमेखेरीज सर्व रकमा एकामागून एक वजा करून राहिलेली संख्या शेवटच्या रकमेशीं मिळते की नाहीं हें पाहणें, मिळत असल्यास बेरीज बरोबर ) ४ ताळेबंद, तपशीलवार पत्रक 'तुका म्हणे ताळा घातला अडाखीं।' —तुगा १२३८ [ अडाख ]

**अडाघडी**—स्त्री जगाची रचना 'क्षणिक जाणून अडाघडी। वेगें लावी प्रेमाची शिडी।' —ह १९.७६ [ अड+घटना ? ]

**अडाडी**—स्त्री १ प्रतिबंध, अटक, 'तर्मी दाम्ती खयात कोडी। तेवीं अज्ञानी कर्माची आडाडी।' —एभा २७.३९ २ उत्कटा, घाई '*होत डोळ्या आडाडी। अभिनव गोडी कृष्णाची॥*' —एभा ३१.३० ३ गर्दी, पसारा, रगाडा 'सत्र धर्मांची आडाडी। धार्येवीण वापुडी निमाली॥' —एभा ११.११०४ [ अड+अड ]

**अडाण**—न १ शाती नसलेले किंवा न करणार गावकरी, शेतकऱ्याउलट बलुतेदारापक्षा हे निराळे [ स अज्ञान का अडने ] ०कवाड—न अडाण खड्यांतील कारागीर व्यापारी, मजूर, कामकरी, इ० ( शेतकरी नव्ह त ) ( अडाणारा, शेतकऱ्यावर अवल बून रहाणारा तो अडाणी—गागा ८ ) [ अडाण+कावाडी ] ०चाट—वि अडाणी मदबुद्धीचा, धांदचुका करणारा, मठ्ठ ०जात—स्त्री अशि क्षित, रानवट, जंगली लोक, रीतभात माहीत नसणार ०पट्टी—स्त्री शेतकरी व बलुतेदार या लोकांखेरीज बाकीच्या सर्व धंद्याच्या व उदमी ( अडाण ) लोकांवर बसविलेला कर अडाण—बाकी—वसुली वगैरे असे सामासिक शब्द अनेक होतात ०मत—न गेडवळ, विल क्षण, भलतेच विचार—समजूत—कल्पना वगैरे, हट्टवादीपणाचें मत, दारकमत ०वस्ती—स्त्री बलुतेदार व शेतकरी यांवाचून बाकीच्या ( अडाण ) लोकांची खेड्यातील अगर त्याच्या एखाद्या भागातील वस्ती

**अडाण**—न वाप्त, ओरी, भडण पहा [ स ऊषस्—न., प्री औधर, ज युर ई अग ]

**अडाण**—न पाण्यधारा, धारा ( डॅम ) [ अडण—णा ]

**अडाणा**—पु गायन शास्त्रातील एक राग ह्या रागास षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, कोमल निषाध हे स्वर लागतात आरोहात गांधार वर्ज्य व अवरो हात धैवत वर्ज्य *ह्याची जाति षाडव षाडव आहे वादी तार षड्ज* व संवादी पचम आह गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर हा कानडा रागाचा एक प्रकार आह

**अडाणा**—पु १ अडची, अडसण पहा २ उसाच्या चरकाला बैल जुपण्याचा दांडा—लाट ३ दरवाजाचा अडणा, अडसर [ अड ]

**अडाणी**—वि १ अकुशल, अनिपुण, अनभ्यस्त, कलाहीन ( माणूस ), रानटी, ग्राम्य, जंगली, असभ्य, अशिष्ट, उद्धट, खड बळ ( भाषा, रीतभात ), ओबडधोबड, वेडीवाकडी ( वस्तु, पदार्थ ) २ अज्ञानी, न शिकलेला, विद्याहीन ३ बिगर शेतकरी, अडाण 'थोड्याशा भांडवलावर व्याजधंदा करणारे अडाणी त्याचे दस्तै वज प्रपंचखर्चासाठीं होतात' —गागा १६० म्ह०—१ अडाणी कुणबी दुप्पट ( दुणा ) राब २ अडाण्याचा आला गाडा, वाट वरल्या वशी मांडा ०कवाडी—पु अव १ अडाणकवाड पहा २ ( व ) पादरपेशे, मजूर काबाडकष्टकरणार ३ गावढळ, गोणप, वेडगळ ०गाठ—चुकीची निरगाठ, सहज सुटणारी चाहेगाठ ०जात—स्त्री रानटी, अर्धवट जात ( पठाण वगैरे ) [ स अज्ञानी ]

**अडात-थ**—पु १ दरवाजा, फाटक खिडकी इ० दारावर *मजबुतीसाठीं खिळे मारून बसविलेला आडवा गज २ बसा* वयाच्या पाटाखालील आडव्या पट्ट्या किंवा पाय [ का अड+स स्थ ]

**अडातुटी-डी**—क्रिवि मधून मधून, थांबून राहून राहून, केव्हातरी, विसावा घत घत [ स अर्द्ध+त्रुट् ]

**अडावरी**—पु ( कों ) नैर्ऋत्येकडून वाहणारा वारा ( हा आषाढाच्या सुमारास ४९ दिवस वाहतो ) [ स आडवर ]

**अडाव-चा**—पु सालमखर देणेंघेणें इ० व्यवहाराच्या सर्वे हिशेबाचा सर्व साधारण मेळ पाहण्याचा तक्ता, जमाखर्चाचें पत्रक—झाडा—तेरीज—ताळेबंद अडावबंद, अडावबाकी, अडाववसूल अडा वसूट वगैरे कांहीं सामासिक शब्द २ खर्चाचा कच्चा खर्डा

**अडावर्णी**—स्त्री अडविणें अडवणूक, अटक 'त्याचे व आमचे तराडयाची अडावर्णी केली' –विवि ८ ३ ०५

**अडाळा**—(हेट) गिळी, मोगली, अडला पहा

**अडिवा**—पु अडसर (दारा-गिडकीचा) [का अड्ड-अड+?]

**अडिवा**—पु पसार, पार, गास 'शृंगाराचा अडिवा।' –भाए १८० [स आटोप, प्रा आडाव=आडंबर?]

**अडियाळ**—अडयाल पहा

**अडिशेरी-अडिश्री**—अडशेरी पहा

**अडी**—स्त्री (विप्र अटी) फळें पिकविण्यासाठीं गवतात घातलेले फळाचे थर या व इतर अर्थांसाठीं अढी पहा

**अडी**—स्त्री १ (व) जमीन खोदून केलेली लांब चूल, चर (स्वयंपाकाकरिता) २ अटकाव, अट, प्रतिबंध 'गृहरक्षणार्थ कुलुपें, कड्या, कोयंडे, अर्गळा, कळड, मेहराबी आदिकरून सर्व पदार्थ लोक अडीनच करतात' –नाना मोरोजी, वियो प्र ११२ [स (आ) ड]

**अडी**—स्त्री खळें, मळणीची जागा

**अडीच**—वि १ दोन आणि अर्धा २ बुद्धिबळाच्या खेळातील घोडयाची दोन सरळ व एक आडवें घर अशा प्रकारची चाल [स अर्धतृतीय, प्रा अड्ढाइज्ज (अडीच), प ढाई, सिं –हिं अढाई, व अडाई] ०की–न अत्र उजळणीचा प्रकार, अडीचपर्यंत अडचाचा पाढा ०पेडी वेणी–स्त्री दोन मोठे व मध्यें एक लहान पड ठेवून घातलेली वेणी ही वेणी चांगली रुंद व आवळ येऊन निच्या मागील बाजूस पन्हळ पडतो ०मासा—पु (कवे) श्रावण घेवडा, हा २॥ महिन्यांनीं तयार होतो याला अडीच माशाची शेंग असेंहि म्हणतात [अडीच+मास=महिना]

**अडीमोडी**—स्त्री आडमोड पहा

**अडील**—वि १ अडेल, हट्टी, हेकेखोर स्वच्छंदाचारी २ आश्रयास असणारा, आड दडलेला –क्रिवि आड, आश्रयार्थ पुढें [अड–आड]

**अडील**—न कोणी कोणी मनुष्याच्या शरीरातून रात्रंदिवस एका तऱ्हेचें तेज निघत असतें तें –पवि १२ [?]

**अडीश्री**—अडशेरी पहा

**अडु**—स्त्री १ तोनतुळया अगर चिरव्या फरशी यात मजबुतीसाठीं मारलेली लोखंडी पट्टी २ वस्तु अडवून धरून कातरणारें यंत्र ३ (व) विहीर खणण्याची दीड फूट लांबीची मोठी छिन्नी पाथरवटाचें एक हत्यार [अड]

**अडुर**—वि (कों) तुरट, कडू

**अडुमाडु**—न माडु नावाचें एक हत्यार माडु पहा –वि १ (ल) धुरंधर, धाडशी, आडदांड (शिपाई, योद्धा, मारामारी व मारामारीस सिद्ध असा), (उप) शेंदाडशिपाई, गडमारवीरपीर, तिस्मारखान २ दांडगा, जबरा, अतिहुशार-निपुण (लहान वक्ता इत्यादींबद्दल गौरवपर किंवा व्याजोक्तिपूर्वक) –शिवदि ४०८ [माडु द्वि]

**अडुमाडु**—वि अल्पत्यागत्वस्या, कोणीतरी (माडु=कर्णे या कानडी शब्दावरून कोणी कानडीसारखें–न समजण्याजोगें बोलणारा) [का माडु]

**अडुसष्ट**—अडसष्ट पहा

**अडुळसा**—पु एक वनस्पति औषध, रंग, खत वगैरे कामाकरिता याचा उपयोग करतात जुनाट कफविकार, क्षय, दमा या रोगावर या वनस्पतीचा चांगला उपयोग होतो, याच्या पांढरा व काळा अशा दोन जाती आहेत फुलें पांढरीं –वगु [स अटरुष्–अडळुस, हिं अडुसा म आडसोग गु अरडुसो–अडुसी, ते० आडसार, आडापाडु, ता आधडोडे, लॅं आधाथोडा–वासिका]

**अड्ड**—पु अड्ड पहा शिवाय १ पिंजन्यातील पक्ष्यांची बसायाची दांडी २ लाट, आडकाठी (लोकांनीं आत घुसूं नये म्हणून देवळात लाकडाचे दांडे उभे करून त्याला आडवें लाकूड बसवतात तें) ३ एखाद्या वस्तूस बांधलेली दोरी मजबूत बसण्यासाठीं किंवा आवळण्यासाठीं जिला पीळ देतात ती काठी ४ तरफ लावताना उपयोगात आणलेला दगड किंवा ठोकळा, उटाली, टेंका –वि हट्टी, हेकेखोर, अडेल [अड]

**अड्डन**—क्रिवि १ एकाद्याच्या आड उभें राहून किंवा एकाद्याच्या मागें लपून २ एकाद्याच्या मध्यस्थीनें–करवीं, मार्फत [आड होऊन] ०गोळी मारणें–आपण प्रत्यक्ष एखाद्याचें नुकसान न करता परभारें दुसऱ्याकडून करविणें शिवाय 'अहाड्न पहाड्न' पहा ०झड्डन–क्रि वि आड्डन, लपून छपून 'कोणी अडुनझडुन। अडचणीत दडुन। कोणी राहाती पडुन। खाल्ती॥' –प्रला २०० [अड्डन द्वि] ०बोलणें–अप्रत्यक्ष रीतीनें लागेलसें छद्मी बोलणें

**अडे**—न (ना) नदीकाठाजवळ असलेले बावर

**अडेक**—वि (गो) गौण, बरकरणी [?]

**अडेचा**—वि (गा) कृत्रिम, उसना 'निजा ते निजाचें, अडें तें अडेचें'

**अडेजावबडेजाव**—पु बडेजाव पहा [बडेजाव द्वि]

**अडेवाटकी**—वि (गो) नवशिक्या [अडेक]

**अडेल**—वि अडखोर, हट्टी, दुराग्रही, हेकेखोर, अडून बसणारा, खलेल [अड] ०गुण–पु अडचणीची–संकटमय स्थिति, सारवळ 'कोणाचा अडेलगुण पाहूं नये' ०तट्टू–न हट्टी, हेकेखोर, अडेल माणूस

**अडेशिरी**—(गा) आहार, खाणें, अडशेरी पहा 'अडेशिरी क्वचित्‌ परत्यावगर तों कैमाच हाल्यों ना'

**अडेसरी**—अड्डेशेरी पहा

**अडोंगी**—क्रिवि एका-आडबाजूस, एका बाजूने, आडमार्गाने, सरळ रस्ता सोडून [ का अड्गु=लपणे ]

**अडोपर**—स्त्री १ अडवणूक, अडथळा, प्रतिबंध, विरोध, हरकत, अडवणूक (क्रि० करणे–दाखविणे–लावणे) म्ह० महाराची अडोपर वशीपाशी (आपणाला जे मागावयाचे तें महार वेस अडवून मागतो) २ आग्रह करणे-धरणे पाठीस लागणे, पिच्छा पुरविणे ३ अडून बसणे, खनपटीस बसणे, एकच धरून बसणे (क्रि० दाखविणे–धरणे–लावणे) ४ सक्ती, हरस्ती पुढे आणणे, शका काढणे, कठिण करून ठेवणे (क्रि० धरणे) ५ गरज, नसले तर अडेल अशी स्थिति, जरूरी 'आज चाकरीणे पडले आहे वकिलाची अडोपर नाहीं' ६ (सामान्यत) गुंता, रुद्धता प्रतिबद्धता, अगतिकपणा (क्रि० पडणे–लागणे–होणे) [ अड+पर प्रत्यय? ]

**अडोशीपडोशी**—वि जवळपासचा, शेजारपाजारचा, आसपासचा 'गोपाळरावाचे अडोशीपडोशी लोक पकडून कैदेत घातले तेव्हा त्याचा राग थोडासा शात झाला' –विक्षिप्त ११३ [ स प्रातिवेशिक, प्रा पडवेसिअ, हि पडोसी पडोशी ह्रि हिं अडोस पडोस, गु अडोशीपडोशी ]

**अडोशींपडोशीं**—क्रिवि आसपास, आसमतात् आजूबाजूस

**अडोसा**—पु आडपडदा, आच्छादन, आडबाजू करण्याकरितां उभारलेला कुड इत्यादि प्रतिबंध करण्यासाठी केलेली पडद्यासारखी योजना आसरा (क्रि० करणे–घेणे–देणे) [ अड+स वस् ]

**अडोळणें**—आडळणें पहा

**अडोळसा**—अडळसा पहा

**अडोळा**—पु आडें (घराचें) [ स अट्टल वा अड+ळा ]

**अड्डताल**—पाताल पहा

**अड्डा**—पु अखाडा पहा १ जूट, संघ, एकत्र जमाव समुदाय (गाडीवान, मजूर वगैरे विशिष्ट व्यवसायी लोकांचा), २ तळ, गोट बारे, खुर चव्हाटा, अखाडा वा नगरातील देवघेव करण्याची जागा प्रवासी लोकांची विसावा घेण्याची–मध्यन्तरी उतरण्याची जागा ३ सता किंवा साट्या प्रमाणावर चालणारा व्यवहार-उद्योग उदा–गाण्याचा–नाचण्याचा–वादाचा अड्डा ४ आखाडा तालीम रणभूमि वगैरे शौकांची ठिकाणें ५ आळशी किंवा व्यसनी लोकांची जमण्याची–शिळोप्याच्या गप्पा मारण्याची–जागा [ म अड्ड का अड्डु=जमणे नमविणे किंवा मे अड (इड) =आधार ]

—पु (व) आग्रह हा साठे वाडे पण अड्डाच जास्त '
]

**अड्डा**—पु आडपता, बाणा, प्रौढी, प्रतिज्ञा, फुशारकी क्रि० बाळगणे–'अरे तू शिपाइगिरीचा अड्डा बाळगतोस आणि चोर येताच पळालास का?' [ स आढ्य, प्रा अड्ड ]

**अड्डा**—पु (विणकाम) फणीच्या चोया करण्याची सुरी ही लाकडी ठोकळ्यात बसविलेली असते [ तुल० इ अड्झ=एक कुऱ्हाड, म अडग स का अड्=हाण करणे ]

**अड्डावणें**—अक्रि ओरडणे, बोंबलणे [ स अड्ड+आरव ]

**अड्डितचारी, अड्डितभौमि**—स्त्री (नृत्य) उजवा पाय नुसत्या बोटावर उचलून ता एकदा डाव्या पायाच्यापुढे व एकदां मागे असा त्याला आगदी चिकटून ठेवणे [ स ]

**अड्डेकरी**—पु अड्डा ठेवणारा इसम किंवा अड्ड्याचा मालक

**अड्डेबाज**—वि अड्ड्यावर जाणारा, अड्ड्यात पडून असणारा

**अड्डेबाज, अड्डेबाइक**—वि गैमा–प्रौढी–शेखी मिरवणारा [ अड्डा+फा बाख्तन=खेळणे ]

**अड्याल**—वि अलीकडील इकडील –क्रिवि ह्या बाजूला, अलीकडे, इकडच्या बाजूस–अगाल 'आमचे शेत नदीच्या अड्याल्च आहे' [ प्रा अइ=हा, ही, हें+ल ] ०पड्याल–अलीकडे पलीकडे [ तुल० आयल+पयल ]

**अड्याळू**—पु (व) लाकडी नांगरास मागच्या बाजूस हातीं धरण्याकरितां वीत दीडवीत लांबीचा एक खुंटा असतो तो [ अड+आळू प्रत्यय ]

**अॅड्रेस**—पु १ भाषण, व्याख्यान २ पत्ता, मायना [ इ ]

**अढंच**—वि मोठा, थोर 'अढचे अचाट ऋषीदेवथाटें।' –दावि ३३३ [ आढ्य+अच ? ]

**अढण**—स्त्री मुगाच्या तोंडाशीं असणारी कानगी अडण २ पहा

**अढल**—वि अढळ हुशार नावलगार 'अढलाचे बरलदाज' –समाग २ १८७ ।

**अढळ**—पु १ आवळ, थाग, पत्ता, शोध, भेद, उपलब्धि 'त्या श्लोकाचा मला पूर्वी अढळ लागत नव्हता' २ ज्ञानाचें अनुभवाचें क्षेत्र, आटोका 'ही गोष्ट माझे अढळात नाहीं' [ आढळणें ]

**अढळ**—न अविनाशपद स्थिरपद, मोक्ष 'शरण येती त्याचे न विचारिती दोष। न मागता त्यास अढळ देसी॥' –तुगा ८६८ –वि १ अचल, कायम स्थिर दृढ 'तेंचि प्रमेय एक वळ। शिष्यीं होआवया अढळ।' –ज्ञा १८१२३८ २ खरा, खात्रीचा हा बोलु तुझा थोर अढळु। मानूं आम्ही॥' –ज्ञा ११४९१ [ म अट=स्थिर, प्रा ढल=पडणे, हिं अढल ] ०पद–न अचल निश्चल, कायम असें स्थान स्थिरपद, कोठल्याहि गोष्टीमुळें जें जाण्याची ढळण्याची भीति नाहीं असें स्थान-पद (ध्रुव ताऱ्याच्या किंवा नक्षत्राच्या अचलपणास तसेंच स्वर्गांतील वैकुंठ आदि स्थानांना हा शब्द वापरतात )

**अढळ**—न १ नक्षीय प्रासन 'वैष्य म्हणती तये वेळीं । नव्हे वर्ते यासि अटळीं ।' –गुरु २०४१ [ स अटल ]

**अढळणें**—अक्रि अढळ होणें, भेटणें, दिसणें, सापडणें, गव सणें, आढळणें, ज्ञानगोचर होणें, लक्षात येणें [ आढळणें ]

**अढा**—पु १ काठी, खांब वगैरेभोंवतीं घातलेला दोरीचा वळसा, विळखा २ दोरीचा फासा, अढी, दुमड, पेंच 'मी वावडी तू एक सडा नको मारू आढा '–मभा २ ३ थव नी उप योग–अढे, अढेपारडें पहा [ का अड्ड ]

**अढाउ(ऊ)**—पु १ आढाव, सैन्यात एक प्रकारची वरची चाल गणारा आड हत्यारी शिपाई सामान्यत सैनिक, शिपाई 'भीतरी परवडी भाटावाची। दर्खे उघडीं होतीं त्याचीं ।' –एरुस्व ६ ५१ २ सैन्यातील परिचारक जखमी झालेल्याची सेवाचाकरी करणारा ॲंब्युलन्समधील माणस 'अढाउ–क्रीं लेटुनीं नेला । काठीचीये मानेवरी ॥' –उषा १८ [ स अर्धभागिक–भड्डाइअ–आढाअ–अढाऊ ]

**अढाऊ**—वि ( व ) १ चळमाप, त्यांच 'ही जात जात्या फार अढाऊ कितीहि समजुतीच्या गोष्टी सागा पण डोक्यात उजेड म्हणून कसा पडणार नाहीं ' २ द्वाड, उनाड, मूर्ख ३ न पेरता आपोआप उगवणारा, मेहनत न करता उत्पन्न होणारा 'हीं झाडें अढाउच उगवलीं आहेत ' [ का अड्ड–अड–अडव ]

**अढाचौताल**—पु एक ताल, आडा चौताल पहा [ हिं ]

**अढाल**—स्त्री ढाल, निशाण, झेंडा 'फडकती तडवेचि अढाला ।' –दावि ३७९

**अढाच**—अटाऊ पहा

**अढाव(वा)**—पु अडाव पहा

**अढावेढा**—पु १ अढा पहा २ आळा, प्रतिबंध, आडकाठी 'जिव्हेला अढावेढा असला म्हणजे मूर्खास बरा ' [ अढा+वेढा ]

**पायाला अढावेढा**—पायात पाय ( घालणें–घुटमळणें )

**अढाल**—वि (कों) अतिशय मोठें ( पान, गृह इ० )–न मोठें स्थान (सिंहासन, अर्धासन) 'जें आदरिलें अढाळ । राजाधिश्रियेचें ।' –शिशु ७२६ [ म आधा ( न )+आल=मोठें किंवा अर्धास्य= अर्धासन ]

**अढी**—स्त्री फळें पिकविण्यासाठीं गवतात घालून ठवण्याची केलेली योजना **अढीत उतरणें**–अशा रीतीनें पिकणें [ का अग्नि=पक्वधा ]

**अढी**—स्त्री रास ढीग [ का. अड्कु=ढीग करणें त अड= ढीग, स आत्य ? ]

**अढी**—स्त्री १ पायावर पाय ठेवून, तिडा दऊन बसण्याची रीत २ फाल्गुन अमावास्येच्या दिवशीं राहून पाहून भविष्य सागण्याची एक रीति ( ग्रामजोशी त्या दिवशीं ववळात भरा धान्यें निरनिराळ्या भोकांत घालन त्यावर पानें झाकण घालतो दुसऱ्या दिवशीं जें पान ओलसर झालें असेल त्या धान्याची पुढील सालीं सुगता होणार असें भाकित करतो ), ३ धान्याच्या राशीवर लाकडाच्या पेंड्या घालून केलेलें छप्पर ४ ( कों ) गाई, म्हशी यांचें दूध काढताना त्याना घालण्यात येणारा भाला ५(गो) चिर कामासाठीं केलेली योजना ६ दोरीचा वळा, विळखा, दुमड,मुरड, गुता, अढा पहा ( ल ) अडचण, बाधा, नड 'ऐशिया निह पण घडमोडी । तुझेनि बोलें पडे अढी ।' –एभा २० १६ (क्रि० उगवणें, पडणें ) ७ तेढ, मनातील गाठ, विपरीत ग्रह, अनिष्ट शंका– विचार, रुसवा ( क्रि० धरणें, पडणें ) 'का मनिं धरलि अढी ।' ८ कपाळावरील मुरकुटी–वळी 'भृकुटिये आढी घालोन। –राक्षि १० ३९ ९ रहाट गाडग्यामधील रव्याच्या वरील आडवें लाकूड ( यावर माळ टाकलेली असते ) १० मिठी 'चरणीं घालूनिया अढी । कासव गजातें पैं ओढी ॥' –मुआ ५ १०८ ११ ( व ) स्वयपाकासाठीं खणलेला चर [ का अड्ड= आडवें, अडि=धीरा, टेंका ] ०खोर–वि मनात तेढ बाळगणारा, खुनशी **०मारून निजणें**–अक्रि डोक्याखालीं व पायाखालून पाय रुण दुमडून घेऊन निजणें, पाघरूण गुरफटून घेऊन निजणें

**अढी**—स्त्री •पूजेचा एक विशिष्ट प्रकार ( खाशी सोलापूरकडे ब्राह्मणात दुगणाची पूजा करण्याची चाल आहे, तसेंच खडोबाच्या दुगणाची पूजा करण्याची चाल अजून काहीं ठिकाणीं आहे असें सागतात ) [ स आधि ? ]

**अढोन्यादिढी**—क्रिवि अवाच्यासवा, अतिशयोक्तीनें, प्रमा णाबाहेर, उधळेपणानें, फाजील बेसुमार ( क्रि० बोलणें–वागणें ) [ दीड हिं ]

**अढें**—न १ घराच्या छपरावरचें दोन्ही पाख्यामधलें लाव लाकूड, अढोळा (अढाणा पहा). 'घरा पच वासे असे एक आढें।' –वचेतुन • २ मानेच्या दोन्ही बाजूचा खांद्यावरील भाग ( शरी राचा, अंगात घालावयाच्या वस्त्राचा, स्त्रियांच्या चोळीचा) ३ दोन माणसानीं चालवावयाची करवत ४ एखादी वस्तु फिरविण्यासाठीं त्यात खुपसलेला गज, दाडा (जसें उसाच्या चरकाच्या लाटा फिर विण्याकरिता व बैल जोडण्याकरिता असलेलें लाव लाकूड, किंवा माग उठविण्याच्या यत्रातील ( कापसन ) दाडा ) ५ चांभाराची कातडें वाळत घालण्याची आडवी दाडी–तुळई **एका अढ्या खालचा**–एका घरातील–कुटुंबातील **अढ्याला पाय लावून निजणें**–स्त्रि झोंप घेणें=खुशाल स्वस्थ पडणें, अत्यंत बेफिकिरपणें निजणें असणें [ का अड अड्ड ]

**अढें**—न काम, ओरी ( गाय, म्हैस इ० जनावरांची )

**अढेवड**—पु चाकाच्या अन्याची दोन्ही नेंमें सांधणारा आडवा तुकडा [ का अड्ड+वड ]

**अढेपाट**—पु अर्ध्याचे लाकूड, अढे

**अढेपारडे ( डे )**—पु भर जमीनीच्या उत्पन्नातील गाव पाटलाचा हिस्सा, पाटलाचे हक्क –पाटलाच्या इनाम जमीनीशिवाय गावांडी व लगानीतील त्याचा जो हिस्सा असतो त्याला नेमणूक म्हणतात सरकारातून मिळणारा जा त्याचा पगार ती नेमणूक

**अढेवेढे**—पु अव १ वसूर आणि वेडयावाकड्या ताना घेऊन केलेले गायन २ वाकडे तिकडे, आड फाटयाचे टाळाटाळीचे मुद्दे हरकती, वाक्षा ३ अळेपिळे, आढव तिढव वगैरे ०घेणे–सक्रि वाकू करणे अडचणी हरकती उपस्थित करणे [का अड्ड अढा (र्ता)+ स वेष्टनवेढ ]

**अढ्या**—पु सुत काढण्यासाठी किंवा साकळे करण्यासाठी ज्या दोन खुंट्यांभोवतीं ते गुंडाळतात त्यांपैकीं प्रत्येक [ अढ ]

**अढ्याफरचत**—पु स्त्री दोन्ही टोकास लाकडी खुंटी असलेला दोषांनी चालवावयाचा गोठा करवत, अढे [ अढे+करवत ]

**अढ्याचौताल**—पु एक ताल, आडचौताल पहा [ हिं ]

**अणकुची**—स्त्री टोंक, तीक्ष्ण बिंदु शेवट 'त्याच्या (धोंड्याच्या) अणकोच्या झिजल्या '–भूव २१ [सं अणि+का कुचि=ल्पुता ? ]

**अणखर**—पु दूध काढताना शेवटच्या जाराने पिळाच्या लाग णाऱ्या ल्हान धारा [ अणि+धार ? ]

**अणखर**—वि १ बळकट, मजबूत, टिकाऊ,भक्कम, (लुगडे मणता –विशेषत नारायण पेठी कापडास, कारण ते पत्त्या रंगाचे व टिकाऊ असते, सरीव शुद्ध धातूचे (दागिने) २ कठीण,करार, तडका फडकी, राखठोक निर्भीड (भाषण-वचन) ३ दु समद-मर्मभेदी, खोंचदार भाषण( वतमान-गाढ) ४ विलक्षण चमत्कारिक कधीं न घडणारी, अलौकिक [का १ अणिकर=उत्कृष्टता, मुख्यता वनवात २ अणक=चेष्टा निंदा ]

**अणखी**—क्रिवि १ अधिक, जास्त, शिवाय - पुन्हा, परत ' एकदा भेटास गेलें होता मग अणखी कशाला जाऊ ' –उभ आणि, व अणिक पहा [ स अन्यत्+क=अणिक ]

**अणखुरणें**—अक्रि दुधाच्या पान्हा दाटल्यामुळें भर आचळ भारी ताठणे, तरारणे, फुगणे ' गाय अणखुरली ' [म अन+धार म अणखर ]

**अणगट**—स्त्री न १ (अगापासूनची)फादी, अणी टोंक अंकुर ' विशिष्ट वतांचे फोक। धीराच्या भणगर्ने तिख। '–ज्ञा १ • १९१ [ स अग्र+गत ]

**अणगें**—न (गा ) तवारूची मागील मान, असें गहा ' ताणी धाच अणगीं विकली घेतल्यात ' [का अडिग=असें अर्धी गागी]

**अणगु**—वि स्थूल मोठा अस्थूल मी अणगू। जें काहि तें मी। '–राज्ञा १८ ११९१ तुल० ' स्थूल मी अणु। जें वाही तें । '–( च ) ज्ञा १८ ११९७ [ म अन्+ अणु ]

**अणणें, अणणावळ, अणणाई, अणाआण**—आणणें पहा

**अणदळ**—न ( ना ) ताम्हन [ ? ]

**अणभुजणें**—अक्रि चमत्कारिक–नवल–आश्चर्य वाटणें [ अणभुज ]

**अणभुज**—वि १ परका, अपरिचित, नवीन २ चमत्कारिक, आश्चर्यकारक [ म अन्+भुज, प्रा अण+भुज्ज ]

**अणवट**—पु एक तऱ्हेचा रुप्याचा दागिना ( पायातील ), पायाच्या आंगठ्यात घालवयाचें जोडवें चटपट अणवट जोडव्यांची झटपट, दाही बाहीं मेंदी रंगली । '–गाग २० [ वैदिक म अण्वी=बोट+वृत विंवा अणु=शब्द करणे का आणी=वाटोळेपणा+ वृत–वट्टे ? गु अणवट ]

**अणवा**—वि ( गो ) १ न शोभणारा, हल्कया कर्मी प्रतीचा ' तो विहरा पेला ? तो सामको अणवो ' २ अव्यवहारी, मढ्ठागी, मूर्ख [ स अनु+वत् ]

**अणवा, अणवाणी, ( क ) अणवाई**—क्रिवि वहाणा–उघडया पायाने, अनवाणी पहा

**अणस**—न ( गो ) एक प्रकारचें भात [ गं अणु तुल० कणिस ( वण+स ) ]

**अणस**—स्त्री ( गो ) लोखडाचा वाटा, वर्ने ३० मुसळांनी अणस [ का आणि=वर्तुळपणा ]

**अणसूट**—अनसूट पहा 'अणसूट निमल चार वाजी। –वर्मास्व ८ १०९

**अणा**—आहणा पहा

**अणा–णी**—पु स्त्री आणा, एक नाण्याचा रुपया, आणा पहा

**अणि–णी**—स्त्री १ टोंक, शवटचा बिंदु अग्र ' केसाच्या अणी इतकेंसुद्धा हटविणारा प्राणी मला संसारात दिसत नाहीं ' –पपप्रे १०५ २ अंकुर अग्र ( वृक्ष, पर्ण इ० चा ) ३ प्रनवळ, अणिनाणीची वेळ 'अणी चुकली बारा वर्षांचा वायदा'=योग्य समय चुकला कीं बारा वर्षे काम होत नाहीं ४ भोवऱ्याची आर–आरी ५ जोडण्याचें बाकदार मुरडलेलें टोंक ६ लगामाचे हातात धरावयाचें टोंक–शवट ७ गाडीच्या आगात घालण्याची खीळ–खुंटी [स अणि ता अणि=खील ] ०दार–वि अणकुचीदार गाक असणारें ०वाणी–स्त्री नेनवळ

**अणि–णी**—उभ आणि, शिवाय, अणखी ' कदाचित् त्या दर्वी, अणि फणिमणींच्या पण मुरी। '–कक ३२

**अणिक–ख**—उभ ( कविता ) आणखी, आणि –वि वगळा भिन्न, विशेष, दुसरा, अन्य ' न ईल सर्वे आणिकीं। कामा नय सवथा। '–दा ७ ९ १० [ग अन्यत्+क, प्रा अण+क]

**अणिमा**—पु स्त्री १ अष्ट सिद्धींतील एक, अणु एवढा ल्हान, अष्टमहासिद्धि पहा ' दिले अणिमादिभयें अष्टगुण गा ' या '

मोअनु ६ ५१ २ अणुत्व, अतिशय सूक्ष्मपणा, बारकाई [स अणिमन्]

**अणिमोल**—अनमोल पहा

**अणिया**—वि अणीदार 'पुढील अणिया भाले।' –उपा १८ –स्त्री (गो ) गलबताच्या पुढचा (अणकुचीदार ) भाग [स अणि प्रा अणिय=अग्रभाग]

**अणियाळें**—वि अणीदार अणकुचीदार नोकदार तीक्ष्ण 'अणियाळिया दृष्टि।' –भाग ३६५ 'दीर्घ नासिक आणियाळें।' –नभा १४ ८७७ [स अणि+आयुध्]

**अणीक, अणीकु**—अणिक पहा ३ अणीच्या प्रमाणें अणीक विध

**अणीकसा**—वि विलक्षण असाधारण असामान्य, चमत्का रिक [स अन्यत्+क+सदृश, म अणिक+सा]

**अणीबाणी**—स्त्री १ संकटाची-भीतीची स्थिति 'धुमधडा क्यांची-लुमरीवर यण्याची अवस्था (क्रि० येणें) मी मुक्कीत बोलत असता तू अणीबाणीवर यतोस हें काय' २ काय सिद्ध होण्याची जवळ आलेली स्थिति एतप्रसग सौभमोगाचीवेळ आमची पचाईत अणीबाणीस आली ' ३ निकडीचा कठीण प्रसग-समय 'त्याची अणीबाणी भ्या सभाळली ' [ अणी + बाणी किंवा बाणी द्वि ] ०चा कज्जा-भांडण-लढाई-वाद– कडाक्याचा, निकराचा, जोराचा कज्जा वगैरे ०चें काम-नाजूक काम गलबलेचें अगदीं सपविलेंच पाहिजे असें काम ०स येऊन नासणें-एनवळीं बिघडणें–बिघाड होणें

**अणु**—पु १ पदार्थाचा स्वतत्र रीतीनें अस्तित्व असणारा अतिसूक्ष्म भाग रज कण ( सूर्यकिरणात जे धुळीचे कण दृग्गोचर होतात त्याच्या षष्ठांशानें लहान असणारा ) ( इ ) मोलक्यूल 'जें पाहता त्रिभुवन। अणुही नाहीं॥' –ज्ञा १२ ३२१ २ कालाचा एक भाग–मुहूर्ताचा ( ४८ मिनिटांचा ) ५४,६७००० वा हिस्सा ३ ( सगीत ) पावमात्रा काल –वि अति लहान अल्प सूक्ष्म 'तुम्हारामचि हें तुझें अणु उणें नस नाम हा।' –केका ७ [स ]

**अणुआर**—पु वारिक तुरा चागतुरा 'तय निवगाचा अणु आरु। आइकत निघाला जो अपारु। तो महाभारतप्रकारु। भोंवता कला॥' –ज्ञा १८ ३. [म अणु + आर = अल्प ']

**अणुगुरुत्व**—न (पदा रसा ) वाफेचें विशिष्ट-गुरुत्व अणु भार ( मोलक्युलर डॅन्सिटी )

**अणुभार**—अणुगुरुत्व पहा

**अणुमन्द्रसत्तर**—न (सगीत) मन्द्रनादापक्षा ज्यानें नीच नाद असणारें स्वरसप्तक

**अणुमात्र**—वि अगदीं थोडें किंचित ईषन्मात्र तिळमात्र 'तुज भय नाहीं अणुमात्र।' –नार ९ ७

**अणुरेणु**—पु अतिशय लहान कण सूर्य किरणात दिसणाऱ्या रजःकणाच्या ( परमाणु ) ... असे जे धुळीचे वगैरे अति सूक्ष्म कण त्यातील एक (सामान्यत अव प्रयोग) 'अणुरेणु सूक्ष्मस्थूळा पार नाहीं। श्रुती नेती त्याही खुंटलिया॥' –तुगा २२०४ [स अणु + रेणु=धूळ] ०जाल–न १ सूर्य किरणातील अणु परमाणु २ अतिसूक्ष्म कणाचा समुदाय [स ]

**अणुवाद**—पु (तत्त्व ) जगातील सर्व वस्तुमात्राची उत्पत्ति अणूपासून झाली आहे व हे अणू अनत काल आहेत असा सिद्धात [स]

**अणुसूट**—अनसूट पहा

**अणेगा**—स्त्री आणेगा पहा

**अणेगी, अणेकीं**—वि अनेकीं, अनेक प्रकारें 'मायासूत्राची करोनि दोरी। जो ब्रह्मादिकां खेळवी अणेगी परी।' –शिशु १ भणे हाचि खेळतुसें अणेकी खेळीं।' –दावि ३४० [म अनेक]

**अण्णा**—पु १ ( मूळ अर्थ ) वडील भाऊ २ बहुमानार्थी आपण नाव, लहान मुलानाहि लाडकें नाव म्हणून लावतात [प्रा अण्ण–अ, का अण्णा=मोठा भाऊ]

**अण्णाठें**—न ( गा ) पायलीच्या १६ व्या भागाएवढें एक माप 'अण्णाठेंभर तांदूळ घेऊन यॉ '

**अण्वी**—वि अणुरूप, सूक्ष्म 'अण्वी जीवकळा तथ। पहावी माझी॥' –एभा २२ १८७ [म ]

**अत**—क्रिवि म्हणून एतदर्थ, अताएव, यामुळें, या कारणा स्तव [स ] ०कारणात–क्रिवि अतएव यामुळें याकारणास्तव ०पर–क्रिवि म्हणून यापुढें, पुन (नकारार्थी वाक्यात ) [स ]

**अतएव**—क्रिवि याच कारणासाठीं यासाठीं 'तक परम हमाचें लक्षण। ज्ञानपरिपाकें परिपूर्ण। अतएव शांति ओळग आपण।' –एभा १८.१८४ [स अत एव]

**अतखानी**—वि (प्रा ) मत्सरी नीचबुद्धि [ ' ]

**अतणें**—आतणें पहा

**अतत**—उद्गा एखाद्यानें अचबा आश्चर्य दाखविलें असता निघ णारा उद्गार 'अतत ' 'अतत बघता हा नदीस पूर आला ' [म हा ( आ ) तात ]

**अततना**—स्त्री १ चोरानें अडखळत कललें आपण बाल ताना गमणें २ (ल ) बाकू नातु करणें, मागें घेणें, स्मरणें ( क्रि० करणे माडणें लावणें ) [ध्व ]

**अतताई,-त्याई-त्यायी**—वि ( क्रोधाच्या भरात ) साहस कर्म करणारा करणारा ( मोडकर द्वाड मुलाला लावतात ) [म आततायिन्]

**अतत्त्वार्थ**—वि असत्य अयथार्थ 'अतत्त्वार्थ भाषणीं धरावें मौन।' –सुर ५१.८८ [स अ+तत्त्व+अर्थ]

**अतथ्य**—वि. खोटें, असत्य, बनावट [ स अ+तथ्य ]

**अतद्व्यावृत्ति**—स्त्री सर्व पदार्थांचा निरास करणें, आत्म्या शिवाय सर्व पदार्थ दूर करणें —वेगळे करणें 'श्रुति 'नेतिनेति' येणें शब्दें। अतद्व्यावृत्ती निषेधबोधें।' —एभा ३ ६६७ [स नतत्=अतत्+व्यावृत्ति=पृथक् करणें ]

**अतर**—अत्तर पहा

**अतर्कित**—वि अटकळ, कल्पना, तर्क न केलेलें, अनपेक्षित, अचिंतित, अगोदर लक्षात न आलेलें, आकस्मिक अकल्पित [स]

**अतर्क्य**—वि कल्पनातीत, अचिंत्य, गूढ, तर्क करण्यास कठीण 'अतर्क्य महिमा तुझा गुणहि फार वा हे विधी' —केका ८७ [ स ]

**अतर्पणीय-अतर्प्य**—वि संतुष्ट करण्यास कठिण, समाधान न पावणारा, तृप्त न होणारा, असोशी [स अ+तृप् ]

**अतल-ळ**—न सप्त पातालांपैकीं पहिलें 'आताळो गलों, पाताळो गेलों। तिथून आणली ।' —लोककथा —वि अगाध, अतिखोल [ स ] ०**स्पर्श**—पु ज्याचा तळ, ठाव लागत नाहीं असा, अतिखोल ( डोह वगैरे )

**अतल(ळ)स**—स्त्री सटीन, रेशमी कापड, गर्भरेशमी कापड, काळसर लाल सटीन 'अतळस कुतन्याहीं साहित्या रुद वोरीं।' —साछह ३ ४० [ अर अतृलस ]

**अतळ(ळ)स**—पु परिमळ, स्वाद? —मनको 'वेडे भिरडी स्वाद घेती। आतळस आपालाचा।' —दा १८ १ ८

**अतस, अतसिका, अतसी**—स्त्री जवस, अळशी 'ज्या सावळ्या अतसिका कुसुमासमाना।' —वामन ४ ३ ६ [स अतसी, हिं गु अल्सी का अगसी व तिसी, म अळसी] ०**पुष्प**—न जवसाचें फूल 'नाना अतसपुष्पाचिया परी।' —रयोवा ४३

**अतक्षणीं**—क्रिवि याचक्षणीं याच वेळेला [ स एतत्क्षण ]

**अतज्ञ**—वि अनभिज्ञ विषयाची पुरी माहिती नसलेला [स अ+तज्ज्ञ ]

**अतां**—क्रिवि सध्या, यावळीं आता [स अत्र, प्रा अत्तो, सिं इताम्] ०**शां-शीं-शॉ-सा**—अलीकडे, हल्लीं, सध्या

**अताई-यी**—वि १ शिक्षकाच्या मदतीवाचून नुसत्या पर परेनें शिकलेला ( गवई, वैद्य ), क्रियाशिक्षक वेत असलेली ( गाय नादि कला ) २ (ल ) दक्ष, कुशल, प्रवीण [ तुर्की अतालीक=राजगी शिक्षक, हिं अताई=विनामूल्य गाणारा व नाचणारा, गु उत्तम गाणारा ]

**अतातय, अताता**—उद्गा आश्चर्यदर्शक उद्गार, अत्ता पहा

**अतात्त्विक**—वि असत्य असार, अवास्तविक, पोकळ 'ते नव्हे तें [ सं ]

**अतायत**—वि आजन्म, तहाहयात, मरणपर्यंत [फा ता-हयात]

**अतार-री**—पु १ सुगंधी अत्तरें करणारा-विकणारा, अत्तारी, आतारी, गंधी २ ( व ) बेगड, भिन्याचे कागद, रंग वगैरे विकणारा [ अर इत्र, फा अत्तार-री ]

**अति**—क्रिवि पुष्कळ, फार, अधिक, जास्त, अतिशय 'हा अति बोलतो ' म्ह० १ अति सर्वत्र वर्जयेत्=कोणतेंहि बाजवीपेक्षां जास्त करणें टाळावें २ अति तेथें माती —शअ ( नामापूर्वी हा उपसर्ग पुढील काहीं अर्थांनीं योजतात ) वरचढ, सरस, मागें टाकणारा, पलीकडे, वरून उ० अतिकठिन-कोपी-गर्व-मिष्ट-मृदु इ०

**अतिइच्छा**—स्त्री ( विप्र ) अतीच्छा, फार लोभिष्टपणा, अतिशय लुब्धपणा, असोशीपणा

**अतिकरणें**—सक्रि ओलांडणें, पलीकडे जाणें, अतिक्रांत होणें 'निपजलें धान्य तेंसें। दुपाहरीं का येरें दिवसें। अतिकरें तैं तामसें। घेईजे तें॥' —ज्ञा १५ १५५ [स अति+कृ]

**अतिकाल-ळ**—पु उशीर, अवेळ, विलंब, योग्य वेळ टळून गेलेला काळ ( पेरणी, भोजन वगैरेस योग्य काळ जो वर्षाऋतु, मध्यान्ह इ० तो टळून अनुक्रमें शरदृतु तृतीयप्रहर इ० पुढचा काळ ) ०**ळ्या**—पु स्नानसंध्या, पूजा, भोजन इत्यादि नैमित्तिक कर्में उशीरा करणारा माणूस, अतिकाळीं वागणारा माणूस [ स अति+काल ]

**अतिक्रमण**—पु १ उल्लंघन, पराभव, अतिक्रांत करणें, ओलांडून जाणें 'तैसा भेटलियां न करवे। अतिक्रमु॥' —ज्ञा १३ २५९, 'तेवीं असत्याचेनि अतिक्रमें। वाचा प्रकाशें सत्य संभ्रमें।' —एभा ३ ५३५ २ ( ल ) अमर्यादा, अपमान, अव्हेर ( गुरु, शास्त्र इत्यादिकांचा ), अनादर ३ उल्लंघन, अतिक्रांतस्थिति ४ ( कायदा ) अपराध, गुन्हा (आज्ञा, हक्क उल्लंघन केल्याचा) 'स्थावर मिळकतीवर अ० केल्याबद्दल नुकसान भरपाई ' सामा शब्द-आज्ञातिक्रम, गर्वातिक्रम, कालातिक्रम, देशातिक्रम, मार्गातिक्रम, मर्यादातिक्रम, निद्रातिक्रम, भोजनातिक्रम [ स ]

**अतिक्रमणें**—अक्रि १ पलिकडे जाणें, उल्लघणें २ आज्ञा मोडणें, तोडणें, अमर्यादा करणें, अवमानणें, अपराध करणें 'ब्यसनीं म्हणें नव्हे हा आर्य अतिक्रमिसि का वृथा ! यासी?।' —मोमभा ५ ३९ ३ पराभव करणें, जिंकणें ४ व्यापणें

**अतिक्रांत**—वि १ ( काल, स्थल, मर्यादा, इ० ) ओलांडलेला, पलीकडे गेलेला २ ज्यानें अतिक्रमण केलें आहे तो ३ सपलेली, होऊन गेलेली ( गोष्ट ) ४ व्यापलेला ५ जिंकलेला [स] ०**करण**-( नृत्य ) नाचण्याची एक तऱ्हा ( पाय संकुचित करून एकदम वर उचलून पुढें पसरणें व पुन उंच करून खालीं टाकणें )

**अतिक्रांताशौच**—न सुतकाचा अवधि टळून गेल्यानंतर समजल्यामुळें धरण्यात येणारें सुतक [ सं. अतिक्रांत+अशौच ]

**अतिगंड**—पु सत्तावीस योगांतील सहावा योग [ सं ]

**अतिचर**—वि अतिवेगवान, अतिचचर ( ग्रह, मगळ वगैरे ) अतिचार पहा [ स ]

**अतिचार**—पु १ ( ज्यो ) एखाद्या ग्रहानें पूर्व राशीचा भाग शीघ्रगतीनें उल्लंघून दुसऱ्या राशीवर ( ठरीव वेळेपूर्वी ) जाणें 'तेथ एकाची ते शीघ्रगती । एक मंद मंदगामी होती । अतिचार वक्रगती । मंडळभेदें येती एकत्र ॥' –एभा २३ ८२७ २ अति वेगवान माणूस, ग्रह इ० [ स ]

**अतिचौकस**—वि फाजील, वाजवीपेक्षा जास्त चौकशी करणारा, अति चिकित्सखोर, छडा न छडा काढणारा [चौकस पहा]

**अतिच्यार**—वि मर्यादेबाहेर, फाजील, अतिचार 'हा भाआ वाणिता जाणी अतिच्यारी । तरी रगितु गोपती ॥' –शिशु ७१९ [ अति+चर ]

**अतिछत्र(त्रा), अतिछत्रका**—१ शेपू (भाजी) २ न बरुडासारखा वास येणारें एक प्रकारचें गवत ३ बडिशेप [ स ]

**अतित**—पु अतिथि पहा **०अभ्यागत**–अतिथि, बैरागी गोसावी, इ० पाहुणा [ स अतिथि ]

**अतितत**—वि अतिशय विस्तृत 'पुराभागीं जो हा अतितत सभामडप असे ।' –सारह ८ ९२. [स अति+तन्-तत ]

**अतिताई**—स्त्री अततार्इ पहा

**अतितार सप्तक**—न तार सप्तकापेक्षा उच्च सुराचें सप्तक [ स ]

**अतितृष्णा**—स्त्री अतिशय लोभ, हावरपणा, अधाशीपणा, लुब्धपणा 'अतितृष्णा न कर्तव्या' –सुभाषित [ स ]

**अतित्याई**—स्त्री अततार्इ पहा

**अतिथि**—पु १ पाहुणा, पांथस्थ २ एन जेवणाच्या वेळीं आलेला, अनाहूत मनुष्य, अगातुक पाहुणा 'असा अतिथि धार्मिक स्तुतपदा । कदा सापडे ।' –केका १२१ [स] **०काळ**–पु पाहुणा येण्याची वेळ, (ल ) दोन प्रहर, जेवणाची वेळ 'अन्न धावें निर्धारीं । अतिथिकाळीं परियेसा ।' –गुच ३२ २९ **०द्वेष**–पु आलेल्या अतिथी बद्दलचा द्वेष किंवा अनादर **०पूजन**–न. अतिथीचा आदरसत्कार, स्वागत, ( गृहस्थाश्रमातील एक मुख्य कर्तव्य ) **०भोजन**–न अतिथीला आपल्या पक्तीला घेऊन करावयाचें भोजन, पाहुण्याला घातलेलें जेवण **०यज्ञ**–पु पंचमहायज्ञांपैकीं दुसरा–मनुष्य यज्ञ **०वेळा**–स्त्री अतिथिकाळ पहा **०संतर्पण**–न ब्राह्मण भोजन अतिथियज्ञ पहा, पंचमहायज्ञांपैकीं एक 'अतिथि संतर्पण हा मनुष्य यज्ञ ।' –गीर ७८८ **०सत्कार**–पु अतिथीचें आदरातिथ्य मान मरातब

**अतिथ्यरीति**—स्त्री अतिथीच्या सत्कारासंबंधीं पद्धत नियम [ स आतिथ्य+रीति ]

**अतिदिष्ट**—आज्ञापित, अतिदेश पहा [ स ]

**अतिदेश**—पु १ प्रस्तुत विषयाच्या बाहेरील विषयास एखादा नियम, मुद्दा, विधान, तत्त्व लागू करणें, लागू पडेल त्या त्या ठिकाणीं लावणें २ आज्ञा, हुकूम, आदेश [स अति+दिश् ]

**अतिनीलकिरणें**—न अव ( शाप ) सूर्याच्या वर्णपटांतील नील किरणाच्या पलीकडचीं किरणें, 'अल्ट्रा व्हायोलेट' किरणें

**अतिपरमाणुविद्युत्कण**—पु ( शाप ) पदार्थाचा विद्युद्युक्त परमाणूपेक्षा लहान कण, इलेक्ट्रॉन

**अतिपरिचय**—पु अति स्नेह, फाजील सलगी, वाजवीपेक्षा जास्त संघटण म्ह० अतिपरिचयादवज्ञा=कुणाकडे अति जाणें येणें असल्यास आपला आदर, मान राहत नाहीं [ स ]

**अतिपाड**—पु १ अतिशय मोल, किंमत २ (ल ) फार मोठी सीमा, मर्यादा 'ब्रह्मविद्या देता उदारू । जे अति पाडाचे ॥' विसि ११ ४६ [ अति+पाड ]

**अतिपात**—पु ( नियम ) भंग, उल्लंघन अतिक्रमण, शास्त्र, रीतीभाती यांना न जुमानणें [ स ]

**अतिप्रसंग**—पु १ पराकाष्ठा, कमाल, अतिशयितता, अमर्यादा २ वाईट परिणाम, अनर्थ बोलता बोलता ( किंवा खेळता खेळता, वाद करता करता ) अ० झाला ' ३ फार निकट संबंध, सलगी ४ विषयांतर, अप्रासंगिक भाषण, पाल्हाळ 'हा असो अतिप्रसंगु । न सडीं पां कथालागु ।' –ज्ञा ५ ६६ [ स ]

**अतिबद्ध**—वि अतिकृपण, चिक्कू 'एकें उदारें अतिबद्धें । क्रुद्धें एकें ॥' –ज्ञा ११ १२६ [ स अति+बध् ]

**अतिबळी**—वि अतिशय ताकदवान बलिष्ठ 'अतिबळी बळी छळिला ।' [ स अति+बलिन् ]

**अतिभर**—पु विपुलता, आत्यंतता, तीव्रता, पुष्कळपणा, फार जोर चढ 'व्यथेचेनि अतिभरें ।' –विसि १ ६७२ [स अति+भर]

**अतिमनुष्य**—पु अतिमानुष पहा ('सुपरमन'ला प्रति शब्द) 'ज्यांना अतिमनुष्यकोटीचा दर्जा प्राप्त झाला,' –केले १ १८१. [ स ]

**अतिमर्याद**—वि मर्यादेपलीकडे, सीमेपलीकडे, निःसीम, पुष्कळ, अतिशय वाजवीपेक्षा जास्त, फाजील

**अतिमात्र**—वि क्रिवि अतिशय, अतीव, अत्यंत फार, पुष्कळ रसु हाआवा अतिमात्रु ।' –ज्ञा १३ ६३५ 'करकरती अतिमात्रें ।' विवि. ८ ६ ११९ [ स ]

**अतिमान**—वि अतिशय, बेसुमार, अमर्याद, विवक्षित मर्यादेच्या पलीकडे गेलेला ( काम, क्रोध, वायु पित्त इ० ) 'ब्रह्मगोळ अतिमानें कोंदाटला ।' –सप्र ८ २० ३७ [ स अति+मान ]

**अतिमानुष**—वि १ मनुष्याला असाध्य असें, अमानुष, अपौरुष, अमानव २ अलौकिक, मनुष्यापेक्षा गुणानें अधिक,

**अतिमुक्ता**—स्त्री १ मधुमाधवी वेलगी, माधवीलता, कस्तुर मोगरा २ तिवस, तेंदुरणी [सं]

**अतिरथ-थी**—पु. १ रथात बसून असंख्य योद्ध्यांशीं लढतो तो, मोठा योद्धा, वीर, शूर पुरुष २ (ल.) वादविवादात हार न जाणारा [म अतिरथ]

**अतिरथीमहारथी**—पु अव मोठमोठे वीर, एकापेक्षा एक वरचढ, पराक्रमी पुरुष, श्रेष्ठ पुरुष [स अतिरथ+महारथ]

**अतिरस**—पु अतिगोडपणा, अतिशयपणा, अत्युष्णता 'भीष्माच्या अतिरसीं। सर्वांनि तूगें जैसीं।' —ज्ञा ९ १०१ [स]

**अतिराग**—पु अत्यंत राग—क्रोध —वि अतिशय रागीट, क्रोधी 'अतिरागा भीरु माणा। त्याहून रागा दया त्यागा' [स]

**अतिरिक्त**—वि १ अतिशय, मर्यादेच्या पलीकडे गेलेला 'पूर्वीच्या काळीं मराठी व इंग्रजी शाळेंत असताना मुलें अतिरिक्त अभ्यास करीत होतीं' —आवि १०६ २ पलीकडे, शिवाय, वर, निराळा, पुढें या अर्थी समासांत उ० एतदतिरिक्त=याशिवाय, तदतिरिक्त=त्याहून निराळा 'हें मला ठाऊक आहे, एतदतिरिक्त ठाऊक नाहीं' [स]

**अतिरुद्र**—पु रुद्राच्या १३३१ एकादशण्या. (रुद्राचीं ११ आवर्तनें=१ एकादशणी, ११ एकादशण्या=१ लघुरुद्र, ११ लघुरुद्र किंवा १२१ एकादशण्या = १ महारुद्र, ११ महारुद्र किंवा १३३१ एकादशण्या=१ अतिरुद्र) 'अतिरुद्र केले फळदशा।' —सुच १९ ८९ [स]

**अतिरेक**—पु भरमसाटपणा अमर्यादपणा पराकाष्ठा, विपुलता, आधिक्य, कळस [स]

**अतिरोग**—पु क्षयक्षय रोग [स]

**अतिवयस्क**—वि १ वयानेंत म्हातारा, अतिवृद्ध, उतार वयाचा २ (विवाह विवाजन इ० ला) असमर्थ नालायक [स अति+वयस्+क प्रत्यय]

**अतिवस्**—वि पुष्कळ बहुवस अतिशय 'तैसें सकल जीवाचें जीवन। जें अतीवस प्रसन्न।' —ऋ ३२ [स अति+वसु]

**अतिवाद**—पु १ हवेडपणाचा वाद, वितंडवाद 'आम्हां समस्त करिशी अतिवाद, त्यजुनि लाज आमेंदीं।' —मोसभा६ ३६ २ निंदा, अपशब्द, कठोर भाषण —दी—वि अतिवाद करणारा [स]

**अतिविष-षा**—न (विष्र अतिविख) एक औषधि वनस्पति ही ज्वरघ्न व दीपनवर्धक आहे अपचन, उलटी होणें, हगवण व खोकला या विकारावर हिचा उपयोग होतो साल पांढरी—तावडी अशा काळी असते हे औषध बाळगुटींत घालतात वस्त्र रंगविण्याच्या [कामीं] सालीचा उपयोग होतो —वगु १ १९ [स अतिविषा का अतिविषा हि. अतिस गु अतस, ब आतईच, ते अतिविषाग, इं ॲकानिटम, इं ॲकोनाईट]

**अतिवृष्टि**—स्त्री अतिशय पाऊस, अनावश्यक वृष्टि [स]

**अतिव्यय**—पु. उधळेपणा (मितव्ययाच्या उलट), बेताल खर्च, उधळपट्टी [स]

**अतिव्याप्ति**—स्त्री १ वाजवीपेक्षा अधिक विस्तार, फाजील गोष्टींचा समावेश, मर्यादेचें उल्लंघन, अतिविस्तृतता २ (न्याय) अलक्ष्यावर लक्षणाची व्याप्ति, व्याख्येय जातीमध्यें ज्या ज्या वस्तूंचा समावेश व्हावा असी इच्छा असते त्याखेरीज दुसऱ्या निराळ्या वस्तूंचा समावेश होणें असें दिसेल तर त्या व्याख्येस 'अतिव्याप्ति' हा दोष आहे असें म्हणतात उ० 'पदार्थांची दरपेच करण्याच्या साधनास नाणीं म्हणतात,' अशी नाण्याची व्याख्या केल्यास वायका बोहन्यापासुन भांडीं घेऊन त्याबद्दल त्यास जीं कापडें चिरगुटें देतात त्यासहि नाणें म्हणावें लागेल, म्हणून वरील व्याख्येंत अतिव्याप्ति हा दोष आहे —सुको ४१ [स]

**अतिशय**—पु १ वैपुल्य, बाहुल्य, विपुलता, भरमसाटपणा २ अतिरेक, अत्याचार, दांडगाई 'जा हा करूं अतिशय। काहां तुम्हां दया नय।' —तुगा ५२५ ३ मेजवानींत जेवण्याचा आग्रह ४ अति प्रसंग, अनर्थ 'तेवींचि सजयो म्हणे चित्तीं। हा अतिशया या नृपतीं।' —ज्ञा १७४३१ ५ निकड, तकार, आग्रह, जिकीर करडा अमल 'तथापि अतिशय करतील' —रा ३ ४२६ ६ नेट, मायेपोट 'म्हणे भगवत्सत्ता प्रमाण यथें। मी अतिशय व्यर्थ का करूं॥' (नि० करणें) [स]

**अतिशय**—वि फार, विपुल, बहुत, वाजवीपेक्षा जास्त, भरमसाट

**अतिशयित**—वि अतिशय, फार, मोठें, पुष्कळ, विपुल 'अतिशयित भाग्य त्याचें स्त्रीयहि अतिशयित हु स वळविलें॥' —मासभा ३ ३९ [स]

**अतिशयेंकरून**—क्रिवि आग्रहानें 'अतिशयेंकरून बोलावून'—ख १९१९

**अतिशयेंसी**—क्रिवि अत्यंत, विपुलतेनें, भरपूरपणानें 'ऐसें आवघण आलें। तेणें घरचि बुडालें। पुढें तैसीं सुभिक्ष जालें। अतिशयेंसी॥' —दा ३ ७ ११

**अतिशयो**—अतिशय पहा

**अतिशयोक्ति**—स्त्री १ स्वाभाविक गुणापेक्षा अधिक वाढवून सांगण्याची रीत २ वाचाळता, अति बडबड, चाटाई ३ एक अर्थालंकार वस्तूचें लोकमर्यादेच्या बाहेर प्रतिपादन केलें म्हणजे हा अलंकार होतो याच्या प्रकारात (अ) भेदीं अभेदाची, (आ) अभेदीं भेदाची, (इ) योगीं अयोगाची—संबधीं असंबधाची, (ई) अयोगीं

रोगाची–अमर्यादी संबंधाची, (७) कार्यकारणाच्या समवायत्वाची आणि विरोधाची कल्पना केलेली असते उ० 'शोणित नदीत गेले पमदरथद्विरद वाहवाहन ।' –मोमीष्म ३ ६१; 'जो अवरीं उफ ळ्ता सुर लागलाहे। तो चंद्रमा निजननूवरि डाग लाहे॥' –नल ३१ ०करणें–अक्रि फुगवून सांगणे, तिखटमीठ लावून सांगणें, भलतेंच सांगणें [स अतिशय+उक्ति]

**अतिशहाणा**—वि फार समजल्या, लुच्चा, अति धूर्त, फाजील शहाणा, ज्याची योजना चुकते असा, अव्यावहारिक, (ल) मूर्ख म्ह० अतिशहाणा त्याचा बैल रिकामा=राजवैद्यापेक्षा जास्त चिकित्सा करतो त्यास यश येत नाहीं [अति+शहाणा]

**अतिशूद्र**—पु शूद्रजातीपेक्षा हलकी जात, या जातीचा, मनुष्य अस्पृश्य वर्गातले महार, मांग, इ०, चांडाल [सं अति+शूद्र]

**अतिशो**—अतिशय पहा 'तू आधींचि काय नेणसी। कीं हे गोत्रज नोळखसी। वायाचि काय करिसी। अतिशो आता॥' –ज्ञा २ २४ [अतिशय]

**अतिसार**—पु ज्यात मलविसर्जन अतिशय होतें असा–ह्गवणीचा रोग, या रोगाचे प्रकार –आमातिसार, ज्वरातिसार, पित्तातिसार, रक्तातिसार, श्लेष्मातिसार, सर्वसामान्य अतिसार यावर पित्तपापडा गुणकारी असतो म्हणून त्यास 'अतिसारघ्न' असें नाव आहे [स. अति+सृ=सरणें] –री–वि अतिसारानें पीडित असा

**अतिसूक्ष्मदर्शकयंत्र**—न अत्यंत ल्हान वस्तू ज्याच्या योगानें पहाता येतात असें यंत्र (अल्ट्रा मायक्रॉस्कोप) [स]

**अतिसो**—अतिशय पहा 'सोइरिकेचा अतिसो। पोखिलसे।' –अमृ २ ६९

**अतिस्नेह**—पु गाढ मैत्री, दाट स्नेह–मैत्री, दृढ प्रेम [स] –ही–जीवश्च कंठश्च मित्र, जिवलग मित्र, अतिशय सलगीचा दोस्त [स अति+स्नेह]

**अतिस्वार्थ**—पु अतिशय स्वार्थ अगर लोभिष्टपणा आप्पल पोटेपणा, हावरेपणा [स अति+स्व+अर्थ] –र्थी–वि अतिशय हावरा किंवा लोभी, मतलबी, केवळ स्वत पुरतें पाहणारा, आप्पलपोटा

**अती**—अति पहा ०करप–(गो) अतिरेक करणें [गो करप=करणें] ०आयप–(गो) फाजील होणें, मस्त होणें [गो आयप=आणें]

**अतीत**—वि १ गत, भूत, गलेला संपलेला, जवळून गेलेला, अतिक्रांत (काल, मार्ग वगैरे) उ० अतीत काळ=गेलेली वेळ 'तेवीं अतीता जन्माचें। उर्णे जो पाह॥' –ज्ञा १३ ५२७, 'अतीता नागतज्ञानरत। ऋषीश्वर मौनलें समस्त।' –एभा १ ३४४ २ मुक्त झालेला, पलीकडे गेलेला उ० कालातीत, जगतीत, दुःखातीत, देहातीत, दयातीत, हृदयातीत, बुद्ध्यतीत, बोधातीत, मोहातीत, लोभातीत, वयातीत, गुणातीत 'म्हणौनि जन्मऊर्मा। अतीत होसी । ७ ते धनंजया॥' –ज्ञा १४ ५९, 'भोग भोगूनी भोगातीत।' –एस्व ७ ५९ –दास पलीकडे, वेगळा [सं]

**अतीत** (ग्रह)—पु (संगीत) गायन सुरू झाल्यावर काहीं वेळानें ताल देण्यास आरंभ करणें [स]

**अतीत**—पु १ पाहुणा, अतिथि पहा 'तेथें समयीं आला अतीत। सन्यासी ब्रह्मचारी अर्थार्थ॥' –एभा ८ १५४, 'पाळी देव आज्ञा ब्राह्मणाचा मान। अतीतपूजन वैष्णवांचें।' –तुगा १०२. २ वैरागी, भिकारी, परमहंस 'अतीत वेषा देउनि तुजरा नेतों मी विपिनात।' –रत्न २ ? [स अतिथि] ०अभ्यागत–पु अतिथि, पाहुणा, आगंतुक [स अतिथि+अभ्यागत]

**अतीतणें**—अक्रि होऊन जाणें 'येथें भूतें जिये अतीतलीं॥' –ज्ञा ७ १६१ [स अतीत]

**अतींद्रिय**—वि इंद्रियास आकलन न होणारा, त्याच्या सामर्थ्या बाहेरचा, इंद्रियास अगम्य, अगोचर (परमाणु, ईश्वरस्वरूप, इ०) 'जरी अतींद्रिय लाहिजे। ज्ञानबळ॥' –ज्ञा ६ ३३ [स अति+इंद्रिय] ०विचारसंक्रांति–संक्रमण, ०सहसंवेदन–न दूरच्या दोन इसमाच्या मनात एकाच वेळीं एक विचार–भावना येणें 'टेलिपथी' ०ज्ञान–न पंच ज्ञानेंद्रियास आकलन न होणारें ज्ञान, इंद्रियास अगम्य ज्ञान, भूत भविष्य कालासंबंधी, तसेंच दुसऱ्याच्या मनात काय विचार चालले आहेत त्याचें ज्ञान ०ज्ञानी–वि अतींद्रिय ज्ञान असलेला

**अतीव**—क्रिवि फार, पुष्कळ, अत्यंत, बहुत [स अति+इव]

**अतुट**—क्रिवि सतत, न तुटता, तुट न येता, अतूट पहा [अ+तुटणें स अ+त्रुटित]

**अतुडणें**—आतुडणें पहा

**अतुर**—आतुर पहा

**अतुर्बळ**—न अपार शक्ति, धाडस –वि बलाढ्य, शक्तिमान 'यादव कर्मनि अतुर्बळ। नाना दुष्ट दमिले सकळ॥' –एभा १ २२१. [स अतुल+बल] –बेली–ळी–अतिशय कणखर, मजबूत, बलाढ्य, दांडगा, पराक्रमी, बिनतोड, धाडसी 'ज्ञान मार्गी अतुर्बळी। तुमचें दैन्य हरील॥' –गुच ५ ३१ (ल) फारच मोठा अवाढव्य, अचाट

**अतुल**—वि. (विप्र अतूल), तुलना नाहीं असें, बिनजोड, असामान्य अनुपम 'अतुल बळें अतिप्रबळ। बाटले जे यादव कुळ॥' –एभा १ २२७ [स]

**अतुलनीय, अतुल्य**—वि १ बिनजोड, तुलना करावयास योग्य नाहीं असें २ असमान, असदृश अतुल पहा [स]

**अतुवट**—आतुवट पहा

**अतुष्ट**—वि असंतुष्ट, नाराज, असमाधानी, अतृप्त [स]

**अतूट**—वि १ तूट न येणारें समृद्ध, पुष्कळ, अक्षय (धान्य वगैरे) २ कधीही न झालेले, अखण्डित, सतत, अभंग (दृष्टि

वगैरे ) ३ प०, सोडण्यास किंवा तोडण्यास कठिण 'आलिंगनीं मैंद पाहू। अतूट कंठीं शिरकला।' –मुआदि २५ ८९ ४ अराड, पूर्ण, अतुटित ( अक्षता, तांदूळ–कणी नसलेले वगैरे ) [ सं अ+तुट्–तुटित ] ०भाता–ज्यांतील बाण कधीं संपत नाहींत असा भाता, अक्षयतूणीर

**अतृप्त**—वि असमाधानी, तृप्तता न झालेलें–पावलेलें, असंतुष्ट, अपूर्ण, न भरलेलें ( पोट ) [ सं ]

**अतृप्ति**—स्त्री असमाधान, असोशी, हाव, लोभ, लाहो, वख वख [ स ]

**अते**—क्रिवि ( खा ) आतां [ स अत ]

**अतेव**—अतएव पहा

**अतोनात, अतोनास्त**—वि अतिशय, बहुत, पुष्कळ, विपुल 'यापाशीं अतोनात द्रव्य आहे' 'नदीस अतोनात पाणी आलें' [स अत +नास्ति]

**अतौत–ता–तीं–तें**—अम आत, मध्यें 'तेथें कृष्ण जळा अतौता।' –निगा ४५. 'आणि कोणासहि जगा अतौता। काळी मृत्यूची बाधा होता।' –नव ६ ५२ आतौता पहा [स अन्त ]

**अत्कारी, अद्कारी**—अधिकारी पहा

**अत्तर**—न सुवासिक फुलांचें अगर पदार्थांचें शुद्ध सुवासिक सत्त्व, अर्क, सौगंधिक अर्क, पुष्पगंधार्क, निरनिराळे प्रकार –१ वाळा ( हिंदी उस ), २ मेंदी (हिं हिना), ३ गुलाब (हिं ), ४ मोतिया ( मोतियाच्या फुलांचें ), ५ पाच पानडी, ६ चमेली (जाईजुईच्या फुलांचें ), ७ केवडा वरील पदार्थ एका भांड्यात पाण्यासह घालून त्याची वाफ करून ती एका नळीद्वारा दुसऱ्या भंड भांड्यांत साठवितात त्या वाफेचें द्रवरूप तें अत्तर [अर इत्र तुल० इ आटो] ०जाळणें,–राचे दिवे लावणें–मूर्खपणानें उधळपट्टी करणें 'अगोदर अत्तराचे दिवे जाळून मग काय धुळीचे दिवे खात जावयाचे आहे?' ०गुलाब–सभा बरखास्त होण्यापूर्वी सभासदांस पान सुपारी, अत्तर, गुलाबपाणी वगैरे देण्याचा विधि, ( सामान्यत ) पानसुपारी, सभावना [फा] ०दाणी–नी–अत्तर ठेवण्याचें पात्र 'त्यात फुलें अ०। लोकामाजीं मिरवतसे॥' –नव २० १०१ [अर इत्र+फा दान्]

**अत्तां**—क्रिवि ह्याक्षणीं, आताच, हल्लीं [स अत, प्रा अत्त, म आता, खा अत्ते]

**अत्तार–री**—गांधी, सुगंधी, आतार पहा

**अत्तुरी**—स्त्री ( काव्य ) स्त्री, भार्या, बायको [ अस्तुरी, अतुरी पहा ]

**अत्यंत**—क्रिवि वि अतिशय फाजील, फार, मनस्वी, हुमार, अमर्यादपणें, बहुत, बेहद [ स ] ०स्वजन–पु निकटचा, अगदीं जवळचा नातलग, अति प्रीतीचा माणूस 'दारा पुत्र धन यौवन। बंधु सेवक अत्यंतस्वजन।'

**अत्यंताभाव**—पु १ तिन्ही काळीं किंवा कधींहि एखादी वस्तु अस्तित्वात नसण्याची स्थिति, पूर्ण अभाव उ० वंध्येचा पुत्र २ ( न्याय ) अभावाच्या चार प्रकारांपैकीं एक प्रकार, अभाव पहा. [स ]

**अत्यय**—पु. १ विध्वंस, शेवट, अखेर, नाश, नुकसान, नाहींसें होणें सामा शब्द धनात्यय, धर्मात्यय, पापात्यय, प्राणात्यय, भ्रमात्यय, मोहात्यय, सत्यात्यय 'जीर्णे श्रमे अत्ययपातकासी।' –सारुह १ ३९ २ सोडणें, पलीकडे जाणें, त्याग करणें ( ल ) मरण उ० गेहात्यय, दारात्यय, देहात्यय, पुत्रात्यय ३ अतिशय, पराकाष्ठेचें, मर्यादेबाहेर, अमर्याद, अमर्यादता, अतिक्रांतता [स अति+इ=जाणें ]

**अत्यर्थ**—वि क्रिवि पुष्कळ, अतिशय, फार, अतोनात [स अति+अर्थ ]

**अत्यवस्थ**—वि मरावयास टेंकलेला, मरावयाच्या बेतांत असलेला, मरणोन्मुख ( अत्यावस्थ रूप चुकीचें आहे ) [स. अति+अवस्था ]

**अत्यवस्था**—स्त्री वाईट–बिकट दशा ( शरीराची ) 'मागें काहीं दिवस मदनमंजरीची अत्यवस्था झाली होती' –मम १४१

**अत्या**—आत्या पहा

**अत्यागी**—वि. कामुक, वासनायुक्त, फलेच्छा न टाकणारा 'एवं गोंविले संसारें। अत्यागी ते।' –ज्ञा १८ २५६ [स ]

**अत्याग्रह**—पु अतिशय आग्रह, निकड, मायेमोड [स ] –ही–वि अतिशय आग्रह करणारा–धरणारा

**अत्याचार**—पु १ अविहित, व्यवहाराविरुद्ध वर्तन २ अधर्माचरण, अनुचित आचार ३ बलात्कार, जुलूम 'चालू हिंदवासियांवरचे राज्यकर्त्यांचे अत्याचार आणखी किती दिवस सहन करावयाचे ?' –के १६ ४ ३० ४ ( कोष्टे देखील धुऊन घ्यावीं इ० छादिष्टपणा दिसण्याजोगा ) अनवश्यक आचार ५ बेकायदेशीर राज्यद्रोही, क्रांतिकारक कृत्य 'हिंदुस्थानात इतर कोठेंहि अत्याचार झाला तरी मी (गांधी) माझा निश्चय पार पाडणार' –के २५ ३ ३० [स ] –री–१ विहित आचार–विधि सोडून वागणारा, अतिरिक्ताचारी, नेमाळ्या, फुंकून पाऊल टाकणारा २ जुलमी, कुकर्मी, पापी ३ क्रांतिकारक

**अत्यादर**—पु १ विशेष आदर, सत्कार, स्वीकार, सन्मान, अंगीकार 'असेल अशि आवडी करिशि का न अत्यादर।' –केका ६१ २ विशेष प्रेम, श्रद्धा 'मज ह्रदयीं सद्गुरु। जेणें तारिलों हा संसार पुरु। म्हणउनि विशेषें अत्यादरु। विवेकावरी।' –ज्ञा १.२२ [स अति+आदर]

**अत्यावस्थ**—अत्यवस्थ पहा

**अत्यासक्त**—वि एखाद्यासवधीं विशेष आवड गोडी-आसक्ति असलेला, अत्यत उत्सुक-तत्पर तल्लीन [स.] —**क्ति**—स्त्री विशेष ओढा, कल, आवड, शोक, तल्लीनता, तत्परता, अत्यत प्रेम, भक्ति [स. अति+आसक्त]

**अत्युक्ति**—स्त्री अतिशयोक्ति पहा. 'अत्युक्ती ही नाहीं नाहीं। खरेंच तुज्ला कथितों ॥' —टिक ३७ २ वाचाळता, बडबड [स]

**अत्युद्गार, ०वात**—पु एक प्रकारचा वात, यात रोग्याला ढेंकरा फार येतात [स अति+उद्गार,+वात]

**अत्युष्ण**—वि अतिशय उष्ण, तप्त [स]

**अत्र-त्रे**—क्रिवि ह्या स्थळीं, येथें 'अत्र गध सुमनी धूपा। करीतसे धर्मराजा ॥' —कथा ६ २१४. ('अत्र गध-पत्र-पुष्प-धूप-दीप' इ० पूजा मत्र) [स]

**अत्र**—अत्रप-ब पहा

**अत्रक**—(गो) प्रतिबध 'प्रसिद्ध लेखानें आईक्ट करून एकत्र राहण्याम अटक होत नाहीं' —गोमातक रीतिभाति, पृ ११ [अटक]

**अत्रत्य**—वि येथील, या ठिकाणचे, स्थानिक [स]

**अत्रप-फ-ब**—वि १ अधिक, फालतुक, जास्ती, रिकामा, निराळा 'तुम्हापाशीं अत्रप अगरखा असेल तर द्या' २ जव ळचा, शेजारच्या, सभोंवतालच्या [अर अत्राफ्]

**अत्रप-ब**—न अनिश्चितपणा, असबद्धपणा, दुटप्पीपणा (भाष णाचा, आचरणाचा वगैरे) (क्रि० ठेवणें, राखणें) —वि अनिश्चित, मोघम 'चार तटप्यातून तीन निवडले एक अत्रब राहिला आहे' —क्रिवि असबद्धपणें, विसगतपणें, अनिश्चितपणें, दुटप्पीपणानें [स अत्र क सदह याचा सक्षेप ? अर अत्राफ् ?]

**अत्रबीद्**—वि (गो) बेमुर्वतखोर 'सगल्यामितर हॉ चड अत्रबीद' [पोर्तु आत्रेव्हीदु]

**अत्राप-फ**—वि अत्रप पहा 'वरकडही अत्राफ शिलेदार वगैरे लोकास याचप्रमाणें तात्रीद आहे' —रा ७ ५४ [अर (तरफ चे) अत्राफ्=बाजू, सभोंवार तुल० हें अत्राफ=रोजारचें]

**अत्लस**—रेशमी कापड, साटीन, अतलस पहा 'अत्लस हात चौदा' —रा ३ १९

**अत्यातत्या**—अद्यातद्या पहा

**अत्विष-ष**—अतिविष पहा

**अथ**—अ १ (सस्कृत प्रथारभीं लिहिण्याचा शुभ शब्द) आता येथून, पुढें, नतर अशा रीतीनें. २ अथवा 'आपण अथ असे विकिले मग एक घरो अथ दोन घरी।' —वामन ८४ **०पासून इतिपर्यंत**—आरभापासून अगरपर्यंत, आदीपासून अतापर्यंत, सायत [प्रथाच्या आरभीं 'अथ' व शेवटीं 'इति' असते म्हणून]

**अथज्या**—क्रिवि (ना) इकडे [स अत्रस्थ]

**अथर्गण**—न (कों) रानटीपणाची, आडदाड वागणूक, आरडा ओरड, अट्टहास, आदळ आपट, शिवी गाळ, उतावीळपणा, घाई किंवा आग्रह, तारागण [स अथर्वण]

**अथर्वण**—पु १ चौथा वेद 'अथर्व' वेदाचीं २० काडें आहेत त्यात जारण मारण यासबधीं मत्र आहेत याचें वैतानस नावाचें श्रौतसूत्र असून कौशिक वगैरे गृह्यसूत्रें आहेत व त्या त्या ग्रथात अथर्ववेदातील तत्तद्विषयक मत्राचे विनियोग दिले आहेत २ अथर्ववेदाचा द्रष्टा-सपादक ऋषि ३ आपल्या फायद्यासाठीं दुस ऱ्याची चहाडी, लावालावी इत्यादि खेळ करणें किंवा जो करतो तो [स] **०विधि**—अथर्ववेदात सांगितलेलें कर्म, जारणमारण **अथर्व वेदी**—अथर्वण सस्कार ज्याच्या परपरेंत आहेत असा ब्राह्मण, त्या शाखेचा

**अथर्वणें**—क्रिवि (गो) अर्थावीण [अर्थ+विना]

**अथवा**—उभ पक्षातरबोधक अव्यय, अगर, किंवा, निर निराळे किंवा विरुद्ध पदार्थ, शब्द किंवा गोष्टी अलग अगर वेगळे करण्यासाठीं योजावयाचा शब्द साधारण मानानें किंवा, व, अथवा हे शब्द सारख्याच अर्थानें योजतात [स अथ+वा]

**अथाक, अथांग**—वि (काव्य) तळ, ठाव, थाग लागत नसलेलें, अतिशय खोल, अतलस्पर्शी 'क्षमा आणि शातीचा दुजा अथाक सागर तू।' —प्रला १७१ [स अस्थाग=फार खोल, प्रा. अत्थग्घ=अगाध]

**अथापि**—उभ असें असताहि, तथापि, तरीसुद्धा 'तो कोपून शिव्या दऊ लागला अथापि मी बोललों नाहीं' [स अथ+अपि]

**अथांवी**—क्रिवि अथाग, खोल 'वधू गौतमाची पतीशाप डोही। बुडाली अथावी शिळारूप होई।' —वामन-बोध ३० (अक्कभा २) [अथागी अप]

**अथारी**—स्त्री १ (व) (काहीं वऱ्हाडवाले मिळून) रामाइतीनें शेत वखरण्याची अगर नागरण्याची पाळी 'आमच्या शेतात उद्या अथारी चालेल' २ एखाद्या शेती कामाच्या मोबदल्यात गडीमाण साना दिलेलें जेवण 'रामानें शेती नागरल्यानतर आपल्या सर्व गड्याना अथारी दिली' [?]

**अथाव**—वि १ खोल, ओंड, अथाग, अगाध —पु खोल पाणी 'पैं अथावीं घट बुडाला।' —ज्ञा ८ ६५, 'जेवीं अथावीं पडिला चिरा। तेवीं बाहिरा निघों न शके।' —एभा ५ ३९८ २ खोली 'तो विषयविषाचा अथावो।' —ज्ञा १८ १०५४ [स अ+स्थाप्य प्रा अ+ठाव]

**अथिमाय**—वि (व) भायल्या, नामर्द 'इतका कसा अथि माय तू?'

**अथिर**—वि चळवळ्या;चळवळ करणारा —शिपु [स अस्थिर]

**अथिल-ला**—वि. आश्रय केलेला, योग्य, समर्थ, थोर, भाग्यवान्. 'चिद्रूपायें अथिल विदेह मिथिलाभूपाळ भूपावली।' —आगी १. आथि-ला पहा [स अस्ति, प्रा अत्थि+ल]

**अथिलीथडी**—स्त्री अलीकडील बाजू (२) आस्तिक्य बुद्धि [स अस्ति+तट]

**अथिलेपण**—न थोरपण, सामर्थ्य, भाग्य, आथिलेपण पहा

**अथी**—आहे, आथी पहा

**अथेति**—अ आरंभापासून शेवटपर्यंत, अथपासून इतिपर्यंत [स अथ+इति]

**अद**—वि अर्धा, निमा, शब्दांना हा उपसर्ग म्हणून लागतो जसें –अदकोस, अदसडी, अदगज, अदपडी, अदतोळा, अदघडी, अदपाव, अदमण, अदशेर, इ० [सं अर्ध, गु अद-ध, प हिं अद, आद, कों अद]

**अद**—न (शाप) एक धातु द्रव्य, इं आयाडिन, हें औषध व फोटोग्राफींत उपयोगांत आणितात

**अदकाव-अदकावाचा**—अधकाव पहा

**अदखणा**—वि. १ कुरूप, देखणा नव्हे तो २ ज्याला पाहवत नाहीं तो, परोत्कर्षासहिष्णु दुष्ट, मत्सरी 'आइत्त झोड आदखणा ।' –दा २ ३ २८, 'पडीत वाचाळी टकडे अदखणा । घडिघडी करिती निंदा जाचणी ।' –दावि ४५८ [स. अ+दर्शन, प्रा अ+दक्खण, म अ+देखणा]

**अदगळणें**—अक्रि (व) झुरणें, दु खित होणें, व्यथित होणें, वेदनांनीं विव्हळ होणें 'खाइकानें रात्रदिवस तो अदगळतो' [स अर्ध+गल् ?]

**अदट**—वि १ दृढ, निश्चल 'रुक्मिणीचा भक्तिभावो अदट ।' –कथा ४ ८ १७३ २ धीट, अजिंक्य पराक्रमी, सामर्थ्यवान् 'भगवत महाअतुवेळी । अदट दैत्यातें निर्दाळी ।' –एभार ७७६. [स दृढ, प्रा दढ, तुल० का अदटु=सामर्थ्यवान्]

**अदंडनीय-अदंड्य**—वि दंड–शिक्षा–शासन करण्यास अयोग्य [स]

**अदत**—स्त्री १ अद्ल शासन 'त्यानें आपणास घडलेल्या अदतींची हकीकत त्यास सांगितली' –बाळ २ १ २ खोड सवय (वाईट) स्वभाव (क्रि० धरणें, पडणें लागणें) [अर आदत्= सवय, चाल]

**अदत्त**—वि १ न देणारा, कृपण चिक्कू कवडीचुंबक, कद्रू 'आइत्त झोड आदखणा ॥' –दा २ ३ २८ २ न दिलेला [स अ+दा] ०**शिखामणी-शिरामणी**–पु. पराकाष्ठेचा कृपण [स]

**अदना**—वि नीच कनिष्ठ अद्ना पहा [अर अद्ना=कनिष्ठ]

**अदपाव**—पु. अर्धापावशेर, शेराचा आठवा हिस्सा [स अर्ध+पाद]

**अदपुत्तिक**—न (शाप) अद(आयोडिन)मयुक्तद्रव्य, जखमा भरून काढण्यास उपयोगी इं आयडोफार्म

**अदब**—स्त्री मर्यादा विनय नम्रता, सन्मान, प्रतिष्ठा, भीडपणा, आदर (क्रि० ठेवणें, राखणें, सभाळणें, राहणें) **चालविणें**=सन्मान राखणें ०**धरणें**–सलामी देणें 'फौजेचा कदम धरि अदब झडतो शिपाई ।' –एपो २४० ०**बजावणें**–छातीवर एकावर एक हात ठेवून नम्रतापूर्वक उभें राहणें (मुजरा करणें, मान देणें) [अर अदब्=मर्यादा राखणें, नम्रता, शिष्टाचार]

**अदब**—पु १ चिंता, श्रम, दु ख, त्रास (क्रि० पडणें, पावणें, सोसणें) २ निकड, जरूरी (कामाची, बाबीची) (क्रि० पडणें) [दवणें]

**अदबखाना**—पु. तुरुंग कैदखाना 'हरदोघांस अदबखाना दवलें' –रा १८ १९, 'आठदहा महिने अदबखाना, पायीं बेडी घालून बहुत कष्टी केलें' –वाड सनदा ३४ [अर. अदब्]

**अदबणें**—अक्रि १ खागावणें, अशक्त–अधू होणें, खितपत पडणें (आजारानें) २ टेकीला येणें–गांजणें, बेजार होणें (दुखानें–त्रासानें, पीडेमुळें). ३ रंगीस येणें मेटाकुटीस येणें, थकून भागून जाणें (श्रम–मेहनत–कष्ट–काळज्या यांनीं) ४ परिश्रम करणें, काबाडकष्ट करणें, अति खस्ता करणें, दगदग सोसणें 'मी त्या विषयीं अदबलों तेव्हां तें झालें' [दवणें]

**अदबशीर**—क्रिवि नम्रतापूर्वक, लक्षपूर्वक, काळजीनें, कळकळीनें (क्रि० ठेवणें–राखणें–सरणें–हालणें) –वि १ पडदा इत्यादिकानें अच्छादिलेलें, सुरक्षित, मर्यादेनें राहिलेला 'हीं कांचेचीं भांडीं पेटींत ठेवा म्हणजे अदबशीर राहतील' २ आदर बाळगणारा, सन्मान ठेवणारा ३ आगेपशीर [अर अदब्]

**अदभागी**—वि हतभागी, फुटक्या कपाळाचा–नशीबाचा, दु खी व दरिद्रि उपभोग नशीबात नसणारा [स हतभागिन्]

**अदंभित्व**—न (काव्य) साधेपणा नम्रता, आढ्यता नसणें, ढोंग न करण्याचा गुण, साधुपणा 'तरि अदंभित्व ऐसें । लोभियाचें मन जैसें ॥' –ज्ञा १३ २०२ [स]

**अदभ्र**—बहुत, मोठा, फार 'अन्योन्य हताघातें वा मूर्छा पावले अदभ्र ते ।' –मो [स अ+दभ्र=ल्हान]

**अदमण-णी**—पु स्त्री अधामण (माप वजन) अर्धामण वजनाचा जिन्नस [स अर्ध+मान]

**अदमणका, अदमणा**—वि अर्ध्या मणाच्या वजनाचें–मापाचें (भांडें, वजन दगड इ०)

**अदमास(से)-सें**—अजमास(से)–सें पहा

**अदमु(मो)रें**—न पूर्णपणें न विरजलेलें दूध, विरजण लावल्यापासून अजमासें १२ तासात तयार होणारें दहीं गोड दहीं थोडा आंबटपणा असलेलें दहीं, अर्ध मुरलेलें ०**घालणें**–(बायकी) विरजणाची अर्धवट स्थिति करून ठेवणें [स अर्ध म अद + मुरणें] ०**चांदिणें**–कोवळें चांदणें ? 'अदमुरें चांदिणें फोडिजे । कैरवाचा मकरंदु काढिजे ।' –शिशु ७७६

**अदम्य**—वि दमन करण्याला कठिण, ताब्यात आणण्यास कठिण, मश, अंकित करण्याला अयोग्य [स ]

**अदय**—वि निर्दय, कठोर, दुष्ट निष्करुण [स ]

**अदरून**—आदरून पहा.

**अदर्शन**—न १ दर्शन न होणें, नाहींसें होणें २ दिसण्याची स्थिति नसणें, न दिसणें, लोप, तिरोधान, अदृश्यावस्था [स ]

**अदल**—वि वास्तविक, खरा, रास्त, न्यायी 'या खट ल्यात अदल इन्साफ झाला' –विक्षिप्त १४० –पु इन्साफ कर णारा अद्ल पहा [अर अद्ल=न्याय ]

**अद्ल**—अदल पहा

**अदलंड मदलंड**—अधल्ड मधल्ड पहा

**अदलबदल**—( वों ) अदलाबदल पहा

**अद्ला**—वि मालेंतील पहिला किंवा सर्वांत पुढचा, आधींचा अगोदरचा, आरंभींचा, पहिला [स आदि] –**लें वर्ष-साल**–मागील वर्ष, गतसाल, गुदस्त साल ०**दिवस**–विवक्षित दिवसाच्या मागचा, अगोदरचा –**ल्या घरचा** पहिल्या नवऱ्यापासून झालेला (मुलगा) ०**जन्म**–मागील जन्म ०**मधला**–मधल्या भागातला, ना पहिला ना शेवटचा, कोठला तरी

**अदलाबदल**—स्त्री १ ह्याचें त्याला व त्याचें ह्याला असा फेरफार, येथलें तेथें, तेथलें येथें, परस्पर देवघेव, बदलाबदल, मोब दला २ (व्यापार) चढत्या व पडत्या भावात विक्री, इ एक्स्चेंज [बदल द्वि ]

**अदवासुंठ**—स्त्री आलेंसुंठ 'अदवासुंठ चार टाक।' [स आर्द्रक, हिं आदरक=आलें, गु आदु=सुंठ]

**अदवेचा**—आदवेचो पहा

**अदशेर**—पु अर्धशेर (माप किंवा वजन) [स अर्ध+शेर]

**अदहनीय-अदाह्य**—वि जाळण्याला किंवा दहन करण्याला कठिण अयोग्य, दहन न करता येण्यासारखें [स ]

**अदळ**—वि १ अयोग्य, असार गर किंवा मगज कमी असलेला २ कचा, हलका उ० अदळ पोटाचा किंवा कासोट्याचा=ज्याचें पोट हलकें आहे किंवा ज्याला लवकर शौचास होतें असा, मृदुकोष्ठ अदळगाता=ज्याच्या जवळ गुप्त गोष्ट टिकत नाहीं असा, चहाड खोर [स अ+दल] ०**पण**–असमर्थता अयोग्यता असारता 'जें अदळपण दखिलें। तुझिये ग्रंथें।' –ज्ञा १३ ५४१

**अदळ**—पु स्त्री १ हीन वापर वर्दळ रहदारी, त्रास निर्जर छळ, अगभाड २ घाव धक्का हेलकावा (क्रि० काढणें लागणें लावणें) 'दारिद्र्याचा अदळ मपत्तिमानास फार लागतो' 'ह्या ओझ्यावर सर्वांचा अदळ' [स आ+दल] ०**अ(आ)पट**, ०**उपट**, ०**उप(फ)ळ** ०**धोप**, ०**धोपट**,–**ळा आदळ**–स्त्री हाताच्या भरात चीज वस्तूची फेंकाफेंक दगा, गिगामस्ती

**अदळणें**—उक्रि १ कोसळणें, धडकणें, थडकणें, आपटणें 'आंधि नगारीं घाला घेयेंश्व आदळोनिया भग्न।'–मोकर्ण १.१८. 'जैसा पर्वतावरी पडला पर्वत। तैसा सुभिवावरी आदळत।' २ चालून जाणें, तुटून पडणें, जोरानें हल्ला करणें 'एथून फौज उठली ती थेट किल्ल्याच्या माचीस जाऊन अदळली' ३ (ल) अधाशी-पणानें खाणें, (दाताखालीं) रगडणें [स आदलन, किंवा अद्= खाणें+ल स्वार्थी –भाअ १८३४]

**अदा**—पु १ नखरा, नजर फिरविणें, डोळे मोडणें वगैरे शृंगारिक हावभाव, अभिनय, विलास, अंगविक्षेप, चेष्टा, ऐट. 'डवगल्यांत उभी होती शयनात खूण अदाची मारी लहरा।' –पला ७२ 'हसत मुख सदा पाहून तुझी अदा। मुळूक झुकले।' –ह्री १३५ 'त्या मैफलींत त्या नाटकशाळेनें अदा करून लोक रंजन केलें' २ खूण, शकून, चेष्टा 'जवळ जाऊन पहातो तों कावळा अदा दावितो।' –अफला ७५. [?]

**अदा**—१ लाभ, नफा, फायदा २ समूह, साठा, संचय, मुद्दल, भांडवल, मालमत्ता ३ उत्पन्न, वसूल, मिळकत, प्राप्ति 'अदा पाहून खर्च करावा' 'तीन टके अदा त्रेपन टके खर्च' ४ पूर्ण करणें, भरपाई, फेड 'आम्ही आपला अमील ठेवून तुमचा पैका अदा करून देऊं' –दिमरा १ ?१४ **करणें**–फेडणें, देणें, वारणें, देऊन टाकणें (मागणी, कर्ज) [अर आइदा किंवा अदा तुल० स आ+दा=देणें प आदाय ]

**अदाई**—स्त्री १ मिळकत, प्राप्ति, उत्पन्न २ भरपाई, फेड ३ (ल) कामाची पूर्णता –वि हातीं आलेले, भागविलेले–देऊन टाकलेले–पैसे [अदा]

**अदाता**—वि अनुदार, कृपण, कंजूष 'अदातयाचें उच मंदिर।' –रावि ६ ३४

**अदातृत्व**—न कृपणपणा [स ]

**अदांभित्व**—अदंभित्व पहा

**अदालत**—स्त्री १ न्यायकचेरी, न्यायसभा, कोर्ट, कोर्ट २ खरला चौकशी इन्साफ न्यायव्यवहार [अर ]

**अदावत**—स्त्री १ वैर, दुस्मावा, हेवा, भाऊबंदकी, अकस, शत्रुत्व, द्वेष मत्सर दावा उ० अदावतीच्या फिर्यादी २ आळ, दोषारोप (क्रि० करणें, घालणें, घेणें पडणें) ३ दुसापन ४ सवट –**ती–त्या**–वि द्वेष्टा अदावत आणणारा, मत्सरखोर, कुभाड रचणारा [अर ]

**अदावळ**—स्त्री १ पाडसाळपणा, द्वाडकी, दांडगाई, चेष्टा, उपद्रव (रहा मुलाचा) २ खोटा आरोप तोहोमत दोषारोपण, आळ (क्रि० घालणें, टाकणें, येणें) 'मल्हारराव यानीं पुनाच्या कारभारी हे अदावळ घातली आहे' –भाव ६ ३ लचांड, सवट, छळ, त्रास [फा+वळ किंवा अदावत]

**अदिति**—स्त्री इंद्रादि देवतांची–आदित्यांची माता [स ]

**अदिनाशंबा**—शुक्रवारची रात्र [फा ]

**अदीरु**—( गो ) अधिक पहा

**अदींचेव( वि )दीं, अदींविदीं**—आदींचे विदी पहा

**अदीक्षित, दीक्षितेतर**—वि दीक्षा न झालेला, प्राकृत जन, सामान्य जन, 'लेमन' या इंग्रजी शब्दाचा पर्याय 'कौंसिलचे एकाद्या सालचे अदीक्षित कामदार पुढीलसालीं निवडून न आल्यास त्यास सदर सालाकरिता कौंसिलचे सभासद समजावें' –ई वि १८९ कौ घ य नि ९१३६ [स अ+दीक्ष्]

**अदु खनवमी**—स्त्री भाद्रपद शुद्ध नवमी ( भावी वर्षांतील सर्व दुःखें टळावीं म्हणून या दिवशीं स्त्रिया देवीची पूजा करितात) [रा ]

**अदुगर**—(कुण ) अगोदर पहा 'ए बया, माझा अदुगर कडे लोट कर' –वाय २ २

**अदूरदृष्टि**—स्त्री १ ज्याला दूरचें दिसत नाहीं असा, 'शॉर्ट साईट' असणारा, अधू डोळ्याचा २ (ल ) उतावळा, अप्रबुद्ध, दूरवर विचार न करणारा [स ]

**अदूषणीय-अदूष्य**—वि दोष देता न येण्यासारखा, अनिर्भर्त्सनीय, अनिंद्य, अवाच्य [स ]

**अदृशी**—वि अदृश्य, गुप्त, अप्रकट 'श्रीगुरु जाले अदृशी।' –गुच ५१ ४४४ [अदृश्य अप ]

**अदृश्य**—वि दिसत नाहीं असा, गुप्त, अगोचर, अलक्ष्य [स ]

**अदृश्यवाद**—पु ध्येयवाद, काल्पनिक अत्युत्कृष्टपणा, इ 'आयडियालिझम' –रागिणी [स ]

**अदृष्ट**—वि न दिसलेलें, न पाहिलेलें, गुप्त. –न नशीब, दैव, प्राक्तन, कपाळ (शुभाशुभ फल होण्याविषयीं प्रयोजक जें आपलें प्राक्तन, कर्म तें –त्याचा ब्रह्मलेख कपाळीं लिहिला असतो), प्रारब्ध, ईश्वरी संकेत 'होय अदृष्ट आपैतें। तरि बाळूचि रत्नें परते॥' –ज्ञा १५ २२, 'मरमर विधातया दुष्टा। काय अदृष्टा लीहिलें' –एरुस्व ५ ६९ **–ग्रास येणें**–कि अनुचित गोष्टहि करावी लागणें, नशीबीं येणें, भोगावें लागणें **०खर्च** पु दानधर्म, इत्यादि न दिसणारा खर्च, याचें फल पुढील जन्मीं मिळतें **०धनसंचय** पु गुप्त धनसंग्रह **०पूर्व**–वि पूर्वी कधीं न पाहिलेला. **०फल**–न भविष्य काळीं मिळणारें फल **०भय**–न स्वकर्माच्या परिणामासंबधाची, दुष्कर्माविषयीं भीति किंवा काळजी **०वंत-वान्**–पु ज्याचें नशीब चांगलें आहे असा नशीबवान, **०वशात्**–यदृच्छेनें, दैवयोगानें, नशिबानें **०मत-वाद, अदृष्टार्थ-मतवाद**–१ दैववाद किंवा तसें मत, कर्मवाद २ या जन्मांतील पापपुण्याचें पुढील जन्मीं फल मिळतें असा विश्वास **०वादी, अदृष्टार्थवादी**–दैववादी, अदृष्ट मानणारा पुरस्कर्ता **०हीन**–दैवहीन, दुर्दैवी, फुटक्या नशीबाचा 'शक्तिहीन सामर्थ्यहीन, अदृष्टहीन भिकारी।' –दा २ ३ ३४ [स ]

**अदेख**—वि १ मत्सरी, असहिष्णु, दुसऱ्याचा उत्कर्ष पाहवत नाहीं असा, वाईटावर असलेला २ (बायकी) ज्याचें तोंड बघू नये असा. [स. अ+दृश्, प्रा देख, हिं देखना]

**अदेखणा**—वि १ कुरूप, बेडौल, दिसण्यात वाईट अदखणा पहा २ मत्सरी, हेवेखोर, असहिष्णु **–णेपण**–दुसऱ्याचें बरें न पाहवणें, विघ्नसंतोषीपणा, मत्सर [अदेख]

**अदेखाई**—स्त्री शत्रुत्व, मत्सर, हेवा 'दुसऱ्याचे भाग्याची अदेखाई न करावी' –सिंव ५१

**अदेय**—वि न देता येण्यासारखें, वहाल न करण्यासारखें **०दान**–न अयोग्य देणगी [स ]

**अदेव**—वि हानिकारक, मारक, विरुद्ध 'अदेव वडवानळ। दानवासी।' –शिशु ५१६ [स ]

**अदोळणें**—अकि अदोळणें, आपटणें, आदळणें, हालणें, आदोलन पावणें 'हार गळ्यातील त्याल करित महिभाळ अदोळित।' –अमृत ५१ [स आ+दोल्, आदोलन]

**अदोळसा**—पु (गो ) अडुळसा पहा

**अद्दल**—स्त्री न्याय (ल ) ठेंच, ठोकर, कृतकर्माचें प्रायश्चित, शासन, शिक्षा, सावधगिरी, ताकीद **०घडणें**–अकि शिक्षा मिळणें, ठोकर बसणें, इशारत मिळणें. –वि नेमकें, बरोबर, तितकेंच, मोजकें (माप, प्रमाण, वजन, हिशेब इ० ) 'जी खेळातील मार्कांची सीमा ठरवावी तितकेच अद्दल मार्क झाले तरच तो खेळ जिंकतो.' –पाट २६ [अर अद्ल्=न्याय]

**अद्दल**—हुशार, अट्टल पहा (चांगल्या अर्थी ) अ० न्हावी–शिंपी-कसरी इ० (वाईट अर्थी ) अ० चोर-लबाड-शिनळ-हरामी

**अद्ना**—वि नीचतम, कनिष्ठ 'प्रस्तुतचा रंग तर असा दिसतो जे आला व अद्ना खाविंदापाशीं बरावर' –रा ५ ९ [अर ]

**अद्भागी**—वि दुर्दैवी, हतभागी, अदभागी पहा [स हत+भागिन्]

**अद्भुत**—वि अपूर्व, आश्चर्यकारक, पूर्वी न झालेलें, चमत्कारिक, विलक्षण, अचंबा वाटण्यासारखें 'अद्भुत वार्ताआणि कोल्हे गेले तीर्था' 'तो (सिंहनाद) गाजत असे अद्भुतु।' –ज्ञा १ १२६ –न १ आश्चर्य, उत्पात, चमत्कार (धरणीकंप, उल्कापात, पुरुषास हत्तींचे वळ इ०) २ नवरसांपैकीं एक रस अ० रस पहा 'जेथ शांताचिया घरा। अद्भुत आला आहे पाहुणेरा। आणि येरांही रसां पांतिकरा। जाहला मानु॥' –ज्ञा ११ ? **०मांडणें**–विलक्षण गोष्टी करावयास लागणें **०कौतुक**–न चमत्कार, आश्चर्यकारक कृत्य 'अद्भुत कौतुक वर्तिलें जाण। ऐका तें भाविकहो।' **०दृष्टि**–स्त्री. आश्चर्यकारक गोष्टी पाहिल्या असतां पापण्याचे केस (भुवया ?) आकुंचित होतात, बुबुळें व तारका चढतात, अशी कृति करणें हा अद्भुत रसाचा अभिनय आहे **०रस**–पु काव्यांतील नवरसांपैकीं

एकरस ०शांति–स्त्री (शेडिंनसन, धरणीकंप इ०) भावी अरिष्टसूचक काही अद्भुत झालें असता त्या अरिष्टाचे निरसनार्थ जें होमादि कर्म (विधि) करतात तें

**अद्य**—अ आज, हल्लीं [स] ०**तन**–वि आजचें, चालू दिवसा संबधाचें –न. एका मध्यरात्रीपासून दुसऱ्या मध्यरात्रीपर्यंतच्या चोवीस तासाचा काल, आजचा दिवस [स]

**अद्यतनभूत**—पु १ [व्या] अपूर्ण भूतकाळ (चालू भूतकाळ) २ सामान्य-अनियमित भूतकाळ [स]

**अद्यप्रभृति**—आजपासून [स]

**अद्ययावत्**—क्रिवि (विप्र अद्यावत) आजपर्यंत आजपा वेतों [स]

**अद्या**—पु अदा, नफा, मिळकत, लाभ, प्राप्ति (व्यापार, नोकरी यापासून) [अर अदा]

**अद्याप-पि**—क्रिवि अजून, अजूनहि, हा वेळपावेतों, आज पर्यंत, [स अद्य+अपि]

**अद्यापपर्यंत-वर**—क्रिवि अजूनपर्यंत, अद्यापि

**अद्यापय**—क्रिवि (गो) अद्यापपर्यंत, अद्यापहि 'अद्यापय जेवुक ना' 'दोन वरा झाली' [स अद्य+अपि+हि]

**अद्यावस्थ**—अत्यवस्थ (अप) पहा

**अद्र**—उम (व) उलट. 'पाण्यात उडी टाकून त्यानें मुलीला तर बाहेर काढलें नाहींच अद्र आपणच मेला' –क्रिवि मुद्दाम, हट कून 'मला अद्र विटाळ करतो' [अदरून]

**अद्रक**—न आलें [स आर्द्रक, हिं अद्रक]

**अद्राव्य**—वि (शाप) वितळण्यास कठीण, ज्याचा रस होत नाहीं किंवा जें विरघळत नाहीं असें [स अ+द्रु]

**अद्रि**—पु पर्वत, डोंगर, गिरि 'नातरी तपस्यापनेलागीं। दुर्जेयपण माइनि जगीं। महत्त्वाद्रीच्या शृंगीं। बैसावया॥' –ज्ञा १७ २४२ [स]

**अद्रीण**—न (गो) अजीर्ण [स अजीर्ण]

**अद्रुष्ट**—न (बायकी, ग्राम) कपाळ, नशीब, अदृष्ट पहा 'स्नान झाल्यावरोवर "अद्रुष्टाला" ऊर्फ कपाळाला काहीं न लावणें हें वरिष्ठ जातींतील चालत्या घराण्यात चालले मानीत नाहींत' –आगर ३ ११

**अद्रून**—अ–आदरून (अप) पहा

**अद्रें**—क्रिवि (रा) आदरून मुद्दाम [स आदर]

**अद्वंद्व**—न सुखदुःख, मान-अपमान इत्यादि द्वंद्वापलीकडील निर्द्वंद्व पहा (अप रूप अद्वद्व)

**अद्वय**—वि द्वैतविरहित, एकरूप, अभेद 'तें आपचि अद्वय ब्रह्म।' –ज्ञा ५ ९६ ०**युक्ति**–स्त्री अद्वय-अद्वैत तत्त्वज्ञान पद्धति 'कि प्रेमभावावरून भक्ति। निरपेक्षावरून वरति। कि पावला अद्वय। युक्ति। सहपश्चात्ताप त्यागें जाणिजे।' ०**वादी**–वि अद्वैतवादी, सर्व वस्तु एकचित्स्वरूप आहेत असें मानणारा, बुद्ध [स]

**अद्वातद्वा**—क्रिवि विसंगत, असंबद्ध, भरमसाट, भलतेंसलतें, अचकटविचकट, ताळतंत्र सोडून, मनस्वीपणानें, बेतालपणानें (भाषण, वर्तणूक, बोलणें) 'यद्वातद्वा भविष्यति' या म्हणीवरून 'त्यानें अद्वातद्वा विचार प्रकट केल्यास तो उपहासास पात्र होईल' –टि ४ ३१५ [स यद् वा तद् वा]

**अद्वितीय**—वि ज्यासारखा दुसरा कोणी नाहीं असा, विलक्षण, निरुपम, बिनतोड, सर्वश्रेष्ठ, लोकोत्तर, असामान्य 'जें अद्वितीय उत्तम।' –ज्ञा १ ४९ [स]

**अद्वैत**—वि १ जीव व शिव (परमात्मा) एकच असें मत 'जड-सृष्टि आभासात्मक असल्यामुळें खोटी व ब्रह्म हेंच एक सत्य व आत्मतत्त्व आहे, जीव हा परमात्म्यापासून अभिन्न असल्यामुळें तो व शिव एकच होय,' हें शांकर (शंकराचार्यांचें) मत २ ब्रह्म ३ (ल.) मतैक्य, ऐक्य, दाट परिचय, सलगी, एकोपा ०**दुसरी**–स्त्री (काव्य) अद्वैत मताचें गूढ ज्ञान 'एक नाम हरी द्वैत नाम दुरी। अद्वैत कुसरी विरळा जाणे॥' ०**भाव**,०**ताभाव**–पु अद्वैतपण, एकी, ऐक्यभाव ०**मत**–न जीवात्मा व परमात्मा याचा वस्तुत अभेद असें मत ०**वन**–न महाभारतात वर्णन केलेलें एक वन, (जेथें सर्व पशु वैरभाव विसरून आनंदानें राहात) ०**वाद**–पु अद्वैत, अद्वैत मत पहा ०**वादी**–वि अद्वैतमतास अनुसरणारा (शंकराचार्यादि) 'रिपुशर विजयी गमती द्वैतीं अद्वैतवादि पंडितसे।' –मोकर्ण ४७ १५ ०**सुख**–न अद्वैताच्या साक्षात्कारामुळें मिळणारें सुख आनंद [स]

**अद्वैतानंद**—अद्वैतसुख पहा

**अध**—क्रिवि खालीं, तळाला, समासात खालचा या अर्थी जसें –अध प्रदेश अधोभाग 'तेथ अध परौतें आघवें।' –ज्ञा ६ २३७ [स अध]

**अधकाय-याचा**—वि अधिक, उरलेला, जास्त, फाजील, पार्तील [स अधिक]

**अधकुरो**—वि (गो) अर्धवट, अपूर्ण [स अर्ध+कृत-कुर-कुर-(गोर), सिं अधोसारो, अधोरो]

**अधकोर**—पु नितकोर, आठवा भाग (भाकरीचा) [म अर्ध+(चत) कोर, किंवा अठकोर-अठरर-अठकोर-अधकोर]

**अधचामधचा**—वि १ अधीच मधील, अर्धवट, मधल्या ठिकाणचा, ना पहिला ना शेवटचा, कोटीत नाहीं २ कोणत्यादि एका वर्गांत न पडणारा, धड ना दाहाणा ना मूर्ख, न खरें न खोटें, ना दीव ना गैरदीव इत्यादि [स अध+मध्य]

**अधडा**—आधडा पहा

**अधण**—आधण पहा.

**अधन**—वि निर्धन, दरिद्री, निष्कांचन **०व्यवहार**-फौज दारी प्रकरण बाब, ज्यात पैसा किंवा मालमत्ता याचा संबंध नाहीं अशी कायद्याची बाब [ स ]

**अधपर्णे**—क्रि होरपळणें 'अधपर्ली तवकें। इंद्रियें धरिलीं।' –ज्ञा १२ ४६ [ स अर्ध+तपन–अधपन ]

**अध.पतन**—न १ खालीं पडणें, अध पात २ पुण्यक्षयामुळें नरकात पडणें, स्वर्गातून मृत्युभूमीवर किंवा नरकात पडणें ३ नरक पुरी 'वेदशास्त्रें पुराणें तया बोलती अध पतन। जया नाहीं परि ज्ञान गुरुपरंपरेची ॥' [स ]

**अध.पंथ**—पु नरकात जाण्याचा मार्ग [ स अध पथ ]

**अध पात**—अध पतन पहा **०होणें**–हीनावस्थेस पोंचणें, नर कात पडणें 'करिता ऐके जो निंदा या संताची। तयासि होतोचि अध पात ॥' **अध पातीं**–निराशेच्या–क्लेशाच्या खोल दरींत, दुसऱ्याच्या अविश्वासामुळें किंवा चुकीमुळें उत्पन्न झालेल्या अडचणी मध्यें, संकटात ( क्रि० घालणें, पडणें )

**अध.प्रमाण**—वि ( शाप )–प्रमाणापेक्षा कमी, खालच्या प्रतीचें, कमी तीव्र ( मद्य ) इ अंडरप्रूफ –सेंपू भा ७

**अध प्रवाहीचक्र**—न ( शाप ) पाणी जेथून पडतें अशा ठिकाणीं बसविलेलें चक्र, हें पाण्याच्या जोरानें फिरतें (इ अंडरशॉट् व्हील )

**अधम**—वि १ हलका, कनिष्ठ, क्षुद्र, क्षुल्लक २ ( ल ) नीच, वाईट हलकट, नष्ट, निंद्यकर्मा, दुष्ट, विरुध्द 'वर्जीन गंगा। नाहीं उत्तम अधम जगा ॥' –तुगा ६४२ **०किडा**–पु १ वकऱ्याच्या यकृतामधील रक्त ज्या विकारावर सागितलें आहे असा एक घोडयाचा विकार २ मनुष्याचें यकृत ज्यावर सागितलें आहे असा एक रोग ( एका दंतकथेप्रमाणें ) ३ काळपुळी ( कांहींच्या मतें ) ४ नेहमीं दुखणे करी इसम–मुऱ्हा [ स अध +म ]

**अधमदा( दृष्टि )**—स्त्री ( नृत्य ) खालीं बघणें, डोळ्याची उघडझाप करणें, बाहुल्या कधीं दृश्य व कधीं अदृश्य करणें असे प्रकार ज्यात होतात ती [ स ]

**अधमर्ण**—पु कर्जदार ऋणी, देणेंदार [ स अधम+ऋण ]

**अधर**—वि खालचा, तळचा, हलका –पु अधरदिशा, अध स्स्वस्तिक अधोबिंदु –पु १ खालचा ओंठ २ ( सामान्यत ) ओंठ. 'जीवशिव एकाकार। तैसे मिनले दोन्ही अधर ॥' –एरुस्व १५७ ३ ( नृत्य अभिनय ) खालच्या ओंठानें ( अधरानें ) दाख विले जाणारे अभिनय याचे सहा प्रकार आहेत विकूणन, वेपन, विसर्ग, विनिगूहन, संदष्टक व समुद्ग **०चावणें–चावून खाणें**–क्रि. रागानें ओंठ चावणें, अतिशय रागात असणें 'परमसंताप वाटला तेव्हां। अधर चावून खातसे ॥' **०पान**–ओंठाचें चुंबन, मुका **०पुट**–(काव्य) दोन्ही ओंठ (अंजलिपुटाप्रमाणें शब्द) 'बत्तीस हिरकण्या एकवळीनें विराजती अधरपुटीं।' **–रामृत**–न ओंठाच्या चुंबनापासुन मिळणारा अमृततुल्य रस (इनका मधुर)

**अधर, अध्धर**—वि १ अधीर, उतावीळ, दम नसलेला, असहिष्णु २ निराधार, अधांतरीं असलेला, अंतराळीं असलेला [स अ+धृ=धारण करणें] –क्रिवि १ अल्लाद, वरचेवर, अधांतरीं, हल केंच, सैलपणें, २ अचळवी, अरळ, अचानक, **०ठेवणें–लोंबविणें**– अधांतरीं–कांहीं आधार नसता मध्येंच लोंबत ठेवणें **०वसणें–लोंबणें**=आधारावाचून असणें, रहाणें, लोंबणें

**अधरोत्तर**—न दुरुत्तर 'परतु अधरोत्तरें करण्यात भागुरायण मुळींच हुषार नव्हता' –च १७९

**अधरोष्ठ**–पु खालचा ओंठ

**अधर्म**—पु १ शास्त्रविरुद्ध आचरण, वर्तन, धर्मबाह्य आच रण २ पाप, गुन्हा, वाईट कर्म [ स ] **०चारी**–वि अधर्मानें वागणारा, धर्मबाह्य वर्तन करणारा **०युद्ध**–न बेकायदेशीर–अनी तीचें युद्ध, कपटयुद्ध **०रत**–वि अधर्माचरण करण्यात आनंद मान णारा 'अवघे देखिले अधर्मरत। वरिवरि आचार दाखवित। जैशी शांति मैंदाची ॥' **०विपाक**–पु अधर्माचा अखेरचा (वाईट) परि णाम, अनीतीचें फल

**अधर्माचरण**—न धर्मविरुद्ध वर्तन, अनीतीची वागणूक [स ]

**अधर्मात्मा**—वि अतिदुष्ट, अनीतिमान मनुष्य [ स ]

**अधर्मिष्ठ**—वि अतिशय अधर्मी माणूस [ स ]

**अधर्मी**—वि अधर्मानें वागणारा [ स ]

**अधलंड**—वि न अधला न मधला असा **०मधलंड, अधर लंडमधलंड**–वि अधचामधचा कोठील तरी 'याचे गाण्याचा संप्रदाय धड हिंदुस्थानी नव्हे, धड कर्नाटकी नव्हे, अधलंडमधलंड आहे'

**अधला**—वि पहिला, आधींचा, प्रथम, अदला पहा [स आद्य] **०मधला**–वि मधील भागाचा, अधीलमधील [ स आद्य+मध्य, किंवा मधला द्वि ]

**अधवड**—वि अधोड पहा

**अधवडचा**–अलीकडचा, ताजा अर्वाचीन [ स अद्य+वर्त ]

**अधवणी**—न आधण येण्यासाठीं, उकळण्यासाठीं ठेवलेलें पाणी, आधणाचें पाणी [ आधण+स वन–वण=पाणी ]

**अधवरौतें**—क्रिवि खालचा वरतीं 'तेथ अधवरौतें आकुंचे।' –ज्ञा ६ २३७ [ अध+वरौतें=वरतीं स अध +उपरि, प्रा उवरि, म वरि ]

**अधवा**—वि तिघांत वडील(अधवा, मधवा, धाकटा) [स. आद्य ]

**अधवा**—वि नवीन, अर्वाचीन [ स अद्य ? आद्य ? ]

**अधल्याचा**—वि १ उपरमुख, उपरी, अकस्मात प्राप्त २ सरळ मार्गांत नसलेला, शिरस्त्यात नसलेला, मध्येंच आढळणारा **म्ह०**

अधव्याचा जोडला व पिंडीचा मोडला (बरोबर होत नाहीं) ३ कायमचा नव्हे असा, तात्पुरता ४ वापजायाना माहीत नाहीत अशा गोष्टी करणारा, कधीं कुळात कोणी केलें नाहीं अशा भानगडींत पडणारा ५ एकाएकी सत्ताधारी बनलेला ६ अलीकडील [स अध्वन्=मार्ग]

**अधष्ठणें**—सक्रि अधिष्ठिणें, अवलंब करणें 'अधष्ठुनी मायेतें।' –राराप १ ३ [स अधि+स्था]

**अधस्तन**—वि खालचा [स ]

**अध.स्त(स्थ)ळीं**—क्रिवि (बायकी) १ खालीं, अधो दिशेकडे २ अभरवशीं (पडणें, पाडणें) [स अध +तल किंवा स्थल] ०पहावयास लावणें–मानखडना करणें, फजिती करणें, तोंडघशीं पाडणें 'त्या मेल्यानें मला अधस्थळीं पाहायाला केलें'

**अध स्वस्तिक**—न (ज्यो ) खस्वस्तिकापासुन काढलेली रेखेषा अधोदिशेकडे वाढविली असता आकाशाच्या अदृश्य गोरा र्धाला ज्या बिंदूत छेदते तो बिंदु अधोबिंदु, अधर [स ]

**अधस्त्री**—स्त्री १ दासी २ ठेवलेली बाई, रखेली 'अध स्त्रीगमनी' =रखेली ठेवणारा [स अध +स्त्रीय किंवा स्वपिति]

**अधस्वी**—वि अधाशी, अघोरी, अतिखादाड [अधाशी अप]

**अधांटी**—अधाटी पहा.

**अधाडा**—पु १ तुटलेला कडा. 'मग प्रत्याहाराचा अधाडा। जो बुद्धीचियाही पाया निसरडा। जेथ हटिये साडिती होडा। कडे ल्या।' –ज्ञा ६ ५६, 'जिये ब्रह्माचळाचा आधाडा।' –ज्ञा ७ ६९ २ (ल ) आधार

**अधाडें**—शअ मध्यें, कडे –वि अर्धवट [स अर्ध+कड]

**अधांतरीं**—क्रिवि हवेंत, अतराळीं, आवाशात, वर, निराधार मध्येंच 'आधातरीं होती वेडे।' –दा ३ ७ १५ [स अध +अन्तर्]

**अधांतरी**—वि निराधार, एकाडा 'अशा अधानी व सर्वतंत्र स्वतंत्र लोकानीं सुरत येथील हिंदुसभेच्या निर्णयाकडे पाहून नाकें मुरडावीं ह्यात आश्चर्य नाहीं' –साम २ १६४ [स अध +अतर्]

**अधातुरूप**—वि (रसा ) धातुविरहित, ज्यामध्यें धातु नाहीं असें (मूलद्रव्य), (द ) नॉनमेटल

**अधांत्री-त्रीं**—अधातरी पहा

**अधाधिणें**—अक्रि भिवविणें, भेडसावणें आधाधिणें पहा [?]

**अधाधें**—वि अर्धे अर्धे स्त्रीपुरुष नामभेदें नाद। जग सरळ आधाधे–। पणें निर्हीं।' –अमृ १ १७ [स अर्ध+अर्ध]

**अधार्मिक**—वि धर्माप्रमाणें न चालणारा, दुराचारी अन्यायी, पातकी [स ]

**अधाशी-सी**—वि हावरा, अघोरी अतृप्त, लोभी, खादाड [स अति किंवा अधि+आशी]

शको १ ८

**अधास**—स्त्री हाव, लोभ, उत्कट इच्छा [स अधि किंवा अध +आश=खाणारा, प्रा आस किंवा अधि+आशा, प्रा आसा]

**अधासा**—अधाशी पहा

**अधि**—शअ नेहमीं नामाशीं संयुक्त असणारा उपसर्ग वर, वरचढ (स्थल परिमाण, गुण यानें) उ० अधिपति

**अधिक**—वि १ जास्त, पुष्कळ, फार (ल) नकोसा, नावडता 'मावळींना चंद्रिका जशी अधिक झाली तशी चंद्रशेखराना काहीं झाली नव्हती' –निच ११८ २ अधिक मोठें, गुरुतर ३ वर, पेक्षा जास्त उ० गुणाधिक=गुणानीं वरचढ, रसाधिक=रसेंकरून अधिक, चांगली चव असलेला ४ जास्त, वर–समासात संस्कृत संख्यावाचक शब्दाच्या मध्यें उ० एकाधिक शत ५ विशेष, पटाईत, निष्णात, अव्वल, असाधारण (माईट अर्थी–द्वाड, दाडगा, खोडकर मूल) ६ जादा, वाढीचा (महिना अधिक–मास) [स ] ०होणें–१ सफणें, रमी होणें 'करडयातलें कुकु अधिक झालें' २ वाजवीपेक्षा जास्त पिकणें, अविकणें (फळ वगैरे) ०अलंकार–एक अलंकार, यात कार्यनिष्पत्तीची सामुग्री पूर्ण असूनहि कार्य होत नाहीं म्हणून उप रोधपर वर्णन असतें उ० 'ज्या उदरात सकळहि लोकत्रय सावकाश राहतसे। त्यातंचि मुनिवरदर्शन होता आनद तो न मावतसे॥' –साच ४४ ०आगळा–थोडेसें वर, थोडें जास्त 'अधिक आगळे चार रुपये लागले तरी चिंता नाहीं' ०उणा–वि १ कमीजास्त २ ल्हानमोठा ३ बराबाईट ०उणा शब्द–पु मर्यादेचें उल्लंघन करण्या सारखा शब्द, टाकून बोलणें ०प्रसंग–पु दंगामस्ती, भाडण, उप मर्द 'अधिक प्रसग करशील तर एका क्षणात तुझं तोंड कायमचें बंद करीन' –अस्तभा १२४ ०भेट–स्त्री साक्षात्कार –मनको ०महिना–मास–सूर्यसंक्रातिरहित चांद्रमास, चांद्रवर्षात सुमारें दर तीन वर्षांनीं येणारा तेरावा महिना हा महिना ३२ महिने १६ दिवस आणि ४ घटका इतक्या कालानतर पुन येतो इष्ट शकात ९२८ वजा करून १९ नें भागावें, बाकी १, ४, ६, ७, ९, १०, १२, १४, १५ १७ १८ अशी राहिल्यास अधिक येत नाहीं, ०, २, ३, ५, ८ ११ १३, १६ राहिल्यास अनुक्रमें वैशाख, आश्विन, चैत्र, श्रावण, ज्येष्ठ आषाढ, भाद्रपद हे महिने अधिक येतात बारा वर्षांत चैत्र ज्येष्ठ, श्रावण हे अधिक होतात अठरा वर्षांनीं आषाढ अधिक चोवीस वर्षांनीं भाद्रपद अधिक १४१ वर्षांनीं आश्विन अधिक ७०० वर्षांनीं अधिक कार्तिक येतो कार्तिकापुढील चार महिने अधिक होत नाहींत व आश्विनाचे पूर्वी क्षयमास होत नाहीं –शको (अ) १५२ **अधिकस्याधिकं फलम्**–अधिक केल्यास अधिक प्राप्ति होते, अधिक प्रयत्न केल्यास अधिक यश मिळतें

**अधिकरण**—न १ स्थान याअर्थी व्याकरणातील एक पद (सप्तमीचा अर्थ) २ पाया, विषय, आधार, आश्रयस्थान, ज्यावर उभारलें असतें तें स्थल 'जाणिवा पंडितासि अधिकरणु

होए।' –ऋ ६, 'सकळ विद्यांचें अधिकरण।' –ज्ञा १३ १ [स] –णें–आश्रय करणें 'भूतातें अधिकरूनि असे।' –ज्ञा ८ ३२

**अधिकरणी**—वि अधिकरण असलेलें, ज्यास काहीं आधार–आश्रय आहे असा [ अधि+कृ ]

**अधिकाई**—स्त्री १ समृद्धि अधिकपणा, वैपुल्य २ मोठेपणा, श्रेष्ठत्व, वरचढपणा 'ऐसें अगाध तुझें भजन। अगम्य भजनाचें महिमान। भक्तिअधीन तुझें देवपण। मा मोक्षासि कोण अधिकाई।' –एभा २९ ७३७ [ अधिक+ई प्रत्यय ]

**अधिकांग**—न एकादा अधिक असलेला अवयव ( सहावें बोट ) –वि ज्यास एकादा अवयव अधिक आहे असा [ स अधिक+अंग ]

**अधिकाधिक**—वि जास्तजास्तच 'तों अधिकाधिक वाढ पुच्छाग्र। जैसा पंडिताचे बुद्धीचा प्रसर। बहुत बोलता नसरेचि॥' [ स ]

**अधिकार**—पु १ सत्तेचें स्थान, जबाबदारीची जागा २ धनीपणा, वर्चस्व, प्रभुत्व, हक्क ३ कार्यक्षेत्र, मर्यादा, प्रांत ४ योग्यता 'अधिकार तैसा करू उपदेश।' 'जैसा पाहोनि अधिकार। तैसें बोलावें उत्तर।' –तुगा ८१७ ५ (व्या) सर्व साधारण नियम, विधान, दिग्दर्शक वाक्य, काहीं विशिष्ट गोष्टींना लागू होणारा सामान्य नियम अथवा मथळा, अशा नियमाचा उपयोग ६ विषय, प्रकरण, ज्याविषयीं विचार केला आहे तें. 'ब्रह्मज्ञान उद्देशून वेदांत प्रवृत्त झाला तस्मात् त्यामध्यें ब्रह्मज्ञानाचाच अधिकार' ७ राज्य, अधिसत्ता, अमल्दारी [स अधि+कृ] ०च्युत–भ्रष्ट–वि (प्रधान, सुभेदार इ० मानाच्या)अधिकारापासून भ्रष्ट, अधिकारावरून–नोकरीवरून काढलेला, कमी केलेला ०च्युति–भ्रंश–पुस्त्री सत्तानाश, पदच्युति, अपकर्ष, न्हास ०त्याग–विसर्जन, अधिकारोत्सर्ग–पु सत्ता किंवा स्थान सोडणें, अधिकार टाकणें ०बाजी–स्त्री अधिकाराची हौस 'पटेल कमिटीचा रिपोर्टच अधिक विश्वसनीय ठरत असता, तो रिपोर्ट सरकारजमा करण्यात यावा आणि ज्या अधिकाऱ्यांनीं निष्कारण गोळीबार करून शेंपनास इसम नाहक ठार केले ते अधिकारी सरकारच्या दृष्टीनें सच्चे ठरून आपली अधिकारबाजी गाजवीत रहावे, यापेक्षा न्यायदेवतेचा उपमर्द तो कोणता ?' –क १६–९–३० ०विभागणी–(इ डिसेंट्रलायझेशन ) एकाकडेसच सर्व अधिकार न ठेवता काहीं वाटून देणें, मध्यवर्ती सरकार व वसाहती किंवा प्रांतिक सरकार यांच्यामधील अधिकाराची वांटणी. 'जेथें अशी अधिकार विभागणी असेल तेथें स्वराज्य नांदत नसून गुलामगिरीच वावरत आहे असें खुशाल म्हणावें.' –क २–१२–३० ०शिष्टाई–एकाया अधिकाराच्या स्थानीं असल्यामुळें वागणुकींत दाखवावयाची अदब, गौरव वगैरे ०स्थ–वि स्थानापन्न, सत्ताधिष्ठित [ स ]

**अधिकारणें**—अक्रि. एकायाला उद्देशून करणें–बोलणें ( उघड किंवा मनामध्यें ), स्पष्टपणें एकायास उद्देशून एकादी गोष्ट करणें. 'धन्वंतरीसारिखे जे मोटेमोठे वैद्य त्यातें अधिकारून वैद्यस्तुति केली असता जितकी केली तितकी शोभेल' 'यानें मला अधिकारून शिव्या दिल्या' [ स अधिकृ ]

**अधिकारी**—पु १ कामगार, अमलदार, हुद्देदार. 'अधिकारिया रिगता गात्रो। होय जैसा उत्साहो।' –ज्ञा १८ ७९५ २ विशिष्ट स्थानाबद्दल सत्ता, हक्क, विशिष्ट गुण, पात्रता असलेला, हक्कदार, वारसदार ३ अध्यक्ष, चालक, देखरेख करणारा, व्यवस्थापक, मॅनेजर ४ देशमुखाच्या खालील एक जिल्हाकामगार, गावकामगार पाटील यासहि हा शब्द लावतात ५ नियामक, प्रवर्तक, उगमस्थान 'जन्माचे अधिकारी आईबाप, कर्मांचा ज्याचा तो' ६ एक आडनाव –वि अधिकार असलेला, लायकीचा, योग्यतेचा, पात्र [ स अधिकारिन् ] ०वर्ग–अमलदार मंडळी, कार्यकारी मंडळी, नोकरशाही

**अधिकृत**—वि १ विशिष्टस्थानापन्न, सत्ताधिष्ठित २ अधिकार मिळालेला, नेमलेला 'ठाणेदाराची आपण अधिकृत बातमीदार आहोंत अशी खात्री पटवावी लागे' –के १२ ७ ३० ३ मनांत असलेलें, उद्दिष्ट, अधिकारलेला, अनुलक्षित [ स ]

**अधिकोत्तर**—वि १ विशेष, अधिक, याहून जास्त 'अधिकोत्तर काहीं नाहीं'. २ असामान्य, विलक्षण, वाजवीपेक्षा जास्त लोकोत्तर, वरचढ, एकाहून एक, अभूतपूर्व, भयंकर. 'तेथें न चाले तंतर मंतर, वर्तमान हें एक अधिकोत्तर।' –ऐपो २१४ [ स अधिक+उत्तर ]

**अधिगत**—वि १ प्राप्त, पोंचलेला २ ज्ञात, जाणलेला, अवगत माहीत [ स अधि+गम् ]

**अधिगम**—पु १ बोध, उमज प्राप्ति, ज्ञान २ (कायदा) सापडलेली ठेव पैसा [ स ]

**अधिगम्य**—वि प्राप्त होण्यासारखें, प्राप्त व्हावयाचें ( ज्ञान, ज्ञानाचा विषय )

**अधिदेवता, अधिदैव, अधिदैवत**—स्त्री न १ मानलेली, स्थापन केलेली, अधिष्ठित देवता २ मनुष्याच्या विशिष्ट अवयवांत, इंद्रियांत, शरीरांत अधिष्ठित असलेली देवता उ० सूर्य, नेत्रांमध्यें, अश्विन, नाकामध्यें, दिशा, कानामध्यें, वरुण, तालुमध्यें, वायु त्वचेमध्यें, इ० अधिभूत हें ज्ञेय म्हणजे जाणण्याची वस्तु असते अध्यात्म हें ज्ञानसाधन म्हणजे जाणण्याचें साधन असतें व अधिदैवत हें ज्ञाता म्हणजे जाणणारी शक्ति असते उ० मन अध्यात्म जेथें मंतव्य अधिभूत, चंद्रमा अधिदेवता, त्वचा अध्यात्म, जेथें स्पर्शितव्य अधिभूत, वायु अधिदैवत 'अधिदैव अध्यात्म अधिभूत। त्रिपुटी बोलिजे ते हे येथ।' –एभा २२ ३२६ ३ महमख वगैरे कृत्यांत मुख्य देवतेच्या उजव्या बाजूला

स्थापन केलेली देवता डाव्या बाजूच्या देवतेस प्रत्यधिदेवता म्हणतात [स ]

**अधिप, अधिपति**—पु स्वामी, मालक, धनी, सत्ताधीश, राजा, अधिराजा उ० ग्रामाधिपति, देशाधिपति, राज्याधिपति [स अधि+प]

**अधिभूत**—न साक्षात वस्तु, ज्ञानाचा विषय होण्यासारखी वस्तु, अधिदैवत पहा [स ]

**अधिमधि**—शअ मध्यतरीं, अधेमध्यें, फोल्डरी मध्येंच 'नसता अधिमधि उतरा । नसतींच विघ्नें येती घरा।' —नव १४ १२६. [स आदि+मध्य]

**अधिमास**—पु अधिकमास पहा

**अधिराज**—पु सार्वभौम राजा; मुख्य 'तरी सकळ वीराधिराजु । जो सोमवंशीं विजयध्वजु ।' —ज्ञा १२ २० —ज्य—न सार्वभौमत्व, साम्राज्य [स ]

**अधिरोहण**—न चढणें, चढणें ( राज्यावर, सिंहासनावर ) उ० राज्याधिरोहण [स अधि+रुह्]

**अधिवास**—पु १ राहण्याचें स्थान, वास्तव्य, राहणें 'यहीं अधिवासु श्रुति ।' —ज्ञा ३ १३७ २ शेजार [स अधि+वस्]

**अधिवासन**—न १ व्रतोद्यापनादि कर्तव्य असता तत्तत्कर्मांग देवतांचें पूर्वी विधिपूर्वक सर्वतोभद्रादि आसनावर जें स्थापन करतात तें, देवतास्थापन २ देवतेची प्राणप्रतिष्ठा किंवा स्थापना करण्यापूर्वी आदल्या दिवशीं तिला अक्षतांवर किंवा पाण्यामध्यें ठेवणें ३ ( ल ) कर्ज वसूल करण्यासाठीं किंवा आपली एकादी मागणी मान्य करून घेण्याकरिता एकाद्याच्या दारात धरणें धरून बसणें [स ]

**अधिवेशन**—न सभा, बैठक ( इ सेशन याला प्रतिशब्द ) 'हें प्रजापरिषदेचें ८ वें अधिवेशन आहे ' —के १६-८-३० [स अधि+विश्]

**अधिष्ठणें**—अक्रि १ (बुद्धीनें अथवा ) आश्रय करणें, रहाणें असणें, वास करणें, बसणें, युक्त होणें 'तैसें देख पा विहंगमतें । अधिष्ठूनि ज्ञानातें ।' —ज्ञा ३ ४३ २ स्वीकारणें अंगीकारणें हातीं घेणें 'म्हणे जें जें हा अधिष्ठील । तें आरंभींच यश फळेल ।' —ज्ञा ६ १५१ [स अधि+स्था]

**अधिष्ठाता-त्रा**—पु १ राहणारा, वास करणारा आश्रय भूत 'इंद्रियग्रौढीमंडळा । शृंगार एकचि निर्मळा । जें अधिष्ठातिया का मेळा । देवताचा जो ।' —ज्ञा १८ ३४९ २ अध्यक्ष, आश्रय स्थान, नियामक- (परमेश्वर) 'पाहुं अधिष्ठात्री तेथिंची । मातृका गा ।' —ज्ञा ६ १२७, 'ब्रह्मपदींचा अधिष्ठाता । त्यागी देती ब्रह्मसुता ।' —एरुस्व १५ १४७ [स ]

**अधिष्ठान**—न १ वास, निवास, राहणें, वास्तव्य 'या गावात आमचें दोन महिने अधिष्ठान आहे ' २ स्थान, ठिकाण, आश्रम, मठ, निवासस्थान, राहण्याचें मुख्य घर 'येती अधिष्ठानें पहावया ।' —सप्र ८ १० ९३ 'नेत्रान्तर्वर्ती जो मांसगोलक हें चक्षुरिंद्रियाचें व तद्देवतेचें अधिष्ठान ' ३ ( ल ) एकाद्याच्या दारीं धरणें धरून बसणें ( कर्जवसुलीकरता ) ४ दिखाऊ पसारा, आव, अवडंबर, थाटमाट, बडेजाव, बोभाटा, ( ज्ञान, विद्वता, संपत्ति, पावित्र्य इ० चा ) ( क्रि० माजणें, गाडणें, वाढणें ) ५ भ्रामक आश्रयस्थान, आरोपितवस्तु 'भ्रमविषय सर्पाचें अधिष्ठान रज्जू ' 'गगनीं चंद्रद्वयसें नसता ये प्रलया अधिष्ठानीं ।' —मोमभा २ ११४ ६ ब्रह्म, परब्रह्म 'जेथ अधिष्ठान प्रगट । डोळा दिसे ।' —ज्ञा ६ १७१ ७ आश्रय, आधार 'जव प्रकृतीचें अधिष्ठान ।' —ज्ञा ३ ५३ ८ प्रभुत्व, सत्ता ९ आसन, सिंहासन [स ]

**अधिष्ठित**—वि १ व्यापलेलें, ताब्यात घेतलेलें, वास केलेला २ वसविलेला, स्थापलेला ३ निश्चित केलेला, नियत [स ]

**अधिष्ठिति**—स्त्री १ स्थिति, अस्तित्व, वसति, निवास, वास्तव्य २ वसतिस्थान, निवासस्थान ३ आधान, निवेश, स्थापना [स ]

**अधिक्षेप**—पु निंदा, दूषण, आरोप, हेटाळणी [स अधि+क्षिप्=टाकणें, फेंकणें]

**अधीं**—क्रिवि १ पुर्वी, अगोदर २ प्रथमपासूनच, पूर्वीच, पूर्वीपासूनच 'अधींच बाई नाचरी तिचे पायात बांधली घागरी ' [स आदि ] ०चा-अगोदरचा, पूर्वीचा

**अधीं**—क्रिवि खालीं 'तेवींचि गा धनंजया । संसारतरु यया । अधींचि आथी खांदिया । हेंही नाहीं ।' —ज्ञा १५.९९ ०चा-खालचा 'आणि अधींचीं हीं मुळें । उपपत्तीं परिसविलीं सविवळें ।' —ज्ञा १५ २०९ [स अधस्]

**अधींचे वरी-विदि, अधी विदीं**—क्रिवि सर्वांच्या पूर्वी, सगळ्यात आधीं आदींचे विदीं पहा [अधीं द्वि ]

**अधीत**—वि १ पठण केलेला-वाचलेला ( भाग-ग्रंथ ) २ ज्यानें पठण केलें आहे असा, शिकलेला-पढलेला ( माणूस ) [स. अधि+इ=जाणें ]

**अधीन**—वि १ अवलंबून असलेला, ताब्यात असलेला, सत्ते खालील वश, हातातील विशेषत समासात —एतदधीन, क्रोधाधीन तदधीन, दैवाधीन, पराधीन, पापाधीन, रोगाधीन, लोभाधीन, स्वाधीन 'तऱ्ही वृत्ति वर्णत्रया—। अधीन तयाची ।' —ज्ञा १८ ८२०' १२ ३३ 'प्राप्ताप्राप्तीची गणना । अधीन कोणा पै नाहीं ॥' —एरुस्व [स ] ०पण-न ताबा, वर्चस्व, सत्ता

**अधींनामधीं, अधींमधीं**—क्रिवि १ मध्याजवळ, आरंभीं ना शेवटीं, चोहेंतरी, मळल्याच ठिकाणीं. 'हें झाड मुळापाशीं तोड,

सर्पीने मीं तोड़ नको ' २ अव्यवस्थितपणें ३ अवेळीं **अधींमधीं-अध्यामध्यात-अधेमधें-असणें-पडणें**-मध्य ठेवणें, मध्यें पडणें [स आदि+मध्य]

**अधीर**—वि १ उतावीळ, चचळ, अस्थिर, घोंटाळलेला, धरसोडया, अनिश्चित 'कळों ही आली तयाची जोडी। अल्प रोकडी बुद्धि अधिरा ॥' —तुगा ७०० २ धीट नव्हे असा, म्याड, भेकड [स अ+धीर] —पु १ धैर्याचा अभाव, भीति, म्याडपणा, कमकुवतपणा 'अधीरें दुणावती कष्ट' —मुआदि २९ १४३, २ उतावीळपणा, चचळपणा [स ]

**अधील**—वि अगोदरचा, पूर्वीचा, पहिला, प्रथम [स आदि+ल]

**अधील**—वि खालचा, नीच, क्षुद्र 'मग आधिलीं देहांतरें।' —ज्ञा१५ ९२ [स अध +ल]

**अधीलपण**—न १ श्रेष्ठपणा, मुख्यपणा, अग्रता 'तुका म्हणे अधीलपणें। नेली लाकडें चदनें।' —तुगा १०४७ २ मूळ स्वरूप, पूर्वस्वरूप [स आदिल+पण]

**अधीलमधील**—वि मध्याजवळचा, पहिला किंवा शेवटचा नव्हे तो, कोठला तरी [स आदि+मध्य]

**अधीश, अधीश्वर**—पु धनी, मालक, राजा, सार्वभौम, स्वामी [स अधि+ईश]

**अधुना**—क्रिवि आता, सध्या, हल्लीं, अलीकडे [स ]

**अधुपा, अधुवा**—वि न धुतलेला, (तादूळ वगैरे रोज धुण्याचा जिनस धुतला नसता वापरतात) [स अ+धु-धुणें]

**अधुरा**—वि १ अपूर्ण, अर्धवट, अपुरा 'हें काम अधुरें पडलें आहे.' २ पूर्णपणें तयार नसलेला, कच्चा, अप्रवीण 'हा पडित अधुरा आहे' ' गुप्त गोष्ट मनात न ठेवणारा, [स अर्ध+पूर्ण-पुरा] —क्रिवि अर्ध्या मार्गांत

**अधुरी**—वि १ उतावीळ, अधीर २ कच्ची अर्धवट 'अदी अधुरी गाठ देऊ नको बळकट दे ' ३ अधाशी, हपापलेला, हावरा, कपेरी [स आतुर, अधीर, अर्धपुरा-आ=अधुरा]

**अधू**—वि १ व्यग असलेला, उणीव असलेला, कुरूप, वेडा, लुला अवयव, गात्र, इद्रिय, अशक्त, विकल, पगू (इसम) याप्र डोळा अधू, पाय अधू, दातानें अधू, कानानें अधू २ नीट न चालणारें 'गिरण अधू आहे ' ३ कच्चा—विषय, अभ्यास वगैरे ४ हळवा-मनाचा [स अर्ध ]

**अधृति**—स्त्री अधैर्य, भीति, भय 'तयासि क्षोभु नाहीं बुद्धि। आणि न परता न याधी। अधृति तयातें ॥' —ज्ञा २ ३६० [स अ+धृति ]

**अधे**—पु अध्याय, प्रकरण 'वर्ग कथा श्रुति स्मृति। अधे स्वर्ग स्तवक पाती।प्रमग मात्रें समाप्त पोथी। बहुधा नामें॥' —दा १२ ५.४ [स अध्याय]

**अधेन**—न अध्ययन, पाठ 'विद्वांसास अधेनप्रीती।' —दा ७ ९ ४५ [स अध्ययन]

**अधेमधें**—क्रिवि प्रशस्त अधींमधीं पहा

**अधेला**—पु १ अर्धा पैसा (पुण्यामुंबईकडे) खानदेशाकडे पाव आणा 'मज तरि सपनींही हा दिसेना अधेला। अशुणि तरि न लागे आणि यांच्या क्षुधेला ॥' —सारुह ४ ६८ [सं अर्ध+ल= अर्धल=अधल सिं अधेलो ] २ (ना ) भागीदारीनें शेती करणारा

**अधेला**—पु एका जातीचा निर्विष साप हा पिवळट रंगाचा, वराच लाब असून फक्त रविवारीं चावल्यास याचें वीष बाधतें असें म्हणतात 'अधेल्याच्या मनीं आदितवार ' (कों ) 'अधेलें'

**अधेली**—स्त्री १ अर्धा रुपाया, आठ आणे—याणें अधेल्याची माळ '=घोड्याच्या गळ्यातील दागिना २ अर्धा पैसा, अधेला 'तुम्हासारखे सरदार लोक दतात शिवराई अधेली —स्वरापरि ३० ३ (व ) निम्मे हिश्शानें शेत करण्याची पद्धति [स अर्ध+ल]

**अधेलें**—न (कों ) अधेला साप

**अधैर्य**—वि अस्थिर, चचल, अनिश्चित, उतावळा, भित्रा, भेकड —न धैर्याचा अभाव, अनिश्चितता, भीति, भय [स ]

**अधोक**—वि सुरक्षित, नुकसानीपासून मुक्त—व्यापारा—साव कारीसबंधीं —क्रिवि सुरक्षितपणें, बेशक, भरभराटीनें, नुकसानी शिवाय [अ + धोका ]

**अधोगत**—पु (नृत्य) एक अभिनय डोकें अगदीं खालीं करून पाहणें, लाज दाखविणें, नमस्कार करणें, दु खानें तोंड खालीं घालणें, हा गोष्टी दाखविण्याकरिता हा अभिनय करतात —स्त्री अधोगति पहा —वि १ खालीं आलेला, उतरलेला, गेलेला, राहिलेला २ हीन स्थितीस, निकृष्ट अवस्थेस गेलेला, पतित —क्रिवि १खालीं,खालच्या बाजूस २ (ल ) व्यर्थ 'माझें सागणें अधोगत गेलें ' [स अध + गत]

**अधोगति**—स्त्री १ उच्च प्रदेशाकडून नीच प्रदेशाकडे जी गति ती, वरून खालीं जाण्याची क्रिया, अवपतन, अवतरण २ नरक, नरकगति ३ अध पात, निकृष्ट जन्म, हीन स्थिति, अवनति, हीन अवस्था 'पुर्वीले अधोगतीची लाज नेणवे ।' —ज्ञा ७ १०४. —वि खालीं उतरणारा, खालीं जाणारा, नीच स्थितीप्रत जाणारा, खालवणारा, खालावत चाललेला —क्रिवि खालीं, खालच्या दिशेस, हीनावस्थेस, अवननीप्रत 'तैसे मस्तकीं केश कुरळ । कृष्णमुखेंदीं विन्मुख सरळ । अधोगती धाविन्नले।' —एरुस्व १ ६३ [स ]

**अधोगमन**—न खालीं जाणें, अवनति, अध पात, अवपतन, हीनावस्था, निकृष्टावस्था, फजीति (र ) व्यर्थपण 'या नाव सार्थक चरण । इतर संचार तें अधोगमन।' —एभा ११ १२११ [स ]

**अधोगामी**—वि वाईट मार्गाकडे जाणारा, हीनावस्थेस जाणारा, खालावत चाललेला, नरकाकडे जाणारा 'देओ परात्पर तर। मी अधोगामिया निनरु।' –ऋ ४७ [स ]

**अधोजिह्विका**—स्त्री पडजीभ, प्रतिजिव्हा, उपजिव्हा [स ]

**अधोड**–वि धिप्पाड, दादाट व मद्दड (म्हशीबद्दल तिरस्कार निदर्शक शब्द) ओयडधोबड, एक व फार वाढलेल्या अविवाहित मुलींबद्दल योजतात [धूड²]

**अधोड**—न १ अर्धे कातडें, पाकी २ (म्हशीचें, बैलाचें) न कमावलेलें कातडें, चामडें, लोध (क्रि० कापणें, टाकणें, घेतणें, सालहिरडा भरणें–ढोराच्या धंद्यातील शब्दप्रयोग) ३ गुरांचें कातडें घेण्याचा महाराचा हक्क ०शिवणें–चामडें कमावण्यासाठीं टांगण्या करिता व त्यांत मसाला भरण्याकरिता पिशवी शिवणें [म अर्ध+ढोर, अर्ध+चर्म, अधूत¹ ]

**अधोडी**—वि कच्च्या कातड्याचा बनविलेला, ढाल, जोडा, वादला वगैरे 'आम्हां आधोडीचे जोडे।' –तुगा ४३५४ २ दाडगा, राकट,, (विनकौशल्याच्या कारागिराच्या कामाबद्दल योजतात)

**अधोडी**—वि हावरा, लोभी

**अधोडी**—स्त्री (काव्य) एका खळाचें नाव

**अधोदंत**—पु खालच्या जबड्यातील दात [स ]

**अधोदिशा**—स्त्री अध स्वस्तिक, अधरदिशा, खालची दिशा [स ]

**अधोद्वार**—न १ उपस्थ, योनि–लिंग २ गुदद्वार, मलद्वार 'चरण आणि अधोद्वार। पायू हे प्रकार।' –ज्ञा १३ १००, 'शर्वा करिती अधोद्वारें॥' –एभा २३ ५५८ [स ]

**अधोपर**—न शिखर 'ना तरी कैलासाचीं अधोपरें। आळ गितु इन्द्रनीलाचीं शिखरें॥' –शिशु ६२ [स अर्ध+उपरि]

**अधोपरी**—वि जन्मजात नव्हे तें, नवीन, स्वकर्तृत्वाचें अधोपरी श्रीमत=स्वकर्तृत्वानें श्रीमत, अधोपरी–अधव्वा–दरिद्री–पगळा–वेडा म्हण० १ अधोपरी जोडलें पिढीजात तोडलें २ अधोपरी भाऊ राज (राज्य) कोंबडी मागते जानवाज –क्रिवि मध्येंच, अर्ध्यावर [स अर्ध+उपरि]

**अधोर्पी**—अधुपा पहा

**अधोभाग**—पु १ खालचा भाग, तळ, बूड २ गुदप्रदेश, अधोद्वार [स ]

**अधोभुवन, अधोलोक**—न पु पाताळ [स ]

**अधोभूमि**—स्त्री तळमजल्याची जागा खालची जागा, खोल जागा [स ]

**अधोमुख**—वि अधोवदन खालीं तोंड करून असलेला (ल) खिन्न, ओशाळलेला, लाजलेला, शरमलेला 'तेथें अवघीं झालीं पराङ्मुखें। पाठमोरीं निघालीं अधोमुखें॥' –एभा ४ ८८ –न (ल) भीड 'अधोमुखें भेद वाढतो।' –दा २० ३ २२ [स ]

**अधोमुख(बाहु)**—वि (नृत्य) नृत्यामध्यें शरीराच्या दोन्ही बाजूस हात स्वाभाविकपणें लोंबत ठेवणें [स ]

**अधोमुखी**—वि खालीं तोंड केलेला ०गोम–खालीं तोंड करून असलेलें गायीच्या आकाराचें केसांचें वळण हें एक घोड्यांचें शुभ चिन्ह मानतात याच्या उलट शब्द ऊर्ध्वमुखी गोम

**अधोयंत्र**—न अर्क काढण्याच्या आकृतिपात्राप्रमाणें जोड नळ्याचें असलेलें अध पात्र दारू–अर्क काढण्याचा भांड्याचा एक भाग [स ]

**अधोरंध्र**—न अपानद्वार, गुदद्वार 'अधोरंध्राचेनि वाटे। अपानु हें नाम लाहे।' –ज्ञा १८ ३३८ [स ]

**अधोरा–री**—अधुरा पहा म्हण० १ आधोरें (अर्धवट) उपार्जीन् जीव टांपल्यापाशीं २ अधोऱ्याचा रिण अवकऱ्याची चाकरी (कधीं करूं नये) –समाप २ ३ ६०

**अधोर्ध**—क्रिवि खालींवर 'अधोर्ध अष्टदिशा। तिर्हीं उदक वर्गा वळसा॥' –दा ११ ७ १४ [स अध +ऊर्ध्व]

**अधोर्ध्व**—क्रिवि खालींवर 'अधोर्ध्व काय नेणों जाहलें।' –ज्ञा ११ १८९ –पु १ श्वासोच्छ्वास २ अरितत्व, जीवमानता [स ]

**अधोली**—स्त्री १ पायलीच्या अर्ध भागाचें माप, दोन शेराचें माप २ अधोलीच्या आकाराचें दारूचें एक खापरी भांडें, त्यांत नारळाच्या आकाराचे दारू भरलेले कागदी गोळे भरून तोंडाशीं दुतोंड्या बाण ठेवतात व नळा दाखवितात जेव्हां गोळे जोरानें बाहेर येतात व वर उंच जाऊन फुटतात, त्यावेळीं त्यांतून तारे निघतात [स अर्ध]

**अधोवदन**—वि अधोमुख, खालीं मान घातलेला, खिन्न, दु खी, अवमानित [स ]

**अधोवात, अधोवायु**—पु पाद, अपानवायु, पंचप्राणांपैकीं एक, गुदद्वारातून सरणारा वायु [स ]

**अधोशाखा**—वि खालीं फांद्या असलेला 'हें असो अधोशाखा।' –ज्ञा १५ ५१९ [स अध शाखा]

**अधोष्ठ**—न भगोष्ठ स्त्रीजननेंद्रियातील ओष्ठसदृश भाग [स]

**अध्धर**—क्रिवि अधांतरीं, निराधार, अधर पहा [स अ+धर]

**अध्रा**—पु (ताल) तिल्वाडा पहा [स अर्ध]

**अध्री**—स्त्री (व) अर्धशिशी [स अर्ध]

**अध्यग्नि**—न स्नाच्या वेळीं होमासमोर दिलेलें स्त्रीधन –याज्ञवल्क्य स्मृति, व्यवहाराध्याय ८ १४३ [स ]

**अध्यन**—न अध्ययन, पठण अभ्यास 'ब्राह्मण पुरीत अध्यनें करिती।' –सप्र ८ ८ [स अध्ययन]

**अध्ययन**—न १ पठन, वाचन, अभ्यास (विशेषत धार्मिक प्रथाचा) २ शिकलेलें, पठण केलेलें शास्त्र, अधीतशास्त्र 'अनभ्यासामुळें

मी अध्ययन विसरलें ' [स अधि+इ=शिकणें] ०शील–वि अध्ययनाची–अभ्यासाची आवड असलेला, अभ्यासिक [स]

**अध्यलंडमध्यलंड**—अधलटमधलट पहा

**अध्यवसाय**—पु १ आत्म्याला किंवा स्वत्वाला जाणीव, आत्मबोध, सदसद्विवेकबुद्धीनें केलेला निश्चय, मनोभाव २ ठराव; निर्धार ३ दीर्घोद्योग, प्रयत्न ४ (तर्क) तर्कानें कार्यकारणसंबंध पाहून एकादें निश्चित अनुमान किंवा कार्याकार्यनिर्णय करणें —गीर १३३ [स अधि+अव+सो=प्रयत्न करणें]

**अध्यवसित**—वि स्वत किंवा आत्म्यानें जाणलेलें, निश्चित ठरविलेलें, अध्यवसाय पहा [स]

**अध्यस्त**—वि १ आरोपित, कल्पित, मानलेलें (रज्जूच्या ठिकाणीं सर्पत्व, मृगजलाच्या ठिकाणीं जलत्व इ०) २ चिंतिलेलें, चिंतन केलेलें, विचार केलेलें, मनन केलेलें [स अधि+अस्त अस्= टाकणें]

**अध्यस्थि**—स्त्री घाड्याच्या पायाचा रोग —अश्वप २ ३८ [स अधि+अस्थि]

**अध्यक्ष**—पु १ सभा अगर मंडळ याचा त्याच्या नियमा प्रमाणें निवडलेला अगर ठरविलेला मुख्य–नियता, प्रमुख —सभा ७१ २ स्वामी, मुख्य, नियता, वरिष्ठपणानें देखरेख करणारा, दिशा दाखविणारा, नियामक, नियन्ता उ० दानाध्यक्ष, धनाध्यक्ष, धर्माध्यक्ष ' जो इंद्रियदेशींचा अध्यक्षु । ' —ज्ञा ८ ३४ [स अधि+अक्षि=डोळा]

**अध्यक्षाधिष्ठित**—वि प्रमुखस्थानीं अध्यक्ष असलेली एक प्रकारची लोकनियुक्त (अमेरिकेसारखी शासनपद्धति, राज्य) [स]

**अध्यक्षी**—पु. सर्वांकडे पहाणारा, सर्वत्र ज्याची दृष्टि आहे असा, सर्वश्रेष्ठ सर्वासाक्षी । अध्यक्षी हें नाम त्या ॥' —निगा ४१३ [स अध्यक्ष]

**अध्या**—पु अध्याय प्रकरण, सर्ग अध्या इतुकेन जाला पूर्ण ॥ ' —दावि २०६ 'वाचा एकोनाचा भागवत अध्या ।' —अमृत ११७ [स अध्याय]

**अध्यात्म**—न १ आत्म्याबद्दलचें ज्ञान, ब्रह्मज्ञान, अधिभूतापासून परिणाम पावलेली भावना, सामर्थ्य वेदांत ' तथ अध्यात्म्या नवलपण पुरे ।' —ज्ञा ७ १७७, 'येथवीं देवर्षिंहीं अध्यात्मगता ।' —ज्ञा १० १०५ २ शरीरस्थित (त्वपदवाच्य) आत्मा ३ प्रत्येक वस्तूचा स्वत चा जो मूळ भाव (स्वभाव) ४ परमात्म्यासंबंधी निरूपण ' आज पुराणांत कथा नव्हती अ०च निघालें ' —वि १ आत्मविषयक, आत्म्यासंबंधीं, आत्म्याबद्दलचें, शारीरिक, शरीर, इंद्रियें व प्राण यांपासून होणारें ' तैसें अधिभूताधिदैवां । अध्या त्मादि उपद्रवां । पातलेया पांडवा । गिरूनि घाली ॥' —ज्ञा १६ १६० २ अध्यात्मासंबंधीं वेदांतविषयक [स] ०विद्या-शास्त्र-ज्ञान—वेदांतशास्त्र, ब्रह्मविद्या, उपनिषदांत सांगितलेलें ज्ञान [स]

**अध्यात्मविज्ञान**—न परलोकविद्या, (इ) स्पिरिच्युॲलिझम ' आपल्या स्त्रीच्या मृत्यूच्या शोकानें फार विव्हळ होऊन ते अ०ची चर्चा करू लागले ' —यगोवि ३६

**अध्यात्मा**—पु १ आत्मा, ईश्वरांश, शरीरांत व्यापून असणारा परमात्म्याचा अंश, चैतन्य २ आत्मज्ञान [स]

**अध्यात्मिक**—वि १ अध्यात्मासंबंधीं, आध्यात्मिक पहा २ (विप्र अध्यात्मक) दांभिक, ढोंगी

**अध्यात्मी**—पु वेदांतशास्त्राभ्यासें मग्न, परमार्थी, वेदांती 'देव गुरू अवघे अध्यात्मि जालेती सर्वही ।' —सप्र ८ १० ३० [स]

**अध्यापक**—पु. शिक्षक, गुरु, (इ) प्रोफेसर. [स]

**अध्यापन**—न शिकविणें पढविणें, अध्यापकाचा व्यवसाय [स] ०शास्त्र—न शिकविण्याचें शास्त्र, शिक्षणशास्त्र, (इ) पेडागॉजी

**अध्यामध्यांत**—क्रिवि अध्यातमध्यात, भानगडींत, कारभारात ' कोणाच्या अध्यामध्यांत न पडता आपलें काम बरें कीं आपण बऱ्या अशा प्रकारें त्यानीं वागणूक केली ' —मायेचा बाजार [स आद्य+मध्य]

**अध्याय-व**—पु खंड, पर्व, परिच्छेद (पुराणादि ग्रंथाचे), प्रकरण, विभाग 'एव जन्यजनकभावें । अध्यावो अध्यायातें प्रसवे ।' —ज्ञा १८ ७५ [स अधि+इ=अध्ययन करणें, शिकणें]

**अध्यारोप**—पु मिथ्या आरोप, भ्रम, कल्पना, माया 'सुखद सृष्टिचा आटोप । वेदांत्या अध्यारोप ॥' —टिक १६२ [स]

**अध्यावाहनिक**—न वरातीच्या वेळीं मिळालेलें स्त्रीधन याज्ञवल्क्य स्मृति ८ १४३ [स]

**अध्यास**—पु १ पूर्ण चिंतन, ध्यास, लक्ष लावून केलेला विचार, निरंतर ध्यान ' अध्यासबळानें पुण्यपुरुष । होऊनि ठाकूं दिसती ॥' —दावि ७७९ २ खुळीची कल्पना, जाणीव, खोटी कल्पना, मिथ्याग्रह आरोप, आळ ' देहादि अध्यासु आपुल्याठायीं । श्रवणें मननें मिथ्या केला पाहीं ॥ ' —एभा ११ ६४० [स]

**अध्याहार**—पु १ वाक्य पुरें करण्याकरितां एक किंवा अनेक शब्द घेणें पदरचे घालणें २ अध्याहृत किंवा घाळलेला शब्द, पद स्वा घातलेला शब्द [स अधि+आ+हृ=घेणें]

**अध्याहार्य**—वि अध्याहार करावयाचें (पद), पदरचा घाल याचा (शब्द) [स]

**अध्याहृत**—वि १मूळांत नसता अर्थबोध व्हावयाकरितां घालावा लागलेला (शब्द-वाक्यखंड) २ तर्कित; गृहीत [स]

**अध्येमध्ये**—अधींमधीं पहा

**अध्रुव**—वि त्रिकाल न टिकणारें, अनिश्चित, चंचल, क्षण भंगुर [स]

**अध्रुवात्मक**—वि (गणित) ध्रुवीभवन न झालेलें [स]

**अध्वपरिमाण, अध्वमान**—न मार्ग किंवा अंतर मोजण्याचें साधन–माप, कोस, योजन इत्यादि रस्त्याच्या लांबीचें परिमाण [स अध्वन्+मान]

**अध्वर**—पु १ यज्ञयाग 'ऐसी हे आदि परंपरा। संक्षेपें तुज धनुर्धरा। सांगितली या अध्वरा। लागोनिया॥' –ज्ञा ३ १३८ २ अष्टसूंपैकीं एक [स]

**अध्वरिजें**—अध्वर्यु पहा 'तेथ हातें अध्वरिजें उद्गातें। मेळ ओनि यज्ञ-द्रव्यातें॥' –शिशु ८०७ [स अध्वर्यु]

**अध्वर्यु**—पु १ यज्ञ चालविणारा, उपाध्याय 'अध्वर्यु याज्ञवल्क्य, ब्रह्मा श्रीव्यास पैल मुनि होता।' –मोसभा २ १८ २ यज्ञांतील मुख्य ऋत्विज ३ (ल) मुख्य व्यवस्थापक, पुढारी, नायक, अध्यक्ष, धुरीण, प्रमुख, मुख्य [स]

**अध्वसंक्रमण**—न मार्गसंक्रमण, वाटचाल [स]

**अध्वा**—पु रस्ता, मार्ग, पथ [स अध्वन्]

**अध्व्यावरचा**—वि १ मार्गांतील रस्त्यावरील २ (ल) तात्पुरता, उपरि, अधव्याचा ५ पहा

**अन्**—अ १ नकारार्थी [स न, तुल० इं अन्]

**अन्**—अ रसायन शास्त्रांतील (इं) ॲन उपसर्गाबद्दल, जसें अनहायड्राइड–अनार्द्र

**अन्, अन**—वि अन्य, इतर, दुसरा 'लभमोजनीं पुज्य ब्राह्मण। आन यातिसि पुसे कोण॥' –दा ५ १ १४ [स अन्यत्] –उम आणि, व, आणखी 'या पुढें अन् मला गुंतवेना।' –किंगवि ५५ [स अन्यत् तुल० इं अँड] –क्रिवि १ एकूणएक, सर्व 'वाघाला पाहताच अन माणसें पळू लागलीं' २ फार, अतिशयें करून 'अन उन्ह पडलें होतें तशात मी शेतात गेलों'

**अनक**—पु सैनिक 'तंव वेढिलें पौंडकें। शस्त्रास्त्रीं सहस्र अनकें। विंधितांतीं॥' –कथा १ ४ ६८ [स अनीक]

**अनंकपृष्ठ**—न अंक नसलेलें पोथीचें पान, ज्यावर पानाचा आकडा घातला नाहीं असें पान [स]

**अनकरीब**—अन्करीब पहा

**अनकष्टी**—वि (व) आळशी, कष्ट न करणारा माणूस [स अ+कष्ट]

**अनकळित**—क्रिवि अडचणींत न पडता, प्रयासरहित, श्रमविरहित, सहज, न कळला, अक्लेश, निर्वैर. 'मग निपाले अनकळित। निवृत्तितटीं॥' –ज्ञा ७ १०१

**अनकूळ**—अनुकूल पहा

**अनखर**—अणखर ४ पहा

**अनंग**—वि अंगरहित, निराकार. 'जे अनंगु तो पैंधा। निकवडा उरधा॥' –ज्ञा १३ ९८०, 'मदनें दृष्य देखिला सांग। आगळनि झाला अनंग॥' –एरुस्व १ ७७ –पु मदन, कामदेव, काम, ०दहन–शंकर, शिव [स अ+अंग]

**अनगड**—अणगड पहा

**अनघ**—वि १ निष्पाप, २ निर्मळ, ३ सुंदर [स]

**अनघटित**—वि १ अद्भुत, अघटित, न घडणारें २ अवघड, कठिण, 'तरी हें असें अनघटित। वाचा दुःख दुणावत।' –कथा १, ४ १७९ [स अ+घटित]

**अनघड**—वि १ न घडलेला, न घासलेला, न तासलेला–(लाकूड, दगड) 'दगडाची बाजू खाणींतून जशी अनघड येईल तशीच असावी' –मॅरट तप ४० २ अप्रबुद्ध, अज्ञान, अजाण, अडाणी, असंस्कृत 'अनघड संग प्रसंग नकारे दवडाया।' –दावि १८६ [स अ+घट्]

**अनच्छ**—पु अस्वच्छ पदार्थ, चिखल, गाळ 'मग चिरकाळें गा तो अनच्छ। उपसिल येल्हारीं।' –कथा ? १६ १४३ [स अ+अच्छ]

**अनणु**—अणणु पहा

**अनंत**—वि ज्याला अंत नाहीं असा, शाश्वत, अमर्याद, देशकालपरिच्छेदशून्य, असंख्य अपार (काळ, स्थळ, संख्या, ब्रह्म) 'मी जैसा अनंतानंदु।' –ज्ञा १४ ५३ –पु १ विष्णूच्या असंख्य नावांपैकीं एक 'आपुलिये चाडे श्री अनंता। उमगु नोहे॥' –ज्ञा ५ ३ २ सर्पांचा राजा–नागापैकीं एक–शेष 'नागामाजीं समस्तां। अनंतु, तो मी।' –ज्ञा १० २४७, 'अनंतासी (शेष) म्हणे अनंत (विष्णु)।' –ह ३ १४ ३ अनंतचतुर्दशी (संक्षिप्त रूप) ४ भाद्रपद शु॥ १४ च्या दिवशीं पूजा करून उजव्या हातात बांधावयाचा चौदा गाठींचा रेशमी गोफ–दोरा 'तू आतां रावढून अनंत घेऊन ये, पुजेची वेळ झाली' ५ कानांत घालण्याचा एक दागिना ६ एक फुलझाड, अनंत तगर, याचीं फुलें शोभिवंत, वास मधुर, पांढरा व तांबडा असा दोन जाती ७ (गणित) अमर्याद संख्या, अगणित संख्या, अनंतराशि पहा ८ (सामान्यतः) परमेश्वर, परब्रह्म ९ जैन लोकांतील चौदावा तीर्थंकर [स अ+अंत] ०ख्याल–पु अव अपार, विनोदी–लहरी–मौजा–गमती–युक्त्या–चाळे ०ख्याली–वि, अनंतख्याल किंवा अमर्याद, अपार विनोद करणारा ०गांठ्या–पु एक विंचवासारखा बारीक व बिळबिळीत समुद्रातील मासा ०चतुर्दशी–व्रत–स्त्री न भाद्रपद शुद्ध चतुर्दशी या दिवशीं करावयाचें (विष्णु प्रीत्यर्थ) व्रत चौदा प्रकारचीं फुलें, फळें, नैवेद्यास चौदा पक्वान्नें, अनंत दोऱ्याला चौदा गाठी, व चौदाव्या तिथीला पूजा हा चौदाचा मेळ अभ्यसनीय वाटल ०तगर–पु एक फूल, अनंत ०पाद–पु (प्राणि) घोणवर्गातील अनेक पाय असणारा प्राणी, (इं) मिरिआपोडा ०पार–पु ज्यास अंत किंवा पार नाहीं असा, अमर्याद, अफाट. 'अनंतपारं किल शब्दशास्त्रम्।' –पंचतंत्र ०भट्टी–स्त्री प्राचीन काळीं अनंत नांवाच्या एका विद्वानानें

केलेल्या प्रयाचें नाव, यावरून (ल) विद्वत्तेचें किंवा बुद्धीचें खोटें प्रदर्शन, घमेंड, रिकामा डौल, प्रतिष्ठा (क्रि० दाखवणें, मिरवणें) ०मूळ—न एक वनस्पति, इची सारसापरिल्याच्या तोडीचा रक्त शुद्ध करण्याचा गुण हीत आहे काढा किंवा पाकाच्या स्वरूपात अनतमूळ देतात अग्निमाद, ज्वर, रक्तदोष उपदशादि विकार यावर हा गुणकारी आहे पर्यायनामें –(कों) उपळसरी, तुणतुणी (खा) दुधी ०राशी—स्त्री (गणित) अगणित सख्या, रक्कम, राशी ०वात—स्त्री चार बोटावर १४ दोरे घेऊन केलेली कापसाच्या सुताची वात हा अनतचतुर्दशीपासून दररोज दोन वाती अशा वर्षभर लावतात अगर एकदम लक्ष वाती लावतात [स अनत+वर्ति, प्रा वट्टि म वात] २ निदोषजन्य डोळे, भुवया व आख या ठिकाणीं होणारा एक विकार–योर २ ५१२ ०व्रत—न अनतचतुर्दशीच्या दिवशीं करण्याचें व्रत, अनतचतुर्दशी पहा ०लोम—पु (प्राणि) अगावर पुष्कळ केंस असलेला प्राणी ०श्रेणी—स्त्री (बीज) अत न पावणारी श्रेणी

**अनंतत्व**—न १ ज्या स्थितीला अत नाहीं अशी शाश्वत स्थिति, आनत्य, अनतता, अपारता, निरवधिभाव २ सपूर्णता, अव्ययता ३ (गणित) अनत सख्या, अनतता [स अनत+त्व]

**अनंतर**—वि १ मध्यतरीं अतर न ठेवता, खड न पडता येणारा, अगदीं लागून किंवा पाठोपाठ येणारा, आनुक्रमिक २ अव्याहत, निरतर, अविच्छिन्न, अखड, सतत –क्रिवि मागाहून, पश्चात्, नतर, पाठीमागून, मग –शअ मागें, मागून, पश्चात्, पाठीमागें, नतर [स अ+अतर]

**अनंती**—स्त्री अनताची बायको अनतचतुर्दशीस अनतावरो बर दुसऱ्या एका लहान रेशमाच्या दोऱ्याची पूजा करतात व तो दोरा पूजा करणाऱ्याच्या पत्नीच्या डाव्या दडात बाधतात [स]

**अनत्याचारी**—वि अत्याचाररहित, सात्त्विक, अराजक नव्हे असा, सनदशीर 'अत्याचाराला तोंड देण्याचा प्रसग अनात्याचारी लोकास आला आहे' –के १६ ४ ३० [स अ+अत्याचारी]

**अनंदक**—वि न नादणारें, अपेशी भूतादि बाधेमुळें ज्यांत कुटुंब नादत नाहीं असें (वसतीला–राहण्याला अयोग्य घर) [स अ+नन्द]

**अनद्यतनभूत**—पु (व्या) एक भूतकाळ –चालू दिवसाखेरीज नव्हे तो अद्यतन पहा [स]

**अनधिकारी**—वि १ अधिकार, हक्क, योग्यता, नसलेला, अपात्र, अयोग्य 'एऱ्हवीं गीताश्रवण अवसरीं। आवडी लागली अनधिकारी। परी रोखीं तेंचि उजरी। पात रावली॥' –ज्ञा १५ ५९० २ (व्यापक) ज्याचा वारसा –हक्क गेला आहे असा, बेवारशी ३ साधनचतुष्टयसपन्न नव्हे असा [स]

**अनधिगत**—वि माहीत नसलेलें, शोध लावून न काढलेलें, , अलब्ध, न सपादिलेलें, प्राप्त न झालेलें [स]

**अनधीत**—वि १ न वाचलेलें, न पढलेलें (पुस्तक) २ जो पढला नाहीं किंवा ज्यानें वाचलें नाहीं असा अक्षरशत्रु न शिकलेला [स अ+अधीत]

**अनध्याय**—पु (विप्र अनध्या) (वेद) पठणकरण्यास निषिद्ध मानलेला दिवस, (ल) सुटी (वेद) पठणात किंवा अभ्यासात खड, खळ, अडथळा अष्टमी, चतुर्दशी, पौर्णिमा, अमावास्या, प्रतिपदा सूर्यसंक्राति, मन्वादि, युगादि, कार्तिक, आषाढ, फाल्गुन या महिन्याच्या कृष्ण पक्षातील द्वितीया, तूळ व मेष या सक्रातींचे १२ प्रहर हे काल वेदाभ्यास करण्यास अयोग्य व अनध्यायाचे समजतात या दिवशीं वेदाध्ययन करीत नाहींत –धर्मि २ 'कीं अनध्यायामाजी रसाळ। वेदाध्ययन राहिलें॥' [स]

**अनन**—न (गो) सिताफळ (लॅ पोर्तु अनोना स्पेमोसा)

**अननं**—न १ अन्न २ जेवणखाण, भोजनादि व्यापार 'अर्थी अनन मग तनन।' [स अन्न]

**अनन(ना)स**—पु एक फळ व झाड; हें उष्ण प्रदेशात होतें, केतकीच्या झाडाप्रमाणें व झुपकेदार, फळें रुचकर व गोड फळाचा रस औषधि असून पित्तनाशक आहे फळाचा मुरबा होतो, चटणी कोशिंबीरहि करतात [फा अणस्, पेरु अनन, इ अनन+स अव प्रत्यय] ०भात–पु तादुळात अननस घालून शिजवून केलेला भात –गृशि ३७१

**अनन्य**—वि १एकरूप 'सोऽहबोधें तयाच्या ठायीं। अनन्यु होय।' –ज्ञा १८ १३९७ २ एकमेव, एकटा. 'येणेंपरी परिस तांचि तया अनन्या।' –नल १२१ ३ एकनिष्ठ दुसऱ्याचा आश्रय न घेतलेला 'जो मज होय अनन्य शरण।' –ज्ञा ९ २८८, 'जाति कुळ नाहीं तयासी प्रमाण। अनन्या अनन्य तुका म्हणे॥' –तुगा ६९ ४ अन्योन्य, परस्पर. 'न तुटे अनन्यमिळणी योग। भिन्न विभाग दाविला।' –एरा २४ २७ ५ एकाकी, अनाथ, ज्यास दुसरा कोणी तारणारा नाहीं असा, ज्यास दुसरा उपासनाविषय, देव, आश्रयदाता वगैरे नाहीं असा 'अनन्यास रक्षीतसे चापपाणी।' –राम ३५. ६ स्वकीय, आपला, स्वत चा (मुलगा, मूल) 'पायें अनन्य लोटुनि लावावें बाय अन्य धानातें।' –मोभीष्म ४५. ७ अद्वैत ०गति–क–वि एकनिष्ठ, दुसरा मार्ग किंवा उपाय नसलेला, अगदीं अवलबून असलेला 'ऐसे अनन्यगतिकें चित्तें। चिंतितसाते मातें।' –ज्ञा ९ ३३७ 'हें अनन्यगतीचें भज। आघी व्यसन।' –ज्ञा १८ १३४९ ०भक्ति–स्त्री केवळ एका (देवा) चीच भक्ति ०भाव–पु १ अत करणात एकच एक विचार असणें, नि सीमभक्ति, कळकळ, आस्था, एकनिष्ठता २ सरळभाव, प्रामाणिकपणा, साळसूदपणा, कपटराहित्य (याच्या उलट दुजाभाव) ०विषय–वि. केवळ एकच विषय असलेला, एकचित्त, एकनिष्ठ, एकदिलाचा. ०वृत्ति, ०मनस्क–वि एकाच पदार्थावर विषयावर, मन, ध्यान

किंवा लक्ष असलेला, सावधानचित्त, एकाग्रचित्त ०वेद्य–वि दुस ऱ्याला जाणता न येण्यासारखें, स्वत लाच समजणारें, आपल्या अनु भवानेंच जाणता येणारें, दुसऱ्यास त्याची जाणीव करून देता न येण्यासारखें ( ब्रह्म, सुख, मनातील गुप्त गोष्ट इ० ) ०शरण–वि दुसरा आसरा किंवा आधार नसलेलें, दुसरा ठाव नसलेलें, एकाच आश्रयावर अवलंबून असलेलें ०साधारण, ०सामान्य–इतरत्र न आढळणारें, अलौकिक, सामान्यत न दिसणारें ( धैर्य, शौर्य इ० )

**अनन्योदक**—न एकनिष्ठारूप पाणी, ( ल ) भक्ति 'अन न्योदकें धुवट। वासना जे तन्निष्ठ।'—ज्ञा १५ ३ [ स अनन्य+उदक ]

**अनन्वय**—पु १ विसंगतपणा, असंबद्धता, अप्रस्तुतता २ एक अर्थालंकार एकाच अर्थास उपमानत्व आणि उपमेयत्व कल्पून जो उपमानोपमेयभाव वर्णिला असतो तो उ० 'रामर्था या लोकीं तुजसम अये तूंचि असशी।'—वामन ( गंगालहरी ), 'समुद्रासा रिखा एक समुद्रच आहे' [ स अ+अन्वय ]

**अनन्वित**—वि १ असंबद्ध, विसंगत, अव्यवस्थित, भलभलतें, ( भाषण, ग्रंथ, इ० ) २ शास्त्र व लोकव्यवहार याला विरुद्ध, अनि यमित, अयोग्य ( वर्तन, वागणूक, वगैरे ) ३ बेताल, अमर्याद, प्रमाणाबाहेर ( छळ इ० ) [ स अ+अन्वित ]

**अनपत्य**—वि अपत्यरहित, संतति नसलेली, वांझ, वांझोटी, ( ल ) पडीक [ स अ+अपत्य ]

**अनपराध**—वि ( विप्र अनपराधी ) निर्दोष, निष्पाप निर पराध –क्रिवि. दोष–चुकी नसताना, विनापराध [ स ]

**अनपाय**—वि १ अपाय न करणारा, अविघ्नकारी २ अपाय रहित, नाश न पावणारी, अविनाशी अखंड 'तैसी क्रियाशक्ति पडनी। असे जे अनपायिनी। ते पडिली नानास्थानीं। नाना ठाय।' —ज्ञा १८ ३३३ 'तिष्ठत असो अनपायिनी। न स्मरो विषयादि कांहीं।'—रास १ १७ [ स अ+अपाय ] –क्रिवि अपाय न करतां, उपद्रव दिल्याशिवाय, आसरहित तयावर्नी एक तडाग खोदें। तुष्ट घर्ले सामरसानपायें॥ नल ३६

**अनपाळणें**—सक्रि ( गो ) न पाळणें, ( सांगितलेलें ) न ऐकणें [ स अ+पाळ् ]

**अनपेक्ष**—वि १ अपेक्षा नसलेला, निरपेक्ष निरिच्छ, बेगरजू २ बेफिकीर उदासीन [ स अ+अपेक्षा ]

**अनपेक्षित**—वि १ अनिच्छित, जरूर नसलेलें २ अनिष्ट ३ ध्यानींमनीं नसलेलें अकल्पित, अकस्मात उत्पन्न झालेलें [ स ]

**अनबनाव**—पु बेबनाव, वैमनस्य, शत्रुत्व [ हिं अ+बनाव ]

**अनबुज**—वि अज्ञानी, बुद्धिहीन, अडाणी 'तुझें पोर पण तुकोनाची साजे। देगें अनबुजे होय दवा।'—तु ५१०, 'स्वर देहून कांहिंडा दहाल्या तिरिकदरी अनबुजा।'—पला ५९ [ स अ+बुध्, प्रा बुज्झ, हिं अनबुझ ]

**अनभग्न**—वि ( प्रा ) अभ्यास नसलेलें, अनिष्णात, अनि पुण, अनभ्यस्त, कच्चा [ स अ+भग्न ]

**अनभरवसा**—पु ( ना ) अविश्वास, बेभरवसा [ अ+भरवसा ] –शी, अन भरोशी–अविश्वासी

**अनभावार्थी**—वि ( गो ) कपटी, धूर्त, बाहेर एक व मनात दुसराच हेतु असलेला [ स अ+भाव+अर्थ ]

**अनभिज्ञ**—वि १ परिचय नसलेला, अपरिचित, बिन माहि तीचा २ अजाण, अडाणी [ स अ+अभिज्ञ ]

**अनभ्यस्त**—वि न आचरलेला, सराव किंवा परिपाठ नस लेला, अपरिचित, तरबेज किंवा कुशल नसलेला, माहिती नसलेला [ स अ+अभ्यस्त ]

**अनभ्यास**—पु १ अभ्यासाचा अभाव, परिपाठाचा अभाव, परिचय नसणें इ० अनभ्यासे विषं शास्त्रम्। २ ( संगीत ) एखादा स्वर रागालापात फार थोडा वेळ घेणें [ स अ+अभ्यास ]

**अनभ्यासी**—वि १ न अभ्यासिलेलें, सराव किंवा परिपाठ नसलेलें २ अभ्यास किंवा सराव न करणारा, अभ्यासाच्या कामीं आळशी, अनभ्यस्त

**अनभिषिक्त**—वि अभिषेक न झालेला ( राजा, पुढारी, इ ) 'तरुण बंगाल ज्याला अ० राजाचा मान देत आहे,'—टि ३ ७५ [ स अ+अभिषिक्त ]

**अनमान**—पु १ अनादर, दुर्लक्ष, उपेक्षा, अवगणना, हेळ साड, हयगय २ संशय, शंका 'तैसाचि तो मयूरकेत। पूर्ण करील मनोरथ। यात नसे अनमान।'—जै ४६ ८५ ३ संकोच [ स अ+मन् ] ०करणें–१ दुर्लक्ष करणें २ संकोच करणें ०न ठेवणें–धरणें–पहाणें–१ संकोच न करणें, भीड न धरणें २ अव्हेरणें, अनादर करणें, दुर्लक्ष करणें, हयगय करणें ०णें–सक्रि अव्हेरणें, अवज्ञा करणें, उपेक्षणें उ० अनमानून खाणें, चालणें, सेवणें, बोलणें, लिहिणें वाचणें, उत्तर देणें, इ०

**अनमानधप(ध)का**—पु निव्वळ तर्क, कल्पना, अंदाज, अटकळ, अटकळ पंचविशी, ( बहुधा तृतीया विभक्तींत उपयोग अनुमानधपक्यानें=अंदाजानें ठोकळ मानानें ) 'त्याग घडितें विचारून तुम्ही अनमानधपक्यानें'—भा ११ [ स अनुमान+म धपका ]

**अनमानिक**—वि निष्काळजीपणाचें, बेफिकीरपणाचें, अना दराचें त्यात अनमान आहे असें ( भाषण वगैरे ) [ अनमान ]

**अनमानिक**—वि अनिश्चित, मोघम, संदिग्ध ( इसम, भाषण वगैरे ) [ स अनुमान ]

**अनमानीत**—वि पोकळशब्दाचें संशयित, मोघम, अनिश्चित, संदिग्ध, दुटप्पी ( उद्योग, कारभार, भाषण, वगैरे ) [ स अनुमान ]

**अनमान्या जाणें**—( व ) बेगुद पडणें, घेरी येणें 'एक कुडबी उन्हाखाली माली तर अनमान्या गेला' [ स अ+मन ]

**अनमार्ग**—पु १ अगम्मार्ग, वाईट मार्ग, कुमार्ग २ दुसरा रस्ता, अन्यमार्ग, विपथ, कुपथ 'सन्मार्गी तो जीवीं धरणें । अनमार्गाचा त्याग करणें ।'—दा ५ १० २ [स अ, अन्य+मार्ग]

**अनमोल**—वि बिनमोल, बहुमोल, अमोल, अभिमोल [स अ+मूल्य]

**अनय**—पु. १ अन्याय, अनीति, अप्रामाणिकपणा २ कपट पाप [स अ+नय]—वि अनीतीचें, अन्यायाचें

**अनयाळें**—अभियाळें पहा

**अनर**—स्त्री न (वों) १ रामफळ [हिं एनाना, व नोना, लॅ अनोना रटिक्युलटा] २ (दारूकाम) अनारनळा, हिंगणबट [फा हिं अनार]

**अनरसा**—पु तांदुळाच्या आंबलेल्या पिठांत गूळ मिसळून त्याच्यावर खसखस थापून तुपांत तळून (वडेघारग्यासारखें) केलेलें पक्वान्न [कुरु० ते अरिसे]

**अनरसा**—पु. एक प्रकारचें कापड [फा अनार]

**अनराह(हा)टी**—स्त्री गैररीत, कुमार्ग, आडरस्ता 'अधर्म अनराहाटी शोकसग्रहो ।'—दा २ ३ २७ [अ+राहटी]

**अनरूढा**—स्त्री अनूढा, अविवाहित, कुमारिका 'जैसी अनरूढा रूपवती ॥ देखौनि वेधे चक्रवर्ति ।'—ऋ ५३ [स अनूढा]

**अनर्खण**—न (गो) (निंदार्थी) पोट

**अनर्गल-ळ**—वि अडकाठी नसलेला, बेबंद उच्छृंखल, स्वच्छंदी, मनस्वी, स्वेच्छाचारी 'तू ठायींचा गोवळ । अविचारी अनर्गळ ।'—तुगा १८५ —क्रिवि मनसोक्त, स्वेच्छाचारानें, स्वैर अप्रतिबध्द 'शिष्या मुक्तपणें अनर्गळ। करिसी इंद्रियें वाश्कळ।'—दा ५ ६ ६० [स अ+अर्गला] ०ता—स्वच्छंदपणा, स्वेच्छाचार, स्वैर वर्तन 'अनर्गळता करू नये ।'—दा १४ १ २५

**अनर्गळी**—स्त्री स्वेच्छाचारी आचरण, स्वैर वर्तन, खोडया, छ्प्प चार, चाळे, त्द्दर [स अ+अर्गल]

**अनर्घ-र्घ्य**—वि १ अमोल अंदाज न करता यण्यासारखें बहुमोल, अतिशय किंमतीचें 'कंठीं माळा अनर्घ्यमणी ।'—सीस्व ४५७ [स अ+अर्घ, अर्घ्य]

**अनर्थ**—पु १ अतिशय अनिष्ट गोष्ट मोठें अरिष्ट. 'आमचें कुटुंब समग्र । कुभकर्णें ग्रासिलें उर । घोर अनर्थ माडिला ॥' २ अव्यवस्था, थैमान, दगा किंवा त्यापासुन उद्भवणारें दु ख, सकट, विघ्न 'हें असो जें सागरू । अनर्थाचा ॥'—ज्ञा ८ १४६ [स अ+अर्थ] ३ निरतिशयता, अमर्यादता, अपरंपारता असामान्यता अतिशयता या शब्दाचा उपयोग फार स्वैरपणें केला जातो उ० (अ) 'एक आज्ञी सागती सिते । अनर्थ माडिला तुझिया सुतें ।'—अनत त्वकू (आ) 'देऊळ बाधावयाचा यानें अनर्थ माडिला' =देऊळ बांधण्याच्या प्रयत्नाची पराकाष्ठा केली (इ) 'यदा सस्ताईचा अनर्थ झाला १५ पायल्या तादूळ रुपयास मिळतात' (ई) 'त्यानें एका विमान ५०० श्लोक लिहून अनर्थ केला' वरील अर्थी विशेषण व क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोग 'हा अनर्थ बोलतो' 'त्याची अनर्थ बुध्दि' ४ अर्थहीनता, अर्थशून्यता, निरर्थकता, (ल) मूर्खपणा 'श्लोकांचा अर्थ सोडून अनर्थ केला' ५ पोकळपणा, नि सत्त्वता, नि सारता 'जश्या अनर्थात समान साचा । तो अर्थ तो मी प्रियमाणसाचा ॥' ६ शत्रुत्व, वैर 'मग सांगा घृताशी कृष्णरत्नाचा अनर्थ । वाढला कां ॥'—कथा २ २ ११ [स अ+अर्थ]

**अनर्थक**—वि १ निरर्थक, अर्थशून्य (भ्रष्ट पद्य, वाक्य, इ०) २ बिनफायदेशीर व्यर्थ, पोकळ ३ अनर्थकारी, उपद्व्यी [स]

**अनर्थभ्रम**—न (ल) अरिष्टाची दुर्दैवाची, जागीव, मानसिक विकल्प हुरहुर अनर्थाची पूर्वकल्पना [स]

**अनर्थापात**—न १ मोठया अरिष्टाचा आपात, अरिष्ट कोसळणें, सकट वगैरे येणें २ अतिशयितता, अतिरेक अनर्थ पहा [स]

**अनल-ळ**—पु १ अग्नि, विस्तव, आग सामासशब्द कामानल, मोहानल, तृष्णानल, क्रुधानल-वियोग-विरह-शोक-अनळ, इ जैसा उष्णनामाचीं अनळु ॥'—ज्ञा १ २३० देउनि उपशम अनळा। जाळिती कोधाचा भुईनळा ।'—एरुस्व १५.१२१ [स]

**अनलस**—वि आळस नसलेला, तत्पर, दक्ष, उद्योगी, मेहनती 'अनल समीहित साधी राया वारा मदिरा कामा । अनलस मीहि तसा धीरा याचा रामहि वराका मा ॥'—मोरो [सं]

**अनॅलिसिस**—न पु १ (शाप) रासायनिक पृथक्करण, मूलद्रव्यशोधन घटकशोधन २ (व्या) वाक्यपरिच्छेद, पृथक्करण ३ (गणित) पृथक्करणपद्धति [इ]

**अनल्प**—वि पुष्कळ, थोडा नव्हे तो [स अ+अल्प]

**अनव**—वि श्रुब्द, जुनाट 'बहु हेहि पदभरिहि जरि सारील अनव करी नवा रणगा ॥'—मोभीष्म ४ १० [स अ+नव]

**अनवकाश**—वि १ वेळ, सवड नसलेला, बिनफुरसतीचा २ स्थल जागा नसलेला —पु कालाचा, जागेचा अभाव [स अ+अवकाश]

**अनवच्छिन्न**—वि अखंड, अत्रुटित, व्यापक, अभग 'ऐसी अनवच्छिन्न समता। भूतमात्रीं सदयता ।'—ज्ञा २ २९८ [स अ+अव+छिद्]

**अनवट-ठ**—पु पायाच्या अगठ्यांत घालावयाचा रुप्याचा दागिना, 'अणवट' पहा 'अनवट निटल्या ही जोड त्या जोडव्याचा ।'—सारुह ६ ३१, 'जोडवी अनवठमासोळया ॥'—स्त्रीगीत ६५

**अनवटी-ठी**—स्त्री हनुवटी [स हनु+वृत्]

**अनवगी**—वि. पायात जोडा वाहणा किंवा कांहीं पादत्राण न घातलेला, अनवाणी पहा

**अनवधान**—न दुर्लक्ष, अलक्ष, बेसावधपणा. -वि बेसावध ०ता-निष्काळजीपणा, बेसावधपणा [स अ+अव+धा]

**अनवधानी**—वि १ स्वत स विसरणारा, स्वत ची शुध्द नसलेला, ध्यान नसलेला २ बेसावध, गाफील, दुर्लक्ष असलेला, बेफिकीर [स]

**अनवरणें**—सक्रि त्याग करणें, सोडणें, टाकून देणें 'लोभ आणि अहंकार आम्ही अनवरिला बाई।'-भज ४१ [स अ+वृ]

**अनवरत**—वि अविरत, अविश्रांत, सतत चालणारें, अखंड 'जयजय वो शु द्धे। उदारे प्रसिध्दे। अनवरत आनंदे। वर्षतिये।' -ज्ञा १२ १ -क्रिवि न थांबता, न अडखळता, एकसारखें, सतत, निरंतर 'हे परत्रय अमृत सेविजे अनवरता॥' [स]

**अनवल**-स्त्री **अनवलें-अनोलें**—न (गो)रामफळाचें झाड फळ, अनर [बहुधा पाश्चात्य शब्द]

**अनवला**—पु (वे.) आबाळ, हेळसांड [अ+नवल]

**अनवलोभन**—न सोळा संस्कारांपैकीं एक, गर्भिणीच्या तिसऱ्या महिन्यांत हा करावयाचा असतो अश्वगंधा वनस्पतीचा रस नवऱ्यानें गर्भिणीच्या नाकांत पिळावयाचा हा यांत मुख्य विधि असतो त्या रसामुळें गर्भ सुरक्षित राहतो [स न अवलुप्यते गर्भोऽनेन]

**अनवसर**—पु १ अवेळ, अकाल, फुरसत किंवा सवड नसलेली वेळ, असमय, भलतीच वेळ. 'अथवा अवचटें ऐसें घडे। जें अनवसरें देह सांडे।' -ज्ञा ८ २०५ २ अनधिकार, अयोग्यता 'स्त्री शूद्रादिकां प्राणियां।(वेद) अनवसरु म्हणुनियां। राहिला आहे।' -ज्ञा १८ १४५८ ३ विभाग, लोप, अभाव 'जयाचेनि अनवसरें। द्वय लेखें दृश्यानें मोहें।'-अमृ ३ ९ ४ जागेचा अभाव, अवकाशाचा अभाव ५ संकट, दुष्काळ, वाईट काल, आपत्काल, आपत्ति ०पतित-वि वेडगामी, अकालीं पडणारा-पडणारा-येणारा [स अ+अव+सृ]

**अनवसरी**—स्त्री अकाल जागेचा अभाव [स]

**अनवस्था**—स्त्री १ अनिश्चित-चपल-विस्कळित स्थिति, निराश्रित स्थिति निराधारता 'पुरतें वैराग्य न होता उगीच हट्टानें विषयत्याग केल्यानें अंत करणाची अनवस्था मात्र होईल' २ अव्यवस्था, घोंटाळा, दाराबळ ३ अवस्थातीतत्व अवस्थेच्या-अस्तित्वाच्या पलीकडील स्थिति, अमूर्त-निराकार स्वरूप, स्थिति ४ अमर्यादता, असमाप्ति, अनवस्थाप्रसंग निरवधित्व, अनियमितता 'परमाणूचा अवयव, पुन त्याचा अवयव अशी कल्पना करीत सुटल्यास अनवस्था होईल.' ५ अनास्था, दुर्लक्ष, हेळसांड (मुलाची, जनावरांची) ०प्रसंग-पु निराधार स्थिति, अव्यवस्था, अमर्यादपणा, [स अ+अवस्था]

**अनवस्थित**—वि १ अनिश्चित, अव्यवस्थित, विस्कळित, बेदाद २ वास्तव्य नसलेलें, मोकळें, रिकामें. [स.]

**अनवस्थिति**—स्त्री अनिश्चितपणा, कायम नसलेली अवस्था (ल) (कामाचा, मनाचा, स्वभावाचा) चंचलपणा, अस्थिरता [स अ+अवस्थिति]

**अनवळखी**—अनोळखी पहा

**अनवा**—पु गोराड्याच्या जातीचा, फणसाप्रमाणें, खाण्याचा मोठा कंद, गोराड्याचा कांदा

**अनवा**—पु कच्ची नक्कल, घाईघाईनें खरडलेला लेख, मसुदा, कच्चा खर्डा -खरे १८६५ [स अन्वय ?]

**अनवा**—वि १ सर्वोत्कृष्ट, अमोलिक, 'नवरत्नामधीं चंद्र पहिला तेजस्वी आनवा।' -सला ५३ २ नवीन तऱ्हेचें, विलक्षण, विचित्र, तऱ्हेवाईक 'आजचें गाणें अ० झालें,' 'हें लिहिणें कायहो अनवा' [अर अन्वा=तऱ्हा प्रकार] ०अपरूप-(चुकीनें अननव अवरूप) नवोनव, विलक्षण, अपूर्व व मनोवेधक, आश्चर्यकारक, अप्रतीम [अनवा+अपूर्व अप]

**अनवाणा-णी, अनवहाणी**—वि क्रिवि पायांत पादत्राण (वाहणा, जोडा) न घातलेला, उघड्या पायाचा-पायानीं 'अनवाणी घाई राव हलुहलु।' -सप्र २ १४. [स अ+उपानह] ०काशीकर-पु (पायात कांहींहि न घालतां आपण काशीस जाऊन आलों अशी बढाई मारणारा यावरून) पक्का लबाड, लुच्चा, अट्टल सोदा, भामटा ०पायांनीं-पायात कांहीं न घालतां, उघड्या पायानीं

**अनवाळ**—वि उच्छृंखल, बेफिकीर, सोडकर, स्वैर, उनाड 'दसवर्षी गाजी बाळ। तारुण्यात अनवाळ।' -भाप ८१ [अर बाळ अप ? किंवा स अ+वा+विल्=मोडणें, फोडणें]

**अन(नु)वाळी**—स्त्री टवाळी, चेष्टा, खोड्या 'तूं मजपा ळकबाळक होउनि हे अनुवाळी, करिशी मुरारी।' -वामन ४ कात्यायन [अनवाळ]

**अनवाळें**—न (गो) सोंवळें [स अनाविल=शुध्द] ०ल्यादाडी-सोंवळें वाळत घालावयाची दांडी

**अनवेक्षण**—न अनादर, दुर्लक्ष 'म्हणे ही तप सिध्दी तत्त्वतां। अनवेक्षणीं रुसली।' -जै २९ २ [स अ+अव+ईक्ष्=पहाणें]

**अनव्यावृत्तिसिध्द**—वि दुसऱ्याच्या निरासानें सिध्द होणारा [स अन्यव्यावृत्तिसिध्द]

**अनशन**—न उपवास, उपोषण, निराहार (क्रि० करणें, होणें) [स अ+अशन, प्रा अणसण] ०व्रत-न उपोषण करण्याचें व्रत

**अनशर्वे-अनशिळें-अनशों-अनशो-अनशोय-अनशोलें पोट**—न. रिकामें किंवा अन्न नसलेलें पोट (अनशर्वे

वगैरे विशेषणाचा कधीं प्रथमाविभक्तींत उपयोग करतात. उ० अन शनें पार्नी पाणी प्यालें असता नळांत भोंग ) ०पोटीं-क्रिवि काहीं न खाता, खाल्यावांचून, उपाशी असता [ स अनशित, प्रा अण सिय, म आनशे-पोटीं ]

**अनशुद्ध-शूद-सूद**—अनशुद्धि पहा

**अनश्रुत**—वि १ न ऐकलेलें, अश्रुतपूर्व २ अपूर्व, अलौकिक, ज्याविषयीं पूर्वी एकिलें नाहीं असा ( विषय ) ३ ज्यानें पूर्वी एकाद्या गोष्टीविषयीं एकलें नाहीं असा ( मनुष्य ) 'अश्रितभेनि गगनमानश्रुन। जो दिगंबर अवयवरहित।' [ स अ+श्रुत अप ]

**अनश्वर**—वि शाश्वत, नेहमीं टिकणारा, नाश न पावणारा 'नश्वरें अनश्वरासी। उत्तीर्णता देवी घडे।' –एरुस्व ५ ९३ [ स अ+नश्वर ]

**अनस**—( गो ) अननस पहा ( अनशी=अननसाचें झाड )

**अनसवावा**—पु घोड्याचा एक रोग, ह्यांत सर्दी किंवा गर्मी पासून फोड होतात –अश्वप २९५

**अनसाईपणा**—पु उतावीळपणा, असहिष्णुता 'कीं निरुती हन सुके। अनसाइपणा।' –अमृ ७ ७९ [असहनचा वर्णविपर्यास]

**अनसुट**—वि १ चव न घेतलेलें, उष्टें न केलेलें, न वापरलेलें, स्पर्श न केलेलें, जसेंच्या तसें असणारें. ( दुभतें, पाणी, वगैरे ) 'म्हणे दधि दुध जें साचलें। अनसुट घरी येथूनी।' –ह ७ २८ २ खर्च न करावयाचें, न वापरण्याजोगें, आधीं उष्टें न करण्याचें 'माता म्हणे आजि मित्रवार। दुग्ध अनसुट असे समग्र।' –ह ९ १९२ ३ ( ल ) वाटणीचा भाग ज्यास मिळाला नाहीं असा ४ वैषयिक अनुभव न घेतलेला, ब्रह्मचारी ( पुरुष किंवा स्त्री ) 'उरों नेदी कोठें अनसुट। पद्धारी हा क्रियाभ्रष्ट।' –ह १६ १६ 'आजवर नीट अनसुट राहुन। कसें मन मोहुन। पडोपडीं केला विषय पल्लावर सदय सोडुन।' –प्रला ७२ १७९ ५ बिन बड वलेला ( बैल ), खच्ची न केलेला ( घोडा ) ( ल ) वीर्यवान् 'अनसुट निमळ च्यारि वाजी।' –सीस्व ८ १०९ [ स अनुच्छिष्ट ]

**अनसूत**—वि १ पूर्ण, अखंड 'दारीं दोरपण अनसूत'–एभा २९ ३६३ २ ( श्राद्ध किंवा पक्ष याराबराबर जोडून ) भरणी श्राद्ध भाद्रपद वद्य पक्षांतलें ( न जोडता ) मृताच्या वर्षश्राद्धाच्या पूर्व दिवशीचें श्राद्ध [ स अनुस्यूत ]

**अनसूद**—स्त्री ( को ) अनशुद्धि

**अनसूद**—वि शुद्ध पवित्र 'वाचा अनसुद घरों जाण।' –एभा १० २३८ [ स अ+अशुद्ध-असूत ]

**अनसूय**—वि मत्सररहित [ स अ+असूया ]

**अनसूया**—स्त्री १ मत्सराराहित्य २ अत्रिपत्नी दत्तमाता [ स अ+असूया ]

**अनस्था**—अनास्था ( अप ) पहा

**अनहित**—न तोटा, अहित, नुकसान अकल्याण [ अन+ स हित ]

**अनळ**—पु अग्नि, अनल पहा 'का कस्तुरीसगट परिमळ। कर्मेसगट अनळ।' –अमृ १ ४२ [ स अनल ]

**अनक्षर**—वि १ निरक्षर, खेडवळ, अशिक्षित, जंगली, अडाणी २ शब्दातीत ( परब्रह्म ) [ स अ+अक्षर ]

**अनक्षर**—वि क्षयरहित, कमी न होणारा, न झिजणारा [ स अ+क्षर् ]

**अनाइकी**—वि अराजकता, अनायकी पहा [ स अ+नायक ]

**अनाकार**—वि आकाररहित, निराकार 'तया एकी अना कार। जे दशा गा।' –ज्ञा १५ ५०६ [ स ]

**अनाक्रोश**—वि आक्रोशरहित, सहज, अक्लेश ०क्षमा– सहनशक्ति [ स ]

**अनागत**—वि १ पुढें होणारा, पूर्वी आलेला नव्हे तो 'जे कां अतीत अनागत। वर्तमान ज प्रस्तुत। ते अवतार समस्त। इत्थं भूत सांगावे।' –एभा ४ ३४ २ भविष्यकाळचें, भावी 'अतित अनागत वर्तमान। हें तापसांसी उठे प्रत्यक्षज्ञान।' –विउ ४ ४२ ०ग्रह–पु ( संगीत ) ताल देण्यास सुरवात झाल्यानंतर काहीं वेळानें गाण्यास आरंभ करणें ०चिंता–स्त्री पुढील तरतूद, काळजी, भविष्यकाळासंबंधीं विचार ०द्रष्टा–वि भविष्य जाणणारा 'जे तपसामर्थ्यें समर्थ थोर। अनागतद्रष्टे ऋषीश्वर।' –एभा २२ १२ ०विधाता–वि दूरदर्शी, भविष्य ओळखणारा, धोरणी, पुढील तर तूद करणारा [ स ]

**अनागम**—वि ज्याचा आरंभींचा अगर सुरवातीचा काल माहीत नाहीं असा, पूर्वापार अति प्राचीन स्मृतिकालातीत (वतन, मालमत्ता, हक्क, रिवाज ) [ स अ+आ+गम् ]

**अनागम्य**—वि १ दुर्गम, आटोक्यांत न येण्याजोगें २ अप्राप्य, अवघड, दुरापास्त, असाध्य दुर्मिळ [ स ]

**अनागामी**—वि न येणारा ( ल ) पुनर्जन्मरहित 'इतर सर्व कर्मोचें फळ क्षाति, अनागामी ( पुनर्जन्मरहित ) वृत्ति अथवा अर्ह त्पद प्राप्त केलें असता चुकविता येतें' –ज्ञाको ( व ) ११९

**अनागोंदी, अनीगोंदी**—न कर्नाटकांतील विजयानगर साम्राज्याचें प्राचीन राजधानीचें एक शहर ०कारखाना– कारभार–जमाखर्च–बक्षिस–बोलणें–लोक अव्यवस्थित गोंधळी, पोकळ, रिकामा, कारभार–जमाखर्च, इ० ( विजयानगर साम्राज्य नष्ट झाल्यानंतरचा कोणी एक राजा आपलें वैभव दाख विण्यासाठीं पृथ्वीवरील सर्व देशांचा भपकेदार जमाखर्च आपला म्हणून मांडीत असे म्हणजे त्याच्या सर्व उत्पन्नाच्या मोठमोठ्या रकमा जमेच्या बाजूस मांडून तेवढ्याच रकमा पुन्हा खर्चाच्या बाजूस मांडीत असे यावरून वाक्प्रचार ) [ का अने=हत्ती+गुंदी– गोंदी=गर्दी ] –चा राजा–पु मागितलेली वस्तु विचार न करतां

देणारा, भोळा सांब, गबाळी स्त्री० 'सर्वच अनागोंदी,' 'सगळा अ० कारभार' =जिकडे तिकडे सर्व अव्यवस्थित अशा अर्थानेंहि वापरतात

**अनाघात**—क्रिवि अतिशय, प्रमाणाच्या बाहेर, भरमसाट पणें 'यदा अनाघात पाऊस पडला' [स अनागत ?]

**अनाचार**—पु अनिष्ट, अनियमितवर्तन, विहित आचार सोडून वागणें, आचारभ्रष्टता, अधर्म, दुराचार 'विवेकें त्यजावा अनाचार हेवा।' –राम ६९ –री–वि धर्मलंड, अनाचार करणारा, स्त्रैरी, स्वेच्छाचारी, दुराचारी [स]

**अनाज**—न धान्य [स अन हिं]

**अनाजीपंताचा धारा**—पु शिवाजीमहाराजाचा सचीव अनाजी दत्तो यानें जी तरमदरी केली ती –रा २१ ७९

**अनॉटमी**—स्त्री (शाप) शारीर शारीरशास्त्र, शरीरच्छेदन शास्त्र [इ]

**अनाठायीं**—क्रिवि १ अयोग्य ठिकाणीं स्थळीं, जागीं, गैर मार्गानें, भलत्याच गोष्टींत 'न दवाय न धमाय' 'द्रव्याचा धर्मार्थ व्यय करावा किंवा उपभोग तरी करावा उगच अनाठायीं घालवूं नये' 'दुष्टास हितोपदश केला म्हणजे अ० जातो' २ व्यर्थ, फुकट [स अन्य+स्थान, प्रा अण्ण+ठाय सप्तमीत वापरतात]

**अनाड**—वि १ अडाणी 'मी अनाड कांहीं कळेना गे ये ये। देहजड पडली भ्रांति ॥' –पक्रा २२ ५६ २ उनाड, द्वाड, नाठाळ अधर्मंदील लवरी। सर्वपरी अनाड।' –एभा ११ ५५७ –स्त्री अड चण, संकट 'येथ माडलिया तातडी। तं प्राण पडेल अनाडीं।' –एभा १४ ४२५ [स अज्ञानी किंवा अडाणी] ०चोट–भडाण चोट पहा

**अनाड–ढ, अनाडकी, अनाडचाळ, अनाडबाहुला, अनाडभार्जी, अनाडझाड, अनाडणें**—वगैरे शब्द, उनाड या अर्थी आहेत त्याकरिता उनाड खालीं पहा

**अनाडा**—अडाणा पहा

**अनाडी**—वि १ अडाणी, अशिक्षित, मूर्ख, खेडवळ, अन भिज्ञ, गावढळ, निरक्षर, अजागळ 'अनाडी लोकाचा चांगा वण झाला असेल' –निमा १०७४ २ अजाण, वयानें लहान 'कोणी वदनी र अनाडी सुंदरी।' –दावि २५ [स अज्ञानी हिं गु अनाडी]

**अनात–थ**—स्त्री कृपा मेहेरबानी रयात खैर ०करणें–कृपा करणें –सभासद १९ ५० [अर इनायत्]

**अनात्म–त्मा**—वि मायामय नश्वर, आत्म्याविरहित आत्मा नसलेला, अशाश्वत, जड 'आणि अनात्मवर्गेंसीं। साइनि आत्मत्वाचें धीर। वरताति जे सविचार। राक्षस ॥' –ज्ञा १५ २९६ [स अ+आत्मन्]

**अनाथ**—वि दीन, निराश्रित, गरीब, पोरका, निराल्ब 'जें अर्पिता अनाथाचे मायपोट।' –ज्ञा ८ १९५ [स अ+नाथ्=ऐश्वर्ययुक्त असणें] ०नाथ–पु ईश्वर, साधु, मालक, गरिबाचा कैवारी, अनाथबंधु–पालक ०प्रेत–न बेवारसीप्रेत ०बंधु–पु निराश्रिताचा सहाय्यक, दीनबंधु, ०विद्यार्थीगृह–न निराश्रित विद्यार्थ्यांकरिता बांधलेलें वसतिगृह शाळा–आश्रम महाराष्ट्रांत या नावाची एक मोठी संस्था आहे ०वाणी–क्रिवि अनाथाप्रमाणें, केविलवाणी, दीन, असहाय्य 'झाली असे परिसताची अनाथवाणी। ठावी नसे जिरवी अशि नायवाणी।'–वाह १८ इतर सामाशब्द अनाथपालन, अनाथपूजा, अनाथभोजन, अनाथवत्सल, अनाथसमाचार, अनाथ सेवा

**अनाद**—स्त्री १ (गो) अन्न २ तांदूळ [स अन्न]

**अनादर**—पु तिरस्कार, अवहेलना, तुच्छता, अपमान, अवज्ञा, [स] ०णा–न अवहेलना, धिक्कार ०णें–क्रि अवहेरणें, अपमान करणें, तिरस्कार करणें ०बुद्धि–स्त्री तुच्छता, तिरस्कार

**अनादि**—वि १ आरंभरहित, उत्पत्तिरहित (ईश्वर, माया) 'अनादिमायाप्रभावें।'–ज्ञा १७ ५६, 'मी आदिची अनादि आदि।' –एभा २ ३९७ २ ज्याच्या आरंभकाळाचा थांग लागत नाहीं तो, चिरंतन ३मूळचा, स्वभावत 'तैसाचि श्रुत स्वर्गादिक। अनादि दोष युक्त देख।' –एभा १० ४९६ –न परब्रह्म ०त्व–आरंभरहित स्वरूप 'आपुलें अनादित्व भेटे।' –ज्ञा १७ २२० ०निधन–न ज्यास आदि–अंत नाहीं असा, ज्यास आरंभ व शेवट नाहीं तो, विष्णु ०परंपरा–स्त्री अति प्राचीन काळापासुन चालत आलेली रीति, पद्धति (क्रि० असणें–चालत येणें–होणें) ०वनचर–पु (ल) अतिशय जुनाट जंगल, झुडपांचें रान [अनादि+वनचर] ०सिद्ध–वि अनादि काळापासुन असलेला, स्वयंसिद्ध, अनिर्मित, स्वयंभु (ब्रह्म, ईश्वर इ०) 'जरी मिळाचि अनादिसिद्ध।'–ज्ञा १५ ३२३ ०सोयरा–पु ईश्वर 'भेटला तो अनादि सोयरा ॥' [स अ+आदि]

**अनादृत**—वि तिरस्कृत तुच्छतेनें वागविलेला, [स]

**अनाद्यनंत**—वि १ आरंभ व शेवट नाहीं असा, चिरकाल टिकणारा २ ईश्वर शंकर, विष्णु [स अनादि+अनंत]

**अनान**—वि वेगवेगळा, निरनिराळा, पृथक –पु पृथक्त्व, वेगळेपणा 'दोहींचीं अभिधानें। अर्थाचेनि अनानें। विप्रावर्ली।' –भमृ ८ ९३ [स अन्य+अन्य]

**अनानस**—अननस पहा

**अनापेक्षा**—वि १ अपेक्षेबाहेरचा, कल्पनेबाहेरचा २ कोणतीहि अपेक्षा इच्छा नसलेला, निरिच्छ, निष्काम 'सुगड सगीन गुण ग्राही। अनापेक्षी लोकसंग्रही॥' –दा २ ८ ९१ [स अ+अपेक्षा]

**अनाप्त**—वि परकीय, मानलेला किंवा संबंधी नव्हे तो 'जे नवमास वाहे उदरात। ते माता करूनि अनाप्त। स्त्रियेसि मानिति अति आप्त।' –एभा ३ २३६ [स अ+आप्त]

अनाम—न लोक, जग, मनुष्यमात्र [अर]

अनाम—वि नामरहित असा (ईश्वराचें विशेषण) 'अज अजित पूर्ण अनाम ॥' 'यया अनाम्या नामें ठेविती।' —ज्ञा ४६९ [स अ+नामन्]

अनाम—पु एक प्राचीन राष्ट्र, कोचीन, चीन, आणि टाँकीन या भागास हें नांव आहे

अनामत—वि १ विश्वासानें दुसऱ्याजवळ ठेवलेली (ठेव) २ (ल) अगाऊ विश्वास पटण्यासाठीं दिलेली (टेंडर वगैरेवरची वगैरे रकम) ३ जप्त सरकार जमा 'जयदवरायास हरामखोरी लावून देशमुखी अनामत केली' —इम ३३ [अर अमानत-वर्णविपर्यास] ४ तसल्मात, मोघम, हिशेबांत नावाखालीं दाखल न केलेले ५ तिन्हाइताकडे ठेवलेली (वादांतील वस्तु) सामाशब्द—अनामत खर्च-खातें-जमा-झाडा-रकम-हिशेब इ० —क्रिवि १ खर्च न करता उपभोग न घेता, स्वतः करून न विघडविता, जशीच्यातशी 'मुम्ही धान्य ठेवून गेला तें अजून मासें घरीं अ० पडलें आहे,' 'सारी जिंदगी वाढून घेतली दोतें मात्र अ० राहिलीं आहेत' २ अलगत, अशाद, हद्दप, सावकाश स्थिरपणें 'ही भरलेली दउत अनामत उचलून ठेव' इतर अर्थासाठीं अमानत पहा ०वही—कायम निकाल न लागलेल्या अशा अनिश्चित पैशाच्या देवघेवीसबधीं-तसल्मात रकमाची ठेवलेली हिशेबाची चोपडी

अनामय—न आरोग्य, निरोगिता, उत्कृष्ट-निर्दोष प्रकृति [स अ+आमय]

अनामिक—वि १ नाव घेण्यास अयोग्य, अस्पृश्य (महार, मांग, चांभार वगैरे) 'पवित्राला म्हणती नको हा कल्क। मानिती आस्तिक अनामिका ॥' —तुगा ४०८ २ ज्याचें आवडलें नव गुप्त ठेविलें आहे असा, निनांवी ३ अनामक, नामरहित असा (ईश्वर) [स अ+नामन्]

अनामिका—स्त्री करंगळीच्या शेजारचें बोट आंगठीचें बोट [स अनामिक]

अनाम्ल—न (शाप) अम्लाम निर्गुणत्व (उत्पन्न सारता) आणणारा जो पदार्थ त्यास अनाम्ल म्हणतात भस्म क्षारोत्पादक धातु (इ वेस) [स, अ+अम्ल]

अनायक-की, अनायेक—वि नेता, किंवा सत्ताधारी पुढारी नाहीं असें वेबंद, निर्नायक अदाधुदीचें अव्यवस्थित 'सत्यासत्य हारपलें। अवघें अनायेक जालें। चहूंकडे ॥' —दा ११ २ २४, 'या राज्यांत आता अनायक झालें येथें राहण्याची सोय नाहीं' [स, अ+नायक] ०ता—स्त्री अराजकता वेबंदशाही, निर्नायकी

अनायती—स्त्री कृपा 'अनायती नजर' =कृपादृष्टि [अर इनायत]

अनायत्त—वि स्वतंत्र पराधीन नसलेलें, स्वावलंबी [स अ+आयत्त]

अनायास—पु परिश्रमाची किंवा कष्टाची जरूरी नसणें किंवा त्यापासून सुटका, (बहुतकरून तृतीया विभक्तींत उपयोग, जसें—अनायासें, अनायासानें=परिश्रमावाचून, सहज) ०कृत-वि श्रम न घेतां, पडता, सहज केलेलें ०साध्य—वि करण्याला सोपें, सुलभ [स अ+आयास]

अनार—न १ डाळिंबाचें झाड, फळ 'विलायती अनारें या दिवसांत तेथवर गर्मीमुळें न पावतील,' —दिमरा १ ३३ २ (साधारणत डाळिंबाच्या आकाराचा) दारूचा नळा, हिंगणघाट याचे प्रकार—मोतिया, चमेली, गुल, शेवती, चेंदी आणि साधा अनार, हे जेवताना पंगतींत लावतात 'हवया मुनळे चंद्रजोती जळती। अनारें जातणी या जागोजागीं लाविती।' —श्रीगीत ३७ [फा] ०दाणा—पु डाळिंबाच्या बियाप्रमाणें दिसणारें एक धान्य —मुन्या ११० [फा अनार+दान] ०दाणी—वि डाळिंबाच्या रंगाप्रमाणें किंवा दाण्यासारखे (टिपके) विणकरीनें ज्यावर बूट केलें आहे असें (पागोटें, शेला, दुपेटा वगैरे) —मराठी तिसरें पुस्तक (१८७३) ६४

अनारणें—(विप्र आयनेरणें पहा) अवघणें, आक्रमणें, मुस्त होणें

अनारत—वि सततचें, निरंतरचें —क्रिवि सतत, अविरत [स अ+आ+रम्]

अनारब्ध—वि न आरंभलेले, सुरू न केलेलें, भावी, पुढचें ०कार्य—न पुढें सुरू करावयाचें काम, भविष्यकालीन कार्य, क्रियमाण असें कर्म 'वेदांतसूत्रांत प्रारब्धाचच प्रारब्धकार्य आणि जें प्रारब्ध नाहीं त्यास अनारब्धकार्य अशीं नावें दिलीं आहेत' —गीर २६९

अनारसा—अनरसा पहा

अनारिस-सा—वि १ भिन्न दुसरा, वेगळा, भलता 'आपण विसरोनि अनारिसें। देखे चिनें जयापरी।' —ज्ञानेबा १४,२ २ दुसऱ्या जातीचें-रीतीचें, विलक्षण, नवीन, निराळें 'बाई तुझा नवा शृगार। अनारिसा दिसतो सुखचंद्र। तरी कोण जोडला वर। सांगे आम्हां।' —कथा १ १२ ९ ३ अपूर्व अद्वितीय 'अमृत पानीलें चवी अनारिसी। साक्ष ज्याची त्यासी मनामाजीं।' —न २५१२, 'मागें युद्धें झालीं अपारें। स्वर्गें केलीं असतीं धनुर्धरें। परी हें अनारिसें निधारें। दिसोनि आलें सकळांसीं।' —जै ६६ ७७ [स अन्यादृश प्रा अण्णारिस]

अनार्की—स्त्री अंदाधुंदी, अनायकी, अराजकता, वेबंदशाही, क्रांति —किस्ट—वि अराजक क्रांतिकारक, बडखोर [इ]

अनार्त—वि निरिच्छ, दुःखरहित, सुखी 'होआल तुम्ही अनार्तें।' —ज्ञा ३ १०२ [स अ+आर्त]

अनार्य—वि १ आर्य महावंशातील नव्हे तो, द्राविड, मोंगल वगैरे आर्येतर वंशांतील २ आर्य किंवा श्रेष्ठ नव्हे तो, नीच, दुष्ट

३ आर्यास अनुचित, अयोग्य, न शोभणारें, अप्रतिष्ठाकारक ४ असभ्य, गावढळ, प्रतिष्ठा नसलेला -पु १ भिल, कोळी वगैरे इत्यादि गुन्हेगार जाती —गागा २४ २ आर्य वर्गातील नव्हे तो माणूस, म्लेंच्छ, शक, हूण, शूद्र वगैरे लोकांना अनार्य म्हणत असत, अलीकडे मानववंशातील इतर-द्राविड, मोंगल, नीग्रो इ० [स अ+आर्य]

**अनावड-डी**—स्त्री गोडी, आवड इत्यादींचा अभाव तिरस्कार, नावड, तुच्छता, तिरस्कार, अप्रीति, अरुचि, अनादर 'पता प्रमेयाची गोडी। अमृता उपजे अनावडी।'–शिशु १८, 'कृष्णीं लागलीसे गोडी! अनावडी विषयांची।' —एरुस्व ५ ६१ 'द्वेष घाटाळा अनावडी'—यथादी ४ ८४६ [अ+आवड]

**अनाव(वा)र**—वि वेल्गामी, स्वैर, अमर्यादित, बेताल आटोक्याबाहेरचें 'हें अनावर न विचारिता। वायांचि शिवसा उपनला चित्ता।' –ज्ञा १ ६७ [स अनिवार्य]

**अनावरण**—वि ज्यावर वारण नाहीं असा, वस्त्रांत गुडाळता न येण्यासारखा, उघडा 'मग अनावरणा प्रावरण। भूषणातीतासि भूषण।'–ज्ञा ९ १६२ [स अ+आ+वृ] ०**समारंभ**-पु प्रकट करण्याचा–उघडण्याचा समारंभ (तसबीर, पुतळा, इमारत वगैरे)

**अनावसर**—अयोग्य वेळ, अवेळ, अस्थान [स अनवसर]

**अनावस्था**—अनवस्था पहा

**अनावळी**—वि १ अनावळ पहा -स्त्री खोडी, चेष्टा, अरवाळी [अ+आवळ=आवर?]

**अनाविल**—वि १ शुद्ध, सोंवळें -पु गुजराथी ब्राह्मणांची एक जात, अनाविल ब्राह्मण [स अनाविल]

**अनावृत**—वि १ आवरण-झांकण नाहीं तें, उघडें, जाहीर प्रकट, बंद न ठेवलेलें, न झाकलेलें २ अनिर्मोहित, अनावर, आटोक्यापलीकडील, बाहेरचें, अतीत 'माझें स्वरूप गा असमसहस। गुणमायेसी अनावृत।' —एभा १५ ३२७ ३ (ल) असरक्षित [स अ+आ+वृ] ०**पत्र**-वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होणारें पत्र ०**बीजवर्ग**-ज्यांचें बीज उघडें असतें अशा देवदार वगैरे वृक्षजातीचा वर्ग

**अनावृत्त**—वि आवृत्ति नसलेला, पुन्हा न येणारा [स अ+आ+वृत्]

**अनावृष्टि**—स्त्री अवर्षण, पावसाचा अभाव 'किं अनावृष्टि वरें पन। मृत्युसमयीं सुधापान।' [स अ+आ+वृष्=पाऊस पडणें]

**अनाश्य**—वि न बिघडणारें, नाश न पावणारें, क्षय न होणारें, ऱ्हास न पावणारें [स अ+नश्=नाश पावणें]

**अनाश्रम-मा**—वि समावर्तन होऊन विवाह झाला नाहीं असा, चार आश्रमांत जो मोडत नाहीं असा [स अ+आश्रम]

**अनाश्रय**—पु आश्रय, सरक्षण–आधार याचा अभाव [स]

**अनाश्रय-यी, अनाश्रित**—वि निराधार, आश्रयहीन, निराश्रित [स अ+आश्रय]

**अनासक्त**—वि उदासीन, आसक्त नसलेला 'ऐसा कृतकर्मी अनासक्तु मी भूतीं असे।' –ज्ञा ९ १२९. [स अ+आसक्त]

**अनास्थ**—वि आस्था किंवा कळकळ नसलेला, निष्काळजी, बेफिकीर [स अ+आ+स्था]

**अनास्था**—स्त्री निष्काळजीपणा, बेफिकीरी हयगय, हेळसांड, धरसोड, कळकळीचा अभाव [स अ+आस्था]

**अनाहत, अनुहत**—वि १ न मारलेला, हाणलेला २ स्वयमेव, स्वभावतः न उत्पन्न झालेला ३ कोरें, न धुतलेलें (वस्त्र) ४ सततचा, अखंड ०**कमळ**, ०**चक्र**-न (योग) शरीरांतील षट्चक्रांपैकी हृदयामध्यें अनाहत नामक चौथें कमळ आहे त्याचा रंग अग्नीसारखा असून तें बारा पाकळ्यांचें असतें क पासून ठ पर्यंत तेथें बीजाक्षरें प्रत्येक दळावर प्रकाशमान झालेलीं असतात 'हृदयीं अनाहत कमळ। तें अग्निवर्ण द्वादशदळ। क पासुनि ठ वीजीं करी झळाळ। प्रतिपत्रीं॥' –विउ १ ५१ [स अ+हन् =मारणें] ०**गजर**, ०**ध्वनि**–१ पु योगसाधनानें ऐकू येणाऱ्या दश नादाच्या ध्वनींपैकीं एक किंवा दहाहि 'हें असो ते कुंडली। हृदयाआतु आली। तव अनाहताची बोली। चावळे ते।' —ज्ञा ६ २७४ २ एकसारखा अखंड अव्याहत सूर–आवाज 'जैसा अनुहताचा गजर। तैसीं तुरें वाजती अपार।' —एरुस्व ६ ७२ ३ सोहं शब्द श्वासोच्छ्वास

**अनाहार**—पु उपवास, उपोषण, अन्नावांचून राहणें [स अ+आ+हृ=नेणें] -री-वि उपवास करणारा [स]

**अनाहूत**—वि १ न बोलावलेला, आमंत्रण न दिलेला, आगंतुक २ अनपेक्षित, अकल्पित, आकस्मिक [स अ+आ+ह्वे=बोलावणें]

**अनाक्षर**—अनक्षर पहा

**अनिकट**—पु नदीला बांधलेला बंधारा, बांध, धरण [इ अनिकट मूळ द्राविड शब्द–का अणे=बंधारा+कट्टु=बांधणें अणेकट्टे=बंधारा, ते अडकट=बंधारा]

**अनिगा-घा**—स्त्री काळजीचा अभाव, हयगय, आबाळ, अनास्था ०**करणें**-निगा न राखणें, अनास्था करणें [अ+फा निगाह्]

**अनिगूत-ती**—स्त्री (प्रां) आबाळ, दुर्लक्ष, अनिगा 'हा घोडा अनिगुतीनें नासला' [अ+फा निगाह्, म निगुती]

**अनिचाड**—वि चाड नसणारा, अनुत्सुक, अनास्थ, निघोरी [अ+चाड]

**अनिच्छ**—वि निरिच्छ, इच्छा नसलेला [स अ+इच्छा]

अनिच्छा—स्त्री निरिच्छता, अप्रियपणा, आकांक्षेचा अभाव 'विषयाची अनिच्छा असावी' ॰प्रारब्ध—न दैववशात प्राप्त, केवळ इच्छा नसताना घडून आलेली गोष्ट, नवो तें नकोसें येणें, परेच्छा प्रारब्ध (स्वेच्छा प्रारब्ध याहून भिन्न) [स ]

अनित्य—वि नित्य, शाश्वत नव्हे तो, नश्वर, विनाशी, क्षणिक 'अनित्य प्रपंच जो अनात्मा।' [स अ+नित्य]

अनित्य—न अनीति (अप), वाईट गोष्ट–हेतु 'अनित्यपोटीं धरू नये।' –दा१४ १ २८ [स अ+नीति]

अनिंदक—वि निंदा न करणारा 'जो अनिंदकु अनन्यागती।' –ज्ञा ९ ४० [स अ+निन्द्=दोष देणें]

अनिंदित—वि न निंदिलेलें, दोषरहित, निर्दोष [स ]

अनिंद्य—वि निंदा न करण्याजोगें, निष्कलंक, अवाच्य, उप हास करण्याला अयोग्य, स्तुत्य [स ]

अनिपुण—वि अकुशल, नवशिका, अजाणता, तरबेज नस लेला, निष्णात नव्हे तो [स अ+निपुण]

अनिबद्धगान—न (संगीत) ज्या गायनांत रागाच्या धोरणानें केवळ स्वराचें अनेक प्रकारें उच्चारण होतें पण त्यांत दिजेची अक्षरें व ताल असत नाहीं तें [स ]

अनिभ्रांत—वि १ निःसंशय, खात्रीचा, निश्चित, खचित २ भ्रांतिरहित, विकल्परहित [स अ+नि+भ्रम्=विकल्प होणें]

अनिमि(मे)ष—पु ज्याच्या डोळ्याच्या पापण्या लवत नाहींत असा देव किंवा मासा –वि न मिटणारे, लवणारे, उघडे (डोळे), सदा जागरूक –क्रिवि डोळे न मिटतां डोळ्यांत तेल घालून, टक लावून, सावधानतेनें [वैस अ+निमिष्=मिटणें]

अनियत—वि १ अनिश्चित, अनियमित, अनियंत्रित, पक्कें न ठरलेलें २ नियमानें न वागणारा 'अनियतासि सर्वथा योग्यता नाहीं।' –ज्ञा ६ ३४४ [स अ+नियत]

अनियंत्रित—वि १ निर्बंध नसलेलें बफाम, अमर्याद २ स्वैर जुलमी (सत्ता) 'सीझरनें अनियंत्रित सत्ता आपल्या हातीं घतली होती' –टि २ ४४३ [स अ+नि+यम्=निर्बंधात ठेवणें –यंत्र]

अनियम—पु अनिश्चितपणा, कायमपणाचा अभाव, कायम न केलेली स्थिति –वि अनियमित पहा

अनियमित—वि १ अनिश्चित न ठरलेला २ अमर्याद अपरि मित, निरंतरचा 'जीवीं अनियम चिंतवणी।' –ज्ञा १६ ३२२ [स ]

अनियम्य—वि नियमन किंवा दमन करता न येण्याजोगें आवाक्यांत न आणण्याजोगें, हुकमत न चालविता येण्यासारखें, अनिवार [स ]

अनियाळें—वि वांकडें, तिरपें, तिरकस 'मुरडिवें आगें झाडी करितु। अनियाळां दोळां वेंस घेतु॥' –शिशु ७१०, [अणियाळें]

अनिरूप—वि निरूपण करण्यास कठिण 'तें अनिरूप कीं निरूपिजे। एकता बुद्धि आजिजे।' –ज्ञा १३ १७६ [स अ+ निरूप्=सांगणें]

अनिरूप्य—वि वर्णन करतां न येण्यासारखें, न सांगण्यासारखें [स अ+निरूप्=सांगणें]

अनिर्णय—पु अनिश्चितता, धरसोड, निश्चित किंवा कायम नसलेली अवस्था, निकालाचा अभाव –वि अनिश्चित, अनियत [स अ+निर्णी=ठरविणें]

अनिर्णीत—वि कायम किंवा निश्चित न केलेलें, संशयित [स ]

अनिर्देश्य—वि दाखविता येत नाहीं असा [स अ+निर्+ दिश्=दाखविणें]

अनिर्वचनीय—वि अनिर्वाच्य पहा ॰ख्याति–वेदांतातील एक वाद 'आख्याति अन्यथाख्याति। शून्यख्याति सत्ख्याति। अनिर्वचनीय जे ख्याति। तो वादुनिश्चिती मी उदवा।' –एभा १६ २०७

अनिर्वाच्य—वि १ अवर्णनीय, वर्णन करण्यास कठिण, विवे चन, स्पष्टीकरण करण्यास अवघड (ईश्वर, दुःख, सुख) 'ब्रह्म तें अनिर्वाच्य जाण।' 'आणि इये अनिर्वाच्यपण। तें दुजेही देवाचण।' –अमृ ६ ३९ २ सांगण्याला अयोग्य ३ अवाच्य याअर्थी [स अ+निर्+वच्=सांगणें] ॰पण–न उच्छृंखलपणा

अनिर्वाह—पु निर्वाहाचा अभाव, बिकट किंवा अनिष्ट अवस्था, निरुपायाची स्थिति, नाइलाज [स अ+निर्+वह्=नेणें]

अनिर्वाह्य—वि आवरण्याला, व्यवस्था करण्याला कठिण, चालविण्यास कठिण [स ]

अनिल—पु १ वायु वारा 'सहजें मलयानिलु मदु सुगंधु।' –ज्ञा ४ २२० २ अष्टवसूंपैकीं एक [वैस अन्=श्वास घेणें तुल॰ आयरिश अनल्]

अनिवड—वि अतुलनीय, निवड करता येत नाहीं असा, प्रचंड, भयंकर 'अनिवड उठला टणकु। अवचींनाटु येकु॥' –नीता १ ७७८ [स अ+नि+वृ प्रा अणिवड, म अ+निवड]

अनिवार—वि १ अतिशय, अमर्याद, प्रमाणाबाहेर, फार मोठा 'जन्ममरणकोडी अनिवार।' –एभा २ २८४ २ आवर ण्याला कठिण, दुर्निवार, खोडकर 'मूल तुझा अनिवार यशोदे।' –राला १८ ३ अनिवार्य अपरिहार्य, न टाळतां येणारी, न चुक विण्यासारखी (आपत्ति, विपत्ति गडांतर, अरिष्ट इ॰) आम्हां जन्ममरण अनिवार।' –एभा ३ १११ ४ जागृत, कडक, परा क्रमी 'दख्खनदेशीं अवामवानी दैवत अनिवार॥' –ऐपो २७४ [स+अनिवार्य]

अनिवार्य—वि निवारण प्रतिबंध करता न येण्यासारखें, अप रिहार्य, टाळण्यास कठिण वारण्यास अवघड [स अ+नि+वृ]

अनिश्चित—वि कायम अखेर, खानी, निर्णय न केलेलें [स ]

**अनिष्ट**—वि १ इष्ट नसलेलें, अप्रिय, नापसत २ प्रतिकूल, अशुभ, वाईट, अकल्याणकारक, अननुकूल —न तोटा, नुकसान, अनर्थ, अहित, अकल्याण, अप्रिय, नापसत गोष्ट, वगैरे **०सूचक**—न अनिष्ट फल सुचविणारें, वाईट गोष्टीचें पूर्वसूचक अशुभ दर्शविणारें, दुर्लक्षणी, अभद्र, अमगल [स अ+इष्ट]

**अनिष्टापत्ति**—स्त्री १ अनिष्ट घडणें, सकट येणें, अनर्थ ओढवणें २ (न्याय) जें सिद्ध करावयाचें नाहीं तें सिध्द करणें—होणें [स अनिष्ट+आपत्ति]

**अनिष्टापात**—पु अनिष्ट घडणें, आपत्ति, दुर्दैव, विपत्ति दुर्घटना, सकट कोसळणें—येणें [स अनिष्ट+आपात]

**अनिष्पन्न**—वि १ न सपलेलें अपुरें अर्धमुर्धें २ ज्यापासून काहींएक उत्पन्न झालें नाहीं असें, निष्फळ [स अ+निस्+पत्]

**अनिळ**—पु वायु अनिल पहा

**अनी**—स्त्री अणकुची, टोंक, अणी पहा [स अणि]

**अनीक**—पु न १ सैन्य, फौज २ समुदाय, जमाव 'पुनरपि परते मार्गी माधव हरिसा शिरे गजाअनिकीं।'—मोद्रोण ११ ३९ [स]

**अनीकसा**—वि अणीकसा, भिन्न, दुसरा [स अन्यत्व+सदृश म अणिक+सा]

**अनीगा**—स्त्री आण, शपथ, आणेगा पहा 'माझें चरित्र कोणीं पाहू नये अशी 'अनीगा' विनायकानें घातली' —विक चरित्र [स आज्ञा, प्रा आणा, म आण]

**अनीति**—स्त्री १ अधर्म, पाप अनाचार, अन्याय, व्यभिचार २ असभ्यपणा, अशिष्टता, ग्राम्यता, वाईट चालरीत [म]

**अनीन**—स्त्री लगाम (वादी दोरी) 'एकदाच घोडयाच्या अनिना उटून मोहळाच्या माशा उडतात त्याप्रमाणें सवनानीं उची घातली' —पाव ४५ **अनीनीस अनीन लागणें**=काम अगदीं धाईस येणें 'ज्यावेळीं अनीनीस अनीन लागेल त्यावेळीं येतील तितके ठेवून घेऊ' —रा १२ ३४ [अर इनान]

**अनीवानी**—अणीवाणी पहा

**अनीमोल**—अनमोल पहा 'मुक्त तुरा पदकीं रत्न असे अनीमोल। राजेंद्र भूपती शान सनावर डाल।' —होल ११९

**अनीश्वरभाव**—पु ईश्वर नाहीं असा भाव नास्तिक पाखडी मत (याच्या उलट ईश्वरभाव) [स]

**अनीश्वरवाद**—पु पाखडमताचें समर्थन नास्तिकमताचा पुरस्कार —दी—वि निरीश्वरवादी, पाखडी, नास्तिक ईश्वर नाहीं असें मानणारा [स]

**अनु**—अ एक उपसर्ग अर्थ १ मागून, पश्चात्, उ० अनुगमन, अनुचर २ सारखा, प्रमाणें, परक्रम उ० अनुरूप ३ खालीं (ल) खालोखाल, दुय्यम प्रकारचा, पेक्षा हलका उ० अनुकल्प ४ मिळून, बरोबर उ० अनुकपन [स]

**अनु**—वि आनु दुसरा, अन्य 'मनोरथाचें परिमळ। आरोगिजतु का लक्ष वेळ। परि उपवासावेगळ। आनु आर्थी।' —अमृ ६ ३३ [स अन्य]

**अनु**—क्रिवि मुळींदेखील, किंचित सुद्धा 'मुसळाचें अनु। तुका म्हणे नव्हे धनु।' —तुगा ३१४५ [स अणु]

**अनुकंपा**—स्त्री (दुसरा भीतीनें कापत असला म्हणजे आपणहि दयेनें कापतों म्हणून) दया, करुणा, कृपा, कळवळा, कींव 'नच सुदरी! करु कोपा। मजवरि धरि अनुकपा।' —सौभद्र [म अनु+कप्] —**कंपनीय**—वि दयेस योग्य —**कंपित**—वि दया दाखविलेला, ज्याची दया आली आहे असा —**कंप्य**—वि दयेस पात्र, दया करण्याजोगें [स अनु+कप्=कापणें]

**अनुकरण**—न १ नक्कल, दुसऱ्याप्रमाणें वागणें, प्रतिकृति २ हुबेहुब काढलेला आवाज (जनावर, पक्षी इ०चा), ध्वन्यनुकरण, ध्वनिवाचक शब्द उ० धडाधड, धबाधब, पटापट भडाभड, वगैरे [स अनु+कृ] **०धातु**—पु आवाजाच्या अनुकरणानें बनविलेला धातु, अनुकरणवाचक धातु जसें —करकरणें, खरखरणें, चुरचुरणें, घुरघुरणें **०शब्द**—पु आवाजावरून बनविलेला शब्द उ० सपसप, सळसळ

**अनुकरणें**—अक्रि अनुकरण करणें, सदृश वागणें—होणें 'जो आपु लेनि विसरें। सर्वे भूतत्वें अनुकरे। तो आत्मा बोलिजे क्षरें। पुरुषनामें।' —ज्ञा १५ ४५५, 'जें प्रकृति डका अनुकरे। तें प्रकृति डके अवतरे।' —अमृ ७ ३६ २ उत्पन्न करणें 'तया कर्मामाजीं मग। सहरो आघवें जग। अथवा नवें चाग। अनुकरो॥' —ज्ञा १८ ४३२

**अनुकर्ष**—पु १ आकर्षण २ कालातरावर किंवा दिवसगतीवर लोटलेलें कर्तव्याचरण विहित कालानतर केलेली क्रिया (याउलट—अपकर्ष) ३ (व्या) पूर्वीच्या नियमातील शब्द पुढील नियमात घेणें [म]

**अनुकल्प**—पु १ मुख्यत्वेंकरून जें कर्मादि सांगितलें असतें त्याच्या अभावीं काहीं गौण कर्मादि करावें अशी जी शास्त्रादिकांत अनुज्ञा असते ती गौणकल्प जसें—तुपाच्या ऐवजीं दुध उपयोगांत आणणें २ प्रतिनिधि बदली [स]

**अनुकार**—पु १ अनुकरण अनुसरण जातीचेनि अनुकारें। जेणें अवसरें। करणें पावे॥' —ज्ञा ६ ४० २ आकार स्वरूप कैवल्यघनाचा उध्दारु। करावेआ रेखाचा विस्तारु। तैसा दिसे अनुकारु। बळीनयाचा' —शिशु ३९५ ३ सप्रदाय ४ प्रतिबिंब, नक्कल 'त आनदाचे अनुकार। सुखाचे अकुर।' —ज्ञा ५ ११८ ५ साम्य, सारखेपणा सादृश्य [स] —**री**—वि १ अनुकरण करणारा २ सदृश असणारा, दिसणारा —**र्य**—वि अनुकरण करण्या योग्य, नक्कल करण्यायोग्य [म]

**अनुकूल–ळ**–वि १ फायदेशीर, उपकारी, सहाय्यक, धार्जिणा, शुभ, कल्याणप्रद, हितकर, हितावह, योग्य, मनाच्या आवडीप्रमाणें असलेला 'पूर्वेकडे गमनास पश्चिमवायु अनुकूल होतो ' २ जुळणारा, जमणारा, संमत, अनुसरून असणारा 'मीमांसामत धर्मशास्त्रास अनुकूल आहे ' ३ तयार, हातांत, ताब्यांत हुकमतींत असणारा (पैसे, धान्य वगैरे) 'अनुकूल स्त्रियापुत्र। अ० मंत्री पवित्र। अ० राज्य सर्वत्र। भागिले विचित्र नानाभोग ॥ ' –एभा ७ १४३ –न योग्य परिस्थिति, सहाय्यक परिस्थिति, अनुकूलता, सोई स्करपणा (प्रतिकूल याच्या उलट) 'यदा काशीस जाण्याचें आम्हांस अनुकूल नाहीं, सारीं माणसें घरीं दुखणाईत आहेत ' [स] –ता–स्त्री १ ऐपत, सामर्थ्य २ संमति [स]

**अनुकृति**—स्त्री १ अनुकरण २ नक्कल, चाळुल्या, विडंबन [स]

**अनुक्त**—वि १ अविहित, निषिद्ध (शास्त्रानें न सांगितलेलें म्हणून) २ न बोललेलें, न सांगितलेलें **०संकेत**–पु प्रत्यक्ष न बोलता परस्पर समजुतीनें ठरलेली गोष्ट 'तुम्ही आमच्याकरितां अमुक कराल तर आम्ही तुमच्याकरितां अमुक करूं असा लिखित पक्षांतील पुढाऱ्याचा अनुक्त संकेत किंवा गुप्त करार असतो ' –आगर (अफूचें कमिशन) [सं अ+उक्त]

**अनुक्रम**—पु १ परंपरा, ओळ, एकामागून एक येणें २ पद्धति, नियम ३ विशिष्ट पध्दतीप्रमाणें–किंवा नियमाप्रमाणें–रचना, मांडणी 'कोशांतील शब्द वर्णानुक्रमानें लावलेले असतात ' 'देखें अनुक्रमाधारें। स्वधर्मु जो आचरे।' –ज्ञा ३ ८० [स अनु+क्रम]

**अनुक्रमणिका**—स्त्री पुस्तकांतील विषयांची, प्रकरणांची आरंभीं दिलेली यादी, विषयसूची प्रकरणसूचि [स]

**अनुक्रमणें**—क्रि (काव्य) योग्य काळीं सुरवात करणें प्रारंभ करणें करूं लागणें, हातीं घेणें (काम वगैरे) [स]

**अनुक्रमें**—क्रिवि १ अनुरूप अनुसरून 'जेवीं राजाज्ञा अनुक्रमें।' –एभा २ ५३५ २ ओळीनें, क्रमानें, क्रमवारी [स]

**अनुक्रांत**—वि अनुक्रम लावलेला, अनुक्रमानें मांडणी विशिष्ट रचना केलेला [स अनु+क्रम्]

**अनुग**—पु अनुचर अनुयायी 'कला त्याचीं त्यांना असतिल तयाचे अनुग जे। तयांना, आम्हांला अरसिक जनां काय समजे।' –टिक ८७ [स अनु+गम्=जाणें]

**अनुगत**—वि आसक्त अनुसरणारा, जोडलेला पुरवणी लावलेला [स] **०धर्म**–नैसर्गिक, जाति गुण धर्म आनुवंशिक गुण सहजधर्म 'गधवत्व हा पृथ्वीच्या ठायीं अनुगत धर्म आहे ' [स]

**अनुगम**—पु १ एखाद्या विषयाचें संपूर्ण आकलन २ सर्व शाखांचा विचार करून होणारें अनुगतधर्मादि ज्ञान ३ अनुगमन, मागें जाणें, अनुसरणें [स]

**अनुगमन**—न १ मागून जाणें, अनुसरण, पश्चाद्गमन २ सती जाणें, सहगमन, चितारोहण, क्षत्रिय व खालच्या वर्गांतील विधवा नवऱ्याच्या चितेंत उडी न टाकतां, नवऱ्याच्या पादुका, वस्त्र इ० वस्तूंसह दुसऱ्या एका चितेवर अरोहण करतात तें, किंवा नवरा परगांवीं मरण पावल्यास त्याची पर्णशरप्रतिमा करून सहगमन करतात तें [स]

**अनुगामी**—वि १ अनुसरणारा, नोकर, शिष्य अनुयायी, आश्रित, खिदमतगार २ मनाप्रमाणें वागणारा, सांप्रदायी 'बहुतेक ते अनुगामी आहेत ' –विक्षिप्त १ १४७ [स अनु+गम्]

**अनुगुण**—वि १ जुळणारा, जमणारा, समानशील, अनुकूल 'औषध पाहून तदनुगुणच पथ्य केलें पाहिजे ' २ योग्य, शोभणारा, सलानोगता, सामासशब्द –धर्मानुगुण, देवानुगुण, पित्र्यनुगुण, शास्त्रानुगुण, इ० ३ एक अर्थालंकार –एकाच्या पूर्वसिद्ध गुणाचा दुसऱ्याच्या गुणसान्निध्यानें उत्कर्ष वर्णन करणें 'आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला।' [स अनु+गुण]

**अनुगृहीत**—वि अनुग्रह कृपा केलेला, कृपाळूपणानें, अनुकूलतेनें वागविलेला मानलेला, काळजी घेतलेला, 'तेणें मी अनुग्रहीतु। साधूंचा निरूपितु। ते आपुले अलंकारितु। भक्तयापरी॥' –ज्ञा १ ८२ [स अनु+ग्रह्]

**अनुग्रह**—पु १ कृपा, दया, दयाळूपणा, मेहेरबानी, प्रसाद (देवता, राजा, गुरु इ०चा) 'तुमचा अनुग्रहो गणेशु।' –ज्ञा १० ६, 'ज्यास परिहिलीं बहु तो करि धृतराष्ट्रीं अनुग्रह व्यास।' –मोभीष्म १ १ २ वेदमंत्राचा उपदेश गुरूपासून उपदेश (क्रि० देणें, घेणें) 'आपण धरूनि विश्वेंद। धावा तुझ्यासी अनुग्रह।' ३ अवलंबन, व्यापन, सहाय्यकारी संबंध 'अंतःकरणाच्या अनुग्रहावाचून इंद्रियांस विषयग्रहणीं सामर्थ्य येत नाहीं ' –हीं–वि ज्यास उपदेश दिला तो, उपदिष्ट, ज्यावर अनुग्रह झाला आहे असा **०वाद**–पु ईश्वराची कृपा संपादन करण्याचें तत्त्व भक्तिमार्ग (इं डॉक्ट्रिन ऑफ ग्रेस) 'युरोपांतील अनुग्रहवाद आणि आपल्याकडील पुष्टिवाद याची वाचकांना आठवण करून दिली ' –विचावि ८२

**अनुग्राहक**—वि १ अनुग्रह करणारा, दया दाखविणारा २ उपदेश देणारा उपदेष्टा (गुरु) [स]

**अनुग्राह्य**—वि १ अनुग्रह, दया करण्यास पात्र २ उपदेश करण्यास योग्य [स]

**अनुघडीं**—क्रिवि एकसारखी, निरंतर, सतत 'अमृताची सात वाहुडी। लागो का अनुघडी।' –ज्ञा १३ ६४० [स अनु+घटि]

**अनुघड–डु**—पु १ आच्छादन आवरण ढगाची काळोखी **०फुटणें**–उघडणें, उघडें होणें आवरण नाहींसें होणें 'जेव्हां शारदीयेचा अनुघडु फुटे। तेव्हां घनजात आटे।' –ज्ञा ६ १०२ [अ+उघड]

**अनुघड-डु**—स्त्री अडचण, अवरोध, (हल्याल बद पडणें) 'इंद्रिया अनुघडु पडलिया ।' –ज्ञा ८ १२० [स अनु+घट् अनु घटन=एकत्र जुळणी]

**अनुचर, अनुचारी**—पु सेवक, आश्रित, अनुयायी, पद रचा 'मी श्रीरामाचा अनुचर । हनुमंतनामें वायुकुमर ।' [स अनु+चर्]

**अनुचरण, अनुचर्या**—न अनुसरण, चाकरी, नोकरी, सेवा शुश्रूषा, हुजेरी [स]

**अनुचार**—पु १ अनुचरण पहा २ अनुक्रम, अनुसरणक्रिया, पाठीमागून येणें 'चाप ओढणें व आवाज ह्यामध्यें अनुचार आहे' –न्यायपद्धति २६९

**अनुचित**—वि १ अयोग्य, अशिष्ट, वावगें, न शोभणारें, अप्रशस्त 'तू अनुचिता चित्त नेदसी ।, –ज्ञा २ ८ २ अपात्र अयोग्य, नालायक, असमर्थ योग्य गुण नाहींत असा [स अ+उचित]

**अनुच्चारणीय**—वि बोलण्यास अयोग्य, अशिष्ट, अश्लील [स अ+उच्चर्]

**अनुच्छिष्ट**—वि १ उष्टें न केलेलें, उपभोग न घेतलेलें, उपभोगात न आणलेलें, नवीन, न विटाळलेलें, सोंवळें, सेवन न केलेलें, अस्पृष्ट ताजें (अन, पाणी इ०) 'सातही पदें अनुच्छिष्टें । नवले आहातीं ।' –ज्ञा ७ १९७ २ (ल) अप्राप्य, आटोक्याबाहेर, शक्तीपलीकडील 'असो हें अनादि अविट । जो वाक्चातुर्या अनुच्छिष्ट ।' –क्र ४३ [स]

**अनुज, अनुजन्मा**—पु पाठीमागून जन्मलेला, धाकटा भाऊ [स अनु+जन्=जन्मणें]

**अनुजा**—स्त्री धाकटी बहीण

**अनुजायिनी**—वि अनुकूल असणारी, 'पै स्वहिता अनुजायिनी । मेघा ते गा मी ये जनीं ।' –ज्ञा १० २१९

**अनुजीवि**—पु आश्रित नोकर हुजऱ्या, दास [स अनु+जीव्=राहणें]

**अनुज्जिद्**—न (पाश) उज्ज (हायड्रोजन) विहीन (अम्लें) अनार्द्र (इ) अनहायड्राइड [स अ+उज]

**अनुतप्त**—वि पश्चात्ताप अनुताप पावलेला, दुःखी पश्चात्तापी 'शापूनि होय अ० मुनी सतीतें । [स अनु+तप्=तापणें]

**अनुताप**—पु पश्चात्ताप, अयोग्य कृत्याबद्दल वाटणारा खेद 'आळीन पाय धरुनि अनुताप । वाहे जळ शोंप नाहीं डोळा ।' –तुगा १०७६ 'अनुदिनीं अनुतापें तापलों रामराया ।' –राक ०पणें–अक्रि पश्चात्ताप पावणें, खिन्न होणें दुःखानें व्याप्त होणें 'ऐसा अनुतापोनि वाल्हा । नारदापासीं परतोनि आला ॥' –रावि [स]

**अनुतापी**—वि १ आपल्या कृत्याबद्दल लागलाच किंवा नेहमीं पश्चात्ताप पावतो तो, अशा स्वभावाचा २ पश्चात्ताप झाला आहे असा, अनुतप्त, खिन्न, दुःखी [स]

**अनुताल**—पु एक ताल, अनागत पहा [स]

**अनुत्तर**—न १ उत्तराचा अभाव विसंगत, भलतें, अपूर्ण उत्तर म्ह० अनुत्तरम् उत्तरम् । किंवा अनुत्तरम् एव उत्तरम् । 'कोणी कांहीं फार मागू लागला असता संकोचादि कारणानें कदाचित् अनुत्तरच उत्तर कल्पावें लागतें' २ (कायदा) उत्तर देण्याच्या चार प्रकारात समावेश न होणारें उत्तर, 'उत्तर' पहा ३ वचनभग, करारनपाळणें, ठरलेल्या गोष्टीप्रमाणें न वागणें, करणें 'सदरहु लिहिल्याप्रमाणें वरीन, ह्यास अनुत्तर करणार नाही' –वि १ उत्तर देण्यास असमर्थ, निरुत्तर २ उत्तम, अद्वितीय, सर्वोत श्रेष्ठ [स अ+उत्तर]

**अनुत्पत्ति**—स्त्री निष्प्रतिपत्ति, उत्पन्न न होणें [स]

**अनुत्पन्न**—वि १ उत्पन्न न झालेला २ उपजीविकेचें साधन नसलेला 'श्रोत्री, कुटुंबवत्सल, अनुत्पन्न, असे सद्ब्राह्मण पाहून ग्राम अथवा भूमि देणें ती द्यावी' –आज्ञापत्र २५ 'तर गरीब अ० असे ब्राह्मण पुण्यात असतील त्यास शभर रुपयेपर्यंत येकास याप्रमाणें धर्मादाव करणें' –पेद १८ १३०

**अनुत्साह**—पु कोणत्याहि गोष्टीबद्दल आवड, गोडी, किंवा आनंद नसणें, तिरस्कार, उदासीनता, उत्सुकता नसणें [स अ+उत्साह]

**अनुदात्त**—पु १ वेदातील तीन स्वरापैकीं (उदात्त, अनुदात्त, स्वरित) ज्याला कोणताहि स्वर नाहीं असा वर्ण [स अ+उदात्त]

**अनुदार**—वि कोत्या मनाचा, उदार नाहीं असा, क्षुद्र बुद्धीचा [स अ+उदार]

**अनुदिन-नी**—क्रिवि दररोज, प्रत्येक दिवशीं 'अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया ।' –राक [स अनु+दिन]

**अनुद्भूत**—वि अप्रकट, अनुत्पन्न, गुप्त [स] ०उष्णता—स्त्री (शाप) पदार्थ विरल होताना त्यातील उद्भूत उष्णता गुप्त होऊन आपल्या त्वचेस समजेनाशी होते–ती उष्णता (इ लेटन्ट हीट) –मू ३१

**अनुद्वाह**—पु लग्न न होणें अविवाहित अवस्था–स्थिति, ब्रह्मचर्य, कौमार्य [स]

**अनुद्वेग**—पु संतोष, निर्भयता, आनंद –क्रिवि निश्चित, बेफिकीर रहावें आपण अनुद्वेग ।' –एभा २९ ८२३ [स अ+उद्वेग]

**अनुधार**—अ न थांबता सतत अविरत [स अनु+धारा=प्रवाह]

**अनुधावन**—न १ मागून धावणें, पाठलाग करणें २ पूर्ण तपास, शोध, चौकशी, पिच्छा, दीर्घ शोध, अभ्यास, संशोधन [स अनु+धाव्=धावणें]

**अनुधावन**—न शुध्दि किंवा स्वच्छता [स अनु+धू=धुणें]

**अनुध्यास**—पु पूर्ण चिंतन, एकाग्र मनानें आराधन, पूर्णलक्ष, चित्ताची एकाग्रता, मनन [स. अनु+ध्या=मनन करणें]

**अनुध्वनि**—पु १ मुख्य आवाजानंतरचा आवाज, प्रतिध्वनि, पडसाद २ वाद्य बंद केल्यानंतर चालू राहणारा नाद–सूर–स्वर [स अनु+ध्वनि]

**अनुनय**—पु १ नम्र विनय, विनंति, प्रार्थना २ आदर सत्काराची–सन्मानाची–पूज्यतेची नम्रपणाची वृत्ति, विनयशील वागणूक ३ बरोबर नेणें, अनुसरण्यास लावणें, (ल) शिक्षण, मार्गानें नेणें, शिस्त लावणें, वळण लावणें ४ प्रियाराधन (इ कोर्टींग) –यी–वि १ आदराचा–सन्मानाचा–पूज्य २ शिकवि णारा, वळण लावणारा [स अनु+नी=नेणें]

**अनुनय**—पु (खि) मध्यस्थाच्यातर्फे विनंति करण्याचे तीन दिवस 'रोजेशन डेज्' या इंग्रजी शब्दाचा पर्याय ' ख्रिस्ती पंचा गाप्रमाणें ख्रिस्ताच्या स्वर्गारोहणाच्या दिवसापूर्वीचा सोमवार, मंग ळवार व बुधवार –रे टिळक उपोषणमंडळ ३ [स अनु+नी]

**अनुनादक-पेटी**—स्त्री नाद किंवा ध्वनिवर्धक–पूरक अशी पेटी, आवाज वाढविणारी–मोठा करणारी पेटी (इ रेझोनन्स बॉक्स) [स अनु+नाद]

**अनुनासिक**—वि ज्याचा नाकातून उच्चार होतो असा. हा उच्चार जाणवयाकरिता वर्णाच्या माथ्यावर अनुस्वार देतात ज्या वर्णाच्या माथ्यावर हा अनुस्वार असतो त्यास अनुनासिक–सानु स्वार म्हणावें –न पंचवर्गीतील शेवटचीं व्यंजनें –ङ्, ञ्, ण्, न्, म्, इ [स अनु+नासिका] ०ता–स्त्री (संगीत) नाकात गाणें

**अनुनीत**—वि १ नम्रपणानें विनविलेलें, प्रार्थिलेलें २ पुढें नेलेलें, शिक्षण दिलेलें, वळण लावलेलें ३ मान केलेलें, मनधरणी केलेलें, संतुष्ट केलेलें [स]

**अनुनीति**—स्त्री १ समजूत काढलेली–सांत्वन केलेली अवस्था, संतुष्ट स्थिति, समाधान २ शिक्षण वळण शिस्त लावलेली अवस्था [स]

**अनुपकारी**—वि १ उपकाराची फेड न करणारा, उपकार न जाणणारा, कृतघ्न २ दुसऱ्यावर उपकार न करणारा ३ (व्यापक) निरुपयोगी, कुचकामाचा, निरर्थक (पदार्थ–वस्तु) [स अ+उप कार]

**अनुपठण**—न दुसऱ्याच्या मागून वाचणें–म्हणणें–पाठ करणें, सथा घेणें –ठित–वि दुसऱ्याच्या मागून म्हटलेलें, पाठ केलेलें [स अनु+पठ्=वाचणें, म्हणणें]

**अनुपत्त–द, न अनुपत्ति**—स्त्री १ उत्पन्न नसणें, निर्वा हाच्या साधनाचा अभाव 'आपदा अनुपत्ति कदाय।या नाव आदि भूतिक।'–दा ३ ७ ८१ २ विपत्ति, दारिद्र्य, कंगालपणा, ओढ, आपत्काल 'ब्राह्मणासि हिंसाकर्म। तो जाण पां परम अधर्म। लागल्या अनुपत्ती दुर्गम। तें क्षात्रधर्म करावा॥'–एभा १७ ४५५ [स अ+उत्+पत्=पडणें]

**अनुपत–द**—क्रिवि (अनुपयत्त अप) व्यर्थ 'अनुपद तुझिया मी व्यर्थ पोटास आलें।'–नामू ? १०६ [स अ+उप+पत्]

**अनुपद**—क्रिवि पावलोपावलीं, वरचेवर 'अनुपद तिस कोणी रिझणें जाणतीती।'–सारह ३ ६६ [स अनु+पद=पाय]

**अनुपपत्ति**—स्त्री १ निर्वाहाच्या साधनाचा अभाव, दारिद्र्य अनुपत्त–द पहा २ व्याख्याकूट, उपपत्तीचा अभाव, बाही निष्पन्न न होणें ३ अप्राप्ति, समाप्ति 'अगाचिया अनुपपत्ति। आटलिया उपपत्ति।'–अमृ ५ ५५ [स अ+उप+पद्–उपपत्ति]

**अनुपपन्न**—वि १ सिध्द न झालेलें, स्थापित न झालेलें, पोकळ २ निर्वाहाचें साधन नसलेलें, कंगाल ३ उत्पन्न न झालेलें, अनुत्पन्न [स अ+उप+पद्]

**अनुपम**—वि (अप अनुपम्य) १ दुसरी उपमा किंवा तुलना नाही असें, अतुल्य, निरुपम 'तो सुखसोहळा अनुपम्यरासी।' –तुगा ८१ २ प्रतिस्पर्धी नसलेला ३ सर्वोत्कृष्ट [स अ+उप+मा]

**अनुपमेय**—वि अतुल्य, अनुपम पहा [स]

**अनुपयुक्त**—वि १ निरुपयोगी, निकामी २ न जमणारा, न जुळणारा, न शोभणारा, विशोभित [स अ+उप+युज्]

**अनुपयोग**—पु निरुपयोग, अनावश्यकता, निकामीपणा, निष्फलत्व [स]

**अनुपयोग-गी**—वि अनुपयुक्त, निरुपयोगी, निष्फळ

**अनुपरोध**—वि निर्विकार, स्पष्ट, यथार्थ 'हें अनुपरोध मत माझें। जिहीं परमादरें स्वीकारिजे।'–ज्ञा ३ १९१ [स अ+उप+रुध्]

**अनुपस्थित**—वि १ प्रचलित नाहीं असें, लुप्त, नामशेष झालेलें (शास्त्र, कला इ) २ गैरहजर उपस्थित नव्हे तो ३ मागितल्याबरोबर तयार नसलेला, सिध्द नसलेला ४ स्मरणात नसलेलें, मलिन झालेलें ताजें नसलेलें, (संपादित ज्ञान, अभ्यास, इ) [स अ+उप+स्था]

**अनुपस्थिति**—स्त्री १ गैरहजेरी, अभाव अस्तित्व नसणें २ विस्मरणामुळें (ज्ञान) जागृत नसणें [स]

**अनुपलब्ध**—वि प्राप्त न झालेलें, न गवसलेलें, न मिळालेलें [स अ+उप+लभ्]

**अनुपात**—पु (गणित) त्रैराशिक, प्रमाणगणित [स अनु+पत्]

**अनुपान**—न १ (वैद्यक) औषध घेताना त्याबरोबर घ्याव याचा पदार्थ, रसायनादि सिध्द औषध ज्यात मिसळून घेतात असे पदार्थ (आल्याचा रस, मध इ) 'भोजना न यावें ज्ञान। जेणें चुके अनुपान। तरीच घेतल्याचा गुण। होईल जाण सत्य भाव॥'

—तुगा ७२४ २ औषध घेत असता खावयास योग्य पदार्थ, पथ्य पदार्थ ३ औषधावर, विषावर किंवा इतर बाबतींत उतारा उ० पालीचें तेल विंचवावर अनुपान, अजीर्णाचें अनुपान लंघन ४ भोजन, खाद्य, साहित्य 'मवानराव प्रतिनिधी आले अनुपान भोगुनि। एक मोर्चा त्यांनि रोवुनि।' —पपो ७७८ ५ शेत, मळा वगैरे सबधींच्या लगान घ्यावयाच्या गौण (अनुषंगिक, तत्संबंधी, बरोबर असणाऱ्या) बाबी किंवा गोष्टी —क्रि० धरणें, बाळगणें, सभाळणें ०जमणें-बसणें-साधणें-होणें-प्रधान किंवा मुख्य गोष्टीशीं गौण गोष्टींचा मेळ बसणें, उतारा लागू पडणें [स अनु+पान]

**अनुपाय**—पु निरुपाय, नाइलाज, अगतिकता —वि —निरु पायाचें, नाइलाजाचें, उपायहीन [स अ+उपाय]

**अनुपेग-गी**—वि (कों) निरुपयोगी, निष्फळ, निकामी, 'त्यासि इंद्रियांचें बंधन। सवथा जाण अनुपेगी' —एभा २८ ३२६ [स अनुपयोगी अप]

**अनुप्रवेश**—पु १ मुख्य प्रवेशामागून झालेला-केलेला प्रवेश २ मागोमाग-क्रमानें आत जाणें-शिरणें उ० विषयानुप्रवेश 'मग परस्परें केला अनुप्रवेश।' [स अनु+प्र+विश्]

**अनुप्रास**—पु (काव्य) एक शब्दालंकार काव्यात एका किंवा अनेक अक्षरांची पुन पुन आवृत्ति आली असता हा अलं कार होतो अनुप्रासाचे प्रकार १ छेक-अनेक व्यंजनांची आवृत्ति साधणें 'नसे ठावा ब्रह्मा न शिव अथवा श्रीपति हरि।' —वामा (गजेंद्र मोक्ष) २ वृत्ती-तेंच तेंच व्यंजन पुन्हा पुन्हा येणें 'वशी नादलगी विला कठिनशी खोवोनि पोगीपटीं।' —वामन (वनसुधा) ३ श्रुति-दन्तादिक्यादि स्थानांपैकीं कोणत्याहि एकाच स्थानाचीं अनेक अक्षरें अनेक वेळा येणें 'अलसलुलित मार्गी चालता श्रांत झाली।' —मोडवोले (उत्तरराम) ४ लाट-शब्दा सहित अर्थाची आवृत्ति होणें 'जो कल्याणगुणी गुणींच अगुणी भेटे मला ज्या गुणीं।'—आसी (सीस्व) [स अनु+प्रास]

**अनुफा**—पु शिधा, रोजमुरा उल्फा पहा जे शिपाईलोक सरकार इमानाइतून देती? त्यास अनुफा अडीशी श्रीमत महाराज राजे देतील' —पया ४०१ [अर उल्फा]

**अनुबंध**—पु १ पाश बंधन बेडी लोढणें अडथळा ढुडवा सबधी ओढा, ओढ, काळजी संसारपाश २ भावेचें मूलतत्त्व जसें धातु प्रत्यय, कार्य ३ अवलंब आश्रय जवळचा सबंध संपर्क; अंग, आनुषंगिक भाग ४ गौण-दुय्यम प्रतीची सूचक प्रीति भाव ५ सतत प्रवाह, अखंडता, परंपरा ०चतुष्टय-पु शास्त्रातील किंवा वादविवादातील विषयप्रतिपादनाचे चार प्रकार—१ विषय २ प्रयोजन ३ सबध ४ अधिकारी [स अनु+बंध्=बांधणें]

**अनुबंधी**—वि १ जवळचा, संबंधी २ आनुषंगिक, अनुयोगी, अवलंबून असणारा, कार्यकारणसंबंधी सामासशब्द धर्मानुबंधी, हिता नुबंधी, नाशानुबंधी ३ आसक्त [स अनु+बंध्]

**अनुभव**—पु १ प्रत्यक्ष ज्ञान प्रचिति, स्वत मिळविलेलें ज्ञान, अनुमान, शब्द इ० द्वारा मिळालेलें ज्ञान, साक्षात्कार २ (कायदा) उपभोग, कबजा ३ (ल) परीक्षा ४ (तत्त्व) निरनिराळ्या गोष्टींचें स्मरण ५ हद्यात, वहिवाट ६ चव, आस्वाद, ७ (ल) ईश्वरविषयक ज्ञान 'गुरुविण अनुभव कैसा कळे।' [स अनु+भू] म्ह० अनुभवासारखा शिक्षक नाहीं ०घडणें—आस्वाद मिळणें, '(कवीच्या वाणीचा) अनुभव घडून एकदर कवितेविषयीं कल्पना करता येते' —निमा ४४२ ०येणें—प्रचीति मिळणें, प्रत्यक्ष कळणें ०गम्य—वि प्रत्यक्ष अनुभवानें जाणण्याजोगें, अनुभवानें समज णारें, अनुभवनीय (ब्रह्मज्ञान इ) ०जन्य—वि अनुभवानें मिळा लेलें 'अनुभवजन्य ज्ञानाच्या समुच्चयानें विषयग्राहकता उत्पन्न होते' —सुकी ९ ०रसिक—वि उपभोग, चव घेतलेला, अनुभ वानें रसिकता प्राप्त झालेला (कविता, आ इ० विषयीं) ०शीर, ०सिद्ध—वि अनुभवानें किंवा प्रचीतीनें निश्चित किंवा सिध्द झालेलें —वाद्वैत—न प्रचीतीनें जीवाशिवाचें ऐक्य सिध्द करावें असें मत प्रतिपादन करणारें तत्त्वज्ञान हें मत मद्रासेकडे आढळून येतें व हीं एक कर्मयोगाचीच नक्कल आहे —गीर ३६२ पहा —वारूढ—वि अनुभवानें माहीत झालेला, प्रचीती घेतलेला

**अनुभव(वि)णें**—सकि १ प्रचीति येणें, अनुभव घेणें, अनु-भवास येणें, वाटलें कळून येणें 'देव तेही सर्व येती तियें वेळीं। मृत्यु अनुभवल पुन तेव्हा॥' —च ८६ २ उपभोग घेणें, उपयोग करणें किंवा फायदा घेणें [स अनु+भू]

**अनुभवि(वी)त**—वि १ प्रचीति घेतलेलें, माहीत झालेलें, चव घेतलेलें, ज्याचा अनुभव आला आहे असें, अनुभवसिद्ध २ (ल) तिखट, तीक्ष्ण चोंबणारें परणारें लागणारें हृदयस्पर्शी (काव्य वगैरे) ३ (चुकीनें) अनुभवी [स अनु+भू]

**अनुभवी**—वि १ अनुभव प्रचीति घेतलेला, अनुभव आलेला. ह्या बुद्धी जो अनुभविया। —परमा १४ २७ २ ज्यानें उपभोग घेतला आहे असा ज्यानें उपयोग केला आहे असा ०ज्ञान—न. अनुभवानें मिळालें ज्ञान शहाणपण [स.]

**अनुभाव**—पु १ योग्यता, मान्यता, प्रभाव, माहात्म्य, अधिकार सामर्थ्य मोठेपणा २ (साहित्य) एकभाव, अतस्थ तीव्रा शरीरावर दिसून येणारा परिणाम किंवा मनोविकाराचीं चिन्हें आविर्भाव भाव पहा [स अनु+भाव]

**अनुभाविक**—पु अनुभवणारा, अनुभविक पहा 'तैसें अनुभाव्य अनुभाविक। इहीं दोहीं अनुभूतिक। तें गेलिया कैंचें एक। एकामीचि।' —अमृ ५ ६१ [स]

**अनुभाव्य**—न अनुभवण्याचा विषय –अमृ ५ ६१ अनुभाविक पहा

**अनुभूत**—वि चव घेतलेलें, प्रत्ययास आलेलें, कसोटीस लाव लेलें, अनुभवसिद्ध [स ]

**अनुभूति**—स्त्री प्रत्यय, अनुभव 'अनुभवू वेढावला । अनुभूतिपणें ।' –ज्ञा १८ १२१७ [स ]

**अनुभूतिक**—न प्रत्यय, अनुभव –अमृ ५ ६१, अनुभविक पहा

**अनुभूयमान**—वि (वर्तमानकाळीं) प्रचीति येत असलेलें, उपभोगित असलेलें [स ]

**अनुमत**—न १ अनुमोदन, संमति, मान्यता, खातरी, अभिमत, कबुली 'तोचि मार्गे दावि आम्हाते । तुझिया अनुमतें चालू आम्ही ।' २ अनुकूल मन एकमन, एकभाव ३ निर्णय, ठरलेलें मत, निवाडा, फैसला (न्यायाधीश किंवा पंच यांचें) –वि—पसत केलेलें, आवडलेलें, अनुकूल असलेलें [स अनु+मन्]

**अनुमति**—स्त्री १ पसति, कबुली, संमति, मान्यता, अनुज्ञा २ चतुर्दशीयुक्त पौर्णिमा तिथि श्रौत कर्मांत या देवतेस हविर्भाग देतात [स ]

**अनुमान**—न तर्क, कल्पना, अटकळ, अदाज, (क्रि० काढणें—बांधणें) 'एऱ्हवी अनुमानाचेनि पैसें । आवडे तैंर कळलें ऐसें । परि मृगजळाचेनि वोलावें । काय भूमि तिमे ।' –ज्ञा ९ १३७ २ ज्ञात गोष्टीवरून अज्ञात गोष्टीबद्दल काढलेला तर्क किंवा निर्णय, (न्याय शास्त्रातील चार प्रमाणापैकीं दुसरें) (सामान्यत )तर्क, सिद्धांत ३ (कायदा) तर्कावरून काढलेला पुरावा ४ (काव्य) (अनुमान रूप) दोलायमानवृत्ति, सकोच शका, सशय, किंतु 'मोह दवडूनिया परौता । अनुमाना हाणोनिया लत्ता ।' –मुआदि २६ ९१, 'तुका म्हणे आहे ठायींचाचि मान । आता अनुमान कायसा तो ।' –तुगा १४९३ 'ये गोष्टीस करील अनुमान । तो सिद्धचि पावेल पतन ।' –दा ६ ९ ३० ५ एक अर्थालंकार, साधनावरून साध्याचें ज्ञान तर्कानें काढलेलें असतें तो 'भवन्मतिस आवडे जरि यनादिकालागि तें । मदीय गुणकीर्तनश्रवण कातरी लागितें । असेंहि म्हणशील वा ! जरि तरी तुझी मावली । तुज त्यजुनि पाजिता करिं दुधाकडे धावली ॥' –केका ५० ०गम्य–वि तर्कानें, धोरणानें जाणण्यासारखें ०धप(व)का–पु अनमान धपका पहा ०सिद्ध–नि तर्कानें निश्चित केलेलें, ठरविलेलें, जाणलेलें [स अनु+मा=मोजणें]

**अनुमानणें**—सक्रि तर्क करणें तर्कानें ताडणें, कल्पना करणें, अजमावणें 'मनी अनुमानी पैं येथु । कपटाचार दिसतसे ।' –मुसभा ४१६० [स अनु+मन्=विचार करणें]

**अनुमानी**—वि तर्क करण्यात, तर्कानें ताडण्यात कुशल, धोरण बांधण्यांत, अटकळ किंवा अदाज करण्यात कुशल–तरबेज [स ]

**अनुमानोक्ति**—स्त्री १ तर्कानें बोलणें, अदाज–अटकळ करणें, २ अनुमानानें किंवा तर्कानें केलेली मांडणी, अनमानधपका [स अनुमान+उक्ति]

**अनुमापक**—वि ज्याच्यावरून अनुमान करता येईल असा, यथार्थ कल्पना देणारें, अनुमानाला साधन किंवा जागा करून देणारें, तर्क करण्यास आधारभूत (गोष्ट वगैरे) 'प्रतिबिंब किंवा अनुमापक' अमृ १ २६ [स]

**अनुमित**—वि अनुमानानें–तर्कानें ठरविलेला–जाणलेला [स ]

**अनुमिति**—स्त्री तर्क, निर्णय, (न्याय) अनुमानानें तर्कानें होणारें ज्ञान [स ]

**अनुमेय**—वि तर्क करता येण्याजोगें, अटकळ करता येण्यासारखें 'हो का प्राणानुमेयो । येवो का हातीं येवो ।' अमृ ७ २३८ [सं ]

**अनुमोदक**—वि समति देणारा, पसति दर्शविणारा, अनुकूल मत देणारा, ठरावास वगैरे [स अनु+मुद्]

**अनुमोदन**—सक्रि १ पसत करणें, समति–मान्यता–कबुली परवानगी—देणें 'पडता वानराचें अनुमोदन। स्वयें पुसे रघुनंदन।' २ वाहवा करणें, प्रशसणें ३ चित्त, लक्ष 'श्रवणीं पुण्यीं निजध्यास। आदरें धरावा दिवसेंदिवस। अनुमोदन देता कवेस। सर्व पापास क्षय होय॥' –शिली १ ६९ ४ सूचनेस दुजोरा 'बहुधा अनुमोदनाशिवाय सूचना (ठराव) विचारास घेत नाहींत, सभापतीनें सुचविलेल्या सूचनास अनुमोदनाची जरूरी नसते' –सभा ७१ ५ उत्सव, अनुष्ठान उपासना, समारभ, सागता 'माझ्या पर्वाचें अनुमोदन। करी करवी आपण।' –एभा ११ १२५५ (क्रि० करणें–घेणें–देणें–पडणें) [स अनु+मुद्=आनद पावणें]

**अनुमोदित**—वि पसत केलेलें वाखाणलेलें, स्तुति केलेलें, मान्यता दिलेलें, परवानगी दिलेलें

**अनुयान**—न १ अनुसरणें मागून जाणें, येणें २ (ल) निकाल, निर्णय परिणाम, शेवट, [स अनु+या=जाणें]

**अनुयायी**—वि १ अनुसरणारा, मागून येणारा, (ल) शिष्य, नोकर हुजऱ्या, अनुचर २ एखाद्या पक्षाचा पथाचा किंवा विशिष्ट मताचा उ० बौद्धानुयायी, टिळकानुयायी ३ मागून येणारें, मधून निपजणारें उद्भवणारें, परिणामाचें [स ]

**अनुयोगी**—वि पूर्वीचा, अगोदर येणारा, मूळचा, आरंभींचा, विषय, आधार, स्थान, उगम इ० होणारा, अधिकरणविषयक, प्रतियोगीच्या उलट उ० राजाचा चाकर, चोराचें नरक, आणि पापाचें फल यामध्यें राजा, चोर आणि पाप हे अनुयोगी व चाकर नरक आणि फल प्रतियोगी २ जोडणारा, संबद्ध [स अनु+युज्=जोडणें]

**अनुरक्त**—वि न १ इच्छायुक्त, अनुरागी, प्रेमबद्ध, विषयी, ससारी, प्रेम बसलें आहे असा, मन गुतलें आहे असा २ निष्ठावत, आसक्त, रत, परायण [स अनु+रञ्ज्=आनद पावणें]

**अनुरक्ति**—स्त्री प्रीति, आसक्ति, भक्ति आवड, इच्छा, निष्ठा, स्नेह [स]

**अनुरंजक**—वि करमणूक करणारा, मन वेधणारा, सतोष देणारा, सुखदायी [स]

**अनुरंजन**—न १ करमणूक, मनोरजन, विहरण, सतोष, मौज २ सुखावस्था, आनदवृत्ति [स]

**अनुरणन**—न १ प्रतिध्वनि, पडसाद २ वाद्य वाजविणें बद झाल्यानतर त्यातून काहीं वेळ घुमणारा, टिकणारा ध्वनि, आवा जाची धून ३ सतारीच्या जोडाच्या तारातून निघणारा ध्वनि किंवा कपन ४ (साहित्य) व्यग्यार्थ [स अनु+रण्=नाद करणें]

**अनुरत**—वि आसक्त, रत, अनुरक्त [अनु+रम्]

**अनुरति**—स्त्री अनुराग आसक्ति, प्रेम प्रीति [स अनु+रम्=आनद पावणें]

**अनुराग**—पु प्रेम, प्रीति, इच्छा निष्ठा अत करण वेधणें, विरागाच्या उलट 'हा अनुराग भोगिता। कुमुदिनी जाणें॥' —ज्ञा १ ६० [स अनु+रञ्ज्]

**अनुरागी**—वि प्रेमी, शोकी, आसक्त, इच्छा–प्रेम असलेला, प्रणयी, प्रीतियुक्त, ममताळु, स्नेहाळू [स अनु+रञ्ज्=आनद पावणें]

**अनुराधा**—स्त्री कातिवृत्तातील सत्तावीस नक्षत्रापैकीं १७ वें नक्षत्र, (राधा=विशाखा तदा अनुराधा म्हणजे या नक्षत्राच्या मागून येणारें नक्षत्र, याच चार तारे असतात) [स]

**अनुरूप**—वि १ जुळणारें शोभणारें, योग्य, यथायोग्य, साजणारें सयुक्तिक 'ही स्त्री या पुरुषास सव गुणानीं अनुरूप आहे' २ सदृश, सारखें, समान सामासशब्द–आज्ञानुरूप वा गानुरूप देशा नुरूप, सामर्थ्यानुरूप, योग्यतानुरूप —शब्द अनुसरून अन्वयें, यथावत् अनुरोधानें 'तुमची आज्ञा होईल तदनुरूप मी चालेन' [स]

**अनुरूपबाजू**—स्त्री (गणित) सरूप त्रिकोणाच्या समान कोनासमोरच्या बाजूना परस्परांशीं अनुरूप बाजू म्हणतात —महमा १५०

**अनुरोध**—पु १ बल गति धारण रोख लावून दिलेली दिशा, सरणी 'आर्ता प्रतीतीनें जा अनुरोधू। हा सत्यारि बाधू। कदा न शके॥'—एमा ११ ९६ २ मान्यता समति, अनुसधान मर्जी ३ हुकमत, वचन, आग्रह कल्याण जाणें, तावडींत सांप डणें 'नीपरावचनि अनुरोधें। निळिगें होतीं मोदमदें।'—एमा ३ ५९५ दुसऱ्या विभक्तीत नेहमीं उपयोग उ० नावेंत बसूनें म्हणजे नावेच्या अनुरोधानें निघून जाणें परतु निघून जाणें प्राप्त 'ज्याला शास्त्रज्ञान आहे त्याला तदनुरोधानें बोलावें लागतें, '—पृथ्वीच्या उतरतेपणाच्या अनुरोधानें उदक जातें' [स अनु+रुध्=प्रतिबध करणें]

**अनुरोधी**—वि अनुसरणारा, अनुरूप, यथायोग्य, अनुसरून असलेला, अनुकूल 'तो आळु नोहे अनुरोधी। बोल तया॥' —ज्ञा १५ ३३० [स]

**अनुर्वाच्य**—वि बोलता न येण्यासारखें, अवर्णनीय 'अनु र्वाच्य ज शब्दब्रह्म। स्वानदसुख।'—स्वादि १५ ३९ [स अ+निर्+वच्=सागणें अनिर्वाच्य अप]

**अनुलग्निस**—वि (गो) जबाबदार, सबधी [स अनु+लग्न]

**अनुलक्षून**—क्रिवि अवधान देऊन, लक्षात घेऊन, मन लावून, अवलोकन करून अनुसरून, उद्देशून [स अनु+लक्ष्]

**अनुलक्ष्य**—न लक्ष देऊन केलेली वागणूक आज्ञेनुसार, अनु करणपूर्वक, किंवा लक्ष देऊन केलेली गोष्ट, धारण, अनुवर्तन, अनुरोध पहा [स]

**अनुलेख**—पु (ज्योतिष) रेषेच्या दोन टोंकापासून पातळी वर दोन लब काढले तर त्याचे पाये साधून जी रेषा त्या पातळींत होते ती —सूर्य ८ (इ) प्रोजेक्शन

**अनुलेप-न**—पु १ माखणें, लेप देणें, उटण्यानें शरीरास चोपडणें (क्रिया) 'जयाचे निर्लेप अनुलेपु करी।'—ज्ञा ११ २२५ २ उटी, उटणाचें द्रव्य, लेप (पदार्थ) ३ माखलेली, चोपड लेली (लेप लावलेली स्थिति) [स अनु+लिप्=लेप देणें]

**अनुलोम**—वि योग्य क्रमानें उत्पन्न झालेला किंवा जन्मलेला (विशेषत सकरजातीविषयीं उपयोग), उच्च वर्णाचा ब्राह्मण क्षत्रियादि पुरुष व त्याहून खालच्या वर्णातील स्त्री यापासून झालेली सतति —क्रिवि. योग्यक्रमानें, व्यवस्थित पद्धतीनें, नैसर्गिक पद्धती प्रमाणें किंवा रीतीनें शिस्तवार २ (ल) अन्वय. 'अनुलोम प्रतिलोम। विवचना बाढेल दुर्गम। हें न करिता साध्य सुगम। आकळे तें वर्म सागत।'—एमा २४ ६०३ [स अनु+लोम=केस] ०ज–पु अनुलोम विवाहापासून झालेली सतति 'हीन वर्णाची ज नारी। उत्तम पुरुषाचा गर्भ धरी। ते अनुलोमज ससारी। शास्त्रकारी बोलिजे।'—एमा २० ३३ ०विलोम–वि नैसर्गिक पध्दतीनें व त्या विरुध्दहि असलेलें, योग्य क्रमानें असलेलें व नसलेलें उलटसुलट, इकडे तिकडे **अनुलोमविलोमश्लोक**–पु सुलटा किंवा उलटा वाचला असता सारखाच वाचला जाणारा श्लोक उ० सुरत बध 'या माता ममतामाया।'

**अनुलोम विवाह**—पु अनुलोम पद्धतीनें झालेलें लग्न, उच्च वर्णाचा पुरुष व कनिष्ठ वर्णाची स्त्री याचा विवाह [स अनु+लोम=केस]

**अनुवर्तणें**—सक्रि १ दुसऱ्याच्या मर्जीप्रमाणें वागणें, सेवा करणें २ एखाद्याच्या मागेमागें असणें चिकटून राहणें, धरून बसणें ३ एखाद्या परपरेंतील प्रत्येक वस्तूला, भागाला किंवा गोष्टीला लागू करणें, सबंध लावणें [स अनु+वृत्=असणें]

**अनुवर्तन**—न अनुकरण, अवलंबन, सेवा, चाकरी, अनुरूपत्व, मागून जाणें, अनुवृत्ति पहा [स अनु+वृत्]

**अनुवर्ती**—वि १ सेवा किंवा चाकरी करणारा, कामास किंवा उपयोगास येणारा २ आश्रय आधार देणारा ३ समाविष्ट अंगभूत असणारा ४ सबंध धरून असणारा ५ आज्ञांकित मताप्रमाणें वागणारा, मागोमाग येणारा [स अनु+वृत्=असणें]

**अनुवाअ**—पु (अन्वय अप) सबंध, सगर्ग 'चादिनयाचेनि अनुवाअें। हा मधुमालती कोमाअें।'–शिशु ६८७ [स अन्वय]

**अनुवाक्**—पु ऋग्वेदसूक्ताचा एक समुच्चय, सहिंतेच्या अध्यायातील पोटभाग, प्रकरण, परिच्छेद [स अनु+वच्=बोलणें]

**अनुवाद-वादन**—पु न १ (सभेमध्यें) दुसऱ्याचें बोलणें किंवा स्वत चें म्हणणें पुन पुन सांगणें किंवा मांडणें, पुन्हा स्पष्टीकरण, स्पष्टीकरणार्थ पुनरुक्ति २ एखाद्यावरचा शाबीत झालेला आरोप सर्वांस सांगून त्याला दिलेलें शासन पुन्हा सांगणें ३ दुसऱ्याचीं दुष्कृत्यें उघडकीस आणणें ४ द्विरुक्ति, वरचेवर तेंच सांगणें पुनरुक्ति, पाठ 'हेचि अनुवाद सदासर्वकाळ। करूनि गोपाळकाल्या सेवूं॥'–तुगा २४२ (ल) वर्णन करणें 'एका गुणानुवादु करितां। उपरति होऊनि चित्ता।'–ज्ञा २१७३ ५ (व्यापक) सवाद, सलाप भाषण 'दोहींचा अनुवाद परिसाव जे।' ६ (धर्म) प्रायश्चित्त घेतेवेळीं पातकाचा व प्रायश्चित्ताचा उच्चार करणें ७ (कायदा) सिद्ध करणें प्रस्थापित करणें (जुनी रीत, रिवाज वगैरे) ८ (ल) भाषांतर, नक्कल (ग्रथ, काव्य वगैरे) ९ (तत्त्व) 'अर्थ न वेदांतील वर्णन वस्तुस्थितीस धरून असेल तर त्यास अनुवाद म्हणतात'–गीर ११ १० दुजोरा [स अनु+वद्=बोलणें]

**अनुवादक-अनुवादी**—पु १ अनुवाद करणारा २ भाषांतर, नकल करणारा ३ प्रायश्चित्त घतेवेळीं, प्रायश्चित्त घेणाऱ्याच्या पातकाचा उच्चार करणारा (सस्कारकौस्तुभ) –वि (सगीत) रागांतील वादी, सवादी सोडून बाकीचे स्वर [स]

**अनुवादणें**—क्रि १ पुन्हा पुन्हा सांगणें, म्हणणें, पाठ करणें, घोकपट्टी करणें 'त्याचें नाम व्यर्थ वारकर। जैसें कीर अनुवादति।' २ बोलणें, सांगणें 'तें दु ख मना वाचेसीं। अनुवादव ना।'–शिशु १०२, 'ना स्वयें सर्वेश्वरू। प्रत्यक्ष अनुवादला॥'–ज्ञा १७२ 'ऐसी शूर्पणखा अनुवादली'–रावि १४१३७ ३ स्पष्ट करणें, 'ऐसें बहुधा निरोपिलें। अधर्मी नें बोलिलें। तें अवघेंचि अनुवादलें। न वचे किं करां।'–दा ११११ [स]

**अनुवास**—पु १ उटणें २ सुवासित करण्याची क्रिया ३ (वैद्यक) तैलवस्ति [स अनु+वास]

**अनुवाळी**—अनवाळ पहा

**अनुवृत्त**—वि १ सबद्ध, निगडित, अनुयायी ०दर्शन–न नृत्यामध्यें एकादा पदार्थ निरखून पहाण्याचा अभिनय (नृत्य) [स अनु+वृत्]

**अनुवृत्ति**—स्त्री १ परंपरेनें चालत आलेला सबध, क्रम, मालिका राग 'याचे सातव्या पुरुषानें यज्ञनीला चेतनी होती ती दीक्षित घराची अनुवृत्ति सात पिढया चालत आली' 'अर्जुना इया परी। मिथ्याग्नीच्या घरीं। गुणानुवृत्तीची करी। चोन पाडले।'–ज्ञा १४ ११३ २ सेवा चाकरी, आज्ञापालन, शुश्रूषा 'आम्ही राजाची अनु० करून असतों' ३ साहचर्य 'अलंकाराचे ठायीं सुवर्णाची अ० आहे तमीच जगाचे ठायीं सद्रूपें करून ब्रह्माची अ० आहे' ४ अनुकरण, नक्कल ५ समति ६ (व्याक) पूर्वगामी नियमाचा प्रभाव चालू नियमावर चालू राहणें 'आरंभ श्लोकात राजपद असतें त्याची अ० पुढील सर्व श्लोकांत होते' ०पंथ–पु सुषुम्ना नाडी 'मग अनुवृत्तिपंथें आणावा। मूर्ध्नीवरी।'–ज्ञा ८ ११४. [स]

**अनुवेल-ळ**—क्रिवि पुन पुन्हा, वारंवार, फिरफिरून, अनेक वार [स अनु+वेला]

**अनुव्यवसाय**—पु प्रबोध, भान, सारासार विचार, चैतन्य, जाणीव [स अनु+व्यवसाय]

**अनुशासणें**—सक्रि १ नियमित, परिमित करणें, बदोबस्त ठेवणें, राज्यकारभार चालविणें, कायद्यानें नियमानें बांधून टाकणें २ विवरण विवेचन, उहापोह करणें [स अनु+शास्=नियमन करणें]

**अनुशासन**—न १ आज्ञा, २ कायदा, नियम ठराव, ३ निश्चित, मर्यादित, सुयंत्रित करण्याचा व्यापार ४ व्यवहारशास्त्र ५ अनुष्ठान 'मग मांडिलें अनुशासन। आणि हराचें करी चिंतन।'–कथा ४१३२८ [स]

**अनुशास्ता**—पु १ अनुशासन, नियमन करणारा, राज्य चालविणारा, बदोबस्त राखणारा, कारभारी, शिक्षा करणारा, नियंता २ उपदेश करणारा [स]

**अनुशीलन**—न १ परिशीलन, चिंतन, हव्यास, आसक्ति, अनुरक्ति पाठीस लागणें पाठपुरावा सराव, अभ्यास २ एकनिष्ठ सेवा [स अनु+शील]

**अनुशेपोट**—न (सनदात) अनशेवें पोट पहा

**अनुश्रुत**—वि परंपराप्राप्त, पूर्वापार चालत आलेलें 'श्रुनुश्रुत हे मारादिक। कृपाभीक स्वामीची।'–तुगा २१३२ [स अनु+श्रु=ऐकणें]

**अनुषंग**—पु १ संगति, भागीदारी, संसर्ग, सोबत, साहचर्य, सख्य, निकट समागम, संबंध 'सोधाचे अनुषंगानें भलें फसतो ' २ आश्रय ३ मिश्रण, जोड, मिलाफ 'ताकाचे अनुषंगानें दुधाचें दहीं होतें ' ४ एक अलंकार–एका क्रियेपासून अनेक कार्यसिद्धी झाल्याचें वर्णन जेथें असतें तेथें हा अलंकार साधतो, उ० छळी भूप बळी बळी तरिच तो नसे आटला ।' –केका ७६ [स अनु+सग]

**अनुषंगिक**—वि संबंधी, बरोबरचा, आनुषंगिक पहा

**अनुष्ट**—वि उष्टे न केलेलें, (अन्न, पाणी वगैरे), अनुच्छिष्ट पहा

**अनुष्टुप-च-भ**—पु चार चरण, आठ अक्षरें, लघु गुरु अनिश्चित असा एक छंद उ० 'मातेंचि मानुनी थोर । कर्मे सर्व समर्पिती । तरी अद्वैतयोगेंचि । मातें ध्याती उपासती ।' –वामन –गीस १२ ६ –न (वैदिक छंदात याच्या चरणात अक्षरें सर्वांत कमी असल्यामुळें लाक्षणिक अर्थानें ) अल्पत्व, अल्पराशि, थेंब, संक्षेप 'केवळ अनुष्टुप निर्वळ । ऐसें दिसे पाडवदळ ।' –जै ४२ ३० 'या तुमच्या कोंकणात तुपाचें अनुष्टुप दिसतें ' [स अनु+स्तुप्?]

**अनुष्ठणें**—क्रि १ विधिपूर्वक आचरण करणें 'म्हणोनि आपुलियापरी । शास्त्र अनुष्ठिनी कुमरी ।' –ज्ञा १७ ९२ २ अनुष्ठान करणें 'जियें कर्मी हा प्रयोगु । अनुष्ठिने सत्विनियोगु । तेथ अनुष्ठिला सागु । वेदुचि जाणा ।' –ज्ञा १७ ४१३ ३ करणें, संपादणें, साधणें, सिद्ध करणें, शेवटास नेणें, पार पाडणें (धंदा, उद्योग इ०) 'अन्योक्तीनें प्रसगीं चतुरा । धातुरें काज सागे अतुरा । त्यावरी अभिमान ये घोरा । कार्य अनुष्ठील ते ।' –मुआदि ४ ६५ [अनु+स्था]

**अनुष्ठाता**—वि अनुष्ठान करणारा

**अनुष्ठान**—न १ विधिपूर्वक धर्मकृत्य, कर्म याचें आचरण म्ह० यथा अनुष्ठान तथा सिद्धि 'म्हणोनि स्वधर्मानुष्ठान । ते अखंड यज्ञयाजन । जो करी तया बंधन । कहींच नाहीं ।' –ज्ञा ३ ८३ २ देवाप्रीत्यर्थ अभिषेक, पूजा, पाठ, होम हवन, दान धर्म वगैरे कर्म ३ (ल) मोठ्या परिश्रमाचें काम, महत्त्वाचें अवघड कृत्य ४ (सामान्यत) संपादणी, आचरण, करणें, पार पाडणें (क्रि० करणें, चालविणें, बनावणें, मांडणें) ०पद्धति–स्त्री (स्त्री) धार्मिक विधि यथासांग करण्याची पद्धति (इ) आर्डर ऑफ ॲडमिनिस्ट्रेशन प्रभूचें भोजन म्हणून पवित्र सहभागिता इत्यी अनुष्ठान पद्धति ।' –साप्र ९० ९८ १०७ १२४ ०प्रसंग–पु अनुष्ठानकर्म या गावात कोणाच्याहि घरीं अनुष्ठान प्रसंग झाला असता दीक्षितास आमंत्रण येतें ' [अनु+स्था]

**अनुष्ठानी**—वि १ अनुष्ठान करणारा 'जैसें अनुष्ठानिजें लोचनु । तें वाचवेजा श्रीरत्नु । करितांति धारी तर्पणु । मदन लिंगानी ।' –शिशु ८४९ २ अनुष्ठानामध्यें कुशल, निपुण, यजमानाचें अनुष्ठान चालविणारा, अनुष्ठान–प्रतिनिधि [स]

**अनुष्ठित**—वि केलेलें, बजावलेलें, उरकलेलें, आचरलेलें, अनुष्ठिलेलें, साधलेलें [स]

**अनुष्ठेय**—वि अनुष्ठान करण्यास योग्य, करणीय, करण्याजोगें, आचरणीय, बनावण्यास योग्य 'हेंचि नित्यनैमित्तिक । अनुष्ठेय आवश्यक ।' –ज्ञा १८ ११९ [स]

**अनुसंग**—(विप्र) अनुषंग पहा 'तू अनुसंगाचा ठावो ।' –ज्ञा ४ ३० [स अनुषंग]

**अनुसट**—वि मोकळा, अनष्ट पहा 'पुनपुन संग्राम केला । तिनपुन अनुसट राहिला । आतां माझा युद्धसोहळा । दुरून पाहे स्वामिया ।' –जै ४१०१ [स अनुच्छिष्ट]

**अनुसंधान**—न १ जोडणी, जुळणी, मांडणी, संगति, संगतवार जुळविणें–जोडणें–व्यवस्थित लावणें, (मुद्दा, विषय, अनुक्रम इ०) २ लक्ष, अवधान, चित्त, ध्यान 'कृष्ण चरणीं जडलें मन । यालागीं वाचे पडलें मौन । दृढ लागलें अनुसंधान । सहज-स्थिति चालली ।' –एरुस्व ६ ६७ ३ हेतु, ध्येय, बेत, योजना, लागाबांधा, वळण, वशिला, मसलत, धोरण, युक्ति (क्रि० बांधणें, लावणें) 'मुख्य जागीं दाद लागायानें मी अनुसंधान बांधून ठेवें आहे ' 'त्याचें अनुसंधान कोणास कळत नाहीं ' ४ कथेतील आख्यान 'आज गोसाव्यानें (हरिदासानें) हरिश्चंद्राचें अनुसंधान लाविलें होतें ' 'अवघें पोटासाठीं सोंग । तेथें कैंचा पांडुरंग । लावी अनुसंधान । कांहीं देईल म्हणवून ।' –तुगा २८८३ ५ जम, मेळ, समन्वय, मिलाफ, आनुकूल्य ६ (कधीं कधीं) अनुरोध या अर्थी ७ प्रस्ताव, प्रस्तावना, प्रवेश ८ चौकशी, शोध, मागोवा ९ क्रमप्राप्त गोष्ट, ओघानें आलेली गोष्ट 'यानें शिवी दिली तव्हां याच्या तोंडात मारावी हें अनुसंधान आलें ' [स]

**अनुसंधानी**—वि १ मसलत करण्यात धूर्त, युक्त्या, बेत योजण्यात हुशार मोठा हिकमती शक्कल लढविणारा २ आख्यान लावणारा (हरिदास) ३ (नुसत्या वासावरून) मार्ग काढणारा, सुगावा लावणारा, परानरुचि, परपाकरुचि [स]

**अनुसपाटी**—(क) अनरावें पोटीं पहा

**अनुसरण**—न १ अनुकरण अनुवर्तन, मागोमाग जाणें, सदृश आचरण, नक्कल करणें 'अनावडीचा वर्षावो । तेणें लुगवे अनुसरला भावो ।' –ज्ञाप्र २४३ २ अंगीकार

**अनुसरणें**—क्रि १ अनुकरण करणें, सदृश आचरण ठेवणें, अनुलक्षून वागणें २ अनुकूल होणें, संमत होणें, मिलाफ करणें, जुळणें, जमणें ३ मताचा स्वीकार करणें, अनुयायी होणें, वश होणें ४ स्मरणें, भजणें 'नारायण भय येऊ नेदी गावा । तुका म्हणे नावा अनुसरे त्या ।' –तुगा ८३ ५ अनुरक्त होणें अधीन होणें, वरणें,

दाको. १ ११

' योजनगंधा मुनिला जसि गंगा रत्नराशि अनुसरली ।' –मोआदि ८३७ [स अनु+सृ]

**अनुसार**—वि प्रमाणें, सारखा, सदृश, अनुरूप, जुळणारा, सामासशब्द– आज्ञेनुसार वर्तन, पापानुसार क्लेश, श्रमानुसार लाभ, कालानुसार, योग्यतेनुसार, इ० 'तुम्ही बोलाल तदनुसार मी वर्तेन ' 'औषधानुसार गुण आहे ' यानेरीज कसेतरी बनलेले व्यापक अर्थाचे अनेक सामासशब्द आढळतात जसें, कामानुसार, काळानुसार, देशानुसार, छंदानुसार, अन्नानुसार बुद्धि, बुद्धिनुसार, मर्जीनुसार, वेळेनुसार इ० 'कामानुसार माणसाची गरज लागते ' म्ह० अन्नानुसार बुद्धि=ज्याचें अन्न खातो त्याप्रमाणें वागतो –पु. १ अनुसरण, अनुवर्तन, सारखें वागणें २ क्रम, सरणी, मार्ग 'जो दाविला तुम्हीं अनुसारा । तो पडल्याहूनि पाय उतारा । सोडपा जैसा ।' –ज्ञा ५.११७ –अ धोरणानें, क्रमानें, अनुरूप [सं ]

**अनुसारी**—वि अनुसरणारा, मागोमाग जाणारा, अनुकरण करणारा, आज्ञेप्रमाणे वर्तणारा, योग्य जमणारा, अनुसार पहा

**अनुसृष्ट**—अनसृष्ट पहा

**अनुसृत**—वि मागें गेलेला, अनुसरलेला, अनुयायी झालेला, प्रमाणें वागलेला [स ]

**अनुस्तरणी**—स्त्री (मूळ वैदिक अर्थ सूनकाळीं अग्निहोत्र्याच्या उत्तरक्रियेंत गाय मारून तिची वपा काढून तिनें अग्निहोत्र्याच्या प्रेताचें अच्छादन करीत त्या गाईस वैतरणी म्हणत ) हल्लीं उत्तरक्रियेंत वैतरणी तरावयासाठीं देण्यात येणारी गाय –आश्वगृ ४ [स ]

**अनुस्फटिक**—वि स्फटिकमय (इ ) क्रिस्टलॉईड [स ]

**अनुस्यूत**—वि नियमितपणें, अखंडित जाणारा, अत्रुटित (उपभोग, कारभार, वृत्ति, इ०), सरळ व न अडखळणाऱ्या गतीचा, एकसारखा, व्यापक 'सत्ता अनुस्यूत अबाधिति।' –रयोवा १ ८१ [स ] ०पण–न अखंडितपण, सतत स्थिति, व्याप्ति, एकसारखेपणा 'गंधा पासोनि पृथ्वी कठिण । उपजली आपीं आपण । वेगवेगळें अनुस्यूतपण । सर्वथा जाण मोडेना ।' –एभा २४ १२५.

**अनुस्यूति**—स्त्री अखंड गति, अनुस्यूतपण पहा 'वेगळाल्या भूतीं । जयाचिये अनुस्यूति ।' –ज्ञा १३ ११६ [स ]

**अनुस्वार**—पु. १ श, ष, स, ह या अक्षराच्या पूर्वीच्या अक्षरावरील नाकातून उच्चार दर्शविण्याकरिता योजावयाचें चिन्ह. २ पुढें कोणतेंहि व्यंजन असून त्यापूर्वी ङ्, ञ्, ण्, न्, म् यापैकीं कोणतेंहि व्यंजन उच्चारावयाचें असलें म्हणजे येणारें अक्षरावरील चिन्ह ३ नाकातून होणारा उच्चार व त्याचा प्रतीक शीर्षबिंदु [स ]

**अनुह(हा)त–गजर–ध्वनि–चक्र**—अनाहत गजर–ध्वनि–चक्र पहा 'अनुहताचा हरड गाजी ।' –ज्ञा १२ ७ 'जैसा अनुहताचा गजर । उमी तुरें वाजती अपार ।' –एरुस्व ६ ७२. 'जाति स्वर रागें जाणें टिरिरिया घाई । अनुहत वाय मादळा रे ॥' –तुगा २४६

**अनुक्षणीं**—क्रिवि क्षणोक्षणीं, प्रत्येक क्षणीं 'आनंदाब्धि तुम्हांसीं भरल्गे यास्तव कृपाईक्षणीं ।' –आर्या ११ १८. [स. अनु+क्षण]

**अनुक्षेत्र**—न लहान क्षेत्र, किंवा महत् (काशी आदि) क्षेत्र सदृश–पंढरपूर ०पाळ–पंढरपूरचा विठोबा 'धन्य वेणुनाद अनुक्षेत्र पाळा ।' [स अनु+क्षेत्र]

**अनुज्ञा**—स्त्री १ आज्ञा, हुकूम, परवानगी, संमति 'वरवडले जयाचिया । अनुज्ञा का ।' –अमृ २ १७ २ एक अलंकार, दोषात काहीं एक गुण आहे या बुद्धीनें केलेली दोष देण्याविषयींची प्रार्थना. 'तुझा म्हणे गर्भवासी । सुखें घालावें आम्हासी ।' –तुगा ११९३ 'प्रसाद करणें मनीं जरि नसेल हें आवरा ।' –केका १४. [सं अनु+ज्ञा]

**अनुज्ञात**—वि आज्ञापित, हुकूम केलेलें, संमत, विहित [स]

**अनुज्ञापक**—वि शिफारस करणारें, परवानगी देणारें, (इ ) रेकमेंडेटरी (स )

**अनूढ–ढा**—वि अविवाहित [स अन्+वह्–ऊढ]

**अनूप**—वि निरुपम, असाधारण, अलौकिक, विलक्षण, चमत्कारिक, असामान्य, नवलाईचें, आश्चर्यकारक –प–(शाप) मार्श ग्यास, अनूपवायु पहा [म ]–पु एक देश, जावळी, वेत, ताड, केळ, वेळू इत्यादिकांनीं युक्त असा खोल प्रदेश यात डोंगर झाडी फार असून फार पाऊस आणि (कफजन्य) रोग होतात –योर १ १२८, –अभप २ ७ ०वायु–पु (इ ) मार्श ग्यास, हा कर्बाचा एक परमाणु उज्जाच्या जास्तींत जास्त चार परमाणूशीं संयोग पावून बनतो. सेंद्रियरसायनशास्त्रात यास मधुन (मिथेन) असेंहि म्हणतात, दलदलवायु मथिल, उदिद अशींहि नावें आहेत दलदलीच्या जागेंतील कुजलेल्या पाण्यातून व इतर पदार्थांतून हा निघतो याच्यामुळें खाणीमध्यें भयंकर स्फोट होतात –ज्ञाको(क) १२८.

**अनूराधा**—अनुराधा पहा

**अनृण–णी**—वि कर्ज, रीण नसलेला, ऋणमुक्त [स.]

**अनृत**—न लबाडी, खोटेपणा, असत्यता –वि खोटें, लबाड, अतथ्य (मापण व० ) [सं अन्+ऋत=सत्य]

**अनृत्य**—अनृत पहा 'द्वेषवचनी अनृत्यवचनी । बाष्कळ वचनी धिक्कार ।' –दा २ ३ २२.

**अनेक**—वि एकापेक्षा अधिक, काहीं, पुष्कळ, सामासशब्द– अनेकविध, अनेकसत्ताक, अनेकवार ०चर–वि सघानें राहणारा,

सधचर, समूहचर (एकचर याच्या उलट) ०छिद्रधारी–वि (प्राणि) शरीरावर अनेक छिद्रें असलेला, (इ) पोरिफेरा ०जिह्व–वि पुष्कळ जिभा असलेला (ल) खोटें बोलणारा, बोलणें बदलणारा ०त्र–अ अनेक ठिकाणीं ०धा–विधा–अ पुष्कळ रीतींनीं, प्रकारें ०मातृक–वि पुष्कळ आया असलेला ०वचन–न १ ज्यावरून अनेक वस्तूंचा बोध होतो तें, बहुवचन २ नामाचें भिन्न निराळ्या विभक्तिमधील बहुत्वावबोधक व क्रियापदाचें त्याच्या पुरुष आणि काळ यामधील बहुत्वावबोधक कर्तादि रूप ३ बहुवचनातील शब्द ०वर्णसमीकरण–न (बीजग) दोन किंवा अधिक राशी अव्यक्त असताना गाडावयाचें समीकरण ०वादी–वि पाखंडीमताचा ०वार–अ पुष्कळ वेळा, वारंवार, नेहमीं, सतत ०शः–अ पुष्कळ प्रकारें [स]

**अनेग**—अनेक पहा 'जो स्वयें होय अवघें जग। त्यासि लागता उपद्रव अनेग।' –एभा २३ ५३ 'धानिलामी लागवेगें। वर्षे पुरविती अनेगें॥' –देवसत १३

**अनेगा**—स्त्री (प्र) आण, आणेगा पहा 'रागसमयीं त्याची आहे मज अनेगा।' –पला १८९९ 'महार लोकांना डुक्कर खाण्याची अनेगा आहे'

**अनेळी**—वि (कों) गुळाची एक जात, (एका विशिष्ट पध्दतीनें बनविलेला गुळाचा प्रकार, या गुळाचा उपयोग औषधात व काहीं दुखण्यात करण्यात येतो)

**अनैकमत्य**—न मतभिन्नता, (ऐकमत्याच्या उलट) [स]

**अनैक्य**—न १ फरक, भिन्नत्व, एकत्वाभाव २ एकी नसणें, वैमनस्य, बनाव, बिघाड, वाकडें ३ द्वैत अर्थ, वचन किंवा संदर्भ, यामधील विरोध, तफावत [स]

**अनोठा**—वि, नवीन, विलक्षण असामान्य, चमत्कारिक 'त्याणें आन दोन राग अनोठे गायले' [अ+ठाव किंवा स अ+उत्=ऊर्ध्व, प्रा अन्+उठ्ठ, हिं अनोठा]

**अनोपत**—न आपत्ति, अनुपत अनुपपत्ति पहा

**अनोल**—अनवल पहा

**अनोल**—वि (खा) अळणी 'अनोल आहाद खायान गुन ल्ह्‌द यीन' =अळण औषध खाल्ल्यानें गुण लवकर येईल [स अलवण वर्णविपर्यास]

**अनोघोन्य**—अन्योन्य पहा

**अनोदरी-श्या-पोरीं**—अनदरी पोरीं पहा

**अनोळख**—वि १ ओळख नसणारा नवा अपरिचित २ कृतघ्न (उपकार) न जाणणारा 'दुष्ट दुरात्मे अनोळख।' –एभा २९ ३७५ [अ+ओळख] ०पण–न परकेपणा, अपरिचितपणा 'तया आघवयाचेंचि फिटलें। अनोळखपण॥' –ज्ञा १० १६३

**अनोळखी**–अनवळखी—वि १ न ओळखीचा, न ओळखणारा, नवखा २ बिन माहितीचा, गैरमाहित, ठाऊक नसलेला (इसम, गाव, लोक, वस्तु इ)

**अनौचित्य**—न उचितपणा नसणें, अयुक्तपणा, अयोग्यपणा, गैरशिस्तपणा, चुकी [अ+औचित्य]

**अनौति**—वि दुसरा, आनौति पहा

**अनौरस**—वि औरस नसलेली, विवाहसंबंधापासून न झालेली, जारज, अनौरसी ०ता–स्त्री जारजता, अविधिजन्म ०संतति–स्त्री (कायदा) ज्यांचा कायदेशीर रीतीनें विवाह झालेला नाहीं अशा स्त्रीपुरुषांची संतति [स]

**अन्करीब**—क्रिवि १ जवळ, 'फिल्हाल मळूल हत्तीचे रोज अ० येऊन पोहचतील' –पया ३८४ २ लौकरच 'खर्चाचा मजकूर तर खर्चासही येथून अन्करीब पाठवीत असो' –सावंतवाडी संस्थानचा इतिहास [अर अन्करीब्]

**अन्न**—वि (अन्य अप), दुसरा–रें 'देवाचाचूनि नेणे अन।' –दा १४ ५ ३० [स अन्य]

**अन्न**—न १ धान्य वगैरेंचा तयार केलेला खाण्याचा पदार्थ, (विशेषत भात, भाकरी, भाजी, पक्वानें वगैरे नेहमींच्या खाण्यातील जिनस), आहार, भक्ष्य, भोज्य 'मृत्यूचें आघवेंचि अन।' –ज्ञा १८ ५६३. म्ह० १ अन्नासारखा लाभ (नाहीं) मरणासारखी हानि (नाहीं) २ अन्न तारी, अन्न मारी, अन्नासारखा नाहीं वैरी ३ अन्नाची वाण, शरीराची घाण २ (सामान्यत) धान्य ३ चरितार्थाचें साधन (रोजगार, नोकरी) ४ पक्वान्न, जेवण्याचा पदार्थ 'विचित्र अन्नें वाढिलीं पात्रीं।' ०अंगीं लागणें–पचणें, कामीं येणें, उपयोगी पडणें 'त्याचें अन्न अंगीं लागत नाहीं' =केलेल्या कर्मापासून किंवा संपादलेल्या वस्तूपासून काहीं लाभ होत नाहीं ०अन्न करणें–करीत फिरणें–अन्नाकरिता भिक्षा मागणें, दारोदार फिरणें 'तुकयाची जेष्ठ कांता। मेली अन्न अन्न करता।' ०कडे–कांठास ठेवणें–भुकेच्या अदाजाप्रमाणें ताटात अन्न वाढून घेतल्यानंतर जरूरी लागल्यास घेता यावें म्हणून बाजूस काढून ठेवणें ०चारणें–खाऊ घालणें, जेवू घालणें, पोसणें ०जाणें–भूक असणें, अन्न पचणें, तोंडाला चव असणें. ०परब्रह्म–न अन्न हेंच परब्रह्म, (ल) अन्नाशिवाय दुसरें काहीं महत्वाचें नाहीं (असा माणूस) खादाड ०पाणी तुटणें–राहणें, अन्नावर वासना नसणें तोंडास चव नसणें, भूक कमी होणें ०पाणी सोडणें–अन्न न खाणें, अन्नपाणी टाकणें, उपाशी राहणें ०च खोबरें बरोबर असणें–श्रीमंत पण कद्रुप माणसाला लवितात अन्नावर अन्न, वस्त्रावर वस्त्र–अन्न जिरलें नाहीं तोंच पुन्हा अन्न सेवन करणें व एकाच्या ठिकाणीं अनेक वस्त्रें पेहेरणें (केव्हाहि अहितकारक आहे, यावरून कोणतीहि वस्तु चागली असली तरी

मितपणा सोडून एकसारखें अधिक सेवन करू नये ) **—आड येणें, —वर उठणें**—एखाद्याच्या उदरनिर्वाहाच्या साधनास व्यत्यय आणणें किंवा तें साधन नाहींसें करणें, पोटावर पाय आणणें **—चा, अन्नानें पोसलेला-वाढलेला**—'दास म्हणे तुझ्या अन्नाचा वाढलों साचा ।'—दावि १७ **—चा मारलेला खालीं पाही**—(तरवारीचा मारलेला वर पाही)=अन्न खाऊ घातल्यास तो नेहमीं आपल्याशीं नम्र आज्ञाधारक राहतो, परंतु मनुष्यावर प्रहार केल्यास तो उलट प्रतिकार करण्यासाठीं मगरूरपणें टवकारून वर पाहूं लागतो (ल ) दयेनें, सौम्यतेनें माणूस जिंकला जातो, कठोरतेनें मनुष्य शत्रु बनतो **—चा किडा**—पु १ खादाड, २ सुस्त खाऊन स्वस्थ बसणारा इसम, वृद्ध इसम किंवा लहान मूल **०चा पिंड**—१ पोषणाची योग्य काळजी घेऊन वाढविलेला ( इसम-प्राणी ), आश्रित पोष्य, पोसणा २ अन्न बंद केलें असतां तावडतोब मरणारा-म्हातारा, लहान मूल अन्नाचा किडा **०ची क्रिया**—स्त्री १ एखाद्याचें अन्न खाल्ल्यामुळें भासणारें त्याबद्दलचें कर्तव्यकर्म, उपकार ( क्रि० टाकणें, धरणें, सोडणें ) २ शपथ, भाक ( क्रि० करणें ) **—ची लाज धरणें**—खाल्लेल्या अन्नाबद्दल उतराई होणें, कृतज्ञता वाटणें **—चें खोबरें होणें**—अन्नाची वाण किंवा दुष्काळ होणें-पडणें, ( ज्या देशांत खोबरें फार कमी व महाग तेथील लोकांच्या तोंडांत असलेली म्हण ) **—चे पाठीं लागणें**—निर्वाहाच्या साधनाच्या मागें लागणें, नोकरी पहाणें-करणें **—चें पाणी करणें-होणें**—अन्नातील पौष्टिकपणाचा व चवीचा नाश करणें, होणें, अन्न निःसत्व व बेचव करणें, (खाण्याच्या वेळीं काहींतरी अभद्र, अनिष्ट किंवा भीतिप्रद बोलल्यामुळें) **—च्या गारगोट्या**—(गारगोट्यासारखें थंड झालेलें) अगदीं निवालेलें अन्न **—त माती कालविणें-घालणें**—एखाद्याच्या निर्वाहाच्या साधनाचा नाश किंवा बिघाड करणें, पोटावर पाय आणणें, अन्नाआड येणें नोकरी घालविणें **—त माशी पडणें**—माशी अन्नाबरोबर पोटांत गेली असतां अन्न ओकून पडतें त्यावरून-अगदीं सिद्ध होत असलेल्या कामांत अवचित काहीं अनिष्ट गोष्ट घडून कार्यनाश होणें 'त्यागमति असी कोठुनि आली या भोजनांत हे माशी ।'—मोआश्रम ३ २९ **—मुळें वाळणें**—अन्नाच्या अभावामुळें रोड किंवा कृश होणें, खंगणें **—वर वाढणें**—आश्रयावर लहानाचें मोठें होणें 'पेशव्याच्या अन्नावर वाढलेलीं व पेशव्यामुळें नावारूपास आलेलीं शेकडों घराणीं जेथें हयात आहेत तेथें पेशव्याचा शेवटला वंश वरसोर ठरतो तरी आम्हांस बिलकुल पर्वा नाहीं '—टि ४ १७९ **—स जागणें**—( पोटाचा ) कृतज्ञ राहणें, ऋणी असणें, उपकार स्मरून उतराई होणें **—स महाग-मोताद**—अत्यंत दरिद्री, कंगाल नेहमींच्या सामान्य गरजांची वाण असलेला, बुभुक्षित **—स लावणें-अन्न लावणें**—निर्वाहाचें साधन मिळवून देणें, काम, उद्योग, धंदा देणें

**अन्नई**—स्त्री ( व ) लोखंडी अगर पितळी ताट ठेवण्याची तिवई [ स अन्न+वाही ? ]

**अन्नकूट**—पु बलिप्रतिपदेच्या दिवशीं गोवर्धनादि देवापुढें ठेवण्याचा अनेक प्रकारच्या अन्नाचा ढीग [ स ]

**अन्नकोश**—पु शरीर, अन्नमयकोश पहा [ स ]

**अन्नगुरु**—पु १ खादाड २ अन्नाचा किडा –पिंड [अन्न+गुरु]

**अन्नछत्र**—अन्नसत्र पहा 'नागवुनि यात्रा समग्र। अन्नछत्र घातलें ॥' [ स अन्न+सत्र ]

**अन्नत्याग**—पु प्रायोपवेशन, अन्न वर्ज्य करणें [ स ]

**अन्नदाता**—पु अन्न देणारा, जेवूं घालणारा, पोषण करणारा, यजमान 'अन्नदाता सुखी भव=अन्नदात्याचें कल्याण होवो ।'[ स ]

**अन्नदान**—न अन्नसंतर्पण, जेवूं घालणें, भोजन देणें [ स ]

**अन्नदेवता**—स्त्री १ खाद्य पदार्थादि उपजीविकेच्या वस्तूंवर अधिष्ठित असलेली देवता, अन्न देणारी देवता, प्रयोजन, जेवणावळ वगैरे प्रसंगीं हिची आराधना करतात २ ( देवतातुल्य ) अन्न, धान्य [ स ]

**अन्नद्वेष**—पु १ अन्नाचा वीट, तिटकारा, कंटाळा, असें होणारा विकार [ स ]

**अन्ननलिका**—स्त्री अन्नमार्ग पहा

**अन्नपचन**—न अन्न पचणें, जिरणें, अन्नपरिपाक (अपचनाच्या उलट) [ स ]

**अन्नपाणी**—न १ अन्न आणि पाणी २ जीविताला आवश्यक असलेल्या वस्तू, निर्वाह-साधनें 'अन्नपाणी तोची देतो। प्रेमें सर्वां सांभाळीतो ॥' [ स अन्न+ म पाणी ]

**अन्नपान**—न ( विप्र ) अन्नप्राशन [ स ]

**अन्नपूर्णा**—स्त्री १ दुर्गा, पार्वती, भवानी अन्नदात्री, अन्नाधिष्ठित देवता, समृद्धि देवता २ ( ल ) जिच्या हातचा स्वैंपाक-अन्न पुरवठ्यास येतें अशी बाई, स्वयंपाकीण ३ ( उप ) भिक्षेची, मधुकरीची झोळी [ स ]

**अन्नपूर्णी**—स्त्री काशीकडील पाणी पिण्याचें भांडें (काशीच्या अन्नपूर्णा देवीच्या नांवावरून ) **०येणें**—अन्नास पुरवठा येणें

**अन्नप्राशन**—न लहान मुलास प्रथम अन्न खाऊ घालण्याचा उठावणाचा विधि ( सोळा संस्कारांपैकीं एक ) 'गर्भाधान, पुंसवन। जातकर्म अन्नप्राशन। हीं समस्त कर्मे पूर्वीं जाण। केलीं संपूर्ण चौलांत ॥'—एभा १७ २७० [ स ]

**अन्नब्रह्म**—न अन्न हेंच ब्रह्म, अन्नपरब्रह्म पहा 'अन्नब्रह्मातें आळकारणें, —दावि ३११ [ स ]

**अन्नभूली**—स्त्री अन्नद्वेष 'नियतच तुज आली हे असे अन्नभूली ।'—सादद २ ६० [ अन्न+भूली ]

**अन्नमय**—वि अन्नापासून-नें बनलेलें, अन्नावर अवलंबून असणारें ( प्राण, देह, इंद्रियें इ ) 'कलियुगीं अन्नमय प्राण। ऐसें बोलती सज्जन ॥'. 'अन्नमय प्राण, प्राणमय पराक्रम '=अन्न मिळाल्यास प्राण राहतो व प्राण राहिल्यास पराक्रम शक्य होतो [ स ]

**अन्नमयकोश**—पु चैतन्याचें आवरण असलेल्या पांच कोशां पैकीं पहिला , स्थूल देह ( कारण हा देह अन्नापासून बनलेला असतो ) पंचकोश पहा [ स ]

**अन्नमार्ग**—पु तोंड आणि पक्वाशय यांच्यामध्यें एक लांब नळी असते ती, अन्ननलिका, ही नलिका स्नायूंची असून सुमारें नऊ इंच लांब असते [ स ]

**अन्नमोद**—पु १ अन्नपचन २ भुकेचें समाधान, तृप्तता अन्नासंबंधीं आराामोद [ स अन्न+मोद ]

**अन्नरस**—पु १ अन्नाचें पचन होऊन झालेला रस २ अन्नाश 'रोग्याच्या पोटांत कांहीं करून अन्नरस जाईल कर म्हणजे धडाया येईल ' ३ खाणें, आहार, भक्ष्य [ स ]

**अन्नवस्त्र**—न १ मनुष्याच्या निर्वाहार्थ लागणारें अन्न आणि वस्त्र २ ( कायदा ) आपल्या पोषणाची तजवीज कायदेशीर रीतीनें एखाद्या व्यक्तीकडून अगर मालमत्तेंतून करून घेण्याचा हक्क, यास अन्नवस्त्राचा हक्क असें म्हणतात, पोटगी, जितरोटी, खावटी [स ]

**अन्नविकार-विकृति**—पु स्त्री १ अपचनामुळें पोटांत—आंतड्यांत झालेला विकार-बिघाड २ अन्नद्वेष, अन्नावर वांच्छा नसणें ३ अन्नाचें रूपांतर —एक अवस्था, अन्नापासून बनलेलें ( प्राणि, शरीर, अवयव इ० ) रूप ४ अन्नामध्यें होणारा रासायनिक फरक, अन्नाच्या घटकापासून तयार होणारा एक नवीन पदार्थ [ स ]

**अन्नविपाक**—पु १ अन्नपचन झाल्यानंतरची अवस्था, २ अन्नपचनाची क्रिया ३ अन्नपचनानंतर बनलेलें द्रव्य ( रक्त, मांस इ० ) [ स. ]

**अन्नव्यवहार**—पु रोटीव्यवहार, जेवण, पंक्तिभोजन, एकमेकांच्या हातचें खाणें, एका ठिकाणीं किंवा परस्पराचे घरीं भोजन करणें 'दाक्षिणात्यांचा आणि गुजराथ्यांचा प्राय अन्नव्यवहार नाहीं ' [ स ]

**अन्नशांति**—स्त्री १ ( विप्र अन्नदात ) भुकेल्याना, क्षुधिताना अन्नदान करणें २ ब्राह्मणभोजन [ स ]

**अन्नशुद्ध-द्द, अनशू(सू)द**—अन्नशुद्धि ) अप ) पहा

**अन्नशुद्धि**—स्त्री १ अन्न भोजनास योग्य करण्यासाठीं किंवा नैवेद्यासाठीं भातावर तूप वाढावयाचें हा विधि २ तूप, अन्नशुद्धीचा पदार्थ, 'वरणभातावर तुपाची अ० घालतात ' [ स अन्न+शुद्धि=पवित्रीकरण ]

**अन्नशेष**—पु उच्छिष्ट अन्न, उष्टें, जेवण झाल्यावर राहिलेलें अन्न [ स ]

**अन्नसंतर्पण**—न अन्नदान, अन्नशांति [ स ]

**अन्नसत्र**—न ( विप्र अन्नछत्र ) १ याचकवर्ग किंवा ब्राह्मणलोक याना भोजन देणें अन्नदानाचें धर्मकृत्य २ या कामासाठीं बांधलेली इमारत, अन्नछत्राचें गृह म्ह० अन्नसत्रीं जेवणें आणि मिरपूड मागणें=धर्मादाय मिळालेल्या गोष्टींवर तृप्त न राहून आणखी मागणी करणें, पुरस्थावर श्रीमतीचे चोंचले करणें ३ मुक्कादार. 'आयोजाचो घर तुमारा ' [ स अन्न+सत्र ]

**अन्नसंपर्क-संस्कार**—पु जेवण, जेवणें, भोजन करणें. ( प्रत्यक्ष जेवणें, उपाहार किंवा अल्पाहार नव्हे ), आहार, 'महागिरींत वसल्यापासून आठव्या दिवशीं वद्रास लागलें तेव्हां अन्नसंपर्क झाला ' ' यास पधरा दिवसांत अन्नसंस्कार नाहीं कांहीं औषध तरी योजून सांगा ' [ स ]

**अन्नाच्छादन**—न अन्नवस्त्र 'अन्न आच्छादन। हें तो प्रारब्धा आधीन ॥ ' [ स अन्न+आच्छादन ]

**अन्नाटी**—स्त्री ( गो ) पायपोस. [ अर्थ+निर्दे ]

**अन्नाडी**—वि ( गो ) अनाडी पहा

**अन्नान्नगत-गति, अन्नान्नदशा**—स्त्री अन्न ! अन्न ! करीत दारोदार भटकत फिरण्याची अवस्था, अत्यंत विपन्नावस्था, कंगालपणा, घोर दारिद्र्य [ स अन्न+अन्न+गति ]

**अन्नाभायर**—वि ( गो ) (अन्नाबाहेर अप ) अन्न खावयास न मिळे असें ( करणें ) [ स अन्न+बहि ]

**अन्नार्थी**—वि १ अन्नाची जरूरी असलेला, अन्नाच्या मागें लागलेला, अन्नासाठीं हपापलेला २ जीविताला आवश्यक असलेल्या वस्तूची जरूरी असलेला किंवा त्या वस्तूच्या शोधांत असलेला [ स अन्न+अर्थिन् ]

**अन्नावर्ण**—क्रि भुकावणें, भुकेलेला असणें, भुकेनें व्याकूळ होणें, अन्न न मिळाल्यामुळें दुस्थितींत असणें [ स अन्न ]

**अन्नाशय**—पु जठर, पोट, उदर, कोठा, कोथळा [ स अन्न+आशय ]

**अन्नास**—अननस पहा

**अन्नोदक**—न १ अन्न आणि पाणी २ योगक्षेमवृत्ति, उपजीविकासाधन-व्यवस्था [ स अन्न+उदक ] ०ऋणानुबंध-पु. १ अन्नोदक दिल्या घेतल्यानें उत्पन्न होणारा संबंध, पूर्वजन्मीं केलेल्या सुकृताची, ऋणाची किंवा उपकाराची या जन्मीं फेड, प्रारब्धानें कारणीभूत झालेला संबंध [ स अन्न+उदक+ऋण+अनुबंध ] २ अन्नोदक देण्यासारखा जडलेला संबंध, झालेला उपकार

**अन्मार्ग**—पु असन्मार्ग, वाईट मार्ग दुर्वृत्त 'अशुद्ध अन्मार्गी चालती जन। ' —दावि ३ [ स अन्+मार्ग किंवा अन्य+मार्ग ]

**अन्मीख**—वि अनिमिष, पापण्या न हालविता एकसारखा उघडा ( डोळा ) 'अन्मीखे पाहों ठेलें। राआ मुरारि तें॥' –दाव ७३ [स अनिमिष अप ]

**अन्य**—वि १ दुसरा, इतर २ एकरूप नसलेला, परका, निराळा भिन्न, वेगळा ३ अधिक, शिवायचा [स ]

**अन्यकारणक**—वि ज्याचें कारण वेगळें आहे असा 'अन्य कारणकाचि तैशिया।' –ज्ञा १८ २७७ [स अन्य+कारण+क ]

**अन्यच्च**—दुसरें, अधिक –क्रिवि पुन्हा, आणखी [स अन्यत्+च ]

**अन्यजन्मार्जित**—वि मागील जन्मात केलेलें किंवा मिळविलेलें ( सुकृत, दुष्कृत, पुण्य, पाप ) [ स अन्य+जन्म+अर्जित= संपादलेलें ]

**अन्यत.**—अ दुसऱ्यामुळें कडून, पासून, कडे [ स ]

**अन्यतम**—वि दुसरा, अनेकांपैकीं कोणताहि एक कोणीहि एक, कोणीहि, कोणताहि [ स ]

**अन्यतर**—वि १ दोहोंपैकीं कोणताहि एक २ दुसरा, वेगळा, निराळा, भिन्न [ स ]

**अन्यत्किंचित्**—न १ दुसरें काहीं तरी, वेगळें, निराळें २ सध्या न दिसणारें, ( वर्तमान सुखदु खास कारणीभूत ) पूर्वजन्मातील पापपुण्याचा शेष पूर्वजन्मार्जित, संचित म्ह० अन्यत्किंचित् भविष्यति (दुसरें काहीं थोडें होईल) [ स अन्यत्=दुसरा (जन्म)+किंचित् ]

**अन्यत्र**—क्रिवि १ दुसरीकडे, कोठेंहि दुसऱ्या ठिकाणीं, इतर स्थळीं 'नाना एका ठाउनि उठी। अन्यत्र नव्हे पैठी।' –अमृ ७ १८८ २ खेरीज, शिवाय, वाचून [ स अन्यत्र ] **०ठायीं**–क्रिवि (अशुद्ध प्रयोग) दुसऱ्या ठिकाणीं, अन्यस्थळीं 'त्या भूमिकेवाचूनि सांपडेना॥ अन्यत्र ठायीं पदरीं पडेना॥'

**अन्यथा**—क्रिवि १ नाहींतर नाहींपेक्षा, एरवीं, असें नसेल तर 'हें औषध घ्याल तरच गुण पडेल अन्यथा पडणार नाहीं' २ दुसऱ्या रीतीनें–प्रकारानें–पद्धतीनें अन्य प्रकारें, वेगळ्या तऱ्हेनें 'हें वाचूनि पार्था। राहाणें नये अन्यथा।' –ज्ञा ३ १२६ ३ खोटें असत्य, मिथ्या अयथार्थ अनृत 'मी खरें असेल तेंच सांगेन अन्यथा बोलणार नाहीं' ४ विपरीत, व्यर्थ 'मीं इतकी मेहनत केली अन्यथा गेली काहीं उपयोग झाला नाहीं' ५ चुकीनें, अयोग्यपणानें, गैर रीतीनें [स ] सामाशब्द –अन्यथाकारी अन्यथाचारी अन्यथाभाषी, अन्यथाभोजी, अन्यथावर्ती **०ख्याति**–स्त्री (तत्त्व) एक प्रकारचें विधान, चुकीनें विधान, 'ख्याति' पहा 'आख्याति अन्यथाख्याती। शून्यख्याती सत्ख्याती। अनिर्वचनीय जे ख्याती। तो माद्य निश्चितीं मी उद्धवा॥' –एभा १६ २०७ [स ] **०त्व**–न विपरीतप्रकार 'जे नेणणें मातें प्रकाशूनि। अन्यथात्वें मातें दाऊनि।' –ज्ञा १८ १११४ [स ] **०दृष्टि**–स्त्री विपरीत ज्ञान 'अवस्था त्रय तिन्ही लोक। प्रकाशूनि अशेख। अन्यथा दृष्टि पाथिक। चेव दिलें।' –ज्ञा १८ १३०० [स ] **०बोध**–पु विपरीत ज्ञान, समजूत 'पैं अन्यथाबोधु आघवा। मावळोनि तया पाडवा।' –ज्ञा १८ ५६४ [स ] **०भाव**–पु पालट, बदल, अवस्थांतर (विशेषत वाईट ) अपकर्ष, ऱ्हास, अधोगति [स ] **०मति**–स्त्री विपरीत ज्ञान, बुद्धि 'ते वेळीं विश्वस्वप्नाराहितें। कोण अन्यथामति निद्रेतें। साभाळी तुरेचि जेथें। मायाराती॥' –ज्ञा १६ ११ **०सिद्ध**–वि. १ इतर कांहीं उपायांनीं–मार्गांनीं साधलेलें–स्थापन केलेलें २ (तर्क) जो नसला तर गरज भागविता येईल असा, ज्यावाचून अडणार नाहीं असा अनवश्यक (जसें मडक्याची माती आणावयास गाढवच पाहिजे असें नाहीं दुसरा आणू शकेल यावरून व्यापक) तुच्छ कामाचा, व्यर्थ, फुकट, निरुपयोगी [स ] ३ चुकीनें सिद्ध केलेला ( योग्य कारण न देतां ) **०सिद्धि**–स्त्री १ काहींतरीं, निराळ्या उपायानें सिद्ध करणें, साध्य करणें २ त्याच पूर्वपक्षावरून वेगळा, भलता निर्णय प्रस्थापित करणें उ० 'तू लहान मूल आहेस सबब ही गोष्ट तुला सांगता कामा नये, ह्याला उलट उत्तर असें देतां येईल कीं, मी लहान मूल आहे ना, मग तें मला सांगण्याला हरकत नाहीं' ३ (ल ) चुकीचें अनुमान **०ज्ञान**–न विपरीत ज्ञान 'आतां अन्यथाज्ञानीं। या दोनी अवस्था जया जनीं।' –ज्ञा १५ ५२५ [स ]

**अन्यदा**—क्रिवि ( लु ) दुसऱ्यावेळीं, दुसऱ्यादा, दुसऱ्या एकाद्या वेळीं, अन्यसमयीं [ स अन्यथा ]

**अन्यदीय**—वि दुसऱ्यासंबंधी, दुसऱ्याचा, इतराचा, परकीय [स ]

**अन्यपूर्व**—वि पूर्वी दुसऱ्याचें असलेलें विवक्षित कालापूर्वी जीवर दुसऱ्याची मालकी होती अशी ( भूमि, वृत्ति इ० ) [स ]

**अन्यपूर्वा**—स्त्री वि १ एकाशीं अगोदर वाङ्निश्चय झाला असून मग दुसऱ्याशीं जिचें लग्न झालें आहे किंवा होणार आहे अशी मुलगी २ पुनर्विवाहित [ स ]

**अन्यबीज**—वि दुसऱ्याच्या पोटचा जारज 'कुलगुरु देव विद्या जो शिकवी। त्यासी जो नाटवी अन्यबीज॥' –व२५० [स ]

**अन्यमनस्क, अन्यमना अन्यमानस**—वि १ मन किंवा विचार इतरत्र संचारत असणारा अनवधानी दुर्लक्ष असलेला, बेभान भ्रमिष्ठ, विमनस्क २ चंचल वृत्तीचा अविश्वासी एकनिष्ठ नसणारा [ स अन्य+मनस् ]

**अन्यमूर्ति**—वि दुसऱ्या आकाराचा, रूपांतरित भिन्नरूपी, दुसरा देह धारण केलेला [ स ]

**अन्यरेताचा**—वि अन्यबीज जारज (शिवी) 'य पुत्रो पितरोद्वेषी वचन। द्वेषी ब्रह्मविदो जन दुर्जन। तो अन्यरेताचा

म्हणोन युग। दाविती पंडित शास्त्रांतरीं ॥ ' –दावि ७६३ [ स अन्य+इतर् ]

**अन्यशाखी**—वि दुसऱ्या शाखेचा, पक्षाचा ( वेद, धर्ममत इ०च्या ) [ स अन्य+शाखा ]

**अन्यसाधारण**—वि सर्वसामान्य लागू पडणारा, सामान्य, सार्वजनिक [ स ]

**अन्याय**—पु १ अपराध, गुन्हा, कायदा सोडून केलेलें वर्तन, कायदेभंग २ अनीति, अधर्म, शास्त्रातिक्रम ३ जुलूम जबरदस्ती ४ चुकीचा निकाल ०वर्तन—न ०वृत्ति—स्त्री अनीतीनें वागणें, गैरशिस्त वागणूक, स्वैर वर्तन –चा प्रतिबंध—पु ( कायदा ) ज्या दिशेकडे जाण्याचा कोणा मनुष्याचा हक्क आहे त्या दिशेकडे जाण्यास हरकत करणें ( इ रॉंगफुल कन्फाइन्मेंट ) –याची कैद—स्त्री अमुक मर्यादेच्या पलीकडे कोणत्याहि दिशेनें जाण्यास केलेला प्रतिबंध [ स ] ( इ रॉंगफुल रिस्ट्रेन्ट )

**अन्यायी**—वि १ अपराधी, अपराधाचा, गुन्हेगारीचा दोषी २ अनीतीचा, अधर्मी, अयोग्य आचरण करणारा, पापी ३ कायदा सोडून वागणारा [ स ]

**अन्यायोपार्जित**—वि अनीतीनें संपादिलेलें, अन्यायानें, अनीतीनें मिळविलेलें ( द्रव्य वगैरे ) [ स अन्याय+उपार्जित ]

**अन्यारदान**—न ( व ) भुइनळे [ फा अनार+दान ]

**अन्याव-वो**—पु अन्याय, अपराध, चुकी गुन्हा, ' द्रौपदी वस्त्राहरण पहाहो । मुख्य अन्यावो हा कौरवाचा ॥ ' –एभा१ २१२ ' अरे अन्यावा करितोसि । ' –पंचतन ३१ [ स अन्याय अप ]

**अन्याविशी**—अ ( गो ) १ अन्यायानें, विनापराध २ विना कारण [ स अन्याय–अन्याव+शी ]

**अन्यून**—वि अपुरें नसणारें उणीव नसलेलें पूर्ण, सगळें, अव्यंग [ स अ+न्यून ]

**अन्यो**—पु अन्याय, अपराध ' वैरानिया तक्ता । अन्योविण पिडिती लोका । ' –तुगा २९८४ [ स अन्याय अप ]

**अन्योक्ति**—स्त्री १ आडून बोलणें, अप्रत्यक्ष बोलणें २ एक अर्थालंकार, अप्रस्तुतप्रशंसा, जेथें अप्रस्तुत गोष्टीच्या वर्णनानें प्रस्तुत गोष्टीची प्रतीति होते तो १ कार्यावरून कारणाचें २ कारणावरून कार्याचें, ३ सामान्यावरून विशेषाचें व ४ विशेषावरून सामान्याचें वर्णन करणें हीं काहीं अन्योक्तीचीं अंगें आहेत उ० द्वारीं मृगपति हस्तातून अहो वीरराय जी मुक्ता । ती सेविजेल इतरें सिंहा पावून काय जी मुक्ता ॥ ' –मोरो यथें समस्त बहिरे वसतात लोक । का भाषणें मधुर तू करिसी अनेक । हे मूर्ख ज्यास किमपीहि नसे विवेक । रंगावरूनि तुजला गणितील काक ॥ ' ( हा शब्द श्रीयुत कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं रूढ केला या अलंकाराला मूळ संस्कृतामध्यें अप्रस्तुतप्रशंसा असें म्हणतात ) ३ गूढ अर्थाचें भाषण ' परोक्ष वाद वेदव्युत्पत्ती । त्यागमुखें गा अन्योक्ती । साडवी विषया सक्ती । ब्रह्मप्राप्ती लागूनी । ' –एभा २१ ३५३ [ स अन्य+वच्= बोलणें ]

**अन्योन्य**—वि १ एकमेक, परस्पर ' या उभयतांनीं अन्योन्यास शिव्या दिल्या ' ' धावति अन्योन्यावरि ते दोघे आठवूनि अपकार । ' मोकर्ण ४५ २ २ एक अर्थालंकार एकाच क्रियेच्या द्वारें दोन वस्तू परस्परास उपकारक होतात असें वर्णन यात परस्परानीं परस्परांना भूषविण्याचा प्रकार असतो उ० श्रीकृष्ण रुक्मिणीला श्रीकृष्णा रुक्मिणी जशी आता । दमयंतीस नल नला दमयंती आयरें जसें गाता ॥ ' –मोवन ४ २१ ' पागोट्यास डोरें डोक्यास पागोटें ' ' नाकास नथ नथास नाक ३ सर्वस्वी ( महिकावती बखर ११ १२ ) [ स अन्य द्वि ]

**अन्योन्यभाव**—पु १ परस्परांमधील परस्पराचा अभाव उ० घट तो पट नव्हे, पट तो घट नव्हे असा प्रतीतीनें समज २ ( न्याय ) पूर्ण भेद अभाव पहा [ स ]

**अन्योन्यविण**—वि अनन्वित, भलतेंसलतें, गैरशिस्त ' बोलो नये घटलें ऐसें अन्योन्यविण । दासीगमन आदिकरूनी । ' –तुगा ४०६५ [ स अनन्वित अप ? ]

**अन्योन्यसंपूरक**—वि एकमेकाची पुरवणी ' अन्योन्यसंपूरक लेख ' साक्रेटीस संवाद १६२ [ स ]

**अन्योन्याध्यास**—पु सत्यावर मिथ्याचा व मिथ्यावर सत्याचा भास तो [ स अन्योन्य+अध्यास ]

**अन्योन्यालंकार**—अन्योन्य पहा

**अन्योन्याश्रय**—पु परस्पराचा परस्परांना आधार परस्परांमधील साहाय्य, परस्परावलंबन कार्यकारणभावसंबंध ०ता—परस्पराश्रयित्व –श्रित—परस्परांवर अवलंबून असणारें; परस्परांकडून साहाय्यभूत [ स ]

**अन्योविण्य-न्य**—वि १ असंबद्ध विचित्र, अचेंवट विसंगत, गैरशिस्त, ( भाषण, लेखन इ ) २ कल्पनातीत, स्वैर, बेफाम, बेकैद ( आचरण वर्तन इ ) ' जैसा मदिरापानें उन्मत्त । विसरूनि आपुला निजस्वार्थ । करी अन्योविण्य अनर्थ । आत्मघात करू धावे । ' –एभा १३ २७७ ३ भरमसाट, अद्वातद्वा, ' पुढें अन्योविण्य वर्ण मकर । होणार आहे ॥ ' –दा ६ ४ ८६ अन्योन्यविण पहा [ स अनन्वित किंवा अन्य द्वि अन्यविन्य ? ]

**अन्वय**—पु १ संबंध, अव ' बून असणारें अस्तित्व, आधार, मिलाफ योग, संयोग, ' प्रसंग अन्वय राखतें । ' –वेसीस्व ३ २३ अंत करणाचे अन्वयावाचून सकळ इंद्रियें विषयग्रहणाविषयीं जड प्राय आहेत ' ' जितक्या चंद्रकलांवर सूर्यकिरणाचा अन्वय होतो तितक्या कला प्रकाशमान दिसतात ' ' दर्वी देवाचि न माये । मा देवीं के अन्वयो आहे । –अमृ ९ ३८ २ ( व्या ) व्याकरणांत

अनेक पदें, वाक्यें याचा परस्पर अर्थानुरोधी संबंध ( कर्तृकर्मक, क्रियाकारक, विशेषणविशेष्य, इ० ) ३ काव्याची गद्यमय सरळ रचना, एखाद्या कवितेंतील शब्दांची रचना बदलून आपण नेहमीं बोलतों त्याप्रमाणें करणें ४ तर्कपद्धतीस अनुसरून रचना ५ इंगित, कल, धोरण, मुद्दा, हेतु, उद्दिष्ट, सारांश 'याचे बोलण्यातील अन्वय माझे ध्यानात येत नाहीं' ६ कुल, जाति, परंपरा, वंश 'विरचिला अन्वय भृगुनाचा।'—सारुह ३ २३ ७ ( न्याय ) विग मनाचा एक मार्ग न्यायप १५५ ८ ओघ, अनुसंधान पुढें क्येचा अन्वय। सावध एका॥'—दा ५ १० ८ ९ व्याप्ति, अन्वयव्याप्ति पहा १० ( सामा ) कार्यकारणसंबंध [ सं. अनु= मागें+इ=जाणें ] ०लावून बोलणें—१ दुसऱ्यास न दुखविता बोलणें, गोडीनें बोलणें २ ( ल ) काम साधणें ३ लावण लावणें ०मार्ग—वृत्ता( घडलेल्या गोष्टी )च्या दोन किंवा अधिक उदाहरणा मध्यें आणखी एक सर्वसाधारण कारण दाखविणारें वृत्त तें —न्याय १३३ १५५ ( इ मेथड ऑफ ॲग्रिमेंट ) ०मुखें—प्रत्यक्ष रीतीनें, पदार्थ आहे असें कल्पून अर्थ समर्थन करण्याचा एक प्रकार (व्यतिरेक मुखें याच्या विरुद्ध) 'जडपण व्यतिरेकें मुखें हरि। तदपि अन्वय दावुनि दे हरि॥' ०योजना—स्त्री काव्यांतील शब्द सरळ गद्य वाक्यामध्यें मांडणें, अन्वय करणें (सामा) वाक्यरचना ०व्याप्ति—स्त्री (तर्क) भावाचें साहचर्य, कार्यकारणसंबंध, अस्तिपक्षीं प्रमेया पासून अस्तिपक्षीं अनुमान एकाच्या अस्तित्वावर दुसऱ्याचें अस्तित्व अवलंबून असणें उदा धूर असेल तेथें अग्नि असतो

**अन्वयव्यतिरेक**—पु १ एकी व भेद, ऐक्यभेदाची सांगड २ ( तर्क ) अन्वय म्हणजे अमुक गोष्ट असता अमुक गोष्ट घडणें आणि व्यतिरेक म्हणजे अमुक गोष्ट न घडली तर अमुक दोष उत्पन्न होईल अशा प्रकारचा साध्य व साधन याच्यामधील परस्पर संबंध, भावाभावसंबंध अन्वय आणि वीतरंग।हा शब्दभेद कोणी येक। निशब्दाचा अंतरविवेक। शाधिगा पाहिजे॥'—दा ५ २ २१ 'जें काय अन्वयव्यतिरेकाहीं सिद्ध त्यात तू वस रे।'—मोमसा २ ११६ [सं अन्वय+व्यतिरेक] ०व्याप्ति—स्त्री ( तर्क ) अन्वय (अस्ति) व व्यतिरेक (नास्ति) उभयपक्षीं संबंध, दोन वस्तूंचा भाव व अभाव यांचें साहचर्य उ० जेथें धूर असतो तेथें विस्तव असतो ही अन्वयव्याप्ति आणि जेथें विस्तव नसतो तेथें धूर नसतो ही व्यतिरेकव्याप्ति तेव्हा विस्तव आणि धूर या जोडीसंबंधानें अन्वयव्याप्ति आणि व्यतिरेकव्याप्ति हीं आहेत [ सं ]

**अन्वयव्यतिरेकी**—वि ज्या विधानाची सत्यता सरळ व उलट दोन्हीं पक्षीं पटते तें जेथें अन्वय आणि व्यतिरेक या दोहींचाहि उपयोग होतो तें [ सं ]

**अन्वयी**—वि १ मवदी सामासशब्द—अन्य—अपर—इतर—उत्तर उभय—एतत्—तत्—दूर—पूर्व—अन्वयी २ दोन गोष्टींचें साहचर्य असणारा —न्यायप १७७ [ सं ]

**अन्वर्थ-क**—वि १ यथार्थ वर्णनात्मक,गुणदर्शक,सार्थ,यथार्थ, यौगिक अर्थ न सोडता अर्थाची अभिधानना पावलेला ( शब्द, नाव इ० ) उ० भूपाल=राजा, जलधि=समुद्र, आतपत्र=छत्र, ज्ञान वर्गी=भाग, इ० 'मनोभव हीं मदनाची अन्वर्थक संज्ञा आहे' [ सं. अनु=प्रमाणें+अर्थ=शब्दार्थ ] २ वास्तविक, सत्य, आभासा त्मक नव्हे तो, खरा [ सं अनु+अर्थ=सत्यता ] ३ नावाबरहुकूम, लायक, योग्य

**अन्वष्टका**—स्त्री मार्गशीर्ष, पौष, माघ आणि फाल्गुन यांची वद्य नवमी —मनु ४ १५० —क्य—न त्या दिवशींचें श्राद्ध [सं]

**अन्वाधान**—न ( याज्ञिक ) १ अग्नीवर समिधा ठेवणें २ ज्या देवताना उद्देशून याग करावयाचा त्याचा व त्याच्यासाठीं उपयोगात आणावयाचें होमद्रव्य याचा व आहुतींच्या संख्येचा उल्लेख करणें [ सं अनु+आ+धान ]

**अन्वाधेय-क**—न स्त्रीधन ( विवाहानंतर बापाकडून किंवा सासरकडून मिळालेलें ) —मनु ९ १९५ [ सं ]

**अन्वारब्ध**—वि एकाच कर्माचे दोन अधिकारी असल्यास एकानें प्रत्यक्ष कर्म करावें व दुसऱ्यानें त्याच्या हातास आपला उजवा हात लावावा म्हणजे कर्माचें फळ हात लावणारास मिळतें उ० धार्मिक कृत्यात यजमानाच्या हातास हात लावणें —संस्कार कौस्तुभ —वि.— संबद्ध, स्पर्श असलेलें, अनुसरलेला [ सं अनु+ आरब्ध ]

**अन्वारंभ**—अन्वारब्ध पहा आचार्य, यजमान, इ० जो मुख्य कर्ता त्यास कर्मकार्यी इतर ऋत्विज, पत्नी इ० माणसें जो हस्तस्पर्श करतात तो [ सं अनु+आरंभ ]

**अन्वारोहण**—न सहगमन, सति जाणें, अनुगमन पहा [ सं अनु + आरोहण ]

**अन्वाहार्यश्राद्ध**—न दर अमावास्येला करावयाचें पार्वण श्राद्ध मासिक पितृश्राद्ध [ सं ]

**अन्वाहित**—वि मालकाला देण्याकरिता एकाद्या इसमाजवळ ठेवलेली ( एखादी वस्तु, ठेव ) उपनिधीच्या पाच प्रकारापैकीं दुसरा प्रकार ) [ सं अनु+आहित ]

**अन्वित**—वि १ संबद्ध, जोडलेला, युक्त २ युक्त असलेला, आधीन, ग्रासलेला उदा कामान्वित, अकर्मान्वित (दुष्ट कर्म करणारा) क्रोधान्वित, लोभान्वित शर्करान्वित ३ व्याकरणामध्यें किंवा वाक्यरचनेंत संबद्धयुक्त, संबद्ध व अशाच पण अनेक व्यापक अर्थी अलंकारिक रीतींनीं या शब्दाचा उपयोग करण्यात येतो उ० माया प्रीति, सुख—दुःख, धर्म—अधर्म, पाप—पुण्य भार्या—पुत्र—मित्र, दर्प—आनंद, शोक—संताप, वगैरे पुढें अन्वित लावितात [ सं अनु+इ]

**अन्वेषण**—न १ शोध, संशोधन, चौकशी, तपास २ पाठलाग, मार्ग काढणें [ सं अनु+इष्]

**अन्वेषणें**—सकि तपास करणें, शोध करणें, माग काढणें, धुंडाळणें [ स अनु+इष् ]

**अन्वेष्टा-ष्टी**—पु संशोधक, अन्वेषण करणारा [ स ]

**अन्हव(वा)णी**—वि अनवाणी पहा 'पठतचि निघाला अन्हवणी पाई ।' –दावि ३०८ 'पदिं अन्हवाणी कुंजरनीं मी आलें श्रीरंगा ।' –देप ८० २

**अन्हाड-डी**—अनाड पहा

**अन्हित**—अनहित पहा 'हित अन्हित परीक्षिलें । परीक्षा वर्ती ।' –दा १३ ७ २० [ अन्+हित ]

**अप**—अ एक उपपद किंवा शब्दयोगी अव्यय याचे अर्थ– १ कमीपणा, हीनता उ० अपशब्द, अपपाठ अपकीर्ति २ अभाव उ० अपयश, अपमान ३ वियोग, उ० अपभय, अपकरण ४ विरोध उ० अपसव्य [ स ]

**अप**—न पाणी [ स अप् ]

**अपक(ख)रा**—पु १ कवलीच्या हातात असलेलें ( मडकें ) भाडें त्यास करा म्हणतात त्यात पाणी असतें म्हणून अपकरा [ स अप्+करा, आपस्कर ? ] २ अपकारा, पाण्याची झारी 'जिल्हेदार अपकरे वाटतें आज चर्कीं धरिले । चित्र दिसे कलशात शुद्ध अवयव शरिरावरले ।' –प्रला ११९ ३ पूजेला पाणी घेण्याचें ल्हान भाडें [ फा अबखुरा, तुल० स अप्+करक=करा भाडें किंवा अपस्कर=गाडीची सारथी बैठक स आपस्कार=अग्र, मूळ, बैठक ]

**अपकर्ष-ण**—पुन १ खालीं ओढणें, मागें ओढणें २ कमीपणा येणें, हीनपणा येणें, अपमान–अप्रतिष्ठा होणें, हीनस्थितीस पोंचणें, न्यूनता, ऱ्हास अवनति ३ वेळेपूर्वीच, अगोदर करणें ( धर्मकृत्य ) ४ ( काव्य ) पुढें येणाऱ्या एकाद्या शब्दाचा अगोदरच अध्याहार करून एकाद्या भोळीचा किंवा श्लोकाचा अर्थ पूर्ण करणें ५ ( संगीत ) विकर्षण पहा [ स अप+कृष् ]

**अपकर्षक**—वि हीनता आणणारा, अपकर्ष करणारा [ स ]

**अपकर्षणें**—उक्रि १ हीनता आणणें २ मागें घेणें, ओढणें ३ अर्थ लावण्याकरिता पुढील शब्द मागें घेणें अपकृष्ट पहा

**अपका**—पु हपका, हातानें केलेला पाण्याचा जोरानें मारा छिडकाव,( पाणी दूध, शिपडणें, इ ) जोरानें मारणें ( क्रि० टाकणें देणें, मारणें ) [ ध्व किंवा स अप् ]

**अपकार**—पु १ इजा, नुकसान, दु ख, उपद्रव रोग उपकाराची फेड अपकारानें करू नये ' २ नुकसान, दुखापत वगैरे करण्याची क्रिया ३ गुन्हा, अन्याय दोष 'जी भृगूचा कैसा अपकार ।' –ज्ञा १६ २६ [ स अप+कृ ]

**अपकारक-कारी-कारीक**—वि अपकार करणारा, इजा नुकसान करणारा–देणारा, त्रासदायक, उपद्रवी 'परी तेयींची नवलपरी । अपकाऱ्या होय उपकारी ।' –एभा १७ १०८ शको १ १२

**अपकीर्ति**—स्त्री ( विप्र अपकीर्त ) १ निंदा, अपमान, मानहानि २ दुष्कीर्ति, दुर्लौकिक, बदनामी, बदलौकिक [ स अप+कीर्ति ]

**अपकृति**—अपकार पहा

**अपकृत्य**—पु १ ( कायदा ) कायद्यानें घालून दिलेला नियम मोडला म्हणून नुकसान भरपाईदाखल कोणातरी व्यक्तीला त्याकरितां कोर्टांत फिर्याद आणता येते असा विशिष्ट गुन्हा, इ टॉर्ट २ दुष्कृत्य, विघातक कृत्य 'किचनेर यानीं लष्करी खर्च वाढविला काय आणि कर्झन साहेबानीं तिबेट मिशनमध्यें पैसे ओतले काय, हिंदुस्थानातील लोकाच्या दृष्टीनें दोन्हींहि एकसारखींच अपकृत्यें आहेत ' –टि २ ५९७ [ स अप+कृ ]

**अपकृष्ट**—वि १ खालीं ओढलेला, अवनत, अपकर्ष पहा २ नियमित, ठराविक काळापूर्वी केलेलें ३ मंत्रसाहाय्यानें खेंचून आणलेला ४ नीच, हलका, दुष्ट, अधम [ स अप+कृष् ]

**अपंक्त**—वि ( प्र अपांक्त ) पक्तींतून–जातींतून बाहर टाकलेला, वाळींत टाकलेला, जातिबाह्य, बहिष्कृत [ स अ+पंक्ति ]

**अपक्रम**—पु १ उलटा क्रम, व्युत्क्रम, ( ल ) उलथापालथ, अव्यवस्था २ अतिक्रम, टळून जाणें, निघून जाणें ३ ( ज्यो ) क्रांति, अपम ( तारे, नक्षत्र इ० चा ) [ स अप+क्रम्=पलीकडे जाणें ]

**अपक्रमण**—अपक्रम पहा

**अपक्रांत**—वि निघून गेलेला, टळलेला, उलटून गेलेला [स] ०**आकाशचारी-**( नृत्य ) कुंचित पाय करून गुडघा वक्षस्थळा इतका वर नेणें व दुसरा पाय उद्घटित करणें ०**करण-**(नृत्य) पाय मार्डीकडे वळवून वक्ष स्थळाइतका उच करणें, दुसरा पाय उद्घटित करणें

**अपक्रिया**—स्त्री १ दुष्कृत्य, वाईट काम २ ( कायदा ) मालकाचें नुकसान व्हावें या इरादानें त्याच्या मालाची नुकसानी–खराबी करणें इ मिश्चिफ [ स अप+कृ ]

**अपक्व**—वि १ कच्चा, हिरवा, न पिकलेला ( फळ ) २ न शिजलेला अशिजा, कच्चा, अर्धवट ( भात, स्वयपाक वगैरे ) ३ अननुभविक कच्चा, अडाणी, कोरा [ स अ+पच्–शिजणें, पिकणें ]

**अपखर्डी**—स्त्री निंदा [ स अप+अक्षर ? ]

**अपख्यात-ती**—स्त्री अपकीर्ति 'दयाधर्म सत्कीर्ति लोटूनि पायें । सखी जोडली म्या अपख्यात मायें ।' –सुरामा २ ८७ [ स अप+ख्या ]

**अपंग**—वि स्वत चीं कामें स्वत करावयाला असमर्थ, विकलाग, व्यग असलेला, लुळा, अधळा, पागळा इ० 'मी तो अपग अनाथ । तू तो अनाथाचा नाथ ।' [ स अप+अग ]

**अपंगणें**—उक्रि (प्र आपगणें) १ सभाळणें, वाढविणें, पाळा पोषण करणें, आश्रय देणें, जवळ करणें 'वैभवहीन जाऱ्या अपगी कोण।' –दावि ७८ 'दिनबधु दिनानाथा। पाहिजे अगीले।' –देप ५ २ स्वीकारणें 'गति रीति कैसी अपगिती। राजनाची स्थिति न कळे हो कवणासी।' –दावि २३० आपगणें पहा

**अपगत**—वि १ दूर केलेला गेलेला २ वियुक्त, विभक्त [स अप+गत]

**अपंगिता**—वि आश्रयदाता, सभाळणारा, पोसणारा, पोशिंदा, आपगिता पहा

**अपंगिस्त**—वि परावलबी नाहीं असा, स्वतत्र 'जें जें विष याचें सुख। तें तें इद्रियपगिस्त दुख। अपगिस्त भक्तिसुख। सभाग्य लोक पावती॥' –एभा १४ २१७ [स आत्म–आप+अग किंवा अ+पगु]

**अपघात**—पु १ मरणास कारण होणारी आकस्मिक गोष्ट (सर्पदश, पाण्यात बुडणें इ०) २ आकस्मिक मरण (वरील रीतीनें आलेलें), अकालीं मरण 'मग प्रसन्न होऊनि रुक्मिणीकात। चुकविला काळाचा अ०॥' ३ अपघाताची भागा 'त्या दुशाश्री करी नि पात। तरीच ब्राह्मणाचा होसी भक्त। नातरी करी अपघात। तुजवरी देवा।' –क्या २ ३ ४१ [स अप+हन्]

**अपघाती**—वि हुरी, धडदाड, धाडसी, साहसी [स]

**अपघातीं**—क्रिवि आकस्मिक, अकस्मात्, एकाएकीं

**अपचय**—पु ऱ्हास, तोटा, अवनति क्षय, नाश [स अप+ची=गोळा करणें]

**अपचार**—पु १ अपथ्य आहार कुपथ्य २ वाकडा मार्ग दुर्वर्तन, कुमार्ग ३ उपद्रव, पीडा [स अप+चर्]

**अपची**—स्त्री गडमाळा रोग [स]

**अपंचीकृत**—वि (पचमहाभूतांपैकीं प्रत्येक सूक्ष्मभूत) वेगवेगळीं अमिश्रित 'विषय तवि महाभूतें। तामस प्रसवला अपचीकृतें।' –एभा २४ १२३ [स अ+पच+कृ]

**अपच्छाया**—स्त्री १ अशुभ छाया २ पिशाच भूत [स]

**अपजय**—पु पराजय पराभव [स]

**अपजणें**—अक्रि उपजणें, उत्पन्न होणें कीटकें पाघुरण। त्या उ(अ)पजवी कोण।' –अमृ ७ १६६ [उपजणें अप]

**अपजा(ल)ळ**—न आळ खोटा आरोप (क्रि० घालणें, घेणें टाकणें) 'ना तुझें करील मुखावलोकन। त्यावरी यता अपजाळ।' –ह २५ १४३ [स अप+जाल]

**अपट**—पु पडदा आडोसा अडभिंत 'तें रौरव गा तवं वरि। आइकिजति गा अपटातरीं।' –राज्ञा १६ ४२५ [स अपटी=पडदा कनात]

**अपटचापट**—स्त्री (पत्त्याच्या खेळात) पत्त पिसणें [अपटणें+चापटणें]

**अपटणें**—उक्रि १ आदळणें, पाडणें, जोरानें टाकणें, पडणें फोडणें, एकदम धुपकन परतु जोरानें मारीं पडणें 'धाडधाड मारणें अपटनान' २ मारणें, हाणणें, हाणमार करणें ३ (ल) वादात पराजय करणें, हरविणें ४ खालीं येणें, आपण हट्ट सोडणें, दुसऱ्यानें म्हणणें (अगीं) कबूल करणें, वादात हरणें ५ (वे) स्त्रीगमन करणें, स्पर्श करणें [स आपतन प्रा आपड] आपटोच अपटणें–(ल) एकादी गोष्ट दुसऱ्यानें विनविलें असताहि न करणें पण ती मग स्वत हाऊन करणें म्ह० कोण्ही अपटला पोर कोण्ही अपटला भोपळा=एकानें एक मूर्खपणाची गाष्ट केली म्हणून दुसऱ्यानेंहि दुसरी त्याच मूर्खपणाची गोष्ट करणें **रढ अपटणें**–(आपल्या शत्रूवर सड उगविण्याच्या दृष्टीनें) हातातील काठी, सोटा वगैरे आपटणें

**अपटणें धोपटणें**—क्रि जोरानें टाकणें आदळआपट करणें, निष्ठुरपणें मारणें [अपटणें]

**अपटधोपट, अपटाआपट–टी, अपटा धोपट–टी**—स्त्री जोरानें आवेगानें मारणें, आदळआपट, हाणमार. [अपटणें]

**अपटधोपट, अपटूनधोपटून**—क्रिवि जोरानें मारून टाकून बळजबरीनें [अपटणें]

**अपटपुटी**—स्त्री एक झुडूप, [illegible]

**अपटमार**—पु अपटून आवाज धाडण्याचा एक फटाका [अपटणें]

**अपटा**—पु एक झाड दसऱ्याच्या दिवशीं शमी नसल्यास याची पूजा करून पानें सोनें म्हणून [illegible] देतात पानें [illegible] नाच्यापेक्षा जाड व मोठीं पानांच्या [illegible] करतात यास लाल रंगा येतात, अतरमाचीच बहुकीचें तोंड [illegible] करतात –वगु १ ४१ (स नाव अश्मतक)

**अपटातर**—वि १ मध्यें पडदा नसलेला [illegible] आड नसलेला (ल) प्रत्यक्ष जवळचा २ पडद्यामागें, आड अपट [illegible] हा [स अ+पट+अतर अपटी+अतर]

**अपटी**—स्त्री १ धका सकट दुर्दशा (व्यापारात इ० [illegible] तोटा बुड २ (व) रस्त्यातील चाकोरीवर पावसाळ्यात [illegible] पडलेला गाडीवरून जाताना गाडीचें आपटणें (सामा) पडणें [illegible] (क्रि० खाणें) [अपटणें स आपत प्रा आपड] ०देणें [illegible] आणणें खोडी काढणें कठिण काळ मन प्रास जाहला कपटें [illegible] अपटी दिधली।' –अमृत ३८

**अपटुडेट**—वि १ आजपर्यंतचा २ (ल) पूर्ण सुधारलेला, अगदीं फॅशनेबल त्याची राहणी अ० आहे' ३ चोख व्यवस्थेशीर टापटिपीचा [इ अप=पर्यंत+टु+डेट=आजदिवस]

**अपड**—स्त्री रुसणें पड न घेणें ओढून धरणें 'तव बोलिलें दैत्यविभांडें। आता रुसोहू होइलु अपडें॥' –शिशु १८५ [अ+पड]

**अपडित**—पु अविद्वान् न शिकलेला [स]

**अपढंगीपणा**—पु वाईट वर्तणूक, चाल [ अप+ढंग ]

**अपण**—आपण पहा

**अपतर**—वि ( व ) खोडकर, अनपळ ' मुलगा मोठा अप तर आहे ' अतर पहा [ अर अब्तर=बिघाड ]

**अपतिव्रता**—स्त्री पतिव्रता नव्हे अशी, व्यभिचारी स्त्री, पतीशीं बेइमान, बेमुर्वतखोर स्त्री, पतीची आज्ञा न पाळणारी स्त्री ' अपति व्रता गुमळेदेवता ।' [ स ]

**अपत्नीक**—वि पत्नीविरहित ( पुरुष ), विधुर, कुमार (ल) एकटा [ स ]

**अपत्य**—न १ मूल, संतान (पुत्र किंवा कन्या), संतति 'जैसा स्वभावो मायबापाचा। अपत्य वाले जरी बोबडी वाचा। तरी अधि कचि तयाचा । संतोष आथी ॥ '—ज्ञा १ ६४ २ वडील माणसास ( विशेषत मातापितरास ) लिहिताना स्वत स वापरावयाचा शब्द ' अपत्यें (बालकें) वामनाचा शिरसाष्टांग नमस्कार ' •वाचक–वि ( ज्या ) मातापित्याच्या किंवा एकाद्या पूर्वजाच्या नावावरून पड लेलें, वाचिक (वंश) नाम उ० कौशिक भार्गव, कौंतेय पार्थ, राघव इ० •विक्रय–पु मुलाची विक्री (एक महापातक) [स अ+पत]

**अपत्रपा**—स्त्री १ लाज, भीड, मर्यादा, संकोच २ गोंधळ लाज, शरम (अपराध उघडकीस आल्यामुळें वाटणारी) ' हें कन्द सांड तिकडे चाल तुल्या दृष्टीनि गोधना खल तो । प्राणत्राणपरायण निकड निरपत्रपाप्रणी पळतो । '—मोविराट ४ ८० (क्रि० पावणें येणें ) [ स अप+त्रप्=लाजणें ]

**अपथ**—पु १ पाखंड, कुमार्ग २ अनियमितपणा, रूढमार्गा विरुद्ध आचरण, रीतीविरुद्ध बाहेरचें वर्तन [ स अ+पथ ] •गमन–वर्तन–संचार–पु १ पाखंडमार्ग २ नियमाविरुद्ध, अशिष्ट वर्तन, दुराचरण, वाईट वर्तन •गामी–चारी–वर्ती–वि १ पाखंडी, धर्मबाह्य आचरणाचा २ नियम, रूढी न मानणारा, दुराचारी, कुमार्गी

**अपथ्य**—न १ अयोग्य, अपायकारक रोग्याला वर्ज्य (तेल कट तिखट आंबट) अन्न–पदार्थ, कुपथ्य ' अपथ्यदर्शन रोग तो वद्धक आराडे घोष घी ।'—नेरा ८९ २ पथ्याच्या नियमांना सोडून वागणूक, नियमच्युति ३ ( ल ) अहित, अकल्याण, अमंगल –वि अहितकारक अशुभ इजा करणारें, न मानणारें वर्ज्य ( अन्न किंवा वागणूक ) [ स ] •शील–वि पथ्य न करणारा ' नाहीं भरवसा पथ्य तोंडा ज्याचें । धडे साधूंशीं दुर्दैवाची बुद्धि । '—ज्ञा ७ ९३

**अपदागिरी–गीर**—अबदागिरी पहा

**अपदार्थ**—पु (तर्क ) नास्तित्व अभाव अविद्यमानता [स]

**अपदेवता**—स्त्री दुष्ट देवता राक्षस, पिशाच इ० [ स ]

**अपदेश**—पु १ सबब निमित्त सोंग २ खोटी युक्ति भेद ३ रूप धरा, छद्म, फसवणूक [ स ]

**अपधाक**—पु १ आकस्मिक भीति, एकाएकीं मनावर होणारा भीतीचा परिणाम, धडकी, धसका ' अपधाकासि ताडिलें । लिंग देहासि विभांडिलें ।'—दा ५ ९ ४३ २ आपलीच आपल्याला वाट णारी भीति ' तीं अपधाकानीं अर्धमेलीं झालीं '—वाळमिन १ १ ७० ८० [ आप=आपला किंवा अप=अकस्मात् वाटणारा, अंतर्गत+धाक=भीति ]

**अपधाकणें**—अक्रि भीति वाटणें, भिणें, घाबरणें, हाय घेणें धसका घसणें [ अपधाक ]

**अपनयन**—न डोळे पुसणें, समाधान करणें, सांत्वन करणें [ स अप+नयन ]

**अपनयन**—न अपहार, अन्याय [ स अप+नी ]

**अपन्यास**—पु ( संगीत ) रागालापात ज्या स्वरावर मध्य तरी विश्रांति घेतात तो स्वर [ स ]

**अपन्हव**—पु ( प्र ) अपह्नव पहा

**अपन्हुति**—स्त्री ( प्र ) अपह्नुति पहा

**अपपर**—आपपर पहा

**अपपाठ**—पु चुकीचा पाठ, अशुद्ध पाठ(ग्रंथादिकांतील),चुकीचा शब्द, तऱ्हा, सरणी [ स ]

**अपप्रयोग**—पु शब्दाचा अशुद्ध प्रयोग, दुरुपयोग, (एक भाषा दोष) [ स ]

**अपबळ**—अ आपण होऊन, स्वत होऊन ' छप्पन देशिंचे गुणीजन येती या जागीं अपबळ ।'—होला १८४ [ स आत्मन्–आप+बळ ]

**अपभवन**—न ( शाप ) प्रकाशकिरण वगैरे सरळ रेषेपासून च्युत होणें इ डिफॅक्शन [ स ]

**अपभाषण**—न वाईट भाषण, शिवीगाळ, निंदा, दुर्भाषण, दुरुक्ति, अपशब्द [ स ]

**अपभाषा**—स्त्री मूळ भाषेची अपभ्रष्ट झालेली भाषा, अशुद्ध, गावंढळ भाषा अपभ्रंश पहा [ स ]

**अपभ्रंश**—पु १ मूळ भाषेंतील शब्द इतर भाषेंत आल्यामुळें झालेली विकृति किंवा रूपांतर उ० स गृह–म घर, स अश्वत्थामा–म असणी इ० २ दूषित होणें, अशुद्ध स्वरूप प्राप्त होणें, भ्रष्ट होणें ( ल ) विकार नाश हानि –स्त्री –एक प्राकृत भाषा (ही मूळ संस्कृत भाषेपासून अपभ्रष्ट झाली म्हणून हें नांव) –वि भ्रष्ट करणारा अधोगतीला नेणारा, सुखविनाश, विनाशी ' हे असनिय कीर्तींशीं नातु । आणि पारत्रिकासि अपभ्रंशु ।'—ज्ञा २ २० म्हणूनि हा अपभ्रंशु । त्यजावा ॥ '—ज्ञा २ ११८ [ स ]

**अपभ्रष्ट**—वि १ अपभ्रंश–अशुद्ध रूप पावलेला २ नष्ट, अधो गतीस पोंचलेला, दुराचारी, हीन [ स ]

**अपम**—पु ( ज्या ) क्रांति, अपक्रम पहा,

**अपमान**—पु अनादर, मानभग, मानखडणा, अप्रतिष्ठा, तेजोभग, पाणउतारा, बेअब्रू [स ] **०गिळणें**–पाणउतारा, अपमान सहन करणें 'ग्रायमनसत्त्रकापुढें व त्याच्या अपमानगिळू सहकान्या पुढें कोणीहि स्वाभिमानी मनुष्य पुरावा देणार नाहीं '–अभ्युदय पत्र ३१-१०-१९२८ [स ]

**अपमानणें**—अक्रि. अपमान– मानखडणा, अनादर करणें, धिक्कारणें 'तुझें महिमानु क्वण जाणें ॥ जेणें एक शक्तीचेनि गुणें। बचा अपमानिला ॥ ' –दावि २४१ [ अपमान ]

**अपमानित**—वि अपमान केलेला, धिक्कारलेला [अपमान]

**अपमृत्यु**—पु १ निवावरचें दुखणें, ( सर्पदश वगैरे ) गडांतर, फार मोठें सकट 'हा पोर विहिरींत पडला, आगींत पडून भाजला परतु याचे दोन्ही अपमृत्यु टळले ' म्ह० अपमृत्यूचा एखाद वेळ महामृत्यु होतो २ आकस्मिक मत्यु अपघात, अकालीं मृत्यु ( क्रि० चुकणें–निवारणें टळणें–येणें ) [स ]

**अपयश**—न (विप्र अपेश ) पराजय, कार्यनाश अपकीर्ति **०स्कर**–वि अपमानकारक, लाजिरवाणा, इज्जतखाऊ **–चा धनी–पु –चें खापर फुटणें**–दुसऱ्याच्या चुकीकरिता स्वत वर दोषारोप येणें, दुसऱ्याच्या चुकीकरिता प्रायश्चित्त भोगणें [ स अप+यशस् ]

**अपयशी**—वि दुर्दैवी, अयशस्वी, मदभाग्य, कपाळकरटा 'तो जन्मोजन्मीं अपयशी। यश कधीं न ये तयासी ॥'

**अपर**—वि १ दुसरा, द्वितीय, अन्य 'सुदर तरी अपर मदन। क्रोधी तरी यमासमान।' –जै २३४ २ (ल ) अतुल ३ ( समासात ) दूरचा, पुढील, मागचा, पलीकडचा, उ० अपरार्ध ( दुसरा, पुढला अर्ध ), अपरात्र ( उत्तररात्र ), अपराण्ह–दिवसाचा उत्तरार्ध दोनप्रहरानतरचा, पूर्वापर ( पहिला व दुसरा ) इ० ४ पश्चिमेचा 'का पूर्वापर सरिता। भिन्न दिसती पाहता।' –ज्ञा ३ ३९ [स ]

**अपरत्र**—क्रिवि दुसरीकडे 'एकत्र केशव वसे अपरत्र वैरी।' –नीतिश्लोक १८ [स अपर+त्र ]

**अपरपर्याय**—पु प्रतिशब्द, तद्वाचक दुसरा शब्द उ० उदकयाचा अ० जल [स ]

**अपरपक्ष**—पु १ दुसरा पधरवडा, वद्यपक्ष २ खटल्यातील दुसरी बाजू प्रतिवादी, सामनेवाला ३ पितृपक्ष भाद्रपद वद्य पक्ष, पितृपधरवडा 'आला विप्र महाधनी। अपरपक्ष करणें मनीं।' –गुच १६ २२ [स ]

**अपरपाठ**—पु दुसरा पाठ इतर पाठ [स ]

**अपरंपार**—वि अनत अमर्याद असख्य, अपार अगणित ( शक्ति, गुण, बुद्धि, पराक्रम, महत्त्व वगैरे ) [स अ+पर+पार]

**अपरमात–वाद**—पु टपका, बाल, आरोप, मिथ्यादोष अन्यथा गोष्ट, आळ 'धुंडी० –हा माझ्यावर निव्वळ अपरमात आहे ' –भा ७५ [स अपर+मात–वाद ]

**अपरमाय**—स्त्री दुसरी आई, श्रेष्ठ माता 'जय जय देवी सर्वगे। सत्वधिया श्रीरगे। सर्वातीत निसगसग। अपरमाय तूं।' –स्वादि १४५ [स अपर=अन्य, सर्वश्रेष्ठ+म माय=माता ]

**अपरव**—पु १ मालमत्तेसवधीं भाडण २ ( सामा ) भाडण, कज्जा तटा, बखेडा [स अप+रव ] –वि निर्विवाद, हक्काचीत ( मालमत्ता, वारसा ) –मोको [स अपगत+रव]

**अपरवड–डी**—स्त्री १ क्रम सोडणें बिगर रीत, पद्धत नसणें, सोडणें निरुढि २ (काव्य ) विलक्षणपणा, तऱ्हेवाईकपणा, वैचित्र्य, असामान्यपणा, नवलाई ( क्रि० वाटणें, होणें ) ३ अन्याय, गैररीत 'परी धर्मपत्नी धागडी। पोमिता जरी एकी वोटी। तरी का अपरवडी। आणावी आगा ॥ ' –ज्ञा १८ ५४२ ४ अपकीर्ति, गैर चाल, गैरवर्तणूक, आगळीक 'युद्धीं साडमिद्या वोडी। हे अपरवडी तुवा केली।' –एरुस्व १३ ११ ५ अन्करणें, मार्ग सोडून जाणें 'वेष धारी वृथा मुडी। त्याचे सगतीची अति गोडी। जेय अपरवडी विधि वेदा ॥' –एभा १३ १२१ [स अ+परिपाठ ठि, प्रा अ+परिवाडि]

**अपरवय**—न वृध्दापकाळ 'अपरवय होता काळें। पति तुझा यती होईल ॥ ' –गुच १३ ५४ [स अपर+वयस् ]

**अपरवाद**—पु टपका अपरमात पहा

**अपरवासी**—वि (व ) विटाळशी, रजस्वला, अस्पर्श 'आई अपरवासी असल्यामुळें स्वयपाक करावा लागला ' [ अपर+वास ? ]

**अपरसूर्य**—पु. सूर्यासारखा, दुसरा सूर्यच (ल ) अत्यत विद्वान, तेजस्वी ब्राह्मण दैदीप्यमान तारा इ० [स अपर+सूर्य ]

**अपरस्वस्तिक**—न (ज्यो ) क्षितिजावरील पश्चिम दिग्बिंदु [स ]

**अपरा**—वि कनिष्ठ प्रतीची 'ही अपरा म्हणजे खालच्या प्रतीची ( प्रकृति ) झाली ' –गीर ७१५ अपर पहा [स अपरा]

**अपरा**—वि आपुरा, अखूड उ० अपरें नाक, अपरा अगरखा [स अ+पूर् प्रा. अ+पुर म अपुरा ]

**अपराजित**—वि अजिक्य 'सात्यकि अपराजितु'–ज्ञा १ १५२ **०अंगहार**–पु ( नृत्य ) दडपाद करून उजवा हात इकडे तिकडे फेंकणें, नतर व्यसितकरण करून त्यांतील डावा हात व डावा पाय पुढें पसरणें, मग दान वेळ निकुट्टित करून आक्षिप्त उरोमडल, करिहस्त व कटिच्छिन्न हीं क्रमानें करणें [स ]

**अपराजिता**—स्त्री १ ( विजयादशमीस जिची पूजा करतात ती ) दुर्गा देवी २ जमीनीवर पसरणारी एक वेल दूर्वा, शेफालिका, जयती, विष्णुक्राता, शमी वगैरे वनस्पति ३ ईशान्य दिशा ४ एक अक्षरगण, रामदूत यात प्रत्यक पादात १४ अक्षरें असतात उ० 'धन यश मिळण्या त्यजू निज तत्त्व मी?। रघुहृदयमणि तो न काहीं मला कमी ॥ ' –छर १३ [स ]

**अपराण्ह**—पु १ दिवसाच्या १९–२४ किंवा २१–२५ या घटका, दिवसाच्या पाच भागांपैकीं चौथा भाग, किंवा दिवसाचे दोन भाग केले असता दुसरा, तीन भाग केले असता तिसरा भाग २ तिसरा प्रहर [स अपर+अहन्]

**अपरात-त्र**—स्त्री अपररात्र, उत्तररात्र, मध्यरात्रीनंतरचा काल, रात्रीचा शेवट [स अपर+रात्रि]

**अपरांत**—पु कोंकण देश [स ]

**अपराद्**—पु (गो ) अपराध (अप )

**अपराध**—पु १ दोष, चुकी, अन्याय, अतिक्रमण गुन्हा, अधर्माचरण, दुर्वर्तन २ (कायदा) कायद्यानें शिक्षा सांगितलेलें एखादें कृत्य, किंवा अकृत्य (वर्तव्याकरण, हयगय) (क्रि० करणें) **॰पोटांत घालणें**–अपराधाबद्दल क्षमा करणें 'अपराध सर्व माझे घाली पोटात जोड मन वे ही। पावे सरी सुरासी, मर्त्यहि दाउनि दया समज देही॥' 'मागा अपराधा केले क्षमा' –मुसभा ७ ? [स]

**अपराधी**—वि दोषी, गुन्हेगार [स ]

**अपरापरी**—स्त्री १ दुर्दशा, वाताहत 'एके घरीं कोणी कोणासी न धरी। ऐसी अपरापरी केली आम्हा।'–तुगा ४०७८ [स अपरापरण=नि सतान] २ परकेपणा [अपर द्वि ]

**अपरिग्रह**—पु १ परिवारशून्यत्व २ उपाधिराहित्य उपाधि जवळ न बाळगणें, कोणत्याहि वस्तूचा स्वीकार न करणें 'साधूची अपरिग्रहता। परिग्रहो नातळे चित्ता।' –एभा ११ ९०१ ३ असंचय, दारिद्र्य, निर्धनता, अकिंचनत्व [स.]

**अपरिग्रही**—वि संगरहित, परिवार नसलेला 'सहज अपरिग्रही जे तिहीं लोकीं। तोचि म्हणावेनि॥' –ज्ञा ६ १०६ [स ]

**अपरिचित**—वि ओळख नसलेला, अनोळखी [स ]

**अपरिच्छिन्न**—वि क्रिवि अखंड, सतत, एकसारखा [स ]

**अपरिणीत**—वि (अप रूपें–अपर्णीत–र्णित ) अविवाहित, लग्न न झालेला [स ]

**अपरितुष्ट**—वि असंतुष्ट, असमाधानी, अतृप्त [स अ+परि+तुष् ]

**अपरितोख**—पु असंतोष 'तरी तेथिंचेनि अपरितोखें। क्षमावें ना।' –ज्ञा २ २६९ [स अपरितोष]

**अपरिमित**—वि १ अतिशय अगणित, असंख्य २ अनियमित, अमर्यादित, अचाट, अवाढव्य 'हा विघ्न अपरिमित माय आहे' ३ बाजवीपेक्षां अधिक फाजील 'जितक्यास तितकें बोलावें उगीच अपरिमित बोलू नये' [स ]

**अपरिहर**—वि टाळण्यास अशक्य, अपरिहार्य 'ते जन्म मृत्यु हे पाहीं। अपरिहर।' –ज्ञा २ १५८ [अ+परिहार्य]

**अपरिहार्य**—वि अनिवार्य न टाळतां येणारें, परिहार करण्यास अशक्य, अपरिहर, (ल ) असाध्य, असभ्य [स ]

**अपरीति**—स्त्री गैरशिस्त वर्तन, वाकडा मार्ग–रीत–चाल [सं अप+रीति]

**अपरीक्षित**—वि न तपासलेलें, न सिद्ध केलेलें, परीक्षा न केलेलें [स ]

**अपरूक्ष**—क्रिवि (गो ) अपरोक्ष, अभावीं [स अ+पर+अक्षि–अपरोक्ष]

**अपरूप-प-भ**—वि विचित्र, चमत्कारिक, विलक्षण, अद्भुत 'अपरूप होये ब्रह्मादिका।'–दावि ८७ [वैदिक स अप+रूप= कौतुक, आश्चर्य, आनद, किंवा स अपूर्व] २ दुर्मिळतेमुळें महत्त्व आलेलें, मौल्यवान, दुसऱ्या ऋतूत उत्पन्न होणारें पण सांप्रत मिळालेलें 'हें फळ या दिवसांत अपरूप आहे' [स अप+ऋतु–अपर्तु–अपरुक–अपरूप] ३ (ल) (कर्ना) दुर्लभ, दुष्प्राप्य 'देशावर फणसपोळी हा जिन्नस फारच अपरूप आहे' (ल) मुश्कील, मोताद, पारखा. 'अनाला अपरूप झाला' ४ (ल ) (व ) प्रिय, आवडतें 'त्याला केळ मोठें अपरूप आहे' ५ अपूर्व 'प्रभाकर गाई घुट। अपरूप अनुवुट। प्रला ११२ [स अपूर्व] ६ कुरूप, बेढब, वेडौल [स अप+रूप]

**अपरूपमेवा**—पु १ दुर्मिळ खाद्य २ (ल ) स्वत चें मूल, अपत्य [स अपूर्व+फा मेवा=फळ]

**अपरूपाई-याई-भाई-वाई**—स्त्री १ दुर्मिळता, अपूर्वाई, नवलाई, उत्कृष्टता, बहुमोलपणा २ दुर्मिळतेमुळें आलेलें महत्त्व ३ अत्यंत, वेड लागल्यासारखें प्रेम, अपरूप पहा

**अपरोध**—पु १ (वों ) अवरोध, विरोध, अडथळा २ लाजाळूपणा, विनय, सकोच, मर्यादा [स अप+रोध]

**अपरोधणें**—अक्रि १ विरोध होणें २ लज्जित होणें, थोडेसें गोंधळणें, सकोचणें [स ]

**अपरोक्ष**—वि दृष्टीआड नव्हे, अदृश्य नव्हे असा, दृश्य, दृगोचर –क्रिवि १ (चुकीनें पण रूढ) गैरहजेरींत, पाठीमागें, दृष्टीआड 'तो माझ्या अपरोक्ष माझी निंदा करतो' २ साक्षात, समक्ष, प्रत्यक्ष 'ज्यासि अपरोक्ष पूर्णप्राप्ति। तो सद्गुरु मूर्ति निश्चयें राया।' –एभा ३ ३१५ **॰बोध**–पु प्रत्यक्ष ज्ञान, अपरोक्षानुभूति 'स्वप्नींचे दरिद्र समर्थता। जेवीं मिथ्या दोन्ही जागतां। तेवीं द्वंद्वाभेची वार्ता। न बाधे गुरुभक्तां अपरोक्षबोधें॥' –एभा ३ ४७१ **॰स्थिति**–स्त्री साक्षात्कार 'प्राप्ती म्हणणें अपरोक्षस्थिति। भगवंत स्फूर्ती अनिवार।' –एभा २ ६०९ **॰ज्ञान**–न १ प्रत्यक्ष ज्ञान, साक्षात्कारपूर्वक ज्ञान २ आत्म्यासंबधीं किंवा ईश्वरासबधीं ज्ञान, आत्मज्ञान–प्रतीति 'अपरोक्षज्ञान प्राप्त। सद्गुरुचरणांचोनि न घडे।'–दा १ ५६ [स अ+पर+अक्षिन्]

**अपरोक्षानुभव**—पु ब्रह्मसाक्षात्कार [स ]

**अपर्याप्त**—वि अमर्यादित, अपार, अगणित —गीर ६०४ [स अ+पर्याप्त]

**अपलक्षण**—अवलक्षण पहा

**अपला**—आपला पहा

**अपलाण-णी**—वि अपलाणी, खोगीर न घातलेला (घोडा) [अ+पल्याण-णी फा पल्लान=खोगीर]

**अपलाद**—अफवाद पहा

**अपलाप**—पु १ सत्य लपविणें-टाळणें, सत्यगोपन २ अज्ञानप्रदर्शन, उडवाउडवी, विपर्यास 'ह्या रीतीनें कांहीं सत्याचा अपलाप करून वैचित्र्याचा कारभार सुरळीत चालवावा लागतो' –इमु ३५२ छेकापन्हुति पहा [स अप+लप्]

**अपलाला-ले, अपल्याआपण**—आपलाला वगैरे पहा

**अपवर्ग**—पु मोक्ष, चार पुरुषार्थांपैकीं चवथा, मुक्ति 'जया चिए गाविचा मार्गु। चुके साधनाचा वगु। तो देआवेया अपवर्गु। धावे परोपरीं।' –ऋ ७७ [स]

**अपवर्त**—पु १ संक्षेप देणें, काढून टाकणें २ (अंकगणित) सामान्य-साधारण भाजक [स अप+वृत्] ०क-पु वि ज्यानें संक्षेप देण्यात येतो तो अंक, संक्षेपक

**अपवर्तन**—न (अंकगणित) १ सामान्य भाजकानें भागणें, संक्षेप देणें २ संक्षेप देऊन आलेलें रूप उ० भाज्य ६४ व भाजक ४० यांना अपवर्तक ८ नें अपवर्तन करून ८ (भाज्य) व ५ भाजक) अशा लघुभूत राशी होतील [स]

**अपवाड**—पु बाल्याम असमर्थता, अकथनीयत्व 'वाचेरि अपवाडु।' –ज्ञा १३ ५६८ [प्रा अ+प्रवाद, प्रा अपवाड]

**अपवाद**—पु १ अयोग्य अन्यायमूलक निंदा, दोष 'हानि लाज न देखे। परापवादु नाइके।' –ज्ञा १३ ७९१ २ आळ, टपका 'धाता सागेन अपवादातें। सावधचित्तें परियेसी।' –एभा ९ २८७ ३ नियमविरुद्ध गोष्ट, नियमास बाध ०क,-वादी-वि १ अपवाद, नियमन करणारें, मर्यादित करणारें (वचन, वाक्य, विधि) २ अपवाद काढणारा निंदक, दोषी ३ (ल) वाईट बोलणें करणारा 'भूमीवरी मनुष्य लोक। असत्य निंदा अपवादक।' –सुव २ ६५ [स]

**अपवित्र**—वि १ अशुध्द अनिर्मळ गढूळ, अमंगळ, अस्वच्छ, घाणेरडें २ विधियुक्त नीतिवाह्य भ्रष्ट अतिशय पातकी ३ सोवळें नव्हे तें, ओवळें [स]

**अपविध्द(पुत्र)**—पु आईबापांनीं टाकलेला व दुसऱ्यानें पुत्राप्रमाणें मानलेला मुलगा मनूनें सांगितलेल्या बारा बारसपुत्रां पैकीं एक –मसु ९ १७१, –याज्ञ २ १३२

**अपविध्द(अंगहार)**—पु (नृत्य) हात अपविद्ध व सूचीविद्ध करणें करून हात उद्वेष्टित करणें, निकुट फिरविणें व मग उरोमंडल हात करून कटिच्छिन्नकरण करणें, ०करण-न (नृत्य) उजवा हात शुकतुंड करून एकदा मांडीजवळ फिरविणें व मांडीच्या पाठीकडे लावून ठेवणें व डावा हात वक्ष स्थलावर ठेवणें ०बाहु-पु (नृत्य) छाती वरील बाहु तोंडासमोरून डोक्यापर्यंत नेत असतांची स्थिति [स]

**अपविध**—अपविध्द-पुत्र पहा

**अपव्यय**—पु उधळेपणा, अतिशय खर्च, निरर्थक खर्च, उधळपट्टी, दिवाळखोरी —यी-वि अतिशय खर्च करणारा, उधळ्या [स अप+व्यय]

**अपशकुन**—पु १ अशुभ गोष्ट, दुश्चिन्ह 'सत्यवत म्हणे गावित्री। अपशकुन तुज देखा।' –वसा ५९ २ अवलक्षण [ग]

**अपशब्द**—पु १ (व्या) अशुद्ध शब्दप्रयोग, अपप्रयोग २ दुरुक्ति, शिवी, दुर्वचन, दुर्भाषण ३ अशुभ, अपशकुनी शब्द, वचन [स]

**अपशरण-न**—न १ (कों) आळ, तुफान (घेणें) २ वाईटपणाची जबाबदारी, अपेश, टपका दोष [स अपसरण]

**अपशांच, अपशेंच, अपशां-शीं**—क्रिवि आपोआप, आपसुक, आपण होऊन, आपशाच [स आत्मन्-अप+स्वयमेव]

**अपशारण**—पु. (गो) विनाकारण आळ, अपशरण पहा [स अपसारण]

**अपशोषण**—न (शाप) शोषण, शोषून घेणें, आत्मसात् करणें [स]

**अपसंत-द**—वि अप्रिय, न आवडणारें [स अ+फा पसद]

**अपसद**—वि दुष्ट, अधम 'अरे –अरेरे सुतापसदा' तू माझी निंदा करतोस काय?' –गोड वेणीसंहार अं ३ [स]

**अपसया**—क्रिवि आपोआप, अपसुक, 'उगळोनि सर्पांचीं वेटाळीं। कुर्डी पडलीं अपसया।' –मुआदि ९ ४,'अपसया सिद्धि विचित्र होत।' –दावि २६ [स आत्मन्-अप+स्वयम्]

**अपसर, अप्सर, अफसर, अफ्सर**—पु. अधिकारी [इ ऑफिसर (अप)]

**अपसरण**—न १ दूर सरणें, जाणें २ आळ,टपका, बोल, दोष अपशरण पहा [स अप+सृ=सरणें]

**अपसर्प(अंगहार)**—पु (नृत्य) अपक्रांतचारी करून, उजवा हात व्यंसितकरणातील करणें, नंतर तोच हात उद्वेष्टित करणें व अर्ध सूचीकरण करणें, नंतर विक्षिप्त कटिच्छिन्न, उद्वृत्त, आक्षिप्त, करि हस्त व कटिच्छिन्न हीं क्रमानें करणें [स]

**अपसव्य**—वि १ उजवा, डावा नव्हे 'सव्य अपसव्य भोंवडी गदा' –एरुस्व ९ ४८, 'सव्यें मिनल्या महानदीसी। अपसव्यें आल्या गावरासी।' –एभा ११ ८६२, 'पितरस्वरुपीं तृप्ति जाहली। सव्य सें करण अपसव्य।' –तुगा ३७८० २ विरुद्ध, उलट, विपरीत जसें, उजवीकडून डावीकडे लिहित जाणें (फारशी उर्दू लिहिणें) उजव्या खांद्यावरून जानवें घालणें (श्राद्ध इ. समयें) [स]

**अपसांत**—क्रिवि आपापल्यात ( भाग्णें, समजणें ) आप सात पहा

**अपसातुपसी**—स्त्री हमरीतुमरी, विरोध, वादविवाद कलह भाण्ण [ आप( मी )+तू ]

**अपसारण**—न दूर करणें, काढून टाकणें [ स अप+सृ ]

**अपसारित**—वि दूर केलेला, टाकलेला [ स अप+सृ ]

**अपसिध्दांत**—पु चुकीचा निर्णय तर्कशास्त्रास सोडून केलेला निकाल [ स ]

**अपसु-(सू)क, अपसुख-खें**—क्रिवि आपोआप, आपल्या मतोषानें, आपण होऊन, राजीखुषीनें [ स आत्मसुखेन ]

**अपसूर**—पु ( गाण्यातील आवाज, सूर ) षड्जादि स्वराच्या मर्यादेचा भ्रंश होऊन जो भलताच स्वर निघतो तो, याने स्वर लागणें —वि बेसुर, स्वरशून्य रुक्ष [ स अपस्वर अप ]

**अपसुऱ्या**—वि बेसुर आवाजाचा ( गवई वाद्य )

**अपसूर्य**—अपरसूर्य पहा

**अपसृत**—वि दूर केलेला दूर अंतरावर गेलेला अपसारित पहा ०पार्श्व—न ( नृत्य ) एका पायाच्या चवड्यावर उभें राहून वर्तुळाकृति करीत असतां वरचा सर्व भाग फिरवावा लागतो तो फिरवून पुन्हा जशाचा तसा आणण्याची क्रिया [ स ]

**अपसोस**—अफसोस पहा

**अपसोशी-सी**—वि दु ख करणारा, दु खी [ फा अफ्सोस ]

**अपस्कंदित(भौमीचारी)**—वि ( नृत्य ) एक पाय दुसऱ्या पायापासून मागच्या बाजूस पाच ताल सोडून ठेवणें [ स ]

**अपस्नात**—वि मृत माणसाच्या उत्तरक्रियेसाठीं बरोबर गेल्या मुळें स्नान केलेला —स्नान—न १ वरील कारणामुळें करावें लाग णारें स्नान २ मृतासबंधीं स्नान [ स ]

**अपस्मार**—पु फेंफरें घुरें भुरें मिरगी, मनोवहस्रोतसामधील दोष काळजी व शोक इत्यादिकांनीं प्रदुषित होऊन स्मृतिनाश करून अपस्मार उत्पन्न करतात या जाती धडधडणें स्मरणशक्ति नाहींशी होणें घाम येणें, मूर्च्छा येणें ताडातून फेंस व र स्रवणें असतात [ स अप+स्मृ=स्मरण करणें ] अपस्मार एका आर्मी त भीति पाणिया लागी।' —गीता १३ २४९३

**अपस्मार**—वि दुष्ट, मृत्युसमान पापी अपस्मार जनीं। राहेसा जाणावे।' —दा १८ ६ १ —न ( गा ) १ अपथ्य २ अप स्मारण ०पण—न आवाक्याबाहेर काम करणें [ अप+मारण ]

**अपस्मरी**—वि अपस्मार रोग असलेला [ स ]

**अपस्वर**—अपसूर पहा

**अपहरण**—न हिरावून घेणें, लुटणें लुबाडणें, नागविणें [ स ]

**अपहर्ता**—वि लुटणारा, हिरावून घेणारा, लुबाडणारा [ स ]

**अपहस्तकी, अपहस्तें**—आपल्या हातें आपहस्तक पहा ' या ब्राह्मणाचें कार्य अपहस्तें परहस्तें होईल तितें करावें '

**अपहार**—पु १ अन्यायानें घेणें, कपटानें संपादन करणें, लबाडीनें मिळविणें २ अन्यायानें संपादन केलेलें द्रव्य ' आइते अपहार। आणूनिया भरी घर।' —तुगा १९७४ ३ ज्याचें अपहरण झालें आहे त्यास होणारें दु ख [ स अप+हृ— हरण करणें ]

**अपहारक-री**—अपहर्ता पहा [ स ]

**अपह्नव-अपह्नुति**—पु स्त्री १ कपटयुक्त, लपविणें, दड विणें 'करीतसे नित्य अपह्नवाला।' —सारुह २ ७४ २ एक अर्थालंकार उपमेय उपमान असल्याचें वर्णन, उपमेयावर त्याच्या वास्तविक स्वरूपाचा अपलाप करून उपमानाचा आरोप करणें हा अलंकार उपमेचाच एक प्रकार आहे उ० ' न हें नभोमंडल वारि राशि।' इ०

**अपळाण-णी**—अपलाण-णी पहा

**अपळें**—वि ( व ) पूर्ण दिवस भरण्यापूर्वी जन्म झाल्यानें अवयवाची संपूर्ण वाढ न झालेलें ( मूल ) [ स अ+पूर्ण=पुरें, प्रा अप्पउलिय=न पिकलेलें ]

**अपक्ष**—वि १ पंख नसलेला ( मनुष्य, पशु इ ) २ कोण तीहि बाजू नसलेला ०पात—पु १ पक्ष, बाजू, तर्फ न घेणें, कोण त्याहि बाजूचा कैवार न घेणें २ लोकाची भीडमुर्वत न ठेवणें [ स ]

**अपक्षय**—पु ऱ्हास, उतार, उतरती कळा, क्षय, कमजोरपणा चंद्रकलाची शुक्लपक्षीं वृद्धि आणि कृष्णपक्षीं अपक्षय होतो ' [ स अप+क्षी ]

**अपक्षिप्त**—वि खालीं फेंकलेलें, टाकलेलें [ स अप+क्षिप ]

**अपक्षीण**—वि ऱ्हास पावलेला, अवनत स्थितीस आलेला, उतरती कळा लागलेला, कमजोर झालेला [ स अप+क्षी ]

**अपक्षेप-ण**—पु न खालीं फेकणें, टाकणें

**अपा-प्पा**—पु १ थोर किंवा वडील इसमाचें आदरानें घ्याव याचें टोपण नाव २ लहान मुलास लेखलेलें प्रेमाचें नाव ३ (वरील अर्थी ) नावाच्या पुढें हा शब्द कित्येक वेळा जोडतात उ० चिमाजी अप्पा म्ह० सोनार, शिंपी कुळकर्णीअप्पा। तिघांचा संगत जार चाप्पा॥ ०शाही जोडा—अप्पा नावाच्या कोणा व्यक्तीनें वापरलेल्या जोड्यासारखा जोडा [ द्राविडी प्रा का अप्पा=बाप अप्प=बाप ]

**अपात**—अपघ पहा [ स ] ०पत्र—न ( जात गणनें ) एका यास जातीबाहेर टाकल्यावद्दलचें निर्णयपत्र

**अपांग**—पु १ डोळ्याच्या बाहेरच्या बाजूचा कोण, नेत्रप्रांत २ कटाक्ष दृष्टिक्षेप ' ज्याचेन कृपाअपांगें।' —एभा १ ७९ ' कृपा पांगें निमिषें करी संसार भिंगा ' —गीतागाथा १३ [ स ] ०पात—पु कटाक्षपात ' जयाचेनि अपांगपातें। धर मोक्षपर्णी भात।' —अमृ २ ८

**अपांग**—वि १ अवयवात किंवा इंद्रियात व्यंग, खोडी असलेला, विकलांग उ० आंधळा, बहिरा, लंगडा [स अप+अंग] २ (कों) स्वतंत्र

**अपांगणें**—अक्रि १ विघ्न उपस्थित होणें, उराळणें, लंगडे होणें, हातपाय मोडल्यासारखें होणें, नडणें २ आपगणें पहा [अपांग]

**अपाड-डु-डें**—वि क्रिवि १ अतिशय, फार 'एऱ्हवीं या लक्षणाचिया निजसारा। मी अपाडें कीर अपुरा।'—ज्ञा ६ १४० 'याच्या बळा ब्रह्मांडगोळा। तुळिता उणा अपाडें।'—मुआदि २७ १८३ २ अप्रतिम 'जरी चतुर अपाडाचा।'—विपू १ १७ ३ अशक्य, योग्यतेबाहेरचा 'म्हणऊनि अपाडु हें आघवें। निर्धारितां।'—ज्ञा १ ६९ ४ अंतर, असाधारणत्व, असादृश्य 'वनका आणि कापूसा। अपाडु का जैसा।'—ज्ञा १३ ११०१ 'आणिकही अपाड तुज आणि देहासी॥'—रयोवा ६ ३२८ [स अ+प्रति, प्रा अ+पडि]

**अपाड**—वि अपक्व, कुचींचें, खारटें 'तुम्हीं चाखिजे हें मत कुड। अपाड् वीं।'—शिशु ४८५ [अ+पक्व=पाक=पाड]

**अपात्र**—वि अयोग्य (दान करण्यास वगैरे), नालायक 'देता न म्हणसी पात्रापात्र।'—ज्ञा ११ ५८ [स] ०दान—न अयोग्य ठिकाणीं दिलेली देणगी 'अपात्रदानें दरिद्र पूर्ण।' [स]

**अपाद्**—वि ज्यास पाय नाहींत असें [स]

**अपादणें**—क्रि सपादणें [स अप+आ+दा]

**अपादान**—न १ पंचमी विभक्तीचा अर्थ २ दूरीकरण, वियोग ३ पंचमी विभक्तींतील नाम [स अप+आ+दा]

**अपान**—पु. १ पंचप्राणांपैकीं दुसरा, अधोगामी वायु, हा गुद प्रदेशीं राहतो, पाद 'मग अपानामीचे मुखीं। प्राणद्रव्यें देखीं।'—ज्ञा ४ १४५ 'कठीं उदान गुदीं अपान।'—दा १७ ८ १२ 'प्राणापानाची चुवाचुकी। जाहली होती बहुकाळ वरी।'—एभा ९ ११८ २ गुदद्वार ३ आंत येणारा श्वास —गीर ६७८ (हा अर्थ नेहमींच्या अर्थाहून भिन्न आहे) [स] ०द्वार—न गुदद्वार, मलद्वार ०वायु—पु १ गुदद्वारीं स्थिर झालेला वायु २ पाद अपान पहा [स] ०रंध्रद्वय—न शिश्न व गुद 'अपानरंध्रद्वया-।माझारीं चवघा।'—ज्ञा १८ १०३६ 'अपानीं मेखा मारणें'=आडरानी खुनी ठोकणें, पूर्वीच्या शिक्षांपैकीं एक 'कानीं खुंट्या आदळती। अपानीं मेखा मारिती।'—दा ३ ७ ७३ [स]

**अपाप**—अ आपोआप आपल्याआपण, आपण होऊन 'जशी त्यास गरज लागते तशी त्याचीं आच्छादनें अपाप बदलतात'—मराठी ६ वें पु (१८७५) [स आत्मन्—आप]

**अपाप**—वि निष्पाप, निर्दोष, शुध्द [स अ+पाप]

**अपांपति**—पु. समुद्र 'मोक्षासकट गती। जेथें यती विश्रांति। गंगादि अपांपती। सरिता जैशी।'—ज्ञा १३ १०७४ [स अप—अपाम्+पति]

**अपांपरी**—स्त्री अव्यवस्था, दुर्दशा, अपरापरी पहा 'इंद्रियें प्रकृति मूर्च्छी। वाचा प्राणासि चुकली। ऐसी अपांपरि होतां जाली। शरीरमार्गी।'—राज्ञा ११ ६५५ [स अप+प्रति-परि]

**अपापला**—आपापला पहा

**अपापा**—आपापा पहा

**अपापी**—आपापी पहा

**अपामार्ग**—अघाडा पहा

**अपाय**—पु इजा, विपत्ति, अनर्थपात, कहर, आपदा, विनाश 'शिणता बाप उपायीं। जन अपायीं पडताती।'—एभा १३ ५३८ [स] ०यंत्र—न अपायकारक प्रकार, युक्ति 'एका लागीं उभारिती। अपाययंत्रें।'—ज्ञा १६ ३४४

**अपायी**—वि अपायकारक [स]

**अपार**—वि १ अमर्याद, अपरिमित, अंत नाहीं असें 'हें अपार कैसेनि कवळावें।'—ज्ञा १ ७४ २ अतिशय, पुष्कळ, फार, 'तेणें देवयानीच्या चित्ता। स्नेह वाढला अपार।'—मुआदि १७ ५५ [स अ+पार]

**अपारणें**—क्रि दूर जाणें, कमी होणें, उतार पडणें, ओसरणें (नदी, त्रास, दुःख) [स अ+पृ]

**अपारदर्शक**—वि ज्याच्यातून पलीकडचें दिसत नाहीं असें (भिंग वगैरे) [स]

**अपारस्थायसंचारता**—स्त्री (संगीत) गाताना अनेक रागावयव रचण्याचें ज्ञान असणें [स]

**अपारा**—अपार पहा

**अपारांतर**—वि अमर्याद अंतरावर असलेलें —न फार अंतर 'एव तपसाधन जें ठेलें। अपारांतरें।'—ज्ञा ११ ६२० [स अपार+अंतर]

**अपारू**—वि अपार पहा 'जो अपारू सुस्वादु। निस्तरंगु अगाधु।'—ऋ २ [अ+पार]

**अपार्थ**—वि निरुपयोगी निरर्थक 'जेण सत्य अर्थ नाहीं। तो अपार्थ म्हणिज पाहीं।'—एभा २८ १५९ [स अप+अर्थ]

**अपालिपा**—पु (ल) लपंडावाचा एक खेळ, आंधळी कोशिंबीर [स लिप-द्वि०]

**अपाव-वो**—अपाय पहा 'विकळ जाहलिया साधनामी। ये साधकासी अपावो॥'—एभा २९ ६८

**अपावृत**—वि प्रकट, उघड 'तेथ अपावृत जाहले। इंद्रिया नळ।'—ज्ञा ४ १२८ [स अप+आ+वृ]

**अपास्त**—वि दूर अंतरावर टाकलेला, फेंकलला [स अप+अस्त]

**अपितर**—न (व) बदनाम, खोडकर, उनाड अप्तर पहा.

**अपितार**—पु (कु) अजागळ व्यक्ति [अर अग्गार=बिघड लेला, छद्मी]

**अपिधान**—न झाकणें, आच्छादन, रपविणें 'भरलें रति सागरीं विषयउधान। करू कुठवर करीं अपिधान।' —प्रला ३९ [स पिधान]

**अपील**—न १ खालच्या न्यायाधिशानें दिलेला निकाल तपासण्याकरिता वरच्या न्यायाधीशाकडे अर्ज करणें, रवार मागणें, विनंतिअर्ज 'त्या अपिलाचा जो निकाल होईल तो कायमचा वज्र लेप समजला जाईल' —धका १२२ —**लेटकोर्ट**—न मूळ दिवाणी किंवा फौजदारी कोर्टांनीं दिलेल्या निकालाचा फेरविचार करणारें वरच्या दर्जाचें न्यायासन [इ]

**अपुत**—वि अशुध्द, अपवित्र 'स्पर्शुनि अपुत केली ते कशी पूत नारी' —नराधा ८ [स अ+पूत]

**अपुत्र-क, अपुत्री-क**—वि निपुत्रिक, संतति नसलेला संतानविरहित, अपत्याशिवाय म्ह० अपुत्रिकाचें अन्न खाऊ नये [स]

**अपुनरावृत्ति, अपुनर्भव**—स्त्री परत येण्याचा अभाव असेरची मुक्ति, मोक्ष (जेथून पुन्हा जनन-मरण लागत नाहीं), निर्वाण, जननमरणाच्या फेऱ्यापासून आत्म्याची मुक्तता [स]

**अपुनर्लभ्य**—वि पुन्हां न मिळणारें, प्राप्त न होणारें [स]

**अपुरकीं**—क्रिवि (गो) पश्चात्, मागें, (म) अपरोक्ष, (स परोक्ष)

**अपुरता-अपुरा**—वि १ पूर्ण न भरलेला, न संपलेला, पुरा न झालेला, कमी असलेला २ पुरेसा किंवा भरपूर नसलेला, उणा, थोडा, असमर्थ, अयोग्य 'मी अपाडें वीर अपुरा।' —ज्ञा ६ १४० ३ अपरिपक्व, अर्धवट, पोरकट 'अपुरती बुद्धि पुण्य नाहीं गाठीं।' —तुगा १८७८ [स अपूर्ण]

**अपुरवाय, अपुर्वाय**—स्त्री (गो) १ नवलाई, अपूर्वता 'त्या गोष्टीची इतकी अपुरवाय ती कसली?' २ अतिशय ममता, प्रेम, लाड 'काय त्या मुलाची अपुरवाय करताय?' [स अपूर्व-अपूर्वाई]

**अपुलिया**—(काव्य) आपल्या 'दावावें ख़ुशालत्व त्या अपुलिया।' —विविभामिनी ८ ६ ११९ आपुलिया पहा

**अपुष्पवनस्पति**—स्त्री (शाप) वनस्पतिशास्त्रातील दोन मुख्य भागांपैकीं एक ही वनस्पति जननपेशीपासून उत्पन्न होत व सपुष्प क्रियांपासूनहि होते —शाको अ २०७ [स]

**अपूज्य**—वि पूजेस-आदरास पात्र नसलेलें [स]

**अपूट**—वि १ अस्पृष्ट, हात न लावलेलें (न मोडलेलें, न उप टलेलें पत्र, अन्न इ) 'पुजसुरीयाची वस्ती अपूट होती, त्यांहि मुलूख सांपडली' —भाव १२१ २ स्वतंत्र शिक्के राहिलेलें, वग ळलेलें ३ वैषयिक समागम झाल्यानें दूषित न झालेला (पुरुष, स्त्री) ४ अशिक्षित, वठणीस न आणलेलें (अपेट या अर्थी) ५ (व्यापक) अचूक, अचानक याअर्थी [स अस्पृष्ट]

दाको १ ११

**अपूप**—पु अनरसा, घारगा 'निर्वे नारिंगें नारळे। अपूप लाडू अमृतफळें।' —एरुस्व ६ ८६ [स]

**अपूर**—स्त्री उणीव, कमतरता, उणेपणा, भरपूर नसणें अपुरा पहा [सं अ+पूर्ण] ०**नपूर**—स्त्री किंचित् उणीव असलेलें

**अपूर्ण**—वि १ न भरलेलें, अपुरें, कमतरतेचें, पूर्ण नसलेलें, कमी असलेलें २ निष्णात किंवा तरबेज न झालेला ३ अतृप्त, 'आणि पसरलिया अभिलाषु। अपूर्णुं होय तोचि द्वेषु।' —ज्ञा १६ ३३९ ०**भविष्य**-पु (व्या) एखाद्या क्रियेस प्रारंभ होऊन तिचा व्यापार त्या काळीं चालत राहणार असेल, असा बोध ज्या क्रियापदरूपापासून होतो त्याचा काल उ० 'मी करीत असेन' ०**भूत**-पु (व्या) हा काळ एखादी क्रिया अर्धवट झालेली असून पुरी व्हावयाची असते असें दाखवितो या काळाच्या ठायीं क्रियेची अपूर्णता दर्शविली जाते उ० 'मी करीत होतों' ०**माफी**-स्त्री सान्याचा कांहीं भाग भरावी लागणारी जमीन [स अपूर्ण+अर माफी] ०**वर्तमान**-पु एखादी क्रिया चालू आहे असें दाखविणारा काळ, या काळाचे ठायीं अर्थभेद इतका आहे कीं याचा प्रयोग असतां कर्ता जो आहे त्याची त्या त्या क्रियेच्या ठायीं जी तात्कालिक निमग्नता तिचा बोध होतो उ० 'मी करीत आहें' [स अ+पूर्ण]

**अपूर्णांक**—पु पुरा नसलेला अंक, अंकाचा भाग उ० एक चतुर्थांश, सात अष्टमांश ०**गणित**-न अपूर्णांकाचें गणित किंवा उदाहरण [स]

**अपूर्व**—वि १ पूर्वी कधीं न घडलेलें, झालेलें, प्रथमचें, अगोदरचें, आरंभाचें या गावात मार्श येणें हें अपूर्वच आहे' २ विलक्षण, चमत्कारिक, असाधारण ३ अद्भुत, आश्चर्यकारक, असामान्य, श्रेष्ठ दर्जाचें, अत्युत्कृष्ट, फार मोलाचें 'म्हणौनि तया निर्मळा। सुप्त ज्ञानी सरळा। अपूर्व ये फळा। सात्त्विक तें।' —ज्ञा १४ २६१ —न चमत्कारिक, आश्चर्यकारक गोष्ट, अद्भुत वस्तु, नवल 'येता दखिलें मार्गांतीं। अपूर्व परियेसा।' —गुच ३४ १०२ —न (तत्त्व) पूर्वजन्मविरहित इह जन्मातील कृत्यापासून होणारें पापपुण्य, सुखदु ख होण्याविषयीं प्रयोजक आत्म्याच्या ठायीं पापपुण्यात्मक कर्मजन्य जो संस्कार राहिला असता तें ०**दर्शन**-न १ पहिलें दर्शन २ कांहींतरी नवीन किंवा चमत्कारिक पाहणें. [स]

**अपूर्वाई-यी**—स्त्री अपुर्वाय पहा विलक्षणपणा, असाधारणपणा, उत्कृष्टपणा, नवलाई, अत्यंत कौतुकपणा ०**करणें**-क्रि कौतुक करणें, फार प्रशंसा करणें, फार फार मानणें [सं अपूर्व]

**अपूर्वाय**—स्त्री (गो) अपूर्वता, अपुरवाय पहा

**अपूस**—पु (गो) एक उत्कृष्ट जातीचा आंबा हपूस [पोर्तु आल्फान्सो]

**अपृष्ठवंश-वंशीय**—पु (प्राप) पाठीला कणा किंवा मणके नसलेला एक प्राणिवर्ग (इं) इन्व्हर्टेब्रेट [स]

**अपेट**—वि १ अडेल, अड न वठविलेला (बैल, पशु) द्वाड 'अपेट वृषभ असती सात। त्यांसी घालील जो नाथ।' —कथा ४ ११ ११२ २ अगातली रग न मोडलेला, वठणीस न आलेला, नरम न झालेला, काम न शिकविलेला, तरबेज न झालेला ३ अननुभवी ४ संसारकृत्य इत्यादिकांनीं जर्जर न झालेला, जगन्तील अनभ्यस्त [स अ+पिट, प्रा पिट्ट-पेट्ट-पेट]

**अपेटी**—वि (व) १ रस्त्यापासून दूर, आडवळणीं, एका बाजूस 'तुमचा गाव अगदीं अपटीस पडला' [स अपेत]

**अपेंडिक्स**—न. १ पुरवणी, परिशिष्ट २ आटातील आतड्याचा शेपटासारखा एक लहान भाग, आन्त्रपुच्छ **अपेंडिसाइटिस**—आंत्रपुच्छदाह नावाचा एक रोग मोठ्या आतड्यापासून लांबट पोकळ अरुंद अशी जताकृति एक नळी निघालेली असत हिचें मोकळें तोंड मोठ्या आतड्यातील पोकळीशीं जोडलेलें असतें व त्याच्या मुखावर अपुरा पडदा असतो या नळीच्या पोकळींत दाह अथवा सूज, पू उत्पन्न होतो त्यास हें नाव आहे [इं]

**अपेत**—वि दूर गेलेला, मार्गच्युत-भ्रष्ट [स अप+इ=जाणें]

**अपेप**—आपोआप पहा 'सहस्र वर्षे होता पूर्ण। अपपचि उलेल हें।' —मुआदि ४ ३९

**अपेय**—वि पिण्यास अयोग्य, शास्त्रानें पिण्यास निषिद्ध मानलेलें (दारू इ०) 'का बधिराचे नीट कान। अपेया नाम पान।' —ज्ञा १८.५८० [स] ०पान—दारू वगैरे निषिद्ध पेयाचें सेवन करणें

**अपेरण**—न (प्राप) किरणाचें अकेंद्रीभवन, केंद्रातून न जाणें, अपायन (इं) ॲबरेशन [स]

**अपेश**—न अपयश दुष्कीर्ति, पराभव 'आणि अपश तें न येचेल। कल्पांतवरी।' —ज्ञा २ २०१ [स अपयश] **-शाचें खापर-टोपलें-मोटखुळें**—न अपमानाचें व लाजेचें (कांहीं अनिष्ट कृत्यामुळें) दुसऱ्यानीं टाकलेलें-लादलेलें ओझें (वर किंवा डोक्यावर शब्दावरोबर आण दे घाल, घे, ये, फोड, या क्रियापदांशीं योजतात) [अप रूप अपेस]

**अपेशी**—वि पराभव झालेला दुष्कीर्ति पावलेला [अपयशी]

**अपेष्टा**—स्त्री त्रासदायक दुःखदायक स्थिति, कष्ट, त्रास सोंकटें, ल्चाड, ब्याद विघ्न [स अप+इष्ट]

**अपेक्षणीय**—वि वाट पाहिलेला मार्गप्रतीक्षा केलेला, आशाळ भूताप्रमाणें पाहिलेला-शोधलेला, आशा वाटत असलेला, वचन किंवा खात्री दिलेला २ इच्छा करण्यास योग्य 'अपेक्षणीय जें कांहीं। तें मीचि केला।' —ज्ञा १८ १११८ [स अपेक्षणीय]

**अपेक्षणें**—अक्रि इच्छा करणें, वाट पाहणें, जरूर असणें 'जें अपेक्षिजे विरक्तीं। सदा अनुभविजे संतीं।' —ज्ञा १ ५३ [स अप+ईक्ष्]

**अपेक्षया**—शअ. पेक्षां उ० तदपेक्षया=त्यापेक्षा, मदपेक्षया=माझ्यापेक्षां [स]

**अपेक्षा**—स्त्री १ इच्छा, वांछा, आकांक्षा, वासना 'ऐसी अपेक्षा जालिया। बद्ध मुमुक्षुते आलिया।' —ज्ञा १८ १४४१ २ गरज, कारण प्रयोजन, जरूरी, मागणी ०करणें-(मिळण्याच्या) आशेनें किंवा इच्छेनें पाहणें, वधणें, शोधणें, मार्गप्रतीक्षा करणें, इच्छा करणें ०बुद्धि-स्त्री आकांक्षा, मनीषा, आशा (कांहीं मिळण्याची) (क्रि० धरणें, ठेवणें, करणें) [स]

**अपेक्षित**—वि १ आशानें इच्छिलेलें, मार्गप्रतीक्षा केलेलें 'काय अपेक्षित तुमचें चित्त। तें निश्चित मी करीन।' —एरुस्व ३ ४२ २ वांच्छित, इच्छित ३ जरूर असलेलें 'मग अपेक्षित जें आपुलें। तेंही सागती पुसिलें।' —ज्ञा ४ १६८ [स]

**अपेक्षितव्य**—वि १ अपेक्षा करावयाचें २ काम्य, स्पृहणीय, इच्छिण्याजोगें [स]

**अपेक्षी**—वि १ अपेक्षा, इच्छा करणारा २ गरजू [स]

**अपेता-तें**—वि स्वाधीन, प्राप्त, वश [स आप्त]

**अपैशुन-न्य**—न सरळपणा, प्रामाणिकपणा, इमान, दोष टाळून गुण घेण्याची दृष्टि, सौजन्य 'अगा अपैशुन्याचें लक्षण। अर्जुना हें पुढें जाण।' —ज्ञा १६ १५३ [स अ+पैशुन-न्य]

**अपेसा-सां-सें**—आपैसा पहा

**अपोआप**—आपोआप पहा

**अपोशन, अपोषण, अपोष्णी, अपूष्णी**—न पाणी पिणें १ आचमन, ब्राह्मणादि त्रैवर्णिकांनीं सध्यादि कर्माच्या वेळीं किंवा भोजनाच्या वेळीं चित्राहुती घातल्यानतर व भोजनातीं तळहातावर थोडें पाणी घेऊन आचमनासारखें एकदाच पिणें 'शुद्ध मतीनें आपण। कृष्णासीं दिधलें आचमन। तीन वेळां न करी जाण। सर्वापोशन एकवेळां।' —एरुस्व १५ १४६ २ (कर्हा) न्हात जेवावयास बसताना सासूनें आपल्या पतीचें नाव घेऊन जावयाच्या हातावर तूप घालणें ३ (ल) त्याग, 'केलें अपोषण कर्मासी॥' —निगा ४० [सं आप +अशन]

**अपोस**—अपूस पहा

**अपोहन**—न त्याग, दूर करणें, घालवणें 'सविलास अविद्यानिरसन। अपोहन या नाव।' —एभा १३ १८५ 'अगा सर्व मनाचें अपोहन।' —स्वोवा ३ ३६७ [स अप+ऊह्]

**अपौरुष**—वि १ मनुष्यानें केलेलें नव्हे तें, ईश्वरकृत 'वेद हे अपौरुष आहेत' २ मनुष्याच्या अवाक्याबाहेरचें, दैवी, अतिमानुष. ३ भित्रें भित्रेपणाचें [स]

**अप्**—न पाणी, आप [स ]

**अप्तर**—वि १ बिघडलेलें, दोषयुक्त, नासलेलें 'तिनवा बयान श्रीमंतास लिहिला असता बाजी अप्तर होती '–रा ५ ११६ २ उनाड, उजाड [अर अब्तर]

**अप्तरी**—स्त्री बिघाड, नुस्कान [अर अब्तरी]

**अप्ती**—स्त्री १ आपत्ति, संकट २ वाण, उणीव [स आपत्ति अर आफत्]

**अप्पा**—अपा पहा.

**अप्पाधप्पा**—पु ल्हान मुलांचा एक खेळ–'अप्पा धप्पा। वेणी वेणी गप्पा। आणा दोर। बांधा चोर।' इत्यादि गाणें म्हणून टाळ्या वाजवीत फिरावयाचें अप्पाधोप्पा असेंहि म्हणतात

**अप्रकट**—वि अप्रकट अप्रगट १ अप्रसिद्ध, विख्यात नसलेला उघड न केलेला, न दाखविलेला २ अस्पष्ट, संदिग्ध [स अ+प्रकट]

**अप्रकांडकथा**—स्त्री विसंगत भाषण, भाकडकथा, अवांतर कथा, आडकथा [स अ+प्रकांड=दांडा]

**अप्रकृत**—वि १ विषय, प्रसंग सोडून असलेलें, विसंगत २ असंबध्द, अप्रस्तुत –न्यायप १३६ –न (साहित्य) उपमान [स]

**अप्रगल्भ**—वि अपक्व, पूर्णावस्था प्राप्त न झालेलें, कच्चें, पूर्ण न झालेले (विचार वगैरे) [स ]

**अप्रज**—वि १संतान नसलेला २ प्रजा–लोक नसणारा, उजाड (गाव, राज्य वगैरे) [स अ+प्रजा]

**अप्रणीत**—वि १ न केलेलें, न बनविलेलें २ न रचलेलें, अप्र बधित [स ]

**अप्रतर्क्य**—वि तर्क न करता येण्याजोगें, न जाणण्याजोगें (ईश्वर स्वरूप–महात्म्य इ०) [स ]

**अप्रतिबंध**—वि १ अडथळा न केलेलें, अटकाव, हरकत नसलेलें, २ (कायदा) अनिर्बंध, निर्विवाद, तंटा, भांडण किंवा वाद नसलेलें (वतन वगैरे) ०दाय–पु ज्या मिळकतीवर जन्मत च सत्ता प्राप्त होते म्हणजे सत्ता प्राप्त होण्यास कोणत्याहि प्रकारच्या अटकाव नसतो ती मिळकत बापरोगी (इ) अनऑब्स्ट्रक्टेड हेरिटेज याच्या उलट सप्रतिबंध–दाय ०व्यापार–पु खुला व्यापार आयात व निर्यात मालावर जकात न घेण्याची पद्धति (इ) फ्री ट्रेड 'अर्थ शास्त्रावरील इंग्रजी पुस्तकांत अप्रतिबंध व्यापाराचें जें महत्त्व गाईलें असतें, '–टि १ ५१६ [स ]

**अप्रतिभट**—पु दुसरी तोड किंवा जोड नसलेला योध्दा दुसरा प्रतिस्पर्धी नाहीं असा, सेनापति [स अ+प्रति+भट=योध्दा]

**अप्रतिम**—वि १ दुसरा बरोबरी करणारा ज्यास नाहीं असा जोड किंवा तोड नसलेला २ अद्वितीय, अनुपम [स अ+प्रतिमा]

**अप्रतिमल्ल**—पु बिनजोड पहिलवान, अप्रतिभट पहा 'हे अप्रतिमल्ल जगीं। पुरता प्रतापु अंगीं।'–ज्ञा १ ११० [स ]

**अप्रतिरथ**—वि अविवादित मिळकत, अप्रतिबंधदाय पहा [स ]

**अप्रतिष्ठा**—स्त्री १ दुष्कीर्ति, दुर्लौकिक, अपमान, फजीती, मानखंडणा [स ]

**अप्रतिहत**—वि अनिरुध्द, स्वैर, अनिर्बंध, नेहमीं, सदोदित असणारें, अव्याहत 'कोणत्याहि भाषेची प्रगल्भता म्हणजे सर्वत्र तिचा अप्रतिहत संचार सुरू असला पाहिजे '–टि ४ ८ १५७ [स ]

**अप्रतीत**—वि माहीत नसलेलें, अननुभवी, अपरिचित [स ]

**अप्रतीति**—स्त्री अनुभवाचा अभाव, प्रतीति, अनुभव, माहिती नसणें [स ]

**अप्रत्यय**—पु अविश्वास, विश्वासाचा, भरवशाचा अभाव, बेभरवसा [स ] –यी–वि अविश्वासी, बेभरवशी

**अप्रत्यक्ष**—वि समक्ष नव्हे तो, एकाद्याच्या पाठीमागें ०कर–पु प्रत्यक्ष व्यक्तीवर न बसविता मालावर बसविलेला कर उ० व्यापारी जिनस, मादक पदार्थ, मीठ वगैरेवरील कर, जकात (इ) इंडायरेक्ट टॅक्स ०पुरावा–पु अनुमानिक व परिस्थितीचा पुरावा (इ) इंडायरेक्ट एव्हिडन्स. ०प्रतीकार–पु (इ पॅसिव्ह रेझिस्टन्स) सरळ मार्गानें अडवणूक न करता अन्य मार्गानें अडवणूक करणें. 'अप्रत्यक्ष प्रतिकार हें एक बलवान शस्त्र आहे '–टिव्या

**अप्रधान**—वि दुय्यम, वरिष्ठ किंवा मुख्य नसलेलें, गौण, कमी प्रतीचें [स ]

**अप्रफुल्ल**—वि अविकसित, न फुललेलें [स ]

**अप्रबुध्द**—वि १ अज्ञानी, मठ्ठ, मूर्ख, मद्दड २ अपक्व समजुतीचा, अप्रौढ ३ माहिती नसलेला, तरबेज नसलेला, विपर्यासी अपरिचित [स अ+प्र+बुध्]

**अप्रमाण**—वि १ पुरावा–आधार नसलेलें, अविश्वसनीय, निराधार २ जें प्रमाण होऊ शकत नाहीं असें, गरगसाट 'प्रपंचीं जो अप्रमाण। तो परमार्थी खोटा।'–दा १२ १ ९ ३ किंमत, महत्त्व नाहीं असें गैरलागू आदर्श न मानलेलें 'म्हणोनि भक्ति गा येथ सरे जाती अप्रमाण।'–ज्ञा ९ ४५२ [स अ+प्रमाण]

**अप्रमाणिक**—वि अप्रामाणिक पहा

**अप्रमाद**—वि बिनचुक, दोषरहित 'विहित परी अप्रमादें। अनुष्ठावें।'–ज्ञा ११ १४३८ –पुं प्रमाद, दोष (अचपलप्रमाणें रूप). 'करू आवडे अप्रमाद। तो तमोगुण।' –दा २ ६ १९ [स अ+प्रमाद]

**अप्रमेय**—वि १ न मापता येण्यासारखें, अमर्याद २ निश्चित करता न येण्यासारखें, प्रमाणानीं सिद्ध करता येत' नाहीं असा 'तरि आता अप्रमेया। मज शरणागता आपुलिया।' –ज्ञा ११ ५६० [स ]

**अप्रयास**—पु श्रमाचा अभाव, कष्टाभाव, कष्टराहित्य, सुलभता 'अप्रयासें नारददेवा। मरणार्णवा मज तारी।' –एभा २ १०१, 'निधान लाधे अप्रयासीं। तरी कां कष्ट सायासीं।' –गुच १५८ [स]

**अप्रयोजक-जिक**—वि १ निरुपयोगी, वेचक्टीचें, फुकडी मोल, अनवश्यक 'परी रात्रीविषयीं अप्रयोजिकु। जालाचि कीं।' –अमृ ६ ६४ २ गैरवाजवी, विसगत, अनुचित 'ह्या सुधारणेचा हुतुतू अगदीं अप्रयोजक होता' –टि ४ २९४. [स अ+प्रयुज्]

**अप्रवासी**—वि प्रवास न करणारा, देशाटन न करणारा 'अऋणी अप्रवासी तोच सुखी' [स अ+प्रवास]

**अप्रवाही**—वि (शाप) न वाहणारा, घन (पदार्थ) [स]

**अप्रवीण**—वि तरबेज नसलेला, अकुशल, न मुरलेला [स]

**अप्रवृत्ति**—स्त्री १ प्रवृत्तीचा अभाव, नावड, मनाचा ओढा नसणें २ शास्त्रनिषिद्ध कर्म, कुमार्ग 'जे अप्रवृत्तीचा अव्हाटा। साहूनि विधीचिया निचे वाटा।' –ज्ञा ७ ४८ [स]

**अप्रशस्त**—वि १ अरुंद, मोकळें नसलेलें, चिंचोळें २ बेडौल विशोभित ३ अनभिजात, गैर, अशिष्ट, अनभिमत, सप्रदायास सोडून [स अ+प्रशस्त]

**अप्रशिखा**—स्त्री एकाचा मित्र त्यास ठार करावयास प्रवृत्त झाला असतां आपलें मृत्युवृत्त इतरास ज्ञात व्हावें म्हणून त्यानें अ-प्र-शि-ख या आद्याक्षरयुक्त रचलेली एक चार चरणाची कविता अनेन तव पुत्रेण । प्रसुप्तस्य वनांतरे । शिखामादाय हस्तेन । खड्गेनोपहृत शिर ॥ (त्यावरून) सांकेतिक किंवा लाक्षणिक भाषा

**अप्रसक्त**—वि विसगत, असबद्ध, अप्रस्तुत, विषय, प्रसग सोडून असलेलें, अनुचित [स]

**अप्रसंग**—पु १ अवेळ २ अप्रस्तुत अयोग्य गोष्ट 'म्हणौनि अप्रसगु तेणें। म्हणावा कीं तो।' –ज्ञा १८ १६२६ [स]

**अप्रसन्न**—वि नाखुष असतुष्ट, इतराजी झालेला, गैरमर्जी असलेला [स]

**अप्रसाद**—पु अवकृपा, नाखुषी, इतराजी, गैरमर्जी [स]

**अप्रसिद्ध**—वि १ खरें अस्तित्व नसलेलें, विद्यमान नसलेलें, उपलब्ध नसलेलें, कवींच्या असभाव्य कल्पनेंतच असलेलें जसें- खपुष्प, शशविषाण, वंध्यापुत्र वगैरे ३ प्रचलित, रूढ नसलेला ४ अप्रकाशित न छापलेला (ग्रंथ) ५ सांदीकोंदीचा, अविख्यात कीर्तिमुळें-लौकिकानें प्रसिद्धीस न आलेला ६ हलका क्षुद्र [स]

**अप्रस्तुत**—वि चालू काळाला किंवा विषयाला अयोग्य किंवा न शोभणारें अप्रासगिक, अनुचित विसगत [स] **॰प्रशंसा**-स्त्री एक अर्थालकार, अन्योक्ति पहा

**अप्रा**—अपुरा; अपरा पहा

**अप्राकर्णिक**—प्रकरणास सोडून, अप्रस्तुत [स अ+प्रकरण]

**अप्राट**—वि (कायदडी) अपरंपार 'अप्राट त्यानें पुण्य केला' –मसाप ३२० [स अपार?]

**अप्रांत**—वि अमर्याद 'पृथुतरें सरळें। अप्रांतें एकें।' –ज्ञा ११ १२४ [म]

**अप्राप्त**—वि १ न मिळालेलें, अनागत, अलब्ध २ अकृतार्थ, (ल) ज्यास ब्रह्मानंद मिळाला नाहीं असा 'परी नेणती ते काय कीजे। अप्राप्त देखें।' –ज्ञा ७ २५३ **॰यौवन**–न वयांत न आलेला, यौवनावस्था प्राप्त न झालेला, कोंवळा **॰व्यवहार**-पु कायद्यानें वयात न आलेलें मूल, अज्ञान, अजातव्यवहार पहा [स]

**अप्राप्ति**—स्त्री न मिळणें, प्राप्ति न होणें, (ल) ब्रह्मानंद प्राप्तीचा अभाव [स]

**अप्राप्य**—वि अलभ्य, मिळण्यास कठिण [स]

**अप्रामाणिक**—वि १ अविश्वसनीय, विश्वासार्ह नाहीं असा, विश्वासास अपात्र २ लुचा, खोटा, शका येण्यासारखा [स अ+प्रमाण]

**अप्रामाण्य**—न पुराव्याचा-आधाराचा अभाव **॰ग्रह**-पु खोटें मानणें, असत्य मानणें, अविश्वास [स]

**अप्रासंगिक**—वि अयोग्यकाळीं, अवेळीं केलेलें, विषयाला किंवा प्रसगाला सोडून असलेलें, विसगत, असमयोचित [सं]

**अप्रास्ताविक**—वि अयोग्य तऱ्हेनें, अवेळीं सुरवात केलेलें, सांगितलेलें, प्रसगाला न शोभणारें, अप्रासगिक, अप्रस्तुत [स]

**अप्रिय**—वि पसत न पडणारें, असतोषकारक, न आवडणारें, नावडतें [स]

**अप्रीति**—स्त्री असतोष, नापसती 'सरकारचेबद्दल लोकाचे मनात अप्रीति किंवा द्वेष उत्पन्न करणें यास राजद्रोह म्हणतात' –टि १ ६८३

**अप्रुक**—वि (ना) अलौकिक, नाविन्यपूर्ण, अप्रूप पहा [स अपूर्व]

**अप्रुपाई-वाई**—अपुरवाय पहा

**अप्रुर**—वि (गो) अपूर्व, प्रिय [स अपूर्व]

**अप्रूप**—वि अपूर्व, अपरूप पहा [सं अपूर्व किंवा अपरूप]

**अप्रे**—अपरा पहा

**अप्रेंटिस**—पु उमेदवार शिकाऊ मनुष्य [इ]

**अप्रोक्ष**—अपरोक्ष पहा

**अप्रौढ**—वि लहान, वयात न आलेला 'नाना अप्रौढ वाळवीं। तारुण्य राहे थोर्वी।' –ज्ञा १३ ७८ [स अ+प्रौढ]

**अप्सतुर्कफलवारी**—पु सर्व शरीर लाल, कपाळावर पांढरा टिपका, नाक व वरचा ओंठ पांढरा, डोळे घारे हातापायांवर काळे, जर्द पांढरे ठिपके असलेला घोडा –अश्वप २९ [उर्दू]

**अप्सरण**—न (कर्ना) दोष, अपसरण पहा 'जीव देण्याचें अप्सरण माझ्यावर लादू पाहतोस काय?' –मेनका २८

**अप्सरा**—स्त्री स्वर्गांतील स्त्रिया, वेश्या, (ह्या समुद्रमथनकालीं अप म्हणजे पाणी यापासून उत्पन्न झाल्या ) गंधर्वांगना, देव लोकींच्या नृत्यांगना यांचीं प्रख्यात ७ कुळें आहेत ( १ घृताची, २ मेनका, ३ रंभा, ४ उर्वशी, ५ तिलोत्तमा, ६ सुकेशी, ७ मंजु घोषा ) 'येउनि वराप्सरा अवलोकी राजन्यसगरा ज्या जी ।' –मोभीष्म २.१० (ल ) सुंदर स्त्री [ स अप्सरस्, अप्+सृ ]

**अफजाईश**—स्त्री वृद्धि, वाढ –पेश ६१ [ फा अफ्जाईश ]

**अफट्ट**—वि ( गो ) तुडुंब

**अफतर**—अब्तर पहा

**अफतरी**—वि खराबी, दुर्दशा, दैन्यावस्था, नाश, हानी [ अर अब्तरी ]

**अफतरी**—अकीर्ति, दुष्कीर्ति, बदनाम, बदलौकिक, 'खराब जन निजकर्में करिती अधर्म राजाची अफतरी ।' –ऐपो ३६८ [ अर इफ्तिरा ]

**अफतादार**—वि उनाड, ओसाड, न व्यापलेली, पडून राहि लेली ( जमीन, घर, मकाण ) [ फा उफ्तादह्=पडलेला ]

**अफताव**—पु सूर्य, सूर्यप्रकाश 'अफताव अस्तास का जात नाहीं ?' –मराचिथाशा ६१ [ फा० आफ्ताब्=सूर्य ] ०गीर–स्त्री. अबदागीर पहा [ फा आफ्ताब+गिरफ्तन=पकडणें ] –गिऱ्या– अबदागिऱ्या पहा

**अफरातफर–रा–री**—स्त्री १ घोटाळा, गोंधळ, गडबड घागाघाग ( देशांतील ) २ परागंदा स्थिति ( लोकांची वगैरे ) ३ अव्यवस्थित, विस्कळित स्थिति ( वस्तूंची, कामाची ) ४ लबा डीनें केलेला अपहार 'किल्ल्यावर लोकांचा ऐवज नक्त वगैरे असेल त्याची अफरातफर होऊं न देता जप्त करून ठेवणें' –वाडसमा३ ६५ [ अर तफ्रीक्=फूट द्वि ]

**अफरातफरा–तफ्रीक**—वि परागंदा, नष्ट बेपत्ता, 'हिंदू मापूस होते ते ही अफरातफरा जाहले' –रा १० २९८ 'असल तहनामे विठ्ठलसुंदर याचे गारतीचे वेळेस अफरातफ्रीक जाले' –रा ७ २२३ –री–क्रिवि १ अव्यवस्थित रीतीनें, ढिलाईनें गडबडीनें तारावळीनें [ अर तफ्रीक्=फूट द्वि ]

**अफराद**—पु १ सेवक २ एकटा 'हाली विसाजी राम कृष्णाजी वायदेक याचा फर्जंद हा अफराद देशपांडेगिरीचा वारिसी होय' –भाइसभ १८३४ ५७ [ अर इफ्राद=एकटी ]

**अफल–ळ**—वि निष्फळ, व्यर्थ फुकट [ स ]

**अफलाक–ग**—क्रिवि अधांतरी, फार वरून, अब्लाद–घोड्याच्या किंवा माणसाच्या ( उडीला लावतात– ) [ अर अफ्लाक=आकाश अर. फलक=आकाश यांचें अव ]

**अफलाकांक्षी**—वि यशिसाची इच्छा न धरणारा, निरिच्छ [ स ]

**अफलाद–अफ्वाद–अहफाद**—स्त्री १ मुलीचा वंश 'अव्लादअफ्वाद ( वंशपरंपरा ) देविले असे' –रा १५ १५९, 'व –औलाद व अहफाद चालविजे' –रा २० १४१ २ दत्तक पुत्राचा वंश ३ रखेलीची, पाटाच्या बायकोची, किंवा दासीची संतति, लेकवळा [ अर अहफाद्=नातवंडें ] –द्दी–अफलाद पहा

**अफवा, अफवाई**—स्त्री कंडी, वार्ता, बाजारगप्प, अवाई, भुमका 'अफवाई गोष्टीवर मदार नाहीं' –रा ५ २९ [ अर अफ्वाह=तोंडें, फवाह् ( तोंड )चें अव फा अफ्वाही ]

**अफसोस**—पु १ शोक, दुःख 'नबावानीं ऐकोन बहुत अफसोस केला' –रा ७ १४२ २ (ल ) पश्चात्ताप ३ उद्गा दुःख दर्शक उद्गार, अरेरे, ! हायहाय ! 'अफ्सोस ! प्रत्यक्ष आमच्या शत्रूकडे !' –स्वप २२५ [ फा अफ्सोस्=शोक तुल० स अप+ शुच् ( शोक करणें ) ]

**अफळणें**—अक्रि १ हिरवें, कच्चें किंवा अपक्व राहणें ( फळ ) २ अर्धवट शिजणें ( अन्न ) [ स अ+फल् ]

**अफळणें**—उक्रि ( काव्य ) आपटणें, आदळणें, घर जोरानें पडणें [ स आ+स्फाल् ]

**अफाट**—वि १ विस्तीर्ण, विस्तृत ( स्थळ, अरण्य तळाव, समुद्र, इमारत, काम ) 'जैसा का अफाट समीर ।' 'ऐसा गाढा आणि अफाट । आता कोण करी यया शेवट ।' –ज्ञा १५ २१३ २ मोठें, अचाट ३ प्रबळ, अतिशय सामर्थ्यवान्, आश्चर्यकारक, उत्कृष्ट सामासशब्द– अफाट बुद्धि, अफाटपराक्रम, अफाटसंपत्ति [ स अ+स्फुट्, अ+फाट=फाटणें ? ] ०गुरूं–न १ उनाड, मोकाट जनावर २ (ल ) अशिक्षित, अडाणी, ठोंब्या, धागड

**अफार**—वि अतृप्त 'आनंदसुत विभु हा नंदनंदन अफार विचरे घर ।' –आपद ८४ [ स अपार ]

**अफारी**—वि फार वेळ समाधान न देणारा, थोडा वेळ भूक शमविणारा [ अफार पहा ]

**ॲफिडेव्हिट**—न (कायदा) शपथपूर्वक लेखी जबानी प्रतिज्ञा लेख [ इ ]

**अफिण्या, अफिमी–म्या**—वि अफू खाण्याचें व्यसन अस णारा, अफीण पहा

**अफीण–म**—स्त्री अफू खसखशीच्या बोंडांतील वाळलेला मादक किंवा कैफ आणणारा चीक याचें पीक हिंदुस्थानांत विशेषत माळव्यात येतें हें झाड ३ ते ५ फूट उंच असून, फळास बोंड म्हणतात त्यातील बीं तें खसखस होय अफू खाण्यानें निशा येते ही अतिसारावर देतात अफूच्या उतारावर मोहरीचें पीठ, रिठ्याचें पाणी देणें अफू अग्निदीपक, पाचक, वीर्यस्तंभक आहे [ स अहिफेन, हिं आफीम–ण, व अफेवा, गु अफे–फीण अर अफ्यून, इ ओपियम ग्रीक ऑपिअन, ओपॉस=वनस्पतीचा चीक ] ०सारखा जीव ओढणें–लागणें=अतीशय आवड

किंवा उत्कट असणें ओढा असणें ०उतरवणें-(प) एकाद्याची चांगली खोड जिरविणें ०याज-वि अफूचें व्यसन असणारा [अफीम + यास, अर अफ्यून]

**अफु-फ**—अफीम पहा

**अफुट**—वि न फुटलेलें, अभेद्य, अद्वैत, चराड 'हे सरलें अद्वैता अफुटामाजी।'—अमृ ९ ७ [स अ+स्फुट्]

**अफू**—अफीम पहा

**अफेक**—स्त्री मोठी किंवा प्रबळ इच्छा, उत्कंठा, आशा, आवड, चट, चटक (क्रि० धर, वाळग) [स अपेक्षा=अपेक्खा=अफेक्ख]

**अफ्-फ्**—उद्गा (व) घनगराचा वक्र्या हाकण्याचा शब्द हर्रे

**अफ्जाईश-अफ्तर-अफ्तरी-अफ्ताबीर-गिन्या-अफ्ताब अफराद-अफलाद-अफवा-अफ्वाई-अफ्याद**—अफजाईश-अफतर-अफवा इत्यादि पहा

**अव**—क्रिवि आता राख्या सामाद्यान्द-अनतक, अवतईं= आतापर्यंत अवतन=वारवार [स अय हिं]

**अवई**—स्त्री १ एक फूल झाड २ एक वेल, घेवड्याची एक जात, याच खडसवळ, पटारी, कोयतेवाल, ब्रम्ही अशीं नावें आहेत यास आश्विनात शेंगा येतात त्यांची भाजी करतात

**अवक**—स्त्री इटिदांडूच्या किंवा चेंडूच्या खेळातील शब्द 'एक' या अर्थी जर्गे —अवक दुवक तिवक, अवकी, दुवकी, तिवकी एक, दोन तीन

**अवकरा-सरा**—अपकरा पहा

**अवका**—अपका पहा

**अवकार**—पु एक प्रकारचा क्रिडा, जो घावल्यानें आग सुटते [फा]

**अवकारी**—आबकारी पहा

**अवखदाद**—(ना) अवकात-द पहा

**अवगाळला**—वि (व) आवाळ झालेला, ज्याच्याकडे दुर्लक्ष झालें आहे असा [अवगळणें स अवगलित]

**अवजर**—पु हमरीतुमरी अरेतुरे [हिं अरे-जावे]

**अवजाळ**—अपजाळ पहा

**अवडुर**—वि (क) अवघड

**अवडधोवड**—ओवडधोवड पहा

**अवढू**—न चाकीर 'अगरखे आऊन अवढू पाटलोणी, कोट निघाले'—चान १८ ९ १८७१

**अवद-पैवद**—वि अशाश्वत दौलत अवद-पैवन्द'—रा २० २८६ [फा अवद्-पैवन्द्]

**अवदा**—स्त्री १ संकट, विघ्न, अरिष्ट, २ पीडा, त्रास, दुःख [स आपदा]

**अवदागि(गी)र**—स्त्री १ राजे वगैरे थोर लोकांच्या डोक्यावर सूर्याचें ऊन निवारणार्थ मिरवणुकीच्या वेळीं धरावयाचें छत्र हें राजासाठीं किंवा सरदारासाठींहि असे हा एक मान असून तो सरकार ज्यास देईल त्यानेंच ही वापरावयाची, दुसऱ्यानें वापर त्यास शिक्षा होई यासाठीं लागणाऱ्या गड्याचा पगार व दर तीन वर्षांनीं कापड दांडा वगैरेचा खर्च सरकार देई ही सालीना ६० ते ७० रुपयाची तैनात असे —थोमारोजगा २ २७५ 'तीस हजार अब दागिरी बरोबर चाले टिगारा'—ऐपो १११ [फा आफ्ताब= सूर्य+गिरफ्तन्=पकडणें] ०गिन्या-पु अबदागीर धरणारा सेवक पगार दरमहा ५ रुपये —समरो २ ६० ०वाल्या-स्त्री कानात घालावयाच्या १२ बाळ्यापैकीं एक दागिना 'बाळबाळ्या अबदागिरवाल्या तरंधर।'—अफला ५५

**अवदार**—पु. जलशालेवरील पाणी थंड, स्वच्छ करणें वगैरे कामावरचा अधिकारी [फा आब्दार मूळ स. अप्] ०खाना-पु. पिण्याच्या शुद्ध पाण्याचा खजिना, साठा, जलशाला, हौद पाण्याचें खातें व या खात्याचें काम

**अवदारी**—स्त्री अवदाराची कचेरी व काम, अवदारखाना

**अवध्द**—वि १ न बांधलेलें, मोकळें, स्वतंत्र २ (ल) असंबध्द, मूर्खपणाचें, विसंगत-(भाषण, वर्तन वगैरे) 'देह पांचभौतिक प्रसिद्ध। तो मी म्हणणें हें अबध्द।'—एभा ९ २८८, 'कृष्णासी शरीरसंबंध। हा तंव बोलचि अबध्द।'—एरुस्व २ १ ३ ढिले, ढिलाईचें, बेकैद बेबंद स्वैर स्वच्छंदी, (वर्तन बागणूक) ४ अशुध्द, वेडेवाकडे 'अवध्द वाकुडें जैसातैसापरी। वाचे हरिहरि उच्चारावें।' —तुगा ८०९ 'अवध्द पोथी लेहों नये। पोथीवीण कामा नये। अवध्द वाचूं नये। वाचल्यावीण खोटें।'—दा १४ १ ७८ —न चूक, प्रमाद ०मत-पु शास्त्रविरुध्द पिशाच्चादि साधनाचा मत ०मुख-वि घाणेरड्या तोंडाचा, शिवराळ, अभद्र बोलणारा, फटकळ [स]

**अवध**—अवद अप 'रामीं रामदास ऐसें अवध बोलतो।' सप्र ७ १८१

**अवंध**—वि निर्बंधरहित, स्वैर मोकाट 'परि अवधा नित्य ब्रह्मभावा। विघड नाहीं।'—ज्ञा २ २५७ [स अ+बंध]

**अवधडका**—वि (कना) अनागोंदी अंदाधुंदीचा कारभार [अवध+धडका]

**अवधाक-कों**—अपधाक-कों पहा

**अवना-ल-ळ**—न तरवारीच्या म्यानाचें वरचें टोपण (चांदीचें अगर सोन्याचें), याच्या उलट तहनाल [?]

**अवव**—उद्गा आश्चर्योद्गार अहह! [का अब्ब, ते अव्वव]

**अवरगत**—स्त्री (कु) सक्ताची भीति, खोटें सक्त, बलागत पहा [ बलागत अप स अभेगति ? ]

**अवरगोचर**—क्रिवि अव्यवस्थितपणें, ढिलाईनें, गचाळपणें (क्रि० सारवणें, मारणें, वगैरे) [ ? ]

**अवरचवर**—न (प्र अरबटचरबट), नि:सत्व, बेचव अन्न, नीरस–रूक्ष खाणें, बोलणें –क्रिवि मूर्खपणानें, नीरसपणानें [ स चर्व् तुल फा चर्ब=तेलकट, द्विरुक्ति ]

**अवरु**—अब्रू पहा

**अवर्गत**—वि (कों.) १ ल्हान मुलासारखा, असहाय्य २ रोगिष्ट [ सं अर्भ=ल्हान मूल+गति किंवा अर्भकवत ]

**अवलक-ख**—वि १ चित्रविचित्र रंगाचा, अनेक रंगाचा सर्व शरीर लाल असून त्यात पांढरे, काळे, जर्दे पट्टे असलेला घोडा हा घोडा फार दुर्मिळ होय –अश्वप २९. 'पचकल्याणी घोडा अबलक।' 'अवलक पचकल्याणी कुम्माइत।'–ऐपो १२९ [ अर अब्लक् ]

**अवला**—स्त्री बायको, बाई, स्त्री 'अवला रागती वडिला। येणें अभिमान साडिला।'–एरुस्व १६ ६१ 'बाळा खेळती अचला। त्याही विसरल्या।'–तुगा १२५ [ स ]

**अवळ**—वि १ ताकद किंवा बळ नसलेला, अशक्त, कमजोर, दुर्बळ, दीन, 'बळी अबळातें खाय। हेंचि बाधित जरी होय।'–ज्ञा १६ ३०२ [ स अवला ] २ (ल) अज्ञानी 'बाळकाहातीं दिधल्या फळा। खावें हें न कळे त्या अवळा॥'–एभा १५ २० [ स अवल तुल० अर अब्लह्=मूर्ख, अडाणी ]

**अवळ**—स्त्री हुयगय, आवाळ [ आवाळ ]

**अवा-व्वा**—उद्गा अबब पहा

**अवा**—पु १ वडील माणसास आदरार्थी नाव २ बाप –स २६८१ [ अवा हा शब्द सेमेटिक व इंडोआर्यन या भाषांतून आढळतो याची अप्पा, अव्वा, अत्ता वगैरे रूपें आहेत ल्हान मूल प्रथम बापाला या शब्दानें हाक मारतें म्हणून तो तद्वाचक शब्द बनला इ अब्बा=बाप, हिं बाप, बाव, अर अब्बास, अबु=श्रेष्ठ, हिब्रू आबा=बाप, खाल्डियन–सिरिअक अब्बा=बाप लॅ अब्बास=बाप, परमेश्वर, सिं अबो, ते का अव्व=बाप ]

**अवाजा**—पु सवय; अधिकार 'मठानजीक माती खणावया तुमचे काय अवाजा आहे!'–रा१५ १५९ [ अर इजाफा, अजावा? ]

**अवाट**—वि १ न बाटलेला, जो भ्रष्ट झाला नाहीं असा, दूषित नसलेला, दोष न देता येण्यासारखा २ (कु) जातीबाहेर, वाळींत न टाकलेला [ स अ+भ्रष्ट ]

**अवाठ**—वि ल्हान व अपुऱ्या बनलेल्या बोरींचा–अबा [ अ+पाठा ]

**अवाद-अवादानी**—आवाद पहा

**अवादगुणी**—वि (व) ज्यांत अनेक दुर्गुण भरले आहेत असा. [ आबाद+गुण ? ]

**अबाध-धित**—वि १ अदूषित, आक्षेप न घेतलेला, शास्त्रादिकांनीं संमति दिलेला, अविरोध २ विरोध–प्रतिकार न करता येण्यासारखें, कायम, नाकबूल करता न येण्यासारखें सामाशब्द–अबाधितबुध्दि–कल्पना–पराक्रम–सामर्थ्य–चातुर्य–कौशल्य ३ उत्पत्ति, स्थिति व लय याची बाधा न होणारें, मुक्त ४ त्रिकालाबाधित (भूत, वर्तमान, भविष्य या तिन्ही काळीं बाध न येणारें) [ स ]

**अबाब**—पु १ अबवाब, निरनिराळ्या प्रकारचे सरकारी कर २ गावचे हक्कदार यांचा वाटा वजा करून सरकारला सान्यादल जें धान्य, ऐन जिन्नस यावयाचें तें ३ (नगर)–आम्याच्या पिकाचा अदाज [ अर अववाब, बाबचें अव ]

**अबाबय-अबाबा**—उद्गा अबब पहा आश्चर्य, अचवा ०करणें बाटणें–क्रि अवडवर माजविणें, कागावा करणें, थैमान माडणें, बोंबाबोंब करणें [ ध्व ]

**अबा(ब्बा)शाई-ही, अब्बाशी**—वि गहिरा–गर्द तांबडा व काळसर–अब्बास पुष्पासारखा रंग या रंगाचें वस्त्र [ हिं ]

**अवांव**—न कागावा, थैमान, बोंबाबोंब, अबाबा पहा

**अवीर**—पु चंदन, केशर, कापुर, कस्तुरी यांच्या मिश्रणानें केलेला सुगंधी पदार्थ [ अर अबीर ]

**अबुज**—क्रिवि (व) हुजल्यासारखें, ओकें **अबुज वाटणें**–न करमणें, चैन न पडणें, न सुचणें, न सुचणें [ स अ+बुध् ]

**अबुध्द**—वि माहीत नसलेलें, न समजलेलें –**ध्दि-ध**–वि मूर्ख, समज नसलेला, शहाणा नसलेला [ स अ+बुद्धि ]

**अबुद्धिपूर्वकस्फूर्ति-प्रवृत्ति**—स्त्री (तत्त्व) उपजतबुद्धि (इ इन्स्टिंक्ट)

**अबुध्द्या**—वि अजाणता, नकळत, अबुद्धिपुरस्सर 'यावरून राष्ट्रीय पक्षास 'इंग्रजी साम्राज्यांतर्गत स्वराज्य' मान्य नाहीं असें नें कित्येक बुद्ध्या किंवा अबुध्द्या विधान करतात तें सर्वस्वीं निर्मूल होय'–टि ३ २८३ [ स ]

**अबूज**—वि अडाणी, अल्लड, चमत्कारिक, विचित्र [ स अबुध्द, हिं अबूझ ]

**अबे**—उद्गा अरे [ हिं ]

**अबेदबे**—स्त्री १ अरेतुरे, हमरीतुमरी २ उन्मत्तपणाची भाषा वापरणें–करणें, वाकडेंतिकडें बोलणें (क्रि० करणें) [ हिं अबे द्वि ]

**अबोट**—वि (ग्रा) बोट न लावलेलें, स्पर्श न केलेलें, चव न घेतलेलें, उपयोगांत न आणलेलें, (अन्न, पदार्थ, वगैरे) २ अखडित लेप (रा) अनामिका (व) 'तें लागलेंसें अबोट। चंदनाचें।'–ज्ञा १५ ३

अबोध—वि अज्ञानी, जाणीव नसलेला –पु अज्ञान, ज्ञानाभाव, 'वस्तूसी अपुला जो अबोधु। तो ऊर्ध्वी आठुळेंजे वटु।' –ज्ञा१५ ८८ ०बोधन-ध्य–न मूर्खास शिकविणें –नीय-ध्य–वि १ सांगण्यास, जाणण्यास, शिकविण्यास कठिण २ शिकण्याला कठिण, जड, मद, बुध्दिहीन [ सं अ+बुध् ]

अबोल, अबोलका-णा, अबोल्या—वि १ मुखस्तभ, बडबड न करणारा, जास्त बोलवयास नको असलेला, मितभाषी 'आत्मा अबोलणा स्वयें। परि तोचि बोलतो म्हणावा निश्चयें।' –गाथादी ४ ३०७ २ गाण्यातला विशिष्ट स्वरयुक्त जो बोल त्या विरहित असा 'का न सज्जिता वीणा। तो नाद जो अबोलणा।' –अमृ५ ४१ ३ मुका, स्तब्ध 'एक सदा गाती नाचती। एक ते होती अबोलणें।' –एभा २ ६३१ [स अ+बोलणें]

अबोला—पु १ कोणाच्या चुकीबद्दल रागावून न बोलणें फुगव्या मनानें राहणें, परस्पर मैत्रीत अंतर पडणें, रुसवा किंवा द्वेष इ कारणामुळें एकमेकाशीं न बोलणें २ (सामा) मौन 'ब्रह्माचा अबोला फिटावा। अद्वैतत्वें तो भेगवा।' –ज्ञा १७ ३३२ (क्रि धरणें, करणें) –लण्या–वि न बोलण्यासारखा 'तुका म्हणे नष्टा। अबोलण्या तुझ्या चेष्टा।' –तुगा १४१९ [अ+बोलणें]

अब्ज—न एक सख्या, शभर कोटी, अर्व [स अर्बुद ?]

अब्ज—न कमळ [स अप्=पाणी+ज=जन्मलेलें]

अब्जिनी—स्त्री कमळिणी 'अद्वयाब्जिनी विकाशु। वटू आता।' –ज्ञा १६ १

अब्जुग—न नवलविशेष, अद्भुत [ ? ]

अब्द—पु १ मेघ २ वर्ष ३ सांवत्सरिक श्राद्ध 'प्रयागीं अब्द चवदा श्रीरामें साग सारिले।' –मोरा १३ [स ]

अब्धकणें—क्रि धका बसणें, भीति वाटणें, अपधाकणें पहा [स अप+धाक]

अब्धि—पु १ समुद्र, महासागर 'नातरी शब्दब्रह्माब्धि। मथिलेया व्यासबुध्दि।' –ज्ञा १ ५१ २ (एकदर समुद्र सात आहेत त्यावरून) ७ सख्या [स ]

अब्ब-ब्बा—उद्गा अहा! ओहो! अबब पहा (क्रि० करणें म्हणणें) [ध्व]

अब्बस—स्त्री निर्भर्त्सना, फजीती, अपमान (क्रि० करणें) 'अब्बस केली' =फजीती केली [अबे किंवा अब्+बस= आतापुरे]

अब्बा—पु (खि) बाप, बाबा 'तो बोलला अब्बा, बापा तुज सर्व साध्य आहे' –मार्क १४ ३६, रोम ८ १५, गल ४ ६ [अबा पहा]

अब्बाशाई-ही—अबाशाई पहा

अब्बाशी—स्त्री १ अबाशाही २ (व) स्वैर, मिजास 'एवढी अब्बाशी नाही चालणार येथें' [अब्बा+शाही]

अभ्रश—वि १ घनश्याम, काळासावळा २ ठिपकेदार, कुटी [ अर अब्रम=कुटी तुल स अभ्रसम ]

अब्रह्मण्य—वि ब्राह्मणास करण्यास अयोग्य –न ब्राह्मण्याविरुद्ध गोष्ट, पाप, दुष्कृत्य [सं ] –उद्गा (ल) अरेरे! घात झाला!

अब्राह्मण—पु ब्राह्मणेतर हिंदु, शूद्र [स ]

अब्रू—स्त्री मान, कीर्ति, लौकिक, प्रतिष्ठा, मान्यता, इज्जत [अर आव=पाणी+रु=तोंड-तोंडावरील कळा, तेज ] ०गाढवावरून चालणें-जाणें–दुष्कीर्ति होणें, बदलौकिक होणें –चाळ २ ११, ०खाऊ-घेणा–वि १ दुसऱ्याची अब्रू घालविणारा, घेणारा २ भ्रष्ट किंवा निष्फळ करणारा, मोडता घालणारा, भोंदणारा, चकविणारा, पेंचात घालणारा. ०घेणें–क्रि १ अपमान करणें, अप्रतिष्ठा करणें, मानहानि करणें २ शील भ्रष्ट करणें, (सभोगाचा) बलात्कार करणें ०चा-दार–वि प्रतिष्ठित, योग्यतेचा, माननीय, लौकिकवान, इभ्रतदार ०ची चाड–स्त्री प्रतिष्ठेची आस्था, काळजी ०चे फांकडे–पु अब्रूचा नाश –स्वप २८३ ०जाणें–क्रि अपमान होणें, कीर्तिनाश होणें ०नुकसानी–स्त्री (इ डिफेमेशन) (कायदा) कोणा मनुष्याच्या मन स्थितीला किंवा बुध्दीला, सद्गुणाला, जातीला, धधाला कमीपणा येईल असा मजकूर बोलून किंवा लिहून प्रसिध्द करणें, लेखानें, भाषणानें, खुणांनीं अगर चिन्हांनीं एकाद्याची बेइज्जत करणें

अब्लक—अवलक पहा

अभक्त—वि भक्त नसलेला, पूज्यबुध्दि नसलेला 'तेवि भक्त पाळक अभक्त सहार॥' [स]

अभक्ति—स्त्री १ अप्रीति, श्रध्देचा अभाव २ द्वेष, नावड [स ]

अभंग—वि १ अविनाशी, अखड, अक्षय, निश्चल, निरतर 'श्रीकृष्णरत्नें सुरग। अद्वेषपण तेणें अभग। तेंचि कुकुम पैं चाग। मुखचद्री चद्रमा।' –एरुस्व ७१७ २ (ल) ब्रह्मस्वरूप, अविनाशी स्थिति 'हे करणी केली जनार्दनें। मन अभगीं घातलें तेणें।' –एभा १८ ३९३ ३ न तुटलेलें, फुटलेलें, उल्लघलेलें, सतत, अविरत 'प्रपचाची धाडी। अभग हे।' –ज्ञा १३ ९९२ 'यालागीं जो नि सगु। तोचि अभगु साधक।' –एभा २ १५६ [स अ+भग] –पु एक मात्रावृत्त चरण चार या वृत्ताला घरबध फारसा नाहीं याला मात्रा वगैरेचा नियम फारसा लागू पडत नाहीं चरणात तीनपासुन आठपर्यंत अक्षरें महाराष्ट्रात या वृत्ताचा प्रसार वारकरी पथातील सतांनीं फार केला उदा सुदर तें ध्यान उभें विटेवरि। कर कटावरि ठेवूनिया॥ तुगा १

अभंग—पु अयोग्य गोष्ट, खोटी रीत 'तेय न सुवावा अभगीं। आत्मराजु।' –ज्ञा १८ २८० [स ]

**अभंगी**—वि अभग पहा

**अभंड**—न १ भाड्यातून जिनस तोलून देण्यापूर्वी त्या भाड्याचें वजन करण्यासाठीं वजनें किंवा इतर जिन्नस तराजूतील दुसऱ्या पारड्यात टाकून काटा समतोल करणें २ अशा तऱ्हेनें वजन करण्यासाठीं टाकलेलीं वजनें किंवा इतर पदार्थ [ स भड्=परिमाणें=वजन करणें –पाणिनी ] (क्रि० करणें) ३ जिनसाचे फार मोठे गड्डे, एका गाडींत दोनच डाग जातील अशा प्रकारचे मालाचे गठ्ठे ४ (व) संकट, चिंता 'या लग्नाचें मला मोठें अभंड पडलें आहे'

**अभंड**—वि १ पुष्कळ, अमर्याद, फार 'यंदा नदीला पाणी अभंड आलें' सामासान्तें– अभंड पाऊस–पीक–धान्य–वारा इ० 'तुका म्हणे काळें कांळें केलें तोंड । प्रकाश अभंड देखोनिया ।' –तुगा ३९८६ २ कुभांडी खोडसाळ ३ जहांबाज, आडदांड, भांडखोर, कजाग 'सवती ग सवती नित्य भांडती नाहीं कोणाचा कमनोरा । पति पागळा करुनि वसविला अभंड नारी शिरजोरा ।' –पला ५९ [ स भड्=थट्टा करणें, भांडणें ]

**अभद्र**– न वाईट गोष्ट अकल्याण, अरिष्ट 'अभद्र व्हावें शिशुपाळासी ।'–एरुस्व १३ ४२ –वि १ वाईट, अशुभ, अनिष्ट –भाषण (मरण, आजारीपण इ० चें), घाणेरडें, अपशब्दाचें–बोलणें, गचाळ, तिटकारा उत्पन्न करणारें, बीभत्स द्वाड 'असा जरि नसे रुचे तरि न तो अभद्र क्षण ।' –केका ९४ २ वाईट नजरेचा, दुष्ट भाषण करणारा [ सं ]

**अभय**—न १ सुरक्षितपणाची, निर्भयतेची खात्री २ भीति नसणें, सुरक्षितता 'अभय असे'–कशाबद्दलहि भिऊ नको, निर्भय रहा ३ अभयमुद्रा –वि निर्भय 'स्वकर्मे आचरणार अभय जे वळी सर्वा ठाईं ।' –ऐपो ४२० **०कर**—पु अभय दर्शविणारी देवतेची किंवा राजाची हस्तमुद्रा किंवा हात 'तुझीयेन अभयकरें । अनावर माया हे वोसरे ।' –दा १ ४९ **०डिंडिम**–पु १ निर्भयता असल्याबद्दल जाहीरविण्याचा डमरु दुदुभी वगैरे २ (ल) संरक्षणाच्या खात्रीबद्दल स्पष्टपणें जाहीर रीतीनें बोलणें, सुरक्षितपणाबद्दलचें वचन–कौल वगैरे **०दान**–न सुरक्षिततेबद्दलची देण्यात येणारी खात्री–हमी, वचन **०पण**–न अभयदान **०पत्र**–न सुरक्षितपणाबद्दलचें राजपत्र, कौल, सरकारच्या दहशतीनें अथवा दुष्काळानें रयत परागंदा झाली असता तिला आश्वासन यावयाचें पत्र, दवंडी, जाहीरनामा **०मुद्रा**–अभयकर पहा **०लेख**–अभयपत्र पहा 'समुद्रयान करण्याचा जर त्यास प्रसंग आला तर कप्तानाकडून नौकेबद्दल अ० घतल्यावाचून ता तिजवर पाऊल ठेवणार नाहीं काय ?' –नि ८८८ **०वचन**–अभयदान पहा **०हस्त**–अभयकर पहा 'धर्मप्रतिष्ठा तो सिध्दु । अभयहस्तु ।' –ज्ञा १ १३

**अभयंकर**—वि भीति वाटण्यासारखे नसलेलें सौम्य [स] शको १ १४

**अभर**—स्त्री आकंठतृप्ति, मर्यादा, पिटपर्यंत समाधान ( क्रि० करणें, होणें, धरणें ) [illegible] अतिशय [illegible], भरलेला, श्रीमत 'चिर वरा अभर झालें बहुत ।' –दावि [illegible] देव लाभे अभर जाहे ।' –दा [illegible] [ स आ + भृ ]

**अभरवण**—स्त्री १ आकंठ भरणें, अधिक [illegible] २ पाटापेक्षा जास्त जेवणें ( क्रि० घे, घे ) [ स आ+भृ ]

**अभरवशा**—[illegible] क्रिवि १ आपत्तीत [illegible] च्या अवस्थेत, आशाभंगानें ओढवलेल्या संकटात, 'एकोअंगी मको टाकु जसें जळ वळवानें वाहवलें ।' –होलो [illegible] २ बेभरवसेपणानें, विश्वासघातानें [ अ+भरवसा ]

**अभरवशी**—वि अविश्वासी

**अभरवसा**—पु विश्वासाचा अभाव, निराशा, विश्वासघात 'तुमच्या भरवशावर मी राहिलों आता ऐन वेळेस अभरवसा करू नका' [ अ+भरवसा ]

**अभराड**—वि ( गों ) गर्भधारणेशिवाय जाणारें वर्ष, वाझ काळ ( गाय, म्हैस इत्यादींच्या बाबतीत ) –न गर्भधारणेशिवाय राहाणारें गुरु [ स अ+भृ ]

**अभर्तृका**—स्त्री १ विधवा, ( प्र ) गतभर्तृका ( याच्या उलट सभर्तृका ) २ कुमारी [ स ]

**अभव**—पु ससाराच्या उलट स्थिति ( मोक्ष ) 'ॐनमो श्रीजनार्दना । नाहीं भवअभवभावना ।' –एभा ११ [ स ]

**अभक्षणीय–अभक्ष्य**– वि खाण्यास निषिद्ध–अयोग्य–निरुपयोगी ( मास मद्य इ० ) [ स ]

**अभागी–अभाग्य–अभाग्यवान**—वि कपाळकरटा, खोट्या नशिबाचा, दुर्दैवी 'त्यासी न भजे अभाग्य जाण ।' –एभा २ २९

**अभाग्याची पुतळी**—स्त्री दुर्दैवी, कपाळकरटी स्त्री 'तिथ ही अभाग्याच्या पुतळ्या कपाळकरट्या गोपिकाबाई' –सोंवद १९

**अभाग्ये**—न ( गो ) अभागी माणूस 'अभाग्ये तू नशिबान मेळोक जाय' [ स अभागी ]

**अभांड**—अभंड पहा

**अभांडकुभांड**—न तोहमत आळ कुचाळ कुभांड पहा –डी कुभांडी–कुभांडी पहा [ कुभांड द्वि ]

**अभाय**—न ( खा ) आभाळ

**अभार**—आभार पहा

**अभारण** —न निरवणूक सोंपवणूक भार घालणें, टाकणें 'पार्थाचें अभारण घातलें कृष्णासमेी ।' –भाए ११६ [ स. आ+भार ]

**अभाव**—पु १ वाण, मुळींच नसणें, असंभव शून्यता, नास्तित्व अभावाचे ४ प्रकार –१ प्रागभाव २ प्रध्वंसाभाव ३ अन्योन्याभाव ४ अत्यंताभाव उ० १ लग्नापूर्वीचें अप्रचय २ मृत्यूनें नाश होणें

३ पुरुषाचे ठिकाणीं स्त्रीत्वाचा अभाव ४ वंध्यापुत्र २ नास्तिकपणा, नास्तिकबुद्धि 'अभावाची घेतली नरडी। घाकें उदर तडाडी।' –दा ८ ९ ४६ [स अ+भू=होणें] –अभावीं–शअ १ ऐवजीं, नसून तर २ असंभव असता

**अभाव**—पु १ शंका, वहीम, अंदेशा, कल्पना, समज 'हा श्रीमंत आहे असा लोकांमध्यें अभाव आहे' २ भरंवसा, विश्वास 'भाषेचें तिसरें वसतिस्थान न्यायाधिशांच्या कचेऱ्या या ठिकाणचा मराठी भाषेच्या वैवाऱ्यास मात्र अभाव आहे' –नि ११३ [स आ+भाव]

**अभावणी**—स्त्री १ पिकाचा अदाज, कोंकणात खोत हा दरएक शेताचा पीक उभें असताना पंचासमक्ष व पाटलासमक्ष पाहणी करून जो पिकाचा अदाज ठरवितो ती, पिकाची आणेवारी 'अर्धे लिंबद्दल पुढें मागें तक्रार पडूं नये म्हणून शेतांत उभीं पिकें असतानाच एकदर उत्पन्नाचा अनमास किंवा अभावणी करण्यात येते' –टि २ ६०७ २ प्रत्येक शेतवार अभावणीचें नोंदणीपत्रक हें खोताचें नोंदणीपत्रक असून यांत एकंदर कुळाचीं नावें, जमीन, पीक व खोतानें घ्यावयाचें पाक याची नोंद असते यावरूनच खतावणी म्हणून दुसरें एक नोंदणीपत्रक करतात, अदाजपत्रक [स आ+भू (भाव)]

**अभावनीय**—वि १ अतर्क्य, न जाणण्याजोगें, न समजण्यासारखें २ अचिंतनीय, मनात घेण्यास, विचार करण्यास अयोग्य [स ]

**अभाविक**—वि १ देवावर विश्वास न ठेवणारा, श्रद्धा नसलेला, भाविक नव्हे तो २ अतर्कित अकल्पित आकस्मिक आगंतुक विचार न केलेला चिंतन न केलेला –न अल्पत्व अल्पराशि नवळनवळ अभाव स्वाच घरीं भोजनास येणें परंतु पुरसाल्यार याचें अभाविक होत' [स अ+भाव]

**अभावे ब्रह्मचर्य**—न विषयपूर्ततेचीं साधनें नसल्यामुळें न मिळाल्यामुळें आपोआप घडणारें ब्रह्मचर्य तुरंगब्रह्मचर्य वृद्धनारी पतिव्रता' यासारखा सोंवळेपणा

**अभाळ**—न १ आकाश अस्मान म्ह० अभाळ फाटलें तर ठिगळ कायथावें २ अभ्र ढग मेघपटल, काळोखी ढगानें व्यापलेलें आकाश ढगाळपणा 'कडकडित अभाळें। यऊनि आकाश झाकोळे।' –एभा ७ ४४९ 'गगनीं अभाळ आलें। मागुती नेंचि उडालें।' –दा १० ७ २१ ३ (ल) सकट थड 'मोंगलाचें पारिपत्य झालें म्हणून चार अभाळें उरलीं आहेत हीं विरतील' [स अभ्र+आल्य, प्रा अब्भ गु आभ, सिं अभ्र, पं अब्र] °कोसळणें–मोठें अरिष्ट येणें गुदरणें °उराळणें–(व) आकाशांत ढगांचा गडगडाट होणें °डोक्यास टेकणें, लागणें, दोन बोटें उरणें° टसटसा लागणें ठेंगणें दिसणें–होणें=अतिशय मोठेपणाचा प्रयोग °फाटणें=मोठें अरिष्ट गुदरणें सर्वच बाजूंनी संकटें येणें °येणें–क्रि संकट येणें –वर

अ°येणें–एकावर एक संकटें येणें, ओढवणें –खालीं–तळीं–पृथ्वीच्या पाठीवर, मृत्युलोकीं, पृथ्वीवर –वर थुंकणें–निष्फळ प्रयत्न करणें किंवा आपल्याच अंगावर बाजू ओढवेल असें कृत्य करणें –शीं भांडणें–१ अती उंच होणें, असणें, गगनचुंबित असणें–झाडें, इमारती वगैरे २ भयंकर भांडखोर असणें निष्कारण कलह करणें, वाऱ्याशीं भांडणें –चा चढणें–१ वरचढपणानें अधिकाधिक मागणी करणें, एकसारख्या मागण्या करीत राहणें २ अरेराव होऊ लागणें, आव्यतेखोर बनणें –स भोंक पडणें–अति वृष्टीबद्दल योजावयाचा प्रयोग मुसळधार पाऊस पडणें सततधार लागणें –चा गड–पु (शेतकी)–अभ्रा ढगाची गर्दी –चा गाळ–पु गर्द ढग मळभ, ढगाची काळोखी –ची सावली–स्त्री क्षणभंगुर गोष्ट, पाण्यावरील बुडबुडा, अभ्रछाया, ढगाची सावली

**अभि**—उपसर्ग व शब्दयोगी अव्यय १ सारखेपणा, साम्य, सादृश्य उ अभिरूप, अभिराम (याप्रमाणें, असें) २ सान्निध्य उ० अभ्यग्नि, अभिचर अभिमुख, (पुढें, म्हणून) ३ वेगळेपणा, पृथक्त्व (निरनिराळ्या प्रकारें, वेगवेगळें,) ४ संयोग, विवक्षितपणा (संबंधीं, विषयीं) उ अभिधान, [स अभि, तुल ग्री अम्फि, लॅ ऑब, झेन्द अइवि गॉ बि, ओल्ड हायजर्मन बी]

**अभिकार–गार–घार**—पु १ यज्ञात हवन करावयाच्या द्रव्यावर किंवा होमाकरितां घेतलेल्या अवदानावर तूप घालणें २ (व) जेवणाच्या सुरवातीस [illegible] पानशुद्धि ३ (ल) पाहुण्याच्या [illegible] ओतणें ४ सिंचन [स अभिघार]

**अभिघारणें**—सक्रि [illegible] सिंचन करणें 'नमस्कारावें धाडिलां [illegible]। अभिघारावें पहिलेंचि जाण।' –गुच। ३७ १२० [स अभिघार]

**अभिचार**—पु दुसऱ्याला दुःखापन किंवा नाश करण्याचे मंत्र किंवा जादूटोणा, जारणमारण, करणी 'यालागीं रिघे अभिचारीं ते ममता खरी तामस।' –एभा २५ १३२ 'क्षत्द्दतशेष द्रुत गच ते अभिचारप्रयागमें फिरले।' –मोभीष्म १० ६९ २ यासबंधीं हामादिकर्म, अनुष्ठान ३ हिंसा, वध [स अभि+चर्]

**अभिचारक–रिक**—वि १ जारणमारण करणारा, अभिचार करणारा, जादूगार 'आणि अभिचारकीं निद्दीं। उपद्रविजे चतुलें काहीं।' –ज्ञा १६ ४०० २ जारणमारणसंबंधीं, अभिचाराचें, जादुगिरीचें 'तेथींचा अगम अभिचारक। वेदविरुद्ध मार्ग देख।' –एभा ११ १९०

**अभिचारी**—पु अभिचार करणारा, मांत्रिक जादुगार 'देखा स्वव्हणी नाहीं अभिचारिक। जा होमी कातिजाचा देहिक॥' –शिशु ८४१ [स ]

**अभिजन**—पुन १ जन्मभूमि मातृभूमि स्वदेश २ कुटुंब, कुळ, वंश ३ उत्पत्ति ४ उच्च कुळ सत्कुळ ५ पूर्वज किंवा वंशज

६ नातलग, परिवार, सेवकजन, अनुचर [ सं ] ०सत्ता–स्त्री जींत सरदार प्रमुख आहेत अशी राज्यपध्दति, उमरावसत्ता, इं ॲरिस्टॉक्रसी 'परंतु त्यांतील अभिजनसत्तेचें बीज मात्र त्यांनीं नेलें नाहीं'–पार्लमेंट २७६

**अभिजपणें**—सक्रि जप करणें, पुनःपुन्हा उच्चार करणें, पठण करणें 'रागरागेगन अभिजपून लताच्या पानातील हिरव्या रंगाच्या मनोहारितेला हरताळ फासणार असेल'–विचावि २ [ स अभि+जप् ]

**अभिजात-त्य**—वि १ कुलीन, सभ्य, थोर मनाचा, प्रतिष्ठित, उच्च दर्जाचा 'तरि आता पवित्र तयाचेंचि कुळ। अभिजात्य तेंचि निर्मळ।'–ज्ञा ९ ४२१ २ सुसंस्कृत, विदग्ध, इं क्लासिकल ०वाङ्मय–न विदग्धवाङ्मय, उच्च दर्जाचें वाङ्मय, श्रेष्ठ प्रतीचें–पहिल्या प्रतीचें प्रथसाहित्य ( इं क्लासिकल ) [ स ]

**अभिजाति**—स्त्री १ मनाचा थोरपणा, सभ्यपणा २ कुलीनता, उच्च वंश [ स ]

**अभिजित्**—न २८ वें नक्षत्र उत्तराषाढा नक्षत्राचा शेवटचा ( चौथा ) भाग व श्रवण नक्षत्राचा १५ वा अंश एवढया कालास अभिजित् नक्षत्र म्हणतात ( इं लायरा ) या नक्षत्राचा क्रांतिवृत्ताशीं संबंध नाहीं हें फारच उत्तरेस आहे 'तो मी अभिजितु म्हणे हरी।' –एभा १६ २०१ –पु १ दोन प्रहरचे बारा वाजण्याच्या पूर्वी एक घटका व नंतर एक घटका मिळून दोन घटकांचा काळ, सूर्योदयापासून आठवा मुहूर्त 'वीराच्या अभिमाना झाला अस्त। मध्यान्हीं आला आदित्य। मुहूर्तीं मुहूर्त अभिजित। समयो उचित लग्नाचा।' –एरुस्व ७ ६४ २ आगंतुक, आकस्मिक, अनपेक्षित ( पाहुणा, खर्च, एखादी गोष्ट ) 'आम्हीं आहे त्यांत यास पुरायाजोगी वर्षाची खर्चाची बेगमी केली आहे, आता मध्येंच अभिजित् एखादा खर्च उभा राहिल्यास पुरणार नाहीं नवें घेतलें पाहिजे' [ स ]

**अभित.**—क्रिवि सभोंवार, सर्व बाजूंनीं, सर्व दिशांनीं [ स ]

**अभितप्त(दृष्टि)**—वि ( नृत्य ) पापण्याची उघडझाप करणें व बाहुल्याची चमक कमी करणें हा अभिनय निराशा, पीडा, राकट इ० अवस्थादर्शक आहे [ स अभितप्त=तापलेला, दुःखी ]

**अभिधा**—स्त्री १ संकेतानें शब्दाचा वाच्यार्थ दाखविण्याची शक्ति २ शब्दाचा अर्थ, वाच्यार्थ यौगिक अर्थ ३ नाव, पदवी लक्षण [ स ] ०वृत्ति–स्त्री शब्द व त्याचा यौगिक अर्थ यामधील संकेत

**अभिधान**—न १ नाव, नाम 'आता विषयाभिधान-। भेदु आइकें॥'–ज्ञा १३ ११६ २ नामनिर्देश, उल्लेख, अर्थबोध 'घट हा शब्द कंबुग्रीवादिमान् जो व्यक्तिविशेष त्याचें अभिधान करतो' ३ नाव सांगणें, नाव घेणें. ४ व्याख्या करणें, लक्षण करणें 'आता दु खाची आतुवट वेली। दोषकांटयाची जरी भरली। तरी निनामाभिधानीं घाली। असुरी ते।'–ज्ञा १६ ११३ ५ शब्द ६ शब्दसंग्रह, शब्दकोश उ० हेमचंद्राचा अभिधानचिंतामणि हा समानार्थक कोश, हलायुधाचा अभिधानरत्नमाला हा कोश ७ ( व्या ) कर्त्याबद्दल विधान [ स अभि+धा=ठेवणें ] ०कोश–पु अनेक कोशांचें ज्ञान, चौसष्ट कलांपैकीं एक कला [ स ]

**अभिधायक**—वि नामनिर्देश करणारा, उल्लेख करणारा, कथन करणारा, दर्शविणारा ( शब्द, वक्ता ) [ स ]

**अभिधेय**—वि नावाचें, उल्लेखिलेलें, निर्दिष्ट केलेलें, निर्देशिलेलें, दाखविलेलें, कथन केलेलें –न अर्थ ( शब्दाचा ), विषय ( बोलण्याचा ) [ स ]

**अभिनंदन**—न कोणी कांहीं चांगलें केल्यास, किंवा कोणाचें कांहीं चांगलें झाल्यास त्याबद्दल आनंदप्रदर्शन कौतुक, स्तुति [ स अभि+नन्द् ]

**अभिनय**—पु १ मुद्रेनें किंवा अंगविक्षेपानें किंवा इतर हावभाव करून मनातील भावना व्यक्त करणें २ ( नाट्य ) ज्याचें रूप घेतलें असेल त्याचें–वेष, भाषण, चेष्टा, मनोविकार इत्यादि सर्व गोष्टींमध्यें अनुकरण करीनें रंगविलेल्या भूमिकेचें तंतोतंत ज्ञान, हावभाव व वेष यांनीं श्रोत्यांस बरोबर करून देणें ३ ( नृत्य ) हस्तपादादि अवयवांच्या नियमबद्ध हालचालीनें रस व भाव प्रकट करणें ४ ( सामा ) हावभाव, चेष्टा, अंगविक्षेप [ स अभि+नी=जवळ नेणें ]

**अभिनव**—वि १ नवीन, नूतन 'आता अभिनव वाग्विलासिनी'। –ज्ञा १ ०१ २ अपूर्व, आश्चर्यकारक, विलक्षण 'कृष्ण पहावयाच्या लोभा। नयनीं नयनासी निघती जिभा। श्रवण श्रवणासी वर्भा। अभिनव शोभा कृष्णाची।'–एरुस्व १ ७६ –न नवल आश्चर्य 'अभिनव करितीं सकळ जन। म्हणती वांजेसी गर्भ धारण।'–गुच ३९ ३३ [ स ]

**अभिनवणें**—अक्रि अपूर्वतेनें प्रकट होणें 'तो शांतुचि अभिनवेल। ते परियेमा मऱ्हाठे बोल।'–ज्ञा ४ २१४ [ स अभि+नव ]

**अभिनिविष्ट**—वि १ अभिनिवेशयुक्त उत्सुकतापूर्वक, लक्ष देणारा, पूर्ण व्यग्र किंवा एकचित्त झालेला, अति आसक्त २ निपुण, परिचित निष्णात असलेला ३ गर्विष्ठ हेकेखोर [ स अभि+नि+विश् ]

**अभिनिवेश**—पु १ औत्सुक्य, एकचित्तता २ निश्चय, प्रयत्न नेट आग्रह धीर ३ दमदारपणा नैपुण्य तरबेजपणा, प्रगति, परिचय, परिज्ञान ४ मनावरील परिणाम किंवा ठसा कल्पना, ग्रह ५ अहंकार, अभिमान ६ ( व्यापक ) संचार ( क्रि० धरणें ) [ स ]

**अभिनिवेशी**—वि १ अभिनिवेश बाणलेला ० २ हट्ट धरणारा, हेकट, हट्ट धरून राहणारा, ३ निग्रही, दमदार, चिवट, पिच्छा धरणारा [ स ]

**अभिनीत**—वि १ चांगला शिकविलेला, शिक्षण दिलेला, तर बेज केलेला २ हावभाव करून व्यक्त केलेले किंवा अभिनयानें दर्शविलेले (मनोविकार, भावना) [स ]

**अभिनीति**—अभिनय पहा [स ]

**अभिन्न**—वि १ पृथक् किंवा वेगळें नसलेलें, भेदरहित 'एव जीवधर्मेंहीतु। जो जीवेंसीं अभिन्नु।'–ज्ञा १३ १०६६ २ (ल) अद्वैत, एकरूप, सरूप 'अभिन्न सुखसेवेंगातू। नारद आनंदें नाचत गातू।'–एभा १ ९२ ३ (*गणित*) *अपूर्णांक नसलेले*, पूर्णांक संकलन (बेरीज), व्यकलन (वजाबाकी), गुणन (गुणाकार), भाजन (भागाकार) या शब्दार्थी जोडून उपयोग करतात ४ अखंड, सगळा [स ] ॰**परिकर्माष्टक**–न (गणित) पूर्णांकाची मुख्य आठ कृत्यें (बेरीज, वजाबाकी, गुणाकार भागाकार, वर्ग, वर्गमूळ, घन, घनमूळ), [स ]

**अभिन्नव**—अभिनव (अप) पहा –नागा ६३० [स अभिनव ]

**अभिपट्टी**—स्त्री जादा कर –शर

**अभिप्राय-य**—पु १ अर्थ, उद्देश, हेतु, भाव 'तैसा नव्हे हा अभिप्राव।'–रास १० ८६ 'तुझा अभिप्राय पाहून मला फार खेदवाटतो'–बाळ २ २३१. २ भावार्थ, साराश, मथितार्थ 'भक्तिचेन योगें देव। निश्चयें पावती मानव। ऐसा आहे अभिप्राव। ईये ग्रंथीं।'–दा १ १ ४ ३ मत, शेरा, सरकारी कामगाराचा शेरा किंवा अहवाल, रिपोर्ट 'मामलतदाराचा अभिप्राय घ्यावा.' [स अभिप्राय ]

**अभिप्रेत**—न अर्थ, हेतु, उद्देश, योजना, साराश –वि १ उद्देशिलेलें, योजिलेलें ठरविलेलें २ इष्ट, प्रिय 'निष्कामासि अभिप्रेत। सर्वदा जें।'–ज्ञा ८ १०५ 'प्रार्थना हें या वर्गास अभिप्रेत असलेल्या साधनांपैकीं मुख्य साधन आहे'–टि ३ २४३ [स अभि+प्री ]

**अभिभव**—पु पराभव, पराजय मोड, दाणादाण विच्छी *अभिभव नव्हे त्यासी। तूं हरीकेशी रक्षिता।'*–एभा ४ १५९

**अभिभवणें**—उक्रि (काव्य) १ पराभव करणें; जिंकणें घेरणें 'ना तरी रगीं शव साडिजे। तें पाचैमेरी गिधीं विदारिजे। तैसें स्वधर्महीन अभिभविजे। महादोषीं।–ज्ञा २ २०० २ उदय पावणें पसरणें 'तेथ यजन म्हणिजे स्वयें यज्ञ कराव। जे का सोमादि अश्वमेधांत बरवे। अथवा नित्यकर्मी अभिभवे। श्रौतस्मार्तादिक।'–स्वादि ५ ४ ८ [स अभि+भू]

**अभिभूत**—वि पराभूत, पराजित, वश 'देखें कामना-भिभूत।'–ज्ञा २ २४८ [स ]

**अभिमत**—वि प्रिय, सगत, पसत [स. अभि+मन्]

**अभिमंत्रण**—न १ मतरणें, मत्र म्हणून विशिष्ट संस्कार करणें, सुसंस्कृत करणें, मंत्रानें पवित्र करणें, भारणें २ आमत्रण, निमंत्रण बोलावणें, हाक मारणें [स अभि+मन्त्र् ]

**अभिमंत्रणें**—क्रि मतरणें, मत्र म्हणून सुसंस्कृत–शुद्ध करणें

**अभिमंत्रित**—वि १ मतरलेलें, अभिमत्रण केलेलें, मत्र म्हणून पवित्र केलेलें २ बोलाविलेलें, आमत्रण दिलेलें–केलेलें, आमंत्रित [स अभि+मत्र ]

*अभिमनस्क–अभिमना*—*वि १ विशिष्ट गोष्टीकडे मन* वळलें आहे असा, विशिष्ट गोष्ट ज्याच्या मनात आहे असा, चित्त एकाग्र असलेला, तल्लीन, आसक्त २ उत्सुक, तयार, उत्कंठित असलेला, सावधान [स अभि+मनस् ]

**अभिमर्द**—पु जोरानें तुडविणें, किंवा मर्दन करणें–मळणें, अतिशय तुडवातुडव–चेंदामेंदा, नाश, नासधूस [स अभि+मृद् ]

**अभिमान**—पु १ गर्व, ताठा, आढ्यता, तोरा, चढेलपणा, मगरूरी २ आत्मिक भावना, आपलेपणाची दृष्टि किंवा जाणीव, आपल्या स्वत विषयीं किंवा आपल्या वस्तूसबधीं हा माझा असा मह असणें, मन व अतकरण यावरें किंवा गुतविणें, जेणेंकरून त्या त्या विषयाचें जें बरें वाईट तें तें आपणेंच असें वाटणें सामाशब्द– कुलाभिमान, अधिकाराभिमान, *जात्यभिमान*, *देशाभिमान* ३ एकाकडे ठेवलेला, लावलेला हक्क, हक्क सागणें, स्वत्व-स्वामित्व वाद ४ मान, योग्य गर्व, उच्चत्वबद्दलची भावना उदात्त किंवा थोर मनोविचार (क्रि॰ धरणें, भोगणें, वाहणें, मानणें, करणें) काहीं वाक्प्रचार– **अभिमान धरणें–पडणें**=एखाद्या गोष्टीबद्दल अतिशय काळजी, कळकळ, आस्था वाटणें **अभिमानाखालीं जाणें**–१ गर्वामुळें नाश पावणें, नुकसान होणें २ अहकारानें बोलणें, वागणें **म्ह॰** अभिमानाचें घर खालीं असणें=गर्विष्ठ मनुष्य नेहमीं अवनत स्थितींत असतो, त्याचा कधीं उत्कर्ष होत नाहीं **अभिमानानें मरणें**–१ गर्वामुळें आपला जीव, दर्जा किंवा सौख्य नाहींसें करणें २ काहीं झालें तरी (जिवावर बेतली तरी) आपला ताठा किंवा मत, पक्ष, हेतु कायम ठेवणें, हेका न सोडणें **अभिमानास पडणें–पेटणें**–लाजेमुळें किंवा केवळ अपमानाच्या कल्पनेमुळें मोठ्या सकटासीं लागणें, ईर्षेस चढून कार्योद्युक्त होणें

**अभिमानणें**—उक्रि (काव्य) अभिमान (सर्व अर्थी) धरणें, बाळगणें 'निज शरीरचि म्या अभिमानिलें। प्रमुख गर्वभरें अप मानिलें।'

**अभिमानधन**—वि अभिमानाला महत्त्व देणारा, अभिमान धरणारा स्वत च्या शब्दास जागणारा, धीराचा, निश्चयी, दम दार [स ]

**अभिमानशून्य**—वि अभिमान नसलेला, स्वाभिमान न बाळगणारा, पाणी नसलेला [स ]

**अभिमानी**—वि १ गर्विष्ठ, मगरूर, दिमाखी, ताठ्याचा २ योग्य अभिमान बाळगणारा [स अभिमानिन्]

**अभिमुख**—वि १ सामोरा, सन्मुख, -कडे तोंड केलेला, रोख असलेला उ० पूर्वाभिमुख, सूर्याभिमुख, मदभिमुख इ० २ (ल) प्रवृत्त, उद्युक्त, सज्ज असलेला, इरादा असलेला, (अमुक एका गोष्टीच्या) चिंतनात किंवा विचारात गढून गेलेला उ० अध्ययनाभिमुख, युद्धाभिमुख प्रयाणाभिमुख इ० ३ अनुकूल, फायदेशीर, उत्कर्षकारक (नशीब, काल, परिस्थिति) उ० दैवाभिमुख [स]

**अभियुक्त**—वि १ आरोप असलेला, विरुद्ध तक्रार असलेला, आरोपित, आरोपी २ पूज्य, पवित्र मानलेला, अधिकारी म्हणून मानलेला (ग्रंथ, ग्रंथकार) ३ अभिजात (क्लासिकल) पहा 'वरील अभियुक्त (ग्रीक व ल्याटिन) भाषांतले शब्द लोकभाषेत थोडथोडे मिसळत चालले होतेच' -नि ५५२ ०उक्ति-स्त्री (अभियुक्तोक्ति) अधिकारयुक्त वचन किंवा बोलणें, अभियुक्तजनांची उक्ति सूत्र वचन ०प्रयोग-पु अधिकारयुक्त प्रयोग, अधिकारी माणसांनी योजलेला प्रयोग [स]

**अभियोग**—पु १ फिर्याद, आरोप, (वादीची) तक्रार आळ, दोष २ वाद, युद्ध, भांडण, द्वंद्व 'श्रींच्या अधिकाऱ्यासमोर वादी प्रतिवादीच्या अभियोगात झालेला पुरावा कोणत्या तरी सभेपुढें यथेच्छ वाचीत बसण्याचें नाकारलें' -दि ४ १२७ ३ मनन अभ्यास, चिकाटी [स]

**अभिराम**—वि १ सुंदर, रमणीय २ आनंददायक, चाल्हाददायक, सुखदायक, समाधानकारक [स]

**अभिरुचि**—स्त्री १ चव, गोडी, आवड, शोक [स]

**अभिरूप**—वि १ सदृश, सारखें, एकरूपी, साजेसा, शोभेसा २ सुंदर रम्य, देखणें, सुरूप [स]

**अभिलषित**—वि इच्छित, इष्ट प्रिय 'जो अभिलषित मनोरुचि। पुरविता तो।' -ज्ञा १ २७ [स अभि+लष्=इच्छिणें]

**अभिलाष-ख**—पु १ प्राप्तीची इच्छा, हेतु 'स्वधर्म करणें आवश्यक। तेथें सांडणें फळाभिलाख।' -एभा १८ १६८ 'म्हणे अर्जुना परियेसीं। जो हा अभिलाषु प्रौढमानसीं।' -ज्ञा ३ २९१ २ लोभ हांव, हावरेपणा ३ दुसऱ्याच्या द्रव्यादिकाचा अपहार करण्याची इच्छा, दुसऱ्याचें गिळकृत करणे, अपहार 'करिता परदारेचा अभिलाख। कोण कधीं पावला यश।' [स अभि+लष्=अभिलाष] ०बुद्धि-स्त्री अपहार करण्याची इच्छा

**अभिलाष(ख)णें**—क्रि १ इच्छा करणें, अपहार करणें 'शरीरनिर्वाहाविखीं। कोठें कांहीं नाभिलाखी।' -एभा ३ ५०१ 'माती अभिलाषिती जननी। म्हणोनि विंधिलें कामबाणी।' -एरुस्व ७ ५४

**अभिलाषित**—वि वाञ्छित, मनोगत, इच्छा केलेलें, लोभ ठेवलेलें, हाव धरलेलें, अभिलषित पहा

**अभिलाषी**—वि लुब्ध, लालिस, हावरा, इच्छा करणारा 'तैसेनि साहकारें। फळाभिलाषियें नरें।' -ज्ञा १८ ६०५ [स अभिलाषिन्]

**अभिवचन**—न वचन, भाक, खात्रीचा शब्द, वाग्दान, हमी [स]

**अभिवंदणें**—क्रि नमस्कार करणें 'तैसा पुढतपुढती तोचि। मिया अभिवंदिला श्रीगुरुचि।' -ज्ञा १ ७

**अभिवंदन**—न नमस्कार सर्वांगेकरून नमन, नामगोत्रोच्चारपूर्वक वडील गुरु यांना नमस्कार करणें [स अभि+वन्द्]

**अभिवादक**—वि नमस्कार करणारा, (मी अमुक अमुक असें सांगून) अभिवादन करणारा [स अभि+वद्]

**अभिवादन**—न १ नामगोत्रोच्चारपूर्वक वडील-गुरु यांना नमस्कार २ (साधा) नमस्कार प्रणिपात, नमन [स]

**अभिविधि**—पु समावेश, अंतर्भाव, -पासून-पर्यंतचा सर्वांचा समावेश उ० रविवारपासून शनवारपर्यंत अभिविधि विवक्षित असता सात दिवस घडतात, नाहीतर पाचच होतील पुण्यापासून नाशिकपर्यंत अभिविधि विवक्षित नसता मध्यें एकदेखील शहर नाहीं [स]

**अभिवृद्धि**—स्त्री वाढ, उत्कर्ष वृद्धि, भरभराट, चढ, वाढवा, वर्धन उ० आयुष्याभिवृद्धि, ऐश्वर्याभिवृद्धि [स]

**अभिव्यक्त**—वि स्पष्ट, स्वच्छ, उघड, उघडें, खुलें [स अभि+व्यक्त]

**अभिव्यक्ति**—स्त्री खुलासा, स्पष्टपणा, उघडपणा स्वच्छपणा, पुरें व्यक्त करणें, पूर्ण प्रदर्शन, स्पष्ट रूपरेषा किंवा गुणवर्णन, प्रकट भाव 'तेथें महाभूतांची। अभिव्यक्ति होय।' -ज्ञा १४ ९२ [स]

**अभिव्यंजक**—वि स्पष्ट, उघड व्यक्त करणारें, पूर्ण रूपरेखा, वाढ दर्शविणारें, खुलासा करणारें गुणादिकांची अभिव्यक्ति करणारें [स]

**अभिव्यापक**—वि सर्वत्र वटणारें-पसरणारें, सर्व व्यापणारें, व्यापणारें, स्वीकारणारें, आक्रमण करणारें, सर्वव्यापक [स]

**अभिव्यापणें**—क्रि (काव्य) सर्वत्र पसरणें-आक्रमणें-फैलावणें

**अभिव्याप्ति**—स्त्री सर्वत्र विस्तार-फैलाव-प्रसार, विश्वव्यापकत्व, सर्वव्यापकता सर्व लोकांवर आकाशाची अभिव्याप्ति आहे'

**अभिशप्त**—वि १ खोटा आळ (अभिशाप) ज्याच्यावर आला असा २ शाप दिलेला [स अभि+शप्]

**अभिशंसन**—न १ तुफान, यारूप, अभिशाप, खोटा आरोप, आळ २ निंदा, अपमान [स अभि+शंस्]

**अभिशंसी**—वि मोठा आरोप पसरविणारा, फैलावणारा, तुफान घणारा, निंदक [स ]

**अभिशस्त**—वि निंदित, आरोपित, अभिशप्त पहा [स ]

**अभिशस्ती**—स्त्री १ (व ) आळ, आरोप, निमित्त 'नाहक आमच्यावर अभिशस्ती आणू नका ' २ निंदा, अपमान [स ]

**अभिशाप**—पु विप्र अभिश्राप १ अन्यायानें ठेवलेला आरोप, आळ, खोटा आरोप–ठपका २ तळतळाट, शाप, निंदा (के०दृशे) 'अभिशाप होईल माने माथा । ऐसें सर्वथा न करावें ।' 'असती कीर्ति जाईल। जगचि अभिशापु देईल।' –ज्ञा २ १९८ [स अभि+शप्]

**अभिशिस्ती**—(व ) अभिशस्ती पहा

**अभिशेष**—पु अभिषेक (अप ) पहा ' लिंगें लाखोली अभिशेष। नामस्मरणीं विस्वास।' –दा २ ७ ७६ [स अभिषेक]

**अभिश्रवण**—न १ श्राद्धाचे ब्राह्मण जेवावयास बसले असता त्यांना एकावयासाठीं म्हणण्यात येणारे वेदमंत्र २ असे मंत्र म्हणणें [स ]

**अभिश्राप**—अभिशाप पहा 'अभिश्राप पूर्ण तुजवरी।' –सप्र २ ३ [स अभिशाप]

**अभिषव**—पु १ धर्मकृत्य करण्यापूर्वीचें स्नान २ सोम लतेचा रस काढणें, (सामा ) मद्य तयार करणें ३ यज्ञयाग ४ अभिषेक ५ (सामा ) स्नान –न –कांजी, अबील [स अभि+सु]

**अभिषिक्त**—वि (विप्र ) अभिषेकी १ ज्यास अभिषेक केला आहे तो (देव, राजा ) २ संस्कारानें स्थापलेला, अधिकारारूढ, पदारूढ [स ]

**अभिषेक**–पु, **अभिषिंचन–अभिषेचन**—न १ विधिपूर्वक व संस्कारपूर्वक स्नान घालणें अभिषेकपात्रांत पाणी, दूध, वगैरे घालून मंत्र म्हणून पात्रांतील पाणी थेंब थेंब पाडून देवाची मूर्ति, राजा, उपाध्या भाजागी मनुष्य इ० स ) स्नान घालणें, देवपूजेंतील स्नान धर्मसंस्कारात यजमानावर पाणी प्रोक्षण करणें, सतत धार धरणें 'पय दधि आणि घृत । मधु शर्करा गुड संयुक्त । मूर्ति न्हाणानि पंचामृतें। अ० वरिती मग तेव्हां ॥ ' २ सिंचन, शिंपडणें ३ राज्याभिषेक ०पात्र–न देवादिकांवर अभिषेक करावयास, सतत धार पडण्याजोगें सछिद्र भांडे [स अभि+सिच्]

**अभिषेक(च)णें**—उक्रि संस्कारपूर्वक स्नान घालून प्रतिष्ठापन करणें पदारूढ करणें अभिषेक करणें 'इंद्रें स्कंदास आणूं। सेना पतित्व दिधलें जाण। दिव्यरथीं बैसवून। अभिषेकिला भाद्रपदीं ॥'

**अभिष्ट**—अभीष्ट पहा

**अभिष्यंद**—न डोळे येणें–गळणें लागणें, एक नेत्ररोग [स ]

**अभिसंधि**—पु भय लाभ, उद्देश, बेत (धि० ठेवणें) [स ]

**अभिसरण**—न १ इकडेतिकडे धांवणें–वाहणें (द्रवपदार्थ) २ पाणी जाणें, मरणें (शोनइपाठीं वायु) ३–कडे जाणें=जवळ पोहोंचणें, अभिगमन ४ (शाप ) अ दोन द्रवरूपी पदार्थांचें एकमेकांत समिश्रण होणें –ज्ञाको (अ) ३१८ आ प्रसरण, विक्षेप, इ डिफ्यूजन –रसायन ३५ उ० उष्णताभिसरण, वाय्वाभिसरण [स अभि+सृ=सरणें]

**अभिसार**–पु, **अभिसारण**—न साउलवड, इकडेतिकडे पसरणें, विस्कळित पसरणें, वाताहत, दाणादाण, सैरावैरा होणें [स ]

**अभिसारिका**—स्त्री पूर्वी संकेत करून प्रियकराकडे ठरलेल्या जागीं संभोगार्थ जाणारी स्त्री [स ]

**अभिस्नाट**—न तक्ता, पगारपत्रक 'एकदा तुकोजीराव महाराजांनीं त्याच्या समतीवाचून एक हुकूम दिला होता म्हणून आणि सात त्याचें नाव अभिस्नाटांत लागत होतें ' –विक्षिप्त २ ६० [इं ॲब्स्ट्रॅक्ट अप ]

**अभिहत**—वि १ वश झालेला, नरम आलेला, वठणीस आलेला, नम्र झालेला २ मारलेला, पीडलेला, बडविलेला, झोडपलेला [स अभि+हन्]

**अभिहित**—वि म्हटलेलें, बोललेलें कथन केलेलें, नामनिर्देश केलेलें [स अभि+धा]

**अभिज्ञ**—वि १ जाणणारा, माहितगार 'कैवल्यमार्गीचा अभिज्ञु । सागती हा ।' –ज्ञा १६ ९९ २ निपुण, कुशल, तरबेज, निष्णात, पारंगत, मर्मज्ञ [स ]

**अभिज्ञात**—वि पूर्ण माहीत असलेलें, पूर्णपणें जाणलेलें, अवगत असलेलें, अभिज्ञ पहा [स ]

**अभिज्ञान**—न १ पूर्ण किंवा खोल ज्ञान, संपूर्ण ज्ञान, माहिती २ खूण (ओळख पटण्यासाठीं केलेली किंवा दिलेली) उ० अभिज्ञानशाकुंतल [स ]

**अभीप्सित**—वि १ इच्छिलेलें, प्रिय, आवडलेलें, इच्छित वांछित, मनोगत २ अनुकूल, उत्कर्षकारक, फायदेशीर –न कल्याण, हित [स अभि+ईप्स्]

**अभीर**—आभीर पहा

**अभीरी**—पु (संगीत) एक राग, या रागास षड्ज तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात आरोहांत ऋषभ व धैवत स्वर वर्ज्य आहेत व अवरोह संपूर्ण आहे जाति औडुव–संपूर्ण वादी स्वर मध्यम व संवादी निषाद गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर [स आभेरी=एक रागिणी]

**अभीष्ट**—वि अभीप्सित पहा [स अभि+इष्] ०चिंतक–वि एखाद्याचें कल्याण इच्छिणारा, त्याची प्रार्थना करणारा [सं ] ०चिंतन–न कल्याण व्हावें अशी (ईश्वराजवळ) प्रार्थना, इच्छा [सं ]

**अभुक्त**—वि १ ज्याचा उपभोग कोणी घेतला नाहीं असें, न उपभोगलेलें, उपयोग न केलेलें, उपयोगात न आणलेलें २ न जेवलेला, उपाशी, उपभोग न घेणारा ३ ज्यानें उपभोग (संभोग) घेतला नाहीं असा (मनुष्य) [स अ+भुज्] ०मूळ–न. ज्येष्ठा नक्षत्राच्या शेवटच्या चार व मूळ नक्षत्राच्या पहिल्या चार घटिका असा आठ घटिकांचा काळ [स]

**अभुला**—वि न भुलणारा, विसरणारा [प्रा अ+भुल्ल म भूल]

**अभूक**—स्त्री तृप्ति

**अभूट**—न (ग्रा) अभ्रे, मळभ [स अभ्र+ट]

**अभूत**—वि न झालेला, नसलेला [स] ०पूर्व–वि अपूर्व पूर्वी कधीं न झालेला नसलेला [स] –तोपमा–स्त्री असंभव नीय कल्पनेपासून घेतलेली उपमा किंवा उदाहरण, जी गोष्ट संभवनीय नाहीं, घडलेली नाहीं तिची उपमा [स]

**अभेंड**—वि (व) अडाणी, अज्ञ [स अ+भण्=पठण करणें, शिकणें]

**अभेद**—पु १ अभिन्नता, फरक नसणें, भेद नसणें एकरूपता, एकता, एकी, एकदृष्टि व एकभावना असणें, ऐक्य 'आतां अज्ञानाचेनि मारें। ज्ञान अभेदें वावरे।' –अमृ ४१ 'या नामा नामीं आश्चर्यो तैसा। अभेदु असे।' –ज्ञा १७४०३ २ अभेद भाव–मत पहा [स अ+भिद्] –वि अभिन्न, भाग करता न येण्यासारखें अद्वैत एकरूप ०भाव, ०मत–पुन विश्व व ब्रह्म किंवा जीव व शिव हीं एकच आहेत असें मत, तत्त्व अद्वैतमत [स] ०भक्ति–स्त्री आत्मा व ईश्वर (जीवात्मा व परमात्मा) एक होत ही जाणीव, तसेंच या भावनेनें केलेली ईश्वराची भक्ति ०वाद–पु अभेदमत व त्याचें समर्थन ०वादी–वि अभेदमताचें अनुसरण करणारा, अभेदमत मानणारा [स]

**अभेद्य**—वि १ वेगळें न होणारें, न फुटणारें–मोडणारें–तुटणारें–भंगणारें, भाग न करता येण्यासारखें २ भोसकता न येणारें [स]

**अभोगत**—वि १ न भोगलेलें, हिशेबात न घेतलेलें अनिश्चित न ठरविलेलें, अखेरचा निकाल लागला नाहीं असें, अजूनपर्यंत न स्वीकारलेलें किंवा न घेतलेलें–केलेलें २ मोघम अनमानानें घेतलेलें, –रा ३३११ [स अ+भुज्=अभुक्त]

**अभोगती जाणें**—(अधोगतिचा अपभ्रंश) अधोगतीस जाणें, चिरडले जाणें, चुराडा होणें नाश होणें [स अधोगति]

**अभोग्य**—वि उपभोग घेण्याला–करण्याला अयोग्य [स]

**अभोज्य**—वि न खाण्याजोगें, खाण्यास अपवित्र, अयोग्य अभक्ष्य [स] ०अन्न–वि ज्याच्या (पतित सुतकी इ.)हातचें अन्न खाण्याला निषिद्ध मानलें आहे असा [स]

**अभोळ**—वि दुर्बल, अशक्त 'आम्हा सारखिया अभोळा।' –ज्ञा ५१६६ [स अबल]

**अभ्यक्त**—वि तैलमर्दन वगैरे केलेला, अभ्यंग केलेला

**अभ्यंग**—न (स्नान करण्यापूर्वी) तेल, तूप, अत्तर इत्यादि स्निग्ध पदार्थांचा शरीरास करण्यात येणारा लेप, माखणें, चोपडणें, उटी लावणें, शरीर मर्दन करणें 'नाहीं अभ्यंग केश विंचरण। तेणें जटा वळल्या आपण। हें ब्रह्मचारियासि जाण। व्रतधारण नेमस्त॥' –एभा १७२८१ ०स्नान–न अभ्यंग लावून केलेलें स्नान, न्हाणें [स अभि+अञ्ज्]

**अभ्यंग**–पु (ख्रि) 'अङ्क्शन' या इंग्रजी शब्दाचा पर्याय, एक्लेसियेच्या वडिलानें प्रभूच्या नावानें आजारी मनुष्याच्या सर्वांगास विधिपूर्वक आशीर्वादित केलेलें तेल लावून त्याच्यासाठीं प्रार्थना करणें 'प्राचीन एक्लेसियेमध्यें अभ्यंग करण्याचा प्रघात होता' –ई नि १९६ याकोबपत्र ५१४१५० [स अभि+अञ्ज्]

**अभ्यंजन**—न तैलमर्दन, अभ्यंग पहा [स अभि+अञ्ज्]

**अभ्यंतर**—न १ आंतील भाग, अंतर्भाग, गाभा, मध्यभाग, अंतरंग 'आणि अभ्यंतरिलियेकडे।' –ज्ञा १३३८४ २ मन, हृदय, अंतःकरण ३ समाविष्ट झालेली जागा, माजघर, आंतील बाजू ४ अंतःकरणांतील हेतु 'तुका म्हणे यासी। न लावी उशीर। माझें अभ्यंतर जाणोनियां।' –तुगा १६४७ ५ उदर, अंतरंग, पोट 'नित्य निर्माल्य सिरेंवेशिरीं। चरणतीर्थ अभ्यंतरीं।' –एभा २२९६ ०ज्ञ–पु अंतर्ज्ञानी ०ज्ञान–न अंतर्ज्ञान पहा [स]

**अभ्यर्चणें**—क्रि पूजा करणें

**अभ्यर्चित**—वि पूजित [स अभि+अर्च्]

**अभ्यर्थना**—स्त्री १ प्रार्थना, विनंति, विनवणी, याचना २ अर्जी [स अभि+अर्थ्]

**अभ्यस्त**—वि १ निपुण, परिचित, अभ्यास केलेला, वाकबगार, पटाईत २ ज्याचा अभ्यास, सराव केला आहे तो (शास्त्रादिक) ३ गुणलेला आवृत्ति केलेला [स अभि+अस्=फेकणें, टाकणें]

**अभ्यस्त**—वि सूर्यास्ताच्या वेळीं निजलेला –क्रिवि सूर्यास्तकालीं सूर्यास्तासमोर [स अभि+अस्=असणें]

**अभ्यागत**—पु १ पाहुणा अतिथि २ सत्कार, पाहुणचार 'काइ करो अभ्यागतु। तुम्ही निदानें तृप्तु।' –शिशु ७४ [स अभि+आ+गम्]

**अभ्यास**—पु १ व्यासंग सराव, परिपाठ, सवय 'अभ्यासें प्रगट व्हावें। नाहीं तरी झाकोन असावें।' –दा १९७१७ २ मन जाणण्यासाठीं केलेली आवृत्ति, घोकणें, पुनरुक्ति, निदिध्यास 'प्रधान अभ्यास म्हणजे पुनरुक्ति किंवा वारंवार काय सांगितलें आहे तें पहावें' –गी २० ३ सरावानें मिळविलेलें कौशल्य–योग्यता ४ (अंक) गुणाकार पद ५ (संगीत) रागविस्तार करताना एखाद्या

स्वराचें पुन्हां पुन्हा उच्चारण करणें ६ (व्या ) धातूतील पहिल्या अक्षराची पुनरुक्ति ( असें पुनरुक्त अक्षर मूळ धातूस द्विवार अभ्यास करून नवें क्रियापद सिद्ध करतात जसें –मामारलें, ददाति ' अथवनि मोरचे मारो । नाना म्हणे श्रीरी । वैराकार केगा । ' –पेवो १३ ) –साखालीं पडणें–एखाद्याच्या नेहमींच्या सरावामध्यें असणें, म्हृ० अभ्यासासारिखी विद्या अभ्यासामुळें प्राप्त होणारी विद्या [ स अभि+अस्=फेकणें, टाकणें ] ॰गम्य–वि अभ्यासानें, सरावानें प्राप्त होणारें –सागम्य–वि अभ्यासानें प्राप्त न होणारें [ अभ्यास + अगम्य ]

**अभ्यासणें**–क्रि अभ्यास करणें, शिकणें, सराव करणें, नेहमीं परिपाठ ठेवणें पाठांतर करणें, आवृत्ति करणें ' हेंच कायिस यावरी हाये । एसा जगी सदरो बर्तत आहे । तरी अभ्यासुनि आदीं पाहें । मग नव्हे तरी वायें । ' –ज्ञा ८ ८० ' ज्याने ( उच्चै अभ्यासाच्या ) चरणीं मनपवन । अभ्यासिती चपलता । ' –मुआदि ४४५ [ स अभि+अस्=फेकणें, टाकणें ]

**अभ्यासन**–न अभ्यास 'मलगे यापरतें वार्दीं करणें । नाना परींचीं अभ्यासणें । सकरपविकल्पात्मक साधनें । सर्व त्यनीज ॥ ' –परमा २४ [ स ]

**अभ्यासी**–वि १ अभ्यास केलेला, निष्णात २ अभ्यास करणारा, व्यासंगी अध्ययनशील [ स ]

**अभ्युत्थान**–न १ भेटावयास आलेल्याच्या स्वागतार्थ उठणें, मानसन्मान ( कि देणें घणें ) २ उदय उत्कर्ष 'अभ्युत्थान मधर्मस्य' –गीर ७६७ ३ एखाद्या विरुद्ध शस्त्र उचलणें माहिमेवर निघणें [ स अभि+उत्+स्था ]

**अभ्युदय**–पु १ वर येणें दिसू लागणें, उदय उगवणें ( आकाशातील ग्रह-तारे इ० ) २ ( ल ) उत्कर्ष भरभराट चालता काळ नशीब उघडणें–उदयाला येणें उन्नतावस्था ' म्हणौनि तेथ श्री तयें श्रीमतु । जेथ सो पाडुचा सुतु । तय विजय समस्तु । अभ्युदयो तेथ ॥ ' –ज्ञा १८ १६५५ [ स अभि+उदय ]

**अभ्युदित**–वि १ उगवलेला ( सूर्य इ ) २ ( ल ) नशीब फळलेला, अभ्युदय झाला आहे असा ३ सूर्योदयाच्या वर्ती किंवा त्यानंतर निजलेला [ स अभि=समोर+उदित=उगवलेला ]

**अभ्युपगम**–पु १ ( विशेषत प्रतिपक्षाचें म्हणणें पुढें खोडून काढण्यासाठीं तूर्त ) गृहीत धरून चालणें काहीं वेळ अनुमति देणें, स्वीकारणें २ जवळ जाणें–येणें आगमन, अभिगमन ३ सारख पणा, साम्य तुल्यभाव उपमान [ स ]

**अभ्युपेत्यवाद**–पु पुढें खाडून काढण्यासाठीं प्रतिपक्षाचें ... किंवा मानू काहीं वेळ गृहीत धरून त्यावर भाषण करणें [ स ]

**अभ्र**–न १ मेघ, ढग 'ना तरी अभ्रवातें हाले । ' –ज्ञा १ ३ २ ढगाची काळासी, आभाळ मळभ ३ आकाश, अंतरिक्ष ४ ( ल ) संकट [ स १ अभ्र ( अप+भृ=पाणी धारण करणारा ), २ अभ्र=गमन करणें ( पाणिनी ), फा अब्र झेंद अब्र ग्री ओंब्रॉस, ॲप्रॉस, ॲं इमेर ]

**अभ्रक**–पुन पारदर्शक व पापुद्र्यांनीं युक्त असें खडकात सांपडणारें एक खनिज द्रव्य प्रकार चार–पाढरा, तांबडा, पिवळा, काळा विजेच्या कारखान्यात व औषधाच्या कामीं विशेषत याचा उपयोग होतो [ स अभ्रक अभ्र–मेघाप्रमाणें ] ॰भस्म–न धान्याभ्रक करून तें सुकवून रुईच्या चिकात एक दिवस खलून त्याची टिकली करावी व त्याच्या भोंवतालीं रुईचीं पानें गुंडाळून शरावसंपुटात घालून गजपुटात दहन करून गजपुट द्यावें अशीं ७ पुटें दिल्यानंतर वडाच्या पारंब्याच्या काढ्याचीं वरीलप्रमाणें ३ पुटें देणें हें सर्व रोगावर योजतात ॰मारणें–न ( खडीकाम ) खडीकामा वर चकाकी यावी यासाठीं अभ्रकाचा भुसा वर मारणें

**अभ्रछाया**–स्त्री १ ढगाची सावली २ ( ल ) क्षणभंगुरता, पाण्यावरचा बुडबुडा 'अभ्रीची साउली आईत ऱ्या । ' ॰पटल–पडळ–न ढगांनीं आकाश आच्छादिलें जाणें व्याप्त होणें किंवा व्याप्त झालेली स्थिति–अवस्था, मेघावरण [ स अभ्र+पटल=आच्छादन, पडदा ]

**अभ्रमु**–स्त्री ( इंद्राचा हत्ती ) ऐरावताची स्त्री 'त्यासि जयश्री न त्यजि तसि जशि ऐरावतासि अभ्रमु रे । ' –मोसभा ७८२ [ स ]

**अभ्रा**–पु छत्री, लोड तक्या गादी गालिचा, इ० कावरील वस्त्राचें आच्छादन ( अभ्र आकाशास झाकितें त्याप्रमाणें ) [ स अभ्र, फा अब्र ]

**अभ्रात**–वि भ्रांतिरहित, निःसंशय 'तरि मी धनत्याधिक दोहन तुज जय घडेल अभ्रांत । ' –मोकर्ण २० ४१ [ स अ+भ्रांति ]

**अमइ**–उद्गा अगबाई ! आई ! ( आश्चर्य–उद्गारवाचक ) ' अमइ ! निरखिली म्या चोरटी चौदिशा गे । ' –आक १८ [ म अग+आई किंवा अम्मा+इ ]

**अमका**–वि १ कोणी एक इसम, म्हणणा कोणी विवक्षित मनुष्य कोणी एक ' लोक म्हणतील अमक्याचा अमुक । घरोघरीं मागतो भीक । ' –नव १८ ५१ २ ( नामावरोबर उपयोग ) कोणी विशिष्ट विवक्षित(इसम पदार्थ) [स अमुक] ॰तमका–ढमका–धमका–कोणी तरी कोणीएक ( इसम वस्तु ) [ अमका द्वि ]

**अमगळ**–वि विप्र अमगळ १ अशुभ मगल नसणारें, अनु कूल नसलेलें अहितकारक अनिष्ट २ घाणेरडें, खराब, गचाळ, अपवित्र, ओंगळ, भ्रष्ट ( क्वचित् विधि आचार क्रिया, स्थळ,

इसम ) ३ (फॉ ) ओवळें ४ (उप ) ज्याच्या कुंडलींत मगळ अशुभस्थानीं नाहीं असा

**अमटी**—अवटी पहा

**अमडा**—अवाडा पहा

**अमत्र**—न पात्र, भांडें —मोकृवि ३४२५ [ वैदिक स अमत्र=पात्र, भांडें ]

**अमंत्र-क**—वि १ ज्यास वेदमंत्राचा अधिकार नाहीं तो (स्त्री, शूद्र), वेदाला अनधिकारी २ न मंतरलेलें, वैदिकमंत्र न म्हणता केलेला ( विधि, समारंभ ) ३ मंत्राखेरीज इतर 'अमंत्र मक्षरं नास्ति।' [स. अ+मन्त्र ]

**अमंत्रि**—वि ज्याला मंत्री (प्रधान) नाहीं असा 'अम त्रिया राज्याची परी होये। बलासिया।' —राज्ञा १३ ५५० [स]

**अमंद**—वि १ शीघ्र, मंद नव्हे असा २ पुष्कळ 'सस्नेह ज्यात अतिसुंदर हास्यमंद। प्रेमप्रसाद शुभ ज्यात भरे अमंद।' —ध्यानमाळो ११ [स अ+मन्द]

**अमद(दा)नी**—स्त्री १ हंगामात उत्पन्न होणाऱ्या वस्तू, विवक्षितकालीं बाजारामध्यें येणारा माल २ हंगाम मोसम, सुगी, विपुलता ३ आयात मालावरील जकात, दस्तुरी ४ (जकाती अर्थीत) नव्या रस्त्यावरील, पुलावरील किंवा नदीच्या तरीवरील, रहदारी, व्यापारी वाहतूक ५ उत्कर्षाचा, भरभराटीचा काळ, ऊर्जित काळ 'सांप्रत तुझी अमदानी आहे म्हणून मोठाल्या गोष्टी सागतोस' ६ अवांतर मिळकत, खेरीज प्राप्ति, आगतुक लाभ, आडमिळकत ७ कारकीर्द, अमल ८ (व ) उत्पन्न, अमदनी ९ आवक, उत्पन्न, वसूल 'चहूकडून गल्ला यये येण्याची आमदानी बंद जाली' —रा ५ ४४ [फा आमदनी=मोसम, येणें, आयात (माल) उत्पन्न]

**अमन**—वि मनरहित, निर्विकार 'व्रत तप यज्ञ दान। त्याहून अधिक हरीचें ध्यान। निमिषामाजी समाधान। अमन मन होऊनि ठाके॥' —एरुस्व ४.९२ [स अ+मन] ०**मन**—न (मन या) उपाधिरहित मन, मनावाचून उत्पन्न झालेला आदि संकल्प 'हयें प्रकृतिपुरुषें दोनी। उपजलीं जयाचिया अमनमनीं।' —ज्ञा ९ २७२ [स ]

**अमनचमन-चमीन-चैन**—स्त्री १ शांति-समृद्धि, वैपुल्य, सुबत्कपणा २ मौज, मजा, गमत —वि विपुल, भक्कळ, पुष्कळ, अचळपचळ, अतिशय, उदंड, यथेच्छ —क्रिवि सुरक्षितपणें, शांत पणें, निर्धास्तपणें, निर्भयपणें, सुखानें, चैनीनें [अर अम्न=सुर क्षितता+चैन=मजा ]

**अमनधपका-का**—अममानधपका पहा

**अमनसभा**—स्त्री देशावर बेबंदशाही माजणारें सकट टाळण्यासाठीं उपाय सुचविणारी सभा, शांतिसभा (असहकारितेच्या चळवळी पासून सरकार अशा सभा भरवितें) [अर अम्न, अमान=सुरक्षितता शांति ]

**अमनस्क**—वि विमनस्क, मनरहित, शून्यमनाचा, लय नपावलेला, व्यग्रचित्त 'तया अमनस्काचें मन। बुद्धीही होय।' —ज्ञा १३ १००० [स अ+मनस्+क]

**अमनी**—उद्गा आई! अगबाई! इ० उद्गार, अमई पहा 'मकर केतनोम्द्भमणी। सुरिं म्हणती अमनी अमनी।' —आमपद ९०

**अमर**—वि न मरणारें, मृत्यूच्या आधीन नसलेलें, मृत्युरहित, नाशरहित, 'सहजें दुवेचा डिरु। आगेंचि तव अमरु। वरी आला पुरु। पीयूषाचा॥' —ज्ञा १४ २८ —पु अमर्त्य, देव, देवता, सुर 'कृष्णरस जे सेवित। तयासी फिरे होय अमृत। अमर अमृतातें सेवित। तेही चरफडित हरिरसा॥' —एरुस्व १ ७७ —न (गो) करवंद फळ [स] ०**कंद-कांदा**—पु १ या नावाच्या अनेक प्रका रच्या वनस्पती व कांदे आहेत उ० गुळवेल, कोरफड, निर्गुडी इ २ अमरवेलाचा कांदा—गड्डा 'नवसार अमरीसी वाडुनु अजन कीजे' वैद्यकवाड ७७ भाइमंडळ अहवाल ३ काल्पनिक सर्व रोगनाशक मुळी हिच्या सेवनानें तारुण्य कायम रहातें अशी कल्पना आहे ४ महाबळेश्वराकडे मिळणारा एक कांदा ०**काया**—स्त्री १ न मर णारें शरीर, निरोगी व जोरकस शरीर (आशीर्वाद देताना किंवा औषधोपचार करताना हा शब्द वापरतात ) ०**तरु**—पु कल्पवृक्ष, देवाचा वृक्ष, देवदार ०**ता**—स्त्री अमरपणा, चिरंजीवपणा, मृत्यु न येण्याचा स्थिति 'कृष्णाच्या अधरामृतें अमरता तत्काळ त्या पावल्या।' ०**पट्टा-टा**—पु ०**पत्र**—न अमरपणाचा लेख, मृत्यूपासून सुटका केल्याचा हुकूम—आज्ञा—ताम्रपट, मरण न यण्याचें आश्वासन 'तू काय अमरपत्र घेऊन आलास?' 'तू आपणाला महाराणी म्हणं वितेस म्हणून तुला देवाकडून अमरपट्टा थोडाच मिळाला आहे?' —राक्षसी महत्त्वाकांक्षा [स अमर+पट=लेख, करारनामा] ०**पण**—अमरता पहा 'सेविली अमृतसरिता। रोगु दुवाडूनि पडुसुता। अमर पण उचिता। देऊनि घाली॥' —ज्ञा १५ ५८३ ०**पाट**—अमरपट्टा पहा ०**वेल**—स्त्री १ सोनवेल, आकाशवेल, ही आंब्याच्या झाडा वरहि उगवते ही आम व पित्तनाशक आहे २ अमृतवल्ली पहा ०**साहित्य**—न मरण न देणारें साधन, जगात घालावयाचें चिरस्थत इ० अमरसाहित्य जगातील काढोन' —रा ३ १९१

**अमरंथ**—न १ कोरांटी, गुलमखमल वगैरे फुलझाड २ तांदु ळजा माठ राजगिरा वगैरे पालेभाजी [स अमरण तुल० ग्री अमरंतास (अ=नाहीं+मरंत=सुकणें)=कधीं न कोमेजणारें एक फूल ]

**अमरसा**—पु एका दागिन्याचें (?) नाव —मोल

**अमराई**—आंबराई पहा

**अमराधिप**—पु (देवाचा राजा) इंद्र [स अमर+अधिप]

**अमरावती**—स्त्री १ स्वर्गातील इंद्राची राजधानी 'जेथ अमरत्व हेंचि सिंहासन। ऐरावतासारिखें वाहन। राजधानी भुवन। अमरावती ॥'—ज्ञा ९ ३२० २ मद्रास इलाख्या, गुंतुर जिल्ह्यांतील धरणीकोट नावाचें सांप्रतचें खेडें हें पूर्वी आंध्र राजाची राजधानी असून तेथें एक प्रेक्षणीय बौद्ध स्तूप (इ स १३०) आहे ३ वऱ्हाडांतील अमरावती शहर [स ]

**अमरेंद्र**—अमराधिप पहा

**अमर्त्यभाव**—अमरता पहा

**अमर्पित्त**—न (वो) १ आम्लपित्त रोग २ नाकातून निघणारें रक्त [स अम्लपित्त अप ]

**अमर्याद**—वि १ (लोक, शास्त्र इ० च्या) मर्यादेच्या किंवा योग्य सीमेच्या पलीकडे गेलेला ठराविक मर्यादा उल्लंघन करणारा, स्वैर, स्वेच्छाचारी, मोकाट, अव्यवस्थित, (ल) फंदी, अनाचारी, छैनी २ अतिशय, अत्यंत, प्रमाणाबाहेर, बेसुमार, कल्पनेच्या-आटोक्याच्या बाहेर, विपुल (क्रिया, रकम, गुण, इसम वगैरे) [स अ+मर्यादा]

**अमर्यादा**—स्त्री १ सीमा-मर्यादा यांचें उल्लंघन २ अनादर, अपमान, उद्धटपणा, विनय सोडून वागणें [स ]

**अमर्ष**—पु क्रोध, संताप, असहनशीलता 'जगचि देह जाहले। म्हणोनि प्रियाप्रिय गेलें। हर्षामर्ष ठेलें। दुजेनविण ॥'—ज्ञा १२ १६८ [स अ+मृष्]

**अमल**—वि १ मलरहित, शुद्ध, स्वच्छ 'सवडी अमल राजीवनयन।'—रावि ६ २४८ २ आवळी, शिकेकाई, खडीसाखर [स अ+मल]

***अमल**—पु १ अधिकार, स्वामित्व, सत्ता, राज्य, ताबा, हुकूम २ बजावणी, निवाडा लागू करणें, कृतींत आणणें 'पुढें अमलात येईल तें मागाहून विनंती लिहू'—दिमरा १ ३७ ३ कैफ, निशा, औषधाचा पगडा 'दारूच्या अमलात झमाझम उड्या लागल्या तर बारा'—पापो ३२४ ४ पदार्थांतील कैफ आणणारा गुण ५ दारू, गांजा वगैरे कैफी पदार्थ 'इत्यादीकस्याचा अमल सेउनि'—दावि ४५२ ६ सुभा, मामला इ० जागा, हुद्दा, अधिकार ७ (अमीन अप ) जमीनीचा सारा वसूल करणारा सरकारी अधिकारी, कलेक्टर, ह्यावरून सध्या खेड्यांतील सारावसुलींतील एक हक्क ८ वेळ, काळ 'सायंरा वांद्रन दीड प्रहरचे अमलांत तोफाचे चार पाच कर दिले'—ख ११ ५६१६ 'साठीच्या अमलात' [अर अमल्] ०करणें-मादक पदार्थ खाऊन कैफांत गुंग होणें, दारू वगैरे पिणें —च्या जोरानें—अधिकारामुळें प्राप्त झालेल्या सत्तेनें —त आणणें—१ (निवाडा, ठराव, हुकूम वगैरे) लागू करणें २ (गाव किंवा देश इ०) आपल्या सत्तेखालीं आणणें, ताब्यांत घेणें ०गाजविणें—नेट चालविणें ०कलम—न कियाल्स 'बोलण्यात गोष्टी आल्या असतील, परंतु दस्तैवज अथवा वचन, शपथ, क्रिया, अमलकलम असें कांहीं झालें नाहीं'—रा ५ ११५ ०गहाण—न ताबेगहाण (नजर गहाणाच्या उलट) ०दस्तूर—पु नियम, कायदा, वहिवाट, शासन ०दार—पु अधिकारी, अखत्यार असलेला सरकारी नोकर, सुभेदार, मामलेदार वगैरे [अर अमल+फा दार] ०दारी—स्त्री अमलदाराचें काम-हुद्दा ०बजावणी—स्त्री कार्य घडवून आणणें, अधिकार वर्तविणें, अमलांत आणणें, (हुकूमा)प्रमाणें वर्तन करणें, अनुरूप वागणें '(रामकालीन) राजा हा फक्त अमलबजावणी करणारा अधिकारी असून तो प्रजेच्या नियंत्रणाखालीं असे'—मसाप २ ११२ ०मस्त—वि सत्ता असल्यामुळें मगरूर बनलेला ०मस्ती—स्त्री सत्तेचा गर्व, ताठा

**अमलतास**—पु बहाव्याच्या शेंगांचा मगज —मुज्या १५६ [हिं ]

**अमला**—पु कारकून, अधिकारी, अमलदार 'तालुक्यास अमला योजून बंदोबस्त करावा'—रा ७ ४५ [अर अमला, आमिलचें अव] ०फैला—पु १ अमल, अधिकार, ताबा 'त्या दप्तरावर अ० चांगला बसला' २ कारकून, पाडपशा, इतर लोक, प्रजा 'दिल्लींतहि अमलाफैला पळावयाचा इरादा करीत आहेत'—रा १० ३४७ —क्रिवि पूर्णपणें, एकंदर, निखालस (विक्री, देवघेव इ व्यापाराच्या कामांत)

**अमला**—पु सोन्याचा डूल (कानांतील), लोलक, आवळा [स आमलक]

**अमली**—वि १ कबजी, सरकारच्या सत्तेंतील (गाव, कमवा, प्रांत वगैरे) उ० सरकार अमली=सरकारचे ताब्यांतील, परभार अमली=दुसऱ्याच्या सत्तेखालचें 'हिंदुस्थान गुजराथ पर्यंत तमाम मुलूख अमली अमनी आहे आम्ही वाटेनें काय खाणें?'—रा १ ७९ [अर अमल] —पु १ कैफी, निशा आणणारें २ निशा करणारा, व्यसनी ०पदार्थ—पु मादक पदार्थ (ज्यामुळें अमल चढतो असे, दारू, भांग इ ) ०बाब—स्त्री जमाबंदींतील एक खातें (दारू कलाली, अफू ताडी, माडी, शिंदी इ०), अमली पदार्थांचें विल्हेवारीचें खातें व त्या खात्यापासून होणारें उत्पन्न ०सन—पु ओरिसांत प्रचारांत असलेला एक शक याचा आरंभ भाद्रपद शु॥ १२ पासून होतो

**अमवाळ**—वि आंबट 'न साहे रुक्ष, क्षार, अमवाळ'—गीता १२ १८१ [स अम्ल]

**अमस(सो)ल**—न कोकमसाल, रातांबीच्या फळाची सुकविलेली साल रंग काळसर, चव आंबट, हें हिरवें असताना वातकारक, उष्ण व अतिशय जड आहे व पिकलें म्हणजे हलकें व ग्राहक असून रुचकर, कफ व वातनाशक आहे ०तेल—न रातांबेल, [स अम्ल+छाल-साल]

**अमसुळ**—वि आवन्सर 'रसास थोडा कचरा लागला तरी तो अमसुळ होतो '-कृषि ४८० [स अम्ल+सदृश]

**अमळ-सा**—वि थोडा, किंचित्, जरासा, काहींसा -क्रिवि थोडावेळ, अल्पकाल [वैस अम्रस्, स अम्=थोडें, त्वरा]

**अमा**—स्त्री १ अमावास्या, आवस सूर्य व चद्र याच्या युतीचा दिवस, चद्राची १५ किंवा १६ वी कला 'अमारात्रीचें तम केवळ।'-कथा ५५४० [स अमा=अमावास्या]

**अमा**—पु स्तन, थान 'वा घे अमा पानितें'-राला ८ (पोर्तु) अगावर दूध पाजणारी दाई अम्मी=लहान मुलाच्या भाषेत थान

**अमा**—स्त्री (का) आई एकाद्या स्त्रीस आदरार्थी संबोधितात [स मातृ-मा, अर उम्म=आई, द्रा अम्मा=आई]

**अमा**—अ परतु तथापि, उलट, इकडे, इतक्यात 'कागद घेतला अमा दाम दिला नाहीं'-भाइ (१८३४) १४४ 'अमा पातशहा सलेल करवितात'-रामदास रामदासी भाग १-२११ [अर अम्मा=परतु तुल ता अमा=होय परतु]

**अमाईकपण**—न 'निष्कपटपण अमाईकपणें मनींच सागसी'-दावि २६३ [स अ+माया=कपट+पण]

**अमात**—वि अभाव स्येला सपणारा [स अमा+अन्त] ०मास-पु शुद्ध प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत असणारा एक चाद्र मास हा दक्षिणेकड प्रचारात आहे

**अमात्य**—पु १ आठ प्रधानापैकीं एक, यानें सर्व राज्यातील लष्करी आणि मुलकी वसूल व हिशेब ठेवून युद्धावरहि जाण्याचें काम करावयाचें असे, फडणिशीपत्रावर याची निशाणी असे -इऐ २२४४ -पया ३५५, ३५९-६० फारशी नाव मज्मुदार २ (सामा) मत्री, प्रधान सल्लागार, सचीव [स अमा=जवळ+त्य]

**अमात्र**—वि १ निर्विषय अविषय २ प्रमाणातीत ३ अभौतिक, पचमहाभूतात्मक नव्हे तो -पु परमात्मा [स अ+मात्रा]

**अमाथ**—क्रिवि (कर्ना) अचूक

**अमान**—स्त्री अमान्य करण्याची बुद्धि अनादरवृत्ति 'सर्व शास्त्रविद्या सिकवोन कोणी। परिपूर्ण जाले वदता ऐकुनी। चेले न ऐकिनी पडोन अमानीं।'-दावि २०१ [स अ+मन्]

**अमानणें**—सक्रि न ऐकणें न मानणें अनादर करणें [स अ+मन्]

**अमानत**—स्त्री १ (विरु अनामत) ठेव निधि, विश्वस्त वस्तु २ जप्ती, सरकारनामा 'जयदवरायास हरामखोरी रावून देशमुखी अमानत केली'-इम ११ अनामत पहा [अर अमानत] ०दार-पु विश्वस्त ठेव सुरक्षित ठेवणारा ट्रस्टी अमीन, ०नामा-पु विश्वस्तपत्र, ठेवपत्र ट्रस्टडीड ०पत्र-न जप्तीपत्र वादग्रस्त वस्तु तात्पुरती सरकारताब्यांत घेतल्याबद्दल किंवा एखाद्या विश्वस्ताजवळ ठेवल्याबद्दल लिहिलेला लेख 'एक वादी भोगवटा करतो दुसरा फिर्याद आला, सबब लिहिणें तें'-भाइअ १८३२

**अमानतपन्हा**—पु पेंशु याअर्थी एक पदवी, अमीर (प्रमाणें) -रा ३ ५५ [अर इमारत्पन्हा]

**अमानवी**—वि माणसाहून निराळें, अमानुष, दैवी 'त्यातून (प्रसगातून) पार पडून पुन आज आपलें पूर्व कर्तव्य करण्यास त्यास जें सामर्थ्य आलें आहे तें त्याच्या दृष्टीनें तरी काहीं अमानवी कारणामुळें आलेलें आहे'-टि २ १ [स]

**अमानित्व**—न (काव्य) निरभिमानपणा, निगर्वता, अह भाव नमणें, निगर्वीपणा, नम्रता, विनय 'पैं अमानित्व पुरुषीं। तें जाणावें ऐसीं मिषीं।'-ज्ञा १३ २०१ [स]

**अमानी**—स्त्री १ गैरइजारा, गैरमक्तेदारी, रयतवारी (पध्दत) 'तालुक्यावर तांहूद केलें तें मोडावें आणि अमानी करावी'-रा ५ २३ २ ठेव, विश्वस्त वस्तु, अमानत पहा -वि १ तात्पुरता कामावर नेमलेला, कायमची नेमणूक न झालेला, बदली, इ० ॲक्टिंग २ कायम नसलेल्या अमलदारानें चालविलेलें [अर अमानी]

**अमानुष-ष्य**—वि १ मानवी सत्तेबाहेरचें अमानवी, दैवी, स्वर्गीय, अद्भुत, मनुष्यदेहधर्मरहित 'तेविं अमानुषा मानुष। मानाल मातें॥'-ज्ञा ९ १४२ २ मनुष्यजातीला अयोग्य-न शोभणारें, राक्षसी, पाशवी ३ मनुष्यानें न आचरण्यासारखें [स]

**अमान्य**—वि १ पसत-मान्य नसलेलें स्वीकारण्याला अयोग्य, नापसत, अप्रिय, तुच्छ २ पसत न पडणारें, मान्य नसणारें [स]

**अमान्य**—न कच्चें अन्न, शिधा 'अयाचित अमान्यें उदड आलीं।'-सप्र ८ ११४ [स आम=कच्चें+अन्न अप]

**अमाप-प**—वि १ न मापता येण्यासारखा २ न मावणारें ३ (ल) असख्य पुष्कळ 'अमाप पोराची मिळवीन मादी।'-दावि २१ [स अ+मा]

**अमाय**—वि १ मायेचा अभाव सत्यज्ञान २ निष्कपटता [स अ+माया]

**अमायिकवृत्ति**—स्त्री मायेमध्यें न गुरफटलेली वृत्ति-वतन-ज्ञान, निर्विकार स्थिति निर्लेप वृत्ति [स अ+माया+वृत्ति]

**अमारतपन्हा**—अमानतपन्हा पहा

**अमार्ग**—पु १ अपथ आडमार्ग चुकीचा रस्ता २ असम जसपणा ३ व्यतिक्रम विलक्षणपणा (बोलणें-वागणें-न्याय करणें यामध्यें) ४ कुमार्ग व्यभिचार 'मार्गामार्गी येकवटे। करीत चाले। -ज्ञा १८ ९२५ [स]

**अमाल्त**—पु वर्चस्व, सत्ता [अर अमल्]

**अमा(व)वास्या, अमावास**—स्त्री कृष्णपक्षाची अखेरची तिथि, सूर्य व चद्र ज्या दिवशीं जवळ जवळ येतात तो दिवस अवसेची तिथि [स अमा=जवळ+वस्=राहणें]

**अमांरा**—पु. अंश, आमारा पहा.

**अमास, अमांस**—( गो. ) अमावास्या

**अमाला**—वि क्रिवि (कों )थल्प, लहान, अमळ—ना पहा 'तो अंतरात्मा आहे कैसा । प्रस्तुत बोलतांना अमाळा ।' —दा १० १०.३१. —सें-क्रिवि (व अमाळानें ) थोड्या वेळानें, अमळ-शानें 'कियहुना ज्यानें नाम ऐसें । त्याचें स्वरूप असेल कैसें । तें पाहों आतां अमाळें । तिजनाम गोई ।' —स्वादि १ ० ४१ [सैम अमल्, स अम=थोडें ]

**अमासुस्त**—वि सांवीं गइ, आळशी 'मोंगलाई कारभार अमासुस्त ।' —रा १ १४७ [ फा आम्+सुस्त ]

**अमाळ**—वि (अमल अप )शुद्ध,स्वच्छ,शुभ्र 'चापेकळयांच्या मिरवेत माळा । मुक्तापळांच्या दिसती अमाळा ।'—साह्द १ २९

**अमाळसा**—अमळसा पहा 'उभा न राहेच अमाळसा ग ।' —गाह्द ७ ७४

**अमित**—वि १ न मापलेलें, मोजलेलें २ मोजता न येण्या सारखें, अमर्याद, अंदाज किंवा अटकळ न करतां येण्याजोगें, अपरिमित, अपार, पुष्कळ 'तुज नमो अमितविक्रमा ।' —ज्ञा ११ ५१३ [ स अ+मा=मोजणें ]

**अमित्य**—( काव्य ) ( अमित अप )पुष्कळ 'अमित्य सेना ज्यांची होती ।' —वेसीस्व १ ९० [ स अमित ]

**अमित्र**—पु शत्रु, स्नेही नसलेला, द्वेषी, वैरी [ स ]

**अमिद**—( शाप ) अन्नसयुक्तद्रव्य ( इ अमाईड )

**अमिदिन**—न ( शाप ) इमिदापें अनाम्ल हें एकाम्लक असून फार स्थिर नसते अमिदहरिदें किंवा गधकिल अमिदें यावर अम्र किंवा अभिनें याची क्रिया केली म्हणजे अमिदिन तयार होतें —शाको अ ३३८ ( इ अमिडाइन )

**अमिन**—न ( शाप ) अम्र( अमानिया )मधून उज्ज ( हाय ड्रोजन ) परमाणु निःसारित करून होणारें द्रव्य [ इ अमाइन ]

**अमिल**—न ( इतर रासायनिक द्रव्याबरोबरच असणाऱ्या स्वतंत्र राहू न शकणाऱ्या ) मूलद्रव्यांपैकीं एक [ इ ]

**अमिल**—अमलदार, अधिकारी. 'चांगलासा आश्रय मिळता तर तुमच्या अमिलाचा रंगमहाल टाकून दर्खाल मी ह्या भिकार गावकुसाच्या बाहेर पडतों ' —विवि ८ ११ २०६ [ अर आमिल ]

**अमिली**—स्त्री अमलदारी कारभार 'अमिली न शाभ कंटे घडु ।' —दावि ७७७ 'याचे अमिलीचे वारस्तानाचा बयान केल्यावरून ' —रा ० ६५ [ अर आमिल् ]

**अमीन**—पु १ निधिधारक विश्वस्त ट्रस्टी 'वारीसदार हजर नसेल तर ती निगो अमीन याचे ताब्यांत दफन —ऐस्तु ५८ २ मोगलाईतील व पेशवाईतील एक अधिकारी —याची कामें-प्रत्यक्ष वसूल जमा करणें, कज्जांचा निवाडा करणें, सामान्य राज्यव्यवस्थे वर देखरेख ठेवणें इ , तपासणी अमल्दार, तालुकादार मामलेदार, तहसीलदार, ख्वाद, घच, पगार व काम यांसाठीं —थोमारो १ ३४१ ० १२०, ३४१–४२ पहा आरमार अमीन=आरमाराची पहाणी करणारा [ अर अमीन ]

**अमीनचमीन**—अमनचमन पहा

**अमीनी-अमिनी**—स्त्री १ अमिनाचें काम —पया ५७ २ व्यवस्थितपणा, सरकारी अधिकाऱ्याकडून जमीनीची तावडतोब लागलेली व्यवस्था [ अर अमीन ]

**अमीबा**—पु इंद्रियरहित आदिजीवाचा एकपेशीमय सूक्ष्म जतु, हा विषवलात सापडतो हा प्राणी आपल्या पोटात गेल्यास रक्ताची आव पडते —धारपुरकृत प्राणी आणि आरोग्य 'जीव रचनेतील अगदीं खालच्या दर्जाचा अमीबा नावाचा जो प्राणी आहे त्याची रचना इतकी साधी असते ' —वस्व ७९

**अमीर**—पु १ थोर किंवा बडा इसम, सरदार, उमराव उच्च घराण्यांतील मनुष्य 'वीर वीर किति अमीर होउनि फकीर भिक मागती ।' —ऐपो ३६७ २ आज्ञा करणारा अधिकारी [ अर अमीर=सरदार, श्रेष्ठमनुष्य आमिर=आज्ञा करणारा, शास्ता अम्र= आज्ञा, हुकूम स मिन्न ( सूर्य ) किंवा अमर=देव, श्रेष्ठ फा मिहिर ? ] ०उमराव-पु मोठे लोक, सरदारमंडळी [ अमीरचा अनेकवचन ] ०उल्-उमरा(व)-अमीरांतील श्रेष्ठ, सरदाराचा नायक ( मालोजी घोरपडे यास ही पदवी होती ) ०उल्-ममालिक-राज्यांतील श्रेष्ठ अधिकारी ०राव-एक पदवी —मदरु ११२

**अमी(मि)राई**—स्त्री सरदारी, सरदारी वैभव 'आहे घरीं पुरी अमिराई ' —प्रला १३९ [ अर अमीर ]

**अमी(मि)री**—स्त्री १ सरदारी सत्ता, सर्वाधिकारित्व २ बडे जाव, मोठा थाट ३ अमिराचा दर्जा [ अर अमीर ]

**अमील**—अधिकारी, अंमल्दार. 'अमिलानी हाल व इस्त कबाली' =आजचे व भावी अधिकारी. —रा ८.६७ [अर आमिल]

**अमु-मू**—वि ( कों ) ज्यास वाचा नाहीं असे ( पशुवग्यादि लहान मूल ) [ स अ+मुख, अ+मूक ]

**अमु-मू**—पु आमा, स्तन अमा, आमा पहा

**अमुक**—वि विवक्षित कोणीएक नाव न घेता सामान्य रूपानें सांगण्यास इष्ट असा 'कोणीतरी करा असें सांगू नको, अमुकानें करावें असें सांग —न १ विवक्षित वस्तु इसम 'तरी अमुकाचि मी स्वयमेव । तो सांग कवण तूं ।' —विउ ३ ११ २ फलाणा, कोणी तरी माणूस अमका पहा [ स अमुक अदस् याचें रूप ] ०तमुक-वि गमकात्मक विवक्षित कोणीएक असातसा 'मी बाजारांत जातों अ० काय जिन्नस आणायाचे असतील ते सांग, आणीन ' —न कांहीं एक वस्तु ही किंवा कोणतीहि वस्तु सर्व अर्थी अमका समका पहा [ ...

**अमुक्ताभरण**—न भाद्रपद शुद्ध सप्तमीस आचरावयाचें देवीचें व्रत [स]

**अमुत्र**—पु परलोक, पुढील जन्म, जन्मांतर [स]

**अमुप**—वि अमूप पहा

**अमुर्पिका**—वि (गो) अर्धवट पिकलेला, न मुरता पिकलेला. [अमूर+पिका]

**अमूप**—वि. प्र अमाप मोजता न येण्याजोगें, असंख्य, अतिशय, फार, पुष्कळ, अपार, अमित अमाप पहा 'कुळशीळ धन रूप। विद्यावयसा अतिस्वरूप। शांति कांति तेज अमुप। करिती तप तुजलागीं।' –एरुस्व ४९ [अ+मा=मोजणें]

**अमूपार**—वि अनंत [अमूप+अपार]

**अमूर्त**—वि आकार किंवा रूप नसलेलें, आकृति रेखाटून स्पष्टीकरण किंवा विवरण न करितां येण्यासारखें, अव्यक्त, निराकार, आकाररहित उ० आकाश, हवा, वळ, काळ, अंतर, आत्मा, ब्रह्म, [स]

**अमूल्य**—वि किंमत करतां न येण्यासारखें, बिनमोल अमोल, मूल्यवान [स अ+मूल्य]

**अमूस-अमोस-अमोशा**—स्त्री अमावास्या, आवस [स अमावास्या]

**अमृत**—न १ देवलोकींचें पेय (यानें वृद्धावस्था किंवा मृत्यु येत नाहीं), समुद्रमथनांत निघालेल्या चौदा रत्नांपैकीं १४ वें, सुधा, पीयूष, सुधारस 'जोडे अमृताची सुरसरी। तैं प्राणातें अमर करी।' –ज्ञा १७ २१९ २ दूध आटवून त्यांत खडीसाखर, जायफळ, वेलदोडे वगैरे पदार्थ घालून रात्रीं थंडींत उघड्यावर ठेवून दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं तें दूध घुसळून त्यावर फेंस येतो तो ३ मरणापासून मुक्तता, सुटका, मोक्ष 'जिणें गरळ पाजिलें अमृत पाजिलें तीस ता।' –केका ११ ४ उदक, (ल) देवाचें चरणतीर्थ ५ ब्रह्म 'अमृत म्हणजे अविनाशी ब्रह्म हा अर्थ उघड असून' –गीर ३५८ ६ दूध 'सर्प पोसुनिया दुधाचाहि नाश। केलें थीता विप अमृताचें।' –तुगा २०७३ 'अमृता चवी यावयालागून। साकर घालून पहावी।' 'अमृतें तरिच मरिजे। जरी विखेंसीं सेविजे।' –ज्ञा २ २२४ ७ पंचमहायज्ञ करून जें अन्न शिल्लक राहतें तें किंवा यज्ञशेष अन्न –गीर २८८ ८ (उत्तरहिंदुस्थान) पेरू, जांब [तुर्० फा अमरूद] ९ चौलपद्यातील एक संस्कार–एका मोठ्या भांड्यांत पाणी व साखर घालून तें मंत्र म्हणत क्रिपाणानें ढवळतात व मग तें प्राशन करावयास देतात सामाशब्द–ज्ञानामृत, गीतामृत, अधरामृत म्ह० १ अमृताचें जेवण मुतानें आंचवण=भव्य व चांगला आरंभ केला असून त्याचा शेवट क्षुद्रपणानें किंवा कमीपणानें झाला असतां योजितात २ पासरा पाहून अमृत पाजणें=वळनवरीनें एखाद्यास त्याच्या कल्याणाच्या किंवा हिताच्या मार्गास लावणें ३ अमृत देणाऱ्यास (तें चाखण्यास) जीभ दे असें सांगणें लागत नाहीं 'अमृतप्रदा म्हणावें न लगे रसना मुखांत दे साया' –मोआश्रम ५ ११ ४ अमृत सेवन करूनहि मरण येतें=एखाद्याच्या दुर्दैवानें त्याला अमृत मिळालें तरी मृत्यु (हानि) येतो 'अमृत सेवितांचि पावला मृत्यु राहो। (राहू)' –दा ११ ७५ [स अमृत] –वि अमर, मरणाधीन नसलेला, मृत्यूपासून सुटका झालेला [स] ०कर–पु चंद्र [स] ०कळा–स्त्री १ गाल, गालफड २ घशांतल्या गांठी (टॉन्सिल) 'येकाच्या बैसल्या अमृतकळा' –दा ३ ५ ४ म्ह० अमृतकळा बसणें=मृत्यूचा काळ जवळ येणें 'अ० बसल्या आतां वांचणें कठिण' ३ 'चंद्राची सतरावी कळा' –ज्ञा १७ ७ ०कुंड–न स्वर्गांतील अमृत भरलेलें पात्र–भांडें ०कुंडली–स्त्री वाजविण्याचें एक चर्मवाद्य ०घटका, घडी–वेळ पहा ०घुटका–घुटिका–पु १ अमृताचा घोट २ मजेदार गोष्टींचा चुटका ३ छोटीशी व सुंदर गाण्याची चीज ०झोप–स्त्री पहाटेची साखरझोंप ०धारा–स्त्री एक वृत्त. ०ध्वनि–पु एक छंद, वृत्त ०पाक–पु खव्याच्या एका प्रकारच्या वड्या ०पान–प्राशन–न अमृत पिणें, अमृतसेवन, अमृतघुटका, (ल) विप पिणें–खाणें 'खुरशेट मोदी यानें अमृतप्राशन केलें' ०पी–प्राशी–वि अमृत पिणारा ०फळ–न १ जें फळ खाल्लें असतां मनुष्य अमर होतो तें एक काल्पनिक फळ राजा भर्तृहरीला असें फळ मिळालें होतें २ पेरू, आंबा, द्राक्ष, बेदाणा, किसमिस वगैरे ३ एक पक्वान्न, मोदक 'कीं देवाचिये सन्निधी अमृतफळें। पावतें जाली' –ऋ८७ 'निंबें नारिंग नारेळें। अपूप लाडू अमृतफळें' –एरुस्व ६ ८६ 'तिळवे लाडू अमृतफळें' –वसा ७६ ०मंथन–न अमृतासाठीं देव व दैत्य यांनीं केलेलें समुद्राचें मंथन, घुसळणें 'एऱ्हवीं अमृतमथना। सारिखें होईल अर्जुना।' –ज्ञा १८ १४८७ ०महाल–स्त्री म्हैसूर राज्यांतील या नावाच्या महालांतील बैलाची एक जात 'खिलारी, अ० व कृष्णाकांठ या जातीचे बैल तयार करणें' –के १८ ७ २१ ०वर्षाव–पु अमृताचा पाऊस, त्यावरून चांगल्या व सतोपकारक गोष्टींचा किंवा पदार्थांचा वर्षाव किंवा देणगी, समृद्धि ०वल्ली–स्त्री १ जिच्यामुळें अमरत्व प्राप्त होतें अशी एक काल्पनिक वेल २ (ल) भाग ३ अमरवेल गुरवेल ०वेळ–स्त्री १ तीस घटकांपैकीं एक शुभ काल एकंदर दिनमानाचे व रात्रिमानाचे ८ भाग धरून मुख्यत आठ वेळा कल्पिल्या आहेत ३॥ घटका हें याचें मध्यम प्रमाण आहे दिनमानाप्रमाणें त्याचा काल कमीजास्त होतो (वेळ पहा) 'अमृतवेळ भगवज्ञान। कैसें तें ऐकावें।' –दा ४ १ २० २ करमणूक, विलास व उपभोग याची योग्य वेळ ३ औषध देण्याची योग्य वेळ (सकाळ) ४ शांत सुपींत असण्याचा–स्नेहभावाचा काल ०संजीवनी–स्त्री १ मृतास जीवंत करणारी विद्या मृतसंजीवनीचा पर्याय २ अमृत ३ (ल) अद्वैतबोधरूपी अमृत 'ते नमस्करू अमृत संजीवनी। श्री देववाणी।' –ऋ १ ४ चंद्राची अमृत झिरपणारी १७ वी कळा

**अमांश**—पु. आव; आमांश पहा.

**अमास, अमांस**—( गो. ) अमावास्या.

**अमासा**—वि. क्रिवि (कों.)अल्प; लहान; अमळ—सा पहा. 'तो अंतरात्मा आहे कैसा । प्रस्तुत बोलखाना अमासा ।' —दा १० १०.३६. **-सें**-क्रिवि. ( व. अमासानें. ) थोड्या वेळानें; अमळ-सानें. 'किंबहुना ज्याचें नाम ऐसें । त्याचें स्वरूप असेल कैसें । तें पाहों आवंत अमासें । निजनाम सोई ।' —स्वादि १.५.४१. [ वैसं. अम्रसु; सं. अम्=थोडें ]

**अमासुस्त**—वि. सरेर्वी थंड; आळशी. 'मोंगलाई कारभार अमासुस्त ।' —रा १.१८७. [ फा. आम+सुस्त ]

**अमाळ**—वि.(अमल अप.) शुद्ध; स्वच्छ, शुभ्र. 'चापेकळयांच्या मिरवेत माळा। मुक्ताफळांच्या दिसती अमाळा।'—साह्द ६.२९

**अमाळसा**—अमळसा पहा. 'उभा न राहेच अमाळसा गे।' —साह्द ७.७४.

**अमित**—वि १ न मापलेलें, मोजलेलें. २ मोजतां न येण्यासारखें, अमर्याद; अंदाज किंवा अटकळ न करतां येण्याजोगें; अपरिमित, अपार, पुष्कळ. 'तुज नमो अमितविक्रमा ।' —ज्ञा ११.५३३. [ सं. अ+मा=मोजणें ]

**अमित्य**—( काव्य ) ( अमित अप. ) पुष्कळ. 'अमित्य सेना न्यायीं होती।' —वेसीस्व १.९०. [ सं. अमित ]

**अमित्र**—पु शत्रु; स्नेही नसलेला; द्वेपी; वैरी. [ सं. ]

**अमिद्**—( शाप. ) अम्लसंयुक्तद्रव्य. ( इं. अमाईड )

**अमिदिन**—न ( शाप. ) इमिदाचें अनाम्ल. हें एकाम्लक असून फार स्थिर नसतें अमिदहरिदें किंवा गंधकिल अमिदें यावर अम्र किंवा अमिनें यांची क्रिया केली म्हणजे अमिदिन तयार होतें —शाको अ ३३८ ( इं अमिडाइन )

**अमिन**—न ( शाप ) अम्र( अमोनिया )मधून उज्ज ( हायड्रोजन ) परमाणु नि सारित करून होणारें द्रव्य [ इं अमाइन ]

**अमिल**—न. ( इतर रासायनिक द्रव्यांवरोबरच अमणाऱ्या स्वतंत्र राहूं न शकणाऱ्या ) मूलद्रव्यापैकीं एक [ इं ]

**अमिल**—अंमलदार, अधिकारी. 'चागलासा आश्रय मिळता तर तुमच्या अमिलाचा रेशमहाल टाकून देखील मी ह्या भिकार गावगुमाऱ्या बाहेर पडतों' —विवि ८.११.२०६. [ अर आमिल् ]

**अमिली**—स्त्री. अंमलदारी, कारभार 'अमिली न शोभे कोठे बहु।' —दावि ७७७. 'यांचे अमिलीचे कारस्तानाचा बयान केल्यावरून' —रा १.८५. [ अर. आमिल् ]

**अमीन**—पु १ निक्षिपारक; विश्वस्त, ट्रस्टी. 'बारीगदार हजर नसेल तर ही जिनगी अमीन याचे ताब्यांत देऊन' —ऐसफु ५८. २ मोगलाईतील पेदावारीतील एक अधिकारी —याचीं कामें—प्रत्यक्ष वसूल जमा करणें, कज्जांचा निवाडा करणें, सामान्य राज्यव्यवस्थेवर देखरेख ठेवणें इ.; तपासणी अंमलदार, तालुकदार, मामलेदार; तहसीलदार; स्वाद, पंच, धगार व काम यांसाठीं —थोमारो १.३४२-२.१२०, २४१—४२ पहा. आरमार अमीन=आरमाराची पहाणी करणारा. [ अर. अमीन ]

**अमीनचमीन**—अमनचमन पहा.

**अमीनी—अमिनी**—स्त्री. १ अमिनाचें काम.—पया ५७. २ व्यवस्थितपणा; सरकारी अधिकाऱ्याकडून जमीनीची ताबडतोब लागलेली व्यवस्था [ अर. अमीन ]

**अमीबा**—पु इंद्रियरहित आदिजीवांचा एकपेशीमय सूक्ष्म जंतु, हा चिखलांत सांपडतो. हा प्राणी आपल्या पोटांत गेल्यास रक्ताची आव पडते.—धारपुरेकृत प्राणी आणि आरोग्य. 'जीव-कोटींतील अगदीं खालच्या दर्जाचा अमीबा नांवाचा जो प्राणी आहे त्याची रचना इतकी साधी...असते' —वस्व ७९.

**अमीर**—पु १ थोर किंवा वडा इसम; सरदार; उमराव; उच्च घराण्यांतील मनुष्य. 'धीर वीर किति अमीर होउनि फकीर भिक मागती।' —ऐपो ३६७. २ आज्ञा करणारा अधिकारी [ अर. अमीर=सरदार; श्रेष्ठमनुष्य. आमिर=आज्ञा करणारा; शास्ता. अम्र= आज्ञा; हुकूम सं. मित्र ( सूर्य ) किंवा अमर=देव, ग्रीक. फा. मिहिर. ? ] **०उमराव**-पु. मडे लोक, सरदारमंडळी. [ अमीरउम्रा अमीरचें अव. ]. **०उल्—उमरा(व)**—अमीरांतील श्रेष्ठ; सरदाराचा नायक ( मालोजी घोरपडे यास ही पदवी होती. ) **०उल्—ममालिक**—राज्यांतील श्रेष्ठ अधिकारी. **०राव**—एक पदवी. —मदरु १ १२.

**अमी(मि)राई**—स्त्री. सरदारी; सरदारी वैभव. 'आहे घरीं पुरी अमिराई' —प्रला १३९. [ अर. अमीर ]

**अमी(मि)री**—स्त्री. १ सरदारी, सत्ता; सर्वाधिकारित्व. २ बडे-जाव; मोठा थाट. ३ अमिराचा दर्जा. [ अर. अमीर ]

**अमील**—अधिकारी; अंमलदार. 'अमिलानी हाल व इस्त-क्बाली' =आजचे व भावी अधिकारी. —रा ८.६७. [ अर. आमिल् ]

**अमु-मू**—वि. ( कों ) ज्यास वाचा नाहीं असे ( पशुपक्ष्यादि, लहान मूल ) [ सं अ+मुख, अ+मू ]

**अमु-मू**—पु आमा; स्तन. अमा, आमा पहा.

**अमुक**—वि. विवक्षित; कोणीएक नांव न घेतां सामान्य रूपानें सांगण्यास इष्ट असा 'कोणीतरी करा असें सांगूं नको, अमुकानें करावें असें सांग' —न. १ विवक्षित वस्तु; इसम. 'तरी अमुकाचि मी स्वयमेव। तो सांग कवण तूं।' —विउ ३.११. २ कल्याणा; कोणी तरी माणूस. अमका पहा. [ सं. अमुक, अदस् याचें रूप ]. **०तमुक**—वि. अमकातमका, विवक्षित; कोणीएक, असातसा. 'मी बाजारांत जातों अ० वाव जिन्नस आणायाचे असतील ते सांग, आणीन.' —न. कांहीं एक वस्तु, ही किंवा कोणतीहि वस्तु; सर्व अर्थी अमका तमका पहा. [ अमुक द्वि ]

**अमुक्तामरण**—न भाद्रपद शुद्ध सप्तमीस आचरावयाचें देवीचें व्रत [स]

**अमुत्र**—पु परलोक, पुढील जन्म, जन्मांतर [म]

**अमुप**—वि अमूप पहा

**अमुर्पिका**—वि (गो) अर्धवट पिकलेला, न मुरता पिकलेला. [अमूर+पिका]

**अमूप**—वि. प्र अमाप मोजता न येण्याजोगें, असंख्य, अति शय, फार, पुष्कळ, अपार, अमित अमाप पहा 'कुळशीळ धन रूप। विद्यावयसा अतिस्वरूप। शांति कांति तेज अमुप। करिती तप तुजलागीं।'—एरुस्व ४ ९ [अ+मा=मोजणें]

**अमूपार**—वि अनंत [अमूप+अपार]

**अमूर्त**—वि आकार किंवा रूप नसलेलें, आकृति रेखाटून स्पष्टी करण किंवा विवरण न करिता येण्यासारखें, अव्यक्त, निराकार, आकाररहित उ० आकाश, हवा, वेळ, काळ, अंतर, आत्मा, ब्रह्म, [स]

**अमूल्य**—वि किंमत करता न येण्यासारखें, बिनमोल अमोल, मूल्यवान. [स अ+मूल्य]

**अमूस-अमोस-अमोशा**—स्त्री अमावास्या, आवस [स अमावास्या]

**अमृत**—न १ देवलोकींचें पेय (यानें वृद्धावस्था किंवा मृत्यु येत नाहीं), समुद्रमंथनांत निघालेल्या चौदा रत्नांपैकीं १४ वें, सुधा, पीयूष, सुधारस 'ओडे अमृताची सुरसरी। तें प्राणातें अमर करी।'—ज्ञा १७ २१९ २ दूध आटवून त्यांत खडीसाखर, जायफळ, वेलदोडे वगैरे पदार्थ घालून रात्रीं घर्डीत उघडयावर ठेवून दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं तें दूध घुसळून त्यावर मेंस येतो तो ३ मरणापासून मुक्तता, सुटका, मोक्ष 'जिणें गरळ पाजिलें अमृत पाजिलें तीस तां।'—केका ९१ ४ उदक, (ल) देवाचें चरणतीर्थ ५ ब्रह्म 'अमृत म्हणजे अविनाशी ब्रह्म हा अर्थ उघड असून'—गीर ३५८ ६ दूध 'सर्प पोसुनिया दुधाचाहि नाश। केलें थीता विष अमृताचें।'—तुगा ३०७३ 'अमृता चवी यावयालागुन। साखर घालून पहावी।' 'अमृतें तरिच मरिजे। जरी विखेंसीं सेविजे।'—ज्ञा २ २२४ ७ पंचमहायज्ञ करून जें अन्न शिल्लक राहतें तें किंवा यज्ञशेष अन्न —गीर २८८ ८ (उत्तरहिंदुस्थान) पेरू, जाब [फा अमरूद] ९ शीख पंथांतील एक संस्कार—एका मोठ्या भांड्यांत पाणी व साखर घालून तें मंत्र म्हणत विरपाण्यानें ढवळतात व मग तें प्राशन करावयास देतात सामाशब्द—ज्ञानामृत, गीतामृत, अधरामृत म्ह० १ अमृताचें जेवण मुताचें आचवण=भव्य व चांगला आरंभ केला असून त्याचा शेवट क्षुद्रपणानें किंवा कमीपणानें झाला असता योजितात २ पासला पाडून अमृत पाजणें=बळजबरीनें एखाद्यास त्याच्या कल्याणाच्या किंवा हिताच्या मार्गास लावणें ३ अमृत देणाऱ्यास (तें चाख ण्यास) जीभ दे असें सांगणें लागत नाहीं 'अमृतप्रदा म्हणावें न लगे रसना मुखांत दे खाया'—मोआश्रम ५ ११ ४ अमृत सेवन करूनहि मरण येतें=एखाद्याच्या दुर्दैवानें त्याला अमृत मिळालें तरी मृत्यु (हानि) येतो 'अमृत सेवितांचि पावला मृत्य राहो। (राहू)'—दा ११ ७५ [स अमृत] —वि अमर, मरणाधीन नसलेला, मृत्यूपासून सुटका झालेला [स] ०कर—पु चंद्र [स] ०कळा—स्त्री १ गाल, गालफड २ घशांतल्या गाठी (टॉन्सिल) 'येकाच्या बैसल्या अमृतकळा—दा ३ ५ ४ म्ह० अमृतकळा बसणें=मृत्यूचा काळ जवळ येणें 'अ० बसल्या आतां वाचणें कठिण' ३ 'चंद्राची सत रावी कळा'—ज्ञा १२ ७ ०कुंड—न स्वर्गांतील अमृत भरलेलें पात्र—भांडें ०कुंडली—स्त्री वाजविण्याचें एक चर्मवाद्य ०घटका, घडी—वेळ पहा ०घुटका-घुटिका—पु १ अमृताचा घोट २ मजे दार गोष्टींचा चुटका ३ छोनीशी व सुंदर गाण्याची चीज ०झोप—स्त्री पहाटेची साखरझोंप ०धारा—स्त्री एक वृत्त. ०ध्वनि—पु एक छंद, वृत्त ०पाक—पु रव्याच्या एका प्रकारच्या वड्या ०पान-प्राशन—न अमृत पिणें, अमृतसेवन, अमृतघुटका, (ल) विष पिणें—खाणें 'खुरशेट मोदी यानें अमृतप्राशन केलें' ०पी-प्राशी—वि अमृत पिणारा ०फळ—न १ जें फळ खाल्लें असता मनुष्य अमर होतो तें एक काल्पनिक फळ राजा भर्तृहरीस असें फळ मिळालें होतें २ पेरू, आंबा, द्राक्ष, बेदाणा, खिसमिस वगैरे ३ एक पक्वान्न, मोदक 'वीं देवाचिये सन्निधी अमृतफळें। पावतें जाली'—ऋ८० 'निंबें नारिंग नारेळें। अपूप लाडू अमृतफळें'—एरुस्व ६ ८६ 'तिळवे लाडू अमृतफळें'—मसा २६ ०मंथन—न अमृतासाठीं देव व दैत्य यांनीं केलेलें समुद्राचें मथन, घुसळणें 'एऱ्हवीं अमृतमथना। सारिखें होईल अर्जुना।'—ज्ञा १८ १४८७ ०महाल—स्त्री म्हैसूर राज्यांतील या नावाच्या महालांतील बैलाची एक जात 'खिलारी, अ० व कृष्णा-कांठ या जातीचे बैल तयार करणें'—के १८ ७ ३१ ०वर्षाव—पु अमृताचा पाऊस, खावरून चांगल्या व संतोषकारक गोष्टींचा किंवा पदार्थांचा वर्षाव किंवा देणगी, समृद्धि ०वल्ली—स्त्री १ जिच्यामुळें अमरत्व प्राप्त होतें अशी एक काल्पनिक वेल २ (ल) भाग ३ अमरवेल, गुळवेल ०वेळ—स्त्री १ तीस घटकांपैकीं एक शुभ काल एकंदर दिनमानाचे व रात्रिमानाचे ८ भाग धरून मुख्यतः आठ वेळा कल्पिल्या आहेत ३॥। घटका हें याचें मध्यम प्रमाण आहे दिन मानाप्रमाणें त्याचा काल कमीजास्त होतो (वेळ पहा) 'अमृत वेळ प्रसंगज्ञान। कैसें तें ऐकावें।'—दा ४ १ २० २ करमणूक, विलास व उपभोग याची योग्य वेळ ३ औषध देण्याची योग्य वेळ (सकाळ) ४ शांत सुर्पीत असण्याचा—स्नेहभावाचा काल ०संजीवनी—स्त्री १ मृतास जीवंत करणारी विद्या, मृतसंजीवनीचा पर्याय २ अमृत ३ (ल) अद्वैतबोधरूपी अमृत 'ते नमस्करूं अमृत संजीवनी। श्री देववाणी।'—ऋ १ ४ चंद्राची अमृत झिरपणारी १७ वी कळा

'सतरावियेचें स्तन्य देसी।' –ज्ञा १२ ७ –वि मृताग राजीव करणारी 'अमृतसंजीवनी विजविली साई। अगें तये ठायीं हार पर्ली।'–तुगा ३७८९ ०सिध्दियोग–पु रविवारीं हस्त, सोमवारीं श्रवण किंवा मृग, मगळवारीं अश्विनी, बुधवारीं अनुराधा, गुरुवारीं पुष्य, शुक्रवारीं रेवती, शनिवारीं रोहिणी याप्रमाणें वार व नक्षत्र यांचा योग हा कोणत्याहि कार्यास शुभ असतो [स]

**अमृता**—स्त्री गुळवेल [स]

**अमृती-त्ति**—स्त्री १ वैष्णव लोकाजवळील दवाचें तीर्थ ठेवण्याची लहान गिंडी 'अमृतीमधें आकाश। सगळें साठवता प्रयास।' –दा ७४१८ २ पाणी पिण्याचें लहान भांडें ३ हिरडा, आवळी, तुळस, दूर्वा इ० वनस्पती [स अमृत]

**अमृतोपम**—वि अमृतासारखें-प्रमाणें [स]

**अमृत्यु**—पु अमरत्व –वि अमर [स]

**अमेज-द**—स्त्री मिश्रण, गायनातील राग वगैरेंचा मिश्र सुर –वि मिसळलेलें मिश्रित [फा आमेज=मिसळणें]

**अमेध्य**—वि अप अमेद्य-ध्य १ हवन करण्यास अयोग्य, अपवित्र, घाणेरडें, कुजकें, बिघडलेलें (अन्न, वस्त्र इ) 'मग केवळ ये देह खोडा। अमेध्योदकाचा बुडबुडा।' –ज्ञा १६ ३१७ २ विष्ठा, मल, गू [स]

**अमेय**—वि मोजता न येण्याजोगें, अमोज 'मज अमेया मान।'–ज्ञा ९ १५९ [स अ+मा=मोजणें]

**अमोघ**—वि १ योग्य प्रकारें लागू होणारें, अचूक, हटकून काम करणारें 'आपल्या मनात येणारे विचार तसेच काहीं तरी अमोघ असायचे'–चद्रगुप्त ११९ २ गुणदायी, फलदायक (शक्ति, पराक्रम औषध, मत्र कौशल्य, शस्त्र वीर्य) 'मग तेयिंचे जे अमोघ। अलौकिक भोग।' –ज्ञा ६ ४४२ ३ (क्वचित्) निरुपयोगी, निष्फळ, विनक्रियायतीचें, व्यर्थ [स अ+मोघ=व्यर्थ] ०वीर्य–वि १ ज्याचें वीर्य (रेत) व्यर्थ जात नाहीं असा, प्रजनन शक्ति चांगली असणारा (माणूस) २ (ल) पराक्रमी, उत्कर्षकारक, सामर्थ्यवान ३ नेहमीं गुणकारक असलेलें, रामबाण, हटकून गुण आणणारा (उपाय, मत्र औषध,)

**अमोज**—वि १ मोजमाप करता न येण्यासारखें, गणना न करता येण्यासारखें अमाप, असख्य २ न मोजलेलें, न गणलेलें [स अ+मा=मोजणें]

**अमोड-डी**—वि न मोडलेलें साप्र 'तळवटीं अमोडी। कुशाकुर॥'–ज्ञा ६ १८२ [स अ+मृद्=मोडणें]

**अमोण**—अवोण, आवोण पहा

**अमोद**—आमोद पहा

**अमोनिया**—पु नत्र व उज्ज याच्या सयोगानें होणारा वायु हा तीव्र वासाचा असतो नवसागरासारख्या क्षारपदार्थापासुन उत्पन्न होतो पाण्यांत मिसळतो (आफ्रिकेंतील लिबिया प्रांताचें पूर्वीचें नाव अमोनि होतें तेथें ज्युपिटर अमोनीचें देऊळ होतें, तेथें उटाची लीद जाळीत त्याच्या धुराच्या वासावरून त्या वायूस अमोनिया हें नाव पडलें असें म्हणतात) अमोनियापासुन बनणारीं सयुक्त द्रव्यें –अमोनिअदिद (अमो० आयोडाईड), अमोनिकर्बित (अ० कार्बोनेट), अमोनिगधकित (अ० सल्फेट), अमोनिनत्रायित-नमित (अ० नायट्राइड-नायट्रेट), अमोनिप्लवित (अ० फ्लुओराइड), अमोनिस्तभिद (अ० ब्रोमाइड), अमोनिस्फुरित (अ० फॉस्फेट), अमोनिहरिद (आ० क्लोराइड) इत्यादि [इ]

**अमोल, अमोलिक, अमोल्य, अमौल्य**—वि १ किंमत न करता येणारा, विनमोल, किंमत किंवा महत्त्व, अदाज करतां न येण्यासारखें, अमूल्य, अनर्घ २ उत्कृष्ट, सुदर, छानदार, सुरेख 'अमोल काया जाइल वाया।' ३ (ल) ज्याची मुळींच किंमत नाहीं असा, कवडी किंमतीचा, क्षुद्र पदार्थ 'वायु राऊत वेटिला। जीतेयां शिशुपाळाचा अमोला।' –शिशु ५१५ [स अ+मूल्य]

**अम्न**—अमोनिया पहा

**अम्मल, अम्मल-दस्तूर-दार-दारी-बजावणी**—अमल पहा

**अम्मली**—अमली पहा

**अम्मळ-सा**—अमळसा पहा

**अम्मा**—स्त्री आई, (सामा) स्त्री, बाई (द्राविडी प्रांतांतुन हा सररहा आढळतो) 'अम्माचें उतावीळ चित्त।'–दावि ४११८ [स अबा, प्रा अम्मया, अम्मा, द्रा अम्मा]

**अम्मा**—अ पण, तथापि अमा पहा [अर]

**अम्मासा**—अ (व) अमळसा, अमासा पहा.

**अम्याग**—वि (कों) सौम्य, नरम, म्याड, भेकड, निरुपद्रवी [अम्म=किंचित् अमळ+सा आग=अपराध?]

**अम्ल**—वि आम्ल, आंबट –पुन १ आंबटपणा २ रासायनिक आंबट द्रव, ॲसिड ३ महाळुग, लिंबु नारिंग, चिंच, आवळा, कवठ वगैरे आंबट फळ ०त्व–न आंबटपण, (इ) ॲसिडिटी [स] –पित्त–न एक रोग हा स्वतत्र नसून अग्निमांद्य किंवा दीर्घकालीन अपचन या रोगांच्या अनेक लक्षणांपैकीं एक आहे यानें आंबट ढेकरा व अन्नाची आंबट वांती होते घश्यां, छातींत हवळाढवळ सारखी होते, पोटांत जळजळ व अरुचि येते [स]

**अम्लान**—वि म्लान नसणारें, न कोमेजणारें, ऱ्हास न पावणारें, खिन्न न होणारें, टवटवीत, प्रफुल्ल [स]

**अम्ली**—स्त्री चिंच (झाड व फळ) [स अम्लिका, हिं इमली] ०करण, ०भवन–न अम्ल(ॲसिड) करणें-होणें

**अय**—न लोखड [स अयस्]

**अयकर्णे**—ऐकणें पहा•

**अयगारकी**—स्त्री (कर्नाटक) अय्याचा मनुष्याचा हक्क [का अय्या]

**अयट-टा-टी**—स्त्री १ ऐट, अकडबाजी, भपका, दिमाख, छानछोकी, डौल, तोरा २ नखरा, आविर्भाव (मुद्रेचा, बाग ण्याचा, चालण्याचा, कृतीचा) ३ तडफ [स आवृत, प्रा आय ड्ड किंवा स आयत ? हिं ऐंठना=अकडणें] ॰णें-ऐट करणें ॰बाज-वि भपकेबाज, नखरेबाज, दिमाख दाखविणारा, नखरा, आविर्भाव करणारा, छानछोक, अकडबाज ॰बाजी-स्त्री भपका, छानछोकी, नखरा, डौल

**अयणी-अयणुटें**—वि. (कों, व) अळणी, अळणुटें, किंचित अळणी असलेलें, अळणी पहा [सं अलवण-अल्यण-अयण]

**अयणी**—आयणी पहा.

**अयता**—आयता पहा

**अयत्नत.-त्नानें, अयत्नें**—क्रिवि कष्ट, श्रम, प्रयत्न न करता, अनायासें, सहज, सहजपणा, सहजासहजीं, आपोआप (क्रि॰ सापडणें, मिळणें) [स अ+यत्न+त]

**अयत्नसिद्ध**—वि प्रयत्न न करता मिळविलेलें-साधलेलें-केलेलें. [सं]

**अयथार्थ**—वि १ खरें किंवा खऱ्याप्रमाणें नसलेलें, खोटें, असत्य. २ युद्धीस न पटणारें, अवास्तव, निराधार, अयोग्य -क्रिवि १ खोटेपणानें, लबाडीनें २ अप्रमाणशीर, निराधारपणें [स अ+यथा+अर्थ]

**अयदी**—वि सुस्त, मंद, आळशी, जड, ऐदी पहा [स अयत्नी ?]

**अयन**—भईन पहा

**अयन**—न १ सूर्याचें उत्तर किंवा दक्षिण दिशेनें गमन उ॰ उदगयन-उत्तरायण, =सायनमकरारंभापासून कर्कारंभापर्यंतचा उत्त रायणाचा काळ, दक्षिणायन=कर्कारंभापासून मकरारंभापर्यंतचा दक्षिणायनाचा काळ २ सहा महिने, अर्धे वर्ष, तीन ऋतू 'कोठें वर्षे कोठें अयन' ३ अयनांत, अयनबिंदु, इं सॉल्स्टिस ४ रस्ता, मार्ग, पथ 'पौष्याप्रति जाता जो पुरुष दृष्टाहड दखिला अयनीं।' -मोआदि २ १२८ ५ (समासात) जाणें, येणें, गति ६ प्रवेशद्वार (सैन्याचें) सैन्यप्रवेशमार्ग -भगवद्गीता १ ११, -गीर ६०४ [स इ=जाणें] ॰काल-पु दोन संपाता मधील काल (सूर्याच्या गतीला लागणारा), दोन अयनबिंदू तील काळ, अयन पहा ॰चलन-न पृथ्वीचे ध्रुव एका बिंदू भोंवती फिरत असल्यानें ताऱ्यांचें होणारें चलन, क्रांतिपात किंवा क्रांतिसंपातगति, संपाताच्या स्थानाचें मागें सरणें ॰वलन-न विशिष्ट ताऱ्याच्या क्रांतिवृत्तीय स्थानापासून ध्रुव व कदंब यावर जाणाऱ्या सूत्रामधील कोण ॰वायु-पु एक प्रकारचे नियतकाल वाहणारे वारे, ६ । ६ महिन्यांनीं याची दिशा बदलते त्यावेळीं मोठमोठीं वादळें होतात मुख्यत हिंदीमहासागरात वाहतात -ज्ञाको शान २८ ॰वृत्त-न अयनवृत्त, भवृत्त, क्रांतिवृत्त, विषुववृत्तापासून २३॥ अंशावर उत्तरेस व दक्षिणेस असलेलें अक्षवृत्त उत्तरेकडील कर्कवृत्त व दक्षिणेकडील मकरवृत्त या दोन वृत्तामधील प्रत्येक अंक्षांशावर एकदा सूर्य अगदीं डोक्यावर येतो (इं ट्रॉपिक्स) [स]

**अयनक**—न चष्मा, उपनेत्र, चाळिशी, आरशी 'माझ्या अयनकीला भिंग बसवावयाचें आहे' [अर आयनक अयन= डोळा याचें द्विवचन तुल॰ स नयन, इं आय]

**अयनक**—पु आरसा, दर्पण, काच **अयनेमहाल**-पु सर्वत्र आरसे असलेला दिवाणखाना **अयन्याची अंबारी**—स्त्री. राजे लोकाची आरसे असलेली अंबारी 'अयन्याची अंबारी गगनीं तारागण।' -ऐपो १०९ [अर. आइना=आरसा]

**अयना**—पु आरसा, अयनक पहा

**अयनांत**—पु १ अयनाचा शेवट, अयनबिंदु, दोन अयनां मधील संधिकाल. २ अयनअर्थ ३ पहा [स]

**अयनांश**—पु निरयन गणनेचें आरंभस्थान जी नि शर रेवती योगतारा (झिटापीशियम) तीपासून सायन मेषसंपातापर्यंतचें क्रांतिवृत्तीय अंशादि अंतर. [स]

**अयनी**—आयणी पहा

**अयब**—पु १ दोष, उणीव, अपुरेपणा, खोड, व्यंग, न्यून. 'नाहींतर शरक्ती (शरीक, मददतनीस) आहेत म्हणून कमती सरञ्जामाची होती तर इमनाचे जवामर्दीस अयब लागता' -ख ८, ४३५४ 'जाणतें नेणतें अनुचित कर्म होत असेल तर ती गोष्ट चित्तात ठेवून त्याचा अयब इतर लोकात न बोलता' -आज्ञापत्र १९ २ दुर्गुण, दुराचार ३ (ल) धक्का [अर अयब] ॰दार-वि न्यून किंवा दोष असलेला, अपुरेपणाचा

**अयुगयगु, अयबोगयबो**—पु (गों) कोणी तरी व्यक्ति, कोणीहि आला गेला कोणतेहि सामान्य लोक [स आ+या आणि +गम्, आया+गया]

**अयमुचें**—कि (गो) फुलाची कळी अर्धवट उमलणें [स. अर्ध+मुच्, का -मुरुगु-मुरडणें]

**अयय्यो**—उद्गा आई! आई! बापरे! आश्चर्य किंवा दया, भीति वाटली असता निघणारा उद्गार [प्रा अइया=स्त्री, किंवा प्रा अइय=दयाहे का अय्या द्वि]

**अयराण**—न—न अरण्य, जगल, रान [स अरण्य फा. वैरान]

**अयल**—अयाळ पहा

**अयव नवमी**—अविधवानवमी पहा

**अयं विशेष.**—प्रथम मान्य झालेली जी गोष्ट, तिच्याबद्दल युक्त्यादि पुन्हा सांगितलें असता पहिल्यापेक्षा ती जास्त मान्य झाली असता हें वाक्य म्हणतात (चुकीनें अहं विशेष) [स ]

**अयश**—न पराभव, अपकीर्ति, दुर्लौकिक, फजिती, अपमान [स अ+यशस्]

**अयश**—चैन, ऐषआराम 'पातशहा वदस्तूर दिल्लींत अयश धरून आहेत'—दिमरा १ ९१ [अर ऐष=सुख, आनंद]

**अयस**—न १ लोखंड 'त्वद्गुरुचे काशायस दत हिरण्मय तुझे असात असे।'—मोआदि २४८ २ पोलाद [स ]

**अयस्कात**—पु लोहचुंबक, लोहकांत [ग ]

**अया-य्या**—पु १ लिंगाइत लोकांत सन्मानदर्शक संज्ञा २ त्याचा गुरु—जंगम 'आकर्णुनि ऐस्या शुद्ध ज्ञानगोष्टी। वृत्ती अय्याची झाली उफराटी।'—दावि ३५७ ३ (सामा) बहुमानार्थी पदवी (स्वामी, साहेब याप्रमाणें) ४ गुरव, पुजारी कर्नाटकांत हा एक वतनदार आहे ५ स्वयंपाकी, आचारी 'हुजूर मुदवकखान्यातील कामाठी, भालेकरी, अय्या लोकांशीं संबंध येत असे' विविधज्ञान १ ९७ [स आर्य, द्रा अय्या]—स्त्री युरोपियन लोकांजवळ असणारी हिंदु दाई, (सामा.) दासी [स आर्या, पोर्तु अइआ =दाई आईआ=शिक्षक याचें स्त्रीलिंगी रूप]

**अयाचित**—१ वि याचना न केलेलें, न मागता मिळालेलें [स ] २ न मागता इतराकडून सहज मिळणाऱ्या भिक्षेवर अन्न वस्त्रादिकेंकरून ज्याची उपजीविका चालते असा निर्वाह करणारा 'धनाचा सद्वयो खरा। द्यावें अनाथ प्रेतसंस्कारा। अपावें दीनाल्या उद्धारा। धाडावें घरा अयाचिताच्या॥'—एभा २३ ३९६ —क्रिवि न मागता, आपोआप, सहजासहजीं (मिळालेलें) [स अ+याच्] ०बावा-पु अयाचितपणें येणारा साधु [अवचित] ०व्रत-न ०वृत्ति—स्त्री याचना न करता जें मिळेल तेवढ्यावर निर्वाह करण्याची वृत्ति याचना केल्यावाचून ज्या दिवशीं जें अन्न मिळेल तेंच सेवन करून राहाणें (ल) संतोषवृत्ति ०व्रत-न वरील तऱ्हेनें राहण्याचा केलेला निश्चय

**अयाचित**—क्रिवि (बायकी) अनाहूत, अवचित 'मी तेथें अयाचित गेलें' ०खून-पु एकाकीं केलेली हत्या, मनुष्यवध

**अयाचिती**—स्त्री अयाचिताकडे पाठविलेलें द्रव्य, भिक्षा वगैरे [स ]

**अयान-अया**—वि व्यक्त, श्रुत, स्पष्ट 'मुकदमे इजविहार केले, अयां जाले'—पया ४९० [अर अयां=स्पष्ट फा ]

**अयांनम**—(गो) अविधवानवमी पहा

**अयाल-ळ**—स्त्री घोडा, सिंह वगैरे जनावरांच्या मानेवरचे लांब केस ०दांडी—स्त्री अयाळ आणि शेंपटीचा झुपा-दांडी 'घोड्याची अयाल दांडी धरून चालावें' [फा अयाल]

**अयाल-ळ**—स्त्री विधवेच्या नावापुढें नवऱ्याच्या नावा पूर्वीं (कागदोपत्रीं) लिहिण्यात येणारा (कोम, भ्रतार यासारखी) शब्द, जसें—साद् मोलसकरीण अयाळ विठोजी सोळंकर [अर इयाल=कुटुंब फा अयाल=पत्नी, स्त्री.]

**अयाव**—इतर रूपें—आयव-आयाव (गो) अहेव, अविधवा, सवाष्ण [स अविधवा]

**अयांवया**—क्रिवि गयावया, दीनवाणें, रडवें तोंड करून (क्रि० करणें) [ध्व गयावयां]

**अयुक्त**—वि १ न जोडलेलें, सुटलेलें २ अयोग्य, अनुचित, निरुपयोगी [स अ+युज्] ०पणा-न विलगता, वचलता, 'म्हणोनि अयुक्तपण मनाचें।'—ज्ञा ७ ३४७

**अयुत**—न दहा हजार ही संख्या 'जो देवाल्याची वृत्ति हरी। जो ब्राह्मण वृत्तीचा लोप करी। तो अयुतायुत वर्षसहस्त्रीं। योनीं सूकरीं विष्ठा भोगी॥'—एभा २७ ३९२ [स ]

**अये**—उद्गा हे! अगे! (संबोधन) 'अये, ये भूलोकीं कवण तरुणीचें तप फळे।'—सारह ७ ८२ [स अयि]

**अयेर, आयेर**—(गो) अहेर पहा.

**अयो-अयोनवमी**—(गों) अविधवानवमी पहा

**अयोगसंभव-असंयोगिक**—वि (शाप) स्त्रीपुरुषसंयोगाशिवाय झालेली (प्रजा) [स ] (इ) असेक्सुअल

**अयोग्य**—वि १ न शोभणारें, योग्य युक्त नसलेलें २ निरुपयोगी, नालायक अपात्र [स ]

**अयोनिसंभव**—वि १ शुक्रशोणितसंयोगानें उत्पन्न न झालेला, जारज, अंडज, स्वेदज नव्हे असा. 'जो अयोनिसंभव श्रीहरी। जगन्निवास लीलावतारी।'—ह ५ १५ २ मानसपुत्र [स ]

**अयौतक**—न स्त्रीधनाचा एक प्रकार, विवाहप्रसंगाशिवाय इतर वेळीं मिळालेलें स्त्रीधन [स अ+यौतक]

**अर**—(कुण) अरे पहा

**अर**—स्त्री अलीकडील बाजू 'अर बाधे तर बाधे'—वैधकबाड भाईअह १८३२ ८५ [स आर=सान्निध्य]

**अरई-य**—स्त्री विघ्न आरई गाडीवरील खाडुक किंवा गळू, गुदस्थानातील गळू (भगंदर) [स अरति प्रा अरइ=अस्वस्थता, दुःख ]

**अरकशी-परकशी**—स्त्री कलागत, कचकच, कटकट, धुसफूस, तोंडातोंडी, हमरीतुमरी (क्रि० लागणें, चालणें) [वर्कशी फा वर+मक्स्=भांडण, हि.]

**अरकस**—पु १ करवत चालविणारा, अरकसी २ करवत [फा अरा=करवत, अराकश्=करवत्या, का अर=कानस तुल.

स क्रकच(र)-करवत ] ०काम-न चिरकाम, (माप-एक गज म्हणजे २४ तसू लांब आणि ६ तसू रुंद, एक दोरी म्हणजे ४ गज किंवा १२ फूट लांब आणि ६ तसू रुंद अरकसकाम अशा दोरीनें किंवा गजानें मोजतात) ०दार-पु करवत चालविणारा, करवत्या, अरकसी ०वरकस-स्त्री १ भिकार, वेचव, सत्वहीन, भग, रक्ष, अस्वादिष्ट अन्न, कदन्न २ नीरस बोलणें, मुळमुळीत भाषण करणें, काहीं तरी पाणचट बोलणें ३ भाडाभाडी, तोंडातोंडी, कचकच, अरकशी वरकशी पहा

**अरकसणें**—उक्रि करवतीनें कापणें, करवतणें

**अरकसलें-वरकसलें**—न पचनास कठिण किंवा जड, रक्ष जाडेंभरडें अन्न, अरकसवरकस अर्थ १ व वरकसल पहा

**अरक-सी-शी**—पु करवत चालविणारा, करवत्या, अरकस पहा —वि त्यानें केलेलें ( काम ), करवतीचें ( काम )

**अरकाट**—न प्र अर्काट कर्नाटकातील एक शहर —वि अर्काटी, अर्काट शहरचें ( रुपये, नाणें ) उ० अरकाट गंजीकोट= अर्काटातील एक विशिष्ट रुपया [ अर्काट व गंजीकोट खालील ]

**अरकाट**—पु लुच्चा, भाडखोर, धूर्त, हुषार, अर्कट पहा

**अरकान**—पु १ खांब २ (ल) सचारूक, आधारस्तंभ, प्रधान [अर रक्न=खांब अव] ०इ दौलत-स्त्री राज्याचे मंत्री, राज्याचे आधारस्तंभ (एक पदवी)

**अरखडा**—अरासडा पहा

**अर(रा)खणा**—स्त्री (प्रा ) निग्रह, दमन, निरोधन, दाब, प्रतिरोध [ स आ+रक्षण, प्रा आरक्खण, म राखण ]

**अरखुंडा, अरखुडा**—पु १ चोळवटून, घासटून पडलेली खूण ( दोरीनें वगैरे ), वरकोचा २ खाच, खोंवण ( दोरी बांधण्या साठीं, काठी-खुंटीला पाडलेली ) [ ओरखडा ]

**अरगजा**—पु अनेक मसाल्याच्या द्रव्यांनीं मिश्रित असलेली पिंवळी सुवासिक पूड, एक सुगंधी, सुवासिक उटीचा पदार्थ [हिं]

**अरगडी-ड**—स्त्री खरीपाच्या पिकापैकीं हलकी-तीन महि न्यात येणारी ज्वारी ही मृगारंभीं पेरतात [ का आर=लहान+ गड्डे=दाणे, कादे ? ]

**अरगळणें**—अक्रि गोंधळणें, भडखळणें, घोटाळणें, कुंठित होणें, भांबावणें [ स अर्गला ]

**अरगाल**—न ( कर्ना ) चाकोरी, नेमि

**अरगिन**—पु टांगण्याचा ( लोंबता ) राकेलचा दिवा [हिं अरगनी=दोर स अ+अग्नी-अलगीन तुल० इ अर्गंड=वातीच्या वातीचा दिवा]

**अरगीपारगी, अरगोपारगी, पारगींयारगी**—स्त्री १ आळीपाळी, अदलाबदली, आलट पालट २ हातोहात देवघेवीची क्रिया ( उ० चौलें, विटा वगैरेच्या भरलेल्या टोपल्या एकानें दुस न्याच्या, त्यानें तिसऱ्याच्या हातीं, अशा रीतीनें घेऊन जाणें व रिकाम्या परत आणणें ( तृतीया किंवा सप्तमी विभक्तींत नेहमीं उपयोग ) अरगीपारगीनें, अरगीपारगीं [ स आर=सान्निध्य+तरु, प्रा आरओ, म अर, आर=अलीकडे+स गम्+पार=पलीकडे+म गम्=(येणें, जाणें ) ]

**अरजणें**—क्रि (व ) परवडणें, बनणें, चालणें, जमणें, जुळणें 'ज्याला अरजेल तो घेईल पीतांवर ' [ स अर्ज्=मिळविणें ]

**अरजल-जली-जेल**—वि एका (किंवा तीन) पायानें पांढरा असलेला (घोडा), चित्रभागी, हा अशुभकारक मानतात [ अर अर जल्, हिं स अर्ज्=चकाकणें, पांढरें असणें ]

**अरड**—स्त्री तेल काढण्यासाठीं करडई, एरंडी वगैरेंचा भाजून, कुटून तयार केलेला कुट, करडई वगैरेंपासून तेल काढून घेण्याची क्रिया ( मि० घेणें ) अरड काढणें-घेणें-१ एकाचाची खरवड काढणें, हजेरी घेणें २ ( जिवाला ) मरमरेतोंपर्यंत त्रास देणें किंवा बेजार करणें, दमविणें, शिणविणें, क्षिनविणें, झीज सोसावयास लावणें, घायकुतीला आणणें, भडावणें, हाडें घुसळणें अरड निघणें-जोर गमावणें, सत्वहीन होणें, दमणें, त्रासणें, गळणें, थकणें [ का अरलु=भाजलेलें धान्य अरि=दळणें, चुरडणें ]

**अरड**—स्त्री आरडाओरड, आक्रोश, बखेडा, गलबला, गलका [ स आ+रट्, प्रा आरड ]

**अरडणें**—अक्रि ओरडणें, आरडणें, रडणें, आक्रोश करणें, हंबरडा फोडणें 'तों अरडत कौसल्यामाय । वरतें करोनिया बाहे ।' [ स आ+रट्=ओरडणें प्रा आरड ] ०वरडणें-आरडाओरड करणें [ अरडणें द्वि ]

**अरडा**—अरड पहा ०अरड-ओरड-स्त्री ०ओरडा-पु एकदम ओरड, कल्होळ, सर्वांनीं मिळून केलेला आक्रोश, गडबड

**अरडींदरडी**—स्त्री अवघड जागा, कडा, उतरण चढण, नदीचा कांठ 'जैशा भोंवत दिसती अरडीदरडी ।'-ज्ञा ९ ८१ -एभा १९ १०० 'महा अवघड अरडीदरडी । उतरतां कडे कडाडी ।' -कथा ६ ५ ९८ [ दरडी द्वि ]

**अरडींदरडीं**—क्रिवि खाचखळग्यात,रानात-डागरात 'गायी रासें अरडी दरडीं ।' -एभा १४ १५६ [ स दरी=दरडी दरड द्वि ] जीव अरडींदरडीं घालणें-पाडणें-संकटात घालणें, साहस करणें, त्रास सोसणें, अतिशय कष्ट करणें, -पडणें-संकटात सापडणें, पेंचात येणें

**अरडीपरडी**—स्त्री परडी (द्वि ) 'अरडीबाई परडी ग । परडीं एवढें फूल ग ।'

**अरडेल**—न अरड घेऊन काढिलेलें तेल अरड पहा [ अरड+ तेल ]

**अरड्या**—वि ओरडणारा, बोंबल्या, किंकाळणारा, रडणारा ‘ तुमचा गडी नुसता अरड्या आहे ’ [ स आ+रट् ]

**अरणी**—स्त्री १ शेताची बाधवरळी, सींव, ओग २ रणांगण, रणमैदान युद्धभूमि, रणक्षेत्र ‘ पारकिया चिए अरणी । घाग्तु आला लोहा ची गरसनी । ’—शिशु ९७९ ‘ टेव्हूळीं प(ख)ळवळलि अरणी । ’—उषा १४१६ ३ ( ल ) पुढारी, सेनाव्यूह ‘ देपा(खा) मोडलिया अरणी । ’ —उषा १६०६ [ स अ+रण, अरणी स अरण=हिंसा, वैर किंवा स रण ]

**अरणी**—स्त्री ऐरण, लोखंड वगैरे धातु ठोकण्याचा ठोकळा ‘ जैसी लोहाची अरणी । तैशी मेरूची घडणी । ’ —कथा ६ २ २६ [ स अरणि ]

**अरणी**—स्त्री (व ) एक प्रकारच्या फुगची वेल ही बहुधा कटिरी कुपणात वाढते फुलाचा वास दुरून चागला येतो व जवळून वाईट येतो [ स ]

**अरणी-अरणीपात्र**—न अग्न्याधानाच्या वेळीं अग्निहोत्री ज्या लांकडातून मथन करून अग्नि पाडतात तें ( पिंपळाचें ) लाकूड ‘ जैसा दो काष्ठाच्या अरणी । मथूनि काढिजे जेवीं अग्नि । ’ —एरुस्व ५ ५ —एभा १९ ७४ [ स अरणि ]

**अरणें**—सक्रि ( गो ) आवळणें, आखडणें आरणें पहा

**अरण्य**—न १ ओसाड, निर्जन प्रदेश मोठें जगल वन झाडी २ जमीनीची स्थिति पाण्याची दुर्भिक्षता, आणि अशाच काहीं दुसऱ्या कारणानीं जी जमीन लागवडीस व वसाहतीस निरुपयोगी असते ती, वैराण प्रदेश ३ गोसावी लोकातील एक पंथ [ म ] **०पंडित**—पु अडाणी लोकातील शहाणा ज्याच्या विद्वत्तेचा व्यवहाराला उपयोग नाहीं असा (ल ) मूर्ख (फक्त अरण्यातला विद्वान्, तेथें त्याची विद्वत्ता अजमावण्यास कोणी येत नाहीं) असे अ० इंग्लडात गेल्या वर ‘ एरडोपि द्रुमायते ’ या न्यायानें तेथें मान पावतात ’ —नि **०रुदन-रुदित-रोदन**—न (निर्जन अरण्यातील निष्फळ रडणें) ज्या प्रकारीचा किंवा विनवणीचा उपयोग होत नाहीं अशा वेळीं योजावयाचा शब्द व्यर्थ श्रम निरुपयोगी खटपट आपल्या देशबधूची जी काकुळत केली ती केवळ अरण्यरुदिताप्रमाणें निष्फळ झाली ’ —नि **०वास**—पु तपश्चर्येकरिता गाव सोडून अरण्यात राहणें **०सेवन**—न अरण्यवास **०सेवी**—वि अरण्यवासी, अरण्यात राहणारा

**अरतणेंपरतणें**—उक्रि उलथे पालथे करणें ( भाकरी, पोळी ) [ स परिवतन=परतणें द्वि अरता+परता ]

**अरतवण-परतवण**—न नवीन लग्न झालेल्या मुलीचें सासर—माहेर करणें [ स परिवतन=परतणें द्वि अरतवणें—परतवणें ]

**अरता-ती-तें, अरुता**—क्रिवि अलीकडे, इकडे, येथें, ह्या बाजूला, मागाला याच्या उलट परता ‘ देव सारावे परते । सत पुजावे अरते । ’ ‘ तो गाव नदीचे अरता आहे ’ ( ल ) अधिक प्रिय किंवा आवडता ‘ मला लेक अरता आणि पुतण्या परता, असें नाहीं दोघे सारखेच [ स आर=सान्निध्य+तस् ] **०परता**—क्रिवि १ अलीकडे पलीकडे, इकडे तिकडे, दोन्ही बाजूस, सर्व बाजूनीं, सर्भोवार २ तेथेंच, आगेमागे जवळ, आसपास कमीअधिक, लवकर किंवा उशीरां —वि १ इकडचा तिकडचा या बाजूचा त्या बाजूचा, दोहींकडील एकाच विवक्षित सदराखालीं न येणारें उ० ‘ अरतीपरती मिळकत, जादा आड मिळकत २ क्षुद्र, किरकोळ, अवातर, सटरफटर ‘ मी एकच चाकरी करीन अरतें परतें काहीं करणार नाहीं ’

**अरती**—स्त्री १ कटाळा, तिटकारा, वीट, विरक्ति २ असमाधान, अतृप्ति —वि कटाळा करणारा, विरक्त, अतृप्त, असमाधानी [ स अ+रति ]

**अरती**—आरती पहा

**अरतीर**—न अलीकडची थडी—काठ वगैरे ‘ प्रपच नगरा मर्भोवर्ती । कर्मनदीची महाख्याति । तियेनि जेथें जीव वर्तती । उत्पत्तिस्थिती अरतिरीं । —एभा ११ १०५२ [ अर=अलीकडील+तीर=काठ ]

**अरत्नि**—स्त्री १ कोपरापासून करंगुळीच्या टोंकापर्यंतचें हाताचें माप हात २ विष्कु, लांबी २४ २ इच —छ अक १९९ [ स ]

**अरत्र**—क्रिवि १ येथें २ इहलोकातलें, मृत्युलोकचें जीवित, याच्या उलट परत्र ३ इहलोक मृत्युलोक ‘ तेथें अरत्र ना परत्र । काहींच नाहीं । ’ —दा ५ ३ ४ [ स परत्रच्या उलट ] **०नापरत्र**—अ इकडे नाहीं व तिकडे नाहीं अशा प्रकारें, इथें ना तिथें; अधातरीं

**अरद**—वि (गो ) अर्ध पहा ज्या सामासिक शब्दात अर्ध हें पद आहे त्या ठिकाणीं अरद हेंहि पद धुरीनें पुष्कळदां वापरतात उ० अरदकच्चा—जेरा—पडा—पिका—वाट [ स अर्ध ]

**अरदळ**—तैनातीची अर्धी रकम, अर्धेली —ख ३६८०. [ स अर्ध ]

**अरंदळणें**—अक्रि १ ओरडणें गर्जना करणें, गोंगाट करणें २ हातपाय आपटणें चरफडणें, अदळआपट करणें [ स आक्रन्दन किंवा आरट् ]

**अरद्र**—वि आर्द्र ( अप ) ओलें ‘ कितेक दिवस अरद्र झाकपणें ’ —सप्र ८ २० [ स आर्द्र ]

**अरधें**—न सततीचा अभाव, अनपत्यता, निसतान [ अ+राधणें ? ]

**अरपार**—आरपार पहा

**अरब**—पु. अरबस्तानातील रहिवासी-माणूस-घोडा (ऋग्वे दात अर्व-र्वा हा शब्द घोडा या अर्थी येतो अर्व देश म्हणजे दुर्लीचें अरबस्तान असावें) [अर तु० स अर्वन्=घोडा प्रा आरव=अरब]

**अरबचरब, अरबट, अरबटचरबट**—वि १ बेचव, नीरस, वेलज्जतदार, नि सत्व, रुक्ष (अन्न) २ धथोट, निलाजरा, उनाड, तोंडासतोंड देणारा, उद्धट, राकट, असभ्य, जगली, खेडवळ (इसम, मापण, चालरीत, सवय, देश, मुलुख, रान, जागा इ०) 'मोठा अरबट दिसतो हा!' —न बडबड, वकवक, वटवट, वाफ्कळ, निष्कारण गप्पा —क्रिवि निरर्थकपणें, वाफ्कळपणें, कार्दीचे यार्दीं (बोलणें) [स आरभट=साहसी अप किंवा चर्व् चर्व= चावणें, खाणें द्वि किंवा ध्वनिवाचक]

**अरबट दांड**—वि जगली, खेडवळ, अडदाड, रानवट, अड मुठ्या, ठोंग्या. [ग आरभट]

**अरब(स्ता)स्थानी**—अरबी पहा

**अरंबळ**—न क्षीणता, कासावीस होणें, घाबरणें, कुथणें 'तेवि भुङ्पोनि सुजला पाये। तरी अरबळ न करिती।' —दावि १३३ [स आ+रु=ओरडणें, शब्द करणें]

**अरंबळणें**—अक्रि विप्र आरबळणें १ झोपेंत बरळणें, वड बडणें, कुथणें २ झोपेनें घेरलेला असणें, पेंगणें ३ ओरडणें, अमात बहकणें, आक्रोश करणें, हबरडा फोडणें ४ निष्कारण किंवा व्यर्थ वडबड करणें [स आ+रु किंवा आ+रभ्=ओरडणें, शब्द करणें]

**अरंबळणें**—अक्रि पोळणें, भाजणें

**अरबा**—वि चार सख्या (सुर सन) [अर अरबाह्]

**अरबा**—पु १ अरबाची लढाई-हल्ला, युद्ध (क्रि० (वर) झाडणें) २ शिव्याचा किंवा धमक्याचा वर्षाव ३ कोणतीहि तडफदारी, जोराची क्रिया, झपाटा तडाखा, धडाका जसें-रागाचा -जेवणाचा-लिहिण्याचा अरबा ४ (सोलापूर प्रात) गावाची किंवा किल्ल्याची वेस ५ अरावा पहा (वर) ०उडणें-रागानें-त्वेषानें उठणें, उठाव करणें ०पिऊन जाणें-पिणें-सोसणें-त्वेष, राग, आवेश सहन करणें, सोसणें २ तोफाचा मारा सहन करून आत घुसणें [अर अरावा]

**अरबाड**—न (व) उर फासळ्या, बरगड्या किंवा त्याची बाजू 'अरबाडावर लाथ मारली' [स उरस्+अर्ति]

**अरबाडी**—पु (व) विंचू व सापदशावरील मत्र जाणणारा मांत्रिक 'अरबाड्याच्यानें साप उतरला नाहीं' [स उरग, आर= अजगर+बाधा, फा अरवद=सर्प]

**अरबाणा**—पु हुकमत वर्चस्व, ताबा, आटोका [फा अराबा+धाणा=रीत चाल, अरे+बाणा ? मोको] —च्यात असणें-चालणें-राहणें-आगणें-आईत किंवा कब्जात असणें -च्यात नसणें-तून जाणें-आईत नसणें, आटोक्याबाहेर जाणें

**अरबी**—वि अरबस्तानासबधीं (ल) भाषा, घोडा, वेष, लिपि, फळफळावळ वगैरे 'मद हळु हळु चालतो। चपळ कैसा आटो पतो। अरबी फिरवणार तो। कैसा असावा।' —दा १९ ७ १८ ०तगादा-पु अरबी शिपायानी लाविलेला तगादा हा अतिशय जुलमी व त्रासाचा असतो यावरून (ल) अतिशय निकडीची-सक्तीची-जोराची मागणी, मारवाडी तगादा ०पहारा-पु अरब लोकाची चौकी हा फार कडक व जालीम असतो त्यावरून कडक व सक्त पहारा (क्रि० करणें, लावणें, माडणें, बसवणें, लागणें, बसणें) ०साल-न ०सन-पु अरबी वर्षे, मृगसाल, शुहुरसन (सुर), याची सख्या माडण्याची रीत पुढीलप्रमाणें अह्दे-इहिद १, इसने २, सलास ३, अरबा ४, खम्मस-सिन ५, सीत ६, सब्बा ७, सम्मान ८, तिस्सा ९, अशर १०, अहद अशर ११, इसने अशर १२, सलास अशर १३, तिस्सा अशर १९, अशरीन २०, सलास सीन ३०, अरबैन ४०, तिस्सैन ९०, मया १००, मयातैन २००, सलासमया ३००, अरबामया ४००, तिस्सामया ९००, मय्या व अल्फ ११००, मय्यातैन व अल्फ १२००, अशर अलफ १०००० हे उजवीकडून डावीकडे माडीत जातात ठोकळ मानानें अरबी सनात ५९९ मिळविले म्हणजे इसवी सन येतो कागदपत्रात हे अक्षरानीं लिहितात उ० इसने सलासीन तिस्सैनमया व अल्फ= २+३०+९००+१००० =१९३२

**अरबु(बु)ज-द**—वि (विप्र अर्बुज) राकट आडदाड, खेडवळ, मठ्ठ, रानटी, जगली, अडाणी, रद्द, क्रूर, ओबडधोबड 'अति सात्विकता दृष्टी पडे। तरी मानी वेडें अर्बुज।' —एभा २३ २६४ [स अ+बुध प्रा अ+बुज्झ=अबुध] ०जात-रानवट, अडदाड जात, अशा जातीचे लोक-भिल्ल, पठाण वगैरे 'इराणी दुराणी, जात अर्बुज त्यानीं कित्येक तरुण स्त्रियाच्या अब्रू घेतल्या' —भाव ८

**अरबैन**—वि ४० सख्या, अरबी साल पहा [अर]

**अरब्बा**—अरबा पहा

**अरंभ-अरंभिक**—(गो) आरभ पहा

**अरम(मा)र**—आरमार पहा

**अरमिन**—एक मुगसाच्या जातीचा, अगावर लव किंवा लोंकर असलेला प्राणी य लोंकरीचे झगे न्यायाधीश, सरदार याच्या करिता करितात [इ इर्मिन]

**अरर**—न दार दाराची फळी, कवाड 'जाय वळें उघडाया कर देउनि उघडिल्याहि अररा ज्या' —मोसभा ३ ४ [स अरर=दार]

**अरर**—उद्गा अरेरे! दु ख शोक आश्चर्य व्यक्त करणारा उद्गार • [स आ+रु]

**अरव**—वि अर्व, दहा कोटी सख्या [स अर्बुद]

**अरवळ**—वि (गो) खोप्पर, पोरकट, वेडसर [स आ+ रव+ल]

**अरवा**—वि नाजुक, अरवार, अरखार पहा 'माझुक मउ मुखचंद्र सुकुमार पुष्पाहुनहि अरवा ।' –प्रला २३०.

**अरवा**—स्त्री मर्जी ? दार

**अरवाडीं(ळीं)**—क्रिवि (व) अवेळीं, अकाली [वेर+वेळीं, स अपर+वेला]

**अरवार**—वि (गो) खोडकर, खोडसाळ, उनाड, दांड, अवखळ (मूल) [स आ+रव+ल]

**अरवार-ळ**—वि अरखार पहा १ हलकें, सहज तुकडे पडणारी (भाकरी, पोळी इ), सुसखुशित (पक्वान्न) २ मऊ, नरम (अंबि, फळीं, इ) 'मुळे चांगले अरवार असतात' –बागेची माहिती ३४ ३ (काव्य) नाजुक, सुकुमार –स्त्री मृदु शय्या, शेज, अरवार पहा [प्रा अरलु=फूल ? ते अरवरलु=काटकुळा, पातळ]

**अरवाळी**—स्त्री खोड्या, दांडपणा (लहान मुलांच्या) चेष्टा, उनाडक्या –वि खोडकर

**अरविंद**—न कमल, पद्म 'नमो विशदबोधविदग्धा । विद्या रविंदप्रबोधा ।' –ज्ञा १०१ 'रामाचें वदनारविंद ।' [स]

**अरशिसि**—अर्धशिशी पहा [का अर=अर्ध+ स शीर्ष= डोकें]

**अरशी-सी**—स्त्री १ उपनेत्र, चष्मा २ लहान आरसा, आरशी 'त्या आरशा घालुनि अगठ्याला' –सारह ६ २७ [स आदर्श]

**अरस**—वि रसहीन; नीरस (ल) बेचव, शुष्क 'कशासाठीं गावीं अरस कवनें मी स्ववदनें' –केक ६ [स अ+रस]

**अरसट्टा**—अडसट्टा पहा

**अरसपरस**—क्रिवि १ भोंवतालीं, जवळपास, आसपास, आजूबाजूस २ (कों) अवरसचवरस [स परिसर-परस द्वि]

**अरसपरस**—क्रिवि (बडोदें) परस्पर 'अरसपरस सलाम्या होऊनी। परत आले' –पापो ६७ शब्दीं उभयपक्षीं अ० हळदीकुंकू देण्यात येतें' –ऐरापुविवि १४६ [स परस्पर, गु अरसपरस]

**अरसा**—आरसा पहा

**अरसा-आरसा**—अर्सा पहा

**अरसिक**—वि १ सौंदर्य व मोहकपणा न जाणणारा किंवा त्यासंबंधीं अडाणी, चव किंवा गोडी नसलेला, मर्म न जाणणारा ज्याचें ललितकलादि गोष्टींत मन रमत नाहीं असा 'सेवंतीचे अरसिकाहीं। भाग पाहतां विशेषु तरी नाहीं। परी सौरभ्य नेलें तिहीं। भ्रमरीं जाणिजे ॥' –ज्ञा १५८९४ २ बेचव, नीरस [स अ+रसिक]

**अरसेनिक**—न सोमल ताल, रसायनांतील एक मूल द्रव्य होमिओपाथींत हें महामारी, अतिसार, शक्ति, दमा वगैरेंवर औषध [इ]

**अरस्य**—? निरंग 'चार्खो तें तें अरस्य' गीता १ २३१८ [स अ+रस]

**अरळ**—न १ फूल 'रोमेपरी अरळ सुकले' –द ३० २७ २ (गो) मऊ झालेले –निवि (असाद या अर्थी) 'उंच होवोनि ऊर्ध्वहस्तें। अरळ कलिका तोडिल्या'–ह १७ १०९ [का अरलु= फुलणें, फूल] –वि (ल) नाजूक, मृदु 'शय्या घालुनी एकांतीं। अरळ सुमनांची निगुति।' –एरुस्व ३ २६ अरवार, अरवार, अरवाळ, पहा

**अरळ, अरळतरळ**—वि १ सैल, विरळ (वोचकें, गाठोडें) २ अव्यवस्थित बसविलेलें, नीट, सरळ नव्हे, वेडेवाकडें, अयोग्य बसविलेलें (धोंडा, गवत, तुळई) ३ अनिश्चित, घोटाळ्याचें, घाल मेलीचें मोघम, पिरपिळीत (बोलणें, भाषण) ४ अव्यवस्थित ढिलाईची, मंदीची (वागणूक, उद्योगधंदा) –क्रिवि ढिलाईनें, गैलपणानें, सरळ नव्हे (वाघों), अयोग्यरीतीनें (बसविणें, लावणें, ठेवणें) सैल, विस्कळित (रचणें, टेरणें,) मोघम, पिळपिळित पणें (बोलणें, करणें) [अरळ+तरळ]

**अरळी**—स्त्री विप्र अरोळी (कों) मोठ्यानें मारलेली हाक, आरोळी, मोठ्यानें ओरडणें–आवाज देणें–करणें [म आ+र =शब्द करणें, प्रा रोल=कोलाहल]

**अरळी**—स्त्री घोड्याच्या अंगावरील उठलेली गाठ (कसाची), एक अशुभ लक्षण [?]

**अरक्षित**—वि रक्षण न केलेलें, असंरक्षित, न राखलेलें–पाळलेलें [स]

**अराइणें**—आराइणें पहा

**अराकस**—अरकस पहा

**अराखडा**—पु १ ठोकळ अंदाज, बेनवात, नकाशा, मसुदा, रूपरेषा, खुणा, योजना [स आ+रेखा आलेख] (क्रि० घालणें, करणें, मांडणें) २ हिशवाचें अदाजपत्रक खर्डा ३ मर्यादा किंवा सीमा, इयत्ता कार्यक्षेत्र, ४ नकाशा, चित्रें वगैरे काढण्यापूर्वीचा आकृतिपट (आऊट लाईन) ५ आरखडा, ओरखडा, रेघोट्या, खरडलेल्या खुणा (क्रि० ओढणें काढणें, पडणें)

**अराखणा**—स्त्री (कों) दमन, निग्रह संयमन, आकलन, दाब, प्रतिरोध, दाबांत ठेवणें, रोघणें [आ+रक्षण–राखण]

**अराजक**—वि १ राज्यसत्ता नष्ट करू पाहणारा, बंडखोर, क्रांतिकारक २ राजसत्ताविरहित, शास्ता नसलेला (देश) [स] ०त्व–न बडाकडे प्रवृत्ति, अराजकपणा अराजकता 'एखादी सुधारणा करणें म्हणजे अराजकत्वाकडे पाऊल टाकणें की काय असें लोकांस वाटू लागलें होतें' –इभू ३१३

**अराजक-ता**, स्त्री **अराज्य**—न (राजाच्या) सिंहासनावर किंवा गादीवर कोणी नसणें (ल) निर्नायकी, अदाधुंदी, बेबंदशाही, अराजककाल, सरकार या संस्थेचा अभाव [स अ+राज्, राज्य]

**अराटी**—स्त्री काटी, एक झुडुप, हीं झाडें कटकयुक्त वेली प्रमाणें पसरणारीं आहेत पानें रेराच्या पानासारखीं वात, कास व पित्तरोग यावर गुणकारी –वगु १ २७ ( सामा ) कांगेरी झुडुप 'अराटीलागीं मृदुता। कोठोनि असेल कृपावता।' –ध्य १५ [ वै स अराटकी, स आरी ? ]

**अराटणें, आरटणें**—अक्रि बाजूस येणें [ स आरात् ? ]

**अराणूक**—स्त्री १ विश्रान्ति, स्वस्थता स्वास्थ्य फुरसुद रिकामपण २ शांतता, सौख्य, शांति तृप्ति, समाधान 'तुका म्हणे नाहीं। अराणूक तुज काहीं।' –तुगा ५८० [ स आ+रम्+णूक ]

**अराबा**—स्त्री १ तोफ तोफेची गाडी २ बातेरी, तोफांचा मारा, सरबत्ती अरब लोकांचा सपाट्याचा गोळीबार अरबा पहा ३ गराडा, व्यूह 'दळणि अराबा भवतीं।' –मग्रामगी ५८ ४ ल्वाजमा इतमाम, तान्यातील मालमत्ता, प्रापंचिक पसारा निरनिराळे व्याप ( कुटुंब, गुरेंढोरें जमिनी वगैरे ) ( क्रि० पडणें, घालणें, मांडणें, पसरणें उचलणें आटपणें ) ५ मोठा बडेजाव, डौल, दिमाख, भपकेदार प्रदर्शन, अवडंबर, ( क्रि० घालणें, घालून बसणें ) ६ ( व ) घोंटाळा, गोंधळ ०पिणें–शत्रूचा गोळीबार सहन करून शत्रूच्या फौजेंत जाणें –रा ८८६०. 'इभ्रनाचा अराबा पिऊन मराठी फौजा आत घुसल्या, हत्यार चाल्लें इभ्रनी लोक बहुतेक कापून काहाडले' –रा १९६३ [ फा अराबा=तोफेचा गाडा ]

**अराम-खाना-शीर**—आराम पहा

**अराल**—वि वाकडें 'आम्हांसी सांपाती। होती अराळे ते होती।' –तुगा १८०७ [ स अराळ ]

**अराल**—( हस्त ) पु ( नृत्य ) आंगठा अनुचित वरून तर्जनी धनुष्याच्या आकाराप्रमाणें मध्येंच वाकवून ठेवणें व बाकीचीं बोटें सरळ पसरून ठेवणें [ स ] ०खटकामुख ( संयुत हस्त )–पु ( नृत्य ) दोन्ही हात उपपक्षक करून पद्मकोष वरणें व मग अराल करून खटकामुख करणें

**अराष-स-सी**—स्त्री आरास, सुंदर रीतीनें केलेली मांडणी, सजावट, आरसे, छतें चित्रें दिवे इत्यादिकांनीं शृंगारलेलें घर थाटमाट, भपका, आराईश '–रा १ ११० करून तन्हा घरिच्या अरासी।' –सारह ८३१ [ फा आराइश ]

**अराष्ट्रीय**—वि राष्ट्रसंबंधी नव्हे तें राष्ट्रहिताचें नव्हे असें विदेशी, परकीय, राष्ट्रीय भावनेच्या विरुद्ध शिक्षणक्रमास जास्तच अराष्ट्रीय स्वरूप आलें आहे सेंपू २ १५ [ स ]

**अराळफराळ**—न ( कु ) अप्रस्तुत भाषण अरळतरळ पहा [ विचित्र रूप फराळ द्वि किंवा अरळ+फराळ ]

**अरि**—पु १ शत्रु, वैरी, दुष्मन् 'मज सर्वांतरातें कल्पिती। अरि मित्र गा।' –ज्ञा १ १६६ २ चक्र [ स ] ०मर्दन–वि शत्रूला ठार मारणारा, नाश करणारा 'अरिमर्दना उठे आता।' राधि –न शत्रूचें निर्दालन हनन, शत्रूचा पराजय 'तेंचि धगधगीत चक्र। अरिमर्दनीं उद्भट' –एरुस्व १ ४७ ०राय–पु अरिराव, शत्रूचा राजा, शत्रुनेत 'दंचाचेनि तेजें बहुवसें। अरिराए निर्दिलें अनायासें॥' –शिशु ७३५ [ स अरि+राजन् ]

**अरिठा**—पु रिठा [ स अरिष्ट ]

**अरिथ-अरथ**—पु ( गो ) अर्थ [ स अर्थ ]

**अरिष्ट**—न १ अनिष्टकारक, दु खकारक गोष्ट, अशुभ किंवा त्रास उत्पन्न करणारी गोष्ट २ लुटारू, दरोडेखोर टोळधाड, धूमकेतु, उत्पात, धरणीकंप, नैसर्गिक संकट, किंवा अशा तऱ्हेचा अनिष्टकारक प्रसंग, आपत्ति ३ खोडया (लहान मुलाच्या) ४ दुर्दैव, दुर्भाग्य ५ अनर्थकारक अतिरेक नुकसानीचा जोर उ० पावसाचें पडणें वारा वाहणें ( क्रि ओढवणें, कोसळणें, माडणें ) ( सामाशब्द ) अरिष्टनिरसन – कारक – सूचक ६ आसव, अर्क, मद्य, पाणी आदि करून द्रव पदार्थांत औषधी द्रव्यें घालून काढ्याप्रमाणें अग्नीवर तयार करून आसवाप्रमाणें पुरून ठेवून काढतात तें ७ (वैद्यक) मरणचिन्ह ८ सूतिकागृह, बाळंतिणीची खोली 'मेळविले देव सकळ जाउनि विधिनें स्वयें अरिष्टात।' [ स ] –वि कठिण, अवघड, प्रचंड, प्रयासाचें 'वेद मुखोद्गत करणें म्हणजे केवढें अरिष्ट काम' नि १०५५ ०संतोषी–वि दुसऱ्यावर संकटें आलीं असता आनंद मानणारा

**अरी**—स्त्री १ आर ( चांभाराचें टोंचण्याचें हत्यार ) टाचणी म्ह० गाडीखालीं अरी चांभार पोर मारी = स्वत जवळ जिन्नस असून तो हरवला असें समजून शोध करणें २ लोखंडी अणकुचिदार टोंक ( भोंवऱ्याचें पराणीचें ) [ स आरा ]

**अरी**—स्त्री हारी ओळ, रांग [ स अर=चाकाचा आरा ]

**अरीणी**—वि ( गो ) अऋणी ( अप ) कर्ज नसलेला [ स अ+ऋणी ]

**अरीनूवरूत्**—क्रिवि सध्या [ फा ]

**अरीभवन**—न ( शाप ) सरळ रेषेंत बाहेर पडणें ( प्रकाशाचें ) किरणरूपानें निघणें किरणविसर्जन ( इ ) रेडिएशन [ स ]

**अरीस**—स्त्री मूळव्याधीचे मोड 'एक वरी सेविजे अरीस मरति।' वैद्यखाड भाइग ८६ [ स अर्श ]

**अरीळ**—वि न चाखलेलें, शुद्ध 'फळें कंदमूळें जरी ही न मीळे। तरी काळ कर्मी जळें वीं अरीळें।' –विगुदा ९८ [ स अलीढ ? ]

**अरुच**—वि ( गो ) १ रुचकर नसलेलें २ तुच्छ, न रुचणारें [ स अ+रुचि ]

अरुचि—स्त्री १ कंटाळा, तिटकारा, अनावड, अप्रीति, नाप सती २ (वैद्यक) पोटात भूक असूनहि रोगामुळें तोंडांत घातलेलें अन्न खाववत नाहीं अशी अवस्था चव नाहींशी होणें, जिभेला गोडी नसणें ३ अमान्यता, अननुकूलता, अनभिमतत्व (प्रतिपादित अर्थासंबधीं) 'या दुसऱ्या उदाहरणावरून पूर्वोदाहरणीं कांहीं ग्रंथ काराची अरुचि आहे असें दिसतें' [स]

अरुचिर—वि १ बेचव, कटाळवाणें, नापसंत, तिरस्कार उत्पन्न करणारें २ सुंदर नसलेला [स अ+रुचिर]

अरुण—पु १ सूर्याचा सारथी, कश्यपपुत्र, गरुडाचा वडील भाऊ. २ उषःकाल, प्रभात, पहाट, अरुणोदय, (तांबडें फुटणें) –वि तांबडा, लाल, रक्त आरक्त 'रागजली अरुणशांति विराज वीते।' –नल ५७ [स] –णिमा–स्त्री तांबडपणा, लाली, रक्तिमा –णोदय–पु तांबडें फुटणें, सूर्योदयापूर्वी पूर्वदिशेकडे रक्तप्रकाश दिसू लागणें, सूर्य उगवण्यापूर्वी तीन घटकांचा काळ, प्रभात, पहाट 'घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला।' –होन १६

अरुता—क्रिवि इकडे, अलीकडे, अरुता पहा 'तो बुध्दियोग विवरितां बहुतें पाडें पार्था। दिसे हा अरुता। कर्मयोगु।' –ज्ञा २ २७४ 'तें अरुतेंचि ठेलें।'–दाव १९४ [स आरात्+तस्]

अरुता–अरू—स्त्री १ हक्क, जागा, योग्यता, योग्य स्थान किंवा धंदा, उद्योग २ पूर्ण आवश्यकता–जरूरी (हजेरीची, मताची, येण्याची) अपरिहार्यता, अगत्य 'त्याच्यापुढें बोलण्याची कांहीं अरुता नाहीं' –ख ३२०३ (क्रि० धर, ठेव) 'मी आता मरतों असतों पण दादाची अरुता आहे' 'कुळाची अरुता न धरता जामीनदार खुद्द रुपये देईल' [स अर्हता]

अरुंतुद—पु (शाप) एक उत्कर्ष, (इ) ॲकिडाइन

अरुंद—वि (कधीं अरुध) रुंदीला कमी किंवा अपुरें [अ+रुंद]

अरुंधती—स्त्री १ वसिष्ठऋषीची पत्नी, कर्दमकन्या २ सप्त र्षींमधील वसिष्ठाच्या जवळचा तारा, (ज्याला अरुंधती दिसत नाहीं तो लवकर मरतो कारण दृष्टि इतकी मंद झाल्यानंतर आयुष्य फार थोडें उरलेलें असतें असा समज आहे) ३ (योग) जीभ जिव्हा जिव्हाग्र –योर १२६ ०दर्शनन्याय–पु अरुंधती तारा वसिष्ठा च्या खुणेवरून दाखवितात त्यावरून लक्षणेनें दोघांच्या मोठ्या गोष्टीवरून लहान गोष्टीचा निर्देश करणें [स] ०केश–ही राशि उत्तरगोलार्धांत सिंह आणि भूतप याच्या मध्यें आहे (इ कोमा बेरेनिसेस)

अरुवार—वि १ कोमल नाजूक, मृदु सुंदर, मऊ हलु वार, सुकुमार 'कीं अरुवारें करें। विचित्रा धातुचीं सपुरें।' –ऋ ७८ 'कां अग लाभे अरुवारें। राधितिये उगें' –ज्ञा १८ १४२ 'रातोत्पलसुकुमार। त्याहूनि पदें तुमचीं अरुवार।' –रावि १३ ५९ 'कीं कमळिणी सुकुमार कीं दिरस फूल अरुवार। क्षणमात्रें कुचुंबे।' –हरि ? १३५ २ गुणगुणीत, हलकी, हळु 'एक सच्छिद्रें अरुवार। नवनीतसदृश मोडतीं।' –मुआदि२९ ८४ ३ हलकें 'वाळल्या अनुतापकाचरिया। वैराग्य-तळणें अरुवारिया।' –एरुस्व १४ १०८ [हळुवार का अरलु–फुर] –न मृदु शय्या 'मह्मा सुपाचें अरुवारीं।' –परमा १२ ७ 'तो असे क्षीरसागरीं। निद्रिस्त शेषाचें अरुवारीं।' –कथा २ ५ १५७ अरवार पहा.

अरु(रू)श–ष, अरुसा—वि १ आर्ष, मूढ, विचित्र, मंद, जड, वेडावाकडा, मंदबुद्धीचा, बोबडा, मूर्ख 'हा अरुष भक्तिचा भाव। दयाळा धाव घेई धनुकरा।' –देप २८ १ २ विचित्र, विक्षिप्त (माणूस) 'येक अरुषें आक्षेपिलें' –सप्र ८ १२२ [स आर्ष]

अरूप—वि १ आकार किंवा रूप विरहित, निराकार (ब्रह्म, वायु ध्वनि, इ०) 'अरूपतें रूपास आलें' २ कुरूप, बेढब, बेडौल 'कृष्ण अगुणाचा अरूप। कन्या सगुण आणि स्वरूप।' –एरुस्व १० ९६ [स अ+रूप]

अरे—उद्गा पुरुषाला हांक मारताना–बोलावताना सलगीनें अगर तिरस्कारानें बोललेला शब्द, संबोधन–रे, ए वगैरे म्ह० अरे तर कारे अहो तर काहो कधीं आश्चर्य वाटलें असताना अरे! असा उद्गार निघतो नामापुढें लावताना अ गाळतात जसें–रामरे! [सं अरे] ०अरे करणें–करू नको म्हणणें, मना करणें, ताकीद देणें. ०जारे–(क्रि० बोलणें–म्हणणें–चालणें–भांडणें) उद्धटपणा, उर्मटपणा ०तुरे–स्त्री शिष्टाचार सोडून अमर्यादपणें, हलकटपणानें बोलणें, एकेरीवर येणें, हमरी तुमरी, हातघाई, कच्चाखांची लढाई –शिदि १४० (क्रि० बोलणें, करणें) ०तुरेनें–अहमहमिकेनें अधिक उत्साहानें 'योग्य मनुष्यास उमेद चढून दुसऱ्यानें अ० कामें करीत असावें' –स्वप २७१ ०तुरेवर येणें–एकेरीवर येणें, भांडण्यास लागणें 'थाईसाहब असें अरेतुरेवर एकदम येऊं नका' –इप १०१ ०बापरे–आश्चर्याचा–भीतीचा उद्गार

अरेकस—पु करवत्या अरस्म पहा 'अरेकसाच्या कामाला चिरकाम म्हणतात' –मदमा १२६

अरेराव—पु अरे! अरे! करण्यात पटाईत फुशारकी मार णारा, फुकट प्रतिष्ठितपणा दर्शविणारा, रागक्या, धटिंगण, खलेल टकोजी, लोकांत मन मानेल तसें वागणारा, रागडमल्ल अहमन्य गर्विष्ठ अल्पाधिकारानें प्रमत्त झालेला, तिस्मारखान 'राष्ट्रीय सभा पूर्णपणें राष्ट्रीय हित साधणारी व्हावी, तिचें काम जनतेच्या बहु मतानें व जाहीर रीतीनें व्हावें, तें एखाद्या अरेरावाच्या खोलीं खासगी रीतीनें होऊ नये असें आमचें म्हणणें आहे' –टिळक [अरे+राव] –वी–वर्गी–स्त्री जुलूम, अहमन्यता, दडपशाही फुशारकी 'विद्याखात्याचें धोरण अरेरावीचें असून' –केले १ ४९ –वि जुलमी, अहंपणाचें, आडदांडपणाचें, उद्धट, अन्यायी 'चार्लर

इलियट याच्या सारख्या अरेरावी अमलदारास खाल पाण्यात शिरावयाचें होतें ' –टि १ १६०

**अरेरे**—उद्गा दु खोद्गार, शोक-विस्मय-भय यांचा किंवा मद त्याची चूक आठवली असता पश्चात्ताप होण्याच्या वेळीं येणारा उद्गार, अरेरे [ अरे ]

**अरेलिया**—न एक सुदर पानाचें बागेंतील झाड [ इ ]

**अरेठ**—न अनर्थ, अरिष्ट पहा 'शैल्ये घोर अरेठ केलें। तवें तीनि ओतना वाहिले। –शिशु ९८७ [ स अरिष्ट, प्रा ]

**अरोग-गी**—वि निरोगी, आजारी नसलेला, निर्दोष प्रकृतीचा, धडधाकट सुदृढ [स अ+रोग]

**अरोचक**—पु अरुचि, तोंडाला चव किंवा रुचि नसणें, भूक नसणें (ल) कटाळा दिसारी 'तेतुलें अरोचक। विषयीं घेईल॥' –ज्ञा १२ १०६ –वि न रुचणारा, आवडणारा, कटाळवाणा [स. अ+रुच्]

**अरोवा**—अरावा पहा

**अरोसा**—पु १ अगरुचीदार, निमुळतें टोंक, शेवट (दोरी-दोराचा) २ निमुळत्या शेवटाची दोरी जीभ अरुसा पहा

**अरोळी**—स्त्री निखाऱ्यावर भाजलेली चादवी अहारोळी पहा [आहार=विस्तव+पोळी]

**अरोळी**—स्त्री १ मोठ्यानें मारलेली हाक २ ओरडणें, मोठ्यानें आवाज करणें [स आ+रु=आवाज करणें] ०**हाकाहाक**—स्त्री मोठी हाकाटी व गोंगाट

**अरौतें**—क्रिवि अलीकडे, अरुता, आरौतें पहा 'पैं परतावा अरौतें' –ज्ञा १३ १५८ [स आर+तस्]

**अर्क**—पु १ सूर्य, आदित्य 'तो तव अर्काचाहि आदि अर्क।' –एरुस्व ७ ६१ २ रुईचें झाड, मदार ३ बारा ही सख्या (बारा आदित्य असतात म्हणून) [स ]

**अर्क**—पु १ सत्त्वांश, तत्त्वांश (औषधादिकाचा), रस, मद्य, सार, कस, निष्कर्ष, काढा २ गड्डा, गाभा, गाळीव सार (ल) अट्टल सोदा, चोर, लबाड 'हा लबाडाचा अर्क, चोराचा अर्क' तुल० इ आर्च [स अर्क, अर अरक्=रस, सत्त्वांश]

**अर्क**—स्त्री न कमान (भिंतीची, कोनाड्याची) [पोर्तु आर्च, इ आर्क ]

**अर्क**—पु. बालेकिल्ला 'यावरीन येथे किल्ले अर्कात तोफा पाचसात आहेत' –रा १ १८ [फा अर्क=बालेकिल्ला]

**अर्कट-कॉट**—वि अर्क बस्ताद लुच्चा, पगईत [अर अरक् इ आर्च]

**अर्कटी**—वि १ लबाड वस्ताद, हुशी अर्कट पहा २ अर्काटी, अरकाट पहा

**अर्कक्षेप**—पु उभा दावा, हाडवैर [अर्क+क्षेप]

**अर्कमंडळ**—न सूर्यमडळ [स अर्क=सूर्य+मडल]

**अर्कविवाह**—पु पुरुषाच्या तिसऱ्या लग्नाच्या वेळीं रुईशीं प्रथम विवाह करतात तो, कारण लग्नाची तिसरी बायको ही भाग्यशाली नसून लवकर मरते अशी समजूत [स अर्क=रुईचें झाड+विवाह]

**अर्कशी-अर्कस**—अरक्स पहा

**अर्कानी-दौलतानी**—अरकान पहा –इम २१६

**अर्कांश**—पु (ज्यो) ग्रहणाचा विस्तार दाखविण्याकरता सूर्याचे (व्यासाचे) १२ भाग करतात, त्यापैकीं प्रत्येक. [स ]

**अर्की**—स्त्री (काव्य) मदार, रुई [स अर्क]

**अर्कुलें-कूल**—न १ रकार किंवा रफार यद्दल्ची अर्ध्या रची अक्षराच्या डोक्यावर द्यावयाची (ˈ) खुण, रेफ २ इउ स्वराना दीर्घत्व देण्याकरिता दिलेलें चिन्ह (ˆ) 'अडव्या मात्रा त्याही नीट। अर्कुलीं वेलांटया।' –दा १९ १ ३ [?]

**अर्केंदुसंगम**—पु अमावस्या, आवस, सूर्य व चद्र याची युति, (सगम) या दिवशीं होते [स अर्क+इदु+सगम]

**अर्खंडें**—पु अव (वों) तांदुळाचे तुकडे, मोडलेल्या कण्या. [स अर्ध+खड-किंवा कण]

**अर्गजा**—अरगजा पहा

**अर्गट**—वि हेकेखोर, अरेट पहा

**अर्गडी**—अरगडी पहा

**अर्गल (करण)**—(नृत्य) उजवा पाय पाठीमागच्या बाजूस दोन ताल उचलून पसरणें, तसेंच उजवा हात पुढच्या बाजूस तितक्याच अतरावर पसरणें [स ]

**अर्गळ-ळा-ला**—स्त्री १ अडसर, अडणा, कडी, अगळ 'घेतली द्वाराची अर्गळा।' –कथा १ ७ ३३ २ शृखला, साखळी, बेडी, खोडा, पायबेडी, हातकडी ३ (ल) दाव, दमन, निग्रह, प्रतिरोध, अडकाठी, प्रतिबंध, नड, अटकाव (क्रि० घालणें) [स अर्गला]

**अर्गानर्गा**—पु वेडा, खोडमारा 'मोंगलाचा अर्गानर्गा केला आहे गग, वैरण, काडी, कुल बाद जाहली आहे' –पया २९. [फा नर्गा=वेढा द्वि ]

**अर्घ्य**—न १ ओंजळींत किंवा लहान पात्रात पाणी घेऊन त्यात गधाक्षता-फुलादि घालून देवादिकास, ब्राह्मणास पूजासमयीं जें अर्पण करतात तें 'मरूनिया पुष्पाजुळी। अर्घ्यु देवों॥' –ज्ञा १५ २ २ सध्यावदनादि कर्मांत सूर्यास उद्देशून जें ओंजळींतून उदक सोडतात तें –वि १ पूज्य, पूजनीय, दर्शनीय, सन्माननीय २ मूल्यवान [स ] ०**देणें**-वरप्रमाणें पाणी वगैरे देणें (ल) उदक सोडणें, नाश करणें, इजा करणें, सत्यनाश घडवून आणणें ०**घेणें**, ०**घेऊन उभा-तयार राहणें-असणें**-नाश करण्यासाठी तयार असणें, टपून बसणें

**अर्घ्या**—पु अर्घ्य देण्याच्या उपयोगाचें एक पात्र [स अर्घ्य]

**अर्चक**—वि पूजा करणारा, अर्चन करणारा [स अर्च्=पूजा करणें]

**अर्चणें, अर्चिणें**—सक्रि उपासना, सेवा, पूजा करणें, भजणें, स्तवन करणें 'देखे मातापितरें अर्चिजती।'—ज्ञा २ ३२ [स अर्च्=पूजा करणें]

**अर्चन**—न पूजा, अर्चा, उपासना, सेवा, वदन (देवाला किंवा ब्राह्मण, थोर लोक याना केलेलें) 'सर्वहि अर्चनें घडलीं हो।'—सप्र ८ ५४ [स] **०पात्र**—न देवपूजेच्या साहित्याचें भाडें, पूजापात्र **०पूजन**—न (व्यापक) पूजाअर्चा, उपासना, सेवा **०भक्ति**—स्त्री नवविधाभक्तीपैकीं पाचवी भक्ति [स]

**अर्चनीय, अर्च्य**—वि पूजनीय, वदनीय, वद्य [स]

**अर्चपट**—वि (ल) अचरट, बअक्की [आचरट अप]

**अर्चा**—स्त्री १ पूजा, अर्चन, उपासना २ मूर्तीची स्थापना, प्राणप्रतिष्ठा (नवीन बसविलेल्या मूर्तीची) किंवा पुन शुद्धि (विटाळल्यामुळें) करण्याचा विधि, अर्चाशुद्धि ३ स्तुति (वैदिक) ४ देवाची प्रतिमा —शास्त्रीकोश **०शुद्धि**—अर्चा अर्थ २ पहा देवाच्या मूर्तीस अपवित्रेचा स्पर्श झाला असता किंवा नवीन मूर्ति बसविताना होम वगैरे अनुष्ठानानें जी शुद्धि करतात ती [स]

**अर्चि**—स्त्री ज्वाला, दिव्याची ज्योत 'दीपकाची अर्ची।'—ज्ञा १३ ११२३ [स अर्चिस्]

**अर्चिक तान**—(सगीत) एकच स्वराची तान (सामगायनातील एक प्रकार) ह्यावरून पूर्वी ऋचा एकाच स्वरात म्हटल्या जात असाव्या [स ऋक्]

**अर्चित**—वि पूजित वदित, पूजिलेला [स]

**अर्चिरादि (मार्ग)**—पु १ ब्रह्मलोकाचा मार्ग ह्याला देवयान, उत्तरायण मार्ग असेंहि म्हणतात याच्या उलट धूमादि मार्ग या मार्गाच्या सर्व गोष्टी प्रकाशासवर्धीच आहेत उ० नित्य दिवस इत्यादीं सूर्याचे समीप गमन, चद्रबलाची वृद्धि इ० 'गातें अर्चिरा मार्गु म्हणिजे।'—ज्ञा ८ २२५ —गीर २९२ २ ज्योतिर्मार्ग ३ (ल) उत्तम मार्ग [स अर्चि+आदि+मार्ग]

**अर्च्य**—अर्चनीय पहा

**अर्च्या शुद्धि**—अर्चाशुद्धि पहा

**अर्ज**—पु जमिनीची रुदी विस्तार, क्षेत्रमापनातील रुदी **०काठी**—स्त्री जमीन मोजण्याची काठी —पया २९ **०मूज**—स्त्री रुंदी (जमीन मोजणींत) [अर अर्झ्]

**अर्ज**—पु १ विनति, प्रार्थना, निवेदन अभ्यर्थना, विज्ञप्तिपत्र २ फिर्याद दरखास्त ३ श्रुत माहज 'हे खबर श्रीमत खुदावंत न्यामत यास अर्ज होताच'—पया ४८० (क्रि० करणें, ठोठावणें, ठोकणें, सनविणें, बनविणें) [अर अर्झ्] **०दार**—पु विनति करणारा, याचक, दरखास्त देणारा, फिर्यादी [फा] **०दास्त**—स्त्री लेखी अर्ज, दरखास्त 'दामाजीपनाच्या नावें अर्जदास्त। लिहून खलेती मुद्रा केली।'—तुगा ४४३६ [फा दाश्त्] **०याव**—स्त्री तैनातीशिवाय कारणपरत्वें लग्न वगैरे कार्यप्रसगीं सरकारातून मिळालेली देणगी —ऐसुले ७३ [फा] **०बेग**—बेगी—पु अर्जदाराचा अर्ज हुजुरास—राजास एकविणारा (तोंडी किंवा लेखी) अधिकारी *'महाराजाचा भोळा अर्जबेगी'*—दावि [फा] **०मात**—स्त्री १ अर्ज २ अर्जदार 'सर्व अर्जमात आले भेटी।'—सप्र ? ९६ [फा] **०विनंति**—स्त्री अर्ज पहा

**अर्जक**—वि मिळविणारा, सपादन करणारा [स अर्ज्=मिळविणें]

**अर्जंट**—वि जरुरीचा, तातडीचा [इ] **०तार**—स्त्री तातडीची तार, निकडीचा सदेश, एक्सप्रेस तार

**अर्जणें, अर्जिणें**—क्रि सपादन करणें, मिळविणें, प्राप्त करून घेणें 'जरी बहुता जन्मीं बहुतें। अर्जिलें सुकृतें।'—रासप १ ७८४ 'अर्जिलें तें भावें जीवीं धरू'।—तुगा ७८३ [स अर्ज्]

**अर्जणें—अर्जिणें**—अर्ज करणें, विनति करणें 'अर्जिती आम्हा बीजे पावन।'—दावि ४११ [फा अर्झ्]

**अर्जन**—न. **अर्जना**—स्त्री मिळवणूक, संपादन, प्राप्ति, सपादणी, सामाशब्द—द्रव्यार्जन, विद्यार्जन [सं अर्ज्]

**अर्जमंद**—वि उत्कठित, उत्सुक [फा आर्झुदन=इच्छाकरणें —आर्झुमद]

**अर्जल**—वि अप्रसिद्ध, गैरनामी, किरकोळ 'सत्तावीस सरदार नामी मारिले, दीडशें सरदार अजल जखमी केला'—जोरा ९० [अर अर्जल्=अप्रसिद्ध]

**अर्जल**—अरजल पहा

**अर्जव**—आर्जव पहा

**अर्जानी**—वि हस्तगत, प्राप्त, ताब्यांत असलेलें 'हाली सादे बासी मुकासा अर्जानी जाला आहे'—इम ४८ [फा अर्झानी =प्राप्त तुल स अर्ज्]

**अर्जित**—वि मिळविलेलें, सपादिलेलें [स अर्ज्]

**अर्जी**—स्त्री अर्ज पहा **०इनाम**—न सरकारास नजराणा देवून घेतलेलें ईनाम —भाइअह १८३२ **०इल्तमास**—स्त्री विनति 'नवाब व राजेबहादर यास माघारे फिरल्यावरी अर्जी इल्तमास लिहावी कीं'—ख २ ४७९ [फा अर्झ्+इल्तिमास] **०मर्जी**—स्त्री स्नेह मैत्री 'अर्जीमर्जीमध्यें विकल्प उडवा।'—पल १६४ [फा]

**अर्जुन**—पु पाच पांडवांपैकीं तिसरा, पार्थ २ सहस्रार्जुन कार्तवीर्य ३ अर्जुनसादडा—साताडा पाढरा ऐन याचा पाढरा हीक औषधी आहे हें झाड कोंकणात होतें याच्या सालींचा उपयोग

कालडे कमाविण्यास व औषधास होतो पानें वीतभर लाव, फुलें पाढरी साल पाढरी, लाकूड हरकामास उपयोगी असून पहा –वि पाटरा, श्वेत [ स ] ०वाद्य–न चौंव, शखध्वनि, अर्जुनाचें दुसरें नाव फाल्गुन यावरून फाल्गुनातील वाद्यम्हणने चौंव 'अर्जुन वाचें केलीं' –ख १९३० ०रुख–पु एक झाड, अर्जुनसादडा, अर्जुन(अर्थ २) पहा 'जै अर्जुनाचें रुख मोडिलें।'–दाव ३३६ [स अर्जुन+वृक्ष]

**अर्णव**—पु समुद्र, सागर सामाशब्द–शोकार्णव, मोहार्णव, दु खार्णव 'मग मोहार्णवगवाक्षें। रिघोनि टेला।'–ज्ञा ११ ६१ [स]

**अर्त(र्त्त)णें**—अकि अत्यत उत्सुक्तेनें, उतावळेपणानें अधीर, व्याकूळ होणें, पीडित होणें [स आर्त]

**अर्ता-र्ति**—क्रिवि अलीकडे 'तया अर्ता पर्ता नाहीं पाहीं।' –दावि ३५ 'म्हणे राम बीभीषणा बैस अर्ता।'–राक ११७ 'माया अर्ति पार ब्रह्मास नाहीं।'–दा ६ ५ १० अरता पहा [स आर=सान्निध्य+तस्]

**अर्ता-र्ति**—स्त्री आवड, इच्छा, आशा 'माझे मनीं असे जे अर्ता पुरवावी ते देवराया।'–गुच ५ १८ [स आर्ति]

**अर्ताग**—न (गो) अर्धे ताग, अदताग–आठ रेसाचें ताम्याचें नाणें [स अर्ध+टक]

**अर्ती**—स्त्री अपेक्षा, आवड, इच्छा, उत्कठा 'अर्तीन जातो ते सर्तीन जायना' = प्रेमानें होतें तें स्पर्धेनें होत नाहीं [स आर्ति]

**अर्तु**—पु दु खी, रोगी, पीडिलेला [स आर्त]

**अर्थ**—पु १ अभिप्राय, भाव, भावार्थ, तात्पर्य, काम, हेतु कारण 'हे आणिकाही एका अर्था। उपकारे।'–ज्ञा ३ १५३ [स अर्थ्=मागणें] २ मतलब, आशय, उद्दिष्ट, इंगित, उद्देश, हेतु ध्येय 'मग ते तुम्हा ईप्सिता अर्थातें देती –ज्ञा ३ ९५' 'यास्तव शोधिसि कीं हतफळ झाले अर्थ जे मनामधिले।'–मोकर्ण ११० ३ द्रव्य, लाभ, मालमत्ता, धन 'अर्थे प्राण देता न सोडी सर्वया।' –तुगा १३० 'जयापासोनि होय अर्थप्राप्ति। ते समर्थ शिष्य आव डती।'–एभा २३ २३३ ४ मिळविण्याची किंवा साध्य वस्तु सपादनीय गोष्ट–विषय–ध्येय ५ धर्म, अर्थ, काम मोक्ष या चार पुरु षार्थांपैकीं दुसरा, कीर्ति, सत्ता व सपत्ति यापासून मिळणारें सुख ६ द्रव्य, जड पदार्थ, वस्तु सत्पदार्थ, निर्माण केलेला निरनिराळ्या (व्यापक अर्थानें) अस्तित्व किंवा सबध, इंद्रियाचा विषय तैसें भारती गुरवाडलें। अर्थजात॥'–ज्ञा १ ४० 'तैसेंचि तया सगती। इंद्रियें आपलाला अर्थी वर्तती।'–ज्ञा १५ ३७४ 'तृण जळ नाना अर्थ। तेही परार्थं धरीतसे।'–एभा ७ ३७९ ७ फळ, निष्पत्ति परिणाम, बनाव, (ल) प्रसग 'अर्थ तसा आलाहे का, जी मधुसूदना कपाळाल।'–मोभीष्म ९ ५८ ८ इच्छा, आकाक्षा, अपेक्षा ९ दम, दम, जोर सत्त्व, दलील 'ह्या देशात आता कांहीं अर्थ राहिला नाहीं' १० (समासात) आशय भावार्थ याअर्थी विद्वानाचें सभाषण, चर्चा यानून नेहमीं उपयोग करतात जसें –लक्ष्यार्थ, वाच्यार्थ, व्यग्यार्थ ११ (समासात) सार्टी, स्तव, करिता म्हणून, इ० हेतुदर्शक अर्थानें जसें –शीतनिवारणार्थ, उदर पोषणार्थ, देवतार्चनार्थ, दानार्थ 'कामसुख कामिनीमेळीं। सुखार्थ स्त्रियेतें प्रतिपाळी।'–एभा २३ ४२७ १२ जरकरितां, तरकरिता, (त्या) सार्टी, (ज्या) पक्षीं–पेक्षा, (त्या) पक्षीं–पेक्षा या अर्थी जसें –ज्याअर्थी तुम्ही मागता त्याअर्थी दिलें पाहिजे कोणत्याहि अर्थानें तुमचें व्हावें=कोणत्याहि प्रकारानें किंवा तऱ्हेनें किंवा कर्मेहि करून कोणत्याहि स्थितींत तुमचें व्हावें १३ (कायदा) दावा, वाद, फिर्याद, मिसल, विवादाचा विषय १४ करावयाची–मन जावयाची–विश्वासावयाची–वगैरे कोणतीहि किंवा कोणत्याहि प्रकारची गोष्ट, धाव 'एव इया आघवेया। अर्थरूप करावया। विषो एथ चौदाविया अध्यायासी।'–ज्ञा १४ ३७ 'दोहींतूनएक अर्थ करावा' –भाव ८ 'बाल्हा जाहाला सद्गदित। म्हणे कैसा अर्थ करू आता॥' १५ काळजी, आस्था, गरज, हितसबधाची जाणीव 'सर्वास सर्वांचा अर्थ असावा' १६ (व्या) कर्त्याचा क्रियाविषयक हेतु, १ स्वार्थ, २ आज्ञार्थ, ३ विध्यर्थ ४ सकेतार्थ ५ सशयार्थ १७ (ल) ब्रह्म 'जेंहीं शोधून पाहिला। त्यासी अर्थ सापडला। येरां असोनि अलभ्य जाला। जन्मोजन्मीं।' –दा १ ९ १२ १८ (ल) स्वत ची सत्ता, स्त्री 'आपुलें अर्थ दुसऱ्यापाशीं। आणि दुसऱ्याचें अभिलाषी।'–दा २ १ ६१ १९ बोल, दोष 'या प्रकरणात आपल्याकडे काहीं अर्थ नाहीं'–शिवदि २७७ २० (समासात) प्रभाव, सामर्थ्य, जोर, कारण, अवलबन, 'जन्मगति वळार्थे। धर्मार्चनि।'–ज्ञा १६ ४६४ [स अर्थ] ०फावणें–क्रि सापडणें, मिळणें, सगति लागणें 'एव सर्व शब्दाचा अर्थ फावे।' –यथादी ११ ५४५ म्ह० १ अर्थ वा साधयेत देह वा पातयेत्= यश मिळवावें किंवा मरावें २ अर्थाचे तुकडे भागवताच्या चिंध्या= ओढून ताणून केलेलें विवरण किंवा टीका, भलताच, काहींतरी अनुवाद **अर्थाला मरणें**=स्वत च्या फायद्यासाठीं धडपडणें किंवा अति उतावीळ असणें **अर्थणें**–उक्रि मागणें, याचना करणें, विनति करणें विनवणी करणें, प्रार्थना करणें 'अर्थी आल्या अर्थावयासी। विमुख न व्हावें सर्वस्वेंसी।'–एभा ७ ४०५ ०अपुर्वाय–स्त्री (गो) लाड, कोड कौतुक अपुर्वाय पहा 'त्याची अ० वरी चालते' ०गम्य–न अर्थाचें ज्ञान, अर्थबोध 'हा मुलगा श्लोक लावितो परतु त्यास अर्थगम्य नाहीं' [स अर्थ+गम्] ०गौरव–न अर्थाचा भारदस्तपणा 'वक्त्याचें वाग्मित्व सुदृढ अत्यत। अर्थ गौरव मुख्य लसत्प्रीत।'[स] ०ग्रह–पु अर्थ जाणणें, समजणें, स्वीकारणें, अर्थबोध होणें, ग्रहणशक्ति ०दर्शक–वि अर्थ दाखविणारें,

किमती दाखविणारें उ० अर्थदर्शक परिमाणें ( किंमती दाखविणारी, रुपये, आणे, पै ) –छत्रे भग ६८ ०दास–वि द्रव्याची अति हाव बाळगणारा, कवडीचुंबक, पैशासाठीं धडपडणारा, पैशासाठीं वाटेल तें करील असा ०बुद्धि–स्त्री. १ गरज, इच्छा, अपेक्षा २ आस्था, कळकळ, हितबुद्धि, पोटाग ०भेद–पु अर्थांतील फरक 'ना कांहीं आथी अर्थभेदु । तो देव करोतु विशदु ।'–ज्ञा १८ ८९ ०वाद–पु १ अतिशयोक्तिपूर्वक स्तुति किंवा निंदा, अति प्रशंसा, अति निंदा, अतिशयोक्तीचें वर्णन 'का हा अर्थवादु म्हणती । वाचा ळपणें ॥'–ज्ञा ३ १९५ २ (काव्य) स्पष्टीकरणार्थ करण्यात येणारा युक्तिवाद, फलश्रुति, अर्थगौरव, कविलाघव, काल्पनिक मंडन 'वेदींच्या अर्थवादागरिसा । मनीं बांधोनि भोगाशा । यज्ञमिषें पशु हिंसा । भोगलिप्सा करू धावती ॥'–एभा ५ २६१ ३ मिथ्या कल्पना, काल्पनिक स्पष्टीकरण, ऊहापोह, युक्तीची रामकृत 'चिंचु दरी मांजराची मावशी म्हणून तिला मांजर खात नाहीं, हा उगीच अर्थवाद, वस्तुत पाहिलें असता घाण येते म्हणून खात नाहीं ' ४ ( ल ) ( मीमांसा ) आगंतुक विधान –गीर २८५ ५ अर्थासंबंधीं वाद–चर्चा, वादविवाद –टि ४ ६३ ०शास्त्र–न १ संपत्तीचें उत्पा दन व व्यय यांचें विवेचन ज्यांत केलें आहे तें शास्त्र (इं इकॉनॉ मिक्स ) 'पण त्या घडवून आणण्याचे खरे उपाय आमचे वृथा देशा भिमानी गांवठळ अर्थशास्त्री सांगतात ते नव्हत ' –आगर ३ ९७ २ ऐहिक सुखांसंबंधीं लौकिक व्यवहारशास्त्र (धर्मशास्त्राच्या उलट) 'अर्थशास्त्राहून धर्मशास्त्र बलाढ्य ' ३ राज्यव्यवहारशास्त्र, राज नीति–शासनशास्त्र उ० कौटिलीय अर्थशास्त्र ४ दंडनीति ( याच्या उलट आन्वीक्षिकी ) दंडनीति पहा ०समर्थता–स्त्री मनांतील आशय स्पष्ट करण्याची कुवत या भाषेला इतकी भ० आलेली आहे कीं कोणत्याहि विषयावर हिच्या द्वारा शिक्षण देता येईल ' ०सिद्ध–वि १ अर्थात् सिद्ध गर्भित, ध्वनित, अध्याहृत २ सिद्धार्थ ज्याचा हेतु तडीस गेला आहे असा

**अर्थत** —क्रिवि १ अर्थाप्रमाणें, अभिप्रायाप्रमाणें, भावार्था प्रमाणें, २ अलबत् अर्थात् खात्रीनें, जरूर [ स ]

**अर्थना**—स्त्री याचना विनति, मागणी, अभ्यर्थना, प्रार्थना 'हेंचि होऊनि प्रार्थना । मीचि माझ्या अर्थी अर्जुना ।' –ज्ञा १८ ११२० [ स अर्थ् ]

**अर्थविणें**—सक्रि अर्थ करणें, अर्थ सांगणें, प्रतीति सांगणें 'यथार्थ पूर्ण अर्थवी ।' –एभा २ ७९३ [ स अर्थ् ]

**अर्थाअर्थी**—क्रिवि कोणत्याहि मार्गानें–रीतीनें–पद्धतीनें कांहीं एक अर्थानें–करारानें–कांहींएक संबंध नसताना, किमपि, यत्किंचि तहि ( नकारार्थी प्रयोग ) 'तुमचा खटला तुटला, आतां त्याचा व तुमचा अ० संबंध नाहीं ' [ स अर्थ ]

**अर्थागळें**—वि अतिप्रचुर, गाढ. अन्वर्थक, ज्यापासून कांहीं बोध होईल असें, सुबोध 'कवित्व अगाधें अर्थागळें ।' –दा १४ ३ ३७ [ अर्थ+आगळें ]

**अर्थात्**—क्रिवि १ कारणामुळें, कारणास्तव, अवश्य परिण मानें ओघानें, साहजिकच, आपोआप 'कत्रधुनें असतां अर्थात मळ जाईलच ' २ वस्तुत वास्तविक, परिणामीं, अंतीं, फल दृष्टीनें पाहता [ स अर्थ पंचमी विभक्ति ]

**अर्थांतरन्यास, अर्थांतरोपन्यास**—पु १ एक अर्थालंकार, यांत सामान्य आणि विशेष अशा दोन्ही गोष्टींचें अर्थाच्या साध र्म्यावरून अथवा वैधर्म्यावरून एकाच वेळीं कथन असतें एखादी विशेष गोष्ट सांगून तिचें समर्थन एखादी सामान्य गोष्ट सांगून केलेलें असतें किंवा सामान्य गोष्ट सांगून तिचें समर्थन विशेष गोष्टीनें केलेलें असतें याचे चार प्रकार आहेत १ साधर्म्यावरून सामान्याचें विशे षानें समर्थन २ साधर्म्यावरून विशेषाचें सामान्यानें समर्थन ३ वैधर्म्यावरून सामान्याचें विशेषानें समर्थन ४ वैधर्म्यावरून विशेषाचें सामान्यानें समर्थन उ० 'तदितर राग भेणें वेगळाले पळाले । उप वनाल्वेरी जे कराया मिळाले । स्वजन गवसला जो त्याजपाशीं नसे तो । कठिण समय येता कोण कामास येतो ।'–नल ४४. २ सामान्य गोष्ट–सिद्धांत सांगणें उ० 'तुम्ही मनावर घेतलेंत तर होईल, कां कि थोरास काय अवघड आहे.' [ स अर्थ+अंतर+न्यास ]

**अर्थानुसंधान**—पु मागील विधानाचा व पुढील विधानाचा अर्थांच्या दृष्टीनें समन्वय, अर्थसंदर्भ, पूर्वापर संबंध, किंवा धागा ( क्रि० राखणें, ठेवणें ) [ स अर्थ+अनुसंधान ]

**अर्थान्वय**—पु अर्थांचा संबंध, अर्थाविषयीं धोरण, संदर्भ, संबंध, वाक्यांमधील शब्दांच्या अर्थांतील एकसूत्रीपणा [ सं ]

**अर्थापत्ति**—स्त्री १ स्पष्ट न केलेलें परंतु गर्भितपणें किंवा ध्वनित करून समाविष्ट केलेलें अनुमान, गर्भितार्थ २ अनुमान किंवा तर्क करणें, बांधणें, अनुमानसिद्धांत, कल्पना, तर्क, अटकळ, आनु षंगिक सिद्ध गोष्ट 'अर्थापत्ति उपमान । इतिहास परिशेषादि प्रमाण । तयांसिहि स्वतंत्र करण । प्रमाण तो बोलेल ॥' ३ एक अर्थालंकार. यांत प्रस्तावित अर्थावरून गर्भित अर्थाची व गर्भित अर्थावरून प्रस्तावित अर्थाची उपस्थिति होते उ० दंडापूपन्याय, कैमुतिक न्याय 'बृहस्पती शशी दैत्यगुरू तिघे तेजहीन तेजीं बुडले । इतर तार तर एहान केवळ मग दिसतिल कोणीकडले ।'–प्रल २४. 'काळहिवळें कितीहा न तृणनळें वन्हि होय बध्द रणीं ।' –मोआदि ३० २४ ४ प्रत्यक्षादि जीं सहा प्रमाणें (म्हणजे प्रत्यक्ष, अनुमान, उपमान शब्द, अनुपलब्धि, अर्थापत्ति) त्यांतील एक प्रमाण उ० 'देव दत्त दिवसा न जेवतां धष्टपुष्ट आहे–त्याअर्थी रात्रीं जेवतो ' [ स ]

**अर्थाभास**—पु. अर्थाचा आभास, अर्थसादृश्य, चुकीची विचार सरणी [ स ]

**अर्थार्थी**—वि. १ धनाची इच्छा करणारा; द्रव्येच्छु 'जिज्ञा अर्थार्थी जाणिजे । ज्ञानिया चौथा ॥ '–ज्ञा ७.१०९. २ प्रर्हिषपर चार प्रकारच्या भक्तांतील पहिला; सकाम भक्त [सं.]

**अर्थार्थी**—अर्थाअर्थी पहा.

**अर्थालंकार**—पु अर्थाच्या योगाने काव्यास शोभा आणणारा, अलंकार. (उपमा रूपक इत्यादि) 'याच्या उलट शब्दालंकार. [सं.]

**अर्थिक**—वि. १ याचक. २ उपयोगी पडणारा; सेवक. 'कोण कोणा अर्थिकु । कोण जाणे ॥ ' –ज्ञा १८.१५१७. [सं.]

**अर्थिल**—वि.जरूरी असलेला, गरजू, आस्थेवाईक. [सं. अर्थिन्] –**लें ठिकाण**–न. गरजू ठिकाण, स्थळ; जेथें जरूरी आहे असें स्थळ.'अर्थिलें ठिकाण पाहून मुलगी द्यावी, माजोऱ्यास देऊं नये.' [सं. अर्थ]

**अर्थी**—वि. १ अर्ज, याचना, विनंति करणारा; प्रार्थना करणारा. 'अर्थी आल्या अर्थायथायी । विमुख न व्हावें सर्वस्वेंसीं ।' –एभा ७.४०५. २ (समासांत) इच्छिणारा, आकांक्षा असणारा; गरजू. उ० विद्यार्थी, पुत्रार्थी, मोक्षार्थी, धनार्थी. ३ द्रव्यवान. [सं. अर्थिन्]

**अर्थीप्रत्यर्थी**—वि. परस्परापेक्ष; परस्परांवर अवलंबून असणारा; एकमेकांची गरज लागणारा. 'या प्रकरणीं त्यांचा आमचा थोडासा अर्थीप्रत्यर्थी संबंध आला आहे ' –टि ४.६६. [सं.]

**अर्थे**—क्रिवि. करतां, साठीं. अर्थ पहा.

**अर्थेला**—अर्थिल पहा.

**अर्देखाप**—न.(गो.) प्रत्येक फळीला अर्धी खांच घेऊन फळ्या जोडण्याचा साधा प्रकार. [अर्ध+खाप]

**अर्देमापटें**—वि. (गो.) अर्धे मापटें; एक माप; पावशेर [सं. अर्ध+मा; मापटें]

**अर्दास**—अर्जदास्त पहा.

**अर्दितवायु**—पु तोंडाचा पक्षघात, पक्षवायु, अर्धांगवायु [सं.]

**अर्दी**—स्त्री. १ पै. २ (गो.) १३ पैसे १ पै किंमतीचें नाणें [अर्धी]

**अर्दुक**—न. (कु.) अर्धाभाग, नारळाचा अर्धा भाग. [सं अर्ध]

**अर्दुवटो**—वि. (गो.) अपुरें; अर्धवट [सं. अर्धवृत्]

**अर्दो**—वि. (गो.) अर्धा. [सं अर्ध]

**अर्ध**—न. १ एका पदार्थाचे जे दोन सम विभाग ते प्रत्येकीं, निम्मा तुकडा, अर्धा भाग २ (समासांत) अर्धा, निम्मा उ० अर्धकोस, अर्धघटिका इ. [सं] ०**कच्चा**–वि १ अर्धामुर्धा पिकलेला, तयार झालेला किंवा शिजलेला (फळ, धान्य, विद्या, अन्न), अर्धामुर्धा, अपूर्ण; अपुरा. २ पुरें शेवटास न जातां अर्धवट राहिलेलें (काम). ०**कंदरा**–पु. लगामाचा प्रकार –अश्वप १८५ [सं. अर्ध+कंधरा] ०**कामी**—वि. अर्धवच्ची. 'एक अर्धकामी सुटे।'–एरुस्व १४.१०६. ०**कोर**–स्त्री. अर्धा चतकोर; (गो.) नितकोर (भाकर). ०**घडाड**–पुन. एक शुभ मुहूर्त, परंतु घडाडीपेक्षा कमी महत्त्वाचा. घडाड पहा. ०**चंद्र**–पु.१ वद्य किंवा शुद्ध अष्टमीचा चंद्र; अर्धा चंद्र. २ अर्ध चंद्राच्या आकारासारखी वस्तु. ३ (गचांडी देतांना हाताचा आकार अर्धचंद्रासारखा होतो म्हणून;) हकालपट्टी. 'या आठ मीच्या चंद्राच्या मुखांवर मराठि अर्धचंद्र मिळाला.'–मूकनायक. 'आणि म्हणे भृत्यजना । यासी अर्धचंद्राची द्यावी दक्षिणा । देशावाहेरी या ब्राह्मणा । घाला वहिले ॥ ' –कथा ५.११.७१. (हा प्रयोग मूळ संस्कृतांतच आहे.) (क्रि० देणें, मारणें, मिळणें, इ०). ४ (नृत्य) हाताचीं चार बोटें एकमेकांस लागून ताठ ठेवणें व आंगठा दूर पसरून ठेवणें. ५ अर्धचंद्राकृति (फाळाचा) बाण. ०**चंद्री, तंद्री**–स्त्री. अर्धवट झोंप, मूर्च्छा. 'बाण भेदिला जिव्हारीं । हिरुय पडिला धरणीवरी । डोळां लागली अर्धचंद्री । जैसी खेचरी योगिया ।' –एरुस्व ९.३२. [सं अर्ध+तंद्रा]. ०**चरतीय, जरतीय**–वि. अर्धे किंवा अर्धवट काम; अनिश्चित स्वरूपाचें काम; मोघम किंवा अनिश्चित भाषण. 'येतो म्हण किंवा नाहीं म्हण उगीच अर्धचरतीय सांगूं नको.' [सं. अर्ध+जरा–जरित किंवा जर्जरित; अर्ध+चरित]. ०**जेवा**–वि.अर्धवट जेवलेला; अर्ध्या जेवणांतून उठलेला; अर्धपोटीं. [अर्ध+जिम्]. ०**देशी कापड**–न. विदेशी सुताचें, हिंदुस्थानांत विणलेलें कापड. ०**धणी**–वि. अर्धतृप्त; अर्धपोटी. 'भलें करीं परी अर्धधणी । तुटीं कदा ।' –ज्ञा १६.३०. ०**नार**–स्त्री. स्त्रीजातीतील पंढ; पंढा; अर्धवट स्त्री; स्त्रीधर्मापैकीं कांहीं बाबतींत उणीव असलेली स्त्री. [सं. अर्ध+नारी]. ०**नारीनटेश्वर**–पु १ अर्धे आपलें (पुरुषाचें) व अर्धे पार्वतीचें (स्त्रीचें) असें शंकराचें रूप, अर्धनारीश्वर; शिवशक्ति. मोहिनीराज हें विष्णूचें रूप (यांत अर्धा विष्णु व अर्धी अमृतकलश घेतलेली मोहिनी असें अर्धनारीश्वर स्वरूप असतें नेवासें येथें असा देव आहे). २ अर्धा पुरुष व अर्धी स्त्री एकत्र 'अर्धनारीनटेश्वरी । जो पुरुष तोचि नारी ।' –ज्ञा ९ २५०, –एभा ११ ३६९. ३ प्रकृतिपुरुष; शिवशक्ति 'प्रकृतिपुरुष शिवशक्ति । अर्धनारीनटेश्वर म्हणती ।' –दा १० ३.१० ०**नारीश्वर**–अर्धनारीनटेश्वर पहा. ०**निकुट्टक**–(अंगहार) –पु (नृत्य) उजवा पाय नूपुर करून मग तीचारी सोडून भराभर आक्षिप्तचारी त्याच पायानें करणें नंतर दोन्ही हात फेंकून निकु वळविणें व शेवटीं निकुट्टक व करिहिस्त हीं करणें. ०**निकुट्टित** (करण)–न (नृत्य) खांदा आकुंचित करून त्यावर त्या बाजूचा हात ठेवून बोटें हलु हलु ठोकणें व दुसरा हात आपल्या तोंडासमोर बोटें करून ठेवणें. उजवा पाय कुट्टित करणें व डावा पाय स्तब्ध ठेवणें. ०**पड–डा**–वि. अर्धवट पडलेलें–केलेलें–वाजावलेलें–म्हटलेलें, अपुरें साधलेलें, वाजवलेलें; वरवरकरणीपणानें केलेलें.

(साना) अपुरें, वरवर, सरासरी [अर्ध+पडणें] ०पद्मासन–न डाव्या पायाची मांडी मोडून वसणें व उजवा पाय मोडून डाव्या पायावर ठेवणें ०पक्षकीटक–पु (प्राणी) एक कीटक वर्ग यातील किड्याचे पुढील अर्धे पंख शृंगी द्रव्यानें कठिण झालेले असतात म्हणून यास हें नाव आहे –प्राणिमो १०३ ०पिका–वि अर्धवट पिकलेला (फळ वगैरे) [अर्ध+पिकणें] ०पुडी–वि अर्धवट, अल्पायुषी (अर्धे झोपेंत जातें म्हणून) 'थोडें जिणें अर्धपुडी काया। गर्व करिती रडाया।' –दा १८५३५ [स अर्ध+पुट ?] ०पोटीं–क्रिवि अर्धेच पोट भरलें असता, पूर्ण न जेवता, भूक पुरी न भागता (क्रि० जेवणें, जाणें, असणें, उठणें, राहणें) ०फोड–अर्धवट फोडलेली लाकडें, ठोकळे (सुरूड) बांबू उभा चिरून केलेले दोन भाग ०बाट–गा–वि १ अर्धवट संस्कार झालेला (वाटण्याचा–कुटण्याचा–शिजण्याचा इ०), अर्धवट बन विलेला, अर्धवोबडा २ अर्धवट भ्रष्ट झालेला, बाटलेला, जातींतून अर्धवट बाहेर पडलेला, वाळींत टाकलेला ३ ज्याचा बाप एका जातीचा व आई दुसऱ्या जातीची आहे असा ४ अर्धवट किंवा वरवर ज्याला माहिती–परिचय आहे असा ५ (ल) अर्धवट शिकलेला (विद्यार्थी, कारागीर, पंडित इ०) कडेचा पोहणारा, ०भतल्या –क्रिवि अर्धमुखें करून, अपुरेपणानें, उणेपणानें [अर्ध+भ्रष्ट–बाद] ०बारे पाऊण मराठे–न १ सकर, पचमिसळ, खिचडी, धेडगुजरी (भाषा, काम, पदार्थ), बारभाई, बजबजपुरी २ (ल) उच्छृंखलपणाची वागणूक–आचार ०बिंब–न १ अर्ध वर्तुळ आणि त्यावरील बिंब २ (ल) ओंकाराची–प्रणवाची अर्ध मात्रा 'अव मात्रात्रय भावळे। अर्धबिंबीं।' –ज्ञा ८ ११५ ०बुकट–बुकट–वि (राजापुरी) अर्धवट पहा [अर्ध+बुकटी] ०बोबडा–वि १ अर्धवट कुटलेलें–चेचलेलें–वाटलेलें (मिर वगैरे) २ शिजताना अर्धवट राहिलेला–(भात–डाळ इ० पदार्थ), मऊ न झालेला, चोटचेपा ३ (ल) कसें तरी ओबडधोबडपणें केलेलें काम, बिगारी–वठ काम ०भरपोशाख–पु भर पोशाखातील फक्त काहीं विशिष्ट वस्तुयुक्त मामुली पोशाख –बडोदें खानगी खातें नियम नोकर पोशाख पा ३ ०मत्तल्लि(करण)–न (नृत्य) पाय अडखळल्यासारखें करून मागें टाकणें, डावा हात रेचित करणें व उजवा हात कमरवर ठेवणें ०मत्स्येंद्रासन–न योगासनांतील एक प्रकार –सपूर्ण योगशास्त्र पा ३२५ ०मागधी–स्त्री एक प्राकृत भाषा जैन धार्मिक ग्रंथ या भाषेत लिहिले आहेत हिलाच भारतीय वैय्याकरण आर्षभाषा म्हणत शौरसेनी व मागधी भाषा प्रदेशाच्यामध्यें अर्धमागधीभाषाप्रदेश होता (म्हणजे हल्लींचा प्रदेश अयोध्या) त्याच्या दक्षिणेकडील मराठी भाषा काहीं अर्शी या भाषेवरून बनली आहे प्रचारकाल खि पू ४ थ्या शतकाचा शेवट –ज्ञाको अ ४७५ ०माडणी–स्त्री अर्धी माडणी पहा ०मात्रा–स्त्री १ ओंकारातील अर्धी मात्रा. 'अर्धमात्रापर तें न सापडे।' –परमा २ १३ २ एका वेळीं घ्यावयाच्या औषधाच्या प्रमाणाच्या अर्ध्या इतकें 'अर्धमात्रा रस देऊनिया जीव। रोग दूरी सर्व करिताती।' –ब २२२१, ३ (ल) औषध, रसायनगुटिका 'पचगव्य तेंचि जाण अर्धमात्रा।' –ब १०४५ ४ किंचित्, थोडें 'हे कृष्णकथा अलौकिक। महादोषासी दाहक। भवरोगासी छेदक। अर्धमात्रा सेविलीया।' –एरुस्व १८ ७५ ५ व्यंजन, अर्धस्वर ६ संगीतात स्वर घेताना घेतलेली विश्रांति, एका मात्रेचा अर्धा काल ०मुकुल(दृष्टि)–स्त्री (नृत्य) अर्धवट डोळा उघडणें, पापण्याचे केंस एकमेकास लागतील इतके जवळ आणणें आल्हादकारक सुगंध, सुखस्पर्श ह्या गोष्टी ह्या अभिनय दर्शवितो [स मुकुल=किंचित् उमललेली कळी] ०मेला–वि १ अर्धवट मेलेला, थोडासा जिवंत राहिलेला २ जर्जर, मृतप्राय, व्याकुळ 'ती भुकेनें अर्धमेली झाली आहे' –पाव्ह २३ ०रथी–वि (रथात बसून) एका रथ्यासह वर्तमानहि युद्ध करता येत नाहीं तो रथीहून अल्पबळी (ल) कचा योद्धा 'अतिरथ नव्हे रथ नव्हे हा (कर्ण) केवळ अर्धरथचि अविदग्ध।' –मोउद्योग १२ ५८ [स] ०रात्र–स्त्री मध्यरात्र ०रेचित(करण)–न (नृत्य) उजवा हात तोंडासमोर नेऊन डोक्या वर उचलून धरणें व उजव्या पायाकडील भाग किंचित् वाकवून तो सूची करून जमिनीवर हलु हलु आपटणें [स] ०रेचित(संयुक्त हस्त)–पु (नृत्य) डावा हात चतुर व उजवा हात रेचित करणें [स] ०लंड–मर्धलंड–पु अघलड, अधलडमधलड पहा ०वट–क्रिवि १ अर्धेपणानें, अपुरेपणानें, उणीव असलेल्या रीतीनें, वरवर, वरवरणी मोघमपणें 'काम पुरतें करावें, अर्ध वट ठेवू नये' [स अर्ध+वत्] २ अध्यांत, मध्यभागीं, दोन्ही टोकांच्या मध्यें –वि १ अधलामधला, अपुरा, २ (ल) वेडा, अप्रबुद्ध, कमी समजूत असलेला 'हा पुरता वेडा नव्हे पुरता शाहणा नव्हे अर्धवट आहे' ३ अर्ध वय झालेला, तरणा नव्हे 'आम्ही म्हैस घेतली ती तरणी नाहीं, अर्धवट आहे' ०वर्तुल–ळ–न (गणित) अर्ध वर्तुळ, वर्तुळाचा निम्मा भाग, व्यास आणि त्यानें कापलेला परिघाचा भाग यांच्यामध्यें जो वर्तु ळाचा भाग सापडतो तो –महमा ६ (इ) सेमि–सर्कल –विराम–पु १ अर्धी विश्रांति, पूर्ण विरामापेक्षा कमी थांबण्याची जागा २ ती दर्शविण्याचें चिन्ह ०वेडा–वि वेडसर, मूर्ख, अर्धवट ०शिजा–वि अर्धवट शिजलेला, पुरता न शिजलेला (भात वगैरे) ०शिशी–स्त्री अर्धे कपाळ दुखण्याचा रोग, यात अर्ध्या मस्तकाकडील मानेचा भाग, भुवई, आख, कान, डोळा व अर्धे कपाळ–या ठिकाणीं तर वारीच्या आघातासारखें दुःख होतें यावर गोकर्णाचें मूळ व फळ पाण्यांत वाटून त्याचें नस्य करावें अथवा मूळ कानात बाधावें [स अर्ध+शीर्ष] ०सम(वृत्त)–न ज्यात दोन दोन उ० पहिला आणि

तिसरा व दुसरा आणि चौथा हे चरण सारखे असतात तें वृत्त. उ० पुष्पिताग्रा; हरिणीप्लुता; वियोगिनी, अपरवक्त्रा. [ सं. ]. ०सूची (करण)–न. (नृत्य) उजवा पाय सूची करून उजवा हात अपवद्ध करणें व डोक्याच्या वरच्या बाजूस नेऊन ठेवणें. ०स्थित(स्वर)–पु (संगीत) द्वयर्ध आणि द्विगुण या स्वरांमधील म्हणजे पांचवा, सहावा व सातवा हे स्वर. ०स्वस्तिक(करण)–(नृत्य) पु पाय स्वस्तिक ठेवून उजवा हात कमरेवर व डावा हात वक्ष:स्थळावर ठेवणें. ०स्वर–पु. य्,व्, र्,ल्, हीं व्यंजनें स्वरांबद्दल योजितात म्हणून त्यांस अर्धस्वर किंवा अंतःस्थ वर्ण म्हणतात. ०हार–पु. बारा किंवा चौसष्ट सरांचा हार; एक दागिना.

-अर्धेल–स्त्री–अर्धेल्या—अर्धेल पहा.

**अर्धा**—वि. एखाद्या वस्तूचे दोन सारखे भाग केले असतां त्यांपैकीं प्रत्येक; निम्मा. [ सं. अर्ध ] –र्धा जिवाचा–वि. अर्धमेला; अशक्त. ०जीव होणें–१ आजार, श्रम, थकवा, कष्ट, भीति वगैरेंनीं जीव त्रासणें; जर्जर होणें. २ अधीर होणें. अर्ध्या हळकुंडानें पिवळें होणें–थोड्याशा लाभानें फुगून जाणें, ताठून जाणें; गर्विष्ठ होणें. ०अधिक–वि. अर्धा व किंचित् जास्त; अर्ध्यापेक्षां जरा मोठा. ०अर्ध–क्रिवि. (गो.) निम्मेनिम; अर्धाअर्ध; अर्ध अर्ध करून. ०कोर–पु. भाकरीचा आठवा भाग; अदकोर; नितकोर; ( कांहींच्या मतें ) अर्धी भाकरी. [ कोर=एकचतुर्थांश, किंवा लहान तुकडा ]

**अर्धांग**—न. १ अर्ध शरीर; शरीराची एक बाजू; मांडी. 'जगज्जननी असे वाममार्गी। भीमकी शोभली अर्धांगीं। जैसी विद्युल्लता झळके मेघीं। दर्शनें भंगी महा दोष ॥' –तुगा ७३३. २ पत्नी; स्वस्त्री; गृहस्वामिनी; घरधनीन; अर्धांगी पहा. 'कीं तें ( यमुना ) रत्नाकराचें अर्धांग।'–दाव १७८. ३ (ल.) मित्र; साहाय्यक. ४ पक्षवात, पक्षवायु; अर्धांगवायु. ०वायु–पु. १ अर्धांग; एक वातरोग, ज्यामुळें शरीराचा अर्धा भाग निकामी होतो. २ एक घोड्याचा रोग यास 'लखवा' म्हणतात. [ सं. अर्ध+अंग ]

**अर्धांगी**—स्त्री. पत्नी; भार्या; स्त्री; बायको. 'अर्धांगी पार्वती सुमनांच्या माळा।' [ सं. ]

**अर्धांगीकार**—पु अर्धी अनुमति; अर्धवट संमति; नाखुष कबुली. [ सं. अर्ध+अंगीकार ]

**अर्धामर्धा-मुधा**—वि. जवळ जवळ अर्धा–निम्मा, सरासरी अर्धा; अर्ध्यापेक्षां कमी किंवा अधिक. [ सं. अर्ध द्वि ]

**अर्धार्धे**—क्रिवि. अर्धा अर्ध पहा.

**अर्धाला**—वि. १ अर्धा ( वांटणीचा भाग दर्शविताना एकंदर संख्येपैकीं प्रत्येकाविषयीं बोलावयाचें झाल्यास ). 'सर्वांस अर्धाल्या भाकऱ्या दे.' 'अर्धाला खांब पुर.' [ आकारान्त विशेषणांना 'ला' हा विभागदर्शीवाचक प्रत्यय लागतो. उ० मोठाला, दुवलाला इत्यादि, इ० अर्धा+ला ]

**अर्धासन**—न. १ अर्धे आसन; बसावयाच्या आसनाचा अर्धा भाग. २ (ल.) सहकारित्व; सहचारित्व ( नवरा आणि बायको, दोन मित्र, राजा आणि सामान्य प्रजाजन यांचें ). ३ यावरून अर्ध्या आसनावर बसण्याचा दिलेला मोठा मान; विशेष घरोबा, परिचय, सलगी; जिवलगपणा. –नी–वि. अर्ध्याआसनाच्या वांटणीचा मान उपभोगणारा; अर्ध्या आसनावर बसण्याची पात्रता असणारा; विशेष स्नेह असलेला. [ सं. अर्ध+आसन ]

**अर्धांसा**—वि. अर्ध्यांसारखा, जवळजवळ निम्मा. (गो.) अर्धांसो. [ सं. अर्धसदृश ]

**अर्धिकभीमिचारी**—वि. (नृत्य) उजव्या पायामागें डावा पाय ठेवून तो मागच्या बाजूस ओढून घेणें. [ सं. ]

**अर्धी**—अर्ध, अर्धा पहा. १ निम्मी–'वडिलांची अर्धी भाकर खाउं पुरुत।' –पला ९.१९. म्ह० अर्धी टाकून सगळीला धांवूं नये. २ ( मुंबई ) एक पै.-३ (गो.) तीन आणे चार पै किंमतीचें एक अर्धदर्शक परिमाण. (विरू.) अर्दी पहा. ०कोर–स्त्री. अदकोर; अर्धकोर पहा. ०पट्टी–स्त्री. ओलें लादलेल्या बैलावरील पट्टी–कर.

**अर्धी मांडणी शिरस्ता**—पु. शेत करण्यास कुळास देतांना शेताचें निम्मेनिम उत्पन्न व निम्मेनिम सारा मालकानें व कुळानें वांटून घेण्याची रीत.

**अर्धीम्हैस**—स्त्री. चार वेतें दिलेली म्हैस ( कारण म्हैस सुमारें आठ वेतें देते. अर्धवट पहा.

**अर्धूक**—न. अर्धा भाग; अर्धेल; निम्मे; निमाई, निमखाई; [ सं. अर्ध+क ]

**अर्धेल**—स्त्री. १ (सामा.) निम्मे वाटणी. २ ( शेतकी–व्यापार) उत्पन्नाचा वांटणीतील अर्धा हिस्सा; शेतीच्या उत्पन्नांतील अर्धा शेतमालकाचा व अर्धा कुळाचा हिस्सा, भांडवल पुरविणाऱ्याचा व अंगमेहनत करणाऱ्या इसमाचा–मजुराचा परस्परांच्या उत्पन्नांतील किंवा प्राप्तींतील अर्धावाटा 'शेत अर्धेलीनें केलें आहे.' ३ वरील पद्धतीवर दोन इसमांची ठरलेली भागीदारी; अर्धेली. ४ लागवड करणाऱ्यानें जमीनीच्या मालकास उत्पन्नाचा अर्धा वांटा देण्यासंबंधानें कबुलायतपत्र ५ पैशाची, मालाची अर्धी होण्याची स्थिति; मूळ वस्तूचें ( पैसा, माल ) अर्धे होणें; निम्मेभाडवलाइतकें नुकसान येणें. 'ह्या व्यापारामध्यें मिळकत व्हावी तो तर नाहींच आणि पैक्याची अर्धेली झाली' ६ निम्मे, निमखाई. [ सं. अर्ध+ल ] ०तिर्धेल–स्त्री. १ जमीनीच्या उत्पन्नांतील तिसरा हिस्सा; एकतृतीयांश उत्पन्न २ हें उत्पन्न घेण्याचा खोत वगैरेंचा हक्क. –टिले २.६०४.

**अर्धेली-ल्या**—वि अर्धेल करून व्यवहार व तो करणारा (शेतकरी, व्यापारी)

**अर्धवचन**—न तावडतोब फलद्रूप होणारें वचन, वचन किंवा अधिकार 'तें तुझें अर्धवचन आहे '-वचनात असणें-वागणें-विनयपूर्वक आज्ञाधारक असणें, अगदीं तत्परतेनें आज्ञा पाळणें

**अर्धोअर्ध**—अर्धाअर्ध पहा

**अर्धारा**—पु दरमहा दरशेकडा अर्धा (टक्का) दराचा व्याज किंवा तें घेण्याची पद्धति (स अर्ध+उत्तर=वर किंवा अधिक)

**अर्धोदक**—न १ कमर इतकें खोल पाणी २ (ल) उपोषण करून अर्धे शरीर पुढें इतक्या गंगेच्या पाण्यात राहून प्राणत्याग करणें, जलसमाधि 'का बुडोनि प्राण गेले। त अर्धोदकीं निमाले।' -ज्ञा १८ १५४ [स अर्ध+उदक]

**अर्धोदय**—न १ एक पर्व पौष वद्य अमावास्येचा प्रथम भोग, रविवार व श्रवण नक्षत्राचा मध्यभाग व व्यतिपाताचा अन्त्य भाग हे योग असता तें पर्व असतें याचें पुण्य कोटि सूर्यग्रहणसमान आहे (धर्मसिंधु) 'हे कृष्ण उद्धव अर्ध माना। अर्धोदयो महा याना।' -एभा ५ ५५५ २ आकाशस्थ ग्रहाचा किंवा ताऱ्याचा अर्धा उदय होणें [स] **अर्धोदयीं पडणें**-आरंभिलेलें काम अर्धवट होणें, लांबणीवर पडणें, भिजत घोंगडें राहणें

**अर्धोन्मीलित**—वि (काव्य) अर्धें उघडलेलें (डोळे, कळी इ) 'तेथ अर्धोन्मीलित स्थिती। उपजे तया।' -ज्ञा ६ २०३ 'निर्विकल्प समाधि प्रवर्तली। दृष्टि अ० झाली।' [स]

**अर्ध्र्ध**—अर्ध अर्ध पहा

**अर्पण**—न १ देणें, समर्पिणें २ वाहणें, बक्षीस देणें, बहाल करणें, दान [स ऋ=जाणें प्रयोजक] ०**पत्रिका**-स्त्री ग्रंथ ज्यास अर्पण करावयाचा त्यासंबंधीं मजकूर लिहितात तें पुस्तकातील पहिलें पान

**अर्पणीय**—वि देण्यास योग्य देय [स]

**अर्पणें, अर्पिणें**—उक्रि १ बक्षीस देणें, इनाम देणें, दान करणें 'योगी विषय जे त्यागिती। ते भक्त अर्पिती भगवंतीं॥' -एभा २ २८९ २ ओपणें, देणें वाहणें अर्पण पहा [स ऋ=जाणें प्रयोजक]

**अर्पित**—वि १ उपायन-वायन दिलेलें, दान केलेलें, बक्षीस दिलेलें २ दिलेला, अर्पण केलेला, वाहिलेला [स]

**अर्बा, अर्बा-अरार-मया, अर्बैन**—अरबा पहा

**अर्बुज**—वि अर्बुद, दशकोटी 'एका पासोनि एकु आगळा। ऐसिआं सैन्या अर्बुजें सोळा।' -शिशु ९ २६ [स अर्बुद]

**अर्बुज**—अरजुन पहा 'आम्ही तरी श्रेष्ठ तुझे। हीं भौळिय असतीं अर्बुजें।' -कथा ४ ६ ५२ 'खडगाच्या यायला म्हणतो अर्बुजें, त्यास काहीं कळत नाहीं'

**अर्बुद**—वि दशकोटी 'अर्बुद गायी दतों अथवा दतों स्वराज्य भोगाया।' -माआदि ३० १० [स]

**अर्भक**—न १ लहान मूल, बालक, लेकरूं 'अर्भकाचे साठीं। पंतें हातीं धरिली पाटी।' -तुगा २१८० २ (ल) मूर्ख, वेडसर, मतिमंद, अगमजग माणूस -की-स्त्री लहान मुलगी, अजाण पोर [स]

**अर्भटी**—स्त्री एक काव्यप्रकार भाटांचीं गीतें यांत रचिलेलीं असतात, आरभटी 'नेटें गर्जति भाट आरटिव। महाअर्भटि आरंभिती।' -अगी ८१ [सं भट्=बोलणें आरभटी=विशिष्ट लेखन, कथानक, नाट्यविशेष]

**अर्म(र्मा)र-री**—आरमार पहा

**अर्यमा**—पु १ सूर्य २ पितृगणांपैकीं मुख्य 'आणि पितृगणा समस्तां-। माजीं अर्यमा जो पितृेश्वरा।' -ज्ञा १० २४४. ३ उत्तराफाल्गुनी नक्षत्र [स]

**अर्या**—पु आऱ्या, बोऱ्या, फजिती

**अर्व**—वि दहा कोटी [स अर्बुद, हिं अर्ब]

**अर्व**—स्त्री (शाप) दुर्मिळ मृत्तिकाधातूंपैकीं एक धातु (इं) अर्बियम एक रासायनिक मूलद्रव्य, यास गाडोलिनाइत असेंहि म्हणतात [भ]

**अर्वळ**—वि (गो) फाजील लाडात वाढलेला, अरवळ पहा. इतर रूपें-भाराबाय, आळुवाय

**अर्वाक-च्**—वि आधींचा, ठरलेल्या वेळेच्या अगोदरचा, पूर्वींचा -क्रिवि अगोदर, आधीं, अलीकडे [स अर्व+अच्-अर्वाच्]

**अर्वाक**—अर्वाच्य पहा 'अर्वाकानें फार बोलत्ये हाचि त्रास आग।' -बयाबाई पृ ९० पद ७ [स अवाच्य]

**अर्वाचिक**—वि (काव्य) कच्चा, अननुभवी, निपुण नसलेला, अकुशल, नवखा, नवशिक्या [स अव+अच्-अर्वाचीन]

**अर्वाचीन**—वि अलीकडचा, सद्य कालीन, आधुनिक, हल्लींचा. याच्या उलट प्राचीन 'म्हणितलें या ज्ञसी। अर्वाचिना।' -ज्ञा १२ ४० [स] -**केली**-अलीकडील, अर्वाचीन केलेली, नवीन (भाषा) 'त्याची भाषा अ० आहे' -वैद्यक ७८

**अर्वाच्य**—वि १ नीच, हलकटपणाचें, खडबळ, घाणेरडें, अभद्र (भाषण, माणूस वगैरे) २ खोडकर, खोडसाळ, खट्याळ, उनाड, उच्छृंखल द्वाड 'आमच्या रावबहादुर प्रभृति अर्वाच्य पण्डितांनीं आज जो भयंकर इतकीं वर्षे बिचारा सारखा भडिमार चालविला आहे' -नि १०५५ [स अवाच्य]

**अर्वाळी**—स्त्री अरवाळी पहा

**अर्ह**—वि अर्ह, योग्य 'जाला बहु अर्ह कृपेसी।' -दावि ४२८ [स अर्ह]

**अर्श**—पु तुर्कीने अर्थ १ मूळव्याध २ वेंड, गद्द इ० मासांश, कर्णांश [ स ]

**अर्शोग्रहणी**—अतिसार, नग्रहणी, कॉलरा 'एकाते अर्श ग्रहणी' –गीता १३ २४८८ [ स ]

**अर्सा**—पु १ अतर, आडपडदा, कालावधि, अवकाश 'लाड कारण वालीम सहदेस दाखल होण्यास अर्सा फार थोडा' –रा ८ ४४३४ २ फेरा, मैदान, क्षेत्रफळ, आंगण [ अर अर्सा=अंगण, जागा, अवधि ]

**अर्सेनिक**—अरसेनिक पहा

**अर्ह**—वि योग्य, साजणारें, शोभणारें, युक्त लायक इ० पूजनार्ह, दानार्ह, पन्नार्ह [ स ]

**अऱ्हळ-तऱ्हळ**—अरळतरळ पहा

**अलक**—पुन केंस, कुरळे केंस [ स ]

**अलकट-पालकट**—अलखटपालखट पहा

**अलकतरा**—पु राळ आणि तेल यांचे मिश्रण करून बनविलेला पदार्थ [ अर ]

**अलंकरण**—न. शोभविणें, भूषविणें, नटविणें, अलंकृत करणें [ स अलंकृ ]

**अलकापुरी**—स्त्री १ आळंदी, ज्ञानेश्वराच्या समाधीचें गाव (जि० पुणें) २ आळें–ज्ञानेश्वराने ज्या रेड्याच्या तोंडून वेद म्हणविला त्या रेड्याच्या समाधीचें गाव (जि पुणें) ३ अलका, हिमालयाच्या उत्तरेकडील कुबेराची राजधानी

**अलकाब**—पु पत्रामध्यें लिहावयाच्या मायन्यातील पदव्या किंवा मायनें 'हलका अल्काब लिहिलियामुळें विषम मानितात' –दिमरा १ ८ [ अर अल्काब, लकबचें अव ]

**अलंकार**—पु १ दागिना, भूषण (पायाखालील व दागिन्यांतील), रत्नें, दागदागिने, शोभादायक वस्तू इत्यादि 'अलंकारातें जाले। तरी सोनेपण काइ गेलें।' –ज्ञा १४ १२८ २ (भाषेंतील) चित्ताकर्षक शब्दरचना, अर्थरचना, उपमा, रूपक, यमक, प्रास, अनुप्रास, इ० मुख्य अलंकार तीन आहेत त्यात बाकीचे सर्व प्रकार येतात जसें –शब्दालंकार, अर्थालंकार उभयालंकार 'अलंकारु म्हणिजे। काय ते नेणें।' –ज्ञा१८ १७०७ ३ (सामा) शोभाकारी–शोभा देणारी वस्तु गुण 'क्षमा ही समर्थास अ० होय, चर्चा चित्रें हीं भिंतीस अ०' ४ (संगीत) स्वराची विशेष व नियमित रचना अलंकाराची संख्या ६८ आहे स्थायी वर्णाचे ७ आरोही वर्णाचे १२ अवरोही वर्णाचे १२ संचारी वर्णाच २५ गीतोपयोगी ७, व रागोपयोगी ५ ५ साहित्य शास्त्र [ सं ]

**अलंकारणें**—उक्रि अलंकार घालणें सुशोभित करणें आराम करणें [ स अलंकृ ]

**अलंकारिक-री**—आलंकारिक पहा

**अलकृत**—वि (व) नाजूक, कोमल, हलुवट सुकुमार. [ सं अलक्षित प्रा अलुक्खित=कोमल ]

**अलकृत**—वि एक प्रकारचा मासा

**अलंकृत**—वि शोभविलेलें, विभूषित, सुशोभित, सजलेलें [ स ]

**अलकोल**—अलकोहोल पहा.

**अलक्त-क**—पु लाख, अळता, अळिता पहा

**अलख, अलखनिरंजन**—पु १ अलक्ष, ब्रह्म, त्यावरून ईश्वर. 'अलखमो परम दरसे मौजा। सब घटमो नाथ विराजा।' –दयनाथ २ गोसावी लोक भिक्षा मागताना हा शब्द उच्चारतात ३ अदृश्य [ स अलक्ष्य ]

**अलखट पालखट, अलखंड पालखंड, अलखण पालखण, अलखत-पालखत**—न पाराच्या आकडयासारखी घातलेली मांडी, मारलेली बैठक, आसनमांडी [ स पर्यंक=पालखी, पाळणा, पालख द्वि ]

**अलखालक-ख-खालिक**—स्त्री किनारीदार व भरलेलें एक वस्त्र एक प्रकारचा डगला, अंगरखा –हिंलइ १४६ [ तुर्की. अर अलखालक=अंगरखा ]

**अलग**—वि वेगळें, निराळें, भिन्न, स्वतंत्र [ स अलग्न, लग्न ]

**अलग, अलगत**—क्रिवि १ निराळ्या प्रकारें, भिन्नपणें, फटकून, विरळ २ कशास न लागता, स्पर्श न होता, सरळ अडथळ्याशिवाय, तडक (भोंडा, गोळी इ० कोणेक मार्गानें जाणें, उडणें, पाठ म्हणणें वगैरे) ३ पृथक्, दूर ४ विवक्षित संस्कार–संबंध न होता (क्रि० असणें, राहणें, ठेवणें) 'माहामारीनें सर्वांचा समाचार घतला एवढें मान घर अलग राहिलें' 'जे प्राप्ती तव अलग टळी।' –ज्ञा ६ ४३५ ५ हलकेंच, अचळ, अलाद ६ स्वतंत्रपणें, मोकळेपणें ७ लौकिकरीत्या गोळाफत, अभावानें एकीकडे, एकीकडे 'आमचें यजमान गलपापासुन आम्ही येथें उगीच अलग पडलों आहों' [ स अलग्न–लग्न ]

**अलंग**—स्त्री १ लांबच लांब सोपा, चाळ, गोठा, खदक, तट, फौजेची पागा राग वगैरे इकडील अलंग फोडून पलीकडील सफेल फोडून गोळा फा(पा)र झाला' –होके २० २ फरा (लढाईतला) रस्त्यावर एक अलंग धरून –पया ५४ –पेपा २७७ ३ बाजारपेठेतील दुकानांची लांब ओळ, रांग [ स अलग्य, म अलग=स्वतंत्र फा आलंग=खंदक हिं अलंग=बाजू, मार्ग ]

**अलंग**—गर्भी पन

**अलगट**—वि १ स्वतंत्र फाजील 'अलगट बहु दोघी ढाल हें काय केलें। –साहड ४ ६४ 'अहो सत्यभामे अलगटी। सापे जाहलीस तू धीटी। परि न मागता जाजटी। मणीलागी दीपलीसी॥'

—कथा ४ १८ ११८ ३ द्वाड, झुभाडी अल्घट पहा [ अ+लगत स लग्न, प्रा लग=जवळ ]

**अलगड**—स्त्री घोटाळाविणारें, मति कुंठित करणारें काम, उद्योग, त्रास, अडचण (क्रि० पडणें, येणें) २ पेंच, कोंडी, खात्री [ अडगळचा वर्णव्यत्यास ? ]

**अलगणें**—अक्रि १ ( पासुन ) लोंबकळत किंवा लटकत राहणें ( पिकलेलीं फळें वगैरे ) २ झुबके, घड किंवा घोंस लटकत राहणें-( फळांसबंधीं ) ३ ( सामा ) ओळवणें, लोंबकळणें ४ ( कों ) पूर्ण पिकून गळावयास होणें ( फळ ) 'त्यातून अलगलेले चागले चागले पाड तेवढे भागिरथीचे ओटींत पडले ' —बाळमित्र २ ६७ [ सं आ+लग् ]

**अलंगणें-दुलंगणें**—अक्रि ( व ) मुकणेंमुकणें, चुकून राहणें [ अलग द्वि ]

**अलगत-द-ज**—अलग पहा

**अलंगनौबत**—स्त्री डंका-निशाण, पहारा 'ठाणाचे चाकरी अलग-नौबत करून असणें ' 'अलग नौबतीची सेवा घेणें ' —शारो ५१२ [ अर अलम्=निशाण+अर नौबत=नगारा ]

**अलगपीत**—क्रिवि १ एकदम, एकाएकीं, अकस्मात २ सावकाश, हळूच, अलगत, न हालवता-हलता, बेतानें ३ चोरून, छपून, चोरपावलानें, नकळत ४ ( इतर अर्थासाठीं ) अलग अलगत पहा [ स अकल्पित ( अप ) अलगत ]

**अलंगभवरी**—स्त्री पायाच्या एका आगठयावर फिरणें 'देता छत्रभवरी अलगभवरी ।' —भाए ४०९ [ अलग+भवरा ? ]

**अलगरजी-जू, अलगरदी-द**—वि १ मंद, ढिलाईचा, निष्काळजी, हलगर्जी अव्यवस्थित, बेशिस्त, विस्कळित, ढील ( इसम, उद्योगधदा ) 'परतु अलगर्जीपणामुळें किंवा दुसऱ्या एकाद्या कारणामुळें ' —सावेस ९ २ ( विशेषत अलगरजी ) न्हारा पावलेला, खालावलेला, वय झाल्यामुळें उतरलेला, जुराडा झालेला, चिनटिकाऊ, हलगर्जी पहा ३ आपल्या कामापुरतें दुसऱ्याचें वाह्या त्वारीं आर्जव करणारा, आपलपोटया, स्वार्थी [ अर अहल्-ई-गरज ]

**अलगरजी-नें**—क्रिवि ढिलेपणानें, सैलपणानें ( क्रि० धरणें )

**अल्गुजें-गूज**—नपु १ एक प्रकारचा पावा हें वाद्य बांबूचें किंवा धातूच्या नळीचें असतें त्याची वीतभर व जाडी पायाच्या आंगठयाएवढी असते एक बाजू बद असून तिला बारीक भोंक ठेवतात दुसऱ्या बाजूस तिरकस छाप पाडून पायरी करतात व त्यात पावडी बसवून वाजविण्यासाठीं चीर ठेवितात तोंडापासून चार बोटांवर पाहाण्याच्या आकाराची सहा भोंकें समान अतरावर पाडतात तोंडापासून तीन बाटांवर चौकोनी भोंक ठेवितात तेथपर्यंत पावरीचा तुकडा एकचतुर्थांश भोंक शिल्लक राहील इतका असतो विरुद्ध बाजूस पहिल्या व दुसऱ्या भोंकाच्या मध्यावर एक भोंक ठेवतात शिपी तोंडात धरून फुकलें म्हणजे नळी वाऱ्यानें भरते व हाताचीं बोटें भोंकावर ठेवून इच्छित स्वर काढून हवें तें गीत वाजवितात बासरी, मुरली हींहि याच जातींतील वाद्यें आहेत २ खोगीराच्या दोन्ही बाजूना पाठीवर जोडणारे नवारीचे पट्टे [ फा. अल्घुजह् ]

**अलंघन**—न ( संगीत ) रागविस्तार करताना एखादा स्वर पूर्णपणें घेणें [ स ]

**अलंघनीय-अलंघ्य**—वि ( अक्षरश किंवा ल ) ओलांडून जाण्याला कठिण, दुर्लंघ्य, उल्लघन करण्याला कठिण [ स ]

**अलटापालट**—स्त्री मागचें पुढें, आधीचें मग, उलटा पालट पहा [ प्रा अल्हपल्ह, पालट द्वि ]

**अलड**—अल्लड पहा

**अलतड**—स्त्री ऐलतड, नदीची अलीकडची बाजू, अल्याड [ स आदि-लस्तट ]

**अलतमघा**—स्त्री राजानें दिलेली इनामी जमीन, सनद, वशपरंपरागत जहागीर —पया २३ [ तुर्की अल्तमघा=तांबडा शिक्का ]

**अल्ताभलता**—वि कोणी तरी, अल्त्यागल्त्या, गोमाजी तिमाजी, गैरमाहितीचा, अनोळखी [ भल्ता द्वि ]

**अलंदुनिया**—( विप्र ) अल्मदुनिया पहा

**अलप**—पु ( व ) बैलाचा सरकी, ढेप, वगैरे खुराक [ स अल्प ( खाद्य ) ]

**अलपल्लव-हस्त**—( नृत्य ) उपपद्मक पहा

**अलंप्रतीति**—स्त्री, **अलंप्रत्यय**—पु पुरेसेपणाची जाणीव, समाधान, तृप्तता, शांति [ स अलम्+प्रतीति ]

**अल्फ**—वि एक हजार ( अरबी सालाबाबत उपयोग ) [ अर अल्फ्=एक हजार ]

**अलबत्-त्ता**—क्रिवि १ खात्रीनें, जरूर, खरोखर, निश्चयानें, निश्चितपणें, खास, अगत्यपूर्वक, हमखास 'एथें गुराचा उपदर आहे तेव्हां अलबत बुधण केलें पाहिजे ' 'हे गढ्स्य सगावित, शांत आणि अलबत्ता जमाखर्चांच कामात हुशार असलेच पाहिजेत ' —विविधज्ञा १ १४४ २ निदानपक्षीं, निदान, कमींतकमी ( रक्कम, संख्या ) 'अलबत शभर रुपये तरी पदरीं असावे तर घर बाधावयास आरभावें ' [ अर अलबत्ताह् ]

**अल्यत्या-गल्यत्या**—पु कोणीहि कोणीतरी, भल्ता सल्ता, साळकोजीमाळकोजी, गोमाजीसोमाजी, य कश्चित्, क्षुद्र, क्षुद्रपा माणूस भलतुफालतु, अव अल्यतेगल्यते 'खुद्द त्याच्या कुटुबात चार पांच माणसें आहेत परतु पचवीस अल्यते गल्यते असतात ' कधीं विशेषणाचीं उपयोग 'कित्येक अल्यतीं गल्यतीं माणसें किल्लेदाराच्या घरीं येऊन रहात ' —कोरकि ८०. [ गफलत-गफलत्याची द्विरु किंवा अलबत-त्या द्वि ]

**अलबम**—पु चित्रवही, चिकटवही, चित्रे, फोटोग्राफ वगैरे एकत्र ठेवण्याचें (समह) पुस्तक, यात प्रसिद्ध पुरुषाचे फोटो तसेंच स्वदस्तुरचे लेख, गद्यपद्यातील वेंचे वगैरे ठेवतात [इ]

**अलबला**—अलाईबलाई पहा

**अलबलीत गलबलीत**—वि ढिला, मंद, सैल, अव्यवस्थित, विस्कळित [स गलित द्वि]

**अलंबीं**—क्रिवि (कों) आधारावाचून, निराधारीं, अनिश्चित, धोक्याच्या ठिकाणीं (फांदीच्या टोंकावर, कड्याच्या काठावर) [स आलंब]

**अलंबुद्धि**—स्त्री समाधान, तृप्ति, तृप्तता, तृप्ततेची भावना, दिसारी [स अलम्=पुरे+बुद्धि]

**अलबेल**—स्त्री सर्व नीट सुरळीत चाललें आहे अशी हमी, अहवाल, हालहवाल 'अलबेलीचे शब्दातें।'—सभामगीतें १५४ 'पार्लमेंटच्या माहितीकरितां प्रति दहा वर्षी हिंदुस्थानची अलबेल रुशी आहे याचा रिपोर्ट असतो'—टि १ ३२९ [इ ऑलवेल्]

**अलबेला**—वि १ हलका, ढवेशीर, बेफिकीरीचा (कपडा, गति) २ सैल, पोकळ, ढिलें (गाठोडें, बोचकें, काम) ३ कम जोर, ठुजबी, दिखाऊ (इमारत) ४ अकडबाज, नखरेवाज (इसम) ५ सुंदर, रंगेल, प्रिय, लाडका 'तो जिवबादादा पक्षी अलबेला।'—ऐपो २८३ ६ मोघम, गुळगुळीत, अनिश्चित (भाषण) 'त्यास खसखशीत ताकीद कर, उगीच अलबेलें सांगून येऊं नको [हिं अलबे(बे)ला=मजनिम, निरपराध (मूळ अर्थ)]

**अलबेली**—स्त्री रंगेल स्त्री, चालक भवानी, चटकचांदणी

**अलबेलीं**—क्रिवि सहजासहजीं

**अलभ्य**—वि मिळण्याला, लाभण्याला कठिण, संपादन करण्यास कठिण अशक्य [स] ०**लाभ**—पु लाभण्याला अशक्य, अपेक्षेच्या बाहेर किंवा असंभवनीय असा लाभ, अनपेक्षित फायदा, दुष्प्राप्य मिळकत, केवळ दैवयोगानें झालेला लाभ [स]

**अलम**—झेंडा, निशाण 'भाडीं, फिरणा, अलम निशाण'—मेस्तक-पुस्तक, जमेरेखन ११९ [अर अलम्] ०**खाना**—पु वाद्यशाला, छत्र, पालखी, चवरडोल, हौद, निशाणें इ सामान ठेवण्याचें ठिकाण

**अलम**—पु लहान पागोटें, वत्ती (मुलाकरितां) [अर आल=मुलें?]

**अलम**—१ जग, लोक, जनसमुदाय २ काळ, स्थिति, अमल आल्म पहा [अर आलम=जग] ०**गीर**—पु जगज्जेता, औरंगजेबाची पदवी ०**दुनिया**—स्त्री सर्वजग मानवी जात 'तुमच्या शिवाय हें कृत्य घालें नाहीं हें मीच काय पण अ० म्हणत आहे' ०**दुनिया मुकणें**—(विशिष्ट प्रसंगीं) मनुष्यांची अलोट गर्दी होणें [अर आल्म+दुन्या=जग] ०**पन्हा**—वि जगरक्षक [अर आल्मपनाह्]

०**रोशन**—वि जगाला प्रकाशविणारा, जगद्विख्यात 'त्याचा फायदा तो अलम-रोशन आहे'—पया

**अलमक**—क्रिवि (व) नेमका [अर अलामत्=खूण?]

**अलमगिरी पैसा**—पु औरंगजेबाच्या शिक्याचा पैसा

**अलमदांड**—वि अतिशय उध्दट, दांड, आडदांड, अति मस्त, धिंगाणा घालणारा [अर आल्म्+म दांड]

**अलमारी**—स्त्री १ खण असलेलें कपाट २ (ल) साठा, संचय, तिजोरी [पोर्तु अलमारिया इ अल्मारी, स्कॉच ऑमरी, हिं अल्मारी]

**अलम्**—क्रिवि पुरे, बस् [स]

**अलर्क**—पु १ पिसाळलेला कुत्रा व त्याच्या चावण्यापासून होणारा रोग २ रुईचें झाड [स]

**अललल**—उद्गा अचवा-आश्चर्य दर्शविणारा उद्गार अरर-अबब—मोर प्रहसन २८ ०**डुर्र**—उद्गा पौराणिक नाटकांत देव व राक्षस यांची लढाई चालली असतां अल्ललडुर्र असें राक्षस ओरडत असत म्हणून पौराणिक नाटकाला अल्ललडुर्रची नाटकें म्हणत असत [स अल्ले=पिशाचादींचा अर्थशून्य उद्गार]

**अलुलित**—वि (गो) डळमळित [स आ+लल्=हलणें]

**अलल्हिशेबी**—वि चालू हिशेबी 'अलल् हिशेबी वसूल'—रा २२ ७३ [अर. अल्हाल=चालू+हिसाब्]

**अल्वण-णी**—वि बिगरमीठ, अळणी, 'एकें तुसती अलवणें। बरवेपणें मिरवती॥'—एरुस्व १४ १०५. 'हरिप्राप्तीविण प्रवृत्तिक मग। काय कविता अलवण ते।'—ह २१ २४ [स अ+लवण]

**अल्वर तालवर, अल्वार तलवार**—न.पु अव थोर किंवा सन्माननीय समजून वागविणें, शिष्टाचार करून व सभ्यपणा दाखवून मोठेपणा राखणें किंवा मोठेपणानें वागविणें (क्रि० करणें, ठेवणें, राखणें) [अर तालीवार=नशिबवान् तालवर द्वि]

**अलवान**—स्त्री न १ एक प्रकारची शाल २ एक प्रकारचें तांबडें कापड [अर अल्वन (ल्वन=रंग अव)=अनेक रंगी तुल० स आरक्तवर्ण, प्रा आलवण्ण]

**अलवार**—वि (व) कोमल, अलवार-ल पहा 'अधिकचि तें अलवार जाहलें।'—विक ५५

**अलस**—आळस पहा

**अलसंदा**—पु अळसुंदा, चवळीसारखें मोठें कडधान्य [का. अलसंदी]

**अलसिका**—स्त्री १ पेटके आणणारी महामारी, कॉलऱ्याची दुसरी अवस्था, पेटके, विषूचिका पहा [स]

**अलक्ष**—अलख पहा 'ते सधीस गोरख जाला। अलक्ष आदेस जल्पतसे।'—नव ९ ११० [स अलक्ष्य]

**अलक्षण**—(प्र) अवलक्षण पहा

अलक्षपण—न लक्षात न येण्याजोगी स्थिति, दुर्लक्षता 'बोलता ना उगला। अलक्षपणें॥' –ज्ञा ११ ११११ [स]

अलक्षित—वि अटकळ किंवा अनुमान न केलेलें (बद्दल किंवा विषयीं) लक्ष न दिलेलें, न शोधलेलें, न पाहिलेलें, अकस्मात् [स]

अलक्ष्मी—स्त्री दुर्दैव, दुर्भाग्य, दारिद्य, विपत्ति, अवलक्ष्मी, अक्काबाई लक्ष्मी आणि अलक्ष्मी या दोन बहिणी असून त्या समुद्रातून निघाल्या अशी सार्वत्रिक समजूत आहे पहिलीनें विष्णूशीं लग्न लाविलें व दुसरी नवरा पहात दारोदार भटकते ज्येष्ठा व कनिष्ठा पहा [स]

अलक्ष्य—न १ दुर्लक्ष, गैरसावधता, असावधानता २ परमेश्वर, ब्रह्म –वि (अप अलक्ष), कल्पनातीत, दुर्बोध, अज्ञेय, अतर्क्य 'ध्वजवज्राकुशरेखा। चरणींची सामुद्रिकें दखा। न वर्णवती सद्यसुखा। ब्रह्मादिकां अलक्ष्य॥' –एरुस्व १ २२ ०लेखणें-धरण-मोजणें-मानणें-पाहणें-जाणणें-किंमत न देणें, क्षुद्र किंवा क्षुल्लक मानणें तिरस्कारणें, अनादरणें, अवज्ञा करणें [स]

अलक्ष्या—स्त्री योग्यांची एक मुद्रा मुद्रा पहा [स]

अला—पु वैभव, श्रेष्ठता –वि सर्वश्रेष्ठ, सर्वज्ञानी [अर अला]

अलाईबलाई, अलायबलाय—स्त्री सर्व दुःख–त्रास–पीडा, इडापिडा, सकट दृष्ट काढण्यासाठीं दिवे ओवाळतांना किंवा कान शिलावर बोटें मोडतांना अनिष्ट निवारण व्हावें म्हणून असें म्हणतात, (यावरून) दृष्ट काढणें (क्रि० घेणें) 'मातुश्रीनीं अलायबलाय घेऊन मस्तकीं विजयहस्त ठेवला' –चित्रगुप्त ११ अव० अलायावलाया 'तुका म्हणे वर्णूं काय घेतो अलाया बलाया।' [अर बला=दुर्दैव द्वि तुल० स अलात–अलाय=कोलीत]

अलागत—अलगत पहा

अलाछन—वि कलकरहित 'चद्रमे जे अलाछन।' –ज्ञा १८ १७९८ [स अ+लाछन]

अलॉट—सक्रि वाटणें (कपनीचा भाग, पैसे वगैरे) ०मेंट–स्त्री वाटणी, वाटा, भाग [इ]

अलाड—क्रिवि अलीकडे, येथें, इकडे, ह्या किंवा अवळच्या बाजूस अलाड पहा ०पलाड–क्रिवि अलीकडे पलीकडे, इकडे तिकडे, ऐल पैल [स आदिल–अइल+तट]

अलाडाबलाडा—पु अडथळा, विघ्न 'नसता अ० व जेथे वेठबिगारी मनस्वी घालून तगादा करितातिं' –मसाप २ ३९६

अलाणटप्पू, अलाल्टप्पू—पु १ निष्काळजीपणें, उनाडपणें भटकत राहणारा इसम, उडाणटप्पू २ आयतगव्हू, आयता, ऐदी

अलात—न (नाविक) १ वल्ह्याचें पानें किंवा फळी २ तारवें पाण्यांतून जमीनीवर ओढण्याची जाड व बळकट दोरी [ग अरित्र=वल्हें, ग्रा अरित्त, अर आलत्=हत्यार, साधन, नावेचा दोर]

अलात—न कोलीत, मशाल [सं] ०चक्र–न कोलीत गरगर वाटोळी फिरविली असता दिसणारें चक्र, अग्निचक्र 'जैसें अ० फिरे। तैसा हनुमत असुरात वावरे॥'

अलात(आकाश-चारी)—स्त्री (नृत्य) पाय पाठीमागच्या बाजूला वळवून चोहोंकडे आवळ्या आत फिरवून बाजूस टाचेच्या आधारावर टेकणें [स]

अलात(करण)—न (नृत्य) उजवा पाय अलात करणें व उजवा हात वक्षःस्थलावर टेवून उंच करून खालीं सोडणें व ऊर्ध्व जानुचारी करणें [स]

अलातक(अंगहार)—पु (नृत्य) स्वस्तिककरण करून व्यसित करणाप्रमाणें हात टेवणें नतर क्रमानें अलातक, ऊर्ध्वजानु निकुचित, अर्धसूचि, विक्षिप्त, उद्वृत्त, आक्षिप्तक, करिहस्त व कटिछिन्न हीं करणें

अलाद्—स्त्री गजीफातील एक सज्ञा –मोको

अलाद, अलादि—अचानक, अलग पहा 'स्वस्थ गच्छलों, अलाद टकलों।' –अमृत पृ २८

अलादा—(व) अलाहिदा पहा 'वराता तीन अलादा अलादा सावकाराचे नावें होत्या' –मदबा २ ३४

अलाप, अलापिणें—आलाप, आलापिणें पहा

अलाॅवला—अलाईबलाई पहा 'अलावला कुणी घेउन आनदें, लिंबलोण उतरिती। आभर्णें कुणी चढुकुन आवरती।' –प्रला २३२ 'मी एकटा मेलों तरी शिवाजी राजे यांची अलाबला गेली, लाख मरादे परतु लाखाचा पाळणारा कायम रहावा' –मदरु १ ५४ 'तेव्हां वाटलें कीं सारी अलावला टळली म्हणून' –भा १०४

अलावु—पु दुध्या भोपळा 'बुडता जो चितेच्या झालें अद्भुत अलावु ओघीं तें।' –मोसभा १ ७६ [स]

अलाभ—पु १ लाभ, मिळकत न होणें २ जरूरी, पाहिजे असणें, अभाव, वाण 'तुमच्या भेटीचा अलाभ होता तो प्राप्त झाली!' 'राज्याला कशाचा अलाभ नाहीं' [स अ+लाभ, लभ्=मिळणें]

अलायी—वि प्रचड व्यापक अलिशाही ०कारखाना–पु मोठा कारखाना फाकटपसारा, प्रचड तयारी, मोठें प्रदर्शन, डामडौल, व्याप [अर अला=मोठा]

अलारशी—अल्लारशी पहा

**अलार्म**—पु. १ भयाची हांक; ओरड; सूचना (धोक्याची). २ गजर. ०फ्लॉक-वॉच—न. गजरी घड्याळ. ०बेल—स्त्री. भयसूचक घंटा; हुलीचा नगारा. [इं.]

**अलालनामा-हिशेब**—पु. १ चालू हिशेब; देण्याघेण्याचा किंवा अगाऊ दिलेल्या रकमांचा हिशेब; चालू खातें. २ (विशे. अलालनामा) कच्चा हिशेब, टांचण. –क्रिवि. अशा हिशेबाप्रमाणें–रीतीनें. [अर. अल्हाल=चालू, वर्तमान]

**अलावत**—स्त्री. (कु.) बायको.

**अलावत लावणें**—(व.) एकादा जड पदार्थ ओढण्याकरितां बैलाच्या जोड्या लावणें.

**अलावन्स**—पु. भत्ता; मुशाहिरा. [इं.]

**अलावा**—पु. १ मोहरमांत डोल्याच्यापुढें जी खांच खणतात ती. या खाचींत आग पेटवून मुसलमान लोक तिच्याभोंवतीं नाचतात. २ आगटी; नगारा, चौघडा तापविण्याची जागा. [सं. अलात; हिं. अलाव]

**अलाहिदा**—वि. अलादा; वेगळा; निराळा; भिन्न; पृथक्; विभक्त; स्वतंत्र. अलादा पहा. –क्रिवि. वेगळेपणें; भिन्नपणें; अलगपणें. [अर.] ०जमा—स्त्री. स्वतंत्रजमा; जमीन महसुल सोडून झालेली इतर बाबींपासूनची जमा.

**अलि**—पु. भुंगा; भ्रमर. 'बोधमदामृत मुनी–। अली सेविती ॥' –ज्ञा १.१६. [सं.]

**अलिक**—न. कपाळ; ललाट; भाल. 'भीमातें वाहनि गुन्नें नाराच हाणिला अलिकीं।' –मोद्रोण ११.६३. [सं.]

**अलिकडचा-ला**—अलीकडचा पहा.

**अलिखित**—वि. लेखी नसलेला (कायदा, ठराव, नियम). (इं.) अन् रिटन. [सं.]

**अलिजाहा, अलिशा**—अलीजाहा; आलिशा पहा.

**अलिता**—पु. १ लाख वगैरे पदार्थांचा रंग; अळिता; याचा तांबड्या शाईप्रमाणें उपयोग होतो. बायका पायांनादि लावितात. २ अलित्याच्या रंगांत बुडविलेला कापूस. ३ अर्धे सुती व अर्धे रेशमी असें कापड. [सं. अलक्तक. प्रा. अलत्त. तुल० प्रा. आल=लाल कमळ]

**अलिंद**—पु. घराच्या पुढील ओटा, देवडी, महाद्वारावरील गोपुर. 'अलिंदीं नंदाचें घन, रुचिर चैतन्य मिरवे।' –सारद १.५७. [सं.]

**ऑलिनिफ्दान ऑफिस**—न. इनामासंबंधी तपास करून निकाल देणारी कचेरी; इनाम इन्साफ खातें. [इं.]

**अलिप्त**—वि. १ न चोपडलेलें–माखलेलें, भ्रष्ट न झालेलें, निर्मळ. २ (ल.) दुष्कर्मे करून पुन्हां शुद्ध किंवा पवित्र दिसणारें. म्ह० करणी-करून अलिप्त. ३ संलग्न, संयुक्त न झालेला; वेगळा; निराळा; अलग. 'आतां ऐक वो सुंदरी। परमात्मा अलिप्त चराचरीं। संयोग वियोगाची परी। न धरी संसारीं सर्वथा ॥' –एरुस्व १३.६१. [सं. अ+लिप्=माखणें] ०पणा—पु., स्थिति—स्त्री. अलिप्त असण्याची अवस्था, अनासक्तता; पवित्रता. 'अलिप्तपणाचा निश्चयो। बोलिला असे ॥' –दा १.१.७.

**अलिव**—अळीव पहा.

**अलिशान**—वि. प्र. आलीशान; उच्च मानाचा, दर्जाचा. [अर. फा. आली+शान्]

**अलीक**—वि. खोटें; असत्य. –पु. खोटा, लबाड माणूस. 'काय अलीका ! सगळी प्रीति लटकी ती ठरली !' –मंमं ३. [सं.]

**अलीकडचा, अलीकडील**—वि. १ ह्या किंवा जवळच्या बाजूचा. २ हल्लींचा; थोड्या दिवसांचा; नवा; आधुनिक; अर्वाचीन. [सं. आदिम–उ, प्रा. आइल्ल+कट–कड]

**अलीकडून**—क्रिवि. ह्या किंवा जवळच्या बाजूनें; इकडून. २ (अमुक–मागील काळापासून) शतांपावेतों; अमुक काळापुढें.

**अलीकडे-स**—क्रिवि. १ ह्या किंवा जवळच्या बाजूला; येथें; इकडे. २ या काळांत; सांप्रत; हल्लीं.

**अलीगोल**—पु. गोलंदाज; तोफची. 'पुण्याहून बारूद आली त्याजबरोबर अली–गोल दोनशें नवें माणूस आलें.' –स १२. ६३४४. [फा. अह्लिगोल्]

**अलीजाहा**—वि. १ भव्य; विस्तीर्ण; डौलदार; दिमाखीः छाप बसविणारा (कारखाना, व्यवहार, कारभार वगैरे). २ थोर पदवीचा (सरदार). ही पदवी निजामास आहे. [अर. आली+जाह्] ०दरबार—पु. अलीजाही—स्त्री. अवाढव्य थाटमाट. २ (ल.) अव्यवस्थित व अंदाधुंदीचा कारभार (वैभवशाली). 'जुन्या लोकांच्या तोंडून...मोगलाईची तारीफ कधीं कधीं ऐकूं येते ती काय तर अंदाधुंद कारभार। अलीजाही कारखाना।' –चिपळूणकर लेखसंग्रह. 'ही अलीजाही आम्हांत पुरती भोंवून तिनें अगदीं अभाव मोसाद करून टाकलें आहे' –केसरी ०बहादर–पु. १ एक पदवी. ही शहाअलमनें महादजी शिंदे यांस दिली. ही ग्वाल्हेरकर शिंदे अद्यापि वापरतात २ (ल उप.) भोगृहस्थ, बडे लोक. [अर फा. आलीजाह्]

**अलीफ**—अ या उच्चाराचा अरबी पहिला वर्ण, पत्राच्या डोक्यावर मराठींतील श्रीकाराप्रमाणें लिहितात. [अर. तुल० ग्रीक अल्फा, हिब्रू अलेफ=बैल]

**अलीशान**—अलिशान पहा.

**अलुका-ा, की**—स्त्री. व्यसन, भूक, आउका पहा. –वि. भुकेला. [सं अलुक्.]

**अलुता-त्या**—पु तेली, तांबोळी, साळी, माळी, जंगम, कलावंत, डौरी, ठाकर, घडशी, तराळ, सोनार, चौगुला हे गांवच्या खालच्या वर्गाचे १२ कामगार होत. ग्रँटडफच्यामतें सोनार, जंगम,

शिंपी, कोळी, तराळ, वेसकर, यांचा हक्क महारापेक्षा निराळा माळी, डवऱ्यागोसावी, घडशी, रामोशी, तेली, भिल्ल, तांबोळी, गोंधळी याना नारूकारूच्या उलट अशी संज्ञा आहे शेतकऱ्या कडून यांना जें धान्य हक्क म्हणून मिळतें त्याचें प्रमाण ठराविक नाहीं यांतील सोनार सरकारी नाणीं पारख करणारा पोतदार होय तराळ म्हणजे पाटलाजवळ सतत हजर असणारा, सरकारी अधि काऱ्याची सरबराई करणारा, त्याचें सामान वाहणारा महार होय यांच्या बारा अलुते कोटल्याहि खेड्यातून क्वचितच सापडतात कोठें कोठें धाजनी, गारपगारी वगैरे नवीन अलुतेदार आढळतात वलुता पहा [ वलुता द्वि ]

**अलुतींवलुतीं**—न अव अलुतेदार व वलुतेदार या गावकाम गाराना असणारे वतनी हक्क

**अलुदा**—वि १ मिश्रित २ ( ल ) जुळणारा, परिचित ३ ( ल ) दूषितपणें, अपवित्रपणें मिसळलेला [ फा अलुदाह्=खराब झालेला ]

**अलुबुखार**—पु एक प्रकारचें आंबुस व रुचकर फळ व त्याचें झाड झाडापासून बाभळीच्या गोंदासारखा डिंक निघतो बिया पासून काढलेल्या तेलाचा उपयोग जाळण्याकडे करतात त्याचें फळ बाहेरून तांबूस व काळसर असतें मेह, गुल्म, अर्श, ज्वर, वायु याचा नाश करतें –वगु १ ४७ [ फा आलु=गड्डा+बुखारा स अलुक ]

**अलुलकी**—स्त्री मोहबत, कृपा मेहेरबानगी [ फा ]

**अलुलित, अलुल**—वि बुजट, नाचरा, बुजरा, रंगेल, बुळबुळ्या, मस्त ( टाणटद घोडा ) [ स आ+लुल्=लोळणें ]

**अलें**—न आलें, ओली सुंठ, अलें हें पाचक सारक, अग्नि दीपक, रुचिप्रद व कठास हितकर आहे सूज, कफ, वायु कंठरोग, खोकला, दमा मलबद्धता, वांति, शूळ यांचा नाश करतें अलें हिंदुस्थानांत सर्व प्रदेशांत होतें याच्या झाडाच्या मुळयास ठेंगा प्रमाणें अल्याचीं कुडीं येतात **अल्याचा चटका**–पु अलें धुवून बारीक किसून तुपात परतून त्यात सैंधव, मिरीं किंवा मिरची, जिरें, धणेजिरें याची पूड घालून हरवऱ्याचें पीठ लावून तूप–हिंगाची फोडणी देतात **०पाक**–पु अल्याचा तयार केलेला एक औषधी पाक हा श्वास, कास, अग्निमांद्य, अरुचि, यावर प्रशस्त आहे [ स आर्द्रक, प्रा अल्लय, अद्दअ, हा अल्ल, हिं अदरख–क, व आदा, गुज आदु ]

**अलेकमसलाम**—तुम्हाला सुखशांति लाभो ! असें मुसल्मानांत एकमेकांस भेटताना नमनार्थी म्हणण्याचा प्रघात आहे [ अर अलैकुम्–अस्सलाम ]

**अलेख**—अलख पहा

**अलेंबिक**—न अर्क काढण्याचें यंत्र, आसुतिपात्र, ऊर्ध्वयंत्र उ० अलेंबिक केमिकल कंपनी [ इ ग्री अंबिक्स, अर अल्+अंबिग=अर्कयंत्र, फ्रें अलंबिक, तुल० स अंभस् ]

**अलेमान**—स्त्री दोन हात लांब व काहींशी वाकदार पात्याची उत्कृष्ट पोलादी तलवार [ अर अल्–अमान=जीवदान मागणें किंवा अलामान=जर्मन माणूस लॅ अलेमनी, जर्मन अल्समनेर=एक लढाऊ जात ]

**अलेल**—वि ( ग्रो ) पक्का, अट्टल, अस्सल (सोदा, लुच्चा, चोरटा, लबाड, शिनळ, बदफ्या, मस्त्या या शब्दांबरोबर विशेषत उप योग ) **०टप्पू**–( ना ) उडाणटप्पू, उनाड, भटक्या [ ? ]

**अलैय्या**—पु (संगीत) एक राग या रागास षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम व पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात आरोहांत मध्यम वर्ज्य जाति षाडव संपूर्ण वादी स्वर धैवत व संवादी गांधार आहे गानसमय दिवसाचा पहिला प्रहर अवरोहांत कोमल निषाद घेतात हा एक बिलावलाचा प्रकार आहे [ हिं ]

**अलोचणें**—सकि १ न पाहणें २ इच्छा मागणें ( ? ) 'मागता आपुली सुखगोष्टी। अलोचावया वेगळा नुटी।'–एभा ११ १०३६ [ स अ+लोचन ]

**अलोचन जागरण**—न डोळे न मिटता रात्रभर केलेलें जागरण, अखंड जागर [ स अ+लोचन+जागरणम् ]

**अलोट**—वि १ मागें न परतणारा–पडणारा, फरक न पाड णारा, न बदलणारा–उलटणारा–फिरणारा, २ दुर्निवार अनिवार्य आतां घेई शाप दुर्गम। जो कां अलोट हरिहरा।' मुआदि १९ ६८, 'मग तिनें शापिलें त्यातें। जो अलोट हरिहरातें।' ३ अनि र्वचनीय, अचाट, अपरपार, अतिशय 'कीं गगन चक्र उठावलें अलोट। काळरात्रीचें।'–शिशु ९३१ ४ अचूक, खरें ५ निश्चित, दृढ 'जेणें चैतन्य ईश्वरा ब्रह्मा। देहचि केलें परमसीमा। तया आत्मा कर्ता हा भ्रमा। अलोट उपजे॥'–ज्ञा १८ ३८२, –एभा २०. ११३ ६ अनुल्लंघनीय, दूर टाळून देता न येणारें, अतिरस्करणीय, 'त्या आज्ञा अलोट माते' [ स अ+लुट्=लोटणें ]

**अलोट**—पु अधिक परिचय किंवा तरबेजपणा निपुणता, अनायासानें–सवयीनें आलेला शहाणपणा [ स आलोड्य ]

**अलोटणें**—क्रि करणें, बजावणें, साधणें, लोटणें 'हें काम मला अलाटणार नाहीं' [ स आलुट् ]

**अलोडणें**—सकि १ आलोडणें, धुडाळणें, शोधणें २ सर्व संदर्भ जमून येणें ? –मनको ३ पारंगत होणें, हस्तगत करणें, आलोडन करणें [ आलोडन स आ+लुड्–ड् ]

**अलोणि**—अळणी पहा 'अलोणि कीं जाहलें क्षारें। घ्राणानि वासिलें जिव्हांधें।'–कथा ४ १२ ८३ [ अलवण=अलोण=अळणी ]

**ॲलोपॅथी**—स्त्री विषमचिकित्सा, भिन्न किंवा उलट स्थिति होइल अशाप्रकारें औषधोपचार करून व्याधिनाश करणारी पद्धत याच्या उलट होमिओपॅथी [इ]

**अलोभ**—वि निर्लोभ, लोभ रहित —पु प्रेमाचा किंवा प्रीतीचा अभाव 'तुमचा एलीकडे अलोभ दिसतो' [स]

**अलोलकी**—स्त्री १ अति चाहा, महत्त्व, किंमतवान किंवा अमोलिक समजून अतिशय घेतलेली काळजी, आवड, प्रेमळपणा, भावना, लडिवाळपणा, मान, किंमत (क्रि० करणें) २ (व) कौतुक, हौस लालनपालन, लाड, आवड

**अलोलिक**—न १ अलोलकी पहा 'सर्वत्रासी भजनाची अलोलिक।' —सप्र ८ ९१ —वि चमत्कारिक, आश्चर्यकारक नावीन्याचें, कौतुकास्पद, अपूर्व 'रामावेगळें अलोलिक। ता मज दिधले तिन्ही लोक।' —वेणासीस्व १ ३८ २ प्रेमळ, आवडतें, हृदयंगम, लडिवाळपणाचें (भाषण, चालरीत, वागणुक) 'पुढील कथा अलोलिक।' —एरुस्व १० १०० ३ सुंदर, नाजुक, सुकुमार, उत्कृष्ट (माणूस, स्वभाव) 'ते महालावण्यरूपकळा। शृंगारें आथिली मगळा। चंद्रवदनीं तेजकळा। अलोलिक॥' —कथा २ ११ २० [स आलोलिक] ०तालोलीक—न लाड, लडिवाळपणाची वागणूक, कोड पुरविणें, कौतुक करणें, खुशामत करणें, मिजास पुरविणें 'मी नवऱ्याचें अलोलिक्तालोलीक वोठपर्यंत करूं?' [चालोलीक द्वि] ०रचना—स्त्री अपूर्व रचना–घडण (विशे सृष्टीची) 'अलोलिक रचना दाखविली।' —य १० [स]

**अलोलुपत्व**—न अनासक्ति, निर्लोभता, लोभ नसणें, निरिच्छा, 'अलोलुपत्वदशा ठाकी। जाण ते हे।' —ज्ञा १६ १६७ [स]

**अलौकिक**—वि १ चमत्कारिक, जगाविरहित, लोकोत्तर, अद्वितीय, विलक्षण, अपूर्व, असाधारण (इसम, क्रिया, गुण, दोष वगैरे) 'विश्व हें मोहरें लावावें। अलौकिक नोहावें। लोकाप्रति।' —ज्ञा ३ १७१ २ अरण्यवासी, लोकांत (जगात) न राहणारा —पु दुर्लौकिक दुष्कीर्ति अपमान, फजिती, सार्वत्रिक अनादर [ग]

**अल्**—१ अरबी भाषेंतील षष्ठीचा प्रत्यय, चा ची चे उ० अल् बदनि=देहाचा २ इंग्रजी 'दी' प्रमाणें निश्चितार्थी उपपद उ० अल्किमि–अल्=उपपद+किमि=धातुविपाक

**अल्क**—कल्याव, खार, क्षार अम्लप्रतियोगी (इ अल्कली) अल्क पदार्थांचे विशिष्ट गुणधर्म हे पाण्यांत विरघळतात, अम्लांचें निर्गुणीकरण करतात, सेंद्रिय पदार्थांना जाळतात वगैरे अल्क किंवा अनाम्ल यांची क्रिया अम्लावर झाल्यास अम्लांतून उज्ज निघतो होऊन पाणी बनतें [अर अल्+कल्यि=भाजणें, राख]

**अल्कल अल्कहल**—पु अर्क, अल्कोहल, मद्यार्क [अर अल्+कोह्ल=सुरमा तुल० फ कल्या=दारू]

**अल्कली**—अल्क पहा

**अल्काव**—पु मायना, पदव्या, अलकाब पहा 'हलका अल्काव लिहिलियामुळें विषम मानितात।' —दिमरा १ ७ [अर अल्काव-लकबचें अव]

**अल्कोद**—पु वनस्पतिजन्य व फार विषारी अनाम्ल [इ अल्कलाइड]

**अल्कोनेट**—न एक विलायती रंगाची वनस्पती, याच्या मुळांत एक उत्तम लाल रंग असतो निरनिराळीं तेलें, रोगणें, मद्यें, द्रव यामध्यें उपयोग करतात (सामा) एक तांबडा रंग (इ) अल्कनेट [अर. अल्+हेना=वनस्पति, स्पॅ अल्कना]

**अल्खालक**—अलखालक पहा

**अलगर्जी**—वि स्वार्थी अल्गरजी पहा 'आता कशाला जाऊन राहिला पोकळ अल्गर्जी।' —पला १७१ [फा अहलि–गरज्]

**अल्गुज**—अल्गुजें पहा.

**अल्जिब्रा**—पु बीजगणित (इ) [अर अल्+जबरा=पुन्हां एकत्र करणें]

**अल्तम्गा**—बक्षीस सनद, अल्तमघा पहा 'पर्वाना अल्तम्गा' —पया २३ [तुर्की अल्तम्घा]

**अल्प**—वि १ थोडें, लहान, कोतें म्हृ० अल्प मोली बहु गुणी सामाशब्द—अल्पबुद्धि–बल–व्यापार–लाभ–भाषी–विद्य–व्यय, २ क्षुद्र (जन, पुरुष), दरिद्रि, भिकारी 'कृष्णासि भेट लाहो स्पर्शसुख जगीं अल्प्य बल्पा तें।' —मोकर्ण ५० १६ ३ मूढ, मूर्ख 'मानिति माया केवळ अल्प सभेंतील भूमि–तळ–पट हो।' —मोसभा ५ ८७ [स] ०करणी–स्त्री थोडें, किंचित् किंवा अपुरें करणें 'अल्प करणी बाभाट बहुत।' ०कर्णी–वि विप्र अल्पकानी १ हलक्या कानाचा, कानपिसा, सहज विश्वास ठेवणारा, भाविक, भोळा, श्रद्धाळु २ गुप्त गोष्ट ज्याच्याजवळ ठरत नाहीं असा, निभेचा हलका ०कालिक तारे–पु अव क्षणिक दिसणारीं नक्षत्रें ०क्रोधी–वि चिडखोर, शीघ्रसंतापी, शीघ्रकोपी ०खादी–वि थोडेसें खाणारा 'अशा प्रकारची आरूढशिंगी, कृष्ण वर्णी, बहुदुधी अल्पखादी व अल्पमोली गाय पैदा करावी' —आगर ३ ८४ ०गति–वि मंदगतीचा ०गुणें–क्रिवि सहज, थोडक्यांत आणिक एक आह्मां दर्में। मुक्ति हाय अल्पगुणें।' —गुच २९ १९० ०गोष्ट–स्त्री लहान बाब, क्षुल्लक गोष्ट, बिनमहत्त्वाची बाब ०ग्रह–पु क्षिकोळग्रह (आकाशांतील) (इ) अस्टरॉईड ०जनसत्ताक–वि थोड्याशा लोकांची हुकमत असलेलें —नि ८२ ०तृष्णा–स्त्री थोडीशी तहान, हाव ०दृष्टि–वि १ आकुंचित कोत्या मनाचा, अदूरदर्शीचा २ बारकाईनें व काळजीनें पाहणारा, काटेकोर, बारीकसारीक दर्शील पाहणारा ३ (ल) कृपण चिकट ०धन–वि गरीब दरिद्री, कंगाल, अपुऱ्या साधनाचा, ऐपतीचा ०निद्रा–वि थोडीशी झोप

ज्याला पुरते असा, ज्याची झोंप लवकर मोडते असा ०प्राण-पु व्यजनांतील एक भेद जीं व्यजनें उच्चारण्याला फार सोपीं आहेत तीं ज्यात हकाराचा ध्वनि येत नाहीं तीं, जोर न देतां सहज उच्चारवयाचा साधा उच्चार किंवा अक्षर उ० क्, ग्, ङ्, च्, ज्, ञ्, ट्, ड्, ण्, त्, द्, न्, प्, ब्, म्, य्, र्, ल्, आणि ळ् वगैरे २० महाप्राण पहा ०बुद्धि-मति-वि कोत्याबुद्धीचा, अल्प समजुतीचा ०भाष-भाषी-वि मितभाषी, अबोलका, वटवट न करणारा, ०मोली-वि थोडक्या किंमतीचा, हलक्या किंमतीचा, स्वस्त म्ह० अल्पमोली बहुगुणी. ०वय-वयस्क-वि ल्हान उमरीचा, बाल ०विचार-री-अल्पबुद्धि पहा विद्य द्या-वि थोडकें शिकलेला, बरवर ज्ञान असलेला, उथळ ज्ञान असलेला म्ह० अल्पविद्यो महागर्वी ०विषय-पु क्षुल्लक बाब, गोष्ट, हलकें काम, बारीक सारीक प्रकरण ०वृत्त-न ल्हान वर्तुळ-मडळ ( भौगोलिक किंवा खगोलिक ), लघुवृत्त ०शक्ति-वि अशक्त, निर्बळ, कम ताकद ०संख्यांक-वि थोडया प्रमाणात असलेले ( लोक, द्रव्य, वगैरे ) अल्पांश ( इ ) मायनॉरिटी ०संतुष्ट-संतोषी-समाधानी-वि तावडतोब किंवा थोडक्यात सतुष्ट होणारा, खूष होणारा, कमी महत्त्वाकाक्षी ०सत्ताकपद्धति-अल्पजनसत्ताक पहा (इ) ऑलिगार्ची ०समजूत-वि कोत्या समजुतीचा, अडाणी ०सामर्थ्य-न थोडिशी शक्ति, अल्पबल ०सिद्ध-वि थोडक्या श्रमानें-मोलानें-साधनानें मिळविलेलें, मिळालेलें, केलेलें ०स्वल्प-वि काहींसें, थोडेसें जरासें, किंचित, ल्हान प्रमाणाचें-रकमेचें, थोडेंबहुत ०ज्ञ-ज्ञान-वि कोत्या बुद्धीचा, समजुतीचा, अल्पबुद्ध, अल्पसमजूत

अल्पक—वि दरिद्री, कगाल ' एके दिवसींचिनि परातें । अल्पकु जैसा ॥ ' -ज्ञा १६ २२७ [ स ]

अल्पत्व—न १ थोडेपणा, कमीपणा २ ( सगीत ) राग लाप करताना एखादा स्वर थोडक्या प्रमाणात घेणें, ह्याचे प्रकार दोन आहेत लघन व अनाभ्यास [ स ]

अल्पाविणें—उक्रि बुडविणें, आप्लविणें ( अप ) पहा ' तिन्ही लोक अल्पावती -विउ ५ ३७ [स आप्लवन]

अल्पश —क्रिवि किंचित, थोड्या प्रमाणात [ स ]

अल्पाक—न दक्षिण अमेरिकेंतील पेरु देशात एक अल्पाका नावाचें उंटासारखें जनावर असतें, त्याच्या अगावरील लोंकर व तिच्यापासुन होणारें कापड अल्पाकाचीं ब्लँकेटें व पगे करितात ०हिरवी वि (विणकाम) सव पोत हिरव्या उभाराचा व आडवण सव तावडें, किनार कोणतीहि अशा लुगड्याची एक जात ०पिवळी-वि सव पिवळी उभार व आडवण सर्व तावडी, किनार कोणत्याहि रगाची या प्रकारचें लुगडें [ अर अल्+पेरूव्हिअन पका=पेरू देशातील एक जनावर ]

अल्पायास—पु थोडके परिश्रम, कष्ट, मेहनत प्रायः किंवा तृतीया विभक्तींत फक्त उपयोग उ० अल्पायासाचा, अल्पायासानें [ स अल्प+आयास ] म्ह० अल्पायास आणि महाफल

अल्पायु, अल्पायुष-षी—वि थोडया, अपुऱ्या आयुष्याचा, जीविताचा, थोडे दिवस जगणारा [ स अल्प+आयुस् ]

अल्पारंभ—पु हळुहळु किंवा थोडासा प्रारभ सुरुवात, सावकाश व सत्य आरंभ, मद प्रवेश, दिग्मात्र [ स अल्प+आरंभ ]

अल्पाहार—वि मिताहारी, खाणेपिणें नेमस्त, माफक असलेला —पु थोडेसें खाणें, फराळ, उपाहार [ स अल्प+आहार ]

अल्फा व ओमेगा—पु ( ख्रि ) १ आदिमाक्षर व अंतिमाक्षर २ आदिअंत ( ख्रिस्त अखिल इतिहासाचा आधार आहे आणि अर्थातच त्या इतिहासाच्या उत्पत्तिस्थितिनाशाहून त्याचें अस्तित्व भिन्न आहे हें यावरून दर्शविलें जातें ) ' प्रभु देव म्हणतो, मी अल्फा व ओमेगा आहे ' -प्रक १ ८ [ग्रीक वर्णमालेंतील पहिलें व शेवटलें मुळाक्षर ]

अल्वत-ता—अल्बत पहा ' अल्वता येणें, काहीं मुलाहिजा न करणें ' -रा १७७

अल्विदा—पु अखेरचा सलाम ताबूत बुडविल्यानंतर ह्याचा उच्चार करतात [ अर अल्+विदाअ=पाठवणूक ]

अल्मारी—अलमारी पहा

अल्मुल्कलिल्लाह—' विश्व परमेश्वरासाठीं आहे ' हें वाक्य आदिलशाही बादशाही फर्मानाचे प्रारभीं नेहमी असे [ अर ]

अल्याड पल्याड—अलाड पहा

अल्युमिनिअम—न एक रासायनिक धातुरूप मूलद्रव्य, हें शुद्ध स्वरूपात सापडत नसून सिलिकेट रूपानें इतर पदार्थांशीं सयुक्त स्थितींत सापडतें ही धातु फार हलकी व पाढरी असते हिचे पातळ पत्रे करून त्याचीं भाडीं करतात तारहि काढता येते हीवर क्षाराचा परिणाम होतो ही डाकानें जडत नाही ( शाप ) रसट [ इ ] ०ब्रॉंझ-स्त्री सोन्यासारखी दिसणारी परंतु सोन्याहून कठिण अल्युमिनिअम व तावें यांची मिश्र धातु ही हलकी असते हिच्या डब्या, साखळ्या व काहीं अलकार करतात [ इ अल्युमिनिअम+ब्रॉंझ ]

अल्ल—अलें पहा

अल्लख—वि अलगअलग, स्वतत्र अलग पहा ' झगडे, बाजे फाकडे अल्लख अल्ख ' -ऐपो २४० [ स अ+लक्ष् ]

अल्लख—अलख पहा ०दादोजी-पु (गो ) कपटक मनुष्य

अल्लड, अल्लडड—वि १ अननुभवी, कच्चा, निपुण नसलेला, प्रौढ नसलेला कुशल नसलेला, अपक्व बुद्धीचा अज्ञानी ( माणूस विशेषत तरुण ) २ अपेट पहा [ हिं अल्हड का अल्ड=दाणगाई, अड्ड=दगखोर मल्याळी अले ]

**अल्लफ**—अल्फ पहा

**अल्ला, अल्लाह्**—पु (मुसलमानात) ईश्वर, देव, खुदा 'अग्ना करे सो होय बाबा करताल्का सिरताज।' —तुगा ३२७ —उद्गा (गो) वा! ओ-गो! एक उद्गार ०अल्ला—उद्गा आश्चर्य किंवा दुःखोद्गार **अल्लाहो अकबर**—ईश्वर सर्वश्रेष्ठ आहे **अल्लाची गाय**—(ल) अत्यत गरीब निरुपद्रवी माणूस (कारण मुसलमान खाटीक गाईच्या मानेवर सुरी ठेवीत असताहि ती शात व स्तब्ध असते) [अर अल्+इलाह्=देव, अल्लाह्, हिब्रू एलोहा तुल० स अग्ना=देवी]

**अल्लाद-दी, अल्हाद्-दी**—अलाद पहा 'हा! हा! काचेचें माडें आहे, फुटेल, अलाद ठेव' 'मी अलादीच जाऊन त्याच्या मागें बसून राहिलों' [स अल्+लग् तुल अर अल्स्त=लोंबणें, टागणें]

**अल्लारखी**—वि परमेश्वरानें राखलेला किंवा सुरक्षित ठेवलेला ज्याला कोणी वाली नाहीं असा, अनाथ इसम, किंवा कोणी पहात नाहीं अशी बाब [अग्ना+रखी=राखणारा]

**अल्लारशी, अल्ला ऋषि, अल्लारुपी**—वि १ ढिलें, ढिलाईचें, निष्काळजीपणाचें, गैदीपणाचें, गबाळग्रथी, अव्यवस्थित (काम, धागगुफ) २ नेभळट, माभळभट, भोंगळट, ढिला, शिथिल, सुस्त, हयगयी, दुर्लक्ष करणारा (माणूस) 'टोपी कोणीकडे, झोडा कोणीकडे, अल्लारशी आहे' [अल्ला+वासी किंवा ऋषि]

**अल्हाद**—पु आनद, आह्लाद पहा [स आह्लाद]

**अल्हें**—क्रिवि त्वरत, एकदम —शर [स अ+लघु—लहु—ल्ह]

**अल्होट**—अगोड पहा 'पण ते अभग अल्होट।' —उषा १६७६

**अल्ह्या**—पु स्त्री (रागीत) एक रागिणी —राग प्रकार

**अव**—शअ बाहेर, पासून खालीं, पासून दूर, रान —उपसर्ग १ न्यूनता, ऱ्हास, कमीपणा उ० अवदशा २ अनादर उ० अवज्ञा, अपमान ३ निश्चय उ० अवधारण ४ विस्तार, व्याप, पसारा उ० अवकीर्ण ५ आधार उ० अवलब ६ खालीं, खालीं जाणें उ० अवतार, अवगाह शिवाय अप पहा [स]

**अवई**—अवाई पहा

**अवकदा**—क्रिवि (काव्य) एकाएकीं, अकस्मात, एकदम, अवचट पहा

**अवंकण-णी**—स्त्री दुसऱ्या मळणीच्या वेळचें धान्य, अकण पहा [स अव—अल्प+कण]

**अवंकणी**—स्त्री अटकळ, आकलन 'तें ही उन्मेषाचिय पेठे। गुणा अवकणी भरीन दिठीचि साटें॥' —ऋ १४ [अवाका पहा]

**अवकणें**—अकि विप्र अविकणें (कों) अधिक पिकून जाणें व बिघडणें अरगणें पहा [स अति+पच्]

**अवकणें**—अवाकणें पहा

**अवकत-द**—अवकात पहा

**अवकल**—वि १ न आकळलेला, अनावर, दाबात नसलेला, ओटाळ, हट्टी, बेलगामी २ आकळण्यास कठिण, दुःसाध्य, दाडगा [स अव+आकलन]

**अवकल-ळ**—स्त्री १ आयुष्यातील उतार, ऱ्हास, अधःपात, शक्तिहानि, सत्त्वहानि, दुर्बलता, निःसत्त्वता [स अव+कला] ०तवकल—तवकल पहा

**अवकलणें**—अकि उतरती लागणें, कमजोर होणें, ऱ्हास पावणें (आयुष्य) [स अव+कल]

**अवकहडाचक**—न (ज्योतिष) मुलाचा जन्म ज्या नक्षत्रावर झाला असेल त्या नक्षत्राचे चार चरण कल्पून त्यास दिलेल्या सज्ञेवरून नाव (विशेष सध्येंतील) ठेवण्याविषयीं तयार केलेलें कोष्टकवजा चक्र यात प्रत्येक नक्षत्राच्या चारी चरणाच्या निरनिराळ्या सज्ञा, अत्य—मध्य इत्यादि नाडी, जाति, गण, योनि, नक्षत्र, राशि इत्यादि दाखविलेल्या असतात [अवक ग्री आल्फा बीटा गॅमा ६० अर अलीफ, बे, पे]

**अवकळवर्णी**—स्त्री अकाळी पाऊस [स अव+काल+वन=पाणी]

**अवकळा**—वि तेजोहीन, निःसत्त्व 'फल्दत्ता अवकळी करीन मी।' —शिशु २७ —स्त्री १ तेजोहीन दशा, अवदशा, निस्तेजता, ऱ्हास उतरती कळा, अधःपात 'कटाक्षाचा मोसु देखिला। तेणें नीलोत्पला जाली अवकळा॥' —शिशु ८०६ 'यमदमा अवकळा आणिली।' —ज्ञा ९ १९८ २ दुर्दशा, अप्रतिष्ठा, फजिती 'आणि हे पञ्ता पळा नेदिती। धरूनि अवकळा करिती॥' —ज्ञा २ २१८ 'हाण नेईल भीमकबाळा। यासी अवकळा वरील' —एरुस्व २ ४० [स अव+कला]

**अवकात-द**—स्त्री १ शक्ति, सामर्थ्य, प्राज्ञा, ताकद, बळ, उपाय साधन (शरीर—धनसबधीं) २ निर्वाह, गुजारा (ना) अवखाद 'अबे चाल, मेले माराची तुटी का अवखाद आहे?' [अर औकात=परिस्थिति]

**अवकादा**—पु पृथक् ओझें? —शर (गोहिमह)

**अवकाल**—पु अकाल, अयोग्य काळ, अवेळ अवकाळ पहा

**अवकाश**—पु १ अवधि, समय, वेळ, प्रसग २ फुरसत, निवातपणाची वळ, सवड, रिकामा वेळ 'व्योमकेश भर्यीकेश। स्मरतो नाही ज्या अवकाश॥' —मुविराट ५ २७ ३ जागा, प्रदेश,

स्थल 'न त्यान अवकाश या स्थळ दिलें सदा को दया।' –केका १७ ४ मधलें अंतर–जागा–काळ 'पाहता ब्रह्मी नाहीं अव काशु। दोहीं माजीं॥' –ज्ञा ६ ४० ५ भेद, वेगळेपणा, अंतर 'तो आत्मारज्जुसर्पाभास। अवकाश हा।' –यथादी २ ६४५ ६ विलंब, उशीर, वेळ ७ सामर्थ्य 'मातें जाणावया होआवा। अवकाशु गा।' –ज्ञा १० ७१ ८ शून्य, आकाश, पोकळी, पोकळ जागा, रिकामी जागा 'येथून तेथवरी अवकाश' दा २० १० २२ 'घुरु शस्त्रजाळ पसरिति अवकाशा न उरवी नभाच्या तें।' –मोभीष्म १० ४५ ९ सवड, सोय, संधि [स] ०धरणें–थोडा वेळ थांबणें, वाट पहाणें, दम धरणें

**अवकाळ**—पु अकाल, अयोग्य वेळ, भलतीच वेळ –स्त्री दुर्दशा, वाईट काळ 'पुढरी मुट आवळयाची राख पन्ना कप काळीला।' –ऐपो ४१० –वि अकाली आलेला, योग्य वेळेपूर्वी देणारा 'एर्‍हवीं तरी आकाश मोडी। जो गर्जोन ब्रह्मांड फोडी तो अवकाळु मेघु काय घडी। राहात आहे॥' –ज्ञा १७ २५१ –क्रिवि सांप्रत, सध्या, हल्ली, अलीकडे, आताशीं [स अव+ काल]

**अवकाळ**—वि (व) पुष्कळ, पोटभर

**अवकाळवणी**—अवकळवणी पहा

**अवकाळी–ळ्या**—वि अयोग्य काळचा, वेळगामी, अयुक्त- वेळचा, अकालीं येणारा, घडणारा, पडणारा (पाऊस वगैरे) 'हा पहा, अवकाळ्या वारा आणि पाऊस आला' –बाळमित्र २ २४

**अवकिराय**—स्त्री (कु) दुखणें, आजार [स अवक्रिया]

**अवकीर्ण**—वि पसरलेलें, विस्तारलेलें, विखुरलेलें, वरून आच्छादलेलें, माखलेलें, व्याप्त सामासशब्द–केशावकीर्ण, जलावकीर्ण पर्णावकीर्ण, पुष्पावकीर्ण, फलावकीर्ण मेघावकीर्ण, रक्तावकीर्ण, रजो वकीर्ण [स अव+कृ=पसरणें, टाकणें]

**अवकृपा**—स्त्री गैरमर्जी इतराजी, नाखुषी, राग, प्रेमाभाव [स]

**अवक्र**—वि १ वाकडा नव्हे, नसलेला, सरळ २ प्रामाणिक, निष्कपटी, शुद्धांत करणाचा 'नित्य प्रिया भजति सत अवक्र तूतें।' [स अ+वक्र=वाकडा]

**अवक्रिया**—स्त्री १ तिरस्कार, निंदा, हेटाळणी, फजिती, उपहास पाणउतारा २ अपमान, दुयगय, उपेक्षा, कमी लेखणें [स अव+कृ]

**अवखणणें**—क्रि (व) अडचणींत सापडणें, आखडणें, अव घडणें 'एका पायावर बसून बसून अवखणून गेला आहे' [स अव+धृष्]

**अवखंद**—पु मोठा खड्डा, मोठा ओहोळ 'खदक अवखदे भडमार। जळें जाती।' –दावि १४४ [स अव=खोल+खन्, अवखात=खोल खदक]

**अवखळ**—वि विप्र अवखट पहा १ अनिर्बंध, बेलगामी, आळा नाहीं असा २ उनाड, दाङगा, खोडकर (मूल) 'देहे योगासाठीं अवखळपणीं लोक पडला।' –दावि २२७ [स अव+ स्खल किंवा खल]

**अवखळा**—स्त्री कमताई, न्यूनता 'तेवीं अपेक्षेचा अव खळा। न पडे जयां।' –ज्ञा १५ ३०३ [स अव+कला]

**अवखा**—स्त्री दुखणें, विकार, विकृति, अस्वास्थ्य, असमा- धान [अर वाकिया=मृत्यु, तुल० स अवक्षेप प्रा अवक्खेव]

**अवखा**—पु अवांकबद्दल कुळीनें उपयोग अवाक पहा

**अवखात–द**—अवकात–द पहा

**अवखादणें**—अक्रि (कु) त्रासणें [स अव+खिद्]

**अवखुण**—स्त्री वाईट कृति, खोडी, दोष 'बाई! हे हरिची अवखुण गे।' –आगो ११० [स अव+शुद्–शुण किंवा अवगुण]

**अवखुळा**—पु आडकाठी, अडथळा [स अव+स्खलन]

**अवग, अवाग**—न (कु) मांसाचें हृदय व फुप्फुस [स अव+अग ?]

**अवगण**—पु अनादर, उपेक्षा, त्याग, अवगणना पहा 'अनंत तपाच्या अवगणा। जोडिलें विदेहनाम भूषणा।' –सीस्व १० ५८ [अवगणन अप]

**अवगणणें**—उक्रि तिरस्कारानें किंवा उपहासपूर्वक वागविणें, कमी लेखणें, तिरस्कारणें, अवहेलणें, अनादरणें, तुच्छ मानणें. 'पिता अवगणुनी दूतें निंदी। होय अपराधी सर्वथा।' –एरुस्व १२ १४२ [स अव+गण्]

**अवगणन–ना**—न स्त्री तिरस्कारानें किंवा हेटाळणी करून वागविणें, हिडकारणें, अवमान, अनादर, अपमान, हेटाळणी 'भक्तवचनाची अवगणना। देव सर्वथा न करीचि।' –एरुस्व ४ ७१ [स अव+गण्]

**अवगणित**—वि अवमानलेला, अपमान केलेला, तिरस्कृत, अनादृत [स]

**अवगणी**—स्त्री (काव्य) वेष, रूप, सादृश्य, सोंग, ओळख ण्याची खूण 'आत्मा घे नाना शरिराची अवगणी।' –माए ५१८ 'जो प्रसिद्ध असे पुराणीं। कृष्णत्वाची अवगणी। वलि रामातें पुर सरोनी। अवतरला येथें।' –रास २ २८९, 'घकनि पक्ष्याची अवगणी। जातीची सारसपक्षिणी। तियेशीं रतला।' [स अव+गम्]

**अवगणी**—स्त्री खोल्वा, धावणें, अवगणें पहा

**अवगणें**—क्रि १ दिसणें, सारखें वाटणें, सादृश्य असणें; भासणें 'तो सूत्रधारू राऊ तें अवगला। तो कैसा सांगों।' –शिशु ६९८ 'वारणावरी धावला मृगेंद्र। तैसा अवगला वायुपुत्र।' २ समजलें जाणें, माहीत होणें, ठाऊक होणें; जाणणें 'वृत्तांत

सर्व अवगला ' ३ धारण करणें, आवरणें, स्वीकारणें, अंगीकारणें का अवगें तरवरें । भूमिरसु । -ज्ञा १४ २८१ ४ सोंग घेणें, नटणें 'राजसा तामसा भावाची परी । तेही नटिला तो ॥ ऐसें अवगोनि मुरारी । येतुसें गोकुळा माझारी ।' -दाव ८९-९० [स अव+गम्]

**अवगणें**—अक्रि (कों) वाव्हळपणें, स्वच्छंदीपणें वागणें (वर्ना) माणसातून उठणें [स अव+गम्=जाणें]

**अवंगणें**—अक्रि थांबणें, खाळंबणें, तिष्ठत राहणें वाट पहाणें, मार्गप्रतीक्षा करीत राहणें [स अव+वृ=थांबणें]

**अवगत**—वि ठाऊक असलेला, कळलेला समजलेला माहीत असलेला 'प्रणयचपला त्या भ्रमीला । अवगत नव्हल्या कुमारिकेला ।' -बालकवि (फुलराणी) -पु ज्ञान, माहीत असलेली गोष्ट 'कोण कधीं आला काय तो भाव । सुचारिता अवगतामार्गी ठेली ।' -दावि ७६३ [स]

**अवगत, औवग**—स्त्री (कु) गरोदरपणात मेलेली स्त्री [स अवगत]

**अवगति**—स्त्री १ अधोगति, अधःपात (नरकात दुस्थितींत वगैरे) 'युद्ध सोडून जे पळाले । ते पावले अवगती ।' -एरुस्व १०१८ २ (सामा) खालीं येणें, उतार, उतरण ३ अवगम पहा [स]

**अवगम**—पु ज्ञान, जाणीव, आकलन, अवगमिणें जाणणें [स]

**अवगमणें**—अक्रि वाटणें, भासणें, जाणणें 'गज अवगम लिया दोनी । मीमांसा श्रवणस्थानीं ' -ज्ञा १ १६ अवगणें पहा [स अव+गम्]

**अवगळणें**—क्रि १ टाकणें, गाळणें जो मनें विकल्पें भरला । अहंतेचा अवगळला । घुडा जैसा ।' -ज्ञा १३ ६७७ २ तुकून राहणें 'आणि अभिचारावेगळें । विपायें जें अवगळे ।' -ज्ञा १६ ४०१ ३ गोंगणें, चिलगणें, गळ्यात पडणें 'मागत दधिगोळ । न देता अवगळे । दापिता चोळी डाळे ।' -अमृत ६४ [स अव+गल्=गळणें]

**अवगाहणें**—अक्रि अवगाहन करणें [स अव+गाह्]

**अवगाहन**—न १ पाण्यात बुडणें बुडी मारणें स्नान करणें 'का रवि तिये त्रिभुवनीं । तिये धरुनी समुद्रावगाहनीं । -ज्ञा १ ५१ २ (शास्त्र किंवा विषय) प्रवेश शिरकाव संचार अध्ययन अभ्यास [स]

**अवगाळ**—पु गाळ, चिखल, दलदल स्त्री अंतीचनि पडे । स्वर्गें गाईचें अवगाळें ।' -ज्ञा ७ ७८ [स अव+गल्]

**अवगाळणें**—क्रि (व) तुच्छ करणें अवगाळणें पहा

**अवगी**—स्त्री घोड्याची ऐटींत थाटाची चाल (क्रि० धरणें) 'ज्या ठिकाणीं घोडा हुकुम अमान्य करील त्या ठिकाणीं अवगीनें इशारा करावा ' -अश्वप १६९ [स आ+वल्ग्=नाचणें, थयथय करणें (घोडा), प्रा आवग्ग]

**अवगुंठन**—न ल्पेटणें, ल्पविणें, आच्छादणें, गुरफटणें, वेष्टन, बुरखा, घुंगट, ओढणी [स]

**अवगुंठित**—वि वेष्टिलेलें, ल्पेटलेलें, आच्छादिलेलें, ल्पेटलेलें, बुरखा घेतलेली (स्त्री) [स]

**अवगुण**—पु १ दुर्गुण वाईट गुण, खोडी, वाईट सवय, दोष 'सकळ अवगुणामधें अवगुण । आपले अवगुण वाटती गुण ।' -दा १९८८ २ वाईट परिणाम, अपायकारक प्रयोग, अनिष्ट किंवा इजा करणारी किया (औषध, उपाय, इत्यादिकांची) [स]

**अवगुणी**—वि १ दुर्गुणी, दुराचारी 'मी अवगुणी अन्यायी । किती म्हणोन सांगों काई । आता मज पायीं । ठाव देई विठ्ठले ॥' -तुगा ५१८ २ अनिष्ट, अपायकारक, वाईट गुणधर्माचा ३ स्वैर ४ अवलक्षणी, अपशकुनी ५ खोडकर, व्रात्य [स]

**अवगून**—क्रिवि अवगूंन पहा

**अवग्र**—वि सर्व, सगळें, एकूण एक एकदर (रास, गोळा, सघ) 'पणे अवग्र लिहिविलें ।' -दावि १८१, 'क्रिया घेऊनि सोडून दिले धनी महाराज (अ)वग्र ।' -ऐपो ३४० [स अव्यग्र]

**अवग्रह-ग्राह**—पु १ थांबणें, विराम २ पाऊस पडावयाचा थांबणें, अनावृष्टि, अवर्षण ३ परिच्छेद ४ संधि झाला असता व पुढच्या शब्दाच्या आरंभीं अ असता त्याचा लोप करून त्या गवीं जें चिन्ह (ऽ) लिहितात तें [स अव+ग्रह]

**अवग्रहण**—अवघ्राण पहा मस्तक अवग्रहण करी । सप्रेम चैसवी अंकावरी ।'

**अवघड**—वि १ कठिण, दुस्तर, (करण्याला, जाण्याला, पोहोंचण्याला सोसण्याला किंवा घडण्याला), दुर्घट, जबर, दुष्कर, श्रमसाध्य, अशक्य, असंभाव्य, दुर्जेय, दुर्गम, दुर्लभ्य, दुष्प्राप्य 'मिळाला जा अवघड वर । तो एखादा जी विचार ।' -कथा १ ३ ११ २ अन्नाणीचें अप्रशस्त अवघड (स्थळ, जागा) ३ विलक्षण, ऐकोनतर लोकयाद्य वाईट तहेवाईक (कृत्य) ४ गैर, भलतेंच, चमत्कारिक गैरमाईचें, धाटाळ्याचें, संकटावह (स्थळ, परिस्थिति अवस्था) अवघड नागीं टुस व जाणें वैय ' ५ कठिण (बहुतक सर लाक्षणिक अर्थी) जसें विलक्षण, चमत्कारिक, अनियमित वर्तिस्त (करणी) दुखपद, त्रास देणारी, पीडा करणारी (गाठ) बुद्धीला न पटणारें, वठनसरीचें, अयोग्य, सर्पाचें आढून साप्या आणिलें हा अंगा दीपाचिये जिव्हीं । अवघड धू आर्धी ।' -ज्ञा १८ ७८० ६ वेडेवाकडें, चमत्कारिक, भिन्नभिन्न आकाराचें 'होतु का उजु वाहुडें । परि घाईचें हृ न मोडे ।'

तेसीं भूतें अवघडे । परि वस्तु उजू । '-ज्ञा १३ १०६१ ७ दु साध्य, कठिण (दुराणें) [स अव+घट्] -न अडचण, लचांड, सकट, ग्रास 'समर्थाचेनि नामेचि अवघडे निस्तरीजति' -पंचतंत्र ३ ९ ०वाटणें, होणें-१ अस्वास्थ्य, असमाधान वाटणें, सकोच वाटणें, फसेसें वाटणें 'मला त्याच्या घरीं अवघड वाटतें' २ गोंधळणें, भांबावणें, घोंटाळ्यात पडणें ३ असह्य वाटणें, दु ख होणें 'मुलगी सासरीं जावयाला निघाली, तेव्हा तिला अति अवघड वाटलें' ०जागा-जाप वगैरे जागा, अडसधि 'अवघड जागीं दु ख आणि जावई वैद्य'

**अवघडणें**—अक्रि १ अडचणींत-सकटात सांपडणें, पडणें २ पेंचात सापडणें, गोंधळणें, भांबावणें घाबरणें, मति गुग होणें ३ अडकून राहणें, खोड्यात पडणें, गोत्यात येणें, अडचणींत पडणें, पचायतींत, तारांबळींत सापडणें ४ एखाद्याची निकड लागणें, गैरसोय होणें, नेट लागणें, तगादा लागणें ५ अडचणणें, अडणें, अतिशय ताण बसणें, अडग्या होणें, कोंडमारा होणें, कुचंबणें 'स्वभाव त्याचागें अवघडला।'-विक ३ 'ऐसा स्मृतिभ्रंशु घडे। मग सर्वथा बुद्धि अवघडे।' -ज्ञा २ ३२७ ६ (शरीराचें गात्र) भारावणें, मुग्या येणें (रक्तप्रवाह बद झाल्यामुळें), ताठणें 'याला घे, माझा हात अवघडला' ७ गरोदरपणामुळें भारावणें 'शिव मेरीवर सडा शिंपला अवघडल्या तो हातीं' -शिवमाय (स्वातन्त्र्य शार्दूल)

**अवघडणें**—अक्रि अडचणींत आणणें, कोंडणें, ग्रास देणें अवघडणें पहा 'की अविद्यादुर्गीं अवघडी। अविचितीं मोक्षाची घाडी। भणोनि विषयाचिया नाइलुवाडी। पळतां दीसती।' -शिशु ३४ [अवघड]

**अवघडनाथ**—पु १ अडव्या अगाचा, स्थूल, गलेलठ्ठ, ढेर पोट्या माणूस २ (ल) ढोण्या, लठ्ठ ३ अवघड्या अवघड्या-वि अडचणी उत्पन्न करणारा, शका उपस्थित करणारा, कुरकुरणारा भव्व्हळ करणारा [अवघड + नाथ]

**अवघडपंथ-थी**—पु वैराग्याचा एक पथ, अघारपथ पहा

**अवघा**—वि १ सगळा, सर्व २ प्रत्येकजण 'अवघाचि काळ जरी सजे। तरी अवघेचि होती राजे।' -दा १८ १० ४ [स अप्रवत्, प्रा अगवा-अघवा-अवघा]

**अवघात**—स्त्री (ना') गैर हगाम, गैर मोसम [स अव+हन्]

**अवघ्राण**—न १ वास घेणें, हुगणें २ टाळू हुगून शुभचिंतन करणें [स अव+घ्रा]

**अवघ्रात**—वि वास घेतलेला हुंगलेला [स]

**अवचक**—वि अवाच्य, अगणित, अमूप 'अवचक धनाचा ठेवा। ओपूनि पाठविलें पार्थिवा।' -मुआदि २० १५५ [स अ+वच्]

**अवंचक**—वि प्रामाणिक, न फसविणारा 'ऐसा अवचक वदोनि नृपाल आला' -नल ४४ [स अ+वञ्च्] ०पण-पु पणा-न (काव्य) फसवणुकीचा अभाव कापट्याचा अभाव, चोख व्यवहार 'धान्य ठेविलें त्या सांठून। तें देवाल्याचे कामा लावून। अवचकपणें सर्वथें॥' -मोरो [स]

**अवचट**—वि १ आकस्मिक, दैववशात् प्राप्त 'अदामा ये तुझा अवचट मला लाभ घडला।' -सारह ५ ७२ 'अवचट सुकृतें नारदेंहा झाली भेटी।' -श्रीधर नवनीत ४४३ -न १ अनपेक्षित, अनिष्ट गोष्ट, अतर्कित अरिष्ट 'अवचटाचें कवचट झालें'=विलक्षण अनर्थ गुदरला -क्रिवि अकस्मात्, एकदम, एकाएकीं, अकल्पित पणें, अवचित, सतत, सहजगत्या 'तैसें पुरुषाचें दुर्लभ दर्शन। अवचटें कृपाकर लागता पूर्ण।' -पाप्र ५ ८० २ (ना व) क्वचित् इतर रूपें-अवचटी -एभा २ ५५५ अवचटें -ज्ञा २ १९० [स अवचित्त]

**अवचित-ता-तां-तीं**—क्रिवि १ अकस्मात्, एकाएकीं, अकल्पितपणें, सहजगत्या, अवचट 'वरपडा जाहला अवचिता।' -ज्ञा ६ १६८ (व) क्वचित् [स अव+चित्त, किंवा अयाचित, किंवा आहोस्वित्? तुल० सिं ओचितो] ०च्या कवचित-वचित्, केव्हातरीं 'तो आमच्याकडे अवचितच्या क्वचित येतो' ०पर्व-न एकाएकीं उद्भवलेला प्रसग 'नारद बरोबर आहे, अग हें अवचित पर्व।' -चित्रसेनगधर्व नाटक ३८

**अवचित-फळ**—न मूल होण्यासाठीं स्त्रिया एक व्रत करतात तें मकरसंक्रातीचे दिवशीं ब्राह्मणाच्या घरात कोणाला न कळत (पाण्याच्या भांड्यात वगैरे) नारळ टाकणें, असा टाकलेला नारळ [सं अवचित्+राव]

**अवचितराव**—पु १ मोठेपणाला चढलेला किंवा ज्याचें प्रस्थ वाढलें आहे असा निबाप्या किंवा अज्ञातपितृक मनुष्य २ पालक बापाच्या निदगील वारसदार झालेला किंवा तिचा उपभोग घेणारा ३ (ल) उपटसुभ [अवचित]

**अवचितिया**—वि अवस्मात्, एकाएकीं आलेला अज्ञात 'अवचितिया वृक्षाचीं अंगें।' -ज्ञा १८ १५ [अवचित]

**अवचितें, अवचित**—न एका जातीचें हळवें भात हें फार जल्द पिकतें [अवचित]

**अवचित्त**—न (गो) दुर्लक्ष, चित्त नसणें [स अव+चित्त]

**अवचित्या**—वि १ उनाड, खोडसाळ २ अवचित आलेला, अनोळखी, पूर्वी माहीत नसलेला 'अवचितयावरी सर्वस्व सांडिजे। मग चोख तरी तोचि भांडारी कीजे।' -ज्ञा १० ५२ [अवचित]

**अवचिंद, अवचिह्न**—न (कों) १ अपशकुन, दुश्चिन्ह अवलक्षण, उत्पात, अद्भुत [स अव+चिन्ह]

**अवचिंद्या**—वि १ अवलक्षणी, अपशकुनसूचक २ उनाड, गोडकर (मूल), कमनशिबी, दुर्भागी, दुर्दैवी (इसम) [म अव+चिन्ह]

**अवचिन्ह**—न दुश्चिन्ह, अशुभ गोष्ट, अपशकुनी, वाईट किंवा दुष्ट लक्षण -वि अशुभ, कुलक्षणी, [स अवचिन्ह]

**अवचीन**—वि (गो) अवचिन्ह (अप) पहा 'तो अवचीन पोर आला' 'असों अवचीन बोलों नको' [स अवचिन्ह]

**अवचुकून**—क्रिवि १ गफलतीनें, इच्छा नसताना, गैरसावध पणें, दुर्लक्षामुळें, चुकून २ अकस्मात, एकाएकीं [स अव+म चुकून]

**अवच्छिन्न**—वि १ तोडलेला, विभागलेला, वेगळा केलेला, अलग केलेला, उ० घटावच्छिन्न, पटावच्छिन्न २ वर्जित, विवक्षित, विशिष्ट, परिच्छेद केलेला अवच्छेद पहा [स]

**अवच्छेद्**—पु १ तुकडा, विभाग, विभाजन, भिन्नीकरण, वेगळें करणें, भिन्न करणें २ वियुक्तावस्था, परिच्छेद-पृथकावस्था, (रेषा, चिन्हें, फरी, वगैरेंनीं किंवा वर्ग-योग्यतेनुरूप निरनिराळी सदरें पाडून) 'तैसीं सिनानीं चारी पदें। श्लोक श्लोकावच्छेदें।' -ज्ञा १८ ५४ ३ विभागणारी, वेगळें करणारी खूण, चिन्ह, जागा, फाड, चीर, छेद, खाप, खाच, खाड, सड फट, साध (ऽ)अव ग्रह, (॥) चरणरेघ, इत्यादि सामासिक शब्दांचीं पदें किंवा कवि तेचे चरण दाखविणारीं चिन्हें ४ उध्दृत करणें, उतारा ५ व्यतिरेक, वर्जन, व्यवच्छेद, निरसन, अवकर्षण ६ आक्रमण, व्याप्ति, वस्ती (उ० पृथ्वीमध्यें गंध, अग्नींत उष्णता, विश्वांत ब्रह्म यांची) स्वभावसिध्द किंवा अविनाशभूत अधिष्ठान (उ० आदिभौतिक पदा र्थांच्या ठायीं घटकावयवाचें, सजीव प्राण्याच्या ठायीं मृत्यूचें) 'आहारनिद्राभय जीवावच्छेदेंकरून आहे' ७ विशेष गुण-धर्म व्यावर्तक लक्षण, वैशिष्ट्य ८ सीमा, मर्यादा, अवरोधक पदार्थ किंवा वस्तु [स] **अवच्छेदकावच्छेदेंकरून**-सर्वांना (व्यक्ति, जाती, वर्ग, पद वगैरे) वेगळे किंवा त्या सर्वांचा समावेश करून, सर्वांचा (माणसें, प्रकरणें, गोष्टी वगैरेंचा) स्वीकार करून किंवा त्याची गणना करून, कोणतेंहि वर्ज्य केलें असता किंवा कसेंहि व्यक्त केलें असता **एकसमयावच्छेदेंकरून**-एकदम, एकाचवेळीं, एकाच रोखेंत, दुस रीकडे लक्ष न देता, विश्रांति न घेता (करणें, उरकणें) **एतत्काला वच्छेदेंकरून**-फक्त याच वेळीं, समयीं **शास्त्यवच्छेदेंकरून**-(माझी, तुझी) सर्व शक्ति खर्च करून

**अवच्छेदक**—वि तोडणारा, विभागणारा, वाघणारा, अव च्छेद करणारा, अवरोधक, व्यापक, मवध्द, अधिष्ठित [स]

**अवच्छेदनाच्छेद**—पु १ अपवाद मर्यादा, परिच्छेद नाहींसें करणें, वैशिष्ट्य, समतेंत, साधारणपणात आणणें [स]

**अवच्छेदणें**—क्रि वेगळें करणें 'जर ब्रह्म अवच्छेदवे' -भाए ५०० [स अव+छिद्=तोडणें]

**अवजड-जाड-झड**—वि १ फार मोठें, अचाट, अवाढव्य, अफाट, दांडगा, भारी, जड वजनाचा, स्थूल, धोजड 'ससार शब्द अवजड, पुरुष स्त्री दोन हीं तया चाकें। जरि एक उच, दुसरें नीच, तरी शकट हा कसा हाकें?॥' -या अ भिडे २ अवघड, कष्टप्रद [स अव+जड]

**अवजणें**—अक्रि (व) उपयुक्त होणें, वर्तणें, चालणें, उपयोगी पडणें 'आईचा हात अवजत नाहीं आजच्या दिवस' 'आमच्या हातचें अन्न त्याला अवजत नाहीं म्हणून तो स्वत स्वयंपाक करतो' [स आ+व्रज्=जाणें, हालणें, गो वचणें=जाणें]

**अवजतन**—न आबाळ, दुर्लक्षपणाची, निष्काळजीपणाची वागणूक, हेळसांड, कळकळीचा अभाव, हयगय [स अव+यत्=प्रयत्न करणें म जतन]

**अवजा**—पु वेळ, उशीर, अवधि 'दासा मनीं तत्वविजा अवजा न लागे।' -दावि १३८ [अवधि?]

**अवंजा, औजा**—पु (कों) भातें लावण्याचा हंगाम [अवधि?]

**अवजार**—न १ मोठें शीड, (सामा) शीड २ हत्यार (कारागिराचें) ३ (ल) साधन, वस्तु [अर औज़ार=गलव तांचें साहित्य, हिं ओजाउ]

**अवजाळी**—वि (कों) दांडगा, अडदांड, उनाड [स अव+ज्वल् किंवा जाळ]

**अवज्या, अवजता**—वि (व) ज्याच्या हातचें पाणी वगैरे चालतें व जो घरांत वापर करूं शकतो असा (माणूस) [स आ+व्रज्=जाणें, चालणें, अवजणें पहा]

**अवझरता-झडता**—(म) ओझरता पहा

**अवझा**—स्त्री हिडिस, ओंगळ, राड, राइरु, घाण, अमंगळ स्त्री -वि खराब, टाकाऊ, जड 'असे झाला माया म्हणून सजल जीव अवझा।' -सारुह ६ १६० [स अ+ओज=ओझ्य=बलवंत किंवा स अवद्य, प्रा अवज्ज=निंद्य, पाप]

**अवट**—पु १ इमारती लाकडाचा-जळाऊ ओंडक्याचा ढीग-रास [वैदिक अवत=खळगा, स वट्=वाघणें, रचणें, का औट्टु, म ओटा]

**अवट-अवटोण**—ओहोटी पहा

**अवटकी**—स्त्री १ अवतीची कचेरी, नोकरी, मालमत्ता २ ओटकी पहा

**अवटणें**—अक्रि (चां) ओहटणें, ओहोटी लागणें -क्रि शेतांतील पीक गोळा करून दणें [स आ+वृत्, प्रा अवि=शोषणें]

**अवटणें**—न वीट, तिटकारा 'कालिदासाच्या काव्यरूप पक्वान्नांनीं अवटणें आलेल्या वाचकाच्या जिभेला भिन्न रुचि उत्पन्न

करण्याकरिता पै अण्णा किर्लोस्कर यांनी संगीत सौभद्रांत तिल्वट करून वाढलें ' –आगर ३ १४५ [ तिरणें ]

**अवटरणें-अवटारणें-अवठरणें**—उक्रि १ आनमणें 'पानें अवटरतात ' २ संकोच पावणें, आटणें, आखूड होणें ( कमावलेलें कातडें, दोरा ) 'आगरर्‍याचें कापड अवटरलें ' ३ ताटरणें, ताठणें, अवघडणें ( कपर, मान इत्यादि उचर-उचर भरल्यामुळें ) ४ ( ल ) उदासीनपणें मुग्ध होणें, आखडून बसणें, रुसणें, अंग काढून घेणें [ स आकुंचन प्रा आउंटण-आउट्ट-पचट ]

**अवटळणें-अवटाळणें**—अवटरणें पहा

**अवटला**—पु ताठा, ताठरपणा, लचक अवटळणें-अवटरणें पहा 'नाहीं तर अवटला भरेल ' ( क्रि० भरणें-येणें-काढणें-निघणें )

**अवटा**—पु. कुडेपणा, कुरटेपणा, घुमेपणा, ताठरता, खुद्दन असणें खळ घेणें ( क्रि० धरणें-घेणें ) [ स आकृष्ट किंवा आवृत्त, प्रा आवट्ट=मागें खेंचलेला अवटणें पहा ]

**अवटाण**—न अयोग्य वेळ, गैर हंगाम अवताण पहा 'भर तीन तासावर होडींत बस, अवटाण झालें म्हणजे चालणार नाहीं ' [ स अव+तन् ]

**अवटाळणें**—उक्रि १ कवटाळणें, मिठी मारणें, धरणें, पकडणें वेगानें, कवटून धरणें २ ( ल ) समावेश करणें, आकळणें, अंतर्भूत करणें ३ जमविणें, साठविणें ( वाईट प्रकारांनीं किंवा फसवणुकीनें पैसा वगैरे ) [ कवटाळणें द्वि तुल० का ओट्टु=रास, ढीग ( धातु ओट्टु=जमविणें एकत्र करणें ) ]

**अवटाळणें**—उक्रि भवणीवर टाकणें दूर ढकलणें ( कपटानें ) थोपविणें [ स अव+म टाळणें ]

**अवटी**—स्त्री १ ( सोनारी धंदा ) दागिन्याच्या भागावर नक्षी अगर ठसा उमटविण्याचा एक छाप हत्यार हा काशाचा किंवा पंचरसी धातूचा असून चौकोनी किंवा लांबट कांबीसारखा असतो बहुधा याची लांबी रुंदी व उंची हीं सारखींच असतात व तोंडावर विवक्षित आकार कोरून ठेवलेला असतात काहीं प्रकार –१ पराची आवटी २ वाळ्याची आवटी ३ कलम आवटी–हिनें सोन्याच्या बांगडीवर निरनिराळे उठाव उठवितात ४ करडे-आवटी–ही नक्षी उठविण्यासाठीं लहान व बारीक कंगोर व वेलबुटी उमटलेली असते ही लांबट, मध्यें जाड व कडेच्या बाजूस पातळ होत गेलेली असते २ (तोडावयाच्या किंवा तासावयाच्या) लाकडावर घेतलेली कोरणी सारखी खाच ( क्रि० पाडणें, घेणें पाहणें ) ०काम–न अवटीचा उपयोग करून करण्याचें छापकाम [ स अवटी=खांच ]

**अवटी**—पु १ ( कारखान्यांतून धान्यादिकांचें ) मोठ्या प्रमाणावर माप करणारा मापारी २ वजन-मापावर देखरेख ठेवणारा, ज्याच्या स्वाधीन सरकारी वजनमापें असतात असा अधिकारी, बाजारांत आलेलें धान्य, माल मापणारा अधिकारी ३ सर्व शेतांतील उत्पन्न मोजून त्या अनुरोधानें सरकारसारा ठरविणारा अधिकारी मोंगली अमलांत हा वतनदार असे पण मराठी राज्यांत त्याचें वतन काढून घेतलें –समारो ? २१५ [ स आवृत, म अवट ? ]

**अवटी**—स्त्री ( व ) खोल खड्डे असलेला, उचखळ असा लांबट रस्ता ०जमीन–स्त्री पिकाची जमीन, डोंगराळ जमिनीच्या उलट [ म अवटी=खाच ]

**अवटी**—स्त्री ( गों ) ओहोटी

**अवठा**—पु अवठण रुसवेपणा, रुसण्याची लहर घुमा राग ( क्रि० धरणें, सोडणें, येणें ) [ स अव+स्थान ? ]

**अवठाण**—न एक रोग यांत घोड्याच्या अंगावर गाठी उठतात अवठाणू पहा [ स अव+उद्+स्थान ]

**अवठाण**—न १ शक्यता २ जोर, शक्ति [ स अवस्थान ]

**अवठाणूं**—न ( विरू ) उठाणू पहा गळू अवाळू, फणतूड, खाडुक

**अवड**—आवड पहा ०गाड–वि १ आवडता म्हणून गाड ( देणगी, बक्षीस, मवा ) २ आवडत्या माणसानें केलेलें म्हणून गोड ( चाकरी, देणगी ) ०चतुर–वि आवडत्या गोष्टींत चातुर्य, हुषारी दाखविणारा, आवडत्या गोष्टी जाणणारा ०चतुराई–स्त्री १ आवडत्या गोष्टींत दाखविलेलें कौशल्य २ आवडेल तें तें करणें, स्वेच्छाचार स्वच्छंदी वर्तन, आवडीची चतुराई

**अवडकचवडक, अंवड(क)चंवडक**—स्त्री १ मुलाचा खळ ओडकचौडक पहा २ पसारा, गोंधळ, अव्यवस्था ( घरांतील वस्तूंची वगैरे ) ( क्रि० करणें, मांडणें चालवणें ) ३ अव्यवस्थित गोंधळाची स्थिति अवस्था [ ध्व किंवा चिवड द्वि ? ]

**अवडचिवड**–स्त्री **अवडाचिवडा**—पु १ अव्यवस्थित पणें कालवणें कोळणें चेंदामेंदा करणें, दावणें, पिळणें, कुस्करणें २ चिवडलेली-विस्कटलेली अवस्था, चिवडाचिवड, विस्कळित स्थिति लादालगदा [ चिवडणें द्वि ]

**अवडणणें**—अक्रि कंटाळा, किळस येणें, अवढणणें पहा

**अवडणें**—न १ तोंडाची अरुचि वीट, किळस कंटाळा अवगणें पहा ( क्रि० पडणें ) अवगणें पहा २ आवडणें पहा

**अवडता**—आवडता पहा

**अवडवर, अवडावर**—न १ भपका डौल देखावा 'गाडें अवडवर रचलें असतां त्याचा शेवटीं एका क्षणांत विध्वंस होऊन जातो ' –नि ६६९ २ आवेश गर्व तोरा, ताठा ३ हूड दाखविणें आडंबर पहा [ स आडंबर ]

**अवडळ-ळु**—आवडळ पहा

**अवडा**—वि आवडा आवडता लाडका नावड शब्दाच्या जोडीनें उलट अर्थी वापरला जातो 'मला हा पुत्र अवडा ता नावडा असा नाहीं त दोघे सारखेच ' [ आवड ]

**अवडादेवडा**—वि अटवातिडवा, वाकडातिकडा, अप्रिय, रानापदायर, अपमानकारक (मनुष्य, भाषण, कृत्य इ ) [ओडवा–अवडा द्वि ]

**अवढंगी**—वि वाईट चालीचा, वेढंगी [सं अव+हिं ढग]

**अवढणणें**—अक्रि वीट–किळस–शिसारी येणें, अवढणें पडणें, कटाळा येणें, तिटकारा येणें. [?]

**अवढणें**—न वीट, तिटकारा, शिसारी, कटाळा. अवढणें पहा (क्रि० पडणें, येणें)

**अॅवढा**—पु १ मुखातील द्रव (रस) जो क्षणक्षणीं गिळावा लागतो तो (क्रि० येणें, जाणें, परतणें, उतरणें, गिळणे) 'मला अॅवढा जात नाहीं, दूध कमी गिळू' २ (कों) चिडखोरपणाची किंवा घुम्या रागाची ल्हर रागानें किंवा इतर विकारानें मन क्षोभ होऊन कंठ दाटून येणें, (क्रि० धरणें–मोडणें–येणें इ०) ३ हुदका

**अवढा, अवढाय, अवढ्या**—पु (का) अरुचि, नावड, अभक्ति, किळस, वीट, कटाळा (क्रि० पडणें–येणें–वाटणें) [अवढणें]

**अवढाण**—वि (कों) द्वाड, ओढाळ, हुडी, अनावर, मोकाट, मस्त (गुरु, ढोर) 'ते मज नागेपे अवढाण ।' –दावि ७६७ [स अव+स्थान ?]

**अवढ्यानागनाथ**–पु अवढ येथील देवस्थान बारा ज्योतिर्लिंगापैकीं एक अवढें हें परभणी जिल्ह्यात आहे

**अवण–णी–णें**—आवण–णी–णें पहा

**अवणापावणा**—क्रिवि अउणापाउणा पहा

**अवंतण–णें–न , अवता**—पु १ आमत्रण, बोलावणें (क्रि० दणें, सागणें, करणें) 'जन्ममरणासी अवतणें । दीधलें तेणें सर्वेया ।' –एरुस्व १२ ३८ २ अक्षता टाकून आव्हान करणें, विधिपूर्वक बोलावणें अभिमत्रण करणें आवतण पहा म्ह० अवतण टाकून भीक मागणें = दिलेल्या आमत्रणाला चिडकारून भीक मागत हिंडणें म्हणजे (ल) मूर्खपणानें वागणें [स आमत्रण, प्रा आमतण–अपभ्रष्ट आवतण, द्रा अउतण]

**अवतर्णें**—क्रि आमत्रण दणें, बोलावणें, पाचारणें 'भुजग गृहीं जो करी वास । त्याणें अवतिलें मृत्यूस ॥' –जैम ४१ ३ [स आ+मत्र]

**अवतरण**—न १ उतरणें, खालीं यणें देवादिकाचें पृथ्वीवर–मृत्युलोकीं जन्मास येणें अवतार अवतरण्याची किया, व्यापार 'पार्वती म्हणे माग वरदान । तव अदिती विनवी वचन । कीं त्वा करावें अवतरण । माझे ठाई ॥' –कथा २ ११ ३७ २ अध पात, अधोगति, अवपतन ३ विवरणात्मक भाषण किंवा विधान (श्लोक, वाक्य इ०वर), टीका स्पष्टीकरण, भाष्य टिप्पणी ४ उतारा, उध्दृतवचन, 'अभियुक्त ग्रथकाराच्या ग्रथातून आपल्या मतास पुष्टि आणण्याकरता किंवा लेखास शोभा आणण्याकरता घेतलेलें वचन' –नि १४३. ५ आवेश, वारें, सचार 'जेणें चैतन्यासी भरे अवतरण ।' –विपू ५ ३९ ६ मूर्ति, प्रत्यक्षपण, प्रत्यक्ष अवतार 'तो सद्गुरुचि स्नेहाचें अवतरण ।' –ज्ञा ११ ४२ 'ऐसा दढिवेचेनि अवतरणें नाचे ।' –ज्ञा ६ ३४७, १४ ४१४ [स अव+तृ] ०चिन्ह–न ग्रथातील किंवा भाषणातील उतारा दाखविताना प्रारंभीं व शेवटीं उलट्या व सुलट्या स्वल्पविरामाच्या आकाराचीं चिन्हें (' ') देतात तीं

**अवतरणिका**—स्त्री १ अवतरण, भाष्य, टीका २ प्रस्तावना, सूचना ३ अनुक्रमणिका, विषयसूचि, साराश 'ऐसें नाम धारक विनवीत । सिद्धाचे चरणीं लागत । म्हणे श्रीगुरुचरितामृत । अवतरणिका मज सागा ॥' –गुच ५३ १३ [स]

**अवतरणें**—अक्रि १ अवतार घेणें, देहधारी होणें, आविर्भाव होणें, प्रगट होणें (ईश्वर, देवता, देवलोकवासी) 'तेथ छद्मगणाचे सघाट । अवतरत देखे ॥' –ज्ञा ११ १८३ २ (काव्य) खालीं येणें, उतरणें, अधोगमन करणें, अध पतन होणें ३ (ल) वडबडणें, प्रलापणें, असबद्ध बोलणें, अचरटपणा करू लागणें, अव्यवस्थितपणें वागणें ४ आवेश येणें, सचार होणें, वारें शिरणें 'ज प्रकृति डका अनुकरे । तें प्रकृति डके अवतरे ।' –अमृ ५ ३६ ५ सरसावणें, पुढें होणें 'तव सुमरणी आणि उदारें । रसज्ञ आणि जेवणारें । मिळती मग अवतरे । हातु जैसा ॥' –ज्ञा १३ ११९ [स अव+तृ]

**अवतरविणें**—सक्रि प्रगट करणें 'आत्मा अवतरवित मन । अक्षरें इयें ।' –ज्ञा १५ ५७६ [स अव+तृ]

**अवतंस**—न १ पुष्पें, रत्नें इत्यादिकाचें केलेलें शिरोभूषण, झुबका, गुच्छ, तुरा, मुगुट, किरीट 'भुजपर्यंत लोळे अवतंस ॥' २ कानातील एक दागिना, कुडल, कर्णभूषण [स]

**अवताण**—न अयोग्य किंवा भलती वेळ, काळ, अकाल, अवढाण, योग्य हगामापूर्वीचा काळ. ताण पहा [स अव+स्ताण]

**अवताभवता, अवतींभवतीं**—क्रिवि सभोंवती, भोंवताली, सभोंवार इकडे तिकडे [भवता द्वि]

**अवतार**—पु १ एखाद्या देवतेचें मनुष्याच्या किंवा पशूच्या रूपानें किंवा इतर कोणत्याहि रूपानें पृथ्वीवर अवतीर्ण होणें 'कृष्ण हा देवाचा आठवा अवतार आहे' विष्णूचे मुख्य दहा अवतार–मत्स्य कूर्म, वराह, नृसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण, बौद्ध कल्की ह्यापैकीं आठ होऊन गेले व नववा चालू आहे, अवतरण २ (ल) पवित्र किंवा असाधारण सुप्रसिद्ध माणूस, दैवी अशाचा माणूस, देवावतार ३ अघोरकर्म करणारा, महापापी,

राक्षस अवतार ४ उनाड, उपद्व्यापी, शिरजोर, मारा माणूस-मुलगा, उत्पातीपणा ५ अवतरण, उतरणें, खालीं येणें ६ प्रस्ताव, उतारा वगैरे अवतरणाचे अर्थ अवतरण पहा ७ (दशावतारांवरून) दहा सख्या 'अवतार पावेतों' –रा १२ १२४ ८ आयुष्य, जीवन 'अवतार जरी संपेल।'–मग्रामगीतें ४८ ९ स्वरूप, वेष 'आज तुमच्या मुलाचा अवतार पाहण्यासारखा होता!' १०(खि) इन्कारनेशन या इंग्रजी शब्दाचा पर्याय प्रभु येशू ख्रिस्ताचें देह धारण ख्रिस्ताचें स्वत चे ऐतिहासिक प्रकटीकरण 'येशू ख्रिस्त त्याचा अवतार झाल्यापूर्वी जें काम करीत होता तें तीन प्रकारचें होतें –ईवि ४१ अवतार शब्दापासून बनलेलीं कांहीं वर्णनात्मक-संकेतवाचक नामें १ कर्णावतार=विलक्षण उदार माणूस, अतिशय दानधर्मी २ धर्मावतार=फार न्यायी, सद्गुणी, स्वभावानें सात्त्विक असा मनुष्य ३ कृष्णावतार=अत्यत खेळाडु, चैनी, विलासी, गमत्या, चेष्टेखोर मनुष्य ४ बौद्धावतार=शांत, मौनी माणूस ५ रामावतार=पवित्र, सत्यवादी, निर्मळ, पापभीरु, एकवचनी माणूस ६ रुद्रावतार–यमावतार=सतापी, उग्र, क्रूर, भयकर माणूस ७ वामनावतार=खुजा, खुरटा मनुष्य ०घेणें-धरणें–विशिष्ट काम अतिशय करू लागणें, उच्छृंखलपणें, अव्यवस्थितपणें–दुष्टपणानें–वेड सळपणानें–वागणें ०आटोपणें–होणें–संपणें–१ उत्कर्षदशा जाऊन निकृष्टावस्थेस पोंचणें, शून्यत्व पावणें २ मरणें 'पति गेल्यावर आटपला श्वशुराचाही अवतार'–विक १५ ०कार्य–कृत्य–न १ अवतार घेण्याचा उद्योग कारण, विषय २ (ल) आयुष्यातील मुख्य कर्तव्य 'आमुचें अवतारकृत्य जाहलें समग्र।।' [स]

**अवतारणा**—स्त्री आश्रय, अवलबन अवतार 'वस्तुस्थितीचें वर्णन सपल्यावर कल्पनेची अवतारणा करून प्रश्न करी' –पग्रे ६३ [स अव+तृ]

**अवतारणें**—अकि वेड–चळ लागणें, चळणें, स्वच्छदी बनणें, पिसाटणें, अव्यवस्थित, बेशिस्तपणें वागणें [स अवतार]

**अवतारी**—वि विप्र अवतारीक १ पृथ्वीवर देहधारी, प्राणिरूप धारण केलेली (देवता) २ अत्यत पवित्र किंवा बुध्दिमान, सुप्रसिध्द असामान्य, दैवी अशाचा, लोकोत्तर (व्यक्ति) 'परिस्थितीला न जुमानता राष्ट्राला वळण देणें हें अवतारी माणसाचें कर्तव्य आहे' अवतारी पुरुष असा रूढ प्रयोग ३ धाडसी, अति दुष्ट, उनाड, आडदाड, उग्र, घोरकर्मी (इसम, मुलगा) [अवतार]

**अवतारू**—वि (गो) दहा सख्या (व्यापारी भाषेतील सांकेतिक सज्ञा) अवतार अर्थ ६ पहा

**अवति, अवतिका**—स्त्री उज्जनी, सात अतिपवित्र, स्मरणीय नगरांपैकीं एक 'अयोध्या म(दु)थुरा माया काशी कांची अवतिका।' इ० ०देश–पु माळवा –पया २११ [स]

**अवतीर्ण**—वि १ मानवी स्वरूप धारण केलेली, अवतार घेतलेली (देवता) २ प्रगट झालेला, पुढें आलेला, जाहीर, ज्ञात झालेला ३ खालीं आलेला, उतरलेला, अध पात झालेला [स]

**अवथण(न)रूढ**—वि अवथणलेलें (मूल)

**अवथणणें, अवथ(था)नणें**—अकि १ अगावरप्यावयाचें बद केल्यानें (विशेषत गरोदरपणीं) मुलाची प्रकृति खालावणें, अगावर पिण्याचें तुटणें आयनेणें पहा [स अव+स्तन]

**अवथान**—न अगावर पिण्याचें बद केल्यामुळें स्तान मुलाची झालेली स्थिति (विशेषत आईच्या गरोदरपणीं), आयनें [स अव+स्तन]

**अवथिलें**—सकि १ इच्छिणें, योजणें 'प्रतिज्ञेनें भीष्में मति अवथिलें या हटतें॥'–वामन (भीष्म प्रतिज्ञा) 'लापनें अपुल्या मनीं अवथिलें स्वर्गावरी जावया।'–केक ६ [स अव+स्था?]

**अवद–दा–ध**—पु अवधि, अवकाश, मध्यतरींचा काळ [स अवधि]

**अवदशा–सा**—स्त्री १ दुर्दैव, दुर्भाग्य, कमनशीब 'आतु डलों होतों मरणगांवीं। ते अवदशाचि अवघी। फेडिली आजी।' –ज्ञा १६ ३४ २ विपत्ति, विपन्नावस्था, दारिद्र्य, निकृष्ट स्थिति 'श्रीमूर्ति देखोनि राउळिची। फिटली अवदशा डोळेयाची॥' –ऋ ३६ 'तुज आली अवदशा यथार्थ॥' ३ (ल) कर्कशा, भांडकुदळ स्त्री, जगभाड (स्त्री) 'तू घराण्याचें वाटोळें करायला बसली आहेस अवदसा नाहींतर!' क्षमात्यमाधव (न चि केळकर) [स] ०आठवणें–वाईट, निकृष्ट स्थिति प्राप्त होईल असे भलतेसलते घातक विचार मनात येणें, वाईट वर्तन करणें 'अहह! आठवली मनही अशी। अवदसा, वद साह्यकरी कशी॥' –लक्ष्मण शास्त्री लेले [स]

**अवदसचिन्ह**—न ओढवणाऱ्या दुर्दैवाचें किंवा दारिद्र्याचें चिन्ह लक्षण, खूण, भावी सकटाची, दारिद्र्याची खूण **अवदसेची फेरी**–स्त्री दुर्दैवाची फेरी, अक्काबाईचा फेरा **अवदसेचें बाळ**–न दुर्दैवी, अभागी इसम [अवदशा]

**अवदा**—क्रिवि (कुण) १ यदा, चालू सालीं, औदा २ सध्या, साप्रतकाळीं 'अवदाच्या काळीं। मोठ्की राणीव खासी लिली।'–शिशु ४८१ 'दाविले दु खाचे दिवस वृथा गेले नवस, सख्यारे अवदा।'–प्रला १७८ ३ (हेट) अवतु पहा [फा कुण आयन्दा=पुढें, भविष्यकाळीं तुल० स आयात्+दा, किंवा अद्य]

**अवदाडा**—पु-(वर) भूर्देड [स अव+म दाडा]

**अवदान**—न १ अग्नींत टाकावयाच्या एका आहुतीस पुराया जोगें होमद्रव्य (सामा) आहुति 'तेथ पूर्णाहुतीस कारण। घालितां जीवभावाचें अवदान।'–एभा १९ ७७ 'टाकोनि हातींचें

अवदान ।' –रावि ३८६. २ ( ल ) लाच, बक्षीस–खाणें–घेणें, अपहार, खादीनें केलेला अभिलाष, खाद, खादगी, हरामखोरी ( क्रि० देणें, मारणें ) 'आजपर्यंत किती अवदान तू पशा खालीं घातलेंस बोल '' –तोव १६४ म्ह० गृहस्थास अवदान, भिक्षुकास शय्यादान किंवा कारकुनास अवदान, भटास महादान ३ बळी 'सेंदरींहेंदरीं दैवतें । कोण तीं पुजी मूर्खेखेतें । आपुल्या पोटा जीं रडतें । मागती शितें अवेदान ।' –तुगा ७०० [ स ]

**अवदार**—न ( नाविक ) शीड, अवजार पहा.

**अवदिवस, अवदिस**—पु १ वाईट दिवस, अनिष्ट दिवस, साधारण दिवस २ आड दिवस, सण नसणारा दिवस म्ह० सर्णी धुगऱ्या, अवदिसीं पुऱ्या [ स अव–वाईट+दिवस ]

**अवदीप्ति**—स्त्री तेज, प्रकाश, ज्ञान 'जे श्रीकृष्णाचि आज वलि का अवदीप्ती वृत्ती कीटका ' –दाव १२२ [ स ]

**अवदुंबर**—पु औदुंबर पहा

**अवध**—स्त्री १ शेवट, अखेर, अंत ( मुदतीचा ), निघून जावयाची वेळ २ अवधि, वेळ, अवकाश, मधला काळ 'स्वयं पाक होण्यास मध्यें चार घटका अवध आहे ' ३ मधील अंतर, ओलांडावयाची, चालून जावयाची, शिल्लक राहिलेली जागा–जमीन [ स अवधि, गु अवध–धी=शेवट, मुदत ]

**अवधंडा**—पु जिकडे तिकडे पसरलेलें मोठें संकट, फार मोठा अनर्थ, उत्पात जसें वादळ, भूकंप, टोळधाड इ० [ अवदाडा ? ]

**अवधणा, अवधाण, अवधान**—पु गळू, दुखापत झाली असता वगलेंत किंवा सांध्यात येणारी गाठ, वाघणा [ रा अव ध्मान, अवदहन ? ] **खाजवून अवधणा आणणें**–गाढण उप स्थित करणें–काढणें स्वतःवर त्रास किंवा संकट मुद्दाम ओढून आणणें

**अवधा**—स्त्री ( गणित ) शिरोकोनापासून पडलेल्या लंबाच्या योगानें त्रिकोणाच्या पायाचे जे दोन भाग पडतात ते प्रत्येकीं [ स अवाधा ]

**अवधात**—वि उगाड, रोडकर, खोडसाळ, हट्टी, शिरजोर अवखळ, घातदायक ( मूल ) [ स अव+धा किंवा धातु ? ]

**अवधातु**—वि ज्यामध्यें कोणताहि धातु नाहीं असें, अधातु, निकृष्टधातुयुक्त 'अष्ट धातु सायासें । जेवि वेधिजेति स्पर्शें । तरि नोहें ऋद्धिपुर एसें । तें अवधातुतें वेधी ।' –ऋ २० [ अव+धातु ]

**अवधान**—न १ लक्ष, एकाग्रता, ध्यान, भान, सावधगिरी, हुशारी, जागृति 'यापरी ज निजसज्जन । तिहीं व्हावें सावधान । द्यावें मज अवधान ॥' –एभा १ ५५ २ मनाचा कल, ओढा अनुसंधान, उद्देश, हेतु, नजर, रोंख, चित्त [ स ]

**अवधानी**—वि पुष्कळ गोष्टींकडे एकाचवेळीं लक्ष पुरविणारा, एकाच वेळीं अनेक मोठ्या व गुंतागुंतीच्या मानसिक क्रिया, व्यापार करणारा, उ० अष्टावधानी, दशावधानी, शतावधानी इ० [ स अवधानिन् ]

**अवधारण**—न णा—स्त्री १ दृढ निश्चय, खात्रीनें, निश्चयानें ठरविणें, स्पष्टपणें निवेदन करणें, मांडणें, धरणें २ ( व्यापक ) प्रमाणावधान, आत्मसंयमन, सावधगिरी, हुशारी, देहभान ३ लक्षात ठेवणें, स्मरणात ठेवणें, स्मृति, स्मरण, धारणा. [ सं ]

**अवधारणें**—उक्रि १ ( काव्य ) स्पष्टपणें–खात्रीचा निश्चय करणें, निश्चित मत, योग्य ठेवणें, ठाम मत असणें २ मनात, लक्ष्यात, ध्यानात, स्मरणात ठेवणें 'ऐसे अभ्यंतरी अवधारी ।' ३ ऐकून घेणें, लक्ष्य देणें, ध्यानात आणणें, लक्ष लावून श्रवण करणें 'आता माझें विणविलें । अवधारिजे ।' –शिशु १४६ 'हे माया मूळप्रकृती । परमपुरुषाची निजशक्ती । तियेसी तेणेंसी संगती । ते अवधारिजो ।' –विपू ३ ४६ [ स अव+धृ ]

**अवधारित**—वि १ निश्चित, ठराविक, खात्री केलेलें, निर्धारित २ स्मरणात, आठवणींत असलेलें [ स ]

**अवधि**–पु **धी**—स्त्री १ मर्यादा, सीमा, कार्याच्या आरंभाची व समाप्तीची वेळ–घटका, पर्यवसान, शेवट, एखाद्या वस्तूचा अथवा गोष्टीचा परिच्छेद करावयाचा असला म्हणजे जी रेषा काढतात ती 'तैसी दुर्लभ जे सद्बुद्धि । जिये परमात्माचि अवधि ।' –ज्ञा २ २४१ 'यदुभुजवळनिधिला नसे अवधि राहे ।'–मोकर्ण ४३ ८७ २ मधला काळ, अवकाश, मुदत, ठराविक अंतर 'तुक्या बधु म्हणे थोडे । अवधि उरली आहे पुढें ।' –तुगा २७३ ३ उपमा देण्याचें प्रमाण, तुलना करण्याचें मोजमाप–इयत्ता, अमुक गोष्टी हून ल्हान–मोठें, चांगलें–वाईट ठरवितात ती गोष्ट ४ सुरुवातीची जागा–स्थळ–काळ, अवलंबिलेला उद्दिष्ट मार्ग, आरंभाची किंवा अखेरची गोष्ट ५ मूळस्थान, उगमस्थान, उत्पत्तिस्थान, आरंभ स्थान ( एखाद्या कामाचें–व्यवहाराचें ) उत्पादक, जनक ६ (समासात ) शब्दयोगी अव्ययाप्रमाणें १ पर्यंत, पावेतों याअर्थी उपयोग –रात्र्यवधि, कालावधि, देशावधि, दिन–मास–वर्ष–अवधि, –ज्ञा ८ १६३ २ कालात, अंतरात, भर असताना या अर्थी. ७ आश्रयस्थान, अतिमस्थान 'तुजचि अवधि करून । ठेविले असती प्राण ।' –रास ३ ५८ ८ अवधारणा पहा ०**शेष**–वि उर्वरित –न ब्रह्म [ स ] ०**साकांक्ष–सापेक्ष**–वि अवधीची आकांक्षा किंवा अपेक्षा असणारें, तुलनात्मक, स्वर्धी, काहीं तुलनात्मक मापाशीं किंवा इयत्तेशीं संबंध असणारें

**अवधुत (शीर्ष)**—न डोळे एकदांच वाकडे करून खालीं करणें, निरोप पोचविणें, ओळख पटलेली दाखविणें इत्यादींबद्दल हा अभिनय करितात [ स अव+धू=हलविणें ]

**अवधूत**—वि १ टाकलेलें, सोडलेलें २ विरक्त, विरागी, वैषयिक विकारालिप्त 'अवधूत निराकारी । तयाची तिन्ही लोकीं

फेरी' ३ नग्न, दिगंबर —पु. १ दत्तात्रेयाचा अवतार २ विरक्तावस्थेत फिरणारा गोसावी, गोसावी पथातील, नग्न गोसावी ०गीता—स्त्री भागवतातील एक प्रकरण ही अवधूतपंथी तोंडानें म्हणत फिरतात ०पंथ-मार्ग-संप्रदाय-चरित्र-दीक्षा-पुनस्त्री १ अवधूत गोसाव्याचा संप्रदाय,त्याची रीतभात,रहाणी २ (ल) जात गोत न पाळणें, वर्णसंकर, भ्रष्टाचार, दुराचरण ०मूर्ति—वि दत्तात्रेय 'सकळ ब्रह्मादिकीचीं दैवतें धावतीं । अवधूत मूर्ति पहावया ।' [स अव+धू=धुणें]

**अवध्य**—वि १ वधासाठीं निरुपयोगी, ज्यास ठार मारावयाचें नाहीं असा २ न मारला जाणारा [स]

**अवंध्य**—वि लाभदायक, फलदायक, फायदेशीर, नफ्याचा, मिळकतीचा, हिताचा, उपयोगी 'दिवस अवध्य करावा, वध्य जाऊं देऊं नये' [स अ+वध्य=नापीक, विफल]

**अवन**—न रक्षण, संरक्षण 'दीनावनाविषें क्षण देइल दयिता दया वरी वर्तु ।' —मोसंशयरत्नमाला २४ [स अव्=संरक्षण करणें]

**अवन**—वि निजल [स अ+वन=पाणी]

**अवनत**—वि १ खचलेला, वाकलेला, ओणवा २ नम्र, शरण घेत, निरहंकार, विनयशील [स अव+नम्-नत]

**अवनति**—स्त्री १ खालीं जाणें २ अपकर्ष, दुस्थिति, दुर्दशा, खालावलेली स्थिति [स अव+नम्-नति]

**अवन(ना)स**—स्त्री (कों) अननस पहा

**अवनि**—स्त्री पृथ्वी, धरित्री, धरणी 'येरें वायव्यास्त्र टाविलें तुणीं । झंझामारुत सुटला रणीं । वाऱ्यानें जाळ पाहे अवनी ।' —एरस्व १०१०५ [स]

**अवनिगा-घा**—स्त्री हयगय, निष्काळजीपणाची वागणूक, काळजीचा अभाव, उपेक्षा, हलसाड, अवज्ञतन [अव+फा निगा=दृष्टि]

**अवनीति**—स्त्री अन्याय 'अवनीतीनें वर्तों नये । आगवळें ।' —दा ११ २१ [स अव+नीति]

**अवनु**—क्रिवि (कु हेट) चालु सालीं, अवदा पहा 'अवनु गुपारी वरी पिकुक ना' [फा आयदा=पुढें]

**अवपथ्य**—वि कुपथ्य, पथ्याम अहितकारक विरोधक [अपथ्य अप]

**अवपीड**—पु १ स्त्रियांचा डोक्यांत घालण्याचा एक दागिना (?) २ शिंक आणणारा पदार्थ, औषध [स]

**अवबाधा**—(गणित) अवधा पहा [स]

**अवबोध**—पु ज्ञान, जागृति, जाणीव, बोध पहा 'ह स्वप्ना बरोबु टेकें ।' —ज्ञा ३ ५७ [स अव+बुध्]

**अवबोधक**—वि बोधक पहा

**अवभाष**—स्त्री दुरुत्तर, दुष्ट बोल, निंदा [स अव+भाष्]

**अवभास**—पु भास, भ्रम, भ्रांति 'माया अविवेकिया अवभासा ।' —विपू ७ २६ [स अव+भास्]

**अवभिताड**—न कुंभागच्या भींतीच्या पुढची भिंत [अव+भिताड, द्रा आवि=भर्ती+स भित्ति=भित]

**अवभृत (थ), अवभृत-स्नान**—न यज्ञसमाप्तीच्या वेळीं करावयाचें स्नान 'पूर्णाहुती पडली हुताशीं । तेथ अवभृत समरसीं । सहजें जाहलें ।' —ज्ञा ४ १३८ 'अवभृथ स्नान केलें । तैसे सकळ लोक सुस्नात जाहले ।' —ह ३५ १८० [स]

**अवमत**—वि अपमान केलेला, तिरस्कृत, अवमानित [स]

**अवमर्द-न**—पुन १ तुडविणें, चेंचणें, कुचलणें, कुसकरणें, दाबणें, मळणी करणें, पिळणें, मर्दन करणें २ (ल) नासधूस, पायमल्ली [स]

**अवमर्यादा**—स्त्री अमर्यादा, अपमान, हेटाळणी, मर्यादेचा अतिक्रम, उल्लंघन [म अमर्यादा अप]

**अवमान**—पु अपमान, हलना, तुच्छता, अनादर, अवहेलना, उपेक्षा, दुर्लक्ष [स]

**अवमानणें**—उक्रि अपमान करणें, अनादर करणें, तिरस्कार करणें वाईट रीतीनें वागविणें [स अव+मन्]

**अवमानित**—अवमत पहा

**अवमास**—वि १ ढिला, अव्यवस्थित, विस्कळित गैदी पणानें चालविलेला (उद्योग, धंदा) २ उद्धट, बेपर्वा, धाडसी, हूड, अडदांड (इसम जनावर) —क्रिवि स्वैरपणानें, मोकाट पणें, मोकळेपणानें, स्वच्छंदाचारानें, यदृच्छेनें पणानें (क्रि० चरणें, फिरणें, हिंडणें, राहणें) [स अव+मन्=मापणें, मानणें]

**अवयव**—पु १ शरीराचा भाग, गात्र, इंद्रिय २ परस्पर संबद्ध झालेल्यांतील सुटा, एखाद्या गोष्टीचा भाग तुकडा, जडाव याचा भाग (पंचभूतांपैकीं प्रत्येक भाग, सामान, कपडे यांपैकीं प्रत्येक) 'मग दोन घटिका स्वस्तिक्षेम । भगिनी ते विश्राम । उपरी अवयव परिक्षानून । मागें म्हणू म्हणताती ॥' —नव १३ ९५ ३ (अनेकवचनी प्रयोग) स्त्रीचे रत्न (क्रि० येणें) 'मुलीस अवयव आले' ४ (बीज) गुणक, बीजगणितांतील एखाद्या संख्येचा भाग (इ) फॅक्टर ५ (संगीत) गिनेचे निरनिराळे भाग नांवें —उद्ग्राह, मेलापक, ध्रुव अंतरा, आभोग स्थायी संचार हे प्रबंधाचे प्राचीन अवयव होत व स्थायी अंतरा संचारी व आभोग हे आधुनिक गितांचे अवयव होत [स]

**अवयवश:**—क्रिवि प्रत्येक भाग घेऊन, पृथक्पणें प्रत्येक वेगवेगळे करून, भिन्न करून एकेक (नमस्कार करणें) 'हा धर्म मी अवयवश: अवगाहन केला' [म]

**अवयवार्थ**—पु १ समासादि शब्दांतील प्रत्येक अवयवाचा-पदाचा अर्थ २ सरळ वाच्यार्थ [ स ]

**अवयवावयवी भाव**—पु अवयव आणि अवयवी यांचा जो परस्पर संबंध तो, पदार्थ व त्याचे भाग यामधील संबंध उ० पट व तंतु यामधील [ स ]

**अवयवी**—पु निरनिराळे भाग, इंद्रियें, उपांगें असलेला-जोड भाग असलेला पदार्थ, शरीर, शरीरी, देहधारी 'सागपां धनंजया। अवयवी अवयविया। आच्छादिजे कीं तया। तेंचि रूप॥' –ज्ञा १४ १२५ [ स ]

**अवयाल**—न (हेट) ओल्या खोबऱ्याचें कढवून काढलेलें तेल अरेडेल पहा [ गो अवल=पूर्ण तयार झालेला गाळ ]

**अवर**—क्रिवि अलीकडचा, ह्या बाजूचा (बहुधा 'पवर' शीं जोडून उपयोग) 'म्हणौनि पुरुषु क्षराक्षर। दोन्ही देखोनि अवर॥' –ज्ञा १५ ५३८ –वि १ धाकटा, वयानें लहान २ पाठीमागचा, नंतरचा ३ कनिष्ठ, नीच ४ पश्चिमेकडील [ स ]

**अवर**—पु तास 'नंतर चिरण मातीनें त्या सुरईंची तोंडें बंद करून त्या भट्टींत घालून किती एक अवरपर्यंत तापवितात' –मराठी ६ वें पुस्तक पृ १२६ १८७५ [ ग्री लॅ होरा=तास, इ अवर ]

**अवरंगाबादी**—वि १ औरंगाबादसंबंधीं-विषयक २ (उप) (काशीकर, नाशिककर यांप्रमाणें संकेतानें) हुशार, कावेबाज, भामटा, धूर्त, सोदा (अवरंगाबाद शहर मोंगलाईंत आहे) [ फा औरंग+आबाद+ई ]

**अवरज**—पु धाकटा भाऊ ०जा–स्त्री धाकटी बहीण [ स अवर+ज ]

**अवरज**—न (ग्रा) मोठें, अपार नुकसान, सर्वप्रकारें नाश, समूळ, निःशेष नासधूस, नुकसान जसें-गुरांनीं केलेली शेताची नासाडी [ स अ+वर्ज् ]

**अवरजा**—पु १ हिशेबाची वही, डायरी, रोजनिशी, खतावणी यांतील एक सदर, उतारा, खतावणींतील एक स्वतंत्र खातें, रोजकीर्दींतील एकाद्या विशिष्ट बाबीच्या जमाखर्चाचा उतारा २ (सामा) हजेरी पत्रक आवर्जा पहा [ फा आवर्जा, आवारजह् अवारिज, आवारिजह्=रोजकीर्द ]

**अवरजून**—अ (विरू) आवरजून १ स्पष्टपणें हडसून खडसून २ प्रत्यक्ष, मुद्दाम, एकदम, तडक, हुब्या 'अवरजून पंचप्राण झाड घालिती खगेंद्र सुधारसा।' –होला १०७ [ स अ+वर्ज्, किंवा आर्जव ? ]

**अवरठा-डा**—वि विवाहाची योग्य वेळ गेल्यानंतरहि विवाह न होता राहिलेला अविवाहित, ब्रह्मचारी अठवरा पहा [ स अ+वृ+स्था, किंवा अठवरा वर्णविपर्यास ]

**अवरठेपणा**—पु ब्रह्मचर्य, कौमार्य

घको १ २०

**अवर्णे**—आवर्णे पहा

**अवरपर**—वि परोक्षापरोक्ष, दृष्टश्रुत-हको वाक्य २२६७ [ स अवर+पर किंवा अपर ]

**अवरस**—औरस पहा

**अवरस चवरस**—औरस चौरस पहा

**अवरा**—पु (कों) कडवें वाल, कडया, पावटा, अळसुद्या सारखा एक धान्याचा प्रकार [ का अवरी, ता वेलावराची, तुर्की अवेर तुल० स अवारिका ]

**अवरात**—स्त्री रात्रीचा शेवटचा प्रहर [ अपरात्र अप ]

**अवरी**—वि अविवाहित, कुमारी 'त्याची कन्या चपकमालिनी। ते अवरीच असे आजुनी।' –जै ५५ ८४ [ स अ+वृ ]

**अवरीत**—स्त्री १ दुर्वर्तन, विरुद्ध वर्तन, आचरण २ अप्रीति, रुसामर्जी आवरी पहा [ स अव+रीति ]

**अवरुद्ध**—वि १ अडथळा केलेलें, रोधलेलें, अटकाव केलेलें, हरकत घेतलेलें, थांबविलेलें, बंद पाडलेलें २ राखलेली, ठेवलेली; वाळगलेली (रांड, राड) [ स अव+रुध् ]

**अवरोध**—पु १अडथळा, हरकत, अटकाव, अडकाठी, प्रतिबंध, कुंठितावस्था, 'कृष्णप्राप्तीशीं अवरोधु। सबळ क्रोधु उपजेल॥' –एरुस्व २ ४८ सामाशब्द-मलावरोध, मूत्रावरोध, श्वासावरोध, रक्तावरोध, कंठावरोध, व्यवहारावरोध, गत्यवरोध, मार्गावरोध, शस्त्यवरोध २ नातलगाच्या मृत्यूच्या श्रवणानें येणारी अशुद्धता, सुतक, मृताशौच ३ अंतःपुर, जनानखाना, राणीवसा 'तदुपरि अवरोधद्वार विनिद्रिलें। यदुपति मग पावे पार्थ हस्तावलंबें॥' –सारुह ७ ४३ –स्त्री कुलीन स्त्री, औरत [ स ]

**अवरोधणें**—उक्रि (काव्य) अडथळा करणें, हरकत करणें; आडकाठी करणें, थांबविणें सोडविणें 'वदन विधुभयानें घ्यात हें कावरोधे।' –सारुह ६ ३२ [ स अव+रुध् ]

**अवरोह-ण**—पुन १ खालीं उतरणें, अवतरण, अधोगमन; पासुन, खालीं, वरून, बाजूनें जाणें २ वर चढणें, जाणें, जसें–मचकावरोहण ३ (संगीत) निषादापासुन खालीं षड्जाकडे स्वर म्हणत येणें याच्या उलट आरोह **अवरोहीवर्ण**-पु (संगीत) निषादापासून खालीं षड्जाकडे येताना लागणारे वर्ण [ स ]

**अवर्गीय**—वि वर्गीकरण, वर्गवारी न केलेलें, न करता येणारें, संकीर्ण निरमोळ ज्यांत निरनिराळे अनेक प्रकार आहेत असा व्याकरणांत हा प्रयोग येतो [ स ]

**अवर्जून**—अवरजून पहा

**अवर्ण**—वि १ विजातीय, आपल्या जाति-वर्णांबाहेरील, २ (ल) निंद्य, दूषणीय, चातुर्वर्ण्याबाहेरील 'जो खादाड आणि स्थूलोदर। जो अवर्णस्त्रियेचा करी स्वीकार। जो श्वशुरगृहीं राहे निरंतर। तयाचा विचार नायकावा॥' –नै २ ९१ [ स अ+वर्ण ]

**अवर्ण**—अवर्णनीय,अवर्ण्य पहा 'अवर्ण अवान्या शोभरया ॥' –नव १३ ७७ [ स अ+वर्ण ]

**अवर्णनीय, अवर्ण्य**—वि वर्णन करण्यास कठिण असे, शब्दातीत, अनिरूपणीय [ स अ+वर्ण् ]

**अवर्णपूजा**—स्त्री उपदेवताची पूजा, मुख्य देवताखेरीज इतर देवताची पूजा 'भक्तजनाचिया काजा । जैवीं करिती अवर्णपूजा । तैवीं सैन्य रचिलें वोजा ।' –एरस्व ६ ५४ [ स आवरण ]

**अवर्षण**—न १ पावसाचा अभाव, वृष्टीचा अभाव अना वृष्टि 'मरतया अमृतपान । कीं अवर्षणीं वर्षे घन । '–एरुम्य ५ ८४ २ दुष्काळ, 'आणि सुराचें अवर्षण पडिलें । '–ज्ञा ११ ३८१ [ स अ+वृष् ]

**अवल**—वि १ पहिला, उत्तम, प्रमुख २ ( ल ) अतिशय –पया ७२ माठा, उच्च ३ (गो ) पूर्णपणें तयार झालेला ( नारळ ) ४ पहिल्या प्रतीचा, दर्जाचा, ( जमीन, रेशीम वगैरे ) वर्गवारींत पहिला –सन १७८८ चा पहाण खर्डा ( कासारीतर्फे कागद ) –क्रिवि प्रथमत , पहिल्यादा, प्रारंभीं, आदौ –स्त्री पहिला किंवा आरं भींचा भाग 'पावसानें अवल साधली, अखेरी घालवि ली ' [ अर अव्वल्, अव्वल, दूम, सीम=पहिला, दुसरा, तिसरा ) ०**अखेर**–**आखर**–क्रिवि आरभापासून अखेरपर्यंत, अथपासून इतिपर्यंत (नका रार्थी प्रयोगात ) पूर्णपणें, एकदर, समूळ, बिलकूल, अगदीं, सर्वस्वीं [ अर अव्वल्+आखिर=शेवट ] ०**अखेर(आखर)दस्तावा**–पु नवीन जमीनीवर दरवर्षी वाढत जाणाऱ्या करापैकीं पहिला ०**अर्जी**–वि ( कायदा ) मूळ फिर्यादि, तक्रार, अर्ज ०**आढावा**–पु साल आरंभीं मागचें येणें–देणें समजण्यासाठीं माडलेला जमा खर्च ०**कारकून**–पु मुख्य कारकून, फडणीस ०**कोर्ट**–न मूळ दावा किंवा फिर्यादीबद्दल ज्या कोर्टात सपूर्ण चौकशीचें काम चालून निकाल मिळतो तें कोर्ट ( इ ) ओरीजनल कोर्ट ०**जप्ती**–स्त्री ( इ ) अटॅचमेंट बिफोर जज्मेंट, दाव्याचा निर्णय होण्यापूर्वी मिळकत कोर्टाच्या ताब्यात घेणें ०**पुरावा**–पु ( इ ) प्रायमरी एव्हिडन्स पहिल्या प्रतीचा पुरावा कोर्टानें समक्ष पहावा म्हणून मूर्तिमंत हजर केलेला दस्तऐवज ०**रजिस्टर**–न आजमितीस दरएक गावातील जमीनी कोणाकोणाकडे कोणत्या हक्कानें वहिवाटीस आहेत त्याचें तपशीलवार नोंदपत्रक ०**दोड–द्राड**–वि वाईटपणात, द्वाडपणात अग्रगण्य बिल्दर अव्वल पक्का ०**साल**–न १ वर्षाचा आर भींचा भाग २ विवक्षित सवयींतील–मालिकेंतील पहिलें वर्ष ३ हिशोबाच्या सालातील पहिलें साल ४ सुदुर एका वर्षाच्या काळात ज्येष्ठातील ( वैशाखातील सुद्धा ) कांहीं मित्या दोन वेळा येतात यामुळे त्याच्या निर्देशानील संदिग्धता घालविण्यास 'अवलसाल 'अखेरसाल' हे शब्द योजतात 'ज्येष्ठ शुद्ध ४ घरी ५ अवल सालीं रात्रीची मुंज जाहली ' –दिचप्र २७

**अवलकी**—स्त्री पोह [ का अवलक्की, अवल=कुटणें+अक्कि= तांदूळ ]

**अवलणें**—उक्रि वल्हविणें, हाकारणें 'ज्ञान वैराग्य भक्ति । इचि अवलें अवलितीं ॥' [ अवलें=वल्हें स आ+वल्=वल्हविणें ]

**अवलंब**—पु १ आसरा, आश्रय, सरक्षण, धारा, आधार 'म्हणोनि तुझा अवलंब केला । ' –सारह ११८ २ रेघ, ( इ ) परपेंडिक्युलर ३ ( ज्योतिष ) एखाद्या स्थळाचें खस्वस्तिकापासून रास्य ज्योतीपर्यंत दृङ्मडलावरील अशात्मक अतर, कोटिज्या, नताश [ स अव+लंब ]

**अवलंबणें**—उक्रि १ आश्रय करणें, आधार धरून राहणें २ पकडणें, लोंबकळणें, धरणें, चिकटणें, कवटाळणें 'प्रवेशें मौन्य अवलंबून । ' ३ धारण करणें, उचलणें, स्वीकारणें, अंगीकारणें त्वां बरी युक्ति अवलंबिली पाहि । '

**अवलंबन**–न ग्रहण, स्वीकार, धारण, आश्रयण 'चित्त अव लंबनें वीण । ' –विपू २ ९३

**अवलंबित**—वि १ आश्रय दिलेला, सरक्षिलेला, हातीं धरलेला, पोसलेला, बाळगलेला, कैवार घेतलेला २ घेतलेला, धरलेला, कवटाळलेला, पकडलेला ( सरक्षणासाठीं ) ३ लोंबता, लटकता, हालता

**अवलक्षण**—न १ अशुभ–अनिष्टसूचक चिन्ह, गुण, देखावा चेष्टा, कृत्य, दुश्चिन्ह उ० सहावें बोट, झोपेंत दात खाणें इ० २ अपशकुन, अरिष्ट, उत्पात ३ वाईट सवय, खोड 'बहुतासी न मने तें अवलक्षण । सहजचि जालें ॥' –दा ११ ३ २७ म्ह० हात दाखवून अवलक्षण करणें [ स अव+लक्षण ]

**अवलक्षणी**—वि १ दुर्गुणी, खोडसाळ २ अरिष्टकारक, दुश्चिन्हाचें, अवकृपेचें औत्पातिक ३ शारीरिक व्यंग असलेला, कुरूप विद्रूप [ सं ]

**अवलक्ष्मी**—स्त्री कमनशीब, दुर्दैव, दुर्भाग्य, विपत्ति, आपदा [ स अव+लक्ष्मी ]

**अवला**—पु ( विप्र ) १ अवलें, वल्हें पहा २ वल्हेकरी

**अवलाद**—स्त्री १ पुत्रपौत्रादि सतति, वश, कुळी, प्रजा 'राम अवलाद कुशपत्नी धामा । अवलाद देह असे हा ॥' –नव ८ ८१ हा शब्द विशेषत मुलाच्या वशाला लावितात अफलाद पहा २ ( उप ) मात्य खोडसाळ [ अर औलाद्, वल्द् अव ] ०**अफलाद खाणें**-वशपरपरा उपभोग घेणें

**अवलाहो, अवल्हाओ**—पु अनिष्ट प्राप्ति अपलाभ 'तैसा कर्माकारा दुजेया । तो करितेपणाचा आत्मेया । अवल्हाओ ये तो गलेया । कांहिं उरे ॥' –राज्ञा १८ ४०९ [ स अव+लाभ ]

**अवलिप्त**—वि १ माखलेला, चोपडलेला २ ( ल ) दुष्कृ त्यांत सबध असलेला, अनिष्ट कृत्यात भाग घेणारा एखाद्या दुष्क र्माचा वाटेकरी [ स अव+लिप्–लिप्त=दुष्कृत्यानें माखलेला ]

**अवलिया**—पु १ साधु, सत, पुण्यात्मा, पुण्यपुरुष, परमेश्वराच्या चिंतनात मग्न असणारा, विदेही २ (ल) लहरी ३ स्वच्छंदी, इत्यादि मनुष्य [अर अवलिया, वली=साधु याचें अव.]

**अवलिला-ळा, अवलीला-अवलीळा**—क्रिवि १ सहज, लीलेनें, सुलभपणें 'रामनाम जपसी जरी अंतरीं। अवलिळा तरसी भवसागरीं॥' 'जे जे जगीं अप्राप्त वस्त। ते ते लाभे अवलीळा॥' —सुमादि ४० ६६ 'हरि म्हणे ते वळा। मी बाळक होईन अवलीला। परि मन सत्वर गोकुळा। नेऊनिया घालावें॥' —ह ३ १६६ 'श्रीपादें उठवूनि अवलीळा। सागती गोप्य अवधारा।' —गुच ११ ९४ [स अवलील्या] —स्त्री खेळ, लीला, कसरत, उड्या वगैरे 'ताकिकाचिया चक्रवाळा। कीर्ती सार्वी नाळीची अवलिळा॥' —शिशु ७५ [स अव+लीला]

**अवली**—स्त्री आघाडी, प्राधान्य, गुणाधिक्य, वरचष्मा, उत्कर्ष, प्रगति (क्रि० साधणें) [अर अव्वल्=पहिला]

**अवलीढ**—पु घोडयाच्या अगावरील केसाचा भोंवरा-शिंपीसारखे अनेक भोंवरे एकत्र असणें —अश्वप ८५ [स अव+लिह्]

**अवलुठन**—न १ लोळण, लोळण्याची क्रिया, लुठन २ लुटणें या अर्थी चुकीनें वापरतात [स अव+लुठ्]

**अवलें**—न वल्हें 'स्वयें अवलें घेऊनि करीं वेगें। नाव हळु हळु लोटीत जळासगें।' —अक ११ १४२ [स आ+वल्=वलविणें, प्रा अवल्ल, दे अवल्ल]

**अवलेकरी, अवल्या**—पु १ वल्हेकरी, वल्हे मारणारा 'गगा म्हणता गीता गगा सरी न पावे। अवलें पोहता मुक्ती म्हण वुनि सरी न सामावे।' —ज ६२८ २ (ल) सत्ता गाजविणारा, सत्ताधीश, दिशा दाखविणारा, नायक [स आ+वल्]

**अवलेप-न**—पुन माखणें, सारवण, चोपडणें [स अव+लिप्]

**अवलेह**—पु चाटण, पाक, रसक्रिया, लेह (इ) इमल्शन [स अव+लिह्=चाटणें]

**अवलोक**—पु. १ नजर दृष्टि 'करूनि आपुलिये दिठी चोरु। मग घापें अवलोकु। तयावरी।' —ज्ञा १६ १४७ २ प्रकाश 'का घरामाजि एकु। दीपाचा तो अवलोकु।' —ज्ञा १८ ३२८ ३ दर्शन, निरीक्षण, अवलोकन, पाहणें 'येथें मी वाचून अवलोकीं। आन हेतु असे।' —ज्ञा १५ ४२४ [स अव+लोक्]

**अवलोकणें**—उक्रि पाहणें बघणें प्रेक्षणें विलोकणें न्याहाळणें, निरखणें निरखून पाहणें 'हें अर्जुनें तियेवेळीं। अवलोकिलें।' —ज्ञा १ १८४ 'कामें नेलें चित्त नेदी अवलोकू मुख।' —तुगा ४०६ [स अव+लोक्]

**अवलोकन**—न निरीक्षण, चिंतन, विलोकन, पाहणी, कोणेक विषय डोळयानें किंवा विचारात्मक बुद्धीनें जाणण्याचा व्यापार अवलोक पहा ॰शक्ति-स्त्री निरीक्षणशक्ति, पाहण्याचें सामर्थ्य [स]

**अवलोकित**—वि १ निरीक्षिलेलें, पाहिलेलें २ चिंतिलेलें, ध्यान केलेलें ॰दर्शन-न (नृत्य) नृत्य करताना खालील वस्तु पाहण्याचा अभिनय करणें [स]

**अवलोडन**—न पाण्यात डुबणें, डुबकणें, बुचकळया मारणें [स अव+लुड्]

**अवश**—वि १ स्वतंत्र दुसऱ्याच्या ताब्यात नसलेला, वश न झालेला, न माणसाळलेला २ पराधीन, परतत्र, स्वाधीन नसलेला —३ ५ [स अ+वश्]

**अवशक्ति**—स्त्री अशक्तता, निर्बलपणा, असमर्थता, नाताकद कमकुवतपणा, दौर्बल्य, शक्तिक्षीणता [अशक्ति अप किंवा अव=ऱ्हास+शक्ति]

**अवशिष्ट**—वि बाकी, उरलेलें, शेष, शिल्लक राहिलेलें, उर्वरित [स अव+शिष्]

**अवशी**—स्त्री पूर्वरात्र, प्रदोषसमय, तिनिसाज अवस पहा 'मग अवशींची प्रहररात्र गुदरलियावर गुप्तपणें हत्तीच्या घाग काढून, डेरेदाडे पाडून झाडून निघाले' —भाब ११९ [प्रा आओस, म अवस]

**अवशीं, अवशीस**—क्रिवि पूर्वरात्रीं

**अवशेष**—पु १ बाकी, शिल्लक, शेष, अवशिष्ट, उरलेला भाग २ राहिलेली रक्कम किंवा सख्या [स]

**अवश्य**—वि अनिवार्य, दु साध्य, वश न होणारें, न टळणारें [स अ+वश्]

**अवश्य, अवश्यक**—क्रिवि १ आवश्यक बद्दल चुकीनें उपयोग जरूर, खचित, खात्रीनें, खास, अलबत्त, नि सशय, अगत्य, निखालस २ कोणेकानें सांगितलेल्या गोष्टीच्या अगीकाराचें द्योतक, समतिदर्शक होय, बरें या अर्थी अव्यय [स अ+वश्]

**अवश्यक**—वि जरूरीचा अगत्याचा, आवश्यक पहा [स आवश्यक]

**अवश्यकता**—स्त्री जरूरी, अगत्य, अवश्यबुद्धि [स आवश्यकता]

**अवश्यबुद्धि**—स्त्री आस्था, अगत्य, कळकळ, आसक्ति, अपेक्षाबुद्धि आवड, अमुक गोष्ट अमुक कार्यार्थ आवश्यक आहे असें समजूत [स]

**अवश्यंभावी**—वि खचित-खास होणारें, खात्रीचें, खचित, निश्चित अचूक [स अवश्य+भू-भावि]

**अवश्यमेव**—क्रिवि खात्रीनें, जरूर, मगदीं खचित-खास, अवश्यच निश्चय, निखालस [स अवश्यम्+एव]

**अवष्टब्ध**—वि १ प्रतिबद्ध, अडविलेला, थांबविलेला, थोपविलेला, अडथळा केलेला २ (शब्दश व ल) आधार दिलेला, तोलेला अवष्टम पहा [स अव+स्तब्ध]

**अवष्टंभ**—पु १ अडथळा, अटकाव, खोळंबा, हरकत २ टेंका, आधार, आश्रय, आसरा ३ (ल) कृपादृष्टि, दया, हिमाईत, मदत, पाठिंबा ४ अहंकार, गर्व, आढ्यता 'येर अवष्टंभु जो आघवा। तो आस्कंदोनि मद्भावा।'—ज्ञा ९ ४१८ ५ अत्यान्तिक भावाच्या उर्मी, फुंज 'आपण पा करूनि स्वयंभु। बुडाविला अवष्टंभु। सत्यें तेणें॥'—ज्ञा १८ १६२२ ६ मलावरोध [स अव+स्तंभ्]

**अवस, औस**—स्त्री अमावास्या [अमावास्या, अमावसी]

**अवसेस (ओसेस) पुनवेस येणें-घडणें**-केव्हांतरी प्रसंगवशात् येणें-घडणें, एखाद्या वेळीं, अधूनमधून येणें, अनिश्चितपणें येणें, अवसेपुनवेला येणें

**अवस, औस**—स्त्री १ रात्रीचा-मध्यरात्रीचा पूर्वीचा भाग 'न म्हणे अवसीं धाहांटीं।'—ज्ञा १३ २९ २ पहाट, उष काल, अरुणोदय नेहमीं रासमींत प्रयोग अवसपहाट असा सामासिक शब्द रूढ आहे (क्रि० करणें) अवशी पहा [स उषसि, प्रा ओ औस=प्रदोपसमय]

**अवसति**—क्रिवि अकस्मात्, अवस्तुक, एकाएकीं [स आत्मन्+स्वत म आपस=आपोआप]

**अवसर**—पु १ रिकामा वेळ, अवकाश, फुरसत २ योग, संधि, प्रसंग, वेळ, काळ 'अवसर मदनाला तोच अत्यंत फावे।'—मापद २ ६४ 'चिंतित होतों चित्तीं तेरा वर्षे सदा अवसरा ज्या।'—माभीष्म १५७ ३ योग्य काळ, योग्य वेळ, समय, सोईस्कर वेळ (कोणत्याहि कार्याची), हगाम सामाशब्द—भोजनावसर, स्नानावसर -पूजावसर ४ संचार वारें घुमारा 'मनुष्याच्या अंगात अवसर येतो'—न्यायप ४४९, 'दुसऱ्या दिवशीं श्री वताळाचा अवसर येत असे'—भारतमित्र (फेब्रुवारी १९२५ पृ ३०) [स अव+सृ] ०माता—स्त्री अंगात येणारी जागृत देवता 'अवसरमाता चोपडाई करी धावणें।'—ऐपो ३३४

**अवसरणी**—स्त्री १ आकाशवाणी 'अवसरणी वाचा झाली।'—यसा ६३ २ ज्यावेळी विचार किंवा वेत करीत असतां दुसऱ्याचे साहजिक बोलणें ऐकून, ते शब्द आपल्या मनांतील विचारास लागू करून घेऊन, व आपल्या मनातील कार्यास जोडून शंका निवारण किंवा अनुमान किंवा तदनुरूप वर्तन करतात ते शब्द ३ लौकिक वार्ता, भाकित, होरा (क्रि० काढणें, निघणें) [स अवसर+वाणी किंवा अवतरिणी]

**अवसरणें**—अक्रि (ना) शुगणीस लागणें, खत घेणें 'मुलांची आई जर गोवाऱ्यानी तर तिने पश्चात् मुलें अवसरतात' [स अव+सृ]

**अवसरी**—स्त्री १ अडचण, अडथळा, हरकत, शंका 'पदार्थे दिसे तववरी। दिठीतें न सडी दीप जरी। तरी कें आहे अवसरी। देखावया॥'—ज्ञा १८ १०४४ 'माझी अवसरी ते फेडीं। विनयाची सांगे शुद्धी॥'—ज्ञा १४ ४१० २ अभाव, उणीव 'पै मानसींचि जरी। अहिंसेची अवसरी। तरी कैंची बाहेरी। वोसंडेल॥'—ज्ञा १३ २९७ ३ अवकाश, जागा, अवस्थिति, स्थान 'अनुभव हा ठाव वरी। आपुलीचि अवसरी॥'—अमृ ५ ६२. [स अव+सृ]

**अवसरी**—पु वेळ दाखविणारा, घड्याळजी 'इशानु अवसरी। कुबेरू भांडारी। इंदु हडप धरी। आगाजवळी॥'—शिशु ४९ [स अव+सृ, अवसर]

**अवसरी-ऱ्या**—वि ज्याच्या अंगात संचार झाला आहे असा, अंगात आणणारा-झाड, दवकर्णी, भगत [स अवसर]

**अवसरू**—पु अवसर पहा 'साक्षात् ब्रह्मी घडला। अवसरू त्यातें।'—रास १ २६१ 'तुका अवसरु जाणविती पुढें। उघडली महाल मंदिरें क्वाडें।'—तुगा ४६३

**अवसरोचित**—वि समयोचित, यथाकाळ 'मग अवसरोचित भोगावे। भोग सकळ।'—ज्ञा ३ १८८ [स अवसर+उचित]

**अवसांत**—क्रिवि एकदम, एकाएकीं, अकस्मात् 'पाठीं अवसात ये चेवो। तैं तें अवघेंचि होय वावो।'—ज्ञा ६ ६९ [स अ+वस्तुत]

**अवसाद**—पु १ श्रम, थकवा, ग्लानि, कल्मळ २ औदासिन्य, विषाद, खिन्नता [स अव+सद्]

**अवसान**—न १ अंत, शेवट, समाप्ति, अखेरी 'हें कार्य आरंभापासून अवसानापर्यंत निर्विघ्नपणें गेलें म्हणजे बरें' 'तदापरी जया ज्ञाना। शिवादि तृणावसाना। इया भूतव्यक्तिभिन्ना। नाडळती॥'—ज्ञा १८ ५३१ 'त्या ध्यानाचें परिस अवसान। कैवल्यधन पावावें॥'—एभा १३ ९७ आदि-मध्य-अवसान असा वाक्-प्रचार 'आठवतमे तुझ्या प्रश्नीं। आदि मध्यावसानक॥'—गुच ४२ २ (ल) मृत्यु, मरण, नाश 'देवाचें कार्य काय अवसानीं।'—मोभीष्म ११ १४९ ३ खंड, विराम, रहकुबी, विश्रांति, खाडा, अवसाय 'एकसारखें काम केलें पाहिजे, मध्यें अवसान घेता नये' 'नाम्लुनि दृढ पायांचें चिंतन। अवसान तें क्षण नाहीं मधीं'—तुगा १५९४ ४ (संगीत) विराम, विश्रांतिस्थान, विरामचिन्हें खुणा (पदावर) 'म्हणताना अवसानावर दम घ्यावा मध्यें घेऊ नये' ५ धैर्य, हिंमत, धाडस, मनोधैर्य, प्राणायाम, आवेश दम, धमक, उत्साह हिम्या 'परि हें अनावर आवरितां आवडि। अवसान तें घडी पुरों एवीं देत नाहीं॥'—तुगा ४५८ (क्रि० धरणें, सचणें, सुटणें, गळणें, फुटणें) ७ जोर, शक्ति सामर्थ्य प्रयत्न, परिश्रम, ताण, ओढ, नट, कष्ट, भर, शक्तिप्रयोग, दम,

'तू दमला असल्यास बैस, मी एक अवसान मारतों' 'या मता वर श्रीधरपंत वारंवार फार अवसान देतील' –आगर ३ १४३ ८ ऐनवेळ, ऐनप्रसंग, आणीबाणीची वेळ, अडचणीचा प्रसंग (क्रि० साधणें–सांभाळणें) 'पाऊस पुष्कळ लागून अवसानीं घालवितो त्या पेक्षा अवकाशानें सांभाळून थोडा थोडा जरी लागला तरी पुरे' ९ संधि, प्रसंग, योग १० आवेश, उत्साहाची पटका, विकाराची उत्कटता, मनोवृत्तींचा क्षोभ, माज, मस्ती ११ खोटा डौल, आव [स हिं अवसान, ओसान] **अवसानांत येणें–असणें**–आटोक्यात आवाक्यात असणें **अवसानांतून जाणें**–सामर्थ्याबाहेर, आटो क्यातून जाणें, हातातून निसटणें **अवसान–तुटणें**–धीर खचणें 'ही बातमी ऐकून सर्व मराठ्यांचें अवसान तुटलें' –स्वप २७

**अवसानघातकी**—वि आणीबाणीच्या वेळीं निराश कर णारा, पाहिजे त्या वेळीं काम न करून घात करणारा, गरजेच्या वेळीं उपयोगी न पडणारा म्ह० अवसानघातकी महापातकी [स]

**अवसानी**—वि प्रसंगावधानी प्रसंगीं उपयोगी पडणारा, आणीबाणीच्या वेळीं तत्पर, सिद्ध असणारा, धारिष्टवान [स]

**अवसाफ**—स्त्री स्तुति, प्रशंसा, वर्णन [अर अस्फ् अव]

**अवसाव**—पु (व) दरारा, धाक, ख्याती 'त्याचा अवसाव असा होता कीं गाभणी गाभ टाकी' [अर अवसाफ?]

**अवसाय**—पु १ बंद होणें, उपरम, विराम, थांबणें २ अंत, शेवट, अखेरी, समाप्ति [स]

**अवसार**—(काव्य) वेळ, प्रसंग, योग अवसर पहा 'कानाडी ओढुनि ते अवसार।' [अवसर]

**अवसी**—अवशी पहा

**अवसुती**—वि १ गैर भलतेंच अव्यवस्थित, विस्कळित, सैल, गोंधळलेलें, घोटाळ्याचें (काम, कारागिरी) २ ओबडधोबड किंवा अव्यवस्थित काम करणारा, अडाणी अजागळ, गोंधळ्या (माणूस) [स अव+सूत्र] –त्या–पु अवसुती माणूस, अडाणी इसम

**अवसूद**—वि नेमस्त प्रमाणशीर बेताचा, मर्यादित [अर औसत्=मध्यम]

**अवस्ठा**—स्त्री अवस्था, स्थिति 'कैसी अवस्ठा मूतळीं वाढू पाता।' –शिशु १७१ [स अवस्था]

**अवस्ता**—स्त्री दुरवस्था, वाईट अवस्था या अर्थी झाडीन अवस्तेचें विप।' –उषा ७ मनोगत राखोन जाता। परस्परें होणें अवस्ता।' –दा १२ १० २८ [स अवस्था]

**अवस्तां, अवस्तू, अवस्तूक, अवस्थ, अवस्था**—क्रिवि १ एकदम एकाएकीं अकस्मात् गैरसावध असता २ एकदरीनें, पूर्णपणें, अगदीं, कधींहि चुकून देखील, निरंतुल 'हा मजशीं अ० बोलला नाहीं' अवस्तूक बुडाली [स अवस्तु, अवस्तात्]

**अवस्तु**—न १ नास्तित्व, वस्तूचा अभाव २ अवास्तवत्व, खोटेपणा, भ्रामकपणा, शुल्लकपणा, पोकळपणा [स अ+वस्तु]

**अवस्तुत**—क्रिवि (कों) अवस्ता पहा

**अवस्था**—स्त्री १ स्थिति, दशा, प्रसंग, प्राप्त काल, हवाल २ उत्कंठा, आवड, चटका, चिंता, काळजी, हुरहुर, आशा, छंद, वेध, नाद, तन्मयता 'येरीकडे राजकुमारी। अवस्था लाग लीसे भारी।' –एरुस्व ५ ४३ 'भक्तप्रेमाची देवासी होय अवस्था।' –सप्र ९ १७ 'तुका म्हणे त्याचें न कळे अंतर। अवस्था ते फार होते मन।' तुगा ५९८ आजि अवस्था लागली मानसी' –दावि २३८ ०**चतुष्टय**–न मानवी आयुष्याच्या चार अवस्था, पर्याय, काल (बाल्य, पौगंड, तारुण्य, वार्धक्य, किंवा बाल्य, तारुण्य, मध्य, वृद्ध) ०**त्रय**–न १ जागृति, स्वप्न, सुषुप्ति 'अव स्थात्रय तिन्ही लोक' –ज्ञा १८ १३०० २ बाल्य, तारुण्य, वृद्धत्व ३ सात्विक, तामस व राजस, अशा अवस्था 'किंबहुना अवस्थात्रया। हें अधिष्ठान धनंजया।' –ज्ञा १८ ३२० गीर १५५ ०**द्वय**–न मानवी जीविताच्या दोन अवस्था १ पूर्वावस्था (बाल्य, यौवन) व उत्तरावस्था (प्रौढता, वार्धक्य) २ जागृतावस्था व सुषुप्त्यवस्था, जागृति–निद्रा ३ आयुष्याच्या दोन स्थिती, सुख दुःख [स]

**अवस्थातीत**—वि मानवी जीवितातील अवस्थाच्या पलीकडे गेलेला, मुक्त, ब्रह्मामध्यें विलीन झालेला [स]

**अवस्थान**—न १ राहण्याची जागा, ठिकाण, वसतिस्थान, वास २ राहण्याची, असण्याची रीत ३ पदार्थाची स्थिति, पद ४ अस्तित्व, वसती, मुक्काम 'न करिता मथन। काष्ठीं अवस्थान। जैसें का हुताशन सामर्थ्याचें।' –अमृ ७ ५१ [स अव+स्था]

**अवस्थापणें**—सक्रि ठेवणें 'लीलेनें द्विडिंभाचा न मदभव स्थापिता महात रणीं।' –मोभीष्म २ २ [स अवस्थापन]

**अवस्थाभेद**—पु जीवात्म्याच्या निरनिराळ्या अवस्था, जागृति, स्वप्न सुषुप्ति या तीन अवस्था, पहिली विष्णूची व सत्त्व गुणाची दुसरी ब्रह्मदेवाची व रजोगुणाची, तिसरी शिवाची व तमो गुणी ह्यांना अनुक्रमें विश्व तैजस व प्राज्ञ अशाहि संज्ञा आहेत याखेरीज तुरिया व उन्मनी अशाहि दोन अवस्था आहेत अवस्था पहा [स]

**अवस्थित**—वि १ स्थल–काल्व्यापक, वास केलेला, राहि लेला थांबलेला, वसवलेला २ स्थिर घट्ट बळकट, मजबूत, पक्का ३ अकस्मात शब्दाबद्दल चुकीनें वापरतात [स]

**अवस्थिति**—स्त्री १ राहणें, वास करणें, मुक्काम करणें, नांदणें २ वसतिस्थान राहण्याचें ठिकाण, स्थान, स्थळ, स्थिति, अवस्था [स]

**अवस्वर**—पु वेळ, प्रसंग, क्षण, अवसर पहा, 'प्राणु नाहीं नियें अवस्वरीं।'-उपा ४१. [स अवसर अप]

**अवहार**—पु १ एकत्र जमविणें, गोळा करणें, गुडाळणें २ उपसंहार, समारोप ३ तहकुबी, खंड, (युद्धादिकाचा) मुदतीचा-तात्पुरता तह, सावधिक संधि (इ) आर्मिस्टिस, ट्रुस ४ मोठ्या सैन्याचा आळा-पसारा, [स अव+हृ]

**अवहित**—वि हजर, तत्पर, सावधान, सादर, अवधानी, लक्ष दिलेला [स]

**अवहित्थ(स्थान)**—न (नृत्य) एकबाजूकडील कटी, पार्श्वभाग व जघा किंचित उन्नत करणें, एक हात लताख्य करणें, दुसरा हात नितंबाचे बाजूस सोडणें, उजवा पाय किंचित् तिरकस व डावा पाय मागें ओढून सम ठेवणें पत्नीची वाट पहाणें, लीला, विलास वगैरे भाव दर्शित करण्याच्यावेळीं अशा स्थानाचा अंगीकार करितात [स]

**अवहित्थ(संयुतहस्त)**—पु (नृत्य) दुसदुस हात वक्षःस्थळासमोर अंचित करून ते हळुहळु अधोमुख धरणें [स]

**अवहित्था**—स्त्री १ शरीरावर हर्षक्रोधादि विकार-भाव दृग्गोचर होत असता ते बळेंच लपवून ठेवणें, खरें रूप झाकून ठेवणें, आकारगोपन २ कपटी व्यवहार, ढोंग [स]

**अवहेलणें**—उक्रि हेंगाळणी करणें 'द्विजाची मर्यादा तदपि अवहेळूच न शके'-सारुह ५५० [स अव+हेलन]

**अवहेलन-ना**—नस्त्री (विरू) अवहेळणा-हेटाळणी, अव्हेर, तिरस्काराची-अपमानाची वागणूक, अनादर अप्रतिष्ठा [स]

**अवळ**—वि १ घट्ट गच्च आवळून बसणारें, अटस २ अरुद बारीक, आकुंचित आखुड, संकुचित (गळा, मनगट, नळी) [स आ+वल्]

**अवळ**—वि (खा) चांगलें, बरें उत्तम (गोष्ट) [अर अव्वल]

**अवळकटी-ठी, अवळकाठी**—स्त्री वाळलेले आवळे, सुकवून ठेवलेल आवळ्याचे तुकडे [स आमलक+काष्ठ]

**अवळका**—न अपयश 'अवळका करुनि सेवटीं विरून जाय।'-भाए ३६५ [स अ+वल्]

**अवळचवळ**—क्रिवि (कर वायकी व कुण) अर्धवट, अपूर्ण-अव्यवस्थितपणें चावून 'विडा अवळचवळ खातोस, खानें तोंड रगत नाहीं' [स अर्ध+चर्वित चवळ द्वि]

**अवळणें**—अक्रि १ आकसणें आकुंचित होणें आखुड होणें २ दृढ होणें, घट्ट होणें, खालीं बसणें (भिंतलात बांधलेली इमारत, किंवा नक्षत्रातील पावसानें भिजलेली जमीन) ३ गच्च बसणें, आवळणें (दात हिरड्या) ४ भरून येणें, दाटणें, रसरसीत भरदार होणें (वेळेवर पडलेल्या पावसामुळें येणारें पीक) ५ रड होणें, अंग भरून येणें, गुटगुटीत होणें (रोड जनावरांस चांगलें खाद्य मिळाल्यामुळें जनावर, गरिबाची स्थिति सुधारल्यामुळें माणूस) वरील काहीं ठिकाणीं सकर्मकहि उपयोग करतात [स अव, आ+वलन]

**अवळणें**—उक्रि १ घट्ट बांधणें-करणें, आवळणें, मनधून धरा धरणें, ताठ ओढणें २ गच्च दाबणें, जोरानें पकडणें ३ रगडणें, दाबणें, चुरणें (अवयव) ४ आवळून धरणें, घट्ट मिटणें (मूठ) ५ लुबाडणें, बळकावणें, जबरदस्तीनें ताब्या घेणें, हिसकावून घेणें, कावीज करणें 'अरवानीं किल्ला अवळला' ६ फौजचा व्यूह रचून तयार होणें आवळणें पहा [स आ+वलन]

**अवळबंधा**—स्त्री निवारण, मनाई, आकलन, नियमन, नियंत्रणा, दाब गवसणी (क्रि॰ करणें, लावणें, माडणें, होणें) [अवळणें व बांधणें स आ+वल्+बध्]

**अवळसर**—वि १ किंचित्, काहींसें घट्ट मजबूत २ किंचित् बारीक, अरुद चिंचोळें, किडकिडीत [अवळ+सर]

**अवळसरा**—वि आवळ्यासारखा, खडे असलेला -पु गंधकाचा एक प्रकार, स्फ्यागधक [आवळा+सरा=सारखा]

**अवळा**—पु. १ आवळा, एक तुरट फळ २ समईच्या दांड्याला असणारे वाटोळे वेढ -ळ्याची मोट-स्त्री तात्कालिक फायद्याकरिता एकत्र जमलेल्या लोकांचा समुदाय, गट गोळी म्ह॰ १ अवळा पिकायचा नाहीं, समुद्र सुकायचा नाहीं =हुडग्याम अशक्य अशा गोष्टीबद्दल म्हणतात २ अवळ्याची मोट बाधणें=(आवळे एकत्र बांधता, जुळविता येत नाहींत, ते निसटून जातात, यावरून) अशक्य गोष्ट करू पाहणें ३ अवळा देऊन कोहळा (किंवा बेल) काढणें=थोड्याचा बराच फायदा मिळविणें, आपण थोडें देऊन दुसऱ्याकडून अधिक घेणें, थोड्या मोबदल्यावर पुष्कळाची आशा करणें (चे) अवळे उपटणें-मोठा राग काढणें, अपशब्दाचा भडिमार करणें, ठोकणें, बुकलणें, फाडून खाणें (अवळकाठी करताना अवळे उकलतात त्याप्रमाणें) अवळ्या येवढें पूज्य-न पूर्ण अभाव, शून्य अवळे शिजणें-(कर) पायावर धारण वसणें, प करणें [स आमलक, प्रा आमल-ग-य, हिं आमला, आवला, व आम्ला, गुज आवळा, फा आम्लज, अर अम्लज्, पजा आवला लॅ फिलेन्थस् अम्बिका]

**अवळाअवळी**—स्त्री बांधाबांधी, आवराआवरी, सैन्याची कूच करावयाच्या वेळची, किंवा प्रवासास जाण्याची तयारी [म आ+वल् द्वि]

**अवळी**—स्त्री अवळ्याचें झाड, याचे दोन प्रकार आहेत-एक रायआवळी व दुसरी कृष्ण आवळी पहिलीचीं पानें बदामी आकाराचीं दुहेरी असतात फळास कमन्याप्रमाणें कंगे असतात हें फळ फक्त खाण्याच्या उपयोगी असतें दुसरीचीं पानें दामीच्या

पानागारखीं भरतात, फळ सुपारीयेवढें व आंबट असतें, हीं फळें कार्तिकांत येतात व माघ महिन्याच्या सुमारास पक्कीं होतात फळाच्या अवळ्याचा मोरावळा करतात तो पित्तशामक आहे तसेंच अवळ्याचें लोणचें करतात अवळीच्या सालींपासून कात होतो शिवाय मालींचा कातडीं रंगविण्यासहि उपयोग होतो सुकलेले अवळे ( अवळकाठी ) औषधी आहेत हिरडा, बेहडा व अवळकाठी यांचें चूर्ण करतात, त्यास त्रिफळा म्हणतात अवळीचें लाकूड पाण्यात टिकाऊ असल्यामुळें विहिरीच्या कामीं त्याचा उपयोग करतात [स आमलकी] ०भोजन–न कार्तिक शुद्ध चतुर्दशीस दूध्न अवळीच्या झाडाखालीं देवतासमाराधनेनिमित्त केलेलें जेवण

**अवळीजावळी**—आवळीजावळी पहा

**अवळ्या गंधक**—भवळसारा पहा

**अवळ्यांची समई**—स्त्री जिच्या मधल्या दांड्याचे वेढे अवळ्याप्रमाणें वाटोळे, गेंदेदार असतात अशी समई

**अवळ्यावेंच**—वि आडदांड, गॅरेरट, टोंच्या [आवळा+वेंच]

**अवक्षर**—( प्र. ) अवाक्षर पहा

**अवक्षारण**—न उपनयनातील एक विधि, गुरूनें आपल्या ओंजळींतील पाणी बटूच्या ओंजळींत घालणें व ओंजळ धुणें [स]

**अवक्षिप्त**—वि खालीं टाकलेला, फेंकलेला [स अव+क्षिप्]

**अवक्षेप-ण**—पुन १ खालीं टाकणें, फेकणें २ (ल) टोमणा, व्याजस्तुति, औपरोधिक भाषण, मर्मी भाषण [स]

**अवज्ञा**—स्त्री आज्ञाभंग, अनादर, अवमान, तिरस्कार, अपमान, हेळणा ( क्रि० करणें ) 'जे सामान्यत्वें लेखिती । अवज्ञा करूनि देखिती ।'–ज्ञा ३ १९५ 'पितृवचनीं घडली अवज्ञा अविचार । कुटिल कुतर्कवादी शिव ।'–तुगा २२६० [स अव+ज्ञा]

**अवज्ञात**—वि अनादरानें–तुच्छतेनें वागविलेला, ज्याची अवज्ञा केली आहे असा [स अव+ज्ञा]

**अवा**—पु विरू आवा १ कुंभाराची भट्टी २ भाजावयाच्या किंवा भाजलेल्या मडक्यांची रास 'आवा भाजलियावर । घेऊनि आई रात्वर ।'–भवि ९ १७० ०लुटणें–भाजलेल्या मडक्यांची रास करून तिचें पंचोपचारें पूजन करून सुवासिनींकडून लुटविणें (चा) ०उतरणें–१ मडक्यांची भट्टी नीट भाजून निघणें २ स्वच्छ चीं सर्व मुलें जगून प्रौढदशेस येणें ३ उपायसफल होणें म्ह० ज्यानें न पाहिला अवा त्यानें पाहिला दिवा=अशक्य गोष्टी सांगणें [का आवि=कुंभाराची भट्टी तुल० स आपाक हिं आवा]

**अवा**—स्त्री १ आवा, बाई अवाची पहा २ रांड, ठेवलेली स्त्री, रक्षा ३ रंडी, वेश्या, व्यभिचारी स्त्री [का अव्वा–अव्वे=आई, आजी, मोठी बाई कु आवो तुल० स अंबा]

**अवाई**—स्त्री १ आवई, कंडी, लोकवार्ता, भुमका, वार्ता, खबर, गप्प, बोलवा, बातमी 'जनि वनि पसरे राक्षसीची अवाई'–आपू ४१ म्ह० तवाई पुरवते, अवाई पुरवत नाहीं २ प्रसिद्धि, प्रख्याति 'धर्मराज श्रीमंत धन्याची त्रैलोक्यामध्यें अवाई'–ऐपो २०२ ०पडणें–बातमी पसरणें 'मोठें बक्षीस मिळेल अशी अवाई पडल्यावर बक्षिसाचे लालचीनें जिकडून तिकडून तमाशेवाले आले'–नि १४८, 'अशी लोकांत जिकडे तिकडे अवाई पडली पाहिजे'–तोब ५० [स आ+ई, प्रा आव=येणें, हिं आवाई]

**अवाईतवाई**—स्त्री संकट 'अवाई तवाई शिपाई लोकांवरी येऊन पडतच आहे'–ख ७ ३२४६ [स आपद्, प्रा आवई=संकट, फा तबाही=नाश]

**अवाक्**—क्रिवि खालीं, अध प्रदेशाकडे, सामासशब्द–अवाङ्मुख, अवाग्वदन=लज्जित, खिन्नवदन, खालीं तोंड असलेला [स]

**अवांकणें**—अक्रि १ विचार करणें, मनन करणें, मनात आणणें, चिंतन करणें २ काकू करणें, डगमगणें, आशंकणें ३ योजणें, घेत करणें, हेतु असणें 'मनामाजि अवांकिलें मर्म कांहीं ।'–राक ४३ 'आम्हीं यंदा लग्न करायास अवांकलें होतें परंतु घडलें नाहीं' ४ अंदाज करणें, अटकळ करणें, कल्पना होणें, तर्क बांधणें 'हा लाख रुपयांचा धनी आहे असें मला अवांकत नाहीं' [स अव+अक्, अवाका]

**अवाकणें**—अक्रि ( कु ) अति पिकणें, अधिकणें, [अधिकणें]

**अवांका**—( विरू ) आवाका पहा –पु १ सामर्थ्य, शक्ति, ताकद, धैर्य, हिंमत अवसान 'विप्र सुंदर नेटका । परी कोडमुखीं देखा । तरी तो जाणावा अवाका । सर्व व्यर्थ ॥'–ब ६१० २ आटोका, कबजा, आक्रमण, पकड, डाव 'तो माझ्या अवाक्यात आला म्हणजे पाहून घेईन ।' ३ धारणा, अटकळ, धोरण, मनाची गति, आकलन ४ अभिप्राय, समज, कल्पना, तर्क, अटकळ, संभवनीयतेचा विचार–दृष्टि ५ आकार, विस्तार [स अव+अक्]

**अवांग**—न (शरीराचा) नाजूक भाग, मर्मस्थान (क्रि० अवांगीं लागणें, पडणें, मारणें) [स अव+अंग]

**अवागणें**—अक्रि ( कु ) वाईट मार्गाला लागणें [स अ+वागणें]

**अवाची**—स्त्री दक्षिण दिशा [स]

**अवाचीन**—वि दक्षिणदिशेकडील–संबंधीं [सं]

**अवाचेसवा-च्यासवा**—क्रिवि अतिशय, लावल्यक, प्रमाणाबाहेर, वाटेलतितकें, भलतें, जास्त, अवाढव्य 'गोकुळरा अवाचेसवा गोष्टी सांगण्याचें अति वेड आहे'–प्रेमसंन्यास 'बाजारात माल थोडा आणि मागणी फार, अशी स्थिति पहातांच

व्यापाऱ्यांनीं कापसाचा भाव अ० वाटविला.' (क्रि० बोलणें, खाणें, वाढणें, खर्च करणें) [सं. सपाद. प्रा. सवाय=सवा द्वि]

**अवाच्य**—वि. १ उच्चारण्यास-सांगण्यास कठिण, अयोग्य; बोलण्यास अयोग्य. 'अवाच्य ते टाळी। जीभ चि गा।'—ज्ञा १४.२०९. 'तुम्ही जरी अवाच्य वदाल। तरी हा विप्र तत्काळ जाईल।'—जै ४७.११. २ अवर्णनीय; वर्णन करण्यास कठिण; अकथनीय. ३ विरुद्ध बोलतां न येण्यासारखें; अनिंद्य. [सं. अ+वच्]

**अवाज-दार-री**—आवाज पहा.

**अवाजवी**—वि. गैरवाजवी; अयोग्य. [अ+वाजवी, अर. वाजिब्=जरूरीचें, योग्य, अगत्याचें]

**अवाजी**—स्त्री. अवा; शूद्र स्त्रीला सन्मानार्थी बोलावण्याचें संबोधन (बाई, आजी याप्रमाणें). [का. अव्वा+जी]

**अवाट**—वि. आड मार्गानें जाणारा. [सं. अ+वर्त्मन्=वाट]

**अवाटा**—पु. (कर्ना.) (मालकीची) मर्यादित केलेली जागा, ओटा. [?]

**अवाड**—न. घराभोंवतालची बंदिस्त जागा; आवार; अंगण; पटांगण; परसू. [सं. आवार]

**अवाडाव**—स्त्री. १ अमार्गी, कुमार्गी वर्तन; सैन्याचा-लुटारूंचा हल्ला; त्यांनीं केलेली नासधूस, जुलुम, जबरदस्ती, जाळपोळ. २ खोडसाळपणाचें कृत्य; लहान मुलांच्या खोड्या. ३ अटोका; पकड; मिठी (सप्तमी विभक्तींत प्रयोग). 'हा माझे अवाडावांत आला म्हणजे मी मारीन.' [अ+वाट+डाव=भलत्या मार्गानें जाणें. आव=कबजा+डाव]

**अवाडू**—वि. घाव, रीघ नाहीं असें 'त्यागा भोगा होय अवाडु'—भाए १४१. [अवाट]

**अवाढवी**—अवाढाव अप 'मुलखांत अवाढवी सर्वथा होऊं न द्यावी'—मराआ ३७.

**अवाढव्य**—वि फार मोठें, विशाळ; अचाट, फार विस्ताराचें; राक्षसी; भयंकर; विपुल (इमारत, शरीर, जंगल, ओबड धोबड मोठा पदार्थ, वस्तु) [सं. अव+वृध्; प्रा वड्ढ=वाढणें]

**अवात**—वि. निर्वात, निवांत —न. १ शांतता; निवातता. [सं. अ+वात.] २ मोठें वादळ; जोराचा वारा; तुफान. ३ एकाएकीं प्राप्त झालेलें मोठें संकट-अरिष्ट, आपत्ति. [सं. अव+वात.]

**अवांतर**—वि. १ इतर; दुसरा, बाकीचा; उरलेला (भाग, संख्या) २ मुख्य विषयाला सोडून; फिरकोळ. 'माळी मग असा तर कांहीं बोलूं लागली तों कांहीं नर आल्या.' ३ गौण; अनिश्चयात्मक, विवक्षित सदरात, प्रकारांत न येणारा; किरकोळ. 'पाकीचे शंभर रुपये येतात अवांतर शंभर रुपये मिळतात.' ०प्राप्ति-स्त्री. मिळकत, आड मिळकत. ०कार्य-न निराळें काम; किरकोळ काम. ०खर्च-पु. आडखर्च. ०भोजन-न. पाहुण्यांना, अतिथींना भोजन; कुटुंबांतील माणसांशिवाय इतरांना भोजन घालणें. [सं. अव+अंतर]

**अवाप्त**—वि. १ मिळविलेला; संपादन केलेला; ज्यानें मिळविलें आहे असा. ०काम-वि ज्याची इच्छा तृप्त झाली आहे असा. 'श्रीकृष्ण अवाप्तसकळ काम।'—एभा १.२९६. [सं.]

**अवाप्ति**—स्त्री. मिळकत, लाभ; संपादणूक. सामासशब्द-सुखावाप्ति; दुःखावाप्ति; आनंदावाप्ति; मोक्षावाप्ति. [सं. अव+आप्]

**अवार**—क्रिवि (कुण) अलीकडील किंवा जवळच्या बाजूला. 'तवार' या शब्दाशीं योजितात. [सं. अवार=अलीकडील किनारा, बाजू]

**अवार**—वि. मोठें; अफाट; अपार. [सं. अपार; प्रा. अवार]

**अवार**—पुन. प्राकार; आवार पहा. 'नगरा वेढिला अवारु।'—उषा ३८. [सं. आ+वृ]

**अवारित**—वि. प्रतिकार, अडथळा न केलेलें, हरकत न केलेलें; अप्रतिबद्ध. [सं. अ+वृ=प्रतिबंध करणें]

**अवारु**—न. साधन. 'मोक्षाचें करूनि अवारु।'—भाए ५१. [वारु ?]

**अवारू**—वि. येरू; दुसरा. 'ऐसा न लागे त्याचा पार। मग अवारू जोडूनिया कर।'—भवि १८.९३. [सं. अवर=दुसरा]

**अवॉर्ड**—पु. निवाडा; लवाद निवाडा; पंचांचा निर्णय. [इं]

**अवार्डुपॉइस**—पु. इंग्रजी वजनाचीं विशिष्ट परिमाणें; औषध, मूल्यवान धातू, याखेरीज गूळ, साखर वगैरेसारखे पदार्थ मापावयाची जी (वजनी) पद्धति. तिचें कोष्टक जसें—१६ ड्राम=१ औंस. १६ औंस=१ पौंड. २८ पौंड=१ क्वार्टर. ४ क्वार्टर=१ हंड्रेडवेट. २० हंड्रेडवेट=१ टन [इं फ्रें. अवॉ दे पॉइ]

**अवार्य**—वि. ज्याचें निवारण किंवा ज्याला प्रतिबंध करतां यावयाचा नाहीं असें; अनावर [सं. अ+वृ]

**अवालीपन्हा**—वि. उच्च पदाचा; पहिल्या प्रतीचा. [अर. अव्वल्+फा. पन्हाह्=आश्रय]

**अवालीमजलत**—वि. पहिल्या प्रतीचा सामर्थ्यवान्. [अर. अव्वल्+मजाल्=सामर्थ्य]

**अवासवा**—अवाचेसवा पहा.

**अवाहक**—वि. (शाप.) विद्युत्, उष्णता इ० ज्या पदार्थांतून वाहत नाहीं असे (पदार्थ) (इं) नॉन कंडक्टिवल [सं. अ+वाहक]

**अवाह्न**—आमंत्रण, आवाहन पहा. [सं. आ+ह्वे]

**अवाही**—वि. (व) मशागत न करतां लागवड केलेलें. मळाऊ ३ अर्थ पहा. [सं. अ+वह] ०डोंगर-पु जमिनीची मशागत न करतां, न पेरतां, न लावतां आलेला डोंगर-भोपळा.

**अवार्द**—आवार्द पहा.

**अवाक्षर**—न १ वाचण्यांत, बोलण्यात, लिहिण्यांत निघालेलें भलतें अक्षर, बोलण्यात, लिहिण्यात चुकी-प्रमाद, अशुद्ध उच्चार २ एकहि अक्षर, शब्द, आवाज, ध्वनि, उद्गार, चकारशब्द (मुख्य तेच्या उलट अर्थी) 'एक अवाक्षर तोंडातून काढायचीं नाहीं' —फाटक, नाटपछटा १ 'तू दुसऱ्या कोणाजवळ अवाक्षर बोललास तर टार मेलास म्हणून समज' —उष काल ३ अपशब्द, निंदा युक्त, अभद्र, शिवराळ, भाषा, दुर्भाषण, शेवटच्या दोन अर्थी नका रात्मक उपयोग [स अव+अक्षर]

**अवि**—पु १ मेंढा २ सुपण, वई 'मृतिदायक सापाची छाया मेका, अवींसहि कसापाची।' —मोकृष्णवि ३८४८ [स अवि स्, लिथु अविस्, स्लाव्ह ओव्न्स, ॲं ओव्हिस्, ग्री ओइस्, गॉथिक अविस्त्र]

**अविकणें**—अक्रि उतरणें, अतिशय पिकणें, पिकून बिघडणें, नासणें (फळ) [स अति+पच्]

**अविकळ**—वि १ अखड, सबध, संपूर्ण 'तेथें भागवतधर्मे हे सकळ।शिकावे अविकळ अनन्यश्रद्धा।'—एभा ३ ६१४ 'स्त्रियाचें यालागीं मन सफळ झालें अविकळा।' —कात्यायन मत २० २ व्यवस्थित, निर्दोष 'निघवण त्रिकाळ। पूजा करितां अविकळ। भजोनि जिंकिला कळिकाळ।' —एभा ६ १२१ ३ विकाररहित, स्थिर, दृढ 'तैसीं नाना कर्में करिता सकळ। सदा अविकळ योगिया।' —एभा ८ ४३ ४ अव्यग, ज्याची गात्रें शुद्ध आहेत असा [स अ+विकल]

**अविकार**—वि विकाररहित, निर्दोप 'बोलणें जें अविकार। तें सत्य येथें॥' —ज्ञा १६ १२४ [स अ+विकार]

**अविकारी, अविकार्य**—वि १ विकृति न पावणारें, फरक, बदल न पावणारें, निर्विकल्प, नित्यसम २ नाश, ऱ्हास न पाव णारें ३ (व्या) अव्यय, ज्यास लिंग, वचन, विभक्ति लागत नाहीं असा [स अ+विकार]

**अविकृत**—वि १ रूपांतररहित २ विकार न पावणारा, न बदलणारा 'व्यक्तीसी अतीतु। आनंदि अविकृतु। सर्वरूप॥' —ज्ञा २ १५० [स]

**अविक्रिय**—वि १ विकाररहित 'म्हणौनि कैंचे अश्रा अवि क्रिया। एका मज।' —ज्ञा १५ ३३७ [स अ+वि+कृ]

**अविक्रिय**—वि अक्रिय, क्रियाशून्य [स अ+वि+कृ]

**अविक्रिया, अविक्री**—स्त्री १ विकार विकृति, विघाड दुखणें, अजारीपण, असमाधान २ किळस, वीट ओकारी, कंटाळा, शिसारी [स अ+वि+कृ]

**अविचार**—पु अविवेक, विचाराभाव, दुर्लक्ष्य, अज्ञान, वेडे पणा —वि अविचारी पहा [स अ+विचार]

**अविचारणीय**—वि १ विचाराच्या आवाक्या बाहेरचें 'मग अविचारणीय तें आंगा। पडोनि जाय।' —ज्ञा ६ ४६७ २ अतर्कनीय, शुद्ध [स]

**अविचारणें**—अक्रि अविचार करणें 'मग सुमती बोले प्रधान। राया करवें दुशिलें वर्तमान। अश्व धरिला अविचारून। यासी परिहार एक आहे॥' —जै २३ ४१ [स]

**अविचारशील, अविचारी**—वि विचार न करणारा, लक्ष न घालणारा-देणारा, अविवेकी, गाफील, असंयमी, तापट [स]

**अविचारित**—वि ज्याबद्दल मनन, विचार केलेला नाहीं असें, अविचाराच्या लहरींतलें, पूर्णपणें आकलन न केलेलें, 'हें एकलौतें चराचर। अविचारित सुंदर।' —ज्ञा १४ ११० 'तेवीं इहामुत्र कामनीय। जें अविचारित रमणीय।' —एभा १४ ३५६ [स]

**अविच्छिन्न**—क्रिवि १ निरंतर अव्याहत, एकसारखें, अखड, सतत 'ही वृत्ति आम्हाकडे पाचशें वर्षें अ० चालली आहे' २ ततोतत, बरोबर, निवळ, यथास्थित, व्यवस्थितपणें, सुंदर रीतीनें 'धंद्याचे व्यवहारात अ० दोन हजार रुपये मिळाले' —वि अविभक्त, अत्रुटित, अखंड, सबध, सगळा 'सरकारी सभा सदाचें अविच्छिन्न बहुमत सदैव कायम राहील' —टि ३ २१६ [स अ+वि+च्छिद्=कापणें]

**अविट**—वि (विरू) अवीट १ अविनाशी, उत्कृष्ट न विट लेले 'अविट अमल अनुपम्य अतिभव्य तेज फाकलें।' —देप १६३, 'अविट ज्याची करणी ऐकतां देहभाण होतो भंग।' —होला १४ २ सतत कार्य करणारा, न कंटाळता काम करणारा, दमदार, शूर 'बापु गोखले केवढे अविट। म्हणे शत्रुची लागली विट।' —गापो १०४ अवीट पहा [अ+विटणें]

**अविंद**—अविंध पहा 'अविंदाचें राज्य वेदरीं असता। कागद पाहता तलाव केली॥' —तुगा ४४३६ [स अ+व्यध्]

**अविदग्ध**—वि मूर्ख, अडाणी, अकुशल [स अ+विदग्ध]

**अविद्धयोनी**—वि अक्षतयोनि, जिला पुरुषाचा संग झाला नाहीं किंवा जिचा कौमार्यभंग झाला नाहीं अशी, अनुपभुक्त (विधवा, कुमारी) [स अ+विद्ध+योनि]

**अविद्य**—वि अविद्वान, मूर्ख, अडाणी 'अविद्य सुविद्य न म्हणता जाण। धरातळीं ब्रह्म ब्राह्मण। त्याचें करूं जाता छळण। कुळनिर्दळण आवश्यक॥' —एभा १ ३६४ [स अ+विद्या]

**अविद्यमान**—वि हजर नसणारा, अनुपस्थित, नाहींसा झालेला निर्गत, विनष्ट मयत, अवर्तमान [स अ+विद्=असणें]

**अविद्या**—स्त्री १ विद्या नसणें, अज्ञान, अजाणपणा 'हे चिदंश अविद्येमुळें आत्मस्वरूप विसरून आपण जीव असें मानून संसारात पडले' —शास्त्रीको २ माया, अवास्तविक गोष्टी खऱ्या मानणें 'तर्षे मायेच्या प्रपंचासच अविद्या ही संज्ञा आहे' —गीर २०८ 'परमात्म्याचीं दोन आवरणें —स्थूलदेह, लिंगदेह— आहेत या कल्पनेच्या मुळाशीं अविद्या आहे' ०पसारा-पु अज्ञानाचा

प्रसार, व्याप, मायाजाल, मोहजाल 'स्त्री केवळ अविद्याप सारा '-द्योपाधि-पु अविद्या-अज्ञान याची उपाधि, अज्ञानरूपी आवरण उपाधि पहा [स]

**अविंध**—वि छिद्र, भोंक न पाडलेला (मोती, कान) -पु मुसलमान, यवन, म्लेंछ, मुसलमानांच्या कानास हिंदूप्रमाणे भोंकें पाडलेलीं नसतात म्हणून (सामा) अहिंदु [स अ+व्यध्]

**अविधवा**—स्त्री जिचा नवरा जिवंत आहे अशी स्त्री, सुवासिनी, सवाष्ण [स अ+वि+धव] ०नवमी—स्त्री भाद्रपद वद्य नवमी, या दिवशीं पिता जिवंत असून माता मृत असेल अशा गृहस्थानें श्राद्ध करावयाचें असतें हें श्राद्ध सपिंडक करावें माता मृत असून पुढें कांहीं दिवसांनीं पिता मृत झाल्यास हें अविधवा नवमी श्राद्ध करू नये असें कांहीं म्हणतात —धर्मसि ?

**अविधि**—पु नियमाचा-विधीचा अभाव, शास्त्रविरुद्ध वर्तन, स्वैराचार, धर्मबाह्य आचार, अनाचार. 'रुक्मिया म्हणे लग्न लावूनिया । मग कन्या नेऊ अनाल्या । राजा म्हणे कुलधर्म टाकोनिया अविधि केंवि करावा ।' —ह २३ ३३८ —वि अव्यवस्थित विधिपूर्वक न केलेलें, अशास्त्र —क्रिवि अशास्त्ररीतीनें, अव्यवस्थितपणें [स अ+विधि]

**अविंधी**—वि मुसलमानी, यावनी, अहिंदु, विधर्मी (अमदानी) [स अ+व्यध्]

**अविनय**—पु उद्धटपणा, दांडगेपणा, मस्तवालपणा, विनयाभाव —वि उद्धट, मस्त उर्मट, द्वाड, गर्विष्ठ [स]

**अविनाश**—पु नित्यत्व, शाश्वतता, नाशाचा अभाव, अनश्वरत्व —वि नाशरहित असा, शाश्वत, नित्य, अनश्वर 'पाहतां मज अविनाशातें । तरी कैंचा दिसे ।' —ज्ञा ९ १५२ [स अ+वि+नश्] ०पद—न मोक्ष, कैवल्य 'या देहाचेनि साधनें । अविनाशपद पावणें ।' —एभा ९ २८१ ०भाव—पु नित्यत्वबुद्धि, अविनाशी आहे असा समज 'तो देखतसे अविनाशभावें । आत्मबुद्धि ॥' —ज्ञा ४ १२०

**अविनाशित्व**—न (शाप) सातत्य, नित्यत्व (इं) कॉंझरवेशन [स]

**अविनाशी**—वि नाश न पावणारें, अनश्वर, नित्य शाश्वत, नष्ट न होणारें [स]

**अविनिगमक**—वि (छत) शास्त्रप्रामाण्य, पुराव्याचा आधार नसलेला [स अ+वि+निगम+क]

**अविनीत**—वि उद्धट, अनम्र गर्विष्ठ अविनय पहा [स]

**अविभक्त**—वि समाईक, एकत्र ०कुटुंब—न एकत्र राहणारें हिंदु कुटुंब, घराणें (इं) जॉइंट फॅमिली [स अ+विभक्त]

**अविभाज्य**—वि १ भाग, वांटा, वाटप न करता येणारें, विभाग न होणारा रें २ भाग करण्यास योग्य नाहीं असा ०अवयव—पु (गणित) ज्याचे अवयव पुन्हा पडत नाहींत असे अंक उ० ११, ७, ३ ०मिळकत—स्त्री १ जिची वाटणी करू नये असें कायद्यानें ठरविलें आहे अशी मिळकत, राज्य वगैरे २ कुटुंबातील इतर इसमास वाटून न देता एकाच इसमाकडे चालणारी मालमत्ता [स]

**अविमुक्तक्षेत्र**—न काशीक्षेत्र 'अविमुक्त महास्मशान । वाराणशी, आनंदवन । एकासीचि नावें जाण ।' —एभा ३१ ५२६, रा ३६९९ [स]

**अविरजी**—वि न विरजलेलें 'अविरजी दुधाचें भाडें ।' —ज्ञा १८ १४७६ [अ+विरजणें]

**अविरस्था**—अवस्था पहा

**अविरल**—वि १ पातळ नव्हे तो, दाट घट्ट २ एकसारखा, निरंतर 'जगदुन्मीलनाविरल । केलिप्रिय ॥' —ज्ञा १८ ६ [स]

**अविर्भव**—आविर्भाव पहा

**अविलंब**—पु शीघ्रता, तातडी, उशीराचा अभाव 'सकळा भेटी साधनी । अविलंबेंसी ।' —गुच १६ —क्रिवि जल्द, त्वरित [स अ+विलंब]

**अविवक्षित**—वि १ विवक्षित, विशिष्ट, निराळा नसलेला, विशेषेंकरून उद्देशिलेला किंवा इच्छिलेला नव्हे तो २ ज्याचा विचार किंवा मनन केलेलें नाहीं असा, अचिंतित ३ अनिश्चित, कोण ताहि [स]

**अविवाहित**—वि लग्न न झालेला [स]

**अविवेक**—पु अविचार, विचाराचा अभाव, तारतम्य नसणें, मूर्खपणा 'जरी जाहला अविवेकु । तरी सतक्रपादीपकु । सोज्वळु असे ।' —ज्ञा १ ७३ [स अ+विवेक]

**अविवेकी**—वि अविचारी, सदसद्विवेकबुद्धीचा उपयोग न करणारा, तारतम्यज्ञान ज्याला नाहीं असा, मूर्ख, असमंजस 'जैसी रायवणी रसलोय निकी । करूनिया मोलें विकी । तैसा भाग साटीं अविवेकी । घाडिती धर्मु ॥' —ज्ञा २ २५४ [स]

**अविश्रम**—क्रिवि एकसारखें, विसावा न घेतां 'त्या भोगाचें फळ गहन । अविश्रम जन्ममरण ।' —एभा २८ १५७ [स अ+विश्राम]

**अविश्रांत**—क्रिवि न दमता, थकता, विश्रांति घेतल्याशिवाय, सतत, अखंड निरंतर [स]

**अविश्वसनीय**—वि विश्वास ठेवण्यास अयोग्य, गैरभरवशाचा [अ+विश्वास]

**अविश्वास**—पु बेभरवसा, विश्वासाचा अभाव 'तिजवर माझा अविश्वास आहे' —न्यायप ३९१ [अ+विश्वास]

**अविश्वासी-सू-सूक**—वि १ बेभरंवशाचा, साशंक, विश्वास, श्रद्धा न ठेवणारा २ विश्वास, भरवसा ठेवण्याला अयोग्य [स]

**अविष्करण**—विप्र आविष्करण पहा

**अविसाळें**—न पक्ष्यांचें घरटें, खोट, कोठार 'का महा वृक्षीं अविसाळें। पक्षजातीचीं।'—ज्ञा ११ २५८ 'हो का पक्षिणी देखोनि पिलें। साडोनिया अविसाळें। मुख कोंचळें जेवीं पसरी॥' —एभा ७ १५७ [स अविस्+आलय=आश्रयस्थान]

**अविस्रां**—क्रिवि एकाएकीं, न समजता [स आ+विस्मृति=आ+विसर]

**अविस्वासणें**—अक्रि अविश्वास ठेवणें, विश्वास नसणें 'भग वद्रचनीं अविस्वासे। ऐसा कोण पतित असे।' —दा ११ २१ [स अ+विश्वस्]

**अविहित**—वि शास्त्रामध्यें न सांगितलेलें, न आज्ञापिलेलें, शास्त्रविरुद्ध 'अविहित कामस्थिती। हा स्वभाव ज्याचे वृत्ती। ते अत्यजादि प्रकृती। जाण निश्चिती उध्दवा॥' —एभा १७ २२३ [स ]

**अवीक**—वि (गो) जास्त, फाजील, अधिक [स अधिक]

**अवीट**—वि १ न विटणारा, पक्का (रंग), चवदार, न विघडणारें (अन्न) 'अवीट न विटे परमान्न।'—भज ४२ न विघडणारा, निस्तेज, खराव न होणारा (रत्न, मणि, धातु), कद्राळा, विळस शिसारी नस णारा (मुद्दाम दुष्टपणा, पापाचरण करणारा इराम), लवकर जीर्ण न होणारें—न झिजणारें—खराब न होणारें, मुस्ड (दागिने, भांडीं, शरीर, इमारत), उच्छृंखलपणाचें, अमर्याद, अविनयशीलपणाचें (भाषण), विपुल, समध्द (पीक, धान्य), याखेरीज इतर पुष्कळ निरनिराळ्या अर्थांनें हा शब्द योजतात, पण बहुतेक अक्षय, टिकाऊ या अर्थीच असतो २ अढळ, अच्युत, अक्षय्य, अनश्वर (ईश्वराबद्दल योज तात) 'भीटपणेंचि अवीट पदाप्रति नीट करुनि मन सत्वर पावा।' —रत्न ८ ३ ऐटदार, आकर्षक 'भीट सभातरिं नीट रिघोनि, अवीट वसे कवणास न साहे।'—आमी २९ अविट पहा •**आवडी**—स्त्री अढळ, अक्षय, श्रद्धा–प्रेम 'तैसा तुका वैष्णव वीर। अवीट आवडी त्याची थोर।' [अ+वीट]

अवील, अवीलचूल—अवेल व अवेलचूल पहा

**अवीस**—न मांस [स आमिष]

**अवृष्टि**—स्त्री अवर्षण 'ते अवृष्टीचेनि उपद्रवें' —ज्ञा ११ २२१ [स अ+वृष्]

**अवेक्त**—वि अव्यक्त (अप) 'जे अनेक पुरुषांची वेक्ती। निस्तारें वाढवी इच्छाशक्ती।' —दा १ ३ ११ [स अव्यक्त]

**अवेग्रता**—स्त्री अव्यग्रता (अप) एकतानता 'कीर्तनें अवे ग्रता घडे। कीर्तनें निश्चये सापडे' —दा ४ २ २९ [स अव्यग्रता]

**अवेच**—वि खर्च वाचविणारा, बचत करणारा, काटकसरी, कृपण, कजूष, हाताचा जड [स अ+वि+ची, म अ+वेंचणें]

**अवेर-रां**—क्रिवि (गो) एरवां, पुढें येणाऱ्या किंवा गेल्या चौथ्या दिवशीं (काल किंवा उद्यां), परवां, तेरवां अवेरां (एरवां) असा अनुक्रम) [स अपर, अवर]

**अवेल**—स्त्री अयाळ पहा •**केश**–वि ज्याचें अयाळ खुरा- पर्यंत पोहोंचतें असा (घोडा)

**अवेल(ला)**—पु चुलीच्या बाजूला, लहान सहान भांडें ठेव- ण्याकरिता केलेला एक भाग (यास स्वतंत्र तोंड नसून चुलींतून जाळ जावयास जागा असते, असे एक, दोन क्वचित् तीनहि अवेल एका चुलीस जोडलेले असतात), वैल पहा •**चूल**–स्त्री जीस वईल आहे अशी चूल [?]

**अवेव**—पु अवयव (अप) शरीराचा भाग 'का कूर्म जिया- परी। उवाइला अवेव पसरी' —ज्ञा २ ३०१ 'हात पाये अवेव नाना।' —दा १५ ७ २४ [स अवयव]

**अवेश्वरीं**—क्रिवि योग्य किंवा या, त्या वेळीं, काळीं, समयीं– प्रसंगीं 'ह्या अवेश्वरीं त्या अवेश्वरीं।' —शर (शुभा उद्यो ५ १) [अवसरीं अप ]

**अवेळ**—स्त्री १ योग्य वेळ निघून गेल्यानतरची वेळ, उशीर, विलंब २ अयोग्य वेळ–काळ–समय, अनवसर [सं अ+वेला] •**सवेळ**–स्त्री योग्य–अयोग्य, अनुकूल–प्रतिकूल वेळ–समय, वेळ– अवेळ 'अवेळसवेळ पाहून काम करणें तें करावें भलतेंव्हा करू नये' [स अवेला+सुवेला]

**अवेक्षण**—न १ शोध, तपास, चौकशी, पाहणें २ लक्ष, देखरेख, अवलोकन, रक्षण ३ कृपा, लोभ ४ काळजी [स अव+ ईक्ष्]

**अवो**—उद्गा अहो! अगे! एक संबोधन 'अवो अवो कृष्णे हरिजे। अडखळसी रत्नाचिजे पायरिजे।'—शिशु ६९२. 'अवो तू देवाची प्रिय परम अर्धांग हरिचें।' —साछह ७ ९९ [ध्व ]

**अवो**—पु आव पहा [स आकार]

**अवोज**—पु आवाळ, ओज नसणें 'नातरी होता कृषीचा अवोज। परिता नासे वीज पाहा।' —जै ६३ २० [स अव+ ओजस्]

**अवोक्षण**—न औक्षण, अभिषचन, पाणी शिंपडणें (विशे षत विधि, संस्कार यामध्ये [स अव+उक्ष्–शिंपडणें]

अव्कात—अवकात पहा.

अव्जार—अवजार पहा

**अव्यक्त**—वि १ व्यक्त नव्हे तें, उघड–प्रकट नाहीं तें, अस्पष्ट, अदृश्य, दृग्गोचर नसलेलें, मानवी दृष्टीला अगम्य (देवता, परमेश्वर,

आत्मा ) ' पडिला अव्यक्ताचिया दशा । उद्योतकारु सूर्य जैसा । ' –अमृ ६ ३ २ ( गणित ) अस्पष्ट, अज्ञात, माहीत नसलेली ( बीजगणितातील राशि, सख्या ) ३ अस्पष्टोच्चारित, ककारादि वर्णरहित शुद्ध ध्वन्यात्मक ( शब्द ) ४ ( ल ) गुळमुळीत ( आवाज, ध्वनि ) ५ निराकार ' आघु मी व्यक्तु । अव्यक्तु ही मी । ' –ज्ञा १८ ११९४ ६ अतिसूक्ष्म –न माया, ब्रह्म, प्रकृति, कारण ' विराटाचा विराज पुरुषु । तो अव्यक्तीं करी प्रवेशु । ' –एभा ३ १७५ [स] ०गणित–न बीजगणित, यातील काहीं राशी अव्यक्त असतात ०गुणन–न ( बीज ) अव्यक्त राशींचा गुणाकार ०पक्ष–पु. पिंगवाच्या वर्गांतील प्राणी याचे पख दिसत नाहीत याच्या अनेक जाती आहेत ०भजन–न (गणित) अव्यक्त सख्याचा भागाकार ०राशी–पु ( बीज ) जिची किंमत दिली नाहीं किंवा माहीत नाहीं अशी सख्या सस्कृत बीजगणितात इग्रजी एक्स्, वाय, झेड् प्रमाणें अव्यक्त सख्यादर्शक काहीं सज्ञा योजिल्या आहेत, उ० कालक, नीलक, पीतक, लोहितक चित्रक, हरितक, मेचक, श्यामलक, कपिलक, पिंगलक इ० ०साम्य–न (बीज ) अव्यक्त राशींचें समीकरण

**अव्यक्तता**—स्त्री ( सगीत ) वर्णोच्चार स्पष्ट नसणें [ स ]

**अव्यंग**—वि १ उणेपणा नसलेला, सर्व अवयवानीं, घटकानीं परिपूर्ण, सगळा, सपूर्ण, साग ' जिंतिला जन्ममरणाचा पाग । सुख अव्यग पावलें ॥ ' –एरुस्व १० ८६ २ व्यग नसलेला, दोषहीन, निर्दोष ' आदरि जो अव्यगु । सन्यासु तो । ' –ज्ञा १८ ६९ ०वर्ण–वि व्यगरहित, दोषरहित, पूर्ण ' तया अव्यगवर्णेया ब्रह्मातें । जाणोनि स्मरे । ' –ज्ञा ८ ९१ [ स ]

**अव्यग्र**—वि ( काव्य ) अस्वस्थ नसलेला, न क्षोभविलेला, अनुद्विग्न, शात, सथ, स्वस्थ, एकाग्रचित्त, पूर्ण लक्ष असलेला, ज्याचे चित्त दुसरीकडे गुतलें नाहीं असा ' गुंफेद्वारें लक्ष्मण । बैसला रक्षण अव्यग्र । ' –रावि [ स ]

**अव्यत्यय**—वि उपद्रवरहित, एकसारखा, अखडित ' मग समाधि अव्यत्यया । ' –ज्ञा १८ १०५४ [ स ]

**अव्यभिचार**—पु एकनिष्ठता, अनन्यता एकाग्रता ' घणा वली आवडी । अव्यभिचारें चोखडी । ' –ज्ञा १५ ५ **अव्यभिचारित**–वि. सदोदित, अखडित –न्यायप १६८ **अव्यभिचारी**–वि सर्वसाधारण, सामान्य नव्हे असा, योग्य, बरोबर, आवश्यक, विवक्षित [ स ]

**अव्यय**—न (व्या ) १ अविभक्तिक किंवा अविकारी शब्द, ज्यास लिंग वचन विभक्ति, प्रत्यय लागत नाहीं किंवा ज्याचें रूप बदलत नाहीं असा शब्द उ० क्रियाविशेषण उभयान्वयी –वि अविनाशी, नष्ट न होणारें, न बिघडणारें, फरक किंवा बदल न होणारें शाश्वत, व्ययरहित, अनश्वर, विकाराक्षम, व्यर्थ न जाणारा ' व्यया मार्जी मी अव्ययो ' –एभा २ ३९४ २ अमोघ, व्यर्थ न जाणारा, ' बाण अव्यय काढिला । गुणीं अवगुणाचे जोडिला । अक्रूरें कानाडीं चोढिला । उडविला विदूरथ । –एरुस्व ६ ३० ३ व्ययरहित (ब्रह्म, स्वर्गलोक ) अक्षय ' अन्य पुरुषाची जों वरी घुशिला । नसे, गेली जों न ती अव्ययाला ॥ ' –टिक ७३ [ स ]

**अव्ययीभाव**—पु (व्या ) एक समास ज्या समासांतील पहिले प्रधानपद अव्यय असून सबध समासाचा उपयोग अव्ययासारखा होतो तो समास उ० यथाशक्ति, हरघडी, दरदिवस, अनुरूप प्रतिवर्ष [ स ]

**अव्यवस्थ–स्थित**—वि १ योग्य, यथास्थित, जेथल्यातेथें न लावलेलें–रचलेलें–माडलेलें–ठेवलेलें, विस्कटलेलें ( गोष्ट, काम ), गुताागुतीचें ( काम ) २ बेशिस्त, अनियमित, टापटीप नसलेला, गजागळ (इसम) [ स ]

**अव्यवस्था**—स्त्री व्यवस्थेचा अभाव, बेशिस्तपणा, घोंटाळा, घालमेल, गोंधळ, अनियमितपणा [ अ+व्यवस्था ]

**अव्यवहार**—वि व्यवहाररहित, अव्यवहारी पहा –पु खोटा व्यवहार, चोरी, निंद्यकर्म ' का राजाज्ञा अव्यवहार । कुठ्ठी मेवीं । ' –ज्ञा १८ ७३३ [ स ]

**अव्यवहारित**—वि उपयोगात न आणलेला, व्यवहारातून गेलेला, रद्द, अनुपलब्ध, अव्यवहारी–र्य पहा [ स ]

**अव्यवहारी–र्य**—वि १ व्यवहारातील नाहीं असें, अप्रमाण्य, ज्यासबधानें कोणताही व्यवहार होऊ शकत नाहीं असें ' आणि सवादाचेनि मिषें । जे अव्यवहारी वस्तु असे । ' –ज्ञा १८ ८१ २ बहिष्कृत ३ ज्याला व्यवहार माहीत नाहीं असा [ अ+व्यवहार ]

**अव्यवहित**—वि १ अव्याहत, अप्रतिबध्द, अखड, अडथळा न केलेलें, झालेलें, सतत चाललेलें २ जुळलेलें, जोडलेलें, चिकटून असलेलें, लागतें ३ एकनिष्ठ व्यवहित, व्यवधान न पावलेला ' ते अव्यवहिता भक्ति । ' –यथादी १८ २४३८ [ स अ+वि+धा ]

**अव्या**—पु (कों ) १ अडथळा, आडकाठी, हरकत २ खड, भग ( चालीरीतींचा ) दु खप्रद प्रसग, अरिष्ट, अनर्थ

**अव्याकुल**—वि अनुद्विग्न, अव्यग्र, एकाग्र, स्थिरचित्त 'सदा मद्रूपें मननशील । अव्याकुल श्रवणार्थी । ' –एभा १३ ७३९ [ स अ+व्याकुल ]

**अव्याकृत**—वि १ विवरण, स्पष्टीकरण टीका न केलेलें २ अस्पष्ट, अव्यक्त गूढ ३ विकाररहित, अविकृत ' कारणदेह अव्याकृत । प्रलय अवस्था वर्ते तेथ । ' –विउ ५ २५ ४ चागलें अगर वाईट असें कोणतेंच फल न देणारें ( कर्म ) कर्माचे तीन विभाग करितात–कुशल, अकुशल आणि अव्याकृत –ज्ञाको ( क ) १३८ [ स ]

**अव्याकृति**—वि सुंदर, सुरूप 'शेषशयना अव्याकृति । घन श्याम तु लावण्य जोती ।'—मक ३२ १६२ [स अ+वि+आकृति]

**अव्याज**—वि निष्कपट साधा, सरळ, पाचपेंच नसलेला [स अ+व्याज=कपट]

**अव्यापारेषु व्यापार**—पु नसता उद्योग, भलतीच गोष्ट, विकतश्राद्ध, ओढवून आणलेली अडचण (पचतनात एक खुंटी उपटणाऱ्या वानराची गोष्ट आहे तीतील एका श्लोकाचा हा आरंभ आहे)

**अव्यापी**—वि न व्यापणारें, व्यापक नसणारें [स ]

**अव्याप्ति**—स्त्री. अपुरी व्याख्या, लक्ष्यार्थाचा एकदेश (काहीं भाग) लक्षणानें व्याप्त न होता (शिल्लक) राहतो असा दोष तो, —शास्त्रीनो व्याख्येय जातीमध्यें ज्या ज्या व्यक्तींचा समावेश व्हावा अशी इच्छा असते, त्यापैकीं एखाद्या व्यक्तीचा समावेश तीमध्यें होत नाहीं असें व्याख्येवरून दिसणारा एक दोष, जसें—पदार्थांची किंमत देण्याघेण्याच्या सोयीकरता राज्यकर्त्यांनीं केलेले जे धातूचे तुकडे त्यास नाणीं म्हणावें अशी नाण्याची व्याख्या केली तर ती वरून कवड्या, बदाम इत्यादिकांचा समावेश नाण्यात होणार नाहीं यात अव्याप्ति हा दोष आहे —सुको ४१ [स ]

**अव्याप्यवृत्ति**—स्त्री १ (तर्कशास्त्र) कालासर्वी, स्थिती सर्वी वगैरे अपूर्ण अस्तित्व, जसें—दु खावस्थेंत सुखाभाव, सुखावस्थेंत दु खाभाव पूर्णपणें होत नाहीं २ सावधित्व, समर्यादत्व, हिच्या उलट विश्वव्याप्यवृत्ति अमर्यादत्व [स ]—वि (तर्कशास्त्र) १ विश्वव्यापक किंवा सर्वव्यापी नसणारा २ अकथनीय, अवाच्य, असंभवदुक्तिक [स ]

**अव्यावस्त, अव्यावेस्त**—अव्यवस्थित पहा 'बहुधा बोलणें अव्यावेस्त । बोलोंचि नये ।'—दा ४ २ १८ [अव्यवस्थित अप ]

**अव्याहत**—वि अबाधित, अखंड, अडथळा न होतां चाललेलें, अप्रतिहत, अप्रतिबध्द, निर्विवाद अविच्छिन्न 'दशसी तो अव्याहतु । तामसु वता ॥'—ज्ञा १८ ६८८ —क्रिवि मदोदित, अखंड, खंड न पडतां सतत [स ]

**अव्युत्पन्न**—वि १ ज्याची व्युत्पत्ति लावलेली नाहीं असा मूळ न सापडलेला (शब्द, नियम) असाधित (शब्द) २ अविद्वान, अडाणी [स ]

**अव्रण**—वि १ दु ख जखम क्षत रोग वगैरेंतून मुक्त (इसम जनावर फळ) २ निर्दोष, उणेपणा नाहीं असें, भग किंवा तडा वीर नसलेला (कळश, पात्र, सापर वगैरे) [स ]

**अव्लाद**—औलाद पहा 'देवाच देवकीं अव्लाद्-अस्ला- तुम्हा रापें ।'—रा ८ २६

**अव्लिया**—अवलिया पहा

**अव्वल**—अवल पहा 'अव्वलीपासून जातीनें मनुष्यास धक्का कोठेंहि बसला नव्हता ।' होकै ६ [अर ]

**अव्वा**—स्त्री स्त्री, बाई, वृद्ध बाई अवा पहा [का अव्वा= आई, स अबा, प्रा=अव्वा]

**अव्हा**—वि १ उजवा, —एभा १३ ७५७ ॰शंख—पु दक्षिणावर्ती, उजव्या मुखाचा शंख हा फार मंगलदायक असतो असें म्हणतात 'अव्हाशंख अव्हावेल । गुप्त वनस्पती अमोल ।'—दा ६ ९ १२ २ भलता, नियमरहित, अनियमित ॰सव्हा—क्रिवि उजवाडावा, इकडेतिकडे, हवेतसें, अव्हान्यासव्या 'जो इंद्रियें अव्हासव्हा । चारी चेथ ।'—राज्ञा १३ ७६९. 'धाडिता अव्हा सव्हा पाय । शिवयात्राचि होती जाय ।' —अमृ ९ ५३ [स सव्यच्या उलट ?]

**अव्हाट**—स्त्री आडवाट वाममार्ग —एभा ११ १०७०, 'पूर्व पाप ओढवलें । मन अव्हाटीं पडिलें । सवकाळ ।'—दा ५ ८ १३ 'नीट वाट साडूनि अव्हाटें जाती'—दावि ४०९ [अ+वाट, सिं अवाट ]

**अव्हाटणें**—अक्रि १ आड मार्गानें जाणें 'अव्हाटलिया आस्थाबुद्धि । विषय सुखचि परमावधि ।'—ज्ञा ४ २१ २ (व) मागील गाडी पुढें काढण्यासाठीं चवारी सोडून वैल हाकणें, रस्ता सोडून बाजूला जाणें, बाजू देणें 'गाडी अव्हाटली म्हणून चाक मोडलें' [अवाट ]

**अव्हारणें**—सक्रि (व) विस्तारणें, पसारा घालून ठेवणें 'महालक्ष्म्याच्या सणाची तयारी केली होती त्या अव्हारल्या कथा टाकाव्या म्हणून पूजा, जेवण त्यानें उरकलें व मग गेला' [स अव+हृ—हार ?]

**अव्हावणें**—अक्रि बोलावणें [स आ+व्हे=बोलावणें]

**अव्हेर**—पु १ हेटाळणी, अनादर, अवज्ञा, हेळसांड, अवहेलना धिक्कार तिरस्कार 'तु करिसी माझा अव्हेर । तरी त्यागीन शरीर ।'—कथा १ ५.१०५. २ त्याग 'जे परदेशीय आचार विचार आपल्या रीतींस जुळत नाहींत त्यांचा या पुस्तकात अव्हेर केला आहे' —नि ५४१ [स ]

**अव्हेरणें**—उक्रि १ अपमान करणें, तिरस्कारानें, तुच्छतेनें वागविणें अनादर करणें, त्याग करणें 'तैं देखिलयां दुर्योधनें । अव्हेरिलें कवणे मानें ।'—ज्ञा १ ८२ 'द्विगुरु तीर्थे जे अव्हेरिति । त्या टाकिनि नरकभूमीं ।' २ हेळसांड उपेक्षा, दुर्लक्ष्य, दुरुपयोग करणें अव्यवस्थित, धुळखात पडणें, दुर्दशा होणें (भाडीं कुंडीं पुस्तकें, शाळ्या, जागा वगैरे) [स अव+धीर प्रा अवहीर —अवहीरी=अवगणन ]

**अदाकारा**—पु कीर्ति, नावलौकिक, प्रसिद्धि अस्कारा, अस्कारा आस्कारा पहा [फा आस्कारा]

अशक्त—वि. १ निर्बल; असमर्थ; दुर्बल; हीनशक्ति. २ नालायक; अयोग्य. ०नी दुर्जन-पु. दरिद्री असून गर्विष्ठ; दुर्बळ परंतु दुष्टबुद्धीचा माणूस. [सं.]

अशक्य—वि. शक्य नव्हे तें; असंभवनीय; न घडण्यासारखें; न करतां येणारें. ०सनद-स्त्री. अव्यवहार्य वचन; कधीं अमलांत न येणारी सनद. 'राणीचा जाहीरनामा 'अशक्य सनद' म्हणून बाजूस ठेवण्यास खुद्द लॉर्ड कर्झन तयार आहेत.' –टिळे २.५५४. [सं.]

अशन—न. १ खाणें; भोजन; भक्षण. २ अन्न; खाद्यपदार्थ. 'अशनाचेनि पावकें । हारपतां प्राणु पोखे ।' –ज्ञा १८.१०२६. 'अशन अर्पुनिया स्वसुरालया' [सं.]

अशना—स्त्री. भूक; क्षुधा. [सं.]

अशनि—पु. वीज; विद्युत्; वज्र. 'एकोन योजनें घात टाकी मथुरापुरींत अशनीची । शक्ति किती' –मोसभा १.८५. [सं.]

अशब्द—वि. शब्दरहित; मूक. 'अर्थ तुमजनां ज्या लिहिती । अशब्दकाव्यें रोज किती ! ।' –ललितलहरि [सं.]

अशर—वि. दहा संख्या. अरबी सनाबद्दल वापरतात. [अर. अशर्]

अशरफी—अश्रफी पहा.

अशरीन—वि. वीस संख्या. अरबी सनाबद्दल वापरतात. [अर. इशरीन्]

अशरीरवाक्, अशरीरिणी-वाक्-वाणी, अशरीरा (री)वाणी—स्त्री आकाशवाणी; देववाणी. -एभा २४.१५५; 'अशरीरिणी अंबरीं । वदती झाली ।' –कथा. 'तों अशरीरिणी वदली उत्तर । धर्मयुध्द नव्हे हें' –पांप्र ४५.३९. अपभ्रष्ट अशायणी पहा. [सं.]

अशांत—वि. (गो) क्वचित; विरळा.

अशांत—वि. १ क्षुब्ध, अस्वस्थ; खवळलेला (समुद्र, मन, वारा इ०), दमन न केलेला, न जिंकिलेला (विषय, विकार). २ षड्विकार ज्यानें जिंकिले नाहींत असा. (विषयी, क्रोधी, लोभी इ०).

अशाश्वत—वि. (बायकी अशाश्वती) कायम न टिकणारें; क्षणभंगुर; अनित्य; क्षणिक, नश्वर [सं.]

अशास्त्र—वि. १ शास्त्रविरुद्ध केलेलें; शास्त्राला अमान्य; शास्त्राविहीत; आचाराकडे-नियमाकडे दुर्लक्ष करून किंवा त्याचा भंग करून केलेलें; शास्त्रनिषिद्ध. २ अशुध्द, अयोग्य, अडाणी. [सं.] ०सिद्ध-वि. शास्त्राप्रमाणें सिध्द न झालेलें (इं.) इनव्हॅलिड. [सं.]

अशिजा—वि. अर्धवट शिजलेला, पूर्ण शिजलेला नव्हे असा. [अ+शिजणें]

अशिलता—(प्र.) असिलता तरवार पहा. 'दळ अशिलता धरून करा पाई ।' –ऐपो २६८ [सं असि+लता]

अशिव—न. अकल्याण. [सं.]

अशिष्ट—वि. १ असभ्य; न शोभणारें; लज्जास्पद, लाजिरवाणें; विचकट; बीभत्स; कुत्सित; अव्यवस्थित; गैरशिस्त; अनर्गल (मनुष्य, व्यवहार, चालरीत, मार्ग वगैरे). २ शिष्ट, थोर लोकांना संमत नसणारें; रूढ नसणारें; सर्वमान्य नसणारें. [सं.] ०व्यवहार-पु. अनुचित, असभ्य चाल-व्यवहार (दासीगमन, लाचण्या म्हणणें वगैरे).

अशिक्षित—वि. १ न शिकलेला; शिक्षण न घेतलेला. २ कवाईत न दिलेला; तयार न केलेला-झालेला; वळण, शिस्त न लावलेलें. [सं. अ+शिक्ष्]

अशी—स्त्री. आशीर्वाद. [सं. आशिस्]

अशी—वि. असा याचें स्त्रीलिंग. –क्रिवि. या स्थितींत; याप्रमाणें. अशी होणें-विधवा होणें; वैधव्य येणें. 'तिकडच्या मरणानें मी अशी झालें ना !' –अस्तंभा १५८. अशी राहणें-वैधव्य आल्यावर सकेशा स्थितींत राहणें. 'ही चाडाळीण अशी राहिली आहे म्हणून मला घरांतलीं किती तरी कामें करावीं लागतात.' –सदानंद [सं. ईदृशी]

अशी—स्त्री. १ काशींतील नदी; असी. अशी व वारणा मिळून वाराणशी. २ काशींतील एका टोकास असलेल्या तीर्थाचें नांव. 'मर्यादा क्षेत्र वरुणा अशी । मध्यें नांदे पंचक्रोशी ।' –एभा ३१.५२९. [सं.]

अशीतशी—वि. लहानसहान; किरकोळ, क्षुद्रक; महत्त्व नसलेले.

अशीर—वि. (कों. गो.) शिरण्याला-शिरकाव होण्याला कठिण, अरुंद; चिंचोळें; २ सैल नव्हे असें, आटोपशीर. [अ+शिरणें]

अशीर—वशीवान; असीर पहा.

अशील—पु. १ खासा; खानदानीचा; अभिजात; असील पहा २ वकीलानें वृळ; पक्षकार. [अर. असील्]

अशील—वि. जखमी (लढाईतील कैदी). असीर पहा. [अर असीर]

अशुचि, अशुचिर्भूत—वि. अशुध्द; अस्वच्छ, अपवित्र (शब्दश व लक्षणेनें) 'तया तोंडीं काटिवडें । आतु कुसर्ती हाडें । अशुचि तेणें पाडें । सबाह्य जो ।' –ज्ञा १३.६७८. [सं.]

अशुद्धाळ, अशुद्धाळ, अपट्टाळ—वि घाणेरडा, अव्यवस्थित, ओंगळ; अजागळ (माणूस); गिचमिड, चुक्यानीं भरलेला (कागद, लेख); गिचमिड लिहिणारा; अजागळ पणानें (भाषण, काम), वेंगड; अडाणी; गवाळ्या; भोंगळ; अव्यवस्थित. 'कोण अशुद्धाळ माणसें येवा हीं !' –सूर्यग्रहण ७७. [का. असह्याळ=तिरस्कारता, निंद्य वर्तन. किंवा का. असड=मूर्खपणा ! सं अशुद्ध+आलय]

**अशुद्ध**—वि १ शुध्द नसलेलें, चुकीचें, सदोष, प्रमादयुक्त २ घाणेरडें, अस्वच्छ, विघडलेलें, अपवित्र, अमगळ विटाळलेलें —**ध्या**—वि नेहमी चुका करणारा, गोंधळ्या, प्रमादी —न चूक, चुकी, प्रमाद, दोष ( बोलण्यात–लिहिण्यात ) [ स ]

**अशुध्द**—न (काव्य) रक्त 'परि ते अन्हेरूनि गोचिड। अशुध्द काय नेघती॥' –ज्ञा १ ५७ 'धार्यी चूर केलीं हाडें। अशुध्द उडे आकाशीं॥' –एरुस्व १० ३३ 'अशुध्द पूर वाहों लागले। वीर आटले अपार।' –जै ७८ ८५ [ स ]

**अशुभ**—न १ अमगलपणा, अनिष्ट, दुर्भाग्यता, दुर्दैव, अकल्याण म्ह० अशुभस्य कालहरणं। शुभस्य शीघ्रम् २ अनिष्ट कार्य, अमगल कार्य ३ पातक 'आमुच्या अशुभाशयाचा घातु। करिता चरणधूमकेतू।' –एभा ६ १११ [ स ] –वि १ अमगल, अभद्र, अनिष्ट, प्रतिकूळ ( देखावा, सूचना, मतलब, अर्थ, योग, क्रिया, शब्द, गुण, चिन्हें, लक्षणें वगैरे ) ०**कर्म**—न अमगल किंवा तिरस्करणीय विधि ०**आचार**—पु १ ज्यात उत्सव–सुखसोहळा नाहीं अशा तऱ्हेचें कार्य किंवा समारंभ, विशेषत और्ध्वदेहिक क्रिया–उत्तर क्रिया २ पापाचरण, अनाचार, दुष्कर्म [ स ] ०**चिन्ह**–०**लक्षण**—न १ अमगल, अनिष्ट, चिन्ह–लक्षण, छाया, व्यंजन, दुश्चिन्ह, अनिष्ट सूचक गोष्ट 'अशुभचिन्हें अत्यंत। एकेमाजि होति बहुत।' घोड्याचीं कांहीं अशुभलक्षणें–'असुडाळ किंवा असुपात, धृषी, अजनी ( चादणी ), द्वयखुरी, कुसावर्ते, एकाग्रुळ, निकर्णी, थनी, हीनदंती, अडावर्ते, अधिकदंत, काळवदन, विकाळ, पचनखी, कराळ, अहीमुख, तुम्फ्डा, वाणिया वाशिंग, आसनखऊ सर्पिण, कृष्णा जनी, खानखऊ, गोमीपाच, हरिणाग, पितअजनी, काखावर्ते, सार भूक्ण ( सारभाजन ), एकाडी, काळाजनी, अगावर्ते, दान्तशृखळ, पुमावर्ते, श्वेताजनी, लेंडावर्ते, शून्यमस्तक, हृदावर्त, नासावर्ते, पोटावर्ते, तळावर्ते, शिळावर्ते नेत्रावर्ते भाव्लोचन, व्याघ्रकांत, कृष्णाटाळु, कपिमुखी, जानुवर्ते, आर्जेळ, कर्णमूळ, शिंपला, पचनखी, मेंढसुख खरमुख, रावामुख, कौस्तुकी, हयभग, केरसुण्या, मध्यदंती, खुनीउपाड, अश्रुपात, सेनाभजन, टाशी, पोटसूळ, खळतो, राताधळ, लीदखातो, माथेशूळ, पद्ममुत रक्तमुततो, पाण्यात बसतो चन्हाटें खातो, डसतो, मुततो याशिवाय इतर खोडी–ग्तरड, चिमणा, डकी, बोंबल्या, एका अगावर झुलणें, चमरा असता उठताना गुडघे टेकून उठणें, मगरुरी करणें फार हिंसणें, भिनें पगा, उडया मारणारा, पळण्याची खोड लाथ मारणें व भाडखोर, पुढें आलेल्या निनसावरुन उडून जाणें, चावणें, दोन पायावर उभें राहणें, माल्लदी करू न देणें, पचवास बाधरीनारा ( हरिनाख ), उपानयन, जीनपाठक, तगावर्ते, माडवर्ते, चिन्नी, शाखी, दोसीना, दृकपाती, जवावर्ते, पचपर्ने गुदक, पापवर्ण घोड्याचे काही अशुभ भोंवरे–असलि, पक्व, सार्सन, रिपल्क, गिगन, कनहसलि, स्ठपर खट ( जनाजा ), इतलमार, डखडजाड, सगिनमाक, कुल्ज, सफादारा, गातदार, सुरापा, चवडाशुभ, मुत्लक्कुल्फेदान, मुत्लकुल्जेन मुत्लकुलयेसार, मुत्लकुलयोजान, मुलारत, चारगुल, खाल्दार, चवदस्त, सिक्ल, गोवस्तान, कच्छि, तरख तस्मागर्दन, ओसिक्म, मर्दजान, मोयेवाला, चपरहडी, पोतेअलग, पोपेला, पेरसोन, अकवपेसानी, माहिरू, दवल, मिलारपेसानी, सिकाल, खुंटेउखाड, चादसुरत, गनदत, चकावळ, उठाच्या दातासारखे दात असणारा, उंच कपाळाचा, चालताना बाहेर जीभ काढणारा, पाणी पिताना पाण्यात फार तोंड बुडविणारा, दाणा खाऊन शिल्लक कांहीं न ठेवणारा, अडावर गाईसारखें थान, सड व त्यावर केंस असणारा, एकाडचा, अडात कोय नसणारा, काळ्या जिभेचा, एका अगास झुलणारा, छातीवर भोंवरा ( वेड फोड ) असलेला, कुसगोम, विरकावदाल, अदमचसव, खाडकुव्हा, हृदावळ, विपानैनीं, पितानी ' वगैरे –अश्वप ९३–१०६ या शब्दाच्या अर्थासाठीं ते ते शब्द पाहणें. ०**वर्तमान**—स्त्री वाईट बातमी, अमगल, अनिष्ट बातमी '(विशप साहेबाच्या) अशुभवर्तमानानें फसून जाण्यइतके मूर्ख आता आम्ही राहिलों नाहीं '–टिले २ ५६० [ स ]

**अशुश्रूषु**—वि सेवा न करणारा 'शठ नास्तिक दंभयुक्त। अशुश्रुषु आणि अभक्त।' –एभा २९ ५०१ [ स अ+शुश्रूषा ]

**अशें**—वि ( गो ) असें

**अशेख**—वि एकदर, अशेष, निःशेष, सर्व, सपूर्ण 'गुण रत्नाचा परीक्षक। स्वयें सद्गुण पूर्ण अशेख।' –निमा १ १०४, –अमृ ७ १४६, –एभा १ १४१ [ स अशेष ]

**अशेर, अशेरी, अशीरगड**—पु (ना) बऱ्हाणपुराजवळील दक्षिणची वेस या नावानें प्रसिध्द असलेला किल्ला. याला अहीरगड ( अहीर=गवळी राजानें बाधलेला म्हणून ) असेंहि नाव आहे –ख २१९८

**अशेला**—वि ( प्र ) असला, अशा प्रकारचा, अशा जातीचा [ असा+ला प्रत्यय ]

**अशेष**—वि ज्याची बाकी–शिल्लक उरत नाहीं असा, निःशेष, सपूर्ण, सगळा सर्व, अवघा, अशेख पहा 'द्विधा केली अशेषें।' [ स ]

**अशोक, अशोग**—पु १ एका वृक्षाचें नाव, ह्याचीं पानें आंब्याच्या पानापेक्षा लाब व कुरळीं असून शोभिवत असतात, हीं झाडें देवळात, बगीचात लावतात दाह, गुल्म, उदर, विष, रक्तरोग, स्त्रियांचे प्रदर वगैरेवर औषधी म्हणून याची साल उपयोगात आणतात सस्कृत वाङ्मयातून याचा नेहमीं उल्लेख येतो यास गरोदर स्त्रीनें लत्ताप्रहार करण्याशिवाय फुलें येत नाहींत अशी सैममूत आहे २ एक बौध्दकालीन मौर्यवशीय सम्राट ( ख्रि पू २७३–२३२ ). ३ एक अरण्य 'रावणानें सीतेस अशोकवनात राक्षसिणींच्या

पाहन्यात ठेविलें होतें ' अशोकवनिकान्याय-एखादी गोष्ट करण्याचे अनेक तुल्य मार्ग असताना त्यापैकीं अमुकच का स्वीकारला याचें कारण सांगता न येणें जसें- रावणानें सीतेला अशोक वनात का ठेविली तर कोठेंतरी ठेवावयाची ती अशोक वनात ठेविली [स अशोक (अ+शुच्) हिं अशोग ]

**अशोधित**—वि १ अशुद्ध, शुद्ध न केलेला, खाणींतून काढलेला व वर कोणतीहि क्रिया न केलेला (धातु) २ शोधून न काढलेला, अज्ञात [स ]

**अशोभ**—वि न शोभणारा [स अ+शुभ्]

**अशौच**—न (प्र) आशौच १ सुतक, अपवित्रस्थिति आशौच पहा २ मलिनपणा, अपवित्रस्थिति ' अशौच तो बाधी आणिका अक्षरा । नाम निदसुरा घेता तर ॥ ' –तुगा २५१२ –वि अपवित्र, पतित 'जालों मी अति अशौच ।' –विपू १ ९०, –एभा १६ ३०४ [स आशौच]

**अशौचक**—वि अपवित्र, 'तोंडाळ, बोढाळ, पतिनिंदक । ते स्त्रियेच्या ऐसे देख । अशौचक सबाह्य ।' –एभा १७ ७०३

**अशौच्य**—वि अशोच, अशुद्ध ' का अशौच्या मनें । बीजें कथिलीं ।' –ज्ञा ९.१७७ [स अ+शुचि]

**अश्म**—पु दगड, अश्मा पहा ०**युग**–न पाषाणयुग, जगाच्या संस्कृतीची पहिली अवस्था [स ]

**अश्मंतक**—पु अपट्याचें झाड [स ]

**अश्मरी**—स्त्री १ मूतखडा, मूतराग, मूत्रकृच्छ्र [स ]

**अश्मसार**—पु १ लोखंड, लोह २ हिरा [स अश्मन्+सार]

**अश्महृदय**—वि पाषाणहृदयी, निर्दय, निष्ठुर [स ]

**अश्मा**—पु १ दगड, पाषाण ' शिळा पदें देउनि अश्मा । उद्धरिला –क ६० २ उत्तरक्रियेच्या वेळीं ज्या दगडावर तिलांजलि देतात तो दगड, जीवधोंडा [स अश्मन्]

**अश्मीभूत**—वि (शाप) दगडाचें रूप पावलेला, दगडासारखें कठिण झालेलें, प्रस्तररूप पावणारी (वनस्पति वगैरे) [स ]

**अश्रणी**—अशरीरिणी(वाक्) पहा

**अश्रद्ध**—वि श्रद्धा नसणारा, भाव, भक्ति नसलेला [अ+श्रद्धा]

**अश्रद्धा**—स्त्री १ श्रद्धेचा अभाव, भरवसा, भक्ति यांचा अभाव (ईश्वराच्या ठिकाणीं) २ अप्रीति, नावड, घटाळा, तिरस्कार ३ गैरविश्वास, अविश्वास [स ]

**अश्रद्धेय**—वि श्रद्धा ठेवण्यास अयोग्य–नालायक [स ]

**अश्रफ**—वि थोर, मोठ्या योग्यतेचा, अत्यंत अभिजात, उदारमनाचा (माणूस) [अर अश्रफ्]

**अश्रफी**—स्त्री एक सोन्याचें नाणें, मोहोर (किंमत सुमारें रु १५), असर्फी पहा ' मी दोन अश्रफी कबूल केल्या ' –सूर्यग्रहण ३५० [फा अश्रफी]

**अश्राप-फ**—वि १ अश्रफ पहा अभिजात, सभ्य, थोर, खानदानीच्या घराण्यातील (माणसें) २ रोहिलखंड, अयोध्या व बनारस या बाजूस हा शब्द काहीं विशिष्ट हक्क असलेल्या जमीनदारास लावतात ३ गरीब (जनावर) ' जनावर मोठें खर, पण फार अश्राप ' ०**गाय**–निरुपद्रवी मनुष्य [अर शरीफचें अव ]

**अश्रायिणें**—सक्रि आश्रय करणें [आश्रयणें अप ]

**अश्राव्य**—वि १ न ऐकू येणारें २ ऐकण्याला किंवा श्रवण करण्याला अयोग्य (ईश्वर-साधुनिंदा इ०) ३ बीभत्स, अश्लील [स अ+श्रु=ऐकणें]

**अश्रु**—पु अस्रु आसू, रोदन–हर्षादि समयीं डोळ्यात जें पाणी येतें तें, सामाशब्द–प्रेमाश्रु, आनंदाश्रु, शोकाश्रु इ० [स तुर० कें जिप्सी अस्व] ०**ढाळ**–वि सारखे अश्रु गाळणारा, घोड्याचें एक कुलक्षण ०**धारा**–स्त्री अश्रू वाहाणें, एकसारखें रडणें, अश्रूंचा पात–धारा, प्रवाह 'नयनीं वाहत अश्रुधारा ' ०**नाली**–स्त्री व्रण, भगंदर, नासूर. ०**पात**–पु १ अश्रूंचा पात–धार–प्रवाह, सारखें रडणें (क्रि० चालणें, वाहणें) ' ऐसें बोलतां अश्रुपात । नेत्रीं रायाचे चालले ।' २ घोड्याच्या डोळ्याखालील भोंवरा, घोड्याचें एक अशुभ लक्षण ०**पात्र**–न कांच किंवा भाजलेली तांबडी माती (टेराकोटा) यापासून केलेलें एक प्रकारचें भांडें हीं भांडीं ग्रीक व रोमन थडग्यातून सापडलीं असून शोक करणारीं माणसें त्यात आपले अश्रु गाळीत असत असें म्हणतात –ज्ञाको (अ) ६०३ ०**पिंड**–पु अश्रूत्पादक मांसग्रंथि [स ]

**अश्रुत**—वि १ न ऐकलेलें, ठाऊक नसलेलें, अज्ञात ' अश्रुत फळें या वेगळीं । श्रवणीं पडतां त्याही फळीं ' –ययादि २ १२४२ २ ज्यानें ऐकलें नाहीं किंवा ज्याला ठाऊक नाहीं असा, अशिक्षित ३ वेद न जाणणारा ४ वेदविरुद्ध वेदानें विहित न केलेला, वेदास असंमत असा, अशास्त्र, वेदबाह्य ५ करारानें–शपथेनें–प्रतिज्ञेनें स्वतःला बांधून न घेणारा [स ]

**अश्लाघनीय-अश्लाघ्य**—वि स्तुति करण्याला अयोग्य, प्रशंसा करण्याला अयोग्य, अप्रशंसनीय, निंद्य [स ]

**अश्लील**—वि १ असभ्य, अयोग्य, लज्जास्पद, ग्राम्य बाण्याजोगा, अनीतिसूचक–मूलक २ असभ्य भाषा असलेलें (वाङ्मय), शिवराळ, गांवढळ [स अ+श्रीर–श्लील=शोभिवंत]

**अश्व**—पु. घोडा एक चतुष्पाद प्राणी, हा मनुष्यास बसावयाचे व गाडी वगैरे ओढण्याचे उपयोगाला येतो [स अश्(अशू=व्यापणें, अ=नाहीं+श्वन्=उद्या ?) झेंद अस्प, फा अस्प, ग्री इप्पॉस, लॅ इक्वस्; लिथुआनि अस्वा, ओल्ड आयरिश इच]

०क्रांत(स्थान)–न. (नृत्य) एक पाय समस्थित ठेवणें, दुसरा पाय अमनलमंचर वरून पाय अंगठयावर टेंकून दुसऱ्या पायाजवळ ठेवणें, अवसळणें, वस्त्र उचलणें, झाडाच्या फांद्या ओढणें वगैरे दर्शक हें स्थान आहे. ०खाद्य–न. हरभरा, घोडखाद्य, अश्वजीवन. ०गति–स्त्री. स्त्री. घोडयाची चाल–गति. ०गंधा–एका झाडाच्या कांद्यास आस्कंद म्हणतात. ही फार पौष्टिक औषधि आहे. यास आस्कंद, अजगंध, टोरगुंज वगैरे निरनिराळीं नांवें आहेत हें झाड खानदेश, नाशीक, वऱ्हाड आणि घाटावर आढळतें. उंची दोन फूट झाड ४।५ वर्षे जगतें. पानें कोरांटीसारखीं असतात हरभऱ्याएवढीं लाल फळें येतात. पाक धातुपौष्टिक आहे. इतर अनेक रोगावर याचा पाक गुळवेलीचें सत्व व मध यावरोबर देतात ०गुण–पु १ घोडयाचा गुण–धर्म. २ घोडयाचा विशेष सुलक्षण उत्कृष्ट गुण. ०गुटिका–घुट–टि–का–स्त्री. एक विवक्षित मात्रीकरण (औषध, मंत्रसिद्धि, ताईत या द्वारें). ०चिकित्सा–स्त्री. घोडयाचे औषधी उपचार. ०चिकित्सक–पु शालिहोत्र, अश्ववैद्य, घोडयाचा वैद्य. ०दोष–अशुभ चिन्हें पहा. घोडयाचे दुर्गुण. ०धाटी–स्त्री. एक वृत्त याला मंदारमाला असेंहि म्हणतात. उ० 'वाचाळ मी नीट पाचारितों धीट याचा नयो वीट साचा हरी।'–वृत्तदर्पण ३२. या दोहोंत फरक म्हणजे अश्वधाटींत बाराव्या अक्षरावर परसमाप्ति, तर मंदार मालेंत अकराव्या अक्षरावर असते. मंदारमाला पहा. ०धाटीयमक–न. हें मात्रें व पुढें निराळें व्यंजन असल्यामुळें घोडयाप्रमाणें उडया मारीत चाललें आहे असा भास होतो. उ० 'गाजत वाजत साजत आज तया जनन करुनि आणाहो'–मोविराट ८. ७५. ०परीक्षक–पु घोडयाच्या शास्त्रांत प्रवीण ०परीक्षा–स्त्री. १ घोडयासंबंधानें ज्ञान, परीक्षा. २ घोडयाच्या मांसाचें ज्ञान, अश्वमासज्ञान ०भार–पु १ अश्वसेना, घोडदळ, घोडेस्वारांचें सैन्य २ घोडयाचा जमाव, समूह [सं.] ०मूत्राम्ल–न. (इं.) हिप्युरिक ॲसिड हें अम्ल वनस्पत्याहारी जनावराच्या मूत्रांत सापडतें ०मेध–पु सार्वभौम राजानें कराव याचा यज्ञ. हा यज्ञ केल्यानें पृथ्वीचें सार्वभौमत्व मिळतें व असे शंभर यज्ञ केल्यानें इंद्रपद मिळतें, अशी समजूत आहे [सं.] ०रात्री–स्त्री. एक वनस्पति हरितालिका पूजेंतील पत्रींपैकीं एक. ०वाहक–पु सारथी, घोडे हाकणारा, चाबुकस्वार. 'जेथ अश्व वाहकु आपण'–ज्ञा १.१४०. [सं.] ०वैद्य–पु घोडयाचा वैद्य, शालिहोत्र, घोडाडाक्टर ०शक्ति–स्त्री घोडयाचें बल, सामर्थ्य. (इ) हॉर्सपावर ०शाणी–साहणी–पु चाबुकस्वार, घोडयाची परीक्षा करणारा, अश्ववैद्य, परीक्षक 'बोलावोनिया अश्व शाणी। म्हणती घोडे निवडीं या ये क्षणीं।'–कथा ४ ९ १५ 'जैसा वारु उपलाणी। वश्य करी अश्वसाहणी'–एभा २० २१६ [सं अश्व+म साहाणा] ०शाला–स्त्री. १ घोडयाची पागा, तबेला. २ घोडयावर बसविण्यास जेथें शिकवितात तें गृह ०शिक्षक–सारथी–पु घोडयांना शिकविणारा; चाबुकस्वार; घोडे हांकणारा. ०शिक्षा–स्त्री. घोडयांना शिकविणें, शिक्षा लावणें (गति, चाल वगैरे). ०सारथ्य–न. रथ किंवा त्याला जुंपलेले घोडे चालविणें–हांकणें; त्याची व्यवस्था. [सं.] ०हृदय–न. १ घोडयासंबंधी रहस्य किंवा गुप्त गोष्टींचें ज्ञान; अश्वशास्त्र; अश्वविद्या; घोडयावर बसण्याची विद्या. २ घोडयांच्या प्रकृतीचें निदान किंवा त्यासंबंधानें शास्त्र; शालिहोत्र [सं.]

अश्वत्थ–पु. एक झाड; पिंपळ. हा अतिशय मोठा, फार वर्षे वाचणारा व अनेक औषधिधर्मांनीं युक्त असल्यामुळें हिंदू लोक यास पवित्र मानितात धार्मिक संस्कारनिमित्त याच्या समिधा वापरतात. 'कल्पद्रुम हन पारिजातु। गुणें चंदनुहि वाड विख्यातु। परि यया वृक्षजाती आंतु। अश्वत्थु तो मी॥'–ज्ञा १०.२३५. –वि. उद्यापर्यंत न टिकणारा. 'आणि अश्वत्थु ऐसें ययातें। म्हणती जे जाणते।'–ज्ञा १५. ११०. ०नारायण–पु देवतारूप मानिलेला अश्वत्थ. मद्रासी–कानडी लोकांत हें नांव असतें. 'अश्वत्थनारायण सूर्यनारायण'–दा ४.५ १३. ०स्थापन–न. पिंपळास पार बांधून मंत्रांनीं जो संस्कारविशेष करतात तो. [सं. अ+श्वः+स्थ]

अश्वस्थ–वि अस्वस्थ (अप.) 'अश्वस्थ संसार हा स्वस्थ नाहीं जाणा'–सप्र ५ २१. अश्वथ्य असेंहि रूप आहे.

अश्वारी–री–स्त्री. (गो.) घोडेस्वारांची पलटण.

अश्वासन–आश्वासन पहा.

अश्विन, अश्वीन–पु चैत्रापासून सातवा महिना; आश्वीन.

अश्विनी–स्त्री. १ घोडी. 'म्हणे अश्व करितां जळपान। अश्विनी वेत्री जाहली।'–जै २१.८५ २ सत्तावीस नक्षत्रांपैकीं पहिलें या दोन किंवा तीन तारका समजतात [सं]

अश्विनी–कुमार–पुन, अश्विनौ, अश्विनीदेव–पु. १ देवाचे वैद्य, अश्विनी नावाच्या अप्सरेचे दोन जुळे मुलगे. २ (ल.) कुशल वैद्य 'पैं सौम्यतेचा वोलवा। मिती नेणिजे अश्विनीदेवा।'–ज्ञा ११ १४४. ३ एक औषधि मात्रा–रसायन.

अश्वील–अश्वल–अस्वल पहा.

अश्वेत–वि पांढरें नव्हे तें. [सं. अ+श्वेत]

अशशी–वि ऐशीं पहा [सं अशीति]

अषट्टाळ–वि ताळतंत्र (बोलणें, करणें इ० कांमध्यें) नसलेला, अशुटाळ पहा.

अषाढ–आषाढ पहा

अष्ट–वि. आठ संख्या, सामाशब्द–अष्टगुण, अष्टादश, अष्टविंशति व पुढील शब्द [सं अष्टन्] ०क–न. १ आठ पदार्थांचा समुदाय २ पाणिनीच्या व्याकरणाचे (सूत्रपाठाचे) आठ विभाग आहेत त्यांतील प्रत्येक. ३ ऋग्वेदसंहितेचे पठणाच्या सोयीकरतां

आठ भाग केले आहेत, त्यांतील प्रत्येक. ४ आठ श्लोकांचा समूह, एक काव्यरचनापध्दति. उ० मंगलाष्टकें, करुणाष्टकें. [सं.]–वि आठ किंवा आठवा. ०कपाळया–वि. १ अष्टांगें–दोन हात, दोन पाय, दोन गुडघे, वक्ष स्थळ आणि कपाळ इतक्याचा उपयोग करून हि ज्यास कांहीं मिळत नाहीं तो. २ (ल) पूर्णपणें दुर्दैवी; आपद्ग्रस्त; भग्न; कपाळकरंटा. ०कर्णिका–स्त्री. कमळाच्या पाकळ्या. 'मासें हृदय दिव्य कमळ। जें तेजोमय परम निर्मळ। अष्टकर्णिका अतिकोमळ। मध्यें घननीळ विराजे।' –ह ३५.१. ०कुलाचल–पु मेरूच्या चारी दिशास जे भारतादि वर्ष आहेत त्या प्रत्येकाची मर्यादा करणारे (नील, निषध, विंध्याचल, माल्यवान्, मलय, गंध मादन, हेमकूट, हिमालय इ०) आठ पर्वत. अष्टकोन–नी––ण–णी–वि आठ कोन–बाजू–असलेली, (वस्तु, आकृति) ०गंध–न. आठ सुगंधी द्रव्यें (चंदन, अगरु, देवदार, कोष्टो लिंजन, कुसुम, शैलज, जटामांसी, सुरगोरोचन) एकत्र करून केलेलें गंध, (सामा.) उटणें ०गुण–वि. आठपट. –पु आठ गुण ब्राह्मणाचे आठ गुण–दया, क्षांति, अनसूया, शौच, अनायास, मंगल, अकार्पण्य, अस्पृहा बुध्दीचे आठ गुण–शुश्रूषा श्रवण, ग्रहण, धारण, चिंतन, ऊहापोह, अर्थविज्ञान, तत्त्वज्ञान ०गोल–गोली–वि.–कांठापदरावर वेलबुटी काढलेला (चौपदरी शेला) 'कोणासी पागोटें परकाळा। कोणी मागती अष्टगोली शेला –भक्तवि. ३०४१ [सं. अष्ट+गोल]. ०गोळी–क्रिवि सर्वतऱ्हेनें, एकंदर. ०घाण–स्त्री अतिशय दुर्गंधी–घाण. [अष्ट+घ्राण]. ०ताल–झंपाताल पहा ०दल–ळ–वि. आठ पाकळ्यांचें, आठ पानांचें, अष्टकोनी; अष्टभुज –न १ कमळाच्या आकाराची काढलेली आठ पाकळ्यांची किंवा भागाची आकृति 'गर्भी रचिलीं उदंडें। अष्टदळें। –ऋ ७३. २ एक प्रकारची रांगोळी. ३ (ना.) ताम्हण, संध्या पात्र, 'एक अष्टदळ आणवा.' ०दानें–न अव. आमान, उद कुंभ, भूमि, गोदान, शय्या, वस्त्र, छत्र, आसन हीं आठ वस्तूंचीं दानें और्ध्वदेहिकांत द्यावयाचीं असतात ०दिक्पाल–पु अंत रिक्षाच्या आठ दिशा पालन करणाऱ्या देवता. जसें–पूर्वेचा इंद्र, आग्नेयीचा अग्नि, दक्षिणेचा यम, नैर्ऋत्येचा नैर्ऋत, पश्चिमेचा वरुण, वायव्येचा मारुत, उत्तरेचा कुबेर (सोम), ईशान्येचा ईश, अष्ट दिग्पाल 'इयेवरी सप्तसागर। मध्यें मेरु महाथोर। अष्टदिग्पाळ तो परिवार। अंतरें वेष्टित राहिले॥' –दा ४.१०४. ०दिग्गज––पु ऐरावत, पुंडरीक, वामन, कुमुद, अंजन, पुष्पदंत, सार्वभौम, सुप्रतीक असे अष्ट दिशास पृथ्वीचे आधारभूत आठ हत्ती आहेत [सं] ०दिशा–स्त्री आठ दिशा, दिक्चक्राचे आठ भाग–पूर्व, आग्नेय, दक्षिण, नैर्ऋत्य, पश्चिम, वायव्य, उत्तर, ईशान्य ०देह–पु देहाचे आठ प्रकार–पहिले चार पिंडीं व पुढील चार ब्रह्मांडीं 'स्थूल, सूक्ष्म, कारण। महाकारण, विराट, हिरण्य। अव्याकृत, मूलप्रकृति जाण। ऐसे अष्ट देह।' –दा ८.७.४०. ०धा–वि. आठ प्रकारें, 'भूतें गुण मेळविजे। त्यासी अष्टधा बोलिजे।' [सं.] ०धामूर्ति–स्त्री आठ प्रकारच्या मूर्ती. 'शैली दारुमयी लौही लेप्या लेख्याच सैकती। मनोमयी मणिमयी प्रतिमा अष्टधा स्मृता॥' –एभा २७ १८ १०३; 'शैली, दारुमयी, लेप्या, लेख्या, सैकती अथवा सुवर्णमूर्ती, जळीं, स्थळीं, अष्टमूर्तिस्वरूप श्रीहरीसी पूजावें।' –अमृतधारा ६. अष्टमूर्ति पहा. ०(देह)प्रकृति–स्त्री. पृथ्वी, पाणी, अग्नि, वायु, आकाश मन, बुद्धि आणि अहंकार मिळून आठ प्रकारें विभागलेली.... प्रकृति.' –गीर ७१५ ०(विध)प्रकृति–अगाहि पाकृप्रचार आहे सत्त्व, रज, तम, व मूळ पांच तत्त्वें मिळून आठ प्रकारची प्रकृति. 'पंच भूतें आणि त्रिगुण। ऐसी अष्टधा प्रकृति जाण।' –दा ६.३.१८. ०धातु–पु सोनें, रुपें, तांबें, कथील, शिसें, पितळ, लोखंड, तिखें (पोलाद) कोणी पोलादाच्या ऐवजीं पारा धर तात 'अष्टधातु सायासें। जेवि वेधिजति स्पर्शें।' –ऋ २०. ०धार–वि. आठ धारा असलेलें. 'तंव तेणें सापकें एक अष्टधार आड धरिलें।' –कृमुरा २२.९६. ०नायका–नाईका–स्त्री १ जन श्रीकृष्णाच्या आठ आवडत्या पत्न्या–रुक्मिणी, सत्यभामा, जांबवंती, कालिंदी (सूर्यकन्या), मित्रवृंदा (अवंतिराजसुता), याज्ञजिनी (यज्ञजिनकन्या), भद्रा (कैकेयनृपकन्या), लक्ष्मणा (मद्रेंद्रनायकन्या) २ इंद्राच्या आठ नायका–उर्वशी, मेनका, रंभा, पूर्वचित्ती, स्वयंप्रभा, मिश्रकेशी, जन्यवल्लभा, घृताची (तिलोत्तमा) 'अष्टनायिका येऊनि। सर्वां घरीं नृत्य करिती।' –ह २६ २२८. ३ (साहित्य) वासकसज्जा, विरहोत्कंठिता, स्वाधीनभर्तृका, कल हांतरिता, खंडिता, विप्रलब्धा, प्रोषितभर्तृका, अभिसारिका ०नाग–पु आठ जातींचे सर्प–अनंत, वासुकी, तक्षक, कर्कोटक, शंख, कुलिक, पद्म, महापद्म ०पत्री–वि १ कोणत्याही विशिष्ट आकारच्या (क्राऊन, डेमी) छापावयाच्या कागदाचीं आठ पृष्ठें होतील अशा तऱ्हेनें घडी पडणारें छापलेलें (पुस्तक) (इं) ऑक्टेव्हो 'पाच पाचशें पानांचें अष्टपत्री मापांचें एक एक पुस्तक' ०पद–पु १ कोळी वर्गांतील प्राणी– गोचीड, सुतविडे, विंचू, कातीण वगैरे (इं) अर्कनिडा २ आठ पायांचा काल्पनिक प्राणी ०पदरी–वि आठ पदराचा (शेला), आठसराची (माळ), आठ पेडाची, धाग्याची (दोरी) [सं अष्ट+पल्लव] ०पदी–स्त्री १ आठ पदांचा समुदाय २ आठ चरणांचें एक कवन, कविताप्रकार ०पाकूळ–न (ल्प्त) आठ पाकळ्यांचें फूल ०पाद–अष्टपद पहा. ०पुत्रा–वि आठ पुत्र आहेत जिला अशी (स्त्री) सौभाग्यवती स्त्रीस असा आशीर्वाद देतात ०पुत्री–स्त्री विवाहामध्यें वधूला, काठाला हळद लावून नेसावयास दिलेलें शुभ्र वस्त्र तिला पुष्कळ अपत्यें व्हावींत या इच्छेचें द्योतक 'फेडिलें मायेचें वधूवस्त्र। अष्टपुत्र्या पीतांबर। नेसली कृष्णमय स्वतन्त्र। तेणें सुंदर शोभली।' –एरुस्व १६ १५ म्ह० अष्टपुत्री

मेर्गुणीगुनी ०पैलू–वि १ ज्याला आठ पैलू ( बाजू ) आहेत असा ( हिरा रत्न ) २ ( ल ) हुषार, कामभिज्ञ, व्यवहारचतुर (इसम) ०पैलू माळ–(गोफ) स्त्री धातूच्या गळ्यातील दागिना, आठ पैलू असलेल्या मण्याची माळ किंवा आठ पदर असलेली माळ ०प्रकृति, ०विधप्रकृति–अष्टधाप्रकृति पहा ०प्रधान–पु राज्यकारभारातील आठ प्रधान–प्रधान, अमात्य, सचीव, मंत्री, डबीर, न्यायाधीश, न्यायशास्त्री, सेनापति अष्टप्रधानाची पध्दत शिवाजीनें सुरू केली काहीं जण वैद्य, उपाध्याय, सचीव, मंत्री, प्रतिनिधी, राजाज्ञा, प्रधान, अमात्य हे आठ मंत्री समजतात 'प्रधान अमात्य सचीव मंत्री । डबीर न्यायाधिश न्यायशास्त्री ॥ सेनापती त्यात असे सुजाणा । अष्टप्रधानीं नृप मुख्य जाणा ॥' हा श्लोक रूढ आहे ०फली–स्त्री, ०फळ–फल–स्त्रीन अटोफळी पहा ०भार–पु ८००० तोळ्याचा एक भार असे आठ भार 'नित्य प्रसवे अष्टभार सुवर्ण । सूर्यासम प्रभा परिपूर्ण ।' –ह २५ १५ ०भाव–पु अव ( साहित्य ) शरीराचे सत्त्वगुणाचे आठ भाव, प्रकार–स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग किंवा वैस्वर्य, कंप किंवा वेपथु वैवर्ण्य, अश्रुपात, प्रलय पर्याय–कंप, रोमांच, स्फुरण, प्रेमाश्रु, स्वेद, हास्य, लास्य, गायन –हगो 'आठवीया दिवशीं नाम अष्टभावा । अद्वयानुभवासुखें राहे ॥' –ब ११० 'अष्ट भावें दाटोनि सद्गद । आनंदमय जाहला ।' ०भैरव–पु भैरव हीं गिरगणातील स्वतंत्र देवता असून तिचीं पुढील आठ स्वरूपें आहेत–असितांग, संहार, रुरु, काल, क्रोध, ताम्रचूड, चंद्रचूड, महा यातील काहीं नावांऐवजीं कपाल, रुद्र, भीषण, उन्मत्त, कुपति इत्यादि नावें योजिलेलीं आढळतात ०भोग–पु आठ प्रकारचे भोग –अन्न, उदक, तांबूल, पुष्प, चंदन, वसन, शय्या, अलंकार ०म–वि आठवा –स्त्री अष्टमी ०मंगल–वि ( विरू ) अष्टमंगळ १ ज्याचें तोंड, शेपूट, आयाळ, छाती व चार खूर शुभ्र आहेत असा, कित्येकांच्या मतें ज्याचे पाय, शेपूट, छाती व वृषण शुभ्र आहेत व जो कटिप्रदेशीं भोवऱ्यांनीं युक्त ( नराकित ) असून ज्याच्या कपाळावर कमलाकृति केसांचें वेटोळें असतें असा ( घोडा ) २ ( सामा ) आठ शुभलक्षणांनीं युक्त असा ( घोडा ) –न पुढील आठ मंगल वस्तूंचा समुदाय–ब्राह्मण, अग्नि, गाय, सुवर्ण, घृत सूर्य, जळ व राजा काहींच्या मतें सिंह, वृषभ, गज, पूर्णोदककुंभ, व्यजन निशाण, वाद्यें व दीप ( राज्याभिषेकाच्या समयीं या अष्ट मंगलकारक वस्तू लागतात) ०मंगलघृत–न वेखंड, कोष्ट, ब्राह्मी, मोहऱ्या उपळसरी सैंधेलोण, पिंपळी व तूप या औषधांच्या मिश्रणानें विधियुक्त बनविलेलें तूप हें बुद्धिवर्धक आहे –यार २ ६७० ०महारोग–पु आठ मोठे रोग–वातव्याधि, अश्मरी, कुष्ठ ( किंवा कुष्ठ ) मेह, उदर, भगंदर, अर्श ( मूळव्याध ) संग्रहणी महारोग पहा ०महासिद्धि–१ अणिमा=शरीर अत्यंत सूक्ष्म होणें, २ महिमा=शरीर मोठें होणें, ३ लघिमा=शरीर वजनात हलकें होणें, ४ प्राप्ति=सर्व प्राण्यांच्या इंद्रियांशीं त्या त्या इंद्रियाच्या अधिष्ठात्री देवताच्या रूपानें संबंध घडणें, ५ प्राकाम्य=ऐकून ठाऊक असलेल्या व स्वर्गादि पारलौकिक स्थानीं, व दिसण्याजोगे इहलोकच्या स्थानीं भोग व दर्शनाचें सामर्थ्य येणें, ६ ईशिता=शक्तीची, मायेची व तिच्या अंशाची ईशाच्या ठिकाणीं न इतराच्या ठिकाणीं असणारी प्रेरणा, ७वशिता=विषय भोगीत असूनहि त्याच्या ठिकाणीं आसक्त न होणें, ८ प्राकाम्य=ज्या ज्या सुखाची इच्छा करावी तें तें सुख अमर्याद प्राप्त होणें. –एभा १५ ४२ ते ४७ ०मर्यादागिरी–पु आठ मोठे पर्वत–हिमालय, हेमकूट, निषध, गंधमादन, नील, श्वेत शृंगवान व माल्यवान हे जंबुद्वीपांत असून ते त्यातील नऊ वर्षां(भागां)च्या मर्यादा आहेत ०मांगल्य–न त्रैवर्णिकाचा एक संस्कार अठांगुळें पहा ०मातृका–स्त्री आठ ईश्वरी शक्ती–ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इंद्राणी, कौबेरी, चामुंडा सामान्यत कौबेरी सोडून या सात असतात विवाहादि मंगलप्रसंगीं यांची पूजा करतात 'वेगें आल्या अष्ट मातृका । एकी चढितली वृश्चिका । वाराही ते सूकरमुखा । वन्हाड देखा निघालें ॥' –एरुस्व १४ ५८ ०मांश–पु १ आठवा अंश, भाग २ ( वैद्यक ) ज्वर नाहींसा होण्यासाठीं आठभाग पाण्याचे सात भाग आटवून एक अंश उरवितात तो काढा ०मी–स्त्री चांद्रमासातील प्रतिपदेपासून आठवी तिथि, या महिन्यातून दोन येतात–शुध्द व वद्य ०मूर्ति–स्त्री पृथ्वी, जल, तेज, वायु, आकाश, सूर्य, चंद्र व ऋत्विज या परमेश्वराच्या आठ मूर्ती, शंकर, महादेव, अष्टधामूर्ति पहा ०योगिनी–स्त्री अव आठ योगिनी, पार्वतीच्या सख्या, या शुभाशुभ फल देणाऱ्या आहेत– मंगला, पिंगला, धन्या, भ्रामरी, भद्रिका, उल्का, सिध्दा, संकटा दुसरा पाठ– मार्जनी, कर्पुरतिलका, मलयगंधिनी, कौमुदिका, भेरुंडा, माताली, नायकी, जया ( शुभाचारा ) यांत कधीं कधीं सुलक्षणा, सुनंदा हींहि नावें आढळतात ०चक्र–अष्टावक्र पहा ०वर्ग–पु १ आठ औषधींचा समुदाय–ऋषभ, जीवक, मेद, महामेद, ऋध्दि, वृध्दि काकोली, क्षीरकाकोली २ मौंजीबंधनांत मातृभोजनांत भोजनाच्या वेळीं आठ मुंज्या मुलांना भोजनास बोलावितात तें कर्म ०वर्ग्य–र्ग्या–पु अष्टवर्गास जेवणारा बटू, उपनयनाच्या दिवशीं मातृभोजनाच्या वेळीं आठ बटू भोजनास बोलावितात ते प्रत्येक ०वर्षा–वि आठ वर्ष वयाची (कुमारिका), ( त्यावरून लग्नाला योग्य झालेली) उपवर ०वसु–पु अव प्रतिमन्वंतरातील आठ वसू चालू मन्वंतरातील धर्मऋषि व दक्षकन्या वसु याचे पुत्र–धर, ध्रुव, सोम, आप, अनिल, अनल, प्रत्यूष, प्रभास भागवतांत द्रोण, प्राण, ध्रुव, अर्क, अग्नि, दोष, वसु, विभावसु अशीं नावें आढळतात 'इंद्र चंद्र वरुण कुबेर । अष्टवसु गंधर्वकिन्नर ।' –ह २५ १४१

**०वायन**–न आठ वस्तूंचें दान, हळकुंड, सुपारी, दक्षिणा, खण, सुप, कंकण, धान्य, काचमणी, या आठ पदार्थांचें वायन (वाण) सौभाग्यसंपादनार्थ स्त्रीत आठ ब्राह्मणपैकीं प्रत्येकाला वधूकडून दिलें जातें **०विध समाधि**–स्त्री समाधियोगाचे आठ प्रकार–यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि **०विधा शृंगारनायका**–(साहित्य) अष्टनायका पहा **०विनायक**–पु अव गणपतीचीं आठ स्थानें– १ मोरेश्वर गणनाथ, (जेजुरी नजीक मोरगाव जिल्हा पुणें) २ बल्लाळेश्वर (मूळ मुरुड हर्णै पाली, खोपवली नजीक–जिल्हा कुलाबा) ३ विनायक (कर्जत नजीक मढ–जिल्हा कुलाबा) ४ चिंतामणी (लोणी नजीक थेऊर–जिल्हा पुणें) ५ गिरिजात्मक (जुन्नर नजीक लेण्याद्रि–जिल्हा पुणें) ६ विघ्नेश्वर (जुन्नरनजीक ओझर–जिल्हा पुणें) ७ गणपति (नगर सडकेवर राजणगाव–जिल्हा पुणें) ८ गजमुख (दौंड नजीक सिध्द टेक–जिल्हानगर) **०विवाह**–पु विवाहाचे आठ प्रकार–१ ब्राह्म=सालंकृतकन्यादान, २ गांधर्व=उभयताच्या अनुमतीनें, ३ राक्षस=जबरीनें कन्या हरण करून, ४ दैव=यज्ञप्रसंगीं ऋत्विजास कन्यादान करून, ५ आर्ष=गाय, बैल घेऊन कन्यार्पण, ६ प्राजापत्य=धर्माचरणार्थ कन्यार्पण, ७ असुर=शुल्क घेऊन, ८ पैशाच=कन्या चोरून आणून पत्नी करणें सविस्तर माहिती धर्मसिंधु परिच्छेद ३ पूर्वार्ध पहा **०सात्विक भाव**–अष्टभाव पहा **०सावध**–वि पुष्कळ गोष्टींकडे एकदम लक्ष पुरविणारा–देणारा, अष्टावधानी **०सिद्धि**–अष्टमहासिद्धि पहा 'अष्ट सिद्धि चामरें घेऊनी। वरी वारिती अनुदिनीं।'–ह १ १५ **०सृष्टि**–स्त्री काल्पनिक, शाब्दिक, प्रत्यक्षा, चित्रलेपा, स्वाप्नी (स्वप्नसृष्टि), गंधर्वा, ज्वरिका (ज्वरसृष्टि), दृष्टिबंधना –दा ६ ६ ५१ [स] **०क्षार**–पु पळस, निवडुंग, सज्जी, अघाडा, रुई, तीळ, जव व टाकणखार

**अष्टाकपाल**—पु १ ज्यात आठ खापरीच्या तुकड्यावर भाजलेल्या पुरोडाशाचा हवि देतात तो याग २ तो पुरोडाश [स]

**अष्टांग**—पु १ शरीराचीं आठ अंगें–दोन हात, उर, कपाळ, दोन नेत्र, ग्रीवा, कटि, दुसरा पर्याय– दोन हात, उर, भाल, दोन पाय, दोन गुडघे, तिसरा पर्याय–दोन हात, दोन पाय, दोन गुडघे, वाचा, मन, चौथा पर्याय–हात, पाय, गुडघे, छाती, मस्तक, दृष्टि, मन, वाणी –एभा २० २९१ २ (सामा) सर्व शरीर, सबंध देह अष्टांगीं पहा 'आरोग्यता तुकी पावला अष्टांगीं।'–तुगा ३९५८ ३ अष्टविध समाधि पहा 'अष्टांग अभ्यासिजे योगु तेणें।'–ज्ञा ६ ४२७ ४ आठपट ५ वैद्यकशास्त्राचे आठ भाग–शल्य, शालाक्य, कायचिकित्सा, भूतविद्या, कौमारभृत्य, अगदतंत्र, रसायनतंत्र, वाजीकरणतंत्र ६ स्मृतीचीं अष्टांगें–कायदा, न्यायाधीश, पंच, लेखक, ज्योतिष, सोनें, अग्नि, पाणी ७ पूजेचीं अष्टांगें–पाणी, दूध, तूप, दहीं, दर्भ, तांदूळ, जव, मोहरी ८ मैथुनाचीं अष्टांगें–स्मरण, कीर्तन, क्रीडा, दर्शन, गुह्यभाषण, चिंतन, निश्चय, संयोग ९ बुध्दीचीं अष्टांगें–शुश्रूषा, श्रवण, ग्रहण, धारण, चिंतन, ऊहापोह, अर्थविज्ञान, तत्त्वज्ञान **०नमन-पात-प्रणाम**–न पु. हात, पाय, गुडघे, वक्षस्थल, मस्तक, दृष्टि, मन व वाणी हीं आठ अंगें जमीनीवर टेकून नमस्कार करणें अतिशय आदरार्थी नम्रतापूर्वक नमस्कार –एभा २० २९१ **०योग**–अष्टविध समाधि पहा 'येंक सागती अष्टांगयोग। नाना चक्रें ॥'–दा ५ ४ २८ **०लवण**–न पादेलोण, ओवा, आमसुलें, आम्लवेतस हीं एकएक भाग, दालचिनी, वेलदोडे व मिरें हीं अर्धा भाग व साखर सर्वांच्या बरोबर घालून केलेलें चूर्ण हें अग्निदीपक आहे **०साधन**–अष्टविध समाधि पहा 'योगी करिती अष्टांगसाधन। त्यासीही नव्हे ऐसें दर्शन।'–ह ८ १८२ [स]

**अष्टांगीं**—क्रिवि अष्टांग (सप्तमींत प्रयोग) सर्व शरीरात-देहात (अकरणरूपी प्रयोग) (क्रि० नसणें) 'मी इतका उपदेश केला परंतु त्याचे अष्टांगीं नाहीं' [अष्टांग]

**अष्टादश**—वि अठरा **०धान्य-पुराण-उपपुराण**–अठरा धान्यें वगैरे पहा **०पदें**–न अव गयाक्षेत्रीं विष्णुपदाजवळ–कश्यप, अगस्ति, क्रौंच, मतंग, कण्व, दधीच, गणेश, कार्तिकेय, ब्रह्मा रुद्र, इंद्र, सूर्य, चंद्र, व आहवनीय, दक्षिण, गार्हपत्य, सभ्य, आवसथ्य, (हे अग्नि), या अठरा पदावर पिंडप्रदान करावें लागतें हीं अठरा पदें म्हणजे खडकावर पावलाच्या आकृतीचे काळे डाग उमटलेले आहेत हीं पावलें अति सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यासच दिसतात [स]

**अष्टाधिकार**—पु अव १ (अ) जलाधिकार–प्रवाशांना व सरकारी नोकरांना पाणी पुरविण्याचा अधिकार (आ) स्थलाधिकार–अनेक प्रकारच्या वस्तीच्या जागा ठरविणें व दाखवून देणें हा पाटलाचा अधिकार (इ) ग्रामाधिकार–लहान गावातील व्यापार व सामान्य धंदे यांची देखरेख करणें (ई) कुलकरण–रयतेचा सरकारी हिशेब ठेवणें व सरकारी दप्तर सांभाळणें–हें कुळकर्ण्याचें काम (उ) ब्रह्मासन–चेल्पिाचा अधिकार (ऊ) दंडविनियोग–मामलेदाराचा अधिकार (ऋ) पौरोहित्य–ग्रामोपाध्यायाचें किंवा कुलोपाध्यायाचें काम (ॠ) ज्योतिष–ग्रामज्योतिषाचें काम, जोसकी या अधिकारांचींच रूढ असलेलीं नावें–कोळीपणा, पाटिलकी, देशमुखी किंवा महाजनकी, कुळकरण वतेकी, धर्माधिकार, उपाध्येपण किंवा भटपणा, जोशीपणा २ (ल) स्नान, शौच, भोजन, निद्रा, वसणें वगैरे शरीराच्या दैनिक विधींनाहि धंदे हा शब्द योजितात 'एका खणाचे खोलींत सगळे अष्टाधिकार करूं म्हणता ते होतील कसे?' ३ राज्यादिसंबंधीं प्रधानकी, सेनापत्य इ० जे सर्वाधिकार ते, गडी, कारकून वगैरेंकडून होणारीं कामें 'नारू एक अराग म्हणजे दुसरा गडी, कारकून, मातदार इ० कोणी नको सगळे अष्टाधिकार एकटा सांभाळील' [स]

**अष्टावक्र, अष्टवक्र**—वि १ या नावाचा कहोड ऋषीचा मुलगा, (गर्भांत असता बापास अध्ययनातील चुकीबद्दल यानें हिणविलें म्हणून त्याच्या शापाने हा आठ ठिकाणीं वाकडा झाला त्यावरून) आठ ठिकाणीं वाकडा २ (ल) कुरूप, विद्रूप, विलक्षण दिसणारा (इसम, वेडब वस्तु)

**अष्टावधानी**—वि अनेक गोष्टींकडे एकदम लक्ष पुरविणारा किंवा अवधान देणारा अष्टावधा पहा [स अष्ट+अवधान]

**अष्टास्त्र**—न अष्टकोण-न, अष्टकोनाची आकृति -वि अष्टकोनी [स अष्ट+अस्त्र=कोन]

**अष्टाक्षरी**—स्त्री १ एका छंदाचें नाव काहीं अभंग व ओंव्या अष्टाक्षरी असतात गायत्री छंद हाहि अष्टाक्षरी असतो आठ चरणी, त्रिचरणी असे अष्टाक्षरीचे काहीं प्रकार आहेत 'विरोन जो मुरेलरे। भल्यात तो सरेल रे। विरेचिना मुरेचिना। भल्यात तो सरेचिना॥' -दावि ७७६ २ मद्रास इलाख्यानील (सातानींची) एक जात 'ओं नमो नारायणाय' या अष्टाक्षरी मंत्राच्या प्रभावावर त्याचा विश्वास असतो °मंत्र-पु १ आठ अक्षरें ज्यात आहेत असा मंत्र 'ओं नमो नारायणाय' २ (ल) 'कर्म करु काय करू' हा आठ अक्षराचा मंत्र, अतिशय दारिद्य, मोठें संकट किंवा अडचण प्राप्त झाली असता असे शब्द तोंडून निघतात 'त्याला हें उदाहरण सुचत नाहीं, तो अष्टाक्षरी मंत्र जपीत बसला आहे'

**अष्टेदळ**—(व) अष्टदळ पहा

**अष्टोत्तरशें**—वि (पाद्यात) १०८ संख्या [स अष्टोत्तर शत]

**अष्टोपद्वीप**—न पृथ्वीवरील आठ उपद्वीपें-स्वर्णप्रस्थ, चंद्रशुक्ल, आवर्तन, रमणक, मंदरहरिण, पांचजन्य, सिंहल, लंका

**अष्टोप्रहर, अष्टौप्रहर**—क्रिवि रात्रंदिवस, अखंड, सतत निरंतर (दिवसाचे आठ प्रहर यावरून)

**अष्टाविवाह**—अष्टविवाह पहा

**अष्ठी**—स्त्री गाठ अठळी, गठोळी 'जैं मागुती होय गर्भ इच्छा। गर्भकोश वाढे मासामासा। तं अष्ठी पडे शुद्धाचा। स्तन थोरासी॥' -कथा ५ ७ १२२ [स अष्ठि=गी, अठळी]

**असक**—असका पहा 'विवचूनिया पाटि ऐं असक।' -दावि ८१

**असकट**—वि १ वारवार २ (ल) बारीक कणिक चाळावी असकट। पारइति साडावें कमपट। होईल परिपाक चोखट। पूर्ण पुरिया सिध्दताइ॥' -एरुख १८ ५० [स भराकृत्]

**असका**—वि एकत्र कृष्णु असकाचि सापडे।' -उषा २९ [म अ+सक्तिन्-सखा]

**असका-कें**—वि १ सर्व, सगळें, एकूण एक एकंदर 'निगे कीचें पाप असकें।' -एभा २७ ३९८ २ सर्वांतील प्रत्येक विना सारें एकदस 'आता उठाउठी। असकेया ब्रह्मगोळका देखु मोटी।' -शिशु ९२१ 'तो तू परब्रह्मचि असकें। मन देवें दिव्यगि हस्ता दकें।' -ज्ञा १० ३२२ [स आसाद्य, प्रा आसग, आसस, असका]

**असकृत्**—क्रिवि वारवार, पुनःपुन्हा, अनेकवार [स]

**असक्त**—वि विरक्त, उदासीन [स]

**असंख्य, असंख्याक-त, असंख्येय**—वि १ अगणित, अगण्य 'आता शब्दब्रह्मीं असंख्यातें।' -ज्ञा १० ३० २ न मोजलेला, न गणलेला [स]

**असंग**—पु संग-संगतीचा अभाव -वि १ सर्वसंग परित्याग केलेला, संन्यासी, विरक्त २ एकटा, एकलकोंडा, कोणाची संगत, जोड नसलेला, संगतीला कोणी नसलेला ३ संगति न करण्याजोगा, संगतीस अयोग्य म्ह० असंगाशीं संग प्राणाशीं गाठ [अ+सं+गम्]

**असंगडी**—असंघडी पहा

**असंगत**—वि १ असंबध्द, विसंगत संदर्भ जुळत नाहीं असें (भाषण-विचार) २ अयुक्त, अयोग्य, विपरीत (वर्तणूक, वर्तन)

**असंगति**—स्त्री विसंगतपणा, असंबध्दता, अयोग्यपणा-भाषण, विचार याचा [स]

**असगोत्र**—वि भिन्न गोत्राचा, स्वगोत्रातील नव्हे तो, समान गोत्रातील नव्हे तो [स]

**असगंध**—पु अश्वगंधा, आस्कंद [स अश्वगंधा, हिं असगंध]

**असंघड-डी**—स्त्री अयुक्तता, असंभाव्यता, विरुध्दपणा 'प्रकृतिपुरुषाची चुरवाडी। साधता देख असंघडी।' -ज्ञा १३ ९७२ [स अ+सम्+घट्]

**असंचळ**—न (गो) स्वैरबुध्दि [स अ+सं+चल्]

**असंजाळ**—पु (कों) खोटा, मिथ्या आरोप-आळ [स असत्+जाल]

**असट**—वि पातळ, सरबरीत पिलपिलीत खरबीत पाणी अधिक झाल्यामुळें ज्याचा गोळा बनत नाहीं असें (पीठ, भात वगैरे) [स आ+सक्त] °भाजी-स्त्री पिठासरोबर शिजविलेली भाजी गोळाभाजी

**असट**—वि आसक्त गुरफटलेलें 'धरिता इच्छा दुरी पळे। पाठी सोहळे उदासा। म्हणऊनि असट मन। नका रूप सांगतो।' -तुगा ३२९३ [स आ+सक्त]

**असडणें**—उक्रि १ हिसका देऊन आढणें, हिसकणें, खेचणें (इंद्रिय अवयव इ०) 'कीं हृदयीं भावि रसोत। असडोनि आदिल सालीं पाडू।' 'कीं दु खल्याप्राच्या असडून हाणी। मायें भेणी केरी असे।' -नव २२ ५० २ सुपानें विशिष्ट प्रकारें

हिसका देऊन गदळ काढणें, कणी वगैरे काढणें, नीट करणें, स्वच्छ करणें ३ असडा, हिसडा देऊन–जोरानें आपटणें, (रात्री, वर) आदळणें हाणणें पहा ४ एकदम, खाडकन फटकावणें (चाबूक वगैरे) ५ सुनारणें, मुडणें, भोंदणें, लबाडीनें–टकून उपटून नेणें (पैसा, माल वगैरे) ६ (शाप किंवा अपशब्द यांचा) भडिमार करणें ७ गाली पडणें [स आ+सृद्. आस' ध्व ]

**असडा**—पु १ एकदम–चटकन दिलेला जोराचा हिसका, हिसडा (अवयव–गात्राला), असा हिसका बसल्यामुळें होणारें दुःख (क्रि० देणें, बसणें) एकदम हिसकणें, फटकावणें, उडविणें (चाबूक, दोरी वगैर), एकदम धरणें, पकडणें २ पिळवटणारा कष्ट, तिडीक, वेणा, आयका (सुडणारा, फाशी जाणारा, मुदमरणारा किंवा मरायाचा टेकलेला जसें करतो तसा) (क्रि० देणें, येणें,) ३ धक्का, धडकी, तडाखा (व्यापारात, धिकामबधानें) सोसावें लागणारें नुकसान–तोटा, (क्रि० बसणें) [असडणें]

**असडा–डी–डीक**—वि १ न सडलेला, न काढलेला, उस्त व्यात न कुटलेला, स्वच्छ, पाखडा न केलेला (तांदूळ, धान्य वगैरे) २ (ल) अशिक्षित, बेशिस्त, वळण नसलेला, असभ्य, असंस्कृत, अडाट, अपेट, अडाणी, गावंडळ, अज्ञानी 'तुम्ही फार असडे आहात'—नामदेव नाटक ९० [अ+सडणें]

**असडी, अंसडी**—स्त्री १ जखमेवर बसणाऱ्या माशानीं केलेली विष्ठा, क्षतादिकावर माशा बसल्यामुळें त्यात होणारी कृमींची उत्पत्ति, सडण्याची–कुजण्याची क्रिया (क्रि० पडणें, घालणें) २ (कांहींच्या मतें) जखमेंतील कृमी किंवा त्या उत्पन्न करणारी माशी [सडणें २]

**असण–णा–असणी**—पुन्नी अगाण्याचें झाड याच्या फांद्या मोठ्या व लांबट असून लाकूड इमारतीस उपयोगी पडतें सून, संग्रहणी व कुष्ट इत्यादिकावर गुणकारी [स आसन]

**असणें**—अक्रि १ वर्तणें, अस्तित्वांत असणें, जिवंत असणें, जगणें २ राहणें, वास्तव्य करणें, मुक्काम–वस्ती करणें, म्ह० १ असून अडचण नसून खोळंबा ० असल्या दिवशीं दिवाळी नाहीं तेव्हा शिमगा [स अस्=राहणें]

**असत**—न असत्यपणा, अविनाशी पदार्थ [स अ+सत्]

**असंत**—वि असत्य, अस्थिर 'जैसें वाहतें पाणी जाय वेगें। तैसेंचि आणिक मिळे मागें। तेवीं असतचि असिजे जगें। मानिजे सत'—ज्ञा १५ १३३

**असत**—वि १ अविद्यमान, खोटें असत् पहा 'म्हणानि हें असतचि सरें।'—परमा १० २४ २ लबाड नास्तिक सत नव्हे तो ०पण–ता–नस्त्री १ नास्तिकपणा, असाधुवृत्ति 'ज्याचनि वाक्यें असतता। नि शेष मावळे तत्त्वता। त्यासीचि गा सद्गुरुता। वदशास्त्रार्थी प्रतिपाद्य॥'—एभा ३ २८७ २ असत्कर्म, मिथ्यात्व, खोटेपणा 'तैसें गुरूनि गुणेंवीण। मनचि घेई असतपण।'—ना ११ ३९० [अ+सत्–सत]

**असता**—वि १ असणारा, असलेला 'वीं असतें आपुलें डोळे। आपण झाकी'—ज्ञा ६ ७३ ज्याच्याजवळ कांहीं अर्थ आहे असा, संपत्तिमान, सधन, ऐपतदार, पतदार म्ह० असत्याच विचार नसत्याचे घोरकार=जो श्रीमंत आहे त्यास धनी करण्याचा चिंता लागतात व गरीबाला कायाडकष्ट करावे लागतात २ समर्थ, क्षम, योग्य, लायक, उपयोगी, कामाचा म्ह० असत्याचा बाप ०नस–त्याची आई=मिळविता किंवा कामाचा मुलगा बापाला आवडतो पण ज्याला कांहीं मिळत नाहीं, जो कांहीं उद्योग करीत नाहीं, असा मुलगा फक्त आईलाच आवडतो ०करी–(माण) पैसेवाला

**असती**—स्त्री १ साध्वी किंवा पतिनिष्ठा नव्हे अशी स्त्री, कुलटा, जारिणी 'हरणार असु हरनि वसु तदभिलषित न गणिका तमी असती।'—मोगमा १ ६१ —वि दुष्ट नीच वाईट 'ज्याची मति, साडीना दुराग्रहा असती।'—मोकर्ण १ २५ [स]

**असंतुष्ट**—वि १ नाखूष, असमाधानी, अतृप्त २ रागावलेला, रुष्ट [स]

**असंतृप्त**—वि (शाप) पुरें न भरलेलें, कणांत कण न सिरलेलें, पूर्णपणें न मुरलेलें, असपृक्त, (इ) अनसॅच्युरेटेड 'हे (आल्डिहाईड) असंतृप्त असल्यानें साक्षात् दान एकमूल्यकतत्त्वाशीं किंवा मूलकाशीं सयोग पावू शकतात'—सेपू २ १६ [स]

**असतेपण**—न अस्तित्व, असणेंपणा, जगणें, असणें 'मर्त्ये ल्गो असतेपण। नावरूपासी पडो खडण॥' 'तेंसे असतपण आहाच'—ज्ञा ८ ३१ [स अस्]

**असंतोष**—पु १ नाखुषी, इतराजी, खेद 'याचकानीं किती मागितलें तरी मला असंतोष नाहीं' २ असमाधान, अतृप्तता ३ (राजकीय) प्रजेच्या मनाची अस्वस्थता, अशांतता, चलबिचल–खळबळ होण्याची स्थिति (इ) अनरेस्ट 'असंतोष हा मन भावी उत्कर्षाचें प्रयत्नाचें, ऐश्वर्याचें व साक्षाचें बीज आहे, हा जर आपण सर्वांनीं नष्ट केला तर या जगांत व परलोकांत देखील आपली धड गत लागणार नाहीं'—टिसू १२ [स] –षी–वि नाखूष, अतृप्त, असमाधानी, समाधान पावण्याला कठिण, हावरा, लोभी

**असत्**—वि १ खरें नव्हे तें, खोटें, असत्य, मिथ्या, अवास्तव, विनाशी, ज्याला अस्तित्व नाहीं तें, काल्पनिक, अस्सल नव्हे तें 'तैसी सत् ना असत् हाये।'—ज्ञा १५ ८१ 'तरी सच्छब्दें येणें। आद्यनि असताचें मार्गे। दाविजे अक्षगवाणें।'—ज्ञा १७ ३८० [स] २ वाईट दुष्ट, असाधु खन्याठ ३ अन्याय्य भयाग्य, सामासिक शब्द–असन्मित्र–खोटा मित्र, प्रसंगीं उपयोगी न पडणारा मित्र असद्विद्या=कुविद्या, पिशाचविद्या, दुःशास्त्र असन्मार्ग=कुमार्ग अनिष्ट–वाईट मार्ग, असद्व्यापार–व्यवहार=वाईट–

मुर्खपणाचीं कर्मे-प्रघात असद्भाव=दुष्टस्वभाव असत्कर्म, असत्पथ, असत्पुत्र, असत्संसर्ग, असद्विचार, असदाचार, असद्वृत्ति इ० [स]

**असत्कार**—पु अनादर, अवज्ञा, अपमान, असन्मान, अवहेलना [स]

**असत्काळ**—स्त्री (कों) अनिष्ट-दुष्ट-अन्यायाचा काळ, ज्यात दुर्गुणी पुरुषाची प्रतिष्ठा व सद्गुणी पुरुषांना दैन्य असतें अशा तऱ्हेचा विपरीत काळ-दशा भ्रष्टाचार, मचमच, दैन्यावस्था, यांचें प्राबल्य मानल्यामुळें दुःख करताना हा शब्द योजितात [स असत्+काल]

**असत्प्रायस्वर**—(संगीत) विवादी स्वर पहा

**असत्य**—वि खरें नव्हे तें, अनृत, मिथ्या, खोटें, अयथार्थ, अवास्तव -न खोटेपणा, खोटी गोष्ट ०प्रतिज्ञ-वि वचनभंग करणारा, करार मोडणारा, बेइमानी, अविश्वासी, बेभरवशाचा, खोटी प्रतिज्ञा करणारा ०भाषी ०वक्ता-वि असत्य भाषण करणारा, खोटें बोलणारा [स]

**असत्संग**—पु वाईट, दुष्ट संगति, असज्जनसंगति [स]

**असदर्थनिदर्शना**—स्त्री निदर्शनालंकाराचा एक भेद आपल्या वाईट व्यापारानें दुसऱ्यास त्याच्या वाईट व्यापाराचा व त्याच्या फलाचा जेथें बोध करतात तेथें हा अलंकार होतो उ० 'अगणाशीं सग आणि प्राणाशीं गाठ' 'रामाशीं जो द्वेष करी। तो जाय यममंदिरीं। असें बोधित मारिच। मर हेममयतत्त्व॥' [स]

**असदाचार**—पु वाईट वर्तन, दुराचरण, दुर्वर्तन [स]

**असंदिग्ध**—वि निःसंशय, निश्चित, निःशंक, निर्विवाद [स]

**असद्व्यय**—पु मूर्खपणानें-अयोग्य रीतीनें केलेला खर्च-व्यय [स.]

**असधन**—वि निर्धन, दरिद्री, कंगाल, गरीब [स]

**असंपृक्त**—असंसृष्ट पहा

**असंप्रज्ञ**—वि निर्विकल्प **असंप्रज्ञातसमाधि**—स्त्री ज्या समाधीत सर्व वृत्तींचा लय होऊन आत्मा केवळ आपल्या स्वरूपाच्या ठिकाणीं लीन असतो ती, निर्विकल्पसमाधि -सप्र १८५ [स]

**असफज्या-ह्**—पु एक पदवी ही हैदराबादच्या निजामाला आहे 'नबाब असफज्या ह्याचा विचार दरबारचीचा एकार पर म्हणाव एराम यारी लाग म्हणवे' -पया [अर आसफ-स ले माच्या पविरार्चे नाव (सामा) वजीर, दिवाण+ज्याह-महान्=जग जमाचा वजीर असफद्दौला=मस्थानचा वजीर]

**असबध्द**—वि १ विसंगत असंयुक्त मेळ नसलेला न पटणारे (भाषण लेख) विपरीत, वाङ्गी, अनावरी, असंगत अनुचित (कृत्य, आचरण) 'जरी निर्गुनि अनादिसिध्द। तरी न येती हे असबध्द।' -ज्ञा १५ ३२३ २ अलग, वेगळा, तुटक, निराळा, संबंध तोडलेला 'साधु संसाराचे ठायीं असबध्द असतात' ३ चमत्कारिक, असंभाव्य, असमंजसपणाचें, असमर्पक, बुध्दीला न पटणारें, अयुक्त 'पाण्यानें घर जळालें म्हणतोस परंतु हें मला असबध्द वाटतें' [स]

**असंबंध**—पु संबंधाचा अभाव, मेळ किंवा समन्वय याचा अभाव -वि निराळा, वेगळा [स]

**असबस्ट, असबस्टास**—पु एक तंतुमय खनिज द्रव्य, यावर विस्तवाचा परिणाम होत नसल्या कारणानें बॉयलर व वाफ नेण्याच्या नळ्याभोंवती हें लावतात तसेंच जेथें आगीचें भय त्या ठिकाणीं वापरतात [इ ॲस्बेस्टॉस]

**असबाब**—स्त्री १ चीजवस्त, मालमत्ता, सामानसुमान, साधनसामग्री, साहित्य, वस्तू २ युध्दसामग्री, युध्दोपयोगी सामान असबाब पहा [अर अस्बाब, सबबचें अव]

**असयाया**—पु घोड्याच्या गुडघ्यावर फोड येऊन जो रोग होतो तो -अश्वप १ २२८

**असंभव**—पु १ संभवाचा-होण्याचा अभाव, २ (ल) अशक्यता, असंभाव्यता, दुर्घटता, नसणेंपणा, अभूत गोष्ट ३ असबध्दता, असमर्पकता, अयुक्तता, वैपरित्य विचित्रपणा ४ (साहित्य) एक अलंकार, अशक्य गोष्टीचें वर्णन असतें तेथें हा अलंकार होतो याला असंभावना अलंकारहि म्हणतात उ० १ उदरानें मांजरास मारलें, २ गाय गोपर्दी बुडाला हा दैवा सिंधु शोषिला सशकें। न शके सासाया हे वरिला तो केसरी वमा मशकें॥' -मोगोप ३ २ ५ (साहित्य) व्याख्येय जातीमध्यें ज्या ज्या व्यक्तींचा समावेश व्हावा अशी इच्छा असते त्यापैकीं एकाचाहि समावेश तीमध्यें होत नाहीं असें जर व्याख्येवरून दिसेल तर तीमध्यें असंभव हा दोष आहे असें म्हणावें जसें- पदार्थांची किंमत देण्याघेण्याच्या मार्गावरिता राजकर्त्यांनीं जे कधींच न झिजणारे पदार्थ केलेले असतात, त्यास नाणीं म्हणावें ही नाण्याची व्याख्या काण्त्याच नाण्यास लागू होण्याचा संभव नाहीं कां कीं कधींच न झिजणारा असा एकहि पदार्थ नाहीं म्हणून ह्या व्याख्येमध्यें असंभव हा दोष आहे -मुरो ४१ [स अ+सम्+भू]

**असंभवदुरितक**—वि ज्या उदरींचा मुळीं संभवच नाहीं असा (अर्थ) अशक्यप्राय 'सूर्य अंधारामुळें ठेंच लागून पडला हा गाष्ट असंभवदुरितक दिसते' [अ+संभवत्+उदित+क]

**असंभवनीय**—असंभावनीय पहा

**असभर्यी**—वि दरिद्री 'जैसें असभरियाचें रेकरूं। पें पयोपानीं हारूं। -क ६० [अ+संभव]

**असंभाव्य-चिंत्य-वित-भव्य**—वि १ विपरीत विचित्र विवाद २ (ल) मनात न येणारें-नसणारें, अगभाव्य, अशक्य 'साहित्य असें अपार। असंभव्य दाटलें।' -दावि [स]

**असंभाड**—(क्व) असमड, असभाव्य –वि फार, बेसुमार 'तरी तयाचिसारिखें । असमाड पाप पिकें ।' –ज्ञा १३ ३१ [स असभाव्य]

**असभावना**—स्त्री १ सभव किंवा मिलाफ याचा अभाव, २ (ल) अशक्यता, असाध्यता, असभाव्यता, दुर्घटता ३ (वेदात) जीव व ब्रह्म याचा भेद प्रतिपादन केला आहे की अभेद प्रतिपादन केला आहे हा प्रमाणगत सशय; आणि जीव व ब्रह्म याचा भेद सत्य आहे हा प्रमेयगत सशय या दोन्ही सशयाना असभावना म्हणतात 'असभावना विपरीत भावना । नि शेष तुटलिया वासना । निजस्वरूपीं तेव्हा जाणा । जागेपणा तो आला ॥' –एभा ११ ४३७ [स]

**असंभावनीय**—वि १ असभाव्य, असभूत, अगदीं विरुद्ध विनोद, विपरीत २ अशक्य, दुर्घट [स अ+स+भू]

**असंभावित**—वि १ असबद्ध, विसगत, न जुळणारा, सदर्भ शून्य, असमर्पक २ (ल) असभवनीय, अशक्य, असाध्य ३ सभावित, सभ्य नाहीं असा, हलकट नीच, बेअब्रूचा [स]

**असंभाव्य**—वि १ घडण्यास, होण्यास असमर्थ (अयुक्तता, विपरीतता या कारणानीं), अक्षम, अशक्य, अघटित, असाध्य 'हें वहु न सागोंचि जे कथा । असभाव्य हें ॥' –ज्ञा १८ ८०९ २ अतर्क्य, अघटित 'असभाव्य श्री रामचरित्र।' –रावि १ ५ ३ पुष्कळ, अतोनात, अतिशय, अमाप 'जें जें मनीं इच्छिलें । तें तें हरीनें पुरविलें । सकळ राजे भृत्य जाहले । द्रव्य सचलें असभाव्य ।' –ह ३३ १३३ [स]

**असंभूत**—वि १ बुद्धीला न पटणारें, न जुळणारें, असमर्पक, अयुक्त २ (ल) अस्तित्व नसलेलें, न घडलेलें–होणारें, असभवनीय, अशक्य किंवा असाध्य [स अ+स+भू]

**असंभूति**—स्त्री अस्तित्व नसणें, नाश 'विदेस सभूति म्हणजे जगाचें आदिकारण आणि त्याहून भिन्न जी अविद्या तिला असभूति किंवा विनाश अशीं दुसरीं नावें देऊन याच्या पुढल्या तीन मत्रात पुन (तोच अर्थ) वर्णिला आहे' –गीर २५७ (ईश उपनिषद् १२ १४) [स]

**असभ्य**—वि १ (मूळ अर्थ) सभेंत बसण्यासबरण्यास अयोग्य, अयुक्त २ (ल) शिष्टाचारविरुद्ध, अशिष्ट, वाईट भलत्या रीतीचा, वर्तनाचा, जगली, क्षुद्र, अडाणी, गावढळ, हलकट, ग्राम्य [स अ+सभा]

**असम**—वि सदृश, सारखा नाहीं असा विषम –पु. (साहित्य) एक अलकार जेथें उपमान नाहीं असें वर्णन असतें तेथें हा अलकार होतो उ० 'धन्यगुणें काय घडे मारुतिशीं इतर वानरा जन्य ।' –मोभीष्म १ ६५ [स]

**असमज**—पु समजुतीचा अभाव, अज्ञान, गैरसमज –वि समजूत नसणारा–न पडणारा [अ+समज]

**असमंजस**—न असादृश्य, असाम्य, अननुरूपता, फरक तफावत –वि १ असदृश, असमान, असम २ मद, ज्याला ग्रहण शक्ति नाहीं असा, मूर्ख, अविचारी, बुद्धिहीन, अविवेकी, तार तम्यज्ञान नाहीं असा [स]

**असमजुती-त्या**—वि विनवणी करून किंवा स्पष्टीकरणानें समजूत पडत नाहीं असा, समजूत होण्याला अशक्य, मनधरणी करण्यास, मन वळविण्यास अशक्य–कठिण, शात करण्याला कठिण

**असमजूत**—स्त्री गैरसमजूत, विपरीत ग्रह, मतभेद, बेबनाव

**असंमत**—वि १ अमान्य, समत, मान्य नसलेलें, २ (ल) नामजूर, त्याज्य, निषिद्ध 'परि ही गोष्ट असमत ।' [स]

**असमर्थ**—वि साम र्थ्यहीन, अशक्त, दुर्बळ, अक्षम नाताकद, नामर्द, नालायक [स]

**असमवायी**—वि एकसमयावच्छेदेंकरून नसणारा, सबध्द नसणारा, अगभूत नसणारा, आकस्मिक, नैमित्तिक, प्रासगिक, यदृच्छा भूत [स] ०कारण–न (न्याय) नित्य सबध नसलेलें कारण उ ततुयोग हें पटाचें कारण

**असमसहास, असमसास, असमसाह(हा)स**—वि १ फार, अमर्याद साहसी, ज्याच्या साहसकृत्यास तुलना नाहीं असा २ असख्यात, पुष्कळ, अतिशय, अपार, अमर्याद 'पाचाळाचें सैन्य असमसास ।' –शिशु ९२७ 'मग तया ब्रम्हगोळकाचें अशाश । प्रसवती आदि सकल्प असमसाहास ॥' –ज्ञा ८ २४ –एभा ६ ३८ 'असमसाहास कृप सरोळ ।' –दावि ५३ ३ अनिवार –एभा ३ २६७ असमास पहा [स अ+सम+साहस, अ+समास= मर्यादा, सकोच]

**असमाई**—वि १ न मावणारी, मनात न राहणारी 'आपुलिया मना वरी । असमाई गोठी जीवीं ।' –ज्ञा ६ ११८ २ असह्य 'मायबाप निमाल्यावरी । घातलें गावाचे आभारीं । तोहि परि हरी । तुज जाला असमाई ।' –तुगा ४०९० [स अ+सम्+अव+ई–असमाई–मिलाफ न होणें]

**असमातरभुज चौकोन**—पु (गणित) ज्या चौकोनाच्या कोणत्याहि दोन बाजू परस्परांशीं समातर नसतात असा चौकोन [स]

**असमाधान**—न १ नाखुषी, असतोष अशातता, अस्वास्थ्य, मनस्ताप २ दुखणें, आजार 'विप्र पडला असमाधानीं । वैद्यवरें करूनि । पचत्व पावला परियेसा' –गुच ८ २६ [स]

**असमान**—वि असदृश विषम, अधिकउणा, एका पान ळींत नसलेला, भिन्न 'की अगजुग पडिलें असमान् । एक वेळे' –शिशु ६३ ०गति–स्त्री १ नागमोडी, वाकडीगति–चलन–मार्ग–

ओघ २ अनियमित, अव्यवस्थित, विषम, प्रगति–सुधारणा ०देश–पु १ चढउताराची, उच–सखल जमीन २ अनेक भेद–प्रकार असलेला प्रदेश [स]

**असमान**—न अस्मान, आकाश 'नव खड पृथ्वी पिंडें मगजें। डोंगर मेरे वळे असमानासी।' –तुगा ४२१० अस्मान पहा

**असमाप्त**—वि न सपलेलें, समाप्त–परिपूर्ण न झालेलें, अपूर्ण [स]

**असमास**—वि १मर्यादित, सकुचित नरालेलें, पसरलेलें, फैला वलें 'मध्यें सुगध सुवास। तेथें उठतो असमास॥' २ (काव्य) अमर्याद, असख्यात 'पुच्छावरी असमास। शास्त्राधाय प्रेरिती॥' असमसहास पहा [स अ+समास=जूट, सकोच]

**असंमितता–मिति**—स्त्री (शाप) विसादृश्य, भिन्नता, दोन बाजूत सारखेपणाचा अभाव (इ) असिमेट्री [स]

**असंयुक्त**—वि (शाप) सयोग न पावलेलें, वेगळें, निराळे (परमाणु) (इ) अन्क्वाइन्ड

**असंयुक्तावस्था**—स्त्री (शाप) स्वतत्र, वियुक्त स्थिति (इ) फ्री स्टट [स]

**असर**—पु १ परिणाम, अत शेवट 'कृष्णरावजी याचे प्राणानें असर केला असें वाटलें' –रा ५ ८३ २ परिणाम, ठसा, प्रभाव, कार्य 'असरकारक भाषण' –मौज २ ६ ३० ३ अश 'दुधामध्यें पाण्याचा असर आहे' ४ (व्यापक) छटा, चिन्ह रूप, वास, लज्जत, टकर [अर असर्=चिन्ह परिणाम]

**असरणी**—(कों) अशरीरिणी पहा

**असर्फी**—स्त्री (गो) एक नाणें किंमत सहा आणे शाठ पै (०–६–८) अश्रफी पहा

**असल**—वि १ मूळचें, अवल, आयकालिक, पहिलें 'याची नक्कल तुम्ही घ्या आणि असल पत्र मजपाशीं ठेवा' २ मुख्य, प्रधान, उत्कृष्ट, श्रेष्ठ पहिल्या प्रतीचा ३ नकली नव्हे तो, खरा, अकृत्रिम ४ थोर, कुलीन, उच्च घराण्यातील–वशातील–जातींतील ५ मूळाबरहुकूम, हुबेहुब (चित्र, तसबीर वळ) ६ औरस, धर्मपत्नीपासून झालेला [अर अस्ल=मूळ, वश] ०नसल–वि औरस सतति, प्रजा, कुल्य [अर अस्ल्+नस्ल्]

**असल अर्जी**—स्त्री (कायदा) मूळ तक्रार दाखल फिर्याद [अर अस्ल+अर्जी]

**असलग**—वि १ सलग, जवळचा 'असलगु ऐसा आवडे। सिआसिभा न ए क दुर्गी कडे।' शिशु ६८८ २ सोपें, सुगम 'एरें घुर्मिनें सावेरें। असल्गें एरें अगाधें। –ज्ञा ११ १२६ 'मर तो भक्तिरा मार्गु। तो वगना आणि असलगु।' –ज्ञा ८. २३७ ०पण–न सुगमपण, सुगमना 'ऐसा सकविलों असलग पणें। अधुरांचेनि।' –ज्ञा ७ १९४ [स आ+सग्न]

दासो १ २१

**असलंग**—क्रिवि जवळ, सगतींत 'अशाच्या वसू नये असलगी।' –राला ४४ [स आ+सलग्न]

**असल(ळ)णें**—अक्रि उसळणें 'कीं गगापय असळलें।' –ज्ञा १३ २६८ [उसळणें]

**असलफूल**—न १ शुद्ध कदफूल २ शुद्ध अर्क [अर अस्ल+स प्रा फुल्ल म फूल]

**असलबाव**—स्त्री १ मूळचा–पहिला करपत्र, मूळची बाब–कलम २ किल्ल्याच्या बदोबस्ताकरिता ठेवलेल्या सैन्यास कमी दरानें पदार्थ पुरविण्याची सरकारची रयतेवर असलेली सक्ती [अर अस्ल+बाब]

**असला**—वि अशा प्रकारचा, ह्या जातीचा, अशा घडणीचा [स ईदृश]

**असलाई**—स्त्री १ अस्सलपणा, खरेपणा, उत्कृष्टपणा 'असलाईस सोडें काम करणें मोठें लाछन' २ मोठेपणा, थोरपणा, सभ्यता, कुलीनपणा, घराण्याचा उच्चपणा 'प्राणहि वेंचुनि करणी करील तो असलाई।' –राला ११ [अर अस्ल+ई प्रत्यय]

**असली**—वि अस्सल [फा अस्ली]

**असवय**—वि (गो) सवय नसलेला

**असवर–रें**—वि न सावरणारें, अमर्याद 'तेथ असवरें आनदें।' –ज्ञा १८ १६२०, 'सेना पाहे असवर। आता ते कैशी आईकें उत्तर।' –गीता १ ३१७, 'म्हणोनि हें असवय। हें दैवि केरें औदार्य। वाचूनि स्वातत्र्य। मानें नाहीं।' –अमृ १० ६ [अ+सावरणें स अ+स+वृ]

**असवर्ण**—वि भिन्नवर्णाचा, भिन्न जातीचा–रूपाचा, विजातीय [स]

**असवल, असवोल**—न ऋक्ष, रीस, भल्लूक, अस्वल पहा

**असविणें**—क्रि १ नवीन सूतिकापान–मडकें तावविणें–तापविणें (तापवून व दुधानें भरून) २ (ल) कौमार्य भग करणें, एखाद्या कुमारिकेशीं सभोग करणें ३ (सामा) एखाद्या स्त्रीशीं अशास्त्र किंवा बेकायदेशीर समागम–सग करणें, जारकर्म, व्यभिचार करणें [स आसव?]

**असविणें**—उक्रि रिंगणामध्यें भोंवरा टाकणें–मारणें [म भाग]

**असंसक्ति**—स्त्री (वेदात) अनासक्ति, प्रेम, लोभ यांचा अभाव, ज्ञानी जीवाची सप्त भूमिकांतील पाचवी स्थिति –हयो [स]

**असंसृष्ट**—वि १ न मिसळलेला २ निराळा, वेगळा, पृथक् (इसम, मालमत्ता) [स अ+स+सृज्]

**असंस्कृत**—वि १ कोणताहि सस्कार (स्नान, मुज वगैरे) न झालेला, सस्कार विरहित २ गावढळ, हीन सस्कृतीचा [स]

**असहकार**—पु सहकाराचा अभाव, तुटकपणा, अलगपणा, बरोबर काम न करणें, मदत न करणें 'असहकार जरि करिता ।' –सन्मित्रसमाज मेळा सन १९२९ पद ८

**असहकारिता**—स्त्री (इ) नानकोऑपरेशन एकत्र किंवा पर स्परांचें काम करण्याचें नाकारणें, बलिष्ठ सरकाराशीं दुर्बळ व नि शस्त्र प्रजेनें जुलमानें गांजून गेल्यामुळें कोणत्याहि प्रकारची सहकारिता न करण्याचा उपक्रम 'असहकारिता श्रेष्ठ का सहकारिता श्रेष्ठ हे राजकीय विषय आहेत' –नाकु १७ [स]

**असहन**—न १ सहन करण्याची असमर्थता २ दुसऱ्याची ऊर्जितावस्था, भरभराट, उत्कर्ष सहन न होणें, मात्सर्य [स अ+सहन]

**असहानु**—वि सहन करण्यास कठिण. 'असहानु जगीं जग दळा चौहानु मल्लु ।' –शिशु ५१५. [स अ+सहन]

**असहाय**—वि १ एकटा, जोडीदार नसलेला, मित्र, मदत नीस, अनुयायी नसलेला २ अनाथ, निराश्रित [स]

**असहाल**—पु घोड्याचा एक रोग यानें घोड्याच्या पाठांतून मैल निघतो 'नल्लरी' असाहि एक शब्द आहे' –अश्वप २ १९६

**असह्य**—वि सहन करण्यास कठिण, अशक्य, दु सह 'चादणें देखोनि प्रकाशमान । सतुष्ट होतील इतरजन । परि तस्कराचें न आनंद मन । त्याजकारणें असह्य ।' [स]

**असळका-सा**—पु आलिंगन, मिठी, कवटाळणें [स आश्लेष अप]

**असा**—वि असल, अशा प्रकारचा, अशासारखा, विशिष्ट, इतका 'म्हणोत म्हणणार या तुज असा नसेल क्षमी ।' –केका ५१ –क्रिवि १ अशा रीतीनें ह्या प्रकारें, म्हणून २ सारखा–शब्दातील आरंभीचा अ गाळून ता शब्दाच्या शेवटीं जोडून नेहमीं वापर तात उ० 'भीष्म भीष्म तरणिसा अर्जुन हसत तरणिसा गमला ।' –मोभी १० ९१ 'गोरगरीबास अन्न यावेसें मज वाटतें' [स ईदृश, प्रा अइस, म असा] ०तसा-वि कोणी तरी, साधारण हलका, सामान्य प्रतीचा, क्षुद्रक, कमी प्रतीचा, दर्जाचा, नालायक, असाच पहा 'हा पंडित केवळ अशातशांतला नव्हे' –क्रिवि कोणत्या तरी उपायानें, रीतीनें युक्तिप्रयुक्तीनें, अडप झडप [स ईदृश+तादृश]

**असाइन**—पु मुखत्यार ०मेंट–न विमापत्रक वगैरे कांहीं हक्क एखाद्याच्या नावानें करणें -नी–पु ज्यास वचन करून द्याव याचें–कोणतीहि गोष्ट नावें करून द्यावयाची तो, मुखत्यार [इ]

**असागडें, असाघडें**—वि निरुपम, ज्यास सगत, बरोबरचा कोणी नाहीं असा, ज्याला सागड नाहीं असा 'हें किती बोलू असा गडें ।' –ज्ञा १५ ३०४ [स अ+स+गम् किंवा घट् म सागड]

**असाच**—वि १ निकृष्टप्रतीचा, सामान्यप्रतीचा 'तो सेना पती असाच होता' २ विन तगाचा, आहे तगाच, जशाचा तसा (उ० टोंक्या इ०) 'त्याला तुम्ही असाच किती दिवस ठेवणार' –क्रिवि माघाऱ्या पावलीं, इतक्यात 'मी असाच परत आलों' पहा [असा]

**असाजे, पेसाजे**—क्रिवि (पत्रादिकांच्या आरंभीं) पुढें दिल्याप्रमाणें, येणेंप्रमाणें

**असाडी, अंसाडी**—स्त्री १ अ (अ) सडी पहा २ (गुप्त पणें) वाईट अपकृत्य विषयक, दुष्कृत्यासबधीं घातलेलें वजन, भीड, अनुचितवजन, अनिष्ट पगडा

**असाणा**—असणा पहा

**असाधारण**—वि १ सामान्य, साधारण नव्हे असा, एकदेशी, विशिष्ट, विवक्षित प्रकारचा, विशेष, अगदीं निराळा २ विलक्षण, असामान्य, लोकोत्तर 'आणीक ही असाधारण । जे शस्त्रीं प्रवीण ।' –ज्ञा १.९६ ३ सन्माननीय, मान्यता असलेला, विख्यात, पूज्य ४ सुगम नव्हे असें, कठिण 'सांगितले तुम्ही आचार दोनी । कष्ट बहु विधवापणीं । अशक्य आम्हा न टाके स्वामी । असाधारण असे दातारा ॥' –गुच ३२ ६८ [स]

**असाधु**—वि वाईट, साधु नव्हे तो, दुष्ट, अधम 'पैं असाधु-कर्मा तैसा ।' –ज्ञा १७ ३९९ 'कौरव हो गौरव हो सुजनीं न करुनि असें असाधु तरा ।' –मोसभा ६ १०० ०वाद–पु निंदा

**असाध्य, असाधनीय**—वि १ साधण्याला–साध्य करून घेण्याला कठिण, सपादण्यास–प्राप्त होण्यास अशक्य २ बरा न होण्यासारखा, न सुधारण्यासारखा, उपाय–योजना लागू न पड णारा (रोग) [स]

**असाध्वस**—वि निर्भय [स अ+साध्वस=भीति]

**असान**—न उपकार, दया, कृपा, मेहेरबानी [अर इह सान]

**असान**—वि सुलभ सुगम, सोपें, सुखकर [फा आसान]

**असान**—न अवसान, धैर्य 'भणओनि असानेया होइने। पुढा भादु धाडिजे ।' –शिशु ४७४ [अवसान अप]

**असांप्रत**—वि अकालिक, अप्रस्तुत, हातीं घेतलेल्या–चालू गोष्टीशीं विसगत, अप्रासगिक, अनुचित, अयुक्त [स]

**असामदार**—पु सरकारात नमणूक, असामी असलेला, वेतन घेणारा (सरदार, दरकदार, इनामदार, कामदार, इ०) 'असामदारानें घोडें परिच्छिन्न लहान जमेस धरू नये' –खर ११ ५७०७ [अर]

**असामी**—पु स्त्री १ इसम, व्यक्ति, माणूस, 'तुकोजी शिंदे यानीं मौजे मुलखेडे येथें वटकी देखील पोरें असामी तीन येकूण रुपये दीडशास विकत घेतली' –वाड बाबा २ १९१ २ देणेकरी,

कर्जदार, ऋणको, प्रतिवादी 'ती असामी भारी आहे' ३ धारेकरी, भाडेकरी, कूळ–खडकरी ४ हजीरीपटावर असलेलें नाव, नोंद 'मातबर लोकांत असामी घातली' सभासद –पु १ सरकारी नोकरी, चाकरी, नेमणूक, उपजीविकेचें साधन 'रावर्ट आर्मे हा इस्ट इंडिया कंपनीच्या पदरी कारकुनाची एक लहान असामी पतकरून हिंदुस्थानांत आला' –नि ६१२ २ मोठा, मातबर माणूस, स्वारी 'दक्षिणेंत केवळ असामी नाहीं दुसरा।'–ऐपो २३६ [अर इस्म=नाव अव] ०दार–असामदार पहा ०वार–क्रिवि १नेमणुकीप्रमाणें, हुद्याप्रमाणें 'वरकड पांच इसम यास असामीवार शिरपेंच, पानदान देऊन वाटेस लाविलें' –रा ५ १४१ २ प्रत्येकी, वेगवेगळें, मनुष्यागणीक, नावनिशीवार ३ कुळाप्रमाणें, रयतवार [फा]

**असार**—वि १ निःसत्व, सारहीन २ खोटें, मिथ्या, निकामी, पोकळ 'असार जीवित' 'येथें एक वर्म पाहिजे धीर। परि म्या रेरिलें असार।' –तुगा ७११ 'असार म्हणिजे नासिवंत। सार म्हणिजे तें शाश्वत' –दा १६ ९ ५ [स]

**असार**—१ सामा अंतर, दोन वस्तूमधील क्षेत्र २ (गवंडी काम) भिंतीची रुंदी ३ दार किंवा खिडकी यांच्या दोन बाजूमधील अंतर, चौकटीचें क्षेत्रफळ [अर अर्स?]

**असार**—परिणाम, अंश वगैरे अर्थासाठीं असर पहा 'दुधामध्यें पाण्याचा असार आहे' 'पाण्याचा असार लागून गाळोडें भिजलें'

**असार**—(विणकाम) असारा–री पहा

**असारणें**—उक्रि पसरणें 'का समुद्राचेनि पैसारें। वरी तरंगता असारे।' –ज्ञा १५ १०३ [स आ+सृ]

**असारा**—पु (विणकाम) मैदानांत पाजणी करण्याकरितां पसरलेला सुताचा ताणा [स आ+सृ द्रा आसु=ताणा]

**असारा-री**—पुस्त्री (विणकाम) १ पराता किंवा फाळका (किंवा असारा) यावरून सूत उकलून ज्या कामगीच्या केलेल्या हाडीच्या आकाराच्या घरावर घेतात तो यावर सुमारें एक योक सूत उकलतात सूत गुंडाळण्याचें चाक, त्यावर गुंडाळलेलें सूत किंवा रेशीम, गठीव रेशीम [स आ+सृ–सर, द्रा आसु–पसरणें, ताणा] ०पर्नी–स्त्री पतंगाचा मांजा (दोरा) ज्यावर गुंडाळतात तो चाक

**असाल**—पु मूळ 'प्रयागांत नून (रोगी) मॉल (दर्दी) असाल (मूळ) आणि प्याज (कांदा) या व्यतिरिक्त कांहींहि पदार्थ पवते नाहींत' –मास २ २६३ [अर असल=मूळ]

**असावणें**—क्रि आसावणें, आतुर होणें 'तुका म्हणे माझ्या असावल्या वाणा। तुझ प्रेम पान्हा पाजी गा।' –तुगा ८२९ [स आश]

**असावणें**—क्रि अश्रुयुक्त होणें [स अश्रू, म असू]

**असावध**—वि १ लक्ष नसलेला, गैरसावध, गाफील, अनवधानी, दुर्लक्ष असणारा २ गफलत्या, प्रमादी, अनवधानदृष्टि [स अ+स+अवधान]

**असावरी**—पु १ (संगीत) एक राग आसावरी पहा २ एक वनस्पती, शतावरी

**असावरी-ली-कांठ**—पु शेला वगैरे वस्त्रांत विणलेले काठ० एका वनस्पतीच्या पानासारखी नक्षी असलेले काठ अस्तली काठ पहा

**असासा**—पु उसासा–धापा टाकणें, नाकातोंडातून वायु जोरानें बाहेर सोडणें, सुस्कारा, मोठा दुःखाचा उच्छ्वास (क्रि० टाकणें–देणें–घेणें–सोडणें) [स अस्=श्वास घेणें]

**असासित**—क्रिवि एकदम, अकस्मात् 'सिंहासना वरौनि उठिला। तवकें असासितु निगाला।' –शिशु ९८९ [स अशासित?]

**असाहाणुपणें**—क्रिवि सहन न करता, असूयेनें, मत्सरानें 'तरि तेहीं खिळनी केली इंभेसीं। असाहाणुपणें॥' –शिशु ८०८ [स अ+सहन]

**असाह्य**—वि एकटा, एकाकी, कोणाकडून मदत नसलेला [स अ+सहाय]

**असाळ-ळी**—स्त्री १ राक्षसिणीचा एक प्रकार, पिशाची, हडळ आसाळी पहा २ (ल) कर्कशा स्त्री, अवदसा, राक्षसीण, कृत्या 'परम विरस वाक्यें बोलते जों असाळी।' सारुह ८ ५१ [स ईर्यालु–इसालु किंवा प्रा आसालिय=सापाची एक जात ?]

**असाक्ष-क्षिक**—वि १ न पाहिलेला, न देखलेला, ज्याला साक्षी नाहीं असा २ (?) अतिथीस न देता भक्षण केलेलें 'असाक्षिकें मिष्टान्न।' –मक १४ ८८ ०भोजन–न पत्नीस कोणी नसता केलेलें भोजन –एभा २१ १३१ [स अ+स+अक्षि=डोळा]

**असि**– पु बाजारांत मांडलेल्या मालावरील कर 'इयां पाटणीं जें कोणी उपरें तेन्हांचा असि आऊ मग दीन्हला।' –पाटण शिलालेख, शके ११२८

**असि**—स्त्री तरवार खड्ग 'जय असिपत्र तरुवर।' –ज्ञा १६ ३७३ [स] ०धारा–स्त्री तरवारीची धार ०धारा व्रत–न १ स्त्रीपुरुषांनीं संगमनिवारणार्थ उभयतांमध्यें नागवी तरवार ठेवून एका शय्येवर निजणें २ (ल) मनोविकारांचें नियमन करणें, यावरून अत्यंत कठिण दुष्कर व्रत–नियम [स] ०पत्र–न तरवारीचें पातें, धार ०पत्रतरु–पु ज्याला तरवारीसारखीं पानें आहेत असें झाड 'जेथ असिपत्रतरुवर। खदिरांगाराचे डोंगर।' –ज्ञा १६ ३७३ ०पत्रमत्स्य–पु एक जातीचा मासा (द) गॉफिश –प्राणिमा ९० ०पत्रवन–न तरवारीसारखीं पानें असलेल्या झाडांचें वन पापी लोकांना शिक्षा तरवारीसारख्या पानांनीं या (नरक

लोकांतील ) अरण्यात मोठे क्लेश देण्यात येतात ०पत्रनत-ब्रह्मचर्य, असिधाराव्रत पहा 'चैत्री पौर्णिमेसीं सोडावा। वर्षं पर्यंत तो रक्षावा। स्वयें असिपत्रव्रत नेम धरावा। आणि वर्जावे भोगमान॥' -जै १९३ [स ]

**असिका**—स्त्री (काव्य) राहण्याची, अधिष्ठानाची जागा 'स्वानुभूतीची असिका आनद मात्र तू।'—वि असणारा 'एन्हवी स्वामि दुन्हा असिका। मीं केवि उरे।'—ऋ ५३ [स अस्=असणें, राहणें ]

**असिका-कें**—वि सपूर्ण, सर्व, समग्र असका पहा 'जियेचेनि स्नेहमयके। दु खतम निरसे असिके। तिये प्रभुशक्ति शके। अविद्या जात।' -ज्ञाप्र २२ 'उठावला वोयरे तरका। तो सुनाट पडे असिका।'—अमृ ६ ४६ 'त्यागीन तिला का मी यत्त्यागें निष्फळें यशें असिकीं।' —मोसभा ४ ७ [स आसाम]

**ॲसिड**—न अम्ल,, तेजाब अम्ल पहा [इ ]

**असित**—वि पाढरें नव्हे तें, काळें, निळें [स अ+सित=पाढरें] ०पथ-पु (ज्याचा मार्ग काळा असतो तो) अग्नि ०पक्ष-पु कृष्ण वद्य-पक्ष 'असितपक्ष माघमासीं।' —गुच ७ ११२

**असिध्द**—वि १ सिद्ध नव्हे तें पुरावा नसलेलें २ अस्तित्वात नसलेलें अनुपलब्ध, अविद्यमान [स ]

**असिपद्**—न तत्त्वमसि यातील असि=आहे हें पद तत्पद आणि त्वपद या दोहींचें निरुपाधिक ऐक्य जेथें होतें तें पद 'असिपदीं तदात्मा अलिप्त।' —परमा १ १७ [स असि—अस्—व द्वि ए ]

**असिरणि**—अशरीरिणी पहा 'असिरणि वाचा जालि।' —पचतत्र ३ १९

**असिल**—न (रसा ) पाढरा स्फटिकाकार व ननप्रचुर असा स्नायूचा घटक (इ ) मिएटाईन

**असिलता असिल्लता**—स्त्री १ तरवार 'हातीं असिल्लता करि खेटकें। कटिं झळके यमदड॥' २ तरवार परजणें, पें फिरवणें ३ विजेची वक्रगति—लकाकी, चमक [स असि=तरवार+लता]

**असिलेपण**—न अस्तित्व नाहीं अज्ञानावाचूनि मूळ। ययाचें असिलेपण ख्वाळ।' -ज्ञा १५ १४० [स अस्]

**असिवाद**—पु तरवारीचें युद्ध 'असिवादा असिवार तों यावे' —एपो २६९

**असिवार**—पु खड्गधारी, घोडस्वार, राऊत 'धरौनि घोडाचा गोमी निवटिती असिवारा तें।' —शिशु ६६९, —एभा ३० ९३ [असि+स्वार, असि+वार ?]

**असिस्टंट**—वि दुय्यम, नायब, उ० असिस्टट मॅनेजर (दुय्यम व्यवस्थापक), असिस्टट कलेक्टर वगैरे [इ ]-

**असीम**—वि निस्सीम, अमर्याद 'मूर्ति असे अत्युग्रा दीन जनीं करिसि परि असीम दया।' —कुभक [अ+सीमा]

**असील**—पु घोड्याच्या डोळ्याजवळचा भोवरा हा डोळ्यावर असल्यास चागला व डोळ्याखालीं असल्यास वाईट ' —अश्वप १०२ [स अक्ष किंवा स अश्व ]

**असील**—असल पहा

**असु**—पु १ प्राण, जीव, श्वासोच्छ्वास 'असु जाता तनु विकळा, कीं जाता वत्स जेवि धेनु सती।' —मोमभा ७ ४० [स ] २ (शाप ) ऑक्सिजन सामासशब्द- असुद्दिल अग्नि, असुवितन वगैरे

**असुआर**—पु घोडेस्वार, असिवार पहा 'तव पुढिला असुआरा। भिडौ सरले।' —शिशु ८७४ [स अश्ववार—वार]

**असुख**—न सुखाचा अभाव, दु ख, त्रास, अस्वस्थता, पीडा, असमाधान 'देखोनिया असुख घे स्वकुलाभिमानें।' —आक १२ [स ]

**असुख, असूख, असूक**—न १ स्त्रियास अवेळी विटाळ येणें, अकालीं, अनियमित ऋतुप्राप्ति (क्रि० सुटणें) [स असृक्] २ देवीचा रोग

**असुखी**—वि अस्वस्थ, बेचैन, दु खी, असमाधानी [स ]

**असुखोदर्क**—वि शोकपरिणामी, शोकपर्यवसायी —गीर ६६ [स असुख+उदर्क ]

**असुजणें**—अक्रि (कों ) सूज नाहींशी होणें, धावणें, ओसरणें, वसणें, निरणें, मावळणें [अ+सुजणें]

**असुडणें**—क्रि हिसकणें, फेकणें 'कृष्णें तेव्हा काय केलें। गोपींचें वस्त्र वेगें असुडिलें। तत्काळ धरवरि पडिलें। उघडें जाहलें सर्वांग।' —ह ७ १३२ 'मग हनुमतें असुरी समग्र। या गोप्या असुडिल्या', 'का केळीचा गाभा मोडला। चोखळा असुडला। आकाशाचा।' —अमृ ७ ६९ [स आ+सृद]

**अंसुढाळ**—वि १ ज्याच्या डोळ्यातून पाणी गळतें असा पिचकुडा, पिचक्या डोळ्याचा (घोडा) हें घोड्याचें अशुभ लक्षण आहे दोन्ही डोळ्याच्या खालील बाजूस गाम किंवा भोंवरा असतो त्यात डोळ्याचें पाणी जात असल्यास मालक नेहमीं रडत राहणार असें मानतात २ रडवा, रडवा, रडया —पु घी गळका, पिचका डोळा—घोड्याचा एक प्रकारचा रोग [स अश्रु+म टाळणें ]

**असुणी**—न अश्रु, ' नितबातें शुभस्थळ निरभिता मत्तकरिचें। महाग्लेनें त श्रवति असुणी साचपरिचे।' —निमा ३ ६९ [स अशु अव ]

**असुद-ध**—न रक्त, असृद्ध 'वाहाती असुधाचिया सरिता।' —अपा ८३१ [स असृद्ध]

**असुदगी**—स्त्री शांतता, भरभराट 'तिनी सर्कारची नजर ग्यतीचे व मुल्काचे व शहरचे असुदगीवर सादर आहे'—पेम ६१ [फा आसूदगी]

**असुदा-य**—वि १ आनंदी, उल्हासी, हुषार, विशेषत पुष्कळ दिवस तबेल्यात बांधून ठेवलेला (घोडा) २ ताजातवाना (काम केल्यानंतर—श्रमल्यानंतर), दमदार, जीवदार, जिवट, ईरयीचा, जोरदार, ज्याला श्रम लवकर भासत नाहींत असा, चपळ, उत्साही, थकवा न येणारा, ताकतवान —रा ३१२९ ३ (व्यापक) रिकामा, मोकळा, स्वतंत्र, निर्बंध, न गुंतलेला—अडकलेला (कामधंद्यात), सुग्न, मार्गे (संसार, कामधंदा पारें याचा) पार, लोढणें नसलेला, कोणी रहात नाही, वापरीत नाहीं अशी (जागा, भांडीं इ०) 'तुम्ही शटक पाचेतों मुलुक कावीज केला, आता मोहिमेस राज्य असुदें कोणतें?' —भाव ३७ 'राज्य ही असुदें आहे, पैसा पाहिजे तितका मिळेल'—भाव ३५ ४ अननुभवी, अपरिचित, ज्याला पूर्वी काहीं माहीत नाहीं असा, ज्यानें पूर्वी काहीं केलेलें नाहीं असा ५ अनसूट अर्थ ४ व ५ पहा [फा आसूदा] **असुदादम**—पु नवीन दम, विश्रांतीनंतर येणारी टवटवी, उल्हास

**असुदा-य**—वि (गो) १ आयतें, तयार २ मनमोकळ, स्वैर असुदा पहा

**असुपात**—असुटाळ पहा

**असुमाई**—वि १ अतिशय, बेसुमार, २ (ल) आश्चर्यकारक असमाई पहा 'वाणली असुमाई आणी योगकळा।'—शिगा ३०९ 'परि दाखविली लीळा असुमाई।'—शिगा ३११ [अ+सामावणें]

**असुर**—पु १ दैत्य, राक्षस दानव (सदुत्पत्तीच्या आरंभीं तुफानी वाऱ्यास असुर म्हणत, नंतर अधाराग म्हणत, त्यानंतर आर्येतर जातींस ही संज्ञा लावीत ऋग्वेदात बहुतेक ठिकाणीं असुर याचा अर्थ शक्तिवान, वीर्यवान असाच केला आहे पुढील वाङ्मयात देवशत्रु असा रूढ अर्थ झाला) 'सुरासुरातें टवळूनी। महादेव माहिरा॥' —एरुस्व ९१९ २ असिरिया देश, त्या देशांतील लोक ३ बिहारमधील एक अनार्य जात [स असु=प्राण, वल—असुर]

**असुरवाड**—न दु:ख क्लेश, श्रम कष्ट 'एरव्हीं विहितत्वें नाहीं। परी पाहितां असुरवाडी' —ज्ञा १८ १८९

**असुरवेळा**—स्त्री सन्ध्याकाळ 'दिन मारा झालिया ग्रास। मेघावली झाली प्रसून। असुरवेळायागें सुन। लिंघ लागल राहले' —तं ७८ ६१

**असुरा**—पु मोहरमची १० वी तारीख [अर असूरा—अशूरा]

**असुरी**—स्त्री राक्षसीण, असुरस्त्री —वि १ असुराविषयीं, राक्षसी, दैत्यविषयक २ राक्षसी, धाडसी, क्रूर, कठोर, तामसी ०अन्न—न १ उडीद, बाजरी व दुसरीं काहीं धान्यें गावान पहा २ ज्यात कैम आढळतो असें अन्न ०उपाय—पु फारच कठोर व जालीम उपाय, जसें—अगच्छेदन, डाग इत्यादि क्रूरपणानें रोगावर केलेले उपाय, तापदायक औषधें इत्यादि 'वायु झाला असता डाग देणें हा असुरी उपाय' ०कर्म—न अगावर शहार आणणारें क्रूर कृत्य, दुष्टपणाचें कृत्य ०खाणें—न मास, दारू इत्यादि सेवन ०विद्या—स्त्री मंत्रतंत्र, जारणमारण, मोहन, स्तंभन, विध्वसन याचा जींत समावेश होतो अशी कुविद्या, अभिचारकर्म [स असुर, असु=प्राण, वल, असू=श्वास घेणें]

**असुर्पी-फीं**—(गो) अशर्फी पहा

**असुळविसुळ**—वि अस्ताव्यस्त, विस्खलित 'असुळविसुळ न होती। ब्रह्मनविती स्फुरे म्हणोनी।' —विपू १४४ [ध्व स अ+सु+वि+सु+ल सु=हालणें]

**असुज्ञ**—वि १ अजाण, अकुशल, अनिष्णात, गैरमाहित गार २ सुज्ञ नव्हे तो, अज्ञानी, मूर्ख [स.]

**असूं**—पु न डोळ्यातील पाणी, अश्रु पहा 'एकाचिये डोळा असू बाष्पाळकारी। नाहीं तीं अंतरीं जळतील।' —तुगा ४६ **असवें उगाळणें**—(अंत करण सद्गदित होऊन) अश्रु ढाळणें [म अश्रु, प्रा अस्सु, गु अस, अंसु, नेपाळी अस्सु, प अम्सु जि अस्व, सिं आंसा, फा अश्क]

**असूक्त**—वि चागलें नव्हे—योग्य नव्हे तें (कृत्य) [स अ+सु+उक्त]

**असूरा**—न (गो) देवीचा रोग असुरा पहा [स असुर]

**असूड**—पु गाडीवाल्याचा—शेतकऱ्याचा लांब चाबूक, कोरडा [म असु—फेकणें, ध्व सट्] ०गाठ (असुर गाठ)—स्त्री एक पदर धरून आगडा दिला असता सुटण्याजोगी गाठ, सुरगाठ

**असृत-द**—न खातापिताना अन्नाचा अश श्वासनलिकेत जाऊन व त्यामुळें ठसका लागून जीव घाबरा होणें (क्रि० जाणें) 'तू हसू नको तुला असुद जाईल' [म उद्+सिक्थ=भाताचें शीत] **असुद-दा जाणें**—भलत्याच मार्गानें जाणें, आड मार्गानें जाणें [स+शुद+म सुदा—धा?]

**असृत-द**—न रक्त [स असृज् अप]

**असूदगी**—असुदगी पहा

**असूदी आरादी**—स्त्री ईनामी लागवण, नागानी वगैरे इ० शर्तीच्या काळानंतर वाढी [फा]

**असून असून**—क्रिवि मधून मधून, थांबून थांबून, राहून राहून 'असून असून नाना विधिइ देते' [असणें द्वि]

**असूया**—स्त्री. १ मत्सर; द्वेष; हेवा. २ द्वेषबुद्धीनें दुसऱ्या-विषयीं गोष्टी असता पसरविणें; चहाडी; आळ; तुफान. [ सं. ]

**असूर**—न (गो.) रस्त. 'त्याला असुर पडते. [ सं. असृक् ]

**असूरखाना**—पु ताबूत करण्याची जागा. [ अर. असुर+फा. खाना ]

**असूरा**—असुरा पहा.

**असृक्, असृज**—न. रक्त, रुधिर, शोणित. 'हो असृक् स्रोत. दान वाहे समराजिरीं सळसळावे।' -मोद्रोण २.२३. ॰पीटिका—स्त्री. रक्ताचे गोलक. (इं.) ब्लड सेल, कॉर्पुस्कल [ सं. ]

**असें**—असा पहा. -क्रिवि. १ याप्रमाणें; अशा रीतीनें. -नव १२.१५१. (**असें**)**असेंं होणें**-(वा.) वैफल्य येणें. 'माझें हें असं झालें तेव्हांच सारा ग्रंथ आटोपला.'—सुदर्शन २८. **असें काय तें! असें काय करावें**-एक वाकुडतीचा उद्गार. 'बाळे असें काय तें अगदीं' —रजपूत कुमारी तारा ७६. [ असा पहा. ]

**असें करतां**—क्रिवि हाप्रमाणें चालले तर पुढें शेवटीं; सरते शेवटीं, परिणामीं; या प्रमाणांत, या हिशेबानें, फार तर.' एवढें घर बांधलें असता आठशें रुपये लागतील, असें करतां हजार लागतील' [ असा+ करणें ]

**असे(ख)सा**—वि संपूर्ण; सर्व, अशेष. 'असेसा ऋद्धिपुर वसो। भणौनि चरणांरतिंतें।' -ऋ १३. 'राणे हो आपुल्या राज्या। तुम्हीच झालेति असेसा।' —विपू ७.४२. [ सं. अशेष ]

**असेंत, असेंति**—कि असती, आहेत. 'असेत माझ्या अप-राध कोटी।' —सारुह १ १३ 'जेथ असंड असेंति सुरगण।' -दाव १३१ [ अस् ]

**असेला**—वि असला, अशा प्रकारचा—जातीचा. [ असा+ला प्रत्यय ]

**असेली**—असल पहा

**असेसर**—पु १ साग, कर, पट्टी ठरविणारा—बसविणारा—घालणारा. २ जमाबंदी करणारा, वसविणारा ३ फौजदारी कोर्टांत किंवा विशेषेंकरून सेशन कोर्टांत न्यायाधिशास मदत करण्यासाठीं नेमलेला माणूस (पगारी नव्हे), पंच. 'असेसराचे जातीचे तीन असेसर्स नेमावे.' —टि ४ ३३७ [ इं. ]

**असैनु**—कि. असेन 'मीं असैनु श्रीकृष्णा तुझा होता।' —दाव ४८५ [ असणें ]

**असो**—कि असुदे, राहो, पुरे, असेना 'अथवा हें असो। बाप औदार्याचा अतिशो।' —ऋ १३. 'असो वरि कसा तरी विमल भाव ज्याचा असा।—केका ६७ [ सं. अस्तु—अस्तु—असो ]

**असो**—वि. (कों गो.) असा. 'असो येकलो फिरं नाका'.

**असोक-का**—पु अशोक वृक्ष. अशोक पहा. [ सं. अशोक ]

**असोड**—असुड पहा

**असोल**—वि. न सोललेला (नारळ, ठोंठा वगैरे) 'त्याचें काम्य असोल्या नारळासारखें कठिण असून तें उकलायास मोठा प्रयास पडतो.' -नि ७६६. [ सं. अ+छाल; म. साल—सोलणें ]

**असोशी-सी**—स्त्री. १ सोस; हव्यास; अतृप्ता; फाजील लोभ, आतुरता; उत्कट इच्छा. 'कृपा करोनिया पुरवीं असोसी। आपुल्या श्रीदासी राखावया॥' —तुगा ४४९५. 'नाहिं झाला भोग तुम्हीं फेडून घ्या असोसी।' —अफला ५८. 'सुस्वरु असुचीं हे पुरे वींजे असोसी।' —महाराष्ट्र काव्यग्रंथ ५१, (माधव कृत) रामायण, अयोध्याकांड ६. —वि. अतृप्त, लोभी; आतुर; (अधिकाराची वगैरे) हाव धरणारा. [ सं. आ+शोष=सोस ]

**असोशीक**—वि. सहन न करणारा; चिडखोर; अविचारी; तापट; उच्छृंखल. [ अ+सोशीक ]

**असोस-सु**—वि. सहन न होणारें; अतिशय; फार मोठें; अमर्याद; पुष्कळ, शिवाय सोस पहा. 'निवडुना माया असोस।झाला जी तुझेनि डोळस।' —ज्ञा १४.१०. 'आतुडे पैथ सुरा असोस।' —रंयोवा १.८९. —क्रिवि. हावरेपणानें. 'त्रिविधविकारीं बहुवस। वाटली असोस संगाढ।' —एभा २४.१२२. ॰पण—न हावरेपणा. [ अ+सोसणें ]

**असोळीं**—न. अव. पदार्थाचीं धरटीं. अविसाळीं पहा.

**असौरभ्य**—वि. सुगंधरहित, सुवास न घेतां येण्याजोगा. 'जो नादकिजता नादु। जो असौरभ्य मकरंदु।' —ज्ञा १५.५४. [ सं. ]

**अस्क**—असरा—कें पहा. 'लेखिका हातीं श्रध्दापूर्वक। ठतार करविलें कवन अस्क।' —दावि १८२.

**अस्कट-ड**—न. (गो.) १ अडचणीची जागा. २ जेथें गवत, झुडपें वगैरे दाटीनें एकत्र वाढतात ती जागा; रान, दाट [ सं. अस्=फेकणें ] ॰विस्कट—न स्त्री. अस्ताव्यस्तपणा, अव्यवस्थित स्थिति, विस्कटणें; पसारा —वि. गबाळ; अस्ताव्यस्त. 'कितीयेक तीं अस्कटेंविस्कटेंतीं' —दावि २८४. [ अस्कट+विस्कट—विस्कटणें ]

**अस्कत**—(गो.) अशक्त [ वर्णविपर्यास होऊन ]

**अस्कंद**—अश्वगंधा पहा.

**अस्करणें**—अक्रि. धिक्कार करून बोलणें, हुर्यो करणें; अस्कारणें धिक्कारणें पहा. 'सारी खेळतां अस्कारे। निकरेंही भाडें।' —ज्ञा ११.५४८. [ सं. असत्कार किंवा अस्=फेकणें ]

**अस्करा, अस्कारा**—पु कीर्ति, नावलौकिक, ख्याति, आख्या; लौकिक. 'सकळ सुघर मंडळींत माझ्या स्वरूपाचा अस्करा।' —प्रला ५८ 'नाजुक रुपडें दिपडें ठिकडें, जिकडे तिकडे अस्कारा।' —पला १७४ (फा.म कोश). [ फा. आश्कारा=प्रसिद्धि ]

**अस्फवळ**—वि एका घासात गट केलेला [ स आ+ कवल ]

**अस्का**—अस्क, असका–के पहा 'दैन्यवत अस्का मी तों मुली।' –दावि ७६

**अस्कारणें, अस्करणें**—अक्रि कीर्ति मिळविणें, नाणावणें, प्रसिद्ध असणें [ फा. आश्कारा ]

**अस्कारणें निस्कारणें**—उक्रि तिरस्कारणें, धिक्कारणें, हिडिसफिडिस करणें, हेटाळणें, अस्करणें पहा

**अस्कारी**—स्त्री ( विशेष प्रसिद्ध अर्शी ) काळ्या द्राक्षाची जात [ फा आश्कारा ]

**अस्खलित**—वि १ न अडखळता अप्रतिबद्ध, एकसारखें, अखंड, अचूक, सबीर, अढळ २ निरंतर, सतत, अखंड ०**गति**–स्त्री १ अनिरुद्ध गति, एकगति ३ ( ल ) सदाचाराचा मार्ग, निर्दोष वर्तणूक ०**बुद्धि**–स्त्री तर्कशुद्ध–अचूक विचारसरणी, कधीं न चुकणारा तर्क, ज्ञान ०**ब्रह्मचारी**–पु कुमार्गाला न जाणारा ब्रह्मचारी, न चळणारा–अढळ ब्रह्मचारी ०**भाषण**–न स्पष्ट व न अडखळता केलेलें भाषण, वाणीचा अखंड प्रवाह ०**वीर्य**–वि आजीव, अखंड (ब्रह्मचारी) –क्रिवि सतत, निरंतर, अखंड 'माझी वृत्ति अस्खलित चालली' [ स ]

**अस्टर**—न एक विलायती फुलझाड [ इ ]

**अस्त**—पु १ अंतर्धान, अदृश्यत्व, लोप २ (ज्यो ) आकाशांतील ग्रहादिकांचें भूगोलाच्या आड गेल्यामुळें होणारें अंतर्धान–मावळणें ( सामा ) मावळणें उ० सूर्यास्त, चंद्रास्त ३ मंगळ, शुक्र, गुरु शनि इ० ग्रह हे सूर्याजवळ असले म्हणजे अदृश्यत्व पावतात, दिसत नाहींत ती स्थिति गुरु, शुक्र यांच्या अस्तांत मुंज, लग्न इ० नैमित्तिक कर्में करीत नाहींत ४ नाश, शेवट ( मरण, दुर्लौकिक वगैरेमुळें ) ५ ( ल ) सादीकोंदीत पडणें, मागें पडणें ६ सपणें फना, अभाव राहित्य, उणीव [ स ]

**अस्तंगत**—वि मावळलेला, अदृश्य झालेला (आकाशज्योति, ग्रह ) 'अस्तंगत दिनकरकररंजित मंडप शोभे वरि गगनाचा।' [ स ]

**अस्तगिरी**—पु पश्चिमेकडील काल्पनिक पर्वत याच्या पाठीमागें सूर्य विश्रांति घेण्यास जातो अशी कल्पना आहे (सामा ) पश्चिम दिशा 'तरि अस्तुगिरिचिया उपकंठीं।' –ज्ञा १२ ३० [ स अस्त+गिरि ]

**अस्तनी**—स्त्री बाही, बाहीचा कोंपरापासून पुढील भाग **अस्तन्या वर सारणें**–युद्धास सज्ज होणें लढाईची तयारी करणें 'आमचे दोघेहि वीर आपापल्या अस्तन्या वर सारण्याच्या विचारांत होते' –स्वप ६१ **अस्तनींतील अग्नि–आग–निखारा**–पुस्त्रीपु गुप्त शत्रु घरचा दावेदार, वैरी, गृहकलह वर णारा, विश्वासघातकी, घरभेद्या, दगलबाज ०**नर**–पु (शिवणकाम) बाहीची वरची बाजू ( दर्शनी बाजू ) ०**मादी**–स्त्री (शिवणकाम) बाहीचा आतला भाग [ फा आस्तीन ]

**अस्तबाल**—पु तबेला, पागा 'पीलखाना व अस्तबालास व उष्ट्रास दाणा नाहीं, फाके गुजरतात' –रा १ ५४ [ अर इस्तबल, तुल० लॅ स्टॅबुलम=उभे राहणें, जुनें में इस्टेबल, इ स्टेबल, स स्था ]

**अस्तम**—पु (गो ) अस्तमान 'अस्तम जांचो वेळ आयलो' [ स अस्त ]

**अस्तमन–मान**—न १ (नाविक) गलबताच्या तळास मध्य भागीं चार–सहा वाकावर एक–दोन हात रुदीचें व वीत दोन वीत जाडीचें लाकूड बसवितात त्याला वरच्या अंगास काठी उभी केलेली असते यात डोलकाठीचा बुधा बसवितात हीं अस्तमनें दोन–तीन असतात २( हेट ) अस्तमन असलेला तळमजला ( गलबताचा ) [ स आ+स्तंभन ]

**अस्तमय, अस्तमान**—पु न मावळणें, अस्त, अस्ताची वेळ ( ग्रह–तारका यांची ) 'का अस्तमानीं निशी' –ज्ञा २ ३२४ [ स ]

**अस्तमान, अस्तमित**—वि अस्तगत, मावळलेला, अस्तास गेलेला ( ग्रह, तारा ) [ स ]

**अस्तर**—न १ अंगात घालावयाच्या कपडयाला आतून लाविलेलें पातळ (मऊ) कापड, ( सामा )कोणत्याहि वस्त्राला आतल्या अंगास लावतात तें कापड २ जोडयास आतील बाजूस जोडलेलें मऊ कातडें ३ ( वैद्यक ) आवरणत्वचा, आंतरत्वचा ( इ ) मेंब्रेन 'तोंडापासून सर्व नळीस आतल्या बाजूस एक सावडया रंगाचें फार पातळ व नाजूक असें अस्तर आहे' –आरोशा १ ६ [ फा आस्तर् स आस्तृ–आ+स्तरण ] ०**गिरी**–स्त्री गिलाव्याचें काम, चुन्याचें लिंपण 'शिखरास अस्तरगिरी होत आहे' –रा १० ५ [ फा आस्तर् +गिरी प्रत्यय ]

**अस्तरि**—स्त्री बायको, अस्तुरी पहा 'वोसविलें अस्तरीस।' –ऐपो ११६ [ स स्त्री ]

**अस्तलग्न**—न १ क्रांतिवृत्ताचा पश्चिमक्षितिजावरील भाग–बिंदु याच्या उलट अंगलग्न २ मावळता राशि [ अस्त+लग्न ]

**अस्तवणें**—१ अंतर्धान पावणें, अदृश्य होणें, लोप होणें, निकाल' खलास होणें २ अस्तास जाणें, मावळणें 'आवो दुसरी शुक्र वेइल। तरि जीवनकळा अस्तवैल।' –शिशु ८३० [ स अस्त ]

**अस्ताई**—स्त्री ( संगीत ) ध्रुपदाच्या तीन भागांपैकीं पहिला, दुसरे दोन–अंत्रा व आभोग [ स आ+स्था ]

**अस्ताचल**—पु पश्चिमेकडील पर्वत ( सूर्य अस्ताची जागा ), पश्चिम दिशा 'तों अस्ताचला गेला गभस्ती।' [ स ]

**अस्तायी**—अस्ताई पहा

**अस्तावा**—(विप्र) तस्त पहा. [फा आफ्तावा=झारी]

**अस्तान्यस्त, अस्तव्यस्त**—वि अव्यवस्थित, घोंटाळ्याचा, धाल्मेलीचा, वशिस्त 'आता जापाणी जापाणी आपुलें। अस्ता व्यस्त हें।'—ज्ञा ११ ३८१ —क्रिवि उलटापालट करून, अव्यवस्थित रीतीनें [अस्त+वि+अस्त]

**अस्ति**—१ आहे 'स्वामी बोलिलें मुख्य भक्ती। इतर जे साधनें सागती। त्यासि प्राप्तीची अस्तिनास्ति। देवें मजप्रती सागावी।' —एभा १४ ३४ २ असण्याचा भाव [स अस्, तृ पु एकवचन]

**अस्तित्व**—न १ असण्याचा धर्म-भाव-स्थिति २ असणें ३ राहणें, वास्तव्य [स]

**अस्तिनास्ति**—न काय आहे, काय नाहीं तें 'म्हणे घरात अस्तिनास्ति, सर्व ठाऊकें असे।' —कचेसुच ४ —क्रिवि १ होय किंवा नाहीं, ममतीनें अगर नकारानें (क्रि० म्हणणें) २ काकू करून, नानू करून (क्रि० करणें)

**अस्ती-ति**—स्त्री हाड, अस्थि 'अस्तिसादे दु खती जाण। या नाव आध्यात्मिक।' —दा ३ ६ २४ [स अस्थि अप]

**अस्तु**—अ १ असो, तसें असू दे, बरें, काही एक गोष्टीचा विस्तार न करता अगीकार करून दुसरी गोष्ट बोलण्यासाठीं किंवा एखादीचा जेव्हा उपसहार कर्तव्य आहे तेव्हा या शब्दाचा उपयोग करतात २ तथास्तु 'मजकडे दोष नसता तू मला लबाड म्हणतोस, अस्तु, थोर आहेस!' [स]

**अस्तुरी**—स्त्री (कुण) लग्नाची बायको, स्त्री 'डोळाभर नाहीं पाहिलें अस्तुरीला।' —ऐपो १५९ [स स्त्री]

**अस्तेकरी**—वि १ ज्याच्या जवळ द्रव्य-मालमत्ता आहे असा, गब्बर, जवळ ठेवलेलें असलेला २ लौकिकवान्, अब्रूदार, जिम्मेदार, जबाबदार [असणें+करी]

**अस्तेनस्ते**—वि अप्रस्तुत, अप्रासगिक, ज्याची गरज नाहीं असें, उकरून काढलेलें, नसता पहा [असणें+नसणें]

**अस्तेय**—न चोरी न करणें, चौर्यकर्मापासून परावृत्ति, चोरी न करण्याचा धर्म [स]

**अस्त्युत्तर**—न १ कोणत्याहि गोष्टीवर प्रत्युत्तर, हजरजबाब (वाईट अर्थी) 'अस्त्युत्तर भान्चोद'=एक शिवी २ एखाद्या गोष्टीच्या सत्यत्वाबद्दल अमान्यता दर्शविणें, ज्या योगानें लोकाचे उपकार—दगम्या वस्पटासमान भासतात, ज्या योगें आपल्यावर अन्याय होतो, मान मिळत नाहीं, बुद्धि आहे त्यापेक्षा लोक कमी लेखतात असें वाटावयास लागणारा मनाचा कमकुवतपणा—असतुष्टता—कृतघ्नता—यासबधानें प्रयोग करतात —वि कृतघ्न [स अस्ति+उत्तर]

**अस्त्र**—न १ फेंकण्याचें शस्त्र २ अभिमन्त्रित शस्त्र किंवा मन्त्रसामर्थ्यानें—अग्न्यस्त्र, वारुणास्त्र, मेघास्त्र, नारायणास्त्र इ० [स]

**अस्त्रशस्त्र**—न १ शस्त्रास्त्रें २ सामानसुमान, मालमत्ता, चीजवस्त ०**विद्या**—स्त्री शस्त्रास्त्रांचें ज्ञान 'अस्त्रशस्त्रविद्याप्रवीण। जाहले राम आणि लक्ष्मण।' [स अस्त्र+शस्त्र]

**अस्त्री**—स्त्री स्त्री (अप) 'भवती अस्त्रीयाची रायणे' —उषा १४२१ 'चागयान बोब्यानें रूप अस्त्रीचें धरलें।' —ऐपो ६८

**अस्था**—आस्था पहा

**अस्थान**—न (ठाणें) वृत्ति, पूजा इत्यादिकासबधीं हक्क, तद्रूप वृत्ति —पोतु दस्त २९ ११ १६५६ [स अर्चा+स्थान]

**अस्थायी**—वि अनित्य, क्षणिक, लवकर नाहींसें होणारें, वितळणारें, अदृश्य होणारें [स]

**अस्थि**—स्त्री हाड ०**गत**—वि हाडात गेलेला, मुरलेला (ज्वर) 'आतली मज्जा वाढीं। अस्थिगत।' —ज्ञा ६.२१८ ०**गतप्राण**—वि मरणाच्या द्वारीं पडलेला ०**त्वचा**—स्त्री हाडें आणि कातडें (रोड, अशक्त माणसाबद्दल) 'त्याच्या अगदीं अस्थित्वचा उरल्या आहेत' ०**पंजर**—पु हाडांचा सापळा 'तिचा केवळ अस्थिपजर राहिला होता' —पॉल्ह २३ ०**भंग-भेद**—पु हाडाचा भग, हाड मोडणें ०**माला**—स्त्री हाडाचा सापळा ०**मेद**—पु हाडातला मेद, चरबी (इ) बोनमॅरो ०**व्रण**—पु हाडावण, हाडास क्षत किंवा जखम होणें ०**शोष**—पु हाडें वाळणें-क्षीण होणें ०**संचय**—पु प्रेतदहन झाल्यानतर त्याच्या अस्थी विशिष्ट सस्कारासाठीं राखून ठेवण्याकरिता गोळा करणें, राख सावडणें ०**संधि-सांधा**—पु १ हाडाचा साधा—जोड—दुवा २ हाडें जोडण्याची क्रिया ०**समर्पण**—न मृत मनुष्याच्या अस्थी तीर्थांत टाकणें ०**सिंचन**—न (मृत मनुष्याच्या) तिसऱ्या दिवशीं राख दावण्याकरिता मृताच्या अस्थींवर जल सिंचन करण्याचा विधि [स अस् अगर अ+स्था, तुल० लॅ ऑस्, ऑसिस, ग्री ऑस्टिऑन, रुग कोस्ति, झें अस्त, फा. अस्ताइ, उस्तुखवान्]

**अस्थित**—वि अस्तित्वात-हयात नसलेली, लुप्त, अनुपलब्ध, धुळीस मिळालेली, नाहींशी झालेली [स]

**अस्थिति**—स्त्री १ अनास्तित्व, अनुपलभ्यता, लुप्तता, अदृश्यता २ टिकाऊपणाचा, निभावणीचा अभाव, कायमपणा नसणें, सतत, अखड न चालणें [स]

**अस्थिर**—वि १ स्थिर नव्हे तो, अनित्य, क्षणिक २ एका जागीं न टिकणारा, डळमळित ३ चचल, उतावळा ०**तेलें**—न अव उडून जाणारीं, न टिकणारीं, वायुपरिणामी तेलें (इ) व्होलटाईल ०**प्राय**—वि १ न राहणारा, न टिकणारा, अबाधित २ राहणीत पणा नसलेला, उतावळा [स]

**अस्थैर्य**—न चचलवृत्ति उतावळेपणा अस्थिरता, अशाश्वतता, अनित्यता [स]

**अस्नात**—वि (अप) अस्नाती १ अंग न धुतलेला, स्नान न केलेला २ (ल) अशुद्ध अमंगळ [ सं ]

**अस्प**—पु घोडा, अश्व पहा [फा स अश्व] ०स्वार–घोडेस्वार –रा २० १६२

**अस्पखुंग**—पु घोड्याचा एक प्रकार, याचें सर्व शरीर पांढरें, गुडघ्यावर काळ्या रंग किंवा शरीराचा अर्धा भाग काळा, डोळे हरणा सारखे काळे, पाठीवर सेली दुमपर्यंत, कानाची टोकें काळीं असलेला हा घोडा कुलक्षणी व धन्यास संतोष देणारा असतो –अश्वप ३१

**अस्पताल**—न ( ना ) इस्पितळ, रुग्णालय, रोग्यास औषधें देण्याची जागा [ इं हॉस्पिटल, म इस्पितळ ]

**अस्पर्श**—वि स्पर्श करण्यास, शिवण्यास अयोग्य, पाणेरडा, अशुद्ध, अपवित्र २ सुतकी ३ रजस्वला [ स ]

**अस्पष्ट**—वि. उघड न केलेलें–बोललेलें–सांगितलेलें, अधुरू, गूढ, अव्यक्त, पुसट, अस्फुट, दुर्बोध [ स ]

**अस्पृश्य**—वि १ स्पर्श करण्यास अयोग्य, अशक्य, अस्पर्श पहा –पु हिंदु समाजात असा एक वर्ग आहे की ज्यास शिवलें असता विटाळ मानतात उ० महार चांभार, ढोर, मांग, होलार, हलालखोर, मांगगारोडी इ० [ स अ+स्पृश्य ]

**अस्पृश्यता**—स्त्री विटाळ मानला जातो ती स्थिति, अस्पृश्य जातींचा विटाळ मानणें, महार, मांग इ० अस्पृश्य जातींशीं संबंध न ठेवणें 'अस्पृश्यता ही वैदिक धर्मास संमत नाहीं' –टिसू १३ ०निवारण–न अस्पृश्य जातींचा विटाळ काढून टाकणें, त्यास अस्पृश्य मानण्याची कल्पना नाहींशी करणें 'अस्पृश्यतानिवारण हें राष्ट्राचें पहिलें बीजतत्त्व' –के १६ ४ ३०

**अस्पृश्योद्धार**—पु अस्पृश्य लोकांची उन्नति, अस्पृश्यता निवारण [ स अस्पृश्य+उद्धार ]

**अस्फुटोच्चार**—पु अव्यक्त–अस्पष्ट उच्चार, अशुद्ध वाणी, दुर्बोध भाषण, अडखळत बोलणें [ स अ+स्फुट+उच्चार ]

**अस्फुर**—वि अस्फुट, अस्पष्ट (वाणी) 'तैसेंयाचेया अस्फुरा। वेंचीं धांवें सारंगधरा।' –उषा १५८४ [ स अस्फुट ]

**अस्फूर्ति**—स्त्री १ स्फूर्तीचा अभाव २ विस्मरण, विस्मृति, व्यामोह ३ लक्षात न राहणें, मनात–ध्यानात न येणें [ स ]

**अस्बाब**—न सामान, असबाब पहा 'बायकापोरें आणि अस्बाब कोठें ठेवावा' –रा ७ १५३ 'जो आम्हापाशीं अस्बाब आहे तो हजरतचे कृपेचा आहे, हा घेऊन फौजेचे खर्चांत आणावा' –दिमरा १ २१२ [अर सबबचें अव ]

**अस्मत्**—सना आम्ही सामाशब्द–अस्मद्गृह अस्मत्पत्नी, अस्मत्कुल इ० [ स ]

**अस्मतपन्हा, अस्मतपना**—वि पावित्र्यरक्षक, पातिव्रत्य शील, सन्मान्य कुलीन, पनातून स्त्रियांना लिहावयाचा मायना (सामा) शुद्ध, पवित्र [अर इस्मत्=पातिव्रत्य, शुद्धता+पनाह्=रक्षक] शको १ २४

**अस्मदीय**—सना वि आमचा, माझें, मम [ स ]

**अस्मद्वाच्य**—पु (व्याक ) प्रथम पुरुष, मी वाचक [ स ]

**अस्मसास**—असमसहास पहा 'गदायुद्ध अस्मसास। ऐसें प्रवर्तला।' –गीता १ ३५४.

**अस्माकं**—सना आम्ही, आमचे (विनोदानें प्रयोग) 'अरे अस्माकवरी कर्म प्रगटे।' –दावि २६

**अस्मादिक**—सना आम्ही, सुद्ध, आम्ही स्वत (आपला विशेषपणा वर्णन करावयाचा असता आम्ही या ठिकाणीं उपयोग, शिवाय बढाई, विनोद यावेळीं) 'तुमच्या अलीकडच्या नाटकांतील अद्भुतप्रसंग वस्तुस्थितीस अनुसरून नसल्यामुळें ते अस्मादिकांना पसत नाहींत' –नपुक ८९ 'येथें अस्मादिक होते म्हणूनच या कामाचा उलगडा झाला' [ स अस्मत्+आदि+क ]

**अस्मान**—न आकाश, अंतराळ, स्वर्ग 'अस्मानीं फत्तेची ध्वजा लागली' –चिनगुप्त ३३ 'अस्मानहि फुटालें तरी (मराठे) आपल्या मर्दानगीस अंतर करणार नाहींत' –मरि ३ ७१ ०गिरी–पु चांदवा, छत, चांदणी, माडवाचें आच्छादन, मांडव, छप्पर, वळचण ०चपेटा–पु १ परमेश्वरी कोप, मोठा प्रलय, संकट, दैवी आपत्ति, अरिष्ट २ (व्याजोक्ति) आकाशात उड्डाण करणारा घोडा (एखाद्या रद्दी, टाकाऊ, निकामी घोड्यास म्हणतात) –ची परी–स्त्री अप्सरा, सुंदर स्त्री 'तवियतखानाचें सर्व लक्ष्य हातीं लागलेल्या अस्मानच्या परीकडे होतें.' –स्वप ४२९ ०तारा–पु १ आकाशात चमकणारा तारा, चांदणी २ धूमकेतु, उल्का (क्रि० तुटणें) ३ सुंदर, चपळ घोड्याबद्दल अगर खद्या घोडेस्वाराविषयीं, तसेंच उत्तम गवई, उत्तम लेखक, उत्तम वजवण्या इत्यादिकांची प्रशंसा करतेसमयीं म्हणतात **अस्मान तारा तुटणें**–१ उल्कापात होणें, तारे निखळून पडणें २ निरर्थक वडबड करणें. **अस्मान जमीनीची तफावत**–स्त्री महदंतर, फार मोठें अंतर 'त्या सुमारास व या लिहिण्यास पाहता अस्मान–जमीनीची तफावत' –रा १२१५ **अस्मान ठेंगणें होणें**–स्वर्ग दोन बोटें उरणें, ताठ्याचा–गर्वाचा कळस होणें 'नवऱ्याच्या पगारामुळें तर तिला अगदीं अस्मान ठेंगणें झालें होतें' –पकोधे [ फा आस्मान्=आकाश ]

**अस्मानी**—स्त्री ईश्वरी कोपामुळें आलेलें संकट (अतिवृष्टि, साथ वगैरे) –वि १ आकाशी, फिक्कट जांभळा, आकाशाच्या रंगासारखा निळा, निळसर, मेघवर्ण २ आकाशातील, स्वर्गातील, दैवी 'शिकंदर ताले। अस्मानी फत्ते (दिग्विजय) होत चालली आहे' –ख ७ ३२३६ ०रंग–पु आकाशी रंग, निळा रंग ०सुलतानी–स्त्री १ दैवी व राजकीय आपत्ति, ईश्वरी व मानवी नाति, ईश्वराचा व राजाचा कोप झाल्यामुळें ओढवणारीं संकटें २ (ल) जुलूम जबरदस्ती 'जेथें अस्मानी सुलतानी एकदम कोसळतात तेथें विचारा

माणून काय करणार ?' 'अस्मानी सुल्तानी मजरा असावी' –सारइ–जुले १२. आकस्मिक हानी; दैवी आपत्तीमुळे नुकसान. 'आमच्याकडे विलायतेहून विक्रीस आलेल्या मालाची अस्मानी सुल्तानी झाल्यास त्याची जबाबदारी आमच्याकडे नाहीं.' –मुंग्या ७१. [ फा. आस्मान्+सुल्तान=बादशाहा ]

**अस्मार्त**—वि १ आठवणीच्या पलीकडचें, स्मृतीस अगम्य; अतिप्राचीन २ स्मृतिविरुद्ध; अशास्त्र; धर्मशास्त्रास सोडून; धर्मशास्त्रविरुद्ध; धर्मशास्त्रबाह्य; बेकायदेशीर; बेकायदा. ३ अस्मार्तकालिक पहा. ०काल–पु आठवणीच्या पलीकडचा–अतिप्राचीन काल, (कायदा) शंभर वर्षांपूर्वीचा काल. ०कालिक–वि. (कायदा) शंभर वर्षांपूर्वीपासून उपभोग घेतलेली (जिनगी, मालमत्ता). [ सं. अ+स्मृ–स्मार्त ]

अस्राप—अश्राप पहा.

**अस्लूब**—पु. रीति; पद्धति; व्यवस्था. 'तेव्हां करारीं कोणे प्रकारच्या व कशा, याचा अस्लूब काय तन्हेचा ?' –रा ७.८२. [ अर. अस्लूब्, उस्लूब्=रीत, पद्धति ]

**अस्वडीं**—क्रिवि. (गो.) मागें, परोक्ष; सवड नसता, अयोग्य वेळीं. [ अ+सवड ]

**अस्वत्व**—न. मालकीचा, धनीपणाचा, स्वामित्वाचा अभाव (कायदा) जिनगी, मालमत्ता वगैरेवरील वारसाचा, मालकीचा अभाव, बेवारसा. [ सं अ+स्व+त्व ]

**अस्वपात**—पु आंसवें टाळणें, अश्रुपात. 'अस्वपात पडती नयनीं।' –उषा ४८.४८. [ अश्रुपात, अश्रु=असु+पात ]

**अस्वयंवेद्य**—वि. स्वतःस न कळणारा; अज्ञेय. 'अस्वयंवेद्य म्हणजे आपल्या स्वतःस न कळणारा अहंकार' –गीर १७१. [ सं. ]

**अस्वरस**—पु नापसंति, इतराजी; नावड; मनाची किंवा प्रीतीची अनासक्ति, अनिष्टा [ सं अ+स्वारस्य ]

**अस्वल**—पु १ एक पुष्कळ केंस असणारा चतुष्पाद प्राणी, रीस. हा ऑस्ट्रेलियाखेरीज सर्व देशांत सापडतो. २ मोठाले केंस असलेला पुरुष [ सं. ऋक्षभल्ल–अच्छभल्ल–अस्विल–अस्वल (राजवाडे) ऋक्ष+ल (स्वार्थी) ] म्ह० १ अस्वला आधीं आरोळी=दुसऱ्यानें आपणासंबंधीं तक्रार करण्यापूर्वी आपणच त्याबद्दल तक्रार सुरू करणें. २ अस्वलाच्या अंगास (गांडीस) केंसांचा (केसांचा) दुष्काळ, किंवा अस्वलाच्या रानांत केसांचा दुष्काळ=एखादी गोष्ट हटकून ज्या ठिकाणीं असेल अशी अपेक्षा असते त्या ठिकाणीं तिचा अभाव. बाप्र म्ह० ३.स्वलीचा कान दरवेशाच्या हातांत=प्रत्येकाला योग्य नियंता असतो.

**अस्वली**—स्त्री एक वनस्पति. असावरी; शतावरी ?

**अस्वलीकांठ**—(प्र.) असावरी–स्त्री कांठ अस्वली वनस्पतीच्या पानासारखी नक्षी असलेले कांठ.

**अस्वली पायपुसणें**—न पायाची माती–चिखल पुसण्याकरितां दरवाजाजवळ ठेवलेलें काथ्याचें अस्वलीच्या केंसासारखें केसाळ खरखरीत तरट

**अस्वस्थ**—वि. अस्थिर; अशांत; स्वस्थपणा नसलेला; मन स्थिर नसलेला, प्रकृतीस समाधान नसलेला. [ सं. अ+स्वस्थ ]

**अस्वस्थता**—स्त्री. १ असमाधान, असंतोष. २ राजकीय असंतोषामुळें उद्भवणारी चळवळ, (इं) अनरेस्ट. '(धीरलपाल) यांनीं केलेलें अस्वस्थतेचें निदान शास्त्रदृष्ट्या फारच चुकीचें...आहे' –टि २.१६. ३ प्रकृतीस स्वास्थ्य, आराम नसणें; दुखणाईतपणा [ सं. ]

**अस्वाधीन**—वि. (शब्दशः पराधीन पण प्रचारांत) स्वतंत्र, दुसऱ्यावर अवलंबून नसलेला. [ सं. अ+स्व+आधीन ]

**अस्वामि–अस्वामिक**—वि. ज्याला राजा–धनी–पुढारी–अधिपति–पालक–मालक–वारसदार नाहीं असा; बेवारसी. ०विक्रय–पु (कायदा)मालकी हक्क किंवा अधिकार असल्याशिवाय केलेली मालाची, जिंदगीची, मालमत्तेची विक्री, बेकायदेशीर केलेली विक्री. [ सं. अ+स्वामिक ]

**अस्वाम्य**—न (कायदा) जिंदगीवर कायदेशीर हक्काचा अभाव; स्वामित्व नसणें. [ सं ]

**अस्वार**—वि घोडा, हत्ति, उंट इत्यादिकांवर आरूढ झालेला, वर बसलेला. –पु स्वार; शिलेदार, राउत. [ फा. सवार् ]

**अस्वारस्य**—न नापसंति, अरुचि; नावड; स्वारस्य, प्रेम, प्रीति नसणें [ सं. ]

**अस्वास्थ्य**—न. १ स्वास्थ्याचा अभाव; असमाधान; असंतोष, असुख. २ शारीरिक व्याधि किंवा विकृति; प्रकृति बरी नसणें. ३ निर्धनता, दारिद्र्य. [ सं. ]

**अस्सें**—उद्गा. (कुण) अस्सें, खरें की काय ?; खरं ?. [ अशें तुल० सं. अंजस–अँसा–अस्सँ (राजवाडे) –भाभ १८३२ ईदराम ]

**अस्सल**—वि मूळचें; खरें; अकृत्रिम, गैरनकली; असल पहा. [ अर. अस्ल् ]

**अस्सों**—वि. (गो.) १ विकार; गर्व २ अस्मा, अस्पे पहा.

**अह**—पु. दिवस [ सं. अहन्, अहस् ]

**अहं**—सना. १ मी, स्वतः; प्रथम पुरुष. 'तो अहं म्हणून बसला आहे.' 'अहं कोहं सोहं भेद।' –एभा १२.४६७ 'तेणें अविद्येनी अहं लीन राहे। यालागीं होय भवभ्रमु।' –एभा ३.७३१. २ मीपणा, गर्व, ताठा, अहंकार [ सं. ]

**अँहँ**—उद्गा. नापसंति, असंमति, नकारदर्शक उद्गार.

**अहंकर्ता**—पु मी सर्व करणारा असा गर्व; मीपणा; अहंकार; ताठा; स्वत:च्या कृत्याबद्दल प्रौढी. 'अहंकर्ता भाव गाळून । मन निमम्र राखुनार्थी ।' [सं. अहं+कर्ता]

**अहकाम**—पु. हुकूम; सत्ता; हुकमत; परवानगी. 'याप्रमाणे मुख्तारीचे अहकाम आणून दिले.' –चिरा २४. [अ. अहकाम् हुक्म अव.]

**अहंकार**—पु. १ आपली, स्वत:ची जाणीव; आत्मज्ञान. २ अभिमान; गर्व; मीपणा; ताठा. ३ परमात्म्यापासून किंवा बाह्य विश्वापासून आपण वेगळे आहों अशी भावना. 'बुद्धीपासून पुढें उत्पन्न होणाऱ्या पृथक्पणाच्या या गुणासच अहंकार असें म्हणतात.' –गीर १७१. ०भेद–पु. अहंकाराचे तीन प्रकार–सात्त्विक, राजस आणि तामस; यासच अहंकारत्रय किंवा त्रिविध अहंकार म्हणतात [सं.]

**अहंकारणें**—अक्रि. गर्वानें फुगणें; ताठणें.' अहंकारला रावणु। बोटी गुणें।' –राक १.१४.

**अहंकाराशय**—पु अहंकाराचें (किंवा आत्म्याचें) स्थान; शरीर. [सं.]

**अहंकारास्पद**—वि. ज्याबद्दल अहंकार वाटावयाचा तो (देह आत्मा). [सं.]

**अहंकारी**—वि. अहंकार असलेला; गर्विष्ठ, ताठर. [सं.]

**अहंकृति-भाव**—स्त्री पु अहंकार; गर्विष्ठपणा; ताठा; स्वत:ची प्रौढी. 'तूं भ्रमलेपणें अहंकृति । यासि घालु न घरिसी चित्तीं ।' –ज्ञा २.९८. 'ऐसेनि अहंकृतिभावो । जयाचा बोधीं जाहाला वावो' –ज्ञा १८.४२२. [सं. अहम्+कृ]

**अहंग**—पु (संगीत) एक राग. राग पहा.

**अहंचत्वंच**—स्त्री. शरतुरे, मी तूं करणें, वाचावाची. [सं. अहं+च+त्वं+च]

**अहडणें**—अहाडणें पहा.

**अहडणी**—स्त्री. (कामाठी धंदा) नवीन घडविलेल्या भाडयावरील टेंकि गाफ, गुळगुळीत करण्याचें–मठारण्याचें हत्यार.

**अहंता**—स्त्री. १ अहंकार; मीपणा, अभिमान; गर्व 'थोर तो गव्हालीं पाहिजे अहंता । उपदेश घेतां सुख वाटे ।'–तुगा ३६३६. 'हलु हलु सडो अहंता गम्मनी वाढेलीं असी दोडी ।' –मोरोपंत 'पडणाचें वा अहंता नेणारो या तरीन का ममता ।' –मोवन २ ८२. २ स्वाभिमान (अभिमान शब्दांगांत दिलेले वाक्प्रचार आणि म्हणी येथेंहि लागतात) [सं]

**अहद तहद**—क्रिवि १ या टोंकापासून त्या टोंकापर्यंत, या हद्दीपासून त्या हद्दीपर्यंत 'हा गांव अहद तहद दोन कोस लांब आहे.' २ पासून-पर्यंत. 'अहद नर्मदा तहद चंजी चेंजावर.' –चित्रगुप्त १६१. 'अहद् पुणें तहद् काशी मारला पाऊस पडला.' 'अहद् दर्या तहद् सूर्य' अहत तहत असाहि शब्द लिहितात. [फा. अह्-हद्+ता-हद]

**अहदनामा**—पु. वचनपत्र, करारनामा. [अर. अहद्=वचन, करार+फा–नामा]

**अहद-पैमान**—पु करार; करारमदार. 'अहद-पैमान व्हावे ते सर्व स्वामीपाशीं आल्यावर अर्ज करितों.' –रा १.१५५. [अर. अहद्+फा. पैमान=करार]

**अहद-शर्त**—स्त्री. तह; करार; अट. 'यांस अहदशर्तीचे कागदपत्र देऊन रवाना केले.' –रा १९.८. [अर अहद=करार+फा. शर्त=अट]

**अहंदेहबुद्धि**—स्त्री. १ स्वत:च्या अस्तित्वाची कल्पना, जाणीव, भावना (त्यावरून). २ (तत्त्व.) मीपणा; अहंकार; पोकळ गर्व; ताठा; आढ्यता. 'दुर्धर अहंकार दशानन । अहंदेहबुद्धि लंकाभुवन ।'; 'जैसी अहंदेहबुद्धि सांडोन । योगी विचरे निर्जनीं ।'. –वि. ज्याला आढ्यता, मीपणा आहे असा; अहंदेही. [सं.]

**अहंदेही**—वि. ज्याला आढ्यता, मीपणा आहे असा; अहंदेहबुद्धि. [सं.]

**अहंपण-णा**—नपु. अहंता पहा. 'उगाळूनि अहंपण । सोऽहं काढिलें शुध्द चंदन ।' –एरुस्व १.६२. [सं अहं+पण]

**अहंपदार्थ**—पु (तत्त्व.) अहंपणाची मांडणी; मीपणाचें निश्चयात्मक कथन; आपल्या स्वतंत्रपणाची भावना. अहंता पहा [सं.]

**अहंपूर्विका**—स्त्री. १ प्रत्येक कार्यांत मी पुढें आहे अशी भावना ठेवून वागणें; आपलें घोडें पुढें दडपणें. २ लढाईत योद्धयांचें एकमेकांना अहंतापूर्वक आह्वान; हा मी पुढें झालों असें ईर्षेनें सांगणें, अहमहमिका (युध्दांत). [सं. अहं+पूर्व]

**अहफाद**—मुलीची संतति; अफलाद पहा 'व–औलाद व अहफाद चालविजे' –रा २०.१६१, १५.३६८. [अर. हफद=कन्या; हाफिद=नातू, वन्यावश, अर.]

**अहंबळ**—न अभिमान, अहंकार 'उदकीं दिसाटें जे मळ । तें स्वभावें करी निर्मळ । परी न धरी अहंबळ । जे म्यां शुद्ध केलें ।' –एभा ७ ४६२ [सं. अहं+बल]

**अहंबुद्धि**—स्त्री. अहंता, अभिमान, आपलेपणाची जाणीव. [सं अहम्+बुद्धि]

**अहंब्रह्मास्मि**—(मी ब्रह्म आहे हा मूळ अर्थ, यावरून ल.) मी काय तो श्रेष्ठ, सर्वांत मी मोठा असा अभिमान. 'अहं ब्रह्मास्मि ब्रह्मादमस्मि । येथींना अर्थ ब्रह्मचि मी ।' –विउ ७.७८, –दा ५.६.४४.

**अहंभाव, अहंमति, अहंमान**—पुस्त्रीपु अहंकार पहा १ अहंपणा, मानीपणा, मीपणा, दर्प, ताठा, गर्व 'अहंभाव ज्या मानवींचा विरेना' –राम १५९ –तुगा ७१ 'न पुसताचि व्यर्थ भ्रमति। अहंमति भुलोनिया' 'परी देहाहंमान भुली।' –ज्ञा १८ ३८१ २ (चुकीनें उपयोग) भाव, अभाव, कल्पना, तर्क, अनुमान, अटकळ

**अहंममता**—स्त्री १ मी व माझें अशी कल्पना, अहंभाव, अहंकार पहा २ स्वत बद्दल, स्वत च्या माणसाबद्दल, गोष्टीबद्दल, ममता–लोभ. 'अहंममतेनें जग बुडालें' 'तंवी अहंममता निगिटी। सुरचि तया।' –ज्ञा १८ ४०८ [स अहं+मम+ता]

**अहमहमिका**—स्त्री (मूळ अर्थ मी पुढें, मी समोर असें वागणें) स्पर्धा, चढाओढ, ईर्षा, अहंकार 'युरोपांतील राष्ट्रांमध्यें समुद्रापलीकडे मुलूख मिळविण्याची अहमहमिका सुरू झाली' –वस्व ३ [स अहम्+अहम्+इका]

**अहंमानी**—वि अहंकारी, अभिमानी [स अहंमान]

**अहर्गण**—पु १ (ज्यो) दिवसाचा समुदाय, इष्टकालिक ग्रहांचें गणित करविण्यासाठीं विवक्षित अवधीपासून गतदिवसांचा समुदाय ज्योतिषशास्त्रामध्यें अहर्गणाचा उपयोग मध्यमग्रहसाधन करण्याकरता होतो अहर्गणावरून मध्यम ग्रहसाधन करावयाचें म्हणजे करणापासून गेलेल्या वर्षसंख्येस ३६५ यांनीं गुणून आलेला गुणाकार यावरून व दिनगतीवरून मध्यमग्रहसाधन करता येतें २ यावरून पुष्कळ दिवसाचा काळ, बरेच दिवस 'अहर्गणाचे अहर्गण लोटले' [स अहन्, अहर्+गण]

**अहर्निश–शीं**—क्रिवि रात्रदिवस 'जे यत्नशील अहर्निशी' –ज्ञा ४ १०३ [स अहस्+निशा]

**अहर्बिंब**—न सूर्यबिंब, सूर्योदय 'तयें प्रात काळिं अहर्बिंब समईं सहपरिवारिं।' –पच ५ १० [स अहस्+बिंब]

**अहल**—न लोक –पश्र ५९ [अर अहल्]

**अहलकार**—पु कारकून 'साहेबानें फेज–वगैरेवरून लष्कर जाव पाठवावयाविषीं अहलकारास आज्ञा सादर जाली पाहिजे।' –पदमव ११० [फा अहल्+इ+कार]

**अहल्या**—स्त्री १ गौतमाची पांच पतिव्रतांपैकीं एक २ (ल) पतिव्रता स्त्री

**अहल्याबाई**—स्त्री १ मल्हारराव होळकराची सून ही मोठी साध्वी, सत्त्वशील व दानशूर होती २ (ल) दानशूर, सत्त्वशील स्त्री

**अहलुक**—पु भिक्षा मागताना गोसावी लोक जो शब्द म्हणतात तो, अलख, अलक्ष पहा [स अलक्ष्य]

**अहवाल**—पु कामाची केलेली नोंद–वृत्तांत–हकीकत (इ) रिपोर्ट–स्टेटमेंट [अर अह्वाल् हाल अव]

**अहसन**—वि उत्कृष्ट [अर अह्सन्]

**अहह**—उद्गा अरेरे, शोकाचा–खेदाचा उद्गार 'अहह दारुण तात तुझा पण'।' –सीस्व ५ 'मुनीच्या शापानें अहह सतिचा त्या प्रियपती।' –विवि (१८७२) अंक १ पृ १०. [ध्व तुल० इ अहा, आह्]

**अहळण**—अहाळण पहा 'प्रपचीं अहळण त्या सुज्ना।' दावि २३४

**अहळणें**—अहाळणें पहा 'तेवि अहाळली कोमलांगी।' –दावि २६१

**अहळवहळ**—आहाळवहाळ पहा

**अहळी**—स्त्री अग्नीची ज्वाळा, आग, तेज, उष्ण वारा, झळ, (सामा) अनेकवचनीं प्रयोग अहळींत असणें–भिउन चालणें–वागणें, धाकांत चालणें, अहाळणी. [म आहार=विस्तव, का हॊव्व कु–पु=तेज]

**अहळींव**—न एक वनस्पतीचे पौष्टिक बीं याचीं झाडें बागाईत जमीनींत होतात रंग तांबूस, बीं बारीक हें त्वचादोष, वायु व गुल्म यांचा नाश करणारें आहे अहळींवाचे लाडू पौष्टिक असल्या कारणानें बाळंतिणीस देतात [फा हाल्म, हिं व हालिम हारों, स अहालिव]

**अहा, अहाहा**—उद्गा आनंद, आश्चर्य, शोक, निंदा इत्यादींचा वाचक उद्गार 'नृपति बहु विलाप करी गृतांगि म्हणे, अहा ! कर्म घडलें।' –मोकर्ण ६ ३ 'अहा निपट धृष्ट मी।' –केका १६. 'अहाहा ! वारा यतांच बरें वाटलें' [ध्व]

**अहाई**—स्त्री (विप्र) अही पहा

**अहाकार**—पु १ हाहाकार, अहा, हाय असा शोक करणें, मोठ्यानें रडणें २ आक्रंदन, आक्रोश आकांत [स अहह+कृ]

**अहाच**—वि आहाच पहा १ वरवर, सरासरी, दिखाऊ २ सत्याचा आभास असणारा, मिथ्या, मायिक, व्यर्थ, सामान्य साधारण 'नामरूपात्मक प्रपंच। मिथ्या मायिकत्वें अहाच।' –एभा २८ ५८३ देखा समुद्र गंभीर एकिजे। वरुनाहि अहाच दखिजे।' ०वहाच–क्रिवि वरवर बाह्यात्कारी, उगीचच्याउगीच माझा भाव नाहीं निर्व्हारी। अहाचवाहाच भक्ति करीं।' –एभा १७ ११८ [म असत्य अ+साच, किंवा प्रा अहा=यथा+च, दे आहच=अतिशय बहुमार अहाच द्वि]

**अहाटणें**—उक्रि १ (शिजलेली डाळ वगैरे) पळी इत्यादिकानीं घाटणें २ (ल) त्रास देणें, छळणें, पिच्छा पुरवणें ३ (लाटणें लोटणें, रगडणें यांशीं समान अर्थानें) एकत्र गणणें, आत ढकलणें, एक करणें (अविचारानें व बलात्कारानें) 'राजा प्रधानास चोरामध्यें अहाटला [स आ+घट्=घाटणें]

**अहाटींव**—वि १ अहाटलेली–घाटलेली (डाळ) २ छळ केलेला, त्रास दिलेला

**अहाडून पहाडून**—क्रिवि आडून पाडून, घालून पाडून, टोंचून, टोमणा देऊन, वर्मी लागण्यासारखें औपरोधिकपणें, आहाडून पाहाडून पहा [आडून+पाडून]

**अहाणा**—पु १ उखाणा (लग्नांतील) २ कोडें ३ म्हण, उक्ति आहणा पहा [स आहनस्या, प्रा आहाण=उक्ति, वचन]

**अहादी**—पु माणूस, एकाडा शिपाई 'अहादीवर अहादी लाना केले ' —मराचि थोशा ६४ [अर अह्‌दी=एक]

**अहाय अहाय**—उद्गा अरे अरे, हाय, हाय (क्रि० करणें) [ध्व हाय]

**अहार**—आहार पहा

**अहार**—पु अजगर, आर [स अहि+आर]

**अहार**—पु १ निस्तर, निसारा, फुफाटा २ इस्ती करणें (क्रि० वर्णे) [म आहार=विस्तर, का होळकु-पु=तेज]

**अहारणें**—अक्रि अति अन्न खाल्ल्यामुळें सुस्त पडणें, जेवण अगावर येणें, सुस्ती येणें [स आहार=जेवण]

**अहारणें**—अक्रि १ निसरणें, बाहेर येणें, ओघळणें (रहाटाची माळ) २ खचणें, खालीं पडणें, आधार सुटणें (इमारत, लाग, जमीन) [स आ+हृ]

**अहारोळी**—स्त्री निखान्यावर भाजलेली पोळी, रामन्नी, गारोळी [अहार=विस्तव+पोळी]

**अहालकार**—अहल्कार पहा

**अहाली मवाली**—वि उच्चनीच, सर्व दर्जाचे (लोक) 'यावरी तमाम अहाली व मवाली परगणे मजकूर व गिर्दनवाही जमीनदार हर कोणी लहान थोर सागताती जे ' —वाड सनदा १४० [अर अह्‌ल=लोक]

**अहाळणी**—स्त्री १ उष्ण वान्यानीं भाजणें, पोळणें २ ताप दम, उगासा ३ (ल) उत्कंठा, लालसा, हाव, वासना (क्रि० दर्णे) [म अहार, का होळकु-पु=तेज] **अहाळणी, अहाळण्या कहाळण्या टाकणें**, द्वेषें-द्वेष राग इत्यादि मनोविकाराला ताव देणें दु खोद्गार, शोकोद्गार काढणें

**अहाळणें**—अक्रि १ सूर्याच्या, अग्नीच्या झळीनें भाजणें—पोळणें—होरपळणें २ नाश पावणें 'सेजार अहाळ अहाळलें दिव्य भोगाचें ।' —भाए ८९ ' वासानलें जीव महा अहाळे।' —साह्द १ ६ ३ अतिशय दु खित होणें—पीडणें 'अहाळिली अवनी क्षत्रियांची ।' —एभा ४ ७८३ [म अहार का होळकु-पु=तेज प्रा अहिऊल=जाळणें का हाळु=नाश]

**अहाळवाहाळ**—वि फार, बहुत, अत्यंत तो मी येथें अहाळवाहळीं ताप ।' —ज्ञा ११ ३५१ [स बहुल का बाहाळा बाहाळ द्वि]

**अहाळीव**—अहळींव पहा

**अहि**—पु सर्प ' पाहुनि अजातरिपुची तादृक् गुरुचरणभक्ति, महिरले । अहिवरलेखवराहुनि बहु कठिनहि यवन वीर गहिवरले ।' —मोभीष्म १ ११४ [स] **०नकुळ न्याय**—पु साप आणि मुगुस याच्यामधील जन्मजात वैराप्रमाणें वैर २ (ल) जन्मद्वेष, हाडवैर

**अहित**—न १ तोटा, नुकसान, हानि, अपाय, अकल्याण —पु २ शत्रु, वैरी, द्वेष करणारा 'करिता सारथि मस्तक-कोदंड-च्छेद पौरुषें अहितें ।' —मोभीष्म —वि १ अकल्याणकारक, नुकसानीचें २ शत्रुत्वाचें, वैराचें [स]

**अहिनी**—वि लोखंडी 'अहिनी, दगडी जिनस दारूचे अतर्गी ठेवावे ।' —मराभा ३५ [फा आहनीन्]

**अहिमही**—पु द्विवि १ हे दोन पाताळातील राक्षस अत्यंत पराक्रमी व बलाढ्य होते रामानें याना ठार मारिलें यावरून २ (ल) दोन जुळे वीर, जोडीचे पराक्रमी पुरुष 'पण मराठेशाहीची भदार या दोघा अहीमहीवर आहे ' —स्वप २१०

**अहिरण**—एरण पहा 'कीं अहिरणीं गुतता हिरा । हिरकणी काढी तया सत्वरा ।' —नव १८ १३४ [स अयस्+हन् तुल० ६ आयर्न]

**अहिरण-णी**—स्त्री गुराखीण, गवळण —वि अहिराणी पहा [स आभीर-अहीर]

**अहिरा, अहेरा**—पु १ डोळ्याचा एक रोग, बुबुळावर रक्ताप्रमाणें एक लाल ठिपका असतो तो यास अर्जुन असेंहि म्हणतात २ एक तावडा कठिण दगड, डोळ्यातील रोग बरा करण्यास हा अगठींत बसवून डोळ्याच्या बुबुळावरून फिरवितात याला अहिऱ्याचा खडा म्हणतात अगठींत बसविण्याकरिता तयार केलेल्या खड्यास अहिऱ्याचा मणी किंवा त्या अगठीस अहिऱ्याची मुद्रि असें म्हणतात [प्रा अहरी=जात्याचा दगड]

**अहिराणी**—स्त्री एक खानदेशातील भाषा ही मराठीची पोट भाषा म्हणून मानण्यात येतें हिच्यावर गुजरातीचा बराच परिणाम झालेला दिसतो [स आभीर-अहीर, एक राष्ट्र]

**अहिरी**—स्त्री १ लग्न-मुजींत वोहल्याभोवतीं उतरडी रचाया-करता उपयोगात आणतात तीं रंगीत गडवीं वही स्त्र० लोटा घडता यईना आणि अहिरीचा इसार 'सोन्याची अहिरी । मोत्याच कळम-त्यावरी । रगाचे परोपरी चारी । शोभा दिसतस अहिरी ।' —स्त्रीगीत ७७ 'बोलावा साळवी । अहिरी रगावी ।' —स्त्रीगीत ७७

**अहिरी**—स्त्री अहेर करण्यास योग्य वस्त्र अहराऊ पहा

**अहिर्णेसी अहर्निश-र्शी**—क्रिवि रात्रंदिवस, अहोरात्र राम ध्यावा अहिर्णेसी ।' —वेसीस्व १ १४ [स अहर्निश अप]

**अहिवा**—वि अविधवा, सुवासिनी, सवाष्ण स्त्री ' अहिवा नारी दुरवड्या करती ।' —वसा ३० [स अविधवा] **०नवमी**—स्त्री अविधवानवमी पहा

**अहिंसक, अहिंस्र**—वि हिंसा न करणारा, हत्या न करणारा, कोणास न मारणारा 'मित भाषण स्नान दान। अगीं असा नित्य अदभित्व। अहिंसक अतिविरक्त। तोचि गुरु करावा।' [स]

**अहिंसा**—स्त्री १ हिंसेचा अभाव, केवळ मासाकरता जीवाची हत्या न करणें असा कारणाकरता मनुनें हिंसा त्याज्य ठरविली आहे (मनु ५ ४३) शाकाहारमत २ कोणत्याहि प्राण्याला इजा, दुखापत न करणें, रक्तपात न करणें, हें जैनाचें आद्य तत्त्व आहे [स] ॰धर्म-पु प्राणिहत्या न करण्याचा धर्म 'अहिंसा परमो धर्म'

**अहिस्ता**—पु. नवज्यायामातील एक (हिंदी) हुकूम 'जाच कदमनें जात असता लवकर अडचण होईल असें काहीं असेल तर त्यातून सावकाश जाता यावें म्हणून हा हुकूम देतात, सावकाश चालावयाचें असेल तरीहि देतात' –सज्या २० (इ) स्टप् शॉर्ट –डिङ [फा आहिस्ता=सावकाश (अप) आस्ते]

**अही**—स्त्री १ विस्तवाची–पणीची धग, आग 'जठराग्नीची अही थोर।' –मुरु ४३३ २ उष्ण वारा, झळ, मृगजळ (अव) अह्या [स अहि=सूर्य]

**अहीमुखी**—वि ज्याचें तोंड सापासारखें आहे असा (घोडा)

**अहीर**—पु १ गवळी, गवळ्याची जात 'तिरे विषयवासना जरि शुका अहीराम भी।' –केका ५४ 'त्यामाजि बाध नृप भातु अहीर याची। निर्मूनि भक्ति दुहिता तिस फार याची' –मराधा ५. ७ आभिर–गवळी जात ही खानदेशात व निजामशाहींत पाट क्ते हें पूर्वी मोठें राष्ट्र असून यातील निरनिराळे धंदे करणाऱ्या लोकाच्या जातींना पूर्वी हें राष्ट्रनाम लावलेलें आढळतें जसें–अहीर सोनार, अहीर हलवाई [स अहीर, आभीर]

**अहीर**—पु १ अजगर, आग, अहार २ गाड्या पाण्यांतील एक सापासारखा मासा, हा काळा असून याच्या अगास चिकट बळ्य असतो [स अहि=साप]

**अहीरभैरव**—पु (संगीत) एक राग यात षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गधार, कोमल मध्यम, पचम, तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर यतात याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे वादी स्वर षड्ज व सवादी पचम गानसमय प्रात काळ हा एक भैरवप्रकार आहे [स]

**अहूर**—पु (को) नदीचा पूर अऊर, औरं पहा

**अहेतु, अहेतुक**—वि ज्याला हेतु–कारण नाहीं असें, विना कारण अकारण, निष्काम याच्या उलट सहेतुक 'अहेतुकें चित्तें। अनुग पा यतातें।' –ज्ञा ३ ९२ 'आमच्या देशातील सुशिक्षित वर्ग स्वभावत अहेतुक शत्रु बनला।' –टि ४ ४९९ [स]

**अहेदी**—ऐदी पहा

**अहेनवमी**—अविधवानवमी पहा

**अहेर**—पु लग्न, मुंज, गर्भाधान इत्यादि मंगल प्रसंगीं अथवा एखाद्याच्या सत्कारार्थ–अभिनंदनार्थ त्यास त्याचे इष्टमित्र, सो सोयरे, नातेवाईक याच्याकडून शेला, पागोटें वगैरे पोशाख, दागिना वगैरे जी देणगी मिळते ती (सामान) देणगी उपायन, बक्षिस 'तैसे यागाचेनि नावें। जग वाउनि हावें। नागविती आघवें। अहेराचारी॥' –ज्ञा १. ३८७ म्ह॰ अहेर चोळीचा आणि गजर वाजन्त्र्याचा=लहान कृत्यास गाजावाजा जास्त या अर्थी [स आ+ हृ=हरण, आहरण=भूषण, अलंकार, तुल॰ फा महर=स्त्रीधन]

**अहेरण**—ऐरण पहा 'हिरा ठेविता अहेरणीं। घाव मारिती जो घणीं।'

**अहेरण**—स्त्री सोनामुखीची एक जात, आयरण, ऐरण

**अहेरा**—अहिरा पहा

**अहेराऊ, अहेरी, अहीराऊ, अहीरी**—वि १ अहेर करण्याच्या उपयोगी–योग्य (वस्तु, अलंकार इ॰) २ टिकाऊ, पक्क्या रंगाचें नव्हे असें, कामचलाऊ, मामुली, दिखाऊ, [अहेर]

**अहेरावा**—(व) अहिरा (रोग) पहा 'डोळ्यांत अहेरावा पडला'

**अहेव**—स्त्री अविधवा, सौभाग्यवती–सुवासिनी स्त्री 'भरतरें वीण अहेव। जाण पा तो सर्व विन्टू।' –एभा १४ २५७ म्ह॰ अहेवचा मला खळायला गेला=नवरा असलेल्या बाईचा मुलगा मेला तर तो खळायला ऐयासारखाच असतो, कारण तिला दुसरा होण्याचा संभव असतो २ सौभाग्य, भाग्य 'अविधवेचें अहेवकाकण आज फुटलें।' –माए ८५ 'परंतु हे मम सुत सार्थकता हेंच मदीय अहेव।' –नक ४० [स अविधवा, प्रा अविहवा] ॰तंतु–पु. (काव्य) मंगळसूत्र, सौभाग्यसूत्र 'कृष्ण मनी अहेवतंतु। कीं धरिला न तुटतु।' –एरुस्व ७ ३६ ॰दोरा–पु १ मंगळसूत्र २ नेहमीं पाठीस लागलेली नोकरी, उद्योग–धंदा, नेहमीं टिकणारा, कायमचा दर्जा, मान, पदवी ॰नवमी–अविधवानवमी पहा ॰पण–न सभर्तृकत्व, पति जीवंत असण्याची स्थिति, सौभाग्य 'वदनचिया उतरिया। आपण्या पति कुळिहेर। उजारिले लेवविली वैसिया। अहेवपणें।' –ज्ञा ९६. ३७७ 'सौभाग्य नव्हानि अहेवपण। स्मीं मिरवीत निघाली।' –भवि ३ २४७ 'राखें मनस्य अहेवपणीं। प्राणेश्वरनें साडा मिया।' –गुच ७ ३४ 'अहेवपणीं हळद कुंकुमगुच्छित मरावें हीच इच्छा सर्व स्त्रियांची' –आवश्यक ९३ ॰मणि–पु मंगळसूत्र 'कीं अचय झाले रणीं। अहेवमणी।' –पला ४० १०१ ॰मरण–न सौभाग्यवती असता, पति जिवंत असता, सवाष्णपणीं आलेले मरण हें स्त्रिया फार प्रिय व मंगलदायक समजतात ॰सवाष्ण–स्त्री सौभाग्यवती स्त्री, सुवासिनी ॰मुयेय–वि पति जिवंत असताना मरण येत असलेली (स्त्री) [अहेव+ अनु+ई]

**अहो**—उद्गा कोणाला मोठ्या गौरवानें किंवा बहुवचनी सबों धून हाक मारावयाचा प्रयोग अशेचें अव काहीं शब्दापुढें यातील अचा लोप होतो, जसें–बायहो–काहो २ आकस्मिक आनद–आश्चर्य याचा उद्गार •**जाहो**–अ आदरपूर्वक बोलणें, हाक मारणें 'कोणी थोर आला असता त्यास अहोजाहो म्हणावें ' [ अहो+जा+अहो ]

**अहोदिवस**—क्रिवि सर्व दिवसभर, रात्रदिवस अहोरात्रशब्दावरून ( स अहन्=दिवस हा अर्थ न समजून ) केलेला चुकीचा प्रयोग 'अहोदिवस अहोरात्र शास्त्राचें अध्ययन केलें तरी तें जास्त जास्त गूढ वाटणार ' –नि ४६०

**अहोपी**—वि ( अहोदिन पान करणारा ) लोभी, आशाळ भूत, अधाशी [ स अह +पा ]

**अहोरातीं**—क्रिवि रात्रदिवस 'रातें अहोरातीं निज भक्ता ।' –एभा २० १३६, ' शेवा करी अहोरातीं ।' –मुआदि ३० ४७ [ स अहन्+रात्रि ]

**अहोरात्र**—पुन दिवस आणि रात्र, चोवीस तासाचा, तीस मुहूर्तांचा किंवा साठ घटकांचा दिवस पृथ्वीला आपल्या आसा भोंवतीं प्रदक्षिणा करण्यास जो काल लागतो तो कालावधि सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा काल 'का अहोरात्रींची गोंवी । आधलें नेणे ।' –ज्ञा १८ ७१८ –क्रिवि १ रात्रदिवस २ (चुकीनें) सर्व रात्रभर [स अहन्+रात्रि] •**वृत्त**–न सूर्याच्या दैनदिन गतीनें वर्तुळ–वृत्त, क्रांतिवृत्त, शुन्यासमानरवृत्त, ज्या वृत्ताची पातळी विषुवांशीं समांतर असून आकाशातील ताऱ्यांतून जाते तें वृत्त [ स ]

**अहोय**—उद्गा ( ग्रा ) यारे वा ! [ अहा ]

**अळ, अळई**—स्त्री कीड, अळि पहा

**अळई**—स्त्री एक झाड हें डोंगराळ प्रदेशात होतें, उची सुमारें पुरुषभर असून पानें, रासण्यासारखीं याला 'ओवी ' असें म्हणतात गार किंवा उठणू जिरण्यास याचा उपयोग करतात –वगु १ ३९

**अळंकरण, अळंकार, अळंकारणें, अळंकारिक, अळंकारी, अळंकृत**—अलंकरण, अलंकृत पहा

**अळका-अळंका**—वि १ पाठीमागें लागलेला, चापावलेला, चटावलेला, व्याम, धर घेतलेला उ० झोपेचा अळका झालेला भेळवा २ (ल) आसक्त, पैशाचा दास 'परि अळकिया आंग वरी होऊनि ठेला ।' –भाए ७१९ [ का अल्पि द का अळ करिसु=इच्छा करणें, म भाळ ] –**पेपण**–न आसक्ति आवड अळकुवा पहा

**अळकुरा**—वि (वऱ्हाडी धना) भातांचा एक प्रकार [ अळाट ]

**अळकुर्डा**—स्त्री अळ्याचा गठ्ठा, काडा किंवा मूठ [ अळं+कुर्डें=मूठ ]

**अळकुवा**—वि ( को ) आसक्त, गुग झालेला, अतिशय प्रेम करणारा, लपट, पाठीमागें लागणारा अळका पहा

**अळंग**—अलंग पहा

**अळग, अळंग**—अलग पहा

**अळगत**—अलगत पहा

**अळगावणें**—अक्रि १ व्यायला होणें, प्रसूति अवस्थेला येणें (गाय म्हैस वगैरे) २ अलगणें पहा [ स. अलग्न म अलग ]

**अळगु**—क्रिवि अलग, अळग, एकीकडे 'मी उलोंडी जाय अळगु । ' –भाए १४० [ स अलग्न म अलग ]

**अळंगें**—न गोणीच्या प्रत्येक आख्याच्या तोंडाला असणारा फासा, कडी, यातून गोणी आवळण्यासाठीं तडकणी ओंवून घेतलेली असते [ का अळ=जोडणें किंवा आळि=वर्तुळ ? ]

**अळंगें विळंगें**—न अव आळोखे पिळोखे, अळे पिळे, (क्रि० देणें ) [ स अलग्न+विलग्न का अलुगु=कापणें, हलणें ]

**अळंटळ-टाळं-टाळी**—न स्त्री १ चेंगटपणा, चुकारपणा, ढिलाई दिरंगाई, हेळसांड, हयगय, सुस्ती, सावकाशी, आळस, दुर्लक्ष. (क्रि०माडणें–लावणें–करणें) २ टाळाटाळ, चुकवाचुकव, टाळमटाळ, लांबणीवर टाकणें 'यानें कामाची अळंटळ मांडली ' ३ अनिश्चितता, शंकास्पद स्थिति, मोघमपणा 'त्याचें येण्याचें अळंटळ दिसतें ' –क्रिवि दिरंगाईनें, हयगयीनें [ स अल+तत्+अलं किंवा टाळ टाळणें द्वि ]

**अळण**—न १ हरभऱ्याचें पीठ पाण्यात शिजवून मसाला घालून कालवणाचा पदार्थ करतात तें, कालवण, पिठलें, ताक व हरभऱ्याचें पीठ लावून केलेली पातळ भाजी २ पातळ भाजी दाट होण्याकरिता तींत पीठ वगैरे घालतात तें, बेसन, आळण पहा [ का अळक=अर्धवट पातळ, म आ+स्यन ? ]

**अळणट**—वि थोडा अळणी [ स अ+लवण+ट प्रत्यय ]

**अळणी**—वि १ मीठ कमी असलेला, मीठ न घातलेला, मिळमिळीत २ कमी प्रतीचें, ज्यात सत्त्व, तन, जीव, पाणी, रस, रंग नाहीं असें (भाषण, सौंदर्य लेख शरीराची ठेवण, मुद्रा, चेहरा वगैरे) रसभरीत किंवा कडक नव्हे असें ( भाषण ) ३ ( मामा ) वचर म्ह० नावडतीचें मीठ अळणी [ स अ+लवण,प्रा अलोण, व आळणी ]

**अळणें**—अक्रि १ घ°, दाट करणें २ घ°, दाट होणें ( दूध, पाक ) ३ मुरून वाळून जाणें, दाड होणें, बारीक होणें, कृश होणें उपवास करून तो अगदींच अळला आहे ' ४ पर्यात येणें, यौवनावस्था येणें ५ आटणें, आळणें पहा [ का अळक=अर्धवट घट्ट पनाळ, म आ+स्यन ? ]

**अळना**—पु १ लांबपणून तयार केलेला तोरण इ. २ रानें निजविलेला कापूस [ स अलघक ]

**अळती**—स्त्री (कर्ना) माप [का अळि=मापणें, अळति=माप]

**अळंदें भळंदें**—न पोळा नामक सणात वापरण्यात येणारा रांजण-घागर [का अळिंगे=रांजण]

**अळपण-णें**—न १ बांधण्यासाठीं घेतलेली कोणतीहि वस्तु निरोधन करणारी वस्तु, बंद २ (ल) निर्बंध, नियमन, अडचण, मोडता (एखाद्या कामात) ३ (व) दोराच्या शेपटास गुंडाळलेली चिंधी [का अळपु स आवलन, म आवळणें याचा वर्णविपर्यास]

**अळपणें**—उक्रि जोरानें आवळून बांधणें, घट्ट करणें, भोंवताली वेष्टून बांधणें या क्रियापदाला, ज्या पदार्थानें बंधन करावयाचें त्या पदार्थाचा वाचक शब्द कर्म नसून जो पदार्थ बांधला जातो त्याचा वाचक शब्द कर्म असतो यासीं सपदक्रिया पद बांधणें उ० अळपून बांधणें

**अळपा**—पु. १ बांधण्याकरता घातलेला वेढा (क्रि० घालणें-घेणें-देणें) २ बांधण्याचें-वेटण्याचें साधन ३ घट्ट बांधणें-वेष्टणें (क्रि० घेणें-देणें)

**अळंप्रतीति**—स्त्री तृप्ति, पुरेपणा, अलंप्रतीति पहा 'तन्दि भोगिता आनंदावाप्ति। न पवनी अळप्रतीति।' -राम ४ १२२ [स अलं+प्रतीति]

**अळबळीत गळबळीत**—वि १ साधा, मनमिळाऊ, घळ घळीत, जुळतें, मिळतें घ्यावें अशा स्वभावाचा २ निष्कपट, अनुकूल प्रिय भाषण-बोलणारा [गळबळ द्वि]

**अळंबें-भें**—न एक वनस्पती, कुत्र्याचें मूत, भुइछत्री, याचे दोन प्रकार-गोडें व विषारी, यानें अमल चढतो, वाती होते जाती-चुडयें, चिनळें, गवतें कुवळें, करडी, तेलंगी, भुईफोड, भोगराळें हें शीत, मधुर, त्रिदोषकारक कफप्रद आहे [का अळिंबे]

**अळंरो, ओळंरो**—पु (गो) वाळवी, वाळिव

**अळमळीत अळमळीतगुळमळीत, अळमळीत गुळमुळीत**—वि १ मोघम, अनिश्चित (भाषण) २ मिळमिळीत कडक, स्पष्ट नसणारें ३ हयगयीचें, ढिलें कळकळीचें, टाळाटाळीचें, सुस्ताईचें (काम-कृत्य) [गुळमुळीत द्वि]

**अळमाळु**—अळुमाळु पहा 'तव अळमाळु रूपु नाढळे' -शिशु ४१

**अळमें, आळमें**—न (गो) अळवें पहा

**अळय**—अळवद पहा

**अळव**—अळू पहा

**अळवद**—स्त्री (शेती) नांगरलेली जमीन साफ करण्याचें हत्यार, साधन [का हलिवे स हल+वर्ती ?]

**अळवटण**—न स्वयपाकास लागणाऱ्या मसाला वगैरे जिनसांची पिशवी, पचपाळें

**अळवडी**—स्त्री अळवाची वडी, अळवाच्या पानास पीठ लावून तळून केलेली वडी [अळू+वडी]

**अळवण**—न १ पातळ पदार्थ-भाजी दाट होण्याकरता लावलेलें पीठ, अळण पहा २ दाट होणें घट्ट होणें, अमणें ३ (ल) उपास मुळें वाळणें, सुकून जाणें (क्रि० आटणें-घालणें-निघणें) [अळणें]

**अळवण**—स्त्री आळवण, आळविणें, गोंजारणी, समजूत [आळविणें]

**अळवणी**—वि अळणी 'स्वल्प स्वल्प अळवणी।' -गीता २ २१४१

**अळवर्णी**—अल्पवर्णी व अकाल्पवर्णी या दोन शब्दाबद्दल चुकीनें वापरतात

**अळवंत**—स्त्री बाळंत होत असताना मृत झालेली पिशाचरूपी स्त्री, बाळंत स्त्रीनें भूत, हडळ, जखीण [स बालवनी-बाळंत ?]

**अळविणें**—अळणें पहा

**अळविणें**—उक्रि १ समजूत घालणें, प्रार्थना करणें, प्रेमानें-लाडक्या शब्दानें वश करणें-मन वळविणें (देव, राजा, वल्लभ, वल्लभा यांचें), कुरवाळून गोंजारून, लाडीगोडीनें समजावणें (तान्ह्या मुलास वगैरे), शांत करणें, सान्त्वन करणें 'आता नाळवावें तुम्हीं मानें।' -ज्ञा २ ८२ 'सद्भावें अळवुनिया पंढरीराया। केली काया ब्रह्मरूप।' २ विनवणी करणें, मिनतवारी करणें ३ आरापणें, गायन करणें, मंजूळ स्वरानें, तालसुरावर गाणें (राग, गीत रागिणी, तान) ४ हाक मारणें, बोलावणें आळविणें पहा [स आलापन, प्रा आलावण]

**अळवी**—क्रिवि सन्मुख 'वीरें करिता चुकवी। न व्हावें दृष्टीचिए अळवी।' -ऋ ५० [प्रा अल्लिअ-समीप जाणें ?]

**अळवी**—स्त्री (कर्ना) धान्यरूपी कर्ज [का अळवी=जमीन धारण करण्यासंबंधीं करार]

**अळवीण**—अरु पहा

**अळव्यान**—वि (गो) करारबद्ध, करार केलेलें [का अळवी]

**अळशिकावणें**—क्रि (गा) लज्जा उत्पन्न करणें [अळशीक]

**अळशी, अळस, अळसी, अळसावणें, अळा, अळा चांधा, अळीकर, अळीपाळीनें**—आमध्ये पहा

**अळशी, अळसी**—स्त्री जवस (इ) लिन्सीड [स अतसी-अडसी प्रा अलसी का अगशी]

**अळशीक**—स्त्री (गा) १ लज्जा २ घाण, घाणजोगा ३ आळशीपणा अळशीकणो-वि घाणेरडा [स आलस्य]

**अळशी, अळाशी**—स्त्री एक पेंढी-जुडी बांधता येईल इतकें शेतात कापून वाळत ठेवलेलें पीक, मूठभर रास (सामा) कापून

वाळत ठेवलेलें पीक पाथरा व अळशी हीं एक नव्हत [ अळा, आग ]

**अळसंदा, अळसंदी**—पुस्त्री एकप्रकारचें कडधान्य, मोठी चवळी, चवळीची एक जात [ का अळसदी, गो अळसादो ]

**अळसिणी**—स्त्री आळशी स्त्री 'तेथें येती अळसिणी असे ।' –पच ४ १६ आळशी पहा

**अळापिळा**—पु मुरडा, अळसाविळसा, पिरगळा (अगाचा, पदराचा इ०) (क्रि० देणें) [ पिळा द्वि ]

**अळि**—पु भ्रमर, भुगा 'कल्हारीं बुबुदोत्पळीं अळि शर त्याळीं जळीं गुजती ।' [ स अलि ] ०**उळ**–पु भ्रमराचा समुदाय –एभा ५ ५५५ 'भक्त अळिउळ आलापवी स्वयें ।' [ स अलि कुल ]

**अळिका**—स्त्री अळी, कीड 'कीं अळिकेवरी द्विजराज ।' –राम २०८१ [ स अलीक=क्षुद्र अति ल्हान का आळि= वर्तुळ, वेटोळें म अळें ]

**अळिता**—अळता पहा 'रग पिळुनि अळिता जणु देति फेंतुनी ।' –मृ ४२

**अळी**—स्त्री १ धान्य इत्यादिकात बारीक तत्वाकार क्षुद्र जाव–कीडा उत्पन्न होतो तो, किड. [ स अलीक का आळि= वेटोळें ]

**अळी**—स्त्री वाळ, गल्ली, ल्हान रस्ता [ स आलि=रांग, ओळ ] ०**कर**–वि शेजारी, जवळचा ०**न वळीचा**–शेजारचा, आळीं तला नव्हे असा, लाबचा, दूरचा काहीं सबध नाहीं असा

**अळी**—स्त्री छद रग्गी, हट्ट [ का अलु=रडणें ] ०**कर**–वि. हट्टी, हट्टी

**अळी**—स्त्री अळें १ व ३ पहा

**अळीपिळी**—स्त्री १ (दोरीचा–वस्त्राचा) वळसा, वेढा अळापिळा पहा (क्रि० देणें–घालणें–खाणें–येणें–पडणें) [ पिळा द्वि ]

**अळीमिळी गुपचिळी**—स्त्री काहीं न बोलणें गप्प बसणें (ल्हान मुलांच्या खेळातील शपथ) 'यावेळीं अळीमिळीगुप चिळी हें वेदसूत्र आठवतें ना ? या वेळीं आधीं बोलेल त्यानें भाडीं घासावीं' –हाच मुलाचा बाप ०**घालणें**–न बोलण्याची शपथ घालणें, ताकीद करणें

**अळींव**—वि १ आटवलेला दाट केलेला (रस पातळ पदार्थ) २ प्रौढ झालेला वयात आलेला (मनुष्य देह) [ अळणें ]

**अळु**—वि किंचित्, थोडें 'नसे अळुहि प्रपच ल्हाची ।' –दावि ११८ [ स अणु ]

**अळुकी**—स्त्री आवड, भूक, प्रीति अळका पहा –वि भुकेलेला [ का अलुगु=प्रेम करणें ]

**अळुकैलें**—वि भुकेलेलें अळका, अलुका, आळुकणें पहा

**अळुमळु अळुमाळ, अळुमाळु**—वि क्रिवि १ (काव्य) थोडें थोडें, अल्प, किंचित् 'मुख माखिलेंसें अळुमळु' –कृष्णाची भुपाळी १८ 'मजही दर्शन दिधलें अळुमाळ । घातला कवळ मुखामाजीं' –ब ३० –अमृ २ ३०. 'हा आंतपुढी अळुमाळु ।' –ज्ञा ६ १७५ (विशेषत कृत्याविषयीं) क्षणभर, ल्हानसें, कमी 'अळुमाळु प्रकाश करी । तेतुलेंनेच उभारु धरी ।' 'म्हणुनि आता पुरों अळुमाळुसे । मग करू देवा टाकें जैसें ' २ परिपूर्ण, ओतप्रोत, विस्तारानें 'हाडाच्या अळुमाळ टोलति गळा माळा, कटीं कारळा ।' –आता १२ 'अगीं तारुण्य प्रबळ । शृगार केला अळुमाळ ।' –कथा १ ६ ५३ ३ हळु हळु ४ किंचित् दखील, अणुमात्र 'जैसें तीर्थ आणि जळ ॥ भिन्न नसेचि अळुमाळ ।' –भवि १२ ११६ [ स अणुमात्र ]

**अळू**—पु एक फळ झाड याचें फळ तपकिरी रगाचें असतें [ स आलु ]

**अळू**—न एक शाक भाजी, याच्या निरनिराळ्या जाती– राजाळू धावअळू काळेंअळू पानअळू, रुखअळू सुरूंअळू, रानअळू (तेरी) काळेंअळू उत्तम असून अग्निदीपक, रक्तपित्तीचा नाश करणारें, बलवृद्धिकारक आहे म्ह० अळवाची खाज अळवास ठाऊक=ज्याची चिंता त्यास ठाऊक **अळवाची देंठी**–स्त्री अळ वाच्या देंठ्याचें दह्यातील रायतें **अळूवडी**–स्त्री अळवाच्या पानाची तळून केलेली भाजी शिवाय गाठी, कोरडी भाजी, ताकाचें अळू इ० पदार्थ अळवाचे करतात **अळवावर अंचविणें**–उपकाराची जाणीव नसलेल्या माणसावर उपकार करणें (अळवाच्या पानावर पाणी टिकत नाहीं यावरून) **अळवावरचें पाणी**–(अळवाच्या पानावर पाणी ठरत नाहीं यावरून ल) क्षणभगुर, अशाश्वत, चचल, अस्थिर (लक्ष्मी–देह–वस्तु–मन इ०) [ स अलुक, गुज अळवी, अळू हिं आलु व घोपा ]

**अळें**—न १ वृक्षाच्या बुध्याशीं पाणी साचण्याकरिता केलेला खळगा माती चुना याचा चिखल–रद्दा करण्याकरिता केलेली सळी, भोंपळा पडवळ इत्यादींचीं बीजें रुजविण्याकरिता व पाणी ठरून राहण्याकरता केलेला मातीचा उचवटा **अळेंवाफे**–भोंपळा, दोडका इ० वेल लावण्यासाठीं केलेलें अळें वगैरे 'काय ? यदा अळेंवाफे काहीं लावलेस कीं नाहीं ?' २ बागीं, मिरच्या इ० यांचें खळींत एकेक लावलेलें रोप अशाच्या समुदायाला दड म्हणतात ३ एक कुळन इतर प्रातात डिफळा असा प्रचार आहे (नागरल्यानतर मातीनीं डिफळें फोडण्याचें साधन) [ स आलवाल तुल० का आळि=वर्तुळ ]

**अळें**—न किंमत, वजन, मापदर्शक दुय्यम परिमाणाच्यामागें प्रथम परिमाणाचा अभाव अगर त्यापासून भेद दर्शविणारें चिन्ह उ० २॥≈, २॥३, दोन रुपये तीन आणे ५॥३८८ पाच राडी, तीन मण आठ शेर ८३।४ सव्वातीन मण चार शेर

**अळेण, आळेण**—न (गो) अळण, तादुळाचें पीठ [अळणें]

**अळेदांडी, अळेपिळणें**—स्त्री न गाडीचा अगडा (जू आणि दांडीची दोरी) नीट पिरगाळून घट्ट आवळण्याकरिता ज्या लाकडाच्या दांडक्याचा उपयोग करतात तें [अळणें+दांडी-पिळणें]

**अळेपिळे, अळोके पिळोके, अळुके पिळुके**—पु अव **अळ्यापिळ्या**—स्त्री अव अळापिळा पहा 'अळेपिळे अगासीं देत। हिंडे क्षुधातृषापीडित।'

**अळेंरळें**—क्रिवि कसेंतरी, सावकाश, प्रयासानें, जरीनें, जुल मानें, जेमतेम, होय नाहीं करता, रखडत 'म्या अळेंवळें दोन घांस खाले' [वळें द्वि]

**अळांचो मळांचो, अळाचो पाळांचो**—लहान मुलांचा एक खेळ दोन मुलें एका मुलाला दोन्ही कानांनी धरून झोंके देतात तेव्हां हें गाणें म्हणतात [का अडुचु, अडुगु=हालणें स पर्यंक= प्रा पलिअक-पल्लख-पाल्लख-पाळणा द्वि]

**अळोणी**—अळवणी पहा

**अळ्य**—स्त्री (गो) १ अळें (गणितातील) २ शेत साफ करावयाची फळी [अळें]

**अक्ष**—पु १ फासा (सोंगट्या खेळण्याचा) उ० अक्षक्रीडा, अक्षकुशल २ (ल) द्यूत 'हे दुर्दशा वरी कीं धूर्ति असे कीं न अक्ष तृष्णेची'—मोसभा ५ ३२ ३ माळेंत घालण्याचा मणि, रुद्राक्ष

**अक्ष**—पु १ (ज्यो) दीर्घ वर्तुळाचा व्यास २ विशिष्ट स्थलाचें विषुववृत्तापासून अंतर, अक्षांश ३ (गणित) ज्या काटकोन त्रिकोणाच्या फिरण्यानें शंकु तयार होतो त्याच्या स्थिर राखिलेल्या बाजूला त्या शंकूचा अक्ष म्हणतात —महमा १२ [स लॅ इ ॲक्सिस ग्री ॲक्सॉन, जर्म अक्से, लिथो ॲस्सिस, फ्रेंच जिप्सी अकेस]

**अक्ष**—पु नेत्र, डोळा [स अक्षि]

**अक्ष**—न (गो) आरोप, जबाबदारी, खापर, अपेश अक्स पहा [अर अक्स्]

**अक्ष**—पु कपाळावर एकावर एक असे दोन भोंवरे असणारा घोडा

**अक्षई**—क्रिवि सर्वकाळ, नेहमीं वारंवार 'अक्षई पदाचें अधिष्ठान।'—वेसीस्व १९ [स अक्षय]

**अक्षक**—न १ (शारीर) गळसरीचें हाड, जत्रु २ (प्राणि) पक्ष्याच्या पंखातील हाडांतील कांब, मणिबंधास्थि [इं रेडियस]

**अक्षकर्ण**—पु (ज्यो) अक्षक्षेत्राची कर्णरेषा, पलकर्ण

**अक्षक्रीडा-अक्षद्यूत**—स्त्रीन फाशांनीं सागट्या खेळणें, पण लावून फाशांनीं सोंगट्या खेळणें, द्यूत [स]

**अक्षज्या**—स्त्री (ज्यो) अक्षांशाची ज्या, पलज्या [स]

**अक्षत**—स्त्री १ अभिमंत्रित केलेले किंवा अभिमंत्रित करण्यासाठीं घेतलेले तांदूळ, लग्न, मुंज इ० समारंभात प्रधानभूत व्यक्तींच्या डोक्यावर टाकण्याकरता देवतांच्या कपाळीं लावण्याकरता, किंवा लग्न, मुंज इ० चें आमंत्रण देण्याकरता घेतलेले तांदूळ २ लग्न-मुंज प्रसंगींच्या आमंत्रणाकरता मिरवणूक निघते ती (देवास आणि शिष्ट लोकांस अक्षत देण्यासाठीं) ३ कपाळीं लावलेल्या गंधात काळ्या रंगाचा जो टिकला लावतात तो किंवा तें गंध ४ (सामा) तांदूळ **वाप**-वाटाण्याच्या अक्षता लावणें=साफ नाकारणें, (वाटाणे वाटोळे असल्यामुळें कपाळास चिकटून रहात नाहींत म्हणून) **अक्षत काढणें-फिरविणें-निघणें**-समारंभाचें निमंत्रण करण्याकरतां मिरवणूक निघणें **अक्षत टाकणें**-१ एखाद्या घरावर अक्षत टाकून आतील लोक काय बोलतात तें ऐकणें हा एक शकुन पाहण्याचा प्रकार आहे २ (देवावर) पूजेकरता आव्हान केलेल्या देवतेचें विसर्जन करणें ३ एखाद्या गोष्टीवरील सत्त्व सोडून देणें ४ लग्नात वधूवरांवर तांदूळ टाकणें लग्न लावणें 'अक्षत टाकिली जैसी। मांदियेवरी।'—ज्ञा १८ ७२३ **अक्षत देणें**-विवाहादि समारंभास निमंत्रण करणें **अक्षत घेणें**-निमंत्रणाचा स्वीकार करणें **डोक्यावर अक्षत(ता)पडणें**-विवाह होणें **०टाकणें**-लग्न लावणें, करून देणें **तोंडावर अक्षत पडणें**-मनसोक्त,वाटेल तसें बोलणें **अक्षत भरणें**-दोंस भरणें 'अक्षत भरिली भाणा। दुजा ब्राह्मण मेहुणा। आला होता पाहुणा। स्नियस भूक।'—दा ३ ३ १० **अक्षत लावणें**-(घरास, चुलीस) घरांतील सर्व माणसांस, कुटुंबास भोजनास बोलावणें केल्यामुळें चूल न पेटविणें **अक्षत लावणें**-(वेशीस) गावभर-सर्व लोकांस आमंत्रण करणें **अक्षत लावणें**-१ भाकीत करणें २ गुंतून पडणें, प्रयुक्त होणें **अक्षत वाहणें**-(मूर्तीवर) अभिमंत्रित तांदूळ देवावर टाकणें-वाहणें म्ह० या या माझ्या कपाळाच्या अक्षता पहा=दुसऱ्याला विनाकारण हाक मारणाऱ्या किंवा बोलावणाऱ्या मनुष्याबद्दल रागानें म्हणतात **वरती अक्षता, मध्यें गोपीचंदन खालीं रक्षा** (अंगारा)-तोंडाशीं हिरवा मध्यें गोपीचंदनासारखा मऊ व तळाशीं रक्षा झालेला असा भात, चांगला न शिजलेल्या भाताचें विनोदप्रचुर खुबीदार वर्णन वैष्णवीभात पहा —वि १ अभंग, इजा न झालेला, शाबूत, धडधाकट, सबंध 'अक्षतधनु तोंवरि हें वीरशिरोरत्न गावरायाचें'—मोद्रोण ३ १२१ २ पतिसमागम न झालेली (स्त्री) तीन पुनर्भूंपैकीं पुनर्भू पहा अनुपभुक्त स्त्री [स अ+क्षत]

**अक्षतमरिष्ट**—क्रिवि अडथळा न येता, अप्रतिहत, अव्याहत, सतत, विघ्न न येतां, विन हरकत 'आमची वृत्ति पाचशें वर्षें

अक्षतमरिष्ट चालत आली आहे ' 'तुमची संपत्ति अक्षतमरिष्ट असो '[स अक्षत+अरिष्ट 'अक्षतमरिष्ट चास्तु' या ब्राह्मणपूजन विषयक मंत्रावरून']

**अक्षतय**—स्त्री (गो) अक्षयतृतीया

**अक्षतयोनी**—वि १ पुरुषाशी संग न घडलेली, अनुपभुक्त (स्त्री), बालविधवा, कुमारी, अविद्धयोनि [स]

**अक्षता**—अक्षत पहा

**अक्षतारोपण**—न वधूवरे वाधिलीं गेल्यावर वधूवरानें आयुष्य वाढविण्याच्या उद्देशानें वधूवरांनीं एकमेकाच्या डोक्यावर अक्षता टाकण्याचा विधि [स]

**अक्षतिज**—स्त्री अक्षय तृतीया 'नवरीचे टाकले चेंगुर। चाऊ बदलून गाती टीर। घरोघरीं वाजविती ढोर। जशी अक्षतिजेची गोर।' –पग्र १५

**अक्षतृतीया**—अक्षयतृतीया पहा.

**अक्षतेचें खोड**—न काठें गध लावण्याकरिता उगाळावयाचें लाकूड, टेंभुर्णीचा नार, काळया टाकळीचें मूळ

**अक्षभा**—स्त्री (ज्यो) पलभा पहा

**अक्षम**—वि १ उतावीळ, असहनशील २ मत्सरी, हेवखोर ३ कुनशी, दया न करणारा [अ+क्षमा]

**अक्षम**—वि. पगू, दुर्बळ, असमर्थ, अशक्त, व्यग असणारा, (आधळा, लुला, इ०) 'अक्षमें आणि सन्यासिलें। का निरिंधन आणि विझालें।'–ज्ञा १३ २७९ 'क्रोधें धरिलिया अक्षमा। अक्षम होती साधनें।' –मुआदि ७ ९८ [स अ+क्षम]

**अक्षमा**—स्त्री १ उतावीळपणा असहनशीलता, अविवेक, अधीरपणा २ क्षमेचा अभाव, क्षमा न करणें ३ मत्सर, हेवा [अ+क्षमा]

**अक्षमाला**—स्त्री रुद्राक्षाची माळ, मण्याची माळ, जपमाळ

**अक्षमी**—वि १ क्षमेस अयोग्य २ असमर्थ 'देवि गति लाहिजे अक्षमी।' –रु ७ [स]

**अक्षय, अक्षय्य**—वि १ अविनाशी, अनश्वर, नाश न पावणारा, न्हास न पावणारा, नित्य, शाश्वत क्षय पावती इद्र चद्र। कृष्ण नरेंद्र अक्षयी।' –एरुस्व १ ७८ २ कधीं न सरणारा कमी न होणारा, निरतर असणारा उ० अक्षय भाता=नेहमीं बाणानीं भरलेला असा भाता ' मार्गे धनुष्य। अक्षयभाते विशेष। वरद शस्त्रें अपारीं।' ३ (व्याप) नित्य नेहमीचें, निरतर 'आमचें राहणें ह्या गावात अक्षय असतें तर घर बाधलें असतें ' –पु क्षयाचा अभाव, अविनाशित्व [स अ+क्षय]

**अक्षयतृतीया**—स्त्री वैशाख शुद्ध तृतीया कृतयुगाचा आरभ दिवस ह्या दिवशीं केलेल्या जप, होम, तपण दान वगैरेंचें फल अक्षय मिळणारें असतें [स]

**अक्षयत्व**—न अविनाशित्व, अमरत्व 'जेणें जोडे जीविता। अक्षय्यत्व।' –ज्ञा १८ ९४६ [स]

**अक्षयवट**—पु प्रयाग (अलाहाबाद) येथें गगा व यमुना याच्या सगमाजवळ असलेला एक वटवृक्ष हा फार प्राचीन असून कधीं मरत (वठत) नाहीं असें सागतात अशा नावाचे वृक्ष इतर क्षेत्रा कुनहि दाखवितात

**अक्षयवाण**—न दीर्घायुष्य व समृद्धि प्राप्त होण्याकरिता सुवासिनी स्त्रिया ब्राह्मणाना जें वायन (नारळ, वस्त्र, तादूळ इ०) देतात तें 'अक्षय वाणें घेऊनि। धावती नगरीच्या गौळिणी।' –ह ८ ३१ [स अक्षय+उपायन–वायन–वाण]

**अक्षयवीट**—स्त्री विठोबाच्या पायाखालची वीट 'अक्षय वीट चरणतळवटीं।' –विठ्ठलाची भूपाळी २४

**अक्षयसुख**—न चिरकाल सुख, ब्रह्मानंद, ब्रह्मसुख [स]

**अक्षयीं**—क्रिवि १ नेहमीं, सतत, सदासर्वकाळ, कधीं न चुकता, कधीं न टळता २ सबध, अशेषत, सर्वचच्या सबध, यच्चयावत ३ (निषेधार्थी) मुळींच, अगदीं [स अक्षय]

**अक्षय्य**—अक्षय पहा उ० अक्षय्यतृतीया, अक्षय्यत्व, अक्षय्यवट [स]

**अक्षर**—न १ वर्णमालेतील वर्ण किंवा मातृका २ ज्याचा पूर्ण उच्चार होतो असे वर्ण, शब्दावयव (इ) सिलेबल. ३ (ल) विद्या, विद्वत्ता, अध्ययनसंपत्ति 'अक्षर नाहीं चातुर्य नाहीं मग प्रतिष्ठा कशानें होईल ' ४ ब्रह्म 'मग वेदातें परापर। प्रसवतसे अक्षर।' –ज्ञा ३ १३६ ५ अव्यक्त प्रकृति –गीर;१५८ ६ ऐक्य (पन, वस्तएकज) –वि अविनाशी, नाशरहित, शाश्वत, अव्यय, कूटस्थ, अव्यक्त 'अक्षयो मी अक्षर।' –ज्ञा १८ ११९३, 'सर्वे भूतें क्षर म्हणती। अक्षर कूटस्थ बोलिजे।' –ज्ञा १० १० ४५ [अ+क्षर] **०ओळख**–स्त्री १ अक्षराची, मुळाक्षराची ओळख ज्ञान २(ल) लिहिता–वाचता येणें **०जीवी** (अक्षरोपजीवी)–वि १ लिखेवर उपजीविका करणारा २ लेखक किंवा कारकून **०न्यास**–पु अक्षराची माडणी शुद्धलेखन शब्दातील प्रत्येक अक्षर स्पष्ट माडणें **०पद्धति**–स्त्री शब्दातील अक्षराची रचना, अक्षरन्यास **०परिभाषा**–१ लिहिण्याची धाटणी २ विशिष्ट अक्षराना विशिष्ट किंमत देऊन लिहिण्याची पद्धति **०माला**–स्त्री वर्णमाला **०मुष्टिका कथन**–न मनातील अक्षरें सागणें, मुठीमध्यें कोणता पदार्थ आहे हें सागणें **०वटिका**–स्त्री १ स्पष्ट वर्णोच्चार, शब्दाचा शुद्ध व स्पष्ट उच्चार करण्याची पद्धति २ अक्षराचें वळण [अक्षर+वर्तिका] **अक्षरश**, **अक्षरागणिक**–क्रिवि 'प्रत्येक अक्षर घेऊन, प्रत्येक अक्षराचा उपयोग करून 'या कूट श्लोकाचा अर्थ मला अक्षरश लागत नाहीं ' **०शत्रु ०शून्य**–वि अशिक्षित, निरक्षर,

अत्र, मूर्ख 'एखादा अक्षरशत्रु हमाल असो किंवा कवींचा कवि असो दोघांचाहि श्रीगणेशा एकच' —एकच्याला

**अक्षरारंभ**—पु शुभमुहूर्तावर लहान मुलांस मूळाक्षरें शिकवि ण्याचा आरंभ, विद्यारंभ [सं]

**अक्षरी**—वि १ अक्षरासंबंधी २ अक्षरांनीं लिहिलेली (संख्या) ३ यार, नक्षत्र इत्यादिकांचे ज्ञापक अंक न घालता त्यांचीं आद्याक्षरें घालून केलेलें (पंचांग) [सं अक्षर]

**अक्षरेषा**—स्त्री (गणित) समीकरणरेखनातील मूळ रेषा, निर्णयरेषा, मापनरेषा (इं) ॲक्सिस

**अक्षवण-वाण, अक्षवाणी**—नस्त्री १ मंगलप्रसंगीं पुष्कळ वाती लावलेला दीप (परचा यजमान किंवा देवता यांच्या भोंवतीं) ओवाळतात तें, सकटें, अरिष्टें नाहींशीं करण्याचा हा विधि आहे 'कौसल्यात्मजा रघुवीरा। अक्षवाणें केलीं' —वेसीस्व ८ ६ 'राया जनकाच्या वन्हाडिणी। रामा केली अक्षवाणी।'—वेसीस्व ९ ३२ २ मूल वगैरेस न्हाऊ घालताना अंगावरील पाणी ओवाळतात तें, औक्षण, अरिष्टें टाळण्याचा आणि दीर्घायुष्य चिंतण्याचा यांत हेतु असतो [सं आयुष्यवान, म औक्षण]

**अक्षवलन**—न (ज्यो) क्रांतिवृत्तीय स्थानावरून ध्रुव व समबिंदु यावर जाणाऱ्या चापामधील कोन [सं]

**अक्षविचलन**—न (ज्यो) अक्षाकृति पृथ्वीवरील चंद्र सूर्यांच्या विषम आकर्षणामुळें खगोलीय ध्रुवाचें त्याच्या मध्यम स्थितीसभोंवतीं जें भ्रमण होतें तें [सं]

**अक्षविक्षेप**—पु फासे टाकणें, द्यूत खेळणें, अक्षक्रीडा [सं]

**अक्षवृत्त**—न विषुववृत्ताशीं समांतर वृत्त, ह्यावरून आपणास एखाद्या स्थलाचे अक्षांश समजतात अक्षांशवृत्त, (इं) पॅरलल ऑफ लॅटिट्यूड [सं]

**अक्षसूत्र**—न रुद्राक्षाची माळ —एभा २३ ५२०

**अक्षहृदय**—न द्यूतक्रीडाज्ञान, फाशांचें अंतरंगज्ञान [सं]

**अक्षक्षेत्र**—न (ज्यो) ज्यातील एक कोन अक्षांशतुल्य आहे असा काटकोनत्रिकोण

**अक्षांति**—स्त्री १ उतावीळपणा, असहनशीलता, असहिष्णुता, अक्षमा २ दुसऱ्याच्या विजयाचा, वैभवाचा, वर्चस्वाचा मत्सर हेवा, असूया [सं]

**अक्षारलवण**—न १ सूतकांत किंवा व्रतस्थवर्ली खावयाचें अन्न (मीठ वगैरे शिवाय–अळणी), जसें गाईचें दूध तूप, तांदूळ इ० असें (अळणी) अन्न खावयाचें एक व्रत [सं अ+क्षार+लवण]

**अक्षांश**—पु (ज्यो) दोन्हीं ध्रुवांपासून ९० अंश अंतरा वर काढलेलें जें भूविषुववृत्त, त्यापासून खस्थळापर्यंत जें गोलीय लंबाचें भागात्मक अंतर तें, विशेषतःयाशीं ओळख्याचा (किंवा भूमि ज्येचा) विषुवाशीं जो कोन होतो त्याचा अंश (इं) लॅटिट्यूड ०वृत्त—न भू विषुववृत्ताशीं समांतर असीं, त्याच्या दक्षिणेस व उत्तरेस काढलेलीं वर्तुळें [सं]

**अक्षि**—पु नेत्र, डोळा सामासशब्द–अक्षिगोचर, अक्षिमी लन, अक्षिपात, अक्ष्युन्मीलन [सं अक्षि, लॅ ओक्यूलस् ग्री ओक्कोस, इं अक्षि]

**अक्षिकूटक, अक्षगोल-क**—पु डोळ्याचें बुबुळ [सं]

**अक्षिकोश**—पु डोळे ज्यांत बसविले आहेत तो खोल भाग, डोळ्याची खाच [सं]

**अक्षितारा**—स्त्री डोळ्याची बाहुली [सं]

**अक्षिपटल**—न डोळ्यावरील कातडें–आवरण [सं]

**अक्षिव**—न समुद्राच्या पाण्यापासून झालेलें मीठ. [सं]

**अक्षी**—क्रिवि अक्षीं पहा 'अक्षी लई छान!'

**अक्षीयक्षीच्या वाती**—स्त्री (कर्ना) एक प्रकारचें व्रत, ज्या स्त्रीला भावंडें असतात ती तुलसीविवाहाच्या दिवशीं वाती करून देवापुढें लावते [अक्षय]

**अक्षीर, अक्षीर**—वि. (गो) भरदं [अ+क्षिरणें] •

**अक्षुण्ण**—वि १ इजा न झालेला, अखंड, न भिजलेला न वापरलेला २ (ल) अस्पृष्ट, अक्षत, अपुरस्त, विलवट्टिवाटीचा ०मार्ग–पु १ न वापरलेला रस्ता २ थोडासा केलेला अभ्यास, थोडीशी पडलेली एखादी विद्या [सं]

**अक्षे**—अक्षय पहा [अक्षय अप]

**अक्षेप**—पु (प्र) आक्षेप संशययुक्त पृच्छा, शंका, हरकत

**अक्षैं**—अक्षयी पहा 'ऐसा जो विरळा संत। अवघ्या वेगळें मत। अक्षैं त्याचें।'—दा '१ १ ३८ [अक्षय अप]

**अक्षो**—स्त्री (गो) तागाचें बीं, सणबिया

**अक्षोट-ड**—अक्रोड–ड पहा [सं अक्षोट]

**अक्षोभ**—वि १ फार खोल, ज्याचा अंत–ठाव नाहीं असें, अगाध, अथांग (पाणी) 'वरी उदकामी नाहीं अंतपार। अक्षोभ सागर भरलासे॥'—तुगा ५१ २ स्थिर शांत खळबळ नसणारें 'तेंचि निर्वैर का अक्षोभ जळ।'—एभा २१ ११९ [सं अ+क्षुभ्]

**अक्षोभनरक**—पु या नावाचा एक अत्यंत खोल नरक [सं]

**अक्षोभ्य**—वि अक्षोभ क्षुब्ध न करता येण्यासारखा, खव ळता न येण्यासारखा, शांत, सौम्य गंभीर, न रागावणारा (स्वभाव खोल पाणी) [सं]

**अक्षौणी, अक्षौहिणी**—स्त्री १ गज २१८७०, रथ २१८७०, घोडे ६५६१०, पायदळ १०९३५० इतकें मिळून होणारें सैन्य 'आंगवणा करावेशी सोंचणी। वेढिलिया वत्तीस अक्षौणी।' —शिशु १०३५ 'तीन कोटि म्लेंछ त्याचे। तेवीस अक्षौहिणी

दळ मागचाने।' -ह २२.१४०. २ पुरावर एकवीस दुर्वे दिली असतां श्री गणेश होते ती. [सं.]

अज्ञपण—न. मोयाळेणें, अज्ञपण पद्म.

अज्ञ—वि. अजाण; दिया नसलेला, मूर्ख. [सं.]

अज्ञात—वि. १ माहीत नसलेला. २ (क.) अजाण; अज्ञ. ३ जो कोणाला माहीत झाला नाहीं असा (परमेश्वर). 'अज्ञातानें पाडुनि दिशडी धर्ने ती सुवर्णरें।' -विवि. डिसेंबर १९२२. ॰पातक, ॰पाप-न. अज्ञानामुळें किंवा नकळत घडलेलें पाप. ॰पूर्व-वि. १ पूर्वी माहीत नसलेला, पूर्वी न घडलेला. २ अगदीं नवीन; विलक्षण, अपूर्व. ॰यौवना-स्त्री. अजाण; अल्प; वयांत न आलेली कुमारी; बालिका; तारुण्य (विकार) प्राप्त न झालेली स्त्री. ॰वास-पु. गुप्तपणानें, एकांतांत राहणें; कोणाला उमगूं न देतां राहणें; दूर राहणें. ॰हत्या-स्त्री. न कळत-अजाणतेपणीं झालेला खून, हत्या. [सं. अ+ज्ञा=जाणणें]

अज्ञातता—स्त्री. अज्ञान; अविदित भाव. [सं.]

अज्ञान—न. १ ज्ञानाचा अभाव; अजाणतेपणा 'नेणें नीत तो अज्ञान।' -रा ११.१.३४. २ निरक्षरता, अशिक्षितता. ३ मोह; भ्रमात्मक ज्ञान. 'सर्पविषयक भ्रमाचें रज्जुविषयक अज्ञान कारण' 'मी करतों, मी लोकांचें चालवितों इत्यादि अज्ञानामुळें जीव मानतात. वस्तुतः पाहिलें असतां ईश्वर करतो-चालवितो.' ४ तालम्यबुद्धीचा अभाव; असमंजसपणा; समज नसणें. 'पाषाणादि जड पदार्थी अज्ञान राहतें.' ५ मूर्खपणा; अप्रबुद्धता; जडत्व. ६ जीवाच्या गात अवस्थांतील पहिली अवस्था. -वि. १ अज्ञानी; ज्ञान नसलेला; न शिकलेला; अजाण; जड; मंद. 'कृष्ण.-प्रणावतसें, किती अज्ञान आहेस!' -पारिभौ १७. २ (कायदा) (अ) विवाह, आदत्त, घटस्फोट या बाबतींत सोळा वर्षें पुरीं होण्यापूर्वी अज्ञान; (आ) इतर बाबतींत अठरा वर्षे पुरीं होण्यापूर्वी-अज्ञान. (इ) कोर्टानें पालक नेमला असल्यास एकवीस वर्षे पुरीं होईपर्यंत अज्ञान. (ई.) मायनर. [सं.] ॰गत-स्त्री. भांबावलेली स्थिति; मोहाची-चित्तविकल्याची अवस्था. 'ते वेळेस मला अज्ञानगत झाली.' ॰जन-पु निरक्षर मनुष्य; अविचारी, अज्ञ, जड मनुष्य. ॰तिमिर-पु अज्ञानांधकार; गाढ अज्ञान ॰धन-न (कायदा) वयांत न आलेल्या मनुष्याची किंवा वेड्या मनुष्याची संपत्ति, मालमत्ता. ॰पटल-पडळ-न. (काव्य) आध्यात्मिक अज्ञान, आध्यात्मिक ज्ञानाचा अभाव, ब्रह्म, माया इत्यादिकांच्या संबंधीं वास्तविक ज्ञान नसणें. 'तुटें अज्ञान पटल विरालें। तुज झाली दिव्य दृष्टि।' ॰पालक-पु (कायदा) वयांत न आलेल्या मनुष्याच्या मालमत्तेची व्यवस्था पाहणारा किंवा त्याची काळजी वाहणारा. (इं) गार्डियन ॰प्राणी-पु बुद्धिहीन प्राणी, विचार-विवेक नसलेला प्राणी; पशु ॰बुद्धि-स्त्री. १ विवेकहीन किंवा मूर्खपणाची समजूत, कल्पना, मत. 'हें तूं म्हणसी अज्ञानबुद्धीनें.' २ मूर्खपणा; बुद्धिहीनता. -वि. मूर्ख; बुद्धिहीन; भोळा; बालक. ॰भुररें-भुरळ-(काव्य) अज्ञानाचा मोह; भ्रम. 'जें फिटे अज्ञान भुररें' ॰सिद्ध-वि. १ अज्ञानामुळें निर्मित झालेलें, बनलेलें (मत-कल्पना). २ अज्ञानामुळें निर्मित-प्राप्त होणारें; मूर्खपणापासून अवश्य मिळणारें (फल-दिशा). ३ अज्ञानी लोकांमध्ये निश्चित माहीत असलेलें. 'तापावर दूध प्यायलें असतां विकार होतो हें अज्ञानसिद्ध.'

अज्ञानी—वि. अज्ञाणी; अजाण; न शिकलेला; ज्ञानी नव्हे तो; अज्ञ. [सं.]

अज्ञाव—स्त्री. (गो.) अवज्ञा. 'अज्ञाव केली बरी न्हे.' [सं. अवज्ञा वर्णविपर्यय]

अज्ञेय—वि. विचारशक्तीच्या पलीकडील; बुद्धीस अगम्य; अलक्ष्य. [सं.]

अज्ञेयवाद—पु. (तत्व.) (इं.) ॲग्नॉस्टिसिझम; आपणांस जें वास्तविक ज्ञान होतें तें इंद्रियास गोचर होणाऱ्या वस्तूंचेंच होतें. ईश्वर, अमरत्व या गोष्टी इंद्रियांच्या म्हणजे प्रत्यक्षाच्या कक्षेपलीकडील असल्यानें त्यांसंबंधी निश्चित असें कांहीं मत स्थापणें अशक्य आहे असा वाद; मत. -ज्ञानो (अ) ६९४. अज्ञेयवादी-वि. अज्ञेय (वाद) मतानुयायी. 'तो नास्तिक नाहीं आहे, तो स्पेन्सरप्रमाणें आणि मास्त्यांप्रमाणें अज्ञेयवादी आहे.' -सुदे १०८

अज्ञी—पु. (पुरीचें रूप) अग्नि. 'करोति पारोळी अज्नी। आहरसिद्ध।' -दावि ३४७.

---

# आ

आ—१ वर्णमालेंतील दुसरें अक्षर. याचा अक्षरविकास साधारण अ सारखाच झाला आहे. २ संस्कृत शब्दाच्या मागें जेव्हां हें अक्षर उपसर्ग म्हणून लागतें तेव्हां त्याचे पुढील अर्थ होतात-(अ) लघुता; अल्पता, कमीपणा उ० ओष्णम्=कोंवट (उष्णम्=कढत, ओष्णम्=किंचित् उष्ण-कोंवट) (आ) व्याप्ति, प्रसार; वाढ उ० आभोग=समृद्धि, पूर्णता. (भोग=सुख, आभोग=अधिक भोग, भोगाची वाढ). (इ) उपक्रमाची मर्यादा (अमुकपासून) उ० आसमुद्रात=समुद्रापासून, आजन्मन =जन्मापासून. (ई) अवसानमर्यादा; शेवटची, अंताची मर्यादा (अमुकपर्यंत, पावेतों) उ० आफलोदय=फलप्राप्ति होईपर्यंत; आजानु=गुडघ्यापर्यंत, आकर्ण, आमरण=मृत्यूपर्यंत (उ) अंतर्भूत व समाविष्ट मर्यादा. उ० आक्रमण (क्रम्=जाणें, चालणें, पाऊल टाकणें)=व्यापून टाकणें, आसकलात् ब्रह्म=ब्रह्म वस्तुमात्र व्यापून आहे. (आ+सकल=सर्व). (ऊ) अतिरिक्त; अकारण, वाजवीपेक्षां अधिक;

आई—स्त्री १ जननी, माता 'आई वदे ना न मार्गी सरट' —दावि १६० २ जगदंबा, देवी, देवींच्या नावापुढें लावावयाचें उपपद, जसें—तुकाई, मरीआई, काळूबाई ३ (सांकेतिक) वारकरी पंथातील लोक ज्ञानेश्वरीस म्हणतात ४ (सामा) देवी 'आईच नवस नाहीं पुरविला' —दावि ३४७ ५ देवी (रोग), फोडया ६ ल्हान मुलाला लडिवाळपणें संबोधितात [स आर्या, किंवा अंबि? स आदि? प्रा आइ?] शिवाय अइ पहा म्ह० १ आईचें दूध की गायीचें दूध=दान समान गाईपेक्षां सरसनिरस ठरविता येत नाहीं अशा वेळीं योजतात यासारखीच दुसरी म्हण—आई गोड की साई गोड २ आईजीच्या दोंदावर (जिवावर) बाईजी उदार=दुसऱ्याच्या मालमत्तेवर उदारपणा दाखविणें आयती चैन करणें ३ आई जेवू घालीना, बाप भीक मागू देईना=दोन सवतें आर्गी असता किंवा दान परस्परविरुद्ध मताच्या अधिकाऱ्याची मर्जी संभाळावयाची असता योजतात (इकडे आड तिकडे विहीर याप्रमाणें) ४ एका आईचीं लेंकरें=बंधुभाव दाखविण्या करिता योजतात ५ ल्हानपणीं आई आई, थोरपणीं बाय लावाई=ल्हानपणीं आईची आठवण वारंवार होते पण प्रौढपणीं स्त्रीमुळें विसर पडतो ६ आई मेल्यावर बाप मावसा (निष्काळजी) होतो ०आंग—न आईपणा—मायपणा ज्या अंगापासून येतो तें अंग, स्त्रीचें किंवा प्राण्यातील मादीचें जननेंद्रिय, व आतील गर्भा शयाचा भाग, गुह्यांग 'थाळत हातांना तिला त्रास झाला, आईअंग बाहेर आलें' [आई+अंग] ०काळी—स्त्री शेतजमीन ही आई सारखी पोषक असते म्हणून आदरार्थी —गावगाडा [आई+काळी =शेतजमीन] ०पाढर स्त्री गावठाण, गावच्या जमिनींत वसतो ती जमीन, ही शेताच्या निरुपयोगी म्हणजे साधारण पडणाऱ्या रानाची असते [आई+पांढरी] ०पोरका—वि आईवाचून उघडा पड लेला, ज्याची आई मेली आहे असें (मूल) ०बाई स्त्री १ आई सारखी वयानें श्रेष्ठ गुरुजनभावी असी बाई, आईप्रमाणें स्त्री म्ह० देई घर्ई ती आई बाई न देई ती मसणांत जाई २ शेजारची बाई शेजारपाजारची स्त्री, शेजारीण ३ कोणी तरी बाई (अनेकवचनी उपयोग) म्ह० परीट नागविला तर आयाबाया नागविल्या=पर गाच्या येथें चोरी झाली तर त्याचें कांहीं जात नाहीं, उलट इतर लोक उघडे पडतात ०करणें—खुशामत करणें, गोंजारणें ०बाप—पु आई व बाप वडील व मातोश्री, मातापिता (अव) आई व बाप 'माझीं आईबापें आणि माझे शिक्षक जें मला सांगतात तें मी केलें पाहिजे?' —मराठी ३ रें पुस्तक (१८७३) पृ ४१ आई बापावरून पावणें, आईबाप उद्धरणें—आईबापावरून शिव्या देणें वेड्यावाकडया वाईट शिव्या देणें ०माई—स्त्री व्यापक अर्थानें बाई एखादी आईसारखी मानलेली स्त्री माउली, आई-बाई ०माई उद्धरणें—आईवरून शिव्या देणें ०माई करणें—पुरस्कारी करणें; मनधरणी करणें

आईक—वि एकिल, पहिलेग नाहीं असी —वामन बाल गीता ७३ (धार)

आईणी—आयणी पहा

आईदे—क्रिवि यापुढें, आइंदे पहा —स १५७६, पेसा ४ ६६

आईन—पु एक झाड, आईन पहा 'ते पाईरहि सैरें किंजळ, तिथें आईन ही वाटली' —ऋक १२९ ०

आईस—(गों गोंकुल) आई, माता, देवी, लक्ष्मी, आई पहा 'मीं जरी सल्गीचा पुत्र, तरी बाप आईस तरी अंतरु।' —ज्ञा ११ ३२ 'आईस लागे पी लोहिण लागे मोळी शिवशक्तिचें नाव' —मसाप ११४ [आई+स प्रत्यय]

आउक—ख, औख—क्ष—न आयुष्य, हयाति, जीवित 'नाहीं पिटली आसोसी देवा आउक दिला थोडा।' —ऐपो ८९ [स आयुष्य=आउख] ०वंत—वि आयुष्मान्, दीर्घायुषी [आयुष्यवान्]

आउंज—आविंज पहा

आउट—ऊट—कें—औट पहा

आउत—औत पहा

आउलें—वि वेगळें, निराळें, वायलें 'चान्ही वेदयासीं आउलें ठेविलें। बळीसि दिधलें चक्रिदान॥' —व १९८ [उवाइला वाइला पहा]

आउ(ऊ)स—(गों कुण) आई, माता, आईस

आउ(ऊ)क्ष—आउख (आयुष्य) पहा 'आउक्ष तानाजीचें समजली। घोरपड फिरगी।' —पो ४९ 'अंगे बाई! आल। सानि याचा बाळा। आउ र तयाला। उदंड हो॥' —बाट वध (जननी जनकज कृत काव्य) ०वंत—आउसवंत पहा

आऊ—स्त्री अवा पहा १ मराठ्यांच्या स्त्रीस आदरार्थी संबोधितात उ० निजाऊ 'आऊसाहेब' —पया ५२७ २ आवडी नावाचें संक्षिप्त रूप ३ (ल) हलक्या शीलाची स्त्री, आवा, अजाजी ४ (सामा) स्त्री 'ही आऊ कोण बुवा?' [स अवा, प्रा अव्वा—आऊ, का अव्वा] ५ स्तन, थान 'आईचा आऊ तें पिऊ लागल' —नीतिशास्त्रप्रवेश पृ १०० [अमा—आमा—आमू]

आऊ—न १ कण्हणें, विव्हळणें, अयाय करणें, मारताना वाटलेल्या किंवा असाच दु खाचा उद्गार २ काकू करणें, नकार दर्शविणें [ध्व औं+ऊँ]

आऊट—की—कें—अवटकी, अवटी, औट पहा

आऊड—साडेतीन हाताचा पुरुष, औट पहा ०बारा—अउडबारा पहा [प्रा आउढि=साडेतीन]

आऊड—पु (औंध) १ टप्पा २ बदुकीच्या गोळीच्या टप्प्या-इतकें अंतर, [औट, आउड]

आऊत—काठी—की—पेणें—फाटा—औत पहा

आऊत—न (कु) मासे धरण्याचें जाळें [स आयुध]

आओ—पु आकृति, रूप, आकार. 'जरि माजा रीं मोट बांधि आओ। तरि चाचरा केंवी भाओ।' –शिशु ३९४ [स आकार, तुल० म आव]

आक—पु १ (गु) गाडीचा कणा, आंस [स अक्ष म आस] २ (घडकाम) लोखंडी लावट तुकडा, गज, धार.

आक—पु १ अंक पहा २ आरा पहा 'आका बैसला भाला रायानी गायकवाड पडला।' –ऐपो ८७

आकटी—आगटी पहा

आकंठ, आकंठमर्याद—क्रिवि गळ्यापर्यंत-पावेतों (भोजन, जल, संकट, इ० किंवा त्यात बुडणें, निमग्न होणें) 'हिमादर्वे आकंठें।' –ज्ञा १७ २५८ [स आ+कंठ=गळा]

आकंठणें—उक्रि (काव्य) गाठणें आटोपणें (पकडणें, धरणें) 'दव भोळा भाव भक्ता पाठोपाठीं। उचिता आकंठी मागोमाग।' [म आ+कंठ]

आकडसासु—स्त्री (व) बायकोची वडील बहीण, वडील मेव्हणी, [आका+सासु]

आकडा, आंकडा—पु १ संख्या, अंक, गणितांतील एक चिन्ह २ वाकदार, वाकडें टोंक, आकडी, हुक ३ (ल) विंचू किंवा खेंकड्याची नांगी ४ लाव मिरची किंवा चिंच 'चिंचेचा आकडा' ५ टोंक, शेंडा 'आकड्याचें पान' 'तैसे आवाडुना वरी आकडे। धगधगीत दाढाचे।' –ज्ञा ११ ३६३ ६ घोडा (छत्राचा वगैरे) ७ (जरतार धदा) फिरकींतून जाणाऱ्या तारेस एकाच दिशेनें फिरण्यास लावणारें यंत्र ८ (गो) मगटा [स अक्=खूण करणें अक=चिन्ह, आकडा] ०घालणें-धडीनें किंवा भीतीनें अंग आखडणें ०मोडणें-वसणें-विण्याच्या अगोदर गाय किंवा म्हैस या जनावराच्या दुगणाच्या दोन्ही बाजू खोल जाणें आंकड्यास येणें-लावणें-लवणें–वाकणें, पिकणें (शेत, पीक, धान्याचीं कणसें) 'कितेक भारें आकड्या लवती'–सप्र १२ ४३

आंकडी—स्त्री आकडा पहा १ (गो) धडी वाजून भरणारें कापरें 'मावा आकडी आयली' [गो आकडुवें=कापणें] २ लहान मुलाच्या पोटात होणारा व हातापायास आचके बसणारा रोग [तुल० सिं आकुडु] ३ उचीवरील वस्तु (फुलें, फळें वगैरे) तोडण्या साठीं एका उंच काठीच्या टोंकाला कोयती, विळा किंवा तशाच प्रकारचें हत्यार बांधून केलेलें साधन 'आंकडी घेऊन पानें काप' ४ (कों) कमरेस कोयती ठेवण्यासाठीं एका दोरीला गळ केलेला लाकडाचा तुकडा बांधून केलेलें साधन 'कमरेला आकडी लाव' ५ नागराचें जूं ज्याला बांधतात तो मुख्य दांडा –मसाप २ ३ ७७ ६ दुबेळक्यासारखें चित्त्याचा गळपट्टा बांधण्याचें एक हत्यार, एस्की, इन्वी –चित्त्याची माहिती पृ ३१ ७४मेळ (दम व डंका) मारविण्याची वेलाची पाकविलेली लहान काठी ८ (खा) सोनारी (धदा) गावी नावाच्या तार काढण्याच्या टोकळ्यावर लोखंडी जाड पट्टीची कमान बसविलेली असते ती [आकडा स आवृट, प्रा आकड्ढ]

आकडी—वि (वर) पाणी न मिसळलेलें-थोरें, निरसें (दूध) 'आकडी दूध महाग असतें' आसरी दूध पहा [?]

आंकडेपत्रक—न वस्तुस्थितिनिदर्शक आकड्याचा तक्ता (इ) स्टॅटिस्टिकल रिटर्न [स अंक+पत्रक]

आंकडेशास्त्र—न राज्यकारभारात ज्या गोष्टींचें ज्ञान अवश्य असतें तें परिमाणात्मक करण्यासाठीं आकडे गोळा करण्याचें शास्त्र (इ) स्टॅटिस्टिक्स [अंक+शास्त्र]

आकण—न १ एकदा मळणी केलेलीं कणसें (नोंधळा, बाजरी इ० चीं) २ (काहीं प्रांतात) दुसरी मळणी झाल्यानंतरचें धान्य, मदन पहा ३ धान्याची मळणी झाल्यानंतर उरलेलें, माती खडे मिसळलेलें धान्य, सातेरें –ज्ञायो १४४ [स आकृष्ट+कण किंवा आ+कडण किंवा आ=ईषत्, किंचित्+क्षुण्ण=मळलेलें] ०निघणें–(व) पिळा पडणें, खाली निघणें, अतिशय दमून येणें 'पार मजल तो चालून आल्यामुळें त्याची खूपच आकण निघाली' ०निकण-एकदा मदून, धान्य काढून झालेलीं कणसें पुन्हा मदून त्यांतून निघालेलें धान्य

आंकण-णा-णें—पुन १ पायात घालावयाचा तोडा (पूर्वी शत्रूला जिंकल्यानंतर त्याचें नाव एका तोड्यावर खोदून तो पायात घालण्याची चाल होती त्यावरून) पराक्रमसूचक पादभूषण 'तो रणीं जिंतिला करूनि नेम। तेणें सतोषोनि परम। आपलें नाम आकणा घाली।' –एभा १९ १४३ [स अंकन] २ (साभा) ब्रीद, बिरुद, ब्रीदावळी, अलकार, भूषण 'आगाचेनि गरिमपणें। हे पण्हरयावरी पडवी आंकणें।' –शिशु ८०७ 'हें आंकणें अनंता तुजचि साजे।' –भाए ६५०

आंकणकडवें, आकडकडवें—न १ गाण्यातलें पालुपद ध्रुवपद, पेडावद २ (ल) एकदा नाकारलेली गोष्ट पुन्हा पुन्हा काढणें, विनति करणें, ठरलेली गोष्ट पुन्हा उपस्थित करणें, जपमाळ घेणें, घोळणें तुणतुणें गाणें, घाकणें ३ एखाद्याच्या भाषणात वार वार येणारा शब्द, पादपूरण, वाक्यपूरण [अखड+कडवें गु आकणी, आखणी]

आकणा-ना—पु अंकित, तावेदार, आज्ञांकित 'तेजाचेनि आळवना। जेभा वारा हीं सूर्ये आकना।' –शिशु ३९८, 'मानिया प्रतापें यमु आकणा' –नृपुरा ३ ५४, 'विठल म्हणा विठल म्हणा। कलिकाळ आकणा मग तुम्हा।' –निगा पृ. १५५ [आकण पहा]

आकणी—स्त्री (का) रस्ता [अ+कण]

**आंकणी**—स्त्री. १ आंखणी; रेघा वगैरे आंखण्याची परी; -ळ. २ रेघा मारणें; आंखणें; खुणा करणें. ३ पेटींतील खण-रचना. ४ योजना; बेत, रूपरेषा; चित्राकृति; (इं.) प्लॅन; स्कीम. ५ जनावरांना रोग झाला असता डागण्याची सळई. [सं. अंकन; म. आंकणें]

**आंकणें**—सक्रि. (विरू.) आंखणें. १ आंखणें; चिन्हित करणें; क्रमांक घालणें; सरळ रेषा ओढणें; मोजमाप करणें. २ (सोनारी धंदा) कैचारानें माप घेणें. अंकणें पहा. [सं. अंकन]

**आकतीज**—अखतीज; अक्षयतृतीया पहा. 'आक्तीज आक्तीज जाल्या यापरी।' -दावि ४५६.

**आकदस**—अक्दस पहा.

**आंकपट्टी**—स्त्री. १ कापडाचा ताका किंवा सणंग वगैरेवर मालाची किंमत व क्रमांक दाखविण्यासाठीं डकविलेली चिट्ठी. अंक-पट्टी पहा. २ कापडाच्या गांठींतील निरनिराळ्या वस्तूंच्या किंम-तीची मोठी यादी. ३ आंकणी अर्थ १ पहा. [सं. अंक+म. पट्टी]

**आकपिकुळ**—वि. (गो.) सद्गदित, करणेनें द्रवलेला; गहिं-वरलेला. [सं. व्याकुल; अक=दु स+म. पिकुळ=पिकलेला]

**आकंपित**—न. (नृत्य) नृत्यामध्यें डोकें खालीं व वर हळू-हळू हालविणें. हा अभिनय ओळख पटली असें दाखविणें, उपदेश करणें, प्रश्न विचारणें, स्वाभाविक भाषण इत्यादि गोष्टी दर्शवितो. [सं.]

**आकबंद**—वि. सबंध, संपूर्ण, पूर्ण, पुरा. (मालावर किंमतीचा आंक, अंक, आखडा घालून व इतर सर्व साधनें पुरीं करून तयार केलेला माल). उ० आकबंद पेटी. [सं. अंक+बन्द]

**आकबरीमोहर**—अकबरी मोहर पहा.

**आकय**—(गो.) अक्का पहा.

**आकर**—पु. खाण; ठेवा; सांठा; संग्रह; आगर. उ० रत्नाकर, रत्नाकर, कुसुमाकर. 'ऋतूंमाजीं कुसुमाकरु। वसंतु तो मी॥' -ज्ञा १०.२८३. [सं.] ०ग्रंथ-पु. मोठें-जाड पुस्तक, प्रचंड ग्रंथ. ०ज्ञान-न. खनिज्ञान; खाणींसंबंधीं शास्त्राचें ज्ञान-माहिती; जमीन पाहून त्या ठिकाणीं कोणत्या पदार्थाची खाण लागेल हें समजण्याची विद्या.

**आंकर**—पु (गो.) अंकुर, मोड, कोंब [सं. अंकुर]

**आकरणें**—सक्रि. आकार देणें-येणें, उत्पन्न होणें-करणें. 'आकरलें जें जें मायिक तें खरें।' -व २१२. [सं. आ+कृ]

**आकरताळी**—अकरताळ पहा

**आकरसणें**—उक्रि. १ जोरानें ओढून, आवळून, करकचून बांधणें; घट्ट बांधणें; बांधणें याशीं प्रयोग उ० 'आकरसून बांध.' २ ओढणें, ओढला जाणें; आकर्षिणें. [सं. आ+कृष्]



**आकरसणें**—अक्रि. अकसणें; संकोचणें; आखडणें; आटणें. [आ+कृष्]

**आकरा**—अकरा पहा. 'दिवल्या बहुत चौसष्टी। आठ जणी बहुत कष्टी। आकराही हिंपुटी। स्वरूप तुझें वर्णिता।' -ह ३.४.

**आंकरी**—स्त्री. १ अंकुर; कोंवळा शेंडा; डिरी. २ कोंवळें कणीस. [सं. अंकुर]

**आकरीत**—वि. अक्रीत पहा. १ अतिशय; फार. 'नवो कई आग्रह आकरित।' -प्रला १२२. २ लबाड; धूर्त; फाजील. 'लई अंतरची खोल मोठी, वर नट केवळ सात्विक दिसती। गरीब रीतीनें करून आकरितपणीं जनीं असती।' -होला ८९. [अ+क्री]

**आकरोट**—अक्रोट-ड पहा. 'बदामें आकरोटें खिसमिस उतत्या आणवील्या सवेंगा।' -सारह ३.४८.

**आकर्ण**—क्रिवि. कानापर्यंत. 'धनुष्य आकर्ण ओढून बाण सोडला' [सं. आ+कर्ण]. -वि. कानापर्यंत लांब. उ० आकर्ण नयन-लोचन. ०धनुरासन-न. योगशास्त्रांतील एक आसन. -संयोग ३४७. ०वरी-क्रिवि. कानापर्यंत. 'अर्धचंद्र बाण त्वरित। आकर्णवरी ओढिला।'

**आकर्णणें**—उक्रि. (काव्य) ऐकणें; श्रवण करणें; लक्ष देणें. 'हें आकर्णुनि पूर्ण तूर्ण निभवज्ञानार्णव, क्ष्मापती।' -आसीस्व ९. 'तुम्हीं नगरीं हिंडता निरंतर। आकर्णिता जनवार्ता समग्र। -रावि ३७.२०. [सं. आ+कर्ण]

**आकर्णन**—न. श्रवण; ऐकणें. 'परी आकर्णनीं नाहीं। चाड जरी॥' -ज्ञा १८.१४८९. [सं.]

**आकर्णित**—वि. ऐकलेलें.

**आकर्षक**—वि. १ ओढून घेणारा; ओढणारा; खेंचणारा. २ (ल) मनोवेधक; चित्त रमविणारें; सुंदर. [सं. आ+कृष्]

**आकर्षक्रीडा**—स्त्री. १ खेळ (सोंगट्या, बुध्दिबळ इ०). २ मल्लयुद्ध (६४ कलांपैकीं). [सं.]

**आकर्षण**—न. १ ओढून घेणें. २ (ल.) वेधून घेणें (मन, चित्त वगैरे), ओढा; ओढ (मनाची) ३ आकुंचन; आकरसणें. [सं. आ+कृष्]. ४ (संगीत) वाद्याची वाजती तार ताणून तिच्यावर नखीचा आघात करून उच्च स्वर काढणें. ५ ओढून घेण्याची शक्ति; आकर्षणशक्ति पहा. सामाशब्द- विद्युदाकर्षण; लोहाकर्षण इ० (इं.) अॅट्रॅक्शन. ०शक्ति-स्त्री. (पदार्थ.) जिच्या-योगें वस्तूंतील प्रत्येक परमाणु आपापल्या आकारमानाप्रमाणें व अंतराप्रमाणें इतर परमाणूंस आपल्याकडे ओढतो ती. [सं.]

**आकर्षणें**—उक्रि. १ ओढून घेणें, वेधून घेणें; आकर्षण करणें. 'तक्षक आकर्षुनि आम्ही। पाडीत असों इयें होमीं।' -मुआदि १९.१३७. २ आकुंचन पावणें; घट्ट होणें; आकरसणें. 'अगा हिम जें आकर्षलें।' -ज्ञा १४.३७६. [सं. आ+कृष्]

**आकर्पित**—वि १ आकर्पण केलेलें, वेधून, ओढून घतलेलें २ सकुचित, घट्ट केलेलें, आकुचित, आक्रसलेलें

**आकलणें**—आकळणें पहा

**आकलन**—न १ बधन, आळा, तावा, वर्चस्व, पराभूत करणें, (कार्य) करू न देणें २ समावेश, व्यापणें, आत घेणें, साठ विणें ३ बोध, समज, ग्रहण शक्ति, ज्ञान [स आ+कल्]

**आकलित**—वि आकलन केलेलें (सर्व अर्थी)

**आकली**—न (कों) (मासे पकडण्याचें) पाग पेक्षांही ल्हान जाळें [स आकलन]

**आकल्प**—अ १ ब्रह्मदेवाच्या सवध दिवसापर्यंत, म्हणजे ४३ कोटी २० लक्ष मानव वर्षे जाईपर्यंत २ (ल) फार अमर्याद काळ पावेतों, जगाच्या अंतापर्यंत 'आकल्प आयुष्य व्हावें तयां कुळा। माझिया सकळा हरिच्या दासा।' [सं आ+कल्प]

**आकवर**—पु (गो) कुमार, अविवाहित [स कुमार, प्रा कुऑंर, हिं कुवर]

**आकवात**—न (कु) एक वेळ जेवून राहणें [एक+वक्त]

**आकवार-वारीण**—स्त्री कुमारी, कुवारीण [स कुमारी, प्रा कुऑंरी, म कुवारीण]

**आकस**—अकस पहा 'गर्जोनी मग काळदड त्यजिला घालोनिया आकशीं।' –रहुकुश ५९

**आकसर**—वि (गो) लग्नास योग्य असून लग्नावाचून राहिलेला पुरुष किंवा स्त्री, कुमार, कुमारी [आक्चर का अक=मोठा]

**आकसांवां**—न (गो) आकाडताडव, नाटकी आविर्भाव अगर बोलणीं 'ता गेलीं आकसावा सदाचींच!' [पो आक्साव, इ ॲक्शन]

**आकस्मिक**—वि अचानक, अनपेक्षित, अकस्मात, अव चित घडलेलें, आलेलें [स]

**आकळ**—आकलन पहा 'ब्रह्मादिका न कळे खोळ। ते हे आकळ धरियली।' –तुगा २२३ –वि १ अकळ पहा २ (ल) परब्रह्म –दार

**आकळण**—न समजण्याची शक्ति, विवेकबुद्धि आकलन पहा 'विवेक विसरला आकळण।' –एभा २३ ५५८

**आकळणें**—उक्रि १ ओढणें, निग्रह करणें, ताब्यात ठेवणें, बाधणें 'परी त्या गर्वें आकळिलीं' –रासप २ ५५८ 'अगुष्ठमात्र प्राण पुरुष। आकळोनि काढिला।' –मुवन ६ ६३ २ समजणें, बोध होणें लक्षात येणें, आटोक्यात आवाक्यात येणें 'किती समुदाय आकळेना।' –दा १९ १० ११ 'बळें आकळेना मिळेना मिळेना।' –राम १४२ –एभा २० ६९ 'परि योग्य वीर समर-क्रीडोत्सुक-चित्त काय आकळतें।' –मोभीष्म १२ ६५ ३ (ल) आवरणें, किंचित मर्यादित करणें (धदा, प्रकरण वगैरे) ४ सापडणें 'अद्य सोहं ब्रह्म आकळलें।' –तुगा ४०३६ ५ व्यापून जाणें 'तैसा तो धनुर्धर महामोहें। आकळिला।' –ज्ञा १ १९०, ६ ओढून घेणें, वश करणें स्वाधीन ठेवणें –एभा २९ ४७ 'तुझें कुशल नाम या हृदुहृद् मना आकळी।' –केका ७४ ७ जवळ घेणें, ओढणें, कुरवाळणें (ल) चुंबिणें 'शानें चोढनिशानें वदनकमळहि आकळीलें पतीनें।' –विश्लक्षत रसमजरी १० [स आकलन]

**आका**—१ अक्का पहा २ (गो) आत्या ३ निरर्थक शब्द, आकाबाका (ओठोप्रमाणें) 'आका म्हणतां बाका येत नाहीं= ओ म्हणतां ठो येत नाहीं, अडाणी, अक्षरशत्रु

**आकाटाका**—पु (व) आटोका, अदाज 'आलें माझ्या आकाटाक्यात तर टाकतोंच एक घर घेऊन' [आटोका]

**आंकाडा**—पु (हेटकरी) कुपण असलेल्या परसांत जाव याच्या वाटेतील बेंड, वाडग्यांत जावयाच्या वाटेंत पुरलेल्या दुबेळक्यावरील आडवें लाकूड [आंकडा]

**आकांत**—अकांत पहा 'आमचा देव बहु सत्य। आम्हा आकांतीं पावन।' –दा ६ ६ ४२

**आकांतणें**—१ अकांतणें पहा 'त्याचिया पापरहाटी। आकांतगे सर्व सृष्टी।' –मुसभा ५ १४१, २ (गो) घाबरणें, बावरणें 'ता गॅल्या बोवेन हाव सगलो आकातलो [स आक्रान्त]

**आकातला**—वि (व) हपापलेला 'आकातल्यासारखा खायला धावतो' [आकातलेला]

**आकाबाई**—अकाबाई पहा ०आठवणें-अवदशेची इच्छा करणें 'तर तुम्हाला पुरतीच आकाबाई आठवली आहे असें मी समजतों' –अरबी भाषेतील गोष्टी

**आकाय**—स्त्री (गो) वडील बहीण, वयोवृध्द स्त्री अक्का पहा

**आकार**—पु १ आकृति, ठेवण, रूप, घडण, मूर्ति 'पै ब्रह्मबीजा जाहला अकुरु। घोषध्वनी नादाकारु।' –ज्ञा ९ २७५ २ बाह्यस्वरूप, देखावा ३ (ल) साम्य, सादृश्य तुल्यता ४ मना वर ठसलेली आकृति–ठसा–मूर्ति, मनावर झालेला परिणाम–कल्पना ग्रह ५ (पूर्णतेस येणाऱ्या कामाच्या, धद्याच्या किंवा योजलेल्या गोष्टीच्या, मसलत इ०च्या) स्वरूपाचा निश्चितपणा ६ खर्च, नफा, उत्पन्न, वसूल इत्यादि गोष्टींचा अनमान–अदाज, जमाबदीचा अदाज, ठरावणी ७ खूण, चिन्ह अदाज, दिग्दर्शन 'या व्यवहारात शभर रुपये मिळतील असा आकार दिसतो' ८ मनोविकाराचा शरीरावर होणारा परिणाम, विकारदर्शक स्थिति, भाव जसें–कांपणें, हसणें, रोमांच उभे राहणें–भीतीनें, आनदानें वगैरे ९ (भूमिति) आकृति, चित्र (इ) फिगर १० (भूमिति) आकृतिमान, परिमाण (इ) व्हाल्युम ११ पद्धत, वागणूक, राहणी, चाल, ढब, रीत, तऱ्हा 'मी परब्रह्म यणें आकारें।

जेथें जीवस्वरूप स्फुरे ॥ ' ' या रीतीं बहुत आकारें तिनें झाडिता ।' –पच २६ १२ पृथ्वींतील एकंदर वस्तुजात, विश्व ' तरी ती हरीची ज्ञान कळा केवळ । हा आकार अवघा तुझा खेळ ।' –ह २४ ८७ १३ सारा (जमिनीचा) १४ किंमत १५ ( कर ) आव, आविर्भाव 'आकार तर एखाद्या वकिलाचा आणला आहेस' एखाद्या वस्तूचा अमुक एक आकार आहे हें दाखविण्यासाठीं हा शब्द योजून सामासिक शब्द बनवितात उ० मंडलाकार, चक्राकार, गोलाकार, वर्तुलाकार इ० [ स. आ+कृ ] –रात जाणें–(न ग )०व्यर्थ जाणें, असफल होणें ' एवढी उठाठेव करूनही अखेरीस ती गोष्ट आकारातच गेली कीं नाहीं ?' ०दाखविणें–१ मिष करणें, आव आणणें, ढोंग करणें, बहाणा करणें २ एखाद्या गोष्टीचें स्वरूप, मान दाखविणें–व्यक्त करणें –रास येणें–१ एखादी गोष्ट धंदा, दुखणें, काम कांहीं विवक्षित स्वरूपास येणें, रंगास येणें, मूर्त स्वरूपात येणें, दृग्गोचर होणें 'कर्म आलें हो आकारा'–विष्णूची भूपाळी २५ फळास येणें 'त्याची अवस्था तीच तुमची पुढें येईल आकारास'–ऐपो ३०६ २ कमी प्रमाणावर–सख्येवर येणें, खालावणें ०गोपन–न १ खऱ्या स्वरूपाची, आकृतीची, मनोविकाराची छपवणी, रूप विणें, गुप्त ठेवणें, पडदा पाडणें २ ढोंग, छद्मीपणा, छद्मी व्यवहार ०जमा–स्त्री अदाजानें ठरविलेला वसूल, वसुलीजमेच्या उलट ०जात–न वस्तुजात, उत्पन्न झालेल्या सर्व वस्तु, विश्व ' जे आकारजाताचें दुस । घडी केलें ।' –ज्ञा १५ ८३ ०बंद–पु १ लिहिलेला, तयार झालेला मसुदा ( वसुल, जमीन, पट्टया, वराती इ० चा ) २ जमावंदीचें सरकारी वार्षिक अदाजपत्रक ( सारा, जमीन पट्टथा, सूट, इनामें वगैरेंचें) ३ सामान्य अदाज पत्रक–खर्डा [ आकार+बंद ] ०मान–न १ विस्तारमान, बाह्य स्वरूपावरून केलेला अदाज २ आकृतिमान, परिमाण ( इ ) व्हॉल्युम (प्र) आकारमहत्त्व ०शुद्ध–वि नीटनेटक्या, व्यवस्थित, पाहिजे तशा आकृतीचें, प्रमाणबद्ध ( झाडें, घर, माणूस ) [ स ] ०शुद्धि–स्त्री आकृतीचा, स्वरूपाचा, बांधेसूदपणा, अगसौष्ठव, प्रमाणबद्धता [स] म्ह० 'आकारे रगती चेष्टा' 'आकारैरिंगितैर्गत्या चेष्टया भाषणेन च। नेत्र वक्त्रविकाराभ्यां लक्ष्यतेऽन्तर्गतं मन ॥ ( आकार, इंगित, चालण्याचा झोक, कृति, भाषण, डोळे, मुद्रा, इत्यादि गोष्टींवरून मनुष्याच्या मनात साधारणपणें काय चाललें आहे तें कळतें ) या श्लोकाचा आरभीं दिलेला पहिला चरण अपभ्रष्ट होऊन मराठींत आला आहे मनुष्याच्या बाह्यस्वरूपावरून त्याच्या हातून घडणाऱ्या कृतीचें स्वरूप ताडतां येतें, जसें–' आकारेंचि परिगित कळलें बोलानि काय हा कळे ।' –मोवन १ १२

**आकारण**—न आव्हान, आमंत्रण, बोलावणें, हाक [ स आकारण ]

**आकारणी**—स्त्री १ गणती, सख्या, माप, मोजणें, मोजणी, हिशेब २ पाहणी, प्रतवारी ( जमीनीची ), जमीन मोजणी, ३ सामाशब्द –आकारणीखर्डा–ताळेबद–तेरीजपत्र–बाकी–वसूल–सूट–हिशेब ३ ठोकळ अदाजपत्रक, कच्चा खर्डा ४ वर्गणी, दर

**आकारणें**—उक्रि १ आकारास येणें २ ( काव्य ) बोलावणें, आव्हान करणें, आमंत्रण करणें ३ आकारणी करणें ( जमीन इ० ची) ४ रंगारूपास आणणें, विवक्षित स्वरूपास आणणें, आकार धारण करणें, आकारास येणें. 'अवयव आकारले साग '–मुआदि ४ ३६ ' आकारलें रूप असेल जेव्हां ' –साह्द २ ३९ ५ निदान करणें ( रोग वगैरेंचें ) ६ अदाज, हिशेब, मसुदा करणें ७ घ्याव-याची रक्कम ठरविणें

**आकारीव**—अकारीव पहा

**आकालिक**—वि अकालिक पहा

**आकाश**—न १ आभाळ, आपल्या डोक्यावर दिसणारी घुमटाकार पोकळी हिचा रंग निळसर असतो ' आकाश म्हणजे अवकाश पसरला पैस '–दा १३ ७ १ २ वातावरण, अंतराळ ३ पोकळी–एभा १९ १९३ ४ एक सख्या ( शून्य ) ५ पंचमहाभूतांपैकीं शेवटचें यात इथर (ईथर) भरला असून तो ध्वनिवाहक आहे ६ (वेदांत) निर्गुण स्वरूप ' ऐसाही जरी धिवसा । बांधोनियां आकाशा ॥ '–ज्ञा १२ ७४ कांहीं समासशब्द–घटाकाश, मठाकाश, महदाकाश, चिदाकाश इ० [ स ] हा शब्द पाताळ शब्दाबरोबर येतो असे कांहीं वाक्प्रचार ०पाताळ एक–गर्वानें फुगून गेलेल्या माणसाबद्दल योजतात ०पाताळ एक होणें–अति जोराचा पाऊस पडणें (मोठ्या पावसात जमीन–अस्मान एक झालेलें दिसतें म्हणून ) ०पाताळ एक करणें–हलकल्लोळ करणें, आरडा ओरडा करणें, धिंगाणा घालणें (रागानें, दुःखानें) ०पाताळाचा भेद–दोन वस्तूमधील महदंतर दाखविणें 'आत्मा आणि बुद्धि हीं जर तू एक समजत असलास, तर आकाश पाताळाचा भेदच तू नाहींसा केलास असें म्हटलें पाहिजे.'–ला घेरा घालणें–देणें–अचाट कृत्यें करणें, मोठमोठे पराक्रम करणें, दिग्विजय करणें, अशक्य गोष्टींस हात घालणें, महत्त्वाकांक्षी होणें ०शाची चौघडी करणें–आकाशाला घेरा घालणें 'आकाशाची करवेल चौघडी । महामेरूची बांधवेल पुडी । शून्याची मुरडवेल नरडी । परी मनाच्या ओढी अनिवार ॥ '–ची दारी तुटणें–आकाशाची कुऱ्हाड पडणें 'तों एकाएकींच आकाशाची दारी तुटत तैशी गोळी येऊन उजवे बगेंडीस लागली ' –भाव ८१ –शीं राहाणें–वरच्या मजल्यावर, आढ्याखालीं राहाणें –ला गवसणी घालणें–अशक्य गोष्ट करावयास धजणें, आकाशाला घेरा घालणें –ची कुऱ्हाड–धाड पडणें–दैवी आपत्ति येणें, निसर्गाच्या आपत्ती येणें, अत्यंत मोठी हानि होणें उ० पति मरणें, एकुलता एक पुत्र मरण पावणें ' चिरंजीव तुमच्यावर आज आकाशाची कुऱ्हाड कोसळली आहे '–नाप ४४६ म्ह० आकाशाची कुऱ्हाड कोल्हाच्या टोंगार –ची साल काढणें–निरर्थक प्रयत्न

करणें 'तेणें सारी काळाची आकाशाची।'-अमृ ६ ४७ -तून **उतरणें, पडणें किंवा अस्मान फाडून येणें**-अघटित घटना दाखविणें म्ह० आकाशातून पडलं आणि भुईनं सावरलें -नि ५५४ **-ला शिडया लावणें**-शक्तीबाहेर काम करणें ०**फाटणें**-सर्व बाजूनीं एकदम संकटें येणें 'आकाश फाटें त्याला लावावें ठिगळ कुठोनी।' -समासगीतें हेंच दुसऱ्या शब्दांत उदाहरण **-शास ठिगळ लावणें**-निरर्थक प्रयत्न 'हरि-भय-दीर्णे नभ वरिल धड लावुनि कृष्णसार थिगळाला।'-मोभीष्म ६ ४४ ०**कक्षा**-स्त्री दृश्य क्षितिज ०**कुसुम**-न खपुष्प, असंभाव्य किंवा अवास्तविक गोष्ट (सशाच्या शिंगाप्रमाणें) ०**गंगा-नदी**-स्त्री आकाशातील नदी, ताऱ्यांचा एक विशिष्ट समुदाय, अति सूक्ष्म अशा ताऱ्यांचे आकाशांत दिसणारे दोन पट्टे हे दक्षिणोत्तर गेलेले दिसतात पहिला पट्टा अगस्ति ताऱ्याच्या पूर्वेस मघाच्या रेखांशावरून निघून व्याधाच्या पूर्वेकडून आर्द्रेच्या पश्चिमेस वळतो व तेथून तो ध्रुवाच्या पश्चिमेपर्यंत पसरलेला आहे दुसरा पट्टा श्रवण नक्षत्रापासून ध्रुवाच्या पूर्वेकडे गेलेला आहे पहिल्यापेक्षा दुसरा पट्टा लहान आहे दुर्बिणीनें दिसणारे यांतील तारे सुमारें दोन कोटी आहेत ०**गमनविद्या-सिद्धि**-स्त्री यौगिक सिद्धींपैकीं एक, आकाशांत संचार करण्याची माहिती, अर्वाचीन विमानविद्या ०**दिवा-दीप**-पु आश्विन शुद्ध पौर्णिमेपासून कार्तिक शुद्ध पौर्णिमेपर्यंत (पितरांना प्रकाश दिसण्याकरिता) भिंगाचा किंवा कागदाचा दिवा (कंदील) करून एखाद्या उंच काठीस किंवा झाडास टांगून लावतात तो २ सुणेसाठीं एखाद्या उंच जागीं लावलेला दिवा ०**नगर**-ढगांच्या विचित्र आकृतींवरून वाटणारें ढगांतील किंवा आकाशांतील काल्पनिक शहर, (चित्र) गंधर्वनगर, गंधर्वसृष्टि ०**पट**-पु ज्यामध्यें अक्षांश, रेखांश, विषुववृत्त, क्रांतिवृत्त, अयनवृत्त, नक्षत्रें, राशी, तारे, यांच्या आकृती दिलेल्या असतात असा नकाशा यावरून सूर्य, चंद्र, ग्रह, उपग्रह, यांचे मार्ग दर्शविता येतात [स] ०**पथ-मार्ग**-पु १ अंतराळ, आकाशांतून जाणारा रस्ता, यौगिक सिद्धींपैकी एक सिद्धि 'द आकाश पंथें झोंकून। दशदिशा गेले पाषाण।' 'आकाश मार्गी गुप्त पंथ। जाणती योगिय समर्थ॥' -दा २ हवेंतील रस्ता, यान ०**पाणी**-न (ल) ताडी, माडी, इ० मादक पेय, ताड, माड इ० झाडें फार उंच असतात व त्यांपासून ताडी, माडी काढतात ती त्यांच्या शेंड्याजवळच्या भागापासून काढतात यावरून [स] ०**भाषण**-न १ स्वर्गीय देवताशीं संभाषण, (नाटकात वगैरे) आकाशाकडे पाहून, देवांना हाक मारून, त्यांचें उत्तर आपण ऐकलेसें दाखवून जें भाषण नाटकांतील व्यक्ति करिते तें उ० 'हे स्वर्गस्थ देवतांनो!' २ (नाटकात) रंगभूमीवर नसलेल्या दुसऱ्या एखाद्या पात्राचे शब्द आपण ऐकत आहों असें रंगभूमीवरील पात्र हावभाव करून सुचवितें व त्यास उत्तर देतें ते शब्द [स] ०**मंडप**-पु आकाशाचें छत, आकाश हाच मांडव 'आकाश मंडप आसक्त। नक्षत्रें रचिलीं अपार पैं॥' ०**मंडल**-न खगोल ०**मापक**-पु (शाप) वातावरणोष्णतारश्मिदर्शक मापक यंत्र, किरण-विसर्जनदर्शक यंत्र (इं) ईथ्रिओस्कोप ०**मुनि**-पु उंट (हा वाळवंटावर उडाची मान उंच असल्यामुळें पडला) ०**मूलि**-स्त्री एक झाडाचा वर्ग (कुभिका, पुन्नाग, यांचें मूळ जमिनींत नसून अधांतरीं असतें) जलवर्धी वनस्पति ०**यान-वहन**-न विमान ०**वल्ली-वेल**-स्त्री १ वांगुळ, बृहत्ता, वृक्षावर वाढणारी वेल २ बेर वगैरे झाडावर वाढणारी व बारीक बारीक पिवळे तंतू असणारी वेली, सोनवेल, अमरवेल, अंतरवेल याच प्रकारच्या दुसऱ्या एका वेलीस फुलें येतात ०**वाणी**-स्त्री १ आकाशापासून निघणारा शब्द, अशरीरिणी वाणी, देववाणी 'तुझें हें गाणें म्हणजे आकाशवाणीच मी समजतों' -स्वयंवर २ कोणाकडून एखादी गोष्ट समजली हें जेव्हा सांगावयाचें नसतें तेव्हा म्हणतात जसें-'चिमणी गुणगुणली' ०**वास**-पु वृक्षादिकावर राहाणें, उंच राहणें

**आकाशांतला बाप**-पु (खि) ख्रिस्तीधर्मांतील देव, ईश्वर 'त्याला होय'-त्याला, त्याचा बाप-आणि बाप नसला तर आकाशांतला बाप आहेच!' -सुदे ५९

**आकाशिकचारी**-स्त्री (नृत्य) चार नावाच्या नर्तनाच्या चर्यावर केल्या जाणाऱ्या एका पायाच्या क्रिया या सोळा आहेत. त्यांचीं नावें-अतिक्रांत, पार्श्वक्रांत, अपक्रांत, ऊर्ध्वजानु नूपुरपादिक, सूचीपाद, अक्षिप्त, दोलापाद, आविद्ध, उद्वृत्त, विद्युद्भ्रांत, अलाता, भुजंगत्रासित, हरिणप्लुत, भ्रमरी, दंडपाद

**आकांक्षणीय, आकांक्ष्य**-वि अपेक्षणीय, स्पृहणीय, इष्ट, इच्छा करण्यास योग्य [सं]

**आकांक्षणें**-सक्रि इच्छा करणें, अपेक्षा करणें 'जाहला यालागीं जो कांहीं। आकांक्षी ना।' -ज्ञा १८ १६३

**आकांक्षा**-स्त्री १ इच्छा, आशा २ गरज, अपेक्षा, मागणी. ३ (कांक्षा या अर्थी चुकीनें) तर्क शंका, संशय 'होत कवित कांहीं। आकांक्षेचीं।' -ज्ञा १५ १०० ४ (कक्षा अप) आक्षेप, हरकत, उत्तरपक्ष [स] ०**पूरण**-न १ प्रतिपाद्य विषयाचें किंवा अर्थाचें पूरण करण्याकरिता लागणारें गौण वाक्य किंवा शब्द पुरविणें 'जो एथें आहे या वाक्याचें तो याच्या प्रयोगावाचून आकांक्षा पूरण होणार नाहीं २ (सामा) उणीव, गरज भरून काढणें-भागविणें

**आकांक्षित**-वि इच्छिलेलें, अपेक्षित, इष्ट, जरूर असलेलें [स]

**आकांक्षी**-वि गरजू इच्छा करणारा, इच्छिणारा [स]

**आकिनी**-अ तेव्हां, असोंकीं-इम ६५ [फा आँकि]

**आकीर्ण**-वि गजबजलेला, गर्द, भरलेला, दाटलेला, व्यापलेला, परिपूर्ण व्याप्त सामासशब्द-जलाकीर्ण, मेघाकीर्ण, वृक्षाकीर्ण [स आ+कृ]

**आकु**—उद्गा १ (ना) जवळ बोलावण्याचा शब्द, (उ० कुत्र्यास) २ (ल) कुत्रा [ध्व]

**आकुंचणे**—उक्रि आखडणें, संकुचित करणें, संकोचणें, आकसणें 'आकुंचूनि अध। देऊनि तिन्ही संध।'–ज्ञा १८ १०३७ [स आ+कुच्=वाकडें होणें]

**आकुंचन**—न १ आखडणें, संकोचणें, आटणें, आकसणें, अर्धवट मिटणें, थोडी जागा व्यापेल असें होणें, संकोच २ आवळणें, घट्ट करणें, आळून घेणें, आकुंचित करणें ३ बारणें, वारू येणें ४ संक्षिप्त करणें, कमी करणें, पसारा, व्याप आवरणें ५ जमा करणें, गोळा करणें [स आ+कुच्-कुंच्]

**आकुंचित**—वि १ संकोचित, आखडलेला, वाकलेला, गोळा झालेला आकसलेला कमी झालेला २ अडचणीचा, अप्रशस्त, संकुचित, लहान (जागा वगैरे)

**आकुत**—न (कु) गंध (कपाळी लावण्याचें), 'अक्षत [स अक्षत]

**आकुती**—स्त्री अफूसारखा अमली पदार्थ, याकुती पहा 'गांज्या प्रतिवर निरन्ती पडली। खाऊनि भिजते आकुती।' –सला ७१ [गु आकुदी, फा याकुती]

**आकुर**—पु (गो) पावसाळ्याच्या आरंभीं खाऱ्या नदीच्या, खाडीच्या काठीं होणारी भाजी [स अंकुर]

**आकुरणें**—क्रि उद्भवणें, प्रकट होणें, अंकुरणें पहा [स अंकुर]

**आकुल-ळ, आकूळ**—वि घेरलेला, ग्रस्त झालेला, पूर्ण व्यापलेला, मग्न, ०व्याकुळ सामासिक शब्द–क्रोधाकुल, चिंताकुल, निद्राकुल, कामाकुल, शोकाकुल, दुःखाकुल 'शोकाकुल रुदनातें। करीतु असे'–ज्ञा २ १ [स आकुल]

**आकुलित**—वि ग्रस्त, व्याप्त, व्याकुल, आकुल पहा 'शोकाकुलित अर्जुन।'–एभा १६ ११७ 'शोकाकुलित द्विपचरदा। म्हणे हें घडलें अद्भुत विंदा।' [स]

**आकुल्यादियोग**—पु (वैद्य) अकोलाच्या कळ्या आवळ काठीं न हलद याचें चूर्ण मधाशीं चाटावें हें २० प्रकारच्या प्रमेहाचा नाश करतें –योर २ १६२ अंकुर पहा [म अकोल]

**आकुवार-री-पण-वत**—वि (गो) कुमार कुवार कुवारपण इ० आकवा-री पहा 'वक्रमाता तू स्वामिनी। तू सदा आकुवारी।'–शिशु ११४८

**आकुळी**—वि आकलन केलेली ताब्यात ठेवलेली स्वाधीन स्वस्थ 'परी जिव्हा न राह आकुळी। हे हरिवदाची चाळी। म्हणोनि रे वर्णी । देवस्य कुमारी।–कथा १ २ ४७ [आकलन]

**आकुड**—वि (व) कुबड कुबडलेले पार दिवस राहि त्यानें मसूर आकुड लागले' [स कूट=वाईट]

**आकूत**—पु आशय, भावार्थ, हेतु इच्छा, अभिप्राय [स]

**आकूर**—अकुर पहा

**आकूल**—स्त्री (गो) एक वनस्पति, अकोली, सर्पदंशावर हिच्या मुळीचा उपयोग होतो [स अंकोट, हिं अंकोल, म अंकोली, गु अंकोल्या]

**आकृति**—स्त्री १ आकार, रूप, घाट २ प्रतिमा, मूर्ति, चित्र ३ शरीर, देह 'जैसा देह पंचभूतीं। मिळोनि होय आकृती।' –गुच २१४ ४ (ल) मूर्ति, व्यक्ति, मनुष्य ५ (गणित) रेषाचित्र, गणितातील विवेचन करितांना त्यामधील सिद्धांतातील विषयीभूत अंगें जींत स्पष्टपणें दाखविलेलीं असतात त्यास आकृति म्हणतात (इं) फिगर ६ एक किंवा अनेक मर्यादांनीं मर्यांगा करून मर्यादिलेल्या पातळीला व अवकाशाला (म्हणजे पोकळीला) आकृति म्हणावें –ममा ४ ७ एक छंद (दंडक वृत्तातील), मदार माला पहा [स] ०लेखक-पु एखाद्या समपृष्ठाकृतीची (प्लेन फिगर) बरोबर, लहान किंवा मोठी नक्कल करण्याचें यंत्र (इं) पॅंटोग्राफ ०लेख-न-पुन चित्राची रूपरेषा (पेन्सिलीनें काढलेली), (इं) स्केच [स]

**आकृष्ट**—वि ओढलेला, आखडलेला, खेंचलेला, आकर्षित [स]

**आके**—स्त्री (गो) नणंद [का अक्का, आके=ती (स्त्री)]

**आकें**—न (कु) मासे धरण्याचें धनुष्याकृति जाळें यास आटा लाविलेला असतो [आख]

**आकेकर (दृष्टि)**—स्त्री (नृत्य) डोळ्याचे प्रांतभाग व पापण्या आकुंचित करणें, दृष्टि अर्धवट मिटणें, झोंपेंतून जागें होणें, डोळे दिपणें वगैरे गोष्टींचा द्योतक अभिनय [स]

**आके**—आंबी पहा

**आकें**—अखें पहा

**आकै**—स्त्री (गो) १ निःसत्त्व स्त्री २ तरुण असून म्हातारी दिसणारी स्त्री 'तिका पळोंच्या जाता? ती सामरी आकै जाल्या'

**आकोचणें**—क्रि मिटणें, आकुंचणें पहा 'कमळ आकोचें कोंड भ्रमर।'–ह ७ २१ 'अज्ञानकर्मीं आकोचलें।'–दावि ५०३

**आकोडा**—(नाग) छत्रीचा दांडा, आकडा पहा [आकडा]

**आकोंता**—पु कोंडाळें, कोंचाळें, घेरा, वेढा (शत्रुसैन्याचा) 'कीं देवद्या निरयाचे आकोंता। आगविले।'–ऋ ८ [स आ+कुंत=शस्त्र प्रा कोंत, म कोंतळ-कोंचाळें]

**आकोर**—पु (व) अंकुर [अंकुर]

**आकोल, आकोल**—न १ मोलल्या चिंचेचा आकडा २ चिंचेच्या फळाचें पोकळ टरफल –स्त्री एक झाड अंकोल अंकोल पहा [स अंकोल]

**आकोल**—स्त्री तंबाखूचा एक प्रकार अकोला गांवावरून नांव पडलें

**आक्री**—( भिमवडी ) अगरी पहा

**आक्रम**—अक्रम पहा

**आक्राडा**—पु (विणकाम) फणीचे पाते फणी बांधण्यासाठी लागणारा लाकडी मारा

**आक्रावाई**—अक्रावाई पहा

**आक्त**—पु ( गो ) दस्त, मुळ, अरगावर धर्मांचा समारंभ [ पो आक्तु=कृत्य, इ ॲक्ट ]

**आक्तार**—क्रिवि ( गो ) बेजीर, एन प्रसंगी

**आक्या**—पु ( व ना ) दताच्या माराने गाडेल्या गाड्या, पाळ, साड, गोंड, फटाच्या 'हा मार्लीचा आक्या माकाट असतो ' [ असा, आराग=न वडलेला ]

**आक्टोपस**—पु समुद्रांत राहणारा आठ हात असणारा एक शीर्षपादी वर्गांतील प्राणी [ इ स अष्टपाद ग्री. आक्टा=आठ+पोडा=पाय ]

**आक्टोबर**—पु इंग्रजी वर्षांचा दहावा महिना [ इ ]

**आक्रत**—स्त्री ( व ) आठ 'मी थाढीं धाणावर आक्रत घेत नाहीं, खरें ते सागतों ' अक्रीत पहा [ अ+क्रीत, अकृत्य]

**आक्रंदणें**—अक्रि मोठ्याने आरडणें, रडणें, टाहो फोडणें, विलाप करणें, आकांत करणें 'बहुत आक्रंदों ससारें । मोहमाया नाळाच्या विखारें । त्रिगुण थेनानी लहरें । तेणें दुःखें थोर आक्रंदलों ।'—तुगा ७०८ 'मच्छ तळमळतो जळाविण । की मात वांचूनि आक्रंदे तान्हें ।' [ आ+क्रंद् ]

**आक्रंदन**—न मोठ्याने रडणें, ओरडणें हंबरडा फोडणें, रडारड, आरडाओरडा विलाप, शोक [ स ]

**आक्रम**—पु १ चढणें, वर जाणें २ चढ, मागें टाकणें, वर्चस्व, आधिक्य, ओलांडून जाणें, वरचढ, वरचष्मा ३ पराक्रम ४ संचार, वारें, गत 'एकासि जाणिवेचा आक्रम । एकाच पोटीं भ्रम । महासिद्धींचा ।'—एभा २ २२६ ५ हल्ला, छापा [ स आ+क्रम् ] °शक्ति—स्त्री १ आवाका, आवरशक्ति, आटोप, पराक्रम 'त्यांची पचविण्याची आक्रमशक्ति नाहीं '—नागा १५५ २ पोंच, समज आकलनशक्ति

**आक्रमण**—न १ आक्रमण करणें, व्यापणें, वेढणें, ग्रासणें, स्वाधीन करून घेणें ( देश शास्त्र, विषय ) वरून किंवा मधून जाणें ओलांडणें २ वर्चस्व स्थापन, वरचढपणा करणें, मागें टाकणें, वर जाणें [ स ]

**आक्रमणें**—सक्रि आक्रम किंवा आक्रमण करणें, आक्रांत करणें, व्यापणें वर्चस्व स्थापन करणें ताब्यात घेणें, ओलांडणें 'तरी आक्रमिन देख दुःखें । सासारिकें ।'—ज्ञा ७ ३५० 'आक्रमी स्वचरणें त्रिजगातें राम ।' [ स आ+क्रम् ]

**आक्रमणें, आक्रुसणें**—आकसणें पहा

**आक्रांत**—वि आक्रमण केलेलें, दडपलेलें, व्याकुळ झालेलें जसें—चामाक्रांत, शोकाक्रांत, भयाक्रांत, पादाक्रांत, मोहाक्रांत [ स आ+क्रम् ]

**आक्रांत**—पु मोठ्याने रडणें, हंबरडा फोडणें, विलाप करणें, आकांत [ स आक्रंदन किंवा स आक्रांत अप ]

**आक्रांतणें**—सक्रि व्याप्त होणें मागें दवणें, भुकेनें व्याकुळ होणें, थगवरणें, सागावणें, धाधावणें 'मला भुकेनें आक्रांतलें ' [ स आ+क्रांत ]

**आक्राळ**—पु मोठ्याने रडणें, आरडणें [ अकाताळ अप किंवा स आ+क्राल ]

**आक्राळविक्राळ**—अक्राळविक्राळ पहा

**आंक्री**—( गो ) अंकुर पहा [ स अंकुर ]

**आक्रूड**—अक्रोट-ड पहा

**आक्रे**—वि ( व ) उग्रपदार, तोंडात भरण्याजोगें, आकलन करणारें 'मुलगी काळी आहे, पण तिचें पाणी आक्रें आहे ' [ स आक्रम् ? ]

**आक्रोश**—पु १ मोठ्याने रडणें, हंबरडा फोडणें, विलाप करणें, आक्रंदन, आकांत, कल्लोळ, चरफड 'बोलत तू निके । आक्रोशींग जेथें । क्षमा असे ॥'—ज्ञा १३ ३३९ २ निंदा, ओरड, बडबड ३ आवेश, आग्रह 'तेवींचि आक्रोशावळे । व्यापारें कोणे एक वेळे । निगाले तरी आथळें । रापे जैसें ॥'—ज्ञा १४ १८९ [ स आ+क्रुश् ]

**आक्वार**—वि ( गो ) अविवाहित, उपवर, आक्वर-वार पहा 'आक्वार चेडू '

**आक्साबोक्सी**—ओक्साबोक्सी पहा

**आक्साव**—न ( गो ) प्रामसंस्थेचा किंवा एखाद्या कंपनीचा भाग ( शेअर ) [ पोर्तु ]

**ऑक्सिजन**—पु प्राणवायु अम्लजन [ इ ]

**आख**—पु १ डोळा 'आखीं त्याहीली कानळ ।'—स्त्रीगीत ३० [ स अक्षि, अक्षन्=डोळा ] २ डोळा आणि कान यांच्या मधील मर्मस्थान, गंडस्थल °मोडणें—डोकेदुखी बरी होण्यासाठीं आखावर विंचवाच्या फुल्या घालणें

**आखन**—पु ( गा ) शेताचा विभाग

**आख**—पु १ संख्या, आकडा, अंक ( गणितातील ) चिन्ह 'तथ स्वानंदाचा आहकु । तत्काळ भेटला नेमकु । त्यागि जीवेंसहि विवेकु । घाटूनि आखु सत्रमार्गी केली ।'—एभा ११ १००० [ स अंक ] २ ( व ) शेंडा आकडा 'आख्याचें पान ' ३ किंमतीचा आकडा किंमतीचा आकडा वर घातलेलें कापड ४ ( ल ) कापड 'सरकारातून अमुकास दोनशें आख पोंचतात ' 'पोटास

(रोख) व आख (चक्र) पावत नाहीं ' –भोमारो ५५४ ५ (सामा) रकम, आकडा 'जैसें सारिया लेख। आख होती एक।'–ज्ञा १३ ३२७ 'निरूपण जमाबंदी चालू आख।'–दावि ४२८ ०घालणें–(व) निश्चितसा अदाज करणें .'तुम्हीं तर नापासाचा आख घालून ठेविला आहे '

**आख**—गाडीच्या दोन्हीं चाकांतून बसविलेला लोखंडी जाड दांडा, कणा, आंस [स अक्ष]

**आख**—(कों) वर्ण्याच्या दोन्ही भाजण्याचें कुपट–आगटी [आग, स अग्नि]

**आंख**—पु गाय, म्हैस इ० जनावराचा फरा ०मोडणें–बसणें–आकडा मोडणें–बसणें पहा

**आंखटणें**—उक्रि घाईनें किंवा साधारणपणें आखणें, कच्ची रूपरेषा काढणें–खरडणें, आराखडा घेणें [स अंकन, म आखणें]

**आखटणें, आंखडणें**—अक्रि (कों) धस किंवा कोंच, लागून पडणें, (काट्यानें, खिळ्यानें) वस्त्र फाटणें [स आ+कृष्ट, प्रा आकड्ढ=खेंचणें]

**आखर्टें**—वि (गो) वाईट, ओखटें, वोखटें [ओखट]

**आखडणें**—उक्रि अखुडणें पहा १ आवरणें, आकसणें, कमी होणें, संकोच पावणें २ ओढून धरणें, संकोचित करणें, आखूड करणें, आवरून धरणें (दोर, वस्त्र, जनावर इ०) 'घासल आखड, सर्व दूध पिऊन टाकील' ३ थांबणें, बंद होणें, 'सध्या आमची गाय आखडली आहे, दूध कमी झालें आहे' 'आता पाऊस आखडला' ४ गर्वानें ताठणें, रागानें रुसून–फुरंगटून बसणें [स आ+कृष्, प्रा आकड्ढ, म अखूड]

**आखंडल**—पु इंद्र [स]

**आंखडा–खाडा**—(कों गो) १ वेड्याचें दुखळें, कुंप णातील अरुंद वाट २ आकडी अर्थ ५ पहा ३ (गो) आगटा ४ अडसर, वेडें, लहान कवाट 'गोरवा यतील आखडी लाव '

**आखडी**—क्रिवि (गो) मागें [आ+कृष्ट=मागें ओढलेलें, प्रा आकड्ढ, म आखडणें]

**आखण–णी–णें, आंखपट्टी**—आंकण–णी–णें, आकणी पहा

**आंखणकडवां**—(चि) आंकणकडवें पहा

**आखणें**—(भि कातकरी) म्हणणें, सांगणें 'एहकी आख ताहा!'=असें म्हणतात '–भिली भाषेंतील गोष्टी २० [स आ+ख्या]

**आखत**—स्त्री दृष्टि, डोळे 'पौर्णिमेचे चांदिने। आखतीं– वीण जाणे। ते यातें पुसवणें। करी जाता॥'–शिशु ८१८ [आख स अक्षन्]

**आखता**—स्त्री अक्षता, तांदूळ 'इअेते ओवाळोनि आखता।' –शिशु ८१७ [अ+क्षत]

**आखंदुळणें**—सक्रि हासडणें, हालविणें, खालीं वर करणें (तांदूळ खारखे धुतले जाण्यासाठीं व भांडींतील पदार्थ सारखे होण्या साठीं) [आ+स्वाद्–खद् म खदखदणें]

**आखबंद**—अखबंद पहा ०डोक्याचा–वि हुषार, हिशेबी 'जगदीं आखबंद डोक्याचा मनुष्य '–भा ६ [अर+बद्ध]

**आखर**—वि अक्षय, अखर पहा

**आखर**—पुस्त्री गावाच्या शेवटचें शेत, गुरें दुपारीं बसण्याची सावलीची जागा, गोठण, गावाची सीमा अखर पहा 'वोढा ळाच्या गुरीं। आखर आतें धुरीं।–ज्ञा १३ ५५८ 'आखरें दुबळी गुरें' –एभा ५ ४११ –क्रिवि शेवटीं, अखेर अखर पहा 'आखर वक्त जाऊन काम काहीं गरज होणें नाहीं '–रा २ ३७२ [अर आखीर]

**आखर**—न १ अक्षर, अकारादि प्रत्येक वर्ण, लेखनचिन्ह 'लिहुनि ऋद्धिपुरीचेंणि आखरें। चरणु गिरी।'–ऋ १३ [स अक्षर, प्रा अक्खर]

**आखरनखर**—अखरनखर, अखीरनगीर पहा ०पेटी–स्त्री (खा) गाडीचा आंस–कणा ज्या लाकडी खोबणींत बसवितात ती

**आखरपख**—अखरपख पहा

**आखरी**—अखरी पहा

**आखरी दूध**—वि (माण) पाणी न घातलेलें दूध, कोरें दूध [अ+क्षर]

**आखररणें**—अखरकणें पहा

**आखरेखणें**—सक्रि (कु) तरतुद करणें, सांभाळणें 'आख रखून टेव '=सांभाळून टेव [स आखणें+रेखणें]

**आखला**—(गु) पोळ, खाड, न वडविलेला बैल, वळु [अखा– आखा=नवध+ल प्र यय, गु आखलो=अडील बैल]

**आंखली**—(कु) आंबे वगैरे झाडावरून काढण्याचा घळ, झेला, आली, गानिवा, आकडी [स आ+कृष्, अंक ?]

**आखा**—वि अखा–अखें पहा

**आंखा**—पु नारळ, कलिंगडें इत्यादि ठेवण्यासाठीं काथ्याची विणून केलेली जाळी, आखणी, गाजवा

**आखाजी**—स्त्री (खा) अक्षयतृतीया

**आखाड**—पु आषाढ, अखाड पहा म्ह० आखाडात तद्द, भादव्यात भद्द ०झड स्त्री १ आंषाढ महिन्यातील एकसारखा लागून राहणारा पाऊस २ रुगाळणें, नीरस–भाषण ०दुचणा–पु रवणा पिडा (हा आषाढ महिन्यातच आढळतो) ०पाटी–स्त्री लग्न झाल्यानंतर येणाऱ्या पहिल्या आषाढ महिन्यातील वधु पक्षात वधु पक्षाकडून वराकडे फळफळावळ मेवामिठाई व विटीदांडू, सगोरी चेंडू, भोवरा, सोंगट्या, बुद्धिबळें, कलमदान, गंजिफा वगैरे खेळण्याचें सामान व पोशाख वगैरे पाठवितात ती ०पागोळी–स्त्री आषाढ

महिन्यांत घराच्या वळचणींतून पडणारें पाणी हें पाणी नवीन लग्न झालेल्या मुलीनें आपल्या सासरीं पाहू नये (म्हणून तिला माहेरीं धाडतात) हें पाहिलें असतां सासुस वाईट ०पाळी–स्त्री आषाढ महिन्यांत देतास द्यावयाची पुरुषाची पाळी ०भूती–पु सोदा, लुच्चा, लबाड मनुष्य, प्राचीन काळीं या नांवाचा कोणी तरी माणूस असावा 'आखाडभूती ऐसा जाण। गुरूपाशीं न्यावया धन। उपदेश घेऊनि दीन। तो दांभिक जाण शठशिष्य' –एभा २३ २३६ –स्त्री कपटव्यवहार, लुच्चेगिरी, लबाडी, भोंदूपणा, ढोंग, दंभ ०लाणी–लाहणी–स्त्री आषाढ महिन्यांतील मेंढयाच्या केसांची कापणी, पातरणी, भादरणी 'मेंढयाची आखाडलाणी झाली' [प्रा लुन्=कापणें, स लवन=कापणें] ०सासरा–पु १ कोणी पुरुष दटावणीची किंवा उपदेशाची गोष्ट सांगू लागला असता त्यास थायका निदेंने म्हणतात २ (ल) दुसऱ्यावर करडा अम्मल चालविणारा मनुष्य नसता मोठेपणा आपणाकडे घेऊन दुसऱ्यावर करडा अमल चालविणारा मनुष्य (लग्न झाल्यानंतर प्रथम येणाऱ्या आषाढांत नव्या सुनेस सासऱ्याचें तोंड पहावयाचें नसतें व यासाठीं तिला दुसऱ्याच्या घरीं ठेवतात–तो परका मनुष्य तिच्यावर सासऱ्यासारखा अधिकार गाजवू लागला म्हणजे त्यास आखाडसासरा म्हणतात या वरून) 'मोठा मेला आखाडसासरा उपदेश करायला आला आहे!'

**आखाडखाना**—पु १ शस्त्रागार, हत्यारें ठेवण्याची जागा 'गेला आखाडखान्यामधीं। पायीं तुमानी वाघनखें चढवि ती।' –एपो ५७ २ तालीमखाना [आखाडा+खाना अखाडा पहा]

**आखाडणें**—अकि ऐट करणें, अकडबाजी करणें [आखडणें]

**आखाडा**—पु (कों) गुरें वगैरे आंत शिरू नयेत म्हणून कुपणाला खिडकीसारखी केलेली अडचणीची वाट, वेढें, (गा) आखाडो [आकडा]

**आखाडा**—पु तालीमखाना, अखाडा पहा **आखाड्यांत उतरणें**–१ कुस्तीस-लढाईस तयार होणें २ (ल) वादविवादास सिद्ध होणें

**आखाडी**—वि १ आखाड-आषाढ महिन्यासंबंधीं –स्त्री आषाढी पौर्णिमा २ आषाढ महिन्यांतील पावसाची एकसारखी झड (क्रि० वसणें, लागणें) ३ अशा पावसाचा काळ, आषाढांतील पावसाळा 'आखाडीच्या दिवसांत दुखणें फार म्हणून जपून असावें' ४ आषाढांत पाऊस न पडल्यामुळें व त्यामुळें पुढें पिकें न आल्यामुळें पडणारा दुष्काळ या महिन्यांतील पावसाचें फार महत्त्व असतें, कारण त्यानें मुख्यत पिकें होतात ५ (ल) कोणत्याहि वस्तूची उणीव, टंचाई चणचण दुष्काळ 'यंदा विहिरी मध्यें पाण्याची आखाडी पडली' 'यंदा पावसाची आखाडी म्हणून धान्याची आखाडी' (सामा) दुष्काळ ६ आषाढांतील शुद्ध एकादशी, या दिवशीं पंढरपूरची यात्रा भरते 'आखाडी कार्तीकी भक्तजन येती।' –आरती विठोबाची ७ या महिन्यांत गुराला होणारा रोग ८ (नाशिक) या महिन्यांत जत्रेत वगैरे होणारे खेळ, धमालीस 'या सोमवारीं आमच्या येथें आखाडी सुरू होणार आहे' [स आषाढ, म आखाड]

**आखांडो**—(गो) आकडा [आकडा]

**आखात**—अखात पहा

**आखामखाला**—पु मराठ्याच्या स्त्रिया न वाटता फक्त वयाने वाढून अथवा सरळच तशा गावांत टाकतात त्याला म्हणतात (हिं) गस मसाला [अखा+मसाला]

**आखोमाखो**—स्त्री (गो) लहान मुलांचा एक खेळ

**आखिन्**—वि (व.) आणखी 'रस दम (=पुष्कळ दिले) देयान, मंग (=मग) आखिन् काय पाहिजे' [आणखी अप]

**आखिला**—वि अखिल, अखिला पहा 'जो सद्गुरूचनें निवाला। तो सायोज्यतेचा आखिला।' –दा ५.३.३९ 'जो गुरुभजनीं भावार्थी। जगामाजीं तोचि स्वार्थी। त्यापाशीं माझी सद्भक्ती। असे तिन्ही अखिली॥' –एभा ११ १५२४

**आखिरी**—अखरी पहा •

**आंखी**—स्त्रि आंबे इत्यादि उतरून काढण्याकरितां काठीच्या शेवटास जाळी वगैरे बांधतात ती, झेला, गाववी, घळ, आंकस पहा

**आखीरश**—क्रिवि अखेरीस, शेवटीं 'त्यावर दुसरे दिवशीं आखीरश इमन बेहिंमत होऊन' –पया ४८० [फा आखिरश्]

**आखु**—पु उंदीर 'ज्याचें आखु वाहन शोभे रणरंगीं।' –गणेशाष्टक मकाम १ ३ [स] ०कर्णी–पर्णी–वि उंदीरकानी, एक वनस्पति, हिचें फूल व पान उंदराच्या कानासारखें असतें

**आखु**—आम आख पहा 'आखु इंद्रियां पडिपाडें। रथ न चाले असताहि घोडे।' –एभा १२ २१६ [स अक्ष]

**आखुड, आखूड**—अखु(खू)ड पहा ०पासोळ्या–वि (व) कमी ऐपतीचा मनुष्य, दरिद्री

**आखुडणें**—कि अखुडणें पहा 'मवतिया से पडे। तैं लाजरी लानो आखुडे। मविती जैसी।' –अमृ ५ २७

**आखुडवटी**—स्त्री (को) (रहाट) कनकड विहिरीवर ज्या लाकडावर फिरत असतें तें लाकूड

**आखुडवण**—न (कों) विहिरींचें पाणी कमीजास्त जसजसें होतें ततसतशी रहाटाची माळ खालीं वर करता यावी म्हणून मध्यंतरी थोडी (माळ) दुमडून बांधून ठेवावयाची दोरी

**आखु(खू)डवत**—न (कों) कोंक्याच्या अगोदरचें लहानसें केळीचें पान

**आखुणें**—सकि (भिगी) आखणें पहा म्हणणें बोलणें 'हावभाव किइन आपुलें' –भिन्नी भार्पेतील गोष्टी ३० [स आ+ख्या]

**आखुपुष्पी**—आउकर्णी पहा

**आखूडमाळ**—स्त्री (कों) विहिरीचें पाणी जसजसें खालीं जाईल त्याप्रमाणें रहाटगाडग्याची माळ लावविता यावी म्हणून मधून मधून माळ खापेक्डाच्या तीन किंवा दोन जुळ्याइतकी आखडून बांधून ठेवितात ती माळ [ सखुड+माळ ]

**आखुत**—(गो) अक्रोट–ड पहा

**आखूर**—भाखर अर्थ १ पहा

**आखें**—आर्वे पहा

**आखेर, आखेरनौवत, आखेरसाल, आखेरी**—अखेर, अखेरनौवत, अखेरसाल, अखेरी पहा

**आखेंलेखें**—क्रिवि आकडे मांडून, लिहून, स्पष्टपणें, अकीं–लेखीं 'तो ज्ञानाचें तत्त्व न देखे। हें सागावें आखेंलेखें। न लगे तुज।' –ज्ञा १३ ८४६ [ अक+लेख ]

**आंखांआंक**—क्रिवि चिठ्ठीवर लिहिलेल्या किंमतीच्या अनुक्रमानें, मूळ किंमतीनें [ आख ]

**आखोटा**—पु (राजा) गलवतांचें वार्षिक भाडें अखोटा पहा (दुसऱ्याला भाड्यानें गलबत चढावयास दिलें म्हणजे त्याच्या पासून भाडें घेतात तें) याच्या उलट गलवतातून एखादा जिनस नेण्याबद्दल भाडें देतात त्यास नोर म्हणतात.

**आखोमाखो**—पु (गो) ल्हान मुलाचा एक खेळ

**आखोर**—अखोर पहा

**आखोळ, आखळ**—पाऊस नसलेला दिवस, खळ असलेला (पावसाचा) दिवस [ स आ+स्खलन ]

**आख्य–ख्या**—अख्खा पहा

**आख्य**—वि नावाचा, नामधेय, नाव धारण करणारा उ० रामाख्य इ० [ स आ+ख्या ]

**आख्या**—स्त्री १ कीर्ति, ख्याति, प्रसिद्धि 'मोठ्या आख्येच्या रूपवती स्त्रिया सुन्दर' –व्हेनिसचा व्यापारी ११ २ लोकापवाद, जनवार्ता, गप्प, बातमी, कंडी ३ अभिधान, पदवी, नाव ४ कथा, आख्यायिका, हकीकत [ स आ+ख्या ]

**आख्यात**—वि १ सांगितलेलें, प्रसिद्धीस आलेलें, बोलवाला झालेलें, कळलेलें २ (व्याक) धातूला लागणारा प्रत्यय, आख्यात विभक्ति 'तोच न्याय धातूच्या प्रत्ययासहि म्हणजे आख्यात विभक्तीसहि लागू आहे' –दामले, शास्त्रीय व्याकरण ४३६, दुसरे कारक प्रत्यय म्हणजे नामास लागणारे विभक्तिप्रत्यय जसे– रामास, रामाचा [ स ]

**आख्याति**—स्त्री ख्याति पहा 'आख्याति अन्यथा, ख्याति। शून्यख्याति सत्ख्याति।' –एभा १६ २०७ [ स ]

**आख्यान**—न गोष्ट, कथा, कहाणी, दृष्टांत 'पुराणें आख्यान रूपें जगीं। भारता आलीं।' –ज्ञा १ ४६ [ स ]

झको १ २७

**आख्यायिका**—स्त्री १ दंतकथा, कल्पित कथा 'या गोष्टी नुसत्या आख्यायिका आहेत' २ इतिहास, पुराण वगैरेंतून परंपरेनें आलेली गोष्ट ३ (सामा) गोष्ट, कथा, आख्यान [ स ]

**आग**—पु. अपराध 'स्वजिजे राळ सुत कविनीं पाहुनि सत्सप्रहात अत्याग।' –मोराभा ४ १६ 'नागरभूतें जाणों पाजी वर दुग्ध करूनिया आग।' –मोराभा ६ ४३ [ स आगस् ]

**आग**—स्त्री १ विस्तव, अग्नि, विस्तवाचा भडका, ज्वाला २ भाजणें, पोळणें, काहील होणें, दाह होणें 'हाता पायाची आग होत आहे, काहीं सुचत नाहीं!' ३ (ल) राग, क्रोध, संताप 'तनुला जाळी। आग भडकली।' ४ आवेश, ताव, तडफ, फाजील उत्कटा 'सत्शास्त्रनि म्हणे जी यावें सद्भावणें न आग मनीं।' –मोवन ४ ५४ ५ ताप, ज्वर (गणे) ६ दारूगोळ्याचा–तोफेचा भडिमार 'मोंगलाची आग भारी' ७ (ल) तोफखाना, तोफ 'मन्सूरअली याजपाशीं आग भारी म्हणून मडभुजे अभिमान होतें' –भाय २७ [ स अग्नि, प्रा अग्गी–अग्गी, प अगन, च आगुन, हिं अगनी ] ०**असणें**–एखाद्या गोष्टीची फार उत्कटा असणें, तीव्र इच्छा असणें ०**उठणें–पडणें** (पोटात)–अतिशय भूक लागणें ०**ओतणें**–आग पाखडणें, संकट आणणें 'अन्यायानें लोकांवर आग ओतली गेली आहे' –विविधज्ञा १ २० ०**झाडणें–पाखडणें**–एखाद्यावर अतिशय दोषारोप करणें, शिव्यांचा वर्षाव करणें, निंदा करणें, कठोरपणें बोलणें, रागें भरणें 'नाहक सख्या आग मजवर पाखडली रे' –प्रला १८७ 'जीवर नित्य करीं अनुराग। तिजवर झाडितसे मी आग!॥' –उत्तरराम (गोडबोले)पद७८ ०**घालणें**–आग लावणें 'निजामअलीनें पुण्यास वेढा देऊन आग घातली' –विवि (१८०६) ८ ६ १०९ ०**मारणें**–(यंत्र) कोळसा घालणें 'बॉयलरात आग मारतेवेळीं'–एंजिनिअरिंगची तोंडी परीक्षा (वार्वीकर) १२ ०**रिघणें**–राती जाणें ०**लागणें**–१ धान्य, वस्त्र इ० महाग होणें २ (लागो) नाश होवो! जळो! मरो! इ० उद्गार 'आग लागो या राजकारणाला!' –तोव १९ ०**लावणें**–दुही माजवणें, भांडण उपस्थित करणें, कलागत लावणें 'या कारणीनें आग लावून दिली असेल ही मोठी चोमडी आहे असे आजोबाच्या तोंडचे शब्द माझ्या कानीं पडले' –पकोघे म्ह० १ आग लावील आणि विझली कीं नाहीं जाऊन पाहील= जो लोकांमध्यें आधीं भांडणें लावून त्याचा परिणाम काय होईल, भांडणें कशीं मिटतील अशी काळजी वाहतो असें बाह्यात्कारी दाखवितो अशा विघ्नसंतोषी मनुष्यास ही म्हण लावतात २ आग लाव्या बोंबमाऱ्या=आपण दुष्कृत्य करून तें दुसऱ्यावर घालणारा ०**वरसणें**–धान्याची, फळाची, गुळाची, तुपाची, लाकडाची आग वरसणें म्हणजे ते ते जिनस पुष्कळ उत्पन्न होण्याइतके प्रचुर होणें म्ह० १ 'आग हातीं धरवेल पण (हा) हातीं धरवणार नाहीं' हें वाक्य

एखाद्या तामसी, एककली, विलक्षण स्वभावाच्या माणसास लाव तात २ आगीवांचून धड नाहीं आणि माधेवांचून रड नाहीं **आगींत उडी घेणें-घालणें-टाकणें**-धोक्याच्या धयात, उद्यो गात, कामात धाडसानें शिरणें किंवा हात घालणें **आगींत किंवा आगीवर तेल ओतणें-घालणें**-भाडण चालू असता तें आणखी विकोपास नेणें तुल० 'दीप्ताल्य विझनाया दाटुनि घालील धाग तेलातें ' -मोउयोग ८९ **आगींत लाहून काढणें**-पक्का कसोटीस उतरविणें **आगीवांचून धूर निघत नाहीं**-काहीं तरी मुळात खरें असल्याशिवाय बाहेर उगीच भुमका उठत नाहीं या अर्थानें असाच दुसऱ्या म्हणी-वाऱ्याशिवाय लाट उठत नाहीं, विकल्याशिवाय विकत नाहीं ६० **आगी वाऱ्याचें भय** (आगी पासून व वाऱ्यापासून)-जरीमरीचें भय **आगी वाऱ्याचे दिवस**-ज्या दिवसात वावटळी फार सुटून गवत, केरकचरा वगैरे चोहोंकडे उडतो (व आगीहि लागतात) ते दिवस (क्रि० होणें, लागणें, सुरूं) [आग+वारा] **आगीस पडणें**-(व )धडपडणें, हावरपणानें-अधा शीपणानें काम करणें **कोणी आग व्हावें कोणी पाणी व्हावें**-कोणी भाडण काढावें कोणी मिटवावें म्हणजे (ल )काहीं माणसें एका स्वभावाचीं असावींत व काहीं निराळ्याच स्वभावाचीं असावींत काहीं चपळ व तत्पर असावींत व काहीं जड व शांत असावींत अशा वेळीं उपयोग (कोणाच्या) **आगींदुगींत नसणें**-अध्या मध्यात नसणें, संबंध न ठेवणें **आगींतून निघून फोंफाट्यांत जाणें-पडणें**-एका संकटातून निघून दुसऱ्या संकटात पडणें **तळ व्याची आग मस्तकास जाणें**-अतिशय राग येणें ' तळव्याची चढली आग। मस्तकास जाउनि भिडली। ' -रामगीतें ५८ **कोरडी आग पुरवते पण ओली पुरवत नाहीं**-विस्तवाची आग पुरवते पण भुकेचा त्रास सोसवत नाहीं

**आग**—अग पहा आग पासून साधणारे सर्व शब्द अ मध्यें पहा

**आगओलाचें**—वि (कों ) पावसाळा संपल्यावर जमिनींत शिल्लक राहिलेल्या ओलीवर पिकणारें (शेत, जमीन) [आग+ओल]

**आगकाडी**—स्त्री विस्तव पेटविण्याची काडी, हिच्या एका टोंकास ज्वालाग्राही द्रव्य लावलेलें असतें व हें टोंक विशिष्ट (ज्वाला ग्राही) पदार्थ लावलेल्या पृष्ठभागावर घासलें असता पेट घेतें [आग+काडी]

**आगकीर्तीचा**—वि (गो ) शारीरिक [स अंग+कीर्ति]

**आगखाडा**—पु अग्नि पेटविण्याकरिता केलेला खाडा खड्डा, शेकोटी, आगटी -भा इ स अहवाल १८३४ [आग+खाडा]

**आगगाडी**—स्त्री लोहमार्गावरून वाफेच्या इंजिनाच्या साहाय्यानें चालणारी गाडी, हिंदुस्तानात आगगाडी १८५४ सालीं मुंबई ते ठाणें येथें प्रथम चालू झाली [आग+गाडी] -डीचें यंत्र-न इंजन, (इ ) लोकोमोटिव्ह

**आगचें**—न १ अंगात एखाद्या देवतेचा किंवा पिशाच्याचा संचार होणें २ गुदद्वारातून बाहेर येणारें आतडें, अगड पहा ३ देरी (फोड्या ) (क्रि० उतरणें, येणें) [अंग]

**आंगच्या**—स्त्री अ (राजा ) दवी, गोवर, उष्ण विकार

**आगजदिवा**—पु (ना ) आकाशदिवा पहा [आकाश+दिवा]

**आगज-स-पाळणा**—पु (ना ) जत्रा, यात्रा वगैरे ठिकाणीं असणारे फिरते पाळणे किंवा झाडास दोऱ्या बांधून केलेले झोपाळे [आकाश+पाळणा]

**आगजाळी-ळ्या**—वि १ आग लावणारा, खोडसाळ, उप द्यापी २ रागीट, तामसी, जहाल ३ दंश ठेवणारा, दुष्ट ४ भांड खोर, त्रागा करणारा, दुष्ट, खोडसाळ (पुरुष, स्त्री ) 'बाई येथें नाहीं माझ्या वऱ्यावर पाणी । आगजाळ्या राडा जळली मला पाहुनि ।' -होला ७९ ५ ओंगळ, वाईट, घाणेरडें (माणूस अथवा कृत्य) [आग+जाळणें]

**आगट**—न (व ) स्मशानात प्रेत नेताना त्यापुढें ज्यामधून विस्तव नेतात तें मडकें [स अग्नि, म आगटी]

**आगटा-टी-टें**—पु स्त्री न १ काटक्या, गवत इत्यादिक पेटवून तयार केलेला विस्तव, शेगडींत घातलेला आहार किंवा निखारे, शेकोटी, धुनी, परसा 'पाहेपा कामिकाच्या पोटीं। सदा क्रोधाची आगटी।' -एभा १७-२६४ २ सोनाराची शगडी-धुडी, वारसरी म्ह० सोनाराचें पाहणें आगटींत=थोड्याशा लाभासाठीं मनुष्य एखाद्या क्षुल्लक गोष्टींतहि मन घालतो या अर्थानें ३ (गो ) हामहुड ४ थाडीची आग [स अग्नि+स्थिति, प्रा अग्गिट्ठिई=आगिटी-आगटी सिं आगिटो ] ॰पेटविणें-भाडण तंटा-कलह-वगैरे-लावणें-चेतविणें, कलह माजविणें ॰विझवून टाकणें-१ आग विझविणें २ (ल ) एखाद्या कुटुंबाचा समूळ नाश, नायनाट करणें

**आगटी**—स्त्री (गो ) एखाद्या जुन्या वस्त्राचा तुकडा, फडकें चिंधी

**आगठवण**—स्त्री (गो ) अंगाची ठेवण, शरीराचा बांधा, ठवण [स अंग+म ठेवण]

**आगठसा**—पु शरीराची ठेवण बांधा, आंगलोट, आंगकाठी 'भीमा ऐसा आगठसा । मानिंय दृष्टी भासतसे ।' -मुसभा ६ १५३ [अंग+ठसा]

**आगठा**—पु अगठा पहा [स अंगुष्ठ]

**आगठी, आगठेदाम-आगठेघरी, आंगठोळा, आंग ठ्याचा मान-आगडी-डें-आंगण**—हे शब्द अ मध्यें पहा

**आंगड**—अगड पहा ‘ आगड खणविला क्षेत्राप्रति । ’ –एभा २१ २५५, २२ शिवाय २९२, ९१३५

**आगड**—वि ( गो ) अगाध, अतिशय ‘ आगड उदाक ’= अगाध जल [ स अगाध ]

**आंगड**—स्त्री ( गो ) बाजार ‘ आगडींत वचून शाक घेत या ’ [ का अगडी=दुकान ]

**आंगडकार**—वि ( गो ) सोबती, सोबत करणारा [ स अग ]

**आगडणें**—क्रि ( गो ) नाहींसें होणें, हरविणें

**आंगडणें**—क्रि आगास आलेपिठें दणें. ‘ चाले वेळ्यातें उक लिती । कातिकें होय आगडिती । ’ –स्वादि ९ ५ ११

**आगडब्बी**—स्त्री ( ना ) काड्याची पेटी, आगपेटी [आग+ डबी ]

**आगडा**—पु अघाडा पहा

**आंगडी**—१ अगडी पहा २ ( गो ) चिंधी, आगनी पहा

**आगडोंब**—पु १ आगीचा भडका २ ( ल. ) मोठें संकट, अतिशय त्रास [ आग+डोंब ]

**आगड्याचेंबगडें**—न रहान मूल ‘ आगड्याचेंबगडें म्हणाल झणीं ’ –दावि ४०९ [ बगा–बगड द्वि ]

**आंगण-आगणें**—अगण पहा

**आगत**—वि आलेला, प्राप्त झालेला, पोंचलेला, दाखल झालेला [ स ] ०**स्वागत**–न आदरातिथ्य, पाहुणचार, पाहुणेर, आदरसत्कार [ स ]

**आगत**—अगत्य, अगत पहा

**आंगतपंगत**—स्त्री मुलाच्या एकत्र भोजनाचा एक प्रकार, *प्रत्येकानें आपआपल्या घरचें अन्न आणून त्यातील काहींची देव घेव करून एकत्र भोजन करणें* [ स पंक्ति द्वि ]

**आगती**—स्त्री १ येणें ‘मृताची आगती निर्गती स्वयें आणें ।’ –एभा १५ ८९ २ विवाहार्थ वराच्या घरीं येणारी वधू, वधूनें उच लून वराच्या गावीं यण्याचा समारंभ [ स आ+गत ]

**आगंतुक**—( विक ) अगातुक –वि १ आकस्मिक, अनपे क्षित, अवचित प्राप्त २ पाहुणा, नेहमीं राहणारा नव्हे तो नवखा, उपरी, फिरस्ता, वाटसरू, पाथस्थ, परकी ३ जेवणाच्या वेळीं बोली न बोलावतां अवचित आलेला ( मनुष्य ) अगातुक ४ ( शाप ) विजातीय वेगळा, परकीय, आपातत प्राप्त ‘ या रीतीनें केलेल्या दिव्यात पुष्कळ आगतुक द्रव्यें असतात –सेंपू २ ४७ ५ शाश्वत नसणारें ( सुख, दु ख, लाभ इ० ) –क्रिवि ( चुकीनें ) आकस्मिक एकदम, एकाएकीं ०**खर्च**–पु अनपेक्षित एकदम, एकाएकी उपस्थित झालेला खर्च ०**गुण**–पु अंगीं नव्हेत ओगे अभ्यासानें येणारे गुण ‘ रूप लावण्य अभ्यासितां नये । सहज गुणास न चले उपाये । कांहीं तरी धरावी सोये । आगतुक गुणाची । ’ –दा २ ८ ३१ ०**लाभ**–पु १ अकस्मात, अकल्पित घडलेला फायदा, घबाड २ आड मिळकत ०**वृत्ति**–स्त्री अगा- तुकी, आगतुकी, भोजनाच्या वेळीं आमंत्रण नसता अवचित जाऊन जेवणाची पध्दति ०**व्रण**–पु ( वैद्यक ) कांहीं प्रसगानें पडलेलें, नैसर्गिक नसलेलें क्षत किंवा खोंद, शारीरव्रणाच्या उलट.

**आगंतुकी**—आगंतुक वृत्ति पहा

**आगदा**—स्त्री ( व ) दिपवाळींत धान्यरूपानें व द्रव्यरूपानें द्यावयाची देणगी [ अग्र+गात ? ]

**आगदावणा**—वि ( व ) आगस्ताव्या ‘ मूल मोठें आग दावणें आहे ’ [ स अग्नि+दर्श=दाव, आग+दावणा, म दावणें= दाखविणें ]

**आगधाड**—स्त्री १ वणवा, आगीचा डोंबाळा, २ ( ल ) अतिशय भूक लागणें ३ जुलमी, छळणारा, त्रासदायक, खोडसाळ मनुष्य किंवा पोर–जनावर, ४ अति दु ख, मोठें संकट, त्रास, आपत्ति [ आग+धाड ]

**आंगधार**—स्त्री दुभत्या जनावराची जोरानें पिळून काढलेली धार ( अवोण पुढें ठेवून अगर वासरू थानास लावून जो मोठा पान्हा सुटतो त्याच्या उलट ) [ स अंग+धारा ]

**आगप**—अगप पहा

**आगपरमे**—पु अव गर्मी, परमा, मूत्रद्वारासबंधीं विकार, लघवी करताना आग होणें [ आग+प्रमेह ]

**आगपाई**—स्त्री १ ( वें ) आगपपणा, उतावळेपणा, धडपड, एखादी गोष्ट अगादर करण्याची घाई, अघाडी २ होरा वर्तवणें, भविष्य सांगणें, हेरणें [आगप,स अग्र+पाती] ०**करणें–साधणें**– *अव्वल साधणें, आघाडी मारणें*

**आगपाणी**—न १ नायट्रिक ॲसिड, नत्राम्ल, ॲक्वा फॉर्टिस ( गेल्या शतकात सुमारें १८५७–चनविलेला शब्द ) २ दारू, मद्य करण्याच्या उपयोगी ३ सल्फ्यूरिक ॲसिड, गधकाम्ल [ आग+ पाणी ]

**आगपेटी**—स्त्री आगकाड्याची पेटी ( हा शब्द सन १८५० पासून उपयोजिलेला आढळतो )

**आगपेण-पैण**—स्त्री उष्णतमुळें अंगावर येणारे देवीच्या फोडापेक्षा मोठे व फार आग होणारे फोड [ स अग्नि+पीटिका ]

**आगबंब**—पु आग विझविण्याचें इंजिन [ आग+बंब ]

**आगबोट**—स्त्री वाफेच्या शक्तीनें पाण्यावर चालणारें जहाज, तारू ( हा शब्द १८१० च्या सुमारास रूढ झाला )[म आग+ई बोट]

**आगम**—पु १ वेद, श्रुति ‘ निगमागम द्रुमफळ । कल्पद । ’–ज्ञा १८ ७ –एभा १४ ११७ २ तत्त्वज्ञान ३ धर्मशास्त्र ४ मंत्रशास्त्र, तंत्रशास्त्र ‘प्रतिपादिती अभिप्राय । आगम जे परमार –ज्ञा १७ १६७

५ प्राप्ति, फल, मिळकत, उत्पन्न ६ मिळकतीचे कागद, दस्तऐवज (अन्य दृष्टीने उत्सुक), पुरावा, प्रमाणपत्र ७ मूळ, सुरवात, आरंभ, प्रारंभ 'पातक आगमीं गोड निर्गमीं कडू' 'आगमे सुख माप्नोति निर्गमे प्राणसंकट' ८ येणें, आगमन 'जालिया होय अध्यागमु। व्योम तें नेणे।' –ज्ञा १८ ३०८ ९ (व्याक) उप पद क्रिया प्रत्यय, शब्दाच्या आरंभीं, मध्यें किंवा शेवटीं नवीन येणारा वर्ण, उ० परिच्छेद या शब्दांत छ च्या पूर्वी जो च् येतो तो ९ (न्याय) आप्तवाक्य [स आ+गम्] ०निरपेक्ष–वि जिचा तावा शाबीत करण्याची (दस्तऐवजानीं) (शभर वर्षे ताब्यात असल्यामुळें) जरूर नाहीं अशी (जमीन, इस्टेट) हक्क शाबीत करण्याची जरूरी नसणारी (मिळकत) [स] ०निर्गम–पु १ येणें आणि जाणें, प्रारंभ आणि समाप्ति, उपक्रम आणि परिणाम, २ (ल) एकंदर व्यवहार, कारभार 'तुमचे व्यवहाराचा सर्व आगम निर्गम मग टाकून आहे' [स] ०रहित–विरहित–वि दस्तैऐवज किंवा हक्क प्रस्थापित करणारा लेखी पुरावा नसलेला, विना प्रमाण [स] ०संपादक–वि एखाद्या जमिनीचा किंवा जिंद गीचा हक्क, सनद ज्यानें प्रथम संपादन केला तो, संस्थापक, मूळ पुरुष [स] ०सापेक्ष–वि जिच्या संबंधीं हक्क शाबीत करणारा दस्तैऐवज नाहीं अशी, आगमरहित (जिंदगी) [स]

**आगमन**—न येणें, जवळ जाणें, उपस्थित होणें 'नोवरीचें दुश्चित मन। कृष्ण आगमन पाहातसे।' –एरुस्व ५ २० [स]

**आगमाग**—पु पत्ता, मागमूस, ठावठिकाण, सुगावा –स्त्री (गो) थांगपत्ता 'तांची ह्या दिवसांत आगमाग काय ना!' [माग द्वि]

**आगमापायी**—वि १ येणारा जाणारा 'सुखदु खादि नाना व्यथा। आगमापायी अविद्यकता।' –एभा ११ ४६३ २ (ल) अशाश्वत [स आगम+अपायिन्]

**आगमी**—वि तंत्रमार्गानुयायी, शाक्तपंथी [स]

**आगर**—पुन १ नारळ सुपारी, इ० झाडांची बाग, मळा, शेत 'वोल्हावतु का मानसें। आगरातळीं।'–अमृ ६ ३५ (सामा) तेंत मळा 'आगर बागा नाहीं मिती।' –वेसीस्व ३ ५४ –मुवन १५० २ घराभोंवतीच्या आवारात भाजीपाला लावण्याची जागा, परसू 'झोंपडीच्या बाहेर गवतावर केळीच्या झाडाखालीं आग रांत न्याहारी करीत' –पान्ह १७ ३ (कों गो) समुद्रकिनाऱ्या वर किंवा खाडीजवळ मीठ तयार करण्याचें क्षेत्र जागा, मिठागर ४ काहीं विशेष गुणाचें किंवा प्रचुरतेचें स्थान। साठा, संग्रह खजीना ५ सम्रहस्थान उसें–विद्येचा आगर गाण्याचा आगर 'पाहेन श्रीमुखें साजिरें सुंदर। सकळ आगर लावण्याचें।' –तुगा २०२० ६ उत्प त्तिस्थान खाण 'जो सकळ धर्मांसि आगरु'–ज्ञा २ ३७४ [स का]

**आगर**—न (काव्य) अग्र, टोंक, अणकुची, शेवट, शेंडा 'मिठाभाची गोडी जिव्हेच्या आगरीं। मस्तक भरल्यावरी स्वाद नेणें।' [स अग्र]

**आगर**—पु चंदन आगर–ह पहा [अगरु]

**आगर**—न १ (वों) कुपणाचें वेडें, दुबेळकें लाकूड (कुप णाला दार म्हणून पुरतात तें) २ गोठ्यामध्यें गाताडी (गव्हाणीचें लाकूड) ज्यास बांधतात तें पुरलेलें लाकूड

**आंगरखा–रखा**—पु (प्र) अंगरखा अंगात बंडीच्या वर घालावयाचा बंदांचा घेरदार, गुडघ्याच्या उंचीच्या मानानें उंच असलेला कपडा, डगला, (गो) रारा [स अंग+रक्षक, प्रा रक्खग–अ, हिं रखा] अंगरख्याचे काहीं प्रकार–**प्यालेदार**–याचा छातीचा भाग प्याल्याच्या आकाराचा कापलेला असतो **कंठीदार**–याचा छातीचा भाग कंठीसारखा असतो –**गुंडीदार**–गळ्याला गुंडी असलेला **नीमकंठी**–अर्धी कंठी (चौकोनी छाती) असलेला –**गज रेदार**–गजऱ्याप्रमाणें चुण असलेला –**छडीदार**–छडीसारखे पट्टे ज्यावर आहेत अशा कापडाचा –**छिटाचा**–चिटाचा, छापील कापडाचा **जरदोजी**–जरीचा –**अगावानी**–दुगेदार अगावानी कापडाचा –**घनातीचा**–लोंकरीचा –**मलमलीचा** इ० आगर रख्याचे अवयव–**आगा**, **कळी**, **खुटकळी**, **पेशकळी**, **बंद**, **चोळा**, **घेर**, **अस्तन्या** इ० यासंबंधीं माहिती त्या त्या शब्दा खालीं पहा

**आगर(री)गांव**—पु आगर–पोफळ, नारळी यांच्या बागा–असलेला गाव [आगर+गाव]

**आगरडा–डें**—पु अग्र, टोंक, अगरडा–डे पहा 'काहीं काहीं आगरडीं। दृष्टांचीं माखलीं॥' –ज्ञा ११ ४१६

**आगरडांगर**—किनारा आणि डोंगर, (व्यापक) सरहद्द, आवार, प्राकार

**आगरबत्ती**—अगरबत्ती पहा

**आगरमाळ(ळि)का**—स्त्री नारळी, पोफळी याच्या बागाच्या एकापुढें एक एकसारख्या असलेल्या रांगा [आगर+माळ]

**आगरवाडी**—स्त्री राहत्या घराभोंवतीं भातखाचरासह फळ बाग व भाजीपाला करण्याचें आवार [आगर+वाडी]

**आगरवाल**—स्त्री एक व्यापारी जात, दिल्लीपासून काहीं अंत रावर असलेल्या आग्रोहा या गावचे राहणारे यावरून नाव पडलें ही जात बहुतेक सर्व ठिकाणीं व विशेषत संयुक्त प्रांतात व पंजा बात आढळते

**आगरामेर**—स्त्री मळ्याच्या कुंपणाजवळची झाडांची रांग, कुंपणाजवळची जागा, शेताची कड, बांध 'का तृणाचा बाहुला। जो आगरामेरें ठेविला।' –ज्ञा १८ ४३८ [आगर+मेर=कड]

**आगरी**—पु १ एक कुणबी जात, आगले कुणबी, बागवान २ बागाईतदार, आगर म्हणजे पोफळीच्या बागा मक्त्याने करणारा हा शब्द १२८९ च्या नागावच्या शिलालेखात आलेला आहे ' हे दाम वरत सकोश कवळिआ मुख्य करूनि समस्ति आगरिया मागि उहिलि ' -यादवाच्या शिलालेख ( श १२८९ ) ३ कोळ्यांपैकी एक जात हे मिठागरात राहातात व होड्या, मचवे हाकारतात यांच्यापैकी काहीं गुत्ते चालवितात हे जेजुरीच्या खंडोबाची भक्ति करतात ४ ( गो ) मिठागरातील कामकरी [ स का आगर ] -वि आगरासंबंधी, आगरात उत्पन्न होणारा (पदार्थ) ०बागायत-स्त्री किनाऱ्यावरील, खाडीवरील रेताड जमीनीतील नारळ, केळी वगैरे होणारी बाग, आगरातील बाग ०भाषा-स्त्री ठाणे व कुलाबा या जिल्ह्यातील आगरी लोकांची भाषा ही भाषा देशी कुणब्याच्या भाषेहून बरीच भिन्न आहे ०मिरी-न अव आगरात पिकणाऱ्या काळ्या मिऱ्याची जात

**आंगरुटा**—स्त्री (कों ) एका अखंड लाकडाची केलेली होडी [ अंग+रुख=वृक्ष ]

**आगरू**—अगरू पहा

**आगल**—वि पहिला, पुढचा -स्त्री १ नांगराच्या बैलजोड्यातील शेवटची बैलजोडी. पहिली धुरवी व दुसरी चाहुरी जेव्हा तीनच जोड्या असतील तेव्हा तिसरी ती आगली, आणि चार किंवा अधिक जोड्या असतील तेव्हा धुरवी व चाहुरी शिवाय बाकी सर्व जोड्यास (शेवटाकडून पहिली-दुसरी-तिसरी ) आगली म्हणतात २ अगल-ला-ल्या-पहा [ स अग्र ]

**आगल**—स्त्री ( ना ) आगळ, अडसर, अर्गला [ स अर्गला ]

**आगलें**—न ( गो ) आकाशातून पडणारे आगीचे पाणी [ आग ]

**आगलग**—वि अग्रगामी

**आगला-डा**—( कु ) आगरला पहा

**आगलाव्या**—वि भांडण, कळ, कलागत लावणारा कज्जेदलाल, कळलाव्या, कळीचा नारद, कळलाव्या, आगलावणे पहा [ आग+लावणें ]

**आगली**—आगळ-ला पहा

**आगलें**—न अव ( भिल्ली ) वांडे [ स अगुरी ]

**आगलें**—न आगडे ' देवविलें पाचपुटी आगलें । '-शिशु ६१ (गो )धुरें 'ताका मारयेन विसलेवीं आगलें धाल्यान ' ' आगलें तोपरे घालप=पोवारा घालणें-चरणिणें [ स अग ]

**आगवण**—अगवण पहा

**आगवणें**—क्रि ( गा ) अगवण, नाश करणें अगवण पहा ' ताणें देवाक येत्रडो आगावण्या '

**आगवळ**—अगवळ पहा

**आगवा**—स्त्री प्रगति, वाढ 'सत समागम धरावा । तेणें ज्ञाननदी होय आगवा या । ' -अमृ ७० [ अग्रवत् ]

**आगवाडा**—अगवाडा पहा

**आगवान**—पु ( गु ) १ पुढारी, मुख्य २ वाटाड्या [ स अग्रवत् ]

**आगवाला**—( यंत्र ) बॉयलरमध्ये कोळसा घालणारा, (इ ) फायरमन [ आग+वाला ]

**आंगवालें**—न ( गो ) अंगात घालण्याचा कोणताहि शिवलेला कपडा, आंगलें ' तू नाटकाक येतूंय ज्यात्यार तुगलें आंग वालें घाल ' [ स अंग+म वाल ]

**आगवीस**—स्त्री ( कु ) १ रानात वणवा लागला म्हणजे भोवतालची झाडें-झुडपें तोडून वणवा विजविणें-थांबविणें ( क्रि० काटणें ) २ आलेलें संकट निवारण करणें [ आग+विझणें ]

**आगशी**—स्त्री ( कों ) अग्नीची ज्वाळा, शोत, अही [ अग्नि+शिखा ]

**आगशी**—स्त्री गच्ची, अगाशी पहा [ स आकाशिका ]

**आगष्ट**—पु इंग्रजी वर्षाचा आठवा महिना हा श्रावण-भाद्रपद या महिन्याच्या सुमारास येतो (इ ) ऑगस्ट [ इ ऑगस्टस् ]

**आगस्**—न पातक, अपराध, गुन्हा [ स ]

**आगस**—वि आगप, लवकर, अगोदर किंवा योग्य वेळेच्या पूर्वी पिकलेलें तयार झालेलें ( फळ-धान्य ) यांच्या उलट मागस ( हल्ली फारसा उपयोग करीत नाहीत ) [ स अग्र+स ]

**आगसणें**—अक्रि योग्य कालाच्यापूर्वी तयार होणें, पिकणें म्ह० आगसली ती मागसली आणि मागून आली ती कापुसली= गर्भार झाली ( विशेषत सुनेच्या बाबतीत उपयोग ) तुल० ' कानामागून आली, तिखट झाली '

**आगसपाळणा**—पु ( व ) आश्विनाच्या महिन्यात मुल्या जागेत लाव व उंच झोंके घेण्याकरिता पाळणा बांधतात तो [ आकाश+पाळणा ]

**आंगसा**—पु ( गो ) वस्त्राचा तुकडा, रुमाल, फडका ' तो आंगसा हाणाहाड पठोया ' [ स अंगवस्त्र, म अंगोच्छा, हिं अंगच्छा ]

**आगस्कार**—पु अपराधी, गुन्हेगार ' परि म्हणतों यासमयीं येतों आगस्कराहि अन्या या । ' -मोभीष्म १ १०९. [ स आगस्+कृ ]

**आगस्ता**—अगस्ता पहा

**आगस्ताळ**—अगस्ताळ अस्ताळ पहा

**आगळ-गुळ-गाळ**—पु ( कु ) दारूच्या फडाचा तावडा रस आगळ पहा

**आगळ, आगळगाठी, आगळडाव, आगळा**—अगळ-अगळगाठी-अगळडाव पहा

**आगळ**—स्त्री (व) १ जमीनींत खोदलेली लाव चूड, दोष चूड, चर २ विटीदांडू, गोट्या खेळण्याकरिता केलेली खाच, अगळ पहा [का अगळु=खाच]

**आगळणें**—क्रि रानव्याच्या खालील पुढें दणें अगळायणें पहा [आ+गळ्]

**आगळा**—वि १ अधिक, वरती, जास्त 'चउ आगळे चाळीस गह।' –ऐपो १४ शेर आगळें मण=१ मण १ शेर म्ह० (व) जवा आगळी काशी=काशीपेक्षा जवमर अधिक २ अधिक किंमतीचा, उंची, वरचढ, श्रेष्ठ, मोठा 'अमावइनि सुरस। मुळीं येना आगळा सुरस।' –मुआदि २ ५७ 'सहाय दुसरा नसे तुज विणें बळें आगळा' –केका ४६ ३ (संख्येनें किंवा परिमाणानें) मोठा, पुष्कळ 'दखानिया धार्मिकाची लीळा। अपविनास खेद आगळा।' ४ अधिक (वाईट, फाजील, खोडयाळ) ५ उध्दट, उद्दाम, माहूर (नोकराचें भाषण, वर्तन वगैरे) 'तो रुक्मिया असत्य स्वार्थ बोले। म्हणे येथेंळें स्या जिंकिलें। तों रेवतीवर म्हणे आगळें। असत्य न बोले कपटिया॥' –ह ३२ ६९ ६ निराळा, भिन्न, वेगळा 'उपमा देऊं अप्सरा। तरी त्या व्यभिचारी समग्रा। दे त्याहून आगळी सुदरा। पतिव्रतारत्न॥' –कथा १ ८ ९२ [का अगळ=मोठा, श्रेष्ठ, स अग्र+ल, प्रा अग्गल=अधिक, हिं आगला, सि अगळे]

**आगळा**—स्त्री अडसर, अर्गळा अगळ पहा 'गळेत त्या आपण आगळा हो।' –सारह १ ७१

**आगळी**—स्त्री (गु) अगुली अप

**आगळी, आगळिक, आगळीक आगळी-स**—स्त्री १ आधिक्य, वाढ 'तैसीं मि आ केंगी थारी आगळी।' –दाव ३९० 'रंगीं सुरगतेची आगळीक।' –ज्ञा १ ३८ 'करतळानें ताइनि ववतुर्की। आगळीक दावणें।' –मुआदि ३१ ४६ २ दुराचरण, खोडी अमर्यादा, औद्धत्य, मर्यादेपलीकडील कृत्य (क्रि० करणें) [का अगळिक, म आगळा] ३ (कायदा) कोणा मनुष्याच्या ताब्यातील गाडींत (मालात किंवा मालावर) धमकी दणाच्या, त्रास देण्याच्या किंवा गुन्हा करण्याच्या इराधानें जाणें (इं) ट्रेसपास

**आगा**—उद्गा अगा पहा 'आगा तुम्हा दवा दाघा जणा।' –उषा १०६९

**आगा**—पु १ अगरख्याचा पेश कळी आणि खुन्कळी याच्या मधील भाग २ पुढील भाग –वि मुख्य श्रेष्ठ उ० आगा हैदर [स अग्र, प्रा अग्ग, फा आगा=श्रेष्ठ]

**आगा**—स्त्री अगा (इ) पहा

**आगा**—न अव (गो) काळ्यास लागणाऱ्या औषधी, अर्गे [म अग]

**आगा**—अ (गो) येथें, इथें, इग [तुल० गुण अग, इग, इथ]

**आंगा**—पु अगरखा, कुर्तें, अंगा पहा

**आगाऊ**—अगाऊ पहा

**आगाखानी**—पु एक मुसलमानी धर्मपथ, आगाखानाला गुरु समजणाऱ्या इस्मायली मुसलमानांचा पथ [आगा+खान]

**आंगागघडी, आंगागणिक**—क्रिवि (वों) पृथक् पृथक्, निरनिराळें, प्रत्येकीं, वेगवेगळें, प्रत्येक माणसाला निराळें 'आगागडी शेला पागोटें दिले' 'आगागणिक कारभार पृथक् लागले तर राज्य बुडतें' आगागडी–ड्या पहा [अग+अग+वर्नी, अग+गणिक]

**आगाजणें**—अगाजणें पहा

**आगाजा**—१ अगाजा पहा ०उठणें-होणें–बोभाट होणें २ वाद्य 'आगाजाचे धडधडाट।' –नेतील्व ६ ७६ ९ ६३

**आगाडा**—(गा) आघाडा

**आगाड्याचें घगाडें**—न (गो) अवाच्यासवा सांगणें, अतिशयोक्ति [का]

**आगांतुक-क्री**—आगतुक पहा

**आंगाथिणें**—क्रि १ पुढें होणें 'अगाथीनि आगाथिलें ठीक लग।' –दाव १०८ २ अंगिकारणें अंगाथिणें पहा [म अग+स्था]

**आगादज्वारी**—स्त्री अगात ज्वारी, मृग नक्षत्राच्या वेळीं पेरतात ती ज्वारी, लवकर येणारी ज्वारी, अगात पहा [स अग्रजात, म अगात+ज्वारी]

**आगाप**—अगप पहा

**आगापिछा**—अगापिछा पहा 'आता मला आगा पिछा काहीं नाहीं काशीवासास जावें म्हणजे जन्माचें सार्थक होईल'

**आगाबानी**—अगाबानी पहा 'अगीं आगाबानी अगरखा। चढूकडून डौल सारखा।' –प्रला ११६

**आगामी**—वि पुढील, येणारें, भविष्यकाळचें, भावी [स आ+गम्]

**आगार**—अ (गो) अगावर अग पहा ०जावप-क्रि अगावर जाणें, विगळणी होणें, ऋतुप्राप्त होणें, रजस्वला होणें ०घॅवप-क्रि १ अगावर घेणें २ (ल) मुद्दाम दुसऱ्याशीं स्पर्धा करून त्याला तोशीस लावणें, खाट वसणें ०यावप-क्रि अगावर येणें, रोंकणें वसकन अगावर येणें ०लोळप-क्रि अगावर लोळणें, विधिनिषेध न बाळगता (एखाद्याशीं) लगट करणें याखेरीज वाक्प्रचारासाठीं अग पहा

**आगार**—न १ घर, मंदिर, वाडा, महाल, अगार पहा २ रास, सचय, खाण [स आगार]

**आगार**—पु स्त्री अंकुर, (व) आगारें अगारी पहा 'तें चौपासि वेऊनि आगारें। खोलावती॥' –ज्ञा १५ ९२ 'जन्मवरी आगारी। वाढतीचि असे॥' –ज्ञा १५ १७२ [स अग्र]

**आंगारइचें**—क्रि (गो) रागावणें, चिडणें [स अगार=अग्नि]

**आंगारडवी**—स्त्री (व) आगकाडयाची पेटी, आगपेटी [अंगार+डबी]

**आगारा-री-रें**—पुस्त्रीन अंकुर, दोंडा, डिरी आगर, आगार पहा [अग्र]

**आंगारा**—अंगारा पहा

**आगाव**—अगाऊ पहा 'आगाव रुपये दिले असता सस्ते मिळेल, ऐतेवेळेस दिले तर महाग पडेल'

**आंगावो**—पु (गो) मोठेपणा

**आगाशी-सी**—अगाशी-शी पहा

**आगासदिवा**—(व) आकाशदिवा पहा

**आगासताळपणा**—अकरताळ(पणा) पहा

**आगाह्-ही**—अगा(ह्-ही) पहा

**आगाळा**—पु (चि) मुडा, ज्यात धान्य अथवा पेरणीचें बीं बांधून ठेवतात असा पेंढयाचा अंडाकृति बोचा, मोटकुळें, गाठोडें विवळा, कोळें इ०

**आगिअेल-येल**—न आग, विस्तव, आगीचा डोंब –वि विस्तव किंवा अग्निसदृश 'जें आगिएलाचा सरोवरीं। घालिजे पुढिल तें॥' –शिशु ७५६, ९८० [अग्नि+आलय]

**आगिओ**—पु (गु) जोंधळ्याच्या पिकात उगवणारें एक रोपटें यामुळें जोंधळ्याचें ताट सुकतें, आगी पहा [का अगे=कोंब, अंकुर, रोप]

**आंगिक**—अंगिक पहा

**आगिटा-ठा**—पु विस्तव, आगटी 'कोणी एक सुभटा। विचाराचा आगिटा॥' –ज्ञा १३ १०३६

**आगिटें**—न आगटी 'मग तिहीं आगिलीं वागींचीं काष्ठें। तापावया केलें आगिटें॥' –कथा २ ९ १९

**आगिठ-ठी-ठें**—पु स्त्री न आगटी, भगी, शेगडी, विस्तव, आग 'वीड आगिठा पडे। तरी मळु तुटु वानी चढे॥' –ज्ञा १८ १२१ 'लोहाराची आगिठी जैसी॥' –एभा २६ ४४ 'हें वाग्ब्रह्म याचें सारें। साकारपणानें वमोरें। प्रपचाचें आगिठें। अपाड धुपे॥' –स्वादि १३ ३ ४१ 'नेत्र जैसे कुडींची आगिठी॥' –कमुरा ७७ ४५ [स अग्नि+स्था]

**आगिनगाडी**—स्त्री आगगाडी वाफेच्या साहाय्यानें चालणारी गाडी, वाष्परथ (इ) रल्वे 'टोपीवाल्याचा मूल्लूक। आगिन गाडीला कुरूप।' –बाळगीत [स अग्नि–म आगिन+गाडी]

**आगिया**—पु काजवा, अग्या 'सीतकाळी आगिया देखोनि आगि म्हणोनी पालि झाकिला।' –पच १.४५

**आगियाळें**—न आगिअेल पहा १ अग्निकुंड 'धूतें आतु सूनि आगियाळें।' –ज्ञा १४ १६२ २ ललाटस्थ अग्निचक्र [सं अग्नि+आलय]

**आगिवळा**—पु १ अभक्ष्य पदार्थ ठेवल्यानें अशुद्ध झालेलें भांडें शुद्ध करण्यासाठीं वावयाची विस्तवाची आच (क्रि० देणें) २ इमारतीचें लाकूड (नवें तोडलेलें) आकसण्यासाठीं त्यारा धुर करविणें –ळी–स्त्री अग्नीची ज्वाळा [स अग्नि+वलय]

**आगी**—१ अग्नि, आग, विस्तव, निखारा 'जिव्हारीं आगी सुदली। तापत्रयाची।' –ज्ञा ३ २५४ **–चा पुलाव**–पु अति तापट, कडक मनुष्य [आग+पुलाव] **–चा लोळ–कल्लोळ**–पु १ आगीचा डोंब, झोत २ मोठा, दांडगा प्रतिस्पर्धी, योद्धा ३ (ल) संतापी मनुष्य **–ची जीभ**–स्त्री अग्नीची ज्वाळा, अग्निजिव्हा शिखा **–चा विमा**–पु आगीमुळें कोणत्याहि मालमत्तेच्या होणाऱ्या नुकसानीबद्दल किंवा नाशाबद्दल मोबदला देण्याचा करार **–ची वृष्टी**– स्त्री १ तोफ, बंदूक याचा मारा २ (ल) सक्टपरंपरा 'तिच्यावर सारखी आगीची वृष्टी होत होती' –इप ५६

**आगी**—पु शेरट '(घाण्याचा बैल) भवता फिरे लागवेगीं। परी पाहता नलगे आगी।' –एभा २१ २३२ [स अग्र=टोंक]

**आगी**—स्त्री (कर्ना) पड जमीनींत प्रथमच पीक करताना उगवणारें रोपटें [का अगे=कोंब; अंकुर]

**आंगी**—अंगी पहा

**आगीदुगी**—स्त्री १ भानगड, चोंबडेपणा करून किंवा मध्यें तोंड घालून दुसऱ्यानें केलेला अपराध किंवा मूर्खपणा पुढें आणणें, चहाडी, आगलावेपणा (अकरणरूपात उपयोग व ज्या वस्तूवर क्रिया घडते तिची षष्ठी योजितात) (क्रि० काढणें, पाहणें, करणें, उकरणें) 'मी कोण्हाची आगीदुगी पहात नाहीं' २ उठाठेव, दुसऱ्याची पंचाईत, भानगड 'बाबा कोणी कांहीं करो, कोणी कोणाची आगीदुगी करूं नये' [स आगस्, म आग=अपराध, द्वि] **आगीदुगींत नसणें**–भानगडींत नसणें, उठाठेवींत, पंचायतींत न पडणें **आगीभागी पडणें**–धोक्याच्या व दगदगीच्या धंद्यात पडणें, गोत्यात पडणें [स अग्नि, म आग+भाग]

**आगीन**—स्त्री अगिन, अग्नि (अप) 'तिसऱ्या पानावरी जळते नित्य आगीन।' –लावणी (मसाप १ १ १)

**आगीमण्यार**—स्त्री मण्यार, सर्पातील एक अतिउग्र, भयंकर विषारी जात [आग+मण्यार]

**आगीमाशी**—स्त्री जगलामध्यें सहा प्रकारच्या माशा आग असतात, त्यांपैकीं एक ही चावली असता दंश सुंध्यासारखें होऊन सवतो, सुजतो व पिकतो ही माशी प्राण हरण करणारी आहे [स अग्नि+मक्षिका]

**आंगु**—अग पहा

**आंगुठ**—पु आगठा ' दया धोन्याची नीरी। आगुटेन चेपते पुढा।' —ज्ञा १८४६ [स अगुष्ठ]

**आगुदान**—न बाराव्या शतकातील देवगिरीच्या राज्यातील एक सोन्याचें नाणें. 'तीस तीस आगुदाना दिधलिया ' —भाअ १८३६ पृ ६३

**आगुल-गूल**—स्त्री (व ) नागराच्या बैलजोड्यापैकीं शेवटची, पुरवणी जोडी, आगली पहा २ बैलाच्या चाहोरातील पुढचा भाग 'आगुलीची जोडी दुलनी असली तरी चालते ' —वि (व ) आगुल्या, आगुली (आगली) हाकणारा मनुष्य [स अग्र+ल, म आगल]

**आगुल्ल**—वि (गो ) कजाग, कर्कश (स्त्री, पुरुष), भाडखोर 'तें झगडू गेल्यार सामके आगुल्ल।' [पोर्तु आगुल्ह तुल० स अग्नि+तुल्य]

**आगुळ**—न १ आठ यव रुदीचें माप, आठ यव एकादोजारीं एक ठेवून जें प्रमाण होईल तें २ बोटाच्या रुंदीचें माप [स अगुलि]

**आंगुळी-आंगूळ-आंगोळी**—अगुळी पहा

**आगू**—पु श्रौत यज्ञात याज्या म्हणावयाच्यापूर्वी म्हणावयाचा विशिष्ट मत्र [वै ]

**आंगूळ**—अगूळ, अगवळ पहा

**आगे**—उद्गा अग, अगे पहा

**आगें**—क्रिवि ( हिं ) पुढें [स अग्र] ०**मागें**-क्रिवि पुढें मागें, अमळ पुढें अगर पाठीमागें, याबाजूला अगर त्याबाजूला, जवळपास, इकडे तिकडे, अलीकडे पलीकडे (स्थल, काल सबधीं) 'मागाल तेव्हाच रुपये देईल असें प्रमाण नाहीं, परतु आगेंमागें देईल, बुडविणार नाहीं ' ता श्लोक त्याचें टिकाणीं कोठें आगेंमागें असेल ' [आगे,स अग्र +म मागें का मग्गु प्रा अग्गओ मग्गओ ]

**आगें**—क्रिवि खुद, स्वत जातिनिर्शी 'तेचि वस्तु होये आगें। या नाव साधक।' —दा ५ ९ २१ [स अग]

**आगेरू-रू**—अगरू ( रोग ) पहा

**आगेल**—न १ (गा ) आग विस्तव 'त्येचा घराचेर आगल पडों '[स अग्नि] २ (कु ) नारळाचें उष्ण तेल [आग+तेल]

**आगेवान**—वि पुढारी दर वीस इसमावरील नाईक —इक्राची शिकार ४ [स अग्रवत्-वान सिं अगवाणु]

**आगो**—उद्गा (कों गो ) अग पहा 'आगो, तूं थै वचू नका '

**आँगोगडी-ड्या**—क्रिवि (कों ) प्रत्येकावर निरनिराळा अन्वय होईल असें (देणें सागणें) प्रत्येकीं, निरनिराळ्या व्यक्तींस स्वतत्रपणें ' एक जण कोण ते काम सागा, आंगोगडी सागू लागला तर त्या काय करावें ' 'सगळे गावकऱ्यास शभर रुपये बक्षीस दिले, आगोगडी दिले नाहींत ' [आँग+गडी ]

**आंगोघडी-ड्या**—क्रिवि १ आगोगडी पहा २ पुन पुन, वारवार [अग+घटि-डि ]

**आगोज**—वि मोठें, भयकर, अगाध 'भलतें जड पडो भारी ।जीवावरी आगोज।' —तुगा ६६१ [सं आ+गर्ज्?]

**आगोट-टी-ठ**—स्त्री पावसाळ्याचा आरंभ अगोट पहा 'आगोटी मेघ वर्षले।' —गीता १ २३९१ [स अग्र+वृष्टि]

**आगोटणें**—सक्रि (व ) आवरणें, ताब्यात आणणें 'बैल आगोटले तेव्हा गाडी धावली ' [स आकृष्ट]

**आगोटता**—वि (व ) आटोपशीर 'त्याचा कारभार आगोटता आहे ' [आगोटणें]

**आगोतली-थली, आगुतली, आगोती**—स्त्री (कों ) केळ, चवेण याच्या पानाचा शेवटचा—जेवणास उपयोगी पडेल असा भाग दाडाव्वन याच्या उलट 'श्राद्धाकरितां चार आगोतल्या पाहिजेत ' 'केळीच्या लाव लाव आगोत्या हींच त्याचीं रुप्याचीं तारें ' —पाव्ह १७ [स अग्र+दल]

**आगोदर-धर**—अगोदर-धर पहा

**आगोपती**—क्रिवि अगप्रती, वेगळाले, प्रत्येक जण आपल्या पुरतें, स्वतत्रपणें 'ते चौघे भाऊ आगोपती ससार करू लागले म्हणून घर बुडालें ' आगोगडी पहा [स अग+प्रति]

**आगोस**—स्त्री (कों ) उन्हाळ्याच्या सुरवातीचे दिवस जों— आगोठ=पावसाळ्याचा आरभ [स अग्र+उस्र=किरण, प्रा उस, आग+उस्र ]

**आगोस्तर, आगोस्ती**—अगास्तर-अगास्ती पहा

**आगोळ**—१ (कु गो ) रातबीच्या फळापासून होणारा रस, तावडा रग अगूळ पहा २ अगवळ पहा

**आगोळा**—(गो ) आगाळा पहा [चि गो आगोळो]

**आंगोळी**—अगुळी, अगोळी पहा

**आग्न**—पु आग, विस्तव 'आग्न म्हणे आमुचें घर। भस्म करू।' —दा १ १० ४६ [स अग्नि]

**आग्नेय**—वि १ विस्तवासबधीं, अग्निदेवतेसबधीं [स] —स्त्री २ आग्नेयी (अग्निदेवतेची पूर्व व दक्षिण यामधील ) दिशा

**आग्नेयी**—स्त्री अग्नि अधिष्ठित दक्षिण आणि पूर्व यामधील दिशा [स ]

**आग्या**—पु १ खाजरी, खाजकुइली, स्पर्श झाला असतां आग होणारी एक वनस्पति, पीतवर्णी हिरवी जाईच्या पानासारखीं पानें असून सफेद रगाचीं लहान थोडें येतात, धान्याच्या शेतांत हीं झाडें झाल्यास पीक जळून जातें 'आग्या आणि कोचकुहिरी।' —दा ३ ७ ५. २ काजवा अग्या पहा ३ मुतेरा (कोळी), पाऊग

कमी झाला असता जोंधळ्याच्या पिकावर होणारा किडा –कृषिवि १७४ ४ आगी माशी, मोहळाची माशी, चावणारा–आग करणारा ( चावल्या–डसल्यानंतर ) साप इ० प्राणी –वि १ आग करणारा, दश करणारा २ अतिशय रागीट, तापट, जहाल (मनुष्य, स्वभाव) [स अग्नि] ०घणस-घोणस–पु ज्यानें दश केला असता अगाची आग होते असा घणस ०झोटिंग–पु आग्यावेताळ पहा 'जासाई जोसाई मायाराणी। मारको मेसको यक्षिणी। आग्याझोटिंग जखिणी त्यास भजोन जन बुडाले॥' –द १३ ६७ ०देवी–स्त्री दर्वी (फोड) चा एक जाज्वल्य प्रकार ०फुरसें–पु (कु) सर्पाची एक जात ०विंचू–पु एक प्रकारचा विंचू काजव्यासारखा प्रकाशणारा 'आगाया विंचु चाला म्हणून काय कडींच क्वळावा।' –भज ८८ ०वेताळ–पु १ आग लावणारा पिशाच्चाचा राजा याचा एक मत्र आहे तो जपला असता ज्या मनुष्याचा नाश कर्तव्य असेल त्याच्या शरीरास किंवा मालमत्तेस आग लागते रात्रीं डोंगरावर इकडे तिकडे जाळ दिसू लागला असता आग्या वेताळाचा सचार सुरू झाला असें म्हणतात २ अति तामसी, तापट, तडफदार मनुष्य 'आमचे रावसाहेब म्हणज शुद्ध आग्यावेताळच आहेत' ०सर्प–पु एक सापाची जात 'गगनीं लागती ज्वाळ। आग्यासर्पे।' –दावि २४४ ०सोमल–पु मनशीळ

**आग्यें फुरसें**—न (वों) एक जातीचें फुरसें, सर्प [आग्या+फुरसें]

**आग्यें मोहोळ**—न आगीमाशीचें पोळें [आग्या+मोहोळ]

**आग्येल**—न (गो) अग्निवर्षाव, आकाशातुन पडणारें आगीचें पाणी [आग+तेल]

**आग्रयण**—न नवीन धान्याचें भक्षण, नवीन तांदुळाच्या केलेल्या भाताचा स्थालीपाक (होम) करून तो भक्षण करणें हा विधि आश्विन शुद्ध पौर्णिमेस करतात, नवान्नेष्टि [स]

**आग्रह**—पु १ जो हेतु किंवा जें मत एकदा झालें असेल तें बळकट धरणें, दुराग्रह, दृढनिश्चय २ हेका, हट्ट (क्रि० धरणें) 'एसियाहि करू म्हणती तयाचा। आग्रहोचि उरे।' –ज्ञा ३ ६३ ३ विनवणी, प्रार्थना, गळ घालणें, अगत्याचें बोलावणें किंवा आमंत्रण (क्रि० करणें) ४ दुराग्रह, अनमान, हरकत 'राज दश राहव वधिता भीमभुजाग नसे लवायास। आग्रह करिति असाच्या चरणीं त्वत्सुत वसे ल्वायास।' –मोभीष्म ५ ३१ [स आ+ग्रह] आग्रहास पेटणें–आग्रह धरणें

**आग्रहणें**—अक्रि आग्रह धरणें 'आग्रहाल तरी सेवीन अम वैश्वानर।' –वसा ४२

**आग्रहायण**—पु मार्गशीर्ष महिना [स]

**आग्रहायणी**—स्त्री १ मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमा २ त्या पौर्णिमेस करावयाचा पाकयज्ञ (एक होमविधि) ३ (ज्यो) मृगनक्षत्र दासो १ २८

**आग्रही**—वि १ निग्रही, आग्रह धरणारा, हट्टी, हेकेखोर (विशेषत निंदाव्यजक अर्थानें उपयोग) २ चिकाटी–नेट धरणारा ३ आग्रह करणारा, अगत्य दाखविणारा

**आग्राव**—पु (गो) हरकत, विरोध 'हाजेर म्हणॅलों कायच आग्राव ना' [स आग्रह, तुल० पोर्तु आग्राव्हो]

**आग्राळ**—स्त्री (व) आळ 'त्यानें माझ्यावर उगीच आग्राळ घेतली'

**आंग्ल**—वि (इ) इग्रज किंवा इग्रजी यासबधीं [इ ॲग्लो]

**आंग्लोइंडियन**—वि युरेशियन, हिंदुस्थानातील रहिवाशी, हिंदुस्थानात जन्मलेले, इग्रज व हिंदु याच्या मिश्रणानें उत्पन्न झालेले इग्रज

**आगळ**—न (व) सदा

**आघ, आघटी, आघटें**—आग-टी-टें पहा

**आघरू**—(प्र) अगरू, आगरू, अगरु पहा

**आघवा**—वि एकदर, सर्व, अवघा अघवा पहा 'म्हणऊनि अपाडु हें आघवें। निर्धारिता।' –ज्ञा १ ६९, 'असत्य हे माया म्हणता प्रत्यक्ष। मायेचा हा पक्ष दृश्य आघवें।' –व १६५

**आघळ**—पु स्त्री दाराचा अडसर, अगळ पहा [स अर्गल]

**आघळणें**—आघाळणें पहा

**आघा**—वि १ सर्व, अवघा, अघवा पहा २ अघा पहा

**आघाट-ण-णें**—पुन सीमा, हद्द मर्यादा, चतु सीमा 'भूत ग्रामाचे आघाट चिरिले चारी' –ज्ञा १३ ४५ 'ऐसि आघाटणे चिन्हा।' –शक १२८९ तील यादवाचा नागाव येथील शिलालेख (ग्रथमाला पु ६) [स आघाट=हद्द, मर्यादा]

**आघाटी**—स्त्री एक तंतुवाद्य, किनरी, एकतारी 'रंगावलि जे तु घेई आघाटी। गाई स्वराचा पल्लिमठी।' –शिशु ६९७ [वै आघाटि (ऋग् १० १४६ २)]

**आघाडा-डी, आघेडा**—अघाडा–डी, अघेडा पहा

**आघात**—पु १ तडाखा, गुद्दा, चपेटा, धक्का, प्रहार, मार 'माया करुणा हे करिते बहुत। किती सोसू या जगाचे आघात।' –तुगा ११९ २ वधस्थान ३ (यत्र) चलनयुक्त पदार्थ दुसऱ्या पदार्थास जो धक्का देतो तो –यमू २११ [स आ+हन्]

**आघार**—पु कोणत्याहि होमात मुख्य देवतेसबधीं याग होण्यापूर्वी अग्निमंडलाच्या वायव्य कोपऱ्यापासून आग्नेय कोप ऱ्यापर्यंत एक व नैर्ऋत्य कोपऱ्यापासून ईशान्य कोपऱ्यापर्यंत एक अशा सतत धार धरून दान तुपाच्या आहुति देतात ती [स]

**आघारी**—स्त्री शुद्र लोक श्राद्धाच्या वेळीं पितरांना उद्देशून अग्नींत तुपाची किंवा भाताची आहुती देतात ती, किंवा काव ळ्यास काकबळी (भाताचा पिंड) देतात ती [स आघार]

**आघाळणें**—क्रि वस्त्र वगैरे खळखळणें, पिळणें, धुवणें [ स आ+क्षालन, आ+घळ ( ध्व ) किंवा का अगल्लु, अगळ=हालविणें ] ०घाघ(घा)ळणें-खळखळणें

**आघिवळा, आघिवळी, आघीदुगी, आग्रीमण्यार**—आगिवळा, आगिवळी, आगीदुगी, आगीमण्यार पहा

**आघी-आघीमारी**—आगीमारी पहा म्ह० मेलें मेंढरू आघीस भीत नाहीं

**आघोट**—आगोट, अगोठ पहा.

**आघोळ-आंघूळ**—अंघोळ-अंघूळ पहा

**आघ्या**—आग्या, हा व यापासून साधलेले शब्द आग्या खालीं पहा ०घाघळी—स्त्री वाघळी नावाची समुद्रांतील माशाची एक जात

**आघेंं**—न १ ( कों ) मधपाशाचें पोळें, आग्यें मोहोळ [ आग ] २ आग्या, मधमाशा, आगीमाशी [ स अग्नि, म आग ]

**आग्रव-आग्रो**—आग्रह पहा [ स आग्रह अप ]

**आघ्राण**—न वास घेणें, हुंगणें [ स ]

**आघ्रात**—वि वास घेतलेलें हुंगलेलें [ स ]

**आंच**—१ विस्तवाची झळ, धग, शेक २ विस्तवाची उष्णता ( शिजविण्याकरिता, भाजण्याकरिता, औषधें, धातु वगैरे वितळ विण्याकरितां ) 'विस्तवाची आंच लाविली म्हणजे धातूचा रस होतो' ( क्रि० देणें ) ३ ( ल० ) काळजी, चिंता, धामधूम, सावध गिरी ( क्रि० लागणें ) 'गगाधराला संसाराची आंच लागली' ४ धक्का, धसका, भीतियुक्त मनाची स्थिति, भय, भीति ( क्रि० बसणें ) ५ ( ल ) चोट भारणें, जरूर जाणें, हात पोळणें, ( एखाद्या धाडसांत किंवा उनाडपणांत ) तोटा येणें [ स अर्चिस्, हिं व आंच का इजु ] ०बसणें–लागणें–पोळणें, चटका बसणें, डाग दिला जाणें –चीत असणें–धावात–दरा यात असणें

**आचरट**—अचकट पहा

**आचकणें**—क्रि १ जोरानें ओढणें, हिसका देणें हिसडणें, २ तोडणें खुडणें सोरणें ३ झुगारणें, हिसकणें ४ ( अश्लील ) *उपटणें, *विचकणें [ स अच्=जाणें वाकविणें ]

**आचका**—पु. १ एकाएकीं चलाखीनें ओढणें, ताण, खेंच, हिसका एकदम दिलेला धक्का ( क्रि० देणें ) २ भीतीचा धक्का धसका ( क्रि० बसणें ) ३ झटका, कंप [ स अच्, का अजिके=भय ? ]

**आचखूड, आसखूड**—पु ( व ) बैलगाडीचा आंस, आंस [ स अक्ष, स आस ]

**आचकुल**—वि ( गो ) जायवदी, लुच्चा अचकुल पहा

**आचकोन**—पु (वास्तुशास्त्र) ( अप ) आचैकोन, दान रेघा ज्या कमानी एकामागीं मिळतात त्या जागीं होणारा कोन, हिंग्रजर वरील कोन [ इ आर्चकोन ]

**आचंगणें, आचांगणें**—अचांगणें पहा

**आचंगुल**—वि कृपण, अचगळ पहा 'हीन आणि कृत्रिमी। रोगी आणी कुकर्मी। आचंगुल आणी अधर्मी। वासना रसे।'–दा २ ३ १४. [ अ+चगट ]

**आंचणी**—स्त्री आच २ व ३ अर्थ [ आच ]

**आंचणी**—स्त्री ( कों ) ओटी, ज्या घरीं लग्न वगैरे असेल त्या घरच्या बायकाची ओटी भरण्यासाठीं हळद, कुंकू, खा, नारळ, अक्षता इत्यादि साहित्य तबकात भरून नेतात ती [ स अर्चन, किंवा अच्=पूजणें, प्रा अचण ]

**आचणी**—स्त्री रवीनें घुसळण्याची दोरी [ स अच्=वळविणें ]

**आचणें**—( गो ) जमीन तयार करणें, जमिनीचा पोकळपणा घालविणें [ गो आंचप स अच् जाणें, फिरविणें ]

**आचंद्रार्क**—अ सूर्य, चंद्र आकाशात आहेत तोंपर्यंत शाश्वत चिरकाल, निरंतर, यावच्चंद्रदिवाकरौ [ स आ+चंद्र+अर्क ]

**आचपळ**—अचपळ पहा

**आचंबणें**—अक्रि ( व ) आश्चर्यचकित होणें, अचंबा वाटणें, नवल वाटणें [ अचंबा ]

**आचंबा**—अचंबा पहा

**आचमन**—न १ धार्मिक कृत्याच्या आरंभीं शरीरशुद्ध्यर्थ उजव्या ( गोकर्णाकृति ) तळहातावर पाणी घेऊन तें मंत्र म्हणून पिणें, असें तीन वेळ मंत्रासह पाणी पिऊन चौथ्या वेळीं दोन्ही हात धुणें या सर्व विधीस आचमन म्हणतात कर्माच्या शेवटींहि दोन वेळ आचमन करतात त्याप्रमाणें भोजनानंतरहि आचमन करतात 'आचमन करून सागर। उदरामाजीं निरविला॥' ०देणें–आपोष्णी घालणें 'वर वाहेना तुला आचमन शुद्धाला याया।' –विक्र ५, २ ( ल ) एकदम फस्त करणें, आचमनासारखें पिऊन टाकणें, मुखरोग नाहींसा करण्यासाठीं वामळीच्या सालीच्या काढ्यात तुरटी, मध घालून त्याच्या गुळण्या करणें [स आ+चम्] ०पळी–स्त्री संध्येची पळी

**आचमनीय**—वि आचमन करण्यास योग्य ( पाणी )

**आचरट**—अचरट पहा

**आचरण**—न १ वर्तणूक, वागणूक, विधि, एखादें कृत्य करणें–पार पाडणें २ व्रत, नियम चाल, आचार, रीत, रिवाज ०करणें—वरहुकूम चालणें, नियम पाळणें, आचरणें, अभ्यासणें [ स आ+चर् ]

**आचरणीय**—वि १ आचरण करण्यास योग्य, पाळण्यास योग्य ( उपास, व्रत विधि इ० ) २ अनुसरणीय, अनुसरण्यास योग्य, करण्यालायक

**आचरणें**—उक्रि १ आचरण करणें, टेवणें, वागणें 'बहिणी म्हणे ऐसे भक्त आचरित। तयासी भगवत जवळींच।' –ब ५४०

२ चालविणें, करणें, उरकणें, अभ्यासणें 'ज्या अगना कधि न आचरिल्या तपातें ॥' [स आ+चर्]

**आचरय—न** (रा) आश्चर्य [स आश्चर्य अप]

**आचरित—वि** १ आचरलेलें, पाळिलेलें (व्रत, काम), अभ्यासिलेलें, अनुसरलेलें —न १ वर्तणूक, वागणूक, आचरण २ (कायदा) कर्ज वसूल करण्याचा एक प्रकार—ऋणकोच्या दारात उपाशीं बसणें

**आंचवणें, आंचविणें**—अचवणें पहा [स आचमन]

**आंचळ-ळी**—अचळ-ळी पहा

**आचांगळी—वि** वाईट, अभद्र, निंदात्मक अचागळी पहा 'आचागळी अधिक शब्द। ऐकून उठिला वीर गद।'—एरुस्व ९ ४ [अ+चागलें]

**आचार—न** लोणचें, अचार पहा

**आचार—पु** १ श्रुति-स्मृतींना अनुसरून वर्तन-वागणूक, विहित आचरण, शास्त्रशुद्ध वर्तन म्ह० दोन प्रहर आचार, नतर अनाचार=बारा वाजेपर्यंत धर्माचरण करून नतर विषयासक्त होणें किंवा दोन प्रहरपर्यंत धर्म कर्म केलें तर तो आचार व त्यानतरचा अनाचार समजला जातो २ (सामा) वर्तन, वागणूक राहाणी सामासिक शब्द —शिष्टाचार, दुराचार, लोकाचार, कुलाचार, सदाचार आचार-प्राप्त-युक्त-शील-प्रिय-वेत्ता, आचारानुमत-लुप्त इ [स आ+चर्] ०पद्धति—स्त्री वागण्याची चालरीत, नेहमींचें आचरण, वर्तनक्रम, राहाणी ०पूत-वान-शुद्ध-संपन्न—वि १ कुळधर्म व कुलाचार व इतर रीतीभाती वक्तशीर व शुद्ध रीतीनें आचरणारा, सद्‌वर्तनी २ योग्य, रीतीप्रमाणें 'कनल सलगीच्या मनुष्याबरोबर जरी देवघेव करणें झालें तरी खतपत्र करून करावें, कांहीं कोणताहि व्यवहार आचारशुद्ध असावा' ०प्रसिद्ध—वि लोकरूढीतील शिष्टाचाराचा, शिरस्तेवाईक [स] ०भ्रष्ट-वर्जित-हीन—वि विहित धर्मकृत्यें न करणारा, न आचरणारा, अनर्गल बेशिस्त, धर्मलंड अनाचारी ०भ्रष्टी—वि आचारभ्रष्ट (अशुद्ध रूप) म्ह० आचारभ्रष्टी सदा कष्टी ०वार्णे—(गो) अमगळ अभद्र [स आचार+विहीन] ०विचार—पु शास्त्रविहित असें कुळाचार, धर्माचार, विधि सप्रदायशुद्ध आयुष्य घालविण्याचा मार्ग, नियम, शिस्त, मर्यादा इ०, शास्त्रोक्त आचार विचार 'शहरात राहिलें असता तादृश आचारविचार रहात नाहींत ०शील—वि आचारसपन्न सदाचारी ०शोधक—वि सदाचार व अनाचार यांचें परीक्षण करणारा विवरण करणारा

**आचारी—पु** (प्र) आचार्य १ गुरु उपदेष्टा, उपदेश करणारा 'जैसी तैसी असो पुल्लिंगाच सोई। धरिती हातींपायीं आचारिये ॥'—तुगा १३०३ रामाचारी, कृष्णमाचारी वगैरे नावात आचारी हें पद आचार्यांचें अप असतें [स आचार्य] २ स्वयपाक करणारा, स्वयपाकी दुसऱ्याच्या घरीं स्वयपाकाची नोकरी करणारा (विशेषत ब्राह्मण जातीचा) [स आचार्य] ०पाणक्या—पु १ स्वयपाक करणारा व पाणी भरणारा २ (ल) जड बुद्धीचा, अशिक्षित, ठोंब्या माणूस

**आचारु—पु** आचार, वागणूक 'येर आचारु जो परावा। तो देखता कीर बरवा।'—ज्ञा ३ २२०

**आचार्य—पु** १ उपनयन करणारा, वेदमत्र शिकविणारा गुरु २ उपाध्याय, धर्मकृत्यें चालविणारा, भटजी, पुरोहित ३ धार्मिक पथाचा सस्थापक, प्रवर्तक इ० मध्वाचार्य, रामानुजाचार्य ४ अध्यात्मज्ञान करून देणारा 'जें जाणणें या आचार्याचा गावीं। गुरु त्याची आचार्यपदवी। जें सकळ गुह्याचा गोसावी। पविना रावो।'—ज्ञा ९ ४७ ५ पडित, निष्णात या अर्थी नावाच्या पुढें लावण्यात येणारी पदवी, प्रोफेसर जसें—राघवाचार्य, व्यकटाचार्य इ० ६ (खिस्ती) मिनिस्टर याचा पर्याय, खिस्ती लोकाचे धर्मविधि, सस्कार व उपासना चालविणारा दीक्षित, खिस्ती धर्मोपाध्याय, सेवक 'कोणी कारण न दाखविल्यास आचार्यानें वधूवराच्या आज्ञाना पुढें चालवून याप्रमाणें उपासना करावी'—उपासनापद्धति ३१, —ईवि १३८ —साम्रा ६८ इ० ७ (उप) आचारी, स्वयपाकी ८ आद्य शकराचार्य किंवा त्या पीठावरील अधिष्ठित व्यक्ति 'आचार्यस्वामींची साने उपमा।'—सप्र २ ९९ ०वरण—न धार्मिक कृत्यासाठीं आपल्या अगत्यानें यजमान एखाद्या उपाध्यायाची धार्मिक पद्धतीनें योजना करतो तें, पौरोहित्य 'कश्यपा दीधलें ब्रह्मासन। दत्तात्रेया आचार्यवरण।'—कथा २ १४ ६० [स आचार्य+वृ]

**आचार्योपास्ती**—स्त्री गुरुसेवा आचार्याची पूजा 'हे आचार्योपास्ती। प्रकाशिली तुजप्रती।'—ज्ञा १३ ३७०

**आचावाचा**—अचावचा पहा 'काम वाढ भय वासनेच्या द्वारें। झाडावें तें धीरें आचावाचा।'—तुगा २८०३

**आचिरकाय—स्त्री** (गो) कल्पना, अदाज, अटकळ

**आची**—अची पहा

**आचीर—न** (क कुण) आश्चर्य [स आश्चर्य अप]

**आचुक-चौक आचेवक-चुक**—(गो) अचवणें पहा

**आचुडमूळ—वि** आमूलाग्र सबध 'मग दोघां लागे सकळें। आचुडमुळें पीतरंगें'—ऋभा ५ १७४ [स आ+चूडा+मूल]

**आचुंबित**—अचुंबित पहा

**आचुळ-चूळ, आचूळ—पु** १ गुराचें थान, सड, आचळ २ (विणकाम) विणून झालेल्या कापडाचे उरलेले शेवटचे धागे, ज्यास नवीन ताणा (विणावयाच्या सुताचे उभे धागे) जोडतात ३ या व इतर अर्थी अचळ, अचल पहा [स अचल]

**आचूक**—अचूक पहा

**आचोज—न** नवल आश्चर्य, अचोज पहा 'नद नदन हा आचोज आतुला वो'—निगा ६७ [स आ+म चोज]

**आचांद्रा, अचंद्रा**—वि १ चिकट्या किंवा चिपड्या डोळ्याचा, अश्रु दृष्टि अगलेला, २ (ल) चारळ्या मुद्रेचा [स आ+तंद्रा=चद्रा]

**आचर्लें**—वि (गो) एकटें, एकटें

**आच्छन्न, आच्छादित**—वि १ झाकलेलें, वर पसरलेलें, व्यापलेलें २ लपविलेलें, गुप्त, गुपित [स आ+छद्]

**आच्छरिय**—न (गो) आश्चर्य, नवल [स आश्चर्य अप]

**आच्छा**—अच्छ पहा

**आच्छादक**—वि १ झाकणारा, पसरणारा, व्यापणारा २ लपविणारा, गुप्त ठेवणारा [स]

**आच्छादणें**—उक्रि. १ झाकणें, पांघरूण घालणें (वस्त्र वगैरेनीं वस्तू इ०) २ छपविणें, लपविणें [स आ+छद्]

**आच्छादन**—न १ झाकणें, पांघरूण घालणें, आच्छादणें, व्यापणें, लपविणें छपविणें [स] २ गुप्तावस्था, गुप्त स्थिति गुप्त असणें ३ (सामा) झाकण, पांघरूण, कपडा, वस्त्रप्रावरण ४ आच्छादनाचें साधन, जसें—तरवारीचें म्यान, घराचें छप्पर, कीटकावरील कोश इ०

**आच्छुरित**—न (अगहार) (नृत्य) उजव्या हातानें नूपुरकरण करणें, निकुंचिविणें व मग व्यतिकरणातील हात वरून निकुंचविलेलें नीट करणें, नंतर उजवा पाय अलातक करून त्याच पायानें सूची करणें व दोवनीं करिहस्त व कनिच्छिन्न करणें [स]

**आच्याव**—पु (गो) शाचेची वरणी [पोर्तु आशाव]

**आच्यावाच्या**—अचावचा पहा 'आच्यावाच्या बोलवितो। ज्यासीं त्यासीं ॥'—दा १३ ९ १६

**आज**—अज पाहा हा शब्द व त्यापासुन झालेल्या म्हणी—उ० आजीं नसणें इत्यादि, अजी शब्दाखालीं पहा

**आज**—क्रिवि वर्तमान चालू दिवस—काळ, या शब्दापुढें बहुधा दिवस शब्द येतो जसें—आजचा दिवस' [सं अद्य, प्रा अज्ज सिं अजु हिं गु आज व आइज, प अज्ज, गो आज] ०उद्या—क्रिवि पुढें ढकलणें लांबणीवर टाकणें (क्रि० करणें) 'त्याचें आजउद्या दोन वर्षें चालतें' ०काल—क्रिवि चालू काळ, आताशा, सांप्रत, या दिवसात, सध्या हल्लीं सांप्रतकाळीं दीन—गरीब याचा समाचार घेणारा आज काल कोण आहे बाबा?' ०तंव-ता गाइत-यत,-पर्यंत—क्रिवि या दिवसापर्यंत आज पावेतों. ०दिन-पर्यंत—क्रिवि आज पावेतों ०दिवसीं—क्रिवि १ सुदस्ता किंवा मागें या दिवशीं २ आज, आजच्या दिवशीं ०लग—क्रिवि (हा शब्दप्रयोग फक्त लिहिण्यातच उपयोगात येतो, बोलण्यात नाहीं) आतापर्यंत [अद्य+लग] ०ला—क्रिवि १ आज आजच्यासाठीं, करता 'मला आजला खर्चावयास कांहीं रुपये पाहिजेत' २ आजच्या दिवशीं एव्हाना 'मुंज झाल्यापासुन जर अध्ययन करतें असतें तर आजला पंडित म्हणून गणले असतें' ०वर-वेरी-वैरी—क्रिवि आजपर्यंत, हा काळ पावेतों ०वर्षी-वर्ष-वर्षी—क्रिवि ज्या काळास आज वर्ष झालें तो काळ दाखविणें या अर्थी, तो दिवस, 'आजवर्षीं आम्हीं पटांगण गेलों होतों' [आज+वर्ष] म्ह० १ आज मरा उद्या तुम्हां=चारू पर्यंत काम करून घेणें, उद्यावर न टाकणें २ आज अमीर तर उद्या फकीर

**आजगर**—अजगर पहा

**आजगा-गो**—(गो) भाता (साळी)ची एक जात

**आंजणी, आजिणी, आंजणवाडी**—स्त्री (कों) रांजणवाडी, डोळ्याच्या पापणीस होणारा एक फोड-पुटी [स अज्=काजळ घालणें, अंजनावर्ती]

**आजन**—पु १ अंजन पहा २ अंजनीपुत्र मारुती [स]

**आजन्म**—क्रिवि १ जन्मापासून, जन्मप्रभृति या शब्दाच्या ऐवजीं आजन्मपर्यंत, आजन्मापासून, आजन्मप्रभृति, आजन्मात इ० शब्द चुकीनें योजतात [स आ+जन्म] २ (चुकीनें) मरणापर्यंत, जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत जसें—आजन्म सेवक=लाइफमेंबर 'मी आजन्म ब्रह्मचारी राहणार'—सु ५१ ०मरण(णें)—क्रिवि जन्मापासून मरणापर्यंत

**आजन्मत**—क्रिवि १ जन्मापासून २ (चुकीनें) मरणापर्यंत, आमरण

**आजन्मात**—क्रिवि १ जन्मापासून आजपर्यंत, आजतागायत २ सर्व आयुष्यात

**आजम**—पु (व) सामर्थ्य, अजम पहा 'तुमच्यात तर आजम नाहीं'

**आजमा**—पु अजमोदा, ओवा, अजमोदा पहा

**आजमावणें**—अजमावणें पहा

**आजमावा**—अजमाव पहा —वामन विराट ८ ३१ (शर)

**आजमास**—अजमास पहा

**आजरली, आजुर्ली**—आजणी पहा

**आजराहे**—अज्राहे पहा

**आजली**—अजली पहा

**आजवळ**—आजूळ पहा 'राम म्हणे वत्से! तू आजवळा पावलीस न वनातें।'—मो उद्योग १२ ८, —मोवन ६ ५३

**आजस्वारी**—अ (आज स्वारी अमुक मुक्कामीं आहे वगैरे मायना) स्वारीतून स्वारीमधून (हुकुम निघतो वी=आज्ञापत्र निघतें जें) जुन्या कागदपत्रात हा शब्द आज्ञापत्राच्या आरंभीं लिहितात [फा अज्=पासून+स्वारी]

**आजा**—अजा पहा 'वधिजे वैसें धनाचे आज्याला'—मोभीष्म १ २४ म्ह० १ आजा मेला नातू झाला=एकाच्या जागीं दुसरा आला २ आज्यास नातू शिकवितो

**आजागुर**—अजागुर पहा

**आजात-द्**—वि स्वतंत्र, मुक्त अजात पहा 'याच्या मुला माणसाचें चालवून (त्याग) आजात करावें' -ऐटि १२२ [फा आझाद् = स्वतंत्र]

**आजादी**—स्त्री स्वातंत्र्य [फा आझादी]

**आजादेवी**—स्त्री एक क्षुद्र देवता (शूद्रादिकांची) [अजा+देवी]

**आजानुबाहु**—वि उभा राहिला असता ज्याचे हात गुडघ्या पर्यंत पोंचतात असा (मनुष्य) 'एके आजानुबाहो नृपनाथा।' -एमा ३ ७६ [स आ+जानु+बाहु]

**आजाया**—आजोबा पहा

**आंजाम**—अंजाम पहा

**आजार**—पु १ रोग, दुखणें, व्याधि २ (ल) उपद्रव, पीडा, जुलूम, त्रास 'त्याणीं रयतेस काडीचा आजार द्यावया गरज नाहीं' -रा ८ ७४ [फा आझार्, तुल स आ+ज्वर]

**आजारणें**—अक्रि आजारी पडणें, नादुरुस्त होणें, तंदुरुस्ती नसणें 'जाड्यापरी तुज धड बनवावें, आजारतो तू नित।' -घड्याळ कविता (विवि १९१२ नोव्हेंबर)

**आजारणें**—अजरणें पहा

**आजारी**—वि दुखणाईत, रोगी, पीडित, बेमार, व्यथित [फा आझार्, तुल स आ+ज्वर]

**आजास**—(कों कु) आजा पहा

**आजि**—आज 'आजि या म्हणे रामयामी। आणि तू आता।' -लक्ष्मीनारायणकल्याण नाटक (शके १६०४) 'प्रमत्र नाहीं मन आनि तुझें।' -सारुह ९ १०. ०च्यानें-क्रिवि आजपासून, यापुढें 'काकुळती यती हरी। म्हणे आजिच्यानें मी न करी चोरी।' -ह ९ ७० [स अद्य म आज]

**आजि**—पु रण, समर, युद्ध 'कथिलें तेंचि तुजें विजयें मन आजि आजि-दमातें।' -मोद्रोण ११ ८४ [वै आजि=शर्यत, युद्ध]

**आजिजी**—अजिजी पहा

**आजिमांय**—स्त्री (गो) आजेसासू

**आजिमाव**—पु (गो) आजेसासरा

**आजी**—अजी पहा

**आजी**—क्रिवि आज 'आजी जरी रे अगतो। तरी मनाचा कदा न विश्रमतो।' -दा ३ ४ ३४ [स अद्य]

**आजीआजी करणें**—अजीअजी करणें पहा

**आजीज**—वि दीन अजीज पहा 'मारता मारता मग परंतु केवळ आजीज हाऊ नये' -भाव ७ [फा आजिज=दीन]

**आजीबाई**—स्त्री अजी, अजीबाई पहा

**आजीमाजी**—पु (कु) लग्नाचा थाट

**आजीव**—क्रिवि जन्मभर, मरणापर्यंत, आयुष्यभर उ० आजीव सभासद=लाईफमेंबर (इ) [स]

**आजीवक**—पु १ भिकारी, भिक्षुक २ एक धर्मपंथ, अस्तित्व सुमारें ख्रिस्तपूर्व ६ वें शतक [स]

**आजीस**—स्त्री (कों) आजी

**आजीसबब**—क्रिवि या कारणास्तव-साठीं, अजीसबब पहा [फा]

**आजु**—क्रिवि (गो) आज 'आजुन सपलें पुण,'

**आजुनि-आजून**—अजून पहा

**आजुरदा-आजुरा-आजुर्दा**—वि खिन्न,दु खी,श्रमी अजुरदा पहा 'रामा बापास झाल्यामुळें आज तो फार आजुर्दा आहे।'

**आजूद**—न (गो) बस्ति, एनिमा, पिचकारी आन्यूल पहा

**आजूबाजू, आजूबाजूस**—क्रिवि आसपास, भोंवताली, सभोंवतालीं, जवळपास, शेजारीं 'बैल शेतात नमला तर तेथेंच आजूबाजूस कोठें असेल पहा' [बाजू द्वि, फा बाजू=हात द्वि]

**आजूळ-आजोळ**—अजूळ पहा ०वंश-पु मातामहाचा वंश

**आजेगुरु**—अजागुरु पहा

**आजेचोर-चाण**—अजेचोर पहा

**आजेसासरा**—पु सासऱ्याचा किंवा सासूचा बाप, बायकोचा किंवा नवऱ्याचा आजा, आजेसासूचा नवरा [आजा+सासरा]

**आजेसासू**—स्त्री सासऱ्याची किंवा सासूची आई, बायकोची किंवा नवऱ्याची आजी, आजेसासऱ्याची बायको [आजा+सासू]

**आजोबा**—पु १ बापाचा किंवा आईचा बाप २ वृद्ध मनुष्यास आदरार्थी म्हणतात [आजा+बा]

**आजोरा**—पु १ कष्टद, त्रास (जास्त कामाचा वगैरे) अजोरा पहा २ विनाकारण लागणारा खर्च [फा आझुर्दा]

**आजोवळ, आजवाळ**—न (गो) आजोळ 'त्ये का आजवाळ आसाम्?'

**आजाळा-ळा, आजवळा-ळा**—अजवळा पहा

**आज्माईश**—पु परीक्षा प्रत्यय अजमावणें पहा 'एक वेळ आम्हीं स्नेह म्हणून तयें चाल करणें पडती याचा आज्माईश नवाब साहेब यास अद्याप नाहीं' -रा १९ १०१ [फा आझ्माइश्]

**आज्य**—न १ होमीचें तूप २ (सामा) तूप (गाय, म्हैस इ० चें) 'आज्य मी समिधा। मंत्रु मी हवि।' -ज्ञा ९ २६६ -वि होमीसंबंधीं [स अंज]

**आज्याबा**—आजोबा 'मामाजीस म्हणणें, तें न म्हणे आर्ये आज्याबा।' -मोआदि ३२ ७२ [आजा+बा]

**आज्यूत**—न (गो) एनिमा, बस्ति 'ताका दिमपट्टें आज्यूत घेंपाची संवय आगा' आजूद पहा

**आझान**—न (मशीदीच्या मनोऱ्यावर उभें राहून केलेले) नमाज पढण्यासाठीं बोलावणें, हाकामारणें [फा आवाझिदन्]

**आझुइ–आझुणी, आझूं–ई, आझुण–णु–न–नि, आझौनि**—क्रिवि अजून, अद्यापि 'अगा! जी हर्षकेशी आझुइ किती चाळविशी।' –शिशु ७८ 'आझूई उजगरा किर्ती। कराल तुम्हीं।' –शिशु १२२ 'आझौनि साडौनि अहंकारातें।' –दाव ३७६ [अजून]

**आझोडणें**—क्रि चांगलें झोडणें, ठोकणें, मारणें 'विकारें विचारातें आझोडी।' –भाए १८२,१९५,४३७ [स आ=आस मन्तात्+म झोडणें]

**आट**—स्त्री अट पहा १ हट्ट, हेका 'नाहीं सारून कोणी पाहिलें वृथा आट धरणें। इद्रास पाहिल्यामुळें भगेंद्र भरणें' प्रला १९२ २ (ना) मिजास, अभिमान, पीळ, ताठा, दिमाख ३ वेटा, वळसा, पीळ 'भीतरु भला आटा। आदि शरीराचे या सेवटा'–ऋ ९२ ४ अडचणीची जागा, आडवाट 'मार्गे रोधिला देखोनी आट। मार्गस्थातें मांडिला अनर्थ।' –मुवन ७ १७९ [का अड्ड, म अट]

**आट**—पु संताप, त्रास, अटअट पहा [स आर्त, प्रा अट्ट]

**आट**—स्त्री १ धारगे मऊ होण्यासाठीं कण्या उकडून त्यात पीठ घालून तयार करतात ती, शिजलेल्या तांदुळाच्या कण्या २ –पु आटवलेला पदार्थ 'वधाचा वळसा। चैतन्याचा आट भवें जैसा।' –शिशु५९५ ३ आटणी ४ (ल) नाश, शेवट 'विरळ देखोनि दळभार। मागधवीरीं केला मार। आट भविनला थोर। हाहाकार उठिला॥' –एरुस्व १० ४२ [का अट्टु=शिजविणें, म आटणें]

**आटक**—न (कों) करवदासारखें एक फळ हें पिकल्यावर आत–बाहेर लालसर होतें

**आटक**—न (गो) नारळाचा वाळलेला गोटा, पाणी आट लेला नारळ [का अट्टु=आटणें]

**आटक**—स्त्री कैद, प्रतिबंध, अटक पहा

**आटकमाटक**—१ लहान मुलांचा एक खेळ या खेळांतील गाणें–'आटकमाटक। चने चाटक। चने झाले गोड गोड। त्यावर बसला। रामजी पोर। रामजी पोराचे हातात। तुळशी माळा एक एक हात फुलल्यो॥' =रानणगाव म्हणून एक गाव आहे, त्याला लागून असलेल्या डोंगरावर उंबर व मत्तीसारखीं मोठालीं झाडें व चत्तीसारखीं व बाभुळीचीं लहान झाडें दाट उगवलेलीं आहेत तेथें उन्हाळी पडतें ०पाऊसहि थोडाबहुत पडतो तर मग पीक का बरें आलें नाहीं –चिन्मयजगत् (डिसें १९१६) कानडींत या खेळाला अटकमटक म्हणतात [का अत्ति=उंबराचें झाड, मत्ति=एक झाड]

**आटकळणें**—अटकळणें, अडकळणें पहा

**आटका**—पु (क) आठ बियांचे फळ [अष्टक]

**आटंका, आटांका**—अटका पहा

**आटकाटी**—स्त्री (गो) आडविता 'आटकाटन मात्सा बॅडों कातलून दी'

**आटकांड**—न (क) ज्यातील पाणी आटत आलें आहे असें डबकें [का अट्टु=आटणें+म कुंड]

**आटकाळ**—अटकाळ पहा

**आटकी**—स्त्री १ अटकी पहा २ आठ माणसांचा समुदाय, वजन, आठ माणसांनीं वाहून नेण्यासारखा पदार्थ आटका–की पहा। [स अष्टक]

**आटकूल, आटुक**—न १ (क) आठ चिचोक्याचा समुदाय 'आटकूल कर,' 'आटुक झाला' २ अटकी पहा [स अष्ट+कुल, अष्टक]

**आटकें**—न १ अच्छेर, अर्धा शेर, मापटें, पायलीचा अर्धा भाग आठवें पहा [स अर्धक] २ (वेतुलाचा खेळ) अट पहा

**आटखोर, आटणी, आटणें, आटताकाळ, आटदार, आटप–पणें, आटपता, आटपसार, आटपळ, आटपा अटप**–अ मध्यें पहा

**आटघन**—वि (व) अडून धमणारा, लवकर न वळणारा [का अड्ड]

**आटघाट**—अटाघाट पहा –स्त्री १ त्रास देणें, छळणें, फुगर ओढ करणें २ त्रस्तावस्था, श्रम, त्रास, छळ, खराबी, नाश 'देशात होईल मद आटघाट।' –दावि २११ [आटणें+घाटणें]

**आटछाट**—स्त्री १ आग्रह, हट्ट, छादिष्टपणा २ फाजील टाप टीप, वातवत, व्यवस्थितपणा, कडक तनोत्तपणा, चोखदळपणा (क्रि० करणें–धरणें–ठेवणें) ३ शेलक्या शेलक्या–निवडक वस्तू, मासलेवाईक (चाईट अथवा चांगले) पदार्थ **–टीचा**–वि १ मास लेवाईक, निवडक २ बारीक पाहणारा, चोखदळ, कडक वागवे ताचा, शिस्तीचा, शिष्टाचाराकडे फार लक्ष देणारा [आटणें+छाटणें

**आटण**—न प्रवास, पर्यटन अटण–न पहा 'समर्थे भरत खंडीं आटणें केलीं।' –सप्र ३ ५

**आटण**—अटणी पहा ०कळा–स्त्री उतरती कळा

**आटणी**—स्त्री अटणी पहा १ मूस 'जन्म कर्मांची आटणी। –दा ३ १ ० २ नाश 'हं महाभूताची फुडी। आटणी देखा॥ –ज्ञा ६ २९० ३ श्रम, त्रास 'नेणता सोसिली तयाची आटणी। –तुगा १५३२. ४ आटविणें 'त्याची जव जव आटणी कीजे। तव रसपाक ते शर्करादि निपजे।'–स्यो ८ २८ ०पडणें–क्षीण होणें, व्यर्थ खर्ची पडणें 'एव्हीं नरदेहाही यवडें। धन आटणीय पडे।' –ज्ञा १८ ६१६

**आटणें**—१ अगणें पहा 'तैशी सुबद्ध आटली।' –ज्ञा ६ २२५ 'दुहोत भलते सदा तरि न लेशही आटनी।' –केका ५८ २ आगेपणें, मागें हटविणें, पराभव करणें 'शिशोत्साह बळानें कोणी सेणासि त्यात आटेना' –मोकर्ण ४७ ५५ कमी होणें, नाश पावणें ३ मरणें, मारणें, नष्ट होणें 'वैरी एकदाचि आटावे।' –रावि ३१ २०९ 'अपराह्णीं बहु दारुण रण झाला, फार आटलें कटक।' –मोकर्ण १९ २ कित्येक म्लेंच्छ होऊन गेले। कित्येक फिरंगणात आटले।' –दा १५ २ ३ [का अट्टिसु]

**आटतीपरी**—स्त्री हाची वागणूक, वर्तणूक 'चित्तीं कष्टी होतसे भारी। आटती परी देखोनिया॥' [अग=अडणें+स प्रति=परी]

**आटप**—(गो) अटपणें पहा 'आनापा येना'=आटपत नाहीं शिवाय आटोप पहा

**आटप**—पु उरक, अटप, आगेप पहा (कामाचा) ०असणें–कामाची माहिती असणें, उरक असणें

**आटपणें**—अटपणें पहा 'धीर धरोनी आटप म्हणुनी वाप्पें मनसाठीं।' –केका ४१

**आटपता, आटपसार**—अ मध्यें पाहणें

**आटपाट**—पु १ मुलींचा एक शिवाशिवीचा खेळ या खेळात एकीवर डाव असुन तिनें इतर मुलींना शिवावयाचें असतें या खेळात डाव घेणारी मुलगी इतर मुलींस शिवावयास लागली तर त्यानीं (खेळात) बसावयाचें (छपापाण्याप्रमाणें) नसतें, पाठशिवणीचा खेळ (क्रि० घणें, खेळणें) –स्त्री १ (ल) गळ घालणें, गळीं पडणें, आग्रह नेट धरणें (क्रि० धरणें) २ ठामपणा, पक्केपणा [आड+पाट प्रा अट्ट=फार]

**आटपाटनगर**—न १ कोणतें तरी निनावी, रहदारीचें गाव [स अट्=गमने व पट्=गमने=आलेंगेलें गाव (राजवाडे)] २ आठ पठा असलेलें मोठें शहर [स अष्ट=आठ+पट=पेठ] ३ बाजाराचे आठ चौक असलेलें शहर [अष्ट=बाजार+पट=चौक पेठ] ४ आठ मोठे राजरस्ते असलेलें गव [अष्ट+पथ=पाट, कोंकणात गुहागर या गावी एका रस्त्याच्या दोन बाजूस सारखी वस्ती असून त्या वस्तीच्या दोन वेगवेगळ्या भागास खालचा पाट व वरचा पाट अशीं नावें आहेत] कहाण्यातून नेहमीं हा शब्द आरंभीं येतो उ० आटपाट नगर होतें, तिथें एक ... [तुल० गु पाडा=भाग, वस्ती, पेठ उ० नवापाडा]

**आटपिरड**—(व) धुमफुम वैमनस्य रुसणें फुगणें रागावणें

**आटपीठ**—अटापीटा पहा

**आटफाट**—(गो) आटपाट खेळ पहा

**आटबाज**—अठवान पहा

**आटरणें**—अटरणें पहा

**आटवणें-विणें**—क्रि १ (सोनारी धदा) सोनें, रुपें इ० धातूचा रस करणें अगण्याची क्रिया करणें २ द्रव पदार्थ उष्णतेच्या साहाय्यानें घट्ट करणें, अटतील असे करणें ३ (ल) कमी करणें, ठार मारणें 'द्रौणिपराभवकाळीं म्या कौरव सैन्य फार आटविलें।' –मोकर्ण ४० ३८ [अटणें प्रयोजक]

**आट(ठ)वल-ली-लें**—पुलीन १ (को) तादुळ किंवा तादुळाच्या कण्या, यात पाणी अधिक ठेवुन त्याचा पातळसर भात करतात तो, कण्हेरी, पेज 'श्री महालक्ष्मि देविरि प्रातकाळि आटवलिएच्या उपहारासि दिधलें' –शक १३३५ चा बादिवड्याचा शिलालेख [का अट्टु=शिजविणें]

**आटवा**—पु (ना) दगदग, त्रास [स आर्त, प्रा अट, म अट]

**आटवाळ**—(क) तादुळाची कण्हरी आटवल पहा

**आटविणें**—क्रि (ना) त्रासविणें, रडकुंडीस आणणें [आटवा]

**आटवीं**—स्त्री एक मादक वनस्पति, हीस पाढरीं फळें येतात

**आटा**—पु १ (यत्र) स्क्रूचा फेरा-दोरा-कोरा, पेंच २ बाटलीं कडें-वेढे (तवला, पींप व जुन्या काळच्या तोड्याच्या बदुकीच्या नळीस बळकटी येण्यासाठीं बसविलेले) ३ लहान मुलाचें खेळण्याचें लोखंडी कडें, जें मुलें रस्त्यानें पळवीत नेतात तें ४ एखादा पदार्थ आवळून बाधण्यासाठीं घावयाचा दोरीचा वेढा, विळखा, वळसा (क्रि० भरणें, बसणें) (साभा) पीळ ५ (कों राजा) छत्री, इरलें याचा सागाडा [स अट=भ्रमणें, स अटन=चक्राकार शस्त्र]

**आटा**—पु (हिं) गहू इ धान्याचें पीठ 'आमचाच आटा बद जाता' –भाव १३०

**आटा**—पु (कों) गाडीच्या दोन धुऱ्या (दाड्या) मधील तिसरें लाकूड [अट]

**आटा**—पु (का) खेळ, नाटक सन १८४१ च्या सुमारास प्रथम कानडी नाटकमडळ्या सागली–मिरजेकडे आल्या, तेव्हा हा शब्द मराठींत शिरला [का]

**आटाआट-टी**—स्त्री १ खटपट, श्रम, दगदग, अटअट, अगाअग अगाट-टी पहा २ धुमाकूळ, घोटाळा, नाश, गडबड यादवाचआ कटका भीतरी। पारका आटाआटी करी थोरी।' –शिशु ९८८ –एभा ३ ८२४

**आटावाट, आटापीटा-टी-पिट, आटाली**—अमध्यें पहा

**आटाट आटाटी**—अगाट-अगाटी पहा 'निवासस्थानाची आटाटी। सर्वेथा पोटीं न धरावी।' –एभा ७ ४० शिवाय १२ ५९१ 'जर मराठी भाषा होता होता इग्रजीच बनली तर आपल्या लोकाचा तींत ग्रथ लिहिल्याचा आटाट सर्व केवळ व्यर्थ झालाहोईल!' –नि ६.

आटाट्ट—वि (माळवी) अतिशय, फार 'आगाट्ट जेवण झालें' [हिं अटाट्ट]

आटाण—पु ढाल, तरवार बाळगणारा शिपाई [ग अट्टन=ढाल]

आटाप—पु (गो) व्याप, पसारा 'ताणें ल्माचो आटाप व्हंड्लो घरला' [आटोप]

आटापाणी—१ पीठ व पाणी, दररोजची शिधासामग्री २ जीविताचें साधन, अन्नाची बेगमी [हिं आटा+म पाणी] ०धंद करणें—तगादेदारानें कुळाच्या दारात बसून कुळाचें जेवणखाण बंद करणें

आटापिटा-टी, आटापेट—अटापीटा पहा ०पाडणें—मेटाकुटीस आणणें 'खन्चाकुन्या पोटच्या पोराच्या लग्नात त्या विहिणीचा बघा किती आगापिटा पाडील तें एक देव जाणें' —फाटक (नाटयछटा) १

आटाफेड—पु (धान्याचा, पिठाचा) मुष्टिफंड (मूठभर धान्याची मागणी) 'पंजाबात आर्यसमाजाचे मिशनरी आग फंडहि गोळा करतात' —टि ४ ५११

आटारा—पु (गो) अटापिटा, श्रम, आटा अटारा पहा

आटारोटा—अटारोटा-रोटा पहा

आटालें-लें—न (कों) गुरांना पाणी पिण्याचें एक विशिष्ट आकाराचें लाकडी भांडें [?]

आटास—अट्टाहास पहा 'हाक फुटली आटासें'—उपा १४१९ [स अट्टहस]

आटाळ—पु अडथळा —शर अडल पहा [अड-ड]

आटाळ-ळा-ळी-ळें—पुढील माळा, गच्ची अटाळा-ळी-ळें पहा 'मोडिल्या गोपुर आटाळी।'—मुवन २ ५

आटिवेठी—स्त्री १ श्रम, कष्ट २ (ल) वेठबारा अटिवेटी पहा 'तें अन्न आरयागेल्यापाठीं। सूर्याग्नि न पडे आटिवेठी' —एभा २८ ३३७ [आटी हिं]

आटी—स्त्री १ श्रम, यत्न, खटपट (क्रि० काढणें) 'तयातें इंद्रियवैलाची पेटी। न म्हणे अवसीं पाहानीं। विषयक्षेत्रीं आगी। काढी भली'—ज्ञा १३ २९ 'निर्तिलें पातलीं जया कृष्णभेटी। एरवीं ते आटी वायावीण।—तुगा ९८ २ मिठी अटी पहा 'प्रियो तमाचिया वडीं। प्रमदा पे आनी।'—ज्ञा १३ ७८५ ३ (गो) (गोण वगैरे एकावर एक ठेवून केलेली) उभी रांग, अढी 'पाचव्या आटयेंतलीं एक तांदळांचों साक (पोतें) ताका दी' [अटी] ०चें रेशीम—न (चांभारी धंदा) जोडयास भरतात तें एक प्रकारचें रेशीम अगी (रेशमाची लड) पहा

आटीक—स्त्रीन एक झाड व त्याचें फळ

आटीचा, आटीराज, आटीव, आटोरा, आटोपणें, आटोपता, आटोपसार, आटोवी—हे शब्द अ मध्यें पहा

आटीव—वि पीळदार अगीव पहा 'जो आगीव चढिया गेला'—मुसभा ६ १५३

आटु-ट्ट—पु क्षय, आटणी, नाश 'तरि धन्दाचा दिसा मावळला। मग तयाहि धरी आटु भविन्नला।'—ज्ञा ६ ३१४ 'आटु भरीनग यारवा'—उगा १६८८ [आटणें]

आटु—पु ट्ट अड पहा 'आटु वेगु निदाणु।'—ज्ञा १३ ७०१ [स अट्ट]

आटु—वि कष्टपूर्ण, वेदनायुक्त 'आटु भरदिला सिंहा रिसाचा। एक धाडु या पिलिस्तेयाचा।'—ख्रिपु १ २४ ४० [प्रा अट्ट, ग आर्ति, म अट]

आटुळणें—१ (व) आकुंचित होणें, आखसणें 'कापड आटुळलें' २ (व) हुंदके घेणें, रडणें 'आटुळनोम तर आटुळ' [अटणें]

आट्ट—वि (व) हट्टी, कुढणारा आटु पहा

आट्ट—वि १ कोरडें २ दुर्बोध —शर

आंटू—पु शरीराचा संकोच, आखडणें [अटणें]

आटेजणें—क्रि आटणें, आळणें अटणें पहा

आटेनिटे, आठेचिठे—पु अव १ (गो) आळेपिळे, आळोखे पिळोखे [का अट्ट, म अटी टी] २ आडेवेढे ३ (गो) उबग

आटोकाट—अगेकाट पहा 'आटोकाट मिळाले आनेकाट स्वरुचिचा म्हणानी।'—मोभतु ३ ८३ त्याचें आटोकाट ज्ञान व अपूर्व रचनाचातुर्य हीं लक्षात येऊन मन अगदीं थक्क होऊन जातें' —नि ५०, [स आ+कंठ]

आटोप—पु १ सामर्थ्य, आवश 'सूर्योदयपर्यंत कोपें। प्राची निनिली आगेपें।'—मुआदि २१ १२ २ पसारा, व्याप 'व्यापेंविण आगेप केला।'—दा १९ ८ १५ 'सुखद सृष्टीचा आटोप। वेदांत्या अध्यारोप॥'—टिक १६२ ३ 'सचना, सुयत्रणा, व्यवस्था 'गेले बहुत आटोपाचे। कार्यकर्ते।'—दा ३ ९ ५१ ४ वंदोबस्त, नियत्रण, निर्बंध, सरक्षण 'गुरें शेतात येतात तरें आपले शेताचा आगेप करा' ५ अभिमान, गर्व, ताठा, डौल 'आपलेनीचि आगेपें। धनित्वाचेनि दर्पें।'—ज्ञा १७ ९५ ६ जोर, अतिक्रम, प्रभाव, क्षोभ 'ज्वराचेनि आगेप। रोगी भरलेसे जल्पे।'—ज्ञा १६ ३६४ ७ आवर, उरक, आवरशक्ति 'एवढा कारभार चैपावयास त्याचे अगीं आटोप नाहीं' ८ स्वाधीनता, ताबा 'प्रकृतीचेनि आगेपें। वर्ततु असे॥'—ज्ञा ३ १८४ ९ सधान —शर १० अटप पहा [स आटोप=व्याप पसारा याव रून ताबा, म अटपणें]

· आटोपणें—क्रि.अटपणें पहा. १लहान करणें. 'आटोपी मूर्तिप्रति (स्वत:च्या) मारुति हा कविहि तद्विशाल कथा।' —मोवन ५.७२. २ आवरणें; मागें घेणें, गुंडाळणें; संपविणें; माहींसें करणें. ' प्रभुवर तें विश्वरूप आटोपी '—मोउद्योग १०.२०. ३ (पुढें गेलेल्यास मागच्यानें) गाठणें. ' आटोपिलाचि गेला होता जरि भीमसेन दूरवर।' —मोऐषिक २.३. ४ ताब्यांत घेणें; व्यापणें. 'जें देहीं आटोपे पित्त '—ज्ञा १४.१९६. ५ उरकणें; सांभाळणें. 'आटोपसील संसारु।' —दावि २२. ०शुद्ध—वि. नीटनेटका; नेमस्त; आटोपसर.

आटोळा—अटवळा, अटाळा पहा.

आटोळा—पु. (नाविक) वल्हें अडकविण्यासाठीं नावेवर असलेला खुंटा. हा पेरजेस पाडलेल्या भोंकांत वसविलेला असतो. [अट; का. अड्ड]

ऑट्ट—न. (गो.) बाग; बगीचा. [पोर्तु. हॉर्टो]

आट्टखुरी—वि. गाभण (मेंढी वगैरे); आठ खुरी म्हणजे तिचे चार व कोंकराचे चार खूर धरून. [सं. अष्ट+खुर]

आट्यापाट्या—स्त्री. एक महाराष्ट्रीय खेळ. एकानें दुसऱ्यास ठराविक जागेंत-पाटींत-अडवावयाचें व दुसऱ्यानें त्याला हुलकावणी देऊन निसटून जावयाचें अशी खेळाची ठोकळ रूपरेषा आहे. यांत खेळणाऱ्यांच्या दोन बाजू असून दर बाजूकडे सुमारें आठ गडी असून त्यांत एक सूरकरी व सात पाटी धरणारे गडी असतात. सुराचा उभा पट्टा असून पाटीच्या आडव्या पट्या असतात. [सं. अष्ट+पट्टिका; का. आटा=खेळ; पाट द्वि.]

आठ—वि. १ आठ ही संख्या. २ (ल.) अष्टसिद्धी. 'शिणल्या बहुत चौसष्टी। आठ जणी बहुत कष्टी।' —ह ३.४. [सं. अष्ट; प्रा. अट्ठ-अठ; ग्री. लॅ. ऑक्टो; झें. अस्तन्; फा. हश्त] म्ह० १ साठीं जेवणें, मठीं निद्रा=भिक्षा मागून (आठ जणांकडून) राहणें व कोठें तरी झोंपणें. उडाण टप्पू भटक्या माणसाला लावतात. २ आठ हात लांकूड, नऊ हात ढलपी=अतिशयोक्तीनें सांगणें, बोलणें. ३ आठ परदेशी, नऊ चुली (चौके) किंवा ४ आठ पटेल, नऊ चौधरी किंवा ५ आठशें लष्कर, नउशें न्हावी=ज्या कामास थोडीं माणसें पुरतील तेथें विनाकारण जास्त माणसें लावणें. ०आणी—स्त्री. अर्धा रुपयाचें नाणें; अधेली. [आठ+आणा]

आठऊ—पु. आठव; स्मरण; आठवण. 'देहेंबुधिचा आठऊ माठावा।' —राम १६९. [आठवणें]

आठका—वि. आठ संख्या किंवा तिनें युक्त; आठांनीं मिळून झालेला; आठांनीं बनलेला किंवा आठजण लागतील किंवा आठ जणांना योग्य असें; उ० आठ हमालांचें ओझें, आठ मणांची गाडी 'गुरती गांडी आठकी.' —पु (ना.) आठ मणांचें माप (गांडी) [सं. अष्टक]

आठकी—स्त्री. १ आठका पहा. [अष्ट] २ आठ बैलामागें एका बैलाच्या जकातीची जी सूट जकातदार देतो ती. ३ सागरगोट्यांच्या खेळांतील एक प्रकार. आठ खडे एका वेळीं गोळा करून वर उडविलेला नववा खडा झेलणें. अटकी पहा.

आठकें—न. १ अटकें पहा २ अच्छेराचें माप. [सं. अर्धक]

आठकें—वि. (गो.) आठवें. 'हें वर्स आठकें आसा.' [अष्टक]

ऑठखणें-ओंठखणें—क्रि. (गो.) अटकून (भिंतीस वगैरे) बसणें; टेकून बसणें. 'भिंतिक ऑठखोंन बसुं नाकां.' ओटंगणें पहा.

आठंगुळ—अठांगूळ पहा

आठघात—पु एक वाक्प्रचार. आठव्या महिन्यांत (गर्भाच्या) जन्मलेलें मूल जगत नाहीं या अर्थानें; याच्याच पुढें सातारें म्हातारें=सात महिन्याचें मूल म्हातारें होतें असें म्हणतात.

आठणी—(गो.) अठणी पहा.

आठतीस—वि. (गो.) अडतीस. [सं. अष्टत्रिंशत्; प्रा. अट्ठतीस]

आठनहाण-न्हाण—न. लग्नानंतर आठव्या दिवशीं वधुवरास स्नान घालण्याचा एक सोहळा. या प्रथम महिन्यांत या प्रमाणें चार स्नानें असतात. जसें-आठन्हाण; दसन्हाण; सोळन्हाण; मासन्हाण इ० किंवा आठबंधन; दसबंधन; सोळबंधन; मासबंधन इ० 'वरात आणि आठन्हाणें। कनकवस्त्रें नाना भूषणें' —कथा ३. ७.१९२. कोल्हापुराकडे आठणाण असें (अप.) रूप आढळतें [सं. अष्ट+स्नान]

आठपाठ—आटपाट पहा.

आठबैली—वि. आठ बैलांनीं ओढली जाणारी (मोट, नांगर इ०)

आठभाव—अष्टभाव पहा. 'आठाभावाची परवडी। उभूनि स्वानंदाची गुढी।' —एरुस्व ५.७९

आठमुठ्या—वि. अडमुठ्या, अडमूठ-ठ पहा.

आठयो—पु (गो) ताब्याचें जुनें नाणें.

आठरणें—अटरणें पहा

आठरा—अटरा पहा. 'साही त्रिकुट आठरा रांटे तेहि वेडावलीं' —दावि १२३. ०आणेअबरू—स्त्री. मोठी कीर्ति. 'विलायतेंत आठरा आणे अबरू आमच्या प्रभूची असे' —ऐपो १८५. ०नारू-अलुतेदार—पुअ. तेली, तांबोळी, साळी, रंगार, शिंपी, माळी, गोंधळी, डौरी, भाट, ठाकर, गोसावी, जंगम, मुलाणा, वाजंत्री, घडशी, कलावंत, तराळ किंवा कोरबू, भोई इ० —गांगा १४. अलुता-त्या पहा.

आंठल—स्त्री. (कों.) फणसांतील बी; अठळी. [सं. अष्टि प्रा. अट्ठि]

**आठव**—अठव पहा (क्रि० करणें, देणें) 'अपराध नसे केला, स्मरण नसे काय? मन न आठव दे'—मोउद्योग ९ ४३ ०देणें—आठवण करून देणें, स्मरण करविणें 'उद्धवा तू जाय मथुरापुरा। आठव देई यादवेंद्रा।'—ह २१ १११

**आठवगाठ**—स्त्री एखाद्या गोष्टीचा विसर न पडावा म्हणून धोतराला गाठ देतात ती [आठव+गाठ]

' **आठवगात**—स्त्री (गो) फराळाची वेळ (टिफिन टाईम) [आठ+वखत]

**आठवगिरी, आठवडकरी, आठवडा-ड्या, आठवडे पाईक, आठया-चें, आठली, आठांगळें, आठांगुळें-आठी**—अ मध्यें पहा

**आठवडा**—पु अठवडा पहा तेथें दिलेल्या व्युत्पत्ती खेरीज पुढील विवेचन पहा [१ नेमाडात सात या संख्येला हाट म्हणतात सात दिवसांची मजुरी देतात तिला हाटवटी म्हणतात हाट=बाजार बाजाराचे दिवशीं मागील सात दिवसाची मजूरी देतात बहुधा या हाटवटी शब्दावरून हाटवडा=आठवडा असा शब्द निघाला असावा २ (राजवाडे मत) हा शब्द अशिष्ट लोक अठावडा असा उच्चारतात व तोच उच्चार व्युत्पत्तिदृष्ट्या शुद्ध आहे अष्टावर्त (स्वार्थे क)—अष्टावडअ=अठावडा=आठवडा आठव्या दिवशीं ज्या कालमानात त्या वाराची आवृत्ति अथवा आवर्त होतो तो आठवडा, दुधाचा आठवडा=दुग्धस्य अष्ट दिवसावृत्ति'—भाअ १८३२]—डी कौल—पु (कों) देवापाशीं आठ दिवस शुभ मागण्याबद्दल्या प्रश्न, शकुन

**आठवण**—स्त्री १ स्मरण, सय, याद, आठव, पुन्हा लक्षात किंवा ध्यानांत आणणें, स्मृति २ आठवणीकरिता ठेविलेली वस्तु, यादगिरी [स आ+स्थापन, प्रा आट्ठापण]

**आठवणीचा**—वि ज्याची स्मरणशक्ति चांगली आहे असा ०**धड-आटोकाट-बहादुर-खबरदार**—वि चांगल्या आठवणीचा, स्मरणशक्ति उत्तम असणारा

**आठवणूक**—स्त्री १ दूर असलेला किंवा मृत झालेला जो आपला इष्टमित्र त्याची आपणास आठवण होण्यास कारण जी वस्त्र इ० वस्तु ती, आठवणीचा पदार्थ २ त्या योगानें त्याचें जें स्मरण होतें ती आठवण पाहा

**आठवणें**—उक्रि आठवण करणें, होणें, स्मरणात, लक्षात, ध्यानात, मनात येणें 'बाळपणींचा काळ सुखाचा आठवतो घडि घडी मनग।'—शारदा २०

**आठवपोस**—क्रिवि आठवणींत, जाणोपणीं पहा

**आठवता**—वि आठवण करणारा 'दास म्हणे ते देवाचें। आठवत खुरायाचे।'—दावि ५०३

**आठवर**—वि १ अठवर पहा 'ज्याचा विवाहयोग्यकालास नुक्ताच प्रवेश झालेला आहे, त्याना नव+वर—नोवरा—नवरी असें म्हणतात विवाहयोग्यकाळ सुरू होऊन अर्धवट गेला तरीहि ज्याचा विवाह झाला नाहीं त्याना अर्धवट म्हणजे आठसर किंवा आठवर म्हणतात'—मसाप १ २ ८ २ (कातकरी) कुमारी—मसाप ११२

**आठवल**—न (गो) मेथी, तांदूळ वगैरे घालून केलेली खीर (बारश्यास नामकरणविधीच्या प्रसंगीं ही करण्याचा प्रघात आहे) 'तागेर आज पाळण्यात घालतात, आठवल बी खुब केला' आठवल पहा

**आठवळा**—आठोळा पहा

**आठवा**—पु १ अठवें पहा २ (गो) अर्धीपड(माप) आठवो, पायलीच्या आठव्या भागाएवढें माप 'ती पायली आनी तो आठवो माल्सो ताका आठवा व्हरून दी'

**आठवा**—वि क्रमानें मांडिलें असता सातव्यानंतर येणारा

**आठवी**—स्त्री (व) अष्टमी, विशेषत आश्विन वद्य अष्टमीस म्हणतात, 'आठवीपासून दिवाळी आठ दिवस राहाते' ०**मासळी**—स्त्री (कों) दुसऱ्या गावाहून भरून आलेल्या सुक्या माशाच्या होड्यावर ऐन निनसी बसविलेली जकात

**आठवेठ**—स्त्री आठ दिवसांतून एक दिवस खोत प्रत्येक कुळाकडून फुकट चाकरी घेतो ती [आठ+वेठ]

**आठळ-आठोळ-ळी**—अटोळी पहा

**आठांग**—अष्टांग पहा 'आठांगाचा दुडा झुडते दिसे।'—भाए ४५८

**आठांगुळें**—अठांगळें पहा 'मग जीवाचेनि मेळें। निकरलें पणाचें आठांगुळें केलें।'—शिशु ९०

**आठॉलॉ**—वि (गो) आठव्या महिन्यात प्रसूत होऊन झालेलें (मूल) 'आठॉलॉ चलॉ वढ करून वाचना म्हणतात' **आठोळी वाळंत जावप**—आठव्या महिन्यात बाळंत होणें

**आठाळें**—अगाली, अटाळी पहा 'आठाळेया वरी उभे ठाकावें।'—उषा १११८

**आठिव**—वि (कों) आठ थर असलेलें (मधमाशांचें पोळें), सात थर असणाऱ्या पोळ्यास सातेरें म्हणतात [स अष्ट]

**आठिळा**—स्त्री (कों) अटळी अटोळी पहा 'आठिळाची भाजी गोड लागते' [स अष्टि]

**आठी**—सर्व अर्थी अटी पहा —स्त्री १ अठळी, कोय 'सकळ फळें फळल्या पाठीं। आम्रवृक्ष फेडे दोवटीं। रसस्वादाचिया सोठी। पोटींची आठी सांडिलिया॥'—एरुस्व १६ १४७ २ गांठ 'गळ वाच्या आठींतून पु निघत आहे' [स अष्टि]

**आठी**—क्रिवि (या) येथें, या ठिकाणीं अठी पहा 'मागो दुला आठी कालदी उनता' =मागो दुला काल येथें आला होता [स अत्र]

**आंठी**—स्त्री मिठी अठी पहा 'मग सुखेंमीं घे आठी। गाढे पणें।' –ज्ञा ५.१२२ [का अट्ट]

**आठीवेठी**—अठिवेठी पहा

**आंठु**—आटु पहा

**आठुरणें-आठोरणें**—अगरणें पहा –क्रि १ (कों) ओढून घतलें जाणें, ताठरणें (अगाचे वातडें किंवा अवयव) २ बाधणें, आव ळणें ३ (विप्र) सकोचणें, आकसणें, आपडणें [का अट्टु=आम्णें]

**आठुवर**—अठवर पहा ०पण–न निवांतपणा 'तुजवांचि कन्हणें वाले। आगा आठुवरपण आलें।' –शिशु २०८

**आठुळणें**—क्रि बाधणें आठुरणें २ पहा 'तो अर्च्यी आठुळैजे वदु।' –ज्ञा १५८८

**आठुळी**—अगेठी पहा 'आठुळी ले टाकणें कीं वरील साली काढणें।' –शिवरामकृत गीताचंद्रिका ७९

**आठें, आठोपहार, आठोफळी आठ्ठी**—अ मध्यें पहा

**आठेविठे**—पु (गो) अठेवेठ अढेवेढे पहा

**आठो**—स्त्री (व) अष्टमी तिथि [आठ]

**आठो**—स्त्री आठवण, स्मृति 'म्हणोनि निदकें निदावि कगथी। तया तोचि जीवीं आठो असे।' –ब ५३६ [आठव]

**आठोक**—वि रोखठोक 'उपहार केला आठोक बोलणें।' –शवि १०१ [ठोक]

**आठोडिया**—वि आठवड्याचा 'परिकाळि धर्म त्या न कवडी केणारे आठोडिया' –देप ५८

**आठोपार**—अठौप्रहर अठोपहार पहा 'ठाई ठाई नित स्ठाई होई आगेपार।' –ऐपो ३४१

**आठोळा**—आठाळा पहा

**आठोळा**—वि (गो) आठवा

**आठोळी**—स्त्री आठव्या महिन्यांत बाळत होणारी स्त्री आठाळा पहा

**आठोळी**—स्त्री बोय अरली, वी अगेठी पहा 'असारें साठी गाभाळी।' –ज्ञा १८.२०४ –एभा १५.२४ ०पागळी–स्त्री (व) एक मेंट यार विशिष्ट आकाराची घरें पाडून त्यात आंब्याची कोय टेवून ती एका पायानें ढगाउन रेघ मारून बाहेर काढणें, टिकरी 'आगेळीपागरी रोज चाले त्यात माय माझ्यावर यई'

**आठौ**—आठव, आठवय पहा 'जे आपणास आठौ दाये' –ज्ञा १४.३१७

**आठ्ठावन्न, आठ्ठावीस, आठ्ठेचाळीस, आठ्ठ्याण्णव, आठ्ठ्याहत्तर, आठ्ठ्यांशीं**—अ मध्यें पहा

**आड**—पु वाटोळी, पायऱ्या नसलेली व लहान तोंडाची विहीर, कुवा, कूप 'असता वायु, न हो का क्षम पळ जलधीस आड वारावा।' –मोभीष्म ७४९ 'आडात पडला मृगेंद्र। कीं सापळयात कोंडिला व्याघ्र। तैसा साचार गुतलों मी।' [स अवट=खळगा, प्रा अड=कूप, अअड=आड] म्हॅ० १ आडात नाहीं तर पोहऱ्यात कोठून येणार? २ इकडे आड तिकडे विहीर=दोन मोठ्या अडचणींत, सकटात सापडणें ३ आडात घालून दोर कापणें=विश्वासघात करणें 'सकळासी आडामध्यें घालून। दोर कापून गेलासी।' –ह १७.१५१ ४ अर्ध्या आडात सोडणें=सकटात टाकून जाणें ५ आडातला बेडूक आणि समुद्राच्या गोष्टी सागतो=अल्प ज्ञान असून मोठाल्या गोष्टी सागणें

**आड**—न (ना) घराचें आढें 'आड वसळ कीं नाहीं' [वा अड्ड] –स्त्री १ (राना) दोन डोंगराच्या मध्यें पाण्याजवळ असलेली वस्तीस योग्य अशी जागा, घळ, दरी, खोरें [का अड्ड] २ विरोध, अडथळा, अटकाव –स्त्री ३ ह" हेका, आग्रह या सर्व अर्थी अड पहा 'धरिली भाऊनीं आड।' –ऐपो १२६

**आड**—अ १ हा शब्द उपपदाप्रमाणें कित्येक शब्दाना जोडून येतो याची सविस्तर माहिती अडमध्यें दिलेली आहे या शब्दाचे अर्थ–(अ) एकीकडे, एका बाजूस, दूर, मार्गाच्या बाहेर, रीती वेगळा, साधीकोंदीत उ० आडमार्ग, आडवाजू (आ) मधून, वरून, उलट, विरुद्ध, मार्गांत (प्रतिबधरूपानें), उ० आडदड, या उपपदातील आणि अड उपपदातील अर्थभेद 'अड' शब्दा मध्यें पहा २ एखाद्या पदार्थाच्या मागें, पलीकडे, पाठीमागें, पुढें, मार्गे, न दिसेल असा, एका बाजूला 'जे नित्य मायापट आड लावी' –सारुद १५ 'मग आड आला म्हणजे चद्र दिसणार नाहीं' ३ (दृष्टिविरोध करण्याकरिता, प्रवेशप्रतिबधाकरिता, आश्रय देण्याकरिता, सरक्षण करण्याकरिता) मध्यें येणारा, मार्गांत असणारा, मध्यतरीं, मार्गे 'आता आड उभा राहें नारायणा। दयासिंधुपणा साच करीं।' –तुगा १५६८ ४ एखाद्याच्या छायाखालीं आश्रयाखालीं, उ० शेताआड चोरी (आपल्या शेतात शेत आहे तेव्हा दुसऱ्याचें चोरी असा आरोप येणार नाहीं) दादल्या आड दिवळकी यावरून आड करणें, आड दडणें=आश्रय घेणें ५ द्विरुक्तीनें आलेल्या शब्दात आड शब्द आल्यास त्याचा अर्थ प्रत्येक दुसरा, एक टाकून एक असा होतो जसें–सालाआड साल, दाढाआड दाढ, ग्वाआड एक द्विरुक्ति नसतानाहि आड या शब्दाचा असा उपयोग करतात जसें– तासाआड येतें आणि दिसा आड यायचें (मराठी म्हणजे टीक) ६ (समासात) विवक्षित कालाव्यतिरिक्त जसें–आडवार, आडसाल,

आडदिवस=ठराविक दिवसापेक्षा इतर दिवशीं समासात आड याचा अर्थ केव्हा केव्हा अकस्मात् असा होतो काहीं वाक्प्रचार– ०पडप–(गो) वामकुक्षीकरिता आडवें होणें [पडणें] ०येवप–(गो) विरोध करणें, आड येणें [येणें] ०लावून घेणें–ओंवळ्या लुगड्यावर सोंवळें नेसताना बायका मध्यें एखादें वस्त्र लावून घेतात तें किंवा नाहण्याच्या वेळीं लावून घेतात ती पडदणी, पटदा 'नव्हे सपातळ आड लावणें।'–ज्ञा ६ ११४ ०जाणें–१ आडरस्त्यास, आडमार्गास लागणें, रस्ता चुकून भलतीकडे जाणें, २ जरडून जाणें 'जया आड जाता पार्था। तपश्चर्या मनोरथा। पारखियाहि आस्था। समूळ होय।'–ज्ञा ६ १६७ ०पडणें–१ नमस्कार करणें, विनवणी करणें –शर २ अडविणें 'तिये कडोन येतसे वारा। देखोनि धावे सामोरा। आड पडे म्हणे घरा। बीजें कीजो।'–ज्ञा १३ ३७५ ३ मुरकुटी वळणें 'गोपाळ हामा आड पडतु।'–दाव २१७ ०घालणें–१ मध्यें आणणें, रक्षण करण्या साठीं काहीं मध्यंतरी ठेवणें 'तव आड घातलें आणीकीं वीरीं'–उषा ६१६ २ उडी घालणें 'कोणी आड घाली काय अथावीं।'–ज्ञा ८ २४०

**आंड**—अड पहा

**आडआरी**—स्त्री (चांभारी धंदा) कातड्यास भोंक पाड ण्याचें मध्यम हत्यार अरी पहा [आड+आरी]

**आडई**—स्त्री (कों) विश्रांतीसाठीं आडवें होणें (क्रि० घेणें) 'अमळ आडई घेतली तों किंचित डोळा लागला' [का अड्ड, म आडवा]

**आडऊ**—पु चाराचुरा, ढवर, गाळ 'आडऊ निघाला जो अपारु। तो महाभारतप्रागरु। भोंवता केला।' –ज्ञा १८ ३६ [आड]

**आडऊड**—क्रिवि १ एखाद्या वस्तूच्या मागें (लपून, दडून), छत्राखालीं २ साधीसोंदीत, आडबाजूस, आसपास 'रस्त्यात काहीं आडऊड खाचखळगा नाहीं ना?' [आड द्वि]

**आडक**—पु नास, प्रतिबंध, 'अपमानाचिये आडके। देखोनि न फडके भयभीतु।' –एभा ११ ४६४ [अडकणें]-

**आडकंठ**—अडकंठ पहा

**आडकडा**—पु १ कड्याचा मध्यभाग, अर्धा कडा, दुर्गम कडा 'तपोदुर्गांचा आडकडा।' –ज्ञा ६ ४७६ २ (ल्रि) अडथळा [आड=अर्धा+कडा]

**आडकण**—अडकण पहा

**आडकणी, आडकथा, आडकर, आडकळणें, आडका, आडकाम, आडकित्ता**—अ मध्यें पहा

**आडकाठी**—स्त्री १ अडथळा, अटक, प्रतिबंध, हरकत, प्रत्यवाय (क्रि० घालणें) 'परीणामी त्वां रुचिली शाम्हा आडकाठी। हें सांग काय म्हणउनीया नये सदनाशीं॥'–होला १२३ २ दाव, बधन, तावा, वचक (क्रि० करणें, घेणें)

**आडकाष्टा**—पु १ कासोटा न सोडता थोडा बाजूस खोंवून ल्पवीस वसणें २ अडकाष्टा पहा [का अड्ड+स कच्छ+पट्टिका, प्रा कच्छुटिया]

**आडकीसुडकी**—स्त्री (शब्दश अर्थ अर्थे पटकूर लावणारी) एखादी क्षुद्र स्त्री 'बसलास झाडावर एक आडकीसुडकी। न धरी मायेची ह्वाही॥'–होला ५३ [आडकें=अर्थे+सुडकें=वस्त्र]

**आडकुचा**—पु (क) आडोसा

**आडकुडता–चा**—पु.हाताचा केलेला आडवा चुळका,कुडता (पाणी पिण्यासाठीं तोंडाजवळ आडवा हात धरतात ता) 'आड कुडता करून पी, आडकुडत्यानें पी [का आड+कुडत=पिणें, म कुडता=चोंटें जुळवून केलेला तळ हाताचा खळगा]

**आंडकुली, आंडकूल**—अमध्यें पहा

**आडकुशीचा**—वि (ल) एका बाजूस, असलेला, मुख्य विषयात नसलेला, मुख्य विषयास सोडून [आड+कूस]

**आडकुशीस, आडकुशीं**—क्रिवि (ल) सरळमार्गापासून दूर, आजूबाजूस, एकीकडे, अडगळीच्या जागीं

**आडकूट–ड**—न अडोशासाठीं घातलेली भिंत, पडदा, कुपण २ (प्र) अडखळ, प्रतिबंध, अडथळा (क्रि० करणें, लावणें, घालणें, लागणें, पडणें, येणें) [आड+कूड, स कुड्य]

**आडकूल**—अडकूर पहा

**आडकूस**—स्त्री आडबाजू –वि, –क्रिवि आडकुशीचा, आडकुशीस पहा

**आडकोठा**—क्रिवि (काव्य) कोपऱ्यात, एकाबाजूस, एकीकडे 'जैसा धृथिक अन्याय करूनि। बैसे लपोनि आडकोठा।' [आड+ स कोष्ठ]

**आडखप्पा–खर्च–खळ–खळणें–खाणें–खाद–खुळणें–खूळ–खोल–गडा–गल्ली–गाव–गिऱ्हाईक–गिऱ्हाईकी–ग्राहकी–घोडा**—अ मध्यें पहा

**आडखिळा**—पु लगोरीची रचना, ज्यावर नेम धरावयाचा असें स्थळ, निशाण, लक्ष्य 'आपणचि आडखिळा कीजे।तो कौतुकें जैसा विंधोनि पाडिजे।'–ज्ञा ११ ४७८ [आड+स कील्क, प्रा खिल=खिळविणें?]

**आडखिळी**—स्त्री १ दाराचा अडसर, कडी, खिळी २ (व) अडथळा, हरकत [आड+खिळा–ळी–री]

**आडखेडें**—न (गो) अडचणीच्या वाटवर असलेलें खेडें अडगांव पहा

**आंडगडी**—अ मध्यें पहा

**आडगत-गात**—वि (गो) आडगिऱ्हाईकी, आयता, तयार मिळालेला-ली-लें, वापरलेला (इ) सेकंडहँड 'हावेंही आमीर आडगत घेतल्या' [आड+स गम्-गत]

**आडगळ**—स्त्री १ (कों) अडसर [आड+गळणें] २ अडगळ पहा ३ (कु) वाडी, खेडेंपाडें —**ळीचा**—वि गावठळ, खेडवळ, गव्हार, अप्रसिद्ध

**आडगा**—अडगा पहा

**आडगांठ्या**—वि कुरघी, खुनशी, द्वेषी, तेढ उत्पन्न करणारा [आड+गांठ]

**आडगाडी**—स्त्री छकड्यांहून मोठी पण गाडीहून ल्हान अशी गाडी [अर्ध+गाडी]

**आडगात**—न १ शरीराचा घेर २ पल्प, वाज वगैरेंचें आडवें लाकूड [आड+गात्र]

**आडगात-त्या**—वि वक्र, कुटिल, तऱ्हेवाईक, विलक्षण, शकेखोर, विरोधी बोलणारा 'आडगात ना उभगात वाटेनें चालला गीत गात' [आड=आडवें+गाणें]

**आंडगी**—स्त्री (क) (व्यापार) गड्डा 'काल इकडून चार आडगी लुगडीं आलीं' 'आडगींतलीं लुगडीं हिरव्या रगाचीं होतीं' [का अडिगे=अखें, अर्धे बैलाचें ओझें]

**आडगुड**—स्त्री (व) पडदणी [आड+गुडाळणें]

**आडगु-गू-ण**—पु १ (कों गो) भुताखेताचा जोर, भुतानें पछाडणें, काहीं चिन्हांवरून दिसून येणारें भुताखेतांचें दुखणें, वाहेरची बाधा २ कुटुंबातील मृताच्या अवकृपेमुळें होणारी बाधा [आड+गुण]

**आडगोखमा**—अडगोखमा पहा

**आडघात**—स्त्री अवेळ, अकाळ, बेहगाम, गैरमोसम, अयोग्य संधि [आड+घात]

**आडचा**—वि छत्रासालीं, आश्रयाखालीं असणारा [आड]

**आडचावट**—वि कटाळवाणें बडबडणारा, बडबड्या, बोलण्यानें त्रासदायक वाटणारा, वाचाळ [आड+चावट]

**आडचोर**—वि खादीकोंपऱ्यात पडलेल्या, किरकोळ वस्तु चोरणारा, उचल्या, भुरट्या [आड+चोर]

**आडछ, आडजुना, आडणा आडणी, आडत, आडत्या, आडदांड, आडदाळ, आड धोतर, आडनळ, आडपंचा, आडपेठ, आडबंब आडवाक, आडनाड, आडनीट, आडनांड, आडनेड, आडपन्हळ, आडफळें**—हे मध्यें पहा

**आडजात**—स्त्री मुख्य जातीशेजारीच दुसरी जात, तली, तांगोळी, पंगर —वि गल्थाळ, दिवट, द्वाड गोडर, त्रासदायक (मुऊ) [आड+जात]

**आडजाळ**—क्रिवि अकल्पित, भलतें संकट 'जैसें गगनीं आभाळ। ना तरी तरणीं मृगजळ। तैसें नाथिलें आडजाळ। तुज पडिलें हें।' —विपु ७ ४५ [आड+जाल]

**आडजीभपडजीभ**—स्त्री (व) जिभेचा एक भाग, (सामा) पडजीभ म्ह० आडजिभेनें पाहिलें, पडजिभेनें वास घेतला=खाऊन मन तृप्त झालें नाहीं म्हणजे ही म्हण योजितात

**आडझट**—न ल्हानसें संकट, अडचण, बारीकसारीक त्रास, उमेद खचविणारी गोष्ट एखाद्या नीच मनुष्यानें आणिलेलें संकट. [आड+झट]

**आडणी**—(कु) अडणी पहा

**आडणीसावकार**—पु किरकोळ, ल्हान सावकार 'व्याजाच्या आशेनें ल्हान रकमा कर्जाऊ देतात जमीनी गहाण घेतल्या त्या गहाणदाराना किंवा इतराना मक्ताईनें, खंडानें लावतात त्रागा, शिव्याशाप देऊन कर्ज वसूल करण्याचा यत्न करतात पण कुणबी शेतमाल त्यांच्या हातीं लागू देत नाहींत काहीं दिवस अदरचा सोसुन बहुधा मुद्दल रुपयाचे सहा ते बारा आण्यावर आपले रोखे वाण्याना वचन करतात' —गागा १६१ [आडणी किंवा अडाणी+सावकार]

**आडणूक**—अडणूक पहा 'परोपरीं सिकविणें। आडणुका सागत जाणें।' —दा १९ १० १५

**आडणें**—अडणें पहा

**आडताल**—पु कोणत्याहि तालाचें दीडपटीचें आवर्तन अडताल पहा

**आडतास**—न जमीन नागरताना नागरास पुष्कळ वेल असल्यामुळें शेताच्या बांधापर्यंत नागर जाऊं शकत नाहीं अशी नांगराव याची राहिलेली जमीन आडवी नागरतात त्यास म्हणतात [आड+तास]

**आडताळा**—अडताळा अर्थ २ पहा 'परी हा सूक्ष्म आडताळा। वारी विवेकें वेगळा।' —दा ८ १० ६९

**आंडतास आंडदोरी, आंडधरणी**—अ मध्यें पहा

**आडधळा**—अडधळा पहा

**आडदंड**—पु अडथळा आडकाठी पहा 'द्वारपाल आडदंड। धालू न शक्ती महाभये।' —पाप्र ३ ९७ [आड+दंड]

**आडदंडगी**—स्त्री (व) (विणकाम) विणलेलें कापड मागाच्या टराविक उचीवर येण्याकरिता ठेवलेलें आडवें लाकूड याच्या पुढें आडसरावर कापड गुंडाळलें जातें व विणकरी त्यावर रेलून विणतो [का अड्डु=आडवें+दंडगी=काठी]

**आडदरा**—अडदरा पहा 'यता जाता नेणों काळाचा आडदरा।' —निगा ६६

**आडदाया**—पु. गुप्त द्वेष, देवा, सुनस [आड+दावा]

**आडदिवस-दिस**—पु १ ज्या दिवशीं कांहीं नेमधर्म किंवा आचारसत्कार नाहीं असा रिकामा दिवस २ एक सोडून एक दिवस, दिवसाआड दिवस, अधला मधला दिवस ३ विन कामाचा, अयोग्य दिवस [आड+दिवस]

**आडनर**—पु (नळीस वगैरे) आतील बाजूस आट पाडणारें यंत्र [आड+न॰]

**आडनळी**—अडनळी पहा

**आडनाम**—अडनाव पहा —न टोपण किंवा ओपरोधिक नाव 'आडनामीं धर्मी बोलाविलु। गोपाळ झाला आड पडलु। तेवींची अमृता घ्रीं नीववीतु। सवगडेया तें।' —दाव २१७

**आडनांव**—न १ अडनाव पहा २ समाजात एकाच नावाच्या अनेक व्यक्ती सापडतात त्या अर्थी व्यक्तीचा निर्देश अधिक निश्चितपणें करता यावा म्हणून त्याच्या वृत्तीवरून, गावाच्या अगर देशाच्या नावावरून जें त्याला विशिष्ट नाव लाविलेलें असतें तें, कुलनाम, उपनाव 'अस्तमानाचें जयासी। आडनाव नाहीं।' —ज्ञा ८९० २ (ल) व्यर्थ नाव, खोटें नाव 'जीभ जें आरोगू जाये। मग रसना हे होये। आडनाव वीं॥' —अमृ ६ ६२ 'तैसें स्त्रीसगें जें सुख। आडनाव मात्र देख।' —मुरा ७८

**आडनीत**—स्त्री १ (गो) अन्याय्य निवाडा २ अन्याय्य कृत्य 'तागली ही आडनीत हें कोणीय सागत' [का अड्ड= आडवी, वाकडी+स नीति]

**आडपडदा**—पु १ मध्यें सोडलेला-लावलेला-टांगलेला पडदा (पलीकडचें दिसू नये म्हणून) २ (ल) आच्छादन, गुप्तपणा, झाकण 'येथें आडपडदा तरी आहे का?' ३ मर्यादा, दाब, विनय, लज्जा 'वडिल देखत तपकीर ओढणें झालें तर एकी कडे तोंड करून ओढावी, इतका तरी आडपडदा असावा' [आड+पडदा]

**आडपदर-पद्रा**—पु १ पडदा (डोळ्यावरील, व्रणावरील) २ आडपडदा, गुप्तपणा, झाकण, सकोच, विनय, लज्जा [आड+पदर]

**आडपाग**—न मासे धरण्याचें मोठें जाळें (हें बारा हात व्यासाचें असतें) [आड+पाग]

**आडपाट**—स्त्री पडशी (गोणी)च्या दोन्हीं तोंडाच्यामधील भाग-तरट [आड+स पट मै पाट]

**आडफट**—स्त्री १ चीर, भेग (तक्तपोशी, दार वगैरेंतील) २ एकीकडचा काना कोपरा, एकीकडची जागा, एकांत स्थळ [आड+फट]

**आडफांगुर**—पु (गो) एकाच्या खालीं एक असे वाढलेला मोड येणें, फुटणें, आडवे अंकूर फुटणें [आड+फांगुर= अंकुर, फादी]

**आडफांटा**—पु १ हुज्जत अडथळा, आक्षेप, हरकत, तक्रार, हुज्जत अडफाटा पहा २ अवचित अडथळा, विघ्न, संकट ३ (का) भुतापरतांची बाधा, भुतानीं पछाडणें ॰भरणें-आडमार्गानें जाणें, वहकणें 'अहंकार मन पिऊनी। भ्रमती मायाघोरविपिनीं। आपली शुद्धि विसरोनि। आडफांटा भरले हो।' —ह ७ ११८ [आड+फाटा] ॰ट्या-वि १ आडफाटा, अडचणी, अडथळा घालणारा, तक्रार करणारा, तक्रारी २ ल्हरी, चिडखोर, तिरसट, हट्टी

**आडबंदर, आडवाच्या, आडवायरो, आडमाप, आडमूठ, आडमुठा, आडमुठ्या, आडम्हातारा**—अ मध्यें पहा

**आडंबर**—पुन (श्रीमती, विद्वत्ता, पवित्रता इ॰ काचा) डौल, दिमाख, पोकळ बडेजाव, रिकामी ऐट अवडंबर पहा 'जैसें आडंबर स्वप्न भेदाचें। नाथिलेंचि।' —विउ ८४५ (क्रि॰ घालणें, मारणें) [स आ+डंबर]

**आडंरा**—पु (कों) दारास, खिडकीस लावण्याचा आडसर [का अड्ड]

**आडबाजू**—स्त्री मुख्य मार्गाहून एकीकडचा प्रदेश [आड+बाजू] —क्रिवि एका बाजूस, आड बाजूस, कोनाकोपऱ्यात नेहमींच्या जागेच्या पलीकडे ॰चा-वि एकीकडचा, एकबाजूचा

**आडबारें**—न (गो) मडपाच्या उभ्या मेढीवर जे वासे अगर पोफळीचे साट आडवे घालतात त्यापैकीं प्रत्येक

**आडबिदी**—स्त्री आड वाट, आड रस्ता, लहान मार्ग 'जेथ जैन मार्गाचिआ आडबिदी।' —शिशु ९७ [का अड्ड+बिदी=गल्ली]

**आडंबुली**—भडबुली पहा

**आडबोली**—स्त्री (कों गो) १ वाकडें बोलणें २ संदिग्ध, अस्पष्ट, न समजण्यासारखें बोलणें [आड+बोली]

**आडभंगड**—वि (व) मूर्ख, अडाणी अडाणी पहा. 'रामा फार आडभगड माणूस आहे'

**आडभर-भारी**—स्त्री १ अडचण, संकट २ अडवेपणा आडभरीं भरणें-१ (गर्भांत) आडवें होणें, येणें २ वाकडे जाणें 'चित्त बहु निर्गुनलें। तेणें आडभरीं भरलें।' —दा ३ १ ४० [आड+भरणें]

**आडभिंत**—स्त्री पडदी, दोन भाग करण्यासाठीं मध्यें घातलेली भिंत अडभिंत पहा म्ह॰ आडभिंतीची पडभिंत, पड भिंतीचा पोपडा=दूरचें नातें दाखविणें या अर्थी

**आडमळणी**—अडमळणी पहा

**आडमानई-आडमानाय**—पु (राजा) पारगा, मुलगा, आडवाच्या [आड+माणूस? म मान=माप]

**आडमार्ग**—पु आडवाट आड वळणाचा, एका बाजूचा, दुसरा रस्ता 'परमार्थ पथ क्रमिता साग। पाऊल पडलें आड मार्गीं।' [आड+मार्ग]

**आडमिळकत**—अडमिळकत पहा

**आडमुद्दा**—पु सबब, तक्रार, अडथळा, भलता विषय [आड+मुद्दा]

**आडमेळा-ळें**—पुन (गो कों) अकस्मात उत्पन्न झालेली अडचण, आडकाठी, प्रतिबंध, विघ्न, व्यत्यय, अपशकुन 'तें काम करून हात गेल्लों, इतल्यात मधींच हें आडमेळें आयलें' [आड+मिळणें-मेळ]

**आडमोड**—स्त्री मोडतोड, कापाकाप, नाश 'तळीं रिघ विता वोघें। पाताळादि विवरें वेगें। नाशूनिया पन्नगें। अगभगें आडमोडी करी।'—एभा ७ ५२४ 'कवाडें करोनि आडमोडी। प्रवेशला आंत।'—कथा ४ ३ १८ (तुळ) अडमड पहा [आड+मोड]

**आडमोरा-मोहरा**—वि १ एका बाजूस, समोर नाहीं असा, दूर रस्त्यावर नाहीं असा 'जाय पाहता आडमोहरा। सत सुपंथें लाविती।' मुविराट ७ १०३ [आड+मोरा-मोहरा=मुख] क्रिवि मध्यें, आड मार्गांत, प्रतिबंध रूपानें (क्रि० येणें, असणें, होणें, पडणें, घालणें, ठेवणें इ०) —रीं-क्रिवि १ आडून, दडून आणि वाटें २ कोनाकोपऱ्यांत, सावीकोंदींत, बाजूला, एकीकडे

**आडय**—स्त्री एक पक्षी [स आडि]

**आडय, आडय**—स्त्री (कों) आडवें होणें, कुशीवर निजणें, पडणें, टेकणें (क्रि० घेणें) [आडवा]

**आडरझांव**—न (गो कु) अन्यायानें बोलणें 'तागेलें हें पैलें आडरझाव!' [आड+पोर्तु राझाव=न्यायीपणा]

**आडरात**—स्त्री अर्धी रात्र, मध्यरात्रीनंतरची रात्र, भलतीच रात्रीची वेळ [अर्ध+रात्र]

**आडरान**—न अरण्य, आडवाट 'ना तरी सेऊनि थोर आड रान।'—दावि ३९ अडरान पहा ०घेणें—वाकडें बोलणें, मुद्द्याला सोडून बोलणें, भलतेंच समजणें 'ऐसा श्रोतयाचा अनुमान। श्रोतीं घेतलें आडरान।'—दा ९ ३ ७ या शब्दाचा उपयोग पुढील क्रियापदाशीं करतात जसें—आडरानात भरणें, जाणें शिरणें, फिरणें, बहकणें, घुसणें भरकत फिरणें —नात शिरणें—जाणून बुजून अज्ञान दाखविणें, वेड पांघरणें 'तर ते त्याचा अर्थवाद करून आडरानात शिरतील काय?'—टि ४ ४ ६३

**आडरानी**—वि गावठळ खडवळ शहरातील नव्हे असा (भाषा, रीत, माणूस, पदार्थ, व्यापार)

**आडल**—पु. आडहत्यारी आडाऊ पहा 'स्वार माणूस आडलाचे'—पोमारो १ ३२२ [अडला-ऊ पहा]

**आडला**—पु विळी, विळा अडला पहा

**आडलों**—अ (गो) दांड टाकण्यापूर्वी टाकतों या अर्थी नावधनिरीचा इशारा.

**आडलागांजला-पिडला-भिडला**—वि अडचणींत अस लेला, आलेला, सापडलेला [अडणें+गांजणें]

**आडव**—न १ (कु) वेंग किंवा दोन हाताची कवळी २ (ख) एका कवळींत मावणारी भाताची पेंढी

**आडव**—न १ अरण्य, रान, जंगल 'जी जीविताच्या आडवीं'—ज्ञा १६ ३४ —एभा १३ १३४ २ अडचणीचें ठिकाण 'ते चोरांसी आडव होये।'—ज्ञा १८ ७२४ [स अटवी]

**आडवकी-गी**—अडवरी-गी पहा 'सकरपार्टीही आड वर्गी। न करणें जें॥'—ज्ञा १६ २०३

**आडवट**—अडवट पहा

**आडवण, आडवाण**—न १ (कों) डोंगराचा मध्यभाग, शिखर आणि पायथा यामधील भाग [स अर्धवत्] २ डोंगरावरील उताराची जागा, उतरण, उतरणीवरील जंगल ३ अडवण पहा

**आडवत**—न (कों) काकडीचा कीस तांदुळाच्या पिठांत शिजवून केलेलें एक पक्वान्न

**आडवर्ण**—पु आडजात [स अर्ध+वर्ण]—र्णा-वि १ आड जातीचा, सकरजातीचा (मनुष्य) २ भुताखेताच्या बाधेपासून झालेला (रोग, व्यथा) [आड+वर्ण]

**आडवल**—स्त्री (गो) हिंदी पोर्तुगीजांतील (मजूरवर्गांतील) किरिस्तांव —स्त्री न बघूल लग्नाच्या वेळीं हळदीचा रंग दिलेलीं वस्त्रें नेसविल्यानंतर त्यावर त्याच रंगाचें एक वस्त्र गुंडाळून हातात धरावयास लावतात तें [आड+स वलन=वेष्टन]

**आडवली**—स्त्री (गो) विळी अडला-ऊ पहा

**आडवस्ती**—स्त्री १ एकाबाजूस, आडवळणास, किंवा खोल घाट जागेंत वसलेलें गाव २ वरील प्रकारच्या जागीं केलेली वस्ती, वसाहत रहिवास [आड+वसति]

**आडवस्त्र**—न मुख्य वस्त्राशिवाय मध्यें पुरुष पंचा किंवा स्त्रिया पडदणी वगैरे नेसतात तें, सोवळें नेसताना मध्यें दुसरें वस्त्र नेसतात तें [स अर्ध+वस्त्र, अंत+वस्त्र]

**आडवळण**—अडवळण पहा

**आडवा-आडवातिडवा, आडवेंउभें, आडसणें, आड सागड-डी, आडहतेर-री-हत्यार-री**—अ मध्यें पहा

**आडवाग**—न एक बाजू 'आपुलिया उसीसा आडवागीं ठाउनि आपण पाहतयाकड खाटि नीजति।'—गूढपाठ (महानु भाव) [आडवें+अंग]

**आडवाट**—स्त्री १ एका बाजूचा, आड वळणाचा रस्ता, आडमार्ग २ मोठ्या रस्त्याच्या बाजूची वाट, रस्त्याची कड [का अड्ड+म वाट, रा अतवाट(राजवाट)]—ट्या-वि भलत्या मार्गानें जाणारा, सरळ न वागणारा, एककल्ली, करनकल्या

**आडवादंड**—पु. ( व्यायाम ) दोन खांब जमीनींत पुरून त्याच्या शेवटास दोन भोंकें पाडून त्यांत आडवी गुळगुळीत पहार बसविलेली असते ही पहार अधिक खालीं घेणें झाल्यास दोन्ही खांबास समोरासमोर आणखी भोंकें असतात या पहारीस दोन्ही हातांनीं धरून किंवा पाय अडकवून वेगवेगळ्या प्रकारच्या उड्या घेतात या उड्यांचे अनेक प्रकार आहेत ( इं ) हॉरिझाँटल किंवा सिंगल बार

**आडवार**—पु १ कोणत्याहि विशिष्ट दिवसाशिवाय किंवा नेम लेल्या दिवसाशिवाय इतर दिवस, अधलामधला दिवस २ भलता, अयोग्य दिवस [ आड+वार ]

**आडवारणें, आडवरणें**—अक्रि ( प्रा ) रेलणें, ( निजण्या साठीं ) आडवें होणें [ आडवा+आरणें=लोळणें, अडारणें ]

**आडवारा**—पु अडथळा, प्रतिबंध 'करितसे आडवारा। विश्वामासु जो ' —ज्ञा १५ ४६ —एभा ११ ११७१ ' जैसें सिद्ध चिया आहारा । जतुक करिती आडवारा । ' —कथा ४ ११ १२८ [ आड+वारणें ]

**आडवाव**—पु आड रस्ता, अडवळा, मधला रस्ता ' न फेडिता आडवावा । ' —अमृ ७ २६५ [ आड+वाव=वाट ]

**आडवी**—स्त्री अडवी पहा ०काडी—स्त्री अडथळा, प्रतिबंध ' कामप्राप्तिसी आडवी काडी । होता क्रोधाची पडे उडी । '—एभा २३ २५२

**आडवीण**—अडवण पहा

**आडवें**—अडवें पहा

**आडवें**—न अरण्य ' अविद्येचें आडवें । भुजीत जीवपणाचें भवे । ' —अमृ २ २ [ स अटवी ]

**आडवें**—अडवा-वें पहा

**आडवेल**—अडवेल पहा

**आडवोल**—न (गो ) ओलें वस्त्र [ आड+ओलें (वस्त्र) ]

**आडसणें**—अडसणें पहा

**आडसंधि-सांध**—अडसंधि पहा

**आडसर**—पु १ दार किंवा खिडकी बंद करण्याकरिता लाकडी किंवा लोखंडी दांडी, गज, खीळ, अडणा, अड्ड, लाकडी अडसर हा थोडें कोठें दाराच्या पाठीमागच्या भिंतींत भोंक ठेवून त्यात बस विलेला असतो व दार बंद करताना तो दोन फळ्यांच्या आड लाव तात [ आड=आडवें+सरणें ]

**आडसर**—नपु ( कों ) ज्यात पाणी अधिक असून खोबरें थोडें झालें आहे असा कोंवळा नारळ, शहाळें [ स अर्ध+सरस] २ डोंग राभोंवतीं असणारी वाट, ज्याचा खालच्या भोंवतालचा भाग तुटल्या सारखा दिसतो असा डोंगराचा भाग, डोंगराच्या माथ्यावरची धार, डोंगराची बगल 'आडसरामाजीं राहिले ।'—दावि २५० ३ गावच्या शिवेचा दगड ४ (विणकाम) उभा ताणा खालचा पसरलेला रहावा म्हणून पहीच्यापुढें ताण्याच्याखालीं आडवी काठी लावतात ती ५ दाइगर, घटिंगण, आगडबंब मनुष्य [आड+स सृ=सरणें] - शिवि घड, आवळ, ताठ **आडसरासारखा पडणें-निजणें-पस रणें**—अव्यवस्थितपणानें रस्त्यात वगैरे पडणें, निजणें, लोळणें

**आडसाटी**—स्त्री ( गो ) पूर्ण नव्हे व अपूर्ण नव्हे अशी मधली स्थिति [ अर्ध=आड+स स्थिति ]

**आडसाटो**—वि १ ( गो ) मध्यम स्थितींतील, पूर्ण किंवा अपूर्ण नाहीं असा, अर्धवट

**आडसाटो**—पु ( गो ) आडसड अडसड पहा

**आडसाठा**—पु तात्पुरती एका बाजूस करून ठेवलेली, नेहमीं न लागणाऱ्या वस्तूची रास, संग्रह प्राय सप्तमी विभक्तींत प्रयोग जसें-आडसाठ्यात यावरून भलत्या ठिकाणीं ठेवलेलें, टाकलेलें [ आड+साठा ]

**आडसार**—पु. (कुड ) पूर्ण न झालेला नारळ आडसर पहा ' आडसार खाऊन गोड लागता ' [ स अर्ध+सदृश ]

**आडसाल**—न १ एक वर्ष टाकून एक वर्ष, वर्षाआड वर्ष २ ( शेती ) विश्रांतीचे साल जसें—ज्या जमिनींत एक वर्षी जोंध ळ्याचें पीक केलें तीत पुढील वर्षी बाजरी इ० दुसरीं पिकें करणें —ल्या ऊंस-पु अठरा महिन्यानीं होणारा म्हणजे एक वर्षाआड येणारा ऊस

**आडसोंग, आडांख, आडांखताळा, आडांखा, आडाणचोट - पट्टी - वस्ती - आडाणा-णी - आडाणी जात-आडाणी कवाडी, आडात, आडातुडी, आडाथ, आडाव, आडावा, आडून**—अ मध्यें पहा

**आडळ**—न (कों ) गोरवी कटगी या नवाचें झाड

**आडळ**—आटल आडळू पहा

**आडळ**—पु स्पर्श 'कामक्रोधादि त्या नाहीं आडळ '—स्वा १ ५२५

**आडळ**—पु १ विकल्प 'कवणे विखीं आडळु । नेघे चित्त ।' —ज्ञा १३ ३५८ २ अडथळा, प्रतिबंध ' मग घरींचाचि ठेवा । जेवीं डोळ्या दावी दिवा । तरी घेता काय पाडवा । आडळु असे । ' —ज्ञा १८ ८९२ ३ यत्किंचित् ' जळीं जळावेगळ । कापूर न दिसे आडळ । ' —अमृ ३ २७ अडळ पहा

**आडळणें**-क्रि अडखळणें अडळणें पहा ' तरी उनूचि का आडळिजे । जयापरी । ' —ज्ञा १ २४७

**आडळणें**—क्रि आढळणें, प्राप्त होणें ' एऱ्हवीं हा योगियां नाडळे ' —ज्ञा ४ १३

**आडळी**—स्त्री एक पक्षी अडल पहा [ स आडि ]

**आडळीभ्रमणी**—स्त्री (व) अधुक पूर्व कल्पना, संभव 'आडळीभ्रमणी नसता तो वारला' [अटकळ+भ्रम]

**आडळू**—पु आढळ 'जेणेसीं होता आडळू। पुरे जिणें।' –गीता १.४३४

**आडा**—पु १ (कों) शेतास केलेलें काटेरी झाडाझुडपाचें किंवा निवडुंगाचें कुंपण [का अड्ड] २ (गो) घराभोंवतालचें दगडी कुंपण 'ताणें पोर्साभोंवतीं आडो केलो.' (सामा) कापाउड, आडोसा ३ (कु) दरवाजा बंद करावयाचा अडसर ४ (हेट) गलबताच्या व वल्मीच्या आधारासाठीं एकाखालीं एक असलेलीं दोन मोठीं लाकडें ५ (हेट) घराचें आढें [का अड्ड] ६ रेघा, रघ 'भालप्रदेशीं चंदनाचा आडा रेखिती।' –पूजावसर (महानुभाव) [का अड्ड]

**आडा**—पु एका जातीचा पक्षी, बगळा [स आडि]

**आडाआडी**—स्त्री धडपड, खटपट, श्रम, आटाआट 'करूनि आवडीच्या कावडी। या रामेश्वरीं यती भाविक कापडी। क्षणिक आयुष्य जाणुनि तातडी। आडाआडी पावले।' –ह १५.१४० 'एवढी जिवाची आडाआडी करून तुम्ही साधणार काय?' अट अट पहा

**आडाऊ**—पु बंदूक, तरवार या शिवाय हलकें हत्यार वापरणारा–पायदळ शिपाई, आडहत्यारी 'आडाऊ पायींचे चालत।' –मुआदि १९.१० अडाऊ पहा

**आडांख–खा, आडाखा**—अ मध्यें पहा

**आडांगपण, आडांगाय**—न (गो) वात्रटपणा, खोडी, मस्ती, आडदांडपणा 'ता गेलीं आडांगपणा चटल्यात' [आड+अंगी]

**आडांगी**—वि (गो) वात्रट, आडदांड, दांडगा, भांडखोर, मस्त 'भारी आडांगी जाला तों चलो!' [आडवगी, आडवें+अंग]

**आडाचौताल**—पु (संगीत) एका तालाचें नांव, यांत मात्रा चौदा व विभाग सात असतात [आडा+चौताल]

**आडाडी–आडाणचोट, आडाणा–णी, आडाणीजात, आडात–थ, आडांबरी**—अ मध्यें पहा

**आडांत्री**—क्रिवि (कु) नाजूक स्थानीं किंवा मर्मस्थानीं (क्रि० लागणें, पडणें, मारणें) [आड+आंतर्]

**आडांगॉ–गो**—पु (गो) फळी, आडसर 'दाराक आडामॉ (आडवॉ) घाल'

**आडामोडा**—पु उसाच्या रसानें भरलेली (चरकाखालील) मार्डी कुणाकडे नेणारा –कृषि ८७३

**आडाय**—पु १ आड हत्यारी अडाऊ–व पहा 'मावळे आडाव हेटकरी, पाईत याची सजगणी करून हशम मेळविले' –मराभा ६ २ धाडसी, शूर शिपाई

घरो १ ३०

**आडाव**—न (कर्ना) (कडव्याच्या?) पाच पेंढ्या अडव पहा

**आडांव**—न (कों) चालू कामापुरती खणलेली, न बांधलेली विहीर [आड+स वापी, म वाव]

**आडाव–बु**—वि (क) आडगिऱ्हाइकी, जुनाट (वस्तू) 'आडाव वस्तु घेतली म्हणजे स्वस्त मिळते' [आड]

**आडावण**—अडवण पहा

**आडावणी**—स्त्री (नाविक) अडवणी पहा अडवण पहा

**आडावणें**—क्रि (कु) बंदरांत आगबोट दूर उभी असता उतारू उतरून घेण्यासाठीं आगबोटीस पडाव लागणें [अडविणें प्रयोजक]

**आडावतपाग**—न (कों राजा) बारीक मासे पकडण्याचें 'रोंगो' नावाच्या जाळ्याहून लहान जाळें आडपाग पहा [अर्धे वत्=अर्धवट+पाग=जाळें]

**आडास**—पु (गो) आडोसा, आच्छादन, छाया, अधार [आडोसा]

**आडास**—स्त्री (शेती) जमीन एकदा उभी नांगरल्यावर तीच पुन्हा आडवी नांगरणें पहिल्या नांगरणीस तास म्हणतात [आड+तास]

**आडासन**—न वधर 'आडासनी दोनी दोनी प(ख)में।' –उषा ८२४ [स अर्धासन]

**आडाळणी**—स्त्री (कु) पेरणीच्या दुसऱ्या दिवशींची नांगरणी

**आडाळा–ळो**—पु (कु) पिळी अढळा पहा

**आडाळी**—स्त्री (कु) मातीच्या भिंतीचें कुंपण

**आडि**—स्त्री (गो) एक लहान मासा, खर्चा बागडा [स आटि–डि]

**ऑडिट**—न हिशेबाची अखेर तपासणी (सरकारी किंवा नियोजित हिशेबतपासनीसाकडून) [इं]

**ऑडिटर**—पु हिशेबतपासणी करणारा, अधिकृत हिशेब तपासनीस [इं]

**ऑडिया**—पु (कों) अडसर, अडवट, अडणा [अड्ड]

**आडी**—स्त्री एक पक्षी, बगळी [स आडि]

**आडी**—अढी पहा –स्त्री १ (कों) रहाट–गाडग्याच्या चाकाला परिघाच्या बाजूनें अक्षाशीं समांतर अशीं ठोकलेलीं लाकडें, एका रहाटास अशा बारा आट्या असतात [का. अड्ड] २ धार काढतांना गाईनें लाथ मारू नये म्हणून तिच्या सभोंवार बांधावयाच्या काठ्या ३ (मल्लशास्त्र) कुस्तींत प्रतिपक्ष्यास पायांत घालावयाची आडी ४ (रामा) आडी (आंब्याची, गवताची, कपाळ, पाय इ ची) अढी पहा ५ (कों गो) जनावराचा पाय मोडला असता तो नीट करण्यास दोन बाजूंस लाकडें

वाधतात ती ६ ( गो ) घराच्या भोंवतालचें दगडी कुपण, गडगा ७ ( कर्ना ) नदी उतरून जाण्याचा लाकडी पूल ८ आडकाठी, अडथळा, प्रतिरध 'जन्मसहस्राचिया आडी।' –ज्ञा ६ ४६५ 'मार्गी काहीं पडली आडी । दूत तातडी पाठविले ।' –एरुस्व १४ ६७ ९ शका १० ( कासारी धदा ) भाडीं घडविण्याच्या उपयोगी असलेलें दगडी, चपटें आरपार भोंक असलेलें उखळ ११ (नाविक) गलबताच्या झाडीच्या वरील लाकडी तक्त, उताराना बसावयासाठीं केलेली जागा, होडीवरील बसण्याकरिता असलेली फळी १२ ( गो ) वाना १३ ( गो ) अडसर

**आडी**—स्त्री (संगीत) गानप्रकार, आदिपरंपरा ( गाणें ) 'आडी गातातीं देवांगणा '–दाव १६५ [स आदि ? का आडु= मार्गे ]

**आडी**—स्त्री ( कु ) भोंपळ्याची कापलेली फाक, तुकडा

**आंडी**—स्त्री (प्र ) अडेर ( खा ) मुलगी [ स अड, अडीर =पूर्ण वाढीचा माणूस ]

**आडील**—वि आडचा, आश्रयाखालील, छत्राखालील, आच्छादनाखालील, आडोशाचा [ आड का अड्ड+ल प्रत्यय ]

**आंडील, आडुकली**—अ मध्यें पहा

**आडीसरी-श्री, आडुक, आडुमाडु, आडुळसा, आडून**—अ मध्यें पहा

**आडू**—१ स्त्री ( कों ) घाटातील सडकेच्या (डोंगराच्या बाजू शिवाय दुसऱ्या) बाजूस असलेली दगडी अर्धी भिंत, बाध २ ( पाथरवट काम ) दगड फोडण्याचें पोलादी हत्यार, मोठा हातोडा अडू पहा [ का अड्ड ]

**आडूक**—वि ( गो कर्ना ) कडवट 'हॉ रोस आडूक जाला ' [ का ]

**आंडूगाडू**—वि पढ, खुळा, कुचकामाचा, मुर्दाड (माणूस) 'चार आडूगाडू मिळाले म्हणून न्याय होतो काय ? ' [ गाडू द्वि ]

**आडे**—क्रिवि ( खा ) बाजूस, पलीकडे, आड 'नग आडे जाले झाडी वहुत। –दावि ७७८

**आडें**—वि (कों )आडवें, कलतें ( क्रि० घेणें ) [का अड्ड]

**आडें**—न १ ( कों ) आढें ( घराचें ) अढें पहा २ उंबरा, उंबरठा 'ग्रामद्वारींचें आडें। नोलाडी कोण।' –ज्ञा १३ ६९९ ३ दोन माणसांनीं कापण्याची करवत, आडवा करवत ४ ( नाविक ) नावेचा कणा, एक जाडें लाकूड; हें नावेस बोडताच्या दुर्मीणावर बसवितात यानें आतल्या बाजूस मजबुती व पाठीस टेकावा मिळतो ५ उसाच्या चरकाचा आडवा दांडा (ज्यास बैल जोडतात तो ) ६ (कर्ना )घरावरील छप्पर माळ्यावरचा भाग [स अट्ट= माडी का अड्ड ] ७ तागडी, ताजव्याची दांडी –सार [ का अड–ड ] ०करी–वि तागडी धारी

**आडे**—भडें पहा

**आडेकरी**—वि १ आड, आडवा येणारा २ ( ल ) वाटमाऱ्या [आड+स कृ–कर]

**आडेचॉ**–क्रिवि ( कु ) वरकरणी, ढोंगीपणानें –वि ( गो ) तात्पुरता, वेळेपुरता

**आडेचें**—वि ( गो ) चालू हल्लींचा [ स अद्य ]

**आडेपाडें**—न शेतातील दरएक खळ्यातून काहीं धान्य घेण्याचा पाटलाचा हक्क अडेपारडें पहा [ स अर्ध+(पाड=माप किंमत ) म परडें ]

**आडेर**—अडेर पहा

**आंडेल**—पु ( गा ) ताडाएवढा वाढलेला पण टोण्या असा मनुष्य [ अडिल, स अडीर=पूर्ण वाढलेला माणूस ]

**आडो**—न ( गो ) शेत, बाग, घर इ०चें दगडी कुपण, तट, गडगा, आडा पाहा

**आंडोर**—अडोर पहा

**आडोरा**—पु व्यभिचार, बलात्कार 'फिरला पापकर्म डागोरा। विध्वसिला यज्ञ सारा। मांडिला स्त्रियांसि आडोरा। प्रगटपणें।' कथा ६ ५ ४३ [ दे आडालिया=रुद्ध रोखलेलें दे अगाड= बलात्कार ]

**आडोशीपाडोशी, आडोसा**—अ मध्यें पहा

**आडौणें**—( गो ) अडविणें पहा

**आडौनि**—क्रिवि बाजूस, आडवें 'आगाअे वीर हे आडौनि सरा । उजू हातिअेरू भरा।' –शिशु ५६४ –शम आडून 'पूर्ण चद्राडौनि आभळु काढिलें ।'–शिशु ७२० अड्डन पहा

**आड्डा**—पु ( दारू काम ) चंद्रज्योती लावण्याकरितां एका कळकाला लोखंडी फूल ( अटा ) लावतात तो [ अर, अड्ड ]

**आड्याळ**—न ( माण ) नांगराचें रुमणें अड्याळ पहा

**आढई**—स्त्री ( उ ) वगळी [ स आढि ]

**आढक**—वि ओढून धरणारा आस्थेचा [प्रा अड्डिक्ष म ओढणें ]

**आढक**—पु आठ पोंड, चार शेर किंवा पायलीचें माप बगालमध्यें दोन मणांचें माप [स आढक=एकचतुर्थांश द्रोण=१६ कुडव=७ पोंड, ११ औंस]

**आढचस**—वि १ मजबूत, पट्ट अटस पहा २ ( ल ) धाडसी [ अटस ]

**आढगळा**—पु माग लोढाचा सरपच –नागा ३०

**आढणी**—स्त्री तिवई अडणी पहा 'रत्नजडित दीप ठेविले जवळी। जडित आढण्या त्या तळीं।' –ह २४ ११९

**आढन**—पु (व) गाय, म्हैस इ०ची कास अडण पहा

**आढमूढ**—वि विस्तृत अफाट बेफाम अढमूढ पहा 'आरामवाटिकेंत आढमूढ वाढून, आकाशास हात घालणाऱ्या वृक्षांची योजना ' –टि १ १५२ [ स अर्ध+मूढ का अग्गुर ]

**आढवारा**—पु छळ. –शर. –शुभानंद उद्योगपर्व १२.२८. आडवारा पहा.

**आढळ, आढा, आढाऊ, आढाल**—अ मध्यें पहा.

**आढळणें**—अडळणें पहा.

**आढळून जाणें**—भेदून जाणें. 'तिलाहि तो आटढून जात असे' –खरा देशभक्त २५९

**आढाल**—न. दाब, अडला. 'उगाउगीच भाडतो। उगाउगीच तंटतो। उगाउगीच टाल घे। उगाउगी आढाल घे.।' –दाचि ७७६. [सं. अड्=हट्ट करणें] ०ढालाची–वि. टालगज, धीट. 'आटाल्टालाची पैं थोर। अभावभावें अति सुंदर। दाटोनि रिघों पाहे घर। वशीकरण मज करील।' –एरुम्व ५.४५.

**आढाय, आढांव**—आडाऊ, आडाव पहा.

**आढावा**—अडावा पहा.

**आढाळ**—न डोंबारी खेळ करताना दोरीवरून चालतांना तोल सांभाळण्यासाठीं हातांत घेतात तो वेळू 'ब्रह्मगोळकाचे आढाळ करी।' –भाए ६०५. [का अड्, आड+ल]

**आढी, आढें, आढेकड, आढेवेढे**—अ मध्यें पहा

**आढी**—स्त्री. फळें गवतामध्यें थरावर थर रचून पिकविण्याची योजना. अढी पहा. 'यासी शुकमुख लागलें। आवडीचे आटिये मुराले। संतजन सेविता धाले। आनंदले परिपूर्ण॥' –ह १९ २२५ [का. अड्कु=ढीग करणें.]

**आढें**—न. घराच्या किंवा छपराच्या दोन पाख्यामधील लाव लाकूड. 'एका पांच वासे असे येथ आटें।' –कचेसुच २ –एभा ८ २३३ ०खांब–(कों.) खाणी, आढें व तुळई यास जोडून असलेला खांब. (इं) किंग पोस्ट. ०आढ्याचें ताक–न (क.) आटें ज्यात दिसेल इतकें पातळ ताक 'आट्याचें ताक व पोहे तो नेहमीं खातो.' [आढें+ताक]

**आढ्य**—पु धनिक, श्रीमान, संपन्न, युक्त सामासन्त धनाढ्य, बलाढ्य; गुणाढ्य, गर्वाढ्य 'आढ्य कुलीनजनाचें दावी औदार्य जे विनयीं तें' –मोभीष्म ५ ४५ [सं.]

**आढ्यता**—स्त्री. १ गर्व, ताठा; मिजासखोरी, प्रतिष्ठितपणा दौल 'तुला निरोप पाठविला म्हणजे तूं यावें, तुम्हीं आला तरच येईन इतकी आढ्यता धरावी पाहिजे।' २ श्रीमंती 'आढ्यु मानुडे आडी। मग आढ्यता जेवीं हारां।' –ज्ञा ११.२०५. (क्रि० धरणें, बाळगणें मिरवणें) [आढ्य+ता] २ ख्याति, प्रसिद्धि (निराढ्यैतर) [सं.]

**आढ्याकरवत**—पु भडवा करवत पहा दोन माणसांनी चालवावयाचा करवत.

**आढ्याचाखोपळा**—पु उंसाच्या चरकाच्या लाटा(गुरा) पैकीं मधल्या लाटेच्या (नरच्या) डोक्यावर बसविलेली हलकी U च्या आकाराची लोखंडी पट्टी. हींत चरक फिरविण्याचें जोखड बसवितात [आढें+खोबळा]

**आढ्यामारणें**—क्रि. १ (व.) धडपड करणें. 'परिस्थितीनें स्वस्थ बसले आणि आतां भाट्या मारतात' २ (ना.) हेलपाटे घालणें

**आण**—स्त्री १ शपथ. 'श्री विठ्ठलाची आण' –शक ११९५ चा चौन्याशींचा शिलालेख. (क्रि० घालणें; वाहणें, घेणें.). माझ्या गळ्याची आण, देवाची आण वगैरे प्रयोग आहेत 'का भीमकाची आण। हे चंद्रकिरण।' –शिशु ८२२. 'धाडी घलें वृकाच्या घालुनि हरिणीस आण गेहाला।' –मोविराट १.५३. [सं. आज्ञा, प्रा. आणा, सिं गु का. आण, ते आन]

**आण**—स्त्री. (कों.) मिठाची रास (माप), कांहीं बंदरात तीन खंडीची तर कांहीं बंदरांत अडीच खंडीची रास असते.

**आण**—उभ १ आणिक; आणि, व. [सं. अन्य]–वि अन्य, दुसरें, निराळें. 'आण वरूं नये बापा।' –उषा १०९८. 'तुजसम वीर नाही आण।' –सुशाति २०.१५६. [सं. अन्य, प्रा. अण्ण]

**आंण**—न. (गो.) अंड, वृषण.

**आणआणूं**—क्रिवि. एकमेक, परस्पर 'मग बोल्लीं निपनवसा आणआणूं।' –शिशु ८१. [सं. अन्योन्य]

**आणकों**—पु (गो.) ठोमणा; वाक्प्रहार. (अव. आणके.) [आण]

**आणक्रिया**—स्त्री. शपथक्रिया; प्रतिज्ञा; आणभाक [म. आण+सं. क्रिया]

**आणखी, आणखीन्**—अणखी पहा.

**आणणावळ, आणवाई**—स्त्री. सामान वगैरे वाहून आणण्याची मजुरी. [आणणें]

**आणणें**—उक्रि. १ घेऊन येणें; जाऊन आणणें २ बहुतेक; जवळजवळ या अर्थी. आणणें हें सहाय क्रियापद ईत प्रत्ययांत कोणत्याहि क्रियापदास जोडलें असता त्या क्रियापदानें दर्शविलेली क्रिया बहुतेक पूर्ण झाली आहे असा अर्थ होतो. 'किल्ला बांधीत आणला होता, घरची फळी फोडीत आणली होती.' [सं. आ+नी, प्रा आणि सिं आणणु. फें. सिग्नी अन]

**आणनेणें**—स्त्री १ (एखादी वस्तु) वारंवार इकडून तिकडे नेणें आणि आणणें २ (ल) उठाठेव, दगदग, कुतरओढ. तांगेवळ [आणणें+नेणें]

**आणप्रमाण**—स्त्री शपथ, शपथक्रिया, आणभाक. [आण+प्रमाण]

**आणभाक-य**—स्त्री. १ शपथेने दृढ केलेला करार किंवा वचन 'स्टके जाहलिया आणभाकेसि' –ज्ञा १२ २५६. [आण+सं भाषा म भाक] २ लग्न ठरवितेवेळी त्यांच्या वेळीं घ्यावयाची शपथ. या करारामुळें दोन्ही पक्ष त्याप्रमाणे वागण्यास बांधले जातात

**आणशपथ**—स्त्री वचन, शपथ. [ आण+शपथ ]

**आणा**—पु १ रुपयाचा सोळावा भाग, हिस्सा १ जमीन मोजणींत ७ ५६२५ चौरस यार्ड म्हणजे एक गुंठ्याचा $\frac{1}{16}$ किंवा एकराचा $\frac{1}{640}$ भाग, गुंठ्याची सांगडी १६ कडशांची किंवा आण्याची असते, २$\frac{1}{16}$ फूट लांब रेषेचें माप, प्रमाण ३ कोणत्याहि वस्तूचा $\frac{1}{16}$ भाग [ अणु–आणक=ल्हान, हलकें स अकनक, किंवा (कार्ष–आपणक–आअणअ–आणा ( राजवाडे ) तुल० आपण=बाजार आपणक)] **आणे पैचा हिशेब**–पु तपशीलवार हिशेब **आणेवारी**–स्त्री पाटीलकुळकर्णी वगैरे सारा आकारण्यापूर्वी उभ्या पिकाची पहाणी करून अंदाज करतात तो

**आणा**—उखाणा. वाहणा पहा

**आणाआण**—क्रिवि लागोपाठ घाईघाईनें सामानसुमान आणणें इकडून तिकडून सर्व बाजूंनीं –दिशांकडून आणणें, जमा करणें, जुळवाजुळव [ आणणें द्वि ] •**आणाआणीचा संसार**–घरचें उत्पन्न ज्यास अगदींच नाहीं अशा मनुष्यानें बाहेरचें मिळवून केलेला संसार **आणा आणा मागें लागणें अथवा पाठीस लागणें**–१ हें पाहिजे, तें पाहिजे असा घरचा तगादा मागें लागणें २ ( ल ) लग्न करणें, कुटुंबवत्सल होणें, पुष्कळ माणसांचा प्रपंच चालविणें, अडचणींत येणें ' भाऊराव, तुमच्या मागें आतां आणा लागला आहे, व्यवस्थित वागा हां ! '

**आणा–दोन आणे**–वि थोडा तरी, किंचित, १६ आण्यापैकीं काहीं अंश ( १६ आणे गुण=पूर्ण गुण ) ' रोग्यास आणा दोन आणे तरी गुण दिसला पाहिजे

**आणा, आणिखी, आणी, आणीक, आणीदरा, आणीयाणी**—अ मध्यें पहा

**आणापट्टी**—स्त्री प्रत्येक बिघा, नांगर, मनुष्य इत्यादि कागणिक घेतलेला एक आणा जादा कर

**आणि आण्, आन्(अन्)–न–नि**—क्रिवि आणखी या अर्थी मराठींत कित्येक वक्ते पुढील प्रयोग करितात–१ अशा प्रकारचीं व्यवस्था आणि सरकारनें केली २ तो आणि तसा वागल हें संभवत नाहीं ३ ब्राम्हण नि दारू पिईल हें होणार नाहीं या स्थळीं आणि नि हे शब्द हन्त हान या शब्दाचे अपभ्रंश आहेत [ स हन्त=(ज्ञाने ) हान–हानि–आणि–णि–आन्–न–नि हान शब्द ज्ञानेश्वर असाच योजतो –राजवाडे ( १८३२ ) ' म्हणौनि उदकीं हान सु। का पवनीं जो स्पर्शु।।' –राज्ञा ७ ३२ ]

**आणि**—उअ आणखी, व, शिवाय, आणिक [ स अन्य ]

**आणिक**—उअ आणि –वि अधिक, निराळा, वेगळा अणिक पहा ' मग आणिकु उपचारु केला तेहीं। तो सांगिजैलु आता।' –शिशु ७७२ –एभा ३ ६९८ [ स अन्यत्क, प्रा अणिक ]

**आणिकचि**—अ भलतेंच, विलक्षण ' आणिकचि सुख होऊनि जाये। म्हणूनि निरार।' –ज्ञा ६ ३७१

**आणियाळें**—वि तीक्ष्ण, धारदार अणियाळें पहा ' अत्यंत सूक्ष्म आणियाळें। तांदुळ वेंछिले गोजिरे।' –एरुस्व १८ १०३

**आणियाळीदृष्टि**–स्त्री कटाक्ष, नेत्राच्या कोंपऱ्यातून पाहणें, वांकडी दृष्टि 'आणियाळिया दृष्टी।' –भाए २६५ [ स अणि ]

**आणी**—स्त्री एक आणा किंमतीचें चांदी, निकल इ० धातूचें नाणें आणा पहा

**आणी**—स्त्री ( चांभारी धंदा )जोड्यास शोभा आणण्यासाठीं टोपरांमधून आणलेली दोरी, टाक अणि–णी पहा [ स अणि ]

**आणीशिवणें**–( चांभारी धंदा ) तळाच्या मध्यें टांकाच्या रेषेंत भरणें

**आणीक**—अणिक, आणिक पहा ' हरिरहित मुखाचा हेतु आणीक नेणे।' –सारुह २ ६७

**आणीकसारखा**—पु दुसरा कोणीतरी, भलताच 'आणीकसारखा असता तर चांगला चोप देता ' [ अन्य( + क+सदृश ]

**आणीया**—पु अपूच्या ( समरागीच्या ) पिकावरील एक रोग –कृनि ५०७

**आणेर**—पु ( गो ) टोमणा

**आणेगा**—स्त्री १ अधिकाऱ्याच्या द्वाहीनें ( एखादी गोष्ट ) बंद करणें २ प्रतिबंध, मनाई ३ द्वाही, दुराही ४ शपथ, आण अनेगा पहा ( क्रि० घालणें, करणें, मोडणें, मानणें ) [ आण ]

**आणेआन**—वि भलतेंच. 'एऱ्हवीं होईल आणेआन।'–उषा ६५० [ स अन्य द्वि ]

**आणोजें**—न अंकुर ' दहीं कर्माचें आणोजें।' –ज्ञा १४ ३२७ [ स अणि ]

**आण्कुमाण्कुल्यो**—स्त्री ( गो ) ल्हान मुलांचा एक खेळ

**आत**—स्त्री १ आत्या, बापाची बहीण (मूळ संस्कृतांत स्वत ची वडील बहीण हा अर्थ असून बापाची बहीण हा अर्थ पुढें मराठींत रूढ झाला ) २ मामी, सासू ( या अर्थी कुणबी लोकांत कोंकणांत वापरतात) हा शब्द हाल–गाथा सप्तशतीमध्यें या अर्थी येतो मराठ लोकांत मुलीची सासू म्हणजे तिची आत–बापाची बहीण–असत, तेव्हां आत म्हणजे सासू [ दे अत्ता=सासू, मामी (गाथासप्तशती), का अत्ते=सासू, आई, ते अत्त दा आत्त=आई, हिं अत्ता, स अत्ता, अत्तिका=वडील बहीण ]

**आत**—न (कों गो ) सीताफळ, (गो ) आत [ म आत्तृप्य=सीताफळ, प आता, पोर्तु आत, मलायी आत ]

**आत**—शअ क्रिवि १ आंतल्या बाजूस, अंतर्भागांत [ स अंतर् ] २ ठराविक मुदतीच्या पूर्वी, अगोदर 'मानें पैसे महिन्याच्या आत परत दे ' ३ मध्यें, मिळून, धरून, सवधांत किंवा सवधानें,

बरोबर, ( गौणपणें ) एकात एक, जसें—कामात काम, खर्चांत खर्च, गोष्टींत गोष्ट, उदीमात उदीम करणें, पोटात पोट चालविणें इ० म्हणन पुष्कळ, गोष्टी किंवा कामें हातात घेऊन किंवा करणें, किंवा मुख्य काम अगोदर करून त्याच्या अनुषगानें इतर कामें करणें. ०मध्यें—(अशुद्ध प्रयोग परतु सामान्य लोकात रूढ ) अतर्भागात आतल्या बाजूस ०बाहेर करणें—किंवा पाहणें—मागचा पुढचा विचार करणें ०येणें—खालावणें, ऱ्हास पावणें, एखादा धदा तोटयात येणें, साधनसामग्रीचा अभाव होणें म्ह० आत असें जसें, बाहेर पडे तसें=चागलें आत असेल तरच चागलें बाहेर येईल

**आंत**—न आतडें, आत्र 'एकार्चीं लोंबतीं आतें। धार्यी कोतें अडकलीं।' –एरुस्व १२ २२ [स अन्त्र, प्रा अत]

**आतई, आतोई**—पु (व) आतेचा नवरा 'माझा आतई येथें राहतो' [स अत्तिका+पति]

**आतउता-ती**—क्रिवि (काव्य) आत, अतर्भागीं, अतीत-ता पहा 'साग जाई गृहाआतउता।' [स अतर्]

**आतंक**—पु १ भीति, धाक 'तयाच्या आतकें द्विजतिलक तेथें पळवळी।' –सारुह ७ २ २ रोग, व्याधि [स] ०निग्रह–व्याधिनाश, रोगहरण

**आंतकडीं-किटी-किडी**—स्त्री अव. (गो) आतडीं 'तों गल्या आतकडेक कमरे दुर्येस जाला रे!' [स अन्त्र]

**आंतकोनाडा**—पु मोठया कोनाडयात राखलेला लहान कोनाडा

**आतखानी**—वि मत्सरी, द्वेषी, असहिष्णु [आत+खाणें]

**आतगी**—स्त्री (वाणी जातींत) आत, आत्या, बापाच्या बहिणीस बहुमानार्थी म्हणतात [आत+गी–गे]

**आंतचा**—वि आतील, आतला [आत]

**आंतचाल**—स्त्री (ज्योतिष) एक मुहूर्त सूर्य नक्षत्रापासून दिन नक्षत्रापर्यंत होणाऱ्या नक्षत्रापैकीं आरभींच्या चार नक्षत्राचा काल हा मुहूर्त गाय, म्हैस नेण्या–आणण्यास शुभ मानतात वरील एकदर नक्षत्रात क्रमानें प्रथमच्या चार नक्षत्रास आतचालींचीं व त्या पुढील तीन नक्षत्रास बाहेर चालीचीं अशी सज्ञा आहे [स अतर्+चर्]

**आतडी, आतडें**—स्त्री न १ आत, अत्र, नलाकृति अत मार्ग, पाटातील नळी २ तातीचें चर्म [स अन्त्र तुल० (इ) एन्ट्रेर, फ्रें एन्तरोन्] **आंतडयाला पीळ बसणें**–खरी कळकळ, माळणी वाटणें **आंतडी कुंपणावर घालणें**–(क) अतिशय श्रम दुणें शिवाय अतडी–डें पहा

**आतणें**—क्रि १ हाणें, पावणें वसाच्या एसे आतलें धवळ।' –मुआदि १९ ७७ असा जरी स्वय विरानि गेलें। परि क्षारतेगीं हातें उरलें। तेहि हळु हळु मधुरता आतलें। या नाव विज्ञान स्थिति।' –स्वानु ११ १ ८५ २ दडपणें 'परि केंवा भारें आतला पिर्वे। देवाचेनि।' –ज्ञा ६ १४५ ३ देणें, अर्पण करणें 'प्रसन्न होऊनि वरदानास। सावरी विद्या आतुली।' –नव ७ ३ ४ व्यापणें 'विचिनता भूतांचिया। आपण आतोनि ठिरिया।' –ज्ञा १८ ५३९ ५ स्पर्शणें, शिरणें आतळणें पहा [स आप्=मिळणें]

**आततायी—आतत्याई**—यी—वि. अपराधी, गुन्हेगार, खुनी, विष घालणारा, चोर, आग लावणारा, दुसऱ्याची जमीन बळकावणारा व दुसऱ्याची स्त्री हरण करणारा या सहापैकीं एक, आततायी मनुष्याचे हे सहा प्रकार शुक्रनीतींत दिले आहेत 'अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापह। क्षेत्रदारापहारी च षडेते आततायिन।' 'शुक म्हणे कुरुनदना। यादव टेंकले आत्ममरणा। तें मारावया रामकृष्णा। आततायी जाणा लोटले।' –एभा ३० १५८ २ (ल) साहसी, हेकड, मूर्खपणाचें धाडस करणारा [स]

**आतप**—पु ऊन, सूर्याचा प्रकाश, ताप 'सागें वातवर्ष आतपु धरे।' –ज्ञा ५ ११४ [स]

**आतपत्र, आतपत्राण**—न छत्री किंवा अब्दागीर, ऊन निवारण करण्याचें साधन 'छत्रातपत्रचामरयुग्म। ध्वजीं उत्तम गरुडलाछन।' –एभा १५ १७३ 'निजबोधाचें आतपत्र। शिरीं तन्मयानें छत्र।' –एरुस्व १५ ९६ [स आतप+त्र]

**आतपमूर्च्छा**—स्त्री ज्या रोगात कडक ऊन किंवा उष्ण हवेचा परिणाम शरीरातील मज्जातंतूवर प्रथम होऊन त्यामुळें हृदय व श्वसनेंद्रियें याची क्रिया बिघडते व त्यानें मूर्च्छा व ताप येतो तो रोग (इ) सनस्ट्रोक

**आतबट्टा**—पु १ निरनिराळ्या प्रकारच्या नाण्यांची अदलाबदल, देवघेव करताना मूळ रकमेंत येणारी तूट, बाहेरबट्टयाच्या उलट [आत+बट्टा=घट] २ नफा अपेक्षित असता नुकसान होणें, खोट, तोटा ३ (ल) बुडता धदा 'आतबट्टयाच्या या अजागळ मढ्याला आधळ्या श्रद्धेची साक्ष आणि अनोळखी ईश्वराची जामिनकी' –प्रेमन्यास –ट्याचा व्यापार–पु नुकसान सोसून केलेला–चालविलेला व्यापार–धदा

**आतबड**—आधवड, वातडें, अधोड पहा 'वारा आतबडीचा जोडा' –एपो ७७

**आतर**—पु उतारा, नावेंतून नदी उतरून जाण्याचें भाडें, तोर 'तुम्हींच मग आतरास्तव मला मुदीना विका' –केका २२ [स आ+तृ–तर]

**आंतर**—वि आतरा, आतल्या बाजूचा, मधला [स] ०त्वचा–स्त्री झाडाची आतली साल 'या आतरत्वचा भरहुमा। वल्कलें म्हणावया महिमा।' –एभा १२ ४३९ ०राष्ट्रीय–वि भिन्न भिन्न राष्ट्रासबधीं, परस्पर राष्ट्रामधील, सार्वराष्ट्रीय (व्यवहार) (इ) इटर नॅशनल ०विवर–न (प्राणि) पोकळी (इ) ब्लॅस्टुसील –स्तर–न (प्राणि) गर्भपिंडाचें एक आतील आवरण (इ) हिपोब्लास्ट

**आंतर्भाव**—पु प्रीति, प्रेम, लक्ष 'आंतर्भाव ते सासुरवाडीं। मायचापें राहिलीं बापुडीं।'-दा ३ २ ३८ [स अतर्+भाव]

**आंतर्वक्रपृष्ठ**—न (ज्यो) आंतील बाजूनें गोलाचें पृष्ठ पाहिलें असता दिसणारा गोलाचा भाग [स]

**आंतला**—वि आंतील बाजूचा, अतर्भागासबधीं [अतर्]

**आंतलीखूणगांठ**—स्त्री मनातील गुप्त हेतु, मतलब **आंतली चाल**-(राजा) आतचाल पहा **आंतलीपाळ**—स्त्री कानाच्या आंतील कड-बाजू-मासल भाग, याच्या उलट बाहेरील पाळ

**आंतल्या आंत**—क्रिवि १ अतर्भागात आत, मध्यें २ गुप्त रीतीनें, मनातल्या मनात, मुकाट्यानें ३ आपआपसात, घरातल्या घरात, आपल्या मित्रमडळींत

**आंतल्याकडचा-कडला-कडील-धडचा**—वि आंतल्या बाजूचा, आंतील, मधील

**आंतल्याकडेस-धडेस**—क्रिवि आंतल्या भागावर, आंतल्या बाजूनें आंतून

**आंतल्या गांठीचा**—वि खोल मनाचा, ज्याचे हेतू-बेत गुप्त आहेत असा, गुप्त मसलत्या, गुप्त कारस्थानी, मिस्किल, मतलबी

**आतवता**—आतौता पहा

**आंतवर-वार**—न १ (चि कों) स्वयपाक घर, माजघर, घराचा मध्यभाग, याच्या उलट बाहेरवार 'आम्ही पुरुष बाहेर निजू बायकास आतवार जागा पाहिजे।' [स अतर्+वर्ती]

**आतश-ष**—पु अग्नि [फा आतिश्=अग्नि, तुल० स आतप] ०खाना-पु तोफखाना 'किल्ल्यांत अबदुल अहदखानाचे आतश्खान्यात रहावें दिमत १ ८६ ०बाज-वि प्रेक्षणीय दारू काम करणारा -एटि १ ४३ [फा आतिश्+बाझ] ०बाजी-स्त्री १ अग्निक्रीडा, शोभेचें दारूकाम, दारूची लका 'रात्रीं नाच रोशनी आतशबाजी जाली।' -रा ७ १४५ २ (ल) चैन, करमणूक [फा आतिश्+बाझी] ०वेहराम-पु पारशी लोकांचें अग्निमदिर, [फा आतिश्+वहराम] अग्यारी पहा

**आतस**—स्त्री (कों कुण) आत, आत्या [स अत्ता]

**आतसबाजी**—आतशबाजी पहा

**आतळणें**—अक्रि १ (काव्य) ससर्ग होणें, स्पर्श करणें, शिवणें, भेटणें 'ते कर्मी तरी वर्तती। परी कर्मफळा नातळती।' -ज्ञा २ २७८ -एभा २ ४८० आतणें पहा २ पावणें, लाभणें 'तुजहूनि शाल्व पवित्र मला। नाहीं अवेसी आतळला।'-मुसभा ११ ८९ ३ धारण करणें, पावणें, प्राप्त होणें 'अगाध महोदधीचें जीवन। आतळे घनठ दुग्धवर्ण।'-मुआदि ४ ११० [स आप्=मिळणें]

**आता**—क्रिवि १ सांप्रत, या वेळेस, एव्हा 'एवढा वेळ घरीं होते, आता बाहेर गेले' अता पहा २ यापुढें, चान्द्र क्षणानतर 'आता पारा कैसा सोधावा'-वैद्यक बाड ७८ ३ प्रथ, विषय याचें आरभप्रतिज्ञेचें द्योतक 'आता शब्दाचे प्रकार सागतों' 'आता वंदू कवीश्वर।' ४ सांप्रत, सध्या [वै अधा, स एतर्हि, अथ, आत्त (इतोपीत्यर्थे), आता काय म्हणतोस (=इतोपि किं भणसि) आत =आता, आता -राज भाभ १८३४]

**आंतॉ**—पु (गो) भात शिजताना येणारा कड, ऊत

**आतांघटके**—क्रिवि (कुण) या घटकेस, यावेळीं [आता+घटिका]

**आंतॉड**—न (गो) बाबूचें बट, बन

**आताता**—उद्गा अतत पहा

**आताशीं-शीं-सा**—अ यावेळीं, हल्लीं, सांप्रत, आजकाल, अलीकडे [आता+असा]

**आति**—क्रि होय, आहे 'तुज सर्वज्ञा विचारिता धर्मे। काइ ससारा आति।'-ऋ ४४ 'काइसे रचिति तें ऐसि सामर्थ्य आति।'-चक्रसिद्धातसूत्रें १७ ३ [स अस्ति म आहेति]

**आतित**—अतित पहा

**आतित्य**—आतिथ्य पहा 'आलयाचें करावें आतित्य।' -दा ४ ७ २५

**आतिथ्य**—न अतिथीचा सत्कार, सन्मान, पूजा, आदर, पाहुणचार, पाहुणेर [स]

**आतिथ्य आतिथेय**—वि अतिथीला योग्य असें, पाहुण्यासबधीं, आदरसत्कार पाहुणचार यासबधीं

**आतिमधारण**—न (वास्तु) अखेरचा जोर, दाब (इ) अल्टिमेट स्ट्रेस

**आतिशय**—अतिशय पहा

**आतिसो**—पु (काव्य) पुष्कळ, फार अतिशय पहा -वाक्यवृत्ति ४५७६ (-दार)

**आती**—स्त्री (गो) आत, आत्या [स अत्ता]

**आर्ती**—वि आर्त, ग्रस्त 'आर्ती रक्षावेआ।' -दाव ३३८ [स आर्ति]

**आतील**—वि १ आतील बाजूचा, मधील, अतर्गत असें-आतील फितूर, दगा, फूट, भेद [स अतर्] २ गुप्त, अतर्गृहातील जसें-आतील जाच-जुलूम-यातना-सताप-खातें-पत्र-हिशेब-वही इ ०आख-पु व्यापारी लोक मालावर किंमतीचा गुप्त आकडा घालतात तो, किंवा कांहीं खूण [स अतर्+अक] गुप्त याअर्थी इतर उपयोग-आतील खातें-पत्र-याद-वही-हिशेब इ० ०करारनामा-पु खानगी रीतीनें घतलेली वचनचिट्ठी, करार ०जामिनकी-स्त्री आतील जामीनदाराचें काम, पहा ०जामीनदार-पु सरकारी रीतीनें

किंवा उघड रीतीनें जामीनदार झालेल्यास आतून जामीन राहणारा किंवा त्याला हमी देणारा ०टांग-स्त्री (मल्लविद्या) कुस्तींतील एक डाव, आपल्या एका हातानें जोडीदाराचा हात आपल्या बगलेंत भरून आपल्या दुसऱ्या हातानें जोडीदाराचें मनगट धरावें ज्या बगलेंत आपण जोडीदाराचा हात धरला असेल त्याच बाजूच्या आपल्या पायानें जोडीदाराच्या दोन्ही पायांत आपला पाय घालून, जोडीदाराच्या हातास झटका देऊन आपली मान बाहेर फिरवून, ज्या बगलेंत जोडीदाराचा मुडा आपण धरला असेल तो आपला मुडा जमिनीवर टेकून, जोडीदारास चीत करणें ०भाक-न गुप्त गोष्ट, एखाद्या गोष्टींतील व्यंग, छिद्र, दोष, रहस्य ०मजकूर-पु १ (पत्रांतील) वृत्तांत, मजकूर २ (ल) मनांतील गुप्त हेतु, मसलत ०रोग-पु १ गुप्त रोग २ (ल) जुलूम, दुर्बलता, ऱ्हास वगैरेंचें अंतस्थ गुप्त कारण

**आर्तीब्र**—न (शाप) हें रासायनिक धातुमूलद्रव्य असून दुर्मिळ मृत्तिकाधातुवर्गीतील आहे. याचा शोध १८७७ सालीं लागला (इ) इर्बिअम् [स्वीडनमध्यें इट्टर्बी]

**आतुटी**—अ असड, अतूट पहा 'चंद्र चकोरा चोखटीं। घाळे अमृतधारीं आतुटी।'–ऋ ५२ [स अ+तुट्]

**आतुडणें**—अक्रि १ (काव्य) सांपडणें, स्वाधीन होणें 'कट करा क्षुद्र मडळातु आतुडलों।'–पचतंत्र १ ३९ २ (ल) आकलन होणें, समजणें 'माझें मजचि वो आतुडलें गुज।'–निगा ७४ 'जे मना आकळितां कुवाडें। घावुसितां बुद्धी नातुडे।'–ज्ञा ७ ६७ ३ लाभणें, प्राप्त होणें, हातीं येणें 'न करितां भगवद्भक्ति। सर्वथा नाहिं नातुडे मुक्ती।'–एभा २ १८६ 'तो देवेंद्रपदा चढे। सुरवधूसंभोग तया आतुडे।'–निमा १ १७ ४ संबंध येणें, निकट येणें, स्पर्शणें 'गा साक्षात् तु शामसुदर। आतुडलासी कीं।'–रास १ १०३२ [द्रा आतु=धारण करणें, जवळ असणें]

**आतुणें**—सक्रि देणें 'प्रसन्न होऊनि वरदानास। सावरी विद्या आतुली।'–ना ७ ३ [स आप्=मिळणें, कि अर्प्=देणें]

**आतुर**—वि १ उत्सुक, उतावीळ, उत्कंठ 'बहुतकरूनि पौरव। हे आतुर दुस्वभाव।'–ज्ञा १ १७२ २ आर्त, विव्हळ, व्यथित, पीडिलेला दुसऱ्याईत सामासशब्द कामातुर–अर्थातुर–क्षुधातुर–चिंतातुर इ० 'कामातुराणां न भयं न लज्जा। अर्थातुराणां न पिता न माता। क्षुधातुराणां न रुचिर्न पक्व। चिंतातुराणां न सुखं न निद्रा।' [स] ०संन्यास-पु मरणसमयीं घाईघाईनें घतलेला संन्यास, कंपळ प्रेषोच्चारादिक विधि करून घेतलेला संन्यास चतुर्थाश्रम [स]

**आतुरता**—स्त्री विशेष उत्सुकता, घाई [स आतुर]

**आतुराय**—वि (गो) आतुर अधीर उतावीळ उत्सुक [स आतुर]

**आंतुरी**—अतुरी पहा

**आतुर्बळी**—वि महाबलाढ्य, अचाट सामर्थ्यवान, अतुर्बळी पहा 'अकर्म जाण आतुर्बळी।'–एभा १० ५९१ 'धनुष्यकोटीनें आतुर्बळी। गंगा आणिली आश्रमाजवळी।'–मुआदि १६ ८८

**आंतुल ला-ली-लूं-लें**—वि आतील, आतील बाजूचा, अंतर्गत, मधील 'परि तयाआंतुल नव्हे हे देवा।'–ज्ञा ११ ३८८ 'फेडितांचि तो बाहिरू। कड फिरे आतीलु। न फेडितांनि।'–अमृ २ ४८ [स अन्तर्]

**आंतुवट**—वि आतील, अंतरंगातील 'मी देव तो भक्तशुद्ध। हा बाहेरी नावाचाचि भेद। आंतुवट पाहतां बोध। सच्चिदानंद जनि ऐक्यें।'–एभा २१ ४७१ –न अंतरंग हृद्गत, गुप्त, गुह्य गोष्ट 'हें आंतुवट तुज वर्मीं। दाविजत असे।'–ज्ञा ८ २०३ [स अंतर्+वर्ती]

**आतू**—स्त्री आत आत्या, आत्याबाई [स अत्तिका]

**आंतू**—शअ आत, मध्यें [स अंतर्]

**आतून**—शअ क्रिवि आंतल्या बाजूनें, अंतर्भागापासून, बाहेरून च्या उलट [आत+हून] ०पाय काढणें-(मल्लविद्या) जोडीदार आपल्या पाठीवर आपणास धरतो त्या वेळेस आपण खालीं वाकून आपल्या दोन्ही पायांतून त्याचे पाय काढून घेणें जोडीदार आपल्या पाठीवरून आपणास धरतो तेव्हां आपण झटक्यानें खालीं वाकून आपल्या दोन्ही हातांनीं जोडीदाराचा पाय घोट्याजवळ धरून वर उचलावा व तो उचलतांना आपण जोडीदाराच्या मांडीवर बसावें म्हणजे जोडीदार चीत पडतो ०पाय मोडणें-ओढणें-एखादें कृत्य करीत असतां दुसऱ्यानें त्यास गुप्तपणें विरोध-प्रतिबंध करणें 'नानाचे पाय आतून ओढण्याचा विसूभाऊचा यत्न होता'–भस्तभा ११२

**आतृप्त-तृप्ति**—क्रिवि तृप्ति होईपर्यंत, शांत होईपावेतों (खाणें पिणें, भोगणें इ०) (विरु) आतृप्त [स]

**आते**—त्रि १ आहे 'हा ही हातपिटी खळती आते। जगजेत्तींसी।'–शिशु ६८९ २ होतें असतें, बनतें 'पाणी शुद्ध व मिठातें। तंव मीठचि पाणी आतें।'–ज्ञा १६ ७२ ३ यतो, प्राप्त होतो 'जयाचेनि अपांगपातें। बंध मोक्षपणीं आतें।'–अमृ २ ४ [स अस्ति]

**आते**—स्त्री (कों) आत्या, आत, आत्याबाई ०गौरव-चार-चाण-मान-पुन वरपक्षाकडून वधूच्या आतेला मिळणारें मानाचें लुगडें-चोळी २ अशा प्रकारें दिलेला मान, किंवा मानाची रीत-प्रकार ०दीर-पु नवऱ्याचा आतभाऊ ०बहीण-स्त्री आतेची मुलगी ०भाऊ-पु आतेचा मुलगा ०मामे भावंडें-नअव भावाचीं मुलें तीं बहिणीच्या मुलांचीं मामेभावंडें व बहिणीचीं मुलें तीं भावाच्या

मुलाची आतेभावडे होत [ आत+मामा ] ०सासरा-पु १ मात्र ल्याचा आतेभाऊ २ आतेसासूचा-सासऱ्याच्या बहिणीचा-नवरा ०सासू-स्त्री सासऱ्याची बहीण, नवऱ्याची किंवा बायकोची आत

**आंतें**—न अव आतडीं आत पहा 'घाये आंतें काढिलीं।' -एह्म ८ ४५ [ स अंत्र ]

**आतेगवर**—( गो ) वर पक्षानें वधूच्या आतेस अर्पिलेले लुगडे, आते गौरव-चीर पहा. [ आते+गौरव ]

**आंतेर**—स्त्री ( गो ) सिताफळीचें झाड आत पहा 'ती आतेर वरी मातल्या ' [ पोर्तु आतेयर् स आतृप्य ]

**आतेस**—स्त्री ( को ) आत्याबाई, आते पहा

**आतोर्जी**—स्त्री ( को ) सासु [ का आते=सासु ]

*आताड*—पु ( गो ) डोंगराच्या पायथ्यापासून थोडा उंच परंतु साधारण सपाट भाग, यांत काजू, चांबू, आंबे, फणस, कोकम इ० झाडें लावतात व याच्या खालच्या भागात केळी, सुपारी यांच्या बागा करतात [ स आ+तुड ]

**आतोनात**—अतोनात पहा.

**आतोळयोपातोळयो करप-सांगप**—( गो ) अंगविक्षेप करून एखादी लालनक हकीकत सांगणें 'आताळों गेलों पाताळों गेलों, तिथून आणली . . ' या गोष्टी प्रमाणें सुवात करून सांगणें [ स अतल+पाताल ]

**आंतौटेपण**—न अस्तित्व, आत असणें 'हे कवणाजोगे न होती। आतौटेपणें।' -ज्ञा ३ २५९ [ आतौता+पण ]

**आंतौत-ता-तीं-तें**-आंतउता-ती, अतौत पहा 'पैं पर तत्त्वा भरौतें। स्थावराता आनौतें।' -ज्ञा १३ १५८ 'तरग समुद्रा आतौता। म्हणे माझेनि मेघ तत्त्वता।' -एभा २ ३८८ -मुआदि २ ४५, ६ ८४ इ० [ अतर्+वर्ती ]

**आंतौर**—अतुरी पहा

**आत्काटी**—स्त्री ( गो ) आडकित्ता आटकाटी २

**आत्तां**—आता पहा

**आत्म**—वि १ आत्म्यासबधीचें २ स्वत चें, आपलें [ स ] ०कार्य-न आपलें काम, स्वत चें काम -क्रिवि खासगी कामा करिता, आपल्या कामासाठीं ( व्यापारी लोकाच्या पत्रव्यवहारात हा शब्द येतो ) हें अप रूप आहे ०ख्याति-ख्याति पहा ०गत-वि स्वगत, आपल्याशीं ( नाटकात एखाद्या पात्रानें केलेलें भाषण ) ०गति-स्त्री १ आत्म्याची अखेरची अवस्था २ आपली अखेर 'प्रिय आत्मगति याची दिसताहे।' -सप्र ११ १४ ०ग्रह-पु १ आत्मज्ञान २ स्वीकार करणें, स्वतचें मानणें, आपला म्हणणें, कैवार घेणें ०घात-पु १ आत्महत्या, स्वत चा घात, नुकसान ( धर्मशास्त्रविहित प्राणत्यागास हा शब्द लावीत नाहींत ) 'स्व तो वसिष्ठ गुरुमाय। म्हणे सहसा न करावा आत्मघात।' ०घातक-स्त्री, घाती-वि १ स्वतच्या घात करणारा २ ( ल ) स्वत चें नुकसान करणारा, स्वत च्या पायावर धोंडा पाडून घेणारा ०घ्न-वि १ आत्महत्या करणारा २ आत्मघातकी ०चर्चा-वि आत्म्यासबधीं वादविवाद, ब्रह्मविचार, आत्मानात्म विचार [ स ] ०च्छाया-स्त्री स्वतची सावली 'का कवळि लिया न धरे। आत्मच्छाया॥' -ज्ञा १८ ५३० [ स ] ०ज-पु स्वत पासून जन्मलेला, पुत्र, मुलगा 'पैल इतर हा आत्मजु। हें ढरेल के।' -ज्ञा ५ ९३ ०जा-स्त्री स्वत ची मुलगी 'अगा आत्मजेच्या विषीं।' ज्ञा १२ १३२ ०जिज्ञासु-वि आत्मज्ञानाची इच्छा करणारा 'ऐसे आत्मजिज्ञासु जे होती।'-ज्ञा १६ ५२ ०तत्त्व-न ब्रह्मज्ञान, आत्मज्ञान 'येर आत्मतत्त्व उदासीन' -ज्ञा १८ ३०६ ०तोख, तोष-पु आत्मानद, स्वसतोष ०त्याग-पु. स्वार्थत्याग 'हा आत्मत्याग व लोकाश्रय सरकारचे शुभ हेतु पर्यायानें सिद्धीस नेण्यास जर उपयोगी पडला '-टि ३ १८१ ०त्व-न आत्मस्वरूप 'न लगती तें व्रतें अनुष्ठान। आत्मत्वाची खुण वेगळीच' -व १७५ ०धन-न १ स्वत ची सपत्ति २ स्वतच्या आत्मा, स्वत ३ ( ल ) स्वत चा पुत्र ०निंदा-स्त्री स्वत ची निंदा, स्वत स दोष देणें, स्वत वर दोषारोप करणें ( पश्चात्तापाच्या वेळीं ) ०निवेदन-न आत्मसमर्पण, परमेश्वराच्या ठिकाणीं स्वत स वाहून घेणें, नवविधाभक्तींतील शेवटचा-नवव्या भक्तीचा प्रकार, म्हणजे जीवशिवैक्य 'आत्मनिवेदनाचें लक्षण। आधीं पाहावें मी कोण। मग परमात्मा निर्गुण। तो वोळखावा।' -दा ८ ८ १३ २ स्वतची कथा, खुलासा, आत्मचरित्र ०निश्वास-पु वेद ( यस्य नि श्वसित वेदा =वेद ज्याचे ( परमेश्वराचे ) नि श्वास आहेत या वाक्यावरून ) ०निष्ठ-वि १ आत्मस्वरूपीं तल्लीन असलेला, आत्मानंदीं, ब्रह्मानंदीं निमग्न असलेला २ मनोभावाचा, कळकळीचा उत्सुक ०निष्ठा-स्त्री १ आत्म्याच्या ठिकाणीं निष्ठा २ स्वत वर विश्वास, आत्मविश्वास ०परिचय-पु आत्म्याविषयींचें किंवा स्वत विषयींचें ज्ञान-ओळख ०पोटी-वि अप्पलपोट्या, स्वार्थी 'तव भीम म्हणे श्रीकृष्णासी। तू वरवा आत्मपोटी कळलासी। मी अतिथी उभा असता द्वारासी। भोजन सावकाश करिसी तू।' -जै १० २ ०प्रची(ती)ति-स्त्री १ आत्मज्ञान, स्वप्रतीति, गुरुप्रतीति, आत्मप्रतीति या तीन प्रतीतींपैकीं एक २ स्वत च्या अनुभवावरून मिळविलेलें ज्ञान-बोध, आत्मानुभव 'नाना प्रधान्या समती। उपनिषदें वेदात श्रुती। आणि मुख्य आत्मप्रचीती। शास्त्रेंसहित।' -दा १ १ १५ ०प्रशंसा-स्त्री स्वतची स्तुति, आत्मस्तुति-श्लाघा ०प्राप्ति-लाभ-स्त्रीपु आत्मज्ञान, ब्रह्मज्ञान 'महामत्र आत्मप्राप्तीची खाणी।' ०बंधु-पु स्वतच्या नातेवाईक, चुलत-मावस-आते-मामे भाऊ ०बिंब-न १ प्रतिबिंब 'का आत्मबिंबा घेतलें। बाळकें जळीं।' -ज्ञा १८ १३०६ २ जीवात्मा ( परमात्म्याचें प्रतिबिंब ) ०बाध-पु आत्मज्ञान 'मग

रात्रे चोखाळे। उघडती आत्मनोवाचे डोळे।' –ज्ञा १८ २१० –आत्मभंगी–वि अल्पलपोटया ०यज्ञ–पु स्वार्थत्याग, जीवितार्चे बलिदान, स्वत मरणाला तयार होणें ०राज–पु आत्मा, स्वत 'तेउ न मुवावा अभगीं। आत्मराजु।' –ज्ञा १८ २८० ०रूप–न स्वस्वरूप 'जयजय स्वरावेया आत्मरूपा।' –ज्ञा ११ ०लिंग–न १ आत्मस्वरूप 'प तुरी आण वाहें।हें आत्मलिंगातें शिवणें।' –ज्ञा १८ १३६९ २ शिवाचें मुख्य लिंग (प्रतीक) शकरानें आपल्या भक्तासाठीं आत्मस्वरूपाचा तत्त्वाश मूर्त करून ठेवला आहे ३ अत्यत जिवलग मनुष्य, प्रेमाचें माणूस 'एके दिवशीं बाजीरावसाहेब हे नानासाहेबास भोजनाचे वेळीं बोलले कीं, रघुनाथराव याचे पूर्वज विठ्ठल शिवदेव हे आमचे दादासाहेबाचे आत्मलिंग होते' –तीर्थयात्राप्रबध ८२ ०वत्–वि आपल्या प्रमाणें, स्वत सारखें, भेदभाव, आपपरभाव न ठेविता 'आत्मवत् सर्व भूतानि।' या वचनावरून 'आत्मवत् देखावे अवघे जन। नसो देहमान किंचित।' ०वश–मनोनिग्रह, आत्मनिग्रह–आत्मसयमन ०विचार–पु आत्म्यासबधी चर्चा, ब्रह्मविचार 'गतमगे आत्मविचार' ०विद्या–स्त्री १ ब्रह्मविद्या, अध्यात्मविद्या, वेदात २ आत्मज्ञान, स्वत सबधीं जाणीव ०विधि–पु आत्म्याचें कर्तव्य, गुणधर्म 'ऐका चित्त देऊन आत्मविधि।' ०वेत्ता–पु ज्याला स्वस्वरूपाची पूर्ण ओळख झाली, स्वहृदयात वास करणारा ब्रह्माडव्यापी परमात्मा आपण आहों असा ज्याच्या बुद्धीचा निर्धार झाला तो, मी ब्रह्म आहे असें मानणारा ०शास्त्र–न अध्यात्मविद्या–शास्त्र ०शुद्धि–स्त्री चित्तशुद्धि, स्वत चे आचारविचार, वर्तन शुद्ध ठेवणें म्ह० आधीं आत्मशुद्धि मग देवशुद्धि ०संतोषानें–क्रिवि राजीखुशीनें, कोणाची भीड न धरता आपखुषीनें 'हें पत्र मीं आत्मसतोषानें लिहून दिलें असे' ०संतोषी–वि १ आत्मानदात सुख मानणारा २ (ल) आपमतलबी ०सत्ता–स्त्री ब्रह्मज्ञान, आत्मस्वरूप 'तैसें होईजे जाइजे देहें। त आत्मसत्ते अविक्रिय।' –ज्ञा १५ ३८० ०संयम–आत्मवश पहा ०साधन–न १ आपल्या जीवाचें किंवा जन्माचें सार्थक करणें 'जैसि सताचि काग मुमुक्षु नर। धरिती आत्मसाधना।' २ स्वत च्या उपजीविकेची व्यवस्था–तरतूद ३ (ल) स्वत चा मतलब 'त्याचें कांहीं तरी आत्मसाधन असेल तरच तो इतकी खटपट करितो' ०साक्षात्कार–पु निर्गुण साक्षात्कार (सगुण साक्षात्काराच्या उलट), अतर्यामीं परमेश्वर–ब्रह्म याचें दर्शन होणें ०सुख–न स्वत चें (शारीरिक किंवा मानसिक) सुख, आपल्या ठिकाणींच सुख, ब्रह्मज्ञानापासून होणारें सुख ०स्तुति–स्त्री स्वत ची प्रशसा आत्मप्रशसा 'आत्मस्तुति मनातून। स्वप्नीं जयासि नावडे।' ०स्थिति–स्त्री ब्रह्मरूपाची स्थिति, आत्म्याची स्वतत्र अवस्था, शरीर किंवा इतर वस्तू सोडून भिन्न असणारी स्थिति कांहीं वाङ्मयात आत्मस्थिति ओळखावी–जाणावी–सपादावी–जोडावी–धरावी=सोडू नये, आत्मस्थितीवर असणें ०हत्या–स्त्री १ (कायदा) शास्त्रविधिविरहित स्वत स मरण येईल असें कृत्य स्वत करून मरणास कारण होणें, हेतुपुरस्सर स्वत चा जीव स्वत घेणें, आत्मनाश आत्मघात २ आत्महत्येचें पाप, गुन्हा ०हत्यारा–मि आत्मघात करणारा 'जो आपला आपण घातकी। तो आत्महत्यारा पातकी।' –दा १७ ७ १० ०हित–न १ (ईश्वरप्राप्तीनें होणारें) जीवाचें कल्याण, देहाचें सार्थक, भगवत्प्राप्ति 'आहा नरदेह उत्तम पूर्ण। केवळ भगवत्प्राप्तीचें स्थान। त्या आत्महित न करून। बुडालों कि अधर्मीं।' २ स्वत चा फायदा ०ज्ञान–न १ ब्रह्मज्ञान स्वस्वरूपाचें ज्ञान, अध्यात्मज्ञान 'ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान। पाहावें आपणासि आपण।' –दा ५ ६ १ २ स्वत च्या वर्तनाची जाणीव म्ह० आधीं आत्मज्ञान, मग ब्रह्मज्ञान

**आत्मक**—वि आत्मा असणारें, आत्म्याच्या ठिकाणीं असणारें पूर्ण, भरलेलें, तत्स्वरूपी, तन्मय 'हें जग पचभूतात्मक आहे' 'अलकार सुवर्णात्मक आहेत' इ० समासात नेहमीं उपयोग सामाशब्द–सकल्पात्मक, पापात्मक ध्वन्यात्मक, इ०

**आत्मसात् करणें**—क्रि १ आपलेसें करणें, आपल्या कामीं लावणें, वळकावणें २ अभ्यासानें एखादी विद्या अवगत करणें, पाडित्य सपादणें ३ स्वस्वरूप करणें, आपणाशीं एकरूप करणें, (इ) असिमिलेशन

**आत्मा**—पु १ जड सृष्टीपेक्षा अत्यत भिन्न असें आदितत्त्व, जीवाचें मूलबिंब, निराकार अमर्त्य, परमात्मा, परब्रह्म २ प्रत्येक देहमात्राच्या ठिकाणीं त्या त्या देहाची अभिमानी असलेली जाणीव, चैतन्य, प्राण, जीव ३ मी, आपण, स्वत एतद्वाचक शब्द ४ अत करण, स्वभाव प्रकृति ५ देह ६ बुद्धि, समज ७ (ल) ज्याला विचार, भावना, इच्छाशक्ति आहेत असें आध्यात्मिक व्यक्तित्व –योहा ३ ५ ८, ४ २४ 'माझा आत्मा जगा आरसा। पाहो जन त्यामाजि तुम।' –उरा २८१ [स अन् = निरतर चालणें] ८ (पिंजारी) कापूस पिंजण्याच्या कमानीच्या पल्याच्या कडेवर एक चामड्याची पट्टी असते, तिच्या आत बसविलेली घोडी चवा एक कातड्याची घडी केलेली पट्टी हिनें कमानीस असलेली तात ताणून अधिक आवाज निघतो ०नंद–पु विषयसुखापासून निवृत्त आवरून परमात्म्याचें ध्यान केल्यानें होणारें समाधान ब्रह्मज्ञानापासून होणारा आनद, आत्म्याची जाणीव झाल्यामुळें लाभणारें सुख भारतीय तत्त्वज्ञानात आनद हा आत्म्याचा एक धर्म मानिला आहे आनद पहा [आत्मा+आनद] ०नात्मविचार–विवेक–पु देहाच्या ठायीं शुद्ध निर्विषय जो ज्ञानाश तो मात्र मी, इतर देहादिक तें अनात्मा होय म्हणजे मी नव्हे असा विचार, आत्मा आणि अनात्मा यासबधीं विचार [स आत्मा+अनात्मा+विचार, विवेक] ०नुभव–पु आत्म्याचा परिचय आत्मज्ञान, ब्रह्मज्ञान 'तैं

दासा १ ३१

आत्मानुभव योगिये वैसा कवण परि।' [स आत्मा + अनुभव]
**आत्मानुसंधान**—न १ परमार्थविषयक सत्याकडे, आत्मज्ञानाकडे लागलेलें लक्ष २ (ल) अप्पलपोटेपणा [स आत्मा + अनुधान]
०**राम**—पु १ आत्मा, जीव, अत करण 'तुम्ही जेवून आत्मा राम धड करुन पेतगात, मी मात्र उपाशी मेलों' २ विषय पराङ्मुख व ईश्वराराधनेविषयीं तत्पर, ब्रह्मनिष्ठ, आत्मानंद लाभलेला, स्वसतुष्ट ३ परमेश्वर, परब्रह्म 'आत्मारामाचेनि विरहें। जैसा जीवातु न राहे' –ऋ ६ 'जयदेव, जयदेव जय आत्मा, रामा। परमार्थे आरती तुज पूर्णकामा॥' [आत्मा+राम] **आत्मार्पण**—न स्वत ला ईश्वरास वाहून घेणें 'आत्मार्पणाविण हरी वळतो कसा रे।' [आत्मा+अर्पण] ०**श्रयदोष**—पु (तर्क) स्वाश्रयावर अवलबून–विसबून असणें हा दोष, अन्योन्याश्रय दोष उ० घट हा घटजन्य ज्ञानास कारण होय [आत्मा+आश्रय+दोष] –**त्मोन्नति**—स्त्री स्वत चा उत्कर्ष 'आधीं आत्मोन्नति, मग देशोन्नति' –**त्मोपासना**—स्त्री ध्यान करून परमेश्वराची उपासना करणें त्मोपासना, ज्ञानोपासना पहा –**त्मोपम्य**—न १ पर ब्रह्मस्वरूपाशीं एकरूपता २ आत्म्याशीं, आपल्याशीं ऐक्य आप परभाव नसणें 'आत्मौपम्यानें सर्व जग पहावें' –**त्मोपम्यबुद्धि** स्त्री सर्वत्र आपल्यासारखी बुद्धि 'सर्वांभूतीं एक आत्मा किंवा आत्मौपम्यबुद्धि या तत्त्वानें व्यावहारिक नीतिधर्माची जरी उपपत्ति लागते, तरी दुसऱ्या कोणत्याच तत्त्वानें लागत नाहीं' –गीर ३८२

**आत्मिक-त्मीय**—वि १ स्वकीय, आपले नातलग, सोयरे धायर 'आणि मी अर्जुन हे आत्मिक॥' –ज्ञा १८१२८२ २ स्वत सबधींचें

**आत्यंतिक**—वि १ अतिशय, फार 'रायें पुसिलें आत्यतिक क्षेम। तदर्थी कवि ज्ञाता परम।' –एभा २ २७७ २ शेवटचा, निर्वाणीचा [स अति + अतिक] ०**प्रळय**—पु १ ब्रह्मा शिवाय इतर सर्व वस्तुमात्राचा नाश 'म्हणोन हें अशेष प्रपचबधन निशेष सहारें तो प्रऱ्यो देख आत्यतिकी' २ मोक्ष प्राप्त झाल्या वर सर्व जगाचा भासणारा अभाव मोक्षप्राप्ति निद्रा व मरण हे दोन पिंडीचे आणि कल्प व महाकल्प हे दोन ब्रह्मांडीचे असे चार प्रळय आहेत, पण यात जीवास मुक्ति नाहीं म्हणून हा पाचवा अत्यतिक प्रलय कल्पिला आहे हा मुक्तिप्रद आहे

**आत्या**—स्त्री १ आत पहा. देशस्थ ब्राह्मणात आत्ती म्हणतात [स अत्ता, अत्ती, अत्तिक, प्रा अत्ता = आई, सासू का अते, अति=सासू] २ पुरुषास बहुमानार्थी लावावयाचा शब्द रगनाथ स्वामी निगडीकरयाच्या वडील भावास आत्यास्वामी म्हणत असत ०**बाई**—स्त्री १ बापाची बहीण आत २ सासू (काहीं जातींत आत्या ही सासू होऊ शकते) तव सत्यभामा म्हणे आत्याबाई। तुम्हासी तरी म्हणावें काई। तुम्ही का म्हणविता याची आई। केवीं उदरीं धरिलें हो॥' –जै ९ ७२. म्ह० आत्याबाईला मिशा असत्या तर काका म्हटलें असतें=जी गोष्ट किंवा स्थिति पालटणें आपल्या हातीं नाहीं ती तशी नसती तर बरें झालें असतें असें व्यर्थ म्हणणें

**आत्येसा**—क्रिवि अतिशय, फार (शोक) 'मुर्दा हेऱ्यास आणला आनंदी करितसे आत्येसा।' –पेपा ८९ [अतिशय]

**आंत्र**—अतर पहा

**आंत्र**—स्त्री आतडें, आत पहा ०**फल्गुधमनी**–(प्राणि) लघ्वान्त्रावरणलग्न–धमनी (ई) मेसेंटेरिक ०**वेष्टण**—न (शाप) १ उदरांतरीवेष्टन, पर्यंत्रक (रानडे) (इ) पेरिटोनिअम

**आत्रपेन्यान, आत्रोपरयरीं, आत्रापय-यान**—क्रिवि (कु. गो) एक दोन दिवसाआड, परवेकर. 'आत्रपेन्यान तल मीं एक पावट मारताय' [पोर्तु इ अल्टरनेट ?, गो पैरा=एक दिवसाआड]

**आत्रावरोध**—पु एक रोग यात आतड्यातील मल नेहमीं प्रमाणें टकला जात नाहीं, आतड्यांत उत्पन्न झालेला अडथळा [स]

**आंत्रिक**—वि गाळलेलें, ओलाडलेलें, वगळलेलें अंतिक पहा [स अतर्]

**आंत्रिक**—वि आतड्यासबधी [स अंत्र]

**आत्राटण**—न ताडण, मारणें 'निर्विकल्प करिता आत्राटणा' –गीता २ २२५० [स आ+तड्–ताडन]

**आत्राटणें**—अक्रि थापटणें, ताडन करणें, मारणें

**आत्रेय**—पु (शाप) एक रासायनिक मूलद्रव्य (इ) नित्रियम

**आत्साण**—स्त्री (गो) स्वाद, चव [स आ+स्वाद, प्रा अस्साद]

**आत्साण**—(गो) उकिरडा [स उत्सर्जन?]

**आथ**—पु (भिल्ली) हात [स हस्त, गो आत]

**आथडणें**—अक्रि (प्रा) हसडणें, हिसकणें, हिसका मारून–हिसकून–घेणें, पकडणें, बलात्कारानें धरणें [स आ+स्तम्]

**आथडणें**—अक्रि जाऊन धडकणें, पोंचणें, धावणें [स आ+स्तम्]

**आथडा**—पु आथडण्यानें बसलेला हिसका, हासडा, हिसडा [स आ+स्तम्]

**आथणें**—अक्रि (भिल्ली) शिवणें, हात लावणें 'आव मोडो वेहे ताहा कुवाल आथलुनी नेन' –भिल्ली भाषेंतील गोष्टी ३१ [आथ=हात]

**आथर**—पु कामऱ्याची गवताची चटई, आथरी, हातरी [स आस्तरण, प्रा अत्थरण]

**आंथरणें**—अथरणें पहा

**आंथरी**—आथर, अथरी पहा

**आंथरूण**—अथरूण पहा

**आथर्वण-विधि**—जारणमारण, अथर्वण पहा 'विधि आथर्वण। हातीं आथी ॥' –ज्ञा १३ ८०९

**आथवें**—वि (गो) नवखें

**आथवो**—(गो) अर्धा शेर आठवा पहा

**आथारी**—अथारी पहा.

**आथि-थी**—क्रि १ (जुनें मराठी काव्य) आहे आति पहा 'पिंगल्कु सिंह येथें आथि।' –पच १ २४ 'एतद्विषयीं विपाद। आथीचिना ॥' –विउ ८ २९ [स अस्ति-अत्थि-आथि-आति] २ (भिल्ली) होती 'एक कुकडी (कोंबडी) आथी' –भिल्ली भाषेंतील गोष्टी ९ ०ला–१ झाला, असला, होता, असणें या क्रियापदाचें भूतकालाचें जुनें रूप 'कामें आथिला मैथुना रिघे।' ०लें–१ झालें, आलें वायूपोटीं पाहे तेज जन्मलें आपण। तेंहि रे पाचागुणीं आथिलें जाण।' –च ५८७ २ असलेलें, असतें, युक्त, संपन्न (कोणत्याहि गोष्टीनें) 'नाथिलें चिंती तें अतिचिंता। आथिलें चिंती ते निश्चितता।' –एभा २ ४१४ ०लेंपण–न. असतेपण, अस्तित्व

**आथिला**—वि १ भाग्यवान, थोर 'सदाभ्यासाचेनि योगें। भगवत्प्रसादप्रसगें। लाहोनि युक्तिमौभाग्यें। आथिला होय तो।' –रामप २ ६०५ २ युक्त किंवा संपन्न 'ऐसेनि गभीरपणें। स्थिरावलेनि अंत करणें। आथिला तोचि जाणें। मानू इये ॥' –ज्ञा १ ६१ –एभा २३ ९३७ 'पुरुषचिन्हें जो आथिला।' –सुभादि २३ ११६ शिनाय नामाथिला (–सुभादि २१ ४१) मोहाथिग (–सुभादि २७ २२) इ० रूपें आढळतात ०लेंपण–न संपन्नता, थोरपणा, भाग्य 'एथ जाणीव करी तोचि नेणे। आथिलेंपण मिरवी तेचि उणें।' –ज्ञा ९ ३६८ [स अस्ति, प्रा अत्थि, म आथि]

**आथी**—पु (भिल्ली) हत्ती [स हस्ती]

**आथुरण**—अथरुण पहा 'ते गोपाळ झाले जाणते। आपले आथुरणावरी।' –रासप ५ ५१

**आद्**—वि अर्ध, अद पहा सामाशब्द–आदपाव, आदमण इ० [स अर्ध]

**आद्**—स्त्री वंशाची माहिती आदि, वंशावळ–वाईसाले ४७ [स आदि]

**आंद्**—स्त्रीअव (व) मागासलेल्या जाती [स अध]

**आंदवणें**—अक्रि (माण) नाउमेद होणें अदवणें पहा [प्रा आदण्ण=व्याकुल]

**आद्करणी**—स्त्री मागील आचरण, पूर्वीची कृति 'तीर्थवासि सांगता ऐकली सुमित्र तुमची आदकरणी।' –प्रला ९१ [स आद्य+कृ, आदि+करणी]

**आद्खणा**—अदखणा पहा. 'बहुकृपण बहु खदस्ती। बहु आदखणा बहु मस्ती।' दा ५ ७ ३५ ०णेपण–न मात्सर्य, द्वेष 'आदखणेपण करू नये।' –दा २ २ २२

**आद्गी**—स्त्री नणंद, नवऱ्याची बहिण [का आदगी=स्त्री]

**आद्घर**—न आदिघर, आद्यस्थान, पुराणप्रसिद्ध क्षेत्र [आद्य+गृह] 'खुब जुनीनें किल्ला राखावा हें पूर्वीचें आदघर।' –ऐपो ३५१

**आदट**—वि न दटावण्या जोगें, बलवान अदट पहा 'खातीं इंद्रियें आदटें।' –माए ५१०, 'निळा म्हणे माझा पुरता आला वीट। देखोनी आदट कर्म वळी ॥' –निगा २१५ 'इंद्रियें करूनि आदटें। परी अतीं होती शांत।' –चिपु ६८ [अ+दाटणें, दटावणें]

**आद्टणें**—अक्रि दपणें, जिरणें, कमी होणें 'बुद्धी भ्रम सुटे प्रशस्त न घटे धोका सरे आदटे।' –दावि ४३६ [आ+दाटणें–दटणें]

**आद्डा**—स्त्री (च) गर्दी, दाटी [दडणें=दाबणें, दाटणें]

**आंद्ण-णा-णी-ण्या**—अ मध्यें पहा

**आदत**—स्त्री सवय, खोड, अदत पहा 'जयाजी शिंदे यास आदत अशी होती कीं स्नानानंतर मुखावर धोतर घेऊन क्षणभर डोळे चोळीत रहावें' –भाव १५ 'त्याला खोटें बोलण्याची आदत आहे' [अर आदत=सवय]

**आदंतर**—वि (गो) आगाऊ [स आदि+अंतर]

**आदन**—न (गो) आधण, भात इ० शिजविण्यास लागणारें, उकळी आलेलें पाणी [आधण अप, प्रा आदाण, स आदहन]

**आदन**—न (गो) अवलंबन, आश्रय ०करप–अवलंबून असणें, राहाणें, विसंबून असणें, राहाणें 'हावें ताजेर भोव आदन केलाँ!' [स आधान]

**आद्ब-खाना, आदबणें, आदबशीर**—अ मध्यें पहा

**आद्मास**—अजमास पहा

**आद्मी**—पु १ मनुष्य, मानव, पुरुष (आदमचे वंशज) २ इसम, माणूस, व्यक्ति [अर आदम]

**आदमुरें-मोरें**—अदमुरें पहा

**आदमुसा**—वि (व) मूर्च्छित, अर्धमेला 'मारून मारून आदमुसा केला' [स अर्ध+मूर्च्छा]

**आदर**—पु १ मान श्रद्धा, पूज्यबुद्धि 'गुणा न म्हणता उणा अधिक आदरें सेविती।' –केला ७३ २ (हुंडी) स्वीकार, सत्कार, होकार ३ सद्भाव हौस आवड. 'तगा रग श्रीमंत सेऊले कलियुगांत अति आदरान।' –ऐपो १९८ ४ (सामा) गौरव सत्कार, स्वागत, आदरातिथ्य [स आ+दृ, हिब्रू अधरथ] –रातिथ्य–न पाहुणचार (भोजनागवर्गीचा), आदरसत्कार

[आदर+आतिथ्य] ॰उपचार-मान-सत्कार—पु १ पाहुणचार, मानसन्मान, मानमरातब, सभावना, आसन, अभ्युत्थान, भोजन वगैरे देणें

**आदरण**—न (वों गो) बहुमान, सन्मान, आदर, श्रद्धा, पूज्यबुद्धि, अगत्य

**आदरणीय**—वि बहुमानास योग्य, मान देण्यास योग्य, माननीय, आदरार्ह

**आदरणें**—कि १ मान-सन्मान करणें, आदर ठेवणें २ स्वीकारणें, घेणें, कबूल करणें, मान्य करणें 'जसें प्रार्थिताचि आदरिलें।' -मोऐपि १ ३० ३ (एखादा धंदा-विषय) हातात घेणें, पत्करणें 'धरिलें राज्य मनोरथ म्या मूर्टे, न वनवास आदरिला।' -मोभीष्म १११ [स आ+दृ, तुल हिंदु अधरब]

**आंदरणें**—(गो) पावसाचे ढग जमा होणें, अंधारणें [अंधार]

**आदरदोदर**—वि (व) अर्धवट कुटलेलें-चेचलेलें 'हीं औषधें प्रथम खलबत्त्यात जरा आदरदोदर करा नि मग त्याचा अष्टमांश काढा उतरा' [स अर्ध+दृ]

**आदरून**—क्रिवि १ मनापासून, अंतःकरणपूर्वक २ दृढ निश्चयानें, खडसून, खातीनें, साफ, चकचकीत ३ मुद्दाम, जाणूनबुजून [आदर]

**आदरेखुन**—अ (कों) मुद्दाम, आदरून 'बाबू केशव चंद्र सेन याचीं नव्या धर्मावर व्याख्यानें हीं फार मननीय असत तीं नेटिव्ह ओपिनियन आदरेखून प्रसिद्ध करी' -वि ना मंडलीक-चरित्र १२१४

**आदर्श**—१ आरसा 'अधास आदर्श जसा दिसेना।' -सारुह २ १२ २ एखाद्या ग्रंथावरील टीका, भाष्य ३ प्रत, नमुना [स आ+दृश्] ॰अंबारी—स्त्री आरशाची अंबारी 'गजपृष्ठीं आदर्शअंबारी।' -ऐपो २६६

**आदला**—अदला पहा

**आदवड**—न (कु) चामडी रापविण्यासाठीं पाणी ठेवण्याचें कुंड [अधोड]

**आदवसाण**—स्त्री (गो) आशा, फायदा, फळ, परिणाम [आदि+अवसान=आरभ व शेवट]

**आदवेचो-आदवो**—वि १ अदवेचा पहा (चि गो) प्रथम, पहिल्यानें परिचय झालेला, प्रथम परिचयाचा २ अपरिचित [स आयत्]

**आदळ-आपट-उपट, आदळणें-आदळपण**—अदळ पहा

**आदल-ळु**—पु.स्त्री १ धक्का, हल्लकावा, घाव. अदल पहा 'विषयाचे, आदळ रोकडे। बुद्धिबृत्ति धडपुडे। कादिती तीरा।' -एभा २ ३१६ २ झोंबी, झुंज, टक्कर, हातघाई 'मग दोहीं दळा आदळु जाला॥ तो धिंगा सांगों' -शिशु १०४१

**आदा**—पु सर्व अर्थी अदा पहा आवक, उत्पन्न 'टपाल मिळेन खर्च भारी झाला, आदा नाहीं' -ख ४ १८३३ [अर अदा] म्ह॰ आदापेक्षा खर्च मोटा, त्याचा होय सदा तोटा

**आदॉगाद**—पु (गो) वकील. [पोर्तु अदवोगादो, इ ॲडव्होकेट]

**आदान**—न १ कुयोग, अशुभ सूचक प्रसंग २ (ल) ज्यापासून निभावणें-जगणें कठिण असा आजार किंवा अपघात, पुनर्जन्म देणारें संकट 'म्या भोगिलीं आदानें। गर्भवासी अपार।' -मुरशु ४३५ (क्रि॰ येणें, जाणें, चुकणें, टळणें, करणें, [स आ+धान]

**आदान**—न घेणें, स्वीकारणें, वळेंच घेणें-मिळविणें, अंगिकारणें [स आ+दा]

**आदापावती**—स्त्री (सावकारास) काहीं रोख व काहीं हुंडा त्यानें दिलेल्या रकमेची पावती भरणा केलेली पावती [आदा+पावती]

**आदाब**—स्त्री अदब पहा १ वंदन, मुजरा (क्रि॰ बजावणें) 'सर्वांनीं आदाब बजावली' -ऐटि १।१२ २ भेटीचें जवाहीर, अल्वार, नजराणा 'नवाबानीं मोत्याच्या कंठ्या तीन व जिगा, कल्गी वगैरे अकरा आदाब इनायत केले' -रा ५ १९१ [अर अदब्=नम्रता, मर्यादा राखणें] ॰वंदगी-स्त्री वंदन, अभिवादन पूर्वक विज्ञप्ति 'आदाबवंदगी ऐंवीजे' -ख ११५९१८

**आदाम**—पु (खि) १ सृष्ट्युत्पत्तीच्या आद्य कथेंत प्रथम मानवास दिलेलें नाव २ येशुखिस्त 'त्यानें (देवानें) त्यास आदाम हें नाव दिलें' -उत्प ६ २ [इ ॲडॅम, हिब्रू आदाम, अर आदम]

**आदाय**—पु नफा, फायदा, मिळकत अदाई पहा [स आदाय=स्वीकार, तुल अर अदा]

**आदारी**—स्त्री (माण) भंडारा ठेवण्याची कातड्याची पिशवी [स आधार]

**आदाव**—पु (गो) १ हशील, फायदा, आदा आदाय पहा

**आदांव**—पु (गो) एक झाड हें फक्त गोव्याकडेच होतें

**आदावत-ती-त्या-आदावळ**—अमळ्णें पहा

**आदांवत**—पु (गो) आळशी [तुल॰ इ आयड्ल=आळशी] -ती-वि आळशी

**आंदाळी-गुंडाळी**—स्त्री (गो) फिरफिरव [आंदोलन-आंदोळी+गुंडाळणें]

**आदाळी-आदळी-दोळी-दोळी**—स्त्री (गो कु) विळी, विसणीसह विळी अदली पहा

**आदि**—स्त्री १ आरभ, उगम, मूळ, प्रारभ, पहिला भाग 'म्हणौनि नाहीं तेणियां भया। आदि वेंची।' -ज्ञा १५ २३५ 'गांरांस, शक ६०२ पर्यंत अर्वाचीन मराठी भाषेची आदि नेण्यास सबळ कारणें आहेत असें दिसतें' -प्रभात पाटण दिलालेख (राजवाडे)

२ उद्भव, उत्पत्ति, मूळ उत्पत्तिस्थान ३ (ग ) खाण, खरा [स ] ४ मालेंतील पहिली संख्या किंवा वस्तु, (गणित) श्रेढींतील प्रथम पद ५ वश, नांगर, कुठी, कुळकथा –वि १ पहिला, प्रथम, अगोदरचा, मूळचा, प्रमुख, अग्रगी २ समासांत या शब्दाचा मूळ अर्थ कायम रहातो तरी तेथें 'इत्यादि' असा विशेष अर्थ होतो जसें–इंद्रादि देव, रागादि क्रिया, कामक्रोधलोभादि ३ सामासिक शब्दांत या शब्दास क प्रत्यय लागतो जसें–अकारादिक वर्ण= अ पासूनचीं मूळाक्षरें, ब्राह्मणादिक जाती, आकाशादिक भूतें सामाशब्द–आदिकाव्य, आदिदेव, आदिधर्म, आदिभाषा इ० –क्रिवि अगोदर, आधीं 'मी आदि उठेन मग तू ऊठ' ०अंत–पु आरंभ आणि शेवट, प्रारंभ आणि समाप्ति, अव्वल आणि अखेर, दोंडा आणि शेंडा

**आदिक**—वि १ अधिक, जास्त 'तेणें तें निज देवणें। कदापी पालटों नेणें। अथवा नव्हे आदिक उणें। बहुता काळें।' –दा १९९ [स अधिक ] २ आदि ( विशेषण अर्थ ३ ) पहा

**आदिक्रमन**—क्रिवि एका समुदायांतील कांहीं विवक्षित वस्तु प्रमुख धरून ती वस्तु प्रथम असें समजून ती व त्या बरोबर इतर, इत्यादि, वगैरे 'ज्ञान झाल्यानंतर देहादिकरून सर्व पदार्थ तुच्छ वाटतात' [स आदि+क्रमणें ]

**आदिकवि**—पु १ पहिला काव्यकर्ता, २ (ल ) श्रेष्ठ, आद्य कवि, ब्रह्मदेव, वाल्मीकि, व्यास यांना आदिकवि म्हणतात, या वरून एखाद्याची फार प्रशंसा करणें असता त्यास म्हणतात [स ]

**आदिकारण**—न निदान, आद्यबीज, पहिलें कारण, मुख्य कारण [स ]

**आदिकारी**—पु (गो ) अधिकारी, कुळकर्णी [स अधिकारी अप ]

**आदिकुमारी**—स्त्री दुर्गादेवी 'आदिकुमारी येउनि जाण। कृष्णासी तेल लावी आपण। वाधोनि हरयाचें कंकण। जीवें जीव म्हणतसे।' –एरुस्व १५.७३ [स ]

**आदिगादी**—स्त्री मूळ सिंहासन, तक्त राज्यसंस्थापकाची गादी किंवा तक्त, मूळ स्थान, पीठ [स आदि+म गादी ]

**आदिग्रंथ**—पु शीख लोकांचा मुख्य धार्मिक ग्रंथ, यासच ग्रंथसाहेब म्हणतात ग्रंथ या नांवानेंहि हा उल्लेखिला जातो हा ग्रंथ बाबा नानक, वगैरे ... याचे दोन मुख्य भाग आहेत पहिल्यांत अर्जुन नावाच्या पांचव्या गुरूनें पहिल्या चार गुरूंचे म्हणणें –आज्ञा–एकत्र केल्या आहेत दुसरा दहाम पादशाही ( संक्षिप्तरूप दसमग्रंथ ) दहावा पादशहा जो गुरुगोविंदसिंग याचा ग्रंथ सर्व शीख लोक पहिल्यासच प्रमाणभूत मानतात व कांहीं जहाल शीख दुसऱ्यास मानतात याची भाषा हिंदी व लिपी गुरुमुखी आहे [स आदि+ग्रंथ ]

**आदिघराणें**—न १ वंशाचें मूळचें कुटुंब, अगदीं पहिलें कुटुंब २ राज्यापकाचें किंवा मूळ पुरुषाचें गृह किंवा कुटुंब [स आदि+ गृह–घर ]

**आदिजीव**—पु (प्राणि )सर्वांत खालच्या कोटींतील एकपेशी मय प्राणी, हे सूक्ष्मदर्शक यंत्रावांचून पाहिल्याशिवाय दिसत नाहींत, सूक्ष्म प्राणी (इ ) प्रोटोझोआ [स आदि+जीव]

**आदित**—क्रिवि प्रथमत , आरंभापासून, पहिल्यापासून, मूळापासून, उगमापासून [स आदित ]

**आदित**—पु (गो ) सूर्य [स आदित्य अप ] ०वार–पु आदित्यवार, रविवार

**आदिताल**—पु ( संगीत ) संगीतांतील एक ताल किंवा मात्रा [स ]

**आदित्य**—पु १ सूर्य, रवि 'वीराच्या अभिमाना झाला अस्त। माध्यान्हीं आला आदित्य।' –एरुस्व ७.२४ २ बारा आदित्य ( देवता )–धातृ मित्र, अर्यमन्, रुद्र, वरुण, सूर्य, भग, विवस्वत्, पूषन्, सवितृ, त्वष्टृ व विष्णु हीं बारा महिन्यांतील सूर्याचीं बारा रूपें आहेत ३ अदितिपुत्र, ( सामा ) देवता किंवा देव ४ सूर्यकमळ 'आदित्याचीं झाडें। सदा सन्मुख सूर्याकडे।' –ज्ञा १८.८६५ [स ] ०वार–पु रविवार –त्याची छत्री–स्त्री अळंबें, एक वनस्पति –स्याची तुळस–स्त्री एक तुळशीसारखी वनस्पति

**आदिधन**—न (गणित) गणित किंवा भूमितिश्रेढींतील प्रथमपद किंवा आदिपद [स ]

**आदिना**—पु शुक्रवार [अर ]

**आदिनाथ**—पु १ शंकर 'देवाचें दैवत। तुज नमिलें आदिनाथें। ये वो कृपावंतें। भोगा माझ्या धावत।' –तुगा २८९ २ नाथपंथाचा संस्थापक, मच्छेंद्रनाथाचा गुरु 'नमस्कार माझा तया आदिनाथा।' –नाथनामावली [स ]

**आदिनारायण**—पु १ प्रथम किंवा आदिकारण, भगवान्, विष्णु क्षीरसमुद्रांत शेषावर निजलेलें भगवत्स्वरूप 'परब्रह्म असतां निश्चळ। तेथें संकल्प उठिला चंचळ। तयास बोलिजे केवळ। आदि नारायेण।' –दा १३.३.३ [स ]

**आदिपद**—आदिधन पहा [स ]

**आदिपश्चात्**—क्रिवि १ जरा अलीकडे परीकडे, पुढें मागें, आजूबाजूस जवळपास आगें मागें २ लवकर किंवा उशीरा कांहीं दिवस अगादर किंवा कांहीं दिवस मागून 'आदितवारींच आतें पाहिन कीं आदिपश्चात् आतें तर येईल कामास?' ३ अस्ताव्यस्त, एकात एक मिसळून ४ उलटापालट, इकडचा तिकडे, तिकडचा इकडे, क्रमरहित 'पोथीचीं पानें आदिपश्चात् लागलीं असतां नीट करा' [स ]

आदिपीठ—( विक्र ) मूळ पीठ, आयस्थान [ स ]

आदिपुरुष—पु परमेश्वर, शकर, विष्णु 'तें दशानि आदि पुरुष। विस्मितु।'–ज्ञा १ १५१ २ मूळ पुरुष, कुळांतील पहिला पुरुष [ स ]

आदिपृथक्करण—न ( रसायन ) प्राणिज किंवा उद्भिज पदार्थांचे मुख्य घटक एकमेकांपासून वेगळे करणें पृथक्करणाचे दोन प्रकार–आदि पृथक्करण व अतिम पृथक्करण ( इ ) प्रॉक्सिमेट ॲनॅलसिस् –सेंपू १४१० [ स ]

आदिबीज—न मूळ उगम, कारण, तत्त्व, आदिकारण, परमेश्वर, प्रणव, ओंकार 'तें मिया श्रीगुरुकृपा नमिलें। आदिबीज।' –ज्ञा १ २० [ स ]

आदिभूतिक—वि ( प्र ) आधिभौतिक, पचमहाभूतापासून होणारा (त्रास, दु ख, सुख इ०) 'येरताप आध्यात्मिक। दुजा तो आदिभूतिक।'–दा ३ ६ ९ [ स आधिभौतिक ]

आदिम—वि १ पहिला, मूळचा, अगोदरचा २ ( प्राणि ) शरीराच्या मध्यरेषेच्या जवळ असणारा [ स ]

आदिमग—क्रिवि १ आरंभीं किंवा मागाहून, लवकर अथवा उशीरा, आधीं किंवा नतर २ पुढचा मागें मागचा पुढें, उलट सुलट, आदिपश्चात् [ अशुद्ध प्रयोग स आदि+म भग ]

आदिमध्यांतरहित—वि ज्याला प्रारभ, मध्य, शवट या तीन अवस्था नाहींत असा (परमेश्वर) [ आदि+मध्य+अत+रहित ]

आदिमसंघ—पु ( प्राणि ) अतिसूक्ष्म प्राण्याचा सघ, गाडें व खारें पाणी, पाणथळ जमीन आणि ओला, कुजका पाला यांत मुख्यत हे प्राणी उत्पन्न होतात –ज्ञाको ( आ ) १२१ ( इ ) प्रोटोझोआ आदिजीव पहा [ स ]

आदिमाया-माता-शक्ति—स्त्री १ आदिप्रकृति, मूळ माया, जगदुत्पादक शक्ति सर्व ससाराला, प्रपचाला कारणभूत अशी देवता २ आदिपुरुषाची स्त्री, पार्वती, शक्ति 'तूचि आदि मायेचा निजवर।'–ह १ २ [ स ]

आदिमूर्ति—स्त्री मूळ पुरुष ईश्वर, नारायण 'आदिमूर्ती निश्चिता। होतें वटपत्रशयनीं।'–गुच २ ४० २ श्रीकृष्ण 'हेम सिंहासनीं आदिमूर्ती। बैसला असे सहज स्थिती।' एरुस्व ३ २१ [ स ]

आदिरस—पु ( शाप ) जीवनरस, जीवरस ( इ ) प्रोटोप्लाझम [ स ]

आदिल—पु न्यायाधीश [अर आदिल=न्यायी सचोटीचा]

आदिल, आदील—वि पहिलें, मूळचें प्रथमचें अव्वलचें 'ऐसा दीर्घ दीपु लाविजे। तय आदील कोण हें नोळखिजे।'–ज्ञा ९ ४२८ [ स आदि ]

आदिवंत—वि १ मूळचा, पहिला, आदिल २ ( ल ) मिरासदार 'महायुगसहस्रीं। आदिवत।'–ज्ञा ६ ४४९ [ आदि+वत् ]

आदिवदन—न ( गणित ) गणित किंवा भूमितिश्रेढींतील दोन टोकांच्या पदार्पैकीं पहिलें पद आदिधन पहा –मोल [ स आदि+वदन ]

आदिवराह—पु विष्णूचा वराह अवतार [ स ]

आदिशून्य—न १ आदिशक्ति, माया 'भरे आदिशून्याचा गाभारा। नाणयासी।'–ज्ञा ७ २४ २ आकाश ३ आदिसृष्टिजल [ स. आदि+शून्य ]

आदिष्ट—वि आज्ञा, हुकूम केलेला, सांगितलेला, आज्ञप्त, कथित [ स ]

आदिष्टपदार्थ—पु ( रसायन ) एखाद्या वस्तूबद्दल दुसरी यणारी वस्तु बदली पदार्थ –सेंपू १ ६३ ( इ ) सब्स्टिट्यूशन प्रॉडक्ट

आदिसकल्प—पु ब्रह्माच्या ठिकाणीं उत्पन्न होणारी 'एकोऽहं बहुस्याम्' (मी एक आहे, अनेक असावें) ही मूळ इच्छा, पहिली इच्छा ( माया ) 'पैं निर्विकल्पाचिय बरडीं। फुटे आदिसकल्पाची विरुढी।'–ज्ञा ८ २२ [ स आदि+सकल्प ]

आदिसिद्ध—वि प्रारंभीं असलेलें, शाश्वत [ स ]

आदिसिद्धांत—(न्याय ) अजेरचा सिध्दांत, मूळ सिध्दान्त

आदिसोयरा—पु (काव्य ) पहिला सोयरा, नातलग, ईश्वर 'तो जगत्त्रया आदिसोयरा।' [ स आदि+म सोयरा ]

आदीं—क्रिवि आधीं, प्रथम, अगोदर [ स आदि ]

आदीं—उभ पूर्वी, पूर्वीचा, मागचा 'उत्पत्ति आदीं प्रपच नसे। अतीं काहीं उरला न दिसे।' –एभा १९ ८७ [स आदि]

आदी-वर-कारी—पु अधिकारी, सुभेदार–शक १५६५ चा कल्याणचा ताम्रपट ( यावरून अधिकारी अदकारी, आदीकारी हीं आडनावें पडलीं आहेत ) [ स अधिकारी ] आदींचें बिदीं, आदीं बिदीं–क्रिवि १ सर्वांच्या आधीं, सर्वांच्या अगोदर, लवकर 'उद्या आदीं बिदीं निजून कोण उठतो पाहू' २ पुष्कळ अगोदर बराच वेळ पूर्वी 'आदींबिदीं घर शाकारलें म्हणजे पाऊस कव्हा का पडेना' [ आदी द्वि ]

आदु-दू—अदु पहा

आदुफ—न ( गो ) मोठी खिडकी

आदुली-ळी—स्त्री (कु गो ) राजणवाडी आजली, आजणी पहा [ स अन्ध ]

आदुळणी—स्त्री ( राजा ) राजणवाडी

आदुळणें-आदोळणें—उक्रि ( काव्य ) धोके घेणें, दणे, हेलकावे खाणें हलविणें, हलणें कप पावणें, खालीवर होणें (जहाज इ० ) 'आदोळला सत्यलोकु।'–उषा १६८७ २ स्नान घालून हलविणें [ स आदोल ]

**आंदुळी**—पु (गों) झोपाळा [स आदोलक, म आदोळा]

**आदत**—वि १ आदर केलेला, मान दिलेला २ स्वीकार केलेला, ग्रहण केलेला (नजराणा, बक्षीस इ०) [स]

**आर्दे**—वि (गो) अर्धे [स अर्ध]

**आदेखाई**—अदेखाई पहा

**आदेय**—वि. ग्राह्य, मान्य, समत, स्वीकार करण्यास योग्य [स]

**आदेश**—पु १ उपदेश २ आज्ञा, हुकूम, विधि, नियम 'दास म्हणे आदेश तयाला।'—दावि २७४ ३ अतिदश या अर्थी युगीनें योजिला जातो ४ कानफाटे, नाथपंथी (गोसावी) लोक पर स्परास नमस्कार करताना उपयोगात आणितात तो शब्द 'अलक्ष आदेस जल्पतसे।'—नव ८ १ १० ५ (व्या) मूळ अक्षराबद्दल दुसरें योजिलें जाणारें अक्षर (प्रतिनिधि), बदली येणारा वर्ण उ० इ+इ च्या स्थानीं ई आदेश होतो ६ (शाप) बदली वस्तु पदार्थ, प्रतिनिधि ७ (राजनीति) हुकूम, आज्ञा, बदली कारभार करण्याचा ठराव (इ) मॅन्डेट 'वरील विचारास सलग्न असलेलें दुसरें एक तत्त्व म्हणजे आदेशाचें होय'—वस्व ५५ ८ (भाषा) समानार्थक अन्य शब्द, प्रतिनिधि उ० दृश् (धात्वादेश) पश्य [स] ०प्रधान—वि (भाषा) ज्यात शब्दार्थी रूपें बदलतात अशा सप्रत्ययी (संस्कृत, लॅटिन वगैरे भाषा) (इ) इन्फ्ले क्शनल ०प्रकरण—न भाषेतील ध्वनींस होणाऱ्या विकृतींबद्दलचें विवेचन, ध्वनिशास्त्र (इ) फोनेटिक्स —ज्ञानेश्वरी व्याकरण १

**आदेस**—पु (गो) अर्धा दिवस [स अर्ध+दिवस]

**आदो**—न (गो) आर्द्रा नक्षत्र [स आर्द्रा]

**आदोगर**—क्रिवि (प्र) अगोदर [स आदौ+अग्रे]

**आदोड**—वि (गो) अधाशी, हावरा, अधोडी

**आदोंदी**—(गो) खाचर, सारवट शेताचा तुकडा

**आंदोरी**—अतुरी पहा

**आंदोल**—पु झोंपाळा, पाळणा, [स आदोलक]

**आंदोलक**—पु घड्याळाचा लवक, लोलक [स]

**आंदोलणें-ळणें**—क्रि हलणें, हेलकावे खाणें आदुळणें पहा 'आदोलत ब्रह्माड पै।'

**आंदोलन**—न १ झोका, हेलकावा, झेंप. [स] २ (हिं) राजकीय किंवा औद्योगिक चळवळ (इ) ॲजिटेशन —केसरी ११ १० ३० ३ (सगीत) स्वर काहीं वळ वर खाली करीत राहणें ०लेखक—पु विद्युत्प्रवाहाच्या शक्तींत होणारी कमी जास्त तीनता दाखविणारें यत्र (इ) ऑसिलोग्राफ ०सिध्दात—पु सूर्य किंवा दुसरा तेजस्वी पदार्थ याचा वायूवर (ईथरवर) व्यापार घडून लाटा उत्पन्न होतात व त्या डोळ्यास लागून प्रकाशाचें ज्ञान होतें असें मत [स]

**आंदोला, आंदोलिका**—पु स्त्री १ झोंपाळा २ पालखी ३ पाळणा [स]

**आंदोळणें**—आदोलणें, आदुळणें पहा 'जळावरी कमळ कळिका। जेवीं आदोळे।'—ज्ञा ११ २४९ 'सप्तपातार्ळे आदो ळतीं। शेषकूर्म दचकले चित्तीं।'—रावि ३३ १०२

**आंदोळविंदोळ**—वि हलणारा, लहरीनें युक्त 'तेथ घट जो होय चचळ। ते प्रतिबिंब होय आदोळविंदोळ।'—एभा ११ १५० 'आदोळविंदोळ होये।'—ऋमुरा ५९ ४५ [आदोळ द्वि]

**आंदोळी**—स्त्री (गो) विळी अडला पहा

**आंदोळी**—स्त्री हेलकावा, झोंका आदोलन पहा 'आलोडिता विचारा आदोळी जाली।'—भाए ४३७

**आदौ**—क्रिवि प्रथमारंभीं, सुरवातीस, आरंभीं, पहिल्यानें, अगोदर, पूर्वी [स आदि सप्तमि]

**आंदौळणें**—आदोलणें, आदुळणें पहा 'कीं रावणाचेनि भुजा बळें। कैलासतेतू आदौळलें।'—शिशु २३९ [स आदोलन]

**आद्त्त**—वि अदत्त (अप) न देणारा 'स्वार्थी अभिलासी वोढाळ। आद्त्त झोड आदखणा।'—दा २ ३ २८ [स. अ+दा]

**आद्य**—वि १ पहिला, आरंभींचा, अगोदरील, उपक्रम, सुर वात करणारा (वेळ, स्थळ संबंधीं) २ मुख्य, प्रमुख, सर्वोत्कृष्ट ३ आदि, प्रभृति 'काशी यात्राद्य यात्रा याणें केल्या आहेत'—पु १ आदिपुरुष, परमेश्वर 'ॐ नमोजी आद्या।'—ज्ञा १ १ [स] ०कवि-कारण-काल-काव्य-देव-धर्म-पुरुष-इ या सामा सिक शब्दापेक्षा आदिकवि—आदिकारण इ० शब्द अधिक प्रशस्त ते पहावे ०गोदान—न मुख्य अनुष्ठान करण्यापूर्वी प्रायश्चित्ताग भूत करावयाचें गाईचें दान [स आद्य+गो+दान] ०ग्रह—पु पहिल्याप्रथम एखाद्या विषयीं असणारी होणारी भावना, मह, ग्रहा, पूर्वग्रह ०जंतु—पु (प्राणि) आदिजीव, (इ) प्रोटोझोआ ०नाडी—स्त्री (ज्यो) नाडी पहा ०पीठ-स्थान—न १ पूर्वजाची भूमि किंवा स्थळ २ देवता जेथें प्रथम अवतीर्ण किंवा उपलब्ध झाली तें स्थान ३ प्राचीन व पूज्य असें क्षेत्र, नगर, स्थळ [स] ०वेद—पु ऋग्वेद ०वेदी—वि ऋग्वेदी शाखेचा 'आद्य वेदी असे आपण।'—सुच १७ १७ ०ज्ञान—न १ प्रथमचें, मूळ ज्ञान शहाणपण २ उपजत, अगचें अथवा जातीचें शहाण पण, नैसर्गिक बुद्धि ३ मूळ कल्पना। ४ नवीन शोध, शक्ल, प्राथ मिक युक्ति, प्रयुक्ति [स]

**आद्यंक**—पु (गणित) त्रैराशिकातील पहिलें पद [स]

**आद्यंत**—पु आरंभ आणि शेवट, संपूर्ण, समग्र 'बोलिलीसे आद्यंतीं। परमात्मस्थिती निजबोधू।'—एभा १ १६७ उपजनि पत्न पहा —क्रिवि आरंभापासून शेवटपर्यंत, अवल अखेर, अथ पासुन इतिपर्यंत [स आदि+अंत]

**आद्या**—पु नफा, फायदा अदा, आदा पहा [स आ+दा]

**आद्याचार**—पु पूर्वापार चालत आलेली रूढी, रीतिरिवाज, शिष्टाचार [स आदि किंवा आद्य+आचार]

**आद्याक्षरसंयोग**—पु संक्षिप्त नावाचा शिक्का, आकृति, एकाक्षरी शिक्का हें मूळ एकाक्षरी सहीचें चिन्ह असून त्याच्या दोन किंवा अधिक अक्षरें एकमेकांत गुंतवून तयार केलेली आकृति अगा याचा अर्थ होतो हा साधारणत अंगठीवर कोरतात (इं) मोनोग्रॅम

**आध**—क्रिवि खालीं 'भारें धरा हे आध जाउं पाहे।' –दावि १२७ [स अध]

**आधडणें**—क्रि (व) खूप जेवणें, अधाशीपणानें खाणें [स अद्=खाणें]

**आधडा**—वि मूर्ख, अडाणी 'मत्सरी तो अधडा दुराग्रही।' –दावि २४९ [स अर्ध, प्रा अद्ध+म घड, अ+घड]

**आधण**—न १ विस्तवावर तापविल्यामुळें कढत होऊन उकळूं लागलेलें पाणी, उकळण्यासाठीं विस्तवावर ठेवलेलें पाणी 'जरि अमृत घातु आधणा। कापुर मेळउ इंधना।' –ऋ ५१ २ ला प्रकारची पाण्याची अवस्था, उकळी, कढ (क्रि० येणें) ३ गूळ, काकवी, वगैरे करण्यासाठीं काहिलींत कढण्यासाठीं घातलेला उसाचा रस ४ (ल) राज्य, एखादा कारभार, संसार इत्यादि व्यवस्थित चालविण्याविषयींची जबाबदारी किंवा भरवसा (सामा) आधणें, भार, जबाबदारी (क्रि० ठेवणें) ५ अपमृत्यु, आधाण पहा [स आदहन,प्रा आदाण तुल० गो आधन] **जिवावरचें आधण उतरणें**–आलेलें मोठें संकट आपोआप नाहींसें होणें, टळणें ०**निवविणें**–मकरसंक्रांतीच्या दिवशीं सुवासिनी स्त्रीनें ब्राह्मणाच्या घरीं जाऊन त्याच्या चुलीवर ठेवलेल्या आधणात (भाताच्या भांड्यात) तांदुळात सोन्यारुप्याचा तुकडा घालून ते वैरणें म्ह० आधणातले रडतात आणि सुपातले हासतात (सुपातल्या तांदुळावरहि आधणात पडून रडण्याचा प्रसंग येतो)=आज जे सुखात आहेत त्यांना भावी दुःखाची कल्पना नसली तरी तें प्राप्त होतेंच, तें सृष्टिनियमाला अनुसरून आहे

**आधणणें**—क्रि आधण येणें, उकळी येणें [आधण]

**आधमण**—अदमण पहा

**आधमर्ण्य**—अधमर्ण पहा

**आधरून**—क्रिवि हरघडून, आदरून, पहा 'मी दाणे वाळत घातले म्हणजे आधरून पाऊस यतो'

**आधल**—न (खा) पितळेचें उभट भांडें याचा उपयोग धार काढताना करतात हें चोगोण्यासारखें असतें [स आ+धा=ठेवणें]

**आधला**—पु (खा) एक पैसा अधेला पहा [स अर्ध]

**आधला-ली-लें**—वि पूर्वींचा, पहिला आदला पहा 'आर्त होताति आधलें। कृष्णमूर्तीलागीं।' –ज्ञा ११ ६०६ [स आदि]

**आधवड-आधवर्णा-आधव्याचा**—अ मध्यें पहा

**आधळा**—वि (कों) ज्यातील पाणी आटलें नाहीं असा नारळ, कोंवळा नारळ आन्सर पहा [स अर्ध+आर्द्र, प्रा अन्द+ओल, म अर्ध ओला]

**आधळा**—अ मध्यें पहा

**आंधळी कोशिंबीर, आंधळें नक्षत्र-करण**—अ मध्यें पहा

**आधा**—वि (काव्य) अर्धा, निम्मा 'हरें चंद्रमा आधा ठेसा। वाहिजत असे शिरसा।' –ज्ञा ९ ४८६ 'आणि जो कुंभ असे आधा तिजा विभागें। त्यामाजीं डिगीमिगी डगीचि हाऊं लागे।' –राादि ११ १०१ [स अर्ध, प्रा अद्ध]

**आधाटी**– अधाटी पहा

**आधाटी**—स्त्री आधाटीबद्दल चुकीनें उपयोग, एक वाद्य आधाटी पहा 'हातीं घेउनिया आधाटी।' –उषा १८१३

**आधा-धें**—अर्धा-धें पहा

**आधाडा**—अधाडा पहा 'तिये ब्रह्माचळाचा आधाडा।' –ज्ञा ७ ६९, –दाव ३२१

**आधाण-न**—न अपमृत्यु मोठें अरिष्ट, जिवावरचें दुखणें मरण प्राप्त होण्यासारखें मोठें भयंकर संकट आधण अर्थ ५ पहा (क्रि०–येणें, जाणें, चुकणें, टळणें, वारणें, निवारणें) 'शेवटीं तित क्याही आधानातून पार पडून आपल्या कुटुंबात सुरक्षित येऊन पोंहोंचला' –बाळ २ २०४ [स आ+धान]

**आधांतरीं**—अधांतरी पहा 'आधांतरीं होती वेडे। या नाव आदिभूतिक।' –दा ३ ७ १५

**आधातुर**—वि अर्धमृत, अर्ध मुकेला, अर्धयोगी 'जेथ चैतन्यें आधातुरें। करूनि असिजे।' –ज्ञा ६ २८० [स अर्ध+आतुर]

**आधातुरी**—स्त्री आथरूण, शय्या आथरी पहा 'विरहा नलाचा भरी। आवे पाल्वे याची करौंनि आधातुरी।' –शिशु २८३ [स अध+आस्तरण, आथ+आथरी]

**आधातुरें**—अ अधांतरीं, अंतराळीं, निराधार [अव किंवा अर्ध+अंतर]

**आधाधिणें**—क्रि भिणें, भीति घेणें 'मृत्यूनि आधाधिलें। तिहीं निरंजन सेविलें।' –ज्ञा १३ ७३ [स आ+धा]

**आधान**—आधाण आधण अर्थ ५ पहा

**आधान**—न १ स्थापना, प्रस्थापना, ठेवणें २ अग्निहोत्र ग्रहणाचा संस्कार अग्न्याधान ३ गर्भाधान या शब्दाचें संक्षिप्त रूप [स]

**आधान**—आदान पहा

**आधायक**—वि ठेवणारा, स्थापन करणारा [ स ]

**आधार**—पु १ आश्रय, टेंका, धीर, (अक्षरश व लाक्षणिक) धारण करण्याची, सहन करण्याची शक्ति, दिलेला आश्रय 'सर्व जगतास पृथ्वीचा आधार आहे ' सामाशब्द–आधार-गत चलन–च्युत–भूत–भ्रष्ट–स्थान–स्थित–इ० २ निर्वाहाच्या साधनाची मदत, आश्रय, आसरा 'जवळ पैसा नाहीं आणि कशाचे आधारावर लग्न आरभावें ' ३ (ल ) पूस, मदत, कृपा, समति, मान्यता, अधिकार, ४ प्रमाण, वज 'तुम्हीं वतन माझें म्हणता याला आधार कशाचा म्हणाल तर भोगवटा ' ५ ( योग ) पट्चक्रांपैकीं पहिलें, शिश्न व गुद याच्या मधील मूलाधारचक्र, याचा रग तांबडा व पाकळ्या चार असून त्या प्रत्येकीवर 'व, श, ष, स, ' हे वर्ण असतात 'मग कुडलि निघाली टेंभा । आधारीं केला उभा ।–ज्ञा १२ ५१० –विउ १ ४८ ६ ( व्या ) सप्तमी विभक्तीचा अर्थ अधिकरण ( आत, वर, कडे ) ०लावणें–आश्रय देणें, मदत करणें, पाठपुरावा येणें –स लावणें–( एखाद्या गोष्टीचा ) शेवटपर्यंत छडा–तपास–शोध लावणें–करणें –स लागणें–(एखाद्या गोष्टीच्या) मूळापर्यंत जाणें, यान्यास लागणें –स पंथ–पु एखादी गोष्ट समजण्यासाठीं, सिद्ध करण्यासाठीं लागणारी कारणपरपरा, साधन, लक्षण, विशेषत नकारात्मक उपयोग 'मला ओळखीचा वाटला म्हणून त्यास विचारीत होतों परतु त्याणें आधारास पथ लागू दिला नाहीं ' ( क्रि० लावणें, लागणें, दिसणें, असणें ) म्ह० १ 'आधाराला मधार ' २ 'म्हातारा नवरा कुत्र्याला आधार ' ०कमळ–चक्र–न (योग) आधार अर्थ ५ पहा 'आधारचक्रीं सूक्ष्म प्राण ।'–एभा१२ ३१२ [स] ०द्रुम–पु आधारचक्र आधार अर्थ ५ पहा 'चरणतळें देखइजे आधारद्रुमाच्या बुडीं ।'–ज्ञा ६ १९३ पत्र–न पत्राव लीस मधोमध लावलेलें ल्हानसें वेगळें पत्र, ताटाखालचें पान २ पोथी–पुस्तकास दोन्ही बाजूस लावलेला जाड कागद वगैरे पुठ्ठीपत्र ३ प्रमाणपत्र, आधारवचन ०वहाल–न ज्यावर छपराचा सर्व भार असतो तें ०बिंदु–पु (शाप ) तरफ, टेकू ( इ ) फल्क्रम ०मुद्रा–स्त्री योगशास्त्रांपैकीं दहा मुद्रांतील एक शोधूनि आधारमुद्रा वसा।'–ज्ञा ८ ४९ [ स ] ०शक्ति–१ ( योग ) मूलाधारचक्र, आधार अर्थ ५ पहा 'आधारशक्तीचिया अकीं ।'–ज्ञा ११ ५ २ अधिष्ठान, माया, ब्रह्म

**आधार-कांडी-दण-दणी**—अधार पहा

**आधारणें**—( गो ) अधारणें पहा

**आधारी-रात्र**—अधारी पहा

**आधारें**—( गो ) अधेरी पहा

**आधावर्ती**—स्त्री मूळ कारण त्या सगाराची आधावर्ती –एभा २८ ३०१. [ स. अधस्+वर्ती ]

घडो १ १२

**आधि**—पु स्त्री मानसिक दु ख, भीति, शोक, चिंता इत्यादि कापासून होणारें दु ख, काळजी 'ते चुकाले द्वद्व सधी । आधि व्याधि महार्णवी ।'–एभा २ २८९,–तुगा १५७० 'तव सेनेंतील धरिति आधि रथी ।'–मोकर्ण १४ ४९ –पु गहाण, करार, वायदा –स्त्री. १ ( व्यापक ) पाठीमागें लागणारें लचाड, पीडा, उपाधि, कुलगडें, लेकरें २ ( ल ) उत्कठा 'हा बोलु आइक्त सवीं । अर्जुना आधि न माये जीवीं ॥'–ज्ञा १७ ३२६ [ स आधि ]

**आधिकमास**—अधिक महिना पहा

**आधिक्य**—न १ अधिकपणा, बहुलता २ अतिरेक [ स ]

**आधिदैविक**—वि १ इंद्रियाधिष्ठित देवतासबधीं, स्वर्गातील देवासबधीं, देवतोपदिष्ट, अधिदेवतेच्या कक्षेतील, सामर्थ्यातील 'अधिदेवता ' पहा २ देवकृत, दैवी, परमेश्वरी प्रेरणेनें उत्पन्न झालेलें ०ताप–पु देवाकडून शीत, उष्ण, अतिवृष्टि, अनावृष्टि, मूषकादि होणारें दु ख त्रिविधताप पहा 'देवापासूनि तो आधिदैविक । मानस ताप तो अध्यात्मिक ।'–एभा २२ ३०९ –विवेचन–न सर्व परमेश्वरकृत आहे असें स्पष्टीकरण 'पाचभौतिक सूर्याच्या जड किंवा अचेतन गोळ्यात तदधिष्ठात्री सूर्य या नावाची एक देवता असून तीच जड सूर्याचे व्यवहार चालविते असें जेव्हा आपण मानितों तेव्हा त्यास आधिदैविक विवेचन म्हणतात '–गीर ६२ [स ]

**आधिपत्य**—न १ स्वामित्व, अधिकार, धनीपणा २ प्रतिष्ठा, गौरव 'पुरुष निर्गुण जरी असला तरी सासुरवाडीस गेला म्हणजे त्याचें आधिपत्य माडतें '–शास्त्रीको [ स ]

**आधिभौतिक**—वि १ आधिभूतासबधीं, प्राण्यासबधीं अधि दैव, अधिभूत पहा २ आद्यतत्त्वासबधीं ३ जड, स्थूल, पचभूता त्मक, द्रव्यात्मक, प्राकृतिक आध्यात्मिकच्या उलट ( इ ) मटी रियल, फिजिकल ०ताप–पु स्वशरीराहून भिन्न अशा चक्षुगोचर प्राण्या पासून होणारें दु ख –एभा २२ ३०९ त्रिविधताप पहा ०विवेचन–न जड सृष्टींतील पदार्थ आपल्या इंद्रियाना ज्याप्रमाणें गोचर होतात त्याचप्रमाणें ते आहत, त्यापलीकडे काहीं नाहीं अशा दृष्टीनें त्याबद्दल विचार करणें त्यास आधिभौतिक विवेचन म्हणतात –गीर ६०. [ स ]

**आधिला**—वि अर्धा [ स अर्ध ]

**आधिला-ली**—वि पहिला, अगोदरचा–ची 'आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा ।'–तुगा ३०२ 'परपुरुषीं रतें मन । आधिला भ्रतार नावडे जाण '–कथासारामृत ११ ११० [स आदि]

**आधिवेदनिक**—न नवऱ्यानें दुसरी बायको करताना पहिल्या बायकोला दिलेलें धन पोटगीदाखल दिलेलें द्रव्य –यांचा कायदा ६१ 'आधिवेदनिकं यच्च दद्यादाधिवेदनिकं धनं ।'–याज्ञ वल्क्यस्मृति २ १४८ [ स ]

**आधिव्याधि**—स्त्री मानसिक व शारीरिक दु ख [ आधि + व्याधि ]

**आर्धी**—क्रिवि अगोदर, पूर्वी, मुळात 'आर्धीच समुद्र पाहीं । तेथ दुवाडपण स्वणा नाहीं ।' –ज्ञा १ ११७ ०निर्धी-चेव(नि)र्धी–आर्दीचे विर्दी पहा म्ह० १ आर्धी अननम् मग तननम्=जवण झाल्यावर गाणें सुचतें २ आर्धी शुद् नये मग वृध्द नय ३ आर्धीच बहु वावळी अन् वीचमें खाई भग ४ आर्धीच उल्हास त्यात आला फाल्गुनमास ( आर्धीच मर्कट तरातहि मद्य प्याल इ० )=म्वतःच्या हौसेंत दुसऱ्याच्या उत्तेजनाची भर पडणें ५ आर्धी जाते वुद्धि, मग जातें भाडवल किंवा लक्ष्मी=मनुष्याला वाईट दशा यण्यापूर्वी भलभलत्या गोष्टी करण्याकडे त्याची प्रवृत्ति होणें ६ आर्धी पोटोवा, मग विठोवा, आर्धी स्वार्थ, मग परमार्थ ७ (व ) आधी मला खाण मग थोडीन कामाचा गाडा, आता मी जवतें हातीपायीं खेळें=प्रथम जेवणास घाला मग काम करीन असें म्हणावयाचें व नवल्यानंतर जेवण अगावर आल्यामुळें निजावयाचें, एकूण कल्हाच काम व्हावयानें नाहीं कामचुकार, कामचुचर ८ आधी होती पतिव्रता मग झाली मुसळदेवता=प्रथम गरीब मग भाडखोर.

**आधी**—स्त्री मानसिक दु ख आधि पहा 'मनाचा छेदावया आर्धी । योग निर्बुद्धी साधावा' –एमा २८ ६१०

**आधी**—वि ( माळवी ) वावळा [ स अध, हिं आधी ]

**आधीन**—वि स्वाधीन, ताब्यातील, नियत्रित, अधीन पहा 'देख इद्रियाआधीन होईजे ।' –ज्ञा २ ११९

**आधीनामधीं, आधींमधीं, आधील, आधेली, आधाड, आधाडी, आधारी, आधोर्ली**—अ मध्यें पहा

**आधुरू**—वि अधाशी खाणारा वरणारा 'मुरक चरती कुमी भूक म्हणती द्विज आधुरू तरा व्राह्मणी ।' –राला १०८ –ऐपो ३७० [ म अट्–खाणें ]

**आधुल** ( शीष )—न ( नृत्य ) डोकें एकदाच किंचित वाकडें करणें व मग उच करणें गर्व असमाव्य गोष्ट घडून येणें वगैरे गोष्टींचा द्योतक अभिनय [ म ]

**आधुनिक**—वि १ अलीकडचें नूतन सांप्रतचा, आताचा २ (दुर्वनें ) नाशिवत, न टिकणारा, अशाश्वत [ स ]

**आधेन**—वि स्वाधीन अधीन पहा 'साइन सवहि गात । स्त्री आधन जीवित ।' –दा २ १९

**आधेन**—न अध्ययन, अभ्यास 'आधेन आणि अध्यापन । स्वयें करी दानपुण्य' –दा २ ७ १३ [ स अध्ययन ]

**आधेय**—वि १ ठेवलेला स्थापिलेला, निहित २ आश्रय दिलेले आश्रित 'अभय मी आधार । आधय मी ॥' –ज्ञा १८ ११९० ३ धात असलेला, भरलेला, व्यापलेला ४ स्थापावयाचा ठेवावयाचा ५ गहाण, ठव म्हणून ठेवावयाचा [ स ]

**आधेर, आधेरकाडी, आधेरी**—अ मध्यें पहा

**आधेला-लें**—अधेला पहा

**आधोरण**—पु हत्तीचा महात –विठ्ठल रुक्मिणी ४४ (–रण ) [ स ]

**आंध्य**—न १ अधळपणा २ काळोख, अधार 'का जगाचें आन्ध्य फेडितु ।' –ज्ञा १६ २०० [ स ]

**आध्या**—अध्या पहा

**आध्यात्मिक**—वि १ अध्यात्मज्ञानविषयक, तत्वज्ञानासबधी अध्यात्म पहा २ ईश्वर, परब्रह्म आत्मा यासबधी, पारमार्थिक, ( इं ) स्पिरिच्युअल 'जे सात्विकाचेनि वडपें । गलें आध्यात्मिक खरपें ।' –ज्ञा ६ ४५० ३ धार्मिक ४ मानसिक बौद्धिक ०ताप–पु देह इद्रियें व प्राण यांच्यापासून होणारें दु ख, स्थूल व सूक्ष्म शरीरामध्यें होणारें आधिव्याधिरूप दु ख –एमा २२ ३०९ ०मार्ग–पु आत्मा प्रधान मानून वासनेच्या शुद्ध तेचा विचार केला म्हणजे तो नीतिनिर्णयाचा आध्यात्मिक मार्ग होय –गीर १७८ ०विवेचन–न मनुष्याच्या स्वरूपात आत्म स्वरूपानें राहून त्याला सकळ सृष्टीचें ज्ञान करून देणारी अशी एकच इद्रियातीत चिच्छक्ति या जगात असून त्या शक्तीनेंच हें जग चाललें आहे असें जेव्हा मानितात तेव्हा त्यास आध्यात्मिक विवेचन हें नाव देतात –गीर ६२ [ स ]

**आंध्र**—पु. तेलगण देश दक्षिण हिंदुस्थानातील एक प्राचीन राष्ट्र, नेल्लोर, गतूर मच्छलीपट्टण, राजमहेंद्री, विजगापट्टण व गजम इतक्या भागास आज आध्र देश म्हणतात [ स , ते अध्रमु ] –पु. तैलगण देशातील लोक ०भाषा–स्त्री तेलगू भाषा ०राज्य–न आध्र लोकाचें राज्य, हें इसवी सनाच्या पहिल्या शतकात दक्षिणहिंदु स्थानात होतें

**आध्वर्यव**—न अध्वर्यु नामक ऋत्विजानें करावयाचें श्रौत स्मार्तविषयक कर्म [ स ]

**आध्वाचा**—क्रिवि ( व ) १ आधुनिक, अलीकडचा २ उपर मुख, उपऱ्या अध्याचा पहा 'आमचे वाडवडील येथें पुरातन काळापासून रहातात पण हा मनुष्य मात्र आध्वाचा आला आहे'

**आन**—अ ( अडाणी ) एन, अतिशय सपाटून या अर्थी उ० आन महागाई–उन्ह–पाऊस इ० [ ऐन ]–उम आणि अन अन पहा 'म्हणौनि आठें सात्विकाचा मेळावा केला आन गर्गे –भ ६० (गोप ) –वि दुसरें निराळें, भिन्न, वेगळें 'मग अन वार्ती आहे । पापावाचुनी ।'–ज्ञा १ २४८ २ ( ल ) विचित्र 'नामी वाळे आन करीन '–उषा २८ १० अन्, अन पहा [ स अन्य ] ०आन–क्रिवि निरनिराळें 'न करिता सद्गुरु भजन । नव्हे भवदुःखाचें छेदन । जरी कोटी काटी साधन । आनआन करिया ।' –एभा १२ ४७२ [ स अन्य द्वि ]

**आन**—स्त्री (प्रा) शपथ आण पहा

**आन**—न (भिल्ली) घर 'आन को आले' –भिल्ली भाषेंतील गोष्टी २५

**आनक**—पु १ नगारा [स] ०**दुदुभी**–पु कृष्णपिता वसुदेव, याच्या जन्माच्या वेळेस स्वर्गात दुदुभी (नगारे) वाजल्या म्हणून [स]

**आनखशिख**—क्रिवि पायाच्या बोटाच्या नखापासून शेंडीपर्यंत, सर्व शरीरभर, नखशिखात 'मी असें बोल्तांच त्या बोधानें आनखशिख स्नात झाला' [स आ+नख+शिखा]

**आनंतर्य**—न १ अंतर नसणें, असडपणा, एकसूत्रीपणा, अनुक्रमपणा (आमच्या अमस वेळेच्या) २ सातत्य, सान्निध्य [स]

**आनंत्य**—न अनंतपणा, अपरंपारपणा (कालाचा किंवा स्थलाचा) अनतत्व पहा [स]

**आनंद**—पु १हर्ष सुख, सतोष उल्हास, समाधान, उत्साह, आल्हाद प्रमोद पचदशींत पुढील पाच प्रकारचे आनद सागितले आहेत–आत्मानद, ब्रह्मानद, विषयानद, विद्यानद, योगानद २ सन्यासी व गोसावी याचा एक सप्रदाय 'हा (विठ्ठल) भीमातीर दिगंबर। आदिपुरुषपरात्पर। आनद सप्रदाय थोर। तेथूनिया वाढिला' –ह ३६ १९७ ३ साठ सवत्सरातील ४८ वें सवत्सर –न ब्रह्म 'स एको ब्रह्मण आनद' –तैत्तिरीय उपनिषद् २ ८ ३ ६ [स आ+नन्द्=हर्ष पावणें] –**दाची घडी**–स्त्री आनदाचा–सुखाचा काळ (क्रि० येणें उगवणें, उपस्थित होणें, निघणें, चालणें) [आनद+घडी] –**दाचें युद्ध**–न प्रेमकलह मित्रकलह 'वैरभाव नसता किंचित। हें आनदाचें युद्ध हो।' [स आनंद+युद्ध] ०**कंद**–पु (काव्य) आनदाचा उगम, मळ, गड्डा, झरा, परमेश्वर 'आनद कद ऐसा। हा हिंद देश माझा।' –टकांडे आनदगीत ०**कोश**–पु आत्म्याच्या आवरणाच्या पाच कोशांपैकी शेवटचा कोश, अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनदमय असे पाच कोश मानितात, सद्वर्तन आणि चांगलेपणा ठेवून त्यात आनद मानण्याचा धर्म या कोशाची देहाशीं (कारणदेह किंवा अविद्या यांशीं) सापड आहे 'चित्त जेव्हा वृत्तिशून्य। ध्येय ध्याता न दिसे अन्य। अनुभवा आलें शुद्ध चैतन्य। आनद कोश तें गमवीं।' –निगमागमसार ८०७ [स] ०**घन**–वि १ (काव्य) पूर्ण व शुद्ध आनदानें परिपूर्ण [स] २ (ल) ब्रह्म, परमेश्वर ०**भैरव** (रस)–पु १ (वैद्यक) एक रसायन, वचनाग मिऱ्यें पिंपळी, टाकणखार ? गधक, व हिंगूळ यांचे समभाग चूर्ण करून कवडी वर्झी, हीं अनिमार व मेद यावर एक गुजभर दराज देतात –योर २ १७८ २ (सगीत) एक राग या रागांत षड्ज कोमल ऋषभ तीव्र गाधार, कोमल मध्यम पचम तीव्र धैवत तीव्र निषाद हे स्वर लागतात याची जाति सपूर्ण–सपूर्ण असून वादी षड्ज व सवादी मध्यम आद गानसमय प्रातःकाळ हा भैरवाचाच एक प्रकार आहे ०**मय**–वि हर्षयुक्त सतुष्ट, आनदानें भरलेलें 'आनदमय सकळ ब्राह्मण। चिंतिती रामविजय कल्याण।' ०**मयकोश**–पु कारण शरीर, सत्त्वप्रधान ज्ञान आनदकोश पहा ०**वन**–न काशी क्षेत्र 'दडकारण्य बृहद्वन। नैमिषारण्य आनदवन।' –एमा १८ १५७ 'कीं क्षेत्रामाजी आनदवन।' –ह १ ११० ०**वनभुवन**—न नाशिकपासून कोल्हापुरापर्यंतचा प्रदेश, महाराष्ट्र 'बुडाला औरंग्या पापी म्लेच्छ सहार जाहला। मोडली, मांडिली क्षेत्रें आनदवनभुवनीं।' –राक ०**वल्ली**–स्त्री १ भाग २ नाशिकच्या पश्चिमेस तीन मैलावर एक गाव येथें आनदीबाई पेशवे रहात असत –स ८१५ ३ तैत्तिरीय शाखेच्या उपनिषदापैकीं एक उपनिषद् ०**वृत्ति**–स्त्री आनदी स्वभाव –वि रंगेल, आनदी –**दाश्रु**–पु अति आनदामुळें डोळ्यांतून येणारें पाणी (क्रि० येणें, आणणें) ०**पिकणें** अतिशय आनद होणें 'आनद पाडुचा पिकला।' –मोआदि २० १ –**दानें टाळी पिटणें**–अतिशय आनद पावणें ०**ब्रह्मांडांत न मावणें**–आनदानें बहाव, बेभान होणें. –**दाचें भरतें येणें**–अतिशय आनद होणें, आनदानें ऊर दाटणें 'आनदाचें भरतें तेणें राजाला लोटलें' –विक २७ –**दित**–वि सतुष्ट सुख पावलेला, हर्ष पावलेला

**आनंदणें**—अक्रि हर्ष पावणें, सुखी होणें, उल्हसित असणें 'तैशा देखोनि सत मूर्ति। वाग्देवी आनदति॥'

**आनंदन**—न आनद, सुख, सुख–आनद देणें, पावणें –वि आनददायक, आल्हादकारक 'वरी आनदीनी श्रीकृष्णकथा।' –दाव २७

**आनंदवणें**—क्रि आनद देणें, सुख देणें, सतोषित करणें 'तू सुखानें भावी युवराजागह त्याना आनदविशील' –राणी चंद्रावती १६५

**आनंदी**—वि हर्षयुक्त, रंगेल, उल्हासी, हास्यमुख ०**आनंद**–पु पूर्णानद, अतिशय आनद, तिकडे तिकडे सर्वत्र आनद होणें, असणें

**आनंदेशीं**—क्रिवि (काव्य) आनदानें, सुखानें

**आनदवाद्य**—न कातड्यानें मढविलेलें वाद्य, याचे प्रकार —पखवाज नाल तबला बाया, डफ सबळ, चौघडा, ताशा, ढोल, मरफा सनिरी, डौर डुडुबुडे इत्यादि [स आनद आनक=नगारा]

**आनन**—न १ तोंड, मुख, सामासशब्द–दशानन, षडानन, गजानन इ० 'वदन हें निपरांत कपि भारतीं।' २ चेहरा [स]

**आनरसा**—अनरसा पहा

**आनर्त**—पु द्वारका प्रांत याची राजधानी आनंदपूर किंवा आनर्तपूर (हल्लीं वडनगर) येथें होती

**आनसा**—मामा पहा 'नरनामाधि चद्र पाहिला तजग्या आनसा।' –नाम ५३ [स नर]

आनस—(गो) भात अन्न पहा [अन्न]

आनसा—वि (काव्य) दुसरा, निराळा, इतर [स अन्य+दृश]

आनाकानी—स्त्री (हिं) दुर्लक्ष, कानाडोळा, चालढकल डाळाडाळ, टंगळमंगळ अंगचुकार टाळाटाळ, निष्काळजीपणा (क्रि० करणें) 'यास जें काम सांगितलें त्याविषयीं हा आनाकानी करतो' [स अ+आकर्णन=न ऐकणें]

आनागुना—(व) आनाकानी पहा

आनाद—पु (कातकरी) आनंद पहा 'राजाला मोठा आनाद वाटला' [आनंद अप]

आनान—वि वगवगळा, भिन्नभिन्न, अनान पहा 'एऱ्हवीं दीपाप्रति काई आनान। प्रकाशु आहाती॥' –ज्ञा ५.१७ [स अन्य+अन्य]

आनार, आनाचार, आनास्था—अ मध्यें पहा

आनाह—पु मूत्रावरोध, मलावष्टंभ [स]

आनित्य-आनीत्य—न नीति (अप) 'बहु आनित्य अविचार। या गांव बद्द' –शा ७ ७ २८ [स अ+नीति]

आनी आनीक आनींग—वि (गो) आणीक आणखी

आनीत—वि आणिलेलें, जाऊन आणलेलें [स आ+नी=नेणें]

आनीन—अनीन पहा

आनीवानी—अणीवाणी पहा

आनीने—पु पानवेलीवरील एक रोग –शेतकरी मासिक ७ २८३ नामनोंदी कोश [?]

आनु—वि १ आणखी अन्य 'आनु वयें भरलीं' –वमा २६ २ दुसरा भिन्न 'तें वाचौनि थोरें। आनु सर्वीतिना –ऋ २५ [स अन्य]

आनु—वि थोडें, अल्प किंचित 'येक म्हणती येकवि खर। आनुहि नाहीं दुसरें।' –दा ८ २ ४२ [स अणु]

आनुकूल्य—न १ अनुकूलता युक्तता २ (ल) कृपा बहाली सामासशब्द–प्रह्यानुकूल्य देशानुकूल्य कालानुकूल्य, लोकानुकूल्य इ० [स]

आनुपूर्वी, आनुपूर्व्य—स्त्रीन १ (एका पुढें एक असा) क्रम शिस्त टापटीप पद्धत व्यवस्था २ संगति एकवाक्यता यावरून एखाद्या ग्रंथावरील टीका टीप भाष्य [स अनु+पूर्व]

आनुभविक—वि अनुभवास आलेलें अनुभविक पहा 'हें औषध माझें आनुभविक आहे म्हणून तुम्हाला घ्यावयाला सांगतों'

आनुमानिक—वि तर्क केलेलें अदाजिक कार्यकारणसंबंध न घेऊन अटकळ केलेलें [स अनु+मा–मोजणें]

आनुल्ली—स्त्री (गो) राजणवाडी–आजरली [स अघ]

आनुल्लें—न (गो) चोपायी वाहून नेण्याजोगें मेण्या सारखें परंतु वरील भाग उघडा असलेलें गोमांतकप्रांतीं रूढ असलेलें एक वाहन माचील मचील

आनुवंशिक—वि १ वंशपरंपरागत चालत आलेला, बापापासून मुलाला, त्याच्या मुलास, असें आलेलें (गुण दोष) पिढीजाद, वारसानें मिळालेली, वडिलोपार्जित (धन, वतन, इ०) [स अनु+वंश]

आनुवंशिकता—स्त्री १ वंशपरंपरागत प्राप्त अशी स्थिति, पिढीजादपणा (इ) हरडिटी २ प्राणिज व उद्भिज या कोटींतील व्यक्तीमध्यें आपापल्या मातापितरांच्या ठायीं वसत असलेले गुणदोष प्राय उतरतात त्यावरून जीं ठोकळ अनुमानें काढता येतात तीं ज्या शास्त्रांत समाविष्ट केलीं आहेत असें शास्त्र

आनुषंगिक—वि १ बरोबर असणारें सहस्थित अनुषंगानें बरोबर येणारें 'आपणास त्याचे प्रधान व गौण अथवा आनुषंगिक असे दोन भाग पाडतां येतात वस्त्र २९ २ कार्यकारण संबंधी, तत्संबंधीं, तन्निमित्त अनुसारी, परिणामक ३ योग्य प्रमाणाचा, साजा, तुल्य बताचा [स]

आनृण्य—न कर्ज देणें नसणें [स अ+ऋण]

आनें—वि अन्य आन पहा 'हा वस्तार कृपासिंधु। आनें तुरेना।' –ऋ ४३ ०आन–क्रिवि १ दुसरें, अन्य निराळें भल तेंच 'तरि तियसी प्राणी न भजान। मग्येंचि करिती आनआन।' –स्वादि ७ २ ५१ 'तव मनें करूं आनेआन।' –एभा २९ ७१ [स अन्य+अन्य] २ परस्पर [स अन्यान्य]

आनेगा—अनगा, आणेगा पहा

आनोज—पु अंकुर –मनको

आनोविन—वि वाईट तऱ्हें अशास्त्र रीतीनें अन्योविन्य पहा 'वसता एकत्र आनोविन। होईल जघन्य निर्माण।' –निगा ३८५

आनौती—क्रिवि १ दुसरीकडे, अन्य ठिकाणीं सौंदर्या आनौती वासु। पाहों भेदी।' –ऋ ८९ 'तया मी वांचूनि धारं। आनौति नाहीं।' –ज्ञा १२ ७९ [स अन्यत्र] –वि २ दुसरी अन्य गुरुवाचोनि निरंतरीं। चिंता न करी आनौती।' –एभा १० १३५ [स अन्यत्]

आन्वीक्षिकी—स्त्री १ राजनीति–शास्त्राच्या (आन्वीक्षिकी, त्रयी, वार्ता व दडनीति) चार प्रकारांपैकीं पहिला प्रकार विचार करून अनुमति घेऊन केलेला मत किंवा काढलेली युक्ति, तर्कशास्त्र, आन्वीक्षिकींत न्यायशास्त्राचाहि समावेश होतो त्रयी वार्ता व दडनीति हे शब्द पहा 'आत्मानात्मविवेक केवळ। ते आन्विक्षिकी विद्या कुशळ' –एभा १६ २०५ २ अध्यात्मविद्या आत्मानात्मविचार 'करितां त्वंपदाचें शोधन। होय तत्पदीं समाधान। हे आन्वीक्षिकी विद्या जाण। विवेकसंपन्न पावती।' –एभा २० २८५ [स अनु+ईक्ष=पाहणें]

**आन्हिक**—न स्नानसंध्यादि रोजचें धर्मकृत्य, नित्यकृत्य (प्र) आह्निक पहा 'तों मपादुनि आन्हिक, पूजुनि परमेश्वरा भजा वरदा' –मोकर्ण १९७ [स अहन्=दिवस]

**आप**—न उदक, पाणी, जल, नीर, अबु, वन [स अप्, ग्री अपॉस, झेंद अप्, फा आब्]

**आप**—सना १ आपण स्वत २ (उ) आपला, स्वकीय, स्वजातीय 'नमि, ज्याचे रिपु वसले ज्यासह होऊनि आप, गात नय।'–मोभनु ८ ३४ [स आत्मन्, हिं आप] म्ह० १ आप सुखी जग सुखी=आपण सुखी असता सर्व सुखी आहेत अशी भावना २ आप मेलें, जग बुडालें=आपल्या मागें काहीं का होईना या अर्थी –वि आपलें, आपलें स्वत चें सामासशब्द–आपहस्तें, आपमुखें, आपखुषीनें 'आपकार्याहून जीवीं। पर कार्यसिद्धि करावी।' –दा २ ७ ६५ –न आपण, स्वत, अह, सामासशब्द–आपगर्जी, आपघ्न, आपमतलबी ०आगें–क्रिवि स्वत, स्वार्थे 'तिथे चालत जाईन आपआगे स्वता' –होला १४९ ०अपर–आपपर पहा ०आप, आपजात–क्रिवि आपण होऊन, आपखुषीनें, आपोआप, आपल्याआपण ०आपणिया–वि आपण आपल्याला 'आप आपणिया देखणें। सबाह्याभ्यंतर सम दृष्टि।' –एरुस्व १ ५९ ०आपला–वि प्रत्येकाचा, स्वत चा, ज्याचा त्याचा 'सर्वांस आपआपला स्वभाव चांगला वाटतो'

**आप**—पु (गो) आप्त 'तो आप लागता'=तो आप्त लागतो

**आप**—वि स्वाधीन, स्वायत्त, आपल्या ताब्यातील 'एथ पृथ्वीतळ आपु होईल। हें महेंद्रपदही पाविजेल। परिमोह हा न फिटेल। मानसींचा।'–ज्ञा २ ६५ [स आप्=मिळणें, आप्त=मिळालेलें]

**आपई**—स्त्री १ आपलेपणा, आपलेपणाचें द्योतक कृत्य, पर स्थळीं असलेल्या मित्रास फळें, वस्त्रें इत्यादिकाची पाठविलेली भेट, देणगी, नजराणा २ (ग्रा) टेव [स आत्मन्]

**आपकरा-कुरा-दरा**—अपकरा पहा

**आपका**—अपका पहा

**आपखुदी**—स्त्री १ आपण स्वत, खुद्द २ स्वेच्छामर्थे 'ता यावद त्या पाणियातील आपखुदीनें होऊन'–चित्रगुप्त ८३ [हिं आप+फा खुद=स्वत]

**आपखुशी-षी**—स्त्री आपली मर्जी, स्वा ची मर्जी, इच्छा, स्वेच्छा 'तू आपखुषीनं माझी वस्तु मज देऊन टाक' –के १२ ७ ३० [हिं आप+फा खुशी] (विरु) आपखुशीनें–क्रिवि (वायदा) स्वत च्या मर्जीनुरूप, आपण होऊन (इ) व्हॉलंटरीली

**आपगंड**—वि (राजा) हट्टी, स्वच्छंदी, मनस्वी, स्वेच्छाचारी [आप+का गंड=मास]

**आपंगणें**—सक्रि अपगणें पहा १ आश्रय देणें, प्रेमानें वाढविणें, सभाळणें, पोसणें, पाळणें, आपलासें म्हणणें 'जे जे शरण आले। ते ते आपंगिले। पवाडे विठ्ठले। ऐसे तुझे।' –तुगा १६३६ 'आपंगिलें मज श्रीराम समर्थें।'–दाति ३६२ 'याचे आईबाप हा लहान असतानाच मेले तेव्हां आम्ही याला आजपर्यंत आपंगलें' २ स्वीकारणें, अंगीकारणें, आश्रय करणें 'मग येथ अथवा स्वर्गी। जेथ जे देह आपंगी।' –ज्ञा १५ ३६८ [आप+अंग]

**आपगरजी, आपगर्जी**—वि स्वार्थी, अप्पलपोट्या, मतलबी 'प्राणाशीं प्राण देणार नव्हे आपगर्जी राव जी जी'–होला १७५ [आप+गरज]

**आपगा**—स्त्री नदी 'मला निरखिता भवच्चरणकन्यका आपगा।' –केका १० [स अप्=पाणी+गम्=जाणें]

**आपंगिता**—वि आश्रयदाता, पोशिंदा, अपगिता पहा 'त्यासि आपंगिता नाहीं।त्यासि धरी जो हृदयीं।' –तुगा२०१५

**आपघर**—न १ आपलें घर २ नवऱ्याचें घर, सासर 'मग आपघर त्यागूनि बापघरीं केली वस्ती।'–सप्र ११ ४९ म्ह० आपघर किंवा बापघर=विवाहित स्त्रीला एक नवऱ्याचें कीं एक बापाचें घर राहण्यास योग्य [आप+घर]

**आपजणें**—अक्रि उपजणें, उत्पन्न होणें, घडणें, घडून येणें 'पंचभूताचें धान्य निपजे। तयाचा अन्नरस आपजे।' –निपू ६ १० 'का भूमि कुंभ ठेविजे। तें सजुभना आपजे।' –अमृ ८ ४२ २ भासणें वाटणें 'जैसे स्वप्नामाजीं देखिजे। तें स्वप्नींचि साच आपजे।' –ज्ञा २ १३९ [आप+जन्=उत्पन्न होणें]

**आपजविणें**—सक्रि उत्पन्न करणें [आपजणें प्रयोजक]

**आपटणें, आपटा, आपटी**—अ मध्यें पहा

**आपटोळ**—वि १ चहाटळ, गुंड २ बेपर्वा, स्वच्छंदी, अपगड, अठवर, नाठाळ, आज्ञा मोडणारा 'कीं आपटोळ आज्ञा पाल्नीं। मीं स्थीर नव्हे।' –ऋ ७० [?]

**आपड, आपाड**—स्त्री (राजा कुण) शिवाशीव [स आ+पत्]

**आपडणें**—अक्रि शिवणें, स्पर्श करणें

**आपडी, आपडाआपड**—स्त्री (गो) शिवाशीव

**आपडीदडी**—स्त्री (कु) विटाळशी, रजस्वला [आपड]

**आपढंग**—पु (हिं) स्वेच्छाचार, जाणूनबुजून केलेल्या खोड्या, वेडेचार, चाळे [स आत्मन्+म ढंग, हिं आपढंग] ०गी–वि ढंगी, उनाड, स्वच्छंदी दुर्वर्तनी

**आपण**—सना १ स्वत , हें सर्वनाम मीं, तू तो,आम्हीं,तुम्हीं, ते किंवा मी स्वत , तू स्वत , तो स्वत , आम्हीं स्वत , तुम्हीं स्वत यावद्दलहि योजितात जसें–स्या त्याला जेऊं घातलें मग आपण ( मी ) जेवावयास बसलों, तू मला खटपटीस लावून आपण (तू ) स्वस्थ बसलास, त्यानें चोरी करावी आणि आपण ( त्यानें स्वत ) चोर चोर म्हणून हाका मारीत सुटावें याप्रमाणेंच अनेक वचनीं रूपें– आपण (तुम्हीं ) येत असाल तर मी येईन इ० २ दरबारी भाषेंत बोलणारे राजे, सरदार, मोठे लोक, सपादक वगैरे प्रथमपुरुषीं एकवचनीं बहुमानार्थानें स्वत या अर्थी व सत्कार पूर्वक भाषणात तू या अर्थी आपण हा शब्द वापरतात. परस्पर सभाषणात द्वितीयपुरुषी एकवचनी व बहुमानार्थानें वापरतात व सभाषणात ज्याशीं सभाषण चाललें असेल त्याशिवाय अन्य म्हणजे तृतीय पुरुषासबधीं बोलताना एकवचनात आपण शब्द योजनात [स आत्मन्, प्रा अप्पणा–णे, प गु आपण, सिं पाण ] ३ ( विशेषेकरून ) मी, मी स्वत , आम्हीं किंवा आम्ही स्वत याच्या विषयीं आपण हा शब्द वापरतात जसें–त्यापाशीं मागितलें असता तो आपणास देईल ४ ( प्रथमपुरुषीं अ व ) एका स्थानीं असलेले सर्व लोक ( बोलणारा धरून ) किंवा त्याना उद्देशून 'सभ्य गृह स्थहो, आज आपण याठिकाणीं का जमलों आहोंत हें सागण्याचें कारण नाहीं ' म्ह० आपणावरून जग ओळखावें= आपल्यास जसें होतें तसें दुसऱ्यासहि होत असेल असें समजावें **आपणावर आणणें–वर्तविणें**–केलेल्या कृत्याचें यश किंवा श्रेय आपल्या वर घेणें 'सागता हलुहलूच अचाटें । आपणाचवरि वर्तविनो ।' **आपणास म्हणविणें**–अपण आपल्या योग्यतेचे, मोठे हुशार निष्णात असें मिरविणें, प्रौढी सागणें **आपण होऊन**–आप खुशीनें, आत्मसतोषानें स्वत च्या प्रेरणेनें 'मी आपण होऊन तुला हें बक्षीस देणार होतों ' आपण या शब्दाला **पणा, पा पें, पेया**–हे प्रत्यय स्वत स्वत स आपल्या स्वत ला, आपणास या अर्थी लागतात ( विशेषत काव्यातून ) 'तिया न साभाळिती । आपणपआ ते ।'–दाव ३१९ चतुरूप राहिले आपणपा ।' –विपू ४ २५ 'नया आपणपें साइनि कहीं । इंद्रियप्रामुवेरि येणें नाहीं ।'–ज्ञा ५ १०४ 'अहकारु अहत्वसि सुरे । आपणपेंची ।' –क ६३ 'तेही विसरले आपणपें ।'–उषा १८१५ [आपण+पें]

**आपण**—पु बाजार किंवा दुकान 'क्षेत्र म्हणिजे शेत गहन । हाट-उत्पन्न द्रव्य आपण ।' –एभा २७ ३७९ [स आपण, आ+ पण=नाणें ( ८० कवडयाचें ), पण् =विकत घेणें–घणें ]

**आपणया, आपणिया**—सना आपणाला, स्वत स, आपण पा–पें 'आत्मा घाले भेऱ्ला । आपणया ' –अपू ६ ८ 'एमें आपणया आपण खुणे ।' –विपू ६ १०९ –एरुस्व १ ८३ 'ते आपणिया करी नि दास ।' –परमा ६ १४

**आपणुन**—क्रिवि आपण होऊन 'आपणात आपणुन करी गेप ।' –दावि २९७

**आपणें**—कि १ पावणें २ प्राप्त होणें [स आप्=मिळणें]

**आपत**—स्त्री आपदा, दुर्दैव, सकट, पीडा, विपत्ति आपत्ति पहा [स आपत्ति] ०काळ–पु प्रतिकूल, अनिष्ट, हलाखीच, वाईट दिवस ०पुरवणी–स्त्री वादविवादात जी एखादी गोष्ट घस रली किंवा बिघडली तिची कशी तरी सपादणी करणें, चुकीचें सम र्थन करणें

**आपत**—वि नातल्या, सबधी, लागयाबाध्याचें [स आप्त अप ] **आपत आणि घातक**–आपल्या आप्तेष्टाचा–नातलगाचा घात करणारा दुष्ट मनुष्य, माणुसकी नसलेला ०निपर्यी–पु नात लग, सबधी, कृपानुबधी [स आप्त+विषय ]

**आपतंत्री**—वि स्वैर, स्वतत्र [आप+तत्र]

**आपती**—स्त्री आपत्ति, सकट, आपत्ति ( अप ) पहा 'त्वरित बहुत घाई होतस आपतीची ।' –सारुह ३ ६० [आपत्ति]

**आपत्ति**—स्त्री १ ( दारिद्र्यामुळें, आजारीपणामुळें, दुर्दैवा मुळें आलेलें ) सकट, अडचण, हाल दुर्दशा ( अप ) आपद्, आपत्य २ (समासात ) प्राप्ति, मिळणें, प्राप्त होणें उ० सुखा पत्ति, इष्टापत्ति, दु खापत्ति, अनिष्टापत्ति [स आ+पद्=येणें ] ०काल–आपत्काळ पहा

**आपदणें**—कि कष्टणें, शिणणें 'नेणता कोणी येक ते । आपदों लागती ।' –दा १८ ५.१९ [स आ+पद् ]

**आपदा**—स्त्री सकट, अरिष्ट, आपत्ति 'आपदा निर्मी चुविजत । उधवला ठायीं ।'–ज्ञा ७ ८७ २ दु ख, क्लेश, खाण्या वाचून किंवा दुखण्यामुळें होणारे हाल, कष्टावस्था, दुर्दशा 'उप कारी नाहीं दखत आपदा । पुढिलाची सदा दया चित्तीं ।' –तुगा १५०३ [स ]

**आपदावणें**—अकि (ग्रा ) अडचणींत, दु खात, सकटात सापडणें, कुचबत राहणें [स आपदा]

**आपदृष्टि**—वि स्वार्थी, मतलबी, आपल्यापुरतें बघणारा, अप्पलपोटया [आप+दृष्टि ]

**आपदेश**—पु.(काव्य) स्वदश, आपला प्रदेश, प्रात [आप+ देश]

**आपद्धर्म**—पु. वर्णाश्रमधर्मविहित कृत्य करण्याला काळाच्या प्रतिकूलतेमुळें जो असमर्थ त्यासाठीं सागितलेला गौण मार्ग अथवा कृत्य, निरुपायास्तव करावयाची गोष्ट उ० भागवाडीत ओंवळ्यानें खाणें [स आ+पद्+धर्म ]

**आपधाक, आपधाकणें**—अ मध्यें पहा 'आपधाकें विप्रे पळती जाण ।' –एभा ४ २०६ 'तो इतका धावरला कीं आपधा केनं मटकन बसला ' [आप+धाक=भीति ]

**आपनेयां**—सना आपणास आपणया पहा 'पैल भावरमगी। आपनेया तें भणवी शिहाणी।'–शिशु ६८६ [आपण+या प्रत्यय]

**आपन्न**—वि १ विपत्तिग्रस्त पावलेला, आपत्तीनें घेरलेला, हाल–अपेष्टेत पडलेला, कष्टी २ मिळविलेला, कमावलेला, सपादन केलेला, प्राप्त, ज्यात सामासशब्द–खेदापन्न, शोकापन्न, हर्षापन्न, स्थानापन्न [स आ+पद्]

**आपपर**—वि १ आपला आणि दुसऱ्याचा, आपलें व परकें, द्वैत 'जेथ आपपर ऐसा। भागु नाहीं।'–ज्ञा ९ ४०७ ०**भाव–बुद्धि–भेद–मत–वृत्ति–विचार–दृष्टि**–आपल्या आणि दुसऱ्याच्या वस्तूमध्यें भेद राखणें, आपले इष्टमित्र, नातलग व इतर जनता यामध्यें भेद पाहणें २ द्वैतभाव, दुनाभाव (क्रि० पाहणें) [स आत्मन्–आप+पर=दुसरा]

**आपपरकी, आपपरकीय**—वि आपला आणि दुसऱ्याचा, स्वत चा व परक्याचा, आपपर. ०**भाव–भेद**–आपपर पहा

**आपबळ**—क्रिवि आपोआप, आपण होऊन अपबळ पहा

**आपमतलबी**—वि स्वार्थी, आपलपोट्या, स्वत पुरतें पाहणारा 'ज्याला मोठेपणा हवा असेल त्यानें आपमतलबी लोकांच्या कोल्हेकुईकडे लक्ष पुरविलें पाहिजे –टि २.५४ [आप+मतलब]

**आपमती**—वि आपल्या बुद्धीनें चालणारा 'पुसों जावें कवणा प्रती। तव ते सदा आपमती। आपुलें मत प्रतिष्ठिती। अन्यथा देती शापातें॥'–एभा ७ १८० –क्रिवि आपल्या बुद्धीनें 'आपमतीं भजता राया।'–एभा ३ ८०३, [आप+मत]

**आपमरण**—न आपोआप येणारें मरण, आपमोती [आप=आपोआप+मरण]

**आपमुखतार–त्यार**—वि स्वतत्र, स्वैर, अनियत्रित –पु धनी [आप+मुखत्यार]

**आपमुखत्यारी**—स्त्री स्वतत्रता, अनियत्रितपणा, धनीपणा, मालकी

**आपमृत्यु**—पु अपमृत्यु पहा 'ससारकोंडे आपमृत्यु। या नाव आध्यात्मिक।'–दा ३ ६ ४७

**आपमोती–मौती**—स्त्री अपघात न होता यथाकाल आलेलें मरण, आपोआप, वृद्धपणामुळें आलेलें मरण आपमरण पहा (क्रि० मरणें) [आप+हिं मौत स मृत्यु]

**आपयणें**—अक्रि (गो) बोलावणें [स आ+अपायन=जाणें याच्या उलट]

**आपरंग**—क्रिवि (ना) आपणहोऊन, आपोआप [आप+रग]

**आपरस**—पु फळाचा अथवा पानाचा (आत पाणी न मिसळता काढलेला) आगचा रस उ० ओल्या खोबऱ्याचें, पाणी न घालता काढलेलें दूध, नारळाचा रस (गो) आप्रोस [आप+रस]

**आपरापिपरी**—स्त्री (व्यायाम) एक प्रकारचा खेळ. –सव्या ५४

**आपरूप**—अपरूप पहा

**आपरूपी**—वि ज्याचा चेहरा, तोंडावळा बापासारखा किंवा आईमारखादि नाहीं, निराळ्या प्रकारचा आहे असें (मूल) [आप+रूपी]

**ऑपरेशन**—न शरीरावरील शस्त्रक्रिया, चीरफाड उ० डोळ्याचें–कानाचें–पोटाचें वगैरे ऑपरेशन [इ]

**आपलकी, आपलीक, आपलपणा, आपलेपणा**—स्त्रीपु १ मालकी, आप्तसंबंध, सोयरगत, स्नेह किंवा मालकी इ० कार्नी आलेला आपलेपणा, आपलेपणामुळें उत्पन्न झालेला अभिमान, माया, पक्षपात, कैवार 'मानिसिल झणीं आपलिक काहीं। चेरझार पाहीं न चुके कदा।'–तुगा २६९७ 'परी हें गुणें अति निर्गुण। आपलीक या नाहीं।' २ (व्र) मीपणा, अहंकार ३ स्वाभिमान, ममता. ०**लावणें, दाखविणें, माजविणें**—दृढ सबंध अथवा नातें गोतें सागणें, स्थापणें, तुम्हांपैकींच मी एक आहे असें दाखविणें किंवा तशी स्वत ची वर्तणूक ठेवणें [स आत्मन्–आप]

**आपलेपणांत येणें**—क्रि वयात, उमेदींत येणें, शरीराची पूर्ण वाढ होणें 'मी जेव्हा आपले पणात येऊ लागलें तेव्हा नव्या भावना खळबळू लागल्या'–गुपचूप (रसिकरंजन माला)

**आपलपोटाच्या, आपलपोट्या**—वि स्वार्थी, स्वत पुरतें पाहणारा, आत्मभरी [आपला+पोट] वाक्प्र० आपल्पोट्या मगाळ उपट्या

**आपला**—सना (आपण षष्ठी) १ स्वत चा, मालकीचा, आपण या शब्दाप्रमाणें याचाहि प्रयोग तिन्हीं पुरुषीं, दोन्हीं वचनात करतात आपण पहा २ प्रतिष्ठ किंवा अनिश्चयी मनुष्याच्या बोलण्यात हा शब्द निरर्थक, वाक्यपूरणार्थक येतो उ० मी आपला येथून उठलों, तो आपला त्याच्या घरीं गेला 'काय मेलीं अगी कडचीं काहीं तरी! स्नान नाहीं, मौठ नाहीं, आपला उठ धोव्या पाणी पी!'–सुदरची सकाळ आपला हा शब्द पुष्कळ वेळा सुशिक्षित लोकाकडूनहि आपण या अर्थी वापरण्यात येतो, जसें–आपल्यास किंवा आपल्याला=आपणास [आपण षष्ठी, स आत्मीय, प्रा अप्पुल्ल, गु आपणु] **आपली वाट चून खाणें**–आपमतलबीपणानें आपलेंच घोडें पुढें ढकलणें, आपल्या हिताकडेच पाहणें –**आपलीशी करणें**–१ आपलें म्हणणें (पक्ष, मत) सिद्ध करणें, प्रस्थापित करणें, आपली सरशी करणें २ वश करणें, ताब्यात आणणें 'प्रपच वैरी मारावा। अथवा आपलासा करावा।' विपू ७ १४४ ३ स्वत च्या मनाप्रमाणें वागणें **आपला–आपलासा म्हणणें–समजणें**–एखाद्यास आत्मीय भावनेनें किंवा मित्रत्वाच्या भावनेनें वागविणें, मित्र समजणें 'ज्यास मीं एकदा आपलासा म्हटलें त्याच्यासाठीं मीं हवी

तितरी पण सोशीन ' तूं आपला पेम–तू आपलें स्वत चें काम पहा, दुसऱ्याची उठाठेव करूं नको म्ह० १ आपल्या(ला)च्या,दुसऱ्या(ला) पुल्या = आपल्यास घ्यावयाचें असलें म्हणजे माप दाबून भरणें व दुसऱ्यास द्यावयाचें असलें म्हणजे माप पोकळ भरणें ही म्हण लोभी किंवा आपमतलबी माणसास लावतात २ आपलें तें मापटें व दुसऱ्याचें तें दुपायलें ३ आपला कान पिळून घेणें=एखादी गोष्ट करून ती बिघडली म्हणजे पुन्हा तशी न करण्याचा निश्चय करणें, अद्दल घडणें ४ आपला हात आणि जगन्नाथ=ज्यावांचून कार्य स्वत च्या हातात असतें म्हणजे त्यात स्वत चा स्वार्थ साधणें (जगन्नाथपुरी येथील प्रसाद एका ठिकाणीं ठेवलेला असतो व त्यातून यात्रेकरूनें हवा तितका (पुष्कळ सुद्धा) घ्यावयाचा असतो, किंवा जगनाथ म्हणजे सर्व सत्ताधीश-हात ) विपुलता व हवें तेवढें घेण्याची मुभा या अर्थी ही म्हण रूढ झाली असावी ०तुपला–वि माझा तुझा, स्वत चा व परक्याचा, आपपर २ आपली मालकीची, आपली म्हटलेली (मिळकत, जिन्नस वगैरे) आपपर किंवा आपअपर याच्यासारखच आपला तुपला यापासुन सामसिक शब्द बनतात ०माणूस–मनुष्य–पुन प्रीतीचा मनुष्य ' आपल्या मनुष्याला वाणी कमी का करतो ? '–कर्ज्याचा फार्स २२ आपलाला–वि आपआपला, ज्याचा त्याचा स्वत चा, ' आपलाले कपडे सांभाळा ! ' आपल्रूक, आपलुकी–स्त्री (चि ) आपलेपणा, स्वकीयता आपले आपण, आपल्या आपण–क्रिवि आपखुषीनें, स्वप्रेर णेनें, आपण होऊन आपलें उगीच–विनाकारण, निरर्थक आपला अर्थ २ पहा ' आपलें उगीच कारागिराची कुशलता पाहून माझी दृष्टि तिकडे वळली '–मृ ५८ –आपल्या अंगीं–अंगें–अंगानें–स्वत , खुद्द आपल्या आपण–दुसऱ्याच्या मदतीवाचून, स्वत च, आपसूक आपल्या घरचा थोर–राजा–वि १ हट्टी, हेकें खोर मनुष्य २ स्वत च्या घरीं जबरदस्तीनें वागणारा व बाहेर लोकात धड–नरमपणानें वागणारा गावचा गाड्या आणि बायकोचा दाढ पाड्या ३ दुसऱ्यावर विनाकारण वर्चस्व गाजविणारा ' तो असेल आपल्या घरचा थोर मला काय ? ' आपल्यात–स्वगत (भाषण) जुन्या नाटकातून स्वगत या अर्थी आपल्यात हा शब्द योजीत असत ' भीमराव –( बाजूस आपल्यात ) '–रत्नकांता नाटक २४

आपवणी–न पाटातून वाहणारें पाणी ( भाड्यातून आणलेलें नव्हे ), बागाईत शेतीमध्यें याचा उपयोग करतात [ आप+पाणी, किंवा आप+स वन=पाणी ]

आपवण–अक्रि बोलावणें आमत्रण देणें आपयणें पहा ' आपविल्या द्विजा । अष्ट देवताची करिती पूजा ॥ '–वसा ३० [ प्रा अप्पाहण=मागें सरणें याच्या उलट किंवा प्रा अप्पाह=मागणें खबर देणें ]

आपवणी-णॉ–वि (गो ) बोलावणारा

आपशांच-आपशी, आपशीच–अ मध्यें पहा

आपशुध्दि–स्त्रि १ स्वत ची शुद्धि ' आपशुद्धि नेणती । '–दावि ४९६ २ आत्मानात्मविचार ' दृढ कर्मनिया शुद्धी । आधीं घ्यावी आपशुद्धी ॥ '–दा ६ १० १२ [ स आत्मन्+शुद्धि ]

आपसंत–वि १ स्वत पसत केलेलें, ' वडील माणसाचें विचा रावाचून आपसतपणानें केलेल्या कृत्याचें फळ भोग आता ' रत्न कांता नाटक २५ [ आप+पसत ]

आपसया–क्रिवि आपसुक, आपोआप अपसया पहा ' नृग नाहीं तेचें पडिला दाराग्नि । जाय तो वियोगेनि आपसया ॥ '–तुगा ३४२४

आपसाच–आपशाच पहा

आपसां आपसात, आपआपस–सीं, आपसां मध्यें–क्रिवि परस्परात, आपआपल्यात, एकमेकाशीं, आमच्या आमच्यात, तुमच्यातुमच्यात, त्याच्यात्याच्यात, एकमेकात ' शत्रूवर जाण्याचें सोडून आपसातच भाडू लागले ' [ आप किं आपस्+ आ–आत–ईं–मध्यें ]

आपसुक–ख, आपसूक–ख–अपसुक पहा

आपसें–क्रिवि आपोआप, सहज, अनायासें ' ववणाचें मन आपसें अभिलाष न करी । '–भाए २४ [ आप ]

आपसोशी–क्रिवि (राजा ) १ मन मानेल त्याप्रमाणें, कोणाचा अडथळा न मानता, स्वेच्छेनें, यथेच्छ, या शब्दाचा प्रयोग ठोक देणें, हुना करणें, हद्द काढणें, इ अर्थाच्या क्रियापदा बरोबर करतात २ निर्भयपणानें, निःशकपणानें, परिणामाकडे लक्ष न देता, बेतनीत –वि लोभी, आपमतलबी [ आप+मोस ]

आपस्तंब–पु १ कृष्णयजुर्वेदावरील चार सुत्रापैकीं एका सुत्राचा प्रवर्तक ऋषि २ आपस्तंब सुत्राचा अनुयायी ब्राह्मण [ स ] ०सूत्र–न कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेच्या चार सूत्रापैकीं एक सूत्र [ स ]

आपस्तुति–स्त्री स्वत ची प्रशसा, आत्मस्तुति ' आप स्तुतीनें दाविती थोरीव '–दावि ४८४ [ आप+स्तुति ]

आपस्वरूप–न आत्मस्वरूप, ब्रह्मस्वरूप ' मग असइ उर आपस्वरूप । '–दावि १२५ [ आप+स्वरूप ]

आपस्वार्थ–पु ( स्वार्थ याच अर्थानें अडाणी लोकात आप स्वार्थ हा शब्द वापरतात ) आपला स्वार्थ, स्वतचा मतलब [ आप+स्वार्थ ]

आपस्वार्थी–वि आपमतलबी, स्वत चा स्वार्थ पाहणारा ' म्हणे मी कायें आपस्वार्थी । '–दा ५ ८ ३५. [ आप+स्वार्थ ]

आपहस्तक–कीं, आपहस्तीं–स्तें–क्रिवि आपल्या हातानें, आपल्या कडून, आपल्या सामर्थ्यानें, आपल्याच्यानें ' गरी बाचें काम आपहस्तें–परहस्तें होईल तितकें करावें ' [ आप+हस्त ]

**आपा-प्पा**—पु १ वडील माणसाला, किंवा लहानास प्रेमानें हाक मारताना योजावयाचा संबोधनार्थी शब्द, टोपण नाव आप्पा, अप्पासाहेब २ एखाद्या नावाच्यापुढें लावतात जसें-गोविंदपंतआपा, गणुआपा म्ह० सोनार शिंपी कुळकरणी आपा, तिघांची संगत नकोरे बापा ३ (कर) जार, ठोल्या, यजमान 'ती बाई आपा ठेवून बसली आहे' [स आप्त, प्रा अप्प, का अप्पा=पिता]

**आपाआप-आपाप**—अपाप पहा

**आपाड**—वि अपार अपाड पहा 'तयाची उमाणिता कीर्ती। उणीव दिसे आपाडे।' -मुआदि ११ ९३

**आपातत**—क्रिवि १ खोलें टरेतोंपर्यंत, खोडून टाकीतोंपर्यंत टिकणारा, चालू (मुद्दा, उलगडा, अनुमान, उपपत्ति) २ अगदीं आरंभीं, प्रथमच, वरवर, तत्क्षणीं [स आ+पत्-पात+त]

**आपातरमणीय**—वि आपातत, आरंभीं चांगलें दिसणारें, तात्पुरतें ग्राह्य (विधान सिध्दांत इ०) [स]

**आपाद**—क्रिवि पायापर्यंत, पायापासून 'आपाद पाशु तळें। पुलकाचळें।' -ज्ञा ११ २४६ [स आ+पाद] ०कंचुकित-वि पायापासून मस्तकापर्यंत अंगवस्त्र घातल्यासारखें 'वाचा पांगुळली जंविंचि तेथ। आपादकंचुकित रोमांच आले।' -ज्ञा ९ ५०७ [स आ+पाद+कंचुकी] ०तलमस्तक-क्रिवि पायाच्या तळव्यापासून डोक्यापर्यंत [आपाद+तल+मस्तक] ०मस्तक-क्रिवि नखशिखांत, डोक्यापासून पायापर्यंत [स आ+पाद+मस्तक]

**आपादणें**—सक्रि १ स्वीकारणें, घेणें, मिळविणें, संपादन करणें 'आणि आपुलालिये चाडे। आपादिलें हें माडे।' -ज्ञा ३ ५१ २ कर्म करणें 'करचरणें आपादिजे। घडिजे जें जें कांहीं।' -रयो ७ ११६ [स आ+पद्-आपादन]

**आपादन**—न संपादन, मिळवणी, प्राप्ति 'ऐसें ठेलें आपादन। धाराजें जया।' -ज्ञा १७ ३८ [स]

**आपान, आपाप, आपांपति, आपापरी**—अ मध्यें पहा

**आपाप-पा**—क्रिवि आपोआप अपाप पहा 'पापात्म बुद्धि परजी मरती अपापा।'-वामन विराटपर्व ५ १८ म्ह० आपा पाचा माल गपापा=जो माल किंवा वस्तु मिळविण्यास श्रम पडले नाहींत ती वस्तु किंवा माल वाटेल तसा खर्च करणें अन्यायानें मिळविलेलें द्रव्य हवें तसें उधळणें, याच अर्थी फारसी—माल मुफ्त दिल बेरहम

**आपापला**—आपआपला पहा

**आपार**—पु (गो) टाकाचें टोंक, निब [पातु आपारो]

**आपार**—स्त्री (गो) उपमा, व्याजोक्ति 'आपार मारली' =टोमणा दिला

धाडो १ ११

**आपारणें, आपाशाई जोडा, आपूस, आपोस**—अमध्यें पहा

**आपाल**—पु (व ना) घारगा [स अपूप]

**आपालिया, आपितर**—अमध्यें पहा

**आपिक्षीर**—स्त्री गव्हल्याच्या पिठाच्या पापडीची खीर -पाठक पाक शास्त्र ७०

**आपु**—वि १ स्वाधीन, प्राप्त 'हा सदा दुर्लभु मना। आपु नोहे साधना।' -ज्ञा २ १४९ २ स्वत सारखें, आपलें, आप्त 'तेणें ससरलेनि करीं। आपु विश्व।' -ज्ञा ७ १२५ 'तो जीवीं लागे ज्ञानदीपु। तवची स्त्रीपुत्र मायबापु। ये वन्हणीची नव्हेति आपु। प्रकाशलें जया।' -ज्ञाप्र १६३ [आप]

**आपुथिणें**—क्रि गाजणें -मनको

**आपुलकी**—आपल्की पहा

**आपुला**—वि (काव्य) स्वत चा आपण पहा 'रमती श्री चरणकमळीं सुखी। मानसीं आपुलाचि।' -ऋ ७७ [स आत्मन्]

**आपुलिया, आपुलेया**—आपल्या अपुलिया पहा 'तरी यांहीं आपुलिये चाडे। वावरों न ये।' -शिशु १८५ 'तरि आपुलेआ चा होऊे सहारू।' -दाव १०६

**आपुलीक**—ममता आपलीक पहा -ज्ञानेश्वर योगवासिष्ट ६ ४८

**आपुलेन**—वि (काव्य) स्व तच्या, आपल्याच 'आपुलेंणीं परीवारेंसी।' -उषा ९७ 'लेंकुरा नाहीं वाटविते। अन्न करावें लागे आपुलेन हातें।' -दास ३ ५ १२

**आपुल्याकुन**—क्रिवि १ (काव्य कुण) आपल्याकडून, आपणाकडून, स्वत कडून २ आपण होऊन

**आपूर**—वि अपुरा, अपूर्ण 'तरी तुमची वर्णिता स्तुती। आपूर असे माझी मती।' -नव २२ ११२ [स अ+पूर्]

**आपूशन**—न अपोष्णी अपोशन पहा 'सुंदरमूर्ति आपूशन। वरून सौमित्रानंदन।' -वेसीस्व ९ ११

**आपें, आपेंआप**—क्रिवि १ आपल्याआपण, आपण होऊन, स्वत च विच्यारें आपेंआप घनी।' -मुआदि १६ २८ 'जरी आपेंआप आम्हांसि वरी। तरी ते गोष्ट बहु बरी। नातरी कपटरूपें सुंदरी। आण येथें।' -कथा १ ८ ९१ २ स्वभावत, सहज 'ऐसिया आपेंआप लाधलिया। नमों तुज।' -ज्ञा १४ ६

**आपेशी-सी**—वि अपयशी द्वाड आपेसी वोंगळ। चाळक धुवक रच्याळ।' -दा ३ ३ २८ [स अप+यशस्]

**आपेणें आप्वणें**—सक्रि (बा गो) आमंत्रण करणें 'तो आपेना' जेवणाक आपोंणें करचें शानें' [स अपायन]

**आपैता, आपैतिया-ती, आपैतें**—वि १ स्वाधीन, अनुकूल 'तैसीं इंद्रियें आपैतीं होतीं।' -ज्ञा २ ३०२,-एभा १३ १५०,

२ प्राप्त 'हा भिक्षुगीतार्थ धरितां चित्तीं । शांति आपैती सामर्थ्यें ।' –एभा २३ ९६८ ' 'आणि अम्ह्यासुद्धां याचा स्वामिया । जेणें आपैतिया होती भूमि ' –ज्ञा ९ ३२० ३ (युक्तीनें) आयतें, आपोआप [ स आप्=मिळणें ]

**आपैस–सा–सी–सें**—क्रिवि आपल्याआपण, आपो आप, सहज, आपसूक अपशाच पहा 'मग समाधी विसर्जन आपैसा ।' –विउ ११ ९३ 'तव उसळोनि सर्पांच्या कोटी । कुर्डी पडाव्या आपैसा ।' –मुआदि १० ४४ 'गातरी कुश्चित येता सभेसी । निंदा प्रकटे आपैसी ।' –अवि १ ६० 'चारी पुरु पार्थे जैसे । भक्तापाशीं येती आपैसे ।' –एरुस्व ६ ५८ [ आत्मन्+ स्वयम् ]

**आपैसा**—वि आपलासा, वश, स्वाधीन (क्रि० करणें) 'समाधि सगोनी कामळें । मुखोनि करी आपैसा ।' –मुसदु १२ [ आप+अश ]

**आपोआप**—क्रिवि १ (वाच्य) एकदम स्फूर्तीनें २ अपाप, आपल्याआपण, प्रयत्नावाचून, स्पष्ट न करता, 'माळावर गवत आपोआप उगवतें ' [ आप द्वि ]

**आपोशान–न, आपोष्णी**—अपोष्णी पहा 'हातू न माखिता सर्वापोशन । रसनेविण सेवितू ।' –एभा ११ ३०८

**आपोहिष्ठा**—(व) (ल) चमत्कार, फजा, गारा, 'सगळ्या तुपाचा आपोहिष्ठा केला ' [ स आपोहिष्ठा इ० मंत्रावरून ]

**आपौर्णे**—क्रि (गो) चोरावणें आपैणें पहा –न मोट, रहाट यांच्या शिवाय आपोआप मिळणारें पाटाचें पाणी

**आप्त**—वि १ सबंधी एका रक्तामासाचा, नातलग, नातें वाईक, सोयरा 'आप्ताचीं नच सुखें भलसुखवीं । –मोमभा १ ५३ 'ईश्वर ही शास्त्रिया आप्त । विश्वास तेथें न धरावा ।' –मुआदि ३४ २१ २ आपला असा मानलेला, इष्टमित्र, हितकर्ता 'स्त्रो कृति सभाग्य तू सुनय आप्त का मातशी ।' –केका ३८ ३ विश्वासू प्रामाणिक विश्वासार्ह, प्रमाणभूत, भरवशाचें 'आप्त म्हणजे विश्वसनीय पुरुष होय ' –गीर ४०७ ४ (समासांत) प्राप्त जसें–पर्याप्त समाप्त ५ गुरु पूज्य पुरुष, सन्माननीय व्यक्ति, यथार्थ वक्ता, ज्याचें वचन ईश्वरवचनासारखें प्रमाण मानतात तो ०वाक्य –वचन, –उक्ति–नवी विश्वसनीय, साधार प्रमाणयुक्त (भाषण–शब्द) थोराचें वचन [ स ] ०मित्र–पु अव सोयरे, नातलग, भाऊबंद, इष्टमित्र सर्व मिळून ०विषय–पु १ नातलग सोयरा २ नातें, सबंध ०विषय–यी –संबंधी–वि स्नेह भावानें बांधलेले नात्यागोत्याचें 'एका मल्लवावर आमची आप्त विषयी बाई जाणार आहे ' –पाव्ह ६६

**आप्तई**—स्त्री आपत्ति संकट 'आक्रूर हें नामाभिमान सांडून पाही । आकुरें निष्ठुरपणें केली गोकुळात आप्तई ।' –होला ११ [ स आपत्ति ]

**आप्तकाम**—पु संतुष्टता, पूर्ण काम, इच्छापूर्ति 'जशी पुर्ण तदुत्प्रकृति आप्तकामा तशी ।' –केका ३८ [ आप्त+काम ]

**आप्तर**—अप्तर पहा

**आप्तागिरी–ग्या–गीर**— अफतागीर, अबदागीर पहा

**आप्ताफितरती**—स्त्री अस्मानी सुलतानी, दुष्काळ, अतिवृष्टी, परचक्र इ० [ अर आफत+फत्रत ]

**आप्ति**—स्त्री आपत्ति, पाण अप्ती पहा 'त्याचप्रमाणें पीक पाण्याचीही दिवसेंदिवस अधिकच आप्ति पडू लागली ' –धर्माजी ३२ [ स आपत्ति ]

**आप्तोर्याम**—पु अग्निष्टोमादि सप्त सोमसंस्थांपैकीं एक संस्था, सोमयज्ञ [ स ]

**आप्पा**—आपा पहा हें गोपण नाव (बहुमानार्थी) आजच्या प्रमाणें मागच्या काळातहि आढळतें चिमाजी बल्लाळ पेशवे (–पया ८५) चिमणराव सांगलीकर (–पया ४३), जयाजी शिंदे (–पया ३२०) वगैरेंना आप्पा संबोधीत

**आप्पा**—ल्याच्या तद्रून केलेल्या गोड वड्या किंवा गोळे –गृशि ३९०

**आप्पाधप्पा**—अमध्ये पहा

**आप्य**—वि १ पाण्यासारखीं, जलमय २ पाणचट –ज्ञा १८ १० [ स अप्=पाणी ]

**आप्य**—वि मिळण्याजोगें,सपादण्याजोगें 'जयजय देव श्रीगुरो। अकल्पनाप्य कल्पतरो।' –ज्ञा १८ १० [ स आप्=मिळणें ]

**आप्यायन**—न १ पोषण, पुष्टता २ शरीरपोषक द्रव्य, भक्ष्य, आहार, खाद्य, जीवन 'तो व्यान दहींच्या नाडीतें आप्या यन पुरवी ' ३ सुग्रास अन्नाचें सेवन, दुग्धप्राशन ४ अपहार, अभि लाप, पैसा खाणें [ स ]

**आप्रीसूक्त**—न ऋग्वेदातील या नावाचीं सूक्तें हीं दहा असून पशुसवधी प्रयाजयागामध्यें गोत्रपरत्वें याचा विनियोग करतात [ वै ]

**आप्रोस**—पु (गो) नारळाचा अगरस, दूध आपरस पहा

**आप्लविणें**—सक्रि बुडविणें 'तेवीं अन्नम कुळ आवघें । आप्लविजे ॥ ' –ज्ञा १ २५६ [ स आप्लु ]

**आप्लुत**—वि भिजलेला, बुडलेला, सिंचिलेला सामाशब्द आनंदाप्लुत, शोकाप्लुत, स्नेहाप्लुत इ०

**आप्सन**—पु (शाप) एक उत्कर्षे हा वर्णहीन, अत्यंत बाष्प भावी व ज्वालाग्राही आहे [ इ युपिअन ]

**आप्सर**—वि (व) १ मोठा 'कायआप्सरसर्प हा ' २ पाजी, हलकट, अडदांड 'ती घोडी फार आप्सर आहे ' [ स अप+सृ ]

**आप्सुलाद**—वि (गो) स्वतंत्र वृत्तीचा, आपल्या मतानें वागणारा [ आप+सला ]

**आफड**—स्त्री ( कु ) शिवाशिव प्रकार आपड, आपाड पहा [ स आ+स्पृश् ]

**आफडणें**—अक्रि शिवणें, ओंवळें करणें, विटाळणें 'आरती ये आफडू नको '

**आफडूं नयेशी**—वि शिवू नयेशी, विटाळशी [आफडू नये अशी ]•

**आफडी**—स्त्री. ( गो ) विटाळशी स्त्री

**आफत-आफती**—स्त्री १ संकट, आपदा, गोंधळ, दुर्दैव, अड चण, क्लेश, अरिष्ट 'पादशाहीवर आफत पडली ऐसें झालें '–चित्र गुप्त ३५ २ (ल ) दुष्काळ, अनावृष्टि ' रयतेस आफतीच्या वेळीं धान्य आणून पुरविलें '–विश्विस २ ५३ (क्रि० पडणें, येणें, गुदरणें ) ३ तोटा [ अर आफत्, स आपत्ति ] ०अस्मानी-आस्मानी–स्त्री दैवी आपत्ति ( अवर्षण, अतिवृष्टि, टोळधाड वगैरे ), दुष्काळ ' मुलूक जागिरा आहेत त्यात आफत–आस्मानी जाली '–दिमरा १ १०५ ( याच्या उलट ) ०सुलतानी–स्त्री सरकारकडून अगर खास राजाकडून येणारें संकट

**आफताब**—अफताब पहा

**आफरी**—पु १ अव्यवस्थित, बडखोर –शिवदिग्विजय १३८ २ नाखुष –शिवदिग्विजय १५६ [ अर–इफ्राद् किंवा अफ रीत=दैत्य ]

**आफरीन**—पु शाबासकी, स्तुति आफ्रीन पहा [ फा आफ्रीन्=स्तुति ]

**आफळणें**—अक्रि १ आदळणें, खालीं आपटणें 'नातरी उदकाचिये भूमिके। आफळेलि कंदुकें।' –ज्ञा १७ २८० 'खेळत असता सारीपाट। फासे भूमी आफळिले।' –मुविराट ६ १६७ २ (एखाद्या वस्तुवर) जोरानें मारणें, ठोकणें, (काव्य) प्रहार करणें ' भुजदंड आफळी कोधायमान।' –ह ११ ८९ अपळणें पहा [ स आ+स्फल् ]

**आफळणें**—शिरणें आफडणें पहा

**आफावणें**—क्रि बोलावणें, आदरसत्कारानें आमत्रण करणें ( गो ) आपौंगें, आप्वोंगें 'ते वेळीं देवें आफाविले। भीमा दोन्हला सवें मातु।' –शिशु ९२४, 'आगम आफाविले। मूर्त होती॥' –ज्ञा १३ ८३० [ स आहृ ]

**ऑफिस**—न ( अशुद्ध ) हापिस हपीस, कचेरी, फड [ इ ]

**ऑफिसर**—पु ( अशुद्ध ) हापीसर कामगार अधिकारी, अमलदार हुद्देदार [ इ ]

**आफीण-न**—स्त्री अफीण पहा

**आफीयत**—स्त्री दुष्ट गोष्ट [ अर अफाल=कृत्य ]

**आफु**—अफू, अफीण पहा

**आफुडणें**—आफडणें पहा

**आफ्तर**—वि उजाड, बेचिराख, नष्ट [ अर अबतर ]

**आफ्तागीर**—अबदागीर पहा

**आफ्ताबा**—पु पाणी ठेवण्याची प्रवासी झारी [फा आफ् ताबा=पाण्याचें भाडें ]

**आफ्रिदी**—पु काबूल नदीपासून कोहाटपर्यंतच्या प्रांतात राह णारे पठाण [ फा ]

**आफ्रीन**—स्त्री स्तुति, प्रशंसा ' बहुत खुशवक्त होऊन आपल्या तद्बिरेस व जुर्रतेस तहसीन व आफ्रीन फर्मावली ' –पया ४८० ०तहसीन–स्त्री स्तुति, अभिनंदन 'निजामन्मुल्क यानीं स्वहस्तें आफ्रीनतहसीनचा शुक्रा तुम्हांस पाठविला ' –रा ६ ६१७ [ फा आफ्रीन्=भले, शाबास अर तहसीन्=स्तुति ]

**आब**—पु न १ पाणी २ ( ल ) ( तोंडावरील ) पाणी, डौल, तेज, प्रतिष्ठा, अब्रू ' आब राखून सलूख करून निघावें ' –इम२८१ [फा आब्=पाणी, स अप्, म आप] ३ इज्जत, योग्यता, महत्त्व ' त्यात त्याचा बराच आब रहात जाईल '–नि ३७८ ४ पत, ख्याति, लौकिक ( खरपणा, सचोटी, विद्वत्ता, संपत्ति इ० विषयीं ),वजन ' नायकीस आब पडे असें कोणी नव्हतें ' –रा ३ ४१९ ५ दबदबा वर्तणूक, वचक बसण्यासारखें वर्तन किंवा ऐट ( मनुष्याची, धंद्याची किंवा व्यवहाराची ) ६ काळजी ( सामान सुमानाची ), बोज 'आपण पाघरुणाचा आब ठेवावा, पाघरूण आपला आब ठेवील ' ( क्रि० राखणें )

**आब**—पु ( गो ) मेलेला बाप [ आबा ? ]

**आंब**—स्त्री १ हरभऱ्याच्या झाडावर घाटा येण्यापूर्वी राज्या काळच्या वेळीं हरभऱ्याच्या डाळ्यावर फडकें पसरून जें अम्ल दवाबरोबर उत्पन्न होतें तें फडकें पिळून काढतात ती ही पोट दुखी, मोडशी आणि पटकी यावर देतात २ आंबट फळ येणाऱ्या आंब्याची एक जात ३ आंबण्याचा धर्म, शक्ति ( ही शक्ति हवा आणि उष्णता यात आल्याच असते ) 'थंडीच्या दिवसात आंब कमी म्हणून दहीं फार आंबत नाहीं ' ४ आंबटपणा ( गो ) आंबटपदार्थ ( चिंच इ० ) आंबोण, अम्लरस ' जाणपणें न पिएति आंब।' –शिशु ८४ ५ ( गो ) मासळी नसलेली कायाची आमटी, साधें आंबट वरण सार [ स अम्ल ] ०ओर पणें–( गा ) १ दळ भगर मीर काढून घणें २ ( ल ) एखाद्या पदार्थांतील सत्वांश काढून घणें चामडें तेवढें घणें **आंब रंगात घालणें**–( चांभारी ) बाभळीची साल व हिरडा याचा रंग रापून थोडा दिवस झाल्यानंतर त्यात चामडें ठेवणें

**आबई**—स्त्री एक झाड, अबई पहा ' तो पुलींग परमेश्या। जेथ मुळ बांधलें आबइया।' –ऋ ७०

**आबक, आबका**—अ मध्यें पहा

**आवकट**—वि ( गो ) आवट, आवटगर 'आवकट वास येता'

**आंवकटी-फाटी**—स्त्री आंब्याच्या कैऱ्याच्या वाळविलेल्या फोडी, याचा उपयोग चिंचेऐवजीं कालवणात घालण्याकडे करतात, किंवा लागल तेव्हा लोणचें करतात अवस्री पहा

**आवकार**—पु दारु गाळणारा, कलाल [फा आब्कार्=कलाल, मद्यपी]

**आवकारी**—स्त्री १ दारू, अफू वगैरे मादक पदार्थावरील जकात, कर २ दारू वगैरे काढण्याचा धंदा, कलाली धंदा ३ हा शब्द विशेषेकरून मादक पदार्थांच्या खात्याना लावतात त्या खात्या मद्य काढणें, अफू तयार करणें, गांजा तयार करणें, आणि बोजा (बिअर दारू) तयार करणें ४ मादक पदार्थासंबंधीं खातें, उत्पन्न वगैरे (इ) एक्साईज [फा] –वि मादक द्रव्यासंबंधीं, आवकारी खात्याच-विषयीं

**आवखरा-खुरा**—अपखरा पहा –वाड्बावा २ १५४

**आवखाऊ, आवघेण्या-णा**—वि इज्जत, अब्रू घणारा, इज्जत खाऊ [आब+खाणें, घेणें]

**आवगार**—न (व) तूप 'भातावर आवगार वाटल्याशिवाय अन्न शुद्ध होत नाहीं' [स अभिघार]

**आवघात**—पु (गो) अपघात (अप)

**आवटओला-चिवट-ढाण-वर्णी-वेल, आंवटा-ई-टाण, आवटी-ट्या, आंवणें**—अ मध्यें पहा

**आंवटणें**—अकि (कों) आवणें (ताक, कणिक इत्यादि) आवट होणें [आवट]

**आवटाण**—स्त्री (गो) टरफलें काढलेली चिंच

**आवटाव**—आवताव पहा

**आवडणी**—स्त्री नागरणी [आवडणें]

**आवडणें**—अकि (कों) १ झडून, सपाटून काम करणें २ (माणसाळण्यासाठीं) जनावरास पडवणें ३ (कु) (गुरें गावाबाहर नेण्यासाठीं किंवा गावात आणण्यासाठीं) एके ठिकाणीं जमा करणें

**आवडधावड**—वि बेडौल, भोपळसुती ओवडधोवड पहा

**आवण**—स्त्री एक जगली झाड, आमण, याच्या पानास आवट वास येतो

**आवताव**—पुस्त्री तेज, प्रतिष्ठा, अब्रू छाप (अधिकार विद्वत्ता किंवा संपत्ति यामुळें लोकावर पडलेली) 'पुर्नेहि आमची आवताव रक्षण करणार स्वामी समर्थ आहेत' –दिमरा २ १८३ [फा आब्ताब्-तज]

**आवर्ते**—न (कों) १ आवण्यासाठीं ठेवलेली कणिक इ० पदार्थ २ अशा रीतीनें आवलेली कणीक, पीठ [आवणें]

**आवदा**—आपदा पहा 'पुर्वी पाण्याची आवदा चहुकडे। तलाव कोरडे।' –गापो ३९

**आवदागिरी-गीर**—अमध्यें पहा

**आवदाव**—आवताव पहा (क्रि० राखणें, सभाळणें, सोडणें, गमावणें, उडवणें) **आवादावानें**–क्रिवि इभ्रत आणि लौकिक याच्या जोरावर, मान्यतेनें, लौकिकानें, अब्रूनें

**आवदार**—क्रिवि (माण) अगाद, हद्दच **०उचलणें-धरणें**–हलक्या हातानें, अलगत उचलणें, धरणें

**आवधारणें**—अवधारणें पहा

**आवनूस**—पु एक झाड, टेंभुर्णी टेंभुर्णीच्या आतला काळा नार (इ) एबनी [फा]

**आंवर**—अंबर पहा

**आवरु-चा-दार**—अब्रू पहा

**आंवला**—पु (गो) कर्णलोलक, झुल अमला पहा

**आवली-आमली**—स्त्री (गो) १ चिंचेचें झाड व चिंच [स अम्ल हिं इमली] २ आंब्याचें ल्हान झाड ३ (कु) खारातील कैरी [स आम्र, म आंबा]

**आंवले आंवयण, आंवयणी, आवर्विर्णे, आवयारंग, आंवष्टाण-खाण-सुका, आवसूल**—अ मध्यें पहा

**आवहवा**—स्त्री (हिं) (कारी) हवापाणी 'ठिकाणही मातवर नाहीं, परतु आबहवा मात्र कांहीशी बरी' –रा १ ११५ [फा आब्=पाणी+उर्दु हवा]

**आवळ, आवळा**—स्त्री आवाळ, हयगय, हेळसांड हलगर्जीपणा, दुर्लक्ष्य, उपेक्षा 'ज्याची सारखी आवळा चालली आहे' –नि १०६९ (क्रि० होणें, करणें) आवाळ पहा [स अ+पाल्, अ+म बाळगणें]

**आवळागोवळा**—वि सर्वत्र दिशास व्यापून असणारा 'असो चहू देहाविगळा। जन्मकर्मासी निराळा। सकळ आवाळ गावळा। सबाह्य तू।' –दा ५ ६ ५६ २–क्रिवि एकदर [स आ+वलय+गो (दिशा)+वलय]

**आवा**—अवा पहा

**आवा-आवडा-डी**—अमध्यें पहा

**आवांक**—न (गो) रोमण हवक [इ हवक]

**आवाद**—वि १ समृद्ध संपन्न, साधनसामग्रीयुक्त, भरभराटलेलें (शहर, देश, वस्ती, लागवड) 'दिल्लीहून सरजाम आणवून सारें लष्कर आबाद करावें' –भाव १११ २ सुरक्षित, स्वस्थ (प्रांत) 'आपला जागा आबाद ठवितो' –दिमरा २ १५७ ३ सुखासमाधानानें सारा येणारा (प्रदेश) –स्त्री १ समृद्धि, भरभराट, स्वास्थ्य 'ह्याप्रमाणें हे योद्धे निकलेल्या लोकानीं

आबादींत आणलेल्या प्रांताचे एकदम जमीनदार व सुभे बनले ' –इमू २६ २ एखाद्या भरभराटलेल्या शहराच्या किंवा एखाद्या मनुष्यानें वसविलेल्या शहराच्या नावाच्या शेवटीं लावतात जसें– मुर्शिदाबाद, औरंगाबाद, हैदराबाद इ० [ फा आबाद् ]

**आबादान**—वि सुरक्षित आबाद पहा 'वरकड विषय चोरानीं नेला, पेटी मात्र आबादान राहिली ' 'वरकडही जिनस सर्दी न लागे असें आबादान ठेवावे '–मराआ ३५ २ समृद्ध, सधन, भरभराटलेलें ( शहर, लष्कर इ० ) 'सरजामही घेऊन पोहोंचेल, लष्कर आबादान झाल्यावरी पुन्हा गिल्च्याचें पारिपत्य करूं '–भाव १११. [फा आबादान् ]

**आबादानी, आबादी**—स्त्री १ ( दाट वस्ती, लागवड, पिकाऊ जमीन इत्यादींनी युक्त असा ) सुराज्याचा अमल, राज्य 'आबादी जालिया हा प्रांत कोटीचा आहे '–इम २६७ २ शांतता सधनता, विपुलता (देश, प्रांत, वगैरेंची ) 'रयतेची आबादानी होण्यास व रयतेस तगाई देण्यात शर्थी बहुत यत्न करावा ' –ऐस्फुले ५० ३ जमीन महसूल 'आठ वर्षांत आबादी ९१६६॥। वाढली '–विक्षिप्त २ ५३ ४ लागवण, पीक [फा ]

**आबादावांत**—क्रिवि १ लौकिकाच्या, अब्रूच्या जोरावर, आपल्या वचनानें 'फजीती होण्यापेक्षा आबादावात वेळ मारून न्यावी हें चांगलें '–सूर्योदय २२८ २ (ल ) चोरून मारून, लपून छपून 'प्रथम हें सर्व आबादावात चालत होतें '–हास्य वा धर्म २७ [आब+दाब]

**आबादीआबाद**—स्त्री अतिशय भरभराट, जिकडेतिकडे समृद्धि, शांतता [फा ]

**आबाधा**—स्त्री अबाधा (गणित), त्रिकोणाच्या शिरोबिंदूपासून पायावर काढलेला लंब पायाला ( किंवा वाढविलेल्या पायाला ) ज्या बिंदूत मिळाला असेल त्या बिंदूपर्यंत पायाच्या दोन्हीं टोकापासून जीं अंतरें त्यास आबाधा म्हणतात –महमा २० अबधा पहा [स अबधा]

**आबाय-अज्दाद**—पुअव बाप-आजे, बापजादे, पूर्वज 'अन् कदीमुल् अय्याम व आबाय अज्दाद मोक असे '–थाइ सनदा १४० [अर आबा+अज्दाद]

**आबारणें**—अक्रि (ना ) पक्व होऊं लागणें

**आबालवृद्ध**—क्रिवि ल्हानापासून थोरापर्यंत, सर्व, सर्व लोक, जनता [ स आ+बाल+वृद्ध ]

**आबालसुबोध**—वि ल्हान मुलापासून तों जाणत्यापर्यंत सहज कळणारा 'तेणें आबालसुबोधें । वादीवचनिं प्रबंधें । '–ज्ञा १८ १७४२ [ स आ+बाल+सुबोध ]

**आबॉलार**—वि ( गो ) कासावीस [ पोर्तु आबलर ]

**आबाव**—अबाव पहा

**आबाशाई, आबाशी**—अबाशाई पहा

**आबाळ-ळी**—स्त्री १ हेळसांड, हयगय, निगेचा अभाव आबळ पहा 'हा घोडा खाण्यापिण्याचे आबाळीमुळें खंगला, एरव्हीं चांगला आहे २ अन्नवस्त्रादि पदार्थांच्या अभावमूलक विपत्ति, आपत्काल ३ फजीती, दुर्दशा, हाल 'करील आबाळी । माझ्या दाताची बगाळी ॥ '–तुगा ५७७ [अ+चाळगणें, रा अ+पाल्, रा बाळ=सुखांत रहाणें, सिं अबालो=मिस्कीन ] **आबाळणें**–क्रि हयगय करून, दुर्लक्ष्य करून वागविणें, हेळसांड करणें

**आबाळथा**—वि निर्बल, अशक्त [अ+बल ]

**आबिका, आंबी, आंबीण, आंबील, आंबूर, आंबूस, आंबेकरी, आंबेमोहर, आंबेहळद, आंबोण, आंबोशी, आंबोळी**—अ मध्यें पहा

**आबुका**—पु हातानें मारलेला पाण्याचा हपका, आबका, आपका, अपका, अबका अपका पहा ( क्रि० टाकणें, मारणें ) [प्र स अप्=पाणी ]

**आंबुद**—पु मेघ, ढग 'ना तें ओळलें आंबुद । मकरंदाचें । '–शिशु ६१६ [स अम्बु+द प्रत्यय ]

**आंबुला-आंबुली, आंबेली**—अ मध्यें पहा

**आंबुले**—पुअव हुल, आवळे, आमले, आमला पहा 'कुमाराचे आंबुले, कडदोरी । गजपाशीं आणिजे '–शिशु १, १९, ३९ [स आम्र किंवा आमलक ]

**आंबुलेपण**—न नवरेपण अबुलेपण पहा 'निदेलेनि भ्रतारें । जे विये चराचरें । निगेचा विसावलाबुरे आबुलेपणहि । '–अमृ १,२७, [अबुला=नवरा ]

**आबू**—पु एखाद्या माणसाचें ठेवलेलें नाव, अबा, अबू संस्कृत नाटकात हा शब्द थोरल्याच्या भार्येला येतो, तसा मराठींतही येतो –भाअ १८३२ [राजवाडे ] जसें–आबूराव असें प्रख्यात बाबुजी नाईक बारामतीकर याच्या भावास म्हणत

**आबेजावे-जुबे**—अबेदवे पहा

**आबेवार**—अबा मध्यें पहा

**आबेल**—स्त्री ( गु ) दिवसातून फक्त एक वेळ शिजविलेलें अन्न खाण्याची जैन लोकांनी घेतलेली शपथ व्रत

**आबेळ**—पु अर्धा आणा किंवा रुपया (बळ, दुबळ आणि निबळ या शब्दांबरोबर वापरतात )

**आबेल**—स्त्री अवळ, एका जातीची वेल **आबेलें**–न आबेलीचें फळ, केळें

**आबोती**—अ मध्यें पहा

**आबोल-ली**—स्त्री १ पिवळी कोरांटी २ अबई 'उन्हाळ्या मध्यें आबोलीच्या वेला तन्तड फुटून उडतात '–मराठी ५ वें पुस्तक (१८७५) २४३

**आवोलें**—न १ पिवळ्या कोरांटीचें फूल २ अवईचें फूल
**आंबोसा**—अ मध्यें पहा
**आम्झाडणें**—क्रि (गो) लाथानीं बडविणें, मारून जेरीस आणणें [आव+झाडणें ?]
**आव्रस**—अव्वस पहा
**आब्रह्म**—क्रिवि ब्रह्मलोकापर्यंत 'तेवीं आब्रह्म कुळ आवघें। आप्रविजे ॥' -ज्ञा १ २५६
**आब्रह्मस्तंभपर्यंत**—क्रिवि ब्रह्मलोकापासून पृथ्वीपर्यंत (त्यात निरनिराळे १४ लोक-भुवनें येतात) 'आब्रह्मस्तंभपर्यंत। नाना योनि विकारवंत।' -एभा २२ ६१९
**आब्रू-चा-दार**—अ मध्यें पहा
**आभ**—न (वों) १ आकाश, आभाळ २ ढग अभ्र, आभाळ येणें ३ प्रतिबिंब -आगमसार पत्रिका १ २ ३४ (हस्तो) [स अभ्र]
**आभंड, आभांड, आभय, आभर**—अ मध्यें पहा
**आभरण**—न १ दागिना, अलंकार, रत्न, जवाहीर 'मुक्ता फळेंसीं आभरणें। सौभाग्यद्रव्यें कंठाभरणें।' -एरुस्व ६ ८७ २ शोभा, शृंगार मंडन, विभूषण [स]
**आभरणें**—क्रि १ नटणें, शृंगार करणें, अंगावर दागिने घालणें, मंडित करणें २ तृप्त होणें 'आत्मारामीं मन भरलें। स्वात्मसुखें मग आभरलें।' -आभ ४८ [स आ+भृ-भर]
**आभलाख**—(गो) अभिलाष पहा
**आभा**—स्त्री तेज, कांति, प्रभा, प्रकाश, चकाकी सामा शब्द-अंजनाभ, सुवर्णाभ [स आ+भा=प्रकाशणें]
**आभाइणें**—अक्रि बोलणें, भाषण करणें 'तव वैदर्भी आभा इली। मावासिनीतें।' -शिशु १९० [स आ+भाष्=आभाख-क-आभाकि-आभाइ]
**आभार**—पु १ उपकाराची जाणीव, कृतज्ञता, उपकाराचें ओझें मानणें २ भार ओझें 'जळचर जळाचा आभारु धरी।' -ज्ञा ११ ७९ ३ (ल) जबाबदारी, भार, भीड 'प्रसन्न होवोनि म्हणे शंकर। वन शाप न टळे दुर्धर। परि तुझे तपाचा आभार। जाहला मन ॥' -नक्या १ १२ १५७ [स आ+भृ-भार] °भरित-वि (गल्या शतकातील प्रयोग) आभारी अत्यंत ऋणी असलेला, उपकारबद्ध ऋणी °मानणें-कृतज्ञता, उपकार व्यक्त करणें (इ) थँक् ला प्रतिशब्द आभारलेपण-न ऋणी असलेली स्थिति, उपकारबध्दता 'सर्वेश्वर आभारलेपणें।' -विपू ५ २८
**आभारणें**—अक्रि १ आभारी असणें, उपकाराच्या ओझ्यानें 'तेणें उपकारें काय आभारेल। कवी तयातें।' -ज्ञा २ ३७ -सक्रि २ नटविणें आभरण घालणें 'तेव्हां आभारुनीया अति नवऊ। सभा यापरी सिध्द केली।' -कृष्णकौतुक २ २६ (महाराष्ट्र कवि क्रमांक १७) ३ उपकार करणें

**आभारी**—वि ज्याच्यावर उपकाराचें ओझें आहे असा, कृतज्ञ, ऋणी (इ) थँक्फुल ला प्रतिशब्द
**आभाव**—पु उणीव अभाव पहा [स]
**आभाव**—पु (कों) १ तर्क, अटकळ २ अंदेशा, शंका अभाव पहा 'ज्यास अक मोडायासच ठाऊक नाहींत त्यास हिशेबाचें काम म्हणजे म्हणजे मोठा आभाव वाटतो' [स आ+भू-भाव]
**आभावणी**—अभावणी पहा
**आभास**—पु १ भास २ सादृश्य, सारखेपणा, प्रतिकृति, प्रतिबिंब 'का परता केलिया आरिसा। लोपु जाला तथा आभासा।' -ज्ञा १५ ३७८ 'साकार साभास आभास। चौथें जाणिजे निराभास। याहूनि पर तूं परात्पर हंस। तृणावर्त प्राणहरणा।' -ह २० १४५ ३ कल्पना, अंदाज, अटकळ, विचार, ग्रह, समजूत, थोडा विश्वास, थोडा खरेपणा वाटणें 'साडिजे दुजया नामाचा आभासु।' -ज्ञा ६ ४० ४ (तर्क) प्रमाणसादृश्य, बरोबर वाटणारें पण चुकीचें मत, मुद्दा, चुकीची विचारसरणी उत्तराभास, रसाभास, हेत्वाभास भावाभास, पक्षाभास पहा इतर कांहीं सामाशब्द करुणाभास, क्रोधाभास, स्नेहाभास इ० [स आ+भास्=प्रकाशणें]
**आभासणें**—अक्रि भासणें, प्रतिबिंबित होणें 'आभासोनि आविष्करें। देहपणें जें।' -ज्ञा १८ ३२४ 'मिथ्याचि आभासे। निरंतर पाहाता।' -दा ६ ८ ३४
**आभासन**—न भास आभास 'दृश्य मृगजळ आभासन।' -परमा ५ ३३ [स आ+भास्]
**आभाळ**—न आकाश, ढग अभाळ पहा 'जैसी आभाळाची बुथी।' -ज्ञा ६ २५१, -एभा १० ५१४
**आभाळी**—स्त्री मेघपंक्ति -शर [स अभ्रावली]
**आभिचारिक, आभिमुख, आभिशाप**—अ मध्यें पहा
**आभीर**—पु १ गुराखी गवळी, अहीर, गवळी जात अहीर पहा 'हा आभीर गंभीर भूपति असा सोडील ना ते मिठी।' -आक ९ टालेमीच्या भूगोलामध्यें आभीर हें नाव सिंधु नदाच्या मुखाजवळील प्रदेशात रहाणाऱ्या एका जातीचें म्हणून दिलेलें आहे ही जात ब्राह्मण पुरुष व अंबष्ठ स्त्री यांपासून झालेली मानतात २ एक प्राचीन राष्ट्र -ज्ञाको (आ) १९३ पहा [स]
**आभु**—पु ब्रह्म 'तुच्छ्येनाभ्वपिहितं यदासीत्।' -ऋग् १० १२९ ३ 'आभु (ब्रह्म) व त्याला आच्छादणारी माया (तुच्छ) हीं दोन्हीं पहिल्यापासूनच आहेत' -गीर २५३ [स आभु=व्यापणारें]
**आमुग्न (वक्ष स्थळ)**—न (नृत्य) नृत्यास उभें असतां शरीराचा तोल थोडा मागें गेला असतां खांदे किंचित् पुढें येतात, पाठ वर येते व उर आत जातो ही स्थिति गोंधळलेली चिंता विषादयुक्त मन स्थिति दाखविणें झाल्यास हा अभिनय करणें

**आभेळ**—न (कों) आभाळ, ढग, आकाश [अभाळ पहा]

**आभोग**—पु (संगीत) १ चिजेचा शेवटचा भाग, रागाच्या स्वराची परिपूर्णता यात होते याला दोन तुक (भाग) असतात परंतु अस्ताई व अंत्रा याना प्रत्येकी एकच तुक असतो २ (कुनबी–खेड्यातील) सुमारें पंचवीस हात चौफेर प्रदेश –कुणबीचेंड्र ११ [स आ+भुज्–भोग]

**आभ्यंतर**—वि आतील, अतर्गत अभ्यंतर पहा ०प्रयत्न–पु (संगीत) गाताना प्रत्यक्ष शब्दोच्चार किंवा स्वरोच्चारण (बाह्य प्रयत्न) करावयाच्या अगोदर गवई कंठ अगर फुफ्फुसें फुगवून साफ करतो ती क्रिया, आभ्यंतरप्रयत्नाचे चार भाग आहेत–स्पृष्ट ईषत्स्पृष्ट, विवृत, संवृत बाह्यप्रयत्नाचे ११ प्रकार आहेत–विवार, संवार, श्वास, नाद घोष, अघोष, अल्पप्राण, महाप्राण, उदात्त, अनुदात्त, स्वरित [स आ+अभि+अंतर्]

**आम**–वि १ अर्धवट कच्चें, अर्धवट शिजलेलें (उ० आमान्न) २ कच्चें, हिरवें, न पिकलेलें [स] –पु १ आंव, आमांश, खाल्लेलें अन्न चांगलें पचन न झाल्यामुळें क्रमानें थोडा थोडा साठत जाणारा जो अनरस त्याला आम असें म्हणतात हा मस्तक व सर्व शरीर यामध्यें पीडा उत्पन्न करतो २ (शाप) अर्धपक्व अन्न, आमरस (६) चाईम

**आम**—आंबा. [स आम्र]

**आम**—वि सार्वजनिक सामान्य, सरसकट 'हा आमरस्ता नाहीं' दीवाण इ आम, जल्सा इ आम, इ० [अर आम्म=सामान्य] ०खास–क्रिवि सर्रास 'सदर्हूप्रमाणें धारण छ २५ रजबीं आमखास बाजारात जाली' –रा ७ १४७ –पु दरबार, लोकसभेचा दिवाणखाना 'तैसेच आमखासमध्यें कुल्लवजीर मुस्तेद करून उभे केले' –सभासद ३८ [अर आम्म+उर्दू खास्स=सामान्य] ०दार–पु (अर्वाचीन) प्रांतिक कायदेमंडळाचा सभासद, एम् एल् सी, वरिष्ठ कायदेमंडळाच्या सभासदाला खासदार म्हणतात

**आमकाठी**—आवकाठी पहा

**आमगूळ**—वि आवट–गोड, आंबुस, मधुराम्ल [स अम्ल+गुड]

**आमचा–ची–चें**—आम्ही या सर्वनामाचें षष्ठीचें रूप

**आमचेपणा**—पु आपलेपणा 'त्यात आमचेपणा नाहीं निव्वा

**आमच्याइथें, आमच्याइथली माणसें, आमच्या–घरात**—नवऱ्याबद्दल (नाव घ्यावयाचें नसतें म्हणून) बहुमानानें असा वाक्प्रचार योजितात 'आमच्या इथें रात्रदिवस काळजी लागली आहे' –मोर १४ आमच्या घरात देखील स्वभाव असाच पैशाचा लोभी' –विवि ८ ३ ९ 'अभिमानानं मिरवावया सारखी आमच्या इथली माणस होण्याइतक पाणी स्वार्थाच्या जवळ नव्हतं!' –पुपचूप (रसिकरंजनमाला)

**आमटी**—भवटी पहा

**आमटूक**—क्रिवि (व) अदाजानें 'ज्वारी कशास मोजतोस, आमटूकच दे म्हणजे झालें' [स अ+मन्–मतु]

**आमडी**—भवाणी पहा 'कुणास न मिळे भाजी कुणि राजी करडी मिळो आमडी जुनी।' –राला १०८

**आमण**—न (कों) चाकात घातलेलें लोखडाचें पचपानें ठोकतात तें, आवण यात आस फिरतो, [स अक्ष–आस+वत्–वण ?]

**आमण**—स्त्री (कों) एक जगली वृक्ष, आवण

**आमंत्रण**—न १ निमंत्रण, बोलावणें, पाचारण, आवतण, आव्हान (क्रि० करणें, देणें) २ आमंत्रणाला निघालेली मडळी [स आ+मन्त्र्] ०पत्रिका–स्त्री बोलावणें करण्याचें पत्र, कुंकुमपत्रिका, लग्नचिठ्ठी इ०

**आमंत्रणें**—उक्रि (काव्य) १ बोलावणें २ आमंत्रण देणें, आवतणें

**आमंत्रणा**—वि १ (जेवावयास) बोलावणें करणारा नोकर बोलावणेंकरी २ आमंत्रणास जाणारा, अक्षत घेऊन जाणारा (यजमान, आप्त वगैरे)

**आमंत्रित**—वि ज्याला आमंत्रण, बोलावणें केलें आहे असा, निमंत्रित

**आमद**—स्त्री उत्पन्न, आवक 'दौलत आहे तेथें आमदही आहे व खिसाराही आहे' –रा १० १६६ 'पैशाची आमद राहणार नाहीं' –ख ७ ३५७५ [फा आमद्]

**आमदन**—न येणें, आगमन 'आ अमारत्पन्हाचें आमदन या जिल्ह्यास जलदीनें होय तें करावें' –पया ३९४ [फा आमदन]

**आमदनी, आमदानी**—अमद(दा)नी पहा

**आमद्रफ्त, आमद्रफ्ती**—स्त्री १ ये जा, रहदारी, दळणवळण 'हजारों मनुष्याची आमद्रफ्त, त्यात असा चोरून जो यणार तो कोणे स्वरूपानें व कशा येतो हें कशावरून समजावें' –रा ७ १३५ २ व्यापारी मालाची ने आण व त्यावरील जकात 'मुलखा आमद्रफ्त होऊ देत नाहींत –रा ३ ८८ 'मार्गी येता जाता आमद्रफ्तीचा उपसर्ग न लावणें' –रा १५ २३० ३ रहदारीची परवानगी, मुभा मोकळीक 'तो किल्ला घेतला म्हणजे दर्यातून जहाजें येण्यास आमद्रफ्ती जाली' –ख ८ ४३५४ [फा आमद्=येणें+रफ्त=जाणें]

**आमना**—स्त्री (व) १ कामना, इच्छा, मनीषा, हेतु 'त्याबाबतींत तुमची काय आमना आहे' २ अदाज, तर्क [स आ+मन]

**आमनासामना, आमनेसामने**—क्रिवि (हिं) समोरासमोर, तोंडास तोंड देऊन (झालेल्या गोष्टी, भाडण), समक्ष [सामना हिं, सिं आमो+साम्हों]

**आमनेर**—स्त्री (व) ज्वारीची एक जात वऱ्हाडातील आमनेर या गावावरून नाव पडलें असावें

**आमपाचन**—वि हगवण, आव वगैरे नाहींगें करणारें, (औषध), आमाशावर उतारा —न हगवण, अमाश या विकारा पासून होणारी मुक्तता [स आम+पच्]

**आमय**—पु. रोग, व्याधि, दुखणें, आजार, विकृति [स]

**आमरण, आमरणांत**—क्रिवि मृत्यु येईपर्यंत, मरेपर्यंत [स आ+मरण+अन्त]

**आमरवेल**— अमरवेल पहा

**आमरस**—पु पिकलेल्या आंब्याचा पिळून काढलेला रस आंबरस [स आम्र+रस]

**आमराई**—स्त्री आंब्याच्या झाडांची बाग, वन, अमराई [स आम्र+राजी]

**आमल**—पु कैफ, अमल पहा 'इक्या दोदस्याचा आमल सऊनि।' —दावि ४५२

**आमलक**—पु आवळ्याचें झाड व फळ 'तुरट वाटे आम एक परि पुढें गोडी दिसे अधिक।' [स] —की-स्त्री १ आवळी, आवळ्याचें झाड २ आवळकाठी [स] **आमलक्यादि चूर्ण**—न आवळकाठी, चित्रकमूळ, हिरडेदळ, पिंपळी व सैंधव याचें चूर्ण हें सर्व ज्वराचा नाश करतें हें भेदक, रुचिकर, कफनाशक, अग्निदीपक व पाचक आहे —योगर १ ६६९

**आमला**—पु कारकून, अमलदार अमला पहा

**आमली**—स्त्री (भिन्न) इम्ली, चिंच (अव) आमल्या [स अम्लिका, हिं इम्ली]

**आमली**—स्त्री (गो) कैरी, आंबली [स आम्र+ल=लघुत्व प्रत्यय]

**आमलेखामले**—पु अव (वायकी) मंगळागौरीच्या पूजे साठीं देवीच्या चार बाजूस केळीचे चार खांब बसवितात ते [स स्तंभ—खांब—खांबले द्वि]

**आमवात-वायु**—पु संधिवात एकदम कुपित झालेले आम व वात हे दोष माकडहाड व सांधे यामध्यें शिरून सर्वांग ताठवि तात तो विकार लक्षणें—आग मोडून येणें अरुचि, तहान, आळस, जडपणा, अन्नपचन न होणें, हातपाय वगैरे अवयवांना सूज येणें वगैरे —योर २१ २३

**आमविकार-विकृति**—पुस्त्री आमाशापासून होणारा रोग, आतड्यासंबधी होणारा रोग [स]

**आमशूल**—पु आमाशाच्या संचयामुळें जो पोटशूळ जडतो तो, वातजन्य पोटदुखी

**आमसाण-सूल-सोल**—अमसुल पहा

**आमा**—पु स्तन, अमा पहा 'हे तात काय जेवें न बहु मता दे मुरात आमा जी।' —मोसी ४४९ इतर अर्थी अमा पहा

**आमाक**—क्रिवि (व) अंमळ, घटकाभर, थोडावेळपर्यंत [वि अमक्, स अम्=थोडें, त्वरेर]

**आमाडा-डी**—पु (कु) केसाचा आंबाडा अंबाडा पहा

**आमातिसार**—पु आंव हगवण, अतिसार, संग्रहणी [स आम+अतिसार]

**आमात्य**—अमात्य पहा

**आमानी**— अमानी पहा

**आमान्न**—न शिधा, सिधा, कच्चें अन्न, विन शिजविलेलें ब्राह्मणांना वगैरे देतात तें 'ब्राह्मणास संकल्पपूर्वक दक्षिणेसहित आमान्न देतात' [स आम=कच्चें+अन्न सं आमान्य]

**आमाभामर**—वि (गो) जीव की प्राण असा, अत्यंत प्रिय (वस्तु)

**आमाला**—वि चोहोंकडून मारा करणारा 'दानवलेभा देवाचा आमाला। दापितेभा देवाचा जगदला।' —शिशु १५८ [स आ=आसमतात्+मारक—प्रा आमालअ—आमाला=चारी बाजूचा मारा?]

**आमांश**—पु १ अपक्व अन्नाचा अंश, आंतड्यात अगर पोटात पचन न होऊन राहिलेलें अन्न २ त्यामुळें आतड्यासंबधी झालेले विकार हगवण, आव इ [स आम=अपक्व—पचन न झालेला+अंश]

**आमाशय**—पु ज्यात आम सांचतो तो पोटातील भाग, पक्वाशय कोठा, पोट [स आम+आशय]

**आमाशिक-सिक**—वि (ना) अमळसा, जरा, थोडा, अमासा पहा

**आमासा**—अमासा पहा

**आमिष**—न १ मांस, भक्ष्य २ प्रलोभन लालुच, लाच बक्षीस, मधाचें बोट 'जयासि भुकेलिया आमिषा।' —ज्ञा ३ २४६ ३ माशास पकडण्याकरिता गळास लावलेली उंडी वगैरे खाद्य पदार्थ 'जैसा गळीं मीनु आमिषें। भुलविजे गा।' —ज्ञा ३ २१३ —एभा ३ ७९८ ४ (ल) बुद्धिबळांच्या खेळात प्रतिपक्षावर आपल्या मोहऱ्यांचा मारा जारानें चालावा म्हणून पुढें दिलेलें मोहरें किंवा प्यादें (इं) गँबिट ५ (ल) मोहक पदार्थ—स्त्री धन, इ० [स]

**आमिक्षा**—स्त्री (वै) कढत दुधात दहीं घालून होणारा पदार्थ [स]

**आमीं**—क्रिवि (भिल्ली) आतां 'आमीं इ चोटी पाठवेया विगर मान सुटकोज नाह्या।' [?]

**आमीग**—पु (गो) मित्र दोस्त [पोर्तु आमीगु]

**आमीन**—उद्गा (हि) तथास्तु [अर आमीन इ आमेन]

**आमील**—अमील पहा

**आमुडणें**—उक्रि ( गो ) हाकलणें, हाकून लावणें 'त्या कावळ्याक आमुड' [ स आ+मुच् ]

**आमुतें**—सना ( काव्य ) आम्हास, आम्हाला, आम्हाकारणें 'आमुतें जिंतिलें फुडे। नेणों केवीं।' –शिशु ७२९ [स अस्मद्]

**आमुला**—वि सर्वतिरहित, स्वत चें मूल्याळ नाहीं असा 'ते आमुला हे आमुली। यया संगति नाहीं देखली। परि सकळ कुळ वाडी जविली। ययाचि दोघीं।'–स्वादि ११ ३ ३० [ अ+मूल ]

**आमुष्मिक**—वि दुसऱ्या जगांतील, पारलौकिक [ स अदसची षष्ठी, अमुष्य यापासून आमुष्मिक ]

**आमूलचूड**—क्रिवि मुळापासून शेवटपर्यंत, आरंभापासून अखेरपर्यंत [ स आ+मूल+चूडा ]

**आमेज**—पु मेळ, मिश्रण अमेज पहा 'मुंबईची भाषा शुद्ध मराठी नव्हे, काहीं आंत गुजराथी भाषेचा आमेज आहे' [ फा ]

**आमेट**—स्त्री ( गो ) ( खेळांत ) तहकुबी

**आमेद**—स्त्री ( व ) १ आमदानी, उत्पन्न, आमद अम दानी पहा

**आमेन**—उद्गा (खि )तथास्तु, आमीन पहा 'पाद्रीसाहेब जें जें सांगतील त्यास आमेन् या एकया पदानेंच उत्तर करावयाचें हीच का धर्मनिष्ठा' –नि ८७६ 'तेव्हा सर्व लोकांनीं आमेन म्हणावें' –अनु २७ १५ –वि १ स्थिर –प्रक ३ १४ २ सत्य, बायबलमध्यें ख्रिस्ताच्या प्रवचनांत या शब्दाचें भाषांतर सत्य, सत्य ( व्हेरिली, व्हेरिली) असें केलें आहे –पु १ येशुख्रिस्ताचें एक नाव २ समति, समाप्ति दर्शक शब्द –गाण ५ २२ –नेह ५ १३ –स्तोस १०६ ४८ [ हिब्रू ग्री लॅ इ आमेन, अर आमीन ]

**आमोट**—सना ( गोंड ) आम्ही

**आमोण**—अवोण पहा

**आमोद**—पु १ सुगंध, सुवास 'कृष्णमुखकमळ सुंदर। जन नयन तेचि भ्रमर। तेथेंचि गुंतले साचार। कृष्णआमोद राभावें।' –एरुस्व ६ १८ २ आनंद, सुख [ स ]

**आमोदित**—वि १ सुगंधित, सुवासिक २ सुखी, आनंदी [ स ]

**आमोरी**—स्त्री (गो )(ख्रिस्ती लोकांत)दिवे लावण्याची वेळ, तिन्हीसांज 'आता आमोरी जाली, चल तू घरा' [ पोर्तु ऑव्हि मेरिया किंवा मारीय हें तिन्हीसांजा म्हणावयाचें स्तोत्र ]

**आमोला**—चोहोंकडून मारा आमाला पहा 'आमोलेयाचेआ दळभीडा। पुरता हातियेरु वेंचा तेट्वडा।' –शिशु ८८० 'आमोलें उसामिनाती रणीं। कनार वेर्‍हीं।' –शिशु १०४६ –लेपण–न मारण्याची बुद्धी, शौर्य 'भीडला समरंगणीं आमोलें पणें।' –शिशु ९७९

**आम्ना**—स्त्री ( व ) इच्छा, आमना पहा 'आता लोकाची कापूस विकावयाची आम्ना आहे' [स आ+मन् ]

**आम्नाय**—पु वेद, श्रुति 'सुकृत कीजे पुसता। आम्नायातें।' –ज्ञा १८ २४३ 'तुजसम आम्नाय बोल्का नाहीं।' –मोभादि १.३ [ स ]

**आम्र**—पु आंब्याचें झाड, फळ, आंबा [स] ०पल्लव–पु १ आंब्याची डहाळी ही शुभ व अशुभ अशा दोन्ही प्रसंगीं वापर तात २ ( ल ) चांगल्या वाईट प्रसंगीं पुढें होणारा, विवेकशून्य, हलकट माणूस

**आम्ल**—न आंबट, आंबटपणा अम्ल पहा. 'का चुनिया हूनि दासट। आम्लीं हन।' –ज्ञा १७ १३९

**आम्लपित्त**—अम्ल पहा

**आम्लवेतस्**—न १ महाळुंगाप्रमाणें ही एक लिंबाची जात आहे ही फार आंबट असते, इतकी कीं फळांत पोलादी सुई टोंचून ठेवली तर विरघळते म्हणतात हीं फळें काशीकडे फार होतात, (व) सुकें लिंबु २ चुका, आंबट भाजी [ स ]

**आम्ही**—सना प्रथमपुरुषी मीचें अव बहुमानार्थी एकवचनी अर्थानेंहि वापरतात राजे, सरदार, मोठे लोक, संपादक, अधिकारी इ० आपल्याबद्दल बोलताना आम्ही शब्द वापरतात आपण पहा 'आम्ही कोण म्हणून काय पुससी? आम्ही असु लाडके। देवाचे' –केक ( आम्ही कोण ) म्ह० १ (व ) आम्ही तुम्ही भाऊ भाऊ तुमचे पोहे आमचा कोंडा मिळून मिसळून फुकून फुकून खाऊ २ आम्ही तुम्ही भाऊ आमच्या कठाळ्यास हात नका लावू ३ आम्ही खावें आम्ही प्यावें जमाखर्च तुमच्या नावें या सर्व म्हणी आपल पोट्या, मतलबी माणसास लावितात [स अस्मद्, अहं, प्रा अम्हे, त्सीगन आमेन किंवा आमे, मेंच–जिप्सी अमिन, खान आमु–आम्हू, गोंडी अमात, उरिया अम्हे, हळेका आम, व आमी, राजस्ता हम्, म्हे, गु अमे, हिं हम्, प असीम, नेपा हामी, काश्मिरी असि ]

**आय**—पु १ नफा, फायदा, मिळकत, उत्पन्न, आदा याच्या उलट व्यय २ ( ज्यो ) कुंडलींतील ११ वें स्थान, आयस्थान ३ अलुतें, बलुतें, उत्पन्नांतील गांव कामगाराचा हक अलुतीबलुती पहा [ स आ+इ=जाणें ]

**आय**—स्त्री ( कु ) आई अई, आई पहा

**आय**—न लोखंड [ स अयस् ]

**आय**—पु. १ आटोका, आटोप 'हे आदिपुरुषाची माया। ब्रह्मेयाही नयेचि आया।' –ज्ञा १ ००३ २ अस्तित्व –सोहि रोबा अद्वयानंद २ –धार ३ आकार, स्वरूप 'ते म्हणती भला भला रे नेणका। वरवी आणिली आया रूपपीठिका।' –एभा १ १७९ घर वगैरे बांधण्याकरता जी जागा ठरविली तिच्या लांबी रुंदीच्या गुणाकारास आठानें भागून जी बाकी राहील ती हे आय

आठ आहेत —ध्वज, धूम, सिंह, श्वान, वृषभ, खर, कुंजर व ध्वांक्ष घर बांधण्यास विषम स्थानाचे आय शुभ व समस्थानचे अशुभ समजतात, लांबीस रुंदीनें गुणून (आठांनीं भागून) शेषांक जो राहील तो —शिवदिग्वि ४१६ 'सभा रचिजे तें वेळीं। आठही आय साधलेल्या स्थळीं। अष्टदिग्पाळ महाबळी। पायाचे मूळीं स्थापिले।' —ह ३४ ११० 'मटीं तरी चोपडें। आयें दिसे।' —ज्ञा १३ ८९७ **आया येणें**—सक्रि १ समजणें, आकलन होणें 'कीं शिव ब्रह्मादिकां न येसी आया।' —ह २३ १५३ 'जा देवादिकां नये आया।' —दावि १५१ २ प्रत्ययास येणें 'तें मिथ्या वैसेनि ये आया।' —रयो १ ११२६ ३ स्वाधीन होणें, ताब्यांत येणें, आटोक्यात येणें 'ब्रह्मादिकां नयेचि आया। तेव याया देहबुध्दी।' —एरुस्व १३ ५० आय पहा ४ शरण येणें, पराभव होणें, जेरीस येणें, नरम येणें —रा ३५३८ —पया १९४ 'सरकारी दाबदडपा लागला तेव्हां तो आयास आला' ५ आकारास येणें, अस्तित्व असणें 'ब्रह्मावेगळी माया। सर्वथा नये आया।' —एभा २४ ४७७ 'तेथें काशीपुरी जावया। तीन मार्ग योजिले सविया। कोण कोण ते आया। आणिजती।' स्वादि १० ४ ५८ [स आ+यम् =पसरणें]

**आयआय**—उद्गा अंगात एखादी आकस्मिक वेदना उत्पन्न झाली असतां किंवा कांहीं दुःख झालें असतां एकदम उद्गार निघतो तो, अयोयो [म अयि]

**आयकणें, आयकमट्टी, आयकीव**—ऐकणें पहा

**आयकरी**—पु (व) गावांतील बरटी, न्हावी, सुतार वगैरे कामदार बलुतेदार यांना कामाबद्दल धान्यरूपानें मजुरी द्यावयाची असते [आय+करी]

**आयकविणें**—ऐकविणें पहा

**आयचन**—स्त्री (व) अडगळ, कचरा 'आयचनात जाऊ नकोस, तेथें विंचू-कांट्याचें भय असतें' [अडचण]

**आयचो**—वि (गो) आजचा [स अद्य, म आज]

**आयंडा**—पु (कों गो) १ भात झोडण्याच्या वेळीं एका वेळीं जेवढी भाताची पेंढी हातांत घेतात तीस म्हणतात, पेंढी, लाळा, भाताचा भारा वडवल्यानंतर दुसते काढाच्या भाऱ्यास पेंढा, पेंढका, पेंढकें, आयंड्याची पेंढी ६० म्हणतात २ भातेण्याचा-झोडलेल्या भाताचा-भारा ३ वरील पेंढीस बांधावयाची दोरी [स आ+यम्]

**आयडोफार्म**—अदभुत्तिक पहा

**आयणा**—पु (गो) पक्षा विंचणा [पोर्तु निप्सी आइरण स व्यजन, म विंचणा]

**आयणी**—स्त्री १ इच्छा हेतु वासना 'तुका म्हणे मन तुमचे चरणीं। एवढी आयणी पुरवावी।' —तुगा १६१९ —निगा २२९ २ मत ३ मन, बुद्धि 'हे सद्गुरूची विनवणी। कीं ब्रह्मसुखाची राणी। परिसता सप्रेम बोलणी। रिझवी आयणी सज्जनाची।' —एभा ८ २३ ४ चांगली चाल —मनको ५ सामर्थ्य —मनको ६ मार्मिक, ओठ 'तैसी देशी आणि संस्कृत वाणी। एका भाषार्थांच्या सुखासनीं। शोभती आयणी। चोखट आइका।' —ज्ञा १० ४५ ७ चातुर्य, युक्ति 'नातरी जाणिवेच्या आयणी। करितां दधिकडसणी। मग नवनीत निर्वाणीं। दिसे जगें।' —ज्ञा २ १२९ ८ अभिमान, गर्व 'तो (दोष) ही बोलिकेपणें आयणी। बोलका रसना गेली चिरूनि।' —स्वादि १ २ २१ (आइणी, आयनी, ऐणी अशीं इतर रूपें) [स आ+या, आयान]

**आयणी**—स्त्री म्हण, आह्णा

**आयत**—वि लांब, विस्तृत, मोठें लांबट 'पैं कमळायत डोळसा।' —ज्ञा ११ ६९ —पु (गणित) ज्या चौकोनाचे सर्व कोन काटकोन असतात परंतु बाजू असमान असतात त्याला आयत म्हणतात —मदमा ८ (६) रेक्टँगल —न (नृत्य) स्त्रियांनीं उभे राहण्याचें स्थान, डावा पाय सरळ व स्वाभाविक स्थितींत ठेवणें व उजवा पाय एकताल अंतरावर किंचित् तिरकस ठेवणें, मुख प्रसन्न, उर सम व उन्नत, हात निरंतराच्या बाजूस ठेवणें, रागाचा अभिनय, गंभीरपणा, शृंगारभाव दाखविणें, वगैरे वेळीं या स्थानानें उभें राहणें [स आ=यम् =पसरणें]

**आयत**—स्त्री कुराणातील ईश्वराचें वाक्य 'ईश्वराचें वाक्य कुराणशरीफच्या ग्रंथांत असतें त्यास आयत असें म्हणतात' —वाड —सनदा २३ [अर आयत्]

**आयतन**—न जागा, स्थळ, राहण्याचें घर, वसतिस्थान देऊळ, अग्निकुंड परी सतकृपेसि मी आयतन —एभा ५ ७४ सामा शब्द—भोगायतन=भोग भोगण्याचें स्थान, शरीर मूलायतन=उगम, मूळ, उत्पत्तिस्थान [स]

**आयता**—पु (कों ना) तांदुळाच्या पिठाचें आंबोळीसारखें एक खाद्य, घिरडें यांचें पीठ आंबवीत नाहींत हें आयत्या वेळीं करतां येतें आइता पहा [स अयत्नत किंवा आयत]

**आयता**—क्रिवि १ प्रयत्न केल्यावाचून, श्रम केल्यावाचून, दगदग काढल्यावांचून न करतां हाताशीं सज्ज तयार श्रम न करतां, चालून येणारें 'हा दागिना मीं करविला नाहीं मला आयता मिळाला' 'पानी असाचि मजला गंगास्तन आयती सु-धारा हो।' —मोभीष्म १२ १२ [स आयत्त=चालून आलेलें किंवा अयत्नत] २ बोलावल्याशिवाय, आपण कारण झाल्याशिवाय आपल्या संमतीशिवाय (येणें प्राप्त होणें, घडणें—माणूस, प्रसंग, इष्ट गोष्ट) —वि प्राप्त झालेला आलेला, सध्यां हजर चालत असलेला (काळाविषयीं) लग्नाचें साहित्य आधीं करून ठेवा म्हणजे आयत्यावेळीं खोळंबा होणार नाहीं' म्ह० १ आयत्या पिठावर रेघा ओढणें, गुल्का मारणें=दुसऱ्यानें मिळविलेल्या किंवा आयत्या मिळालेल्या संपत्तीवर चैन करणें, दिवाळी

करणें याच अर्थानी दुसरी म्हण—आयत्या बिळीं नागोबा वळी २ आयत्यावर कोयता=अगदीं तुटायला झालेल्या लाकडावर कोरा त्याचा एक घाव मारून सर्व लाकूड तोडल्याचें श्रेय आपण घेणें, (ख) एखादें भांडण अगदीं मिटावयास आलें असता मध्यें पडून तें मिटविल्याचें श्रेय आपण मिळविणें या अर्थी, किंवा दुसऱ्याच्या द्रव्यावर चैन करणें या अर्थी ही म्हण योजितात ३ आयत्यावर रायतें करणें=हातांशीं असेल त्यांतून खर्च करणें **आयत्यावेळीं** –ऐन प्रसंगीं, नडीच्या वेळेस

**आयतामूल**—पु एखाद्या विधवेचा पाट लावण्यापूर्वीचा मुलगा, आयतोळा

**आयतार**—(गो) आदितवार, रविवार [स आदित्यवार]

**आयतालें**—न लागणाऱ्या वस्तूची किंवा पदार्थांची तयारी 'माझ्या घरीं आयतालें आहे' [आयता]

**आयती**—स्त्री १ स्वयंपाकासाठीं (निवडून धुवून, दळून, ठेविलेलें डाळ, तांदूळ पीठ इ०) साहित्य, सिद्धता, तयारी 'पहा हो समाराधनेची आयती। पेढनि आला अतिभक्ति।' –गुच ३८ १५ २ विस्तार, थाट 'गंभीर वाचा ते आयती। गर्जनेची॥' –ज्ञा २ ७८ ३ सहज, आयता याचें स्त्रीलिंग, आयता पहा 'ना ते अखंडचि आयती। परि सगे भिन्न गमली होती। ते सारिखिया मागौती। जैसी का तैसी।' –ज्ञा ८ ४४ ०**वेळ**–स्त्री १ जेवण वगैरेच्या तयारीची वेळ, ऐन कामाची, घाईची, जरूरीची वेळ २ मळणीची किंवा पेरणीची घात, वेळ, हंगाम [आयता]

**आयती बायको**—स्त्री न्हातीधुती स्त्री, वाढलेली मोठी बायको

**आयतें**—१ धिरडें आयता (प्रकार) पहा 'आई मला ज्वारीचीं आयतीं करून घाल' २ आयती अर्थ १ पहा ३ (गो) आमटींत टाकण्यासाठीं तयार केलेला कच्चा मसाला ४ इतर अर्थांकरितां आयता पहा

**आयतेंकार**—पु (गो) स्वयंपाकाची पूर्व तयारी करणारा

**आयतें सुयतें**—न एखाद्या कामास लागणारीं हत्यारेंपात्यारें, साधन, सरंजाम, साधनसामग्री [आयतें द्वि]

**आयतोजी, आयतगब्बू आयतमार–ऱ्या, आयतोबा**—पु आयत खाऊ काहीं श्रम न करता दुसऱ्याचें खाणारा, जेवणाच्या ऐन वेळीं येणारा, श्रम करण्याच्या वेळीं दूर राहून फल प्राप्तीच्या वेळीं हजर होणाऱ्या माणसास हा शब्द लावतात म्हण १ आयत गब्बू आणि पैसा दब्बू २ आयतमार आणि खायाला तय्यार ३ आयतमाऱ्या आणि ताट शृंगाऱ्या [आयता]

**आयतोळा**—वि १ श्रम न करता मिळालेला, सापडलेला, आयता २ (थट्टेनें) पाट लावलेल्या विधवेचें पहिल्या घरचें मूल (हें दुसऱ्या नवऱ्यास आयतेंच मिळालें असतें म्हणून) [आयता]

**आयतोळा**—पु कुणबी बायकांच्या गळ्यातील एक दागिना

**आयतोळा**—वस्त्राचा एक प्रकार –कृषि ३६२

**आयत्त**—वि स्वाधीन, आधीन, अवलंबून असणारा, अनुयायी, अनुगामी, हाताखालचा [सं] ०**कंठ**–वि (संगीत) ज्याचा गळा, आवाज स्वाधीन आहे असा (मनुष्य) ०**कंठत्व**–न (संगीत) आवाज ताब्यात असणें

**आयदण–न, आयदाण–न**—न (राजा गो) वाखूच्या बारीक पट्ट्याची विणलेली पाटी, टोपली, गोण, भांडें 'आयदाण साटकर (लवकर) घास २ कोंबड्याच्या डोक्यावरील तुरा' [स आयतन]

**आयंदा**—आइंदा पहा

**आयदी**—अयदी पहा

**आयनक–आयना**—अ मध्यें पहा

**आयनरणें–आयनेरणें**—अक्रि आई गरोदर झाली असता तिचें दूध प्यायल्यामुळें आर्जारी होणें, आयनेऱ्याचा रोग होणें, अवयणणें पहा [आई+न्हारें=निराळें]

**आयनी**—आयणी पहा

**आयनी**—वि १ लोखंडी, लोखंडाचा 'आयनी गोळे साप डले' –रा ४ १०८८ [फा आह्नीन् = लोखंडी, तुल० स अयस्=लोखंड, इ आयर्न]

**आयनेरें**—न आईचे अंगावर पिणें तुटण्यामुळें मुलास होणारी विकृति, आई गरोदर असता तिचें अयोग्य दूध प्यायल्यामुळें मुलास होणारी विकृति (गरोदरपणीं आईचें दूध चांगलें नव्हे म्हणून मुलाना यावेळीं तोडतात) [आई+न्यारा]

**आयपत**—ऐपत पहा

**आयपाय**—पु अव (गो) आईबाप [आई + पोर्तु पाय=बाप] ०**चेरकाढणें**–(गो) आईबापावरून शिव्या देणें, उद्धार करणें

**आयपूत**—पु (राजा) दत्तक घेतलेला मुलगा [आयता+पुत्र किंवा स आदा, प्रा आया=स्वीकार+पुत]

**आयब**—अयब पहा

**आयंबें**—कुत्र्याची छत्री, अळंबें पहा

**आयराणी**—स्त्री हडळ, जखीण, जाखाई–जोखाई या सारखी एक क्षुद्र देवता हिला मायराणी असेंहि म्हणतात [वै स अरण्यानी =वनदेवता किंवा आय=आई+राणी ?] ०**मायराणी**–(विनोद उप) नखरेल, नखरा करणारी स्त्री

**आयल**—अयाळ पहा

**आयलड–डी**—क्रिवि (कु) अल्याड, अलीकडची बाजू 'आयलडी ये' [अल्याड]

**आयलें**—वि (गो) अलीकडील [स आदि+ल]

**आयल्यान**—क्रिवि ( गो ) अलीकडे किंवा जवळ ( स्थल दृष्ट्या )

**आयवट**—ऐवट पहा

**आयव्यय**—पु १ जमा, आणि खर्च, वसूल आणि खर्च, उत्पन्न आणि खर्च, येणें देणें २ (फलज्यो )कुंडलीतील ग्रहांच्या शुभा शुभ लक्षणावरून मनुष्याच्या आयुष्यातील लाभ, हानि यांचें गणित, आयव्ययाचीं स्थानें, कुंडलीतील अकरावें स्थान आयाचें आणि बारावें व्ययाचें धरितात [स ]

**आयशिलो**—वि ( गो ) जवळचा, लगतचा

**आयशी**—स्त्री. ( कों ) आई, आईस, आवशी पहा [ आई तुल० सिं आयली ]

**आयस**—वि लोखंडाचें, लोहमय, लोखंडी [स अयस्–आयस ] -न लोखंड 'सिवतलियाही परिसें । लोहत्वाचिये अव दसें । न मूकिजे आयसें । तें कवणा बोलु ।' –ज्ञा १८ १७७१ 'आयस जड मी, चुंबकमणि तू ।' –प्रभावती

**आया**—अया पहा

**आया**—स्त्री आकलन, आकलन आय पहा ( क्रि० येणें )

**आयाओया**—आय आय पहा

**आयागमन**—न पुनरागमन, पुनर्जन्म 'मागुतीं होय आया गमन । सर्व जीवाचें ।' –कथा १ १५ ३३ [स आय+आग मन ]

**आयात**—वि जवळ आलेला, प्राप्त झालेला [स ] -पु परक्या ठिकाणाहून बाहेरून आलेला माल ( इ ) इंपोर्ट याच्या उलट निर्गत–निर्यात ०जकात–स्त्री परठिकाणाहून किंवा परदेशा हून आलेल्या मालावर घेण्यात येणारा कर हा एक अप्रत्यक्ष कर असून तो सर्व रयतेवर बसतो ०निर्गत–वि आलेला व गेलेला, प्राप्त झालेला व निघून गेलेला –स्त्री १ परदेशाहून आलेला व पर देशीं गेलेला माल २ त्यावरील जकात

**आयानाम्ल**—न तेजाब चरबीपासून काढलेलें एक अम्ल ( इ ) ॲडिपिक ॲसिड

**आयानाया**—स्त्री अव १ शेजारणी पाजारणी, नात्या गोत्याच्या नसलेल्या, कोणीतरी सामान्य स्त्रिया, आईबाई पहा २ ( ल ) नेभळट कमजोर, निसत्त्व किंवा भागुबाई माणूस वस्तु इ०, पराक्रमहीन दरिद्री पुरुष 'अरे, तुझ्यासारखा वीर जेथें थकला तेथें या आयाबायाच्या हातून काय व्हावयाचें आहे?' [आई+बाई] म्ह० पुरुषामध्यें एक सामा ( साग ), बरकड सान्या आयाबाया

**आयाम**—पु. जमीन वगैरेची लांबी [ स ]

**आयाव**—न ( गो ) अहेव, सौभाग्य [ स अ+वैधव्य]

·[ ण–न अहेवपण पहा

**आयाबाया**—अयाबाया पहा 'संसारीं करिती व्यर्थ । आयाबाया ।' –दावि २१४

**आयास**—पु १ श्रम, मेहनत, दगदग, कष्ट 'भणौनि तुझा आयास ।' –शिशु १२३ 'रायाला न गमे न जाय रजनी आयास होती महा ।' –नल १८ २ ( अव ) थकवा, गळून जाणें ( क्रि० होणें, पडणें ) [स आ+यस्=श्रम करणें] ०प्रयास–सायास–पु अव अनेक दु खें, श्रम, कष्ट, मेहनत, कसोशी, प्रयत्न [आयास द्वि]

**आयासी**—वि १ कष्टी, श्रमी 'तें हृदयीं धरुनीही मी का अद्यापि सांग आयासी ।' –भक्तमयूर ( पराडकर ) केका २८ २ मेहनत करणारा, कष्टाळू प्रयत्नी, खटपटी

**आयाळ**—भ्रतार, कोम या अर्थी अयाल–ळ पहा

**आयिता**—आयता पहा 'निजमोक्ष लाभे आयिता ।'–एभा १७ ५६ 'या लोकीं सकळार्थसिध्दिफळ तें पावे पहा आयिता ।' –निमा १ १५

**आयु**—न आयुष्य जीवितकाल 'कायें उरकुनि घे र तेरा बंधेचि राहिलें आयु ।'–मोसभा ७ २४ [स] सामासशब्द– अल्पायु, शतायु दीर्घायु सहस्रायु 'बापुडा हा त्रिभुवनगोळु । अल्पायु जाहला ।' –ज्ञा ११ ३८९

**आयुध**—न १ शस्त्र, हत्यार ( तलवार, भाला इ० ) सत्त्व काळीं कामा न येती आयुधें । सोयरीं सवघें सैन्य लोक । –तुगा ३५६ २ ( ल ) अवजार उपकरण, साधन ( शेती, कारागिरी इ० चें ) [स आ+युध्=लढाई करणें ]

**आयुरारोग्य**—न पुष्कळ आयुष्य व आरोग्य, दीर्घायुष्य व जन्मभर दुखण्याबाहण्यातून मुक्तता, निरोगी स्थिति 'आयुरा रोग्य ऐश्वर्य अपार। संतति संपत्ति ज्ञान विचार।श्रवणमात्रें देणार।' [स आयु +आरोग्य]

**आयुर्दाय**—पु ( अशुध्द आयुर्दाव ) आयुष्यमर्यादा, जीवन काल [ स ]

**आयुर्भाव**—पु ( आविर्भाव अप ) अभिमानानें मनातील विचार दृग्गोचर करणें, हावभावानें व्यक्त करणें, सांगणें 'म्हणोनि श्रोता आयुर्भाव । आशंका घतली ।' –वेसीस्व १० १०७ [स आविर्भाव ]

**आयुर्भाव**—पु आयुष्याचा अनुभव 'तुका म्हणे दु खें आला आयुर्भाव । झाला बहु जीव कासावीस ।' –तुगा ३५५९ [ स आयु +भाव ]

**आयुर्वृध्दि**—स्त्री आयुष्याची वाढ [स ]

**आयुर्वेद**—१ वैद्यक शास्त्राचा मूळ प्रमाणभूत ग्रंथ, ऋग्वेदाचा एक उपवेद उपवेद पहा [स ] २ वैद्यकशास्त्र वैद्यक 'आणि आयुर्वेदीं आघवा ।'–ज्ञा १३ ११४

**आयुशेष**—वि मरणोन्मुख -पु १ राहिलेलें, शिल्लक आयुष्य 'त्याचा आयु शेष होता म्हणून तो वाचला' २ आयुष्याचा शेवट [स ]

**आयुष्मान्**—वि दीर्घायु, चिरंजीव, पुष्कळ आयुष्य असलेला, एखाद्यास आशीर्वाद देताना आयुष्मान् भव=दीर्घायुषी हो, असें म्हणतात -स्त्री आयुष्मती -पु सत्तावीस योगांपैकी तिसरा योग [स ]

**आयुष्य**—न १ जीवितकाल, हयात, आयुर्दाय, जन्मल्यापासून मरणपर्यंतचा काल २ वय, उमर ३ वेळ, अवधि, फुरसत 'या पुरुषात सर्वगुण चांगले आहेत परंतु बोलण्यास मात्र आयुष्य थोडें' [स ] **आयुष्याचें उणें करणें**—आयुष्य फुकट दवडणें ॰**क्रम**—पु जीवितक्रम, रोजची वागणूक, वर्तणूक, राहणी ॰**दोरी**, —**ची दोरी**—स्त्री आयुर्मर्यादा (क्रि॰ तुटणें) त्याच्या आयुष्याची दोरी तुटली=त्याचें आयुष्य संपलें, मरलें ॰**मर्यादा**—स्त्री जगण्याची इयत्ता किंवा अवधि ॰**मागणें**—आयुष्य वाढविण्याबद्दल देवाजवळ प्रार्थना करणें, हित चिंतणें 'आयुष्य मागेन तुझ्या राज्याला।' -ऐपो ३२

**आयुस-आयूस**—न आयुष्य अप जिवितकाल [स आयुष्य]

**आयुक्षय**—पु आयुष्याचा नाश, आयुष्य पारखिणें [स ]

**आये-अयाये**—उद्गा दु खोद्गार, शरीरास कष्ट झाले असता निघणारे उद्गार, विवळणें, अयायी-अयोयो, ओयओय इ [ध्व , आई द्वि ]

**आयेतुटी**—वि श्रमलेलें, कष्टी झालेलें, सामर्थ्यहीन झालेले, अखेरीस टोंकावर आलेलें 'तेह वेळीं कुच पर्वताच्या घायीं। ओळघता डोळे आले आये तुटी।' -शिशु ५६०. [आय+तुट्]

**आयोडिन**—अद हें एक महत्त्वाचें औषधी द्रव्य आहे याचा बहुधा विज्ञानाप्रमाणें शस्त्रोपचाराच्या कामीं उपयोग करतात याच्या अंगीं जंतुनाशक (ॲन्टी सेप्टीक) व दुर्गंधिनाशक धर्म आहे अद पहा [इं ]

**आयोधन**—न (काव्य)युद्ध, लढाई [स आ+युध्-योधन]

**आर**—स्त्री (गो ) अर्धांगवायु, 'आर मारची'=अर्धांगवायूचा झटका येणें

**आर**—पु १ अजगर, अहार 'आरें घातु गिळिला'-ज्ञा १३ ७७४, -एमा १३ १९४ आरें गिळिताहि सर्की। तें स्मरण करिता सोडवे॥' -मुआदि १२ ३९ २ सुस्त, आळशी माणूस, अजगर वृत्तीचा, जड माणूस [स अजगर प्रा अअअर ]

**आर**—स्त्री १ भोंवरा, जातें अंकुश, काठीचा शेवट लाकडीकणा याची अरी किंवा अणकुचीदार लोखंडी टोंक अरी पहा २ जरूर, निकड, तातड, घाई, उत्कंठा, बोंचणी (क्रि॰ लावणें, लागणें.) ३ दोरीचें बारीक टोंक किंवा शेवट ४ अंकुर, मोड- विशेषत जुन्या नागवेलीस फुटणारे अंकुर, धुमारे या धुमान्याचा वियाण्याकरता उपयोग करतात म्ह॰ नागवेलीची आर एकदा रुजली म्हणजे वेल वाटतो ५ (सामा ) पागोरा, तंतु, वेलीचा ताणा, अंकुर 'तेय आरघेणें मूळाचें। तें ऐसें असे।'-ज्ञा १५ ७९ ६ काळजी, टोंचणी, आच 'त्याला आता संसाराची आर लागली आहे' (क्रि॰ लावणें, लागणें) ७ गुराना टोंचण्याची पराणी 'जुतिलें घाणा बाधोनी डोळे। मागें जोडी आर तेणेंहि पोळे।' -तुगा ७०१ ८ (ओतकाम) चरकीवर भांडें घिर्ल्ई (पॉलिश) करताना त्याच्या मधोमध दोन्ही बाजूंनी लावले जाणारे खिळे ९ (व ) करारीपणा, एखाद्याचें कोणाशीं बिनसलें असता पुन्हा त्याच्याशीं बोलणें-चालणें इ॰ व्यवहार किंवा संबंध न ठेवण्याची वृत्ति, गर्व, ताठा, अभिमान 'इतकी मुद्दा आर असु नये तुम्हाला?' [स अर, आरा ]

**आर**—स्त्री चाकाचा तुंबा व धांवा याच्या मधील लाकडी तुकडा [स अर ]

**आर**—स्त्री गुदस्थानात होणारें गळू, अरई पहा [स अर]

**आर**—स्त्री शरीरावरील केसाचा भोंवरा किंवा झुपका [स आवर्त ]

**आर**—पु विटीदांडूच्या खेळातील मोजण्याचा ६ वा आकडा (वकट, लेंड, मुड, माल, ऐद, आर इ॰) [फा आरु=६ ]

**आर**—उद्गा अर! अर-र-र! [ध्व ]

**आर**—अ संस्कृतमधील कार (=करणारा) या अर्थी मराठींतील प्रत्यय, हा कारागिराना लागतो जसें सोनार, सुतार, लोहार, चांभार इ॰ [स कृ-कार]

**आरई**—अरई पहा

**आरऊं**—पु अंकुर, आर अर्थ ५ पहा 'जेथें शक्तितरूचा आरऊं।' -शिशु १०९ [स आरा ]

**आरकटी**—अर्काटी अरकाट पहा

**आरकसदार**—अरकसदार पहा

**आरक्त**—वि लाल तांबडा, तांबूस 'मस्तकीं मुकुट कानीं कुंडलें तेज फांके। आरक्त दंत हिरे कैसे शोभले निके॥' -तुगा ४८३ [स आ+रक्त ]

**आरक्तोष्ण**—वि तांबडे होईपर्यंत तापलेलें [स आरक्त+उष्ण ]

**आरखंडा**—पु (कों ) डबर, खाणींतून काढलेल्या दगडाचा एक प्रकार [अर+खंड ]

**आरखणा, आरखुडा**—अ मध्यें पहा

**आरखें**—न कमानी कापण्याची बारीक करवत अरकम पहा [फा आरा=करवत ]

**आरगड, आरगिन आरगीपारगी**—अ गर्ये पहा

**आरगुंढाळ**—स्त्री (व) दयगय 'तुम्ही या कामाची पार आरगुंढाळ चालवली आहे' [अरग+ढाळणें]

**आरचेस्ट्रा**—पु १ नाटकगृहात प्रेक्षक व रंगभूमि याच्यामध्ये तनला, पेटी इ० वाद्यें वाजविणाऱ्या लोकांची बसण्याची जागा २ वरच्या दर्जाच्या प्रेक्षकांची बसण्याची जागा [इं]

**आँरज**—पु १ आर्जव, लाड 'काहीं न जना करितील आरज।' –दावि २६४ 'तुम्ही पोराने खूपच आरज करता' [अर अर्ज]

**आरज**—स्त्री आढयता –नागा ५३. (–दार) –वि आर्य, श्रेष्ठ, पूज्य 'जो आरजाग गोष्टी । तो येक मूर्ख।' –दा २.१ १० [स आराध्य, प्रा आरज्ज]

**आरजा**—स्त्री ऋतु प्राप्त झालेली स्त्री, युवती, तरुण मुलगी 'हरि म्हणे वस्त्र काढून भुजा। तैसेंच करिती आरजा। म्हणती काय करावें अधोक्षजा। सकट थोर मांडिलें।'–ह९ २७४ –निगा ७० [स आ+रजस्]

**आरड, आरडणें, आरडा, आरडाओरडा, आरडेल, आरड्या, आरता, आरतापारता**—अमध्यें पहा

**आरडाघर्णे**—क्रि (व) ओरडणें अरडणें पहा [स आ+रुद्]

**आरण**—पु (कृषि) (गु) निळीचा रंग तयार करताना निळीचीं झाडें ज्या हौदात भिजत घालतात तो हौद [वि स. आरण=खोली खोलपणा]

**आरण, अरण**—न आरण्यक म्हणून जो वेदाचा भाग आहे त्यास भिक्षुक लोक लुकीनें म्हणतात [स आरण्यक]

**आरण**—स्त्री (गु) अपेक्षा, इच्छा 'आम्हा द्रव्याची नाहीं आरण। आम्ही करावें वेद पठण।' –कथा ६ १९ १९८ [आर]

**आरण, आरणी**—स्त्री अरणी पहा १ युद्धभूमि 'जया जिया अक्षौहिणी। तेणें तिया आरणी। वरगण क्वण क्वणी। महा रथीया।' –ज्ञा १ १२२ –एभा २२ २९५ २ युद्धाची उठावणी, युद्धविषयक हुकूम 'आणि धुरे नाहीं रणीं। तरी कोणें यावी आरणी।' –कथा ३ ११ १८० ३ शस्त्र –नागा २१०८ (–दार) [स आ+रण]

**आरणूक**—स्त्री विश्रांति, अराणूक 'आरणूक ते मना नाहीं जयाचिया।' –गीता १० ३१४ [स आ+रम]

**आरणें**—अक्रि आरवणें; शब्द करणें (कोंबड्यानें) [स आ+रु]

**आरणें**—अक्रि (राजा) अजगरासारखें सुस्त पडणें, अहारणें [गार=अजगर]

**आरणें**—अक्रि (एखाद्या गोष्टीविषयीं) उत्सुक होणें, अधीर होणें 'आरोनिया पाहे वाट। कटकट सोसना।' –तुगा ६७६ [आर]

**आरणें**—अक्रि १ (वर्षा) ओली जमीन ठरणें, मेगरणें, वाळणें, सुकणें २ शांत होणें, शमणें, तृप्त होणें 'उपकारी असे आरोनि उरला। आपुलें तयाला पर नाहीं' –तुगा २३९५ [का. आर=सुकणें]

**आरण्य, आरण्यक**—वि १ अरण्यासंबंधीं, वन्य, जंगली, रानटी अरण्य पहा [सं]

**आरण्यक**—न वैदिक वाङ्मयातील अध्यात्मविषयक भाग ब्राह्मणग्रंथाच्या शेवटीं हा भाग असून तो बहुतेक गद्य असतो वेदाच्या प्रत्येक शाखेचें स्वतंत्र आरण्यक आहे आरण्यक ग्रंथाचें अध्ययन घरांत करीत नाहींत, अरण्यात किंवा गावातील एखाद्या देवळात करतात प्रथमच अध्ययन करावयाचें तें उदगयनात करतात ऐतरेयारण्यक, तैत्तिरीयारण्यक, बृहदारण्यक इ० आरण्यकाचीं नांवें आहेत [स अरण्य]

**आरत**—न इच्छा, आवड 'पोर्गीचे आरत रामा झडकरि पुरवावें' –दावि १९९ [म आर्ति, गु आरत=गरज, जरूरी]

**आरत**—न (गो.) आरती (देवादिकाची करतात ती) पहा 'रामीरामदासें आरत वोवाळीलें' –दावि ४८२ [स आरति]

**आरत**—क्रिवि अलीकडे अरता पहा 'म्हणतिलें आरत ये श्रमलासि भूपा' –दावि ४३८ [म आर=सानिध्य, आरात्]

**आरतलें**—वि (व) आवड पुरविणारें, काळजी घेणारें 'मुलीला आरतलें ठिकाण सापडलें [स आर्ति, म आरत]

**आरता, आरती**—क्रिवि अलीकडे, अरता पहा 'कल्या विण नव्हे हातीं। धरानि आरतीपारती' –तुगा १६० 'रोह हस गति क्रमीं वसुमती ये उवऱ्या आरती।' –मराधा ८२ 'सुर्याबा रे वधु आरता येरे माझ्या दादा।' –ऐपो४५ [स आर=सानिध्य, आरात्]

**आरती**—स्त्री १ तबकात लावलेलें निराजन किंवा जळता दिवा ठेवून त्यानें देव, गुरु याना ओवाळण्याचा विधि २ ओवाळण्या साठीं• तयार केलेलें जें दीपासहित ताम्हन, तबक इ० साहित्य ३ देवास निराजन ओवाळताना म्हणावयाचें स्तुतिपर गीत उ० 'सुखकर्ता दु खहर्ता। वार्ता विघ्नाची।' ४ तबकामध्यें काढलेली कमळ, स्वस्तिक याची आकृति ५ पुरणाचे, तांदुळाच्या पिठाचे, कणकीचे दिवे करून त्यात तूप, वात घालून प्रदीप्त करून देवास ओवाळतात ती ६ प्रशंसा, सन्मान, वडेजाव (कि० करणें) 'लॉर्ड सँडर्स्ट याचीहि आरती करण्याचा आमचा विचार आहे' –डि० १०३ [स आरति, आर्तिक्य] •कुरवंडी–स्त्री लग्नादि मंगल कार्यांत सकट निवारणार्थ स्त्रिया जें वधूवराना ओवाळतात ती (सामा) आरती, ओवाळणी 'ओवाळू आरत्या कुरवड्या येती'–विठ्ठलाची आरती

**आरतें, आरतेंपरतें**—अरता–ती–तें पहा

**आरत्र**—अरत्र पहा 'सुचि नाहीं स्वधर्म नाहीं। आचार नाहीं विचार नाहीं। आरत्र नाहीं परत्र नाहीं। मुक्त क्रिया मनाची।' –दा ? ४ २२

**आरंदळणें**—अरदळणें पहा

**आरद्रा**—स्त्री सत्तावीस नक्षत्रांपैकीं ६ वें नक्षत्र [स आर्द्रा]

**आरंधें**—संतान नसल्यामुळें होणारें दु ख अरधें पहा 'तेणें बहुत दु ख जालें। घरीं आरधें पडलें। म्हणती आम्हास का दंडिलें। दैवें वाझ करूनी।' –दा ३ ३ ३० [स आ+रध्=नाश]

**आरघेली**—अर्धेली पहा

**आरपणें**—क्रि नष्ट होणें –सदाचार १५९९ (रगस्वामी कृत) –शर [स अर्प्]

**आरपार**—क्रिवि वेध्य किंवा उल्लंघ्य पदार्थाच्या या टोका पासून त्या टोकापर्यंत (वधणें, उल्घणें, इ ) धर मधून, आतून, वरून या बाजूपासून त्या बाजूपर्यंत, इकडून तिकडे अलीकडून पलीकडे [पार द्वि, सिं आरपारी] ०सुजणें–सर्व बाजूंनीं सुजणें, सर्वभर सुजणें

**आरपुल**—न (गो ) एक दागिना

**आरव, आरवट, आरंवळ**—अमध्ये पहा

**आरंवळणें**—अक्रि पोळणें 'जैसा आरवळश आगीं।' –ज्ञा ११ ३२५

**आरवळणें**—अक्रि आक्रंदणें, हवरडा फोडणें, विवळणें अरवळणें पहा 'घरीं खिळिले पाचही जण। आरवळत पटियेले।' –शिव २८४५, –स्वादि ३ ५ ३३ [स आ+रभ्=शब्द करणें]

**आरवळणें**—अक्रि १ (व ) धावून जाणें, गुदरणें 'त्या गंगेत मी तर आरवळून गलों' २ क्षीण होणें 'स्वशरीर दु खें करुनी। आरवळतु जाय प्रति दिनीं।' –स्वो १ १०८०

**आरवाई**—स्त्री खलीत नाचाचें एक मोठ्यानें म्हणावयाचें लांब हेल्क गाणें 'घनसान म्हणता आरवाई घेता' –भाग ४६१ [स आ+रु=बोलणें, न आरव]

**आरवाज**—वि आरवतेदार, आर वाळगणारा आर पहा

**आरविंदान**—न स्वाद पनामार्फत निवाडा [इ ]

**आरवी**—अरबी पहा 'एक घोडे टवल्रगें विशाल। एक नीलवर्णे धतिनिर्मळ। एक पिवळेचि केवळ। आरवी चपळ चौताळी॥' –ह २२ ३९

**आरसेन**—अर्सेन पहा

**आरब्ध**—वि आरंभिलेलें सुरवात केलेलें हात घातलेलें [स ] ०कार्य–न (वेदांत) प्रारब्ध, संचिताचा एक भाग 'प्रारब्धासन आरब्धकार्ये अशें दुसरें नाव आहे' –गीर २९६

**आरंभ**—पु १ सुरवात, उपक्रम, प्रारंभ (ग्रथाचा) कार्यांत, प्रवासात हात घालणें २ अस्तित्वांत आल्यावेळची, मूळची स्थिति, प्रथमावस्था क्रिया, प्रवेश 'उ० जगाचा आरंभ, सृष्टीचा आरंभ' ३ जेथून सुरवात होते तो भाग, आदिभूत विभाग 'ही नदी या गावाचा आरंभ' [स आ+रभ्] ०वाद–पु जगाच्या उत्पत्तीसंबंधीं एक मत, सूक्ष्म व नित्य परमाणूचा परस्परसयोग होण्यास जेव्हा आरंभ होतो तेव्हा सृष्टींतील व्यक्त पदार्थ बनू लागतात या कल्पनेस आरंभवाद अशी पारिभाषिक सज्ञा आहे –गीर १४९ ०शूर–वि कोणत्याहि कामास आरंभ करावयाच्या वेळींच ज्यास्त उत्साह दाखवून आळसानें शेवटीं अर्धेच कार्य टाकून देणारा, आरंभीं उत्साह दाखवून शेवटीं हातपाय गाळणारा [स आरंभ+शूर] म्ह० आरंभशूरा खलु दाक्षिणात्या ।=दाक्षिणात्य (दक्षिणी, महाराष्ट्रीय लोक ) आरंभीं कामात माठे पराईत पण तें कार्य तडीस नेण्याची मात्र त्यांच्यात धमक नसते

**आरभटी**—स्त्री ओढाताण गडबड, 'मोठी आरभटी करूनि विक्री दत्तावळी चालुनी।' –आरी ४२ [स आरभटी=धैर्य]

**आरंभण**—न सुरवात, प्रारंभ [स ]

**आरंभणीय**—वि आरम्भ्य पहा

**आरंभणें**—अक्रि सुरवात करणें, प्रारंभ करणें, हात घालणें [स आरभण]

**आरभार**—पु (गो ) भरवसा, भरिमार 'आता म्हजा आरभार सगलो देवाचेर।' [भार]

**आरम्भ्य**—वि आरंभ करण्यास योग्य, आरंभणीय –क्रिवि आरंभ केल्यापासून उ० जन्मादारम्भ्य 'एव कश्चिद्यादारम्भ्य।' –ज्ञा १५ ५७० [स आ+रभ्]

**आरमान**—स्त्री (व ) हौस 'या प्रवासानें आमची चागली आरमान फिटली' [आर ]

**आरमार**—स्त्री (गो ) वखार अल्मारी पहा [पोर्तु आर्मारिमु]

**आरमार**—न १ लढाऊ जहाजाचा ताडा जहाजावरील योद्धे, अधिकारी व जहाजावरील युद्धसामग्री या सर्वांस आरमार म्हणतात [पोर्तु स्पे आर्मादा, इं आर्मेंड] २ लढाऊ जहाजें ३ नाविक दल ०कर–वि (हद ) आरमाराचीं गलबतें सबद्दी असणारा हें आडनाव दर्यावर आहे

**आरमारी**—वि आरमारासबंधीं, नाविक दलासबंधीं

**आरय**—स्त्री (गो ) काळी रेती [पोर्तु आरेआ]

**आरय**—पद आरई पहा

**आरव**—पु ध्वनि, शब्द, आवाज [स ]

**आरव**—पु १ वृक्ष 'नवरितु नगराची वरा। तेंम चातुरेश आरव।' –रु १५ जधिचें हात्तीं आरव उभारिला ते।' –शिशु २४९ २ बाग, अरण्य रान 'निये निनद्रुमाचिये आरवीं।' –ज्ञा ११ ३१७, १८ १०९७ ३ (गा ) शालविभाग [स आ+रुह्=रोप]

**आरवंठा-ठी**—पु स्त्री कापणी झालेलें भाताचें शेत (जमीन न भाजता दुसऱ्या वर्षाच्या पेरणीसाठीं राखून ठेवलेलें) [स आ+रुह्‌वन्=रोप]

**आरवणी**—स्त्री पश्यांचें-विशेषत कोंबड्याचें ओरडणें, आर वणें 'कोंवडी सकाळींच आरवली' [स आ+रु-रव]

**आरवणें**—अक्रि ओरडणें, शब्द करणें आरवता कोंवडा= आरवण्याजोगा मोठा झालेला कोंबडा [स आ+रु]

**आरवसा**—पु अङ्कुर, आर भरोसा पहा 'यया महदादि आरवसें। अधो शाखा।' —ज्ञा १५ १०९ [स आर=अङ्कुर]

**आरवार, आरवाळी, आरशिशि, आरशी, आरस, आरसी, आरळ, आरळी**—अ मध्यें पहा

**आरसड**—न (विणकाम) लावगण (उभा ताणा) तग्गून रहावें म्हणून लावणखालीं असलेला २-३ हात लांब व १-२ सूत जाडीचा लाकडी तुकडा

**आरसपान**—पु सगमरवरी दगड [हिं, स आदर्श+पाषाण]

**आरसपानी**—वि १ सगमरवरी २ आरसे लावलेला (महाल वगैरे)

**आरसा**—पु प्रतिबिंब दिसण्याची काच, धातु वगैरे पदार्थांत केलेली योजना (धातू घासून चकचकीत करून किंवा काचेच्या मागें पारा लावून), दर्पण, आदर्श 'पाहातें आरिसा पाहे। तेथें काहींचि नवल नव्हे।' —अमृ ६ २ [स आदर्श, प्रा आअरिस-आरिस्स]

**आरसा**—पु (व) अर्सा पहा

**आरसुड-आरसोड**—पु (व) असुड पहा [आर+सुड= काठी, लाकूड]

**आरसेनिक**—अरसनिक पहा [इ]

**आरसेमहाल**—पु चाहोंकडे आरसे लावले आहेत असा महाल, दिवाणखाना, अयनेमहाल [स आदर्श+अर महाल]

**आरळ**—वि नाजुक अरवार, मृदु भरळ पहा 'कवणाचिये मेने फुलाचे आरळ घालिजे।' —भाए १३० 'मागें बुचडा आरळ झोक माण्यावर पदराचा। चार आयुळें सरळ रुपविला चद्र तार पेंचा।' —होला १००

**आरा**—पु (व) वीस पचवीस हात लांब व चार पाच हात रुद जमीन, एक नागरानें नागरण्याइतकी, नागरभर जमीन 'मी एक आराभर काम केलें' [का आर=नागर]

**आरा**—पु गवताची चुवळ (भाऱ्याखालीं ठेवण्यासाठीं) (प्र) आहरा [स हार]

**आरा**—पु साधन (पण वगैरे लावण्यास) द्रव्य 'तव देवी म्हणे कर्पूरगौरा। तुम्हा खेळावया नाहीं आरा।' —कथा २ १५ १२३ [प्रा अर (स कर) हुडा, शुल्क]

**आरा**—पु पिकाची कापणी —शेतकरी मासिक ७ २९ —नामजोशी कोश

**आरा**—पु (कर्ना) लाकडावरची रघ [आराखडा]

**आराइणें**—क्रि १ धारण करणें, धरणें 'किंवा मनोभिमान धरिला। तोही आजिचौ सार्थ झाला। जो गोपीमनें आराइला। कृष्णप्राप्तीलागीं।' —रास ५ ७११ [प्रा आराइअ=गृहीत, प्राप्त]

**आराइणें**—अक्रि अर्पण करणें, अनुकूल असणें 'परी सर्व प्राणें मजचिलागी। आराइले असती।' —ज्ञा ९ ११० २ उत्पन्न होणें 'स्निग्धुता तृपितालागीं। पाणी आरायिलें असे जगीं।' —ज्ञा १६ १६१ [स आ+ऋ किंवा आराध्]

**आराइणें**—अक्रि थांबणें, बद करणें, कमाळणें, पुरें करणें 'जें भोगिता उन्मनी। आराधेना।' —ज्ञा १२ २०९ [स अ+ऋ-आर का आरु=शमणें]

**आराखडा**—अराखडा पहा

**आराखा**—पु (व) मर्यादा, शुपण [स आ+रक्ष् किंवा आ+रेखा]

**आराजी**—स्त्री (व) १ क्षेत्रफळ 'शेताची आराजी किती?' [इ एरिया?]

**आराजी**—स्त्री व्यवस्था —नामजोशी कोश [आ+राज्]

**आराट-ड**—स्त्री (गो) आरडा, ओरड अरडा पहा

**आराटी**—अराटी पहा 'बोरवडित स्नेहाची आराटी —एभा १० ६

**आराटेंपराटें**—वि (गो) उलटें सुलटें अरतें परतें पहा 'आराट्यानीं पराट्यानीं उलयप' =वाकडें, गोंचून बोलणें

**आराटीमाल**—निरनिराळ्या प्रकारचा माल मसाप २ १४२ [प्रा आरडिअ=चित्रयुक्त?]

**आराणुक-णूक**—१ सर्व अर्थी अराणूक पहा 'आराणूक नाहीं चित्ता' —एभा १० २०५ उसंत 'बहुत कामें मज नाहीं आराणुक।' —तुगा ११३ —व ५०० २ स्वस्थपणा 'तुल्या पाया सारीं केली आराणूक' —तुगा ११२०

**आरातणें**—क्रि जवळ येणें, उत्पन्न होणें आराइणें पहा 'काई लावांस्मां केउतें। आरातीचि ना।' —शिशु ११६ [स आ+ऋ, आरात्]

**आरातारा**—(हिं) रागरग [तारा द्वि]

**आराति**—पु शत्रु 'दीर्घद्वेषी या सुर्भीचा कोण भगा आराति।' —दिक ३२ [स अराति=शत्रु]

**आरातिक**—न आरती 'आरातिकें घेऊन भक्त यती' —सारुद ७ ५६ [स आरति]

**आराध**—पु तस्पष्ट धर्म 'आराध करी मोसी। त्यासी हाने तो आव्हमी।' —तुगा २७३५ [स आ+राध्=तुष्ट करणें]

**आराधक**—वि आराधी, उपासक, आराधना करणारा [स आ+राध्=पूजा करणें]

**आराधणूक**—स्त्री पूजा, सेवा, प्रार्थना, [ स आराधना ]

**आराधणें**—उक्रि १ पूजा, सेवा, भक्ति, स्तुति, भजन, मन धरणी, खुशामत करणें 'एक्रामावें तुम्ही गायत्री आराधिजे।' —वसा २० २ प्राप्ति, उपार्जन, संपादन-करणें, मिळविणें [ स, आ+राध्=पूजा करणें, मर्जी संपादन करणें ]

**आराधन**—न १ पूजा, प्रार्थना, सेवा, उपासना, खुशामत, मनधरणी 'योगादिकें साधनें। साकांक्ष आराधनें।' —ज्ञा ३ ९० —एभा २ ४४६ २ प्राप्ति, उपार्जन, संपादन ३ उपास्य देवता 'माझें आराधन। पंढरपुरीचें निधान।' —तुगा ८२१ [ स ]

**आराधना**—स्त्री १ आराधन पहा २ ब्राह्मणभोजन, संन्यासी समाधिस्थ झाल्यावर त्याच्या वर्षश्राद्धाच्या दिवशीं प्रतिवर्षी प्रथम श्राद्ध करून नंतर ब्राह्मणपूजन, त्याच्या तीर्थानें पूजन, ब्राह्मणभोजन इ० करावयाचा विधि संन्याशाच्या पुण्यतिथीचा समारंभ [ स ]

**आराधी-ण, (विप्र) आरादी-ण**—पु स्त्री १ आराधना करणारा री २ (विशेषत) देवीचा पुजारी ण, भक्त, खंडोबाचा भक्त ३ खंडोबाच्या, देवीच्या नावानें भिक्षा मागणाराची एक जात ४ भोंवाईचे भक्त, नपुंसक, पद [ स आराधी-धिनी ]

**आराधुरा**—पु ( व ) १ सारासार विचार 'कांहीं आराधुरा न पाहतां टाकली आडांत उडी' २ भीड-मुरवत [ आरा-चाकाचा+धुरा=जूं ]

**आराध्य, आराधनीय**—वि १ पूजा किंवा भजन करावयास योग्य २ ज्याची खुशामत किंवा चाकरी करावयाची तो ३ ज्याची प्राप्ति करून घ्यावयाची ती वस्तु संपादनीय गोष्ट 'मोक्षु दुराराध्यु कीर होय।' —ज्ञा ११ ९९ [ स ]

**आराध्यदेवता-दैवत**—स्त्रीन कुलस्वामिणी-स्वामी, कुलदेवता, कुलदैवत, उपास्य देवता [ स ]

**आराध्य-ब्राह्मण**—पु तेलंगणातील शैव ब्राह्मण, याच्या गळ्यांत जानवें असून लिंगाकृति प्रतिमा असते हे भस्म व रुद्राक्ष धारण करतात मद्रास इलाखा व द हैद्राबादकडे यांची विशेष वस्ती आहे **आराध्यलिंग**—न उपास्य दैवत, पूजनीय देवता 'स्वजन वनचंदना। आराध्यलिंगा।' —ज्ञा १० ३ [ स ]

**आरापारा**—क्रिवि ( राजा ) तुरळक, विरळपणें, इकडे तिकडे 'यंदा या आंब्यावर आंबे आरापारा धरले आहेत, दाट नाहींत' [ अरन+पारश आर=इकडे+पार=तिकडे ]

**आरापुट्टा**—पु (ना) शरीराची ठेवण, बांधा, आकल्प ( आरा व पुट्टा हे चाकाचे भाग आहेत ) [ आरा=चाकाचें उभें लाकूड+पुट्टा=नाभि ]

**आराब**—न ( गो ) एक वाद्य, ताशा [ अर फा रबाब=तंतुवाद्य ? ]

दाको १ ३५

**आराब-बा**—१ पु अरावा पहा २ ( व ) घोंटाळा, गोंधळ, रगाडा, माड, पसारा 'लग्नाचा आराबा पडला'

**आराबाय**—स्त्री ( गो ) मध्यें लुडबुड करणारी स्त्री

**आराम**—पु ( जरतारी धंदा ) विवक्षित अंशापर्यंत ( तारेस ) उष्णता देणें, यामुळें तारेस ढिलाई येते

**आराम**—पु १ विश्रांति, विसावा, आनंद 'ज्याचा आराम मजमाजीं।' —एभा ११ ७४८ २ दुःखविना आजारापासून मुक्तता, स्वास्थ्य, सुखरूपता 'दौलानीं तबियत आराम झाल्याची नबाबास मजर पाठविली' —रा७ १२० ३ बाग, उपवन, उद्यान, क्रीडाभुवन 'आगम निगमाचा कल्पद्रुम। कीं सकळ विद्यावल्लींचा आराम।' —जै १ ५७. [ स आ+रम्, फा आराम् ] —वि विश्रांति घेणारा ( अशुद्ध प्रयोग ) ४ ( सघ व्यायाम ) एक आज्ञा ( इं ) स्टँड इझी=हात खालीं सोडून, दोन पायांत एक फूट अंतर ठेवून ताठ उभें राहणें —सव्या ७ **०खाना**—पु १ विश्रांतिस्थान, शेजघर २ अठरा कारखान्यांपैकीं एक कारखाना [फा ] **०खुर्ची**—स्त्री जिच्यावर निजतां येईल अशी कापड किंवा वेत वगैरे लावलेली खुर्ची, ( इं ) इझीचेअर 'तो आरामखुर्चीवर स्वस्थ पडून होता' —नाकु २

**आरामशीर**—वि सुखदायक, प्रशांत, सुसावह, स्वस्थता, हुषारी देणारा, आणणारा, ( झोंप औषध, पथ्यपाणी वगैरे ), सुखदायक, आनंददायक ( रस्ता, वाहन वगैरे ) [ फा ]

**आरारूट**—न ज्यापासून पौष्टिक मैदा तयार करतात असें एक झाड व कांदा आरारूटचें झाड साधारण हळदीसारखें असतें या झाडाच्या कांद्यापासून वलक काढतात व त्यापासून तवकीर तयार करतात तें हलकें व सहज पचण्यासारखें असल्यामुळें लहान मुलांस व आजारी माणसास देतात तवकील पहा [ इं ]

**आराव**—पु शब्द, आवाज, पक्ष्यादिकांचा गलबला, ध्वनि, गर्जना 'भ्रमररवेंचि भरावें तें नभ बहु न मानवाऽरावें।' —मो विराट ५ ७५ —मो भीष्म ९ २२ [ स आ+रु=आवाज करणें ]

**आरावण**—पु ( गो ) रुमांत नारळ चंदन, तांबूल, खण वगैरे घालून वरावरोबर मिरवणुकींत एक नोकर डोक्यावर घेऊन नेतो ती वस्तूची दुरडी या दुरडींत शिवाय वधूगृहीं वरास शास्त्रीय विधिसाठीं लागणारें सामान असतें [ स आहरण=भूषण, अलंकार, म आहेर ]

**आरावणें**—क्रि ( गो ) आटोक्यांत आणणें

**आरावणें**—क्रि हातपाय ताणून निजणें, अहारणें आरणें पहा

**आरास**—अरास पहा

**आरासारा**—पु आवरसावर, आवराआवरी. ( सामान वगैरे ) थोडक्या जागेंत नीटनेटकें लावून ठेवणें [ आवरासावरचा संक्षेप ]

**आरिख**—वि १ ऋषिप्रणीत, छांदस, वैदिक 'पुराणिचे आरिख बोल' —दा ७ १७ २ छांदिष्ट, आर्ष, अव्यवस्थित 'सेवि

का तें वाळ अज्ञान पचवार्षिक। जड्बुद्धि केवळ आरिख।'-स्वादि ८ ४ ४२ ३ बोबडे, असस्कृत 'तो आरिखा शब्दामायारी। चातुर्य बोला ते पुरी। स्वाक्षरें मुखाबाहेरी । पडो नेदी।'-ज्ञाप्र ७९२ [स आर्ष]

**आरिसा**—पु आरसा पहा 'आत्मा आत्मसुख दखे। आरिसा निये।'-अमृ २ ६ 'न दिसेचि पाहता आरिसा।' -शिक १८ ७४ [आरसा अप]

**आरी**—स्त्री १ चामाराचें हत्यार, यानें कातड्यास भोकें पडतात अरी पहा २ चाकाचा भाग आरा पहा ३ करवत आर पहा ४ निंबध वृक्ष, येल्या खैर अराटी पहा 'लागरें आळवींचें रान। आरीबोरीचें दारुण। वमा ७ -ऐपो ४५ [स आरि] ५ (ततुवाद्यें) सतार वगैरेंची तार ओंवण्यासाठीं एक व तार टवण्यासाठीं एक हस्तीदती फणी ६ (कु) कोंबड्याच्या डोक्यावरील तुरा 'ह्या कोंबड्याक आजून आरी देंखून पुग्राक नाय [आर]

**आरीफ**—वि जाणता, सुज्ञ 'विशेष लिहावें तरी महाराज साहेब आरीफ असेती'-रा ८ ७ [अर आरिफ्=जाणता, शहाणा]

**आरीबोरी**—स्त्री १ आरी, बोरी यासारखीं विशेषत कांटेरी व सुगध वास नसलेलीं झाडें आरी अर्थ ४ पहा 'चदनाचे सगतीवरी। सुवास होती आरीबोरी। त्यातें देवद्विज वदिती शिरीं। तेवीं साधका करी सत्सग'-एभा २९ २५२ २ (सामा) बोरीचें झाड, बोरीबरोबर आरीचाहि निरर्थक उल्लेख येतो 'आरी बोरी रुई कारगी ती शीघ्र आण। जवळि राखण माडा।'-वसा ७ [स आरि+बोरी किंवा बोरी द्वि]

**आरीयत**—स्त्री शरम 'गुदस्ता दादासाहेब पुण्याहून आले, परतु पुणें पाहिलें नाहीं हे आरियत मातुश्रीस फार आहे' -मदवा १ ६२ [अर फा आर्=लाज]

**आरु**—आर पहा

**आरुता**—स्त्री योग्यता म्हणोनि लोटिला ऊर्ध्व चरणी। आरुता नाहीं स्वर्गभुवनीं।'-कथा २ ७ २२ आरुता पहा [स अर्हता]

**आरुता-ती-तें**—क्रिवि अलीकडे, जवळ, अगोदर, इकडे अरुता, अरता पहा वहिनी ग धावे। वालावी आरुतीं।'-शिशु ८२९ 'तव ध्यानस्थ हात पशुपती। देजे उभी असे शक्ति। खुणावूनि म्हणे ये आरुती। नारद देवो।'-कथा ३ ९ ९ [स आरात्-अर=जवळ्य]

**आरुवार-ळ**—अरुवार पहा क्षीराब्धीं शयाचा आरुवारी। -कपुरा ६ ६८

**आरुष**—वि (प्र) आर्ष, छादस्, वैदिक १ अगमजरा अगबद्ध, वडीवाकडी, गावढळ, चावडी रुक्ष, छादिष्ट, पोरकट अडाणा (वाणी, बोल, भाषण, कृति वगैरे) 'ते माझे मन्दाट आरुष बोल। सद्गुरूनें केले सखोल।'-एभा १६ ७ 'माझें बोलणें आरुष अत्यत।'-रावि १ २ २ मद, मूर्ख, अजागळ, रुक्ष, गोसावड्यासारखा 'या आरुष नामाचा चाळा। घेऊनि गर्जती वेळोवेळा'-एभा ५ ४१२ [स आर्ष]

**आरुसा**—वि टोंकदार [आर+सा (सदृश)] ०करणें-क्रि (चाभारी धदा) दोऱ्याचें टोंक बारीक करणें -पु जुपणीस ज्या कड्या असतात त्यास बाधणारा सळ किंवा वादी अरोसा पहा [आर, तुल० का आर=जुपणी]

**आरूढ**—वि चढलेला, वर बसलेला-गेलेला, आरोहण केलेला (क्रि० होणें) 'जरी सभामारूढ आहों। जाहलों आम्हीं।'-ज्ञा ४ ३० सामाशब्द-अनुभवारूढ=अनुभविक इद्रियारूढ=इद्रियांच्या योगानें जाणीव झालेला, अधिकारारूढ, गर्वारूढ, पदारूढ, विषयारूढ ज्ञानारूढ, सप्रदाय-धर्म-योग-राज्य-स्थान-काम-क्रोध-लोभ-शाति-कर्ण-जिव्हा वगैरेवर आरूढ [स आ+रुह्-आरूढ]

**आरूढणें**—क्रि १ आरूढ होणें वर चढणें, वर बसणें, स्वार होणें 'असो हें जमासीं जेयाचा भेदारा। तें राऊत आरूढिलें।' -शिशु ९३८ 'आरूढल वीरवर नारायण नदन।'-ऐपो ३०९ २ (ल) लोकांच्या तोंडीं असणें, वभ्रा होणें, बोभाट होणें, [स आ+रुह्=वाढणें]

**आरे**—पु १ कर्नाटकांतील एक दक्षिणी लोकांची जात दक्षिणेकडे मराठे जातीना आरे हें उपपद लावतात उ० आरे-बापू [स आर्य]

**आरे**—उद्गा अरे सबोधनार्थी 'आरे, जें आकारासी येतें। तें अवघेंच नासोन जातें।'-दा १८ ८ १८

**आरेक्स**—(गा) अरक्स पहा

**आरेकसणें**—क्रि (खा) अरकसणें पहा

**आरेख-खा**—पु (प्रा) निग्रह, सयमन, धाक, वचक, तावा, हुकमत [आ+रेखा]

**आरेखडा**—अराखडा पहा

**आरेखणें**—उक्रि (प्रा) आरेख्यात ठेवणें, ताब्यात, धाकात ठेवणें, सयमन करणें निग्रह करणें [आरेखा]

**आरेंभेरें**—क्रिवि (गो) अप्रत्यक्षपणें, परभारें [स भृ-भर भेरे-भेर द्वि किंवा भार=बाहेर अप]

**आरोगण-णा**—न स्त्री भोजन, जेवण, मेजवानी, भोजन करणें, अन्न सेवन करणें 'आघोळी देवें पूजा सारिली। आरोगणा सपरिवारीं जाली।'-शिशु ५७६ 'दुग्धसार घृत सुस्वादें। आरोगणें सारिलीं।'-सुआदि ४२ ६३ 'मग जाहली आरोगणा। स्त्री जोडली तया मदना।'-कथा १ ११ १३३ [का आरोगण=खाणें, भोजन प्रा आरोग्य=भोजन करणें, खाणें, हिं आरोगना] ०भूमि-स्त्री जेवणाची जागा 'तव रंगमाळिका दग्न दुसरी। आरोगण भूमि।'-ऋ ७८

**आरोगणें**—उक्रि. भोजन करणें; खाणें; जेवणें. 'दोषादोष न पाहतां प्रभुवरा! आरोगिजे चांगले।' –निगा १.५०. 'आरोगुनी मग। वैसलाती जेथ वन।' –तुगा १८६८. [प्रा. आरोगण]

**आरोग्य**—न. १ निरोगीपणा; (प्रकृतीचें) स्वास्थ्य. २ आरोग्यशास्त्र. [सं.] **०विज्ञान**—न. आरोग्य राखण्यासंबंधी शास्त्र; आरोग्यशास्त्र. [सं.]

**आरोचक**—अरुचि, अरोचक पहा. 'मी याचिलेंसी आरोचकें।' –शिशु ११९.

**आरोठा**—आरवटा पहा.

**आरोण-आरणी**—न.स्त्री. (ना.) चाराच्या फळापेक्षा थोडें लहान असणारें व आंबुस–गोड स्वादाचें एक जंगली फळ.

**आरोया**—स्त्री. तीव्र इच्छा; उत्कंठा. अरता पहा. 'पायांवरी डोई ठेवाया आरोया–झाली याची गता देस ऐसी।' –तुगा ३८०४. [अरता–आर्ति]

**आरोप-आरोपण-णा**—पु न.स्त्री. १ लावणें; पुरणें (वृक्ष इ०) २ (ल) चिकटविणें; लावणें; जोडणें. 'परी करितां बीजारोपण। अंकुर जाण त्या नाहीं।' –एभा १२.५८३. सामाशब्द–वृक्षारोप; बीजारोप; स्तंभारोप; दोषारोप; गुणारोप वगैरे. ३ धर्म; गुण. 'शोषण उष्णादि आरोप। तेज जाणावे।' –दा ८.५.२८. 'मना कोपआरोपणा ते नसावी।' –राम १०७. ४ दोषारोप, गुन्हा लादणें; टपका ठेवणें. 'जल्पनीं ठेवूनि आरोपण।' –दावि २८५ ५ (अलंकार) उत्प्रेक्षालंकार ह० 'तेजस्वितादि कारणामुळें सूर्यत्वाचा आरोप करून हा ब्राह्मण केवळ सूर्य आहे असा भारोप होतो. 'का वस्त्रपणाचेनि आरोपें। सूत्रांप्रति संतु हारपे।' –ज्ञा १८.५४४. ६ खोटा आळ; बालंट; चुगलीची समजूत; तुक. [सं. आ+रुप्]

**आरोपणें**—उक्रि. १ लावणें, रोपणें; पेरणें; पुरणें. 'नातरी विधिचिये वाफे। सत्क्रियाबीज आरोपे।' –ज्ञा १३.३२. 'हो कां वापी कूप आराम। वृक्षारोपण वनविश्राम।' –एभा १२.२३. 'आरोपिलें बीज फळास आलें।' –साछ ७.१५६. २ (ल) चिकटविणें; अंगीं लावणें; लादणें 'तैसी इये निर्मळ माझ्या स्वरूपीं। जो भूतभावना आरोपी।' –ज्ञा ९.७९. ३ हवाली करणें; सोंपविणें; स्वाधीन करणें; वर ठेवणें. 'शस्त्राग्रीं जिव्हार आरोपुनी।' –ज्ञा १.२२ ४ रहाणें, ठाकणें, माजणें 'मग अपघृणि आरोपे। कुळामाजी।' –ज्ञा १ २४५ ५ आरोप ठेवणें, दोष देणें; टपका ठेवणें; आळ घेणें [सं आरोप्]

**आरोपार**—आरपार पहा.

**आरोपित, आरोपी**—वि. १ आरोप केलेला; आरोप असलेला; (आरोपाच्या सर्व अर्थानें) आरोप पहा. २ खोटा; बनावट; ढोंगी. ३ गुन्हेगार; ज्याच्यावर आरोप ठेवला गेला आहे असा. 'समोर आरोपिताकरतां जागा होती.' –सासी सेंडानी १५१. 'प्रेमशॅस्टाप्रमाणें आरोपित लेखांचा नाटकदृष्ट्या विचार करण्याचा अधिकारच...कोर्टाला नाहीं.' –टि ३.३५३. [आरोप]

**आरोरा**—पु. उषा; अरुण; प्रभात; प्रभातकालीन आकाशाचा वर्ण. [इं.] **०बोरिआलिस**—पु. उत्तरध्रुवाजवळील प्रदेशांत पडणारा एक चमत्कारिक प्रकारचा प्रकाश.

**आरोळापारोळा**—क्रिवि. स्नान न करतां, न धुतां सगळा (मासून, कपडा, भांडें वगैरे). पारोसा पहा. [पारोसा द्वि.]

**आरोसा**—अरोसा पहा.

**आरोह**—पु. (संगीत) षड्ज स्वरापासून वर निषादाकडे स्वर म्हणत जाणें. [सं.]

**आरोह, आरोहण**—पुन १ चढणें; वर जाणें; उठणें. 'सिंहासन होईल आपण। वरि गुरु करिती आरोहण।' –ज्ञा १३.४२४. २ (ल.) प्रगति; वाढ; वृद्धि. ३ आरंभ करणें; उद्युक्त होणें. 'चढे प्रेमाचें भरतें। तें वाढेक आवरोनि चित्तें। पुढील कथा निरूपणातें। करी निधिनें आरोहण।' –एभा १.१७६. [सं. आ+रुह्= वाढणें, चढणें]

**आरोही वर्ण**—पु. (संगीत) षड्जापासून निषादाकडे वर जाव जावयाचे स्वर [सं. आरोही+वर्ण]

**आरोळी**—स्त्री. १ जोरानें हांक; ललकारी. अरोळी पहा. (क्रि० ठोकणें; मारणें). २ मोठ्यानें ओरडणें, गर्जणें; गर्जना करणें. 'बाळें चरफडतां देरें जाळीं। आक्रंदोनि दे आरोळी।' –एभा ७.६००. [सं. आ+रु= आवाज करणें] म्ह० अस्वला आधीं आरोळी=संकट येण्यापूर्वीच त्याबद्दल गाजावाजा करणें. 'सरकारनें आपलें नवें धोरण जाहीर करण्यापूर्वीच अस्वलाआधीं आरोळी या न्यायानें जनतेनें आपल्या गान्हाण्यांची दाद सरकारपुढें मांडली पाहिजे.' –सासं २.२३८.

**आरोळी**—स्त्री. १ कणीक व हरभऱ्याचें पीठ एकत्र करून त्यात तूप व मीठ घालून, साखर, वेलची इ घालून तिंबून ते भजाप्रमाणें तळून करतात –गृहि ३९ २ गारार, निखाऱ्यावर भाजलेली जाड पोळी. ३ चादकी, पातळी, अरोळी [अहार=निखारा+पोळी]

**आरौतें**—अहता -अलें पहा १ पूर्वी; अगोदर. आरता पहा. 'पै चंद्रोदया आरौतें। जयाचे डोळे फुटती असते। तें काउळे केवीं चंद्रातें। पोळपती' –ज्ञा ४ २४. २ अलीकडे; या बाजूला. 'चौथे शापूनि केले परते। कनिष्ठ पाचारिले आरौतें।' –मुआदि १९ १०२ ३ शिवाय, विना 'जैसें कल्पांतींचे मरितें। स्थळ जळा दोहीतें। बुडविल्या आरौतें। राहेचि नेणें।' –अमृ ४.११. –वि. अपुरें; कमी. 'तो काय बोलोनि दाखवूं आतां। बोलणें बोलतां आरौतें पडे।' –निगा १९६. [सं. अर=सामिप्य, आरात्=निकट]

आर्क—१ वालेकिल्ला -रा १ १९४ अर्क पहा २ कमान [पोर्तु आर्कु, इं आर्क] आर्का घालीत चढणें (जाणें)-(गो) वाकडें तिकडें जाणें, धिमत जाणें

आर्क लाइट—पु (फोटो) काळोखाच्या वेळीं विशेषत पाव साळ्यात ज्या प्रकाशात फोटो घेतात तो प्रकाश हा विद्युत्जन्य आर्क नावाचा विशिष्ट प्रकारा कर्बापासून घेण्यात येतो [इं आर्क+लाइट=प्रकाश]

आर्कारी—स्त्री (गो) (वहाणेचा) घोरंग (पहिला) पट्टा (तळास शिवण्यात येणाऱ्या चकाकृति दोन पट्टयापैकीं अर्धकाढ्या पट्टा) हा दुसऱ्यापेक्षा रुद असतो शोभेसाठीं कोठें कोठें या पट्टयावर एक अगर तीन गुड्या बसवितात

आर्गळा—स्त्री अडसर, अर्गळा पहा 'आपोआप वेड्या तुटल्या शृखळा। वदाच्या आर्गळा कुलपें सोडि ॥' -तुगा १०

आर्गुमास—न (गो) कात, गूळ वगैरे घालून तयार कलेला चुना [पोर्तु ऑर्गामस]

आर्चकोन—कमानीचे दाड, आचकोन पहा 'कमानीची जाडी ३ फुटापक्षा अधिक असल्यास आर्चकोन कमानीच्या पूर्ण जाडीचे पाहिजेत' -तपशीलपत्रकें (म्यारट) ४७ [इं आर्च=कमान]

आर्चलॅम्प—(सिनेमा, फोटो) विशिष्ट वस्तूवर तीव्र प्रकाश पाडण्याचा (फोकसिंगचा) दिवा [इं]

आर्जल—अरजल पहा

आर्जव—न १ सरळपणा, ऋजुता, प्रमाणिकपणा, साधेपणा, भलेपणा 'तैस प्राणिमात्रीं सौजन्य। आर्जव तें।' -ज्ञा १६ ११३ ०शक्ति-सभ्यपणें किंवा नम्रपणें वागण्याचा गुण, चांगली रीत भात, सौजन्य कुलीनता [स ऋजु-आर्जव]

आर्जव—स्त्री १ स्तुति विनति, सेवा, उपासना, मनधरणी 'कैसें याचें आर्जव फळे।' -सुच ९ २२ २ (ल) खुशामत, खुशी होणें, हांजी हांजी करणें 'आर्जव वाटल त्यानें वाटल त्याचें करावें तें करण्याची सनद अगर हक्क कोणी कोणास यावा लागत नाहीं' -टि ३ १६७ 'त्यास योगक्षेमाविषयीं कोणाचें आर्जव न पडे तें करावें' -मराभा ११ 'तो (घाशीराम) प्रथम काहीं दिवस सरकारदरबारात जाऊन मुत्सद्दी मंडळीचे आर्जवात असून उमेदवारी करून पोट भरीत होता' -घाशीराम-प्रथमप्रवेश (क्रि० सपादणें) [फा आर्झू] ०शक्ति-स्त्री १ सेवा, खुशामत, आर्जव करण्याची शक्ति हांजीखोरपणा 'मी म्हातारा झालों, व माझ्या अगात आता आर्जवशक्ति नाहीं' ०संपादन-न (अशुद्ध प्रयोग) मनधरणी, हांजी हांजी, खुशामत (क्रि० करणें)

आर्जविणें—उक्रि आर्जव करणें, खुशामत करणें हांजी हांजी करणें, आर्जव करून प्रसन्न करणें, मिनतवारी करणें [फा आर्झू, तुरु० स आर्जव]

आर्जवी-वृ—वि १ आर्जव करणारा, आर्जवात राहणारा २ खुशामत करणारा, हांजीखोर ३ आर्जवासंबधी

आर्जू—स्त्री इच्छा 'बल्की मार्गात पडचे व पुढें स्वच्छता व्हावी ऐसी कल्याणराव यांची आर्जू' -ऐ ७ खल १८ -वि इच्छा करणारा, इच्छु, आर्जूमंद 'गोहजवालाही फार आर्जू आहे कीं ग्वालेहर घेऊन माझा मुलुख साहून यावा' -मदबा १ १९० [फा आर्झू] ०मंद-वंद-वि आर्जू इच्छू उत्सुक 'फराशीस सर्का राशीं दोस्ती करण्यास बहोत पाव्हून बहुत आर्जूमंद' -रा ७ ० ६६ 'अगोधर कांहीं आर्जूवंद नव्हतों व पुढें ही आम्ही होत नाहीं' -रा ६ ६०५ [फा]

आर्जी—स्त्री मागणी, आर्जव 'तेथील अमीर आमची आर्जी करितात' -रा ३ ४२८ [फा आर्झू]

आर्टिकल—न १ वृत्तपत्रातील किंवा मासिकातील लेख 'आर्टिकल्ची मर्यादाहि भरत आली' -आगर ३ १४० २ नियम, करार, सॉलिसिटर व्हावयास करतां करावा लागणारा करार ३ वस्तु ४ उपपद [इं]

आर्टिकल्स ऑफ असोसिएशन—न ३ (कपनी कायदा) कपनीचे नियम, शर्ती, कलमबंदी [इं]

आर्टिलरी—स्त्री तोफा, तोफखाना [इं]

ऑर्डर—स्त्री १ व्यवस्था, क्रम, परपरा २ बदोबस्त, टाकटिकी, जम ३ आज्ञा हुकूम ४ (व्यापारी) मागणी, मागणीची नोंद 'कित्येक व्यापाऱ्यानीं विलायती मालाच्या दिलेल्या ऑर्डरी रद्द केल्या' -क ३१ ५ ३० ०बुक-न आज्ञापुस्तक, कार्यक्रमाचें पुस्तक, मागणीवही [इं]

ऑर्डर्ली—पु. लष्करी अमलदारास लष्करखात्याकडून तैनाती करिता दिलेला फौजी नोकर, हुजऱ्या (अप) अडली [इं]

ऑर्डिनन्स—पु १ शासन, कायदा २ वटहुकूम 'ऑर्डिनन्स प्रसिद्ध करून वृत्तपत्राची मुस्कुटदाबी करण्यात आली' -के १७ ६ ३० [इं]

आर्त—स्त्री १ उत्कंठा, आतुरता, तळमळ, इच्छा 'पाहे पा श्रीरामाची प्रसन्नता। तया उपमन्यूचिया आर्ता। काय क्षीराब्धि दूधभाता। देइजेचिना।' -ज्ञा ५ ११ 'श्रेष्ठ दुर्लभ जो पदार्थ। त्यावरी सकळाचीही आर्त।' -मुआदि ४ १५० -वि १ रोगी, आधिव्याधिग्रस्त २ दुःखित, पीडित, त्रस्त 'नातरि आर्तातें स्पर्शिजे। अमृतमाळु।' -ज्ञा १३ ८८७ 'भीष्म द्रोणासि म्हणे आग कीं आर्तशब्द हा कानीं।' -मामीष्म ५.५५ ३ आतुर, उतावळा सामासशब्द-कामार्त क्षुधार्त, रोगार्त तृषार्त वगैरे [म] ०बंधु-पु दीन बधु पीडितांना सकटातून सोडविणारा 'आइक गा आर्तबंधू। निरंतरकारुण्यसिंधू।' -ज्ञा १४ ३ ०भूत-वि उत्कंठेनें पीडित झालेला, खत घेतलेला आर्त झालेला 'पतिव्रता द्रखोनि कृष्णनाथ। श्रवणार्थी आर्तभूत।' -एरुस्व ३ ५३ ०साधु-अभिमानी-वि

दीनाना दयाळु दु खिताचा परामर्श घेणारा, आर्तबंधु ०स्वर-पु दु खिताचा आक्रोश, दु खाची आरोळी, संकटाच्या वेळची हाक

**आर्तक**—वि उत्कंठित असणारा, आतुर असलेला 'अहो एका भाविक । रत आर्तक मुमुक्षु ते।' –निगा १५२ [स आर्त ]

**आर्तव**—पु स्त्रियांचा विटाळ, स्त्रीरज, शोणित –वि विटाळा संबंधी जसें–आर्तवदोष=प्रदर, धुपणी वगैरे विटाळासंबंधीं रोग [स ऋतु]

**आर्तवंत**—वि उत्सुक, आतुर 'धाविनले लक्षानथोर। आर्त वत पहावया।' –मुआदि २८ ५४ [स आर्त]

**आर्ता**—क्रिवि अलीकडे, इकडे अरता पहा 'देव पर्ताचि आर्ता।' –दावि ४१३

**आर्ति**—स्त्री १ दु ख, पीडा, उपद्रव 'जयाचि आर्तीचि भोगित। विषयीं त्यजिलें स्त।' –ज्ञा २ १७० २ उत्कट इच्छा, आतुरता 'कीं गोपिकांची पुरवावया आर्ती। मी झालों श्रीपती कामारा।' –एभा १६ ३१४ 'तुका म्हणे तरी सज्जनाची कीर्ति। पुरवावी आर्ति निर्बळाची।' –तुगा १५०३ [स आर्ति ]

**आर्तिक**—वि इच्छा करणारा, इच्छायुक्त, सकाम, लोभी 'मग तो म्हणे स्त्रियेकारणें आर्तिक नरू काय न करी।'–पच ४ ७ [स आर्त]

**आर्ता**—क्रिवि (चि गो) अलीकडे, जवळ, अगोदर अरता पहा

**आर्थ**—वि १ अर्थासंबंधीं, विषयासंबंधीं, वाच्यार्थासंबंधीं शब्द याच्या उलट २ अभिप्रेत, ध्वनित, गर्भित [स अर्थ]

**आर्थिक**—वि १ आर्थ पहा २ अर्थशास्त्रानुसार (इ) इका नॉमिक अर्थशास्त्र पहा ३ संपत्तीच्या आयव्ययासंबंधीं, नफ्या तोट्यासंबंधीं, सांपत्तिक द्रव्य, धन यासंबंधीं (इ) फायनॅन्शिअल 'सुधारणाकायद्यात आर्थिक स्वायत्ततेचा मागमूसहि नव्हता'–क १४ ६ ३० 'आर्थिक स्वरूपाचीं (फायनॅन्स) बिलें मात्र समग्र सभेच्या कमिटीकडेच जावीं लागतात'–पार्लमेंट ९० [स अर्थ= द्रव्य]

**आर्द्र**—वि ओला, आवट ओला, दमट, भिजलेला सामा शब्द–दयार्द्र, प्रेमार्द्र इ० [स ]

**आर्द्रक**—न आलें, ओली सुंठ [स ]

**आर्द्रता**—स्त्री १ ओलेपणा, आलावा २ (पदार्थविज्ञान) हवेंतील दमटपणा (इ) ह्युमिडिटी ०दर्शक–पु (इ) हायग्रो स्कोप ०मापक–न हवेंतील आर्द्रता मापण्याचें यंत्र, (इ) हायग्रोमीटर [स ]

**आर्द्रा**—स्त्री सत्तावीस नक्षत्रांपैकीं ६ वें नक्षत्र, [स ]

**ऑर्फनेज**—न. अनाथबालगृह, बालाश्रम, संगोपनगृह [इ ऑर्फन=पोरका, अनाथ मूल]

**आर्म**—न १ शस्त्र, हत्यार, चिलखत २ हात, बाहू ०चेअर–स्त्री हाताची किंवा हात असलेली खुर्ची [इ ]

**आर्मी**—स्त्री सैन्य, फौज, लष्कर [इ ]

**आर्य**—पु १ एक मानववंश, (इ) आर्यन् २ वैदिक, प्राचीन वैदिक ऋषींनीं, ब्राह्मणांनीं प्रस्थापित केलेल्या देवतांची उपासना करणाऱ्या जातीस हें राष्ट्रवाचक नांव होतें याच्या उलट अनार्य, श्रेष्ठ, विद्वान्, आदरार्ह माणूस, कुलीन, सदाचारी माणूस ३ मद्रास इलाख्यातील पत्तर ब्राह्मणाची विशिष्ट जात [स आर्य]

**आर्य**—वि १ कुलीन, श्रेष्ठ, सभ्य, मान्यवर, वडील 'पर मोदार वृकोदरभुज यश दतील शीघ्र आर्यातें।' –मोसभा १ ८६ 'सौमित्रे मजविषयीं तू आर्यप्रार्थना करीं कांहीं'–भक्तमयूर केका ११४ २ आर्य लोकाना शोभणारें (वर्तन, वागणूक इ०), ३ यथो चित, युक्त, लायक, योग्य जसें–आर्यवेष, आर्यधर्म ४ आर्यासंबंधीं, आर्यांची जसें–आर्यभाषा, आर्यदेश ५ मोठ्या माणसाला आद रार्थी वापरतात, बहुमानसूचक पदवी 'आर्या, राजा कोठें बांधे तदद शैनेंचि भी माते।'–मोकर्ण ३६ ४९ 'पुण्यास पेशव्यांच्या दरबारीं असलेला पटवर्धनाचा वकील बाबा काळे आपल्या पत्रव्यवहारात परशुरामभाऊला 'आर्य' शब्द योजी'–खरे ५२८५ व ५२९८ [स ]

**आर्यन्**—आर्य पहा –वि (भाषा, समाजशास्त्र) १ आर्य भाषा, लोक वगैरे संबंधीं, आर्यवंश्य,आर्यपरंपरेंतील २ आर्य भाषा वंश, याला इंडोयुरोपियन किंवा इंडोजर्मानिक म्हणतात संस्कृत, झेंद, पार्शी, ग्रीक, लॅटिन, केल्टिक, टयुटॉनिक आणि स्लॅव्हॉनिक या भाषा आपल्या अर्वाचीन पोटभाषासह आर्यन् भाषेंत समा विष्ट केल्या जातात ३ आर्य मानववंश, आर्य भाषा बोलणारे लोक यांत येतात हिंदी लोक, इराणी, ग्रीक, रोमन, इटालियन, फ्रेंच, जर्मन, स्कँडिनेव्हियन्, स्पॅनिश, केल्ट व स्लाव्ह हे प्रमुख लोक या आर्यन् महावंशात येतात

**आर्यपुत्र**—पु श्रेष्ठ, थोर माणूस (संस्कृत नाटकांत नवऱ्याला संबोधितात) आता आर्यपुत्रापुढें स्वता केलेली कांहीं कविता म्हणून दाखीव'–वम ३० [स ]

**आर्यभाषा**—स्त्री १ आर्यभाषावंशातील भाषा २ संस्कृत भाषा

**आर्यव्रत**—न आर्यांनीं पाळून दिलेले आचार,नियम, कौलिन्य, सदाचरण (शरणागताची उपेक्षा न करणें, दीनावर दया करणें इ०) 'आता याही आर्यव्रत कैसें जीवितार्थ सोडावें।' –मोउद्योग ८ ७६ [स ]

**आर्यसमाज**—पु स्वामी दयानदसरस्वती यानीं स्थापन केलेला, वेद मानणारा धार्मिक पंथ हा हिंदुस्थानातील एक मह त्वाचा एकेश्वरी पंथ आहे. आधिभौतिक, आध्यात्मिक, सामाजिक वगैरे बाबतींत मनुष्यजातीचें कल्याण करावें हा याचा उद्देश आहे हा सप्रदाय जातिभेद मानीत नाहीं हिंदु सघटनेच्या कामीं यानें अलौकिक काम केलें आहे. [स ]

**आर्या**—स्त्री १ श्रेष्ठ, आदरणीय स्त्री, स्वाध्वी स्त्री (मि ) आर्याणी=पडदानशीन स्त्री 'चाले दर्वी (द्रौपदी) जीचा कवारी देवेंदेव ती आर्या।'—मोस्त्री २ ३ २ एक वृत्त, छंद, आर्येच्या प्रत्येक अर्धात साडेसात मात्रागण असावेत त्यात विषमस्थानीं ज गण नसावा आणि षष्ठस्थानीं ज गण किंवा न गण यावा हा सामान्य नियम आहे आर्या, गीति, उपगीति, उद्गीति आणि आर्यागीति असे आर्यावृत्ताचे पाच भेद आहेत यानील प्रथम आर्या हा वृत्तप्रकार सस्कृत असून मराठींत हें वृत्त क्वचित येतें आर्या नावाचें जें वृत्त मराठींत आहे तें वास्तविक गीति आहे मोरो पत यासच आर्यावृत्त म्हणतात 'शोभा आर्यावृत्तें आली भुललील यासि कवि कोटी।'—मोभीष्म १२ ७९ पहिल्या व तिसऱ्या पादात १२ मात्रा, दुसऱ्यात १८ आणि चौथ्यात १५ असें वास्त विक आर्यावृत्ताचें लक्षण आहे 'गीति' पहा 'आर्या आर्यासि रुचे ईर्च्या दार्यी जशी अमे गोडी। आहे इतरा छर्दी गोडी परि याप रीसती थोडी॥'—मोस्फुटआर्या **आर्यागीति**—स्त्री या वृत्ताच्या पहिल्या व तिसऱ्या चरणात १२ मात्रा असुन दुसऱ्या व चौथ्या चरणात २० मात्रा असतात उदा० सत्यप्रतिज्ञ भीमस्तुतिपाव वधु कल्लोहितपानें। मारी वसिष्ठ-सुत जो मुनि विश्वामित्र तद् कीर्ति तोहि तपानें॥'—मोकर्ण ६ ३२ [स ]

**आर्या (र्ये) करणें-होणें**—क्रि १ खालीं करणें, खालीं ठेवणें, पाडणें 'आगबोटीचो जिनो आर्या कर' २ (नाविक) शीड उतरणें, शीड खालीं करणें पाडणें ३ (कु) मरणें 'बातमी ऐकल्या बरोबर त्यानें आर्या केलान्' ४ नाश करणें 'भगाऱ्या गवताची आर्या रे। माझ्या बैलान केल्यान् रे [का आर=विमणें, नष्ट होणें]

**आऱ्या**—फजीती, अऱ्या पहा [चोऱ्या द्वि ]

**आर्या**—पु (भिल्ली) सोबती, मित्र 'आमी माझा आऱ्यो हरज्यो तियाला गोठ्याओव' [स आर्य=मित्र ]

**आर्यावर्त**—पु आर्यांचा प्रदेश, आजचा उत्तरहिंदुस्थान, आर्यावर्ताची प्राचीन सीमा—पूर्व समुद्र, पश्चिम समुद्र, उत्तरेस हिमा चल आणि दक्षिणेस विंध्याचल, यामधील भाग [स ]

**आर्चिहली**—वि (गो ) अर्वाचीन

**आर्ष**—पु मूळव्याध अर्श पहा [स अर्श]

**आर्ष**—वि ऋषिमर्बधी, ऋषिप्रणीत (ग्रथ, आचार, प्रयोग इ०) 'रामयशोमयशर्तीं क्षम जीवा जेविं आर्ष ताराया।'—मोभीष्म ५ २९ २ पवित्र, पूज्य, प्रमाणभूत, आधारभूत (ग्रंथ, सप्रदाय, ज्ञान वगैरे) ३ (ल ) मद, जड, अव्यवस्थित, मूर्ख, हट्टी, हेकेखोर ४ असमजस, अयुक्त, मूर्खपणाचें, फाजील (भाषण, मत वगैरे) 'तैसें माझें आर्ष बोलणें पूर्ण। अगीकाराल वाटतें।'—भवि १ ४१ ५ विचित्र, तऱ्हेवाईक, स्थीर धरून नसलेला [ऋषि कालीं संस्कृत भाषा प्रचलित असल्याकारणानें तिच्यात नेहमीं फेरबदल होत असत म्हणजे पूर्वीचे कांहीं शब्द व रूपें नष्ट होऊन नवीन शब्द व रूपें भाषेत येत असत ऋषींनीं आपल्या वेदमत्रात योजिलेले शब्द व रूपें हीं जेव्हा अप्रचलित झालीं तेव्हा त्याना आर्ष (ऋषींनीं योजिलेलीं) असें म्हणत व असे अप्रचलित शब्द व रूपें चालू नसल्यामुळें कानाला विचित्र लागत यावरून आर्ष शब्दाचे लाक्षणिक अर्थ झाले ] ०प्रयोग—पु ऋषींनीं दृष्ट मत्रा वेदग्रथात पाणिनीय व्याकरणाच्या नियमाला सोडून असणारा प्रयोग ०भाव—पु. भोळा भाव 'परि सगुणस्वरूपें आर्षभावार्थें।'—सप्र १ ७१ ०विवाह—पु नैवर्गिकाच्या अष्टविवाहातील एक प्रकार, यात मुलीचा बाप वराकडून गाय व बैल याची एक किंवा दोन जोड्या घेऊन त्यास आपली मुलगी देतो 'अष्टविवाह' पहा [स ]

**आर्सेनिक**—अरसेनिक पहा

**आऱ्हां**—क्रिवि अलीकडे 'जया जें आऱ्हा परौत। जया जें पुढें मागौ तें।'—ज्ञा १५ ७१ [स अर=सान्निध्य, प्रा आरओ]

**आल**—स्त्री एक झाड, याच्या मुळ्यापासुन व सालीपासून तावडा रग काढून त्याचा कातडें, रेशीम वगैरे रगविण्याकडे उपयोग करतात याम सुरगी असेंहि म्हणतात याचीं पानें मोहाच्या पाना सारखीं व फुलें पाढुरक्या रगाचीं असून तीं बारमहा येतात याचीं फळें लोणच्यात घालतात याची लागवड वऱ्हाड-खानदेशांत फार होते रगाच्या उपयोगी झाड होण्यास तीन वर्षें लागतात मुळ्या पासून पक्का तावडा रग होतो त्याचा सतरज्या, पासोड्या रग विण्याच्या कामीं उपयोग होतो वऱ्हाडात आल नावाचे झुप आहेत त्याच्या मुळ्यापासुन तावडा रग करतात आलवण म्हणून आल वृक्षापासुन जो तावडा रग निघतो त्यानें रगविलेलें कापड अलवन पहा [स आलक्तक, हिं आल, अर अलवन]

**आल**—वि (गो ) १ कोंवळा 'नाल मात्सो आल आस'= नारळ थोडा कोंवळा आहे २ मूर्ख, खुळा [स आर्द्र, म ओल तुल० प्रा आल=कोमल]

**आलक**—पु कपटी, लबाड मनुष्य, गुन्हेगार 'अम जरी आपण मालकाही। न देय येऊ पण आळ काहीं।'—साराह १ ६२ [स आल=कपट]

**आलकटपालकट**—अलकट पालकट पहा

**आलकडी**—स्त्री (गो ) दालकडी पहा

**आलंकारिक**—वि १ अल्कारयुक्त,भूषणें,दागिने,शोभादायक वस्तू यानीं मंडित, सुशोभित, सुंदर २ साहित्यशास्त्रातील गुणांनीं युक्त, उपमा, रूपक, वगैरे काव्यगुणानीं पूर्ण ( पद्य, ग्रथ, भाषा सरणी ) ३ अलंकारशास्त्राचें ज्यास ज्ञान आहे असा ( मनुष्य ) [स ]

**आलख**—पु अलक्ष, ब्रह्म अलख पहा 'आलख तो सक लाहुनि वर्ता ।' –दावि ३७९

**आलखणें**—क्रि हलणें, ओघळणें 'तो परमानंद आलखेला ।' –शिशु ४१० [स आ+लष्=जाणें, हलणें, किंवा पाल्ख द्वि, तुल० का अल्कु=हालणें ]

**आलखतीं**—क्रिवि अदृश्य, न कळण्याजोगें 'सत्यलोकीं आलखतीं वाधिली । तैंसी अमूर्ते दृष्टी पातलीं ।' –दाव ८७८ [स अलक्ष्य]

**आलखपलख, आलखटपलखट मारणें**—माडी घालणें, अलखटपालखट पहा 'आलख पलख मारी यथपी कमाना तीर वसुनि वस्ती ।' –सला ६३

**आलखिडी**—स्त्री (गो ) आकडी अर्थ ४ पहा विळा, कोयती वगैरे ठेवण्याचा खाच पाडलेला एक लाकडी तुकडा एका वाटोळ्या फळीस एक लाबट खाच पाडून त्या खाचेंत कोयता ठेवतात व त्या फळीस एक आडवें भोक पाडून त्यातून दोरी ओवून त्या दोरीनें फळी कंबरेस बाधतात ती बाधल्यावर त्या खाचेंत कोयता स्थिर राहतो माडावर चढतेवेळीं कोयता नेण्यास हिचा उपयोग होतो एका खाचेंत एकच कोयता ठेवतात

**आलग**—न १ अग्र, टोंक २ (ल ) क्षेप, फेंक 'पुढें दृष्टि चेनि आलगें। खोंचि वीं निवटी मार्गे ।' –शमू २ १९ [स अ+लग]

**आलगट**—वि द्वाड, कुभाडी अलगट पहा 'आलगटा अव ध्याचि नारी । नसतींच गान्हाणीं आणिता ।' –निगा ३५

**आलगरजी**—अलगरजी अर्थ ३ पहा 'कामापुरता हात परवर फुरवाळसी । आलगरज्या वाम वरून वटाळसी ।' –होला ८५

**आलटपालट-उलटापालट**—अलटापालट पहा

**आलतड**—(गो ) अल्तड पहा 'गोरा आलतडी आसा कीं पल्तडी ?'

**ऑलतेर**—न (गो ) पहुडण्याची खुर्ची, आरामखुर्ची. [फ्रें व्होल्टेर ]

**आलपीन**—स्त्री (कर ) केसाची विशिष्ट रचना 'वाढू अल्पीन राखू नको ' 'त्यानें आलपीन राखली ' [इ आलपीन या विशेषनामावरून ]

**आलंपेड्वार**—वि (गो ) वडील अगर पालक याचा दाब नसलेला, रिकामटेकडा

**आलंब**—पु १ ओळवा, लवक २ आश्रय, आसरा, अवलंबन 'तेयेचेनि आलबें । तो तयासी न निसव ।' –विपू ७ १२३ [स]

**आलबेला**—अलबेला पहा 'सखे हे शृगाररसाचे रंगे । वनली आलवली ।' –होला ८४

**आलंभाव-य**—पु (गो ) सोयरे, दूरचे नातेवाईक, अल-वतेगल्वते उ० ऑल्भाय कॉल्भाय=रिकामटेकडे माणूस [इ ऑल=सर्व किंवा म आला+भाऊ ]

**आलम**—अलम पहा १ जग, लोक 'रघुनाथराव बिरादर असता त्यांणीं दगा केला, आलमशिवाय ( दुनियेविरहीत ) हे गोष्ट त्याजकडून अमलांत आली ' –ख ७ ३५६६ 'सपूर्ण आलमात जालें कीं याची दोस्ती होऊन टोपीकरास सजा करावी एसा नक्षा आला हा लौकिक ' –रा १९ ९२ २ काळ, स्थिति, अमल 'करारांप्रमाणें फडचे करावे, यास दिरंग लावून तफावत होणें दोस्तीचे आलमात दुरुस्त नाहीं ' –रा ५ ३४ [अर आलम=जग]

**आलमगिरी**—पु (व ) एक अल्प किंमतीचें नाणें अलम गिरी पैसा पहा 'मी तुला एक आलमगिरी सुद्धा देत नाहीं '

**आलमारी**—अलमारी अर्थ २ पहा 'विषयसुखाच्या आलमारीच्या मादया तीवर तपेहदा ।' –पला ९३

**आलय**—न घर राहण्याचें ठिकाण, निवासस्थान, वसति स्थान, मंदिर २ साठा, खनिना, कोठार सामाशब्द–देवालय, धर्मालय, सर्पालय 'जें धर्मालय म्हणिजे ।' –ज्ञा १ ८६ [स ]

**ऑलराइट**—उद्गा १ सर्व ठीक, बरोबर २ बरें तर, तसेंच –सु ४ [इ ऑल=सर्व+राइट=बरोबर ]

**आलवण**—अलवान पहा

**आलवारजोडा**—पु (चाभारी ) मारवाडी जोडा ( साध्या घाटाचा) [ अलवार नावाच्या गावावरून तेथील घाटणीचा जोडा ]

**आलवाल**—न आळें, पाणी राहण्यासाठीं झाडाभोंवतीं केलेला खळगा, 'आलवाल न भरिता जळें । सुरतरू ओपी इच्छिलीं फळें ।' –मुआदि ३० १३० [स ]

**आलस, आलस्य**—पु न आळशीपणा आळस पहा 'सर्वेद्रिया जाड्य । मनामाजीं मौढ्य । माल्हाती दार्ढ्य । आल स्याचें ॥' –ज्ञा १४ १७९ [स ]

**आलव्हीस**—स्त्री (गो ) आनंदप्रसगीं देतात ती चिरीमिरी किंवा तशीफ [ पोर्तु आलव्हिस् ]

**आला**—अक्रि येणें याचा भूतकाळ, आगमन झालें–केलें [स आगत प्रा आअअ, आल ] ०**गेला-भला**–वि १ यणारा जणारा २ (ल ) पै पाहुणा, अतिथि अभ्यागत 'त्याच्या घरीं आल्यागेल्याची वर्दळ फार, तरी कंटाळा नाहीं ' **आल्या गेल्याचें घर**–ज्या ठिकाणीं नेहमीं पाहुणे येतात तें घर म्ह० १ आलागेला गोसावी दाढेला दिला २ (कर ) आलागेला भाकरी ईल टोला=एकाच माणसाला काम सांगून अथवा वोलून बोलून

सनावणें या अर्थी ०दिवस-क्रि वि खंड न पडता, दररोज, प्रत्येक दिवशीं, जो दिवस येतो त्या दर दिवशीं 'मुर्गीत घरीं आल्यापासून हा आला दिवस खेळतो आहे '

**आला**—वि अत्युच्च, सर्वश्रेष्ठ 'प्रस्तुतचा रंग तर असा दिसतो जें आला व अदना खानदानापाशी बरावर ' -रा ५ ९ [अर आला=श्रेष्ठ] ०दर्जा-पु (ना) उत्कृष्ट, सर्वोत्तम स्थिति ०हजरत-पु सर्वश्रेष्ठ स्वामी हैद्राबादच्या निजामाला त्याची प्रजा या नावानें संबोधितात [हज़रत=स्वामी]

**आलात**—पु कोलीत, जळतें पेटलेलें लाकूड अलात पहा ०चक्र-न कोलीत वाटोळें फिरविलें असतां दिसणारें चक्र, कडें 'आलातचक्रींचा निर्धार । अभि सत्य मिथ्या चक्र ।' -एभा १३ ५५१ [स]

**आलाप-फ**—पु १ बोल, बोलणें, भाषण 'त्याचिये वाचेचा ठाईं । हरिनावीण वार्ता नाहीं । आलापु जितुका काहीं । तो तद्दि पर्याय जयाचा ।' -रास २ ६७२ २ परस्पर भाषण-बोलणें, समाषण, चर्चा 'दैत्य मिळोनिया सकळीं । आलाप मांडिला पाताळीं ।' -कथा ४ १३ ४९ 'परी हे प्रासंगिक आलाप । आता असतु न बोलों सखेप ।'-ज्ञा ७ ४४ ३ वर्णन, गोष्ट, कथा 'जयाचिये वाचे माझे आलाप । दृष्टी भोगी माझेंचि रूप ।' -ज्ञा ९ ४४५ ४ गाण्यातील-संगीतातील स्वर, तान, लकेर; रागाचा आकार ५ आवाजी जमविणें, गाण्याची तयारी करणें ६ (ल) रडणें, ओरडणें [स आ+लप्-आलाप]

**आलाप(फ)चारी**—स्त्री १ आलाप, आलाप काढणें, गाण्याला सुरवात करण्यापूर्वी स्वर जमविणें [स आलाप+चर-चारी]

**आलाप(फ)णें आलापि(फि)णें**—अक्रि आलाप करणें, आलाप घेऊन गाणें, आलाप काढणें

**आलापाला**—पु पाला, कंदमुळें वगैरे भक्ष्य, जाडें भरडें अन्न, कदन्न, कसें तरी देह निर्वाह होण्यासाठीं अन्न म्ह० आला पाला खाणं आणि गोसावी पाला=जाडेंभरडें किंवा अगदीं साधें अन्न खाऊन जो संतुष्ट असतो अशा माणसाला लावतात [पाला द्वि]

**आलापिनी**—स्त्री १ (संगीत) सतराव्या श्रुतीचें नाव २ वीणा [स]

**आलाबु**—पु भोंपळा अलाबु पहा 'आला मुनी जवळि, आलापिताचि जळिं आलाबुला उसळला ।' -आमा ४५ [स अलाबु]

**आलायबलाय**—अगाईबलाई पहा

**आलावतीण**—स्त्री १ (गो) दाळतपणात मेलेल्या स्त्रीचें पिशाच्च 'आलावतीण जावून गोमेटेरे पनली ' २ (ल) राक्षसी भाडखोर स्त्री [स आ+बाल+वती ?]

**आलावा**—पु आगटी, ताबुतानील निखाऱ्याचा खड्डा अलावा पहा 'त्या मंदिरासमोर मुसलमानाचा आलावा नव्हता पण तेथील मुसलमानांनीं तो पाडण्याचें ठरविलें '

**आलाशिरा, आलाशिरों**—पु (गो) आधार, आसरा, आश्रय 'पूत जोड लागिल्लों जाल्यार विंतेय आलाशिरों जातलों आशिरों ' [स आश्रय]

**आलिकडचा-ला, आलीकडचा, आलीकडील-कडून, आलीकडे**—अम यें पहा

**आलिंग**—पु १ बैलास मारावयाच्या कोरड्याची तुताती (चादी) ज्या कातडी वडीला-वळवाला (कोरड्याच्या मुठीच्या अग्राशीं) बांधलेली किंवा अडगविलेली असते तें वळें, कडी २ (व) (दिवाळीचें) पातें वर करण्यासाठीं किंवा बैलाच्या गयाम घड करण्याकरिता जी दोरी उपयोगात आणतात ती [स आ+लिङ्ग]

**आलिंगणें**—क्रि कवटाळणें, मिठी मारणें, आलिंगन देणें, भेटणें 'कीं आलिंगावेंभा श्रीकृष्णराजा ।' -दाव १७१ [स आलिंगन]

**आलिंगन**—न कवटाळणें, मिठी, गम (क्रि० देणें) (गो) आलिंगणा घालप-लोंगणा घालणें, मनधरणी करणें

**आलिंगित**—क्रि वि कवटाळलेला, मिठी मारलेला आलिंगन दिलेला

**आलिजा आलिजाहा, आलेजा**—वि उच्च पदवीचा उ० आलीजा बहादर शिंदे अलीजाहा पहा [फा आलीजाह्]

**आलिव्ह**—पु एक फळझाड, भूमध्यसमुद्राच्या आसपासच्या याची लागवड होते याच्या फळाचें तेल काढतात काहीं ठिकाणीं फळाचें लोणचें घालतात फळापासून रंग तयार होतो आलिव्हाचें पान, फांदी, माळ खिस्ती लोकात शांततेचें निदर्शक मानितात [इ]

**आलिशा, आलिशान**—वि उच्च दर्जाचा, मोठ्या मानाचा अलिशान पहा [फा आलीशान्]

**आली**—स्त्री आळीचा रंग करणारी एक जात हे लोक नेमा डात राहतात -कृपि ४१४ आळ पहा

**आली**—स्त्री १ सखी, मैत्रीण 'मेली मदत कराया सकलि पाहूनि आपुली आली ' 'आलीजनें अति सुमधहि धुपवीलें।'-सारुह ६ २० २ पंक्ति, ओळ, रांग [स]

**आलीगेली**—स्त्री नफानुकसान जमाखर्च यशापयश, जय पराजय 'तुम्ही आपले निराळे, आलीगेली मजवर लोटणार ' [येणें जाणें]

**आलीढ (अंगहार)**—पु (नृत्य) आलीढस्थान करून व्यस्तित करणातील हातांप्रमाणें हात करून खांद्यावर हळू हळू ठोकणें, डावा पाय नूपुर व उजवा आलात करणें, नतर उजवा पाय पुढें फेकून हात उरोमंडल करणें, शेवटीं करिहस्त व करिच्छिन्न क्रमानें करणें

**आलीढस्थान**—न (नृत्य) ऐन्द्रस्थानाप्रमाणें उभें राहणें व उजवा पाय पाच ताल पुढें ठेवणें मल्लयुद्ध शत्रूची हेटाळणी वगैरे गोष्टी या स्थानात उभे राहण्यानें सूचित होतात [स]

**आलीवाट**—स्त्री आळेरा मार्ग 'बाण वर्षल घनदाट। हरिमया भुलविल आलीवाट' -एरुस्व १२ १३५ [आली+वाट]

**आलु-लू**—पु १ खाण्याजोगें कंदमूळ, २ (हिं) बटाटा, गोराडू, वगैरे कंद [स]

**आलुका-की, आलुकेपण**—अल्का, अळका पहा 'क्मा प्रीतिचा आलुका देव।' विठुदास ३० 'रसनेच्या ठायीं आलुक पण।' -प्रयराज ७६

**आलुता-ते**—अळुता पहा

**आलुधुखार**—अलुबुखार पहा

**आलें**—अलें पहा

**आलेपण**—न येण्याची स्थिति 'नीं निद्रेवेनि आलेपणें। निफेलें तें जाय प्राणें।' -अमृ ४ ०९ [स आगत-आला+पणा]

**आलेख्य**—न चित्रें काढणें, चित्रकला, रेखाटणें, लिहिणें, चौसष्ट कलापैकी एक कला चौसष्ट कला पहा [स]

**आलेभाऊ, आलेभाय, आलेभाव**—पु अव (गो) सोयरे धायरे, दूरचे नातेवाईक °कोल्हेंभाऊ-येणार जाणारे, भोत पाहणारे, तमासगीर, वगैरे [आला+भाऊ]

**आलें**—न अळें पहा 'कृष्णकथेचें आलें कीजे खोल। बुद्धी भावरसाची जीती ओल' -शिशु २२ [स आल्वाल, तुल का आलि=वर्तुल]

**आलोक, आलोकन**—पु न अवलोक-न पहा १ पाहणें, दर्शन २ दृश्य, देखावा, रूप, आकार, 'पेत खाव का पुढु। ऐसा निश्चयो नाहीं एकु। परी काय पाज नेणो आलोकु। दिसत असे' -ज्ञा १४ ७६ ३ प्रकाश, तेज, दीप्ति ४ विचार विचार करणें [स आ+लोक्]

**आलोकशब्द**—पु राजा चालतांना किंवा सभेत बसला असता त्यानें लोकांकडे पहावें, रामराम घ्यावा इ अर्थाचे चोपदार जे शब्द बोलतात ते, ललकारी, पुकारा [स]

**आलोकित**—वि पाहिलेला, अवलोकन केलेला, अवलो कित -न (नृत्य) नृत्यामध्यें एखाद्या वस्तूकडे पाहणें [स]

**आलोच**—पु विचार, मनोगत, आलोक 'मग समुद्रापैलाडी देखे। स्वर्गीचा आलोचु आइके। मनोगत बोलका। मुनिवरें' -ज्ञा ६ २६९ [स आ+लोच्]

**आलोचणें**—सक्रि १ पाहणें, बघणें, विचार करणें 'माद पुढें बाळका। रितना न पड टाका। तेणें मन देतो टाका। नालाची जा' -ज्ञा ११ १६० 'आलोचितें की पीठिलीत कदर्प' -दावि ३०१ २ सांगणें 'प्रधानि मिळी पालखधानी। दिव्युज आणें प्रणी।' -एभा ११ ११०७ [स आ+लोच्]

**आलोचन-ना**—नकी परीक्षण, निरीक्षण, वारंवार्देनें, पाहणें, विचार करणें, चर्चा, विचार अवलोकन पहा 'तयाप्रती पुलिरा पाणी। आलोचना करी विश्वासें।' -मुआदि १७ २९ [स]

**आलोडणें, आलोढणें**—सक्रि १ हालचाल करणें, ढवळा ढवळ करणें, इकडे तिकडे करणें, घुसळणें, मिसळणें २ (ल) मनात घोळणें-घोळविणें, पुन्हा पुन्हा विचार करणें 'तुम्ही आलो डून स्वप्नाची खूण। साग। मनलागीं।' ३ अभ्यासन करणें, अभ्या सणें 'तैसे शब्दजात आलोडिलें।' -ज्ञा १० १७२ 'आलोडूनि वेदशास्त्रार्थ। ज्ञातेपणें जे पंडित।' -एमा ५५७ [स आ+लुड= हलविणें, आलोडन]

**आलोडन**—न (अप) आलोढन १ काहीं एक पदार्थ ढवळ ण्याचा व्यापार २ (ल) ग्रथादिकातील तत्त्व समजावें म्हणून अनेकवार, अनेकप्रकारें अभ्यासून पाहण्याचा क्रम दीर्घ अभ्यास, अध्ययन [स]

**आलोडित**—वि आलोडन केलेलें [स]

**आलोड्य**—वि (मिश्र) आलोडय, (इ) आलोड १ आलो डन करावयाजोगा, ज्याचें आलोडन करावयाचें आहे असा (ग्रंथ वगैरे) २ पुरकळ आलोडन झाल्यामुळें चांगला परिचित झालेला (विषय) किंवा त्या विषयाचा तज्ज्ञ (माणूस) -न प्रावीण्य, पांडित्य, पारिल्य 'ज्योतिषशास्त्रात त्याचें चांगलें आलोड्य आहे' [स]

**आल्गार्ती**—क्रिवि (व) अचानक अल्गार्ती पहा 'कृष्णा गोविंदाला आल्गार्ती भेटला'

**आल्ब्युमिन**—न श्वेतकल्कल्क, हा दुधात, अंड्यात, रक्तात, वनस्पतींत वगैरे सापडतो (अ) (रसायन) अंड्यातील पांढरा बलक (आ) (वनस्पति) गर्भपोषक द्रव्य, मगज, बीजगर्भक द्रव्य (इ) (वैद्यक) रक्तातील एक घटक ओजस द्रव्य **आल्ब्युमि नॉइड पेपर**-पु (फोटो) अंड्यातील पांढऱ्या बलकानें तयार केलेला कागद [इं]

**आल्म**—न (गो) धैर्य धाडस [पोतु आनिमु]

**आल्मा-आंय**—स्त्री (गो) वडील कुटुंब स्त्री [पोतु आल्म+ आंय=माझी आई]

**आल्याड**—क्रिवि अलीकडे अल्याड पहा 'गरुवलीच्या आल्याड आलों' -चाय २०

**आल्यापायलीं**—क्रिवि एकदम तडकाफडकी आल्यागा 'तू माल्यापायलीं परत गेलेस हें फार चांगलें' -नाटू ३ १० [आलें+ पाऊल]

**आल्हर**—पु अगाई गीत 'गाऊनिया आल्हर बरें। निजी निजवी स्या पुरें।' -गिगा १०४ [अल्हरा?]

**आल्हाद**—आह्लाद पहा

**आल्हादी**—क्रिवि (व) अशद भजा पहा

**आव**—पु १ डौल, थाट, मोठा आविर्भाव, प्रतिष्ठा, महत्त्व 'यथूनि रसां झाला आवो। रसाळपणाचा।' –ज्ञा १ ३३ (क्रि० घालणें, आणणें) 'अंगांत कर्तृत्व नसून आव घालणाऱ्या आमच्या लोकांना मोठा अहंपणा' –नि ६४ २ नीटनेटकपणा, सुरसता, वाह्यसौंदर्य, आकारमनोरमता, सुंदर थाट, (सामा) आकार, थाट, घडण 'मसावरुतेसि प्रचंड। आवो माथूनि उदंड। निर्माण केलें ब्रह्मांड। मयूराढ आकारें।' –एभा २४ १४२ ३ धैर्य, हिंमत हिम्या, धमक, अवसान (क्रि० धरणें, आणणें) 'त्या धर्मेंसीनि नाचे झाले हातचि सर्व भाव रिते।' –मोकर्ण १२ ५ ४ दाब, आटोप, आव, दबदबा, शक्तिक्षेत्र, बल, सामर्थ्य 'तुझिया लाटे पणाचा आवो। तिहीं लोकीं।' –ज्ञा २.९ 'पोटून चित्ताची धाव धराविर्गील आव न कळे कैसा।' –दोला १०१ ५ नेम, पवित्रा 'दृढ साधानिया आवो। निजबळें घालिता घावो।' –एभा १२ ५८८ ६ थाट, घडण (माडें वगैरेंची) ७ उद्भव, उद्गम –शर [स आ+इ=जाणें]

**आव**—वि (व) निर्भेळ, तारें, थोरें; जसें–आवचें दूध= निर्मळ–निर्भेळ दूध [स अव=शुद्धतादर्शक उपसर्ग]

**आव**—पु आवक, प्राप्ति, लाभ 'केवळ माझा उवावो। करितां कोण प्रस्तावो। केल्याहि आवो। काय येथ।' –ज्ञा १८ ६२२ [स आय प्र आव]

**आव**—क्रि (आज्ञार्थी द्वि पु) (हिं गु) ये [स आ+या, प्रा आव हिं आव गु आवो, आवजो] आवजा–(भिडी) (आज्ञार्थी) या 'हा काल लाकडी लिईन आवजा' आवजाव–१ या आणि जा ये, जा, पुन्हां ये असें सांगणें २ (ल) हेलपाटा (क्रि० करणें, मांडणें, लावणें,) आवजाव घर तुम्हारा=दानशूर माणसाचें घरीं कोणी येतो जातो त्यास अनुलक्षून योजितात

**आंव**—स्त्री आंतड्यासबंधी रोग, आमांश, पोटांतील अपक्वता, अपचन, अजीर्ण ०रक्त–न रक्ती आंव, रक्ताची हगवण [स आम, हिं आंव, सिंधी आंई, काश्मिरी ओमु सिंहली अमु]

**आवई**—अवाई पहा

**आवक**—वि आलेला, प्राप्त झालेला, आयात मिळालेला –स्त्री १ जमा, उत्पन्न 'जरी त्याची आवक मोठी असून काट कसरही मोठी असे तरी त्याला जबर कर्ज असे' –इराम १९२ २ आलेलीं पत्रें–पुस्तकें कागद, वगैरे, याच्या उलट जावक ०जावक–स्त्री १ आयातनिर्गत जमाखर्च २ आवकजावक बार निशी, आल्यागेल्या पत्राची नोंद ०बारनिशी–स्त्री आलेलीं कागदपत्रें जींत बार करतात ती वही [स आ+इ=जाणें, प्रा हिं आव]

**आवकणें, आवक्णें, आवंक्णें**—अक्रि अडखळणें, थांबणें, कचरणें, साशंक होणें अवाकणें पहा 'पग यशवंत तूं कर णार ना आज सार' गंगाबाईनीं जरा आवकून विचारिलें –हाव का धर्म २३९ 'आंतून गाण्याचा कोमल सूर येत होते, मी जरा आवं कलों हाताशीं' –हाव धर्म २९५ इतर अर्थांकरितां अवांकणें पहा

**आवग**—न (कु) माशाच्या पोटांतील आंतडें अवाग पहा

**आवगणें**—अक्रि १ वाईट मार्गाला लागणें, स्वेच्छाचारी, दुराचारी बनणें, बहकणें, घावचळणें अवगणें पहा 'चोरी–जारी अनाचार। करूनि नाहीं म्हणती नर। तैसा नायक राजेश्वर। अगम्या जागीं आवगला।' –मुआदि १६ ११६१ [स अव+गम्]

**आवगणें**—सक्रि धारण करणें, अंगीकारणें, अंगीं आणणें, घेणें, अवगणी घेणें 'कीं मानुषपणा आवगला। मणभौनि मृत्य लोकीं ठेला विठ्ठल।' –दाव ३५७ 'अमूर्तही मूर्ति आवगे।' –ज्ञा ६ ११३१ शिवाय अवगणें पहा [अव+भग किंवा अव+गम्]

**आवगणें**—सक्रि आटोपणें –हंको [आव=आटोप]

**आवगुंडी**—स्त्री (शेती–चांभारी) मोटेच्या बैलांस मागें ओढतांना उपयोगांत आणावयाची, फासऱ्यास जोडलेली वादी

**आवचट**—अवचट पहा 'आवचटें निधान जोडलें। तें कव डीच्या बदल नेलें।' –दा ३ १० ३४

**आवंजणें, आवंजे**—आवगें, आवगी पहा 'मागें आवंजें (मानाची लावणी) उद्या होणार आहे'

**आवजा–ज्ञा**—वि अवलंबन, भार, ओझें अवझा पहा. 'तया मोक्षाचा आवझा। आपणेया करवें लावीला।' –भाए ७८३ 'जिवन्मामि आवजा जाला' –दावि ७७८ [स अवह्, प्रा आवज्ज किंवा अवजड (अप)]

**आवझयरो**—वि (हेट) (शिवी) आईशीं वाईट कर्म कर णारा, मातृगमनी [आव=माई+झयरो=झवणारा]

**आवट**—पु लाकडाची रास अवट पहा 'आवटामध्यें मोंड वाचा सरा आहे, तो आण'

**आवटचावट**—क्रिवि भलतेंसलतें, आवटचावट [चावट द्वि]

**आवटणी, आंवटणी**—स्त्री (कों) (भाताची) पुन्हा लावणी, आवटण्याची क्रिया, दाट झालेलीं रोपें उपटून दुसरीकडे लावणें [आवटणें]

**आवटणें, आंवटणें**—उक्रि (कों) पेरलेलें धान्य (बहुधा नागली व वरी, क्वचित एका जातीचें भात) उगवून आल्यावर उप टून नागरलेल्या जमीनींत काडी काडी आडवी फेकणें (म्हणजे तें जीव धरतें) [स आ+वृत्=वेगळें करणें]

**आवटणें**—क्रि उरणें (–शर)

**आवटरणें–टारणें, आवटळणें–टाळणें, आवटळ, आवटी**—अम० यें पहा

**आवटळा**—पु गात्रसंकोच, उसण, अवटळा पहा 'उठवणें ताठा करूं। आवटळे आणि ल्चक।' –दा ३ ६ ४६

**आवठ**—पु (व) अस्पष्ट आकृति, अस्पष्ट चिन्ह माग 'येथून चोर गेल्याचा आवठ दिसतो' (क्रि० उठणें, वठणें)

**आवठणें**—(गों) आवटणें पहा

**आवड**—स्त्री १ गोडी, संतोष, आनंद, इच्छा म्ह० आव डीला मोल नाहीं आणि प्रीतीला तोल नाहीं, २ प्रीति, चांगला भाव, रुचि, पसंति (क्रि० ठेवणें, होणें, असणें) 'आवडीची क्षुधा जयाप्रती। तयासि रुचे पाकनिष्पत्ती।' –मक ११ ९५ [सं आ+वृ=वरणें] ०कृत्य–न (काव्य) आवडीचें, मना जोगें, समत असलेलें, आवडणारें काम, 'शीघ्र येऊनि पुनासहित। सपादीन आवड कृत्य।' ०गोड–चतुर–चतुराई–अमध्यें पहा ०नावड–निवड–तिटकारा–स्त्रीपु प्रीति आणि अप्रीति, हवें असणें नसो असणें, एक गोष्ट पाहिजे असणें दुसरी नको असणें, २ (ल) विषमबुद्धि, द्वैत, समतेचा अभाव ०निवड–स्त्री मकर संक्रांतीच्या दिवशीं सुवासिनी स्त्रियांनीं करावयाचा एक विधि तो एखाद्या सुवासिनीस बोलावून तिच्या आवडीप्रमाणें तिस चोळी शिवून देणें हा होय ०भूत–वि १ आवडतें झालेलें, आवडलेलें, प्रिय झालेलें, समत असलेलें 'हें घर मला मोठें आवडभूत आहे' २ प्रीति, आनंद, प्रेम, आवड 'असक्यावर आवडभूत आहे, आम क्याची आतडभूत आहे'

**आवड**—स्त्री (शाप) स्नेहाकर्षण, रासायनिक आकर्षण (इ) ॲफिनिटी [आवड]

**आवड**—पु (व) मोठ्या शेताचा एक भाग अवाड पहा [स आवार]

**आवडचावडक**—औडकचौडक पहा

**आवडणें**—अक्रि पसंत असणें, रुचणें, आनंददायक किंवा मनासारखें असणें. **आवडून घेणें**–आपली प्रीति एखद्या ठेवणें, आपल्यास प्रेमरद करून घेणें [आवड, सिं आउडणु]

**आवडणें**—सक्रि दिसणें, वाटणें, भासणें 'तो मनुष्यासारिखा तरी आवडे। परी मनुष्यत्व तया न घडे' –ज्ञा ४ १००

**आवडणें, आवाडणें**—सक्रि (राजा कुण) शेतविषयी नंतर कुणग धुणें, कुळ्धुणें [अवगें, स आ+पृ, प्रा आव= धोपणें ?]

**आवडता**—वि १ पसंतीचा भावडीचा ल्डका आनंद दायक, मनोहारक २ (ल) बाविन हो प हिन ना इला ता भला हें माथा तुम्ही निरवि। मे आवडतयांहि अव्हासिले।' –ज्ञा ६ ३१७ 'तैसा माझतियें मुनिकें। आम्ही न्यायादि कौतुकें।' भग ७,३६०

**आवडती बायको**—स्त्री १ आवडणारी, पसंत असलेली, बायको, २ (ल) विजयराज्याच्या किंवा दुसऱ्या लमाच्या बायकोबद्दल म्हणतात

**आवडतें शास्त्र**—न १ एखाद्या वाक्याचा (शास्त्रादिग्रंथा तील) सत्याला जरा सोडून आपल्या इच्छेप्रमाणें किंवा मताप्रमाणें अर्थ करणें, अनुकूल शास्त्रार्थ काढणें २ आपल्या इच्छेचा कायदा किंवा आपली इच्छा हाच कायदा, शास्त्र, स्वच्छंदीपणा, मनाला वाटेल तसें करणें

**आंवडवणी**—न आरोग्यासाठीं स्नानाकरिता लिंबाचीं पानें वगैरे टाकून तापविलेलें पाणी [?]

**आवडसावड**—स्त्री १ माणसें, बैल, नांगर इ० एकमेकांच्या उपयोगासाठीं एकमेकास देण्याघेण्याची शेतकऱ्याची पद्धति, २ एकमेकास केलेली मदत, मदतीची अदलाबदल [सवड–सावड द्वि]

**आवडळ**—वि. यत्किंचित्, थोडा, अल्प अवडळ अर्थ ३ पहा

**आंवडा–ढा**—अवडा पहा

**आवडाव**—अवाडाव पहा

**आवडी**—स्त्री (काव्य) आवड, प्रीति, पसंति आवड पहा 'तुरा म्हणे कुडी। जेवीं प्राणाची आवडी।', 'असेचि अशि आवडी करिशि का न अत्यादर।' –केका ६१

**आवढें**—क्रिवि (खा) इतका, एवढा, येवढा [एवढा]

**आवण**—न गाडीच्या चाकाच्या भोंकात पातळसें लोखंडी वर्तुळाकार वेढें किंवा मायणी हिच्यामध्यें गाडीचा कणा फिरत असतो 'चाकाचें आवण बाहेर पडलें' २ (यंत्र) (इ) बेअरिंग, फिरणाऱ्या दांड्याच्या खालीं–वर असणारा भाग, खोबण, याचा उपयोग घर्षणानें होणारी झीज कमी करणें हा असतो आवणांत शाफ्टिंग बसविलेलें असतें [स आ+वृन]

**आवण**—न (गों) १ भाताचें उगें शेत, रोप 'आमच्या शेताला १० मणाचें आवण लागतें' २ वांगीं, नाचणी, वरी मिरची यांचें दुसऱ्या ठिकाणीं लावण्याकरिता तयार केलेलें रोप, नारळी, पोफळी यांचें रोप ३ ज्यात प्रथम रोपें लावतात ती जमीन, जींत बीं पेरून रोपें तयार करतात ती जमीन ४ (उत्तर भाग) भाताचीं रोपें पहिल्या ठिकाणावरून उपटून ज्या दुसऱ्या जमीनींत लावतात ती जमीन ५ (मामा क हीं प्रांतांत) धान्य, भाताच्या वाफ्यांत रोपें लावतात ती जमीन, आवणाची जमीन [स आ+वप्–आवापन–आवण]

**आवणा**—वि (कु) तिरळा

**आवणी, आवणी**—स्त्री १ लावणी, शेतींतील भाताचें रोप उपटून दुसरीकडे लावणें २ जींत भाताचीं रोपें लावतात ती जमीन आवण पहा

**आवण्**—न (कों) १ आवणीसाठीं काढलेलीं रोपें लावण्या करिता तयार केलेली जमीन, जींत आवणी करावी लागते ती (जमीन, शेत,) २ पुन्हा लावणी केलेलीं आवणातील भाताचीं रोपें वगैरे, आवणी करून झालेलें भात [आवण]

**आवणें, आंवणें**—अक्रि (चि गो) जेवण झाल्यावर हात व तोंडधुणें आचवणें चित्पावनी रूपें–आव=आचव, आवयव= आचवव=हात धूवव, आव्वे=आचवावयास [स आचमन=आच वर्णांचा वर्णविपर्यास व वर्णलोप]

**आंवणें**—उक्रि (कों) आवण उपटून दुसरीकडे लावणें, भात, नागली, मिरची, वार्गी वगैरेंच्या रोपाची दुसऱ्या जागेंत लावणी करणें, आवणातून काढलेलीं रोपें आवणांत लावणें [आवण]

१ **आवणें**—अक्रि समाविष्ट होणें, सामावणें, मावणें 'सकल करतळांत क्षिती आवली।'–प्रला ११७ [माव]

**आवत**—(कु) ओत पहा

**आवतण, आवतणें**—क्रि १ बोलावणें, आमंत्रणें अवतण, अवतणें पहा 'गोमायुगृध्रपरिवृतपरिवारा मृत्युलागिं आवतणें। दिधलीं कुरुसैन्यासी '–मोवण ८ ४ २ अभिमंत्रण करणें 'मह विदेचा अभ्यास। आवतूनि चालिला चंडीश। हा हा म्हणता नागपाश। घातिला त्यासि॥'–कथा ३ १० १६३ 'शनवारीं आणिला जरी आवतुन धोतरा। निरमाल्य गमे नाहीं तेज पुण्या मतरा।'–प्रला १०४ ३ भोजनास बोलाविणें 'भोजना आव तिला सहपरिवारीं।'–सुमादि ४० ७२

**आवतर**—अवतार पहा 'आधींच पुणें गुलजार, तशामधि अपूर्व बसला आदितवार। ह्यांत कृष्ण श्रीमंत आवतर समस्त यादव परिवार।'–तेपा २००

**आवतासवदा**—पु (व्यापारी) धान्याचा सट्टा भविष्य काळीं होणाऱ्या देवघेवीचा करार –मुव्या २४९ [गु आवता= आगामी+सवदा]

**आवतिकाय**—स्त्री (गो) गति, स्थिति, विशेषेंकरून दुस्थिति दुर्दशा 'म्हज्या दुस्मानानीं म्हज्या घरार किर्ते (जादुगाणा) करून घालें तैंपासून म्हजी आवतिकाय ही अशी जाल्या [अवगतिक]

**आवती, आवथी**—स्त्री १ आहुती २ (ल) नाश [स आहुति]

**आवतीक**—(गो) न नाश, नुकसान, आवती पहा ०**मारप**= नुकसान करणें

**आवतींभोंवतीं**—क्रिवि सभोंवतीं, आजूबाजूस, जवळपास 'आवतीभोंवतीं अशीं किरकिल करू लागलीं म्हणून जिवाला गार वाऱ्यावर वादळ्यात पडल्यासारखें वाटतें'–भा १३ [भोंवतीं द्वि, स आवृत्त+भ्रमित प्रा आवत्त]

**आवंती**—वि अवंती नगरासंबंधीं –स्त्री एक भाषा ही महा राष्ट्री व शौरसेनी यांचें मिश्रण आहे [स]

**आवदा**—स्त्री आयुष्य मर्यादा 'मृत्युलोकीं मनुष्यमर्यादा। शतवर्षें जी गोविंदा। ते अतिक्रमोनि आवदा। अधिक मुकुंदा पचवीस जाहलीं।'–एभा ६ २५४ [स आयुर्दाय]

**आवंदा**—क्रिवि यदा, अवदा पहा 'तुम्हीं आवदाची मस्लत बुडविली तरी पुरवेल'–भाव ४४ 'चवरी आवदागीरी बत्तीस कळी मोत्याची आवदाची बोली येक पालखीची।'–होला १६७

**आवदुध**—न (व) १ विनपाण्याचें दूध २ न तापविलेलें कच्चें–निरसें दूध 'तापविलेल्या दुधापेक्षां आवें दूध घेणें हितकर आहे' [स आप, प्रा आव=पाणी+दूध किंवा अव=शुद्धतादर्शक आगम]

**आवनो**—वि (कु) न भाजलेला, कच्चा [आवा?]

**आवभापी**—(प्र) दुरुत्तर, दुष्ट बोल 'जमाना आला उफ राटा। सुन सासुला लावी वाटा। ऐकभापाशीं लावी आवभापी।'–अफला ६८ [स अप–अव+भाषा]

**आवय**—स्त्री (गो) आई माता ०**वापुय**–अव आईबाप [अव्व–अवा=आई]

**आंवय, आंयव**—उद्गा (गो) छी,, थू, इश्श [स अ+ वच्, प्रा अवय]

**आवर**—पु स्त्री १ आटोप आटोका, आटोक्यांत आणणें, आटोपतें घेणें, थोडक्यात आणणें, गोळा करणें, बंद करणें, संपुष्टांत आणणें २ नियमन, ताबा, बंधक, निग्रह, अंमल ३ व्यवस्था, कारभार, पाहणी, धंदा चालविण्याचें कौशल्य, उरक, ०**आटोप-शक्ति**–पुस्त्री उरक 'मोठें काम करण्यासें आवर शक्ति असेल तो कामाचा' [सं आ+वृ]

**आवरक**—वि आवरणारा, वेढणारा, बांधणारा, संयम कर णारा, अटक करणारा, ताबा ठेवणारा, आळा घालणारा आवरण घालणारा 'आह्मो भक्तीचें बळ थोर आहे देवराया आवरक।'–दावि २७९ 'अज्ञान अविद्या आवरिका। विपरीत ज्ञान विक्षे पिका।'–विपु ५ ५७ ०**शक्ती**–स्त्री आवरशक्ति, उरक, व्यवस्था ठेवण्याचें कौशल्य

**आवरक्त**—न रक्ताची हगवण, आमांश [आमरक्त]

**आवरजा**—अवरजा, अवर्जा पहा

**आवरजून**—अवरजून पहा

**आवरण**—न १ आवरणें, आरोप, आवरण्याचा व्यापार २ वेष्टन, आच्छादन, वेटा, झांकण, रक्षण साधन (कठडा, कुंपण, वई, झांकण, घुंगटा, पेटी, पडदा, डगा इ०) ३ वेढणारी, बांधणारी वस्तु ४ आच्छादनावस्था, प्रावरणावस्था, संरक्षणावस्था 'मज अनावरणा प्रावरण। भूषणातीतासि भूषण।'–ज्ञा ९ १६२

'धाकट्या भोंवतें आवरण। मी घालूनि धरितसे।'-रावि ३८ १९ ५ ताबा, नियमन, अमल, व्यवस्था, अधिकार, आटोप, उरक ६ भाद्रपद शुद्ध द्वितीयेच्या रात्रीं बायकांचें आवरण भोजन-खाणें-फराळ (कारण दुसऱ्या दिवशीं हरितालिकेचा उपवास काहीं न खाता करावयाचा असतो) ७ (तत्त्वज्ञान) चुकीच्या कल्पनेच्या दोन कारणांपैकीं (आवरण व विक्षेप) एक, आच्छादन, लपविणें 'भ्रमज्ञानास आवरण आणि विक्षेप हें कारण होय' [आ+वृ= आच्छादन करणें] ०देवता-स्त्री मुख्य देवतेच्या भोंवतालच्या अवांतर देवता जसें-अनंताच्या भोंवतीं असणारे अष्टदिक्पाल ८ (ल) राजाच्या भोंवतालचे मंत्री, खुषमस्करे वगैरे, मोठ्या माणसाच्या भोंवतालचा परिवार ०पूजा-स्त्री मुख्य देवतेच्या भोंवतीं असलेल्या देवतांची पूजा, अनंतचतुर्दशीस अनंताच्या भोंवतालच्या अष्टदिक्पालादिकांची पूजा 'कृष्ण परमात्मा मनुष्यमूर्ती। आवरण पूजा यादवपक्ती।'-एरुस्व १४ १०० ०शक्ति-स्त्री १ आवरण्याची, नियमन करण्याची, ताब्यात ठेवण्याची शक्ति आवरक शक्ति पहा २ माया, वस्तूच्या खऱ्या गुणाचें आच्छादन करण्याची शक्ति, मोह अविद्या

**आवरणें**-उक्रि १ एकत्र करणें, गुंडाळणें, आटोपणें, थोडक्या जागेंत आणणें, गोळा करणें, सपविणें (वस्तु कामें इतर गोष्टी इ०) आटपतें घेणें 'जी साईसाब। पण आधुन जरा आवरत ध्या'-चंद्रग्रहण ४१ २ (ल) माघारें घेणें, परत घेणें 'प्रसाद करणें मनीं जरि नसेल हें आवरा।'-कका १४ ३ वहिवाटणें, व्यवस्था पाहणें, देखरेख करणें, अम्मलबजावणी करणें ४ झांकणें, वेढणें, आच्छादणें, गुंडाळणें, व्यापणें, व्यापून असणें 'म्हणानि आम्ही तयातें। म्हणों सर्वत्र आइकतें। एव जें सर्वातें। आवरूनि असे॥' ज्ञा १३ ८८२ 'तू सर्वात्मा असता हृदयीं। चित्त प्रवेशेना तुझ्या ठायीं। तें आवरिलें अर्थे विषयीं। नवल काय सांगावें'-एभा ७ १६८ ४ ताबा चालविणें, नियमन करणें, अटकाव करणें, हुकमतींत ठेवणें 'तेणें तिया आवरिले। भीष्मातळीं राहिले।'-ज्ञा १ १२३ 'तैसा आत्मा आवरला। प्रपंचें हा।'-विपू ७ ११३ ५ आपल्याकडे घेणें, सांभाळ करणें वाढविणें (अनाथ परक्या मुलाचा वगैरे) ६ (काव्य) रक्षण करणें मदत करणें, आश्रय देणें, आच्छादन घालणें 'मन तुम्ही आवरी। देवा प्रपंच सागरीं॥' [स आ+वृ]

**आवरणें**-न आवरण ६ पहा हरितालिकापूजनाच्या आदल्या रात्रीं (भाद्र शु २) करावयाचा फराळ

**आवरणें**-न (सोनारी काम) भांड्यास पसरट आकार देण्यासाठीं उपयोगांत आणावयाची हातोडी [स आ+वृ]

**आवरणें आटोपणें**-उक्रि आवरणें व आटपणें सयु क्रि १ आवरणें पहा (जोडक्रियापदामुळें अर्थवृद्धि होते)

**आवरदा**-वि १ आयात माल २ (क्वचित् कधीं) आवक ०जमा-स्त्री आयात जकातीचें उत्पन्न **आवरदेखाना**-आयात निर्यात, त्यावरील जकात [फा आवर्दन्=आणणें, अर आवर्दे]

**आवरसावर, आवराअवर**-स्त्री वाघावाघ, गोळा करणें, आटोपणें, झाकापाक [आवरणें+सावरणें-आवर द्वि]

**आवरॉ**-पु (गो) धीर, ०उडप-धीर सुटणें [आवरणें]

**आवरॉ**-पु (गो) आळसुंदासारखें एक धान्य, चवळी, कडवेवाल अवरा पहा [का अवरी]

**आवराबावरा**-कावराबावरा पहा

**आवरिव**-न भक्षणाकरितां पुरवठा, मेजवानी 'तै तुम्हा आवरिव केली। दैत्युमासाची।'-शिशु ४४५ [स आ+वृ]

**आवरी**-वि आवरणारा, देखरेख करणारा, कारभारी, व्यवस्थापक 'जया प्राणाचे घरीं। अगें रावतें भाळ चारी। आणि मना ऐसा आवरी। कुळवाडी करु।'-ज्ञा १३ ७८

**आवरीत**-(विर) अवरीत पहा 'आधीं मनीं लावलीस प्रीत। पुढें त्वा केलीस आवरीत।'-होला १४४

**आवर्जणें**-सक्रि टाकणें, त्याग करणें, सोडणें, 'गडी म्हणती जगज्जीवना। का आवर्जिली यमुना। कोण्या विचारें मधुसूदना। कोप धरिला तिजवरी'-ह १० ८२ [आ+वृज्]

**आवर्जा**-हिशेबवही अवरजा पहा 'कीर्दी, नावनिशीवार पत्रकें आवर्जे पहावे'-ख ४ १४३३

**आवर्जून**-क्रिवि अगत्यपूर्वक अवर्जून पहा

**आवर्ण**-पु (रामदासी वाङ्मय) समुद्र 'तिया आधार आवर्णोदकाचा'-दावि २८२ -दा १३ ४ १८ [अर्णव अप]

**आवर्त**-पु १ चक्राकार भ्रमणगति, फेरा, वळण २ पाण्याचा भोंवरा 'जं द्वैताच्या आवर्ती दाटत। मत्सराचे वळसे पडत। माजि प्रमदादि तळपत। महामीन।'-ज्ञा ७ ७१ ३ चक्रवात, वावटळ, तुफान, (इं) सायक्लोन 'समर्थ सज्जनदुर्गीं पर्वत आवर्त पाहणें।'-सप्र ९ १५ 'सूर्य विषुववृत्ताच्या उत्तरेस असता शांत प्रदेश उत्तरेस येऊन तर्थे व्यापारी वारे समोरासमोर येतात, रविकिरणांनीं जमीन फार तापत म्हणून त्यास जोर येतो, त्याचें चक्र बनून तें गरगर फिरू लागतें हें चक्र वर आकाशांत जाऊन प्रतिव्यापारी वाऱ्यावरोबर धुवाकडे जातें यास आवर्त असें म्हणतात'-सृष्टिशास्त्र ७३ ४ पाण्यांतील भोंवऱ्याच्या आकृतीप्रमाणें अंगावरील केसांची रचना, आकृति (विशेषत घोड्याच्या अंगावरील) उ० जयावर्त, जानुवर्त ५ मनात एकसारखें घोळणें, विचार [स आ+वृत्]

**आवर्त (करण)**-न (नृत्य) उजवा पाय कुंचित करून पुढें पसरणें, असें अनेकवार करणें, उजवा हात आकुंचित करून पुढें पसरणें व पुन्हा आकुंचित करणें, डावा हात वक्षस्थलावर ठेवणें

**आवर्तणें**—सक्रि आवर्तन करणें, घोकणें 'यरां स्तोत्र का नाममन्त्र। आवर्तणें पवित्र'—ज्ञा १६ १०८ [स आवर्तन]

**आवर्तदशांश**—पु (गणित) व्यवहारी अपूर्णांकास दशांशाचें रूप देताना कधीं कधीं भाग बरोबर तुटत नाहीं व भागाकारात तेच तेच अंक पुन्हा पुन्हा येतात उ० ९५/९० = ५ १/९ = १० ५५५५ इ० अशा जातीचे दशांशास आवर्तदशांश म्हणतात ह्या ५ असा लिहितात फिरून फिरून येणारा जो भाग त्यास **आवर्तप्रदेश** म्हणतात —छत्र १७

**आवर्तन**—न १ फिरणें, भोंवतालीं फिरणें, फिरवणें, ढवळणें २ पुन्हा पुन्हां म्हणणें, आवृत्ति, सथा, पाठ, पारायण (धार्मिक ग्रंथ स्तोत्र, रुद्राध्याय इ कांचें) 'नित्य दहासहस्र आवर्तनें पूर्ण। क्षोणी पाळा करी सप्तदिन।'—शिवलीलामृत ११ ११९ ३ अभ्यास करणें, सवय करणें, पठण करणें ४ एखाद्याकडे वळणें, फिरणें, येणें ५ (संगीत) श्रोणत्यादि एका तालाचा संपूर्ण मात्रासमूह [स]

**आवर्तनी**—स्त्री सोनें इ० धातु आटविण्याचेंभांडें, मूस [स]

**आवर्तप्रतिध्वनि**—पु (संगीत) पुन्हा पुन्हा ऐकू येणारा प्रतिध्वनि 'निरनिराळया अंतरावरील समांतर अडथळयावर ध्वनि आपटून आवर्तप्रतिध्वनि उत्पन्न होतो'—स्वरशास्त्र ३५ [स]

**आवर्तप्रदेश**—आवर्तदशांशापैकीं पुन्हा पुन्हा येणारा भाग, पहा

**आवर्तित (जंघा)**—स्त्री (नृत्य) डावा पाय उजव्या पायावरून उजव्या बाजूस व उजवा पाय डाव्या पायावरून डाव्या बाजूस नेऊन ठेवला म्हणजे जघांचें एक स्वस्तिक बनतें ती स्थिति विदूषकाचें चालणें दाखविण्याच्या वेळीं हा अभिनय करितात [स]

**आवर्दा**—पु जीवित, आयुष्य —नामजोशी कोश [स आयुर्दाय अप]

**आवर्षांत**—क्रिवि सबंध वर्षांत, उभ्या वर्षांत, वर्षभर, सालभर [स आ+वर्ष+अंत]

**आवलणें**—उक्रि वल्हविणें, वल्हें मारणें नाव चालविणें 'जें आवल्हिता भाववळें। तोडी कर्माकर्मक्रूरजळें।'—एभा २ ३१५ 'ये नदीतील जलचर थोर। ध्रुव प्रल्हाद विधिपुत्र। येथील अनंत एक कर्णधार। आवली कृपादृष्टीनें।'—जै ८० ७ [स आ+वल्]

**आवला आवलेकरी**—पु वल्हें मारणारा, वल्हविणारा, वल्हेकरी, आवल्या, अवलेकरी पहा 'मग डोहीं महा विशाळीं। बाळ लोटिलिसे जळीं। परि धरिला वरुण आवली। विष्णुचेनि धाकें'—कथा ७ ७ २० २ (ल) कर्णधार, सूत्रधार, मार्गदर्शक 'उमती प्रगती नव युक्तीनें समनावितो राज्याचे आवले नाना।'—गापो ८३ [स आ+वल् प्रा अवलय अवलक=वल्हें]

**आवली**—स्त्री पंक्ति, ओळ, रांग, पंगत सामासशब्द—रोमावली, रत्नावली, पद्यावली इ० [स]

**आवलें**—न वल्हें अवलें पहा 'लावूनि विवेकाचें आवलें। तोडिती कर्माकर्मांचीं जळें।'—एभा २० १७८

**आवल्या**—पु १ आवला पहा २ (व) शेतीवाडीच्या सर्व कामाची देखरेख ठेवून तें काम व्यवस्थित चालविणारा मनुष्य, कर्णधार ३ लपंडाव खेळांत भोंग्याप शिवणाऱ्या मुलांना उद्देशून म्हणतात 'आवल्या येरे लवकर, भोंग्याजवळ कोणी नाहीं' [आवलें]

**आवशी**—स्त्री पूर्वरात्र अवशी पहा 'काल न म्हणे हाट घाट। न म्हणे आवशी पहाट।'—एभा १० ४२४

**आवशी**—स्त्री (गो कों कुण) आई, आईस 'म्हेनत करून हेच धर्तरी आवशीची चाकरी कर'—मसाप २ ३६९ **आवशीचो घव**—पु (अपशब्द) (हेट) आईचा नवरा [आयशी, का अब्वा]

**आवशुद्ध**—वि नीट, बांधेसूद, प्रमाणशीर, आकारशुद्ध [आव=आकार+शुद्ध]

**आवश्य, आवश्यक**—अवश्य, आवश्यक पहा

**आवस**—स्त्री आई आवशी पहा

**आवस-आवस**—स्त्री अमावास्या अवस पहा 'ते वेळीं पुनिवा भरे। ना आवसा सरे।'—अमृ ४ १५.

**आंवस**—न १ वाघ सिंह इत्यादि हिंस्रपशु गाय, हरिण वगैरेंना मारून त्यांचें थोडें मांस खाऊन दुसऱ्या दिवसासाठीं काहीं राखून ठेवतात तें २ आमिष, गळ वगैरेस पीठ लावितात तें [स आमिष] **आवसांवरचा वाघ**—पु १ आवस (पूर्वे दिवशीं राखून ठेवलेलें मांस) खाण्यास आवेशानें जाणारा वाघ २ (ल) चिरकाल इच्छित वस्तूचा उपभोग घेण्यास प्रवृत्त झालेला, तापट अधिरा, रागीट, जलाल (मनुष्य)

**आवसथ्य**—पु १ अग्निहोत्र्याच्या पंचाग्नींपैकीं एक पंचाग्नी पहा २ गृह्याग्नि 'आवसथ्याग्निहवन। गुरुवासरीं अवतिय जन्म दिन।'—स्वादि १० ३ २० [स]

**आवसा**—पु तात्पुरतें बांधलेलें घर, झोंपडी, खोप, खोपडी, माडव, प्लेग वगैरे रोग गावात झाला असता बाहेर तात्पुरती बांधतात ती झोंपडी 'पाडरपेशी ब्राह्मण, गुजर, सोनार, कासार वगैरे मंडळी गावाबाहेर आवशात किंवा शेतातल्या पडवीत वगैरे राहण्यास गेली'—सुद २०१ [स आ+वास, प्रा आवास, सिंह अवस, अवा, गु अवास, हिं आवास]

**आवस्ता**—वि (रामदासी वाङ्मय) अनास्तव, विनाकारण 'आम्ही आवस्ता भुललों तुझ्या योगें।'—दावि ७७६ [स अ+वस्तु]

**आवस्वर**—पु वेळ, अवसर अवस्वर पहा 'विश्वामित्राचा अंतरीं। मा र तत्काळ प्रवेश करी। मग उठता त आवस्वरीं। वसिष्ठें वैमविग।'—वेमीस्व १४९ [अवसर अप]

**आवह**—वि आणता, नेता, घडविता, वाहून आणणारा, संपादन करणारा, प्रापक सामासशब्द-सुखावह, सुखावह दुःखावह, दोषावह, सकटावह, हितावह, शोकावह, भयावह, हर्षावह, कल्याणावह इ० [स ]

**आवळणें**—उक्रि अवळणें पहा १ रगडणें, दाबणें, चुरणें, घुसे 'जळीं आवळी वस्त्रमोळी।' –गगाधरकृत रतकल्लोळ ५८ २ व्यूह रचणें ( फौजेचा ) 'तिकडे मोंगल आपले तळावर तयार होऊन जमावसुद्धा आवळून उभा राहिला ' –भाव १४४ ३ आलिंगणें, मिठी मारणें 'त्या हृदयीं स्वभुजीं धरुनि आवळिला।' –भयमयूर केका २८ [स आ+वल्]

**आंवला, आंवळकाटी-काठी, आंवळणें, आंवळसर-सरा, आवळा, आवळी, आवळीभोजन, आवळ्या गंधक**-अ मध्यें पहा

**आवला**—( खा ) हुळा पहा [म हवळा, हावळा, हुळा ]

**आवळाजावळा**—वि जुळें [जावळा-जुळें द्वि, स युगुल]

**आवळेंजावळें,आवळयाजावळ्या,आवळींजावळीं**—पु स्त्री न अव जुळीं भावंडें

**आवा**—पु कुंभाराची भट्टी, मडक्याची रास, वही अवा पहा 'कुंभ अवघा एक आवा।' –तुगा ३१५५.

**आवा**—स्त्री १ बाई 'असली तरवारबहादुर आवा आमासनी साफ बायकू नको ' –वाय २ ३ २ राड, राख अवा पहा

**आवा**—पु (कों ) १ आवणातून काढून आवणूत लावण्यासाठीं उपटलेलीं मूठभर भाताचीं रोपें, रोपाचा पुनका, पुन्हा लावलेलीं अशीं रोपें २ वार्गी, मिरच्या वगैरेंची नवीन वाफयातून लाव लेली रोपाची जोडी आवण पहा [आवण, आवणें, स आ+वप्=पेरणें ]

**आवाई**—अवाई पहा 'टिपूची बाजारआवाई यत होती ती उटकी, तो आहे ' –ख ७ ३६१६ **०खाणें** भिणें 'मुख्य शत्रु आवाई खाऊन व्यग्र जाहला आहे तो सत्वर धरितो ' –मराभा ७

**आवांकणें**—अवाकणें पहा 'जें एक वेळ आवाकुनिया सांगावें ज्ञान।' –ज्ञा १८ १३३७

**आवांका**—अवाका पहा १ शक्ति, सामर्थ्य, आकारमान, अवसान, धैर्य, उमेद 'बहुतीं माडिलें आवांकें। वीरश्रीम्लान मुखें। म्हणती पातलें कौतुकें। महोत्साह पहावया।' –मुआदि ४१ ८८ 'जयसिंगासहि आपला आवाका काय आहे तें समजेल ' –सूर्यग्रहण ८४ २ विचार, सारासार विचार, मर्यादा, रीत 'अहो जी आइरा। तुमतें नाहीं कृपेचा आवाका। तरि येथें बीजें करोनी का मातें चुकविलें।' –ऋ ३२ –एभा ३१ ५५५ ३ अभिमान 'मी एक चतुर बालका। क्षाही तुनी त्या आवाका। बोल चोलू नेणें फिका। बोलोनि नेटका अवोरणा।' –एभा २८ ४४९ ४ सार, अभिप्राय, गोळावेरीज 'तया अर्थजाता अशेषा। केला तात्पर्याचा आवांका। तो हा अठरावा देखा। कलशाध्यायो।' –ज्ञा १८ १४४५ 'एव भारताचा आवांका। आणूनि श्लोका एका।' –ज्ञा १८ १६५९ ५ आटोका कवजा 'तेथ एरादळाचा आवांका। क्वणुकरी।' –शिशु ५०७

**आवाज, आवाजी**—पुस्त्री १ ध्वनि, सूर, शब्द, नाद २ वातमी, गडवड [फा आवाझ्] **०काढणें**-१ बोलणें, शब्द करणें, कुरकुर करणें २ (कु ) ऐपतीबाहेर भाव दाखविणें ३ (कागासाळीं) भोवाईत मारणें **०दार**-वि चांगल्या आवाजाचा, चांगल्या नादाचा, ध्वनीचा **०दारी**-स्त्री आवाजी, सुरेलपणा, आवाजाचा झोंकदारपणा, खणखणीतपणा **०देणें**-हाक मारणें 'त्या वेळीं जमादार त्यास आवाज देऊन आपलेकडे बोलावून घेतो ' –चित्र्याची माहिती १७

**आवाज**—पु नग ऐवज पहा 'थोरलीं भाडीं एकूण आवाज दीड हजार ' [फा इवझ् =द्रव्य ]

**आवाजदारकाम**—न (बडोदे ) सोन्याच्या, चांदीच्या, अल्युमिनमच्या वगैरे जाळीदार घागत नखाग्रव्यें रत्न खुलें (इ ओपनसेटिंग ) बसविण्यात येतें तें काम –जव्हेरखानानियम (पारिभाषिक) १.

**आवाजा**—पु १ ध्वनि, शब्द आवाज पहा २ प्रसिद्धि; कीर्ति, बोलबाला [फा आवाझ्]

**आवाजावा**—स्त्री ये जा, येणेंजाणें, दळणवळण, वहिवाट, वहिवाटीचा हक्क [स आया=येणें+जावा=जाणें, हिं आवजाव]

**आवाट**—पु (गो ) १ परिघ, घेर २ आसमंतातील प्रदेश [स आवृत, आवार]

**आवाठ**—पु (कु ) वाडी, वाडा, आवाड 'तों सुताराचा आवाठाक आसा ' =तो सुतारवाड्याला आहे [स आ+वाट, आवार]

**आवाढ**—पु (गो ) १ मोठेपणा, व्यापकता आवाट पहा. २ ताकद, शक्ति [स आ+वृद्धि=वाढ–आवाढ]

**आवाड**—न आवार अवाड पहा

**आवाडाव**—अवाडाव पहा

**आवाडी**—स्त्री (कों ) (नाविक ) सुकाणू फिरविण्यासाठीं लावलेला दाडा, काठी [स आवर्तं=फिरणें, प्रा अवट्ट=फिरणें ]

**आवाण**—न (कु ) नागली, मिरची वगैरेचें कोंवळें रोप, आवण पहा

**आवातण-न**—न (कुण ) आमंत्रण अवतण पहा 'तुमचें आवातण येईल म्हणून मी बराच वेळ वाट पाहिली '

**आवांतर**—अ मध्यें पहा

**आवाप**—पु परणें, सामाशब्द—धान्यावाप, बीजावाप, क्षेत्रावाप [ स आ+वप्=पेरणें ]

**आवार**—पु १ कुंपणाच्या आतील जागा, परसू, वाडगें, अगण 'उत्तरद्वारीं यादवेश्वर । पैल मदनाचा आवार ।' —कथा १ ६ १५५ २ कुपण, हद्द, ज्यानें वेटतात, मर्यादित करतात असें वई, वडाग, कठडा, भिंत, तट, गडगा, गावकुसू 'कीं गंधर्वनगरीचें आवार ।' —ज्ञा ९ १७१ 'पाडोनि देवाचें शिखर । घातलें सभों वतें आवार ।' ३ वेढा, आवरण, बदिस्तपणा [ स आ+वृ ] ०खाना–पु आवारांतील पायखाना, शेतखाना [ आवार+फा खाना ]

**आवारा**—पु १ आव, मोठी तयारी, बडेजाव, काहीं मोठ्या योजनेचा थाट, डौल ( क्रि० घालणें ) २ ( ल ) फुटल्यानतर पुन्हा फुगणें, तयार होणें ( गळू वगैरे ) ( क्रि० धरणें, घालणें ) [ आव, आवार ]

**आवारा**—वि (माळवी) भटक्या मारीत फिरणारा, रिकाम टेकडा 'तो आजकाल आवारा आहे ' [ फा आउर्दन्=भटकणें, आवारा=भटक्या ]

**आवारा**—पु नासाडी, नुकसान 'गयाळाचें काम हिताचा आवारा । लाज फजितखोरा असत नाहीं ।'—तुगा ३१२८ 'त्याचे सेताचा आपण आवारा केला ' -रा १५ ३४ [ फा आवारा करना=नासाडी करणें ]

**आवारिव**—न भक्षण, भोजन, मेजवानी 'भूतावळीं आवारीव केलें । दैत्य मांसाचें ।' —शिशु १०५९

**आवारी**—पु ( व ) १ शेतावरचा मोकदम २ पाटलाच्या घरचा कारभारी [ आवरणें ]

**आवारू**—वि ( नदभाषा ) दोन 'सेलू पोकू आणि ढवार । आवारू खूण सागती सत्वर ।' —भवि ४२ ४६ 'आवारू उदा नके (पैसे)धर्मार्थ बाळले(दिले)' ०विट्टी–दोनशें ०कार्टी–चाळीस

**आवास**—पु निवासस्थान, वसतिस्थान, टिकाण, राहणें, वस्ति [ स ]

**आवाहणें**—उक्रि बोलावणें, आमत्रण करणें, आवाहन करणें [ स आवाहन ]

**आवाहन**—न आमत्रण, बोलावणें 'ज्ञानाचें आवाहन सत्र । जें ज्ञान पिकतें सुक्षेत्र ।' —ज्ञा १८ ७१ २ नवीन केलेली मूर्ति किंवा एखादी वस्तु यामध्यें देवतेला प्रवेश करण्यासाठीं बोलावणें [ स ] ०विसर्जन–न १ बोलावणें व निरोप देणें 'आवाहनविसर्जनेवीण । शाळिग्रामीं माझें अधिष्ठान ।'—एभा ११ १३५४ २ देवतेची प्राणप्रतिष्ठा करणें व तिला निरोप देणें म्ह० आवाहनविसर्जन बरोबर=क्षणिक टिकणाऱ्या किंवा अल्पजीवि अशा वस्तूबद्दल म्हणतात उ० पाण्यावरचा बुडबुडा [ स ]

**आवाहनपत्र**—न ( ख्रि ) १ एखाद्या सनदी उपदेशकार्चें मडळीनें पाळकपण स्वीकारण्यासबधानें पाठविलेलें पत्र २ पाचारणपत्र, निमत्रणपत्र —सात्रा ७०

**आवाहित**—वि १ आवाहन केलेली ( देवता ) २ बोलावलेला [ स ]

**आंवाळ काट्यां**—पु १ (गो) गणगोत, आप्तेष्ट मडळी २ एकत्र जमून केलेला काण्याकूट [ आवळणें+काण्या ? ]

**आंवाळगोत्र**—न ( गो ) गातावळा [ आवळ+गोत्र ]

**आवाळबोय**—स्त्री आवळकाठी पहा

**आवाळा-ळी**—( गो ) आवळा, आवळी पहा

**आवाळूं**—न १ ओठाचा भाग, ओठ 'जे अनर्थाचे कान वेरी । आवाळुवें चाटीत निघे बाहेरी ।' —ज्ञा ९ १८२. 'सहस्र सख्या वृक्षघाती । तिये जाहली जागृति । आवाळुये चाटिती । उठली तें ।' —कथा ३ ४ १२६ २ जबडा 'मग पसरूनियां आवाळें । मागु धावला गोपाळें ।' —कथा ४ ६ १८ ३ गडस्थळ 'गुर्डीव गुडादड सरळे । शोभे अभिनव आवाळें ।'—दा १ २ १२ ४ डोकें 'आकाशीं लागलें आवाळें ।' —वेसीस्व १ ६५ [ द्रा औडु—आवुडु=खालचा ओंठ, तुल० स आ+वल् ] ५ गळू मासा खुंद, चामखीळ, वालुक हें जन्मत किंवा नतर रक्तदोषामुळें उत्पन्न होतें 'शोभे जयास निढिळीं लघुसें अवाळें ।' —रामदासवर्णन (रघुनाथपडित कृत) ९ [ स अर्बुद ]

**आविंज-झ**—स्त्री ( कों ) आवणी, भाताची पुन्हां लावणी, आवाणातून काढून आवणात रोपें लावणें, आवणें आवणें पहा ०णें–आविंज करणें, आवणात रोपाची लागण करणें आवणें पहा [ स आ+विन्द्=अलग करणें, आवणें ]

**आविद्ध (आकाशीचारी )**—न ( नृत्य ) जघात स्वस्तिक करून कुचित पाऊल पुढें पसरणें व खालीं आणताना चवडा जमीनीवर टेकणें, हा टेकतांना दुसऱ्या पायात अडकविणें

**आविद्धवक्रक ( संयुतहस्त )**—न ( नृत्य ) उजव्या हातानें डाव्या खांद्यापासून डाव्या हाताच्या कोपऱ्यापर्यंत, तसेंच डाव्या हातानें उजव्या हाताच्या खांद्यापासुन उजव्या हाताच्या कोपऱ्यापर्यंत हात फिरवून आपल्या समोर तळहाताच्या पाठी जुळवून धरणें

**आविर्भवणें**—अक्रि १ ( काव्य ) प्रगट होणें, उत्पन्न होणें, व्यक्त होणें 'कृष्णस्वरूपाची प्राप्ती । भीमकी सादर श्रवणार्थी । हृदयीं आविर्भवली मूर्ती । बाह्यस्फूर्ती मावळली ॥' —रुस्व १ ८७ २ दिसणें, दृग्गोचर होणें, स्पष्ट उघड दिसणें 'कीं सध्याराग पश्चिमे आविर्भवला ।' [ स आविर्भू ]

**आविर्भवन**—न प्रकटीकरण दृग्गोचरपणा, उघडपणा, प्रसिद्धि [ स ]

**आविर्भाव**—पु १ प्रगटस्वरूप, अवतार, उघडपणा, मोकळेपणा, स्पष्ट दर्शन, प्रसिद्धपणा २ हावभाव, अगविक्षेप, चेष्टा, मनातील विकारानें दिग्दर्शन, द्वारवारे ३ आव, डौल 'शूरत्वावाचूनि शूरामाजी ठाव। नाहीं आविर्भाव आणिलिया।' –तुगा ३१३८ ४ (सगीत) एखाद्या रागाचे आलाप घेत असता अन्य रागाची छाया सामान्य स्वरसमुदायामुळें उत्पन्न होऊ लागल्यास प्रस्तुत रागाचे रागवाचक स्वरसमुदाय पुढें आणून ती छाया दूर करणें व प्रस्तुत रागाचें स्वरूप प्रगट करणें [स ]

**आविर्भूत**—वि अवतरलेला, प्रकट झालेला, उघड झालेला, दिसलेला, मुळींच गुप्त न राहिलेला, स्पष्ट, उदय पावलेला, उग वलेला [स आविर्भू ]

**आविष्करण**—न प्रसिद्धीकरण, प्रकटीकरण, उघड करणें, फोडणें (गुप्त गोष्ट), स्पष्ट करून दाखविणें, उघडकीस आणणें, जाहीर करणें [स आविस्+कृ ]

**आविष्करणें**—अक्रि १ प्रकट होणें, प्रतिबिंबित होणें, स्फुरणें 'नाना कयारूपें भारती। प्रकटली असे त्रिजगतीं। आविष्करोनि महामतीं। व्यासाचिये।' –ज्ञा १ ३२, ६ १९ २ अभिमान धरणें, गर्व वाहणें, आवेश चढणें 'जो कासे लागोनि तरे। तया पोहती उर्मी पुरे। पुरोहितु नाविष्करे। दातेपणें।' –ज्ञा १८ १७९ [स आविष्करण ]

**आविष्कृत**—वि आविष्कार केलेलें, व्यक्त, प्रकट केलेलें, झालेलें [स ]

**आविष्ट**—वि स्वाधीन झालेला, भारलेला, पछाडलेला, व्याप्त झालेला (विकार वगैरेंनीं) सामाशब्द—कामाविष्ट, क्रोधाविष्ट, कोपाविष्ट, लोभाविष्ट, हर्षाविष्ट, शोकाविष्ट इ० शिवाय आवेश शब्द पहा [स आ+विश् ]

**आंवि(वीं)स, आविस**—न १ आमिष, लालूच, 'न धावे अर्थे कामाचिया आविसा।' –भाए २५९, 'आविसासाठीं फासा मान। पाडी धनइच्छा ते।' –तुगा १०३६ २ मास आवींस आरो गिलें, उडाला।' –उषा ८५४ [स आमिष ]

**आविसाळें**—न पक्ष्याचें घरटें, आश्रयस्थान अविसाळ पहा 'सत्सग सूर्याचे मेळीं। देहाचीं आविसाळीं। सांडिती जीव।' –एभा २६ ४३७ [स आविस्+आलय ]

**आवीज**—पु (गो ) सूचना, नोटीस [पोर्तु आव्हीजु ]

**आवृत**—वि व्याप्त, वेष्टिलेला, आच्छादिलेला, गुरफटलेला 'तिहीं गुणीं आवृत। हे वेद जाणें निभ्रांत' –ज्ञा २ २५६ [स आ+वृ ] –स्त्री आवृत्ति (अप ) पहा

**आवृत्त**—वि फिरलेला, वेढे घेतलेला, गुडाळलेला, गरगर फिरलेला, घोळलेला, ज्याची आवृत्ति झाली आहे असा [स आवृत] शाको १ ३७

**आवृत्ति**—स्त्री १ उजळणी, एखाद्या गोष्टीचें आरंभापासून शेवटपर्यंत पुन्हा एकवार अनुष्ठान २ परतणें, परत येणें, ये जा करणें, परत करणें, परत तेंच करणें, पुन्हापुन्हा उजळणी, अभ्यास 'इतिहासाची आवृत्ति तशी पुन पुन्हा दावी।' –विक ५ ३ मनात घोळणें, चिंतन करणें, 'वृत्ती तये आवृत्तीसीं। बुडोनि जाय।' –ज्ञा १८ ११३५ ४ (तत्त्व ) पुनर्जन्म, जन्ममरणाचा फेरा ५ एखाद्या पुस्तकाचें पुन्हा मुद्रण–प्रकाशन, 'काव्याची पुनरावृत्ती काढतेवेळीं ज्यांत टीपा द्याव्या' –विवि (१८७६) ८ ७ १२६ [स ] ०वाचक–वि पटी दाखविणारा, आवृत्तिदर्शक (प्रत्यय ) जसें–एकपट, पाचपट वगैरेंतील पट हा प्रत्यय

**आवें**—वि (व ) कच्चें, निरसें (दूध) आव पहा

**आवेग**—पु १ जोर, वेग, जोराची गति २ मन क्षोभ, संताप, आवेश ३ तीव्रता (दुखण्याची), ठणका; तिडीक, अस्वस्थता. ४ एक गौण मनोभाव, व्यभिचारी भावाचा एक प्रकार भाव पहा ५ घाई, लगबग, धादल सामाशब्द– दु खावेग, शोकावेग [स ]

**आवेदन**—न नम्रतापूर्वक विनंति, अर्ज, निवेदन, गाऱ्हाणें, फिर्याद [स आ+विद्=जाणणें ]

**आवेल**— (कों गो ) नारळ खवून त्याचा चव पाण्यात उकळून त्याचें काढलेलें, किंवा चवाचा दाट रस कढवून काढलेलें तेल हें थडीनें अग फुटलें असता त्यावर किंवा जखमेवर लावतात, आव्याल, गुळेल अववाल पहा [ गो, अवल=कोंवळा नारळ+म तेल ]

**आवेल**—पु वैल, अवेल पहा 'अवश्य म्हणोनि पंचवुली चेतविले आवेल।' –सप्र १५४

**आवेव**—पु अवयव अवेव पहा 'अघटघटी हरीची माया। अलक्ष लक्षेना ब्रह्मया। आवेव अडामाजीं तया। देवमाया रचियेले।' –एभा ७ ५७४ 'वर्णी स्त्रियांचे आवेव। नाना नाटकें हावभाव।' –दा २ १० १९

**आवेश**—पु १ एका मनोभावाचें किंवा विकाराचें मनावर वर्चस्व, एका विकाराधीन सर्व मनोव्यापार असणें, क्षोभ, आवेग, सचार, विकारवशता, विकाराचा जोर सामाशब्द—कामावेश, क्रोधावेश, पिशाचावेश, लोभावेश, मोहावेश, शौर्यावेश २ उत्कटा, उत्सुकता तळतळपणा, त्वरा, घाई ३ संताप, राग 'देवें एव्हढा आवेश कीजे। कवणावरी' –शिशु ६७२ [स आ+विश्=शिरणें ]

**आवेश**—पु लक्ष, अवकाश 'निगमेंया आणि प्रवेशा। चित्त नेदीतु आवेशा।' –ज्ञा १६ २८२ [स आ+विश्=प्रवेशणें ]

**आवेशणें**—अक्रि १ आवेशयुक्त होणें, स्फुरण पावणें, उद्युक्त होणें २ रागावणें, संतापणें, क्षुब्ध होणें 'तंव वातात्मज आवेशला। म्हणे धरूनि आणीन दुदुमीला। मग तो आकाशीं उडाला। नाहीं देखिला कोणीहि।' –जै ६७ ३९ 'आवेशोनि रावण देखा।' –गुच ६ १८४ २ प्रवेश करणें शिरणें व्यापणें 'मनीं आवेशलें अद्भुत' [स आ+विश् ]

आवेशी—वि आवेशयुक्त, उत्साही, जोरदार, सापट, तडफ [आवेश]

आवेस—पु (गो) शरीरयष्टि, ठेवण, शरीराचा बांधा 'मामागी चली तुर्गेल्या, आवेसान म्हणसारखी काय मा' [स आ+विश्]

आवेष्टित(अंगुलि)—स्त्री (नृत्य) एका हाताने दुसऱ्या हाताच्या तर्जनीपासून आरंभ करून त्या हाताच्या तळहाताच्या बाजूने वेढा घालणे

आवै—स्त्री (गो) आई म्ह० १ आवे नाभिस्याचे पोट म्हइ=ज्याला आई नाही त्याने थोडे खाल्ले तरी पुष्कळ खाल्ले असे सांगणे २ आवै सोसीत, बापूस पोसीत=आई दुःखाचा करणार व बाप पैसा खर्च करणार (तिन्हाइताचे काय जाते?) [द्रा अव्वा-आवा]

आवो—पु. प्राप्ति, प्रतिष्ठा, डौल इ० अर्थी आव पहा जयासी का बीजभावो। वेदांनी केला ऐसा आवो।' –ज्ञा १५ ५१२, १३३, १८६१२ इ०

आवो—उद्गा अहो, अगे अवो पहा 'तव स्वामिनी भणितिरे। आवो आवो गोसावी आले।'–शिशु १७४ 'आवो आइके राजकुमरी।'–उषा ६५०

आव्त, आव्रत्—पु (गो) खडला [पोर्तु आव्तु]

आव्ती—स्त्री (गो) आहुती, आवती ०मारप-(गो) खर्चात पाडणे, खोट आणणे आवतीक पहा

आव्हाट—पु आडमार्ग, अव्हाट पहा 'की आव्हाटी भरला यरु। नव्हती दृष्टीगोचरु।'–कृ ४८ 'जैसे आपले सुईने आव्हांग।' –ज्ञा ३९ [अ+वाट]

आव्हाटचक्र—न उल्हाटचक्र-शक्ति मायाजाळ 'जें अतरींच भ्रमले। मायासभ्रमें सभ्रमले। तयासह कैसे उकले। आव्हाट चक्र।'–दा १४९२३

आव्हाटणे—अव्हाटणे पहा 'आव्हाटलिया तरी जोडे। स्वर्गसुख।'–ज्ञा ६१५८

आव्हान, आव्हानणे—आह्वान आह्वानणे पहा

आव्हेर-आव्हेरणे—अव्हेर, अव्हेरणे पहा

आश—पु चमच्याने खाण्याचा लापशीसारखा पातळ पदार्थ –गृशि २१८८ [स अशन, हिं आश]

आश—स्त्री आस, आशा, इच्छा 'लोकाचा सारविला उवरा देखती। तरी एका शिताची आश करिती।'–शिशु १५० [स आशा, म आस]

आशक—वि १ खुष, फिदा, अनुरक्त 'ते (सभाजीराजे) परस्त्रियावर आशक होते' –मदरु ११०६ २ प्रणयी, प्रियकर (माशूक बरोबर उपयोग) [अर आशिक्] ०माशूक-न प्रणयी जोडपे, प्रियकर व प्रियकरीण

आशखड—आगखड पहा

आशंकणे—अक्रि १ (काव्य) शकित होणे, साशक होणे, कचरणे, भिणे, भय वाटणे २ शका येऊन प्रश्न करणे [स आ+शङ्क्]

आशंका—स्त्री १ भीति, उद्वेग, शंका, संदेह, खात्रीचा किंवा समाधानाचा अभाव, सकोच २ (तर्क) आक्षेप, शंका, विधानाला हरकत 'आता प्रश्न हा घेऊन। विपरीत आशंकेचे –पांप्र २७४२ –दा ११११ ०निवृत्ति-स्त्री शंकेचे, आशंकेचे निरसन, स्पष्टीकरण, फाड [स]

आशंकित—वि १ भ्यालेला, साशक झालेला, विश्वास उडलेला, घुसलेला २ शंका घेणारा, भीति बाळगणारा, अंदेशा असलेला [स]

आशकी—स्त्री प्रणयानुनय, प्रियाराधन [फा आशिकी]

आशनाई—स्त्री मैत्री, नाते, परिचय आश्नाई पहा [फा]

आशय—पु १ उद्देश, हेतु अभिप्राय, मनीषा २ ठिकाण, स्थान, आगर, साठा सामासशब्द-अमाशय, जलाशय, मूत्राशय इ० 'अमुच्या अनुभाशयाचा धातु। करिता चरणधूमकेतु।' –एभा ६१११ [स आ+शी=राहणे]

आशरफी—स्त्री सोन्याचे नाणे अश्रफी पहा

आशा—स्त्री १ अपेक्षा, आकांक्षा 'आशा अमर आहे' २ इच्छा, वासना, मन 'पेढे पाहिले तेव्हां माझी आशा त्यावर गेली' ३ आवड, प्रेम, लोभ 'आता या फाटक्या आगरख्याची आशा कशाला धरतोस। ग्यासास देऊन टाक' ४ दिशा 'धेनु दुरनी वळिल्या येवूनि उत्तरदिशा' –मोविराट६६३ [स] ०कार-वि आशा करणारा, आशावादी ०दुराशा-स्त्री बरी वाईट इच्छा, अपेक्षा, माया, लोभ, आशा आणि भीति 'आशा दुराशा त्यजा। आधि तो उमजा। स्वहित समजा। दुर्भाव टाका दुजा। मुक्तीस लावा ध्वजा।' ०धोशी-वि (गो) हावरा 'किते आशाधाशी रे थावा मनीस हॉ' ०निराशा स्त्री आशा आणि निराशा, आशेची निराशा म्ह० आशेसारखे दुसरे दु ख नाही आणि निराशेसारखे सुख नाही आशेची निराशा होणे–अपेक्षा, आशा, हेतु फलद्रूप न होणे, हिरमोड होणे ०पाश-पु १ ससारातील अपेक्षा, इच्छा, हेतु, यांचे जाळे, मोहजाळ, विषयजाल २ (व्यापक) जगराहाटी, जग ०बद्ध-वि १ आशापाशात सापडलेला, सासारिक, आशा, अपेक्षा यानी जखडलेला, लोभी, हावरा 'आशा बद्ध बोलो नये। विवेकेवीण चालो नये।' –दा १४१७७ २ आशावादी, आशायुक्त ०भंग-पु निराशा, हिरमोड ०भूत-वि (निंदाव्यंजक) (प्र) आशाळभूत, हावरा, लोभी ०वाद-पु

जगात दुःखापेक्षा सुख अधिक आहे आणि जगात अखेर सत्या चाच किंवा सत्पक्षाचाच विजय होणार आहे असें प्रतिपादन कर णारें मत (इं) ऑप्टिमिझम ०वान–वादी–वि (विरु) आशा यत–आशाविष्ट=आशायुक्त आशा ठेवणारा [स]

**आशाचर्णे, आशवर्णे**—अक्रि आशा करणें, इच्छा करणें, आस धरणें, लोभणें [आशा]

**आशाविणें**—अक्रि आशा करावयास लावणें, आशा उत्पन्न करणें, लाभविणें [आशा]

**आशाळ आशाळु**—वि १ लोभी, हावरट, अधाशी २ आशावादी 'प्रो गोखले हे आमच्यातले अत्यंत आशाळु गृहस्थ आहेत'–टि ३ ९८ **आशाळभूत**–पु १ आशाभूत पहा अति शय अधाशी २ आशावादी [आशा+आळु प्रत्यय]

**आशिका**—पु स्त्री आशीर्वाद 'सकळिक आशिका देती।' –वसा ७० [स आशिस्]

**आशिल्लो**—वि (गो) खाऊन पिऊन सुखी असा (मनुष्य) [स अश्=खाणें]

**आशी**—वि खाणारा, सेवन करणारा सामाशब्द–अमृताशी, विषाशी, अन्नाशी, अल्पाशी, मिताशी, पथ्याशी, बहाशी [स]

**आशी**—पु आशीर्वाद 'त्यासी आशी देतो, देतो पुनाजशी चिंता ठेव।'–मोआदि २ २३ [स आशिस्]

**आंशी**—न (कों) पोहे पाखडताना जे बारीक कण निघ तात ते [स अंश]

**आंशी**—स्त्री (गो) १ सुकलेलें गवत २ एक रोपटें

**आशीक**—वि प्रणयी, लुब्ध, (विशिष्ट गोष्टीची) आवड असणारा आशक पहा [अर आशिक्]

**आशीपाशीं**—क्रिवि सभोंवतालीं, चौफेर, जवळपास आस पास पहा

**आशीर्वचन, आशीर्वाद**—नपु एखाद्याचें कल्याण चिंतिणें, आयुरारोग्य, पुत्रपौत्र, संपत्ति इ० प्राप्त होवो असें इच्छिणें, स्वस्तिवाचन, शुभचिंतन, दुवा (क्रि० देणें, घेणें, करणें) **पत्र**–न वडील माणसाकडून लहानास वरिष्ठ जातीकडून (विशेषत ब्राह्मण जात) खालच्या जातींच्या माणसास जें अभीष्टचिंतनपर व आशी र्वाद दर्शक पत्र जातें तें [स आशी +वचन]

**आशीर्वादणें**—अक्रि आशीर्वाद देणें अभीष्ट चिंतणें 'आशीर्वादुनि साधु साधु वचनें आले तदा गोपुरा। –आता ४

**आशीर्वादार्थ, आशीर्वादार्थक**—वि शुभेच्छा प्रदर्शक, अभीष्ट चिंतणारें ईश्वराचें स्वरूप वर्णन करून असा जो ईश्वर तो तुमचें रक्षण करो 'अशा अर्थाचा (श्लोक, वाक्य इ०), आशी र्वादपर [स]

**आशीविष**—पु साप, सर्प 'कुद्धाशीविष गरुडा, कीं जिंकाया अशुद्ध धी शुद्धा।' [स]

**आशीष**—पु आशीर्वाद 'चंद्र इंद्र प्रजापति सकळिक आशीष देती।'–वसा ५० [स आशिस्–आशीस्]

**आशु**—वि सत्वर, लवकर, शीघ्र 'सलज्जाची लज्जा हरि परि हरी आशु भजनी।' [स]

**आशुग**—पु शर, बाण, इषु 'गुरु शासकिमुक्ताशुगपटल न द देश मार्ग वातातें।'–मोद्रोण ११४४ [स आशु=जलद+ ग=जाणारा]

**आशुद्ध**—न रक्त अशुद्ध पहा 'रुते बाण तेथूनि आशुद्ध वाहे'–वामनविराट ७ १७९ –दा ३ ११७

**आशुरा, आशूरा, आशोरा**—मोहरमचा नववा अथवा दहावा दिवस मोहरमचे पहिले दहा दिवस असुरा पहा 'सांप्रत मोहरमचे आशुऱ्याचे दिवस'–रा ५ ९३ [अर अशूरा]

**आशेभाण**—न (गो) कमालीचा हावरा, अधाशी 'तो म्हणजे सामकें आशे–भाण' [स आशा+भांड=भांडें]

**आशौच**—न १ कोणी सपिंडादि जन्मला किंवा मेला असतां किंवा प्रेत वाहून नेलें असतां (खांदा दिला असतां), त्याचें दहना दिक केलें असतां धर्मशास्त्राप्रमाणें श्रौतस्मार्तादि कर्माविषयीं अन र्हता आणि अस्पृश्यत्व अशी जी स्थिति मनुष्यास कांहीं काल प्राप्त होते ती २ ग्रहण लागलें असतां तें सुटेपर्यंत व त्यानंतर स्नान करीपर्यंत येणारें अशुचित्व ३ (सामा) सुतक (मेल्याचें), विटाळ सामाशब्द–जननाशौच, ग्रहणाशौच, निर्हरणाशौच, जाताशौच, प्रेताशौच स्रावाशौच, शवाशौच, पाताशौच, अनु गमनाशौच, दर्शनाशौच, स्पर्शाशौच इ० ४ (ल) अशुद्धत्व, घाणेरडेपणा, गबाळपणा, अजागळपणा [स]

**आशौची**—वि आशौच असलेला, सुतक असलेला

**आश्कारा, आस्कारा**—पु कीर्ति, प्रसिद्धि, लौकिक, अस्करा अस्कारा पहा 'भवानीपंताचा आश्कारा मान, सोंगें कांहीं चम त्कारिक नव्हती' ऐटि १ ५८ [फा आश्कारा]

**आश्चर्य**—न १ विस्मय कौतुक, नवल, अचंबा 'आश्चर्या अति पावली बघुनिया तूणीर पाठीवरी।'–शबरीआख्यान २ अद्भुत गोष्ट चमत्कार, आश्चर्य वाटणारी गोष्ट 'कांहीं आश्चर्य पहावें असें मनत आहे'–कम १ ३८ अशुद्ध रूपें–आश्विर्य, 'ब्रह्मानंद ते समई। कोण आश्विर्य होतसे।'–वेसीस्व ३ २२ (गो) आश्विर [स]

**आश्चर्यणें**—अक्रि (काव्य अर्वाचीन रूप) आश्चर्यचकित होणें, विस्मय वाटणें 'आश्चर्ये दिवकार्थे ऐकुनि दाहा युक्ति हो गोजिऱ्या'–जयजयकार (स्वातंत्र्यशार्दूल)

**आश्नाई**—स्त्री स्नेह, सख्य, परिचय आशनाई पहा 'तेथें रगोजी पटवारी यासी आश्नाई होती त्या आसरियानें राहिलों' –भाअ १८३४ १४१ 'राव पतप्रधान यांजकडील सर्दारांशीही रक्त आशाईचा आहे –रा ५ १०१ [ फा आश्नाइ =मैत्री ]

**आश्रम**—पु १ ब्राह्मणक्षत्रियादि त्रैवर्णिकांना धर्मानें घालून दिलेले ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व सन्यास हे चार मार्ग किंवा अवस्था यास वर्णाश्रम धर्मेंहि म्हणतात 'नित्यानित्य होमद्वारें। ब्रह्माग्नि प्रज्वळला एकसरें। जाळूनि आश्रमाची चारी घरें। केलें खरें निराश्रमी॥' –एभा ७ २६६ २ पर्णकुटी, पर्णशाला, निवास स्थान, मठ, पाठशाला, ऋषींच्या वस्तीचें ठिकाण 'आणि वयसा वित्तकामु। ययाचा वाढवी सभ्रमु। म्हणौनि भर्दे आश्रमु। तोचि केला।' –ज्ञा १८ ७५७ 'देवें आश्रम काहीं चालवावे भले।' सप्र ८ ३३ ३ गृहस्थाश्रम, ससार 'आपणासि आश्रम करणें नाहीं।' –स २ १९ 'साहोनि काम क्रोध अहकार। आश्रमीं अविनाश साधी रे।' –तुगा २४८३ ४ सन्यास, चतुर्थाश्रम ५ गोसाव्यांतील एक पथ ०चतुष्टय–ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य वानप्रस्थ सन्यास हे चार आश्रम ०धर्म–पु ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम व सन्यास हे चार आश्रम व त्यात स्वाध्याय, यज्ञकर्में, दान आणि सर्वसगपरित्याग इत्यादि कर्में आचरणें हा धर्म [ स ]

**आश्रमांतर**—न एका आश्रमातून दुसऱ्या आश्रमांत जाणें, दुसऱ्या आश्रमाचा स्वीकार [ स ]

**आश्रमी**—वि १ चार आश्रमांपैकीं एका आश्रमाचा २ आश्रमवासी, तपस्वी, ऋषि वगैरे [ स ]

**आश्रय**—पु १ आश्रयाचें स्थान, आधारस्थान, निवाऱ्याची जागा २ सरक्षण, छत्र, आधार, आसरा, थारा, आच्छादन 'तिला परमुलुखात कोणाचा आश्रय नव्हता' –पाव्ह ५ ३ ( ल व अलकार ) दुजोरा, मजुरी, पत्करि आधार, प्रमाण, वैवार, आधारभूत प्रमाणभूत, वैवारी ४ आश्रय असणें, अवलंबन करणें, स्वीकारणें उपयोग करणें पाळणें वागणें, अनुसरणें, अभ्यासणें ५ शेजार, सान्निध्य 'अग्नीच्या आश्रयास तूप ठेवू नको, वितळेल ( सामासशब्द ) जलाश्रय, ग्रामाश्रय वृक्षाश्रय इ० [ स आ+श्रि–आसरा घेणें ]

**आश्रयण**—न आश्रय पाहणें, आधार धरणें आश्रयार्थ अवलव करणें धरून बसणें चिकटून राहणें ( मत, सिद्धात इ कास ) [ स ]

**आश्रयणें**—उक्रि १ आश्रय घेणें, निवाऱ्याकरिता अवलव करणें, मदत घेणें, 'साइनि आपला आडल। लक्षण आश्रयी जळ।' –ज्ञा १८ १९५० 'तयाचा आश्रम अति सुदर। जेथें श्वापदांच्या नसे वैर। विहार आश्रयती उदिर। निंदा करिती स्वलीलें।' –जै २९ १५ २ अनुसरणें, मान्य मानणें, चिकटून बसणें ( मत, सिद्धांत यांस ) ३ अवलव करणें, स्वीकारणें, पाळणें ( उपाय, योजना ) [ आश्रयण ]

**आश्रयराग**—पु ( सगीत ) थाटास ज्या एखाद्या प्रसिद्ध रागाचें नाव दिलेलें असतें तो

**आश्रयी**—वि *आश्रय करणारा, आश्रय घेतलेला, ज्यानें* आश्रय घेतला आहे तो, शरणार्थी, शरणागत [ स ]

**आश्रा**—पु आसरा आश्रय पहा 'आपला सरकारचा आश्रा गेला असें त्यास वाटलें' –टि ४ ४४ [ स आश्रय, हिं आश्रा ]

**आश्राप-व**—वि गरीव, निरुपद्रवी अश्राप अर्थ ३ पहा 'अनावर मोठें खर, वाकी फार आश्राव'

**आश्रायणी**—*अशरीरिणी पहा 'तव आश्रायणी सूचना* वचन।' –दावि ४२

**आश्रित**—वि १ आश्रय दिलेला, सांभाळलेला, पोसलेला २ सरक्षणासाठीं ज्याचा आश्रय घेतला आहे असा, जो आश्रयिला जातो तो, आश्रय देणारा ३ अनुसरलेला, पाळलेला, अभ्यासिलेला ४ उपयोग केलेला, कामीं लावलेला, आसरा घेतलेला, अवलंबिलेला ५ *आश्रयास असलेला, ज्यास काहीं कामगिरी* नसून केवळ योगक्षेमासाठीं ज्यास श्रीमत लोकानीं नेमणूक करून दिली आहे असा भिक्षुक वगैरे सामासशब्द–राजाश्रित, भिक्षाश्रित इ० [ स ]

**आश्रुढाळ**—वि ( व ) अश्रु गाळणारा, घोड्याचें एक लक्षण अश्रुढाळ पहा

**आश्लिष्ट**—वि आलिंगिलेला, कवटाळलेला [ स आ+श्लिष् ]

**आश्लेष**—पु आलिंगन, भेट [ स ]

**आश्लेषणें**—अक्रि आलिंगणें, आलिंगन देणें 'सर्व इंद्रियेंहि आश्लेषावें। क्रियातेंचि।' –ज्ञा १६ ३३२

**आश्लेषा**—स्त्री सत्तावीस नक्षत्रांपैकीं नववें नक्षत्र [ स ]

**आश्वलायन**—पु या नावाचा एक ऋषि, आश्वलायन श्रौत व गृह्य सूत्राचा कर्ता, कात्यायनाच्या ऋग्वेदसर्वानुक्रमणीवरील षड्गुरुशिष्यानें केलेल्या टीकेंत आश्वलायन हा शौनकाचा शिष्य असल्याचा उल्लेख आहे २ आश्वलायन शाखेचा (अनुयायी) ब्राह्मण ०सूत्र–ऋग्वेदाच्या शाकल शाखेचें सूत्र, याचे १६ अध्याय असून १२ अध्यायास श्रौतसूत्र व चार अध्यायास गृह्यसूत्र म्हणतात श्रौतसूत्रात श्रौत विषय असून गृह्यसूत्रात सस्कार व इतर स्मार्त विषय आहेत [ स ]

**आश्वास**—पु धीर, आश्वासन 'आश्वास दिधला दयाघनें।' –दावि २६० [ *स आ+श्वस्* ]

**आश्वासणें**—सक्रि १ धीर देणें, आशा दाखवून उद्युक्त करणें उत्तेजन देणें 'वरि आश्वासिलें पार्थातें। विहाऱ्यासी।' –ज्ञा ११ ६५४ 'आश्वासाव दास। तरी घडतो विश्वास।' –तुगा १६८५ २ बोलावणें हाक मारणें 'ऋषी करू गेला अनुष्ठान'।

मार्गे आले प्रयमूर्ति आपण। अनुसयेसी आश्वासुन। अतिथि आलों म्हणती।' -गुच ४०७ [सं आश्वासन]

**आश्वासन**—न धीर, उत्साह, उत्तेजन 'तिसी यावें आश्वासन। उदईक आहे तुझें लग्न। तुवा असावें सावधान। पाणिग्रहण मी करीन।' -एरुस्व ५ ७८ [स]

**आश्वासित**—वि आश्वासन दिलेला, प्रोत्साहन, धीर दिलेला [स]

**आश्विन**—पु चैत्रादि बारा महिन्यातील सातवा महिना [स अश्व-अश्विन्-आश्विन]

**आश्विनगोरी**—वि आश्विनातील गौरींच्या सुमारास तयार होणाऱ्या नाचणीच्या एका प्रकाराचें नाव [स आश्विन+गौर]

**आश्विना-नी**—वि आश्विन महिन्यासबधी (आदितवार, पौर्णिमा तिथि इ०) [स आश्विन]

**आषक**—आशक पहा

**आषाढ**—पु चैत्रादि बारा महिन्यांपैकीं चौथा महिना [स]

**आषाढ झाड, आषाढ दवणा, आषाढखाना, आषाढ पागोळी, आषाढपार्टी, आषाढभूती**—आखाड पहा

**आषाढा-ढी**—वि आषाढासबधी

**आषाढी**—स्त्री आषाढ महिन्यातील शुद्ध एकादशी शिवाय आखाडी पहा म्ह० (व) आषाढीं तट, श्रावणीं भट, भाद्रवीं कुणबट (माजतात)

**आष्ट**—एक झाड आस पहा

**आष्टा**—स्त्री (व) रानतुळस

**आष्णी**—(गो) घुसळखांबाची दोरी आसणी पहा

**आस**—स्त्री आशा, इच्छा, अपेक्षा, उत्कठा 'परी कर्मफळीं आस न करावी। आणि कुकर्मीं सगति न व्हावी।' -ज्ञा २ २६६ 'कान्ह्याचिये आसे। देव जळीं जाले मासे।' -तुगा १८९ (क्रि० धरणें, घेणें, लागणें) म्ह० १ धास तो आस २ आसका बाप निरासकी माय ३ आशा अमर आहे [स आशा, प्रा आसा]•

**आस**—पु स्त्री १ (भोंवऱ्याचा खेळ) रगणात नेमका भोंवरा असणें रगणातील भोंवऱ्यास दुसरा भोंवरा मारणें, रगणटोला २ (चेंडूचा खेळ) एक चेंडूल दुसऱ्या चेंडूलास नेम धरून मारणें [स अस्=फेंकणें]

**आस आस**—पु १ गाडीचा कणा हा लोखडी किंवा लाकडी असतो २ (ज्यो) दोन ध्रुवांना जोडणारी जी कल्पित रेषा व जी पृथ्वीगोलाच्या अगदीं मध्यातून जाते तिला आस म्हणतात (सामा) ज्या कल्पित रेषेभोंवतीं कोणताहि गोल फिरतो ती रेषा [स अक्ष]

**आस**—पु एक झाड (लॅ हिबिस्कस पाप्युलनिओआइड्स) —स्त्री एक प्रकारचें झाड **आसफळ**—न आस झाडाचें फळ -स्त्री (कों) फणसाची एक जात

**आसा**—न धनुष्य 'गणेश घे रत्नजडीत आसा।' -सारुद्र ५ ३० [स]

**आसं**—क्रि (चि) आहे [स अस्=असणें]

**आसक, आसुक**—न (बायकी) बाळंत,पूर्ण दिवस भरण्या पूर्वी प्रसुति [स सू=प्रसवणें]

**आसकुड**—न अडचणीची जागा, खवदाड, दुर्गम स्थान 'शब्दाचिया आसकडीं। भेदनदीच्या दोहीं थडीं। आरडत विहरवेडीं। बुद्धियोगु।' -ज्ञा १६ ५ [स आस+कूट]

**आसका-कें**—क्रिवि सगळा,सपूर्ण असका पहा 'राया तू पाहे पा विवेकें। जयचि आसकें गुरु दिसे।' -एभा ७ ३४३

**आसका**—वि आश्रित 'कगाल तरी मी तुमचाच आसका।' -दावि ६० [स अस्=असणें]

**आंसकुड**—पु (व) गाडीचा आस, कणा आस पहा

**आसक्त**—वि अनुरक्त, परायण, निरत, लपट, लोभी 'तुका म्हणे जीव आसक्त सर्वभावें। तरतील नावें विठोबाच्या।' -तुगा २४९१ सामाशब्द-विषयासक्त, गृहासक्त, भजनासक्त [स आ+सज्=चाधणें]

**आसक्ति**—स्त्री लोभ, तत्परता, तल्लीनपणा, लपटता, भक्ति, व्यासग, हव्यास 'परी कर्मफळीं आसक्ती। धरूनिया।' -ज्ञा २ २४५ [स]

**आसखा**—वि सर्व, प्रत्येक, किंवा सर्व समुदाय 'कवणु कवणा न देखे। होते तैसें राहिले आसखे। येरीकडा जाऊ न सके। अधारें करोनी।' -शिपु १ १६ ११२ असका पहा

**आसट**—पातळ, सरबरीत असट पहा

**आसड**—पु गाय, म्हैस, इ० कांचें थान, सड, अचळ [म सड]

**आंसडणें**—सक्रि (कर्ना) काडणें, सडणें [सडणें]

**आसडणें, आसडा, आसडी, आसण-णा**—अ मध्यें पहा 'मग विराटाचेनि महाभेडें उत्तरें। आसडूनि नागविलें।' -ज्ञा ११ ४६९

**आसडा**—पु जोराचा हिसका असडा पहा 'रगलें तें अगीं दावी। विष देववी आसडे।' -तुगा ३१६४ 'चोढिलें मारोनि आसडा।' -मुआदि १० १०१

**आसडी**—स्त्री (कों) गाय बैल, म्हैस इ० कानीं मारलेली लाथ (क्रि० मारणें) [स अस्=फेंकणें]

**आसणी**—स्त्री घुसळखांबास बांधावयाची खींची दोरी [आसडणें, स अस्=फेंकणें, प्रा असण=फेंकणें, ओढणें]

**आसतुटी**—वि निराशा करणारें, आशा तोडणारें 'तेवींचि कठिण पोलें आसतुटी। अर्जुन होईल हिपुटी।' –ज्ञा ११ ४५३ [स आशा+त्रुट्=तुटणें]

**आसंद**—पु एक औषधी वनस्पति, आस्कंद [स अश्वगंधा]

**आसंदी**—स्त्री १ (श्रौतकर्म) लांकडी चार पायांची घडवंची ही मोळाच्या दोरीनें विणलेली असते हिच्या विणलेल्या भागाच्या वर सुमारें हातभर पायांची उंची असते सोमयज्ञांतील सोमवल्ली ईवर ठेवतात २ (हिं) खुर्ची, आसन, खाट [स]

**आसन**—न १ बैठक, बसकर, बसण्याच्या उपयोगी पाट, खुर्ची, कोच, सतरंजी वगैरे वस्तु सामासिक-कुशासन, दर्भासन, कृष्णासन 'होईन गुरूचें आसन। अळंकार परिधान। चंदनादि होईन। उपचार ते॥' –ज्ञा १३ ४२० २ बसण्याचें वाहन-पक्षी, उंदीर, वगैरे जसें-विष्णूचें वाहन गरुड, गणपतीचें वाहन उंदीर, शंकराचें वाहन बैल ३ हातपाय वगैरे अवयवांची योगाभ्यासांत किंवा सुरत प्रसंगीं जी विशिष्ट प्रकारची रचना ती जसें-कुक्कुटासन, मयुरासन इ० हीं आसनें ८४ आहेत 'तेंचि पद्मामाजीं प्रगट। आसना लागोनि स्पष्ट। मैथुनें लिहिली जी वीट। वैराग्यातें उपजविनी।' –ज्ञा १० २६ 'येकीचे हातीं विचित्र पट। चौऱ्यायशी आसनांचे प्रगट।' –मुरंशु ३ म्ह० एक्या मांडीवर चौऱ्यांशीं आसनें ४ बसण्याचा विशिष्ट प्रकार जसें-वीरासन, पद्मासन ५ घोड्या वरील बैठक, घोड्याची पाठ, घोड्याच्या पाठीवर बसण्याची जागा ६ पुस्तकाच्या पानावरील रकाना, कॉलम, खातें, कोठा **०ओळखणें**-आपला स्वार कोण आहे हें (घोड्यानें) जाणणें **०गुंडाळणें**-बोचकीं बांधून, निघून जाणें, विन्हाड हलविणें **०घालणें-ठोकणें**-आसनमांडीप्रमाणें एखाद्या विशिष्ट पद्धतीनें बसणें, स्थिर होणें, ठाम बसणें **०जड होणें**-१ घट्ट बसणें, बसून राहणें २ चढून जाणें, गर्वानें फुगून जाणें **०जमणें**-१ चांगला जम बसणें २ गच्च भरून येणें, दाटणें (ढग वगैरे) **०जमविणें**-आपला बस बसविणें, आपलें स्थान स्थिर करणें **०जोडणें**-चविडवें बसणें **०ठरणें**-घोड्याच्या पाठीवर बसणें, स्थिर होणें **०ठेवणें**-(घोड्यावर) चढणें **०डळमळणें**-१ आपली जागा, बैठक अस्थिर होणें २ (ल) अस्वस्थ-चंचल होणें घडी विस्कटणें, बसलेला जम बिघडणें **०ढळणें**-आपला बस, जम, योग्यता-दर्जा वगैरे गमावणें **०पडणें**-जागा मिळणें, जम बसणें वगैरे **०बसणें**-आसन ठरणें पहा **०रुंदावणें-वाढणें**-१ रुंद होणें, लठ्ठ होणें (शरीर) २ (ल) मोठेपणा मिळविणें, लवाजमा वाढणें **०सोडणें**-नेहमींची जागा, दर्जा, प्रांत, सोडणें **आसनीं-खेळणें**-१ (भुताटकी) आपल्या झाडामध्यें स्वच्छंदानें वावरणें-खेळणें अंगांत येणें २ आपल्या जागेंत आपल्या साधनांनीं खोड्या, चेष्टा करणें **–नीं येणें**-मूळपदावर, मूळ स्थितीला येणें **०कुढा-घा**-पु **०खोड स**-स्त्री घोड्याच्या ७२ खोड्यांपैकीं एक खोड, घोड्याच्या पाठीवर बसण्याच्याजागीं काहीं रेषा किंवा विशिष्ट रंग असणें हें या खोडीचें लक्षण आहे घोड्याला हें अशुभ लक्षण असेल तर धन्यावर मृत्यु किंवा एखादें मोठें संकट ओढवतें **०चलन**-न चंचलता, अस्थिरता, धरसोड, (अक्षरश व लक्षणेनें) **०बंध-रचना**-पुस्त्री आसन बसविणें, नक्की करणें, पालणें (विशेषत योगांत) **०मांडी०घटा**-स्त्रीपु दोन्ही पावलें दुमडून एक पाऊल दुसऱ्या गुडघ्याशीं आणि दुसरें पाऊल पहिल्या गुडघ्याशीं लावून बसण्याचा प्रकार **०विधि**-पु १ योगांतील आसनें कशीं करावीं, कशीं ठेवावीं वगैरे ज्यांत सांगितलें आहे असा विधि २ एखादें धर्मकृत्य (जप, पूजा इ०) करण्यासाठीं बसावयाच्या वेळीं, तें कर्म संपेपर्यंत उठावयाचें नाहीं असा नियमानें बसणें व त्यावेळीं करावयाचें न्यास वगैरे विशिष्ट कर्म [स] **०शुद्धि**-स्त्री आसनाची ठेवण व रीत निश्चित करणें, अनुशासनापूर्वी तंत्रशास्त्रांत आसनांचे अनेक प्रकार सांगितले आहेत त्याप्रमाणें आसन करणें

**आसनपेढी**—स्त्री (गो) पाट (बसावयाचें) [स आसन+पीठ]

**आसनी**—स्त्री पूजेस वगैरे बसण्यासाठीं केलेलें लोंकरीचें लहान आसन [स आसन]

**आसनी**—स्त्री (व) आश्विनी पौर्णिमेस सर्वांत वडील मुलास ओंवाळण्याचा विधि 'आज मुलाची आसनी करावयाची आहे' [स आश्विनी, प्रा आसिन]

**आसनीवान**—वि (व) यथेच्छ 'आज आसनीवान जेवण झालें' [स आशा+म नीववणें]

**आसन्न**—वि जवळचा, समीप असणारा [स] **०काल-मरण-मृत्यु-अवधी**-वि मरणोन्मुख, मरणास टेकलेला **०निद्र**-वि झोंपेस आलेला **०प्रसव-प्रसूति**-वि बाळंत होण्यास टेकलेली, प्रसूतिकाल जवळ आलेली (स्त्री, गाय, म्हैस इ०) **०समाधि**-वि समाधि घेण्याच्या बेतात आलेला (संन्यासी)

**आसपास**—क्रिवि भोंवतालीं, आजूबाजूस –पु (पुस्तक बांधणी) पुस्तकाची बांधणी करतेवेळीं त्याच्या दोन्ही बाजूस चिकटावयाचे कोरे कागद, (इ) साइडपेपर [स आस्य=तोंड, किंवा आसन्न=जवळ+पार्श्व, प्रा आस+पास=जवळ, वै आसा–स आस=जवळ, +पार्श्व=बाजू हिं आसपास, सिं ओसेपासे]

**आसपासचा-पासील**—वि आसपास असणारा, जवळ पासचा, आजूबाजूचा

**आसपाव**—पु (कर्ना) दोरी, पेंडे, कासरा, इत्यादि जोत जुंपण्याचें सामान

**आसभास**—पु पुढें होणाऱ्या गोष्टीचा भास, चिन्ह, स्वरूप लक्षण, तर्कीला किंवा कल्पनेला वाव 'मला अगदीं आसभास

समजत नाहीं ' ' हा मोर निपेल असा मला आसमास नव्हता ' [भाउ द्वि ]

**आसभास**—स्त्री (गो) रीतिरिवाज, रीतभात 'आस भास काय्च कळना मरे तुका ' [ भात=चाल, रीत द्वि ]

**आसमंतचा**—वि शेजारचा, जवळचा, आसपासचा.

**आसमंतात्**—क्रिवि सर्व बाजूनीं, सभोंवतालीं, चोहोंकडून, आसपास, या शब्दाचीं अशुद्ध रूपें-आसमत, आसमतजागीं, आस मतभागीं [ स आ+समतात् ]

**आसमाप्ति**—क्रिवि समाप्तिपर्यंत, शेवटपर्यंत, पूर्ण होई पर्यंत [ स आ=पर्यंत+समाप्ति=शेवट ]

**आसमास**—क्रिवि सर्वत्र, सभोंवतीं, आसपास, पुष्कळ, अतिशय, सतत, सहसा, कधींहि, केव्हाहि 'मुखीं घालिता एक ग्रास। स्वर्गी पणवर्णी घणघोष। कदा न राहे आसमास। गजर विशेष जाहला।'—ह ३४९५ 'तुझें गुणलक्षण चिदाकाश। तेथें व्यासादिक उडती राजहंस। भेदित गेले आसमास। ज्याच्या मतीस सीमा नाहीं।'—ह २५. 'मी तृप्त न होता जगन्निवास। तें पर नादतचि आस। तें अवद्या ये बहुवस। आसमास कष्ट होती।' —ह ७१४९ 'तीन राती तीन दिवस। युद्ध झालें आसमास।' —रावि २५१६७ 'कृष्णासि जरी देती गोरस। तरी शतगुणें वाढे विशेष। ते गृहीं दशा न ये आसमास। गोरस हरीस अर्पिता।' —ह ६१९१ [स आ+समास, असमसाहस पहा ]

**आसमाळयो**—स्त्री अव (गो) उतार्णे मिजून, पाय वर करून खारर ल्हान मुलाला दिलेले झोके [ अस्मान+अळच्यो ]

**आसर**—पु (गो) आश्रय, मदत [स आश्रय]

**आसर, आसोर**—पु (कों गो) पावसाळ्यात पाऊस थांबून उघाडी पडते ती, उघडीप [स अपसृ प्रा ओसर, म ओसरणें, तुल० स आसार=जोरानें पाऊस पडणें ]

**आसर**—पु परिणाम, असर पहा 'माझ्या बोलण्याचा त्याच्यावर चांगलाच आसर झाला' ०पाडणें-परिणाम घडवून आणणें

**आसरण**—न (कु) पावसापासून रक्षणाचें साधन, छत्री इ० [स आश्रयण म आसरा ]

**आसरा**—स्त्री १ जलदेवता, तळीं, विहिरी वगैरे ठिकाणीं वास करणाऱ्या सात देवता, शेतातील देवता प्रकृतिदेवता आसराई पहा 'वनदेवता गंधर्व यक्षिणी। गोंधळ घालिती महा वनीं। आसरा जान्हवस्य रूप दाऊनी। तेच क्षणीं गुप्त होती।' —ह ११९९१ 'सातवे दिवशीं रातीं आसरा। गुप्त रीतीचा घालिती फेरा।' —पाळणा (शाहूमहाराजाचा) ८ [स अप्+सृ, अप्सरा प्रा अच्छरा ]

**आसरा**—पु १ आश्रयस्थान, आश्रयाची, निवाऱ्याची जागा, आडोसा, 'तुजिया रूपवीण ईश्वरा। आसरा आम्हा नाहीं दुसरा।' २ बचाव, रक्षण; आच्छादन, छत्र ३ आधार, प्रमाण ४ (ल) संमति, अनुमति, अधिकार, परवानगी [स आश्रय, हिं आसरा ]

**आसराई**—स्त्री प्रकृतिदेवता, आसरा 'आसराई सादर केला। रामचंद्र कौसल्ये।' —स्त्रीगीत १२ [ आसरा ]

**आसलग**—वि सोपें, सुगम, असलग पहा 'अपाय इहीं आसलग।' —ज्ञा १६४२९

**आसव**—पु १ पाणी वगैरे द्रवपदार्थांत औषधी द्रव्यें घालून अग्निपचन न करिता तसेंच पुरून ठेवून मद्यप्रमाणें तयार करतात तें जसें—कुमारीआसव २ द्राक्षे, कोरफड इ० औषधी पदार्थांचा अभिसयोगानें औषधार्थ जो द्रव काढतात तो उ० द्राक्षासव ३ ऊस, काकवी वगैरेपासून काढलेली दारू ४ (सामा) मद्य ५ अर्क, (इ) टिंक्चर [स आ+सृ]

**आसवणें**—अक्रि आशाबद्ध होणें आसावणें पहा [स आशा, म आस]

**आसवल**—अस्वल पहा 'आसवले गुरगुरिती।' —दावि २४४

**आसवें**—न अने, अश्रू 'आसवें लोचनीं आलीं।' —विक ९, [स अश्रु, प्रा अंसू, म असू]

**आसवेल**—स्त्री एक वनस्पति, शिलागौड, दिसमावळी, शतावरी पहा

**आसळसा**—स्त्री (गो) आश्लेषा नक्षत्र [स आश्लेषा ]

**आसा**—क्रि (कों गो) आहे, जिवत आहे 'तोचि आसा वीं काय आजुन हें न कळे कोणाला। नाहीं त्याचा विश्वास जाईल अवचित चालुन घाला।'—होला १२ 'आवय आसा काय?' [स अस्=असणें ]

**आसॉ**—पु (गो) तांदुळात एखादा सक्वच असलेला भाताचा दाणा, भातगोटा, भातकण, आशीं पहा

**आसा आसाणा**—पु एक झाड असणा पहा

**आसाटणें**—सक्रि (मिठी) आपटणें 'तियात्र आपो टोपी काडिन तोर तीवे आसाटी।' =त्यानें आपली टोपी काढून जमिनी वर आपटली [म अराडणें ]

**आँसाड**—स्त्री (गो) सुक्तीच्या वेळीं नदीच्या पाण्यास येणारी नोराची उसळी

**आसाडी**—स्त्री जखमेवर बसणाऱ्या माशानीं केलेली विष्टा अराडी पहा

**आंसाडी**—स्त्री (व) आळी वीड असडी पहा 'दाढीनें घोंगड्यावर आसाडी पडली'

**आँसाद**—पु (गो) छत्रीचा अभ्रा, छत्रीच्या सऱ्याचा सांगाडा [ पोर्तु ]

**आसादन**—न. १ ठेवणें; रचणें; मांडणें; लावणें ( यज्ञातील पात्रें—सामुग्री, किंवा जेवणाचीं ताटें, स्तर साहित्य ). २ मिळविणें; संपादणें; प्राप्त करून घेणें. [ सं. आ+सद्=बसणें ]

**आसादित**—वि. आसादन केलेला [ सं. ]

**आसान**—वि. ( व. ) ( हिं. ) सोपें; सोईस्कर. 'परदेशांत नांव मिळविणें आसान गोष्टी नाहीं ' [ फा. आसान=सोपें ]

**आसानी**—स्त्री. ( व. ) ( हिं ) साहजिकपणा; सुलभता, सौकर्य. 'या उपायानें रोग आसानीनें हटतो ' [ फा. आसानी ]

**आसामदार, आसामी, आसामीदार, आसामीवार**—अ मध्यें पहा.

**आसार**—स्त्री. संततधार; निरंतर वृष्टि. 'वर्षाकाळीं आसारीं राहे। हेमंतीं जळाशयें।'—एभा २४.२८४. [ सं आसार=जोराचा पाऊस ]

**आसार-री**—असार, असारा पहा.

**आसावणें**—क्रि. आशा करणें; उत्कंठित होणें. आशावणें पहा. 'पाहावया घनसांवळा। कृष्णश्यामता आली बुबुळां। आसवले दोन्ही डोळां। सबाह्यपणें देखणें ॥'—एस्व ७.२३. 'आसावलें मन जीवनाचें ओढी। नामीं सुरीं गोडी लाविये़ली।'—तुगा १५२२. [ सं. आशा म. आस ]

**आसावरी**—स्त्री. ( संगीत ) गायन शास्त्रांतील एक रागिणी. या रागात षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात आरोहांत गांधार व निषाद वर्ज्य. जाती औडुव संपूर्ण, वादी धैवत व संवादी गांधार. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर. [ सं. ? ] ०थाट—पु ज्यामधून आसावरी वगैरे राग उत्पन्न होतात त्या थाटाचें नांव. याचे सात स्वर पुढीलप्रमाणें असतात—शुद्ध षड्ज, शुद्ध ऋषभ, कोमल गांधार, शुद्ध मध्यम, शुद्ध पंचम, कोमल धैवत, कोमल निषाद.

**आसाहेब**—पु. अधिकाऱ्यास उद्देशून योजावयाचें संबोधन, आपण (तुम्हीं या अर्थी). 'आसाहेबांनीं या इलाख्यांतील ज्यूरी संबंधानें सरकारकडे जो आपला अभिप्राय पाठविला आहे... '—टि १.१५२. [ फा. ]

**आसाळी**—स्त्री. पिशाची; हडळ. असाळी पहा. 'आसाळी घोरकाळी सुरदळ विदळी कृष्ण ज्याळी विशाळी।'—सुरामायण ६.६५.

**आसिका-की**—वि. संपूर्ण, सर्व. असका पहा. 'न फुटतां बीजकणिका। माजि विस्तरे वृक्ष आसिका।'—अमृ ७.१४५.

**आसिद**—न. अम्ल, असिड. 'त्या पाण्याचे ठायीं कांहीं आम्लिदपणा येतो. '—मराठी पु. ६ आवृत्ति २.१६६. [ इं. ॲसिड ]

**आसीमांत**—क्रिवि. सीमेपर्यंत, हद्दीपर्यंत. [ सं. ]

**आसु**—न. एक चांदीचें जुनें (देवगिरीकर यादवांच्या वेळचें) नाणें. 'दक्षिणेसि साठी आसु दिले '—पाटण शिलालेख, भाअ १८३५.६३.

**आसुक**—न. वस्त्र; चिरगूट. [ सं. अंशुक ]

**आसुक्त**—वि. अयोग्य. असूक्त पहा. 'हे गुणपणा थोर आसुक्त कीं। याची लाज तूं तरी धरी जा।'—होला ३७.[सं.अ+सु+उक्त]

**आसुड**—पु. चाबूक. असूड पहा. 'तेथ जो राहे मा मागें पुढें। तो झोडिजे आसुडें।'—एभा ६.१७०.

**आसुडणें**—उक्रि. १ पाखडणें; कोंडा काढण्याकरितां सुपांत घालून झटकणें. 'आकाश असे आसुडत।'—ज्ञा १.१५६. २ ओढणें; हिसडणें; हिसका देणें; हिसकणें; झटका देणें; आपटणें वगैरे अर्थाकरितां असडणें पहा. 'तंव गळ आसुडी। जळपारधी।'—ज्ञा १४.१४७. 'जीव्हा आसुडील ह्मणौनी।'—उषा ७२९. 'आसुडिल्या माना हात पाय नेटें। तंव भार बोटें उचलिला।'—तुगा ७१. ३ लुबाडणें; गडप्प करणें. 'क्षणेक अर्थाची अतिगोडी। क्षणेक आसुडी परद्रव्य।'—एभा २५.१४७. शिवाय असडणें पहा. [ सं. आ+सट्ट्, आ+सूद्; प्रा. आसूड ]

**आसुडपाखूड**—स्त्री. १ धान्य निवडणें, आसडणें, पाखडणें वगैरे निरनिराळ्या क्रियांना हा शब्द लावतात. २ ( ल. ) कसून तपासणी; उलट सुलट तपासणी. [ असडणें+पाखडणें ]

**आसुडा**—पु. हिसका; असडा पहा. 'मालविथेच्या आसुडीं। थडक ह्मणोनियां गाढी।'—एभा २९.२६६.

**आंसुढाळ**—पु. ज्याच्या डोळ्यांतून पाणी गळत आहे असा अस्वच्छ दृष्टीचा घोडा. अंसुढाळ पहा.

**आसुति**—स्त्री. अर्क काढणें, मद्य गाळणें. [ सं. आ+सु ]

**आसुदें-आसुदाय**—वि. (गो.) आयता; तयार. असुदा-य पहा. 'आसुदें अन्न सेऊं नये। वडिलांचेंही।'—दा ३.२.३६.

**आसुपाटी**—पु घोडेस्वार. —पाटण शिलालेख[ सं. अश्वपटी—अस्सपाटी—आसपाटी ]

**आसुमाई**—वि. आश्चर्यकारक. असुमाई पहा. 'आसुमाई चिन्ह पडे दृष्टी। वाटे पोटीं नवल तेव्हां।'—निगा १८८.

**आसुर-री**—वि. १ असुरासंबंधी. २ (ल.) असुरी; जलाल; दुष्ट; दारुण, भयंकर; अघोर; अक्राळविक्राळ (माणूस किंवा कृत्य). [ सं. ]

**आसुरी-उपाय-उपचार**—पु दैवटचा, धाडसाचा उपाय; आततायीपणाचा, भयंकर उपाय. ०कर्म-कृत्य-क्रिया—न.स्त्री. एखादें विलक्षण, भयंकर, राक्षसी काम. ०चिकित्सा—स्त्री. भयंकर, राक्षसी उपाय; शस्त्रक्रिया. जसें—हातपाय तोडणें, डाग देणें वगैरे. ०निद्रा—स्त्री. गाढ झोंप; बेशुद्ध झोंप. ०बुद्धि—स्त्री. ( तत्त्व ) प्रकृतीचा एक भेद. प्राकृतिक बुद्धि. —गीर १७१. ०भोजन—न.

अधाशीपणाचें जेवण, बेसुमार जेवण ०**माया**–स्त्री चेटुक, जादू, जुन्या काव्यातील राक्षसांचीं अजब कृत्यें–चेष्टा ०**विवाह**–पु (प्र) आसुर विवाह कन्या विकत घेऊन करावयाचा विवाह, मुलीच्या बापास किंवा नातलगास द्रव्य देऊन केलेला विवाह अष्टविवाह पहा 'विवाह तव बहुता परी। पिशाच गांधर्व आसुरी।'–एरुस्व ४ ४२ ०**संपत्ति**–स्त्री १ जुलूम जबरदस्तीनें अथवा अन्य मार्गानें जम विलेली अपार संपत्ति २ बेसुमार फाजील चैन ३ कामक्रोध–लोभादि विकारांचें मूळ असी ऐहिक संपत्ति, याच्या उलट दैवी संपत्ति [ स ]

**आसुर्दी**—स्त्री तापटण्याची ( कोरडयाची ) लाकडी दांडी, दाडकें –मसाप २ ७५४ [ असुड+काठी ]

**आंसू**—न अश्रु, असू पहा (अव) आसुवें 'नितंबु आलिंगनीं सुखानलें। बाधितां आसुवें गाळौं लागलें।'–शिशु ७२१

**आसूड, आसूडगांठ**—आसूडगाठ पहा

**आसें**—न ( कों ) किरें, अरुंद पटाशी, लाकडास चौरस भोंक, खाच पाडण्याचें साधन [ स असि=सुरी ]

**आसेवित**—वि सेवा केलेला, सहवासित, परिवेष्टिलेला 'गणीं सेवित शिव आला।' [ स ]

**आसो**—पु. ( गो ) १ तांदूळ निवडताना सांपडणारा भात गोटा २ पंचाक्षरी प्रश्न पाहताना जे तांदुळाचे दाणे किंवा साळ उपयोगांत आणतो ते आशीं पहा [ स अश ]

**आसोडा**—पु ( ना ) हिसका, झटका असडा पहा

**आसोल**—( कों ) अस्वल

**आसोस**—पु फार अतिशय अमोस पहा

**आसोसी**—अशोशी पहा 'वये वचन ऐकावें। माची आसोशी खाणाला।'–ऐपो १८

**आस्कटी**—स्त्री (गो) पापणीचा केश [ स अक्ष+कुटि ? ]

**आस्कंद**—पु अस्कंद अश्वगंधा पहा

**आस्कळघिस्कळ**—वि ( गो ) ऐसपैस

**आस्कारहुस्कार**—पु (गो) श्वासोच्छ्वास, हुदके देऊन रडणें [ ध्व हुस्क ]

**आस्तर**—अस्तर पहा

**आस्तरण**—न १ पसरणें, आथरणें २ हांतरी, पसरण्याचें वस्त्र ( सतरंजी, गालिचा चटई, आथरूण इ० ) 'किंवा वस्त्रें सांडूनी आस्तरणें नेसल्या त्या।'–रास १ २२३ मळमूत्रें भरें आस्तरण।–यथादि १३ ६२९ [ स आ+स्तृ–आस्तरण ]

**आस्तरणें**—उक्रि आथरणें, पसरणें

**आस्ता**—१ आस्था पहा 'त्या पाटीलबोवाची आस्ता नाहीं पुरली।'–ऐपो २८७ २ ( गो ) आशा, हावरेपणा ३ स्वार्थ

**आस्ति(स्ती)क**—वि १ ईश्वराच्या ठिकाणीं श्रद्धा ठेवणारा, ईश्वर, परलोक, पापपुण्य मानणारा, श्रद्धावान् याच्या उलट नास्तिक 'तया आस्तिकाचा आश्रमु। पाडवा गा।'–ज्ञा ८ १९३ २ ( गो ) खाउनपिऊन सुखी असा ( मनुष्य ), सुखवस्तु, ऐपतदार, मातबर –पु एक ऋषि यानें जनमेजयाच्या सर्पसत्रा तून तक्षकाला वाचविलें निजतेसमयीं साप वगैरेची बाधा होऊं नये म्हणून या ऋषीचें नाव दोन वेळ (आस्तिक–आस्तिक असें म्हणन) घेतात [ स ]

**आस्तिकाय**—पु (गो) श्रीमती, ऐपत [ स आस्तिक्य ]

**आस्तिक्य, आस्तिक्यबुद्धि**—न स्त्री आस्तिकपणा, परमेश्वराबद्दल विश्वास, श्रद्धा 'आणि आस्तिक्य जाणावें। नववा गुण।'–ज्ञा १८ ८४८ 'म्हणोनि अनित्याच्या ठायीं। तया आस्तिक्यबुद्धि नाहीं।'–ज्ञा २ १३२ [ सं ]

**आस्तिक्यवाद**—पु परमेश्वराच्या अस्तित्वाविषयीं समर्थन, आस्तिकपणाचें समर्थन ईश्वरवाद याच्या उलट नास्तिकवाद, [ स ]–**वादी**–वि आस्तिकवादाचा पुरस्कर्ता, आस्तिकवाद मान णारा [ स ]

**आस्तीर्ण**—वि १ पसरलेलें, आथरलेलें ( वस्त्र वगैरे ) २ आच्छादिलेलें, झाकलेलें ( जमीन वगैरे ) [ स आ+स्तृ ]

**आस्तुरी**—स्त्री (कुण)( काव्य ) स्त्री, बायको, अस्तुरी पहा [ स स्त्री ]

**आस्ते**—क्रिवि हळु हळु, सावकाश [ फा आहिस्ता ] ०**कदम**–हळू पाऊल टाकणें ( नाटकांतून किंवा विनोदी भाषेंत योजतात ) आस्ते कदम ' आस्ते कदम ! –नाकु ३ २४ २ थांबणें या अर्थी तेथेंच थांबा अशा हेतूनेंहि योजतात [ फा आहिस्ता+अर कदम्=पाऊल ]

**आस्था**—स्त्री १ कळकळ, काळजी, 'परी ते आस्थाही न धरी मानसीं॥'–ज्ञा ४ १९६ २ उत्सुकता, इच्छा, उत्कंठा, पोटाग, याच्या उलट अनास्था ३ आसक्ति प्रेम 'घरावरी तेतुली। आस्था नाहीं।'–ज्ञा १३ ५९४ ४ आशा, आस, अपेक्षा, ( क्रि करणें ) 'ओंवाळणीचिया आस्था। बहुरूपी सोंग संपादिता।'–एभा १३ ६६७ ५ विश्वास, श्रद्धा 'पाखाडियाहि आस्था। समूळ होय।'–ज्ञा ६ १६७ [ स आ+स्था ]

**आस्थान**—न स्थान स्थल, सभास्थान पीठ 'का बहिर-याच्या आस्थानीं। कवण गीतातें मानी।'–ज्ञा ४ २३ [ स ]

**आस्थीक आस्थेकरी, आस्थेवाईक**—वि आस्था बाळगणारा, काळजीचा, कळकळीचा, उत्सुक, उत्कंठित [ स आ+स्था ]

**आस्थीक**—पु (गो) १ गृहस्थ २ धनिक [ स अस्ति+क ]

आस्पत—स्त्री (गो) ण्पन शक्ति, सामर्थ्य 'तुडा दण्याची आस्त नाहीं' [स आस्पद]

आस्पद—न स्थान, स्थळ सामासशब्द–अहंकारास्पद=अहंका राचें स्थान–शरीर, गुणास्पद=विद्वान, सात्त्विक मनुष्य, मोहा स्पद=कनक, कांता इ० वस्तु, दु खास्पद, हास्यास्पद, शोकास्पद, इ० 'जगस्तुहे आस्पद। एक सार्वभौम पद।' –ज्ञा १६ ०३१ 'हे कर्म तुम्ही करता परतु परिणाम दु खास्पद होईल' [स]

आस्पाव—पु. (गो) मोठेपणा 'मराठी भाषेचों आस्पाव जरी व्हडल्यों न्हय तरी आमी तिनो अभिमान धरूक जाय'' विज यनगरचों आस्पाव पळौन लेनाचे पिरगी धरथरतालें'

आस्फारणें—अक्रि घाबरणें कप पावणें, आस्फुरणें पहा 'तव द्व्यामानि रणनुरें आस्फारिलीं।' –ज्ञा १ १३० [स आ+स्फार्=स्फुर्चें प्रयोजक=कप पावणें]

आस्फालणें—अक्रि जोरानें आदळणें, आपटणें 'आस्फा लिताही स्वकरें न राहे। चेंडू जसा तो उसळेचि पाहे।' [स आ+स्फालन]

आस्फुरणें—सक्रि १ कप पावणें २ फुरणें,, वाजविणें 'दिव्य शख भीष्मदेवें। आस्फुरिला।' –ज्ञा १ १२७ [स आ+स्फुर्=कप पावणें]

आस्फोट—पु ठोसा, तडाखा, धपका, दणका, मार ण्याचा आवाज स्फोट पहा [स]

आस्मान—अस्मान पहा

आस्य—न मुख, तोंड 'आस्य सरोरुह हास्यलवें अति रम्य उपास्य मनाभ्रमरीं।' –ध्यानमाला [स]

आस्रा—आसरा पहा

आस्वल—अस्वल पहा

आस्वाद—पु १ रुचि, चव, स्वाद २ इच्छा, लालसा 'तैसा कर्तृत्वाचा मदु। आणि कर्मफळाचा आस्वादु।' –ज्ञा १८ ००५. [स]

आस्वादणें—उक्रि रुचि घेणें, चाखणें हुगणें, स्वाद घेणें, खाणें [स. आस्वादन]

आस्वादन—न सेवन, स्वाद घेणें, रुचि घेणें 'ना तरी अमृतरसास्वादनीं। रस सकळ।' –ज्ञा १ २६ [स]

आस्वादित—वि चाखलेलें, स्वाद, चव घतलेलें [स]

आहट, आहाट—पु (व) १ आवाज चाहूल, चहाळ 'गाडी गल्याचा आहाट आला' २ हाक, हाक मारणें (क्रि दणें) 'त्या शेतात रामा आहे त्यास आहाट दे' [हटकणें]

आहाटणें, आहाटणें—क्रि १ घाटणें, ढवळणें २ त्रास देणें अहाटणें पहा

आहाटीव आहटीव—अहाटीव पहा

आहणा, आहाणा—पु १ आणा उखि, म्हण, वचन, न्याय, दृष्टांत 'एक अनी मुवी तो मारा धरमका इयाव युवा आहणा प्रसिद्ध आहे –भाव ११८ २ लग्नात वधूवरानीं परस्प रानीं नावें घेणें किंवा लग्नात बायका व शिमग्यात पुरुष विनोदी किंवा अश्लील पद्यमय वाक्यें बोलतात तो, उखाणा.' तो आहनी रुचिर गोवुनि नाम स्वामें। बोले मधुर वचना रद–कांति भासे।' –विवि ५९ ३४ ३ कोडें, उखाणा, अहाणा पहा [वें अहनस्या, स आख्यान, प्रा आहाण, किंवा स आह्वन, प्रा आहण]

आहत—वि मारलेला, ताडलेला, ठोकलेला, आघात केलेला 'चहवातें ज्योति आहत जैशी॥' –ज्ञा २ ३०३ [स आ+हन्]

आहाति—क्रि आहेत 'एणें बहुतीं परी अनेग। न सागि तले तुज का याग। ते विस्तारूनि वेदेंचि चाग। म्हणितले आहाति॥' –ज्ञा ४ १५६ [तृ पु अव स अस्]

आहत्य, आहत्यमेव—क्रिवि सरोसर, सात्रीनें, अगत्य पूर्वक [स]

आहरण—न आणणें, बोलावणें, आनयन [स]

आहरा, आहारा—पु मडकें, भाडें इत्यादि नये म्हणून खाखालीं ठेवावयाचें गवताचें निवणें, चुंबळ, आरा पहा [स हार]

आहर्ता—वि आणणारा, आहरण करणारा [स]

आहव—पु युद्ध, लढाई 'मग मथिले द्रौणीचे द्रुपदसुतें करुनि आहवा माजी।' –मोभीष्म ३ ४३ [स]

आहवन—न यजन याग होम हवन [स आ+हवन]

आहवनीय—वि अग्निहोत्र्यानें धारण करावयाच्या (गार्हपत्य, दक्षिणाग्नि, आहवनीय या) तीन किंवा पाच अग्नींपैकीं पूर्व बाजूचा अग्नि इष्टींत व नित्यहोमांत मुख्य याग या अग्नींत करावयाचा असतो पचाग्नी पहा 'आहवनीयादि वन्हीं। निक्षेपरूपी हवनीं।' –ज्ञा १७ ३६१ [स]

आहसी, आहास, आहासी—क्रि आहेस, आहात 'तूच आहसी आमुची गती।' मराठी ३ रें पु पृ १०आ ४थी (१८७३) 'अर्जुना तू कवण आहसी। काय हा करितासि।' –गीताचंद्रिका ६५ 'गवसोन पुसिलें आहास सुखी।' –दावि १८८ [स अस्, द्वितीय पुरुष ए व असि]

आहळ, आहळी—स्त्री अग्नीची ज्वाळा अहळी पहा हा शब्द आहळी किंवा आहळ्या अशा अनेक वचनांत उपयोगिला जाता आहळींत असणें–धाकात जरबेंत असणें

आहळणें—स्त्री जळणें अहाळणें पहा 'त्या सतापें चराचर। आहळो लागे।' निगमसार ६ २७

आहळ आहाळ—मोहळ पहा (व) गुराकरिता पाणी साठविण्याची जागा, (खानदेशी–हाळ) पावसाळ्यातील पाण्याचा साठा

आहा-हे—स्त्री ज्वाला, आंच, उपद्रव, उपसर्ग, पीडा 'लागे घोकाभिची न या आहे.।' –मोसत्य १ २८ आही पहा

आहा—क्रि-(कातरडी) आहे 'माझा ल्हान बाळ आहा, मला मारगा नको' –मराप २ ३१ [स अस्ति, म आहे]

आहा, आहाहा—उद्गा आश्चर्य, दु ख इ० उद्गार, अरेरे, आहा. 'आहा वृथा उतरलों भिजगें विलोकीं।'–मल ७८

आहाकटा—उद्गा पु हाकाटी, ओरड, आक्रोश, हाय हाय 'आहाकटा मग करिती गेलिया। आधीं ठावा तया नाहीं कोणा।' –तुगा ५४ [अहा+कटकटा]

आहाकाप्या जाणें—क्रि (व) गर्भगळित होणें, घाबरणें, धीर सुटणें 'तोफ पाहूनच तो आहाकाप्या गेला' [अहा+हिं काप्या=कापलें]

आहाकार—पु ओरड, हाकाटी, अहंकार पहा 'गोफणीसी गुडा घाली पागोऱ्याच्या नेटें। पळती आहाकारे अवघीं पाखरावीं थाटें।, –तुगा ३९९ [स अहह+कृ, हा+कार]

आहाच, आहाचवाहाच, आहाचवाणा—क्रिवि अहाच वहाच पहा १ वरवर, सरासरी, 'अग्नि ऐसें आहाच। तेवा नामाचें आहे कवच।'–ज्ञा ७ ३६ 'तेथ अचेत चित्ताचा सागातु। आहाचवाणा दिसे माडतु।'–ज्ञा ८ ९५ 'आहाच पाहता कळेना।'–दा २० ३ १४ 'नव्हे करणीचा आहाच। जीवें पायीं जडली साच।' –व ५२३ २ सहज, सहजगत्या, उगीच 'आहाच सापडता धन। त्याग करणें मूर्खपण।' –दा ७ १ ३५ 'पहिलेचि आहाचवाहाच उठलिया।' –ख्यो १० १७. ३ खोटें, व्यर्थ 'तेंगें असतेपण आहाच।' –ज्ञा ८ ३१ 'मी प्रकटलें हें ऐसें। बोलों तें आहाच दिसे।'–एभा १४ ८९ 'तरी हे गोष्टी आहाच दिसे।' –ययादी ४ ६५६

आहाडून पाहाडून—क्रिवि आडूनपाडून अहाडूनपहाडून पहा 'आहाडे पाहाडेगे वाउगेचि झगडे।' –निगा ७६

आहाण—वि १ उक्त, उचित 'यन्हर्वि यागादिकीं क्रिया।' आहाण तेचि धनजया।' –राज्ञा १६ ३७४ [स आह्नस्या, आख्यात, आह्=बोलणें]

आहाणा—वि आत्मघातकी, हानि करणारा 'आता हा ऐसा अव्हेरिने। मग नाथिलें शोचू बैसिजे। तरी आपण आहाणा होईजे। आपगपेयीं।' –ज्ञा २ १९६ [स आ+हन्, प्रा आहण]

आहाणा—पु १ म्हण, उक्ति, उखाणा अहाणा, आहणा पहा 'म्हणोनि खाण तैसी माती। आहाणा लोकीं प्रसिद्ध।' –मुआदि १६ १७४ 'पुण्य करिता उन लागत। हा आहाणा बोलती जनात।' –मक ७ १०७

आहार—पु १ अन्न, शरीरपोषकद्रव्य, खाद्यपदार्थ 'आहार तरीं सेविजे।' –ज्ञा ६ ३४९ २ खाणें, जेवणें, भोजन करणें. सामासब्द–फलाहार, दुग्धाहार, धान्याहार, इ० म्हू० 'आहारीं व्यवहारीं भीड नसावी' 'माझा आहार सुटला' ३ नेहमीं खाण्याचें प्रमाण, शेर 'त्याचा दोन शेराचा आहार आहे' ४ अन्न खाण्याची विशिष्ट शक्ति, सुखानें जेवलें अन्न पचतें तें 'जसा आहार वाढवावा तसा वाढतो' आहारीं असणें–ताब्यात, आटोक्यात असणें आहारीं पडणें–जाणें–ताब्यात, वर्चस्वाखालीं जाणें 'सर्वे झालें आशीर्वादी। नाहीं पडलों मृत्याचे आहारीं।' –तुगा ७१७ आहारा खालीं, आहारीं आणणें–ताब्यात आणणें, कब्जात आणणें [स]

आहार—पु १ (व ना) निखारा, विस्तव, फोपाटा, 'चुलींतून आहार काढ व हातपाय शेक' २ इस्त्री, कपडे कडक करणें, (क्रि देणें) [स आ+हृ]

आहार—अजगर अहार अर पहा

आहारणें—१ आरणें, अहारणें पहा २ खाऊन, गिळून टाकणें 'मासाचे रचके तोडून या पिशाचानें आहारून टाकले आहेत' –एकचप्याला नाटक

आहारपानगा—पु निखाऱ्यावर भाजलेली ल्हान भाकरी, पानगा, आहारोळी, रोट, खाकरा, गाकर [आहार=निखारा+ पानगा=पोळी]

आहारी—वि उपजीविका करणारा, खाणारा, खाऊन राहणारा सामासब्द दुग्धाहारी, फलाहारी, मत्स्याहारी, शाकाहारी

आहारोळी—स्त्री निखाऱ्यावर भाजलेली पोळी अहारोळी पहा

आहार्य—वि बळेंच अंगीकारलेलें, अनुमानिलेलें, कल्पिलेलें, (चुकीनें, किंवा मुद्दाम) आरोपिलेलें, कृत्रिम °निश्चय–पु भलता ग्रह, चुकीची, खोटी समजूत, कल्पना आहार्यारोप–पु चुकीचा ग्रह धरून चालणें, मुद्दाम वेगळी समजूत घेऊन व्यवहार करणें जसें –एखादा मनुष्यानें राक्षसाचें सोंग घेतलें आहे असें समजलें असताहि आहार्यारोपानें त्यास राक्षस समजून त्या भावनेनें त्याशीं वागणें

आहाव—पु (श्रौतकर्म) यज्ञात होता शंसन (शस्त्र पठण) करतो त्यामध्यें 'शोंसावो' असा मंत्र म्हणतो त्यास आहाव म्हणतात [स]

आहाळ—पु १ खळगा, कुडी आहळ पहा २ (चाभार धंदा,) कातडी टाकण्याचें कुंड, खळगा

आहाळ—पु १ आहार, विस्तव, आग आहार पहा 'सुप्तिरा ज्वाळाचिया माळा। रेयिलियाही अयला। भेदाचिया आहाळों। काय पडणें आहे।' –अमृ ७ १३६ २ (ल) दुःख

आहाळणी, आह्लाळणें—क्रि १ भाजणें, पोळणें अहाळणी, अहाळणें पहा 'जेविं तीव्र अग्नींत शिरता तेथें। आहाळेना कैसें म्हणावें।' —नव १५ ६६ २ ( ल ) ताप, दु ख, त्रास 'आहाळण्या किती सोसू या च्यारी।' —पला ८२

आहाळणें—क्रि ( व ) अटणें अळणें पहा 'दूध आहाळलें आहे'

आहाळणें—अक्रि हालणें 'पाटीं निवृत्ति कर्णताळें। आहाळी ते मूजा विभुळे।' —ज्ञा १७.७ [ स आ+हलन=ल्लेळणें, हालणें, म हलणें ]

आहाळवाहाळ—१ अहाळवाहाळ पहा २ सपूर्ण, विस्तीर्ण, पुरेपूर. 'जेहीं आपुला सभोगकाळीं। परब्रह्म भोगिलें आहाळवाहाळीं।' —शिशु ७४५ 'दृश्य दरयपणें जें जें उठी। तें तें निजास्मता पाठीं पोटी। तेणें अन्वयें देवो देखे दृष्टी। आहाळवाहाळ सृष्टि दुमदुमित।' —एभा ३ ४८०

आहाळीव—अहळींव पहा

आह्लिक्य—न.इहलोक,ऐहिकता 'तुका म्हणे आम्हा आह्लिक्य परत्रीं। नाहीं कुळगोत्री तुजवीण।' —तुगा ५०० [ स ऐहिक अप ]

आहित—वि ठेवलेलें, स्थापित केलेलें, वसविलेलें, आधान केलेलें [ स आ+धा-हित ]

आहिताग्नि—पु ज्यानें अग्न्याधान केलें आहे तो, अग्निहोत्री. —वि अग्निहोत्र्यास लावावयाची पदवी [ स ]

आहिर मासा—पु ( माण ) अगाला चिकट बळस असणारा मासा अहीर अर्थ २ पहा

आहिर्णी—स्त्री ऐरणी, वशपात्र, लग्नातील झाल 'तव ते आहिर्णीचा समय।' —वेसीस्व १३ ६ [ स ऐरिणी अप ]

आही—स्त्री उन्हाची झळ, तिरीप अही पहा

आही-हे—स्त्री (काव्य) १ ज्वाला, आग अही पहा ( अव ) आह्या 'येती उष्णाच्या आह्या। पायीं लाह्या भाजती।' —अमृत ध्रुवच५ 'वियोगाची कोण भोगील आहे।' —नरहरि दानवत ९८ २ कांति, शोभा 'रूपाचेनि आहे। ऐरावतु मणि वाहे।' —शिशु ५०७ [ स अहि=सूर्य, स आभा, प्रा आहा=कांति ]

आहुति-ती—स्त्री आहुत (विप्र) १ देवतेप्रीत्यर्थ अग्नींत हवन करावयाचें किंवा जळात, भूमीवर टाकावयाचें द्रव्य ( जस घृत, तील इ ), अवदान २ बळी, भक्ष्य 'आहुत देऊं पचवीस माण सावी' —ऐपो ६० 'ज्या कोणावर माझी नजर जाई त्याची आहुति मी स्वत घेत असे' —विवि (१८७६) ८ १५५ ३ ( ल ) समूळ नाश, नायनाट, सप्पा, धव्वा 'प्लेग, दुष्काळ वगैरेनीं त्याच्या सर्व घरादाराची आहुति घेतली' ०घेऊन उभा असणें-राहणें—नाश करण्यासाठीं टपणें नाश करण्याची वाट पाहणें 'तो त्यामागीं आहुति घेऊन उभा आहे' ०देणें—१ बळी देणें, बलिदान करणें, २ अग्निकुंडात अवदान टाकणें, यज्ञ करणें ३ ( ल ) नाश करणें, बुडविणें, सकटात टाकणें, नुकसान करणें 'त्यानें तिची आहुति दिली' [ स आ+हु ]

आहूत—वि १ बोलाविलेला, आमंत्रिलेला, आव्हान केलेला [ स आ+व्हे ] —स्त्री आहुति ( अप )

आहृत—वि आणिलेला, हरण केलेला [ स आ+हृ ]

आहे—क्रि ( अस्तित्व दर्शविणारें ) असणें या क्रियापदाचें वर्तमानकाळाचें रूप आहेआहे नाहीनाही—एखाद्या गोष्टीचें अस्तित्व किंवा व्यवहार ज्या वेळीं क्वचित्‌च असतो किंवा असून नसल्यासारखा असतो त्या वेळीं हा वाक्प्रचार योजितात 'तो आहेआहे नाहींनाहीं' =त्याचें अस्तित्वच भासत नाहीं, त्याला कोण विचारतो?' 'अशौचामध्यें स्नानसध्या म्हणजे काय, आहे आहे नाहींनाहीं' [ स अस्ति, प्रा अत्थि, आथि ]

आहेत, आहेता-ती—क्रि असणें या क्रियापदाचें वर्तमान काळीं तृतीयपुरुषाचें अनेकवचन 'आहेता सरिता वदड सरिता नाथासि काता प्रिया।' —निमा ( भागीरथीस्तोत्र ) १ २८ 'हस आहेती ऐकिलें तुवा हि।' —नल ११०

आहेपण-णा—न पु १ अस्तित्व २ तथ्य, सत्य 'वस्ताकार दोनी। नसोनि भासती आहेपणीं।' —निमा ( आत्मचरित्र १०५ ) पृ ९७

आहेर—पु १ अहेर पहा २ ( व ) कुणबी लोकात श्राद्ध पक्षाच्या दिवशीं देवस्थानीं ज्या ब्राह्मणास बसवितात त्यास म्हणतात याचा बाप जिवत असावा लागतो

आहेव—वि सधवा अहेव पहा 'आहेव मीं गर्भिणपणें। हें सागणें का लागे।' —तुगा १२७ ०तंतु-दोरा-मणि-पु मगळसूत्र 'कीं अजय झालें रणीं। सखे सावळी। आहेवमणी तुटून पडला।' —पला ४९ ०पण—न सौभाग्य

आहो—अहो पहा

आह्निक—न १ ब्राह्मणाचें रोजचें ( स्नानसध्यादि ) धार्मिक कृत्य, नित्यकर्म, उपासना २ सामान्यत नित्यकृत्य, रोजचा उद्योग [ स अहन्=दिवस ]

आह्लाद—पु. आनद, सतोष, उल्हास, हर्ष [ स. आ+ह्लाद् ]

आह्लादक—वि आह्लाद—आनद देणारा, आनददायक, उत्साहदायक, उत्साहकारक [ स ]

आह्लादणें—उक्रि ( काव्य ) आनदणें, सतोष पावणें, उल्हासणें 'सफुल्लसारसमुखीसखीसध नयनकल्हारीं आह्लादला।' —आमी ६० [ स आह्लाद् ]

आह्लादन—न आह्लादणें, आनदणें, उल्हास, आनद, सतोष [ स आह्लाद ]

आह्लादित—वि आनदित, उल्हासित, हर्ष पावलेला

**आह्वाता**—वि बोलावणारा, हाक मारणारा 'माझ्या सज्ज नेसि मातें। पैशुन्याचेनि आह्वाते।' –ज्ञा १८ १४९९ [स आ+ ह्वे=बोलविणें]

**आह्वान**—न १ आमंत्रण, बोलावणें, पाचारणें, आमंत्रणें २ सामन्यास, वादविवादास, युद्धास, निमंत्रण, (इ) चॅलेंज 'मी त्यास आह्वान करून सांगतों कीं जी काय माझी निंदा करावयाची असेल ती घारपुरे यांनीं खुशाल करून घ्यावी' –केले १ ३६३ ३ नांव, संज्ञा, नांव देणें [स आ+ह्वे]

**आह्वानणें**—उक्रि १ (काव्य) बोलावणें, हाक मारणें, पाचारण करणें 'इंद्रादि अष्टौ लोकपाळ। आह्वानूनियां सकळ।' –एभा २७ २६७ २ युद्धास-सामन्यास वगैरे आमंत्रण देणें ३ नांव देणें, नांव ठेवणें, संज्ञा देणें

**आळ**—पु स्त्री १ आरोप, कुभांड, दोषारोप, अपवाद (क्रि० घेणें, घालणें, येणें) 'तो आळु नोहे अनुरोधीं। बोलतया।' –ज्ञा १५ २३० 'वरी न असदुक्ति हे रविसखोत्थिता आळशी।' –केका ८ म्ह० एक आळ आणि एक महाआळ=एखादा खोटा दोषारोप आला कीं त्याच्या पाठोपाठ मोठी नुकसानी आलीच म्हणून समजावें २ (ल) केवळ बाह्य स्वरूप, सोंग, छाया, सादृश्य, निमित्त, नांव 'नैवेद्याचा आळ। येथे ठाकणीं सकळ।' –तुगा १३९९ ३ आभास, जसें– पुरुषाचा आळ मात्र, ब्राह्मणाचा आळ, शिपायाचा किंवा शिपाईगिरीचा आळ इ० [स अलीक= असत्य, स आल=लबाडी]

**आळ**—पु स्त्री १ हाव, इच्छा, आवड, छंद (' 'बाळकें अघटित घेता आळ। माता पुरवी तत्काळ।' –भगि १ १३ 'आळ घेतली न राहे।' –पाळणे (जागी) १९ (क्रि० घेणें, पाळणें, पुरविणें) [का अळु=रडणें]

**आळ**—पु (राजा) बांधण्याची वस्तु आळा पहा

**आळ**—स्त्री गल्ली, रांग ओळ अळी आळी पहा

**आळ**—स्त्री (गो) रोपटें (फणसाचें वगैरे)

**आळ**—पु. १ मजूर, गडी २ मजुरी [का]

**आळ**—न किंमत, वजन, माप दर्शक चिन्ह अळें पहा [का आळि=वर्तुळ]

**आळई**—स्त्री अळी, कीड, अळई पहा 'लहान पराई उबर कवळी वयें बारा तेराची। प्रत्यक्ष आळई बोराची।' –पला ४ ४१

**आळका**—अळका पहा

**आळकेपण**—अळकेपण पहा 'गोडमासीं आळकेपण। अस्या दरे पिंडपोषण।' –दा २ ५ ३१

**आळंगणें**—सक्रि आलिंगन देणें, मिठी मारणें 'घता स्पर्श सुखाची गोडी। तेवें श्रीकृष्ण आळंगिला भुजादंडीं।' –शिशु ६० [स आलिंगन]

**आळंगेंचिळंगें**—अळंगेचिळंगे पहा

**आळंच**—पु आळस, अळंद्य 'आळच न करावा।' –सूत्रपाठ आचार उत्तरार्ध १६६ [स अल+च]

**आळच**—स्त्री मसलत, खल, विचारविनिमय 'मेळउनि सकळांप्रती। राजा करी आळचु।' –शिपु १ १५४

**आळण, आळणी, आळणें**—अ मध्यें पहा 'घडपापड आळणें। वर वाढिलीं सुवर्णें वर्णें।' –वसा २७

**आळणा**—पु (कु.) पखा 'आळणा आहे तर द्या। वारा मुळींच नाहीं [अळणें]

**आळणी**—स्त्री वाळणें, सुकणें (अन्नपाण्यावाचून) 'अन्न वर्जेवीण आळणी। या नाव आदिभूतिक।' –दा ३ ७ २४ [अळणें]

**आळणी**—वि बेचव, निरस (भाषण, मत) अळणी पहा 'लोकमताचा आळणीपणा कसा घालवावा हा महत्त्वाचा प्रश्न आहे' –टि २ ४

**आळणें**—सक्रि आळा घालणें, ताब्यात ठेवणें, आकलन करणें आळा पहा 'मनुष्यें सकळास आळिलें।' –दा २० ५ २४

**आळणें**—अ दाट होणें, आटणें अळणें पहा 'उग्र गाळिलिया रस होये। तो ठेविता बहुकाळ न राहे। त्याचा आळूनिया पाहे। गूळ होये रापिंड।' –एभा १६ १८ दुग्धें आळूनि केलीं दाटें।' –सुवन ११

**आळता-ती**—वि आळविणारा, आलाप देणारा (गाणें म्हणून वगैरे) 'आळती गानी सरस्वती। गंधर्वराजॅ।' –शिशु ५१ [आळविणें, का आळती=गाणें, स आलापन, प्रा आलावण]

**आळपणें**—सक्रि आवळणें, अळपणें पहा 'दुर्मोच्य मोह पाशें आळपिली घट्ट कधरा ज्याची।' –मोवन ३ ८२

**आळपे**—पु (व) १ अंतर, फट २ (अव) अन्नाचे मोठाले व गडबडीनें घतलेले घास [स आ+लप्–लप्?]

**आळमाळ**—वि अल्प अळुमाळु पहा 'एकादिया आळमाळा। श्रीगुरुचिया खेळा।' –ज्ञा १३ ४४१

**आळमेळें**—न (गो) अपशकुन नाडमेळ पहा

**आळवण-णी**—स्त्री १ हाक, बोलावणें २ विनवणी, प्रार्थना 'त्याची आळवण केल्याशिवाय मी केव्हांहि पुढें पाऊल टाकलेलें नाहीं।' –तोब १३८ 'मागतिया भाडवल आळवण। नामासी जतन दातियासि।' –तुगा १०९२ –न (व) अळविण्याचें गाणें, स्तोत्र अळवण पहा [अळवणें]

**आळवण**—न पदार्थ घट्ट होण्यासाठीं लावलेलें पीठ अळवण पहा

**आळवणें, आळविणें**—सक्रि अळविणें पहा 'जयातें आळविजे स्वभावें।' –ज्ञा ८ ३६

**आळवणें**—सक्रि १ अळविणें, अळणें पहा 'सुंदर आळविल्या गिरी।' –वसा २७ २ कढणें, घालविणें 'कांहीं दिवस तु रात आळविजे।' –एपो २०९

**आळवा**—वि (राजा) ल्हान, कोवळें, लाड करण्याजोगें, आळविण्या–आळ पुरविण्या–जोगें (मूल) [अळविणें]

**आळवातीण**—स्त्री (गो) जमीन, हळद अळवत पहा

**आळवा घेंट**—स्त्री (गो) गलितगात्र, निर्वाण, अशक्त [अळवा=अळू+घेंट=दांट]

**आळवार**—पु दक्षिण हिंदुस्थानांतील प्राचीन वैष्णव संत कवी हे १२ असून त्यांच्यांत नम्माळ्वार हा प्रमुख होय [का आळ्वर=दीन, क्षुद्र, नम्र]

**आळवाळ**—न अळें आल्वाल पहा 'अर्थविनाशाचें फळ। दुसरें एक नाशाचें मूळ। विशेषनाशाचें आळवाळ। धी केवळ आळस पां॥' –एभा ८ ११८

**आळशी**—स्त्री जवस अळशी पहा.

**आळशी–सी**—वि सुस्त, निरुद्योगी, मंद, मठ्ठ, आलस्य युक्त, कामचुकार, ऐदी [स आलस्य] म्ह० १ आळशा दुणें काम, लोभ्या दुणा खर्च २ आळशास निगेकाचें ज्ञान **आळशा वर गंगा येणें**=(शब्दशः) गंगास्नानानें प्राप्त होणाऱ्या पुण्य प्राप्तीसाठीं लोक गंगास्नानास दूरवर जातात परंतु एखाद्या आळ शाच्या जवळ गंगेचें पात्र येणें आणि त्यास स्नान घडणें (ल) एखाद्या नालायक मनुष्यास नसतें महत्त्व येऊन चांगल्या मनुष्यास त्याच्या (नालायकाच्या) कल्याणासाठीं त्याच्याजवळ जावें लागणें या अर्थी ही म्हण योजतात किंवा ज्याची लायकी नाहीं अशास अनायासें चांगली संधि येणें या अर्थी 'गंगा आली आळशा वरी। आळशी दखोनि पळे दुरि।' –तुगा १ आळशाला गंगा, पाप्याला पंढरपूर=प्रयत्न न करणाऱ्यास अनायासें एखादा लाभ होणें **आळशाचा मायबाप–राजा**–अत्यंत आळशी मनु ष्यास म्हणतात (स्त्री रूप) आळसिणी 'एकीं ओंगळा आळसिणी। एकी त्या महा डाकिनी।' –एभा ७ ६५ अळसिणी पहा

**आळस**—पु १ केवळ सुख असणें म्हणजे झालें त्याबद्दल वेळेचा विचार नसणें, दुःख द्वेषासंबधीं विशेष आतुरता नसणें व काम करण्याची अंगांत धमक असून तें करण्याविषयीं मन प्रसन्न नसणें या अवस्थेस आळस म्हणतात, सुस्तपणा, उद्योगाविषयीं कंटाळा, नावड, मंदपणा, मठ्ठपणा, ढिलपणा म्ह० १ आळस भिकारी कुटुंबाचा नाश करी २ आळसें काम नासतें। हें तों प्रत्य यास येतें –दा १८ ७ ४ २ हयगय, दुर्लक्ष, अळंटळ टंगळ मंगळ [स आलस्य प्रा आलस्स]

**आळसट**—वि आळशी, मंद, सुस्त, मठ्ठ ०पणा–पु. आळस सुस्तपणा –पपत्रे २४८ [आळस]

**आळसडा**—वि आळशी, आळसट, निरुद्योगी

**आळसणें**—अक्रि १ आळशी होणें, आळसावणें, आळ सानें युक्त होणें २ (व) शिण होणें, मरगळ होणें 'आईवांचून मूल आळसलें' [आळस]

**आळसभांडारा**—वि आळशी, मंद, मठ्ठ, जड, विशेषें करून हा शब्द वयामुळें जड, आळशी झालेल्या माणसास लाव तात. [आळस+भोंडारा=म्हातारा]

**आळसमळस**—क्रिवि (गो) ऐसपैस

**आळसाई**—स्त्री १ आळशीपणा, आळस, हयगय, ढिल पणा, निरुत्साह (गो रूप आळसाय) कसर दणें, ताप येण्या पूर्वीची अवस्था (हाकें जड होणें इ)

**आळसावणें**—अक्रि आळसणें, आळशी, मंद, सुस्त होणें, बनणें 'गोंदी आळसावून खांबाजवळ उभी होती' –मोरप्रहसन ११

**आळसुंदा**—स्त्री मोठी चवळी अळसदा पहा

**आळा**—१ बंधन, बांधण्याची, आवळण्याची, बांधणारी वस्तु नियंत्रण करणारी गोष्ट, दोर, बंद जसें–वेलीच्या पानास बांध ण्याचा सोपणाचा बंद, गवताचा भारा बांधण्याची गवताची दोरी 'हेंडग्याच्या आळा अनर्घी चिंधाडें। काय तेथें घोडें निवडावीं' –तुगा २८०२ २ (ल) नियंत्रण, बंधन, संयमन, दाब, मर्यादा, आडकाठी, धरबंध (क्रि० घालणें, तुटणें) 'एकीचा घदा दुसरी जात करणार नाहीं असा आळा पडला' –गागा २६ ३ (व) एकी, जूट 'कुणब्याचा आळा' [स आलान (धातु ली)=सांखळी, बंधन, किंवा म अळणें] ०घालणें–मर्यादा, नियम, बंधन पाळणें, आटोक्यात ठेवणें, व्यवस्था लावणें 'घालील महाराष्ट्राला निरभिलाष आळा कोण–यापुढें।' –विक ९ ०पिळणें–गाडीची आखरी आणि साटा यांना बांधणाऱ्या आळ्याला आळेदांडीनें पीळ घालणें **आळ्यात असणें–वागणें–राहणें–चालणें**–धाकांत, कब्जांत, ताब्यांत असणें 'ती भाषा व्याकरणाच्या आळ्यात राहण्यास विशेष योग्य असते' मराठी व्याकरणावरील निबंध (कृष्णशास्त्री चिपळूणकरकृत) १० **आळ्यांत आणणें**–ताब्यात, कबजात ठेवणें नियमन करणें, नियम व्यवस्था लावणें 'जॉन्सन यानें कोशरचना करून तीस (इंग्रजी भाषेस) आळ्यांत आणण्याचा प्रचंड उद्योग आरंभून तो एकट्यानें शेवटास नेला' –नि ७५६

**आळाटाळी**—स्त्री ढिलाई, चेंगटपणा, बेफिकिरी, अळं टळ [अळंटळ–आळा टाळणें]

**आळाटोळा**—पु आटोका, अदाज, पकड, आवाका 'ही गोष्ट माझ्या आळ्याटोळ्यास आली असता मी करीन' [आळा द्वि]

**आळाबांधा, (व) आळेबंध, (गो) आळाबंदा**—पुस्त्री आटोका, अधिकार, ताबा, मर्यादा, नियंत्रण शासन, अमल,

व्यवस्था ( क्रि० येणें, आणणें, घालणें ) 'हें आता आळाबाधा येणें कठिण दिसतें ' **आळाबांधा कहाडप**-(गो) १ (एखादें काम) उरकीत आणणें २ (पातळ पदार्थ) घट्ट करीत आणणें, आट विणें, आळावप [ आळा+वध ]

**आळाशी**—( व ) अळशी, अळाशी पहा

**आळास**—पु (गो) मोठ्यानें रडताना कोंडून धरलेला श्वास ०**परतणें** ( पर्तुंवप )-रडताना श्वास कोंडून धरला असता होणारी अवस्था [ का अळु=रडणें, अळु कूसु=रडणें रडका ( मुलगा ), किंवा आळा+श्वास? ]

**आळिक**—वि क्षुद्रक 'हें अवघेंच विचारिता आळिक ' –भाए ७० [ स अलीक=थोडें ]

**आळिका**—स्त्री ( अव ) अळी, कृमि, कीटक अळिका पहा 'आळिका म्हणती आमुचें घर । काष्ठामधें ।' –दा १ १० २८ [स अलीक=क्षुद्र, का आळि=वर्तुळ, तुल० स अलि=विंचु ]

**आळिका**—वि हट्टी, हावरा, अळका पहा 'अधीर आळिका अनाचारी । अध पगु खोंकलेकरी ।'–दा २ ३ ३३ 'बाळक दरों नियां आळिके । कीर्तनाचिया कौतुकें ।' –अमृत धवच १४ [ अळका ]

**आळिता**—अळता पहा

**आळियाडें**—न हट्ट, छंद, अळि, अळका 'पाहा पा मातें सुन्दरांगडें । माझर तेणें मुरवाडें । मथाचें आळियाडें । सिद्धी गेलें ।' –ज्ञा १८.१७७५ [ अळि ]

**आळी**—स्त्री गल्ली, ओळ अळी पहा ०**कर**-अळीकर पहा

**आळी**—स्त्री कीड अळी पहा 'कीं अधर्माची आळी माटे । पीक खुडे तेणेंही ।' –एभा १० ५१५

**आळि-ळी-य**—स्त्री १ हट्ट, छंद, रुसी, (लहान मुलाची) तीव्र इच्छा, हेतु, मनीषा, लाड 'तें आळि करोनि मागे जेवण ।'–दाव २९६ 'आळी घेऊन जन्मा आलें । कित्येक प्राणी ।'–दा १ ८ २२ 'एके दिवशीं प्रात काळीं । कृष्ण घेऊन बैसला आळी ।'–ह ६ ६ २ रडिवाळपणाचें, हट्टाचें भाषण 'आळि यालेति धाकुटें विदा पतीनी ।' –शिशु ३५३ [ का अळु=रडणें ] ०**कर**–वि १ हट्टी, आग्रही, हट्टखोर (लहानमूल) 'आळिकर त्याचें करिसी समाधान । अभयाचें दान देवोनिया ।' –तुगा ५०१ [ आळ=हट्ट ]

**आळीपाळीनें**—क्रिवि एकामागून एक, आलटून पालटून, आलटून बदलून [ आळी=रांग, किंवा पाळी द्वि ]

**आळींच**—अळींच पहा

**आळुकणें**—क्रि तीव्र इच्छा असणें, हपापणें 'निर्दी आपपणें नाहीं दखिलें । तेंचि दृष्टीं इंद्रियाचीं रेजलें । जैसें रंक का आळुकेले । द्रव्यातें सेवी ।' –ज्ञा ५ ११० [ अळका पहा ]

**आळुका-की**—वि अळका पहा 'कैसी स्वसुखाची आळुकी । जे दोनीपणें भिडोनि एकी ।' –अमृ १५ 'म्हणे पती क्षुकेचा आळुका फार । यासि न होय निराहार ।' –महिकथा ३२ १५३ 'परी क्षुधेचा आळुका बहुत म्हणवोन । नये घडोनि सर्वथा ।'–महिकथा २५ १६९

**आळुकेपण**—न आसक्ति, हाव, हावरेपणा, छंद, लोभ 'ते आळुकेपणें जडली । अति सत्वर श्रीकृष्णि ।' –रास ४ ७२ 'तेथें आळुकेपण ब्राह्मणें । जैसें कीजे ।' –गीता १ ४९३ [ अळका ]

**आळुकेपिळुके, आळेपिळे, आळोके पिळोके**—अळेपिळे पहा

**आळुगाय**—पु (गो) लाडिकपणा अलबेल, अर्वेल पहा

**आळुमाळ, आळुमाळु**—अळुमाळ पहा 'माचे आलया आळुमाळ ।' –गीता २ १५८९

**आळू**—न एक भाजी अळू पहा

**आळू**—स्त्री उसावरील कीड 'उसास मुख्य उपद्रव वाळवी, आळू आणि हुमनी या सूक्ष्म प्राण्यापासून फार होतो ' –कृषि ४६३ [ अळी ]

**आळू**—न एक जगली काटेरी झाड व त्याचें फळ हें तांबड्या मातीस होतें फळ सुमारें पेरूयेवढें असून पिकल्यावर तपकिरी रंगाचें होतें त्यास एक प्रकारचा वास येतो अळू पहा

**आळें**—अळें पहा 'शरीर विटाळाचें आळें । मायामोहपाश जालें ।' –तुगा ७३९

**आळेण**—न ( गो ) आमटी वगैरे कालवण घट्ट होण्यासाठीं लावावयाचें पीठ अळण पहा

**आळेपिळे**—पु अव अळेपिळे पहा 'अभिमानाचे आळेपिळे । महत्त्व उमामें येती वळें ।' –एभा ८ २१२

**आळेवणें**—अक्रि (गो) ( अळणामुळें आमटी ) दाट होणें [ अळणें ]

**आळोंच**—स्त्री कानगोष्ट, कानमात 'वह्निर्याचा घरीं क्वण क्वणा आळोंचु सांगे ।' –भाए ५५४ [ स आ+लोच् ]

**आळोचणें**—अक्रि हळूच कानात सांगणें, बोलणें, कानगोष्टी करणें 'हितगुज आळोंचासी । हृदयींचें गोड सांगावयासी ।' –एभा २४ ३०१ 'तो नेणो काइ आळोंचोनि गेला ।' –भाए ६० [ स. आ+लोच् ]

**आक्षिप्त**—वि १ आक्षेप केलेला, पेतरलेला, नामजूर केलेला, गडबळा-हरकत आणलेला ( वादविवादात प्रतिपक्ष्यानें अडवलेला ) २ अमान्य [ स ]

**आक्षिप्त-अंगहार**—न (नृत्य) नूपुरकरण करून विक्षिप्तकरण करणें, मात्र या करणांत हातपाय मागें पुढें फेंकणें, व अलातक, विक्षिप्त, उरोमडळ, नितंब, करिहस्त, व कटिच्छिन्न ही क्रमानें करणें. [ स ]

सारख्याच अडचणी, संकटें अगणें, व त्यांत सापडणें [इकडे+तिकडे]

**इकर्णे, इकत, इकार**—हे व यासारखे शब्द विकर्णे, विकत, विकार या शब्दांत पहा (कुणबाऊ बोलींत बऱ्याच जागीं इ योजितात)

**इकरम**—पु देणगी, दया, कृपा [अर अकाम = देणग्या, करीमचें अव अप]

**इकरा**—वि (गो) अकरा [अकरा अप]

**इकरार**—पु १ कबुली, करार, ठराव २ जबानी (लेखी किंवा तोंडी) 'पर जिल्ह्यांतील साक्षीचा इकरार घेऊन पाटरणें विषयीं जडजानें जडजास लिहावें'—न्यासे ३४ [अर इकार वचन, मान्ती, कबुली] ०नामा—पु लेखी ठराव कबुली, कबुलायत [फा]

**इकलजमर्दी**—स्त्री पाठपुरावा 'तुझें वितेक मर्दावली व इकलजमर्दी व ममलती केली'—शिवचरित्रप्रदीप ८४ [अर]

**इकरा**—वि. (व्यापारी) अकरा भाजीपाल्याचा सौदा करताना असे सांकेतिक शब्द वापरतात [अकरा गो इकरा]

**इकळी-ळूत**—स्त्री (कुण) किळस कळमळ, ओकारी (क्रि० येणें) [उकळी?]

**इकुडचा-ला, इकुडील**—वि (ग्र) इकडचा पहा

**इकून तिकून**—क्रिवि (कुण) इकडून तिकडून पहा 'गाडी इकून आली व तिकून गेली' [इकडून, तिकडून अप]

**इक्तीदार**—पु १ अनुयायी, अनुकरण करणारा २ (ल) विश्वासु [अर इक्तिदा=अनुकरण अनुचरण]

**इक्तो (इकतो)**—वि (राना कुण) इतका (अप) पहा

**इक्बाल**—पु नशीब सुदैव भरभराट [अर इक्बाल=भरभराट]

**इखार**—इकरार पहा

**इख**—पु (गो) विष विख ता इख खॉन मरतोलो से' [स विष]

**इखण**— न हत्यार साधन उपकरण विखण [स ईषु-ईषिका-हत्यार शस्त्र, साधन?]

**इखंनपाखन**—न (व) शेतकीचें हत्यार शेत वाहतो म्हण तोस काहीं इखनपाखन् आहे का?' [इखण द्वि]

**इखलास**—पु मैत्री, स्नेह प्रीति अंतःशुद्धता मनाचा निर्मळ पणा, निष्कापट्य [अर इख्लास=मैत्री प्रेम] ०नामा—पु स्नेहाचें पत्र मैत्रीचें पत्र स्नेहासोबत्यामध्यें लेखनेच्या पत्रास म्हणतात [अर इख्लास+फा नामा]

**इखलासी**—वि स्नेहपूर्ण, नीतीयुक्त चाहता प्रेमाचा [अर इख्लास्]

**इखळा**—पु (सुतारी धंदा) गिळे वगैरे उपरण्याचा चिमटा [वखळॉ]

**इगीति**—(कुण) यत्किंचित् [इंक्ति=इतकी, स इयत्ता]

**इंगणें**—अक्रि काळजीनें, श्रमानें, आजारानें किंवा इतर कारणानें भारावून जाणें, गलित होणें, टेंकीला येणें [वेंग(घ)णें]

**इगत-इगुत**—स्त्री (कुण) युक्ति, उपाय [युक्ति अप]

**इंगरेज**—पु १ इंग्रज माणूस, लोक, ब्रिटिश २ साहेब, गोरा [इंग्रज, इंग्लिश, पो इंगलेज]

**इंगरेजी**—स्त्री अशुद्ध अंग्रेजी १ इंग्रजी भाषा २ इंग्रजांचा अम्मल, ब्रिटिश अमदानी [पो इंगलेजी] —वि इंग्रजांचा इंग्रजी भाषेसबंधीं, इंग्रजी, ब्रिटिश ०दारू—स्त्री १ तापट, चिडका संतापी माणूस २ हुषार, चलाख माणूस, तडफदार माणूस [इंग्रजी दारू जलद पेटते यावरून]

**इगर्जे**—स्त्री (गो) स्त्रिस्ती वैगोलिक पद्धतीनें देऊळ [पो इग्रेज]

**इगळ-ळा, इगोळ**—पु (व गो) निवत निखारा, विस्तव अंगार 'केंची सुखनिद्रा आधरणीं। इगळाच्या।'—ज्ञा १५०१ 'आगीं लागतातीं कमळें। इगळें जैसीं'—शिशु ७०७ 'सत्यार हाचि दुःखमूळ। लागतील दुःखाचे इगळ।'—दा ३ २१ 'दुसऱ्याच्या घरावर असा इंगोळ ठेवणें चांगलें नाहीं' [स अंगार, प्रा इंगाल] म्ह० इगळ हातीं धरवेल पण हा हातीं धरवणार नाहीं—एखाद्या तापट माणसास उद्देशून म्हणतात **इंगळासारखा लाल होणें**—रागानें चेहरा तांबडा होणें, अतिशय रागावणें **इंगळासारखे डोळे**—रागानें भयंकर डोळे (अतिशय रागानें असे डोळे होतात)

**इंगळा**—पु एका जातीचा मुंगळा [स अंगार प्रा इंगाल]

**इंगळी**—स्त्री १ विंचवाची एक जात ही आकारानें विंचवापेक्षा मोठी असून काळी व अतिशय विषारी असते २ ठिणगी, निखारा, विस्तव, इगळ पहा 'जवीं वेळु वाऱ्यें वेळुजाळीं। वेळुचे व्वा काचणीमेळीं। स्वयें पाडूनि इगळी। समूळ जाळी आपणयातें।'—एभा २३ ६८९ ३ (सोनारी धंदा) तापलेल्या मुशींतील रस ओतण्याकरितां उपयोगांत आणावयाचा इंग्रजी सातांच्या आकड्याप्रमाणें असलेला पोगरी चिमटा, सांडशी (इंगळीच्या नांगीच्या आकारावरून) [स अंगार प्रा इंगाल]

**इंगा**—पु (चांभारी धंदा) चामडें ओढून घोटून ताणण्याचें व मऊ करण्याचें (उत्पण्यासारखें) हत्यार ०दाखविणें—खोड मोडणें, आपलें सामर्थ्य दाखविणें 'तुला दाखवितो चोहवारी इंगा'—नामदेव नाटक ८५ ०फिरणें—गर्वपरिहार होण्यायोग्य अडचणींत सापडणें संकटामुळें नम्र येणें, जेजर होणें त्यामुळें शुद्धीवर येणें डोळे उघडणें म्ह० इंगा फिरे, मुंगा जिर २ नांगरलेल्या जमिनीतील ढेकळें फोडण्याचें लाकूड [स इङ्ग्=फिरणें, हलणें]

**इंगित**—न १ खूण, मुनोवृत्ति सूचक हावभाव किंवा मुद्रा 'या इंगितें जाणदिनें कुमारा ।'—आमा २८ २ अभिप्राय, अतस्थ हेतु, योजना 'साळासस्कारापेक्षां केवळ विवाहालाच अलिकडे इतकें प्राधान्य का आलें यातील इंगित आमच्या मतें हिंदू लोकाची न्हावमावर्ळी अति वाटलेली विपयलपटता हेंच असावें '—टि ४ १३८ ३ (०यगित अप) व्यगोक्ति ओपरोधिक भाषण ०ज्ञ–वि इंगित जाणणारा, आकारावरून अभिप्राय जाणणारा [स]

**इग्नेशिया**—स्त्री (होमिओपाथी) प्लेगप्रतिबंधक व प्रतिहारक बी [इ]

**इग्यारावी**—वि (भिन्नी) अकरावी 'गाठ इग्यारावी ' [हिं ग्यारह]

**इंग्रज, इंग्रज**—पु १ इंग्रेज पहा 'जाची जाती फिरंगी । इंग्रेज बहुधा रक्त रगी । मलेवार नौकामार्गी । तिन्हर्से दडिले ।'—मुसमा ८ १२७ २ (खे) दोन पाशानी व चार रगाच्या सोंगट्यानीं खेळ ण्याचा एक डाव यांत पेशवे (पिवळ्या) आपल्या शिंदे (हिरव्या) होळकर (काळ्या) साथीदारासह एका बाजूला व इंग्रज (तांबड्या) दुसऱ्या बाजूला असून इंग्रजाना इतरानीं हरविलें म्हणजे 'इंग्रजाची गिमरी वनावगी ' असा टोमणा मारून डाव सपतो —न पालाद, लोखडाचा एक प्रकार

**इग्रज इंग्रेज**—(गो) इग्रज पहा 'सर्कैक तेपरी प्रेम ठानी । तें देखिली इंग्रजेची आर्थी। पुन शृगार शोभवी। चोउ कडा।'—शिशु ११९२

**इंग्रजी, इंग्रेजी**—इंग्रेजी पहा 'इंग्रजी साम्राज्य, व्यापार राज्यपद्धति, माल इ० ०गहाण—वि (कायदा) जेथे धनकोला मिळकत तीतील हक्क देऊन ऋणको ठराविक मुदतीत व ने फेड ण्याचा करार करतो व स्वत जातीनें कर्ज फेडण्याची हमी घेतो व कर्ज फेडल्यास मिळकत धनकानें परत करावी असें लिहून देतो त्या व्यवहारास इंग्रजी गहाण (इंग्लिश मार्गेज) म्हणतात

**इग्लाई**—स्त्री (भिन्नी) अफाशीरगा 'साऊशी बासत इग्लाई करों नत '—भिन्नी भाषा २५ [स अल्पु=दागे]

**इंग्लिश**—वि १ इग्रज, इग्रेजी पहा [इ] २ परदेशी, विलायती ०फट–वि १ (मराठी) यूरोप अमेरिकेंत कातून, पेड पाड केलें (रत्न) २ इग्रजी पद्धती ॥ (कपडा पदार्थ इ०) ०बॉर्डी–(छाप) ११ आरचा टाइप असण्याचा, चौरा पॉइटचा टाईप हा पायका टाईपपक्षा मोठा व ग्रेट प्रायमरपक्षा लहान अक्षराचा असतो [इ]

**इग्रड**—पु (प) विपाद 'तनादर आसामा [विपाड]

**इच**—पु फुटाचा बारावा भाग, अगुळ तसू 'दोन इच दाह'—नाइ १८ [इ, लॅ उन्शिआ=१२ वा भाग]

**इचकट, इचकटण इचकणें, इचका**—विचकट, विचकटणें, विचकणें, विचका पहा

**इचका**—पु एका प्रकारची गोफण

**इचका**—पु १ एका प्रकारचें गवत व त्याचें बी तृणधान्यात याचा समावेश होतो २ एक झुडूप याचीं पानें खाण्यात हरकत नसते विचका पहा

**इचका**—पु एक प्रकारचा मासा इचना पहा

**इचकाइंधन**—वि (व) अव्यवस्थित, मोडतोड झालेलें [विचका+इंधन]

**इचर्की**—स्त्री (व) महामारी [स विषूचिका]

**इचकोषा–या**—पु नाश, विध्वस विचका, विचकोषा–या पहा (क्रि० होणें, करणें) 'चोऊन मग इचकोचा तोचा हाय सुरून गेले गोठ।'—अपत्र ४१ [विचरा]

**इचना**—पु फक्त पावसाळी दिवसात सापडणारा लहान मासा यास पुण्याकडे इचका–की म्हणतात याच्या छातीपोटावर दोन व पाठीवर एक असे पर असून अगावर अनेक रगी ठिपके असतात

**इचर**—वि (व) विरळ [स विचर] ०कुंधा–पु विरळ झालला कुधा (एक प्रकारचें गवत)

**इचा–ची**—हिचा–ची (ही या सर्वनामाची षष्ठी) ०भन–उद्गा मूळ अर्थ हिचीसारखा पण पुढें आश्चर्याचा, हेटाळणीचा उद्गार बनला 'अरे च्या!' 'पशुपति–(स्वगत) इचीभन हाथ समदा मान आवानाच'—वाय २२ [हिंदी बहीण]

**इचार–णा**—विचार–विचारणें पहा

**इचु, इंचु**—पु विंचू [विंचु अप स वृश्चिक, प्रा विच्छु]

**इचक**—वि (व ना) सोडवर, खट्याळ 'पाटील! म्हणतं तुमच पोर तस आहे हुशार' 'पण इचक मात!' [विचकणें] ०दांगो–वि (ना) खोडकर

**इच्छा**—स्त्री १ वासना, वांछा, आशा, आकांक्षा मनोगत, मनीषा, आवड सामासाद–इच्छापूर्वक, इच्छापूर सर इ० २ (गणित) इच्छांक, त्रैराशिकातील प्रमाणसजातीय राशि आधक मध्याक व अत्याक किंवा इच्छांक हीं तीन पदें असतात, चवथें इच्छाफल (उत्तर) काढावयाचें असतें उ० पाच रुपयास दोन मण, तेव्हा चार रुपयास किती? यथे पाच हें प्रमाण व चार हीं इच्छा [स इष्] ०तृप्ति–स्त्री इच्छेची तृप्ति होईतोंवरी इच्छा परिपूर्ण होईपर्यंत ०तृप्ति–स्त्री मनीषा सिद्धीस जाणें, हेतु धारणा सफल होणें ०दान–न इच्छिलेलें दान देणें इच्छा पुरी करणें ०दानी–वि इच्छादानकर णारा, ज्याची जी इच्छा असेल ती पुरविणारा 'तुका म्हणे इच्छा दानी।पुरवी आवडीची धणी।' ०पूर्ति–स्त्री इच्छेची परिपूर्तता पूर्तता, इच्छातृप्ति ०फल–न (गणीत) त्रैराशिकातील चौथें पद (उत्तर) मध्यपद आणि इच्छाक याचा गुणाकार करून त्यास

**आक्षिप्त(करण)**—न (नृत्य) हात व पाय बरोबर पुढच्या बाजूस फेंकणें [स]

**आक्षिप्तरेचित(अंगहार)**—न (नृत्य) हात पाय रेचित करून स्वस्तिकें करणें, मग तीं स्वस्तिकें मोडून पुन्हा रेचित व स्वस्तिक करून हात, पाय पुन्हा रेचित करणें नंतर रेचितावर येत असणारे पाय उडी मारल्यासारखें करणें, नंतर उद्वृत्त, आक्षिप्त, उरोमंडल, नितंब, करिहस्त व कटिच्छिन्न करणें हीं क्रमानें करणें [स]

**आक्षिप्तरेचित(करण)**—न (नृत्य) डावा हात हृदयावर ठेवून उजवा हात दूर करून रेचित करणें, नंतर तो रेचितहस्त तोंडा समोरून डोक्यावर नेऊन उचलून धरणें [स]

**अक्षिप्तिका**—स्त्री. (संगीत) स्वरांत, तालांत लिहिलेली चीज, (इ.) नोटेशन [स आ+क्षिप्]

**आक्षेप**—पु. १ ओढणें, खेचणें, आकर्षण 'लगाम हातीं असला म्हणजे घोडयाचा पाहिजे तेव्हा आक्षेप करावयास साप डतो' २ (ल) मोहित करणें, आकर्षिलेली किंवा मोहित अवस्था 'त्याचें चित्त परमार्थाकडे लागलें आहे, त्यास विष याच्या गोष्टी सांगून त्याचे चित्ताचा आक्षेप करू नका!' २ ओढून धरणें, मागें घेणें, आढेवेढे घेणें, शंकाकुशंका काढणें, आवश्यक म्हणून वाट पाहणें, खोळंबून राहणें (एखादा माणूस किंवा वस्तु नाहीं म्हणून), अडून बसणें (क्रि० घेणें, धरणें) 'कोणाचा आक्षेप न घेता स्वत फडशा करीन' 'हा माल गिऱ्हाईक आला म्हणजे विकून टाका, माझा आक्षेप धरू नका' ३ (ल) अनुमान निघणें, सोबत, बरोबर येणें, बरोबरच बोध होणें, ध्वनित, गर्भित असणें, गर्भितावस्था 'माझें ऋण घेतलेंस तें दे—या वाक्यांत ऋणानें व्याजाचा आक्षेप होतो' ४ हरकत, आडकाठी, विरोध (वादांत प्रतिपक्ष्याचा मुद्दा किंवा बाजू) 'त्यांनीं घेतलेले आक्षेप धडधडीत खोटे आहेत'—केले १ ३६१ ५ शंका, संशय, शंकाप्रश्न 'श्रोतयानीं आक्षेप केला।'—रावि ३ ६ आग्रह, हट्ट, सूचना 'नाहीं प्रथा रसमकल्प। नव्हता श्रोतयांचा आक्षेप। प्रथीं उजळला कृष्णदीप। सुखरूप हरिकथा॥'—एरुस्व १८ ६९ 'दुर्योधनेंही आक्षेप। केला असे भेटीचा।'—सुसभा १३ ४९ ७ निंदा, कुटाळी, दूषण टपका ८ एक अलंकार (व्याजोक्ति—व्यजोक्तीप्रमाणें), एखादा आक्षेप घेऊन तो खोडून टाकण्याचें वर्णन असतें तेथें आक्षेप अलंकार होतो बोलावयाचें तें अर्धवट बोलून एखादा विशेष अभिप्राय व्यक्त केला असतो तेथेंहि हा अलंकार होतो जसें—नसेन दिसलो कसा नयनसर्वसाक्षी रवी। विषाद धरिला म्हणो न सुरभी विपक्षीर वी।'—केका ४ [स आ+क्षिप् = फेकणें]

**आक्षेपक**—वि आक्षेप घेणारा, काढणारा —पु. वातरोग मज्जातंतूचा रोग, आचके, आकडी (इ) कन्व्हल्शन, [स]

**आक्षेपणें**—उक्रि (काव्य) ओढून घेणें, आकर्षणें, चटक लावणें २ हरकत घेणें, नामंजूर करणें, अमान्य करणें, ३ शंका काढणें 'मागां श्रोतीं आक्षेपिलें। जी ये मर्यी काय बोलिलें। हें सच्चव्हीं निरोपिलें। संकलित मागें॥'—दा ११ ७ [आक्षेप]

**आक्षेपार्ह**—वि दोषार्ह, आक्षेप घेण्यायोगें [स]

**आक्षेपून**—क्रिवि (काव्य) निक्षून, प्रत्यक्ष बजावून, बुद्धि पुरःसर, मुद्दाम, जाणून बुजून, आवर्जून. [आक्षेप]

**आक्षै**—क्रिवि अक्षय (अप) 'कीं हें गुरुचीं वाक्यें लोटलीं। आक्षै आनंदें उतटलीं।'—दा १ ७ ३१

**आज्ञप्त**—वि आज्ञापिलेला, हुकूम केलेला, सांगितलेला [सं आ+ज्ञा]

**आज्ञप्ति**—स्त्री आज्ञा पहा 'आमात्यराज, ही विज्ञप्ति की आज्ञप्तीच मी समजेन'—चंद्रगुप्त ७०१

**आज्ञा**—स्त्री १ हुकूम, आदेश, ताकीद सामासशब्द—राजाज्ञा, शास्त्राज्ञा, वेदाज्ञा इ० २ वेद, शास्त्र इत्यादिकांस म्हणतात —मनस्मे ३ होय, बरें, इच्छेप्रमाणें करतों या अर्थी वडिलांनी आज्ञा केली असता सेवकजन 'आज्ञा' या शब्दानें उत्तर देतात, ४ तंत्रशास्त्रांतील षट्चक्रापैकीं एक योगशास्त्रांतील एक भ्रुकुटीस्थ चक्र 'आधरादि भेदुनि। आज्ञावरी॥'—ज्ञा १८ १०३८ ०वंदणें—नमस्करणें—पाळणें—आज्ञा शिरसांमान्य करणें 'आज्ञा वंदोनि निघाला तेव्हा' 'तयातें मोळसावया हेचि संज्ञा। जे जगें नमस्कारिजे आज्ञा॥'—ज्ञा १० ३११ ०देणें—१ कामावरून दूर करणें, बडतर्फ करणें २ निरोप देणें ०मागणें(जाण्यास)—परवानगी घेणें, निरोप घेणें ०दशक—न (ख्रिस्ती) दशाज्ञा, परमेश्वरानें मोशाला सीनापर्वतावर ज्या दोन दगडी पाटया दिल्या होत्या त्यावरील लेखाचें नाव पहिल्या चार आज्ञामध्यें मनुष्याचीं देवाशीं आणि बाकीच्या आज्ञांत मनुष्याचीं मनुष्याशीं कर्तव्यें सांगितलीं आहेत)—अनु ४ १३,१०४ 'आणि पाटयावर त्यानें (मोशानें) कराराचीं वचनें म्हणजे दहा आज्ञा लिहून काढिल्या'—निर्ग ३४ २८

**आज्ञाकर—कर्ता—कारी, आज्ञांकित, आज्ञाधारक—धारी, आज्ञाधीन, आज्ञानुसारी—वर्ती**—वि आज्ञा पाळणारा, आज्ञेप्रमाणें वागणारा, अंकित, आश्रित, आज्ञाधारक हा शब्द पत्राच्या शेवटीं आपली आज्ञा पाळणारा सेवक (इ युवर मोस्ट ओबिडियन्ट सर्व्हंट) या अर्थी लिहितात [स]

**आज्ञाचक्र**—न भ्रूमध्यस्थानीं असणारें चक्र, आज्ञा अर्थ ४ पहा 'नाकाचें अग्रसाइनि दूरी। दृष्टी ठेवावी नासाग्रीं। ते ठायीं बैसें आज्ञाचक्रीं। योगगभीरीं योग्यता॥'—एभा १४ ४१२ [स]

**आज्ञातिक्रम—ण**—पु आज्ञा मोडणें, आज्ञेचें उल्लंघन, हुकुमाच्या विरुद्ध जाणें [स आज्ञा+अतिक्रम]

**आज्ञापणें—पिणें**—उक्रि आज्ञा करणें, हुकूम करणें, ताकीद करणें, सूचना करणें 'आज्ञापिला निजपिता वसुदेव देवें।' 'आणीक कथा राहिल्या अपार। मग रुक्मिणीवर आज्ञापी।' 'प्रियाहि

असे जाहली तुज धुकार्थे आज्ञापिती।' –केका ८३ २ सोंपविणें, स्वाधीन करणें, ताब्यात देणें 'प्रधानास राज्यकर्म आज्ञापुन राजा आपण ईश्वराचें ध्यान करीत बसला ' [आज्ञापन]

**आज्ञापक**—वि आज्ञा करणारा, हुकूम करणारा (धनी इ०) 'नाचामिद्धि पावाल। आज्ञापक होआल।' –ज्ञा ३ ९९ [स]

**आज्ञापत्र**—न १ सरकारचें हुकुमाचें पत्र, सरकारी हुकूम, मराठी राज्यात छत्रपतींच्या खुद्द पत्रास आज्ञापत्र म्हणत २ (सामा) मोठ्याकडून लहानास गेलेलें पत्र ३ लेखी हुकूम, शासनपत्र ४ (वि) राजा, विशप वगैरे अधिकारी वर्गाकडून एक्लेसियेला अथवा मंडळीस आलेला हुकूम 'त्याच वेळेस आज्ञापत्रें, आवाहन पत्रें अमल्यास वाचावीं' –साप्रा ७० (इ) ब्रीफ [स]

**आज्ञापत्रिका**—स्त्री (बडोदें) सरकारी हुकुमाचें प्रसिद्धी पत्रक, सरकारी वार्तापत्रक, सरकारी गॅझेट [स]

**आज्ञापन**—न हुकूम करणें, आज्ञा करणें, सूचना करणें, समजावून सांगणें, तांकीद, आदेश [स]

**आज्ञापनीय**—वि आज्ञा करण्यायोग्य [स]

**आज्ञापालक**—वि आज्ञांकित, आज्ञाधारक, आज्ञा पालन करणारा, अंकित, सेवक, अनुचर, प्रजा [स]

**आज्ञापालन**—न आज्ञा पाळणें, हुकूम मानणें, आज्ञांकितता [स]

**आज्ञापित**—आज्ञप्त पहा

**आज्ञाप्य**—वि आज्ञापनीय पहा

**आज्ञाभंग, आज्ञोल्लंघ, आज्ञोल्लंघन**—पुन आज्ञा मोडणें, हुकूम तोडणें, आज्ञेविरुद्ध वागणें

**आज्ञार्थ**—पु (व्या) बोलणारा आज्ञा, उपदेश किंवा प्रार्थना करतो असा जो बोध क्रियापदाच्या रूपावरून होतो तो

**आज्ञार्थी**—वि (व्या) बोलणारा आज्ञा, उपदेश किंवा प्रार्थना करतो असा जो बोध ज्या क्रियापदरूपावरून होतो तें क्रियापदाचें रूप

**आज्ञासिद्ध**—वि ज्याची आज्ञा सिद्ध झाली आहे असा, ज्याची आज्ञा सर्वत्र पाळली जाते असा (ईश्वर) 'मी मनें वाचा देहें। करी तें कैसें नोहे। जें मजवाचूनि आहे। आज्ञासिद्ध आन।' –ज्ञा १६ ३५५ [स]

## इ

**इ**—मराठी वर्णमालेंतील तिसरें अक्षर, व स्वरमालेंतील तिसरा स्वर अक्षरविकास –मुख्य चार अवस्था पहिली इ स तिसऱ्या शतकांतील अशोकाच्या गिरनार शिलालेखांत, दुसरी इ स ४९३ मधील एका दानपत्रात, तिसरी हैहयवंशी राजा जाजल्लदेव याच्या काळातल चवथी इ स १२७३ सुमारच्या लेखात आढळते –ओझा

**इ, ई**—सना हा, ही, हें 'तें समस्तीं इहीं भोगावें।' –ज्ञा १ २१७ 'इ उनाळें बागाल ओहव। आली ' =हें ऐकून वाघाला हसू आलें –भिल्ली भाषा १७ [स एतत्, इदम, प्रा ईअ]

**इ**—या, ची, चें, षष्ठीचा फारसी प्रत्यय हा प्रत्यय मराठींत शके १४५० च्या सुमारास घुसला असें राजवाडे यांचें म्हणणें आहे शके =स शक+फा इ शके १८४९ =शक+इ+१८४९ =१८४९ या शक 'श्री कारले व कोडिवले व वडिगाळ राजमुद्रा मुख्य समस्त इ अशिर्वादु' –शके १४२९ मधील एक पत्र यांतील समस्त इ=चे समस्त –भारिसइ १५ [फा]

**इ॥**—अ इस्तिकबाल (अमुक काळापासून) चा संक्षेप 'दर्च कापड इ॥ माह रमजान उर्फ मार्गेश्वर' –भाव १० ३ ११९ [अर इस्तिकबाल=भविष्यकाल]

**इआ**—सना या, ह्या 'भयानस इआ। ऐसें न म्हणे पुति भवभया।' –ऋ २४ [स इदम् प्रा ईअ]

**इकडचा-ला, इकडील**—वि या ठिकाणचा, बाजूचा, दिशेचा रस्त्याचा, इकडे असणारा **इकडचा डागर तिकडे करणें**–मोठें भयाट, अवघड काम करणें **इकडला गड तिकडे नेऊन ठेवणें**–अर्थ वरील प्रमाणें, पण व्यापक बडबड करणाऱ्या संबंधीं योजतात **इकडला लुचा तिकडला चोर**–(र) दोन्ही कडून थपडा खाणारा [इकडे]

**इकडचा तिकडचा**—वि या बाजूचा, आणि त्या बाजूचा, या ठिकाणचा व त्या ठिकाणचा, म्हणजे निरनिराळ्या ठिकाणचा, बाजूचा, विषयाचा, कोठला तरी, चार (अनेक) ठिकाणचा [इकडेतिकडे]

**इकडून**—क्रिवि या दिशेहून–ठिकाणाहून–बाजूकडून (गुण रूप) इकडनें [इकडे+हून] ०**तिकडून**–क्रिवि येथूनतेथून, आजू बाजूनीं, चोहूंकडून, सर्वेतरी

**इकडे-स**—क्रिवि १ या बाजूस दिशेस २ येथें, या जागीं ३ घरीं, स्थानीं, कडे या अर्थीं त्याचें इकडे' 'माझे इकडे' एवें पहा [हा+कड, का ईकडे, ते इक्कड अक्कड]

**इकडे**—पु (बायकी) पति नवरा बायका नवऱ्याचें नाव घेत नाहींत, तेव्हां इकडे (=आपला पति) हीं मोघम संज्ञा योजितात कधीं **इकडून** असाहि प्रयोग आढळतो 'काय मेल्याची छाती लागली आहे इकडच्यापुढें उभें राहण्याची!' –पुच १३७ 'काल्ची इकडची स्वारी' –गृहसगीतें ४९

**इकडेतिकडे**—क्रिवि येथें तेथें, या बाजूस त्या बाजूस, आसपास –अ (क) इकळमकळ, दुचराई, इकडाव (क्रि० करणें, लावणें, मांडणें) **इकडे आड तिकडे विहीर**–दोन्हीकडे

शतो १ ३९

आदिपदाशें मिळून असतां इच्छाफल देतें ०भंग-पु इच्छेची पूर्ति न होणें, आशा निष्फळ होणें, निराशा ०भोजन-न १ तृप्ति होई पावेतों जेवणें २ भरपूर जेवण ३ इच्छित पदार्थ (ब्राह्मणांस) खाऊ घालणें ०मरण-न इच्छेस येईल तेव्हा मरण येणें, मरणें, पाहिजे तेव्हां मरण आणण्याची शक्ति ०मरणी-मृत्यु-वि पु इच्छा होईल तेव्हा मृत्यूस निमंत्रण करणारा, इच्छामरणाचा ईश्वरी प्रसाद लाभणारा 'स्वातंत्र्यशाली इच्छामृत्यु तुम्ही पुरु पुत्रान वागवेंगे।' –माउद्योग ११ ८७ ०लाभ-पु. इच्छित वस्तूची प्राप्ति, इष्टलाभ ०वान-वि इच्छा असणारा इच्छायुक्त ०विनाश-पु इच्छाभंग, इच्छादमन, आत्मसंयम ०विलास-विहार-पु मानेल तेव्हा, मानेल तें खेळणें, मनगोक्त विलास, चैन करणें ०शक्ति-स्त्री इच्छेचें सामर्थ्य, संकल्पशक्ति, इच्छा हीच शक्ति, (इ) विल्पॉवर ०सिद्ध-वि इच्छेप्रमाणें सिद्ध किंवा अगिद्ध ठरविता येण्यासारखा ०स्वातंत्र्य-न इच्छेची स्वतंत्रता, प्रवृत्तिस्वातंत्र्य ०क्षय-पु इच्छाविनाश पहा

**इच्छाधीन**—वि इच्छेप्रमाणें चालणारा 'इच्छाधीन जे स्नायू आहेत, म्हणजे जे स्नायु मनात आल्याबरोबर आपल्या शरीराचे अवयवाच ठिकाणीं गति उत्पन्न करितात '–मराठी ६ वें पुस्तक (१८७५) २६० [स इच्छा+अधीन]

**इच्छानधीन**—वि इच्छेबाहेरचा, स्वतंत्र 'हृदय हा एक इच्छानधीन स्नायूच आहे' –मराठी ६ वें पुस्तक (१८७५) २५० [स इच्छा+अनधीन]

**इच्छाक**—पु (गणित) इच्छा अर्थ २ पहा

**इच्छिक**—वि इच्छा असणारा, आकांक्षी 'पूर्वील मायरा त्याचा इच्छिक।' –व ५ [स इष्-इच्छ्+क]

**इच्छिणें**—सक्रि इच्छा करणें, धरणें, आकांक्षा असणें चिंतणें, वांच्छिणें, हेतु मनाशा असणें, लोभ धरणें [स इष्-इच्छ्] म्हण १ इच्छिलेलें साधल तर दरिद्र का बाधेल २ इच्छी परा येई घरा दुसऱ्याचें वाईट जे चिंतिलें तें आपणावरच येतें

**इच्छित**—वि इच्छिलेलें चिंतिलेलें वांच्छिलेलें [स]

**इच्छु**—वि इच्छा करणारा इच्छक, इच्छिक पहा सामासिक- पिपच्छु द्रव्यच्छु मोक्षेच्छु [स]

**इछा**—स्त्री (रामदासी वाङ्मय) इच्छा 'मानिलें दवें इ पुरविते इछा।' –दानि २१ वनफळभोजनीं इछा काहीं।' –मन्त्र २४ [इच्छा अप]

**इजखीलाल**—पु घोड्याचा एक रोग हा रोग पाठीचा असून त्यामुळें पाठ सुस्त होत व कणा फाटतो –अश्वप २ २०० [उर्दू]

**इजगा**—स्त्री (व) चिकित्सा, विचका हा शब्द स्त्रियांनीं वापरतात "याला दाखाव त्याला दाखाव असी इजगी इजगी झाली" [विचका?]

**इजट**—न (वर्हा) इवाड, रूद, चाहेचोर, गूढ रागावरें मानर (माग) हैवान [फा]

**इजत, इजतआसर-दार,** **इजती**—इज्जत पहा

**इजन**—न शक्ति उत्पन्न करणारें यंत्र, चालक यंत्र, गतियंत्र, इजनाचे स्टीम (वाफ), ऑईल (तेल), गॅस (धूम), कॉम्प्रेस्ड एअर (पीडित वायु) वगैरे पुष्कळ प्रकार आहेत [इ एन्जिन]

**इंजनधारा**—पु (व) पराा, पल्याचा वारा विस्तारणारा पद्य 'इंजनवाऱ्यानें वारा घाल' [विस्तार+धारा]

**इजवळ**—स्त्री (व ना) एका जातीची पाल विसाप? [म विसप?]

**इजमायली**—वि १ कच्चा, तुटकी (हिशेब, गावचा ताळेबंद) २ (वों) कामचलाऊ, हंगामी, कच्चें, तात्पुरतें (इमारत, काम वगैरे) [फा इज्माल=सारांश, तात्पर्य]

**इजलास**—स्त्री बैठक, सभा, अधिवेशन, सदर (कोर्टचें) [अर इज्लास्]

**इजवटा**—विजवटा पहा

**इजळणें**—विजळणें पहा

**इजा**—स्त्री अपाय, पीडा, त्रास, उपद्रव 'ताउक्याला इजा न लागे एसा बंदोबस्त होऊन तेनवतास पत्रें यावीं' –रा ७ ११७ [अर. ईजा]

**इंजाई**—वि दिसण्यात सुरेख, चकाकित, भपकेदार, दिखाऊ पण पोकळ [स इष्=चमकणें?]

**इंजाईत**—वि लुकसान, लबकान, दिखाऊ (कापड), कमजोर निःसत्व (लाकूड इमारत), चांगलें न बनविलेलें, तयार केलेलें (काम वगैरे) [स इष्=चमकणें?]

**इजाफत**—स्त्री १ (इनामदारास) वतनास कायम जोडून दिलेलें गाव, इनाफत इनाम २ इतर राजाकडून किंवा परराष्ट्राकडून येणाऱ्या जागाच्या देणग्या किंवा नजराणे यांचा हिशेब ठेवणारें खातें, इजाफतखाना, हा जो खर्च होतो त्यास इजाफत खर्च म्हणतात- याच्या उलट मुजाफत व मुजाफतखर्च –स्त्रीन आधिक्य, वाढ, वगैरी –वि अधिक ज्यादा, जास्त [अर. इजाफा=वाढ, आधिक्य] ०गाव-इजाफत अर्थ १ पहा ०जमा-स्त्री १ कर्ज, नजराण्याची विक्री वगैरे निरनिराळ्या नवीन साधनांनीं सरकारनें गोळा केलेला पैसा, रह, तौफीर, नाणेंचलाव, वरपाडा, पारगाव बाजगस्त वटाव भेगी, यादगार, उलफा, तफावत सोसत, नरूबद, देतें नदीकिनाराउत्पन्न (टरबुजें वगैरे) तळ्याच्या काठचें उत्पन्न, महालोमहालचें उत्पन्न, हुसुम्न आलेली रकम, बैलनगी, सनदसूद गुजारत मूस कवडी, कचकलवाजी गुराची नियोजा वगैरे बाबी यात येतात –भाम १८३४ ४४ २ एका मुस्यान किंवा महालात दुसऱ्या महालाचा जमा झालेला वसूल मुनाफत खर्च पहा 'जव्हेरखान्यातून एखाद्या कारखान्याकडे जिनगा दिल्या

गेल्या म्हणजे त्या कारखान्यात जव्हेरखान्याच्या नावानें इ० होऊन खर्च कारखान्यात दाखल होई ' –जनि (वटोदे) ४ ३ जप्त केलेल्या एखाद्या गावचा वसूल

**इजाफती**—वि इनाफत (जमे) सबधी

**इजाफा**—पु १ भार इनाम, नेमणूक, तनखा, नजराणा २ वाढ, वढती ' इजाफा पचहजारीचा दणार '–रा १.१७९ [ अर इझाफा=वाट ]

**इजा, विजा, तिजा**—अ १ एकामागूनएक असा तीनवळा, दोनदा झालें कीं तिसऱ्यादा झालेंच पाहिजे अशा कल्पनेनें लिसऱ्या वेळीं वापरतात –म्ह ६७ (क्रि होणें, सागणें) २ (ल) वारवार, कैक वेळा [बीजु, तीजु हे दोन व तीन या अर्थी गु व बिजा, तिजा, हे हिंदी शब्द यास जुळणारा असा एक इजा शब्द या अर्थी केलेला दिसतो, तुल० का इज=दोन ]

**इजायली, ईजायली**—वि १ अगदीं सामान्य, जगली, रायवळ इमारती लाकूड, इजायली (रायवळ) विरुद्ध साग, साग खेरीज इतर लाकडाला हा शब्द योजतात २ रायवळ लाकडाचें बाधकाम [ अर अजाल=हलकें ]

**इजार**—स्त्री विजार, पायजमा, सुर्वार, चोळणा, पाटलोण ' इजारा पैनारा मुचलग सकळा । '–मप्र ७ ११ म्ह० जो इजार शिवील तो भोंक ठेवील [ फा इझार् ]

**इजारत, इजारा**—स्त्री पु १ खड, मक्तेगिरी, विदिष्ट करार, भाडेपट्टा, चटलावणी (एखादें खेडें किंवा चोसाड जमीन ३०–४० वर्षांत वगाहत करण्याच्या किंवा लागवडीस आणण्याच्या करारानें देणें), धारा ' शेरीफाकडे शायरचा इजारा असे, आणि त्याम दरसाल त्याबद्दल ठराविक रक्कम सरकारात भरावी लागत असे ' –इमू ५८ २ (ल) जबाबदारी ' सर्व इजारत मन्सूराची मुख्या वर आहे '–चित्रगुप्त ९७ [ अर इजारह्=इजारा ]

**इजारदार**—पु इजारा घेणारा, मक्तेदार, ठेकेदार, कनाटदार ' त्यावेळेम इतर इजारदाराप्रमाणें याच्याकडेस काहीं सरकारी बाकी होती '–विविज्ञ १ ५० [ अर इजारा+दार् ]

**इजारदारी**—स्त्री मक्तेदारी

**इजारपट्ट-पट्टा**—पु १ इजारदाराची सनद २ गांवानीट किंवा विदिष्ट हद्दींतील देणाचा जमा फरिस्त ३ गावच्या मुख्य पाटलाला दिलेला वार्षिक वसुलाचा हिशेब जमाखर्च ४ गावचा वसूल ठरवून जो कागद पाटलास देतात तो [ अर इजारा+पट्टा ]

**इजारी**—वि (जुनी) गुडघ्यापर्यंत पाय पाढरे असणारा जनावर (मेंढी वगैरे प्राणी) ' हा मेंढा इजारी आहे ' [ फा इझार ]

**इजितपत्र, इजीत जाणें**—अजितपत्र-अजित जाणें पहा

**इंजिनियर, इंजिनेर, इंजनेर**—पु यत्रकाम किंवा बाधकाम जाणणारा, स्थापत्य (इंजिनियरिंग) शास्त्रज्ञ, यत्रशास्त्रवेत्ता ' जे प्रयोग शेकडों वर्ष वसून गेले आहेत, कीं भाषेचा आणि त्याचा जगीकाय एकच जीव होऊन गेला आहे, त्यास व्याकरणानें उपटून टाकण्याचा यत्न करणें म्हणजे इंजनेरास सडक बाधावयाची असता त्यानें मधील डोंगर व पर्वत उपटून दूर फेंकून देण्यासारखेंच कृत्य आहे ! '–नि १२४ [ इ इंजिनिअर ]

**इंजिनियरिंग**—न वास्तुशिल्प, स्थापत्यशास्त्र, यत्रशास्त्र

**इजूक लागणें**—क्रि (माण) दुखणें लागणें [ इजा ]

**इजागत**—स्त्री (ल) दुष्ट अपघात, सकट, अरिष्ट [ इजा ]

**इज्जत, इजत**—स्त्री १ अब्रू, प्रतिष्ठा, मान, थोरवी, कीर्ति ' हे गोष्ट घोरपडयाचे इज्जतीस लायख नव्हे ' –ऐस्फुले (शिवाजीचें मालोजी घोरपडयास पत्र) ' सरकारची इज्जत सत्या प्रयानीं मीठ लुटलें तेव्हाच गेली '–के २७.५.३० २ पत्राच्या आरंभींचा बहुमानार्थी मायना [ अर इज़्ज़त्=प्रतिष्ठा ] ०खाणें, घेणें–क्रि दुर्लक्ष करणें ०आसार–वि सुप्रतिष्ठित, सन्मान्य, नामदार फारसी पत्रातून नावाच्यापूर्वी हा बहुमानवाचक शब्द किंवा पदवी योजतात –रा १८ ५०, १५ २७१ [ फा इज़्ज़त् ] ०खाऊ घेणा–वि १ एखाद्याची अब्रू किंवा मान कमी करणारा, घुडविणारा, आश्रयदात्याची बेअब्रू करणारा (नोकर, वस्त्र, घोडा, इ०) २ पोटाळा माजविणारा, कार्यनाश करणारा, मूर्खपणा पदरीं बाधणारा, अब्रू घेण्यासारखा ०दार–वि प्रतिष्ठित [ फा ] ०पन्हा, -महा–वि सुप्रतिष्ठित, श्रेष्ठ, नामदार (एक पदवी) –रा३ ४३ [ फा इज़्ज़त्+पनाह्, मआब् ] ०लायक–क्रिवि प्रतिष्ठेप्रमाणें, माफक मरातीव ' शिलेदार इनामत देतात ते अवघ्या सर्दारासहि इज्जत-लायख घेणें '–रा ६ २१० ०हुर्मती–स्त्री मानपान ' परंती याच्या वडिलाची इज्जत हुर्मती चालली आहे तसी याची चालविणें. '–वाडमनदा १६

**इज्जती, इजती, इज्जतीचा**—वि अब्रूदार, प्रतिष्ठित, सन्मान्य

**इज्जती-दस्तगाह**—प्रतिष्ठा-निधी, श्रेष्ठ, सन्मान्य –रा १८ ५० [ अर इज्जत+दस्तगाह ]

**इज्ना**—पु हाथा सत्ता ' आ धाणी रावाईसिंगाने इज्न्यात दरबार त्यास राज्य यावें '–जारा ,१०७ [ अर इज्न=परवानगी ]

**इज्न्यात**—क्रिवि आधीन, स्वामी

**इज्हार**—पु जाहीरनामा, प्रसिद्धीकरण, ताकीदपत्र, नोटीस, समन्स [ अर इज्हार=प्रसिद्धीकरण ]

**इंझणा**—(व) किंवणा पहा

**इझाइल-यल**—इसायल पहा

**इंझाळ**—पु (व) १ पायाच्या खालच्या बाजूस लावलेला आडवा दांडा, पाय, अडात पहा २ वखाडाला लावलेला आडवा दांडा इडाळें पहा

**इझीचेअर**—स्त्री आरामखुर्ची, जीवर शांप घेता येईल किंवा पाय लांब करून बसता येईल अशी एक प्रकारची खुर्ची [इ ई झी+चेअर]

**इट**—स्त्री वीट पहा 'तिहीं गुणांचिए इटेचेनि पाडें।'–शिशु ५८ [स इष्टका, प्रा इट्टा]

**इटकर-डूर**—न स्त्री विटकर पहा

**इटकुला-मिटकुली**—वि लहानशी, एवढीशी 'इटकुली मिटकुली गोष्ट मरो तुमचें आमचें पाडें भग' [इतुकली (स इय त्ता) ची द्वि, गु॰ वा इटकुं=अकुचितपणा]

**इटकार**—वि (व) अटकर, हट्टी, अडेल [अटकर अप]

**इंटर, इंटरक्लास**—पु आगगाडीमधील घर्ड (तिसरा) आणि सेकंड (दुसरा) यामधील वर्ग [इ इंटर=मधला]

**इटा**—पु भाल्यासारखें एक शस्त्र, वीट, साग या भाल्याची लाठी सहा फूट असून पुन्हा त्याच्या अवटाग सहा फूट लांबीची दोरी बांधलेली असते, तो मनगटाला गुडाळून इटा फेंकतात म्हणून याचा मारा बाराफुटांपर्यंत चालतो पट्ट्यापेक्षांहि हा मारा जास्त असल्या मुळें 'दहा पट्टेकरी तर एक इटकरी' अशी म्हण पडली आहे ईट पहा [प्रा इट्टि=ऐंचणें (?) ते ईट, हि ईठि स यष्टि]

**इटाळ-ण-सी**—विटाळ पहा

**इंटाळ इंठाळ**—(कुण) विटाळ पहा 'आमचा इटाळ झाला'–के १७३०

**इटाळी**—स्त्री आळ आरोप विटाळ 'ऐसें गे यशोदे जननी। अवघी लटकीच याची करणी। आम्हावरी इटाळी घाळूनी। नसतीच उठतो ग॥'–ह ७ २५७ [विटाळ विटाळ अप]

**इटाळें**—विटाळ पहा

**इटी, इटीदांडू**—विटी विटीदांडू पहा

**इटीमिटी टी**—स्त्री (काव्य) दृष्ट लागू नये म्हणून ओंवाळून टाकतात ती (पायाची माती ओंवाळतात किंवा ती कपाळाला लावतात, किंवा मीठमिरच्या ओंवाळून टाकितात) अलायबलाय, इडापिडा, निवलोण 'झणी लागेल बाहेरी। म्हणोनि घेतली इटिमिटी। निंबलोण उगाउठी। करी गारूनी निजभावें॥'–एरुस्व १८ ५१ [का मिडी=दु ख वोटे चालविणें, किंवा, मिरी=हि र्मी, माती ?, मिगी=मीठ ?]

**इटेकरी, इटेवरदार**—पु १ इटा हत्यार धारण करणारा, वापरणारा शिपाई –भाअ १८३ (गो) इटकार [इटा+कर इटा+फा बर्दार=धारण करणारा]

**इटेबंदी**—वीटबंदी पहा

**इठाळ**—स्त्री (राजा) ताक वगैरेस वास, रवाद लागावा म्हणून विटेचा किंवा चापट दगडाचा तुकडा लाल तापवून वर लोणी, गोडेत्या इ॰ घालून ताकात बुडवितात तो दगड किंवा विटकर [इट-वीट पासून]

**इड**—स्त्री एक भूषण, अलंकार, तोरण 'कीं आकाशा इड बांधिली। कापूरकेळीची।'–शिशु ३३३ [स ऋद्धि, प्रा इड्डि, का इडु=ठाणिगा]

**इडकणें, इडकावणें**—अक्रि (व) १ नरम करणें, चेंदा करणें 'असा इडकाऊ मरोस' २ नरमोमुरडणे ३ लाडणें [स ऋद्ध, प्रा इड्ड, का इडु=ठाणिने घालणें]

**इडगट**—न (कर्ना) गुप्त धन [का इडु=ठेवलेलें+गट्ट=गाठोडें]

**इडगळला**—वि (व) घाणेरडा, ओंगळ, ओबडधोबड [इड+गळणें ?]

**इडनिंबू-लिंबू**—इडलिंबू पहा

**इडपाड**—पु नेट, आवेश जोर, श्रम ईडेपाडें पहा [स ईर्षा, म ईर]

**इडरी-ली**—स्त्री (कर्ना) विरडें, उडीद व तांदूळ यांचे पीठ आंबवून त्यांत तिखटमीठ घालून गोल थापट्या करून उकडतात तें खाद्य हें सांदणासारखें असतें 'पूर्ण चंद्राचा अनुकारी। चोखाळ पर्णे मजिज इडरी।' –ऋ ८१ [प्रा इड्डरिया=मिष्टान्न, का इड्डली]

**इडा**—पु नाभिचक्रापासून निघून डाव्या नाकपुडींतून वाहणारी एक नाडी ही योग व स्वर शास्त्रांत प्रसिद्ध आहे हिला चंद्रनाडी म्हणतात पिंगला व सुषुम्ना यांच्या बरोबर इडेचा उल्लेख येतो 'इडा पिंगळा एकवटती।'–ज्ञा ६ २४४ 'इडेनि करावा प्राण पूर्ण।'–एभा १४ ४२० [स]

**इडापिडा**—स्त्री (बायकी) सर्व त्रास, सकटें अरिष्टें, दु खें (ओंवाळताना किंवा दृष्ट काढताना बायका म्हणतात) (क्रि॰जाणें, नाहींशीं, दूर होणें) म्ह॰ १ इडापिडा जाओ बळीचें राज्य हाओ २ इडापिडा टळो, पाप अमगळ पळो 'जीवभावाचें निंबलोण।तुम्हांसी मी करीन आपण। इडापिडा मी घेईन जाण। तो लोणलक्षण मज लागो॥'–एभा १२ ५१७ [पीडा द्वि]

**इंडाळें**—न (व) वाडाच्या चौकटीमधील आडवें लाकूड इंझाळ पहा

**इंडियन**—वि हिंदुस्थानसंबंधीं –पु १ हिंदी माणूस हिंदुस्थानचा रहिवासी २ अमेरिकेंतील मूळ रहिवासी, रेड इंडियन [इ इंडिया=हिंदुस्थान]

**इडी**—विडी पहा

**इडुरी**—स्त्री एक पक्वान, इडरी पहा 'पुर्णे परिपूर्ण पुरिया। समाध गोड गुळवरिया। क्षीरमागरींच्या क्षीरधारिया। इडुरिया सकुमारा।' —एरुस्व १४ ११९ [प्रा इडुरिया=मिठान, का इड्ली]

**इडेंपाडें**—क्रिवि १ आवेशानें, ईर्षेनें २ श्रमानें, कष्टानें 'भाते निशूळ इडें पाडें। घे घे म्हणोनि टाकिती।'—मुमादि ६ ३९ 'परि न पाहेचि देवाकडे। तेणें देवासी परम साकडें। मी आलों येथें इडेंपाडें। तें येणें व्यर्थ केलें।' —स्वादि ३ ३ ३९ [ग ईर्षा, म ईर, ईड द्वि ]

**इणंग**—न (गो) एक ल्हान मासा याला फार काटे असतात

**इणा, इणो**—पु (कु) तंबोरा, विणा 'इण्यानी तार तुटली' [स वीणा अप ]

**इत**—(शाप) अस्लाचा अनाम्ल (बेस) वर परिणाम होऊन जे क्षार बनतात त्याना हा प्रत्यय लावितात (इ) एट उ० सक्किन (सल्फेट), कर्बित (कॉर्बनेट), नत्रित इ० [प्रत्यय]

**इतउपर**—क्रिवि याउपुढें, आतापासून, यथून पुढें, इत पर [ग इत+उपरि ]

**इतका-ला**—वि एवढा, एवढा मोठा (परिमाणाचा, मापाचा, सख्येचा) एवढा पहा 'दर एका चिनमाल इतकाची किंमत थारी लागली' मराठी सहावें पुस्तक (१८७४) १९२ [वैस इयत्तक, स इयत् में नि कनी, ते इते]

**इंतकाल**—पु मृत्यु अतकाल 'महमदअलीखान वालाजाह याचा इतकाल छ २७ मादे रविलावली जाल्याचें वर्तमान आहे' —रा ५ २०३ [स अंतकाल, अर इतिक़ाल्=मृत्यु, गमन]

**इतकावा**—वि या प्रमाणाचा, मर्यादेचा, पायरीचा, अवस्थेचा (प्याचा मार्गिनील, आवृत्तीनील) [इतका]

**इतकासा**—वि अगदीं ल्हान प्रमाणाचा, इवलासा, जरासा, ल्हान, थाडा, (व ना ) इतकुसें [इतका+सा]

**इंतजाम**—पु १ बदोबस्त, व्यवस्था, निकाल 'सर्कारच कामाचा पुरा इतजाम'—नोरा १२९ २ इतमाम पहा [अर इंतिज़ाम्=व्यवस्था ]

**इंतजारी**—स्त्री मार्गप्रतिक्षा, वाट पाहाणें 'त्याना जबाब केव्हा येईल याची इतजारी आहे' —रा ५ १२८ —वि मार्गप्र तीक्षक, उत्सुक 'उत्तराविषयीं लवकर आज्ञा जाली पाहिजे, नबाब फार इतजारी आहेत'—रा ५ १२४ [अर इंतिज़ार्=अपेक्षा, प्रतीक्षा ]

**इतपत**—वि एवढें, या प्रमाणात इतकें [स इयत्परिमित]

**इत पर**—क्रिवि याउपुर्रें, यानतर, अनतर, अन पर [स]

**इतफाक, इत्तफाक**—पु सहविचार, एकविचार, सहमतत्त्व 'याचा बदोबस्त केला तर आम्ही राजश्री पतप्रधान याचे इतफाक करू' —रा १ २६१ 'त्या गोष्टीचा इत्यफाक या शादीचे खुशीचे समारभात पडावा हें फार चागलें' —रा ७ ५१ [अर इत्तिफ़ाक्=ऐक्य]

**इतबार**—पु १ विश्वास, इमान, श्रद्धा, भरवसा 'आता इत बार कोणाचा येत नाहीं' —सभासद २९ २ प्रतिष्ठा, पत, मानपान 'कोणा इतबार याचा धरीं'—सग ११ [अर इअतिबार्=विश्वास श्रद्धा] ॰पण-न श्रद्धाळुपणा, विश्वास, भरवसा, खात्री —रा १५ ३७२

**इतबारात**—स्त्री मानपान, इतबार अर्थ २ पहा 'शिवाय स्वारीखर्च व इतबारात चालती होती' —पेदमसा ११० [अर इतबार्]

**इतबारी**—वि विश्वासु, प्रामाणिक, भरवशाचा, अमीन म्हणे तुम्ही वन्याच्या वन्यावरी। पहिल्यापासूनि आहात इत बारी।' —अफग १५ [अर इअतिबारी]

**इतमाम**—पु लवाजमा, सरजा (दासदासी, पालखी, घोडा, इ०), सरजाम, दर्जाप्रमाणें खाजगी किंवा सरकारी तैनात 'इतमाम ज्याचा त्याला। मराठे मुसलमानाला।' —ऐपो २३० [अर इह्तिमाम्=व्यवस्था, बदोबस्त]

**इतमामी**—वि इतमाम ठेवणारा असणारा, सरजामी, लवाजमेवाला [अर इह्तिमाम्]

**इतमाम्या**—पु व्यवस्थापक, रखवालदार, नोकर 'बाणकरी व इतमामे पुण्याहून रवानगी पाठविले' —खर १ ४३३ [अर इह्तिमाम्]

**इतर**—वि दुसरा अन्य, निराळा, गैर, दुसरा, वेगळा [स] ॰पितर काढणें—(व ) नातलगाहून भिन्न्या वर्गे, मायबहीण घेणें [पितर द्वि ] ॰विशेष-वि उल्लेखिलेले, राहिलेले, अवशिष्ट, किरकोळ (बाबी, गोष्टी)

**इतरणें**—अक्रि १ (व ना ) १ सोडणा, पेश, चाळे, मस्करे करणें, उनाडणे 'अर अगा लालनोस काय?' (हा अर्थ हिंदु स्थानींत आढळतो) २ अदावत गाठी करणें, साणणें, दिघ्यानग करणें 'सावलील तर साम ल्लकर, इतरू नको अगा' [स इतर]

**इतरत्र**—क्रिवि अन्यत्र इतर ठिकाणीं, दुसरीकडे [स ]

**इतरथा**—क्रिवि १ दुसऱ्या प्रकारें, निराळ्या रीतीनें, अन्यथा 'नमता दाशजिन प्रभु करिता सात्म्य का इतरथा तें।' —मोभीष्म ४ २० २ उलटपक्षीं 'बारी शोभे बहु इतरथा भूषणें दूषणें हीं।' —कम २ २९ [स ]

**इतराज**—वि अप्रसन्न, रुष्ट, नाराज 'न जावें अशी सरदार इतराज हाताता' —पाग लिम ग्रथ ११८ [अर इअतिराज=आक्षेप घेणारा ]

**इतिहासणें**—अक्रि ( अर्वाचीन काव्य ) इतिहासात समाविष्ट करणें, अमर करणें 'मराठकुंत्या दे सवि इतिहासाया नाव।' –जननीनक्त ( घेइ आइचें नाव )

**इतिहासशास्त्र**—न अर्वाचीन पद्धतीनें संशोधन, चिकित्सा, पांडित्यपूर्वक इतिहास लिहावयाचें शास्त्र [ स ]

**इतुका-ला**—सना वि ( काव्य ) इतका पहा 'दान इतुलें या मन दीना।' –तुगा ३४४ 'इतुक्याहि दिसात रणीं ज्याचें बहु भय धरूनिया पोर्गीं।' –मोकर्ण ६ ५३ 'हेंहि असो कीं इतुली मातु।' –मुसभा ५ १३१ [ इतका, गो इतुलें ]

**इत्तदाय**—पु आरंभ 'ज्येष्ठमास इत्तदायपासुन तागायत पौषपर्यंतचा मजकूर' –जोरा ५८ [ अर इब्तिदा=आरंभ ]

**इत्तिफाक**—पु १ संमति, कबुली २ मैत्री, स्नेह ३ दैव, योग इत्तिहाद [ अर इत्तिफाक=बरोबरी, मैत्री, सख्य ]

**इत्तिहाद, इत्तेहाद**—पु ऐक्य, मैत्री, दोस्ती 'जसें श्रीमंतानें मनात येणें हें इत्तिहादास चांगलें नाहीं' –रा ५ ३० 'आमची दोस्ती आणि इत्तेहाद पूर्वीपासून जो आहे त्यात खलल न यावा' –रा ५ ३० [ अर इत्तिहाद=ऐक्य, मैत्री ]

**इत्थंभूत**—वि जशी घडली तशी, सविस्तर, तपशीलवार ( गोष्ट, वर्णन, निवेदन, प्रतिपादन, विचार, प्रकार वगैरे ) [ स इत्थम्=असें+भूत=घडलेलें ]

**इत्यर्थ**—पु सारांश, तात्पर्य, सिद्धांतरूप अर्थ 'तरी तूं अन्य यांचें सार। इतुलें जाण' –ज्ञा १८ १४६ –स्व ४३०४ [ स इति+अर्थ ]

**इत्यादि-क**—वि वगैरे, हे व इतर 'तत्त्वांची अभिवृद्धि कशी झाली इत्यादिक गोष्टींचा विचार वास्तविक पाहता आमचा आम्हीच करावयास पाहिजे होता' –टि ४ १२६ [ स इति+आदि,+क ]

**इत्यावर्णे**—क्रि ( व ) सोडचा करणें इतरणें अर्थ १ पहा

**इंतुज**—न ( गो ) लिस्ती लोकाचा शिमगा [ पोर्तु इंतुडो ]

**इत्सा**—स्त्री ( काव्य ) इच्छा ( वस्तु मिळण्याची ) 'ते दत इत्साभोजन। दीप तरी चिंतामणिरत्न। छाय करिती वितित भोजन। कल्पतरूचे।' –कथा २ १२ ५७ [ आदित्सा ( =घेण्याची इच्छा ) –आइत्सा–इत्सा ( राजवाडे ) भाग १८३४, इच्छा–इत्सा ]

**इथचा, इथला, इथपर्यंत, इथपावेतों, इथवर, इथून, इथें**—एमध्ये पहा

**इथरणें**—अक्रि वरिस्त, गैरपुरें वागणें, वखरणें, बिघडणें। बिथरण [ बिथरणें अप ]

**इथिल**—न ( शाप ) एक रासायनिक मूलद्रव्य, सामान्य अल्कहल, इथ व दारूमधील मूलद्रव्य हें नाव आहे ( इ ) एथिल ०अदिद–न एथिल आयोडाईड, हायड्रोआयोडिक इथर, वास मधुर असुन हें वर्णहीन व रसरूप असतें ०अल्कहल–न मद्यार्क हा विलेक फठान सापडतो हा निर्गंध असून याची रुचि तिखट व दाहक असते दिव्यामध्ये ... निर्वात ... ( व ) वेंत उघडा राहिल्यास उडून जातो ०नायित–पु नायट्रिक ईथर, नत्र इथ, याचा वास मधुर असुन ... पाढरी ... उष्ण केल्यास याचा स्फोट होतो

**इथिलीन**—पु ( शाप ) एक वायु हा दगडी कोळशात सापडतो, हा तैलयुक्त, रंगहीन, आणि पारदर्शक असुन सारा मधुर पण ल्सणीसारखा वास येतो [ इ ]

**इथुन**—पु ( शाप ) एक उल्कर्ष ( सनूप्तवर्ग ) ( इ ) इथेन

**इथ्र**—पु ( शाप ) इथक, तेजोवाहक पदार्थ, सूक्ष्मवायु [ इ ईथर ]

**इदगा**—पु ईदच्या प्रार्थनासमारंभाकरिता मुद्दाम तयार केलेली जागा [ फा ईद्+गाह् ]

**इदंता**—स्त्री हें पणा, हें असा निर्देश 'मग इदंतेसि वाळलें।' –ज्ञा १८ २६७ [ स इदम्+ता ]

**इदबार**—पु विश्वास इतबार पहा 'आम्ही दुर देशीं राहाणार, नाहीं इदबार कोणाचा धरीत।' –होला १७७

**इदमपि**—सना वि हें देखील, हेंहि, हें सुद्धा 'इदमपि धन जित ते शकुनि म्हणे दीप्तपावक पडानें।' –मोसभा ४ ५७ [ सं इदम्+अपि ]

**इदमित्थ**—न सर्व कारभार, एकदर सर्व गोष्ट, सगळें ( जाणावयाचें, सांगावयाचें, करावयाचें ) [ स इद+इत्थ ]

**इदला**—वि ( कुण ) इतका इतला पहा

**इदवळा, इदयाळा**—क्रिवि ( कु गो ) यावेळीं, एव्हा, एवढ्या वेळीं [ स इयत्+वेला ]

**इदळ**—न ( गो ) १ पावसाळ्यानंतर पेरण्यात येणारीं धान्यें, रब्बीचें पीक, पाणथळ जमीनींतील्यावयाचें पीक २ पाणथळ जमीन

**इंदलस, इदळसकुटा**—वि ( कु ) भोळसट

**इदारणा, इदारणें**—विदारणा–णें पहा

**इंदिन**—पु ( शाप ) हा एक उल्कर्ष ( हायड्रोकार्बन ) आहे दगडी कोळशाचें भाशिक्षपतन केलें असता त्यात हा सापडतो [ इ इंडिन ]

**इंदिरा**—स्त्री लक्ष्मी, विष्णुपत्नी, कमला 'जें होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें।' – नल९ [ स ] ०वर–पु इंदिरेचा पति, विष्णु [ स इंदिरा+वर ]

**इदी**—स्त्री सणावारीं दिलेली भेट [ फा ईदी ]

**इंदी(दि)वर**—न कमळ, नील कमळ निळ्या कमळीचें फूल 'फाकलिया इंदीवरा। परिवारु नाहीं धतुरा।' –ज्ञा १३ ३६१ [ स ]

घटो १ ४०

**इतराजी**—स्त्री अप्रसन्नता, गैरमर्जी, अवकृपा, नाराजी 'परी पदे सत्ताधीशांची इतराजी व यामुळे गुणाची हानि' —सूत्रपाठ नियम १४४ [अर इअतिराझी=राग, अवकृपा]

**इतरायेल**—वि (गा) वाह्यट, वात्रट 'तो इतरायेल पोऱ्या माथ्या वाटी जातो' [इतरणे]

**इतरेजन**—पुअव काहीं नात्याचा संबंध नसलेले, परके, काहीं हितसंबंध नसलेले 'मिळाले मित्र इतर जना' —तुगा 'म्हणून इतरेजना कांहीं तरी त्यात दोष काढीत राहतातच' —विचारविलास २७० [स इतर+जना हिं इतरना, हिंदू इतर]

**इतरेतर**—सना वि परस्पर, अन्योन्य, एकमेक [स इतर+इतर] —पु (व्या) द्वंद्व समासातील एक भेद (समाहारद्वंद्वाच्या उलट) ज्यातील पदे आणि किंवा व या अव्ययाने जोडलेलीं असून तें अव्यय अध्याहृत असतें तो इतरेतरद्वंद्वसमास उ० हरिहर आईबाप, इ० [स]

**इतलतिनल**—वि (गो) चंचल, परमोड वृत्तीचा, लहरी —क्रिवि लहरीपणानें, धरसोडीनें, चंचलपणें (क्रि० करणें, बोलणें, चालणें, लागणें, मांडणें) [कुण इतलें=इतकें+तितलें=तितकें, हिं इधरतिधर]

**इतल्सार**—पु घोडयाच्या [illegible] असतो किंवा पट्ट्याप्रमाणे अंगावरील एक वाईट भोंवरा, हा [illegible] परंतु तरहा एक घोड्याची खोड मानतात

**इतला-इतलां**—वि सना (गा वों) इतका 'इतला मधार क्याइल उनारे?' =इतक्यामध्ये पाणीकडून आलास रे [इतका]

**इतलाख, इतलाख नेमणूक**—स्त्री सरकारी तिजोरीतून किंवा कोठारातून मिळणारी रोखिक नेमणूक, इनाम 'पाचशें रुपये यांचा गाव व पाचशें रुपये इतलाख' —वाडसमा १ ३६ [अर इत्लाक्=स्वातंत्र्य]

**इतलाख-खी**—वि कधीं इतलाक-खी १ स्वतंत्र, निराळा, मोकळा २ पगारी (गैरसरंजामी फौजेला योजितात, किंवा एका नोकर दुसऱ्या खात्यात काम करीत असला किंवा जादा नोकर नेमला असता म्हणूनहि हा शब्द योजतात जसें-इत लाखी फौज, नोकर वगैरे) सात हजार फौज इतलाख रोजमऱ्या वर ठेवावी' —ख ८ ४३२३ [अर इत्लाक्=स्वातंत्र्य]

**इतलाखी**—स्त्री सख्य, मैत्री 'रियासतींत मोठी गोष्ट की वचनाची कायमी, त्यात तलवुन मिजाजी (लहरीपणा) झाल्यास व इतलाखी बातल होऊ लागल्यास लाचार' —ख ७ ३५७४ [अर इत्लाक्]

**इतला**—पुस्त्री १ संबंध हित, लक्ष, गुंता लोभ 'हस्तन्दा करोन त्याचे (शिंद्यांचे) परिधानुन आपले पेठेंत येऊन राहिलें, त्यांचा इतला आम्हाकडे नाहीं' —ख १० ५६०६ २ वार्ता, खबर, बातमी (विशेषतः गुप्त राजकारण विषयी) (क्रि० करणें, देणें, सांगणें, लिहिणें) [अर इत्तिलाअ=ज्ञान, समज]

**इतलेपत्रक-रपोर्ट**—नपु सरकारी कामगाराचा लेखी अहवाल, वार्तापत्र, (सामा) बातमीपत्र, अहवाल [अर इत्तिलाअ+पत्रक, इं रिपोर्ट]

**इतसा**—वि इतका, इतक्या पहा

**इतवार**—पु (हिं) आदितवार, रविवार [स आदित्य+स वार]

**इतस्तत**—क्रिवि इकडेतिकडे, इकडूनतिकडून, अस्ताव्यस्त अनिश्चितपणें 'मी इतस्तत दिवसभर भटकलों' [स]

**इंताजी**—वि (व) मिजासखोर, फारनाजूक, चवचाळ, जोरदार 'त्याला कांवाचा भाग नाहीं चालत, असा इंताजी आहे' [अर इंतिझाम्=व्यवस्था]

**इति**—अ १ (या)प्रमाणें, असें, अशा तऱ्हेनें इत्यादि शब्द प्रमाणें सारखेपणा किंवा एकमेत दाखविणारें [illegible] शेवट [illegible] २ अखेर [illegible] इतिश्री पहा [स] ०कर्तव्यता-क्रिया-स्त्री १ पद्धत, मार्ग, रीत (एखादी गोष्ट करण्याची), कार्यक्रम, सुरुवातीपासून शेवट पर्यंत क्रमानें अनुष्ठान जीत आहे असें कार्य २ कर्तव्य, करणीय यामुळें करावयाची कामगिरी ३ कर्तव्याची समाप्ति अखेरी ०वृत्ति-स्त्री (अर्वाचीन) शिष्टसंमत आचार, वागण्याची पद्धत, (इं) एटिकेट (गोविंदाग्रजानें हा शब्द रूढ केला) ०श्री-स्त्री १ शेवट समाप्ति इतिश्री असे शब्द पुराणांतील अध्यायांच्या शेवटीं ('इतिश्रीस्कंदपुराणे रेवाखंडे ) देतात त्यावरून' 'सकळी इतिश्री करावी।' —दा १९ १ १९ (क्रि० करणें, होणें) २ (ल) अखेर, मृत्यु 'तू आज कबूल झाला असतास म्हणजे धारभाईची इतिश्रीच होती' —इप ४३ ०वृत्त-न अहवाल, हकीकत, इतिहास, रिपोर्ट

**इति-ती**—पु (रामदासी वाङ्मय) यति 'इति महानुभाव गाइत्री पूजन।' —दा ४ ५ ४ 'ज्याचे गृहीं इति जेविला। तेथें स्वयें परमात्मा तृप्त जाला। इति आणि परमात्मयाला। वेगळिक नसे सर्वथा।' —स्वादि ८ २ ८७ 'इती भीडती भाडती दीर्घ देवें।' —दावि ३९४ [स यति]

**इतिमासांव**—न (गो) सुचना, बोलावणें, नोटीस [पो इतिमासाव, इं इंटिमेशन]

**इतिला**—वि इतका, इतला पहा 'इतिला निश्चयो करुनि।' —गीला २ २२०८

**इतिहास**—पु १ प्राचीन काळीं घडलेल्या हकीकतीचें लेखी किंवा परंपरेनें आलेलें वर्णन, जुनी कथा, शब्दप्रमाणाचा प्रतिशब्द म्हणून हा शब्द योजतात २ (सामा) एखाद्या गोष्टीची साग्र माहिती, इत्थंभूत हकीकत वृत्तांत, कथा [स इति+ह+आस=असें झालें होतें]

**इतिहासणें**—सक्रि (अर्वाचीन काव्य) इतिहासात समाविष्ट करणें, अमर करणें 'मराठकर्तृत्वा दे सधि इतिहासाया नाव।' –ननकी ननक न (घेड आइचें नाव)

**इतिहासशास्त्र**—न अर्वाचीन पद्धतीनें संशोधन, चिकित्सा, पांडित्यपूर्वक इतिहास लिहावयाचें शास्त्र [इं]

**इतुका-ला**—सना वि (काव्य) इतका पहा 'दान इतुलें या मन दीना।' –तुगा ३४४ 'इतुक्याहि दिसात रणीं ज्याचें बहु भय धर्मनिया पोटीं।' –मोकर्ण ६ ५३ 'हेंहि असो कीं इतुली मातु।' –मुसभा ५ १३१ [इतरा, गो इतुलें]

**इत्तदाय**—पु आरंभ 'ज्येष्ठमास इत्तदायपासुन तागायत पौषपर्यंतचा मजकूर' –जोरा ५८ [अर इब्तिदा=आरंभ]

**इत्तिफाक**—पु १ संगति, कबुली २ मैत्री, स्नेह ३ दैवयोग इत्तिहाद [अर इत्तिफाक=बरोबरी, मैत्री, सख्य]

**इत्तिहाद, इत्तेहाद**—पु ऐक्य, मैत्री, दोस्ती 'असें थीम ताचें मनास येणें हें इत्तिहादास चांगलें नाहीं' –रा ५ ३० 'आमची दोस्ती आणि इत्तेहाद पूर्वीपासुन जो आहे त्यात खलल न यावा' –रा ५ ३० [अर इत्तिहाद्=ऐक्य, मैत्री]

**इत्थंभूत**—वि जशी घडली तशी, सविस्तर, तपशीलवार (गोष्ट, वर्णन, निवेदन, प्रतिपादन, विचार, प्रकार वगैरे) [स इत्थम=असें+भूत=घडलेलें]

**इत्यर्थ**—पु सारांश, तात्पर्य, सिद्धांतरूप अर्थ 'तरी तूं ज्य यांचें सार। इतुलें जाण' –ज्ञा १८ १४६ –ख ४३०४ [स इति+अर्थ]

**इत्यादि-क**—वि वगैरे, ह व इतर. 'तत्त्वांची अभिवृद्धि कशी झाली इत्यादिक गोष्टींचा विचार वास्तविक पाहता आमचा आम्हीच करावयास पाहिजे होता' –टि ४ १२६ [स इति+आदि,+क]

**इत्रानणें**—क्रि (व) खोडपा करणें इतरणें अर्थ १ पहा

**इंत्रुज**—न (गो) ख्रिस्ती लोकांचा शिमगा [पोर्तु इन्त्रुडो]

**इत्सा**—स्त्री (काव्य) इच्छा (वस्तु मिळण्याची) 'ते दत्त इत्साभोजन। दीप तरी चिंतामणिरत्न। छाय करिती चिंतित भोजन। कल्पवृक्षे।' –कथा २ १२ ५७ [आदित्सा (=घेण्याची इच्छा)–आद्त्सा–इत्सा (राजवाडे) भाअ १८३४, इच्छा–इत्सा]

**इथचा, इथला, इथपर्यंत इथपावेतों, इथवर, इथून, इथें**—एथ-मध्यें पहा

**इथरणें**—अक्रि वदिस्त गेरुपें पाडणें, सरकणें, विपडणें। विथरणें [वियरणें अप]

**इथिल**—न (शाप) एक रासायनिक मूलद्रव्य, सामान्य अल्क हर, इतर व दार्वस्ल यांतील मूलद्रव्य हें नाव आहे (इ) एथिल °अदिद–न एथिल आसोशाईड, हायड्रोऑक्सि इथर, वास मधुर हानी १ ४० वास असुन हें वर्णहीन व रसरूप असतें. °अल्कहल–न मद्याकें हा कित्येक फळात सापडतो हा रंगीत असुन आर्मपुलिकट व दाहक अशी रुचि असते दिव्याच्या सान्निध्यात परतो. व हवेंत उघडा राहिल्यास उडुन जातो °तौत्रित–पु नायट्रिक इथर, तेल द्रव, याचा वास मधुर असुन स्नोप पाटरी असते, उष्ण केला असता याचा स्फोट होतो

**इथिलीन**—पु (शाप) एक वायु हा दगडी कोळशात सापडतो, हा तैल्युक्त, रंगहीन, आणि पारदर्शक असुन त्यास मधुर पण लसणीसारखा वास येतो [इ]

**इथुन**—पु (शाप) एक उल्कर्न (सन्तृप्तवर्ग) (इ) इथेन

**इथ्र**—पु (शाप) इथर, तेजोवाहक पदार्थ, सूक्ष्मवायु [इ ईथर]

**इदगा**—पु ईदच्या प्रार्थनासमारंभाकरिता मुद्दाम तयार केलेली जागा [फा ईद्+गाह]

**इदंता**—स्त्री हें पण, हें असा निर्देश 'मग इदंतेसि वाल्लें।' –ज्ञा १५ २६७ [स इदम्+ता]

**इदबार**—पु विश्वास इतबार पहा 'आम्ही दुर देशी राहाणार, नाहीं इदबार कोणाचा धरीत।' –होला १७७

**इदमपि**—सना वि हें देखील, हेंहि, हें सुद्धा 'इदमपि धन जिन ते दाउनि म्हणे दीप्तपावक पगानें।' –मोसभा ४५५ [सं इदम्+अपि]

**इदमित्थ**—न सर्व कारभार, एकदर सर्व गोष्ट, सगळें (जाणावयाचें, सांगावयाचें, करावयाचें) [स इद+इत्थ]

**इदला**—वि (कुग) इतका इतला पहा

**इदयळा, इदयाळा**—क्रिवि (कु गो) यावेळीं, एव्हां, एवढ्या वेळीं [ग इयत्+वेला]

**इदळ**—न (गो) १ पावसाळ्यानंतर पेरण्यात येणारीं धान्यें, रब्बीचें पीक, पाणथळ जमीनींत घ्यावयाचें पीक २ पाणथळ जमीन

**इंदळस, इदळसकुटा**—वि (कु) मोळसट

**इदारणा, इदारणें**—विदारणा-णें पहा

**इंदिन**—पु (शाप) हा एक उल्कर्न (हायड्रोकार्बन) आहे दगडी कोळशाचें आंशिकपातन केलें असता त्यात हा सापडतो [इ इंडिन]

**इंदिरा**—स्त्री लक्ष्मी विष्णुपत्नी; कमळा 'जें होय मदिरहि सुंदर इंदिरेचें।' – नल९ [स] °वर–पु इंदिरेचा पति, विष्णु [स इंदिरा+वर]

**इदी**—स्त्री सणावारीं दिलेली भेट [फा ईदी]

**इंदी(दि)वर**—न कमळ, नीळ कमळ, निळ्या कमळाचें फूल. 'फाकलिया इंदीवरा। परिवार नाहीं भ्रमरा।' –ज्ञा १३ ३६१ [स]

इंदु—पु चंद्र 'जो मम नयनचकोरा इंदू' –संगीत राम राज्यवियोग ५७ (समासाच्या शेवटीं) जसें–मुखेंदु पूर्णेंदु [स]
०वार-वासर–पु सोमवार

इंदुरी—वि इंदुर शहरासंबधी (पागोटें, वस्त्र, शुक्र १०)

इंदुवदना—वि १ चंद्राप्रमाणें जिचें मुख आहे अशी (स्त्री) २ (ल) सुंदर, रूपवती स्त्री, तरुणी, कुमारी ३ एक समवृत्त अक्षरें १४, गण भजसनगग, उ० कायचरि बाळकरि नीलमल चिर्ती। ज्याल जरि बाळभरि वैमुनि शिवार्ती। भाळशिरि बाळशशिमंडण भवारे। साव शिव साव शिव साव शिव गारे ॥' –निमा (सांबशिवाष्टक) १ [स इंदु+वदन]

इद्दत—स्त्री (मुसलमानी कायदा) घटस्फोटानंतर तीन महि न्याची मुदत 'ज्या स्त्रीचा नवरा नुकताच मयत झालेला असेल किंवा ज्या स्त्रीला तिच्या पहिल्या नवऱ्यानें काडी मोडून दिली असेल अशा स्त्रीच्या इद्दतीच्या मुदतींत तिच्याशीं लग्न लावलें तर तें फासीद आहे परंतु रद्दबातल नाहीं' –घरचा कायदा ७३ [अर इद्दत]

इंद्र—पु १ देवाचा राजा, स्वर्गलोकचा व पूर्व दिशेचा अधि पति, मेघ, पाऊस याची ही अधिष्ठात्री देवता म्हणून फार प्राचीन काळापासून मानतात 'तिया वाखाणिजे अमरेंद्र। कृष्ण इंद्राचाहि इंद्र।' –एरुस्व १ ७८ २ (समुदायामध्यें) राजा, श्रेष्ठ, वरिष्ठ व्यक्ति, नायक मुख्य, पुढारी सामाशब्द–नृपेंद्र खगेंद्र, विप्रेंद्र, फणींद्र पक्षींद्र ३ गोसावी, संन्यासी, याच्यातील एक पंथ, या पंथातील व्यक्ति ४ (सामा) राजा [स] म्ह० इंद्रायतक्षकाय स्वाहा–(जनमेजयानें सर्पसत्र केलें त्यात सर्व सर्पकुलें अग्निकुंडात पडलीं, परंतु तक्षक इंद्राच्या पाशीं दडला तेव्हा जनमेजयानें 'इंद्रायतक्षकायस्वाहा असा मंत्र म्हणून आहुति देताच इंद्रासह तक्षक आकर्षिला जाऊं लागला या कथेवरून)–एखाद्यानें शत्रूला चुकवि ण्याकरिता दुसऱ्याचा आश्रय केला असता शत्रु प्रबल असल्यास त्या आश्रयदात्यासह आश्रिताची उचलबांगडी होणें या अर्थी ही म्हण योजितात 'जॉन्सनसारख्या रसिकाशीं ज्यास कवित्वसिंहासना वर आरूढ करून सर्वांच्या अभिनंदनास पात्र करून ठेविलें होतें त्यास मेकॉलेप्रभृति अर्वाचीन निबंधकारांनीं पदच्युत करून 'इंद्राय तक्षकायस्वाहा' या न्यायानें जॉन्सनप्रभृति मोचेलवाल्यासहि त्या बरोबरच खालीं ओढलें' –नि ८७६ [स]

इंद्रकट—न (को) आढयापासून पाख्यापर्यंतचे खालीं अस लेले वासे टेकून राहण्यासाठीं तुळयाच्या टोकावर आडवें लाकूड बस विलेलें असतें तें भिंतींत बसविलेलें वहाराच्या खालचें आडवें लाकूड [स इंद्र+काष्ठ]

इंद्रकल्याणी—वि (माण) विद्रूप, विद्रूप स्वरूपाचा [इंद्रा विद्रा+कल्याणी]

इंद्रकापशी—स्त्री कापसाच्या झाडाची एकजात देवकापशी [स इंद्र+कार्पास]

इंद्रकीट, इंद्रगोप—पु एक प्रकारचा पावसाळी तांबडा (कधीं पांढरा) किडा, कुकवाचा किडा, सोमकिडा, मृगनक्षत्रात हा उत्पन्न होत असून याच्या पाठीवर राहा ठिपके असतात 'इंद्रगोप धुनले पाउसें। पद्मरागीं जडल्व असे।' –ऋ ८६ [स]

इंद्रकील—पु १ मंदराचलपर्वत, २ घोटयाचा सांधा, घोटयाची खीळ [स इंद्र+कील]

इंद्रगळ—न १ पायाच्या घोटयाचा भाग, घेर्नें पुढील श्लोक म्हणतात 'इंद्रगळच धोतर'=गुडघ्यापर्यंत धोतर, पचा २ गुराच्या टाचेवर (खुरावर) मागील बाजूस जो वाढलेला मांसल भाग असतो तो, पायाचा एक भाग [इंद्र+गळ]

इंद्रचाप–धनु–धनुष्य—न आकाशात पावसाच्या तुषारा वर पडणाऱ्या सूर्यकिरणाच्या योगानें दिसणारी धनुष्याकृति याचा आकार अर्धवर्तुळाकार असून वर्तुळाचा मध्यबिंदु पाहणारा मनुष्य आणि सूर्य यास जोडणाऱ्या रेषेवर असतो या धनुष्यात तांबडा, नारिंगी, पिंवळा, हिरवा, निळा, पारवा व जांभळा असे सात रंग असतात प्रकाशकिरणाचें वक्रीभवन व परावर्तन याच्या योगानें इंद्र धनुष्य पडतें [स]

इंद्रजव—पु इंद्रजीज, कुडयाचें बीं [स इंद्र+यव, हिं इंदर्जौ, गु इंदरजव]

इंद्रजाल—न मंत्रविद्या, जादुगिरी, जादूटोणा, गौंडगाल, भानामती, हातचलाखी, माया 'हें सर्व इंद्रजालच माझ्या दृष्टीस पडत आहे' –कम १ [स इंद्र+जाल=जाळें]

इंद्रज्योत—इंद्रव पहा

इंद्रधनुष्य—इंद्रचाप पहा 'नाना रंगीं गजबजे। जैसें इंद्रधनुष्य देखिजे।' –ज्ञा १५ २४० 'तेही क्षणिक जैसी रेख। व्योमीं इंद्रधनुष्याची।' –मुरुशु २७५

इंद्रध्वज—पु पाडव्याच्या दिवशीं उभारतात ती गुढी गुढी पहा [स इंद्र+ध्वज=निशाण]

इंद्रनील–ळ—पु एक रत्न, उंची नीळ 'पिवळून इंद्रनीळ किळी। चोतली कृष्णतनू सावळी। पाउलें सुकुमार कोंवळीं। घोटीं निळीं दोहीं भागीं।' –एरुस्व १ २३ [स]

इंद्रफणी—पु १ इंद्रजाल विद्येनें दोरीचा दिसणारा साप –मनको २ इंद्र व शेष ३ मांजर व सर्प 'दोघां ऐसीं तीन चालती। अवगुणी अघधा प्रकृती। अघोर्धे साहून वर्तती। इंद्रफणी ऐसीं।' –दा १५ ५ १ [स इंद्र+फणि]

इंद्रबाही—स्त्री दरवाज्याच्या फळीचे दोन बाजूचे दोन व एक मधील असे उभे तुकडे [स इंद्र+बाहु]

इंद्रभुवन—न १ इंद्राचा राजवाडा, इंद्रलोक २ (ल) अत्यु त्कृष्ट व टोलेजंग राजवाडा [स इंद्र+भुवन]

इंद्रमर्डे–र्डें—न अगदीं कृश, अशक्त, रोड, मच्छारसा मनुष्य [स इंद्र+मर्दै]

इंद्रलोक—पु स्वर्गातील इंद्राची निवास भूमी, ज्या प्रदेशात इंद्र रहातो तो स्वर्गाचा भाग [स इंद्र+लोक]

**इंद्रवज्रा**—स्त्री एक समवृत्त, याच्या प्रत्येक चरणात ११ अक्षरें येत असुन प्रत्येक चरणात त त ज ग ग असे गण येतात उ० 'का टाकिलें शस्त्र रणात तेणें।' –वणीसहार [ स इंद्र+वज्र ]

**इंद्रवंशा**—स्त्री एक समवृत्त प्रत्येक चरणात १२ अक्षरें येत असुन त त ज र असे गण येतात उ० गोपी हरीच्या भजनात रगल्या [ स इंद्र+वंश ]

**इंद्रवारुणी**—स्त्री कडूवडळ, कडुवृंदावन, इंद्रावण [स इंद्र+वारुणी ]

**इंद्रवारुण-वरुण**—न इंद्रवारुणीचें फळ, कडुवृंदावन इंद्रावण पहा 'अतर कडू वरी वरी दावी सुदर। इंद्रवारुणफळ जैसें।' [ स ]

**इंद्रसभा**—स्त्री १ इंद्राची सभा २ ( ल ) जेवणाला टाळा ( विशेषत रात्रीच्या ) 'तुम्ही पडला पक्के कोंकणस्थ, पराच पुष्टि वर्धनं, लागलीच रात्रीची इंद्रसभा' –दारादे १०७ [ स ]

**इंद्राचीरंभा**—स्त्री इंद्राच्या सभेंतील अप्सरामध्यें रभा अति सुदर, यावरून ल सुदर स्त्रीस म्हणतात 'पैसा मिळाला की इंद्राची रभा देखील आणून देईन' –मोर २० [ स इंद्र, रभा ]

**इंद्राठी**—स्त्री ( कों ) इंद्रकद पहा

**इंद्राणी**—स्त्री १ इंद्राची स्त्री, शची म्ह० इंद्र फिरतो ( बदलतो ) पण इंद्राणी फिरत नाहीं =इंद्रपदावर कोणीहि आला तरी त्याची बायको इंद्राणी ही एकच, यावरून २ निर्गुडी ३ इंद्र वत्री किंवा कडु कवडळी ( इंद्रवारुणी ) ४ वेलदोडयाचें झुडुप [ स ]

**इंद्रायण**—न कडुवृंदावन, कवडळ-ळ [ स इंद्र+वारुण ]

**इंद्रायणी**—१ इंद्राची स्त्री इंद्राणी पहा 'इंद्रास इंद्रायणी कृष्णास हो रुक्मिणी।' –वसा १५ २ एक नदी ही पुणें जिल्ह्यात असुन हिच्या काठीं प्रसिद्ध आळंदी क्षेत्र आहे [ इंद्राणी अप ]

**इंद्रायुध**—इंद्रचाप पहा [ स ]

**इंद्रावण-न**—न वृंदावन कडु कवडळ हें फळ दिसण्यात सुदर पण खाण्यास कडु असतें यावरून सुदर पण निरुपयोगी, बाहेरून छान पण आतून क्रूर असा माणगाम म्हणतात 'तें इंद्रावण पाणी न सेवी। अतरस्वभावीं अति गर्विष्ठ।' –एभा ३ ३९० 'वचनागाचे झाडीं विष काण घाली। इंद्रावनातळीं,कडूपण।' –व ११९ 'अहो आम्याचें केलें गोडपण। जैसें तें प्रत्यक्ष इंद्रावण। तरि हें काय भूषण दूषण। आम्यागीं कीं आपगार्गी॥' –स्वादि १२ ३ १०७ [ स इंद्र+वारुण ]

**इंद्रावणी**—स्त्री कडु वृंदावन, ही वेल असुन हिचीं पानें वल्लिकाच्या वेलीसारखीं पण त्यापेक्षा थोडीं बारीक असतात पिकलेल्या फळाचा रग पिवळा असता नाहें आम्याएवढें फळ येतें त्यास घोडइंद्रावण म्हणतात, दुसऱ्या जातीचें फळ लिंबाएवढें असतें. हें तीव्र रेचक आहे सर्पदशावर इंद्रावणीचें मूळ किंवा खाण्यास देतात 'मग राजमा जिया किया। तया इंद्रावणी पिकलिया। जे मुखें चितारूनिया। फळती दुःखें॥' –ज्ञा १४ २६२ इंद्रावणीचें फळ=सुदर पण निरुपयोगी माणूस, पदार्थ इ० [ स इंद्रवारुणी ]

**इंद्राक्ष**—पु १ घोड्याचें एक लक्षण ज्याच्या दोन्ही गंड स्थळीं भोंवरे आहेत असा घोडा –अश्वप २५ २ ज्यास कर्णमूळाचे ठिकाणीं एक व उरावर एक असे दोन भोंवरे असतात त्यासही इंद्राक्ष म्हणतात –अश्वप ८८ [ सं इंद्र+अक्षन् ]

**इंद्रिय**—न १ ज्ञानाचें किंवा कर्माचें साधन जो शरीराचा भाग तो इंद्रियें ११ आहेत –(अ) पचज्ञानेंद्रियें–डोळे, कान, नाक, रसना व त्वचा हीं अनुक्रमें रूप, शब्द, गंध, रस व स्पर्श याचें ज्ञान करून देतात (आ) पाच कर्मेंद्रियें–पाय, हात, मलद्वार, मूत्रद्वार व जिव्हा हीं अनुक्रमें गति, देणेंघेणें, मलोत्सर्ग, मूत्रत्याग व बोलणें हीं कामें करतात व (इ) मन–हें सकल्पविकल्प करतें 'अवघाही इंद्रियवृत्ती। वेशा लागती भगवद्भक्ती।' –एभा २ २९३ पचज्ञानेंद्रियें व पच कर्मेंद्रियें याखेरीज पुढील चार अतरिंद्रियें आहेत–मन, बुद्धि, चित्त आणि अहकार ( सामा ) इंद्रिय म्हणजे बाह्य वस्तू जाणण्याची साधनशक्ति, आरभीं इंद्रिय शब्द येऊन होणारे सामासिक शब्द–इंद्रियदमन, इंद्रियनिग्रह, इंद्रियनियमन, इंद्रियगोचर, इंद्रियविषय, इंद्रियवश, इंद्रियाधीन, इंद्रियजेता, इंद्रियनियामक, इंद्रियनिग्रही, इंद्रियतर्पण २ पुरुषाचें जननेंद्रिय, लिंग [ स ] **इंद्रिय हातीं धरणें**–चार कर्माचें अतिशय व्यसन असणें, अति विषयासक्त असणें **०गम्य**–वि इंद्रियाना आकलन होणारें–कळणारें, इंद्रियगोचर **–यागम्य**–वि इंद्रियाना आकलन न होणारें, इंद्रियागोचर, इंद्रियातीत **०ग्राम**–पु १ इंद्रियसमूह, सर्व इंद्रियें २ इंद्रियाचें स्थान शरीर, देह **०जुलाब**–पु १ मूत्ररेच मूत्रपाळ, मूत्राधिक्य होण्याचें औषध २ बहुमूत्र, मूत्रवृद्धि **०दमन**–१ इंद्रियाना कह्यात, स्वाधीन ठेवणें २ विषयाकडे इंद्रियाचा ओढा नाहींसा करण्याचा योगसाधनादि उपाय **०विज्ञानशास्त्र**–न इंद्रियाच्या रचनेची, व्यापाराची माहिती देणारें शास्त्र ( इ ) फिजिऑलॉजी

**इंद्रियार्थ**—पु इंद्रियाचा विषय ( रूप, रस, गंध यापैकी ), विषय 'जा या इंद्रियार्थी। नागवचि।' –ज्ञा २ १७४ [ स ]

**इंद्रियीकरण**—न ( जीवशास्त्र ) इंद्रियरचना, इंद्रियविशिष्टता ( इ ) ऑर्गनिझेशन

**इंद्रुसयारी**—स्त्री ( नाविक ) गलबतावरील डोलकाठी वर शीड उभारण्याची दोरी, दागी

**इंद्राटो**—वि ( गा ) नाश करणारा दुष्ट [ स विध्वंस, स विध्वस्त ]

**इंद्रांस**—पु ( व ) नाश, विध्वंस 'चाकूचा इंद्रांस केला' [ स विध्वंस ]

**इंधक**—पु ( पदार्थ ) इंध, ( इं ) ईथर

**इंधन**—न १ ( व सा ) सर्पण, जळण, जाळावयाची लाकडें, वेतण 'जरि अमृत घालु आंधणा। कापुर मेळउ इंधना।' –क ५१ 'जेवीं इंधनीं वाढे हुताश।'–एभा १५ ७७ शुद्ध हें जेवितां निवे मन। अल्प त्या इंधन शुद्ध लागे।'–तुगा २६२ [ स ]

**इधर**—क्रिवि ( हिं ) इकडे, येथें ॰तिधर–क्रिवि तुरळा तुरळींचें, उडवाउडवीचें (भाषण), खाळतर ननगारें (भाषण) ( क्रि० करणें, माडणें, लावणें ) [ इधर हिं ]

**इंधा**—पु ( व ) स्त्री बाळंत झाल्यानंतर अस्पर्श होण्यापूर्वीच गर्भधारणा होऊन झालेला मुलगा

**इंधा**—पु ( व ) चुलीसाठीं तीन धोंड मांडतात त्यांतील प्रत्येक [ इंधन ]

**इध्मा**—पु विवक्षितसंख्याक समिधांचा समूह, श्रौतस्मार्त यागांत उंबर, पळस इत्यादि वृक्षांच्या सामान्यतः पधरा समिधांचा इध्मा उपयोगांत आणतात इध्मांतील समिधांची लांबी वीतभर किंवा हातभर असते इध्म किंवा इध्मा नामक समिधांचा याग मुख्य यागापूर्वी करावयाचा असतो [ स ]

**इनइन**—स्त्री ( व ) किरकीर, घासाघासी 'मोठी इनइन करतो' ( क्रि० करणें ) [ ध्व ]

**इनई**—स्त्री ( व ) एक रोग यांत हाताला ठणका लागून सुया बोंचल्यासारख्या वेदना होतात [ ध्व इनइन ]

**इनमीनतीन**—ईनमीनतीन पहा

**इनसान**—पु माणूस मनुष्य 'हुजूर काय सांगू! तो इन सान नव्हे केवळ सैतानाची औलाद आहे' –इलामुदरी ( मकरंद माला ) २० १७९ [ अर इन्सान=मनुष्य ]

**इनसाफ**—पु १ न्याय, निर्णय 'रीतभात इनसाफ लवण नाहीं दुधांत कालविलें –ऐपो ३०५ २ ( कायदा ) कोर्टांत फिर्यादी–आरोपीसमक्ष पुरावा घेऊन न्याय देण्याचें काम ३ वरिष्ठ अधिकाऱ्यावरविरुद्ध कोर्टांत आरोप ठेवून खटला भरणें ( इं ) इंपीचमेंट 'त्या वेळेस त्यास कायदेमंडळाच्या मताप्रमाणें वागण्यास भाग पाडण्याकरितां दुसरा कोणताहि उपाय नसल्यामुळें, इंपीचमेंट ( इन्साफ ) या प्रखर शस्त्राचा उपयोग करावा लागला' –वस्व ५० [ अर इन्साफ्=न्याय निर्णय ]

**इनाई**—स्त्री ( व ) महाराची देवी

**इनॉक्युलेशन**—न १ रोगप्रतिबंधक लस टोचून अंगांत ( सामा ) टोचणें द्रवीकाढणें २ प्लेग वगैरे होऊ नये लस टोचणें 'इनॉक्युलेशन हा एक तोडगा आहे आल्यास थोडाबहुत गुण येईल' –टि २ १३५ [ इं ] – ( ज्यो ) ( कोणत्याही ) ग्रहाचें सूर्यापासून अंतर, व ग्रह यांमधील अंतर [ स इन=सूर्य+अपगम=मार्गे जाणें ]

**इनाम**—न १ कोणत्याहि अटीशिवाय शाश्वत, वंशपरंपरेची म्यांवर अशी देणगी, वृत्ति इनामांत पुढील प्रकार आहेत –वतनी ( सनदी ) व गांवनिसबत यांतील गैरउपयोगी ( न्हावी, सुतार, चांभार चौगुला, कोळ्या, माग, कुंभार, पोतदार, महाजन, कुडकुडे जोशी इ० ) व उपयोगी ( उपाध्याय, गुरव, गावज्योतिषी, जंगम, काजी, मुलाणा, मुजावर इ० ), परगणे वतनदार ( देशमुख, देशपांडे, देश कुलकर्णी, नाडगौडा, नाडकर्णी, सरदेसाई सरदेशपांडे, सरदेशमुख, सरपाटील, निरखीदार दप्तगत, पाटपांड, दसाई ), गांवनौकर ( पाटील, कुलकर्णी, मतादार, माधवी, महार, तराळ, वळीकर इ० ), क्षेत्रोपाध्य गांवनिसबत ( पायोडी, देवस्थान, हाडोळी, मानळी, धर्मादाय, देणगी, वतनदारी इ० ) सनदी म्हणजे सरकारी करा पासून मुक्त व कायमचें दिल्याबद्दल सनद मिळते तें शरावती दुमाला म्हणजे गावांतील उत्पन्नांतून गावकामगाराचा खर्च वजा जाता बाकी राहणाऱ्या उत्पन्नांत सरकारची हिस्सेरसी असते ती. शिवाय अग्रहार, भाकरी, चोळीबांगडी, देवस्थान, कदीम जदीद, जात, जुडी, कोल्हाटी, मज्कीवी, राजकीय, साधणूक, शेतसनदी, योगक्षेम, इजाफत, नौकरी, वतनीवजीफा, आल्तमघा, इ० इ० ऐन इनामतीमध्यें ब्राह्मणांची अग्रहारें व बादशहाचे पीर आणि थडगीं, मशिदी आणि देवस्थानें, फकीर इनाम, मोईन, काजी–मुलाणा, फकीर–तपस्वी, अच्छन वगैरे बाबी येत –भाम १८३३ १३८ २ देव, ब्राह्मण वगैरेंना दिलेली भूमि वगैरे ३ मालकी हक्क न देता दर्जे, घेणें, खाणें सोडणें 'हा माड यानें इनाम खाल्ला' 'आम्ही गाईचें दूध वाटीत नाहीं, वासरें इनाम पितात' ४ ( सामा ) कोणतेंहि बक्षीस, नजर, देणगी [ अर इन्आम ] ॰इकाम–पु भेट, देणगी, बक्षीस, वृत्ति –वाडमभा २ १९६ [ अर ] ॰इजाफत–न देणगी वाढवून देणें, देणगीची वाढ, इनामांत घातलेली भर ( काहीं कामगिरी केल्याचा मोबदला म्हणून वाटवून दिलेले इनाम ) ॰इजाफतदार–वि इनाम इजाफत मिळालेला, वाढलेले इनाम उपभोगणारा ॰चिटणावळ–स्त्री इनामावरील सरकारी बाब किंवा कर [ हिं ] ॰चिट्ठी–पु १ वेगवेगळ्या इनामांची यादी तपशील ( जिल्ह्यातील किंवा तालुक्यातील ) २ इनामपत्र, इनामपट्टा इनामखत ॰चौकशी—स्त्री इनामपाहणी पहा ॰चौथाई–स्त्री इनामाचा चौथा हिस्सा ( सरकारांत भरणा करावयाचा ) ॰जमीन–स्त्री एखाद्या मोठ्या कामगिरीबद्दल सरकारातून बक्षीस मिळालेली सारामाफीची जमीन ॰तिजाई–स्त्री १ इनाम जमिनीच्या उत्पन्नाचा तिसरा हिस्सा हा कर सरकार सहा किंवा दहा वर्षांनीं वसूल करी –शारो ४० २ पूर्ण अथवा सर्वस्वी इनाम नसलेल्या इनामी जमिनीवरील साऱ्याचा तिसरा भाग 'इदलशाही दिवाणांत हकचौथाइ व इनामतिजाईच नव्हती' –रा ३ ११७ [ फा ] ॰दार–पु. इनाम धारण करणारा, इनामी

जमिनीचा मालक, वतादार [फा इन्+आम्+दार] ०नोकरी—स्त्री गाव, महाल, परगणा यांची महसुली, फौजदारीसवधानें गावची, घरची कामें करणाऱ्या गावकामगारांना व परगणे अमलदाराना इनाम जें देण्यात आलें तें, काळोचें उत्पन्न, (स्वामित्व नव्हे,) म्हणजे महसुल घेण्याचा अधिकार, किंवा इनाम जमीन धारण करणाऱ्याना महसुलाची सर्वस्वी अथवा अशत सूट देण्यात आली ती इनाम मिळकती दोन प्रकारच्या असतात —प्रत्यक्ष (दुमाला) आणि अप्रत्यक्ष (परभारा) पहिल्या प्रकारात इनामदाराना सबध गाव, महाल किंवा गावातील सर्व जमीन दुमाला करून देत आणि धारा वसूल करण्याचा त्यानाधिकार हा त्याना देत दुसऱ्या प्रकारचें इनाम गेन किंवा नक्त किंवा एनजिनसी असें धारा वसूल करून आपल्या खजिन्यातून सरकार इनामदाराना जी ठराविक नेमणूक रोकडीनें अदा करी तिला नक्त इनाम म्हणत आणि जमीन धारण करणाराकडून इनामदार परस्पर ठराविक घुगरी म्हणजे दर विध्यान किंवा नागरास धान्याची अमुक मापें घेत ती, अथवा बाजारहाटात विक्रयास आलेल्या मालाची शेर-फसरी किंवा वाणगी घेत ती, याना परभाराइक किंवा एनजिनसी इनाम म्हणतात —गागा २९४० ०पट्टी ताजम—स्त्री पु इनामदारावर बसविलेली पट्टी, कर हा कर दर तीन वर्षांनी जेवढें उत्पन्न असेल तेवढा बसवीत, जेवढें त्या वर्षाचें उत्पन्न असेल तेवढा घेत ०पत्र—न इनाम दिल्यासबधींचें खत, सनद, इनाम दिल्याचें राजपत्र, सरकारनें कोणास इनाम दिल्यास त्याबद्दल पुढील चार सरकारी हुकूम निघत—(अ) खुद्द इनामदारास, (आ) इनाम गाव अथवा जमीन ज्या परगण्यात आहे त्या परगण्याच्या मामलेदारास, (इ) त्याच परगण्याच्या देशमुख देशपाड्यास, (ई) इनाम असलेल्या गावच्या पाटील-कुलकर्णी वगैरे मुकदमास ०परभारा—पु सरकारातून न घेता परभारें गावाकडून वसूल करण्यात येणारें इनाम ०पासोडी—स्त्री गावकामगाराना जी विरवोळ जमीन इनाम देतात त्याबद्दल व्यापकतेनें योजावयाचा शब्द जसें —पाऊलाम पासोडीसाठीं, कुलकर्ण्यास रुमालासाठीं, पोतदारास घोंगडीसाठीं, महाराम जोड्यासाठीं, मगास धोतरासाठीं, वगैरे इनाम दिलेल्या जमिनीबद्दल ०पाहणी—स्त्री दिलेल्या इनामजमिनींची पाहणी, तपासणी ०फेजार्ची—स्त्री जमिनीवरील सरकारसाऱ्याच्या एकतृतीयांशाइतका दरसाल सरकारात करावयाचा भरणा [अर ]

**इनामत**—स्त्री देणगी, बक्षीस, इनाम 'किल्यकाम इनामत अमरामर गावें भूमि करून दिधली ' —चित्रगुप्त १०६ [अर इन्+आमत्=देणगी]

**इनामती, इनामी**—वि इनामासबधीं इनामासबधीं इनाम मिळालेला

**इनायत**—स्त्री कृपा, बक्षीस, मेहरबानी, वरिष्ठाकडून देणगी, दयादर्शन, कृपादर्शन [अर इनायत्] ०करणें—बक्षीस देणें

०नामा—पु कृपापत्र, शिफारसपत्र, आज्ञापत्र (वरिष्ठाकडून येणाऱ्या पत्रास लावतात) 'यास अनें करिता इनायतनामा यावयाचा विलव करणार नाहींत ' —रा ८ २०२ ०होणें—बक्षीस मिळणें

**इन्कार**—पु निषेध, प्रत्याहार, नाकबुली [अर इन्कार्]

**इन्किलाब**—स्त्री क्रान्ति, फेरबदल, उलथापालथ [अर इन्किलाब+क्रान्ति ]

**इन्फंटी**—स्त्री प्राथमिक शाळेतील अगदीं पहिला, उजळणीचा, वर्ग, शिशु इयत्ता, बालवर्ग 'ती आता पाच एक वर्षांची झाली होती, आणि इतात पाटी पुस्तक घेऊन इन्फंटीच्या वर्गाला जात होती ' —मुक्ते २९ [इं इन्फट=मूल, बालक ]

**इन्फिसाल**—पु निकाल, फैसला 'त्याचा हिसाबाचे रुईनें इन्फिसाल करावा ' —रा ७ ६८ 'दिगरगावसुद्धा बाकीगाव-मजकुरचा इन्फिसाल करून द्यावा ' —रा २२ ६६ [अर इन्फिसाल्]

**इन्शाल्लाताला**—उद्गा सर्वश्रेष्ठ प्रभु इच्छील तर 'पृथ्वीपद इनशा अल्लाहु तआला यांणीं अखरासहित औरंगजेबास करार करून बक्षिसी केली आहे ' —चित्रगुप्त ४१ [अर इन्शा अल्लाहु तआला]

**इन्शुअरन्स**—न विमा 'कपनीनें फक्त आपल्या नोकरासाठीं प्रॉव्हिडंट किंवा इन्शुअरन्स फड काढावा ' —आगर ३ ७३ [इं ]

**इन्साफ**—पु १ न्याय, निर्णय इनसाफ पहा ०गुजी—वि इन्साफी, न्यायी —ख ७ ३५७५ [फा इन्साफ्+गुजीन्]

**इन्साफी**—वि १ न्यायी, न्यायानें वागणारा 'श्रीमंती इन्साफी त्याचे येसल्यासी हेही मुन्सफ् (न्यायी) असतील ' —ख ७ ३५७० २ इन्साफ करण्यात चतुर [अर इन्साफ्]

**इन्सोल**—(चाभारी धदा ) (जोड्याच्या) आतल्या बाजूस शिवण्याचें तळ (सोल) [इं इन्=आतील+सोल=तळ]

**इन्स्पेक्टर**—पु तपासनीस, देखरेख, तपासणी करणारा अमलदार उदा० पोलीस इन्स्पेक्टर, सर्कल इन्स्पेक्टर, स्कूल इन्स्पेक्टर 'इन्स्पेक्टर उभे हात हातावर। ' —गापो १३ [इं ]

**इपट, इपतर, इपरीत इपसळ, इपारणें, इपारा, इपितर**—विमध्ये पहा

**इफळ**—न (गो ) समुद्रकाठच्या खाऱ्या व भरतीच्या पाण्यानें भिडणाऱ्या जागी होणारें झाड हें सहा सात हात उच असनें याचा विस्तार मात्र असून डाहाळ्या समुद्रात बुडालेल्या असतात, पाला गुरें खातात, लाकूड चिवट व कठिण असतें लाकूड जाळून त्यापासून क्षार होतो त्याचा उपयोग परीट कपडे धुण्याकडे करतात [स विफल]

**इफाजत**—स्त्री सरक्षण, आश्रय 'रघुनाथराऊ पेशवे ईजारवाच इफाजतेंत आहेत ' —रा १० १०६ [अर हिफाझत्]

**इबर्ती**—स्त्री (कर्ना ) लिंगाईत रोज कपाळास लावतात तें भस्म, विभूति [स विभूति ]

**इबाक**—क्रिवि (खा ) या बाजूस, इकडे [इक्ष्वाकु ? ]

**इवाड**—पु (गो ) खराबी, नागवण, नाश विघाड [स विघात, म विघाड ]

**इबादत**—स्त्री पूजा, भक्ति, ईश्वरनिष्ठा [ अर इबादत्=पूजा ]

**इबादती**—वि धार्मिक 'हे वातेचा तरस मोहीयासारसे इबादती लोकास काहींच नये हें अजाईब आहे ' –रा ३ ९० [ अर इबादती =पूजक, इबादत् =पूजा ]

**इबादीपंथ**—पु एक मुसल्मानी पथ व त्यातील लोक याचा पथ ' खवारीज ' पथाची एक शाखा आहे या पथाला हें नाव त्याचा सस्थापक अबदला बिन इबाद याच्या नावावरून पडलें [ अर इबादत् ]

**इबारत**—स्त्री १ भाषापद्धति, वाक्प्रचार, शब्दप्रयोग 'ह्या ग्रथाच्या वैंता तीस हजार आहेत, तो पार्शी भाषेचे इबारतींत आहे ' –ऐस्फुले ४५ [ अर इबारत्=भाषाशैली, धाटणी ] २ इभ्रत, प्रतिष्ठा 'तुमची इबारत गाईक्वाडावरी चटली ' –रा ६ ३२१ [ अर इब्रत् अप ]

**इबीत**—( कर ) इबत्ती पहा

**इबीन, इब्न**—पु पुत्र, बिन ( अमक्याचा मुलगा ) 'येलोजी बिन मालजी इबीन चादजी ' –पेदस १११ [ अर इब्न् ]

**इब्री**—स्त्री ( व ना ) विटी, पिल्ली ( विटीदांडूच्या खेळातील )

**इब्लाग**—स्त्री पाठवणूक, पाठवणी 'हमेशा मोहबतनामा इब्लाग करोन मसूर ( आनंदित ) करीत जाणें ' –रा १० १६८ [ अर इब्लाघ् ]

**इब्लिस**—पु दानव, सैतान 'मुसलमानी कुराणात असें सांगितलें आहे कीं इब्लिसनें अल्लाविरुद्ध बड केलें म्हणून त्याला स्वर्गांतून हाकून लावण्यात आलें ' –ज्ञाको (इ) १७१ –वि ( व ) ( ल ) खोडकर, खोडसाळ, उनाड उपद्यापी, बदमाष ( मूळ किंवा कृत्य, भाषण ) 'दरापाडयाचा रामा फार इब्लिस पोरगा आहे ' [ अर इब्लीस् ] ०पणा–पु बदमाषी मात्यपणा

**इभ**—पु हत्ती सरिसेपणें एकवटत इभ– । मस्तकावरि ' –ज्ञा १ १७ 'द्वैत काननींचे कठीरव । तुम्ही इभ तेथें सर्व । ' –पाप्र ३१ २१ [ स ]

**इभ्रत**—स्त्री थोरवी, वळ, प्रतिष्ठा, विश्वास, वचक, दरारा धाक, अब्रू 'तें ठाणें इभ्रतीनें घेतलें ' –ख ६ २७२५ 'या दर्शीयाची इभ्रत फार बाळगितात ' –ख ११ ६१५६ [ अर इब्रत्= उदाहरण, ( ल ) धाक, भीति ]

**इमला**—पु इमारत, बाधकाम, वाडा, घर, मंदिर 'वैकुंठीं यशाचे इमले । बाधुन मग सुरवर्शी जन्मले । ' –ऐपो २६६ [ अर इम्लाक्=मालमत्ता] ०ढांसळणें–मसलत अगावर येणें, काम नासणें, मोडणें, बिघडणें 'त्याचा ( मनोविकाराचा ) त्वकर नाश करावा । असेल तर त्याना सुशिक्षणाचा किंवा लावावा म्हणजे थोडया त्याचें पीठ होऊन त्यांचा इमला ढासळतो ' –टि ४ ३७

**इमलफेला**—अमलफेला पहा

**इमली**—स्त्री ( हिं ) चिंच, अम्ली [ स अम्लिका, गु अंबील ]

**इमाद**—पु खांब, आधार [ अर इमाद्=खांब, आधार ]

**इमान**—न १ वचन, एकनिष्ठा, सचोटी, 'नवाबानीं आपला इमान राखिला ' –पदमा १ ८९ २ श्रद्धा, विश्वास 'त्या पज्यापाशी तुमचा इमान असावा ' –मदरु १ ११३ [ अर ईमान्= श्रद्धा ] ३ इमानपत्र, इमानाची खूण, शपथपत्र 'इमान पाठविले ' –९६ कलमी ७ ४ सदसद्विवेकबुद्धि, मनोदेवता, अंतर्याम ०इतबार–पु एकनिष्ठा, सचोटी, प्रामाणिकपणा ०करणें-देणें–वचन देणें, शपथ देणें, शपथेवर सांगणें 'यावी शेजेची बाईल पण इमान देऊ नये ' –इपुस्तीपो ४० ०क्रिया–स्त्री इमान राखण्याबद्दल शपथ घेणें ०गुंतणें–शपथेंत अडकणें, शपथ घेऊन चुकणें **इमानास जागणें, इमान धरणें**–इमान नष्ट न होऊ देणें, इमान जागृत ठेवणें, सचोटी न सोडणें, पूर्वीचे उपकार स्मरणें ०प्रमाण–न १ प्रामाणिकपणा, विश्वासूपणा, सचोटी २ करारमदार, आणभाक, शपथक्रिया ०भाक–न आणभाक, करार, अहदपैमान –रा १५ २७३

**इमानतदार, इमानी**—वि विश्वासु, प्रामाणिक, खरा, सत्यशील

**इमानेंइतबारें**—क्रिवि एकनिष्ठेनें, प्रामाणिकपणानें

**इमाम**—पु १ मुसल्मानी धर्माध्यक्ष, गुरु, उपाध्याय, ( विशेषत अलीच्या वंशजापैकीं ), ज्याचें चांगलें वाईट अनुकरण करावयाचें तो पुढारी, राज्यव्यवस्थेंत इमाम ही अधिकाराची जागा असून धार्मिक सस्कार करणें हें काम त्याच्याकडे असतें 'इराणमध्यें शिया लोकातील इमाम जास्त शुद्ध व अध्यात्मी असून सरकारच्या सत्तेखालीं ते येत नाहींत ' २ बहुमानार्थी पदवी, नायक, पुढारी, श्रेष्ठ या अर्थी [ अर इमाम् ] ०गट्टा–पु मुसल्मान लोक हनुवटीवर केंसाचा भाग राखतात तो ०जयंती–स्त्री मोहरमचा सण, ही विचित्र अरबी–सस्कृत सज्ञा हिंदूनीं मुसलमानी सणाला पूर्वीपासून रूढ केली आहे ०दांडगा–वि दाडगाईखर, उर्मट, मस्तवाल, पशुतुल्य, ठ्ठामिश्र ०बाळी–स्त्री १ हत्तींच्या कानातील एक मोठी बाळी ( पूर्वी ही हत्तींच्या कानात घालण्याची चाल असे ) २ एकाच कानात घालण्याची ( मोती, लोलक वगैरे असलेली ) बाळी ही मुसल्मान, भिउ वगैरे लोक घालतात

**इमायत, इमाईत**—स्त्री सरक्षण, आश्रय –रा ८ १८५ [ अर हिमायत् ]

**इमारत**—स्त्री दगड, चुना, विटा, माती, लाकूड इ० साहित्यानें करावयाचें काम, बांधकाम, पायाच्या वरचें बांधकाम किल्ल्याची इमारत, विहिरीची इमारत 'गडाची इमारत मुस्तेद करावी ' –मराआ ३३ २ वाडा, हवेली, मंदिर, घर, इमला ३ अगकाठी, शरीरयष्टी, बांधा –'घोडी पाच हजार रुपये किंमतीची

होती, इमारतीनेंही थोर होती ' –ख ११ ५७०६ [अर इमारत] ०खाना–पु सरकारी इमारत बांधण्याचें (इ पी डब्ल्यु डी ) खातें –इऐ २२ २४ ०फळा येणें–१ इमारत पुरी होणें, बांध काम पुरें होणें २ (ल ) इच्छित कार्य सिद्धीस जाणें ' सतकृपा झाली। इमारत फळा आली।' –व २२९

**इयत्**—सना इतकें, एवढें उ० इयत्काल, इयत् परिमाण [स]

**इयत्ता**—स्त्री. १ इतकेपणा, टरावीक, नेमून दिलेली मर्यादा, प्रमाण, दर्जा, प्रमाणाचें मापन (गुण, काल, दर्जा इ०चें), पग, टप्पा मर्यादा नेमून देणें जसें उग्पतेची इयत्ता 'स्मृतींची ज्वाला अमुक्च इयत्तेपर्यंत वाढली पाहिजे ' –टि ३ २६२ [स] २ शाळेंतील अभ्यासाप्रमाणें दर्जा, वर्ग यत्ता पहा [स इयत्, प्रा. इत्तिय]

**इया-यी**—पुस्त्री (खा ) बिला, बिळी

**इया-ये**–सना इयें—(अर ) या 'इया पाटणी जें , शिलालेख शके ११२८ ' मी माणुमचि नव्हें या थरासि। काइ नाणी तीचि इयें।' –ऋ ५१ 'म्हणोनि मी हें न करीं। इयें सभार्मी शास्त्र न धरीं '–ज्ञा १ २३३ 'तुजरहि मन इचें यावरी का ग्येला।' –नल १९८ 'इन वाय इया पोयरा खेरी याहाकी हाय' =हीन बाई या मुलाची खरी आई आहे –भिल्लीभापा २४ स एषा, एतद् इदम्]

**इयोंक**—क्रिवि (राजा ) विण्यास, प्रसूत होण्यास –मसाप २ ३५९ [विणें]

**इरकल-ली**—वि विजापूर जिल्ह्यात, हुनगुंद तालुक्यात इल कल नावाचें गाव आहे त्या गावावरून (तेथें होणाऱ्या) लुगड्याच्या वाणास नाव पडलें आहे या लुगड्याचा पोत कोणताही असून विणार रेशमी, त्यामध्यें नक्षी करवत व पिवळे पुटकासे व चार गोमा असतात [इलकल गाव]

**इरगीमिरगी**—स्त्री मुलाचा एक खेळ

**इरजा**—पु इरजिक्सारखीं कामावर येणारा मनुष्य, बैल इ० इरजिक पहा

**इरजिक-जीक, इरजे**—स्त्रीन अमिनीस वावयाची कुळ वाची पाळी, पेरणी, पिकाची काढणी, मळणी वगैरे शेताचें काम करण्यासाठीं जे एकाच वेळीं अनेक गडी लावतात त्याना सकाळीं न्याहारी, दुपारीं साधारण जेवण, व सध्याकाळीं मोठें जेवण घालतात तें, अशा कामाला अन्नमय मोबदल्याला–इरजिक म्हण तात –गागा १४५ (सामा ) शेती वगैरे कामास लागणारे बैल वगैरे याची एकमेकानीं एकमेकास करावयाची मदत (क्रि० घेणें) [स विरत्-इरज्ज= यरस्वा करणें, वैस इरा=अन]

**इरड, इरवड-वाड**—स्त्री १ सकाळीं गावदरीस पटलेलें उष्टेंपाष्टें, विष्ठा वगैरे खाण्यासाठीं गुराचें हिंडणें, भटकणें, (क्रि० करणें) २ विष्ठा वगैरे खाणें (क्रि० खाणें) ३ (ल ) शेजारीं पाजारीं अधाशीपणानें तोंड घालणें, पछाड करणें [का एरु=शेण, गुराची विष्ठा]

**इरड, इरवड-वाड**—न (विरू ) विरड मुख्य धान्या बरोबर पेरलेलें धान्य, मोगण (क्रि० टाकणें) [का एरडु=दोन]

**इरड, इरवड-वाड**—स्त्री जगलातून आणलेला लाकडाचा किंवा गवताचा डोईभर भारा, डोईओझें, भाऱ्याकरिता जगलात घातलेली फेरी [विरड, इरड करणें]

**इरडणें**—अक्रि (कर ) उगवणें (रोप वगैरे) 'ऊस गुत्ताच इरडावयाला लागला आहे' [कर्ना इरडा=झाड, रोप]

**इरडपाळी**—स्त्री मृगाचा पाऊस पडताच कुळवानें शेतात घातलेली पाळी

**इरडा-इरडो**—पु (कर्ना गो ) झाडाचें रोप, (गो ) डागो [कर्ना इरडा=झाड]

**इरण**—न एक वेली अरणी पहा

**इरमणें**—विरमणें पहा

**इरमार**—पु (कु ) अभिमान, गर्व, ताठा [वैस इरिन्= गर्विष्ठ]

**इरय**—पु (कु हेट ) १ एक वृक्ष, देवदार २ (गो ) गाडीचा आस

**इरली**—स्त्री (वों ) लहान इरलें

**इरलें**—न १ पर्जन्य निवारण्यासाठीं डोकीवर घ्यावयाकरिता गमयाचा (धुचीच्या आकाराचा ) केलेला सागाडा यावर पळस, कुभा, साग, केतकी यांचीं पानें शिवून हा तयार करतात, नारळीच्या पातींचेंहि इरलें करितात पानाची गावठी छत्री विरलें पहा [प्रा विराली=एक वल्ली, प्रा इरीर=छत्री, स पत्र=छत्ताकुल?] २ (व ) (धान्याच्या ) कणगीवर ठेवण्यासाठीं गवताचें केलेलें झाकण

**इरस**—पु (कु ) गाडीचा आस 'गाडयेचो इरस वाकलो हा' [हिं ईरिस, इर्स=आस]

**इरसाल**—वि निवडक, वेचक 'मवाळपक्षात प्रामाणिक पणाचे इरसाल कोद कमी कसे आहेत तें पहा '–केळ १ १३९ इर्साल पहा

**इरल-ला**—नपु दुसऱ्या धान्यात पेरलेलें धान्य उ० कपाशी पेरताना तींत थोडे ज्वारीचे टाकलेले दाणे [का एरडु=दोन]

**इरळणें, इरळण काढणें**—क्रि (माण ) दाट उगवलेल्या पिकातील काहीं मोड उपटून विरळ करणें [विरल]

**इरा**—पु (व कों कुळ ) पाण्याचा झरा, पन्हा [स इरा= पाणी, पेय]

**इरा**—पु (चद्रपुरी ) विरा [विरा]

**इराकत-खत-गत**—स्त्री ( व वों ) विराकत १ रुसवी, लखो करणें, स्पर्श वसो ( वन्हाडात स्त्रियांना उद्देशून व इतर ठिकाणीं पुरुषांना उद्देशूनही योजतात ) (क्रि० करणें ) २ ( ल ) तुच्छ मानणें ' मी त्या पेशावर इराकत करतों [ अर इराकत्, तुल० स इरा=पाणी, विराक्त, तुल० म वि+रिच्=रिकामें होणें ]

**इराकी**—वि इराक देशांतील ( घोडा ), अरबी [इराक=एका प्रांताचें नाव ]

**इराडा काढणें**—क्रि ( माण ) खोड मोडणें अरड काढणें पहा

**इराणी-नी**—वि इराणांतील(घोडा, गाढव) –पया २९ –पु १ इराणांतीलमूळचे लोक, पार्शी ' मी बाहेर इराण्याच्या दुकानात चहा प्यायाला गेलों होतों '–नाद ३ ३९ २ जेथें अफगाण, पठाण, बलुची यांच्या बरोबर इराण्याचाहि उल्लेख येतो तेथें पठाणांप्रमाणें आडमुठे दरोडेखोर लोक असा अर्थ समजावा आजचे इराणी मुसल मान आहेत [ फा ईरान् ] ०फर्लांग-पु ३३ मैल –इअ ७४.

**इरादा**—पु १ विचार, हेतु, बेत, संकल्प, उद्देश, इच्छा २ योग्यता, अधिकार ' पुरधऱ्याची कदीम इरादा। तत्पर पटे मोंगल बादा।'–ऐपो २१९ ३ इलाखा ( हक, पदवी या अर्थी मुद्दीनें वापरतात ) [ अर इरादत्, इरादा=इच्छा, हेतु ]

**इराप**—स्त्री ( सुतारकाम ) ( फळीच्या ) कोपऱ्यास कराव याची गोल्ची –मॅरट ७७ [ महिराप ? ]

**इरिडयम**—न ( शाप ) प्लॅटिनम वर्गांतील एक मूलद्रव्य हें फाउन्टन पनच्या टोंकास लावतात ऐंद्र पहा [ इं ]

**इरीरी इरिइरि करणें**—क्रि १ बैलांना हाकणें, पुचकारणें ' इरिरि पाया ( तलगु दल, चल )दादा, जाना २ ( ल ) ( कु ) दानी करणें, दानकरी बनणें ' तु शिक्तलय वीं इरीदरी करतल्य ' [ ध्व, स इर्=जाणें ]

**इरुळी, इरोदी**—( व ) विरोली, विरोदी पहा

**इरे**—स्त्री ईर्षा ईर पहा

**इरेफ इराब**—वि क्रिवि ( शिंपी धंदा ) तिरपें, वाकडें, तिर कसपणें, वाकड्या रीतीनें(कपडा कापणें) रास किंवा काग(सरळ) याच्या उलट (क्रि० कापणें) [ स विरेफा, विरेफ, हिं इरेब ]

**इरोळी**—स्त्री गुराच्या पायास होणारा एक रोग

**इर्तिबात**—स्त्री स्नेह, मैत्री ' पंत साहेबांसी व आम्हांसी दोस्ती व इर्तिबात कदीम आहे '–दिमरा १ ४५ [अर इर्तिबात्= मैत्री ]

**इर्मित**—स्त्री ( गो ) ख्रिस्ती धर्मप्रचारकाचा मठ [ पोर्तु ]

**इर्शाद**—पुस्त्री हुकूम, आज्ञा, उपदेश ' रामाजी महादेव यास इर्शाद फर्मावून '–ख ७ ३५६५. ' तिकडील बातमी वरचेवर आणवीत जावी, याप्रमाणें इर्शाद करून खलिता वाचून बहुत श्रमी झाले '–दिमरा २ १६६ [ अर इर्शाद्=आज्ञा, हुकूम ]

**इर्साल**—पु १ पाठवणूक, रवानगी ' चित्तास आल्याप्रमाणें विनंतीपत्र व जिन्नस इर्साल करावें '–रा १ १४७ २ सरकारी खजिन्यात भरावयाचा पैसा, पाठविण्याचा पैका ' यावर तमाम लष्कराचा व बागियांस ताकीद करून इर्साल पोहोंचवून दिल्हा ' –इम १५५ –वि १ अगदीं उत्तम दर्जाचा, गुणानें अत्युत्कृष्ट, ( आंबा, इतर फळें व त्यांचीं झाडें यांस म्हणतात, तसेंच फळें, फुलें, झाडें, बिया अत्युत्कृष्ट समजल्या जाणाऱ्या यांहेर पाठविण्या योग्य यांनाही हें विशेषण लावतात ) निवडक, वेचक, अस्सल, अव्वल २ अट्टल, वेरकी, वस्ताद, पक्का (लबाड माणूस, चोर, भामटा, खोटा माणूस वगैरे ) (अर. इर्साल=दूतमंडळ, पत्रप्रेषण ] ०नामा-पट्टी-पुस्त्री खजिन्यात भरावयाच्या पैशाचा तपशील, अथवा सरकारात भरावयाच्या किंवा भरलेल्या रकमेची यादी ०भरणा-पु महालाकडून खजिन्यात पाठविलेला वसूल, पैसा

**इलगार**—पु हल्ला एल्गार पहा. [ अर इल्घार=लुटालूट, सैन्यानें केलेली नासधूस ]

**इलम**—पुस्त्री १ शास्त्र, विद्या, कला, हुनर २ उपाय, साधन, प्रयत्न, युक्ति, इलाज ३ जादूटोणा, मंत्रतंत्र, चमत्कार, इंद्रजाल [ अर इल्म् ] –वि इल्मी, इल्मबाज

**इल्मबाज, इल्मी**—वि १ इल्म जाणणारा, जादूगार, मांत्रिक २ बुद्धिवान् हुशार, हुनरी [ अर इल्म ]

**इलस**—क्रि ( कु ) आलास ' तूं केन्हा इल्स ' (कों ) इलें= आला

**इलाईत-यत**—स्त्री विलायत, प्रांत, प्रदेश, मुलूख ' देश इलाईत। कार्बाज केलें तळकोंकण '–इपुक्तिपो ' विलायतिर्जन पद।'–राज्यको जनपदवर्ग १ [ अर विलायत्=प्रांत, देश ]

**इलाकी**—इराकी पहा –मराआ ६

**इलाखा-का**—पु १ हक, ताबा, सत्ता अवलंबन ' रघुनाथ राव इलाखा राखणार नाहीं '–ख७ ३५७३ २ परिवार, बायका माणसें, खटला ' सर्व रायगडाखालीं सभानीरानें याचा इलाखा ( परिवार ) राहिला '–मराचिथाशा २५, –ख ८३५. ३ संबंध ' तुम्हांसी त्याचा इलाखा नाहीं '–सभासद ४७ ४ परगणा, प्रांत, शहरहद्द राज्यकारभाराची विशिष्ट भौगोलिक मर्यादा ' हा गाव पुणें इलाख्यात आहे आणि तो नगर इलाख्यात आहे ' ' या देशात इंग्रजांची प्राबल्यता जाहल्यावर अगोदरी नबाब मुहम्मद अली खानाचे इलाखेंत आम्ही होतों '–तरा १०० ५ पालखीच्या दांडीस लावावयाचे लहान लहान गोंडे ६ वसुलीवर वरात, तनखा, वतन [ अर इलाका ]

**इलागत**—क्रिवि ( व ) क्वचित, एखादेवेळीं

**इलाचा**—पु एक प्रकारचें गर्भरेशमी कापड, उंची कापड [ हिं ]

**इलाची, इलायची**—स्त्री वेलदोडा, वेल्ची, वेल्चीदाणा वेलदोडा पहा [ स एला, हिं इलायची, ब इलायची, गु एल्ची, का याळकी, ते एलकी, ता एलाची ] ०**केळें**-न केळयाची एक ल्हान नागरी जात ०**दाणा**-पु वेल्चीं आत घालून केलेला साखरफुटाणा

**इलाज**—पु उपाय, उपचार, युक्ति [ अर इलाज् ]

**इलामत**—स्त्री ( गो ) अबदागीर, छत्री, सूर्यपान वगैरे इत माम [ अर अलामत्=राजचिन्हें, गुण ]

**इलावृत्त**—न जंबुद्वीपाच्या नऊ वर्षांतील एक वर्ष, प्राचीन नगाचा एक भाग हें मेरु पर्वताच्या आसमंतात् भागीं अतिनिकट गमचतुरस्त्राकृतीनें वसलेलें असून याच्या भोंवतीं नील, निषध, माल्यवान व गंधमादन हे पर्वत आहेत [ स ]

**इलाही**—वि ईश्वरी, ईश्वरासंबंधीं, दैवी 'शुक्र इलाही'=मी ईश्वराचे आभार मानतों [ अर इलाह्=ईश्वर, इलाही=दैवी ] ०**सन**-पु अकबर बादशहानें सुरू केलेला एक शक हा अकबर व जहांगीर या दोनच बादशहांच्या कारकीर्दीत चालू होता पुढें शहाजहाननें हा शक बंद केला म्हणून वरील दोन बादशहांच्या कारकीर्दीतील कागद पत्रे यांवर हा शक आढळतो इलाही शकांत १५५५-५६ मिळविले असता इसवी सनाचें वर्ष निघतें ०**गज**-पु अकबराच्या कारकीर्दींत राजा तोडरमल यानें राज्यांतील जमीन मोजण्या करितां जी साखळी किंवा गज उपयोगांत आणिला तो

**इलिसा, इलु, इलुसा-सी-सें**—वि थोडा, थोडासा, अल्प अगदीं ल्हान इवलासा पहा 'व्यग इलुहि त्यांत जाण' —दावि १९४ 'बोले देवें वाटून शके कोणीहि दोष धीरा ज्या। राजासि विशल्य करी देउनि इलुसीच ओषधी राजा ॥' —मोभीष्म ८८ [ स अल्पीयस् ]

**इलेक्शन**—१ निवडणूक, पसंति २ सभासदांची निवडणूक 'नेहमीं नेहमीं मिळक नि गोखले, आणि धर्म नि इलेक्शन। सरार नाहीं होत काहीं' —सुदे ४८ [ इं ]

**इल्जाम**—पु आळ दाप, दोषाची शाबिती, ठपका 'मग कडे कोण काय इल्जाम लागतील त्याचे जाबसाल मी सब पुरवून देईन.' —रा० १० ३४४ 'मनवर इल्जाम नाहीं ऐसें समजोन आज्ञा होईल त्यास हुजर' —रा ५ २०६ [ अर इल्जाम् ]

**इल्तिमास**—स्त्री विनवणी, अर्जी 'ये बाबें तुम्ही इल्तिमास लिहिली' —दम ७५ [ अर इल्तिमास् ]

**इल्लत**—वि ( व ) व्यसनी, खोडकर द्वाड, उपद्व्यापी 'इल्लत माणूस आहे तो' —स्त्री ( व ) व्यसन, खोड, दोष, रोग 'कोणाला विडीची तर कोणाला गांजाची इल्लत असते' [ अर इल्हाद्=अधार्मिकता, नास्तिक्य ]

**इल्लत-ध**—स्त्री हत्यार, उपकरण, आउत, भोंक पाडण्याचें अणकुचिदार हत्यार [ अर आलत्=शस्त्र, प्रा इल्ली=एक शस्त्र, म विळा, विळत ]

**इल्लम**—इल्म पहा

**इल्ला**—पु ( कर्ना ) १ इनसाफ २ अर्थ

**इल्ला**—पु समाप्ति, अभाव, नकार ०**विल्ला करणें-दाखविणें**-नकार देणें, ननाचा पाढा वाचणें, आशाभंग करणें, आढवेढे घेणें, काकू करणें 'बळकून ठेवलें तुला फाकडे, विलीकरशी इल्लेविल्ले' —पला १०९ [ का इल्ला=नाहीं ]

**इल्ली**—वि ( कु ) थोडें इवलें पहा इतर रूपें-इल्ले, इल्ले, इगो ०**तिल्ला**-वि ( गो ) ल्हानसाहान

**इल्लु**—न ( शिंपी धंदा ) सुईचें भोंक, कान ( ३ ) होल 'दुकानीं घरणें आहेत त्याचे इल्लु सदरहूप्रमाणें पूर्वीच करून ठेवावेत' —दिसकदि १ १३

**इल्हण**—वि ( व ) विरविरीत विरळ, पातळ, (जाळ्या-प्रमाणें) 'हें कापड फार इल्हण निघालें'

**इल्हाक**—पु जोडणी, सही 'अमनतखान याचा इल्हाक, सर्बुलंदजंग याचे दस्तत' —रा ७४५ [ अर इल्हाक्=जोड, सांधा ]

**इवइव करणें**—क्रि ( कु ) कोल्ह्यास बोलावणें [ ध्व ]

**इवला, इवलासा, इवलिसा**—वि थोडा, एवढासा, एवढा, इलिसा, किंचित्, अल्प, मूठभर, चिमटीभर, गवाभर 'समर्थी आलिया याचक। इवली भीक न घालिती।' —एभा ७ २८५ [ स अल्प-अल्पीयस् ]

**इवशी**—अवदसा विवशी पहा 'धाड पडो रे त्या मुलखाशीं। दुर्भिक्ष आली इवशी।' —ऐपो १२४ 'म्हणे राज्याला भवली इवशी।' —गापो १०१

**इवळखोर, इवळणी, इवळणें इवळत**—विवळखोर, विवळणी विवळणें विवळत पहा

**इवा**—पु ( व ) विळा [ इलाप्रमाणें विळा अप ]

**इवाइन**—न ( व ) सकट

**इवाई-य-ही इव्हाई**—पु ( कों कु व ना ) व्याही तो म्हातारा गृहस्थ त्याचा इवाई होय' [ व्याही अप ]

**इशर इशरीन**—अशर अशरीन पहा

**इशाड**—न ( हेट, कु ) नागराचा एक भाग, इसाड, नागराचा दांडा, नांगराच्या जोखडास बांधावयाचें लांब लाकूड, ( कु ) नांगर ओढला जाण्यासाठीं ज्याची एक बाजू नांगरखुंटाच्या भोंकांत बसविलेली असून दुसरी बाजू बैलाच्या मानेवरील जुवाच्यां मधोमध बांधलेली असतें असें लाकूड दोरींतून निसटू नये म्हणून याला दाते पाडलेले असतात [ स ईषा, प्रा ईसा=नांगराचें एक लाकड+दंड ]

**इशाड-साड**—न (गो वों ) कलम (पुटींचें), कल्म बांध रुलें झाड **इशाड्याचा आंबा**-ज्या आंब्याच्या झाडावर कलम केलें आहे असा आंबा, कलमी आंब्याचें झाड [ स ईश ]

**इशाण**—न ( कु ) विसण पहा

**इशारत, इशारा**—स्त्री पु खूण 'तेव्हां इशारती। तहा फोकावरी घेती।'-तुगा २७४८ २ सूचना, ताकीद, खबर 'इशारती'-सभासद ४७ [ अर इशारत्-रा=खूण ] म्ह० शहाण्यास चेतावणी, शहाण्याला इशारा=गाढवाला माराची जरूरी आणि अरबी घोड्याला नुसता इशारा पुरसा होतो

**इशी**—स्त्री उद्गा (बाल-बायकी) घाण, मलमूत्रोत्सर्ग, घाणेरडा पदार्थ २ नकारदर्शक तिरस्कारदर्शक उद्गार इश्श पहा [ स विष्-पा=विष्ठा, का इग=स्त्री । शू ।] **०करणें**-( बाल ) शौचास बसणें, हागणें

**इशीम**—स्त्री. अभिमान, अब्रूची चाड, आपल्या नावाची, लौकिकाची, मोठेपणाची जाणीव [ अर हशम्=वैभव ]

**इश्क, इश्क**—पु १ प्रणय, शृंगार, विलास 'आम्ही तर दर्दी, इश्काने भुकेले प्राणी'-प्रला २ नाद, छंद, आवड, शोक, ओढा 'श्रीमंत राजेश्री बाजीरावसाहेब व चिमाजीआप्पा यांसी घोड्यावर बसावयाचा इश्क बहुत आहे'-म १ ४८३३ [ अर. इश्क=प्रेम ] **०पेंच**-न एक पुष्पविशेष, शोभिवंत लता 'इश्कपेंच गुरफटून मस्जिद भर शेवंती सावरी'-प्रला १५४ **०बाज**-वि चैनी, विलासी, स्त्रीलंपट [अर इश्क+फा बाज्] **०बाजी**-स्त्री प्रेमलीला, प्रणयविलास, आशकबाजी -चित्रगुप्त १६४ २ रांडबाजी, बाहेरचा नाद ३ चैन [ अर इश्क+फा बाझी ] **०बाजी लावणी**-स्त्री शृंगारपर लावणी, पद

**इश्की**—वि प्रेमाचा [ अर इश्क ]

**इश्तिहार**—पु जाहिरात प्रसिद्ध करण्याचा मजकूर, जाहिरनामा [ अर इश्तिहार=प्रसिद्धि ]

**इश्यो, इश्श, इश्शरे इश्शो**—उद्गा (बायकी ) लाज, नापसंती, तिरस्कार, आग्रह वगैरे दाखविण्याच्या वेळीं हा उद्गार निघतो छी !, छे ! इशी पहा 'इश्श! असं तुझं नाव तर सांगशील! -नाकु ६ २५ 'केवळ हुंड्यापायीं अनाठायीं पडणाऱ्या रत्ना! इश्श!'-प्रफुल्लता ३१ ३ २३ 'इश्शरे बायको!' [ विष्ठ (=मानाची घाण )-इश्शर-इश्शरें-राजवाडे भाअ १८३४ किंवा न्हीच्छ-ईच्छ्-इश्श इशी, किंवा ध्वनि, सीत्कार ]

**इषक, इष्क इष्की**—इश्क पहा 'इह दे इष्कीनोबद बाजिव चौघडा'-सरा २ 'प्रसन्नता मर्जि उभयता इष्की सागरा आलें भरतें।'-सारा ५

**इष्तिबाह**—पु शंका, संशय, अस्पष्टता [ अर इश्तिबाह्=संशय ]

**इष्कीबाजी**—स्त्री चैन, इश्कबाजी पहा 'पैसा फार फार होत चालला म्हणजे इष्कीबाजी वाढते'-नि ५३

**इष्कल, इष्कील**—स्त्री अडचण, घोटाळा, व्यत्यय (क्रि० करणें, घालणें, पडणें, पाडणें) [ अर इश्काल=अडचण, संशय ]

**इष्ट**—वि १ इच्छिलेलें, आवडतें, पसंत केलेलें, हवें असलेलें, मानलेलें 'तुम्ही इष्ट अंक मनात धरा तो मी सांगतों.' 'इष्टं धर्मेण योजयेत्' २ शुभ, हितप्रद, कल्याणप्रद 'सहज इष्टानिष्ट करणी। दोघीचि इया कवतुकिणी।'-ज्ञा १६ ६१ ३ (गणित), इच्छेनें धरलेली किंवा मानलेली, गृहीत (काल, घटि, वेळ), जसें-इष्टघटि, इष्टकाळ -पु मित्र, स्नेही, जसें-इष्टदर्शन, इष्टमंडळी -स्त्रीन इष्टि, यज्ञयागादि कर्म, स्नान, दीक्षा इ० आवश्यक कर्म 'जे इष्ट यज्ञ यजावे। तें हविर्मंत्रादि आपवें।'-ज्ञा ४ १२० 'इष्ट जें का यागादिक। वापी कूप आराम देवा। गा भू रत्नादानादिक। त्याहून अधिक अन्नदान।'-एरुस्व ४ १९ **०आप्त**-पु अव (प्र ) आप्तेष्ट, स्नेहीसोबती, नात्याचीं माणसें **०कर्म**-न (गणित ) त्रैराशिक, त्रैराशिकाच्या रीतीनें उदाहरण सोडविण्याची क्रिया **०कल्पना**-स्त्री (तर्कशास्त्र किंवा गणित) गृहीत कल्पना, प्रथम खरी मानलेली गोष्ट, गृहीत कृत्य, सिद्धवत् गोष्ट कल्पित पक्ष **०काल**-पु (गणित) शुभ वेळा, कोणत्याहि कार्यास पाहिजे तशी वेळ, शुभ काळ (क्रि० येणें) **०देवता-दैवत**-स्त्री न आपली भक्ति जीवर आहे अशी देवता, आराध्य दैवत पालनकर्ता देव, साधु इ० **०पंगत-भोजन**-स्त्री न श्राद्धाच्या दिवशीं श्राद्धीय ब्राह्मणाचें जेवण झाल्यावर यजमानानें आपल्या इष्टमित्रांसह करावयाचें भोजन किंवा त्याच्यासह जेवणाची पंगत **०मित्र**-पु अव स्नेहीसोबती, सोयरेसायरे, ओळखीपाळखीचे लोक 'इष्ट मित्र आपुले। कुमरजन देखिले।'-ज्ञा १ १८१ **०राशि-राशिक**-पु (गणित) १ त्रिराशिक इष्टकर्म पहा 'इष्टराशीमध्यें एकेरी व दुहेरी असे दोन प्रकार आहेत' २ गृहीतसंख्या, धरलेली संख्या, इष्टसंख्या **०संख्या**-स्त्री गृहीतसंख्या, इष्टराशि अर्थ २ पहा

**इष्टका**—स्त्री वीट [ स इष्टका ]

**इष्टकी**—स्त्री (कु ) मैत्री [ स इष्टक ]

**इष्टतीं**—क्रिवि समजुतीनें, स्नेहभावानें 'त्या जावोनि वैरियासी। इष्टतीं सांगा वादीयासी।'-गुच ३५ २५६ [ स इष्टत्व, इष्टता ]

**इष्टत्व**—न १ मैत्री, स्नेहभाव, समजूतदारपणा 'इष्टत्वें मागती कितीएक।'-गुच ८ ६९ २ मांगल्य, शुभदायकपणा [स ]

**इष्टदा**—वि इच्छित वस्तु देणारी 'इष्टदा परी अनिष्टा। हेतु होती।'-ज्ञा १६ २१९ [ स इष्ट+दा ]

**इष्टांक**—पु (गणित) इष्टसंख्या, इष्टराशि, अंदाजलेली गृहीत धरलेली रक्कम 'श्री निमित्त इष्टांकरूपानें संकल्पिली'-के ३ ८ ३० [ स इष्ट+अंक ]

**इष्टागत**—स्त्री (गो) मैत्री [इष्ट+आगत]

**इष्टानिष्ट**—वि आवडतें नावडतें, आवडीचें नावडीचें, शुभा शुभ, मंगल अमंगल 'इष्टानिष्ट तेंवीं। जगाच्या ठायीं।' –ज्ञा १३ ६०० [स इष्ट+अनिष्ट]

**इष्टापत्ति**—स्त्री एखादी आपत्ति किंवा संकट येणार अशी भीति असताना आपल्याला अनुकूल अशी गोष्ट घडणें, आपल्याला हवी असलेली अनुकूल अशी गोष्ट आयती घडणें, मिळणें [स इष्ट+आपत्ति]

**इष्टापूर्त**—न एखादें धार्मिक, दानधर्माचें मोठें कृत्य, इष्ट म्हणजे यज्ञयागादि श्रौतस्मार्त कर्म व पूर्त म्हणजे तलाव, धर्मशाळा, विहिरी वगैरे बांधून त्याचा उत्सर्ग करणें वगैरे धार्मिक कृत्य 'आणि सत्वाडाचिया परी। इष्टापूर्तेकरी।' –ज्ञा १३ ५७४ –एभा ११ १५१४ [स इष्ट+पूर्त]

**इष्टि**—स्त्री अग्निहोत्र्यानें दर महिन्याच्या शुक्ल आणि कृष्ण पक्षाच्या प्रतिपदेस करावयाचा याग, अग्निहोत्र घेतल्यापासून तें नष्ट होईपर्यंत अग्निहोत्र्यानें हा याग करावयाचा असतो इष्टींत नित्य (दर्शपूर्णमास) नैमित्तिक (आग्रयणेष्टि, वर्षापत्नेष्टि इ०) व बाकी काम्य (अर्थकामेष्टि, पवित्रेष्टि इ०) आहेत अग्निष्टो मादि यज्ञांतहि दीक्षणीया, प्रायणीया, आतिथ्या, अवभृथेष्टि उदयनीया वगैरे इष्टी असतात चातुर्मास्य याग हाहि अनेक इष्टी चाच समुदाय आहे पशुयाग हीहि पशुइष्टीच आहे सामान्यत कोणत्याहि श्रौतयागाची इष्टि ही मूळ प्रकृति आहे 'तव तिय इष्टीचिया बुद्धी। पशुहिंसा रांकडी।' –ज्ञा १३ २२२ [स इष्–इच्छिणें]

**इष्टिका**—स्त्री वीट [शुद्ध स इष्टका]

**इष्टीण**—स्त्री (कु) मैत्रीण [स इष्ट]

**इसकणें**—क्रि (कु) थोडें सरणें विसरणें पहा

**इसकळ-णें**—विसकळ–विसकळणें पहा

**इसकाड**—न (शती) नांगराचा दांडा, इशाड पहा [स ईषा+काष्ठ]

**इसकी**—स्त्री (शती) कोळप्याच्या दिंडास बसविलेला (कोळें जमिनींत दाबण्याकरिता) दांडा लाकूड [स ईषा+काष्ठ]

**इसन**—न (व) विसण पहा

**इसने**—वि दोन ही संख्या अर्थी बर्फ मोजताना योज तात [अर इस्ना] ०अशर–वि बारा संख्या याचा वर्षगणनेंत उपयोग करतात [अर इस्ना+अशर]

**इसप-ध**—पु १ विसर्प हातापायांवर होणारा गजकर्णा सारखा एक चामडीचा रोग २ जनावराच्या अंगावरील लालसर काळा किडा, गोचिडीसारखा किडा [स विसर्प प्रा विसप्प= फैलावणारा]

**इसबगोल**—पु सफेत बिर्रे. एक ओषधी बी, याची उत्पत्ति मिसर देशांत व इराणांत होते ६ वीं आकारानें गव्हासारखें असतें. झाडाची उंची हातभर, पान बारीक असतें, झाडास गव्हासारख्या ओंब्या येऊन त्यातबीयेतें याच्या पाल्यें, तारें व पानें असा जाती आहेत पैकी बाळें ओषधोपयोगी, पानें सर्वांत उत्तम सामान्यत्य विपाकर इसबगोल पाण्यांत कोळून त्यांत बदाणा, दर्भ, गुलाबपाणी, वगैरे घालून प्यावयास देतात –वगु १ ५६ [फा इस्पघूल, तुल० सं ईषत्+म गोल, हिं ईसबगोल, का सब्गोल, ता इसप्पुकोल, इ इस्फगुल]

**इसबंद**—पु मेंदीचें बी, भुताखेताची बाधा किंवा दृष्टिबाधा होऊ नये म्हणून विवाह, प्रसुति वगैरे प्रसंगीं जाळतात तें [फा इस्पंद]

**इसम, इसीम**—न पु अर असामी १ व्यक्ति, नाव २ मनुष्य, अदमी, असामी –न (हिशोबात) नाव, सदर, नशाचें चलन, खात्याचें नाव, बगाचें नाव, धाव, जात 'माळी इसम हजीर झाले' 'कुभार इसमाकडे बाकी राहिली' –स्त्री इसीम पहा [अर इस्म=नाव] ०नविदी–स्त्री नावनिशी, नामावळी 'इसमनविदीची फर्द लिहून नवाबास भेट केली' –रा ५ १७७ [फा इस्मनवीसी] ०मजकूर–वि (सरकारी कागदपत्रावरून) वर सांगीं उल्लेखिलेला, उपरिनिर्दिष्ट (मनुष्य) [फा] ०भुरा दला–पु १ (हजीरीपत्रकात वगैरे) बदलून घातलेलें नाव, बदली नाव २ बदली माणूस, दुसऱ्याबद्दल काम करणारा इसम [अर] ०वार–क्रिवि १ नावाच्या अनुक्रमानें, नावापुढें नाव असें, नाव निशीवार २ हिशोबाच्या सविस्तर बाबीप्रमाणें [अर इस्म,+फा वार] ०वारक्मजास्ती–स्त्री पगार नादीराह नावाचा तक्ता, सामाशब्द–इसमवार–अर्थी नावनिशी, पत्र पत्रक, पाहणी, पावती फाजील, वसुलीबाकी, सूट हाजरी, इनवात इ ०वारी–स्त्री नावाचा तक्ता, नावाची यादी, हजिरीपत्रक (इ) मस्टर, मस्टर रोल

**इसमारी**—स्त्री (गो) घाल एक प्राणी

**इसर इसरकी**—इसारत पहा

**इसरा**—पुस्त्री (व) सांप्रतता चीजवस्त 'आमचा इसरा गावींच पडला आहे' [अर आसार=परंपरा इतिहास]

**इसरानाडी**—स्त्री (चहपुरी) मालमत्ता, इसारा

**इसवी**—वि खिस्ती –स्त्री खिस्ती शक [अर ईसवी ईसा=येशु हिंदू येशू इ जीसस] ०सन पु खिस्ती शक हा शक ख्रिस्ताच्या जन्मापासून धरला आहे

**इसळ-ळी इसळा**—इंगळ पहा

**इसा**—स्त्री (व) घराच्या छपरास धर लागून जमलेलें धुराचें विटण [स विषा=विष्ठा]

**इसा**—स्त्री अव (कुण) वीस, वीस या संख्येचे (पदार्थांचे) गट 'म्हणूनदयाती एक दोन इसा भाषासनी भारूनदानी सर स्वतीच्या आल्याड आलें' –बाय २ २ [स विंशति, म वीस]

**इसाड**—न नागराचा एक भाग इशाड पहा [स ईषा+दंड]

**इसाप-य, इसूप-य**—इसप-य पहा

**इसापत-फत**—इजाफत पहा

**इसार-रा**—विसार-रा पहा

**इसारकी**—स्त्री नागराच्या इसाडाला मागील शवटास (नाग रात बसविलेल्या) असलेली खीळ [फॉ इसार+रा कील]

**इसारा**—इशारा पहा

**इसाळ-ळा**—पु १ स्पर्धा, स्पर्धेचे-चढाओढीचें वारें, चुरस, चढाओढ, अहमहमिका, हेवा, खुमखुमी (क्रि० धरणें, येणें) 'पद्मदळेंसीं इसाळें। भाडतांति जे हे डोळे।' –ज्ञा १३ ५५९ 'बळ देखोनि सर्वांगळें। एक नामाच्या इसाळें। गधर्व राने बुद्धि कुसाळें। संग्राम त्यासीं मांडिला' –मुआदि २३ ९४ २ चीड, तिटकारा 'याचे सत्याचा विगाळ। इंद्रियनियमाचा इसाळ।' –मुआदि १ ६७ [स ईर्षा]

**इसाळा**—(भाण) एक जिन्नसी मोबदला, शभर फेऱ्यास अमुक पेंड्या देण्याचें ठरवून काम करणें

**इसाळा-ळा, इसाळा**—पु ज्वारीवरील रोग –शे ११ १५५, ७ १९५

**इसाळाइसळीं, इसळाइसळीं इसलाइसला**—क्रिवि स्पर्धेनें, ईर्षेनें चढाओढीनें उदा० इसळाइसळा शेजारी पिसळला

**इसाळु, इसाळ्या इसाळा**—वि स्पर्धाळु चढाओढ कर ण्यास उत्सुक [स ईर्षाळु]

**इसाळु**—पु साप, द्रव्यावर राखणीसाठीं बसलेला मूळ पुरुष, ब्रह्मराक्षस, समंध 'आणि इसाळु जैसा घरा। का दंदिया हतियेरा। न विसंबे भाडारा। बन्दुकु जैसा।' –ज्ञा १३ ५०१ [स ईर्षा-ईर्षाळु]

**इस्क**—(कुण) इश्क पहा 'मला कस म्हणतुया, तुझ्या इस्काच्या नादान मी हात आळया' –बाय ३ २

**इस्काद**—स्त्री (गो) जिना [पो इस्काड]

**इस्काल इस्कील इस्कालकी**—स्त्री हरकत, अडचण, तंटा 'चादजीराव इस्कील करील तर त्यासही माकूल करून (सम जावून) सांगणें' –रा ८ ९७ ते विषयीं इस्कीलकी कयला न करणें' –रा ८ ७९ [अर इश्काल्=अडचण]

**इस्टेट**—स्त्री स्थावर मालमत्ता, मिळकत, (सामा) माल मत्ता 'अज्ञानावधानें ही इस्टेट कोर्टाच्या ताब्यात जाऊन तिच्या व्यवस्थेकरितां रोल्ड साहेबाची नेमणूक झालेली होती' –टि २ ५७७ [इ]

**इस्त**—स्त्री १ (गो) इज्जत, इभ्रत २ वेअब्रू

**इस्तक्बाल**—पु १ सामोरें जाणें 'कोणाराव निघोन येथें हैदराबादेस आला, त्यास इस्तक्बाल राजाजींचे भाऊ आपाराव यास पाठविलें होतें' –रा ५ १४५ २ भविष्यकाल, भावी 'कार्ड नानी हाल व इस्तक्बाल' (हल्लींचे व भावी कार्डीन) [अर इस्तिक्बाल्=भविष्यकाल, सामोरें जाणें]

**इस्तकबील**—शअ पासून (मागील विशिष्ट गोष्टीपासून किंवा तारखेपासून ता दिवस धरून) पुढें, सुरवातीची मिति, एखाद्या व्यवहाराचा आरंभकाल, हा शब्द तागायत शब्दाला जोडून येतो [अर इस्तिक्बाल्] ०**तागायत**–शअ अमुक दिवसापासून अमुक दिवसापर्यंत (आरंभीचा व शेवटचा दिवस धरून) उ० इस्तक् बील चैत्र तागायत फाल्गुन [फा]

**इस्तख्लाल**—पु जोर, धीर, धर 'या फौजेचा इस्तख्लाल राहिला नाहीं तेव्हां युद्धक आरंभिला' –रा ६ ४४० [अर इस्ति ख्लाल]

**इस्तंबुल-बोल**—न तुर्कस्तानची राजधानी, कॉन्स्टँटिनोपल, स्तंबोल

**इस्तमरारी**—स्त्री कायमधारा पद्धति [अर इस्तिमरार= असाडता]

**इस्तमालत, इस्तमाली**—स्त्री १ दिल-दिलासा, समजा वणी २ लावणी, सचणी, वीर्द, महासुरी 'आबादीस व इस्तमा लतीस कासीस करून' –रा १५ ११३ [अर इस्तिमाल्=उत्ते जन, सान्त्वन]

**इस्तमाली**—वि मामुली, जुनापुराणा, वापरण्यायोग्य –स्त्री १ वहिवाट, परिपाठ, अभ्यास २ 'इस्तिमालत' पहा [अर इस्तिमआल=वहिवाट, परिपाठ, इस्तिमालि=वापरण्यायोग्य]

**इस्तमेल**—स्त्री १ (हिशेब) जमाखर्चाची एक चाव, जमेच्या रकमा खर्ची व खर्चाच्या रकमा जमा टाकणें, मांडणें उ० धान्य वगैरे प्रथम खर्ची टाकून, त्याचें पीठ कोंडा वगैरे नतर जमा करणें –भाअ १८३३–१४०, १८३४ ४५ २ घालमेल, वर्गा वर्गी उलटापालट, घडामोड [अर इस्तिकमाल=पूर्णता, पुरें करणें]

**इस्तरी, इस्त्री**—स्त्री स्त्री, बायको, बाई अस्तुरी पहा 'मी बी पुरुषराज्यातून इस्तरीराज्यावर एकदम हापल्गें' –बाय २ २ [स्त्री अप.]

**इस्तरी इस्त्री**—स्त्री धुतलेला कपडा ओलसर असताना त्याच्यावरील सुरकुत्या जाऊन त्यास कडकपणा येण्यासाठीं त्यावर (ज्यात विस्तव आहे असें) फिरवावयाचें यत्र यानें कपडा झगझगीत होतो या यत्राचे पोकळ व भरीव असे दोन प्रकार आहेत अभिप्राय, जुदी करण्याचें यत्र ०**करणें-मारणें**-इस्त्री करणें, अभिप्रायानें कपडा सफाईदार करणें 'या धोत्रास इस्त्री करून या' [हिं इस्तु=विस्तव+आर-आरी, म विस्तव]

**इस्तस्वाब**—पु पसति, सत्य 'त्याचे इस्तस्वाबानें काम करावें '–रा ७ ५८ [अर इस्तिस्वाब्=पसती, सत्य]

**इस्ताद**—स्त्री सिद्धता, तयारी [अर इस्तिअदाद्=सामर्थ्य तयारी]

**इस्ताद**—स्त्री १ चुन्याचें पक्कें बांधकाम 'इस्तादेचीं घरें' –मराआ २ चीजवस्त, सामानसुमान, जंगम मालमत्ता । फा इस्ताद=उभे, उभें केलेलें]

**इस्ताफा इस्तीफा**—पु नोकरीची सोडचिठ्ठी, राजीनामा 'आम्हास दौलत नलगे, मक्केस जावें किंवा घरीं बसून राहावें या भावें आम्ही नबाबास इस्ताफाही लेहून पाठविला '–रा ३ ४११ 'याचा इरादा आहे कीं येथील कामाचा इस्तीफा द्यावा '–दिमरा २ १८ [अर इस्तिअफा=क्षमेची याचना]

**इस्तारी**—स्त्री (प्र) विस्तारी (व राजा कुण) पसावळ, 'इस्ताऱ्या माडा ' [स विस्तृ–विस्तर–विस्तार, विस्तरण]

**इस्तावा**—पु १ नवीन जमीन लागवडीस घेते वेळीं काहीं वर्षेपर्यंत भर साऱ्यापेक्षा कमी परंतु दरसाल वाढत्या साऱ्यानें देण्याची पद्धत २ अशा तऱ्हेनें दरसाल वाढणारा सारा ३ (घाटी) नास्ति, अभाव, टाळा 'आज जेवणास इस्तावा पडला' ४ बरोबरी, लढाईची तहकुबी करून बरोबरीच्या नात्यानें तहाचें बोलणें करणें –शर [अर इस्तिवा=बरोबर, समान] °कौल–पु वरील प्रमाणें वाढणारा जमिनीचा सारा

**इस्तियाक मुस्ताकी**—स्त्री प्रेम, लोभ 'ज्या ज्या प्रसंगोचित इस्तियाक–मुस्ताकीच्या गोष्टी बोलावयाच्या त्या नबाब निजामुदौला बहादूर याणी बयाण केल्या '–रा १ १८७ [अर इस्तियाक् मुस्ताकी]

**इस्तिहार, इस्तेहार**—पु जाहीरनामा, प्रसिद्धिपत्रक, इश्तिहार पत्र 'नऊ तारखेच्या होळकर सरकार गॅझेटमध्यें वाणी लोकांसंबंधीं जो इस्तिहार महाराजांनीं प्रसिद्ध केला आहे तो पसंतीदार आहे '–विविज्ञा १ १२७ [अर इश्तिहार]

**इस्तीफस्ती**—स्त्री (गो) बखेडा

**इस्तु, इस्तुव, इस्तो**—पु (कुण) विस्तव 'गाऱ्याच्या डोक्यावर इस्तुव कुठं हाय '–बाय ४ २ (खा) 'इस्त्याचा खेय नको करू=विस्तवाशीं खेळूं नको

**इस्तेरेत**—न (गो) स्नान उचीनी साधी खाट [इ स्ट्रेचर]

**इस्दार**—बाहेर काढणें, प्रसिद्धीकरण 'दस्तक इस्दार करून पाठविले आहे '–रा ३ ६१ [अर इस्दार्]

**इस्पिक**—पु पत्त्याच्या खेळांतील एक रंग, काळा बदाम 'इस्पिक हुकुम योरलास याय! आता बाराच वाजवितो' [इ स्पेड]

**इस्पिट**—न सट्यावयाचे पत्ते, पत्त्याचा डाव [इस्पिक पद्दा]

**इस्पिंजर**—पु (स्थापत्य) दोन कमानीमधील त्रिकोणाकृति दगड ज्या दगडापासून कमानीच्या वाकणास सुरवात होते तो दगड [इ स्प्रिंजर]

**इस्पितळ**—न दवाखाना, रोग्याची राहण्याची व औषधपाण्याची तजवीज जेथें करतात असें स्थान, दवाखाना (उप) वेश्यांचें इस्पितळ 'एखादे राजेश्री जर घरातील सर्व इस्टेट रसुद्यात टाकावयास निघाले तर त्याचे आप्तवर्ग त्यास इस्पितळाचा मार्ग दाखवितील –टि ४ २१ [इ हॉस्पिटल]

**इस्फळ**—वि (कुण) मत्य, अचपळ, त्रासदायक, खोडकर [अचपल अप]

**इस्माळी वसणें, इस्मून वसणें**—(माण) विस्मरणात असणें, विसरून बसणें [विस्मरण अप]

**इस्राएल, इस्रायल**—पु १ देवाशीं झगडून जय मिळविणारा, याकोबाला देवानें दिलेलें नाव, 'इत पर तुला याकोब म्हणणार नाहींत, तर तुला इस्रायल हें नाव प्राप्त होईल '–उत्प ३५ १०, ३२ २८ निर्ग १८१ करिंथ १०१८ रोम ९६ २ याकोबाचे वंशज, ज्यू लोक व त्यांचा धर्म, हे इस्रायल लोक याहवे देवतेचे उपासक आहेत या धर्माचें मूळ उत्पत्तिस्थान पॅलेस्टाईन होय, हिंदु व इस्रायल धर्मांच्या वैचारिक व सामाजिक इतिहासात अनेक साद्दश्यें दृष्टीस पडतात [हिब्रू –सारा=स्पर्धणें+एल्=परमेश्वर]

**इस्राव**—स्त्री (चामारी धंदा) चपलेच्या वरच्या भागाचें नाव, आगळ्यास लावलेली पट्टी (कि° ओवणें) [इ स्ट्रॅप]

**इस्लाम**—पु मुहंमद पैगंबरानें स्थापिलेला धर्म, मुसलमानी धर्म, मुसलमान [अर इस्लाम्]

**इस्लामी**—वि इस्लाम धर्मासंबंधीं, मुसलमानी

**इस्वण–न, इस्वाळ**—पु (कों) कोंकण किनाऱ्यावर सापडणारा एक पिवळा मासा

**इस्वाट**—न (कर) परडें, पसू

**इस्वाटी**—पु (कर) परड्याचा रखवाली, रक्षण करणारा देव

**इह**—क्रिवि येथें या लोकीं 'इह गोमिसी कीं पुढतीं '–गुच ९ ३७ [स] °जन्मी–जन्मांत–क्रिवि या जन्मीं, या लोकीं, या आयुष्यात [स इह+जन्म] °ना परं–क्रिवि इकडे नाहीं आणि तिकडे नाहीं 'इद च नास्ति पर च न लभ्यते ' [स इह+न+पर] °पर लोक–पु मृत्यु लोक आणि स्वर्ग लोक [स] °फल–न या लोकचें फळ [इह+फल] °भोग–पु मृत्युलोकींचा भोग 'अर्जुना मसर। अवघेंचि घर्ती यारे। तव क्षणिक पडतरें। इहभोगाचीं ॥' ज्ञा १५ १९८ [इह+भोग] °लोक–पु मृत्यु लोक, परलोकाच्या उलट °वृत्त–न (वर्तमानपत्री) स्थानिक वृत्त, बातम्या

**इहदे-इहिदे-हे**—वि एक, वाहेद [ अर अहद्=एक ]

**इहसान**—न ( व ) कृपा, मेहेरबानी, उपकार 'दौलता यादवें यत्र आम्हास याचें म्हणूनच स्वामींनीं वय जहागीर दिली, सारांशनिमित्तीकरिता न दिले हेंहीं मोठें इहसान सेवकावर ' –ख १३९ 'आमच्यावर काय इहसान ( उपकार ) आहे ?' [ अर इह्सान ]

**इहा**—स्त्री इच्छा [ सं ईहा ]

**इहीं**—सना अव या, यांनीं, यानीं, इ ची तृतीया विभक्ति 'इहीं लक्षणीं अलक्षण ' –विपू १ ५० 'मोठा अपराध इहीं, प्रभुनीं या योग्य दंड हा केला । ' –मोमभा ३ ६८ [ इ=हे ]

**इहीर**—स्त्री ( खा ) विहीर

**इळ**—पु. ( व कर कुण ) वेळ, दिवस [ विळ अप ] म्ह० ( व ) इळ गेला इळाचा, माथा धुतं तिळाचा=दिवस व्यर्थ घालवून रात्रीं काम करणें या अर्थी ०**भर**-क्रिवि सारावेळ ०**वरी**-क्रिवि या वेळपर्यंत, आतापर्यंत, इतका वेळ **इळानइळ**-क्रिवि ( ना ) सारा दिवस, दिवसभर

**इळक**—स्त्री ( कर्ना ) उचकी

**इळत-द**—स्त्री एक शेतकी हत्यार, नांगराचा फाळ किंवा पावडें यांची माती खरडण्याचें साधन, खणतें, वेडारण्यास शेवटास वखविलेली लोखंडी शिर हिनें फाळास लागणारी माती वगैरे खर डून काढतात ( व ) वखर किंवा नांगर यांच्या फाळावरील माती साफ करण्याचें हत्यार ( गो ) लाकडी कुदळीच्या टोकास असलेली लाकडी अणी [ सिं द, विळा, सं इलि, अर आल्त्= हत्यार ]

**इळंसाट**—क्रिवि ( व ) दिवसभर 'शेतकरी इळसाट शेतांत काम करतात ' [ वळ ]

**इळा**—पु विळा पहा 'इळे कुराडया दोरी साहिल्या ।' –दावि ४४५ [ सं इलि=एक प्रकारची तरवार, का इळगा, इलिगे, अर आल माल्ल ] ०**खिळा**-पु १ घरांतील हलकी, भारी चीजवस्त, लहान मोठया वस्तु सर्व जंगम मालमत्ता २ किरकोळ वस्तु सटरफटर माल [ विळा+खिळा ] **अंगाचा, शरीराचा इळा खिळा करणें**-अतिशय श्रम घेणें, फार मेहनत करणें, श्रमणें इतर वाक्प्रचाराकरिता विळा पहा

**इळी**—स्त्री विळी पहा 'नातरी इळीपळी आडकित्ता । यासी काय तुळावी रत्नलता । चंदनकाष्ठ चंदे दवमाथा । तयासी एरंड समान काय ।' –जै ६२ २१ [ इळाचें लघुत्व ]

**इळीमिळी(चि)गुपचिळी**—उद्गा आतां चुप गप बसा ! ( मुलें गप्प रहावीं म्हणून घालावयाची शपथ ) अळीमिळी गुप चिळी पहा

**इक्षु**—पु ऊंस 'रणभूमीचा पाणा करोनि सरिसा । महाबाळ इक्षु गाळीतुसें जैसा ।' –शिशु १०४३ [ सं ] ०**कांड-दंड**-पु उसाचें पेर, कांडें, ( गामा ) ऊस. 'नातरी इक्षुदंड । पाळितया गोड ।' –ज्ञा १२.२०० –एरस्व ६ ८६ ०**मेह**-पु मधुमेह ०**यंत्र**-न चरक, उसाचा रस काढण्याचें यंत्र ०**रस**-पु. उसाचा रस 'नाना प्रभा व्यापे प्रभाशु । गोडिया इक्षुरसु ।' –ज्ञा १८. ५०१ ०**रसासव**-पु उसाच्या रसापासून केलेली दारू, मद्य ०**शर्करा**-स्त्री उसापासून होणारी साखर ( इं ) सॅकरोज, ( फ्रक्टोस नव्हे )

---

# ई

**ई**—मराठी स्वरमालेतील चौथा वर्ण अक्षरविकास इ प्रमाणेंच

**ई**—सना ही, इ पहा 'निंदा सकळ पापाचे माथा । ई परता असेना ।' –एभा ९ ५०३ ( खा ) 'बाय ई बोरें एहें हें काह ?' बाई, ही बोरें अशीं का ?' –भिन्नीभाषा २७ [ सं एतत्, एषा ]

**ई**—उद्गा. उपहासात्मक अव्यय, थट्टा करण्यासाठीं, लाजविण्या करिता योजितात विशेषत स्त्रियांत रूढ 'ई! आता कशी म्याली गे ?' [ सं ई =एक उद्गार ]

**ई**—बहुमानार्थक, आई या शब्दाचा संक्षेप, जसें-ताराई, जिजाई इत्यादि

**ई**—भाववर्शक प्रत्यय हा नामास किंवा विशेषणास लावला असता तद्भावदर्शक भाववाचक नामें होतात जसें-गरीब-गरीबी, नरम-नरमाई, खुष-खुषी, एक एकी [ फा ]

**ई**—सना हा, ही, हें, दरबारी पत्रांत लेखक स्वत स या शब्दानें संबोधितो 'ई जानब ' [ फा ईन् ]

**ईचा**—पु संशय-मनकी [ सं वीचि=चंचलता ? ]

**ईझीचेअर**—स्त्री आराम खुर्ची, प्रशस्त रेलून बसण्याची एक खुर्ची इझीचेअर पहा 'ईझीचेअर आहेच ही आपल्या करिता ! –मोर ३२ [ इं ]

**ईट**—स्त्री वीट पहा [ सं इष्टका ] ०**बंदी**-वि विटांनीं बांध लेलें-ली ( घर भिंत )

**ईट**—न भाल्यासारखें एक हत्यार इंट पहा [ ते ईट ]

**ईड, ईडलिंबू-लिंबू**—न १ गवड लिंबू, लिंबासारखें परंतु थोडें मोठें असलेलें फळ, याचें लोणचें करतात, रसाचें लेमोनेड करतात फळाचा रंग पिंवळा असून साल खडबडीत असते हें आंबट फळ असून शूळ, आजय वात व पित्त यांचा नाश करतें हें अग्निमांद्य घालविणारें व कृमिनाशक आहे –स्त्री ईडलिंबाचें झाड [ का ईडे ]

ईडपीड—इडापिडा पहा

ईड येणें—क्रि (कर्ता) पुरुषांस, रेल्वेस होणें [का इडिकु=घट्ट धरणें, दाटणें, म बीट]

ईडेपाडें—क्रिवि भेटानें, घटाघोटीनें, ईर्षेनें इडेपाडें पहा 'दोही दळींचे ईडेपाडें। यावर मांडिले चटेंचडें।' –वेसीस्व ११ ७० [सं ईर्षा=ईर, ईडची द्वि]

ईडेपिडे घेणें—क्रि दृष्ट काढणें (बोटें मोडून) इडापिडा पहा 'तिती घेती ईडपिडे '–वेसीस्व २ १८

ईड्य—वि स्तुत्य, स्तुति करण्याजोगा 'गटगुणमंडित पण्डित दडि तपस्वीड्य सद्विवेकगिता।'–मोसभा ८ ५७ [स ईड्=स्तुती करणें]

ईण—स्त्री (कर) विहीण [विहीण अप]

ईत, ईति—स्त्री अतिवृष्टि, अनावृष्टि, उंदीर, टोळ, पोपट, राजकीय जुलूम (स्वचक्र) व परचक्र या सात प्रकारांनीं होणारा उपद्रव [स ईति=उपद्रव]

ईथर—पु पृथ्वीभोंवतीं ज्या वायुरूप पदार्थाचें सर्वव्यापी वेष्टण आहे तो, द्रव, द्रवत्, आकाशतत्त्व [इं]

ईद—स्त्री मुसलमानी सण दोन ईदा मुख्य (अ) ईदउज्जुहा, ईदुज्जुहा किंवा ईदेकुर्बाणी म्हणजे बकरीद, आणि (आ) ईदुउल्फित्र म्हणजे रमजान ईद–रोजे–उपवास सोडण्याचा सण 'गनिमास ईदेबद्दल बखें पावलीं नव्हतीं'–दिमरा १ १६१ –पु स्त्री विवाह झाल्यावर प्रथम वर्षी संक्रांत, दिवाळी, दसरा इ० सणाला वधूवराकडून एकमेकांस तिळगूळ गाठया वगैरे भेट नजराणे पाठवितात त्यापैकीं प्रत्येक किंवा प्रत्येक सण [अर ईद्]

ईदृश—वि अशा प्रकारचा, असला [स]

ईनमीनतीन ईनमीन सवा-साडे-तीन—संख्येनें अगदीं कमी (माणसें), अगदीं अल्प, थोडी संख्या (वस्तु माणसें इ०) 'या संख्येच्या इन-मीन-तीन सभासदांपैकीं दोघे बाहेर जाणार, तेव्हां राहिलेल्या एका सभासदाच्या संस्थेचा कारभार एक मतानें व एकसूत्रीपणानें चालेल, यांत कोणालाच शंका नव्हती' –मुपे २६२ [इनमीन सवातीन याचा संक्षेप, हिन्दी (बायको) न=आणि, मी=स्वत न=आणि स=तो (मुलगा अर्धा) वा=अथवा ती (मुलगी अर्धी)=मिळून तीन माणसें, किंवा इँ मिँ, तिँ,=मी आणि ती –भाअ १८३२]

ईप्सिणें—सक्रि इच्छिणें 'तैसे शतक्रतु यजिजे माते। मी ईप्सितातिं स्वर्गसुखातें।'–ज्ञा ९ ३१२ [स ईप्सा]

ईप्सित—वि इच्छिलेलें 'मग ते तुम्हा ईप्सिता'–ज्ञा ३ ९८ भोजाचे पुरवून ईप्सित मुनी तो होय अंतर्हित।'–विक (गोज) १९ [स]

ईर—वि वीर पहा 'असे लगटे झागी पर, सरसले ईर' –ऐपो ३४४ ०पीर–वि धाडसी मनुष्य 'हे पहा मिस् विलायत, मोठेमोठे ईरपीर हा गुंतागुंतीचा प्रश्न सोडवित सोडवित थकले' –सु ६५ [स वीर अप]

ईर—स्त्री १ शक्ति, उत्साह, सामर्थ्य, तरतरी २ शौर्य, उत्कृष्टपणा, पौरुष व गुणमना याचा समावेश ज्यांत आहे असें (मुना, पीठ इ०), तत्त्व विरी पहा [स वीर्य]

ईर—स्त्री १ चढाओढ, स्पर्धा, चुरस २ हरकत, अडथळा, तटा (क्रि० धरणें, येणें) –पया ३०८ 'यासि जो ईर येईल त्याचे वशावरि गाढव असे' भगळवेडें येथील शिलालेख ३ युद्धि वळात राजास दुसऱ्याच्या मोहऱ्याचा बसणारा जो शह तो लागू न पडायाजोगी मध्यें आपले मोहरें प्यादें याची असण्याची जी स्थिति ती, यावरून पुढील वाक्प्रचार पडले आहेत **ईरेस पडणें** सांपडणें–धाक्यांत गोत्यांत सापडणें, कठिण प्रसंगांत सापडणें **ईरेस घालणें**–स्वतःच्या बचावासाठीं दुसऱ्यास पुढें करणें, धोक्यांत घालणें, किल्ल्याचा दरवाजा फोडताना त्याला असलेले लांब लांब खिळे हत्तीच्या धडकेबरोबर त्याच्या कपाळांत शिरूं नयेत म्हणून मध्यें रोडक्याचा उंट घालणें **ईरेस पडणें–चढणें**–चुरशीनें, अभिमानानें पुढें सरसावणें, कंबर कसून वचनबद्ध होणें 'मोहरे मोहरे ईरेसी पडती'–सप्र २१ ५१ 'माझा ईरेस पडला'–सग्रामगीतें ९९ [स ईर्=प्रेरणा करणें]

ईरतवान—वि (माण) हिंमतवान, ईर्षावान [ईर]

ईरतीनें वागणें—क्रि (माण) हिंमतीनें वागणें [ईर]

ईरमोड—स्त्री हिरमोड, निरुत्साह, निराशा [ईर्षा–ईर+मोडणें]

ईर्षा, ईर्ष्या—स्त्री १ हेवा मत्सर २ चुरस स्पर्धा, चढाओढ ३ संकल्पित कार्य तडीस नेण्याविषयीं मनीं असणारा अभिनिवेश, उत्साह अभिमान ईर पहा (क्रि० धरणें, येणें) 'मी ईर्षेत पडलों' ०देणें–एखाद्यास उत्तेजन देणें, उचलून धरणें, चढविणें

ईर्षालु—वि (विह) ईर्ष्यालु १ ईर्षा बाळगणारा, उत्साही, वीरश्रीचा २ हेवेखोर, मत्सरी [स]

ईव—पु (व) पाठीच्या कण्याच्या दोन्ही बाजूचे मानेपासून कमरेपर्यंतचे फुगवटे पाठीचे स्नायू, प्रत्येक २ (व) पाठींत या भागात येणारी कळ उसण 'ईव लागला जरा चेप'

ईश—पु १ ईश्वर २ राजा, मालक, धनी, सम्राट, अधिपति सामासिक–जगदीश, महेश, वगैरे इ० 'जो प्रजाधर्मेवीण प्रजाशु। जो ईशितृधर्मेवीण ईशु।'–ज्ञा १० ४४५ २ शंकर 'राज्य त्यजिलें ईशानें'–ज्ञा १२ ७४ [स]

ईशान—पु मालक, धनी, राजा, ईश पहा

**ईशानी-न्य**—स्त्री (प्र) ऐशानी उत्तर आणि पूर्व यामधील दिशा, ईशान्य दिशा [स ईश्, ऐशानी]

**ईशिता**—स्त्री १ प्रभुत्व, वर्चस्व २ शंकराच्या आठ स्वरूपां पैकी एक, अष्ट महासिद्धींपैकी एक 'अष्टमहासिद्धि' पहा

**ईश्वर**—पु १ परमेश्वर, जगाचा नियंता, देव २ शंकर किंवा विष्णु ३ स्वामी, राजा, सत्ताधीश, अधिराज ४ अवाढव्यता, विशालता दर्शविण्यासाठी हा शब्द व्यापकतेने सामासिक शब्दांत पुढील प्रमाणे मराठीतून उपयोजितात, त्यामुळे हे शब्द येरेवाढे व वर्णवृद्ध होतात जसे—डोंगरेश्वर, धोंडेश्वर, रानेश्वर, वाडेश्वर, पाटेश्वर, नरीश्वर, फुकेश्वर वगैरे ५ सर्वश्रेष्ठ या अर्थी शब्दाच्या शेवटी लावतात जसे—नरेश्वर, योगीश्वर, परमेश्वर 'तोचि भरवसेनिली। योगीश्वर।' —ज्ञा ६ ४७ [स] ॰कर्तृत्व-कृति-न स्त्री दैवी कृति, ईश्वराची करणी ॰कृपा-स्त्री परमेश्वराची कृपा, ईश्वरीकृपा ईश्वरीप्रसाद ॰तनुचतुष्टय-ब्रह्मांडाची चार अंगे—महामाया, अव्याकृति, हिरण्यगर्भ व विराट 'महामाया मूळप्रकृती। कारण ते अव्याकृती। सूक्ष्म हिरण्यगर्भ म्हणती। विराट ते स्थूळ।'—दा १० १० १४ ॰दत्त-वि ईश्वराने दिलेली, दैवी ॰नियमित-वि ईश्वराने योजिलेले, ठरविलेले ॰प्रणिधान-न ईश्वराची आराधना ॰प्रसाद-पु देवाची कृपा, ईश्वरकृपा ॰प्रीति-स्त्री १ ईश्वराची मर्जी, प्रसन्नता २ देवाची कृपा, ईश्वरीकृपा ॰प्रीत्यर्थ-क्रिवि देवास आवडीचे म्हणून, देवास प्रसन्न करण्यासाठी (दिलेले) ॰भक्ति-स्त्री ईश्वराची पूजा, उपासना, आराधना इ० ॰भाव-पु ईश्वरावर निष्ठा, आस्तिक्य बुद्धि, याच्या उलट अनीश्वरभाव ॰माया-माव-स्त्री देवाचा चमत्कार, लीला, कृत्य, देवाची करणी 'आपण करू जाता एक। प्रारब्ध घडवी अनेक। ईश्वरमायेचे कौतुक। ब्रह्मादिका न कळेचि (अथवा नेणवेचि)' ॰सत्ता-स्त्री देवाची नियामक सत्ता, ईश्वरी सामर्थ्य, ईश्वराचा संकल्प (काहीं बरें वाईट होण्यास) ॰साक्षात्कार-पु परमेश्वराचे दर्शन परमेश्वरी दृष्टांत (अस्तित्वासंबंधी) ॰सूत्र-न १ ईश्वरी योजना ईश्वरी घटना, योगायोग प्रारब्ध दैव नशीब २ वधूवराचा परस्पर विवाहसंबंध होण्यास कारणभूत जो ईश्वरी संकल्प तो —राचा(घरचा)प्राणी-पु देवानेच सांभाळलेला प्राणी, गरीब प्राणी, असहाय मनुष्य, ज्यास कोणी आप्त मित्र नाहीं असा मनुष्य एखाद्याची कींव किंवा दया येऊन त्यासंबंधाने हा शब्द योजितात —राचा लाल-पु देवाच्या मर्जीतला माणूस ज्याची अतिशय भरभराट होत आहे असा, दैवाचा लाल

**ईश्वरपरिज्ञानपाठशाला**—स्त्री (ख्रि) थिऑलॉजिकल कॉलेज, ज्या शाळेत मुख्यत्वेंकरून ईश्वरविषयक ख्रिस्तीसिद्धांतांचे व तुलनात्मक धर्मशास्त्राचेंहि शिक्षण दिले जाते ती शाळा (इ) थिऑलॉजिकल स्कूल 'अहमदनगर येथील ईश्वरपरिज्ञानपाठशाला नाशिक येथे पुन्हा येथे आली' —ज्ञानोदय १७ १ १९१८ [स]

**ईश्वरार्पण**—न परमेश्वराला अर्पण करणे, परमेश्वराला वाहिलेली वस्तु [स]

**ईश्वरावतार**—पु १ देवाचा अवतार, मानवदेहधारी ईश्वर २ (ल) ईश्वरावतारी, ज्याच्यामध्ये दैवी गुण आहेत असा मनुष्य पुण्यशील, उदार पुरुष [स]

**ईश्वरी**—स्त्री शक्ति, दुर्गा, लक्ष्मी, सरस्वती, आदिमाया इ० देवता —वि १ ईश्वरासंबंधीचा २ (काव्य) अतिशय भव्य, उदात्त, विपुल, अद्वितीय वगैरे अर्थीहि वापरतात जसे—ईश्वरी आनंद ईश्वरी गारा, ईश्वरी वज्र, लाभ, सोहळा असा तन्हेचा याचा उपयोग शुद्ध आणि अभिजात असून ईश्वर अर्थ ४ प्रमाणे तो सदोष नाहीं [स] ॰आनंद-पु १ परमेश्वरस्वरूपात मानिलेला आनंद, सुख, ईश्वराच्या ठिकाणी वाटणारा आनंद २ परमेश्वरापासून मिळणारे सुख ३ अत्यंत सुख, दैवी सुख, ब्रह्मानंद ॰उत्पात-पु दैवी आपत्ति, चमत्कार, भयंकर स्वरूपाचा सृष्टचमत्कार (वीज, धूमकेतु इ०) ॰ऋणानुबंध-पु परमेश्वरी, दैवी घटना, दैवी नेमानेम, विधिघटना ॰करणी-कृत्य-कर्तृत्व-स्त्री न परमेश्वरी लीला, ईश्वरकृत गोष्टी ईश्वरकृति पहा ॰कळा-स्त्री ईश्वरी लीला, परमेश्वरी कृत्य, देवाचे कौशल्य, चातुर्य ॰कौतुक-न ईश्वरी लीला, ईश्वराने घडवून आणलेला चमत्कार, परमेश्वराची सृष्टिरचना, नियमन व प्रारब्धाधीन गोष्टी याना हा शब्द योजितात ॰गादी-स्त्री न्यायासन, धर्मासन ॰चेष्टा-स्त्री परमेश्वरी कृत्य, खेळ; ईश्वरी लीला, कला ॰जीव-प्राणी-पु १ सृष्टींतील प्राणी २ योगी, तापसी ॰तंत्र-ईश्वरी घटना, योजना, कार्य, पद्धति, सृष्टिव्यापार चालण्यासाठी ईश्वराने करून ठेवलेली योजना ॰तेज-न १ सत्त्वशील माणसाचे तेज सात्त्विक माणसाच्या ठिकाणी दिसून येणारी कांति प्रभा २ (धंदे)शुद्ध सोने ॰देणे-देणगी-नस्त्री १ ईश्वराने दिलेली देणगी, प्रसाद २ जन्मजात गुण, दैवी गोष्ट ॰नाश-पु १ महाप्रलय, जगाच्या शेवटी होणारा मोठा जलप्रलय २ (ल) महासंकट, अरिष्ट, अनर्थ, दैवी आपत्ति ॰नियम-नेम-नेमानेम-पु दैवी घटना, ब्रह्मलिखित सृष्टिनियम ॰न्याय-पु देवाच्या घरचा न्याय, खरा, वास्तविक न्याय ॰पराक्रम-पु दैवी सामर्थ्य शक्ति ॰पसारा-पु ईश्वरनिर्मित सृष्टि जग, जगदुत्पत्ति ॰पुरुष-पु १ साधु वैराग्यशील, पुण्यपुरुष २ भोळा, सरळ वृत्तीचा माणूस ॰प्रसाद-पु (प्र) ईश्वरप्रसाद, देवाची कृपा ॰फळ-न १ देवाने दिलेली वस्तु देवाची देणगी २ पुत्र ॰बल-ळ-न अचाट शक्ति, असाधारण बळ, ईश्वरी पराक्रम अलौकिक, अमानुष सामर्थ्य ॰भावना-स्त्री सत्प्रवृत्ति पुण्यशीलता साधुवृत्ति परमार्थनिष्ठा ॰महिमा-पु ईश्वराचे सामर्थ्य थोरत्व ॰माया-ईश्वरमाया पहा ॰मुद्रा-स्त्री दैवी तेजयुक्त, अत्यंत सतेज, तेजःपुंज अशी चर्या ईश्वरी तेज

पहा ०यंत्र—न १ सर्व सृष्टी, ईश्वरी तत्र पहा २ प्राणी, जीव, वनस्पति वगैरे ईश्वरनिर्मित वस्तुजात ०लाभ—पु अकल्पित, अत्यंत मोठी प्राप्ति ०लाल—ईश्वराचा लाल पहा ०लीला—स्त्री ईश्वरी कृति, खेळ, परमेश्वरी कृत्य ०वाचा—स्त्री देववाणी, आकाशवाणी, साक्षात्कार वगैरे स्वरूपानें किंवा एखाद्या महात्म्याच्या मुखाच्या द्वारें प्रगट होणारी वाणी, ज्ञान ०संकल्प, संकेत—पु विधिघटना, नेमानेम, प्रारब्ध ०साक्षात्कार—पु देवाचें प्रत्यक्ष दर्शन, देवानें दाखविलेला चमत्कार, दृष्टांत ईश्वरसाक्षात्कार पहा ०सूत्र—ईश्वर सूत्र पहा ०सोहळा—पु १ अत्यंत थाटाचा, शोभायुक्त उत्सव आनंददायक प्रसंग (समाराधना, खेळ, मिरवणूक वगैरे) २ कोण त्याहि देवाप्रीत्यर्थ केलेला उत्सवसमारंभ ३ परमेश्वराच्या या सृष्टींतील घडामोडी, मनुष्याच्या आयुष्यांतील प्रकार वगैरेंच्या चिंतनानें वाटणारा आनंद ०क्षोभ—पु दैवी आपत्ति, अरिष्ट

**ईश्वरेच्छा, ईश्वरी इच्छा**—स्त्री परमेश्वरी इच्छा, ईश्वर सत्ता, देवाची मर्जी [स ]

**ईषणा**—स्त्री इच्छा, प्रेम, उत्सुकता, काळजी, आस्था, आसक्ति सामाशब्द—लोकेषणा, पुत्रेषणा, वित्तेषणा, दारेषणा [स इष्]

**ईषत्**—क्रिवि थोडेसें, किंचित् 'तरी अधिक नोहे ईषत् । मर्यादा न सडी ।'—ज्ञा २ ३५८ सामाशब्द— ईषदुष्ण, ईषद्दर्शन, ईषद्दोष, ईषन्मात्र, ईषत्कर [स ]

**ईषा**—स्त्री दांडा (गाडीचा, नांगराचा), इसाड, धुरा, ईस 'चढला होता धातुनि ईषेवरि नाम करुनि तरवारी।'—मोद्रोण ११ ५० [स ]

**ईषिका**—स्त्री कुंचली, ब्रश 'चित्रकाराची जशी ईषिका तशी वाणिका कवीची ॥'—नि १२२ [स ]

**ईस, ईसाड**—ईषा इसाड पहा

**ईस**—उद्गा इश्श, छी, शी इश्श पहा —स्त्री न तिरस्कार, विषाद, नापसंति ०म्हणणें—१ तिटकारा, कंटाळा, नापसंति दाख विणें 'ईस देखील म्हटली नाहीं' 'मनात ईस देखील आली नाहीं' २ एकदम दु ख वाटून हाय असें विवळणें

**ईसवी**—इसवी पहा

**ईसा**—पु येशू खिस्त

**ईसा**—स्त्री ईर्षा 'मारीन आपुलीया ईसा।'—उषा १० ८० [स ईर्ष्या]

**ईस्टर**—पु गुडफ्रायडेनंतर पहिल्याच रविवारीं होणारा खिस्त पुनरुत्थापनानिमित्त वार्षिकोत्सव, एक खिस्ती सण [इ ]

**ईहा**—स्त्री १ इच्छा २ हातीं घतलेलें काम, उद्योग, व्यापार कृत्य 'या नाव काम जाण । कामक्रिया ते ईहा पूर्ण।'—एभा ५ ७८ [स ]

**ईहित**—वि इच्छिलेलें [स ]

**ईळ**—पु (कुण) वेळ, काळ इळ पहा [स वेला] ०भर—क्रिवि (व) दीर्घकाल, पुष्कळ वेळ, दिवसभर 'एवढा ईळभर बसला'

**ईक्षण**—न १ अवलोकन, पाहणें २ डोळा, नयन 'देवो उन्मेषसूक्ष्मेक्षणु । विघ्नराजु ॥'—ज्ञा १ १५ [स ईक्ष्=पाहणें] ०यंत्र—न एक प्रकारचा आरसा, परंतु यांत कांचेच्या ऐवजीं धातूचा पत्रा असून त्यावरून किरणांचें याग त हें पृथक्करण होण्या करितां तो घासून चांगला चकचकीत केलेला असतो याचा उपयोग शस्त्रक्रियेच्या वेळीं आतरिंद्रियें पाहण्यासाठीं, तसेंच परावर्तक दुर्बि णींत करतात

**ईक्षणें**—सक्रि पाहणें, बघणें 'ईक्षोनि शिष्याचा मेळा दयाळु।'—दावि ३२२ **ईक्षित**—वि पाहिलेलें, अवलोकन केलेलें 'पर्जन्या! तर ये! कृषीवर हृदया मार्गाप्रती ईक्षती।'—केक ८१

---

# उ

**उ**—मराठी वर्णमालेंतील पाचवा स्वर, या अक्षराचें पहिलें स्वरूप अशोकाच्या (गिरनार) शिलालेखांत व आजचें स्वरूप इ स ८३७ च्या जोधपुर लेखांत आढळून येतें —ओझा —उपसर्ग उत्कट क्रिया, विरोध, अभाव, अपकर्ष इ० अर्थी क्रियापदास लागणारा एक उपसर्ग उ० उसवणें, उवळणें, उलगडणें इ० [स उत्, उद्] —पु विष्णु (ओम् मधील उ म्हणजे विष्णु) 'उकार विष्णुरव्यक्त' —गुच २ १३०

**उँ**—उद्गा अँ! काय' या अर्थी आश्चर्यार्थक किंवा प्रश्नार्थक उद्गार, याने नाखुशीहि दाखविली जाते [ध्व ]

**उं**—स्त्री एक कृमि केसांतील ऊ [रा यूका]

**उ॥**—उमर याचा संक्षेप

**उइला**—वि ओवाळींनीं भरलेला [कु ]

**उक**—स्त्री १ झळ माधिया विरहाग्नीची उक तू कैसेनि साहसी —भाए ७० लागे जैसी दावानळाची उक।'—शाप्र ७७० २ उकळी, उठाव [का उक्कु—उत येणें, कढ येणें]

**उकट**—उकड पहा

**उकटणें**—उक्रि १ पाल्हाळा दस्ती देणें, जातें पुन्हा नव्या दारखें करणें (टांकी देऊन) २ (ल) तोंडावर देवीचे वण उठणें—पडणें [स उद्+कृत्=फाडणें, तुकडे करणें, कापणें, तुम० ग्रीक कर्‌ड, ग्री कद्रो, कॉर्टिस, लॅ कोर्ड, लॅ कर्टस, हिंदू कत्रतैपिन्]

**उकटणें**—उक्रि १ उखणें (तव्यावरील पाळी वगैरे) २ (राजा) उचकटणें पहा ३ (कुण) उकलणें पहा [उचकटणें, उकलणें, स उत्कर्तन, प्रा उक्कत्तण=उकडणें]

**उकटाई**—स्त्री १ जात्याला टाकी देण्याची मजुरी २ टाकी देण्याचें काम [ उकटणें ]

**उकटी**—स्त्री १ जात्याला टाकी दिल्यावर दळण्यात येणारें मूठभर धान्य ( जात्याची रेव जावी म्हणून ) २ टाकी देण्याचें हत्यार, टाकी ३ नवीन टाकी दिलेल्या जात्यावर दळलेल्या धान्याच्या रस्त्यावर घातलेल्या फुल्या, वर्तुळें 'कल्पतरूतळवटीं असे सूर्य कराची उकटी ' –भाए ६१३ ४ टाकी दिल्यावर दळलेल्या रेवेच्या पिठाच्या फुल्या ओलाडल्यामुळें पायाच्या टाचेस अगर तळव्यास येणारे फोड, गळवें [ उकटणें ]

**उकटीव**—वि टाकी दिलेलें, नवें केलेलें, दुरुस्त केलेलें (जातें )

**उकड**—क्रिवि उकिडवा, उकिरडा, मांडी न घालता ( क्रि० बसणें ) 'म्हणौनि उकड बैसोनि ' –पच १.११

**उकड**—स्त्री १ मोदक वगैरे करण्याकरिता शिजवून केलेलें तांदूळ वगैरेचें पीठ ( क्रि० तिंबणें ) –वि उकडलेला, शिजविलेला [ उकडणें, स उत्क्वथ ] **०आंबा, उकडांबा**–पु पाडाचा आंबा उकडून तोंडीं लावण्यासाठीं करतात तो, तो बरेच दिवस टिकावा म्हणून पाणखारात घालून ठेवितात **०गरे**–पु अव गरे शिजवून उकडून भाजी करतात ती फणस कोवळा असला म्हणजे त्याची अशी भाजी करितात –गृशि १ २०४ **०पीठ**–न तांदळाचें वगैरे उकडलेलें पीठ **०पेंडी**–स्त्री ( ना ) रव्याला फोडणी देऊन तयार केलेलें एक रुचकर खाद्य [ तुल० का उप्पिट्टु=खारा साजा ] **०पोळी**–स्त्री उकडींत गव्हाच्या साजाचें पुरण घालून केलेली पोळी **०रस्सा**–पु. मास, हाडें वगैरेपासून तयार केलेला रस्सा –गृशि २ ४९ **०लोणचें**–न उकडलेल्या लिंबाचें लोणचें, मिरच्या इ० **०हंडी**–स्त्री १ पावटे, भुई मुग वगैरेच्या ओल्या शेंगा एका मडक्यात घालून तें पालथें भुईवर ठेवून त्यावर विस्तव पेटवून उकडतात ती २ स्वैपाकात भांडें उलटें करून उकडण्याची एक पद्धत **उकडीचे मोदक**–पु अव नारळाचा कीस काढून, त्यांत साखर घालून तें पुरण तांदळाच्या पिठाची उकड तयार करून तिच्या पापडींत घालून उकडून तयार केलेला एक पदार्थ

**उकडणें**—उक्रि १ शिजविणें, उष्णता लावून पदार्थ खाण्या जोगा मऊ करणें 'तेणें सवही उकडती । अस्तिमास ॥' –दा ३ १ ३० २ हवेंत उष्णता भासणें, गुदमरणें 'जळचरें उकडानिया मरति । ' 'येथें दाटीमुळें उकडतें ' ३ ( सोनारी धंदा )( उका ळयाच्या तेलानें) मळ किंवा घाण काढून टाकणें [स उत्+क्वथ्, फा उाकु=उड् येणें, शिजणें ]

**उँकड्या, उकाड्या**—क्रिवि उकिडवा उकड पहा (गो ) उकड्या

**उकडा**—वि मीठ, मिरची, मसाला न घालता केवळ उकडून काढलेला (भाजी इ० पदार्थ) –पु (कों ) उकाडा पहा **०तांदूळ**–पु भात प्रथम उकडून मग काडून तयार केलेले तांदूळ, उकडे तांदूळ –पया ४२१ [ उकडणें ]

**उकंडा**—पु (व ना )उकिरडा 'घरापुढेंच उकंडा आहे ' [स उत्+कृ=वर फेकणें, ढीग करणें, खणणें, प्रा उक्करड ]

**उकडीव**—वि १ उकडलेलें, शिजविलेलें २ पाण्यात घालून थोडी आच दिलेले ( तांदूळ इ० ) [ उकडणें ]

**उकर-उकरी**—पुस्त्री उकरून काढलेली माती, उकीर पहा [ स उत्+कृ, प्रा उक्कर=ढीग, रास ]

**उकरड**—स्त्री ( कु ) नासाडी, खराबी, उकरडा 'काय उक रड केलीस ही ' = काय नासाडी केलीस ही [स उत्+कृ]

**उकरडा**—पु कचऱ्याची रास, घाण, गदळ वगैरे टाकण्याची जागा उकिरडा पहा [ स उत्कर=खणून काढलेली घाण, ढीग, रास, कचरा यज्ञामध्यें वेदीच्या बाहेर उत्कर असतो, प्रा उक्केर] **०फुंकणें**–अत्यंत दारिद्र्यावस्था प्राप्त होणें **–ड्याची दैना फिटणें**–क्षुल्लक वस्तूचाहि केव्हाना केव्हा तरी उत्कर्ष होणें (उकिर डाहि केव्हा केव्हा स्वच्छ होतो यावरून) **–ड्याची धण करणें**–चांगल्या वस्तूचाहि नाश दुरुपयोग करणें ( चांगल्या वस्तूंनीं उकि रडा समृद्ध करणें ) **–ड्यासारखा वाढणें**–बेसुमार वाढ होणें ( संकटें, कर्ज, मूल, दु ख, रोपटा वगैरेंची ) 'मुलगा उकरड्यासारखा वाढो । '

**उकरणें**—उ.क्रि १ खरवडणें, कोरणें, खणणें, पोखरणें, खवणें ( उंदीर, घुशी वगैरे जमीन कोरून काढतात त्याप्रमाणें ) २ जमीन किंवा एखाद्या वस्तूवर खोदणें, कोरणें, ( नख, दात, शस्त्र, इ च्या टोंकानें ) कोरून काढणें, खाचा पाडणें ३ एखादी गोष्ट मुद्दाम पुन्हा उपस्थित करणें, कलह उपस्थित करणें, भांडणाचें मूळ पुन्हा वर काढणें ४ खुबीदार प्रश्नानें खरी हकीकत एखाद्याच्या तोंडा तून बाहेर काढणें उकरून काढणें ही शब्दयोजना वरील अर्थ ३ व ४ यांत वापरतात –अ क्रि ( प्रा ) भिंतीचा गिलावा, भांड्याचें कीट वगैरे सुटून येणें, भांड्याला लागलेलें अन्न भिजून निघण्याजोगें सैल होणें [ स उत्+कृ]

**उकरमणें**—अ क्रि तवा वगैरेवरील खरवड, जळका अंश, खपल्या वगैरे दूर होणें, भांडें वस्त्र वगैरेचे पापुद्रे, मळ वगैरे सुटून येणें [ उकरणें अप ]

**उकराई**—स्त्री खोदकाम करण्यास (उकरण्यास) लागलेला खर्च, खोदकाम

**उकरी, उकरीड**—उकरडा, उकिरडा पहा

**उकरीव**—वि उकरून काढलेला ओरखाडलेला, कोरलेला, पोखरलेला, खवलेला

**उकल-ला**—पु १ उलगडा, गूढ गोष्टीचें स्पष्टीकरण 'या गोपिया योगस्थिनी । उकलु देखिला या वद्दुतीं । ' –शा ६ १८५.

'या गोष्टीचा उकल एक हरीच जाणे ' 'मला त्याचा काहीं उकला होत नाहीं ' –सूर्यग्रहण १९ २ उमज, खुलासा, बोध 'इत्यादि कर्मांचा उकल। होय ऐसें बोलों पाहतो बोल।'–यथा ४ ४१६ [ स उत्कल्=सोडविणें, मोकळें करणें ]

**उकलणें**—उ कि १ सैल करणें, उलगडा करणें, गुतागुत काढणें, मोकळा करणें 'देव्हूडिया वणिआ उकलेलिया। उघवटा गाठीं सूटलिया।'–शिशु ७१६ 'सावध व्हा-नरीं यमपाश कसे घातिला अहा! उकला।'–मोसभा ५ ११ २ फोडून निराळें करणें, दुफळी करणें, फोडणें, चिरणें, निराळा करणें, (गो) उकलास पहा ३ (ल) विवरण करणें, स्पष्ट करणें, फोड करून सागणें 'उकलू जाणे अतर। प्राणीमात्राचें।–दा १४ ७ १२ ४ मुक्त करणें, मुक्त करणें 'ससारीं गुतोन कायें। उकली ऐसें हृदयें। तो सत्व गुण।' –दा २ ७ ४३ –अकि १ स्पष्ट होणें, उघडणें, मोकळी होणें, सुटणें 'अगीं उटी दिसे सुढाळ। कीं इदुबिंब उकलें निर्मळ।'–ह ७ ११ २ उलणें, उमलणें (जमीन, फूल, कळी, दात वगैरे) 'उकलतेनि उन्मेखें। प्रज्ञाकुसलेंचि तिखें।'–ज्ञा १५ १८५ [ स उत्कल् ]

**उकलणें**–न (विणकाम) रेशीम वगैरे उकलण्याची आरणी.

**उकलाउकल**—स्त्री पुन पुन्हा सोडवाव, घडामोड, विचार न करता करणें व पुन मोडणें [ उकल द्वि ]

**उकलास**—पु (गो) देवाच्या नावें निराळा राखून ठेवलेला भाग, सवस्प [ उकलणें ]

**उकलीव**—वि १ सुटलेला, उलगडलेला, सोडविलेला, मोकळा केलेला २ उमललेला, विकास पावलेला ३ तडकलेला, उलडलेला, उललेला ४ स्पष्ट, साफ केलेला ५ घडी मोडलेलें (कापड वगैरे) [ उकलणें ]

**उकवण उकवीण**—न १ (कों) जखमेंतील कीड (किवण) नाहींशी करणारा मत्र २ तो मत्र म्हणण्याचा विधि, प्रयोग [ स कृमि+ व्रण, म किवण, उ+किवण ]

**उकवणें**—उकावणें पहा

**उकशी**—स्त्री एक ल्हान रानझुडुप

**उकसणें**—उकि (राजा) १ अस्ताव्यस्त करणें उसकटणें पहा २ (ना) खरवडणें [ स उत् + कृष्=वर ओढून काढणें ओढणें, फाडणें, प्रा उक्करिस, प्रा उक्कस? ]

**उकसाबुकशी-सां-सीं**—क्रिवि ओक्साबोक्शी पहा 'प्रेम पान्हा फुल्ल देवकीशीं। क्षणक्षणा विलोकी हरिमुखासी। मागुती धरी हृदयासी। उकसाबुकसी स्फुदत॥'–ह १९ १८८ 'आसुवें साडी उकसाबुकसा। धाव मदेसा धावण्या॥'–कथा १४ ८ १५६

**उकल**—स्त्री १ कढ उकळीपहा २ काढा, उकाळा पहा [ स उत्+क्वथ् वा उकिस ]

**उकळणें**—अकि १ रटरटा शिजणें, अधण येणें, बुडबुडे उत्पन्न होणें, खदखदणें, गुदगुदणें, उसळणें, सळसळणें, कढणें, कढ येणें, –उकि शिजविणें, कढविणें, काढा करणें, अर्क काढणें, उकाळा काढणें [ स उत्+क्वथ् ]

**उकळणें**—उकि (पैसा, अन्न भिक्षा वगैरे) वसूल करणें, गोळा करणें, लुबाडणें, उपटणें 'कवडें उकळीं भुतळीं '–शिशु १६२ म्ह० घुसळतीपेक्षा उकळतीचें घरीं फार [ उकळ ]

**उकळा**—पु १ लोकाकडून हक्कदारानें किंवा कुळाकडून सावकारानें गोळा केलेली बाकी, वसुली, उगरण २ भीक मागून जमा केलेला सग्रह ३ दुसऱ्याकडून उपटलेला जिनस, वस्तु. [ उकळणें ]

**उकळित**—उकळीत पहा

**उकळी**—स्त्री १ उकळण्याची क्रिया, कढ, अधण (क्रि० फुटणें, येणें) २ उमाळा, उत्कट इच्छा, उत्कठा, आव 'ब्रह्मा उपजला नाभिकमळीं। त्याच्या मनीं सृष्टीची उकळी। म्हणोनि प्रथम पुत्र मानस उपजले ' –यथादी १० १५७ ३ प्रेम, दु ख, राग इत्यादि मनोविकाराचा उद्रेक किंवा भरतें येणें, उमाळा (क्रि० फुटणें, येणें) 'रामकृष्णरगीं रसना रगली। अमृतउकळी नाम तुझें।' –तुगा २५०२ ४ बाहणारें पाणी अडलें असता होणारी अवस्था, लाटा, पाण्याची खळबळ 'वळणें वाकणें भोंवरे। उकळ्या तरग झरे।' –दा ११ ७ ३ [ स उत्+कल्, उत्कलिका ]

**उकळीत**—स्त्री न १ येणें असलेल्या पैशाची उगवणी, वसूल केलेली रक्कम २ भीक मागून मिळविलेला जिनस. ३ भिका वयाकरिता आणलेल्या बागाईत किंवा किराणा मालावर ऐनमालाच्या रूपानें वसूल केलेली (शेखदारानें) रकम, करवसुली ४ पाटलानें रयतेकडून वसूल केलेला सरकारी सारा ५ धारेकऱ्याना प्रत्येक हप्त्याची जी येणें रकम असेल त्या बाबतींत पाठविलेला फिरता हुकूम, याद, हिशेबाचा कागद अगर स्मरण [ स उत्कल् ]

**उकळेगिरी**—स्त्री लुटालूट, लुबाडणें, दरोडा

**उका**—स्त्री १ उल्का, तुटणारा तारा २ ठिणगी 'नीगती अग्नीचीया उका ' –उषा ११२५ [ स उल्का, प्रा. उक्का ]

**उंका**—वि (कों)(विरू) ओका उघडा, नागडा, हीन

**उकाइती**—स्त्री उकळीत, लुटालूट 'ह्या मुलखात आपली उकाइती किफायतशीर होईल असें त्यास वाटलें ' –कोकि १३४ [ उकळणें ]

**उकाडा**—पु खीव (दूध, भाजी, दळण वगैरे) रोज नियमितपणें घ्यावयाची पद्धति, रीत, नियमित वेळीं रकमा देणें, हप्ते देणें

**उकाडा**—पु १ अतिशय उष्मा, गर्मी २ (सोनारी धदा) माळ्यांना, अलकाराना उजळा देण्याकरता जे चिंच, रिंगाचा रस,

ॲसिड (तेजाब) किंवा इतर अम्ल पदार्थ आणि मीठ वगैरेंचें कढवून मिश्रण करतात तें. (क्रि० देणें; करणें ). उकाड्याचें तेल–न (सोनारी धंदा) सल्फ्युरिक ॲसिड उकाड्यासाठीं वापरतात म्हणून त्याचा पर्याय वाचक शब्द. [ सं. उत्+क्वथ् ]

**उकारमात्रा**—स्त्री. प्रणवाची ( अ, उ, म यापैकीं ) दुसरी मात्रा.

**उकाल**—पु १ निवाडा २घुसका; वेगळे होणें; निसटणें; मुक्तता ३ स्पष्टपणें दिसून येणें; बाहेर पडणें. ४ ( प्र. ) उकाला. आजारांतून उठणें; आराम वाटणें ( क्रि० पडणें; होणें. ) [ उकलणें ]

**उकावणें**—क्रि. १ वर येणें; चढणें; उंच होणें. 'मग मनीं उगलाचि उकावसी।' –दावि १३२. २ हैरस पेटणें, मरीस पडणें. 'पदे भद्र नृपापुढें उकावला चढोवढें।' –यसवक्त महाबळचरित्र ६ [ सं. उत्+क्रम्=वर चढणें; का उक्कु=चढणें ]

**उकाशी**—वि. ( गो. ) १ वरवरी धूळ; स्थायिक नसलेला. २ कांहीं शिल्लक न टाकणारा; उधळ्या.

**उकासु**—पु प्रवासी. –घार

**उकाळ**—पु १ काढा. २ नेम चुकून फुकट गेलेला तोफेचा गोळा. [ उकळणें ]

**उकाळ**—पु. १ निवाडा; निकाल. २ उखाळ पहा. [ म. उकलणें ]

**उकाळा**—पु १ उकळी. २ काढा. ३ कांहीं अम्ल पदार्थ, क्षार किंवा मीठ, ताब्याचा तुकडा वगैरे घालून उकळलेलें पाणी; हें विष खाल्लेल्या माणसास उलटी होण्यास देतात. ४ गांवांतील हक्कदाराचा हक्क वसूल करणें खेड्यांतील बाजारांत येणाऱ्या जिनसांवर हक्कदाराचा ( चिमूटभर घेण्याचा ) असलेला हक्क ५ येणें असलेल्या पैशांची उगवणी, वसुली. [ उकळणें ]

**उकिडवा**—वि टाचा ढिरीशीं व गुडघे पोटाशीं घेतील अशा प्रकारें जमिनीवर पावलें टेकून बसलेला ( माणूस ), उकिडा [ सं उत्कटक–उक्कडअ–उकडय–उकिडव–वा –राजवाडे, भाअ १८३४ सिं. ओकिड़ु ]

**उकिरडा**—पु १ केर टाकण्याची जागा, केराचा ढीग. २ उकिरड्यावरची रास (खताच्या खतासाठीं). [ सं. उत्+कृ, उत्किर् प्रा. उक्करड ] म्ह० कुंभाराचें गाढव उकिरड्यावर आल्यावाचून थांबणार? उकिरड्यावरला शेणगोटा–तुच्छकामाचा, निरुपयोगी. 'आम्ही काय उकिरड्यावरचा शेणगोटा।' –इंप ६१ ०फुंकणें–१ दारिद्र्यामुळें क्षुद्र लाभासाठीं भटकणें. 'तूं आतां विद्या करीत नाहींस? मोठेपणीं उकिरडे फुंकणार कीं काय?' २ वेश्यागमन करणें 'बाहेर जाऊन दहा उकिरडे फुंकून येतील' –बाय २.१.

**उकिरडी भाजी**—स्त्री. हलक्या प्रतीची ( उकिरड्यावर उगवणारी ) माठाच्या जातीची भाजी.

**उकिरवळ्या**—स्त्री अव पोपडे; उकीर पहा. 'जमीनीच्या उकिरवळ्या...' –सूर्योदय १८४. उसरवळी पहा. [उकीर+वळी]

**उंकी**—स्त्री. पाजणी, सागावर विणण्याकरितां खळ देऊन तयार केलेले उभे धागे. [ का. उंकी, ऊंके ]

**उकीर**—पु. १ उकरून काढलेली माती (घूस, उंदीर इ० नीं); उकरलेल्या मातीचा ढीग. 'घुसी उंदरांमी ठेउनी मेनकीं। काय उकीर शेगी काढितीना।' –ब ५३८. २ ओल्या जमिनीवर शेण वगैरे पडून त्याचे निघणारे पोपडे; उखळलेली जमीन. ३ डोळ्यांतील पू, घाण. ४ ( सामा. ) उकिरडा; कचरा. 'उत्पात विविध होती मणिकांचनमय सर्वेतहि उकीर।' –मोमौसल १.२६. [ सं. उत्+कॄ, उत्किर्; प्रा. उक्केर ]

**उकुडवा**—उकिडवा पहा.

**उक्त**—वि बोललेलें; म्हटलेलें, सांगितलेलें. सामाशब्द–तदुक्त; मदुक्त; ईश्वरोक्त. 'तरी आतां जाण म्यांचि उक्त दोन्ही।' –ज्ञा ३.३४. [ सं ] २ प्रकट, व्यक्त. ०निर्वाह–पु बोललेलें करणें, वचन पाळणें, आपले शब्द कायम ठेवणें. ०निर्वाही–वि बोललेलें करणारा; वचन पाळणारा; आपलें बोलणें खरें करून दाखविणारा.

**उक्ता–क्ती–क्तें**—क्रिवि.वि. वजन, माप, न करतां राशीवारी (केलेली खरेदी किंवा विक्री ); घाऊक; ठोकळ, मोघम (आकार). २ मक्त्यानें अगर खेपेवारी किंवा केलेल्या कामाप्रमाणें ( दिलेली मजुरी ); खंडानें ( दिलेली जमीन ). ३ सरसकट; सगळें, मोजकें. [ सं. वक्त्–उक्त; का वट, का. ता. तेलगु, तुलु, ओट=रास. ] ०माप–न ठोकळ, अंदाजी माप.

**उक्ति**—स्त्री. १ भाषण, वचन; वाक्य; बोलणें. [ सं. ] 'तैसें व्यासोक्तितेजें धवळित सकळ।' –ज्ञा १.४१. २ वचनरूप प्रमाण, म्हण; सुभाषित

**उक्ति**—स्त्री. युक्ति 'आपण होता तेथें। नेऊनि त्या प्रेमळाति। उक्ति प्रयुक्ति त्यातें । प्रेमसंभ्रम करोनी। –रास १.३७. [ युक्ति अप. ]

**उक्ति, ओनती**—स्त्री (कों.) एका लांब काठीस एका बाजूस जड दगड व दुसऱ्या बाजूस भांडें लावून विहिरींतून पाणी काढण्यासाठीं केलेलें साधन [ सं. उत्क्षिप्त; प्रा. उक्खित्त=वर फेंकलेलें ]

**उक्तें**—वि. (गो.) १ उघडें, रिकामें 'उक्त्या बैलावर गोणी' २ कापलेलें [ सं. उत्कृत्त, प्रा. उक्कित्त ]

**उक्रंडा**—( व. ) उकिरडा पहा.

**उक्शा–क्सा–बुक्शी–बोक्शी**—ओक्साबोक्शी पहा.

**उखई**—स्त्री फजिती; उपहास; थट्टा, चेष्टा झालेली स्थिति; उघडकीस येणें; बाहेर येणें. [ सं. उत्+भिद् ]

**उखका**—पु भावार्थ; कर्तव्यार्थ –हंको

**उखटणें**—सक्रि (माण) टरफे फाडणें, उराडणें [सं उत्+कृत्=कापणें]

**उखडणें**—उक्रि १ उखणणें, खणून काढणें, उपटणें, मुळा सकट उपटून काढणें, २ (ल) काढून देणें, घालून देणें, उच्चाटन करणें (कामावरून, जागेवरून) ३ रागावणें 'तो जेव्हां असें बोलला तेव्हां मात्र मी उखडलों' [सं उत्+खन्]

**उखडंपट्टी**—स्त्री (व) १ उचलबांगडी, हकालपट्टी २ तारांग भोगवटी, हजेरी, रागावून बोलणें, निर्भर्त्सना [उखडणें]

**उखंडा**—वि (व) उघडा, अनाच्छादित 'उखडया वा वर वसला' (गो) उघडें

**उखड्या**—पु (कुणबी) माशाची एक जात, याचें शरीर लहान व डोळे मोठे असतात हा नदी-ओढ्यांत सापडतो 'ओढयांत उखडया मिळाला'

**उखणणें**—सक्रि खणून काढणें (तक्तपोशी, जमीन, गच्ची, जमिनीचा तुकडा इ०), उखळणें [सं उत्+खन्, प्रा उक्खण]

**उखता-तें-उखत्याचा**—(प्र) उक्ता पहा 'भक्तीची जोडी ते उखत्याचिसाठीं। उणें पुरें तुटी तेथें नाहीं।' –तुगा २०९८ 'जो वितो (जीविता) तो माझा पिता। उखता तो उखत्याचा।' –तुगा ३८११

**उखर**—वि लागवड होत नाहीं अशी माळवट जमीन, रेताड डोंगराळ जमीन, वरड 'कृषीवल पेरणी करी। सुमीपाडें पिकती घुमरी। अकुरेना क्षितितळीं उखरीं। तें बीज निर्धारीं अतिशुद्ध।' –एभा ११ १०३१ 'मेघवृष्टि वर्षे होते अनिवार। निव्हाळ्या उखर लाभ नाइ।' –तुगा ३४४० [सं ऊषर]

**उखरडें**—न १ समुदाय, सैन्य 'तैं देखौनि पातरें उखरडें। यादवांचे' –शिशु ९६५ [सं उत्कर प्रा उक्कर=समूह]

**उखरणें, उखरीव**—उखरणें उकरीव पहा

**उखरवळी, उखरी**—स्त्री पापुद्रा, ढलपा, पोपडा, खपली, जमिनीचा अलग तुकडा, कोदिगा, खवली, खरपुडी, उखीर, उखिरवळ्या पहा [सं उत्+कॄ]

**उखरवा**—पु गुताडा 'परी अधीन का नागवें। हेंचि कैसेनि जाणावें। गुणाचिये उखरव। माजीं असता।' –ज्ञा १४ ३२५

**उखरवाखर, उखराबाखर, उखरपाखर, उखरघखर**—वि १ खालवर खडवडीत, उंचसखल खोल खड्डे असलेली (जमीन पृष्ठभाग वगैरे) २ अस्ताव्यस्त, न लावलेले विस्कटलेले (कागद)

**उखरणी**—वखरणी, उखळणें पहा 'सेताचे उखलणीस नांगर ३ एकूण' –मसाप २ ६६

**उखलणें**—क्रि (खा) वर उचलणें [सं उखळणें]

**उखलाड**—स्त्री (कों) उचलणें आणि ठेवणें काढणें-घालणें, हलवाहलव, काढघाल, हलवणें आणि ठेवणें, अस्ताव्यस्त करणें [उखलणें=उचलणें आणि वसरणें]

**उखलाशी**—वि (वर) हरामी, कायम न टिकणारा, काढून टाकता येण्याजोगा [उखळणें+असा]

**उखळ**—न कांडण्या-सडण्यासाठीं दगड जोडून वगैरे लाकडाचा ओंडा पोखरून जो खोलगट भाग करतात तो 'पीठ करणें पडे वेळे, उखळीं बसुरेचा।' –शिशु ६१४ 'उखळांत घालून करी कांडण। आपुल्या घरें भज देखतां।' 'उखळ रोंविलें धर्मशाळे। भक्ती काढी भक्त्या वेळे।' –सुरसु ४१३ [सं उलूखल, प्रा उक्खल तुल० का ओरळु-उरलु=कांडणें+कल्लु=दगड वरकल्ल] ०पांढरें होणें-वैभव प्राप्त होणें, नशीब उघडणें, अमूप द्रव्य मिळणें (गरीबाच्या घरीं उखळाला काहीं काम नसतें तेव्हां तें पांढरें असत नाहीं यावरून) (एखाद्याच्या) वेणीचें उखळ होणें- चमचमीत खाद्य पेयें मिळाल्यामुळें दोंद सुटणें, (वेणी उखळासारखी खोल होणें) शरीर पुष्ट होणें ०मुसळाशीं गांठ पडणें-भांडणाऱ्या व मारणाऱ्या माणसाचा सहवास घडणें व व्यभिचार- उखळांत पातळ असता ततरा घाव घुसविणारा= धाल्मेज अपरातफा करणारा, भोगाच्या तावडींत न सांपडणारा, अर्थात द्वाड माणूस उखळांत डोकें घालणें, देणें जीव अति श्रम धोक्यांत घालणें, संकट, अनर्थ ओढवण्याच्या स्थितींत असणें, जाणें म्ह० उखळांत डोकें घातल्यावर मुसळाला कोण भितो= स्वतः पत्करलेल्या साहसाचे परिणाम भोगावयास न कचरणें

**उखळ उखळणी**—स्त्री जमिनीची पहिली नांगरणी फाळणी [सं उत्खनन, उत्खलन]

**उखळण**—स्त्री फार वापर पडून खराब झालेली, भेगा पडलेली अशी जमीन, जागा याची अवस्था, खडबडीत पृष्ठभाग (खोणानें खारवलेली जमीन, फरशी, तक्तपोशी वगैरे) [उखळणें]

**उखळणी**—स्त्री (जमीन) उखळणें, खणून काढणें, मोडणें, तोडणें तुकडे करणें, केलें त्याच्या उलट करणें [सं उखळणें]

**उखळणें**—उक्रि १ पहिल्यानें शेत नांगरणें, फाळणें (जमीन), उकरणें खणणें २ उलगडणें काढणें, मोडणें, निखळून टाकणें, उपटून काढणें (स्क्रू खिळे, अडसर पाय हात यासारखे भाग इ०) 'तों रावणाचा उखळला हस्त। शस्त्र पडिलें धरणीवरि।' 'उखळीन ईश्वराचा हरिश्चाहि महाभयावह दासा' –मोउद्योग ११ ११५ ३ (ल) उच्चाटण करणें (स्थान, नोकरी यावरून), निर्मूलन करणें झाकणें, नाहींसें करणें 'उखळा धर्मासि म्हणसि तरि म्हणसिल वाल्हिशा नभा उखळा।' –मोभीष्म ७४३ ४ (ल) उघळणें, पराभव करणें ५ फोडणें, फाडणें, विलग करणें 'तयानें लाखोटा उखळुनि मर्म जें उकलिलें।' –मारद ५ ८१ –अक्रि सैल होणें तुकडे पडणें, (यंत्र वगैरेचे भाग) वेगळे होणें [सं उत्+स्खलन]

उखळ ( ळा ) चेर—स्त्री १ पहिली व दुसरी नागरणी, एकदा आडवें व एकदा उभें नागरणें २ उखाळ्यापाखाळ्या, उखळवेरीज 'या उखळवऱ्या काढीत बसण्यात काहीं अर्थ नाही' –टि १ ४१५ [ उखळणें=पहिली नागरणी करणें+चेरणें=दुसरी (आडवी) नागरणी करणें ]

उखळवेरीज, उखळापाखळ—स्त्री एखाद्याचें दुष्कृत्य उजेडात आणणें, एखाद्याचें दोषाविष्करण करणें, टवाळकी करणें टोमणे मारणें, उखाळी ( क्रि० काढणें )

उखळाउखळ—स्त्री (एखाद्या यंत्राचे अवयव) विस्कटणें उलगडून टाकणें, मोकळें करणें, काढघाल करणें, मोडतोड, तुकडे करणें [ उखळ द्वि ]

उखळी—स्त्री १ डमरूच्या आकाराचें लाकडी–दगडी उखळ ( पोहे, तांदूळ इ० काढण्यासाठीं ) २ भोंवरा, आवर्त, गरगर फिरणारें पाणी ३ उसाच्या चरकाच्या खुंटाचें आख ज्यात फिरतात ती, ( ओतकाम ) चरकातील नराच्या डोक्यावरील खोबळ बसविण्याचें साधन ४ ( व ) दाराचें कुसु फिरण्यासाठीं केलेली खोबण 'कावड ( दार ) उखळींतून निघालें तें बरावर कर' ०च लाटसाधा–खोबण व आत फिरणारी लाट, अशा तऱ्हेचा साधा उ० खायाचें पोकळ हाड व त्यात दडाचें हाड याचा साधा

उखळ्या—वि ( मधला टवका निघून उखळाप्रमाणें ) खाचा पडलेला ( नाणें, पैसा, रुपया )

उखा—स्त्री १ प्रातःकाळ, पहाट, सकाळ, उष काल 'करी साधुहृदयराउळीं । मगळ उखा ।' –ज्ञा ५ १४२ २ उषा, बाणा सुरकन्या, अनिरुद्धाची पत्नी 'उखाहरण पुण्यपावन। ऐकावें चित्त देउन ।' –गाणें [ स उषस् ]

उखाडपछाड—स्त्री ( हिं ) पराकाष्ठेचे श्रम, मेहनत उपधाप, यातायात दगदग [ उखडणें+पछाडणें ]

उखाडे चारणें—क्रि बडवणें, ठोकणें 'पोतशरानें आपल्या मल्लींस त्याना धरण्यास सांगितलें, दोघादोघानीं एकेकास घरून उखाडे चारले' –व्यायाम मासिक १५ १ २३

उखाणा—पु आहणा पहा १ कोडें, कूटप्रश्न उ० परडी भर फुलें हुड्यानें माजवेनात माझ्यानें मोजवेनात उत्तर तार २ गुप्त, गूढ अर्थाचें म्हण वचन ३ वायकोचें किंवा नवऱ्याचें नाव घेताना आपला एक अलंकार यानतात तो, पद्यात्मक नाव घेणें ४ लग्नात वधूवराकडील बायका परस्पराना लागतील अशीं गमतीदार यमकात्मक वाक्यें रचून म्हणतात तो, (भामा) यमकयुक्त टोमणे मारणें नागकास धावण शुद्ध पष्ठीस नदीच्या दोन्हीं काठावर जमून हातात मुसळें वगैरे घेऊन एका काठावरच्या बायका विरुद्ध काठावरच्याना शिव्या देतात पुण्याकडे नागपंचमीस असाच कांहीं घात आहे [ वै आहनस्या, म आख्यान ? प्रा आहणा, सिं ओखाण, गु उखाणु ] ०घेणें–पतीचें नाव घेताना त्या नावाभोंवती गोड शब्दाची सजावट करणें ०घालणें–विचारार्थ कूट प्रश्न टाकणें, कोडें सांगणें ०सांगणें–उखाणा ओळखणें, फिरणें

उखाणा पोटरा—पु कणसाचीं पोटें फुगून कणसें बाहेर पडण्याच्या पूर्वीची स्थिति, शेतात कणसें दाण्याची वेळ 'शेत उखाण्यापोटऱ्यात आहे'

उखाणी—वि कूट, कल्पित –शर

उखार—वि उथळ, माळरान ( जमीन ) ऊखर पहा [ स ऊषर ]

उखार—पु कच्च्या, कोऱ्या रेशमाची मळ ०काढणें–( जरतारी धंदा ) कच्च्या रेशमाचा कच्चेपणा ( ते पापडखारात भिजवून ) काढून टाकणें

उखारणें—अक्रि खळ, खरखरीतपणा नाहींसा होणें, स्वच्छ निघणें 'नातरी सादनिये भीतरी । वस्त्र चूरिजे घायावरी ॥ उखारेना तया बाहेरी । या हेतू ॥' –ज्ञाप्र ८४६ [ उखार+येणें ]

उखारी—स्त्री १ उसाचा मळा –शर २ दुकान –मनको, शर

उखाळ—न ( वों ) ओकारी–वांतीचें औषध, काढा, उकाळा पहा 'तरी उखाळाची मात्रा घणे ।' –गीता २ २०९८ 'हाळ आणी उखाळ देती । पथ्य कठीण सागती ।' –दा ३ ७ ३३ [ स उत्स्खलन हिं उखाल उखळणें ]

उखाळी, उखाळीपाखाळी, उखाळीचाखाळी—स्त्री वर्म, वैगुण्य, दोष, व्यंग, कमीपणा बाहेर काढणें, वैगुण्य काढून केलेलें भाडण ( क्रि० काढणें ) 'उखाळ्या पाखाळ्या काढोनि भाडावें । वडिलीस यावें काय त्यानीं ।' [ उखळणें द्वि ]

उखि–खी—वि मिथ्या, खोटा, वृथा 'असिा आणि मुखीं । मी दिसें हें उखीं ॥' –मगृ २ ६५ –पु मिथ्याभास 'जो भव रुखु जाणें । उखि ऐसा ॥' –ज्ञा १५ १४३

उखित–ता—पु आगतुक, वाटसरू 'अहो नीक एय उखिता। वस्ती करु वाट जाता ।' –ज्ञा १३ ३४ –वि १ उदासीन २ उपरी 'उखिता जैसा बिढारीं ।' –ज्ञा १३ ५९३ 'हतु ठेवूनि परमार्थी । देहीं वस्तीकरू नेवीं उखिता ।' –एभा ९ २५५ [ स उषित ( वस् )=राहिलेला ( तात्पुरता ) ] उखिति क्रिया–स्त्री उदासीनपणें ( ब्रह्मार्पण बुद्धीनें ) केलेली क्रिया

उखिता–तें—क्रिवि ( प्र ) उक्ता, १ एकदर, सगळें, अवघें, सर्व 'तेणें मज आपुलें पोसणें केलें । कीं निक्त घतलें उखितेंचि ।' –एभा २३ ७०८ 'उखिताच एकसरें चित्तें । मनींहूनि विटे विषयातें ।' –एभा २१ ५५८ २ बक्षिस, उचित 'दासींचा पाहुणेर उखीतें । धणी देईन अपुल्या हातें ।' –तुगा ७०० [ स उक्त ( वच् ) ]

उखिरवाखिर, उखीरखाखीर—वि उखरवाखर पहा

उखिचिखी—स्त्री चर्चा, वादविवाद, ऊहापोह 'हे बहु उखिविखो । रूपीं केली नेमिर्षी ।' –ज्ञा १३ ६६ 'नाग वायु राहोनि

मस्तकीं। अनाहतध्वनीची कगी उतिविखी। कूर्म वायु श्रोत्रीं राहोनि सम्यकीं। करी शब्दाधिकरण।'—स्वादि ९ ३ ४३ [स उह्=चर्चा करणें]

**उखी**—स्त्री १ उठवगी, मराळ, निर्जीवपणा २ (ल) दुकाल पटी, नाश 'जेथ अहंकारा उखी जाहली।' —ज्ञा १३ ५३० [म उह्=दुःख देणें, किंवा उत्+खिद्] ०होणें—यकर्मे, मर गळणें —दको ०करणें—(व) निंदा करणें, वोज उडविणें

**उखी**—वि खोटें, मिथ्या उखि पहा 'यणेंही बोलें जाणावी। अज्ञान उखी।' —अमृ ७ ५४

**उखीर**—वरड जमीन, उखर पहा 'जिकडील अत्यंत सुपीक देश सरासरी हकडच्या उखीर जमीनीबरोबर, ही केवटी मौज आहे।' —नि ५८६

**उखेड**—पु (हिं) (कुस्ती) जोडीवाल्याच्या चड्डींत जाघा ह्याजवळ किंवा माडीवर धरून आपल्या दुसऱ्या हातानें जोडी दाराच्या मुडया वर धरून आपल्या छातीच्या झोकानें जोडी दारास वर उचलून खालीं चीत पाडणें (कुस्तींतला एक डाव) [उखडणें उखाड]

**उखेंडी**—स्त्री श्रम, कष्ट, सायास उखाड पछाड पहा. 'भण ओनि आपणेया उखेंडी न पडे। जीतु शिशुपालु हाता चडे।' —शिशु ४९० [स उत्+खिद्]

**उख्ता-खतें**—उक्ता-उक्तें पहा

**उगऊ**—पु उगम, उगवतें स्थान 'जे वेदाचा उगऊ।' —क १ [स उद्गम, प्रा उग्गम]

**उगऊन देणें**—सक्रि स्पष्ट करून सांगणें 'म्या, काम, मातें उगऊन घावें।' —साह्र ७ १७९ [स उद्गम्]

**उगटिलें**—वि नीट उघडलेलें, (साल जाऊन) स्वच्छ झालेलें (धान्य इ०) 'मुर्गी तोंचि पाहे धड उगटिलें। नव्हता नासिलें जग झोडी।' —तुगा २६१ [उघडणें, स उद्+घट्]

**उगड, उगंड, उगडा, उगंडु-डू**—पु उद्धार, सुटका 'पडि लिया तिये ठायीं। मग कल्पांतींही उगडु नाहीं।' —ज्ञा १ २६१ 'जयानेनि सर्गे जन्मशतें उगडुचि नव्हे गा।' —रास ३ ४६० 'तदपि अर्जुणि तुम्हा होता नाहीं उगरा।' —साह्र ४ ८४ [स-उद्गम् किंवा उद्+घट् प्रा उग्घड, म उघड]

**उगडपें**—क्रिवि, प्रसिद्धपणें, उघडपणें 'आपण क्रिस्तु तारक म्हणउलु उगडपें सांगितलें' —ख्रि २ ३६ चा मथळा

**उगडास**—स्त्री (गो) आठवण 'तुजें काम सांगितलयाचो उगडास ना =तुला काम सांगितल्याची आठवण नाहीं' [स उद्+ग्रह्, उग्गह= ग्रहण करणें ?]

**उगण**—स्त्री उगवण, फुटणें, दवी, गोंवर इ० बाहेर निघणें, पडणें [उगवणें]

**उगणा**—पु (काव्य) बयाणा उगाणा पहा

**उगणें**—क्रि उगी राहणें 'तेंव कात मेसे म्हणोनि उगली पावोनिया विस्मया।' —विठ्ठलकृत २ (रसमंजरी ५४ [उगी]

**उगणें**—क्रि (भिल्ली) आघोळ करणें 'आनें उगीनें रामा मोकित केतली' =आणि अंग धुवून रामाची सेवा करी —भिल्ली भाषा ७७ [स अवगाह्, प्रा उग्गाह]

**उगणें**—अक्रि उगवणें, उमलणें 'दिनमणिकिरणस्पर्शित, पंकज उगलीं स्वयेंच हो जैसीं।' —माभक १७२ [स उद्गम्]

**उगंत**—स्त्री उत्पत्ति —दार [स उद्गम]

**उगम**—पु १ उत्पत्तिस्थान, जन्म, उत्पत्ति, बीज, मूळ, २ (शब्दशः व लक्षणेनें) ब्रह्म, आदितत्त्व 'येक चळाचें निव ढलें। तें पोहतचि उगमास गेलें।' —दा ११ ७ १० ३ नदी निघते तें ठिकाण, झरा [स उद्गम]

**उगमगणें उगमणें**—अक्रि उगम पावणें तेजाथासून आप आपापून वर पृथ्वी उगमगी।' —पला ८ [उगम]

**उगमा**—क्रिवि उगा, स्वस्थपणानें, शांतपणें, काहीं एक न बोलता 'पुढें चाले मागें उगमा। नाथ जातमे सर्वे सवें।' —नव ९ ६९ [उगा]

**उगरण, उगराणी, उग्राणी**—स्त्री उगवणी, पैसे वसुली, उधारी गोळा करणें [स उद्+ग्रहण, प्रा उग्गाहण=तगादा, तुल० ते का उग्राणी=उत्पन्न वसूल करणारा]

**उगराधगरा**—वि उग्र, क्रूर, रागीट, भयानक, अकाळ विकाळ, खवळलेला, आवेशलेला, भयंकर [स उग्र द्वि]

**उगरावणें उगराविणें**—सक्रि (राजा) (विरू) उगारणें (काठी, छडी) पुढें करणें, दासविणें, उगारणें पहा

**उगर्मुणें**—अक्रि (गो) फूल गर्भवट फुगणें उमलणें, उघडणें, मिरपणें [स उद्+ग्राम्, प्रा उग्गम+स मूर्च्छ, प्रा मुच्छ]

**उगला**—क्रिवि १ स्तब्ध, मुकाट्यानें, उगीच, निमूट, गप्प, गुपचुप, निवांत, निमूटपणें, तटस्थपणानें 'आनंदें फुगला नसेचि उगला, गाधेय गर्जे सभे।' —शासी ५५ 'क्षत्ता म्हणे करी उगला। वाग्व्यापार ये वाळीं।' —मुआदि २९ १४५ 'बसले कृष्णेसमीप ते उगले।' —मोऐषिक ३ १९ २ व्यर्थ, विनाकारण निरर्थक 'जन्मुनी उगले का मरती?' —आप ३८ 'हा भय म्हणाल उगलीच वाणी। तरी नोहे आहे अमृतसंजीवनी।' —नव ६ ५४ [स उद्+गॄ]

**उगव**—पु १ मूळ, आरंभ, उगम 'वृषाचि शाग जीव। तयासी त्याचा उगव।' —निपु ७ १४३ २ उलगडा, निकाल 'मुख्य विव तो मी शिव। विशद उगव हा जाण।' —एभा ११ १३८ [स उद्गम]

**उगवण**—स्त्री १ उगण, जोरानें (देवी, गोंवर वगैरे) बाहेर निघणें, उफणणें, उतणें, पुरुळ पुरळ २ महादिवाचा उदय,

उगवणें ३ नगरांतून देवापुढें रुजत घातलेलें धान्य ४ गुतागुत सोडविणें ( गुतलेल्या दोऱ्याची ), उलगडा, फोड [ स उद्+गम्, उद्गमन ]

**उगवण-णी-णूक**—स्त्री १ दिलेले पैसे गोळा करणें, वसुली उगराणी २ वसुल-गोळा केलेले पैसे –शक १५०८ चा कल्याण ताम्रपट [ स उद्+ग्रहण, प्रा उग्गाहण ]

**उगवणें-विणें**—उक्रि आदा होणें वसूल होणें, वसुल करणें (पैसे वगैरे) 'माम मजेर रकम जवाहीरखान्यातून उगवून घ्यावी' –गोप्रदाननियम ( बडोदें ) ४ [ उगवण ]

**उगवणें**—उक्रि १ ग्रह, नक्षत्रें वगैरे क्षितिजावर येणें, उदय होणें २ बीजापासून रोप वर येणें, अंकुर फुटणें, प्रादुर्भूत होणें ३ गोवर, देवी वगैरे दिसूं लागणें, उफणणें, उतणें ४ नजरेस येणें प्रकाशणें (बुद्धि, सद्गुण) कला, विद्या, व्यवहार इ०मध्यें निष्णात होणें 'हा लिहिण्यामध्यें दोन वर्षांत चांगला उगवला' ५ उलगडणें, सुटणें, फोड होणें ( गुतावळ, गुतलेला दोरा ) उकलणें, समजाविणें, ओळखणें 'एकाच्या वैवाहें उगवे बहुताचे कोडें। –तुगा २७४ 'आता हें अवघेचि उगवे। आणी मनास प्रत्यये फावे।' –दा १० २ १५ 'पदा गे येणें नवल केलें। कृष्णदृष्टीव उगवलें। विरडें काढिलें निजदृष्टी।'–एहस्व १६ ७९ ६ उमटणें, दृष्टीस पडणें ७ प्रकट होणें, उत्पन्न होणें 'नाना सर्पे उगवले काळ कर्कोट चारिले।'–दावि ५०१ ८ अडचणींतून मोकळें करणें 'याचे मनजप का अध्ययन करणें। अथवा गुतलियासी शब्दें उगवणें।'–स्वादि ४ ३ ९५ ९ हिशोबात जमेच्या व खर्चाच्या रकमाची बरोबरी होणें तोंडमिळवणी होणें १० गध उगाळणें 'केशर कस्तुरी चदन उगवा।'–पग १०७ उगविणें पहा [ स उद्गमन, प उगणा तुल० का उक्किसु उक्कु ]

**उगवणें**—अक्रि स्तब्ध होणें 'परी बोलोनि पार्थ उगवला तेथें।'–गीताचद्रिका ९ [ उगा ]

**उगवत-ती**—स्त्री पूर्व दिशा, प्राची, पूर्व –क्रिवि पूर्वकडे [ उगवणें ]

**उगवतामावळता**—पु ( उगवणारा आणि मावळणारा ) सूर्य 'तुझें कृत्य उगवत्यामावळत्यास ठाऊक आहे'

**उगवतामावळता**—क्रिवि सकाळपासून सध्याकाळपर्यंत दिवसभर 'हा मुलगा उगवतामावळता रडतो'

**उगवला**—क्रीवि उगला उगी, स्तब्ध 'मग देव म्हणे राहा उगवले। या बाळें प्राण वाचविले।'–जै ८२ ७९ [ उगा ]

**उगवा, उगवील**—स्त्री १ दिलेले पैसे गोळा करणें उगराणी २ वसूल केलेले पैसे वसूल [ उगवण ]

**उगवान**—स्त्री [ हेटकरी ] पूर्वदिशा ( नाशिक ) उगवत

**उगविणें**—सक्रि १ गुंत्यांतून मोकळें करणें, स्पष्ट करणें, फोड करणें 'सागितलें सर्वी तुम्हां उगवुनी। गर्भासी येऊनी यमदंडा।'–तुगा १५ २ एखेपूर दावविणें 'हें कलम तुम्ही खरें म्हणतां परतु तुमचे हातचें टाचण आहे त्यांत उगवतें नाहीं' ३ चढ्हा वर येणें 'तुम्ही खोळंबा न करता तर घाट उगवून एव्हाना पार गेलों असतों' ४ ( गो ) सुड घणें ५ सकट निवारणें 'उगवावया दासांत। सुनिश्चित सागितलें।'–एभा १६ ४७, 'असें वर्म सांगून श्रीहरीनें उगविलें सार्कडें'–पला ५४ ६ (गो) केंस विंचरणें, गुता काढणें 'आगो दिवो राँच्या पयरी केंस उर्गोक सांग' [स उद्+गम्]

**उगविनपागर्वात**—क्रिवि साईमोईनें, थोडें थोडें ( दिलेले पैसे हप्त्यानें गोळा करणें ) [ उगविणें ]

**उगवी**—स्त्री समजूत 'येक सागता एकचि भावी। उगीच करी गयागोवी। तया वेडयाची उगवी। कोणें करावी।'–दा ९ ६ २९ [ उगवणें ]

**उगवील**—उगवणी पहा

**उगवू**—पु उलगडा, उगव पहा 'पिंड ब्रह्मांडींचा करोनी उगवू। मग तो अनुभवू होय तुज।'–व ३२७

**उगसाबुकसी**—ओक्साबोक्सी पहा 'स्फुदे यशोदा उगसाबुक्सी।'–निगा ३९

**उगळ**—स्त्री १ तोंडातून टाकिलेला पदार्थ, वमन ओक (क्रि० टाकणें) 'म्हणता यमासि गिळिल्या उगळ प्रभु तो कपीश्वर करी सुगळ।'–मोवरदरामायण ३२ 'सर्पानें उगळ टाकली' २ गुरें एकदां खाल्लेला चारा रवथ करण्याकरितां पुन्हा बाहेर काढतात तो पायाखालीं मळलेला, खराब झालेला चारा, वैरण ३ (व) उसाच्या अथवा धाडयाच्या गड्यांतील रस चोखून घतल्यानतर शिल्लक राहिलेला ( तोंडांतील थुकून टाकला जाणारा ) चोथा चोयटी [ स उद्+गॄ, उद्गिर् प्रा उगिल, ध उगरेण, हिं उगलना का उगि=थुकणें–उगुळु=थुकी ]

**उगळ**—पु •पुरुळ, पुरुल, उगवण [ स उद्+गॄ ]

**उगळ**—वि ( कर ) मोठा उ० उगळ अगरखा [ स उद्+गल् ] •सैल–वि मोठा, ढैल ( अगरखा )

**उगळणें**—उक्रि १ उगाळणें, घोटणें २ (ल) झिजणें 'ते मागी देह जरी उगळे'–पला ३ ४ ३ शिस्तींत, ताब्यांत ठेवणें ४ चारा पायाखालीं तुडविणें ( जनावरानें ) ( घासण्यानें, उगाळल्यानें ) नरम होणें पुढून जाणें ५ सुरा होणें ६ शिस्तीनें मऊ करणें नम्र करणें ताळ्यावर आणणें ७ चांगल्या रीतीनें प्रवृत्त होणें, सचोटीच्या मार्गावर येणें सुधारणें, ताळ्यावर येणें, मार्गावर येणें, वाईट नाद सुटणें 'उगळता तर परमेश्वर नाहीं तर शनैश्वर' ८ मूळची शक्ति परत येणें ( नवीन वडविलेल्या वैलाच्या वृषणाच्या शिरा पुर्तेपणीं न मळल्या गेल्यामुळें ), पूर्वावस्था प्राप्त होणें ९ रद्द कोसळणें, द्रवणें १० अनुकूल होणें, वश

होणें, दया येणें 'बहु दासी दासरतें देताहि न विप्र तो बघे तुगळे।' –मोकर्ण २९.२९ [स उद्+गल्=गळणें]

**उगळणें**—उक्रि १ थुकणें, ओकणें, बाहेर टाकणें, ओकून टाकणें 'घीं मी तोंड करूनी कानवडे। उगळोनि घाली॥' –ज्ञाप्र ९६४ 'उदवणीचें जैसीं तोंड। उगळी धुवाचे उभड।' –ज्ञा १६.२९४ 'असो मच्छशिशूनें उगळून। आणून टेविला पूर्वस्थळीं।' २ टाकणें, त्यागणें, सोडणें 'उगळिसील अरणा तुझा। तरीच देह परतेल माझा।' –मुआदि ५.८५ ३ (ल) चोरलेली, दाबलेली, अपहार केलेली, मालमत्ता परत करणें ४ (ना) गुप्त गोष्ट फोडणें, प्रकट करणें 'दोन्ही निशेष गिळी। ना निर्विशेषातें उगळी॥' –अमृ ७.१८३ ५ रवथ करणें, चर्वण करणें [स उद्+गृ-उद्गिर्, प्रा उग्गाल=रवथ, उग्गिल, व उगरण, हिं उगलना, का उगि=थुकणें]

**उगळलेला गडी**—पु (माण) अन्नान्नदशेतापासून टळलेला मनुष्य [स उद्+गल्, प्रा उग्गाल, उग्गिल, व उगरण, हिं उगलना]

**उगळा**—पु. नाश, धुराडा, नाश, नासधूस 'गनिमी तन्हेनें उगळा लावावा' –रा १ ३६५७ [उगळणें]

**उगा**—क्रिवि १ न बोलता-हालता काम करता, स्वस्थ, गप्प, उगीच, मुकाट्यानें 'तव रज तम उग। का पा राहाती।' –ज्ञा १७.६३ 'आता नाइकें न पाहें। म्हणोनि मी उगा राहे।' –एभा ९.४८५ 'राहे भीष्म उगा, कीं सोडी तव सुत न दुरभिमानातें।' –मोभीष्म १२.२८ 'नको छंद घेऊ उगा राहि गोपाळा।' –कृष्णाचा पाळणा १४ २ न खटपट करता, विना धदा किंवा उद्योग ३ अकारण, अनिमित्त, निष्कारण, जरूरी नसता 'उगा लोळसा घोळ मोठा करीतो' –राक ३६ ४ व्यर्थ, निरर्थक, बे फायदा 'उगा भ्रमसि वाउगा कशाला युगात खळ हा कली' –राला १०६ उगी, उगला पहा [ह का उगि=मिणें, का उके= गप्प?]

**उगाई**—स्त्री उगराणी पहा 'जीवनराव व्यंकटेश यास सर कारी घेणें असल्यामुळें त्या दुवाची उगाई सर्वांनीं वसूल होईल' –विविध ३.९३

**उगाच, उगीचचेउगीच, उगीचेउगीच**—क्रिवि उगा पहा १ निष्कारण, जरूर नसता, विनाकारण, व्यर्थ, निरर्थक 'सत्य धनजय वर्में रूपें दिसतो उगाचि वरि नरसा।' –मोभीष्म ११.७२ २ निमूटपणें, बिनतकार 'घेणार तो न समजोनि उगाच घेतो' –नल ८७

**उगाण**—पु स्पष्टीकरण [स उद्गमन]

**उगाणणें**—सक्रि फोड करून सांगणें, स्पष्ट करणें, उपदश करणें 'शास्त्रसिद्धातु आघवा उगाणिला।' –ज्ञा १६.४१ [स उद्गमन] धको १ ४३

**उगाणणें**—क्रि १ हिशेब देणें, झाडा देणें 'परी परमात्मया चक्रवर्ती। उगाणिती जव हातीं।' –ज्ञा १८.७४३ २ अर्पण करणें, हवाली करणें 'तीं गोपवत्सें उगाणलीं। गोपनाथासीं।' –कथा ४.३.२६५ ३ मुक्त करणें, सोडविणें (पाप इ०का पासून), 'उगाणिलीं जन्ममरणें' ४ लुटणें 'समेसि राजा उगाणवी। तें मृत्यूची पदवी मस्तका आली।' –एभा १.२११ ५ शून्य होणें 'तेथ उगाणलें क्रियाकर्म। लाजा विराल धर्माधर्म।' –एभा २३.७०० [स उद्+ग्रहण, प्रा उग्गाहण]

**उगाणवा**—पु लूट, नागवण [स उद्ग्रहण]

**उगाणा-ना**—पु १ दातव्य, ययाणा, विसार 'आचाराचा उगाणा जी करणासि दिधला' –भाए १०९ २ गणना, झाडा, परीक्षा, हिशोब 'तेथ फलहेतूचा उगाणा। करूं चाली।' –ज्ञा ७.१२९ 'नाणी कांहीं मना। करूनी पापाचा उगाणा।' –तुगा ५५७ ३ मुक्तता, सोडवणूक 'तुजवांचीण योगिया उगानाबेडा क्वण करील।' –भाए १०५ ४ कर्जाऊ रकमेची फेड, तोंडमिळवणी 'चहिंणी म्हणे मना हेतूचा उगाणा। करूनि निर्वाणा पहा तसे।' –च १२९. 'कीं होय उगाणा' –राला २८ ५ चव, रुचि, अनुभव 'रसवृत्तीसी उगाणें। घेऊनि जिव्हाग्र शहाणें।' –अमृ ६.९० 'मानावमाना समदृश्य उगाणा।' –दैप १६ ६ नाश, नागवण 'कोप येताच जाणा। करी उगाणा तपाचा।' –एभा ४.७८ २३.६५९ ०काढणें-(वायकी) कोणतेंहि धान्य काडताना अगर कुटताना उखळांत खालीं राहिलेला नितम वरचेवर खालचा वर व वरचा खालीं करणें [उद्+ग्रहण]

**उगाणा**—पु उपदेशपर भाषण, उलगडा, स्पष्टीकरण 'नाना प्रमेयाचे उगाणे। काय श्रवणाचेनि आगणें। बोलों लाहाती।' –ज्ञा ७.१९८. [उगवणें]

**उगाणा**—पु कारकून, हिशेबनीस, उग्राणी करणारा 'सरिसा उगाणा कोठी, चाट बहुवे तैसे निगाले।' –ऋ १३२ [स उद्ग्रहण, प्रा उग्गाहण=रागादा, परत मागणें]

**उगामुगा**—अ (खा) स्वस्थ, बोलल्यावाचून, गपचीप [उगा+मुका]

**उगारणी, उग्राणी**—स्त्री उगराणी पहा

**उगारणें**—उक्रि १ एखाद्यास मारण्याकरिता शस्त्र, काठी, हात वगैरे उचलणें, मारण्याचें भय दाखविणें, धमकावणें २ पैसे वसूल करणें ३ फेकणें, झोंकणें, मारणें ४ चाल करून जाणें 'त्या पौर वासि सोडुनि सौभद्र जयद्रथावरि उगारे।' –मोद्रोण १.८५ [स उद्+ग्रहण, प्रा उग्गाहण]

**उगाल(ळ)दान**—न पीकदाणी, तस्त 'पीकदानिस्तुगाल दान' –राज्यको [स उद्+गृ, का उगि=थुकणें, उगुळु=थुंकी+फा दान, हिं उगाल दान, सिं ओगारदानी]

**उगावा**—उगवणी पहा

**उगावागा**—पु १ स्पष्टीकरण, सोडवणूक निकाल, मोकळीक, तड २ वसूल 'एक म्हणती व्यवहारिक धन।त्याचा उगावागा करून घेईन।' –मक ३१५८ [ उगविणे ]

**उगाळ**—पु १ तोंडातून टाकलेला पदार्थ, वमन, थुंकी, पीक 'हृदय मी वोळगेन। मीचि उगाळु घेईन।' –ज्ञा १३.८१९ २ (ल) सरमेसळ, काला, चिवडा, खिचडी (कागद, पैसे, कपडे वगैरेंची) ३ अव्यवस्थित स्थिति पसारा ४ (अलंकारिक) जाळें [ स उद्+गॄ, का उगुळु=ओक, थुंकी, सिं ओगार ]

**उगाळणें**—क्रि १ (चंदन वगैरे) घोटणें, घासणें वाटणें, बारीक पूड करणें 'परम सुवास जो मारुतीचा।तो स्वरें उगाळानि तालकाठ। निढळीं टिळक रेखिला।' २ (ल) दह गिळविणें (सेवेंत नाक रीत), कष्ट सोसणें ३ शिक्षेंत धरणें, शिस्तींत, दिवकर्णींत ठेवणें, काचात टेवणें ४ फिरून फिरून करणें (व्याप वगैरे), पुनरुच्चार करणें तेंच तेंच करीत घोकत राहणें ५ विवविणें, भरविणें मारावर उखविणें [ स उद्+घृ ]

**उगाळणें**—क्रि वाति होणें, ओकणें, थुंकणें 'तो पुन्हा उगाळी सावकाश। जैसा होता तैसाचि।' –शनि ३६० [ स उद्गीरण, प्रा उगाल; का उगि, उगुळु ]

**उगाळा-ळू**—पु १ थुंकी, पीक, चावून टाकलेला विडा 'तांबुलाचे उगाळु पडिले। मलपावरी।' –शिशु ७१७ 'उगाळा हातीं घेली। –गीता २.२१६२ [ स उद्गीरण का उगुळु ]

**उगाळा**—पु घोटलेला, वाटलेला, उगाळलेला पदार्थ, शिवाय त्याच कण 'सुंठीचा उगाळा' [ उगाळ ] –स्त्री खडी, दगडाचा बारीक तुकडे (रस्ता करण्याकरिता गच्ची करण्याकरिता, घराच्या पायात भरण्याकरिता) [ उगाळणें ]

**उगिया**—वि व्यर्थ, रिकामा, फुकटचा, उगा उगीच पहा

**उगी**—क्रिवि गुपचूप, उगला उगा पहा 'बयनीसाहब, असें उगी बसून आम्ही साडणार नाहीं' –रत्नकांता ५.४ (व) (गाणें) 'उगीउगी, चोळी शिवीन मुगी, लुगड घेईन लाल सामुन्या जाल' (रडत असलेल्या मुलीला असें म्हणतात) ॰करणें-होणें–रडावयाचें थांबविणें, शांत करणें, गप्प करणें, होणें 'काय झालें दुखिलेला? असें म्हणून तिला त्यानीं मुकीनें क्षणार्धात उगी केलें' –मुदे ७ ॰राहणें–शांत होणें 'उगी राहें आतां बहुत बदता ओंठ सुकले।' –सारह ७.९९ [ का उके=गप्प ह का उगी-भिगें ]

**उगीच**—क्रिवि १ गुपचिप, मुकाट्यानें 'चाल उगीच, प्रभूसीं हट करित पासिशी कशा लाग।'–मोसमा ५.८ २ कारणावाचून प्रयोजनावाचून, व्यर्थ 'कामाशिवाय उगीच कोणाचे घरीं जाऊं नये' [ उगी ]

**उगीदुगी**—स्त्री आगीदुगी पहा ॰ला येणें-(कर) स्थिर डौला येणें 'उगीच उगीदुगीला कां आलीस?' ॰करणें-१ (बायकी) मध्यें तोंड घालणें, रिकाम्या गप्पा मारणें, बाता मारणें २ चहाडी, सुरली करणें

**उगीर**—वि (व) १ उद्धट, रागीट, उग्र स्वरूपाचा गर्विष्ठ मगरूर दिमाखाचा, उगरावागरा पहा २ उग्र वासाचा, कडवट [ म उग्र ] ॰चाटाणा-पु (व) उद्धट उगीर यथें १ पहा

**उगूम**—पु उत्पत्ति, वाव, मूळ, उद्भवस्थान उदय पहा [ म उद्गम ]

**उगें, उगेंच**—क्रिवि निमूटपणें गप्प उगी पहा 'फुन तुमचेंचि रागें। तरी नार्गोंनी उगें। तरी आमुचें पोट्ट पुगें। न बोलता।' –शिशु १२८ 'आता आह तमी गोष्टी। उगचि सांगा।' –गीता २.२२६१ २ व्यर्थ विनाकारण 'उगेंचि खावें उगेचि असावें।' –दा २.६.४७ ॰पण-न स्तब्धता 'म्हणूनि दस राह सती। उगपणाची।' –ज्ञा १८.८०

**उगेलें**—क्रिवि १निवांत शांतपणें, आवाज, गडबड न करता २ आपोआप, सहज, अनायासें 'जैसे उर्वी उदक परिले। तें सळ वळवरी सें उगेलें।'–ज्ञा ९.२२८ [ उगी ]

**उग्र**—पु १ शिव रुद्र 'अति दु सह उग्राचें तेज मकरा दु महींहि मदनीं कीं।' –माभीष्म ३.० २ भेसळ जात क्षत्रिय बाप व शूद्र आईपासून झालेली प्रजा –वि १ भयानक भीतिदायक (मनुष्य, वस्तु स्थिति) अक्राळविक्राळ (चेहरा) ऱ्यासुर, भयंकर, कर्कश कठोर (आवाज, बोलणें) घोर तामसी क्रूर अतिदुष्ट (कृत्य), तामसी, रागीट (स्वभाव), प्रखर उग्र मांडिले बाण।' –मोवर्ण ८.२५ ३ उग्र तीव्र, अनिवार दु सह (वास) ज्याचा वास नाकांत भरून श्वास होतो असा [ स उग्र तुल० ह आगर=राक्षस ] ॰गंध-वि ज्याचा वास उग्र आहे असें

**उग्रट**—वि दु सह, कपाळ दुखू लागण्यासारखा (वास) 'हें पद माझ्या हातीं आल्यापासून या पापी जगाची आणखी उग्रट घाण देऊ लागली आहे' –मु ५३ [ स उग्र ]

**उग्रटाण उग्रष्टाण**—स्त्री दुर्गंधि, दु सह वास, घाण [ उग्र+घाण ]

**उग्रदंड**—पु कडक शिक्षा –वि कडक शिक्षा करणारा, कधीं दयामाया न दाखविता न्याय देणारा (न्यायाधीश अमलदार, राजा) [ स उग्र+दंड ]

**उग्रम**—पु आरंभ सुरवात उद्गम उत्पत्ति बीज मूळ, झरा (एखाद्या कामाचा) [ स उद्गम ]

**उग्रम**—पु जोर उत्साह आग्रह वेग, तडाखा (राग, पाऊस वारे वगैरे सबधाचा) आवेश, क्षोभ 'पावसाचा उग्रम

मोडल्यापासून थंडी पडत नाहीं ' 'गळ्याचा उग्रस मोडत नाहीं ' [स उग्र]

**उग्रम**—वि उग्रट पहा

**उग्रा**—स्त्री विना (संगीत) एकविसाव्या श्रुतीचें नाव [सं]

**उग्राणी**—पु (दक्षिण कानडा) खेड्यांतील एक विशिष्ट सरकारी नोकर, पाटील [का उग्राण=सरकारी कोठार] –स्त्री वसुली, वसूल करणें उगराणी पहा

**उग्रावागरा**—उगरावागरा पहा

**उग्रासन**—न योगशास्त्रांतील एक आसन, पश्चिमोत्तानाप्रमाणें डोकें डोंगरावर न करता आपगत गळून हस्य तिर्थे जमिनीजवळ लावणें, अशा प्रकारचें आसन –योगशास्त्र ३४९ [स उग्र+आसन]

**उग्रहणें**—क्रि प्रत्यक्ष माडलेलाणें, उघडणें पहा 'इया पाटणीं जे कोणे उघडें ।'–शके ११२८ चा पाटणचा शिलालेख [स उद्+ घट्=उग्घट्=उघट]

**उघटा**—(गो) उघडा पहा मराठी उघगे कर

**उघड**—वि १ स्पष्ट, व्यक्त, उमगलेला 'मीं आहे तें उघड । बोल पा गुरें ।'–ज्ञा ११४४७ २ स्वच्छ, ढळढळीत, जाहीर, प्रकट, सार्वजनिक, मशहूर, गुप्तोपरहित ३ दुर्लौकिक झालेलं –स्त्री १ निरभ्र आकाश, हवा स्वच्छ असणें, उघाडी, उघडीक, पाऊस थांबणें २ दुर्लौकिक (एखाद्या गोष्टीचा) –क्रिवि प्रसिद्धपणानें, जाहीर रीतीनें (फिरणें, सांगणें, बोलणें) [स उद्+ घट्, प्रा उग्घड] **उघडकीस येणें**–परिस्फोट होणें, गुप्त न राहणें, जाहीर होणें **उघडकीस आणणें**–परिस्फोट करणें, प्रसिद्ध करणें, जगजाहीर करणें

**उघडगांड-ड्या**—वि नेहमी लंगटी हालविणारा (त्यामुळें ज्याची गांड उघडी पडते तो घोडा, घोड्याचें एक अशुभ लक्षण)

**उघडझांक-प**—स्त्री वारंवार उघडणें–झाकणें (दार, पेटी, डोळे, पत्र वगैरे), उघडण्या–झाकण्याची क्रिया, आकाशात ढग येणें–जाणें होणें, कांठे पाळणें (पडदा वगैरे)

**उघडणें**—उक्रि १ आच्छादन काढणें, खुलें, मोकळें करणें (पेटी, दार) ग्वरणें २ उमगलेले आणणें गुप्त गोष्ट फोडणें, प्रगट करणें, प्रसिद्ध करणें –अक्रि १ मोकळें–खुलें होणें २ (पाऊस) थांबणें, ढग नाहींसे होणें, आकाश निरभ्र होणें (हवा, पाऊस) स्वच्छ होणें ३ उत्कर्ष होणें, उदयास येणें (दैव), उर्जितदशा येणें [स उद्घाटन, प्रा उग्घाडण, सिं उघिड्णु]

**उघडदारा**—पु ज्या दारा नेहमीं धरून ओढें असता चरखा, रगाड इत्यादि उघडला जाता असे लावलेले असतात, त्यांपैकीं प्रत्येक ओढदोरा [उघड+दारा]

**उघडभावई**—स्त्री (व) उघडपणा, काहीं प्रतिबंध, अडोसा नाहीं अशी स्थिति 'घर सापडलें तें असें उघडभावईचें, मग सुरक्षितपणा कसा वाटावा ' [उघड+भाव]

**उघडमराठी**—उघडीमराठी पहा

**उघडमाथा**—क्रिवि १ उघडपणें, प्रसिद्धपणें, उघडउघड, निःशंकपणें, राजरोस २ (उप.) निर्लज्जपणें (फजिती, उघडकीस आणणें इत्यादि)

**उघडमीट**—स्त्री पुनःपुन्हा उघडणें, मिटणें (डोळे, ओठ, पुष्पें इ०), उघडझाप पहा

**उघडवाघड**—क्रिवि उघडपणें, प्रसिद्धपणें, उघडउघड, स्पष्टपणें [उघड द्वि]

**उघडवासरा-वासारा**—पु उघडी, मोकळी जागा, निरभ्र निवळ जागा किंवा स्थिति [उघड+वास]

**उघडवासऱ्यांत**—क्रिवि उघड्या-मोकळ्या जागेंत (मैदानात, पटांगणात), चव्हाट्यावर, दृश्य होईल, हमरस्त्यावर [उघड+ वास]

**उघडा**—वि १ मोकळा, खुला, न झाकलेला, अनाच्छादित २ स्पष्ट, प्रगट, व्यक्त, विशद, आविर्भूत, स्वतःसिद्ध, ढळढळीत, गूढ, गुप्त नव्हे असा ३ लोकविख्यात, प्रसिद्ध, मशहूर, जगजाहीर, सर्व लोकांस माहित असणारा ४ ज्यास सांभाळ करणारा कोणी नाहीं असा (पोर, राज्य इ०), 'आईबाप गेल्यापासून हें पोर उघडें पडलें आहे ' अरक्षित, निराश्रित (स्थळ, प्रदेश, माणूस) (क्रि० पडणें) ५ मोकळी, स्वच्छ (हवा) ६ अंगात कपडा न घातलेला, नागा (कमरेच्या वर), पोशाख नसलेला, फक्त धोतर नेसलेला, केवळ मध्य नेसलेला 'बाऱ्यात अमणात उघडा हिंडू नये ' म्ह० नागड्यापाशीं उघडा (किंवा उघड्यापाशीं नागडा) गेला सारी रात्र हिंवानें मेला ७ सदय नग्न, नागवा, अगदीं वस्त्रहीन 'वा ! ढळता तिळहि पदर भावी व्यजनासि राम रामा जी । ती खलसभेंत उघडी पडल्ये न पडोनि सागरामाजीं । –मोसभा ५ ७७ ८ अनाच्छादित, चोडका कुच्चा, ओसा ९ निर्भीड, स्वैर, दाही दिशा मोकळ्या असलेला ०करणें–१ निराश्रित करणें २ उघडा पाडणें पहा ०पडणें–निराश्रित, अनाथ होणें 'अर्थातच हरणाबाई आपल्या दान मुलींसह उघडी पडली '–स्वप.६५ **०पाडणें, उघड्या वर आणणें**–निंद्यस उपहासास पात्र करणें, एखाद्यास चव्हाट्यावर आणणें गुप्त गोष्ट फोडणें, जाहीर करणें, बोभाटा करणें **उघड्या-डोळ्यांनीं**–जाणून बुजून, बघून सवरून म्ह० १ उघड्या डोळ्यांनीं वरातें आणि डोळे मिटून भरावें २ उघड्या डोळ्यांनीं प्राण जात नाहीं=भलतीच गोष्ट आपल्या देखत घडत असता तिचा प्रतिकार

घेल्यावाचून आपणास राहवत नाहीं ०नागडा-धोत-वंच-थाग(घ)डा-धाग(घ)ड-सोट-वि १ वस्त्रहीन, नग्न, अगावर मुळींच कांहीं नसलेला २ आडोसा नसलेली (जागा) ३ आच्छादन रहित, न झाकलेला (पदार्थ, अन्न) ०बोडका-वि १ अंगांत व डोक्याला कांहीं न घातलेला २ निराश्रित, निराधार ३ कुटुंब, काळजी, धंदा नसलेला, घरदार नसलेला, ना घर ना दार असा ०वाळसंतोष-पु फकिर, संत ०माथा-पु १ धाक, लाज नाहीं असा मनुष्य, नि:शंक, निर्भय, निर्भीड माणूस (चाकरया व वाईट अर्थी) 'आम्ही पिढीचे भिक्षुक, आम्हांस प्रतिग्रह घेण्याविषयीं उघडा माथा आहे' २(ल) दोषविमोचन, निरसन, उजळमाथा-तोंड असणें, निरपराधित्व, आरोपनिराकरण (होणें) (३ बोल, निंदा, दोष, ठपका यापासून अलिप्तता, मुक्तता (असणें) 'कन्याविर्कानें सिंदळकी केली तर तिला कोण विचारतो, मूळचाच तिचा उघडा माथा' ०माथ्यानें-क्रिवि न कचरता, न लाजता, धीटपणानें ०हिशोब-पु सरळ, स्वच्छ हिशेब, स्वक्त समजणारा हिशेब, पाहिल्याबरोबर डोळ्यांत भरणारा, पटणारा जमाखर्च

उघडी—स्त्री (वों) फाजाम लावलेलें दार, पाथाच्या दारा करिता जे उघडझापीचे दरवाजे ठेवतात ते, (आगरी) पाणी घेण्या सोडण्यासाठीं केलेला चुन्याचा किंवा लांकडी दरवाजा 'त्याची उघडी मोठी असल्यामुळें शेतींत पाणी ज्वकर आलें' (इं) फ्लडगेट, स्लूस [उघडणें]

उघडीक-प—स्त्री १ प्रसिद्धि, जाहीर माहिती, परिस्फुटता 'आपलीं शास्त्रें लोकांस ठाऊक व्हावीं, कारण तेणेंकरून आपली उघडीक होत' -नि १०१६ २ उघाड पाऊस थांबणें, उघडावा, स्वच्छ हवा पावसानें उघडीप दिली' [उघडणें]

उघडीमराठी-मऱ्हाटी—स्त्री सरळ, मोकळ्या मनानें केलेलें भाषण प्रामाणिक व्यवहार, सरळ वागणूक चोखी, स्पष्टपणा स्पष्टवक्तपणा [उघडी+मराठी]

उघडी माडी करणें-टाकणें—क्रि (माडी उघडी ठेवणें हें शिष्टाचारास सोडून आहे यावरून ल) निर्लज्जपणाचें आचरण करणें, बेशरमपणानें वागणें, अश्लील प्रकार करणें, अनुचित, असभ्य आच रण करणें

उघडें परब्रह्म—न अगदीं स्पष्ट, उघडउघड दिसणारी गोष्ट, बाब, वस्तु (अशा उघडपणाबद्दल जेव्हां आश्चर्य वाटतें त्यावेळीं हा शब्द वापरतात)

उघड्यावर—क्रिवि १ मोकळ्या जागीं, उघड्या जागेंत आंगणात, चवाठ्यावर, रस्त्याच्या जागीं २ जाहीरपणें, प्रसिद्ध पणें

उघराणी—(वडोदे) उगराणी पहा उघराण्या वगैरे करून रकम वसूल करविण्याची योग्य ती तजवीज करतील' -स्वारी नियम ३८ [स उद्+ग्रहण, गु उघराणी]

उघल—स्त्री (वों) पहिली नांगरट, उसळ 'जमीन उघल घ्यावयास नांगर सुमार २॥ येवून' -मसाप २ १८० [उसळ]

उघळ—स्त्री १ उगळ, जात्यांत दाणे दळून झाल्यावर दळले न गेल्यामुळें खुंट्याच्या मुळाशीं राहिलेलें धान्य, घस २ नवीन जात्यामध्यें प्रथम दळलेलें मूठभर धान्य [स उद्+ग्रह् प्रा उग्गाल]

उघळणें—उक्रि १ जात्यांत राहिलेला घास, उघळ काढणें २ नवीन जात्यांत मूठभर धान्य दळणें [स उद्+ग्रह्]

उघळणें—उक्रि उगाळणें, अतिशय बारीक पूड करणें उग ळणें पहा

उघाड्णें—सक्रि उघडणें 'कोणी गे नि परवसा। उघाडली वगताची दिशा।' -शिशु ८३६ [स उद्+घट्]

उघाड-डी—स्त्री १ पर्जन्यकाळांत कांहीं काळ पर्जन्य पडून थोडा वेळ तो थांबला आहे अशी स्थिति, उघडीक २ उघडी जागा 'परातीसारखें उथळ भांडें घेऊन त्यांत चुन्याचें पाणी घालून उघाडीवर ठेवावें' -मराठी ६ वें पुस्तक १६६ ३ परिस्फुटता, प्रगटपणा 'मुलीला कांहीं खोड होती आणि ती मग उघाडीस आली' -मोर २० [उघड]

उघारणी, उग्राणी—(वों) (वडोदे) उगराणी पहा 'जीं पत्रें येत नसतील त्यांविषयीं उग्राणी करावी' -राजमहाल कारकून नियम ३

उघारणें—उगारणें पहा

उंच—वि (फुा) उच १ भुईपासून किंवा उभें राहण्याच्या स्थानापासून आकाशांत पुष्कळ अंतरावर असणारा पोंचणारा, उन्नत उत्तुंग, उच्च 'चंद्रमंडळापेक्षां सूर्यमंडळ उंच आहे' २ श्रेष्ठ (गुण, पदवी, किंमत यांमध्यें), वरिष्ठ पदवीचा, योग्यतेचा, (चतुरस्रता थोरपण, वगैरेसंबधानें), सन्मान्य 'चातुर्यवीण उंच पदवी।' -दा १४ ६ ७ उचा, उची पहा ३ (संगीत) वर चढणारा (तान, स्वर) ऊर्ध्वगामी, तीन सप्तकपर्यंत गेलेला ४ फार उभट चढ णीचा 'असं झाल्या, कैलासावानी उंच पहाडाच्या डोक्यावर पुष्प वसल्यातीं व्हयना?' -बाय ७ ७ ५ (राजा) खोल (विहीर, खाच, चर वगैरे) ६ फार मौल्यवान् किंमतवान 'कण करिता सेत पिकें। उंच वस्त तत्काळ विकें।' -दा १२ ७ २५ [स उच्च हीन् उच्चन=ऊंडी, फ्रें नि चुच] ०कपाळ्या-वि नशीबवान ०टांचा करून वागणें-असंगल, अपवित्र पदार्थावर पाऊल न पडावें म्हणून चवड्यावर चालणें, (ल) गर्वानें वागणें तोऱ्यांत असणें ०दरवाजा-पु पुढील मोठा दरवाजा 'उठल्या अवाई उंच दरवाजा लाविला।' -ऐपो ६८ ०दर्पण-न सूर्यकांत 'उंच दर्पणीं अग्नी निघतो।' -दा १६ ५ १९ ०नाक-प्रतिष्ठा, मान्यता प्रौढी 'उंच नाकें असुरारीं। वागे न ऐसें करावें॥' -जै १७ ६५ ०नाक करून-क्रिवि १ प्रतिष्ठेनें मान्यतेनें २ निर्लज्जपणानें, बेशरमपणानें ०नीच-क्रिवि

१ खालीं वर असें, खडबडीत, उचसखल, उत्तमाधम २ ल्हान थोर, गरीबश्रीमंत 'उच नीच कांहीं नेणें भगवंत ।'—तुगा३६९१ ०पद—न चढण असलेला रस्ता, चढणीवरील जागा —वि किंचित् वर, थोडें उचावर म्ह०सात ताड उंच=अतिशय उंच

**उंच**—क्रिवि वर, हवेंत, उचावर [ स उच्च ]

**उचक**—वि ( बडोदें ) ठोक, उक्ती, ठराविक, उचलून दिलेली (रक्कम) 'जमादारास दरमहा योग्य ती उचक रक्कम बाधून देण्याचें करावें '—चिटणीसी माहिती २७

**उचकटणें**—उक्रि १ जोरानें बाहेर काढणें, उपटून काढणें, ओढणें, उसकटणें ( खिळा, झाकण इ० ) २ नखानें वगैरे उकरणें, खुरतडणें, सोडविणें ३ वरी झालेली जखम पुन्हा उघडी करणें, जखमेची खपली काढणें ४ सारखी बसलेली ( जमीन, कॅम, वस्त्राच्या चुण्या, तृणसमुदाय ) उखळणें, विस्कटणें, अस्ताव्यस्त करणें, जमीन, छप्पर उकरणें ५ ( ल ) मिटलेला व्यवहार पुन्हा उपस्थित करणें, विसरलेली गोष्ट पुन्हा उकरून काढणें [ स उच्चाटन, म उचकणें, किंवा उत्+निकटणें ]

**उचकटाउचकट**—स्त्री घाईघाईनें ओढणें, ओरबडणें, उलगडणें, विसकटणें

**उचकणें**—उक्रि १ उपटणें, चोरणें, उचलेगिरी करणें, फसवून घेणें 'श्री सुत वधु पैसा उचकी।'—अमृत ११० उचकटणें पहा [ उचकटणें ] २ उचलणें 'नाहीं म्हणोनि उचकीन करें फुलाला '—भाक २५ [ स उच्च+कृ=उच करणें ]

**उचकणें**—अक्रि बुडविण्याच्या उद्देशानें दुसऱ्याजवळून कर्ज अथवा उधार माल घेणें, माईर उद्देशानें उधारी करणें

**उचकणें**—सक्रि १ उपटून काढणें, समूळ वर काढणें २ ( ल ) उच्चाटण करणें, हाकून, फेंकून देणें [स उत्खनन, उचखणें—उचकणें]

**उचकणें-नें**—न ( व ) १ दाखला, उदाहरण 'दुसऱ्याचें उचकणें मला का देतोस ? ' २ टोमणा, छद्मी भाषण, हिणविणें ( क्रि० देणें ) 'मला काय त्याचें उचकणं देता ! '

**उचकळ्याउचकळ्या**—क्रिवि १ बुडत्या माणसाच्या पाण्यांतल्या गटंगळ्या (क्रि देणें) —स्त्रीअव (ल) उपजीविकेसाठीं धडपड, नशिबाचा बराबाईट फेरा (क्रि० देणें) [ बुचकळ्या द्वि ]

**उचका**—स्त्री द्रव्यादिक उपटण्याचा व्यापार, फसवेगिरी खिसेकातरूपणा, दुकानचोरपणा, उचापत उधारी, उसना, उधार माल ( क्रि० घेणें, काढणें करणें ) उचका या शब्दानें नेहमीं लबाडी ध्वनित होते [ उचकणें ]

**उचका**—पु १ काळजी, ध्यास वेध यामुळें होणारा त्रास स्वप्न ( क्रि० येणें लागणें, पडणें ) २ एखाद्या गोष्टीचें औत्सुक्य, कुतूहल, मनांत पक्कें बसलेलें भय किंवा धाक चिंता, घोर, धोसरा ( क्रि धरणें, लागणें, बसणें ) [ धचक ]

**उचकाउचक**—स्त्री १ घाईनें, उतावीळपणानें ओढणें, हिसकणें २ फसवून द्रव्यादिक उपटणें, उपटाउपट, लपवालपव, उचका पहा ( क्रि करणें, काढणें )

**उचकाना**—वि उंच कान असलेला 'उचकाना फॉगट्टु ' —भाए ९

**उचकी**—स्त्री कंठामध्यें सशब्द असा आचका बसणें, गुचकी, आचकी, उडकी, हिक्का ( क्रि० येणें ) 'उचकी उदानलिंगापासुन येतसे जाणा । ' [ ध्व उच्‌ ? ] ०लागणें-(आजारी मनुष्यास) अत्यवस्थ होणें, शेवटल्या स्थितींत येणें, मरणोन्मुख होणें 'उचकी लागली उसित गेला । पीत उसळलें उलाट आला। '—दा ३ ६ ३३

**उचक्या**—वि १ उचल्या, चोर, भामटा, खिसेकापू, उपऱ्या, दुकानचोर ०म्ह बाजार भरला नाहीं तोंच उचक्यांनीं कमरा बांधिल्या [ उचलणें, हिं उचक्का ] २ आपलें बळ, शक्ति, ऐपत न पाहतां हवेतसे, पाहिजे त्या अटीवर पैसे काढणारा, माल उधार खरेदी करणारा, भरमसाट कर्जाऊं वगैरे घेणारा [ उचकणें ]

**उंचखाल**—क्रिवि उचसखल, वरखालीं, खाचखळग्यामध्यें, खाचखळग्याची —वि विषम, नतोनत, खालींवरअसणारी (जमीन) [ उंच+खालीं ]

**उचंगणें**—अक्रि ( कों ) धजावानें वाढणें, उफाड्यानें वाढणें, फोंफावणें, जोरानें वाढणें, लवकर वाढणें, पुष्ट होणें ( मूल, रोगी, जनावर ) [ स उच्च+भग ]

**उचट**—स्त्री उचाट पहा

**उंचट**—वि १ उंच, चढावाची (जमीन), उभट, चढणीचा २ किंचित उंच, वाढलेला [ स उच्च+वत् ]

**उचटणें**—उक्रि चिकटलेला, जोडलेला पदार्थ वर उचलून काढणें (तव्यावरील भाकरी, शिक्के मारलेलें झाकण ), उचकटणें पहा ' पत्र उचटिलें प्रयत्नें । त्याही करायाकारणें ॥ ' —तुगा ४१०४ [ स उच्चाटन ]

**उचटणें**—उचाटणें पहा

**उचटणें**—न उलथणें, कलथा, उचटण्यानें साधन [ स उच्चाटन ]

**उचंडळणें**—उक्रि हिसळणें, सांडणें, पातळ प्रवाही पदार्थ हलण्यानें उचलून बाहेर पडणें, सांडणें [ स उच्च+आंदोलन ]

**उचंबळ**—स्त्री १ काठोकाठ भरून येणें, नदी, तळीं इत्यादि काठोकाठ भरून येण्याची स्थिति ' भाद्रपदाबाहेर खाडेइतकी भर, वाढ, फुग काय पाण्याची उचंबळ चालली हो ' २ ( गो ) तारा बळ ' माझी उचंबळ झाली ' ०खाणें—उडून चळवळ करणें पुन्हा पुन्हा उडून गडबड करणें, एखादें काम अस्थिर वृत्तीनें चालू ठेवणें, विशेषत पराभूत प्रतिपक्षानें पुन्हा वर डोकें काढणें या अर्थी योजतात याच्या विरुद्ध पड खाणें [ स उच्च+वलन ? ]

पत्र स्वीकारणें; जबाबदारी पत्करणें; अभिमान बाळगणें; समर्थन करणें; आधार देणें. म्ह० उचलली जीभ लावली टाळ्याला =विचार न करितां मनास येईल तें बोलणें; ताळतंत्र सोडून बोलणें.

**उचलतां-त्या पाई**—क्रिवि. अति त्वरेनें. 'तेथियां उचलतां पायीं धावती।' –शिशु ६८२. 'जाश्या निघाला लवलाही। तंव शकुन जाहले दोही बाही। म्हणोनि आला उचलत्यापाई। द्वार केमी॥' –कथा ४.१६.२२. [उचलणें+पाय]

**उचलती**—स्त्री. विकास; उत्थान. 'करी कमळांची उचलती' –दाव १७९. [उचलणें]

**उचलपांगडी-वांगडी**—स्त्री. १ हातपाय धरून उचलणें; बलात्कारानें नेणें (लहान मुलांना शाळेंत नेण्यासाठीं प्रयोग). २ बलात्कारानें घालून देणें; हकालपट्टी करणें; उच्चाटण. 'सुभोजींची उचलबांगडी होण्याचा वेळ आला होता.' –विवि ८.६.१११. [उचल+पांग-डी=झोळगाचें जाळें (हें मोठें असल्यास दोघे, चौघे उचलतात.)]

**उचलपुची**—वि. एक शिवी. ज्याची वृत्ती उचललेली आहे असा. 'येसूचे छंद करी उचलपुच्चाला दुशी.' -पला ८०.व

**उचलमावंदें**—न. (व) उच्चाट; हकालपट्टी. 'तेथून लवकरच त्याचें उचलमावंदें झालें.' [उचल+मावंदें]

**उचलला**—वि. १ उचललेला; वर आलेला; निघालेला; सोडून चाललेला. 'उचललेया प्राणासरिसीं। इंद्रियेंही निघती जैसीं।' –ज्ञा १२.१०१. २ मर्जीनुरूप, इच्छेप्रमाणें मंजूर केलेला; नेमून दिलेला; ठराविक. 'उचलला पगार, वेतन, शेर.' ०संसार-पु. तुटपुंज्या शासीवर चाललेला संसार, कामधंदा, व्यापार. ०हात-पु. स्वेच्छेनें यावयासाठीं पुढें केलेला हात; स्वसंतोषानें देणें. 'आई बाप मला जें उचलल्या हातानें देतील तें मी घेत असतों.' उचललेलें काम-न. स्वबुद्धीनें पत्करलेलें काम; रोपेलमें पाहून घेतलेलें काम.

**उचलसांचल**—स्त्री. उचलाउचल पहा.

**उचला**—पु. (कों.) दुर्गा देवी शिवा इतर ग्रामदेवतेच्या देवळांत देवाजवळ एक दगड ठेविलेला असतो तो. कांहीं गोष्टींविषयीं देवाला प्रश्न करून तो उचलला असतां केव्हां जड येतो, केव्हां हलका येतो; त्यावरून त्या प्रश्नाचें उत्तर समजतें; कौलाचा दगड.

**उचलाउचल**—स्त्री. १ प्रापंचिक चिन्हाड वगैरेचें स्थलांतर. २ अस्ताव्यस्त फेंकाफेंक; घाईनें जिनसा शोधणें, उलथणें वगैरे: कोणी कांहीं उचलण्याचा व्यापार.

**उचलाऊ**—वि. (ल्म.) उचलण्यास सत्य: उचलण्यालायक; उचलावासा वाटणारा. [उचलणें]

**उचलाडेवर**—स्त्री. (कों.) उचलणें व टेवणें; पुन्हां पुन्हां उचलणें; उचलाउचल. [उचलणें+डेवणें=टेवणें]

**उचलाव**—पु. चाल; उठाव; हल्ला; घाला. उचल अर्थ १ पहा. –शिदि ३४५. [उचलणें]

**उचलासांचल**—उचलाउचल पहा.

**उचलेगिरी**—स्त्री. भामटेगिरी; एखादी हातीं लागेल ती लहानसहान वस्तु हळूच पळवून नेण्याची, चोरण्याची क्रिया. 'सुधारणेचा जो नवा बाजार भरणार त्यांत उचलेगिरी करून कांहीं हातीं लागतें का पहावें' –केले १.१४०. [उचल+फा. गारी]

**उंचलो**—वि. (गो.) वरचा. [सं. उच्च]

**उचल्या**—पु. १ भामटा; खिसेकापू; चोरांचा एक प्रकार; किरकोळ चोरी करणारा; पुण्याकडे यांना भामटे म्हणतात. 'मैंद उचले खाणोरी। सुवर्णगंथी गुरेकरी।' –दा ३.७.४९. म्ह० 'बाजार भरला नाहीं तोंच उचल्यांनीं कमरा बांधल्या. – वि. थोडा काळ एके ठिकाणीं राहणारा; उपरी; उचलटप्पू पहा. [उचलणें]

**उंचवट**—वि. १ किंचित उंच. २ थोडा चढ असलेला; उंचावर असलेला; याच्या उलट यसकट. [सं. उच्च+वर्ती]

**उंचवटा-ळा**—पु. उंच भाग; टेंगाड; उंचाड; टेंब. २ अंगावरील, एखाद्या वस्तुवरील उंच भाग; टेंगूळ. ३ सपाट पृष्ठभागावरचा थोडा उंच भाग; ओटा. 'तो उंचवटा देखिला। नितळ नीट.' –ऋ ७२.

**उंचवणें**—अक्रि. उंच असणें.

**उंचशिरा**—वि. ज्याचें शिर उंच आहे असा; उंच बांधणीचा; चांगला उंच. 'चौथा मजला उंचशिरा करी वहार आकासीं।' –प्रला ९५. [उंच+शिर]

**उंचश्रवा**—पु. उच्चैःश्रवा; इंद्राचा घोडा. 'उंचश्रवा न सवरेची.' –उषा १६७५. [सं. उच्चैःश्रवस्]

**उंचसखल**—वि. उंच व खालीं; उंचवट व यदसल; चढ उतार असलेली; खडबडीत; विषम (स्थल) [उंच+सखल]

**उंचा**—वि. १ उच्च प्रकारचा, महत्त्वाचा; अधिक योग्यतेचा; नामी; गुणानें श्रेष्ठ असा. 'नीचिये कुळींचा उंचा वंश होय।' –तुगा २४२०. २ अधिक मौल्यवान; महाग. उंच अर्थ ६ पहा. [सं. उच्च]

**उचाट**—पु. १ कंटाळा; उद्वेग; नावड; तिटकारा. (क्रि० येणें; खाणें). २ ध्यास: गाद; उत्कंठा; घाई; अधीरेपणा; अत्यौत्सुक्य; एखादी गोष्ट करण्याचें कामीं भर. (क्रि० भरणें; खाणें). ३ खासगी लिलावानें विक्री. [सं. उच्चाटन; हिं. उचाट]

**उचाटणें**—अक्रि. तिरस्कार, वीट येणें; कंटाळा येणें; तिटकारा येणें; मन उडणें. [सं. उच्चाटन]

**उंचाटा**—पु. १ (नाट्य.) मुखवटे तयार करण्याकरितां केलेला ठसा, आकृति; पौराणिक नाटकांतील गणपती आदिकरून मुखवट्यांसाठीं मातीची आकृति प्रथम करून तिच्यावर कागदाचे थर

। वकरूवून जी आकृति रग्न घेतात त्या आकृतीस उचाय म्हणतात जसें-गणपतीचा, मारोतिदाचा उचाग २ (मुद्रण) ज्यांतून टंगे (टाईप) गाळले जातात तो साचा (३) मेट्रिस [स उच्चट्]

**उंचाड**—न १ उचवटपाची जागा, स्थान टकडी, चढणीची पागा, टेंब, टेकाड -वि २ उच, उन्नत, तुग, भव्य उचवट पहा [स उच्च]

**उचापत**—स्त्री १ माल उधार विकत घेणें, उधारी, उराग घर 'वाण्याची उचापत देऊ कशानें मी आता।'-पला ८० म्ह० उचापतीचें पोतें, सदा हात रिते २ उधार माल, पतीवर आणलेला माल 'उसिणें उचापत कां देतील '-दावि ३०१ ३ कोणाकडून वेळोवेळीं काढलेली रकम, उचल अर्थ ७-८ पहा ४ (सामा) कर्ज 'ह्याली शुद्ध उचापत प्रभुवरें केली विदागी दहा।'-राला १४ ५ उठाठेव, नसती उलाढाल, भानगड, विकत भाण्ण [स उद्+आपद्] ०खाऊ-वि उधारीवर उपजीविका करणारा ०खाणें-१ चागली गोष्ट घडून येईल-पुढें काहीं तरी मिळेल-या आशेवर चैन करणें २ दुसऱ्याचें विकत भांडण घेणें, भाडण ओढून घेणें, विकत वाद घेणें, लफड्याच्या भानगडीं माजणें ०विचापत-स्त्री उचापत द्वि पहा. **उचापतीचा रोजगार-व्यवहार**-पु उधारीचा उसनवटीचा, केवळ पतीवर व्यवहार याच्या उलट रोकडीचा व्यवहार [ हिं उचापट]

**उचापती-त्या**—वि १ उठाठेवी करणारा २ उधार घेणारा व देणारा [उचापत]

**उचापुरा**—वि सुदृढ, भव्य, पूर्ण वाढलेला 'हें स्थित्यंतर युद्धकलेंत अलीकडे यात्यामुळें उचापुरा जवान आणि किरकट पोरहि सारखेंच '-नि ९७१ [स उच्च+पूर्ण]

**उंचाफेर**—पु घोडयाची एक प्रकारची चाल -अश्वप १९४ [उच+फेर]

**उचारापाचार**—पु हट लागून देणारें, नवीन किंवा उलटणारें टुखणें (क्रि० करणें, होणें) [पाचारा=पाचावा, पाच्या द्वि]

**उचारापाचार**—पु दुसऱ्याच्या खाजगी गोष्टी लोकांत सागणें, बकबकणें, मुखरस पाघळणें (क्रि० करणें) [स उच्चार द्वि]

**उचारापाचार**—पु. (कुकींनें) उधारपाधारबद्दल वापरतात

**उचाल, उचाल जाणें**—उच्छाल, उच्छाल जाणें पहा

**उचावणी**—स्त्री १ उठावणी 'करोनि शब्दाची उचावणी। ना त्तु खडिला तिसा मार्गी।'-ख्रिपु २ ४५.३३ २ (ल) गौरव, मोठेपणा [स उच्चय, प्रा उच्चाव]

**उंचावणें**—अक्रि १ उच होणें, वाढणें 'एथ उचावे तेणें नाम। नैमित्तिक होय।'-ज्ञा १८ ११४ २ वक्षस्थल उन्नत होणें ३ उच जाणें, उडणें, भरारी मारणें ४ (ल) सुस्थिति प्राप्त होणें, उत्कर्ष होणें -सक्रि १ चढविणें, वर उचलणें, उठविणें, उंची वाढवणें, थर करणें 'रोप धावला तत्क्षणा। उचावूनि फणा।' -फणाचा पाळणा १०. २ मोठेपणा आणणें 'आम्हा मानवांतें उचावीती मातें।'-टिळक कविता १३४

**उचित**—वि १ देशकाल, लोक, शास्त्र, रीति इत्यादिकांना अनुसरून केलेलें, योग्य, लायक, जुळणारें, साजणारें, बरोबर, चागलें 'प्रमाण न म्हणों जरी उचित मारिया नीचतें।'-केका ३ २ सवयीचें, अभ्यासांतले -न १ योग्यपणा, योग्यता 'निळा म्हणे जागा आपुल्या उचिता।'-निगा १३३ 'देवाचें जें मनोगत। तेंचि आपुलें उचित।'-दा ४ ८ ३२ २ (व) पारितोषिक, बक्षीस, दणगी. 'भाटांतें उचितीं वारितु। पाडयांचा स्तदु वापदीतु।' -शिशु ५२१ 'द्रुपदें गौरविलें उचितीं।' -मुभादि ४५ ९६ -वराप ५० २८३ [स वच्] ०ज्ञ-वि उचित, अनुचित ज्यास समजतें तो, व्यवहारज्ञ, शहाणा, चतुर, माहितगार **उचितास येणें**-योग्यतेनुरूप उचित वाटणें, पसंत पडणें, योग्य दिसणें, बरोबर वाटणें

**उचिष्ट**—उच्छिष्ट पहा 'बहुतांचें उचिष्ट अधीकारी' -दा २ १ ६० [स उच्छिष्ट]

**उंची**—स्त्री १ पदार्थाच्या खालच्या भागापासून वरच्या भागापर्यंतच्या व्याप्तीचें प्रमाण, माप, तळापासून शेंड्यापर्यंतचें प्रमाण २ (राजा) (विहीर वगैरेची) खोली -वि अधिक चागला, सरस, श्रेष्ठ जास्त किंमतीचा उचा पहा 'महाराष्ट्रांत हीं एकच उंची सस्था होती '-कले १ २९८ [स उच्च, सिं ऊचो]

**उंची**—शअ (राजा) वर, उंचीवर, शेंड्यावर, कळसावर, उपरि 'पर्जन्यकाळीं मीठ चुलीउंची टेवावें म्हणजे पाघळत नाहीं' [स उच्च]

**उंची देणें**—क्रि (व) हरभऱ्याच्या झाडावर चढविलें हुर लावयास लावणें, चढविणें, ग्वनें फुगविणें, भर दणें

**उंचीदौड**—स्त्री घोड्याची एक चाल -अश्वप १८८

**उंचीव**—स्त्री उंची, उंचपणा 'उंचिवे जैसा प्रचड ताळ ' -मुसभा ८ ३८ [उंच]

**उंचून**—शअ वरून, उंचावरून, शेंडयावरून, डोंगयावरून (क्रि० वाढणें, टाकणें) [उच]

**उचेट**—स्त्री कोंदणातून खडा काढल्यानतर उचकटून काढलेलें सोनें, रुपें इ० [स उच्चाटन, म उचटणें]

**उंचेला**—वि उच, उंच असलेला, उन्नत, उत्तुग, उचगा, (गो) उचोलो [स उच्च, म उच]

**उचोटा**—उचवटा पहा

**उच्च**—न १ केंद्रस्थ सूर्यापासून अति दूर असणारा ग्रहकक्षेतील बिंदु, सूर्योच्च २ ज्या राशींमध्यें विशिष्ट ग्रह बलवान् असतो ती रास, जसें-सूर्य मेष राशींत, चंद्र वृषभ राशींत, बुध कन्या राशींत, शुक्र तूळ राशींत असल्यास त्यास उच्च मानतात —वि उंच, भव्य, श्रेष्ठ, उच्च प्रदेशावरील, उच्च जातीय, उच्चासनस्थित इ० 'उच्चा तेथ सतुरी पोफळी।' –दाव १३५ [स] ०नीच भाव–पु एक मोठा व एक ल्हान अशी भावना, द्विधा, द्वैतभाव ०पदस्थ–वि मोठ्या अधिकाऱ्याच्या, सन्मानाच्या जागीं असलेला ०शिक्षण–न विश्वविद्यालयीन (युनिव्हर्सिटीचें) शिक्षण, कॉलेजातील शिक्षण ०स्वर–(विरु) चढा आवाज, मोठा, स्पष्ट आवाज, तीव्र स्वर, वरचा सुर, तार सप्तकातील आवाज

**उच्च दिवाण**—वि (गा) खुळा, मूर्ख, वेड बहाणा [का हुच्चा=खुळा+फा दिवाण]

**उच्चलन, उच्चाटन**—न १ उंच करणें, धरणें, उचलणें २ उच्चाटन, हकालपट्टी [स उत्+चल्]

**उच्चाट**—पु आतुरता, उत्कंठा उचाट अर्थ ५ पहा 'माशिया हा मनें घेतला उच्चाट। पहावें वैकुंठ पंढरी हे॥' –व ३४६

**उच्चाट**—पु उचल्या, भामटा [स उच्चाटन]

**उच्चाटण-न**—न १ मनाच्या साहाय्यानें मनुष्यास स्वतःचें घरदार, नोकरी, उद्योग याविषयीं तिटकारा उत्पन्न करून त्यास तें सोडावयास लावणें, जादूटोणा करून वेडापिसा करणें २ जादूटोणा, मंत्रप्रयोग ३ हकालपट्टी, उचलबांगडी, उखडणें, घालवून देणें, उस्थून पाडणें, दूर करणें [स उच्चाटन]

**उच्चाटणें**—उचाटण करणें

**उच्चातिउच्च**—वि श्रेष्ठात श्रेष्ठ 'तुमच्या मतें तुमचीं अन न्योपभोग्य सुधारणेचीं उच्चातिउच्च जीं तत्त्वें आहेत' –टि ४ ७९ [स उच्च+अतिउच्च]

**उच्चार-ण**—पु न वाणीपासून वर्णात्मक शब्दाची होणारी स्पष्टता किंवा त्यास अनुकूल असा व्यापार, बोलण्याची क्रिया, पद्धति, बोलणें बोलून दाखविणें, भाषा, बोल [स उत्+चर्]

**उच्चारणीय**—वि सांगण्याजोगा, बोलून दाखविण्याजोगा [स]

**उच्चारणें**—उक्रि उच्चार करणें, तोंडातून काढणें, बोलणें, बोलून दाखविणें, स्पष्ट सांगणें [स उत्+चर्, उच्चारण]

**उच्चारित**—वि उच्चारलेलें, बोललेलें, सांगितलेलें, उद्गार केलें [स]

**उच्चार्य**—वि उच्चारणीय, वारण्यालायक, सांगण्याजोगें [स] ०मान–वि उच्चार होत असलेला

**उच्चालक**—पु (यंत्र) तरफ, जड पदार्थ उचलण्याकरितां योजलेला लांब दांडा (६) लिव्हर [स उत्+चर्]



**उच्चावच**—वि ल्हानमोठा, उच्चनीच 'ये लोकीं उच्चावचें जाण। देवांरि समान निजभावें।' –एभा २७ ३४० 'सर्वत्र उच्चावच भेद आहे।' –सारुह ४ १३ [स उच्च+अवच]

**उच्चावणें**—अक्रि मोठा होणें उचावणें पहा 'तपस्तेजें बहु तोंचि उच्चावला' –वचिसु ४ [स उच्च, प्रा उच्चाव]

**उच्ची**—स्त्री (ना) एखाद्यास वर चढवून त्याची केलेली फजिती ०पट्टी–स्त्री फजिती, उच्ची उच्चीत येणें–(स्तुति केल्यामुळें) चढून जाणें, वनणें [का हुच्चु=मूर्खपणा]

**उच्चैर्घोष**—पु मोठ्यानें जयघोष, आकांडतांडव, उदोउदो 'स्त्री सुधारणा व स्त्रीशिक्षण यांच्या महातत्त्वाचा उच्चैर्घोष करणारानीं ही गोष्ट अवश्य ध्यानांत ठेविली पाहिजे' –टि ४ ८१. [स उच्चैः+घोष]

**उच्चैःश्रवा**—पु मोठ्यानें एकूं येणारा क्षीरसमुद्रांतून निघालेला इंद्राचा घोडा (चौदा रत्नांपैकीं एक) 'तुरंगमातां प्रसिद्ध आन उच्चैःश्रवा मी।' –ज्ञा १० २३७ [स]

**उच्छलन**—न १ उच्चलन पहा २ उसळी [स उच्चल्]

**उच्छव**—उत्सव पहा

**उच्छिद्र**—न भूमिछिद्र अळवें पहा 'उच्छिद्र आणि पूर्णचंद्र। वत्सपदकें समुद्र।' –फ ४७ [स उच्छिद्र]

**उच्छाई**—वि उत्साही पहा 'सांगतो सत्कारहनियां मन उच्छाई।' –होला ४०

**उच्छाद**—पु १ उपद्रव, त्रास, पीडा, सतावणूक, गांजणूक, पुरेपुरेसें करणें (क्रि० देणें) २ छळाछळ, जुलूम (चोर, दरोडखोराचा), खाड्या (मुलाच्या) (क्रि० आपणें, देणें, मांडणें) ३ उपद्रव झालेली स्थिति, त्रस्तता [स उत्सादन] ०काढणें–त्रास सांसणें 'या मुलाचा उच्छाद मी काढूं तरी किती?' ०येणें–त्रासणें, कंटाळणें, पीडीत होणें 'या धिंगामस्तीनें मला उच्छाद आला आहे!'

**उच्छाप**—पु शापाची निवृत्ति, शापावर तोड, उपाय, इलाज, याकरितां असणारा वर [स उत्+शाप]

**उच्छाल**—पु. वाढ, चढ, बढती, उत्कर्ष ०जाणें–१ फुगणें, एखाद्यावर रागावून उठणें २ उडी मारणें (घोडा वगैरेनीं) [उत्+चल्]

**उच्छा(त्सा)व**—पु उत्सव पहा 'मगरोत्साव वाजवते। ता मदावें रमाल कंप। श्रावणा वसंतचाचे भाय। गानदें शारी।' –वेसीस्व १६

**उच्छास्त्र**—वि शास्त्रविरुद्ध, शास्त्र सोडून (भाषण, वर्तन) [स उत्+शास्त्र]

**उच्छिन्न**—वि पूर्णपणें नाश पावलेलें, नष्ट झालेलें [स उत्+छिद्]

**उच्छिष्ट**—वि १ अवशेष राहिलेले उरलेले (पदार्थ), उष्टे 'पडिलिय ठायीं उच्छिष्ट मेवावें '—तुगा ६२२ २ (ल) उपभुक्त, वापरलेले (वस्त्र, पुष्प, स्त्री, इ०) ३ उष्टे, शिळे, नवीन नसणारें, उसनें घेतलेलें —न उष्टीपानें, उष्टे, उच्छिष्टान्न 'उच्छिष्ट काही धर्मार्थी। ब्राह्मणाची भीड धरी।'—एरस्व ७ ७६ [स उत्+शिष्ट] ०कल्पना—स्त्री दुसऱ्यानें अगोदर व्यक्त केलेली कल्पना, शिळा, नावीन्य नसलेला विचार ०चांडाळी—स्त्री एक क्षुद्र देवता हिला प्रसन्न करण्याकरिता दान जेवणाच्या मधील कालात भाकरीचा तुकडा दाढेत ठेवण्याचा एक विधि 'कर्णपिशाच भगिनी। उच्छिष्टचांडाळी रानसन्नी जरणी। वेताळ गुज्या काळरजनी। भर्नि जनीं अतिप्रीती।'—ह १३ ६८ ०भाषण-श्लोक-वाक्य—न पु पूर्वी दुसऱ्यानें म्हटलेलें वचन अगर भाषण, वाङ्मयचौर्य

**उच्छिष्टणें**—उक्रि उष्टे करणें अर्धवट-काही काळ-भोगून टाकून देणें, जुनें-शिळें करून टाकणें 'वेद म्हणे मा उच्छिष्टें। होमद्रव्य नेणती॥'

**उच्छृंखल**—वि १ ताबा दाब नसलेला, उतावळा, अविचारी, अविवेकी, अनियमित, गैरशिस्त 'हें उ० खल बोलणें कायसें।'—ज्ञा ६ १६२ २ शास्त्र, राजा, वडील इत्यादिकांस न मानता वागणारा, उद्दाम, स्वच्छंद, स्वैर, स्वच्छाचारी 'राहटे उच्छृंखलु। तयापरी॥'—ज्ञा १८ ६६९ [स उत्+शृंखला=सांखळी]

**उच्छेद**—न पु १ समूळ नाश नायनाट विध्वंस मोड २ त्रासदायक कृत्य (शैथिल्यानें उच्छाद बद्दल) 'उच्छेद तो असे हा गे आरंभला। राकडे विठ्ठला परचक्र'—तुगा ६४७ [स उत्+छिद्=तोडणें] ०आणणें-मांडणें—नाश करणें सामाशब्द-धर्मोच्छेद वंशोच्छेद गृयुच्छेद, वनाच्छेद कुलाच्छेद गृहोच्छेद ०क—वि नाहींसें करणारा नायनाट करणारा, त्रास देणारा मुळविणारा निर्दलन करणारा

**उच्छेदणें**—उक्रि नाश करणें, नाहींसे करणें उध्वस्त करणें, फडशा, सप्पा, नायनाट करणें

**उच्छेदित**—वि उच्छेद केलेला, नाश केलेला, उध्वस्त केलेला [स]

**उच्छ्वास**—पु १ नाकातून आत घेतलेली हवा पुन्हा बाहेर सोडणें बाहेर सोडलेला श्वास, (निश्वास) नाकानें श्वास टाकणें, सुस्कारा २ हवा जाण्याकरिता ठेविलेलें भोक वायुमार्ग, श्वासरंध्र ३ पाण्याचा नहर नळ, उश्वास ४ (विहि) उस्वास उंचावरून आणलेल्या पाण्याची उंची कायम रहावी व पाणी दूर अंतरावर न्यावें यांत व आतील दूषित हवा बाहेर जावी म्हणून बांधलेला हौद 'नाना फडणिसांनीं बांधलेले पुष्कळ उच्छ्वास आहेत'—अस्तभा १ [सं]

**उच्छ्वासन**—न श्वास सोडणें, भाषोच्चार करण्याचा व्यापार. उच्छ्वास अर्थ १ पहा [स]

**उछक**—वि स्वैर 'उछक आणि सहिष्णु। तोचि आत्मा।'—दा १३ १ १७ उच्छृंखल पहा

**उंछवृत्ति**—स्त्री १ शेत कापून नेल्यावर राहिलेले दाणे टिपून त्यावर निर्वाह करणें रस्ता, बाजार इ ठिकाणीं पडलेले धान्याचे कण वेंचून त्यावर निर्वाह करणें 'एक त्याचें जीविकावर्तन। शिलोंछवृत्ती जाण।'—एभा १७ ४१४ —पु अशा प्रकारें निर्वाह करणारा उंछवृत्तीनें राहणारा तपस्वी [स]

**उछह**—पु उत्साह पहा 'सर्वे रामनौमी उछह केले।'—सप्र ४ ९

**उछाडपछाड**—उखाडपछाड पहा

**उछाव-ह**—पु उत्साह पहा 'वेणीस्वामी रघुनंदन। ताटिका मारिती उछाह।'—वेमीस्व ११९

**उछिष्ट**—उच्छिष्ट पहा 'पुढें न शिवावें म्हणानि उछिष्ट॥'—दावि २०

**उछेद**—पु उच्छेद पहा 'प्रवृत्तीचा उछेद। जीवमात्रास वाटे खेद॥'—दा ७ ६ १९

**उछेदणें**—उच्छेदणें पहा 'मत्सरें यासी मिथ्या म्हणती। तरी अवघेचि ग्रंथ उछेदती। नाना ग्रंथांच्या समती। भगवद्वाक्यें॥'—दा १ १ १७ 'देवा भक्ताम उछेदी॥'—दा ३ ३ ७

**उजरुरा-खोरा**—वि उजव्या हातानें काम करणारा, याच्या उलट डावखोरा [स ऋजु, प्रा उज्जु+फा सुर्दन् उजवा+खोर]

**उजंग**—पु सुस्थिति, सुखाचा काळ 'देशपांड्याच्या घराणें केव्हा उजंग पडला तो पडो' [स ऋजु+अग, उजु+अग]

**उजगरा-गारा-गिरा**—पु १ (प्र) उजागरा जागरण, निजावयास उशीर 'आळूई उजगरा किर्ती। कराल तुम्हीं॥'—शिशु २७२ 'थाडे सुजघरीं हातीं उजगर। देउळासीं को रे मरसी जाता॥ तुगा २९९३ २ (ल) दुःख, श्रम, त्रास, कटाळा 'भागुला घेवानिया चारा॥ मग पटती महामारा। तणें होतसे उजगरा। कपीश्वरासी।'—कथा ४ १४ १२५. सामान्यत उजागरा पहा ३ जागृति आळवण (क्रि० करणें, देणें) [स उत्+जागृ उज्जागरक, प्रा उज्जगरय]

**उजगारी**—स्त्री उत्कर्ष प्रसिद्धि, लौकिक, भरभराट वाढ उजागरी पहा 'तिलक्या उजगारीस ती (आमची भाषा) कधीं तरी पोचेल कीं नाहीं याचा संशय आहे'—नि ३०१ [स उत्+जागृ]

**उजड, उजडणी-णें-ता**—उजेड पहा

**उजदार**—न पुढील दार, पुढचा दरवाजा 'निरविल तें मग निजात्म स्वसुखें यतिल उजदारा'—देप ६५. [स ऋजु+द्वार=उजु+दार-उजदार]

**उजदार**—वि (गो) प्रकाशमान 'उजदार दिसत असे कर' [स उद्योत, प्रा उज्जोअ+दार प्रत्यय]

**उजम**—पु थोरवी, श्रेष्ठता 'हे आपले सर्कारच्या गोष्टी उजमाच्या सागतात'—दिमरा १ १७ [अर इझ्म किंवा उज्म=श्रेष्ठता, वैभव]

**उजर-रा**—पु (व) तक्रार, हरकत, आक्षेप, बचाव 'पुढे तुम्हीं जिंरत असाल तरी तुमचा कोणताच उजर ऐकला जाणार नाहीं' 'त्याची स्थावर जंगम इस्टेट इन्साफावाचून, त्याचा उजरा ऐकल्यावाचून, महाराजाच्या हुकमानें सरकारात घेतली'—विविज्ञ ३ १०२ [अर उज़्र्=सबब]

**उजर**—पु. उत्कर्ष [म ऊर्ज्]

**उजरणें**—उक्रि १ चकाकित करणें, स्पष्ट करणें, उठावदार करणें, स्वच्छ करणें, ठळक करणें (रेषा, आकृति, मुद्रण छाप) २ पुन्हा उच्चारून पक्के करणें, उजळणी करणें, दृढ करणें, (पुन पुन उच्चार, प्रयोग इ० योगें अभ्यास, आज्ञा, शोध) [म उज्ज्वलन म उजळणें]

**उजरण**—उक्रि १ दुरुस्त, डागडुजी करणें २ मारलेले विळे नीट करणें, साळे बसविणें, करणें, पोचे आलेलें भांडें नीट करणें, गोलाकार घडणें (लोहारी काम) 'मी भक्तिवश न चुकलों त्या कुब्जेच्याहि वपुसि उजराया।'—मोप्राति ७ ४७ [स ऋजु+कृ]

**उजरणें**—अक्रि १ उत्कर्ष होणें २ शक्ति परत येणें, सुधारणें, मूळच्या स्थितीवर परत येणें, हुषारी, तजेला येणें, टवटवीत होणें (प्रकृति सुधारून) ३ मंद बुद्धीच्या मनुष्याची प्रगति होणें, बुद्धीचा विकास होणें, त्याला जास्त कळू लागणें 'सग हित मुत गुरु तू आदेशि समर्थ याशि उजरया।'—मोवन १ ५२ [स ऊर्ज्]

**उजरा**—पु १ प्रगट मार्ग, रीत, 'अनादि सिद्ध उजरा।'—ज्ञा १६ २७१ २ प्रसिद्धि, उजगरा पहा [स उद्+गाग्]

**उजरामम्हामत**—भजामम्हामत पहा

**उजरावणें**—उक्रि (गो) स्वच्छ करणें (मासरी) उजरणें पहा [म उज्ज्वलन, ऋजु+कृ; उजु+कृ]

**उजरिया**—स्पष्टीकरण, विवेचन, उपपत्ति 'तव उजरिया केले दैवाचिया। ते परिसा पा।'—ऋ १० 'सव सिद्धांताचिया उजरिया। माइलिया निंदसुरिया।'—भद्र ५ ३९ उजरी पर्व पहा [म उज्ज्वलन]

**उजरी**—स्त्री तेज, प्रकाश, प्रभा 'प्रभेची अंगी उजरी। ते सोडवुनि आचारीं।'—ज्ञा १४ ३९१ २ स्वच्छता, स्वच्छपण, निर्मळ 'परी प्रमेयाची उजरी।'—ज्ञा १८ ५५ ३ उत्कर्ष, उदय, उजळा, 'तुम्ही म्हण कई भाग्याची उजरी। हाटक पडली देखा बरा।'—तुगा ५४८, 'आता यापरि प्रकारें क्रियाच हारिली। आपुलें होय मनाची उजरी।'—स्वानु ३ २ ९ ४ अंदरविरणा 'तैसी आहारनिद्रेसी उजरी।'—ज्ञा १२ ७६७ —वि १ स्वच्छ, उघड 'नाल्या कामा नाहीं चोरी। तो सड। शाय उजरी।'—ज्ञा १८ ४३ [स उज्ज्वल]

**उजरी**—वि सरळ 'परि ते भजनी उजरी नव्हे। विषम पडे।'—ज्ञा ९ ३४५ [स ऋजु]

**उजरी**—स्त्री सहाय्य, सामर्थ्य, आश्रय 'बळमानिया उजरिया। आपणया पति कुल्त्रिया। जोडोनि सोपिती जैसिया। अहेवपणें'—ज्ञा १६ ३७७ [स ऊर्ज्=शक्ति, पोषण]

**उजवट**—वि उजळ, गोरा 'नवऱ्यापरीस नवरी उजवट, सोन्याचे तुला गोट साळुबाई' [म उज्ज्वल]

**उजवड-ड, उजवाड**—पु (गो) उजेड, प्रकाश 'करतेल्याच्या तोंडाक उजवाड पडलो' =करणाऱ्याच्या तोंडाचा प्रकाश पडला [स उज्ज्वल]

**उजवण-णी-णूक**—स्त्री कर्जितदशा (भूमि, शत्र, मनुष्य, इ० काम) [स ऊर्ज्]

**उजवण**—स्त्री १ समाप्ति, शेवट, अखेर, बाळपण 'जेथे कृष्णकीर्ति कीर्तन। तेथें कर्माकर्मांची उजवण। होय संसाराची बोळवण। जन्ममरणसमवेत।'—एभा ३० ४० २ साफल्य 'आणि आयुष्या उजवण जाहली।'—ज्ञा १० १८७ ३ लग्न, मुंज इत्यादि संस्कार अवश्य त धार्मिक विधि, (विशषत) विवाह 'पुत्राम नोवऱ्या आल्या। आता उजवणा केल्या। पाहिजेत जी।'—दा ३ ४ ७ [स उद्यापन, प्रा उज्जा (उज) वण]

**उजवणें**—अक्रि १ विहित नेमाप्रमाणें समाप्त होणें, पार पडणें, यथायोग्य तडीस जाणें (नेम, विधि, धर्मकृत्य) सफळ होणें, सुपरिणामी होणें 'मग म्हणे गा प्रज्ञावंता। उजवली आणि वस्तुत्वता।'—ज्ञा १४ ६३ २ लग्न वा विवाह इत्यादि संस्कार होणें, 'तुनचेचि कळुणें वाटे। आता आजुवर पण आले।'—शिशु २०८ [स उद्यापन, प्रा उज्जावण=उजवणें]

**उजवणें**—अक्रि १ आपत्ति रोग इत्यादींतून निभावून जाणें, पार पडणें २ चांगलें निघणें निवडणें [स ऊर्ज्]

**उजवरा**—पु स्पर्धा उजरी पहा 'तव नामाचा उजगर। धुडुनि नाशी चराचरा। म्हणोनिया या नंदा। तुटानामा।'—कथा ६ १९ १३

**उजवा-वी-वें**—वि १ दक्षिण उजवीकडचा डावा नाही उजव्या इति २ सरळ सुधारणा म्हण शुभी उजवा '३ सरळ [स ऋजु] ०हात १ उजवा हात अत्यन्त भार भाग, पूर्ण विश्वासातला मनुष्य अत्यन्त मान्नीय निकटवर्ती. 'इनें शाल्यावर मादक्या ...ग ... उजवा हात। वस्तु' —भवकर दिन उजवा मुहूर्त ... नारि ... पाना नाही ... ०माळण-उजवीकडून ... भौतीं निघणें, प्रदक्षिणा करणें 'विनें पृथ्वी ... ज्याचे ... पा ... मुरवत ...'—मोन ... ७ ८१ '... नवापी ... '—सामी ६ ... '... उजवें धाक्न नेत ...' मार्ठा

उजवी घाल ' ०बाजू–स्त्री १ राजसभेंत उजव्या बाजूस बसलेली मंडळी, मोठे मानकरी लोक २ विश्वासू, अतिशय उपयुक्त असा राजेलोकाचा उजवा हात असलेला माणूस **उजवी डावी देणें**–होय-नाहीं स्पष्ट म्हणणें, होकार किंवा नकार देणें **उजवी देणें**–१ उजव्या बाजूकडे जाऊं देणें २ मूर्तीच्या अगाला लावलेले तांदूळ, फुलें वगैरेपैकीं उजव्या बाजूकडील खालीं पडणें कौल देणें ३ संमति देणें, होकार देणें ०जाणें–उजवीकडून जाणें

**उजवाडणें**—अक्रि (गो) सूर्योदय होणें 'उजवाडलें आतां गोराक पसरींक सोड ' [ उज्ज्वलन ]

**उजवात**—स्त्री (गो) उदबत्ती ' आज उजवात देवासमोर लाव ' [ऊद+वात]

**उजवारणें**—क्रि (राजा) रोगांतून बरें होणें उजवणें पहा [ स ऊर्जन ]

**उजविणें**—सक्रि १ समाप्त करणें, उद्यापन करणें, पार पाडणें, पुरें करणें, संपविणें 'अविनयदचिप्रतिज्ञा उजवुनि गुरुभक्तिचा रस त्यजुनि।' –मोकर्ण १ १७ 'जें जें व्रत धरावें। त्यातें उजवावें तत्त्वता।' –गुच ३२ ३६ २ सुपरिणामी करणें 'धन्य इहीं उजविला धनुर्वेद।' –मोकर्ण १० १२ ३ विवाहादि संस्कार करणें उजवू किती होतील पोरें।' –तुगा २५४९ 'दिवसेंदिवस खर्च वाढला। यावा होता तो खुंटोनि गेला। कन्या उपवरी जाहल्या त्याला। उजवावया द्रव्य नाहीं॥' –दा ३ ४ ३ **उजवून घेणें**–लग्न लावून घेणें 'कन्या नृपाची उजवून घ्यावी' –सारुह ७ ९१ **दोहों अंगीं उजविणें**–लग्नामध्यें दोन्हीं पक्षाकडील खर्च करून लग्नकार्य पार पाडणें [ स उद्यापन, प्रा उज्जावण ]

**उजविणें**—सक्रि १ व्यवस्थितपणें करणें, उत्कर्ष करणें, प्रगति करणें ती आपला संसार उजवीत नाहीं हें तर ठरलें ' –निच ९ ५६ २ सजविणें, विभूषित करणें ' चित्रें काढून चौक उजविले ' –ऐपो २११ [स ऊर्ज्]

**उजळ**—वि १ चकचकीत, सतेज, जिल्हई दिलेली (धातु), स्वच्छ, पांढरा, निर्मळ २ गोरा, सुंदर, सतेज (चेहरा) ३ फळ पिकतांना रंग बदलून जी सतेजता येते तशा प्रकारचें (पेरू केळें इ० फळ) ४ शुद्ध वर्तनाचें राबल्यात येण्याजोगे 'उजळ लोकां पैकीं निवडण्याचें धोरण असावें ' –जव्हेरखानानियम ९ [ स उज्ज्वल प्रा उज्जल, गु उजळु सिं उजलु, हिं उजल] **०टिक्या**–वि कपाळावर पांढरे टिपके असणारा (घोडा) **०ठग**–पु १ संभावित मामला, राजरोस भामटेगिरी करणारा २ बाहेरून भपकेदार परंतु कवडीमोल वस्तु आणून सरळपणा नाहीं असा माणूस **०तोंड-माथा होणें**–अपवाद आरोपापासून मुक्त होणें दोषमुक्त होणें, कालिमा जाणें **०माथ्यानें हिंडणें**–राजरोसपणें वावरणें, वागणें, न लाजतां वागणें

**उजळणी, उजळणूक**—स्त्री १ चकचकीत करणें, स्वच्छपणा करणें, उजळा, जिल्हई देणें, पाणी देणें २ आवृत्ति, धुळाक्षरांचें लेखन व पाठांतर ३ (गणित) पाढे सवाकी, दिडकी, अडीचकी, औटकी, शेर, मण, टांक, आणे वगैरे हिशोबाचा भाग, हा भाग तयार करणें ४ (ल) रूप शिक्या देणें (क्रि० करणें) [ स उज्ज्वलन, प्रा उज्जळण, म उजळण–णी ]

**उजळणें**—सक्रि १ चकचकीत करणें, जिल्हई देणें, पाजणें, निर्मळ, स्वच्छ करणें २ दिवे लावणें, मशाल पेटविणें, प्रकाश करणें, पेटविणें, पेट देणें 'जैसा माळवल्लिया दिवा। प्रभेसि जाय पांडवा। मग उजळिजे तेथ तेथवरा। तैसाचि फाके॥' –ज्ञा १५ ३६९ ३ प्रकाशित करणें 'दंत तेजें उजळोनी दिशा। हांसोनि म्हणे।' –मुआदि २२ ८८ ४ स्पष्ट करणें, सुलभ करणें ' विरक्तें पर मार्थ उजळावा ' –दा २ ९ १२ ५ उजळणी, आवृत्ति करणें 'पाठ दृढचि असावे। सर्वकाळ उजळीत जावें।' –दा १८ ३ १९ –अक्रि १ गोरें होणें, सतेज होणें, सुंदर होणें ' क्रमेंच तीचीं उजळेच अंगें।' –मारुह २ ५३ 'उजळेना ना काळवंडेना।' –दा १३ २ २२ २ पाडास आलेलें आंब इ० सुंदर रंगयुक्त होणें, उजळ होणें 'बापुरवेलीची चोखडी। उजळिली परीवडी।' –ऋ ८४ ३ (उष्णादि विकारानें लाल झालेला डोळा, अंधारी रात्र) निवळणें ४ प्रकाशित होणें 'जैसें त्रैलोक्य दिसे उजळलें।' –ज्ञा १ ३९ 'उजळल्या दाही दिशा ' –तुगा ६७८ [ सं उज्ज्वलन, प्रा उज्जळण, सिं ओजारणु ]

**उजळपाजळ**—वि स्वच्छ सतेज, चकचकीत, लखलखीत, तेजदार, लखपख (वस्त्र पात्र इ०) [ उजळ द्वि ]

**उजळा**—पु १ तकाकी, चकाकी, लकाकी (घासून, पुसून येणारी) २ जिल्हई, मुलामा (सोन्याचांदीचा) (क्रि० देणें) 'तैसीं चंपककुसुमें उजळा दिधलें तसेंचि ग स्वर्णे ' –कम ९२ ३ जिल्हई देण्याचा पदार्थ, उ० बाळू, तुरटी, सोरा, इ० ४ (सोनारी) सोरमीठ, नवसागर, मोरचूत, पोटॅशियम् सायनाईड यांचें मिश्रण (हें मिश्रण डाग लावलेल्या जिनसास तो डाग सोन्यासारखा पिवळा दिसावा म्हणून उजळा देण्यासाठीं तयार करतात) –वि चकचकीत, शुद्ध पांढरा, उजळ पहा [स उज्ज्वल, प्रा उज्जल सिं उज्लाई]

**उजळाई**—स्त्री जिल्हई देण्याची अगर घासण्याची क्रिया, किंवा तिची मजुरी

**उजागर-रा**—क्रिवि उघडपणें, सर्व समाजासमोर जगासमोर, अगदीं प्रसिद्धपणें –वि १ निर्भय, धीट २ (व) (उप) संभावित एखादें काम करून न केलें असें दाखविणारा 'चोरी करून राहा उजागरच दिसतो ' –पु. १ जागरण, जागेपणा, जागृतावस्था (क्रि० पडणें, होणें, घडणें) २ उजळमाथा, निर्भयता, धीटपणा,

चूरपणा, धिटाई, धडाडी 'तें पुस्तक आधीच मग त्यापासुन मागून घ्यायचा मला उजागरा नाहीं काय ? ' ३ आठवण ४ सावधपणा, सावधानता [स उत्+जागृ, उज्जागर, गु उज्जागरो]

**उजागरी, उजागिरी**—स्त्री १ निर्भयता मोकळीक, उघडीक, उघडपणें एखादी गोष्ट करण्याम मोकळीक, उघड व्यवहार 'तो तुमचा दवल होऊन तुम्हास पाहील तेव्हा त्याला मेल्याचा पाड चढेल आणि तुम्हाला उजागरी होईल'—याळ २ १८९ [स ऊर्ज्] २ निर्लज्जपणा धीटपणा, धष्टता (तृतीया विभक्तींत प्रयोग) 'नित्य पतिदेखता, भोगिता उजागरीनें मना।'—प्रला २२५ ३ प्रसिद्धि, पर्कर्षी होणें ४ दुर्लौकिक, बोभाटा [स उज्जागर]

**उजागरीस आणणें**—क्रि परिस्फुटता करणें, उघडकीस आणणें, प्रसिद्धीस आणणें [उजागर]

**उजागरीस येणें**—क्रि उघड होणें, उघडकीस येणें

**उजागीर**—वि १ निर्लज्ज, बेशरम, जनलज्जा नसलेला २ धीट, निर्भय 'तो पोरगी फारच उजागीर आहे' ३ त्यास विवक्षित कर्मे प्रसिद्धपणें करण्यास मोकळीक झाली आहे असा, दुजळमाल्याचा ४ उघड, जाहीर [स उत्+जागृ]

**उजाड**—वि निर्जन, ओसाड, वस्तीरहित, निर्मनुष्य, उध्वस्त, वैराण (गाव, मुलुख इ०) 'व्यापाराच्या उत्कर्षामुळे कित्येक शहरात लोकसंख्या अतिशय वाढली होती, तर उलट कित्येक गावातून वस्ती कमीजास्त उरल्यासारखी होऊन ते गाव उजाड झाले होते'—पार्लमेंट ३४ [म उत्+ज्वल्]

**उजाडणें**—उजेडणें पहा

**उजाडना**—उजेडना पहा

**उजाडी**—स्त्री ओसाडपणा, उध्वस्तता, निर्जनस्थिति, उजाडपणा [उजाड]

**उजान**—क्रिवि (व) पुन्हा, आणखी

**उजाला**—पु. (हि) चकचकाट प्रकाश दिवा 'चवनफौ लाविले गलासे त्विकड तिकड उजाले।'—पला ७० [म उज्ज्वल]

**उजाळ-ळू-ळें**—पुन १ तेज, प्रकाश, उघड 'उजाळू भद्रादिमंडळा ॥'—ज्ञा ११ २१२ 'वाग्सूर्याचेनि उजाळें। तेंगी कवडें दाटाबी ।'—एभ्व १ ३१ 'स्वामी पैल देक उजाळें परीवाश्डीं यारले।'—गप्र १५ २१ २ गोरेपणा, स्वच्छपणा, उजळपणा ३ शुद्धता, कीर्ति, नावलौकिक 'मासिया पुण्याचा उजाळ ॥'—ज्ञा १६ ३५८ —वि पांढरें, स्वच्छ उजळ पहा 'उजाळ द्युति मार्दव।'—अमृ ५ ३ [म उज्ज्वल]

**उजिडणें**—अक्रि पेमळें होणें 'जीवु प्रहन्नी पामानि उजिडे। जों गरपप विपडे'—दाव ३१८ [म उज्जु=त्यातून देणें]

**उजिती**—स्त्री जागृती 'प्रळयाग्नीची उजिती। आतुसलीं जैसीं'—ज्ञा ११ ३४२ [स उद्+युग=पेटणें, प्रकाशणें, प्रा उज्जुअ]

**उजितें**—न ज्वलन, पेट, पेटण्याची किया 'तें विझोनि जाय उजितें। अग्नीचें जेव्हा।'—ज्ञा ८ २१३ [स उद्योत]

**उजियड-येड**—पु उजेड पहा 'पडिलेआ भरतमी निबिडें। जिया प्रतिमवीं उजियेडें।'—ऋ २ 'परि श्रीनिवृत्तिदीपउजियेडें। दखेन मी॥'—ज्ञा ६ ३२ 'तेणें उजियड पाहता गा।'—दावि ४५९ [उजेड पहा]

**उजियेरी**—स्त्री सादृश्य 'जरि पाहता उजियेरी न जोडे। ते व्हेंकि माडिएली।'—ऋ ३९ [म ऋजु]

**उजिरा**—पु प्रकाश, तेज, उदय उजरा पहा [सं उत्+ज्वल्, ऋजु]

**उजिवड-डू-डें**—पुन प्रकाश, उजेड पहा 'दिवा जो उजिवडु। ता घराचाचि सुरवाडु।'—अमृ १० ४ 'ऐसेनि यणें निवाडें। जयाच्या जीवीं उजिवडें।'—ज्ञा १३ १०८२

**उजिवडणें**—अक्रि १ उजाडणें, प्रकाशमान होणें २ (ल) भासणें 'तेंगे रविकें यणें रूटे। जड येणें उजिवडे।'—अमृ २ ३५ 'जयाच्या जीवीं उजिवडे।'—ज्ञा १३ १०८२ [उजाडणें]

**उजिवण**—स्त्री साफल्य, सार्थक, उजवण पहा [स उद्यापन, प्रा उज्जावण]

**उजीयडा**—पु उजियड, उजेड पहा 'आपणा वसतिला उजीयडा॥'—विवि ८ ३ ५९

**उजीर**—वि सरळ उजू पहा [म ऋजु] ०पण—न सरलत्व, सरळपणा

**उजु-जू**—वि १ सरळ, वाकडें नव्हे असें, समसूत्रानुवर्ती (रेषा, मार्ग इ) 'तो उजु हातिएडू धरा नेणें॥'—शिशु ८९७ २ नीट योग्य अनुकूल, सीधा (स्वभावाचा) 'किंवा जैसें तें चातक। मेघा उजु करिता धोक।'—स्वादि १ १ ८२ ३ सरळ, चागले सन्मार्गवर्ति 'कर्माभिरामि पडले साकडें। कीं उजू करिता जाहले वाकडें।'—कथा १ ५ ६९ 'स्वैरिणीचें पाऊल उजू म्हणून सुहूर्तांहि पडायचेंच नाहीं'—नि ७८९ ४ बरोबर, प्रमाणशीर, सरळ येणारें, योग्य, यथान्याय 'उजु हिशबाचे जे पैसे ते आम्ही देऊ।'—कोरकि २८० ५ छंदपणें, ध्वन्यर्थ, वक्रोक्ति वगैरे नसलेले महज, सोपें, सुगाप, सहज समजण्यासारखें (भाषण, वाक्य, कविता इ०) ६ प्रामाणिक, न्याय्य, निःपक्षपाती [म ऋजु, प्रा उज्जु, सिंधी उजो] ०धरणें—वळवून कामाला योग्य करणें, पटविणें (भेद)—पाज समोर, कर 'तर तो धारागिपें तिमडे। टाळया उजू॥'—शिशु ७११ 'मग आवो पनगी मुख। उज्वा

उजु ॥' –श ६ २२८ 'उभा राहिला जानकी उजू ।' –मृमुरा १०.१२ 'वीर पादाती आकाश उजु । तों येतां देखिला तेज पुंजु । जो ब्रह्मयाचा आत्मजु । नामें विख्यात नारद ॥' –जै ५१ १५ –क्रिवि १ सरळपणें, बरोबर, नीट रीतीनें २ योग्य बाजूस, दिशेस, मार्गास 'रथियाउजू पार्थ वीर । भिमें लक्षिले गजभार ॥'

उजुं–जूं, उजु–जू–फ–क्रिवि (पुण) अजून, पुन्हां, आणखी, मावळ्यांत उजून पहा 'रामा येतो म्हणाला पण उजुक आला नाहीं ' [ हिं अजो, म अजून ]

उजुकार–पु सरळ रीत, मार्ग, सोंपा मार्ग, सरळपणा 'एकु पदचकाचेनि उजुकारें ' –दाव १५१ [ स ऋजु+कृ ]

उजुवाट–स्त्री सरळ, न्याय रस्ता, उजुकार 'पादु टेंकु लिभा तेंचि दशन।उजुवाट तेंचि रसना ॥' –दाव ९७ [स ऋजु+वर्ति]

उजुवाडु–पु उजेड, प्रकाश 'गेलें उपरा प्रतिरात्री दिनु। सकळे दिशा उजुवाडु होउनु ।' –शिपु २ ४४.१५४ [सं उज्ज्वल ]

उजू–स्त्री उजूर या अर्थी चुकीनें वापरतात 'कुळाची उजू न करता रुपये देईन '

उजू–न (नमाजापूर्वीचें) हस्तपादप्रक्षालन [ अर वुजूद= चेहेरे, वज्ह=चेहरा याचें अव ] ०तवाजू–स्त्री नमाज, प्रार्थना 'तों अब्दुल अही दुराणी जुमा मशिदीस येऊन आपला स्वधर्म उजू–त्वाजू करीत होता ' –भाव २७५२ [ अर वुज़ू+तवाज़ुअ= नम्रता ] ०नमाज–पु प्रार्थना 'याजबद्दल पाच वख्त उजूनमाज करून दुलाही नजीक रावसाहबाचे हुकामध्यें दुवा याद करीत आहों –रा १६१ [ अर वुज़ू+नमाज़=प्रार्थना ]

उजू उजुवुजू–स्त्री आदर, मान, मर्यादा, सन्मान (क्रि० ठेवणें, राहणें, उडणें) [ अर वुज़ू ]

उजूर–पु अरता, आक्षेप पहा १ सबब, सबब सांगण्याचा हक्क 'देव मजूर देव मजूर । नाहीं उजूर मेवपुढें ॥' –तुगा ३७०० 'वायकोला नवऱ्यापुढें उजूर नाहीं ' २ नकार, आक्षेप 'उजूर असेल तरी हुजूर एणें ' –रा १५ १५९ 'नाहिं उजूर आपल्याविशीं रे जिवलगा । ' –प्रला १२८ ३ अडथळा, विलंब, आक्षेप अर्थ ४ पहा 'सेवकास आज्ञा होईल त्या आज्ञेस उजूर नाहीं ' –रा १० २२६ ४ हक्क, अधिकार, वाजवी काम ५ खोल जून रहाणें, विचार करणें, वर पाहणें अरता अर्थ २ पहा 'महिना भरल्यावर माझा उजूर न धरिता तुम्ही गहाण विकून ऐवज घ्यावा ' [त्याचा उजूर न धरिता मी सुर्दानेसवत फडशा करून देईन ' [ अर उज़्र=बहाणा ]

उजूरजू–क्रिवि (गो) रुजवात करून, वजावून 'त्येका तें उजुरजु करून दिलें मू ' [ अर रुजू=परत पाहणें द्वि उजू ]

उजूहातीं–क्रिवि सरळपणानें, भानगड न करता, पैन जिनसीं उजु+हात ]

उजेड–पु १ प्रकाश 'दाही दिशा उजेड । ' –मुआदि १९ १९४ २ प्रकाश देणारी, पाडणारी वस्तु, दिवा 'अधार पडला काहीं उजेड सगें घ्या ' [ स उज्ज्वल किंवा उद्योत, प्रा उज्जोअ, अथवा स उदयित–उजड–उजेड –भाअ १८३२ ] ०पाडणें–लावणें–करणें–१ (उप) अपकीर्तिरूप कृत्यें करणें 'म्हणती भावानें उजेड केला । कीर्तिध्वज उभारिला।' –नर १८ ३९ २ सत्कृत्य करणें 'आम्ही तर हात टेकले! आता तुम्ही काय उजेड पाडतां पाहू ' कांहीं समानार्थी वाक्प्रचार–मशाल पाजळणें, लावणें, टेंभा पाजळणें, नगाऱ्यावर टिपरू टाकणें, वाजविणें, दिवमा मशाल लावणें, बेचाळीस पिढ्या अथवा कुळें उद्धरणें, वडिलांचें नांव गाजविणें ०पडणें–होणें–१ प्रकाश पडणें २ (उप) अपकीर्ति होणें, छी थू होणें

उजेडणी–स्त्री (वों) चूड, ताड, माड वगैरेंच्या सावळ्या एकत्र करून सर्वेलशा बांधून उजेडासाठीं पेटवितात ती, टेंभा [उजेड]

उजेडणें, उजाडणें–अकि प्रभात होणें, सूर्योदय होणें, २ कार्यारंभ होणें ३ अनुकूल काळ प्राप्त होणें, वेळ येणें, सुयोग येणें ४ स्पष्ट होणें 'म्हणोनि हें उजेडे ।' –दा ६ ६ २२ [ स उद्योतन, प्रा, उज्जोअण, उज्ज्वलन ]

उजेडतां–क्षणीं, उजाडतां–क्षणीं–क्रिवि अगदीं पहाटे; दिवू लागताच

उजेडता काळ–पु १ उजाडावयाची वेळ, सधिप्रकाशाचा समय २ (ल) भारी भाग्याची प्रभात, चांगले दिवस येण्याचा समय [ उजेड ]

उजेडाचा माणूस–(उप) चलाख, पराक्रमी माणूस हा शब्दश अर्थ, परंतु ध्वनि उलट होतो [ उजेड ]

उजेरणें–उक्रि (राजा) १ साफ करणें, गाळ, घाण वगैरे काढणें (पाटांतील) २ एखाद्याचा विजेन प्रवेश करून देणें, शिक्षित करणें ३ (सामा) उजरणें पहा [उजळणें]

उजो–पु (गो कु) विस्तव, आग [ स उद्योत, प्रा उज्जोअ ]

उज्ज, उज्जन–पु (शाप) वातावरणांतील एक वायु, हा अतिशय हलका व त्वरित पेट घेणारा आहे हा वायु पाण्यांतील मुख्य घटक आहे (इ) हायड्रोजन [स] ०गंधक्दि–पु एक वायु याची फार दुर्गंधि सुटते धातूंच्या गधकिदावर अम्ल ओतलें म्हणजे हा उत्पन्न होतो (इ) हायड्रोजनसल्फाइड ०प्राणिद–(इ) हायड्रॉक्साइड, हायड्रानाइड उज्जित–(इ) हायड्रेट उज्जिद–हायड्राइड

उज्जनचलनी–न उज्जैन येथें चालणारें, उज्जयिनी येथील शिवशाइ नाणें –पया ४६९ [ उज्जैन+चलन ]

उज्जीवन–न १ जागृति, प्रगटता, प्रगट होणें 'जें उज्जीवन जहालें । ज्ञानाग्नीचें ।' –ज्ञा ४ १३३ २ चेतना, उत्तेजन 'तैसें

रायभोग समृद्धि। उज्जीवन नोहें जीववुद्धि।' -ज्ञा १६८ ३ भोगसाधन -हको [ स उत्+जीव्-जीवन ]

**उज्झड**—वि उद्धट, दांडगेश्वर, उर्मट [ स उद्+झट्, उद्धत, हिं उज्झड=गावठळ ]

**उज्झित**—वि टाकलेलें, सोडलेलें, त्यक्त [स उज्झ्=सोडणें]

**उज्वड**—पु ( कों ) उजवाड पहा

**उज्वल**—वि १ सतेज, चमचमीत, प्रकाशमान २ स्वच्छ, शुद्ध, पवित्र, उजळ पहा. [स उत्+ ज्वल्]

**उज्वलन**—न १ जळण्याची, प्रकाशित होण्याची क्रिया, पटविणें २ तजेला, जिल्हई देण्याची, स्वच्छ करण्याची क्रिया, चकचकीत करणें [स ]

**उज्वलित**—वि १ पेटविलेला. २ प्रकाशित केलेला, जिल्हई दिलेला ३ प्रकाशमान, तेज पुंज [ स ]

**उज्वाड्यार**—क्रि वि ( गो ) पहाटेस [उजेड]

**उज्वाड**—पु ( गो ) उजेड, प्रकाश 'उज्वाडाक हाडप' =प्रकाशात आणणें, प्रसिद्ध करणें [ उजेड ]

**उझहलज**—स्त्री (चक्रपुरी) बाहेरील दरवाजाला लागून आतील दोन बाजूस असलेली बैठक, देवडी [ उज्झ्+लग? ]

**उट**—स्त्री हुटुटु, टटस्ट -शर ( तुगा ३ ७९ ) [ध्व]

**उट**—स्त्री चाकाला प्रतिबंध करण्यासाठीं लावलेली उटी, खुंट, ठेंकू, दगड [ उटणें ]

**उट**—पु उत पहा ०उतरण-स्त्र निरविणें, नक्षा उतरणें

**उंट**—पु ( फ़ा ) उट १ ( सैन्यादिमधील ) ओझें वाहणें इत्यादि उपयोगी एक पशु अरबस्तानासारख्या वाळवंटाच्या प्रदेशांत उंट असतात व तेथें त्यांच्याशिवाय दुसरें कोणतेंहि जनावर वाहतुकीला उपयोगी नसतें २ बुद्धिबळाच्या खेळांतील एक मोहरें याची गति सर्व बाजूंनीं तिरपी असते व तिची मर्यादा पटाच्या अखेर पर्यंत असते [ स उष्ट्र अवेस्ता उस्त्र तुल फा शुतुर, प्रा उट्ट] **उंटावरच्या-दाहाणा**-मूर्खपणाची मसलत देणारा ( राजपुत्र वेडकाचें डोकें अडकलें असता एका उंटावर बसून जाणाऱ्यानें प्रथम आत येण्याकरितां घराची भिंत पाडण्यास सांगून नंतर वेडकाची मान कापून मग रांजण फोडावा अशी सल्ला दिली या गोष्टी वरून ) 'निर्णय एक उंटावरील असें विचारतात' -टि ४४१ **उंटापरन शेळ्या हाकणें**-अतिशय आळस किंवा हलगर्जीपणा करणें **उंटावर बसून दक्षिण दिशेस जाणें**-एक अपवादुन दुर्दिन्द 'पठाणी टोप्यांनीं बैसुनि दक्षिण दिशेसि जाताहे।' -मोउद्योग १० १७१ **उंटाचे पायें**-न शिंकिविलेल उंटाचेंबच्चे

**उटंब**—[ि उताराची, उतरणीची सरकाळ ( जमीन ) 'स्थिर होतसतां भूमिके। येवु न राहे उटंब। जाय निरगोनि।' ऋपू १८७ [स उत्+स्तंभ=उतरण, उत्+स्था, प्रा उट्ट]

**उटकटारी, उंटकटारी**—स्त्री एक वनस्पति, उताटी, काटे चुबुक, हिची पानें कोपर कातरल्यासारखीं असून प्रत्यग्रभागीं सफेत रंगाचे काटे असतात डाग्या खोदल्यावर याची मुळी लहान मुलांच्या गळ्यात बांधतात सर्प, विंचू यांच्या विषावर हिचें मूळ उगाळून लेप देतात मुळास ब्रह्मदंडी म्हणतात ही उंटास प्रिय असते [ म उत्कट, गु उटकंटो, हिं उंटकटाव ]

**उटकणें**—उक्रि उच्चाटन होणें, वेगळें पाडणें, होणें, दूर करणें. 'सर्वारंभा उटकलें।' -ज्ञा १४ ३६६ [ स उत्+स्कू=बांधणें, उत्+टक्=खरडणें, म ऊठ करणें ? ]

**उटकण**—न १ दूर होणें २ अवर्पण -घर

**उटकर-ळ**—स्त्री उटकळ पहा -वि हलणारा, डळमळणारा, सैल, सिळसिळीत झालेला (दगड) [ स उत्+कृ,प्रा उक्कृ, म उटकर ]

**उटकळी**—स्त्री ( राजा ) ताड येणें, लोंडात खरे, पुटकळ्या येणें

**उटकर**—वि उर्मट, मग्रूर, उद्धट ( क्रि० येणें ) [ म उट्= मारणें, पाडणें ]

**उटंगणी**—स्त्री एक वनस्पति -मुव्या ११२ [ ? ]

**उटंगर-ळ**—न. १ उचवटा, लहान टेकडी, टेंब २ शरीरावर असलेलें आवाळू, गंड, टेंगूळ ३ एखादी जड वस्तु लोटून नेताना वाटेंत जो दगड लागतो तो -वि १ वर मारी झालेला, उंच सखल, उच्चनीच, खडबडीत, डळमळीत २ उटगळें असणारा ( प्राणी, जमीन ) [ स उत्+स्था+गाडू, प्रा उट्टगाल ] -क्रिवि उंचसखलपणानें

**उटज**—न पर्णकुटी, झोंपडी, पर्णशाला [ स. उट=गवत, पानें+जन्-उटेभ्यो जायते इति ]

**उटणें**—न १ अंगास लावण्यासाठीं केलेला अंबेजा व सुगंधी पदार्थ, उटी 'उटणें लावूनि घातलें स्नान.' -वस ७७ 'कीं सूर्याचिया आंगा उटणें । लावन असे॥' -ज्ञा १० १० २ उटी, उटणें अंगाला लावणें, माखणें, मर्दन [ म उद्वर्तन, का उटणे= अंगाला तेल रुप लावणें ]

**उटणें**—उक्रि १ माखणें, थापटणें, लावणें, चर्चिणें 'भीमदा दवा कापूरें उटिला॥' -ज्ञा ११ २२० 'हळदीभीनली ब्रमकटा। तगें उटिलें मुक्तकमठा।' -एरुस्व ७१४ 'भीमकी सुकुमार गोमटी। त्याला दगीं हलुनि उटी।' -एरुस्व १६ ८० २ ( राग, माती व नीं भाईं वगैरे ) यांनून साफ करणें 'हां हा उरणेनिया आरिगा।' -ज्ञा ११ १५७ 'कापुरातीं काय लावुनी उटावें। काय ओंवाळावें दीपकासीं॥' -तुगा ४४०३ 'अर् भाडी उटायागेरो होतों' -मागो प्र १ १ ३ पुगें वद परवरा एसी आहे। परसण उटी

वाद्मय।'-एरुय १४८९ 'मग तें मगनरूप पाऊनें। ते तुमे धेनें उटिलें॥' वेसीस्व ९२९ 'क्षणभगुरजाउनी दु स मार्थीक संटलें। वदन उटिलें। रोमाच आर्गी उठले॥' -पग ४५ [स उद्वर्तन, हिं उवटन, गु उन्गु सिं उवटणु म उटणी-णें]

**उटन**—न (खा) पासण्याची क्रिया [उटणें]

**उटंबर-रा**—उटंगर पहा

**उंटमान्या**—वि उटासारखी ज्याची मान आहे असा, विशोभित, उगड [उट+मान]

**उंटवान**—पु (हिं) उट हाकणारा, सारवान [म उट+स वन् प्रत्यय]

**उटा**—पु चाकाची गति थांबविण्यासाठीं चाकाखालीं ठेवलेला दगड, अटकण (क्रि दणें) उट पहा

**उटाउटीं**—क्रिवि (प्र) उठाउटीं, तत्काल 'गौरजानु पयो धरकरी। अवगेकिती उटाउटीं॥ पैथें पळाले वारा वाटीं। नाहींच झाला विचार।'-मुआदि १९१४३ [स उत्+स्था द्वि]

**उंटाड**—वि विशोभितपणें उंच, उटासारखा उंच [स उष्ट्राढ्य=उटाड]

**उटाणंटंगळा**—उटगळ पहा [स उत्थान, प्रा उट्ठाण, म उटाण+टंगूळ]

**उटारेटा-ठा-टी-ठी**—पु स्त्री (प्र) उठारेटा १ उठाठेव, दवड्डाडवळ, उपद्व्याप, नसता उद्योग, भानगडी, लुडबुड २ (लहान मुलाची) चुळबूळ, चळवळ, वळवळ, नाचरपणा ३ उड वाउडव, धिंगड (अर्थाची-भूक नसना कलेली) ४ थापेबाजी, गप्पा (क्रि करणें) [उटणें+रेटणें]

**उटारेटीं-ठा-ठीं**—क्रि वि १ नसत्या उठाठेवींत, आळसात, निवल्यावावल्या करण्यात (कालाचा अपव्यय करणें) ०म्ह-दिवस गग उगरेटीं मग दिव्यात कापुस रटी (किंवा वोटानें काड वाती लोटी) २ निवडीत उडनीत (जेवणें)

**उटारेटीस येणें**—उटारेटा करणें [उटणें+रेटणें]

**उटाळणी**—स्त्री १ उटावणी, प्रोत्साहन, उत्तेजन, प्रवर्तन, भरीं घालणें, चेव आणणें २ उटाळण्याची क्रिया [उटाळणें]

**उटाळणें**—अक्रि १ (व) स्पष्ट उच्चारला जाणें, लिहिलेलें अक्षर स्पष्ट उमगलें जाणें 'श्वास लागल्यामुळे त्याचें बोलणें उटाळत नाहीं' २ अर्थ, हेतु भाव स्पष्ट होणें, करणें, ३ उटविणें, उत्पन्न करणें, उच्चारणें 'इला ऐसें नाम तुझें उटाळ॥' -साकह १२८ -दयाळ ९३ [स उत्+तालें]

**उटाळणें**—उक्रि उलथणें हलविणें उटाळा लावून ढकलणें [स उत्+तल]

**उटाळा-ळी**—पु स्त्री १ तरफ जड पदार्थ उचलून फेंकण्यासाठीं त्याखालीं पहार वगैरे घालतात ती (क्रि देणें) २ अशी उचलण्याची, तरफेची क्रिया (क्रि करणें) ३ नकलणें, जोर लागणें, धक्का देणें (पुढें ढकलण्यासाठीं), खांदा देणें (क्रि देणें) [सं उत्+तड्=स्थापन करणें]

**उटाळा**—पु १ स्पष्टोच्चार (वागिंद्रियापासून होणारा अक्षरांचा) २ स्पष्टीकरण, विशदीकरण, फोड, किल्ली (लिहिलेलें, गूढ श्लोक, इ० याची) 'माझे या स्मरणाचे उटाळे वाचूनि आन नाहीं'-भाए ६८३ ३ चेतना देणें, प्रवृत्त करणें [स उत्+तड्]

**उटाळा**—पु (व) उथळे, इमारतीच्या पायास सुद्धात दिलेला दगड (इ) बेस स्टोन [उत्+तल]

**उटाळें**—न चाकाची गति बंद करण्याकरिता, तें घरंगळू नये म्हणून त्याखालीं ठेवलेला दगड, अट

**उटिंगळ**—(वा) उटंगर पहा

**उटिंबर-रा**—नपु टेंगूळ, गाठ उटंगर पहा

**उटी**—स्त्री उटणें पहा १ सुवासिक द्रव्यापासुन तयार केलेला पदार्थ (चंदनादिक) (क्रि० करणें) २ उटण्याचा लेप (क्रि० लावणें) 'तो जैसा काळलोहें उवरिला। नातरि प्रतिभावकार उटी ओळंघला।' -शिशु ९९९ 'उटी चंदनाची शरीरा दुपारी।' -कम १०२ 'आगीं शेंदुराची उटी।' -गणपतीची भूपाळी ३ [स उद्वर्तन-उद्वर्ति-उवट्टि-उटी-उटी -भाभ १८३२ का उटणी]

**उटी**—स्त्री (कु) उडवी, एक स्तभ पुरून त्याचे भोंवतालीं तृण वगैरे वरपर्यंत वेढेल अशी रचना, गवताची गंजी [स उट=गवत]

**उटी**—स्त्री चाकाची गति बंद करण्यासाठीं जो दगड लावतात ती उटा, उट पहा

**उटी**—स्त्री तेज, माहात्म्य (क्रि० उतरणें) 'सर्वेचि इद्रपणाची उटी उतरे।' -ज्ञा ९३२८ 'तीर्थांची उतरली उटी।' -एभा ११७४५ 'उतरल्या तीर्थांचिया उटी।'-एभा १३०८ उत पहा ०उतरणें-मूळपदापासून भ्रष्ट होणें

**उटीजणें, उटिंजणें**—सक्रि १ उटणें, उटी लावणें, माखणें 'कापुराचेनि पराग उटीजती। मोतियाचेनि रसें न्हाणीजेती।' -शिशु २८१ २ घासून स्वच्छ करणें 'न घडितांचि आरिसा। उटिजे काई॥' -अमृ ७६२ [उटणें]

**उटीण**—स्त्री उटाची मादी, साड [उट, हिं उटान]

**उटींघ**—वि खरवडून काढलेलें, घासलेलें [उटणें]

**उटें**—न (विरू) उटें पहा वाईट कर्माचें प्रायश्चित्त, सुडाचें कृत्य, पारिपत्य 'बहुत लोकास तुवा पीडिलें। त्याचें उटें आज निघालें।' -ह ९८१ 'पाहिजे तर ह्याचें उटें त्यानें दुसरें वेळीं घ्यावें' -बाळ २१८५

**उटेरेटें**—न उठाठेव उपद्याप उटारेटा पहा 'आतां सांडिलें टेरेटें।' -शिशु १३६

उट्टें—न मोबदला, बचपा, भरपाई, तोडीस तोड, सूड, खरड पी 'पण आज येऊं द तरी, म्हणजे त्याच सगळं उट्ट काढतें' –तोब भ २ प्र १ [स आ+वृत, प्रा आउट्ट, किंवा स आकृ, प्रा आउट्ट=हिंसा] ०काढणें–उगवणें–घेणें–जशास तसें करणें 'आहटुन सगुण तिळतिळ काढीन उट्टें तें।' –प्रश्न १५७

उठकट–र–स्त्री हकालपट्टी उठकळ पहा

उठकळ–ळा–स्त्री १ उठण्यास होणारें कारण, उठण्याची निकड, गरज (क्रि० आणणें, लावणें, येणें) २ उठण्याची बुद्धि, हुडुगी, सुरसुरी (मनातून किंवा बाहेरच्या काहीं कारणानें येणें) (क्रि० लागणें, येणें) ३ हकालपट्टी, पराभव ४ स्थलांतर, बारा वाटा होणें (गाव, कुटुंब इ० काचें) ०येणें–दुसरीकडे जाण्याचा हुकूम होणें, भाग पडणें 'हा सुभेदार आला, त्या सुभेदारास उठकळ आली' [उठणें+कळ]

उठकळें–लें–न हकालपट्टी, पराभव 'उठकळें करूनि दैत्यासी।'–भाए ४१ 'मारीनि गजरथांची दळें। वीरांचें उठकळें केलें।' –शिशु १०६१

उठंगार, उटंगार—पु (गो) महापूर

उठणें—अक्रि १ उभें राहाणें बसणें याच्या उलट २ (ल) वर येणें, आकाशांत वर जाणें (धूर, धुराळा) ३ जागें होणें, झोंपेंतून वर येणें (झोंपेंतून, मूर्च्छेतून) ४ बरखास्त होणें, सपणें (सभा बैठक वगैरे) 'चार वाजले म्हणजे कचेरी उठते।' ५ (सैन्य वगैरे) चालू होणें, बाहेर पडणें, सज्ज होणें, हल्ला करणें 'भट दशसहस्र उठले जे आज्ञाकर सुयोधनाचे हो!' –मोभीष्म ६ ६१ ६ उडून जाणें (एखाद्यावरील मन, प्रेम), उद्विग्न होणें, त्रासणें, कंटाळणें ७ बंड करणें (एखाद्या विरुद्ध), सामना देण्यास तयार होणें 'दुर्जन ज्याचें अन्न खातो त्याजवरच उठतो' ८ स्पष्ट दिसणें, उमटणें (ठसा, रंग, छाप वगैरे) 'उत्तम गुण तत्काळ उठे।' –दा १९ ६ २० ९ वर येणें, दिसावयास लागणें, बाहेर पडणें, उद्भवणें (पुरळ, साथ, मंकड, बातमी वगैरे) १० दुखावयास लागणें, (डोकें कपाळ, मस्तक, शीर त्याचप्रमाणें दाढ, दात, कान, हात, पाय, या सर्वांशींही क्वचित उपयोग करतात) 'निघाल्या देवी आणि गोवर। उठलें कपाळ लागला ज्वर।' –दा ३ ३ २६ ११ ताजेतवानें होणें, फुलणें, टवटवीत होणें, आनंदित होणें, (मनुष्य, प्राणी, वनस्पती वगैरे), खुलून दिसणें (रंग वगैरे) १२ आवेशानें अंगावर येणें, उभार रचणें (मनुष्यावर, प्राण्यावर वगैरे) १३ सुजणें, वळ उठून दिसावयास लागणें (वण, वळ, चाबकाचा मार, दाताचा चावा) १४ करवणें, उरकणें, पार पडणें (काम वगैरे) 'माझ्याच्यानें पहिल्यासारखें कामही उठत नाहीं' –विवि ८ ८ १५३ १५ वस्ती वगैरे उठून जाणें, ओसाड पडणें १६ उत्पन्न होणें 'उठली धन पडलें। नाना वर्णें।' –ज्ञा ८ ३० 'शब्द पडसाद उठला। म्हणे कोण रे बोलिला।' १७ (व) खर्च होणें, खलास होणें, सपून जाणें 'इतके तांदूळ आजच्या आज उठतील' म्ह० उठणे बाऱ्याचें उठनें कोठीवाऱ्याचें पोट दुखतें' १८ पूर येणें 'जसें महाप्रळयीं जळ। उठलिया भरे ब्रह्मगोळ।' –विउ ११ ८६ १९ वाढणें 'चार दिंपणी लागोपाठ सापडताच पहिल्यापेक्षा चार बोटें भाजी उठली' २० प्रवृत्त होणें (वाईट करण्यास) 'मी इतकें बोलताच तो जीव घ्यावयास उठला' २१ क्षोभ होणें (पित्त दिकाचा) २२ नवीनच गोष्ट प्रसिद्ध होणें, प्रचारात येणें 'बारा वर्षांचे मागलें देणेंघेणें कोणी देऊं नये, मागूं नये असें हें अलीकडे नवेंच उठलें' २३ एखाद्यानें लौकिकानुरूप मर्यादा सोडून वर्तन करणें २४ उभें होणें, तयार होणें (इमारत वगैरे) 'तें राजवाडा उठे' –विक ११ २५ वाटणें, मनात येणें 'झोंबी घ्यावी ऐसें उठे।' –दाव ६ १५ [स उत्+स्था, प्रा उठ्ठ, सिं उथणु, जिप्सी सीगन उठी, जिप्सी मेंच उठी] उठून जाणें–१ परवानगीशिवाय निघून जाणें, पळून जाणें, रागानें चालतें होणें 'त्याची थट्टा सुरू होताच तो मंडळींतून उठून गेला' माणसांतून उठून जाणें–१ रीतभात सोडणें, अनीतीच्या मार्गाला लागणें २ परपुरुषावरोबर निघून जाणें (स्त्रियांच्या बाबतींत) 'खरेंच का रूपमाया सत्यापती उठून गेल्या' –बाय ४ ३ उठून दिसणें–स्पष्टपणें नजरेस येणें नित्य उठून, रोज उठून–क्रिवि दररोज नेमानें, नित्य, रोजच्यारोज उठला ठाव देववत नाहीं–उठून जेवावयाचें पानहि मांडतां येत नाहीं (अतिशय निर्बलतेचें द्योतक)

उठतबसत—क्रिवि खुरडत, थोडें चालत व थोडी विश्रांति घेत, थांबून थांबून, धीरें धीर (काम करणें जाणें) (अति अशक्ततेचें द्योतक) उठताबसता–पडल्या, उठल्याबसल्या–सुटल्या–क्रिवि क्षणोक्षणीं, हरघडी, सदासर्वदा, केव्हा पहावें तेव्हा, एकसारखें, अहोरात्र 'अहो येता जाता उठत बसता कार्य करिता।' 'उठता बसता जर असें मुलाला मार लागला तर तो कोडगा होईल' 'उठल्यासुटल्या चहा पिण्याची सवय फार अपायकारक बरें!' उठताबसता उपवास–निराहार–नवरात्र–नवरात्रातील घटस्थापनेच्या दिवशीं व शेवटच्या दिवशीं उपास करण्याची पद्धत म्ह० उठता लाथ बसता बुक्की=सदासर्वदा माराचा धाक किंवा मार तुला उठता बसता भरें पाहिजे, एर्‍हवीं तू ताळ्यावर येणार नाहींस!' [उठणें+बसणें]

उठपळ—स्त्री १ एकसारखें पळून जाणें (असलेली नोकर किंवा सून वगैरेंनीं) (क्रि० लावणें) २ त्रासदायक, जुलमी वागणूक, गाजणूक, (पळून जावयास लावण्याइतकी), हाल करणें, छळ करणें (क्रि० लावणें) ३ अस्थिरता, असंबद्ध वागणूक, चंचलता, उतावळी (क्रि० करणें, लावणें, मांडणें) ४ जावयास निघणें (क्रि० करणें)–क्रिवि एकसारखा, पुन्हापुन्हा, अविश्रांत, उतावीळपणानें 'हा पोर उठपळ खळाळला जातो' [उठणें+पळणें]

धाको १ ४५

**उठपाय**—क्रिवि पक्सारखे पुन पुन्हा, उठपाय पहा [ उठ+पाय ]

**उठवशी-सी, उठ वैस**—स्त्री १ उठण्याबसण्याची मेहनत, पुन पुन्हा उठणें व बसणें २ खळगळ, चळवळ (अस्थिरता द्योतक) ३ नसता खटाटोप, उटाटेव म्ह० कोणाच्या म्हशी कोणाला उठावशी ४ बैठका ( व्यायामाचा एक प्रकार ) [उठणें+बसणें ] **उठवस करणें**-( वों ) आदरातिथ्य करणें

**उठवण-णूक, उठवळ**—स्त्री बसलें असता स्वत उठवत नाहीं दुसऱ्यानें उठवावयास लागावें अशी अवस्था (गुरें, घाडे इ०ची) उठून उभें राहण्याची मुद्रा शक्ति नसणें 'उठवणें ताठा करक'—दा ३ ६ ४७ 'आता सर्वथा उठवण्या ।'—एभा ११ १२०६ (क्रि० घणें ) २ (ल ) आपत्ति, दारिद्य, दैन्य, दुर्दैव दशा ०मोडणें-१ शक्ति परत येणें २ दारिद्य, निराशा यापासुन मुक्त होणें, **उठवणीस येणें**-( वों ) १ अतिशय अशक्त होणें, मरावयास टेकणें, उठवण घणें, दुसऱ्यानीं उठवावें लागणें (सामा ) अतिशय दमणें, थकणें 'वैरणचारा महाग यामस्तिता घोडीं व उटें उठवणीस येऊन, अस्थिचर्म जाहा ीं'—भाव ५६ [ उठविणें ]

**उठवण**—स्त्री (गो ) कुणबी लाकांतील देवकृत्य देवक उठविणें [ उठविणें ]

**उठवण(णे)कर-करी-करू**—वि उठवणीस आलेला (मनुष्य, बैल ), बिछान्याला खिळलेला ( रोगानें, वार्धक्यानें ) 'मागचे वर्षापासुन तो उठवणेकरी बनला आहे'

**उठवळ**—वि १ आळशी, कामचुकार (उठवणकऱ्याप्रमाणें वागणारा) म्ह० उठवळ सासू थोंट जावई २ चळवळ्या, उच्छृंखल ३ अपिकीर 'उठवळ ससार करून कसें चालेल?' [उठविणें]

**उठवळ**—स्त्री (उठवळ या अर्थी चुकीनें) ह्रासपट्टी, उच्चाटन अवनति ०येणें-लागणें-उच्चाटनाची वळ फौजेला गेलेला कॉलजला उठवळ आली आहे'—के १ ५ १

**उठविणें, उठवणें**—उक्रि उठणें प्रयोजक १ चलणें, वर करणें, उच्च स्थितीला नणें, उच करणें, उभें करणें २ जागृत करणें, जागें करणें, उठावयास लावणें म्ह० निजलेल्याला कोणी उठवील, जागयाला कोण उठवील? ३ चतना दणें, प्रवृत्त करणें, क्षोभविणें, उठावणी करणें ४ दुखावयास लावणें (डोळे) ५ (कडी) पिटविणें, जाहीर करणें (बातमी, गोष्ट) ६ उत्पन्न करणें, काढणें 'जे उठवी शब्दांकुर। गद वैखरी अपार।'—दा १ ३ २ 'विचार न करता बांधा उठवून अडथळा आणू नये'—स्वारीनियम (बडादे) ४७ ७ पार पाडणें, बनावणें 'सूचना हातीत त्याप्रमाणें नोकरी उठविण्याची आहे'—स्वारीनियम (बडादे) २४ ८ चारणें, लोववणें 'चारटपानीं स्वयपाकाचीं दोन भाडीं उठविलीं'—विवि ८ ११ २०८ ९ रक्कम कर्ज काढणें, उचल करणें, खर्च करणें [स उत्थापन, प्रा उट्ठवण] **घरांतून उठविणें**-गादीं लावून पळविणें 'ह्या स्वतत्र बायका केव्हा कोणच्या म्हाताऱ्याला घरातून उठवतील काहीं नेम नाहीं'—बाय २ १ **जन्मांतून उठविणें**-आयुष्याचें मातेरें करणें (जार कर्मामुळें) 'माझ्या पोरीला अशी जन्मातन उठवलीन्'—निच १२५

**उठळ**—वि (व ) निरुपयोगी, आळशी उठवळ पहा

**उठाउ**—पु जागृति, उत्साह, उठाव 'बोध करितांही उठाउ नेघे।'—दावि २४ [ उठणें ]

**उठाउठी**—क्रिवि तावडतोब, त्वरेनें, त्वरत, तत्काळ, लागलीच झटकर, त्वरित, एकदम, जल्दीनें 'आता उठाउठी। असंख्या ब्रह्मगोळकां देईन मोठी।'—शिशु ९२१ 'धृष्टिर देखता उठाउठी। पादरक्षा आठविजे।'—मुआदि ३४ ८५ '(मी) दीऊं नेणें जडीबुटी। चमत्कार उठाउठी।'—तुगा १८१६ 'वय चालिलें कीं उठाउठी।'—दावि १५७ 'किति उठाउठी भयभीत मरण पावले।'—ऐपो ३६७ [उठ द्वि ]

**उठागीर**—वि १ ( निंदाव्यजक ) प्रवासी, मुशाफर, उपऱ्या, तात्पुरती वस्ती करणारा २ उचल्या [ उठविणें+गीर प्रत्यय ]

**उठाठव-ठेव**—स्त्री १ रिकामी लुडबुड, खटपट, पचाईत, दुसऱ्याच्या कामात टवळाढवळ ( क्रि० करणें ) 'पचभूतिक उठाठेवी। न चले तेथें।'—दा १४ ३० म्ह० विधवेला (बोडकीला) कुंकवाची उठाठेव कशाला पाहिजे २ घरदास्त, सरबराई, व्यवस्था 'घायाळ समशेर बहाद्दर कुमेरीस आला, तिथें सुरजमल जाट याणें त्याची बहुत उठाठेव करून घोडी व पालखी देऊन वाटेस लाविला'—भाव १६२ ३ कामाची दगदग, खटाटोप, खटपट ४ इकडच्या तिकडच्या कुचाळक्या करणें, भलतें सलतें उठविणें [उठविणें+ठेवणें ]

**उठाण-णें**—न १ उठवणी, उसळी, उमेद, तीव्र प्रवृत्ति 'कीं ते समयीं मनाचें उठाण।'—ययादी १० २५८, ११ ८८७ २ उन्नतता, उठावदारपणा ( स्तनाचा ) 'उठेत वक्षोरुह हृ उठाणें।'—सारुह २ ५६ ३ सूचक लक्षण, चिन्ह 'तों दक्षीस वरिती निरश्रीउठाणें।'—कृष्णजन्म (देवनाथ) २३ [स उत्थान, प्रा. उट्ठाण हिं उठाना]

**उठाणूं**—न गळू, फोड (शरीरावर उठणारें) [उठाण]

**उठा ( ठा ) पायीं**— उठपाय पहा

**उठावशी**—उठवशी पहा

**उठारेठा-रेठ-ठी**—उगरेठा पहा

**उठाव**—पु १ वर आलेला भाग २ शरीराची ठेवण, स्वरूप 'आणा धरोनि म्हण हा, वैसा दिसतो मनोरम उठावें।'—मोवा ११ १९ ३ उचल, हरसावणें 'किंवा अमृत क्षीरसागरीं। यती लहरीवरी लहरी॥ तैसी द्रौपदी राजकुमरी। उठाव करी दुसरेनें॥'—ह ३४ २८ ४ खर्च ५ (शिल्प) दरावाची नक्षी, उचलून

दिसणारें काम, वर दिसणारी, कोरलेली आकृति (६) रिंगीक उ० उठावाचा नकाशा १ पदांमध्यें पदलालेल्या चालीवरून पुन्हा मूळच्या चालीवर व ध्रुवपदावर येणें (वर्णी येथील गोविंदकवींच्या पदातून असे उठाव आढळतात) -स्तोत्रमाला २६८ [उठावणी]

**उठावणी**—स्त्री उठविणें पहा १ उत्तेजन, प्रोत्साहन २ जोराने पुढें सरसावणें, उचल करणें ३ चढयोरी, डोकें वर काढणें, हल्ला करणें, स्वारी करणें 'इग्रज लोक जितक्या वेळा उठावणी करतील तितक्या वेळा त्याना चोपून काढावयाचें' -इप १४४ ४ उद्युक्त होणें, पुढें होणें ५ जागृति ६ (वों) शिफारस, प्रशंसा ७ उभारणी राजावट 'अशा धर्तीवर मेनका पानाची उगवणी पुरी दार झाली असती' -नाटु ४७ ८ तळ हलविणें, निघण्याची तयारी करणें, कूच करणें ९ उठविणें, दारिद्र्य, संकटें यातून वर काढणें १० उचलणें (ओझें वगैरे) ११ जैन किंवा वैष्णवामध्यें मृताच्या तिसऱ्या दिवशीं करण्याचा विधि [स उत्थापन, प्रा उट्ठावण, हिं उठावना]

**उठावणें**—अक्रि १ पुढें होणें, उद्युक्त होण, तयार होणें, सरसावणें, एखाद्या उद्योगासाठीं आवेशानें लागणें, मनापासून कामास लागणें 'पत्रिका वाचिताचि गोपाळा। पुढें भीमकी दख डोळा। बाह्या पसरूनि उतावेळा। आलिंगना उठावला॥' -एरुस्व ४ ६२ २ हल्ला करणें, छापा घालणें, स्वारी करणें, युद्धार्थ चालून जाण्याकरिता उठणें 'काळरात्रीचीं कटकें। उठावलीं जैसीं॥' -ज्ञा ११ १९९ 'मग पडताळोनिया करें। उठवला रामुख।' -मुसभा १० १५० 'देहमगधावरी लाटला। सकळपावरी उठावला॥' -दा ५ ९ ४२ 'मृगेंद्रावरि जंबुक। अपार जैसे उठावले।' [स उत्थापन, प्रा उट्ठावण]

**उठावणें**—सक्रि (गो) नकल, तालीक करणें, उतारा घेणें

**उठावदार**—वि डोळ्यात भरणारा, चागला उठाव असलेला, आकर्षक, ठळक ०**चित्र**—न पृष्ठभागाच्या वर आलेलें चित्र, उठावाचें चित्र [उठाव+दार प्रत्यय]

**उठावा**—पु उठाव, उठावणी पहा १ निघून जाण्याकरितां उठणें, तळ हलविणें, कूच करणें, बाहर पडणें 'आता उठावा करीताया। नातरी त्यजीन मी जीविता।' -कथा १ ५ ११२ २ शत्रूविरुद्ध उठाव, हल्ला, चढाई 'दीधला वीरभद्रें उगवा' -उषा ११५७ ३ (अज्ञात स्थितींतून, दुखण्यातून) बाहेर येणें ४ बहार, उत्कर्ष 'फुल वसताचा उठावा। तो आतूचि दिसे॥' -शिशु २९९ ५ विस्तार वाद 'तैसें जेथूनि हा आघरा। रसाखतत्त्वाचा उठावा॥ ज्ञा १५ २०२ ६ प्रोत्साहन, उत्तेजन 'उल्हासु वीरांचिया चित्ता। उठावा दीधला मागुता॥' एभा ९ १३० ७ आवेश, वेग 'ऐसा दृढ वैराग्यउठावा। तेणें विहिताग्नि बोळवावा॥' -एभा १८ ६५ [स उत्+स्थापय्, प्रा उट्ठाव]

**उठाळणी**—स्त्री उत्तेजन, उठावणी पहा. 'चाळीस हजार घोडा मर्द दिली उठाळणी।' -ऐपो ८० [उठविणें]

**उठाळून बोलणें**—क्रि (माण) मोठ्यानें बोलणें [उठविणें]

**उठिंगण**—न (वों) आधार 'सोन्याचें ताट झालें तरी त्यास मुडाचें उठिंगण पाहिजे' [उठणें]

**उठित**—वि (व) मशागत केलेली लागवडीस आणलेली, वहित (जमीन) [स वह्-उत, किंवा उत्थित]

**उठी**—स्त्री उठावयास लावण्याची निकड उठण्याची, निघून जाण्याची निकड 'तुझें स्वरूप पाहता दृष्टी। भयातें उठी उठावे' -नव १४ ७० [उठणें]

**उठीनिलियां**—क्रिवि उठलें असता, उठल्यानें 'एसी प्रेमें उत्कंठिता। पहारिया उठीनिलिया असासिता।' -शिशु ६०० [उठणें]

**उठूठ**—स्त्री कामाची सक्ति, निकड, तगादा, लकडा (क्रि० लावणें, माडणें, करणें) [उठ! उठ! किंवा उठ द्वि]

**उठोळ**—वि (व) आळशी, उठगळ पहा 'ती फार उगेळ मावशी आहे तिच्याच्यानें तें काम होणें शक्य नाहीं'

**उंड**—पु पोटात उगणारा वायूचा गोळा, नळाश्रित वायु 'त्याच्या पोटात उंड धरला आहे' [का उंडे=गोळा, प्रा. उंडी=गोलाकार वस्तु पिंड]

**उंड**—स्त्री उंडीण वृक्ष याच्या फळातील बियाचें तेल काढतात

**उडकी**—स्त्री (गो) लहान उडी [उडी]

**उडकी, उंडकी**—स्त्री (वों) उचकी (क्रि० येणें) 'डोळे झाकले जिव्हा आड पडली। नेदी हुंकारा बोलणी मोडली॥ उडकी हृदयातु प्रवेसली। प्राणु साची वेळोवेळा॥' -शिशु २ २ ८८

**उडकी लागणें**—क्रि गोळी मध्य येणें, (शेती) पाभीचें वर (भोंक) माती लागून बंद होणें आणि त्यामुळें खालीं धान्य न पडणें -ममाप २४५

**उडंग-गु**—पु त्रास [का उडिग=फडिंग]

**उडगण**—स्त्री गोगलगाय उडगण चढों जाय भिन्तीं। तुझें लेंगिना पडे पुन्ती॥' -मुविराट ० ३०

**उडगण**—पुन नक्षत्रें [स उडु गण]

**उडगणें**—उक्रि (वर्‍हा) ताडणें, कर काटणें [का उडगु=झाडणें]

**उंडगणें**—अक्रि उगवणें 'आस्तनियात पुष्कळदा पुष्प परात घुसिकाराधन करीत असून, बायका रस्त्यातून वानारहाट करीत उंडगत आहेत असा चमत्कार दृष्टीस पडतो' -महाराष्ट्र २८ ६ १९३० [का उडिग=फडिंग]

**उंडगळ, उंटगा, उडगा**—वि निरुद्योगी, कामचुकार, उडाणटप्पू, भटक्या ( मुलगा ) [ का उडिग ]

**उंडगा, उंडगादगड**—पु १ ओबडधोबड, खडबडीत धोंडा, ठोकळा, ओंडा २ दांडगा, उद्धट मुलगा [ का उण्डिग ]

**उंडगेमासे**—पु अव ज्यास पिलें झालीं नाहींत असे मासे –मरळ माशाची पैदास ( बडोदें ) ७

**उडण-णी**—स्त्री १ खिडी, आळी 'उडणी लघु न झाक भिंतीसी।'–एभा ५ ९३

**उंडण-णी**—स्त्री उणी, उडीचें झाड हें कोंकणात होतें याची पानें सुरंगीच्या पानासारखीं मोठीं, गुळगुळीत, स्वच्छ असुन पत्रा वळी करता यण्यासारखीं असतात फूल पाढरें, सुवासिक असतें फळें सुपारी एवढीं असून बियाचें तेल जाळावयाच्या उपयोगी पडतें त्यास उडेल म्हणतात हें खरजेवर औषधी आहे –वगु १ ६० [ स पुन्नाग ]

**उडणटप्पू**—उडाणटप्पू पहा

**उडणें**—अक्रि १ भरारी मारणें, आकाशमार्गें गमन, सचार करणें ( पक्षी वगैरेंनीं ) २ आघात प्रत्याघातादि कारणानें स्थान सोडणें, मूळ स्थानापासून अन्यत्र जाणें, वर बाजूस उडी मारणें 'चेंडू जसा वेगानें आपटला तसा वर उडेल' 'तोंडावर वस्त्र धरून बोल, नाहीं तर दुसऱ्याचे अंगावर थुंका उडतो' ३ उल्लघन करणें, ओलांडून जाणें वरून उडी मारून जाणें 'आडमार्गें उडोनि भिंती' –मुविराट ४ २४ ४ उचावरून खालीं उडी मारणें ५ झडप, झेंप घालणें तुटून पडणें रागानें, आवेशानें चालून जाणें ६ नाहींसें होणें, निघून जाणें सपणें 'ते रात्री येता सूर्यापुढें। स्वसामर्थ्यें सगळी उडे।' –एभा २० २८१ 'मनीं निश्चयो सर्व खेदें उडाला।' –राम ६० ७ एकदम अदृश्य होणें, दिसेनासें होणें 'दिवस बुडाला मनुष्य उडाला' ८ कोमेजणें, निस्तेज होणें, रग वि णें, अस्पष्ट होणें, फिक्का होणें 'या चित्राचे रग उडाले आहेत' ९ खपणें, खलास होणें खर्च होणें ( द्रव्य जिन्नस ), 'त्याचा सर्व पैसा चैनबाजींत उडाला' '( कोशाच्या ) दरवर्षी लाखों प्रती उडत असल्यामुळें ते ( ठसे ) झिजून जातात' –नि ६७७ सुटणें, (धैर्य धीर) सुटणें, (पाणी वगैरे) आटणें १० मन विटणें, तिटकारा येणें प्रेम नाहीसें होणें 'तिचा आज जीवच उडून गेला होता'–अस्तभा १८८ ११ दुभतें जनावर दूध देत नाहींसें होणें, गोरडें पडणें, भाकड होणें "हल्ली आमची गाय उडाली आहे" १२ बदुक तोफ पेटणें, गोळी सुटणें स्फोट होणें फुटणें १३ युद्ध, भाडण वगैरे जुपणें १४ मजा, गमत, दुष्काळ, अरिष्ट, भाडण तंटा, अव्यवस्था वगैरे उत्पन्न होणें, सुरू होणें, वाढणें, माजणें 'चालिलें उडत गजेत'–दावि ०६८ १५ बळावर, आधारावर काम करणें, अवलबून कार्य करणें ( द्रव्य सत्ता, वचन वगैरेवर ) 'कशाच्या बळावर उडतोस?' १६ सभोगार्थ उडी मारणें–चढणें ( पशु वगैरेंच्या मादीवर–नर पशूनीं मादीवर ) १७ ( ल ) गर्व करणें, मद येणें, ताठा चढणें 'ज्याच्या बळें उन्मत्त ते तिकडेचि मनेंहि तुजकडे देहें।'–मोउद्योग ४ १०९ १८ ( ल ) वरमान करणें, भरभराटणें 'सत्कीर्ति न दे उडों नवयुवतें।'–मोसभा २ ४० १९ भरधाव पळणें ( घोडा वगैरे ), वेगानें जाणें २० एखाद्याची चाकरी, रोजगार सुटणें २१ दोष, विरोध वगैरे दूर होणें, मावळणें, आरोप नाहींसा होणें, ( शास्त्रादि विषयावरील ) २२ निसटून जाणें, पळून जाणें 'पुढें धरिता मागे पैचला। मागे धरिता पुढें उडाला। ऐसा सापडतचि गेला। ठाइंठाइं॥'–दा १७४ ३ २३ ( शाप ) वाफ होऊन जाणें, बाष्पीभवन होणें ( इ ) व्हेपराइझ, इव्हॅपोरेट [ स उद्+डी, उड्डान, फ्रेंचजिप्सी उरी ] **उडून चरणें**–( ल ) एप आरामात, थाटामाटात राहणें, राजदरबारी मानसन्मानानें राहणें **उडत जाणें**–( ल ) खिजगणतींत नसणें, महत्त्व न देणें, न मानणें 'नाहीं सागितलें स तर उडत गेलास!'

**उडंत**—स्त्री वानराची लढाई –दार

**उडतउडत**—क्रिवि १ उड्या मारीत, नाचत–बागडत, एकाच क्रमानें, वेगानें नाहीं अशा प्रकारें ( जाणें, येणें ) २ अनिश्चितपणें, अनिर्धारकपणें, सदिग्धपणें, अस्पष्टपणें ( सागणें बोलणें, एकणें ) 'हें काम त्यास होणार नाहीं अशी बातमी मी उडतउडत ऐकली' ३ कर्णोपकर्णी ( एकाकडून दुसऱ्याला अशी बातमी इ० यणें ) ४ सक्षेपानें, सारांशरूपानें, मधून मधून 'सगळी कथा सागावी तर वेळ लागेल उडतउडत सागतों' 'तिनें उडत उडत जवाब दिला' –विवि ८ ३ ८२

**उडतक**—न घोड्याच्या अंगावरील गाशाखालील वस्त्र

**उडतघुमा**—वि ( भोंवऱ्याच्या खेळात ) दूर उडून तेथें फिरत राहील अशा तऱ्हेनें टाकलेला, उडून घुमतो असा टाकलेला ( भोंवरा ) [ उडणें+घुमणें ]

**उडतपगडें**—न सोंगट्याच्या खेळातील एक डाव ( क्रि० करणें ) [ उडत+पगडा ]

**उडतबातमी**—स्त्री बाजारबातमी, गप्प, भुमका, सहज राम चललेलें पण राशयित वर्तमान, कर्णोपकर्णी एकलेली वार्ता

**उडतरुमाल**—पु १ मर्दुमकी करणाऱ्या महार वगैरे हलक्या जातीच्या लोकासाठीं योजिलेला किताब २ लढाई यांबविण्याची खुण [ उडणें+रुमाल ]

**उडतहत्यार**—तोफाची मारगिरी, गोलदाजी –रा ३ २९२

**उडतापील**—पु उपाध्यानें वाढणारें मूल थोराड मुलगा, धडाडीचा, पुढें नावारूपास चढेल अशीं चिन्हें दाखविणारा तरुण, हुषार, चपळ मुलगा [ उडत+पील=पिल्लू छावा ]

**उडतीपाटी**—स्त्री खळ्यापैकीं एक हक्क, धान्य उफणताना महार जें जागलें घेतात तो हक्क, धान्य उफणायला जी पाटी घेतात तिला उडती पाटी म्हणतात, अर्थात् धान्य उफणणाऱ्या महारास त्या पाटीभर धान्य देतात त्यास उडती पाटी म्हणतात —गाणा १००.

**उडती वार्ता**—स्त्री उडतवातमी पहा 'उडती वार्ता हे निज कथा।'—दावि २८७

**उडतें ऊन**—न सुर्योष्ण, सकाळचें ऊन [स उदयत्–उड मत–उडत —भाग १८३४]

**उडतें पाखरूं**—न, १ उडणारा पक्षी २ (ल) चंचल, अस्थिर माणूस, हगामी म्हृ० उडतें पाखरू पोटभरू —के ८ १ २९ वाक्प्र चार-उडत्या पाखराची पिसें (शेंटें) मोजणारा—मेज करणारा—(ल) फार चलाख, हुषार मनुष्य, पाताळयंत्री मनुष्य, सुसल्या तर्कानें एखादी गोष्ट अचूक ओळखणारा (गो) 'उडत्या पाखराची शेंटा मोजप'

**उडंत्री**—स्त्री (कर्ना) वैली, सुताचा ताणा सागावर चढ विण्यापूर्वी पाजणी (उकी) करण्याकरिता लागणारें लाकडी घोडें [का हुडु=जोडणें+यन्त्र]

**उडद**—स्त्री (गु) उडीद पहा [का उद्दू=उडीद]

**उडदण-दाण**—न उडदाची मळणी झाल्यावर राहिलेला भुसा, गुसकट **०णी**—वि उडदाच्या रगाचें, काळसर उडदानी झाड, उडदानी रग

**उडदळ**—स्त्री उडीद पेरण्यास योग्य अशी जमीन, जेथें उडीद पेरण आहे अशी जमीन [उडीद+रा आल=व्याप का आळ=व्याप्ति, भूमि]

**उडदावेगम-णा**—न स्त्री (बुद्धिबळ खेळ) मोंगली सप्रदायीं बुद्धिबळांतील एक मोहरें, यात घोड्याच्या ऐवजीं उडदावेगम हें मोहरें असून त्याची गति ३॥ घरें असते या उडदावगणीच्या खळात पटावर १०० घरें असतात [तुर्की उर्दू=सैन्य+वेगम=राणी, उडदाबेगम=हत्यारबद, स्त्राळ वगम, बेगणी=अमीराची स्त्री]

**उडदावेगमी-वेगी**—स्त्री (हिं) हत्यारबद स्त्री, उडदा वगणी [तुर्की उर्दू=सैन्य, तळ, लष्कर, बाजार+बेगम=स्त्री, तरुणी, राणी, वेगणी]

**उडदामुहूर्त**—पु लग्न, मुज वगैरे समारभात मारमीं सुवासिनी उडीद दळण्याचा जो समारभ करतात तो, उडीद भरडण्याचा मुहूर्त, वाल [उडीद+मुहूर्त]

**उडदावळ**—स्त्री १ उडीद पेरलेली जमीन, उडदाचें रान, उडदळ पहा २ उडदी रगाचें लुगडें (काळ्या अगावर पांढऱ्या नौकदी असणारें) [उडीद+स आल]

**उडदी**—वि उडिदाच्या रगाचें **०लुगडें**—न पांढऱ्या चौकडी असलेलें काळें लुगडें

**उडदू**—स्त्री उर्दू भाषा उर्दू पहा

**उडदे**—पु अव (व) उडदाच्या दाण्यासारखे कीटक [उडीद]

**उडद्यामुरूम**—पु उडदासारखा बारीक, काळा मुरूम

**उडप**—न (गो) वाघाला मारण्याकरिता एखादें मेलेलें किंवा त्यानें मारलेलें जनावर ठेवून त्याभोंवतीं केलेलें काट्याचें कुपण [स उडप, प्रा उदय-व?]

**उडपाल**—न १ मोठ्या तबूशेजारीं जो स्नान, स्वयपाक वगैरे करण्याकरिता लहान तंबू ठोकतात तो [आड+पाल=लहान तंबू]

**उडपाल**—न कावळ्याच्या खोळीवर (पर्जन्यनिवारणार्थ) जें दुसरें वस्त्र घेतात तें [स ऊर्ध्व+पल्लव, प्रा उड्ढ+पाल]

**उडया-यें**—पु न (व कु) उड्या-वी-यें पहा

**उंडरणें**—अक्रि (व) माजणें, सैताडणें, उन्माद यणें 'गोप्या आताशा फार उडरला आहे' [का उडिग]

**उंडल**—स्त्री उड, उडीणीचें झाड व तिचें फळ उडण पहा

**उडलटप्पू**—वि निरुद्योगी उडाणटप्पू पहा

**उडली, उंडी, उलडी**—स्त्री. (नाविक) होडी उलटू नये म्हणून ताल साभाळण्यासाठीं तिच्या बाहेरील बाजूस दोन वाकडीं लाकडें जोडून त्यांच्या शेवटाला जोडलेलें एक आडवें लाकूड हें नेहमीं पाण्यात असतें [उलटणें]

**उंडलोण**—स्त्री उडीण

**उंडलेल**—न उडीच्या बियांचें तेल, उडेल [उडल+तेल]

**उडवणी**—स्त्री १ पसरणें, फेंकून देणें, उधळणें २ अवहेलना करणें, अव्हेर करणें, हेटाळणी ३ निरास 'ये विषयीं उडवणी पचकात। बोलिलेती दासानीं अभग पढ्क ते।'—दावि ३१२ [उडविणें]

**उडवणें-विणें**—उक्रि १ उडणें याचें प्रयोजक, उडणें पहा २ दूर फेंकणें, मस्ताव्यस्त करणें, विस्कळित करणें, चारी दिशात उधळून लावणें, पळवून लावणें 'मुकुट गिरीचा उडविला।'—मोरोद्धारामायण ६९ ३ उधळपट्टी करणें, बमुमार खर्च करणें 'आपल्या गावीं राहून हवा तेवढा पैसा उडवील असें तिला वाटलें'—विवि १० ५—७ १२३ ४ टाळणें, अव्हेरणें, सोडणें, टाकून देणें ५ हेटाळणें, अव्हेर करणें, झिडकारणें ६ चोरणें, लांबविणें, नाहींसें करणें 'हातचेहा फिर्यादीनें उडविल्या'—विक्षिप्त ३ ९५ ७ मारणें, आघात करणें, 'निर्गुणास जन्म कल्पिला। अथवा निर्गुण उडविला॥'—दा ९ ३ २६ 'तत्वावर नेम धरून सोजीर उडविता येतील'—इप १५० चाबूक उडविणें, चाबकाचे फटके मारणें 'भटजीचे अगावर चाबूक उडविले'—इप ८६ ८ चारून नेणें, पळवून नेणें, 'तिला उडवून नेण्याचा

प्रयत्न करणें हीं गोष्ट श्लाघ्य आहे ' –निबं १० ५-७ १२१ ९ आटोपणें, जलद काम करणें, त्वरित संपविणें 'लॅटिन भाषांतर विद्यार्थ्यांस दिलें असतां तें जॉन्सननें कसें उडवून दिलें याविषयीं मार्गे सांगितलेंच आहे.' –नि ६५६ १० फजीत करणें 'नका आमची जास्त उडवूं' –चंद्रमदन ४० ११ काढून, हाकून लावणें 'आपण स्वत टोळीचा नायक होऊन तुम्हास उडवून देणार नाहीं' –कोरकि २७८ [स उद्+डी–डायय्–उड्डायन, प्रा उड्डवण]

**उडवलाउडवला, उडवलिाउडविला**—वि (कों) दूर दूर, इकडेतिकडे, मधूनमधून, विरळ, तुरळकतुरळक 'आधे बहुतकरून आभाळानें गळाले, आता कोठें उडवले उडवले आहेत' [उडविणें द्वि]

**उंडवळ**—वि (कों) कामचुकार उडगळ पहा

**उडवा–वी–वें**—पु स्त्री न १ ढीग, रास, गंजी (पिकाची, गोवऱ्याची) 'नाना निधानचि निदेवा । होये कोळमयाचा उडवा ॥' –ज्ञा १८ ७२९ २ (व) (गोवऱ्या वगैरेंची) रास ठेवण्यासाठीं केलेलें कूड 'उडव्यांत कुणबी गोवऱ्या ठेवितात' ३ कोणत्याहि धान्याच्या वाळलेल्या ताटाचा (झोडपणीसाठीं) रचलेला ढीग, खुडाड [स कूट, प्रा उड, का उड्डी=ढीग]

**उडवाउडव–वी**—स्त्री १ टाळाटाळी, कोल्वाकोल्व २ हेटाळणी, अवमान ३ उधळपट्टी, अव्यवस्थित खर्च ४ अस्ताव्यस्त करणें (रचून ठेवलेला जिनस), अस्ताव्यस्तपणा, अव्यवस्था, विस्कळीत रीतीनें केलेली फेंकाफेंकी ५ निरास करणें, लागू होऊ न देणें (दोष इ) [उडविणें द्वि]

* **उडवागी**—स्त्री (प्रा) तिरस्कारानें वागविणें, अवहेलना करणें, अनादर करणें (एखाद्या माणसाचा किंवा त्याच्या भाषणाचा) (क्रि करणें) [उडविणें]

**उडव्या**—वि १ उधळपट्टी करणारा, खर्चिक, अतिव्ययी २ चुकारपणा करणारा, टाळाटाळ करणारा [उडविणें]

**उडळ**—स्त्री उंडी एक झाड

**उंडा**—पु १ भिजविलेल्या पिठाचा गोळा (भाकरी, पोळी करण्यासाठीं तयार केलेला) २ उडीद आणि तांदूळ यांच्या पिठाचे गोळे करून शिजवून एक खाद्य पदार्थ तयार करतात तो ''खाजी करंजी, घ्याजी घाजी, आमह करिती, साखरमांडा, उंडा भर पुरणाचा धोंडा ।' –अमृत ७३ 'आमच्या आया तुमच्या आया । खातील काय दूध उंडे' –भोंगा ३ गोळा 'ताचि दघी भाताचा उंडा वामकरीं ।' –दाव ३८५ ४ (कर्ना) लाडू, गुडाळें (उंडी=लाडू) ५ आळवाच्या पानाच्या वड्या करण्याकरता पानास पीठ लावून तीं गुंडाळून त्याचे किंवा कळण्याचे वरवंट्याच्या आकाराचे गोळे करतात त नतर ते शिजवून कापून तदुन वड्या करतात [प्रा उंडी=गोळा, पिंड, का उंडे=गोळा, ता त नु वगैरे सव भाषांतूनहि हा शब्द आढळतो गा उंडो]

**उडाउडी**—क्रिवि चटाओढीनें, तावडतोब, उड्या पडून, चुरशीनें 'हीं वाणीं उडाउडी विकलीं' [उडी द्वि]

**उडाऊ**—वि अतिशय खर्चिक, उधळ्या उडव्या पहा [उडविणें]

**उडाऊछापी–टप्पू**—वि टाळाटाळी करणारा, चुकारतट्टू [उडविणें+छापणें, उडाण टप्पूप्रमाणें काहीं तरी प्रयोग]

**उडाण**—पु शेताचा, जमिनीचा एकीकडचा विलग असलेला तुकडा [उडणें]

**उडाण**—स्त्री (ना) उडी, धाव [स उड्डान, प्रा उड्डाण] °**खटोलें**—न विमान

**उडाणटप्पू**—वि १ एकाच ठिकाणीं, कामात फार वेळ न टिकणारा, भटक्या, अस्थिर, चचल वृत्तीचा २ खुशालचद, रिकामा, गावगुंड ३ तात्पुरतें, चालचलाऊ हगामी (उद्योग, नोकरी) [उडणें+टप्पू, तुल० उनाड पहा]

**उडाणधीर**—पु (कों) कोणत्याहि अवघड कामात भय, शंका न धरता उडी घालण्याचा ज्याचा स्वभाव तो [उडणें+धीर]

**उडाऊ**—वि १ तात्पुरतें, हगामी, क्षणिक (काम, स्थिति) २ अस्थिर, चचल मनाचा, वृत्तीचा, वेभरवशाचा (माणूस)

**उंडारणी**—स्त्री १ माज, मस्ती, गर्व, ताठा, ऐट, अभिमान, धुमधुमी २ स्वैर वर्तन ३ उनाडकी, उणगणें, खेळणें [उडारणें]

**उंडारणें**—अक्रि १ मानणें मस्तीला येणें उद्धट होणें २ स्वैर वर्तन करणें 'छिनाल छबकड्या उंडारतात' –इप ६० ३ उनाडकी करणें, उडाणटप्पू बनणें [का उडिग]

**उडावणी**—उडवणी पहा

**उडावू**—वि अति खर्चिक उडव्या उडाऊ पहा

**उडाळ**—वि १ अस्थिर, चचल २ (राजा) लक्ष्य उडालेला, मनातून, लोभातून गेलेला, मन विटलेला, पराङ्मुख 'द्रव्य मिळविण्याची आस्था लागताच याचें मन विद्येवरून उडाळ झालें' [उडणें]

**उडिद**—उडीद पहा

**उडिया, उरिया**—पु ओरिसा प्रांतात राहणारा –भा ओरिसातील प्रमुख भाषा [स ओड, प्रा उड्डिअ, हिं उडिसा]

**उडी**—स्त्री १ एका जाग्यावरून उडून दुसऱ्या जागीं वेगानें पडणें, जाणें, झेंप, उडणें, उड्डाण (क्रि० घालणें, मारणें, टाकणें) २ (ल) सकल्प, इच्छेची मर्यादा 'त्या धाडयाचे हजार रुपये घ्यावे अशी त्याची उडी आहे' ३ (ल) मानका, आवाका, पल्ला, कार्यक्षमता, आकांक्षा, उमेद ४ (राजा) दुसऱ्याचा बैल कामाकरिता आणल्याबद्दल धान्याच्या किंवा पैशाच्या रूपानें द्यावयाचें मूल्य भाड्यानें जनावरें आणून शेती करणें [स उत्+डी प्रा उड्डी] **उड्या पडणें**–झटून, तुटून पडणें (मग पाहिजे,

मी करतों म्हणून ) गर्दी होणें, जोराची चढाओढ लागणें, चुरस लागणें (एखद्या गोष्टीबद्दल) 'उंच वस्त तात्काळ विके। जाणत्या लोकाच्या कौतुकें। उडया पडती।' –दा १२ ७ २५ 'त्या रोजगाराविषयीं उडया पडतात ' **उडया मारणें**–१ गर्व वाहणें, पेट करणें, फुशारकी मारणें, बढाई मारणें, उद्दामपणें वागणें २ उनाडक्या करणें ३ चैन करणें ४ विवक्षित मर्यादा ओलांडून, उल्लंघून जाणें ५ गाळणें ( मुद्याचा भाग, नाटकातील भाग, ग्रंथातील विशिष्ट भाग ) **( बळावर, जिवावर ) उडया मारणें**–दुसऱ्याच्या आश्रयावर, आधारावर अवलंबून मोठमोठ्या गोष्टी करणें, गर्व वाहणें, मोठमोठ्या कार्यास हात घालणें 'आजपर्यंत आम्ही तुमचे बळावर उडया मारीत होतों, परंतु तुम्ही हातचें सोडलेत '

**उंडी**—स्त्री ( कों ) उंडीण झाड व त्याचें फळ उडण पहा

**उंडी**—स्त्री उंडा याचें लघुत्ववाचक उंडा पहा १ गोळा, घास 'जैसी घापे लोणियाची उंडी।' –ज्ञा ११ ४७७ २ भाताची मूद, पिंड, घास 'ना तरी भस्मासिनच्या तोंडी। न पुरे भाताची उंडी।' –ज्ञाप्र ७०३. ३ वळी, नैवेद्य 'नवसिया देती उंडी। बाळकाची।' –ज्ञा १७ ९७ ४ खीर करण्यासाठीं तांदूळ कुट्या दिवाच्या पिठाच्या गाळ्या करतात त्या प्रत्येक ५ आमिष, पिठाची गोळी 'उंडीस देखोनि मासा भुलला । गिळिता कंठी गळ टोचला।' –भवि २ १६० [प्रा उंडी=पिंड, का उंडे=गोळा, ते उंड, ता उरुंड उरुंडै, उंडा याचें अल्पत्वदर्शक नाम] **उंडी, उंड्या उकळणें**–भिक्षा मागणें, आगतुकी करणें ( दुसऱ्यावर अवलंबून असणाऱ्याबद्दल वापरतात) ०चकाल–वि (राजा) भोजन भाऊ [उंडी+चकलणें=खाणें]

**उंडीण**—उडण पहा

**उडीद**—पु एक द्विदल धान्य याचें झुडुप अथवा वेल हातदीडहात उंच वाढतें उडदाचा रंग काळा असून डाळ पांढरी, पौष्टिक, शीतल असत 'उडदामाजी काळें गोरें। काय निवडावे निवडणारें।' –तुगा १८ [प्रा हिं उडिद, का उद्दु, गु अडद, स माष]

**उडु**—न नक्षत्र [स] ०गण–पु तारकापुंज ०पति **राज**–पु चंद्र 'तव उडुराज उदेला गगनीं ' –रास १ १००

**उडुप**—पु १ चंद्र २ नौका [स उडु+प=पति]

**उडुगाडा**—पु (व) भरीव चाकाचा गाडा

**उडेकार**—वि ( गो ) पाद करणारा, विकणारा, रोगीयाला [का उंडे=गोळा उडा=पाद+म कृ=कार]

**उंडेल**—न ( कों ) उडिणीच्या फळातील बियाचें तेल याचा जळण्याकडे व गुराच्या अंगावर माशा बसु नयत म्हणून उपयोग करितात [उंड+तेल]

**उड्डाण**—न उडी पहा 'एकेचि उड्डाणें सातहि सागरा। प्रदक्षिणा करी जो।' –ज्ञा १० २५० [स उड्डान]

**उड्डियान**—न हृदयस्थान, अनाहतचक्र [स] ०बंध–पु योगातील एक बंध, योगात मूल, उड्डियान व जालंदर असे तीन बंधाचे प्रकार आहेत

**उडया**—वि १ उडी मारणारा २ धमक असलेला, हुषार, चलाख म्ह० उडया पुरेल पण पडया पुरवत नाहीं

**उढा**—पु बाबूंची एक जात हा झाड असून लोंढा येथील जंगलात होतो

**उण-खुण-खूण**—स्त्री १ हेतु, मनोगत, कामना 'नायटयाभेण। न मोन्जिे नागाची आण। तैसी पाळी उणखुण। स्त्रियेची जो॥' –ज्ञा १३ ८०० २ वर्म, रहस्य 'म्हणोनि एक एकाधीन। जाणती उणखुण येरयेरा।' –निगा १७७ ३ प्रत्यय, अनुभव 'तें शोधित सत्वाचें लक्षण । हें मी जाणें उणखूण ।' –एभा ११ ७२८ ४ ओळखण्याचें लक्षण, चिन्ह, खाणाखुणा 'एकधा विभागे अंत करण। त्याची उणखुण निज लक्षण।' 'ऐकोनिया उणखुणेसी। चाकडी जैसी विव्हळ।' –एभा २३ ९७३ [उणें+खूण]

**उणवट**—वि अल्प मोलाचें [स ऊन+वृत्, म उणें+वट]

**उणवाई**—स्त्री ( कों ) उणेपणा, कमतरता, न्यूनता, कमीपणा, तोटा, टंचाई [स ऊन, म उणें+वाई प्रत्यय]

**उणा**—वि १ कमी, अपुरा, नेहमीपेक्षा कमी, विवक्षित परिमाणापेक्षा कमी 'काय उणें का करितोसि चोरी।' –तुगा ११९ 'गुणा न म्हणता उणा अधिक आदरें सेविती' –केका २३ २ अपुरा, अपूर्ण, सदोष (कार्य, सामग्री ), अपुरी असलेली (गोष्ट) 'शेताचा सरनाम जमविला खरा, परंतु उणा आहे, कांहीं आत बैल उणे आहेत म्हणून ' ३ हलका, कमी योग्यतेचा, प्रतीचा 'म्हणोनि आसुरी उणी संपदा नव्हे।' –ज्ञा १६ २५६ 'वैश्य जातीपेक्षा शूद्र जाति उणी ' ४ मानहानिकारक, अयोग्य, एखाद्याचें व्यंगदर्शक ( शब्द, भाषण, इ० ) 'बोले शब्द उणा विदेह पिशुना मध्यें तदा त्या गुणा॥' –आर्ती ५१ ५ नपुंसक 'वडील बाईल म्हणे ठण्या। धाकटी बाईल म्हणे घुन्या॥' –नामदेवनाटक १९ ६ गैरहजर, अविद्यमान, कमती [स ऊन] ०अपुरा–वि अपुरा, विवक्षित मापाहून कमी ( कापड ) उणा पहा [उणा+अपुरा] ०दुणा –वि १ अपमानकारक, कमी अधिक, तिरस्कारदर्शक, मर्मभेदक ( शब्द, भाषण, बोलणें ) 'कोणाला उणेंदुणें बोलणें बोलू नये ' २ सरासरी उणापुरा पहा. [स ऊन+द्विगुण] ०पुरा–वि कमी अधिक, जवळजवळ, अजमासें, सुमारें सरासरी 'मला पुण्यास आल्याला उणापुरा एक महिना झाला ' [स ऊन+पूर्ण]

**उणाक-रा**—वि हलक्या प्रतीचें, कमी किंमतीचें, ( हलके, विरणारें वस्त्र, माल वगैरे ) 'त्याप्रमाणें उणाक आणि मध्यम

शालजोडया पाहून पाठवून देणें ' -पेद १८ ७२ -न हलकें वस्त्र 'भाची नारायण पुरंदरे यांना उणासीं मिळाली होतीं ' -भांस १० ३ १२७ [ उणा+भास ]

**उणांग**—वि ( गो ) कमी, हलका, हलक्या दर्जाचा [ स ऊन+अंग ]

**उणाव**—पु कमीपणा, कमताई उगवाई पहा

**उणावणें**—अक्रि १ कमी होणें, न्यूनता येणें, पूर्व स्थिती पेक्षा उणा होणें ( पर्जन्य रोग इ ) 'ज्येष्ठ अधलें उणावलिा ॥' -सुआदि २५ ८६ २ तीव्रता कमी होणें ( दु साची ), शिथिल होणें. ३ उतरणें, मालावणें, अवनति होणें, क्षीण होणें [ म ऊन, प्रा ऊण ]

**उणावळ**—स्त्री कमीपणा, तूट

**उणीव**—स्त्री १ कमीपणा, न्यूनता, उणेपणा 'परि उणि वेचा सोस नाहीं तयास ।' २ दोष, व्यंग [ स ऊन मि ऊणी ]

**उणें**—न १ कमीपणा, न्यूनता, दोष, व्यंग, अपूर्णता, वैगुण्य 'दैत्यीं ठवा आणिलें उणें ॥' -ज्ञा ९ ४५० 'तया पाडवाचें उणें । बीजचि ना पुराणें । विश्वत्रयें ।' -ज्ञा १५ २८ 'जे यादवा येईल उणें ।' -उषा ७८५ 'म्हणे स्वकृतिच्या उणें किमपि एकवर्णी न हो ॥' -केका ६१ -शम्र वांचून, शिवाय, वीण 'जीव घेतलिया उणें चालें नेणती साजणें ॥' -मसृ २ ३९ 'तैसें आवडतें हिं करणें । न निफजे सीणलेयां हिं उणें ।' -राज्ञा १८ ९४० -वि उणा पहा [ स ऊन, प्रा ऊण ] •आणणें-दोष लावणें, कमीपणा आणणें, लाज विणें 'वरि झळकति दिव्य कळस । उणें आणति उडुगणास ।' •घेणें-आपल्या कमीपणाबद्दल मनास लावून घेणें, दु ख पावणें, स्वत ला कमी समजणें •पाहणें-काढणें-दोष पाहणें, व्यंग काढणें, नांवें ठेवणें •उत्तर-भाषण-न अपमानकारक, तिरस्कार •व्यंजक, मानभंग करणारें उत्तर 'तें गुड्याएवढें पोर, पण पुरुल्याला उणीं उत्तरें करतें ! हा काय त्याच्या घरचा मोळा तरी !' •म्ह-( व )उणें असे मनी खसे नकट असे नाक परवसे=ज्याच्यात काहीं व्यंग असतें त्यास दुसरें कोणी बोलत असल्यास, तें मलाच तर उद्देशून बोलत नाहींत ना ? असें वाटतें •दुणें-रें-वि अपमानकारक, निंदा व्यंजक कमीअधिक, पाणउतारा करणारें (भाषण), घालूनपाडून बोल लेलें, उणादुणा पहा 'भाऊसाहेब काकासाहेबांना उणेंदुरें बोलत असलेलें पाहून नमुताईना जरा राग आला ' -हाच का धर्म ३३ •पणा-पु कमीपणा •पाणें-पाताळें-न दोष 'एकमेकांची काढण्यातच जर आपला असा वेळ जायचा तर रणांगणावर काय होणार ' -डार्विनकला 'त्याचें कशाला उणेंपाताळें काढतेस ?' -नामदेव नाटक ७६ •पुरें-वि उणापुरा पहा १ कमीअधिक, सुमारें, सरासरी, अदांनें, जवळजवळ 'आपल्या मेंगेला उणेंपुरें वर्ष होत आलें ' २ पूर्णअपूर्ण 'किती अनुवाद, उण्यापुऱ्या नकला भाडवून येतात हें लक्षात येईल ' -गीर ७

**उत**—अव अथवा 'अर्जुन म्हणे उमा रे सिद्धत्व त्यजुनियां न कुनरा हो । उत राहो, क्षम पाहों, जा यमभट हो ! तर्ही न उतरा हो ॥' -मोवन ९ ४३ [ म उत=वा ]

**उतटणें**—अक्रि १ तडकणें, उकलणें, उलणें, उसवणें, ताणून फाटणें, फुटणें, तटतटणें ( ताणल्यानें, भांवून जोर झाल्यानें इ० ) 'मग शिवणी जैसी उतट ॥' -ज्ञा ६ २६६ 'तवेच्या चोळीचे सकळ अरदांगें उतटली ।' -सारुह ८ १६५ 'नादें दश टलें आकाश ।' -वेसीस्व २ २४ २ फ़ाट होणें, दाटणें, अतिशय ताण बसून तुटणें 'हे चोळी गेली उतटोनि । तैचि जाणिलें मिया ॥' -शिशु ३२१ -सक्रि उकलणें, फाडणें, ताणून तोडणें इ [ स उत्+तन् ]

**उतटणें**—अक्रि उचंबळणें, भरून येणें 'कीं हें सुखाचीं तारुवें लोटलीं । भाष्ठी आनंदें उतटलीं ।' -दा १ ७ ३१ 'ऐकोनि उतटला समर्था प्रेम ।' -दावि ३०२ [ स उत्+तट=वर येणें ]

**उतणणें**—उक्रि गवत काढून टाकणें, तृण झाप इत्यादिकांनीं आच्छादिलेल्या गृहावरील तृण किंवा झाप काढून टाकणें [ स उत्+तृण, प्रा उतण ]

**उतणणें**—अक्रि गर्वानें फुगून जाणें, ताणणें [ स उत्+तन्=लांब करणें ]

**उतणें**—अक्रि १ उकळून वर येणें ( दूध, कढी वगैरे ) 'जैसें उतलें आगीं पडे । तें नलगचि होमा ।' -ज्ञा १८ ९१३ २ पू वगैरे येणें ( डोळ्यांतून ) ३ ओठादि अंगावर पुटकळ्या, फोड येणें ( तापामुळें, वस्तरा लावून ) ४ निम्बा वगैरे लागल्यामुळें चिडणें, फुगून वर येणें 'कोणे सवतीनें भरला भिलावा उतला ।' -निर्गुणाचा पाळणा १२ ५ खतखतणें, खदखद होणें ( आगीवाचून शिजल्याप्रमाणें ) ( काहीं चुन्यावर लिंबाचा रस घातला असतां होतें तसें ) फेंस येणें ६ भरून वाहणें 'कोपावेश झालें कल्पनीचें समुद्रें उतलें ॥' -सोमीम्भ ९ २६ ७ ( ल ) गर्वानें फुगून जाणें 'कितिहुना एसें । उतणें जें संपत्तिमिसें ।-ज्ञा १६ २२९ 'खळा ! न मदें उतर ।' -मोरा २६ ८ उसळणें, उचंबळून वर येणें 'तातला तेलीं सागर । उततातीं ।' 'कल्पांतींचे जसे जलधि उतते ।' -मोवन १० ३९ ९ माजणें, फुगणें, जोरानें वाढणें-(पीक, गवत भाजी वगैरे) १० अतिशय समृद्ध होणें, कल्पनेबाहेर वहर येणें ( धान्य, फळें वगैरे स ) [ स उत्+तन्, म उत, तुल० का उदु=फुगणें ] **उतूं-जाणें-चालणें**-१ खर्च होणें, नुकसान होणें, तोटा होणें •अणें 'माझें काय त्याचावून उतू जात आहे ' उतूं येणें-उतास येणें उतास येणें वर येणें ( दूध इ० ) फेंस येणें, ( ल ) रहस्य असणें, भारोकाट, अतिशय प्रेम असणें

**उततर्ण**—अक्रि उच्चवळणें, उतणें अर्थ ८ पहा [उत्+तृन्]

**उतती**—स्त्री बारीक 'बादामें आक्रोटे खिसमिस।उतत्या आणवील्या सवगा ॥' –सारुह ३ ४८ [का उतुत्ते=बारीक]

**उतप**—वि (प्र) उताप उघडें, ज्यावर चांगलें ऊन येत आहे असें, छायारहित [स उत्+तप्, उतप्त, प्रा उतप्प]

**उतफाळणें, उतफळणें**—क्रि फाडून टाकणें, फाडून तुकडे तुकडे करणें, चिंध्या करणें, वाभाडे काढणें [स उत्स्फालन]

**उतमाच-ज-त**—पुस्त्री (ना व) १ उच्छाद, उपद्रव, उच्छृ खलपणा २ मानोरीपणा, गर्व 'एवढी उतमात करू नकोस' [उत+मात]

**उतरंग**—न (गों) दरवाजाच्या चौकटींचें वरील लाकूड [स उत्तर+अंग, प्रा उत्तरंग]

**उतरचढ**—वि वारंवार चढण किंवा उतरण असलेलें उंच सखल, खालवर –स्त्री चढण्याउतरण्याची क्रिया [उतरणें+चढणें]

**उतरट**—वि उतार असलेला, उतरता [स उत्+तृ-तट्]

**उतरड, उतरंड**—स्त्री निवडुगावर वाढणारा एक तऱ्हेचा वेल ह्याच्या रसानें अगर चूर्णानें चामड्यावरील केंस निघून जातात [बा उतरणी]

**उतरड, उतरंड, उतरण**—स्त्री १ खालीं मोठें व वर लहान अशा रीतीनें एकावर एक मडकीं, घट ठेवून केलेली रचना 'मनो रथाच्या उतरडी। उतरीसची।' –ज्ञा १३ ११४ 'नाचती गोकु ळींचीं मंदिरें। नाचत उतरडी दर्द्दरें।' –ह ५ ८० २ घोड्याचें एक वाईट लक्षण (कपाळावर एकावर एक असे तीन उलट भोंवरे असणें) **उतरंडीचा वाघ**-घरात शौर्य दाखविणारा भेकड मनुष्य **उतरंडी उतरणें**-दुसऱ्याच्या कामात ढवळाढवळ करणें म्ह० उतरडीला नमना दाणा पण दादला मगावा पाटील राणा [स उत्+तृ-सर्, उतर+हंडी]

**उतरड**—स्त्री १ ढाळ, उतार २ उसाच्या चरकातील नराचा आस ज्यात फिरतो तो आडवा दांडा, अडवन [स उत्+तृ]

**उतरण**—स्त्री १ उतार असलेली जमीन, उतरड, ढाळ म्ह० चढणीस घोडा उतरणीस रेडा २ उतार, उतरता रस्ता ३ (उत राय्यांतील) रस्त्यावरून वाहणारा वारा ४ धन-संपत्ति वगैरेस लाग लेली ओहोटी, कमी होत जाणें, अवनति, हीन स्थिति ५ (यंत्र) शिलिंड्रातलीं कांडी कडून अशी पातळी तिथवर धरतात (इ) इन्क्लाईंड प्लेन ६ पिकविण्याकरितां झाडावरून उतरलेलें आंब –न ज्या ठिकाणीं नदींतून पायानें चालत जाता येतें अशी जागा उतार [स उत्+तृ-उत्तरण]

**उतरणें**—अक्रि अग्निवर ठेवलेला, वस्त्र पदार्थ खाली आणणें, ठेवणें २ गुरुमाकार आदी वगैरे ठेवणें, खालीं रिकामे करणें भात वाढून ठेवणें (गाडींतून, घरातून) ३ खालीं आणणें, खालीं येण्यास मदत करणें ४ उंची कमी करणें, टेंगणें करणें ५ पलीकडे नेणें, पार करणें (नदींतून वगैरे) ६ उतरून घेणें, पाडून काढणें, नक्कल करणें, चित्र काढणें, छबी काढणें, प्रतिमा काढणें, 'चिंतून गणूच्या पाटीवरील उदाहरण उतरलें' नमुन्यावरहुकूम करणें, वृत्ति, हावभाव वगैरेंची नक्कल करणें 'तोंकण्याची नक्कल हा हुबेहूब उतरतो' ७ धारा, भाव, मागणी वगैरे कमी करणें, अल्प प्रमाण करणें, 'मना राचा झाला त्यांने शेतास पीक नाहीं असें पाडून धारे उतरले' ८ अपकर्ष करणें, दर्जा, हुद्दा योग्यता कमी करणें गर्व नाहींसा करणें (ताठेरा, इ० द्वारा) ९ तीव्रता कमी करणें, शांत करणें (विष, मादक पदार्थ वगैरेंची) १० नारळ, मीठ मोहऱ्या वगैरे पदार्थ अंगावरून ओवाळून टाकणें 'ज्यासी हृदयीं ध्याती पद्मनाभूनेंत्री। त्यावरोनि यशोदा उतरी दृष्टी।' –ह १३ १६१ येसूनाईनें कालमढूवरून एक कोंबडें उतरलें' ११नाक, कान, जीभ वगैरे अवयव कापून टाकणें, 'या खड्गें हें शिर उतरीं हा देह पडे द रणीं।' –विक २९ १२ (नदी, समुद्र इ०) पार जाणें, पलीकडे जाणें बहु दुस्तर विपद्दुराशि उतराया।' –मोकर्ण ७ २३ १३ अंगावरून काढणें (कपडे, दागिने वगैरे) १४ (उतरलें छपर, पडवी, सोपा वगैरे) तयार करणें, बाधून सिद्ध करणें १५ पाडून टाकणें (घराचा वरील भाग इ०) 'म्युनिसिपॅलिटीनें राम रावाचें घर पार उतरलें' १६ कापून टाकणें, साफ करणें (दाढी, मिशा वगैरे) १७ (पत्त्याच्या खेळात) पान टाकणें 'तुम्ही एका उतरा' १८ झाडावरून फळें वगैरे काढणें 'आम्हीं आमच्या आंब्यावरील आंब आज उतरले' १९ वरून खालीं येणें (घोडा, जिना वगैरे) [स उत्+तृ]

**उतरणें**—अक्रि १ (जिना, घाट, पर्वत वगैरेवरून) खालीं येणें उतरलें उदक पर्वत वळपें।' –ज्ञा १० ६९ 'पुण्याचा रस्ता वाई नजीक खानजादेच्या डोंगरावरून खालीं उतरत होता' –विवि १० १० २१७ २ दिसेल, माप भविष्य इत्यादि बरोबर असणें, पडणें, छाळा पडणें मूळावरहुकूम नक्कल तयार होणें 'आता प्रयत्नाराच्या म्हणण्याप्रमाणें भाषांतर उतरलें आहे' –विवि ८ ८ ८४ ३ मुक्काम करणें थांबणें वाहनावून खालीं येणें 'विद्यार्थीला गाडींतून उतरले' आपण सर इकडे बाहेरच्या देवळात उतरा आणि तुम्ही सड ठिकाण या' ४ धुंद, राग आणि ज्वर दर भाव इत्यादि कमी होणें ५ पाणीजणें, निर्जीव होणें निष्प्रभ जाणें म्लान होणें, सुकणें (चेहरा) 'कविता अधम सम स्वपितृमुखजत मुखप्रभा उतरे।' –मोआदि ९ ५७ उतरलें पाहोनि मंदिरावरून।' –दावि १० 'मग पौरुष्य दुर्योधनाग धनरायापुढें उभे मग तेव्हा त्याचें तोंड उत रलें होतें' ७ बयासीत होणें, प्रकृति खालावणें, वय गेलें होणें, शरीर, पुढें, मांस, मास ओस वगैरेंचा ताठर नाहींसा होणें ८ कष्ट वगैरे अधिकतेनें, अधिक दिसणें ९ अन्न वगैरे बरोबर शिजणें

तयार होणें १० योग्य रीतीनें बनणें, तयार होणें 'एक काहील भर रसाचा चार मण गूळ उतरला ' ११ व्याधि, रोग वगैरेंतून पार पडणें 'देवीतून दोन मुलें उतरलीं, एक दगावलें' १२ परीक्षेंत यश मिळविणें, उत्तीर्ण होणें, पास होणें 'आमचा रामा यदा परीक्षा चांगल्या रीतीनें उतरला ' १३ सर्गांतून पार पडणें 'तुम्हा जड भवार्णवीं उतरिता न दासा पडे।' –केका १०१ १४ विशिष्ट दिशेकडे वळणें 'महामारी तिकडे खानदेशांत उतरली' १५ मंत्रीं तून जाणें, नाखुषी होणें १६ मनास पटणें, योग्य वाटणें, पसंत होणें 'हें नाटक लोकांच्या पसंतीस उतरलें' –विवि ९ ८ १७१ १७ मोतीं वगैरेंचें छिद्र मोठें होणें, वेजी उतरणें १८ गरोदर स्त्री प्रसूतीपासून मोकळी होणें, हातींपायीं सुटणें १९ नाहींसें होणें, फिरणें 'तें सूतकें सुतक उतरे दोहींचेंही।' –एभा २१ १२५ २० (लहान मुलींच्या खेळाच्या प्रारंभीं) चक्कन पार पडणें २१ लागणें, उत्पन्न होणें 'जयाचिया दृष्टी उतरे।' –विपू २ १६ [स उत्तरण] **उतरून टाकणें**–१ तवल्यावरील वाया, सार वगैरे काढून टाकणें २ ओंवाळून टाकणें (आजारी माणसावरून खाद्य पदार्थ, प्राणी वगैरे) ३ (सामा) खालीं काढणें

**उतरता-तीं**—वि १ उतरण असलेला, उताराचा २ क्षीण होत चाललेला, अधोगतीस गेलेला, खालीं येणारा ३ अदृश्य होत असलेला मावळता 'उतरता दिवस' ४ क्रमानें खालीं येणारा ५ (गंजिफा पत्ते इ० खेळांत) दहिल्याचे मागें नवल्यानें, त्याच्या मागें आठ्यानें हुकूम व्हावे अशीं उतरतीं पानें चढती-**उतरती कमान**–स्त्री उत्कर्षावस्था व निकृष्टावस्था, उत्कर्ष, अपकर्ष वरेवाईट दिवस ०**पाया**–पु अवनत स्थिति, अव नति, अधोगति हीन स्थिति ०**कळा-दशा-पायरी**–स्त्री विपन्नावस्था ऱ्हास पावलेली स्थिति उच्चावस्था प्राप्त झाली कीं त्यावरोबरच उतरती कळा लागावयाची' –विवि ८ ९ १६१ **उतरत्या पायरीस लागणें**–ऱ्हास होत जाणें 'तो उतरत्या पायरीस लागला' ०**बाजु**–स्त्री १ उतरण उतरत येणारी बाजू याच्या उलट चढती बाजू २ दशावतारी गंजिफांतील परशरामा पासून पुढील पाच बाजू ०**भाजणी**–स्त्री (गणित) भारी परिमा णाच्या अंकास हलक्या परिमाणाचें रूप देणें, उदा-रुपयाचे आणे करणें वगैरे ०**वेळ**–खालीं जाणारा दिवस दोन प्रहर टळल्यानंतर सायंकाळपर्यंतचा काळ २ खालावलेली स्थिति वार्धक्याचा काळ ०**श्रेढी**–स्त्री (गणित) पदांची एक मालिका, यामध्यें संख्या क्रमाक्रमानें लहान होत जातात

**उतरपराई**—स्त्री (प्र) उत्तरपराई तारुण्यानंतरचा काळ, आयुष्याचा उत्तरार्ध [उत्तर+परार्ध उत्तर+पराई]

**उतरपेठ**—स्त्री (प्र) उतारपेठ मुख्य व्यापारी ठिकाण, व्यापाराचें जिन्नस ज्या ठिकाणीं अनेक ठिकाणांहून येऊन पुन्हां निरनिराळ्या ठिकाणीं पाठविले जातात अशी व्यापाराची जागा, (इं) मार्केट [उतार+पेठ]

**उतरल-ला**—दाराच्या चौकटीवरील कोनाडा [स उत्तर+ल प्रत्यय]

**उतरवट**—वि १ किंचित उतार असलेला, उतरण, उतरता (भूमिभाग) २ अधोगतीस लागलेला [उतार+वट प्रत्यय]

**उतरवटा**—पु उतार असलेली जमीन, उतरण, उतार

**उतरवण**—न उतार, उतरण, सखलपणा [उतार+वण प्रत्यय]

**उतरवणी**—स्त्री भाताची पेज, कांजी [उतरणें+वणी=पाणी, स वन=पाणी]

**उतरवाट**—स्त्री उतार असलेली वाट [उतार+वाट]

**उतरविणें**—सक्रि उतरणें प्रयोजक १ खालीं ओढणें, आणणें, खालीं यावयास लावणें उतरणें पहा 'तिरंदाजानें गलबतानें निशाण उतरावयाचा व किनाऱ्याकडे जावयाचा हुकुम सोडला' –कोरकि ९ २ (वडोदें) तयार करून घेणें, कातरणें 'सुपारी खरादी याजकडुन उतरविणें' –ऐरापुप्र ८ २७४

**उतरा**—पु पडण्याची, उतरण्याची क्रिया, पडणें 'नसता अधिमर्दि उतरा। नसतींच विघ्नें यती घरा।' –नव १४ १२६

**उतराई**—वि (कृपा, कर्ज, वचन इ०) उपकाराची फेड केलेला, ऋणमुक्त, कर्जफेड केली आहे असा 'होऊनियां उतराई। लया जाय।' –ज्ञा १५ ५८५ 'मी काय होऊं उतराई।। माझे सावळे कृष्णाबाई।।' –दु३४४० ०**होणें**–उपकार फेडणें 'गुरुसी उतराई होता। न देखों कवणियाही पदार्था।, –एरुस्व ५ ९० 'वर्णांचा उतराई व्हाया वधितों रिपुसि यापरता।' –मोकर्ण ४९ ६७ [स उत्तीर्ण, प्रा उत्तरिय]

**उतराई**—स्त्री १ गाडींतून माल उतरण्यास पडलेली मजुरी २ (हिं) नावेची जकात, भाडें ३ उतरून काढण्याची (नक्कल, चित्र, आत्र, वगैरेंची) मजुरी ४ (राजा) उतार वयाचे दिवस (लागणें, जडणें) [उतरणें, हिं उतराई]

**उतराण**—स्त्री (नाविक) उत्तरेकडून वाहणारा वारा उत रण पहा [स उत्तरायण]

**उतरायी**—उतराई पहा

**उतरावारा**—उत्तरेकडचा वारा (समुद्रावरून येणारा), उत राण

**उतरी**—स्त्री अंगवस्त्र, उपरणें, उत्तरीय 'धरवा मिरवे उतरी जाडा।।' –उषा १८४६ [स उत्तरीय प्रा उत्तरी]

**उतरींव**—वि खालीं पडू न देतां काढलेलीं (आंबे वगैरे फळें)

**उतरूनसर**—क्रिवि (गंजिफाचा खेळ) आपणाजवळ हुकूम असून त्या खालील एक पान नसतां त्या खालचें एक अगर अनेक पानें हुकूम करण्याकरितां आपला हुकूम व त्याच रंगाचें दुसरें कोणतें तरी पान अशी दोन पानें उतरणें

**उतव**—पु १ ( कों ) परसावर कावळें वगैरे सुकत घालण्या साठीं लहान मडपीसारख्या तीन चार काठ्या बांधून तयार करतात तो, माळी, मडपी २ (हेटकरी ) चुलीच्यावर स्वयंपाकाच्या वस्तू ठेवण्याची जागा [ स उत्+स्था, उत्थान, उत्थव ]

**उतव**—पु नदीस येणारा पहिला पूर, उथव [ उत् ]

**उतवडा**—पु. ( कृषि ) एकाच सरींत बाजरीबरोबर अवाडी, तूर, मूग, मटकी वगैरे धान्य मिसळून पेरणें [ का उतू =नागरणें ]

**उतवणी-णें**—स्त्री न आधणाचें पाणी, उकळी आलेलें पाणी [ स उत्तपन, किंवा उत्+वणी=पाणी ]

**उतवणें**—अक्रि १ पाणी वगैरेंना आधण येणें, बढ येणें [स उत्तपन ]

**उतविणें**—क्रि रेशमी वस्त्र, तापता वगैरे तापलेल्या खापरावर पसरून शस्त्रानें, सळईनें विवक्षित घड्या पाडणें उतू पहा [ हिं उतू=कापडाच्या घड्या, चूण, सिं उतु ]

**उतवेळुपणें**—क्रिवि उतावीळपणें ' तें उतवेळुपणें आळगिलें' —दाव १८९

**उतळ, उतळवट**—वि (प्र )उथळ, उथळवट पहा ' लक्षान लक्ष कनक पात्रें। उतळें विस्तीर्णे चित्रविचित्रें।' —वेसीस्व ११ ७८ [ स उत्+तल ]

**उतळणें**—अक्रि ( कों ) गदरणें, पिकण्याचीं लक्षणें दिसू लागणें, उजळणें ( पाडाला आंबा वगैरे ) [ स उत्+तड् ]

**उतळताप**—पु ( गो ) ( तापानें होणारा ) भडका, दाह, संताप [ स उत्+तड्+ताप ]

**उतळपातळ**—स्त्री गप्पा, वार्ता, ग्रौढी —वि अपुरें, थोडें, विरळ, तुरळक ( पाऊस, पिकें, इमारती, झाडें वगैरे ) [ पातळ द्वि ]

**उताट, उताटकी**—स्त्री १ फुटावयास, बाहेर पडावयास होणें २ (ल ) उतावळी, अविचार, अस्थिरता, हावरेपणा, वळवळ, चळवळ, फुळफुळ ( क्रि येणें ) [ स उत्+तट् ]

**उताटणें**—अक्रि ( कों ) १ तटकन फुटणें ( फळ ) आतून भरून आल्यामुळें फळाच्या बाहेरची साल फाटणें, तटतटून येणें, भरगच्च होणें २ (ल ) अतिशय औत्सुक्यपूर्ण होणें, प्रबल इच्छा होणें ३ गर्वानें ताठणें ' तो काय उताटलाय !' [ उताट ]

**उताडा**—पु पक्वावस्था, पूर्णावस्था तयार होणें ' उताडा पिकाचा आणियावरी। —यथार्थदी १८ ३०६७ [ उताट ]

**उताणगाट**—स्त्री १ उताणी पडलेली गाठ २ (ल ) तापट, उग्र माणुरी माणूस [ स उत्तान, प्रा उत्ताण, म उताणा+गाट ]

**उताणणें**—अक्रि वर्णन करणें, जाहीर प्रसिद्ध करणें ' उताणिला तुझी कीर्ति । उताण मने आम्हांं।' [ स उत्+स्तृ, उत्तान, प्रा उत्ताण ]

**उताणा**—वि १ वर तोंड केलेला, उलथा, पालथा, उपडा याच्या उलट (चीत मनुष्य, पात्र, पान इ०) २ (ल ) सुस्त, निरुद्योगी, ढिला [ स उत्तान ] ०**चालणें**—गर्वानें फुगणें, ताठणें छाती काढून, प्रौढीनें, आढ्यतेनें चालणें, ( गो ) उताणें पेवप 'तैसा विद्यावयसा माजे। उताणा चाले ॥' —ज्ञा १३ ७१५ ०**पडणें**— १ उताणा होऊन पडणें, तोंडघशीं पडणें, खालीं येणें ( श्रीमत, सावकार इ० नीं दिवाळें काढलें असता म्हणतात ) २ दरिद्री होणें, हीन स्थितीस येणें ३ आजारी होणें ४ रिकामें पडणें, निरुपयोगी होणें, पालथें पडणें याप्रमाणेंच (कुदळी, पात्र, भांडें इ० ) ५ अपयश पावणें, पराभूत होणें, कोणतेंहि काम अंगावर येणें ०**पाताणा**—क्रिवि खालींवर, उलथेपालथें, पोटावरून पाठीवर, गडबडा फिरवून अगदीं चीत ( क्रि० करणें, पाडणें, होणें ) [ उताणा द्वि ]

**उतान, उत्तान**—वि १ उताणा ' महीस पाडिला वगींद्र तो उतान कौतुकें ॥ '—नगरौरी (वसरकृत) ५९ २ आढ्यतेचा, गर्विष्ठ ' बहु फुरकदरासे बोल बोले उतानें।' —कृष्णकौतुक १५ [स उत्तान ]

**उतान-ना-पाताना-खाट**—उताणा वगैरे पहा

**उतानी-न्ही**—स्त्री इच्छा, आवड ' त्रीं निये ज्ञानीं । मुनी श्वरासी उतान्ही ।' —ज्ञा १३ १६६ [ स उत्+तृष्णा, प्रा तण्हा, म तहान ]

**उताप**—वि उन्हातील, सावली नसलेला, उघडा [स उत्+तप्]

**उतापती**—स्त्री उल्हट्न ह्न, फेर ह्ना [स उत्+पत्] ०**कांडे मारी**—स्त्री लाडगताड, मस्तल

**उतार**—पु १ पलीकडील तीरास चालत जाता येण्यासारखी पाण्यामधील वाट ' तो पव्हण्याहुनि पायउतारा ॥ ' —ज्ञा ५ १६७ २ एखाद्या औषधाची तीव्रता, जोर कमी करण्याकरिता दिलेलें औषध ३ विषावरील वगैरे औषध, मंत्र उपाय, इलाज प्रतिकार ' जेणें विष पानिरें दुर्धर । ताचि कर घाले उतार। '—ह १४ १६२ ४ सन्मान संताप दाखविण्याच्या वेळीं अंगावरील पाणग्रस्त अथवा दाविलें वस्त्रास दणें अंगावरील उतरून टाकणें ५ कमी होणें, आणगणें ( नदीचा पूर रागाचा तीव्रता दुःख वैभव, कीर्ति, संपत्ति वगैरे ) न्हास झाला दमन ६ जमिनीचा उतरतपणा, ढाळ, उतरण ७ चौघडयाच्या असरीस वाजविण्याची जम्नगति, वाजा ८ सोडीं, तर्री भांडें हातीतून पर्वत न्ताच्यानें भांडें, नार ० नदत उतार प्रवाचा अंग गिरिगेंं॥' —नारि ०० १० उतार, एका प्रवाचि दुसऱ्या प्रधान भाग ' त्यांची कराआण काहींना या उतार करता ।' —भाभुगागन ८९८ ११ पराक्रम हानी कमी सीमा कमी होणें ' परंतु त्यांचे शिंद यांनि युद्धीस उतार पडला ' —भाय ०० [ म उत्+तृ —उतार ] —वि

१ उतार वय होण्याच्या मार्गास लागलेला, वृद्धत्व आलेला २ हीन, हिणकस, दुय्यम प्रतीचा, चढ याच्या उलट ३ नाशाच्या पंथास लागलेला, मोडकळीस आलेला, ऱ्हास होण्याच्या मार्गास लागलेला, मंदीचा, तोटयांत चाललेला सामाशब्द–उतार रानें–पत्र पान–औषध–गोळी–पुडी–मात्रा– मोल –मोली–हाव–वाट–रग–काळ–चावडी–मंत्र–मार्ग मसलत–वेत ०खालीं असणें पडणें–अपकर्षास लागणें, निकृष्ट स्थिति प्राप्त होत जाणें, ओहोटी लागणें, उतरती कळा लागणें, मंदी येणें ०खालीं चालणें–गतिकर्मी करणें ०करी–करू–पु १ मुसाफर, प्रवासी, पांथस्थ, तात्पुरता मुक्काम करणारा–केलेला २ द्रव्य वगैरे देऊन नदीपार जाणारा ०घाट–पु नदीवरील पायऱ्यांचा रस्ता ०घात–पु (गो) विश्वासघात [उत्तर+घात] ०चढ–स्त्री १ खालीं वर होण्याची क्रिया, कमी अधिक होण्याची क्रिया (बाजार, माणूस वगैरेंची), क्षयवृद्धि, उत्कर्षापकर्ष २ एखाद्या प्रदेशाचा उंचसखलपणा ३ किंमतीमध्यें कमीजास्तपणा होणें, भावांत बदल ४ ताप कमीअधिक होणें ०चावडी–स्त्री १ रेल्वेतील पांथस्थ वगैरे जींत उतरतात ती चावडी, डाक–बंगला, धर्मशाळा २ (ल) पाहुणे उतरण्याची जागा, अतिथि घर ०चिठी–स्त्री १ जलमार्गावरून प्रवास करण्याचा परवाना २ नक्कल रद्द केलेलें खत–पत्र (पूर्वी वरील श्रीकार खोडून, फाडून खत रद्द करण्याची पद्धत असे) ३ विष वगैरे उतरावें म्हणून बांधलेली–मंतरलेली चिठी, कागद ४ कोणत्याहि लेखाची नक्कल ५ (धोंडें) वडतर्फीचा हुकूम ०जमीन–स्त्री सखल होत जाणारी जमीन, उतरण ०तसरीफ–स्त्री एखाद्याचा सन्मान करण्याकरितां स्वतःच्या अंगावरून काढून दिलेलीं वस्त्रें उतार अर्थ ४ पहा [अर तश्‌रीफ्=सन्मान बहुमानाचीं वस्त्रें देणें] ०तळ–पु माणसें, गाड्या उतरण्याची गांवाबाहेरील जागा, अड्डा, गाडीतळ, वाटेंतील मुक्कामाची जागा ०तेज–वि १ ज्याचें तेज कमी झालें आहे असा २ क्षीण, निस्तेज निःसत्त्व निःशक्त ०ताड–न ज्यापासून घाट उतरण्यास सुरवात होते ती डोंगरांतील जागा, उतरणीचा आरंभ ०दिवस–पु १ आयुष्याचे अखेरचे दिवस, वार्धक्य २ आपत्काळ ०पातार–वितार–पु १ सर्वसामान्य प्रवासखर्च २ तरीचें भाडें, वाहनाचें भाडें, उतार ३ मार्गावरील कर, जकात वगैरे ०पान–न १ (गंजीफा–पत्त्यातील खेळांत) खेळलेलें, खेळावयाचें पान २ हिशेब पुढें चालू केलेलें, करावयाचें पान ०पेठ–स्त्री १ ज्या ठिकाणीं निरनिराळ्या ठिकाणचा माल विकावयाकरितां येतो व खरेदी केला जातो असें शहर बंदर, व्यापारी शहर उतरपेठ पहा 'आचाराचें मूळ पीठ। वेदांची उतारपेठ।' –ज्ञा १७ २७४. २ उतारतळ पहा ०पोशाख–पु १ अंगावरून उतरून बक्षीस दिलेलीं वस्त्रें २ अंगावरून काढून टाकलेलीं जुनीं वस्त्रें उतार अर्थ ४ पहा [फा पोशाक्=वस्त्रें] ०बंद–पु ज्या कागदावर कोणत्याहि गोष्टींची नक्कल काढली आहे असा कागद –वि १ उतारावर असलेली, उताराची २ अपकर्षाप्रत जाणारी [फा बन्द्] ०बंदर–न १ जलमार्गावरील प्रवासी व माल उतरण्याचें ठिकाण २ जलमार्गांत लागणारें ओरखा करण्याचें–नांगर टाकण्याचें स्थान बंदर पहा [फा बंदर्] ०बाजी–स्त्री १ पत्त्याच्या डावांतील हरविल्यापासून झालेले पत्ते २ अंगावर येणारा, हार दर्शविणारा मेळ ३ घोड्याच्या शरीरास जलद वाजविण्याची गत, वाजा उतार अर्थ ७ पहा ०बाजू–स्त्री (पत्त्याच्या खेळांत) ज्या बाजूनें प्रथम पान खालीं टाकावयाचें, उतरावयाचें ती बाजू ०मणी, मोहरा–पु विष उतरविणारें रत्न ०मान–पु १ पाणउतारा, अपमान, अप्रतिष्ठा, अवहेलना २ वृद्धावस्था, आयुष्याची उत्तरावस्था –वि (व्यापक) अवमानित, अपमानित, मानखंडना केलेला ०माल–पु होडींतून पलीकडे पाठवावयाचा माल ०वय–न म्हातारपण, वृद्धावस्था [स उत्तरवय] ०वस्त्र–न १ जीर्णवस्त्र, फाटलेलें कपडें २ दुसऱ्यानें अंगावरून काढलेलीं किंवा टाकून दिलेलीं वस्त्रें 'उमदीं तरी ते उतार वस्त्रें। घालूं नये रे अंगावर।' –दावि ८३९ ०वेळ–स्त्री दोन प्रहर दिवस टळल्यावरची वेळ, संध्यासमय

**उतार**—न (गो) उत्तर पहा १ प्रतिध्वनि २ उत्तर, वचन 'त्येणें माका उतार दिलें'

**उतारा**—पु १ एखादी क्रिया करण्यानंतर उत्पन्न होणारें फळ, निष्पत्ति, पदार्थ, द्रव्य इ० अखेर परिणाम, राहिलेलें उत्पन्न 'पधरा शेर लोणी कढविलें त्याचा बारा शेर उतारा आला' २ जमा, मेळ, ताळा (निरनिराळीं मापें वगैरेंचा) ३ अंगावरून ओवाळून काढलेला पदार्थ (भूतबाधा निवारणार्थ) व ती क्रिया 'ज्या महद्भुत संचरलें अंगीं। त्यासि पंचाक्षरी नसे जगीं। भगवत भेटी वांचून वेगीं। उतारा त्यासी असेचिना॥' –ए ८१ ५८ 'त्वरित उतारे करून देती लोह उडीद डोंबाळ।' –एपो ३०७ (क्रि० करणें) ४ विष वगैरेवरील औषधें, उपाय, इलाज, रोगउपशम ५ एखादा उखाणा कोडें याचें उत्तर, किल्ली ६ रचना, धाटी व सदृश शब्द असलेलें परंतु विरुद्ध अर्थी श्लोक, पद्य वगैरे, किंवा समानार्थक परंतु भिन्न शब्द व रचना असलेलें पद्य ७ नक्कल, प्रत, प्रतिमा, उतरून घेतलेला ग्रंथाचा किंवा भाषणाचा भाग (क्रि० करणें) ८ तरीचें भाडें ९ नदी वगैरेंतून पार जाण्याजोगा रस्ता उतार अर्थ १ पहा १० पाणउतारा याचा संक्षेप, अपमान, अप्रतिष्ठा, मानहानि ११ अंगावरून काढून टाकलेलीं वस्त्रें, जीर्ण वस्त्रें, अगर सन्मानाकरितां अंगावरून काढून दिलेलीं वस्त्रें १२ झाडांवरील फळें उतरण्याकरितां द्यावयाची मजुरी, उतरणावळ १३ हुंडी वगैरे कागदपत्राची नक्कल उतरून घ्यावयाची वही १४ वडतर्फी उतार पहा

**उताराबाग**—क्रिवि (व) उताराच्या अनुरोधानें [उतार+बाजू?]

**उत्कळ**—स्त्री उत्कठा, उतावीळ, अधीरपणा उत्कलिका पहा [स उत्+कल्]

**उत्कळित**—न युद्ध कलह 'उदयेंसे जे उत्कळित ।' –ज्ञा १८ १६२७ [स उत्+कट्]

**उत्काडे**—क्रिवि (गो) परसाकडे [का उक्कड=गावाची कड]

**उत्कीरक**—पु ओरखडणाऱ्या पक्ष्याचा एक वर्ग, या पक्ष्याना अगुलीस तीक्ष्ण नख्या असतात व त्यायोगें त्यास ओरखडता येतें –प्राणिमो ६० [स उत्+कॄ]

**उत्कीलन**—न १ गुतागुत सोडवणें, मोकळें करण २ (बध नापासून) मोकळें करणें, सोडविणें, सोडणें ३ फुलणें, उमलणें, पसरणें, उघडणें, विस्तृत करणें [स उत् +कील्]

**उत्कुण**—पु (हिं) ढेकूण [स मत्कुण]

**उत्कृष्ट**—वि १ अत्यत सुदर चागलें, फार उत्तम नामी, २ अत्युत्कट 'मनुष्यानें उत्कृष्ट उडी मारिली तर पाच हात मारील, आणिक किती मारील!' [स उत्+कृष्]

**उत्क्रम**—पु १ उलटी व्यवस्था, क्रम, पद्धत, व्युत्क्रम २ (ल) अव्यवस्था, अनियमितता, पद्धतशीरपणाचा अभाव [स]

**उत्क्रमण**—न खालून वर जाणें, बाहेर निघणें, पडणें, उडणें, वर चढणें, निघून जाणें उ० प्राणोत्क्रमण=मरण 'कीं विर्बी ऐक्य पण। तेंचि ज्ञानियाच्या चिदशाचें उत्क्रमण।' –यथादी ३ ७६० [स उत्+क्रम्]

**उत्क्रात**—वि उत्क्रमण केलेला, वर किंवा बाहेर चाललेला निघून गेलेला वर उडून चाललेला [स] ०**मति**–वि व्यापक बुद्धीचा ज्ञानी –स्त्री व्यापक अफाट बुद्धि 'नाहीं पाठ गुरु भक्ती। परी गा उत्क्रातमती।'–ज्ञा १३ ४५१ [स उत्+कम्–क्रान्त]

**उत्क्राति**—स्त्री १ ऊर्ध्वगति, मरण २ (सुर्कीनें सध्या रूढ) विकास उन्नति (इ) इव्होल्यूशन [स] ०**धेनु**–स्त्री मरणसमयीं सुखानें मृत्यु यावा व पापक्षालन व्हावें म्हणून ब्राह्मणास अर्पण केलेली गाय [स] ०**वाद**–पु विकासवाद, मूळ द्रव्यातील शक्तीची क्रमाक्रमानें वाढ झालेली आहे व हा पूर्वापरक्रम किंवा सरणी सोडून मध्येंच उपटसुळासारखें कांहीं निर्माण झालें नाहीं असें मत –गीर १६८ [स उत्+क्रम्–क्रान्ति]

**उत्क्वथनाक**—पु (वाफ) द्रवरूप पदार्थाचें वायूत रूपातर होण्याचें उष्णमान (इ) बॉयलिंग पॉइट [स उत्+क्वथन+अक]

**उत्खती**—स्त्री स्वामाचा एक प्रकार –अश्वप १८५

**उत्खात**-वि उखडलेला, नष्ट केलेला नायनाट केलेला मुळा सकट उपटलेला, खणलेला [स उत्+खन्]

**उत्छाह**—पु उत्साव उत्साह पहा 'श्रीरामनौमी उत्छाह आला।' –दावि १४

**उत्तप**—वि उघडा, प्रकाश असलेला, मोकळा, छायारहित, सर्वदा सूर्यकिरणानीं तापत असणारा –न उघडी व पूर्ण प्रकाश असणारी अशी जागा [स उत्+तप्]

**उत्तप्त**—वि अतिशय तापलेलें [स]

**उत्तंभित**—वि १वर उचललेलें,सरळ उभें केलेलें २ पुढें आलेलें, उन्नत (स्त्रियाचे स्तन). ३ उभारलेले, वर केलेले (कान) [स उत्+स्तभित]

**उत्तम**—वि १ अतिशय चागलें, उत्कृष्ट २ प्रथम, मुख्य वरिष्ठ ०**खर्ग**–न (व) हातघाई निकर 'तेव्हाच उत्तमखर्गावर यतो' [खर्न १] ०**गति**–स्त्री १ मोक्ष, निर्वाणपदप्राप्ति २ चागलें मरण (क्षेत्र, तीर्थ वगैरे ठिकाणीं), शुभकालीं मरण येणें ३ चागली प्रगति (शास्त्र वगैरेमध्यें) ०**द्रव्य**–न १ (धर्मशास्त्र) उच्च वर्णाचें (चारलेलें) धन, सपत्ति २ सुवासिक औषधी पदार्थ ०**पुरुष**–पु १ चागला, श्रेष्ठ पुरुष, परमेश्वर, पुरुषोत्तम (व्याक रण) प्रथम पुरुष ०**श्लोक**–वि पुण्यकीर्ति, विख्यात, कीर्ति पसर लेली आह असा, पुण्य श्लोक ०**साहस**–न (धर्म शास्त्र) १ सर्वात मोठा दड, १००० किंवा १०८० पण २ देहातशिक्षा, सर्वात मोठी शिक्षा, (डाग देणें हद्दपारी, मालमत्तेची जप्ती, अवयवच्छेदन व मृत्यु या मुख्य शिक्षा होत) ३ देहातशासनार्ह गुन्हा, सर्वात मोठा गुन्हा ४ अतिशय कष्टाचें कार्य अत्यत धाडसाचें काम

**उत्तमर्ण**—पु १ धनको सावकार याच्या उलट अधमर्ण २ पेढीवाला, हुडीवाला [स उत्तम+ऋण]

**उत्तमाग**—न डोकें, मस्तक 'इयें उत्तमार्गीं होतीं फुडीं।' –ज्ञा ११ ४१८ [स उत्तम+अग]

**उत्तमोत्तम**—वि अतिशय उत्तम, उत्कृष्ट, फारच चागला [स उत्तम द्वि]

**उत्तर**—न १ प्रतिवचन, जबाब 'तो किमपि न दे उत्तर उत्तरदिगेसि सोडूनी।' –मोविराट ३ ५९ २ वाक्यरूप, पदरूप शब्द भाषण 'मी एक उत्तरही बोललों नाहीं आणि हा मला उगीच शिव्या देतो', 'उत्तरास प्रत्युत्तर करतो' 'उणें उत्तरानें बोलणें' ३ (वायकी) गाणें किंवा एखादा हलका प्रबध यातील एक कवार घोकावयाजोगा लहान लहान विभाग असतात त्यापैकीं प्रत्येक 'साठा उत्तराची कहाणी पाचा उत्तरी सुफळ सपूर्ण' ४ (गणित) गणितश्रेढींत ज्या अतरानें सख्या एकापुढें एक चढत किंवा उतरत जातात तें अतर, दोन पदातील अतर ५ (कायदा) प्रतिवादीचा वादीस जबाव, समथन, साक्षी वगैरेंचा जबाव हाचे चार प्रकार आहेत–असदिग्ध (स्पष्ट) अनाकुल (सुसबद्ध) अन्याख्यागम्य (सुबोध–सुलभ) न्याय्य (योग्य) प्रतिवादीच्या उत्तराचे चार प्रकार आहेत–सत्योत्तर (कबुली जबाब) मिथ्योत्तर (नाकबुली) कारणोत्तर (कबूल करून त्यास कारण दाखविणें), प्राङ्न्यायोत्तर

(पुरींच वादीविरुद्ध न्याय झाला आहे असा जबाब) ६ उलट जबाब, हाजीर जबाब —स्त्री ७ दक्षिणेच्या समोरची दिशा 'पूर्वेकडे तोंड करून उभें राहिलें असता डाव्या हाताकडची उत्तर दिशा '—न ८ उदाहरणाचें इष्ट फल —पु ९ एक अलंकार, जेव्हा वक्ता प्रश्नोत्तरासह आपल्या मनातील भाव, वृत्ति व्यक्त करतो तेव्हा हा अलंकार होतो यात विचारलेले प्रश्न किंवा उत्तरें अनुमानिता येतात उ० 'हस्तिदंत व्याघ्रचर्म कैसे येथ मिळे तुला। सुनेचे जोंवरी रम्य विलास दिसती मुला '॥ यावरून प्रश्न तर्किता येतो व 'काय कठिन ? दैवगती, सुख काय ? प्रेमळा अशी पत्नी ॥' यात प्रश्न आणि उत्तर हीं दोन्हीं आहेत —न १० अग्रहार इनाम जमीन, मालकीची जमीन समासात उत्तरपदीं जसें—देवोत्तर, ब्रह्मोत्तर 'ब्रम्होत्तरतें ब्राह्मणीं दिन्हलें' —शके ११२८ चा पाटणशिलालेख —पु ११ उंबरठा 'कातान्येंकातील। उत्तर जडीला।' —स्त्रीगीतमाला २० —वि १ पेक्षा अधिक, जास्त याअर्थी— एकोत्तर, एकोत्रा, तिहोत्रा, चोहोत्रा, पचहोत्रा, पचोत्तरशत, क्रोशोत्तर योजन, अंगुलोत्तरहस्त २ पुढील, नंतरचा, दुसरा, पूर्वेच्या उलट, दूरचा याअर्थी—उत्तरार्ध, उत्तरश्लोक, उत्तरराज ३ श्रेष्ठ, वरचढ, अधिक चांगला, याअर्थी— राजोत्तरप्रधान, नरोत्तरनारी, गुरूत्तरशिष्य, स्वाम्युत्तर सेवक, शास्त्रोत्तर वेद, ज्ञानोत्तर भक्ति ४ नंतरचा, याअर्थी—उत्तर काळ, उत्तर व्यथा यातना—व्यय—आयुष्य—वय. —शअ नंतर, मागाहून उ० इतउत्तर, तदुत्तर 'ज्येष्ठोत्तर लग्नें होत नाहींत' [स उत्तर] ०अक्षांश—पु जीं स्थळें विषुववृत्ताच्या उत्तरेस असतात त्यांचे अक्षांश ०कथा भाग—स्त्रीपु एखाद्या गोष्टीचा, व्याख्यानाचा शेवटचा भाग, उपसंहार ०कदंब—न (ज्यो) क्रांतिवृत्ताचें उत्तरेकडील केंद्र ०कर्म—कार्य—क्रिया—नस्त्री और्ध्वदेहिक, प्रेतसंस्कार 'मागें उत्तरकार्यें मी आपल्या हातून आटोपणार '—विवि १४ १० २१९ ०काल—पु १ भविष्यकाळ २ मृत्युकाळ, अखेरचे दिवस, वृद्धावस्था ३ नंतरचा, मागाहूनचा पुढील काळ ०कुरु—पु १ पृथ्वीच्या नवखंडांपैकीं एक खंड, उत्तरेकडील, उत्तरध्रुवाजवळचा प्रदेश २ उत्तरध्रुववृत्त ०कोन—पु उत्तरेकडील कोपरा, दिशा ०खंड—न १ आर्यावर्त, उत्तर देश पहा २ पुढील, उत्तर भाग (ग्रंथ, प्रदेश, शहर वगैरेंचा) ०गति—स्त्री १ सुटका, मुक्तता २ मोक्ष ०गोल—पु क्रांतिवृत्ताचा उत्तरकडील भाग यात मेषापासून कन्येपर्यंतच्या राशींचा अंतर्भाव होतो ०गोलार्ध—पु भूमध्यवृत्तानें पृथ्वीचे दोन भाग पडतात त्यांपैकीं उत्तरेकडील भाग ०ज्या—स्त्री (गणित) त्रिज्येंतून भुजज्या वजा केली असतां येणारें अंतर, धनु व ज्या यांची मध्यरेषा (इं) व्हर्सेड् साईन ०दशा—स्त्री १ पुढें येणारी स्थिति, नंतरची स्थिति २ उतार वय, वार्धक्य ०दिवस—पु १ पुढील दिवस, नंतरचा दिवस २ उद्याचा दिवस, भविष्यकाळ 'पूर्व दिवस गेला, उत्तर दिवस कसा येईल सांगा येथो ' ०देश—पु आर्यावर्त, उत्तरेस हिमालया पर्यंत व दक्षिणेस विंध्य पर्वतापर्यंत आणि पूर्व—पश्चिम दिशास समुद्रानीं मर्यादित असलेला प्रदेश ०ध्रुव—पु १ उत्तर ध्रुवाचा तारा २ पृथ्वीचा सर्वांत उत्तरेकडील बिंदु ०ध्रुववृत्त—न उत्तरध्रुवबिंदूपासून २३॥ अंशावरून जें अक्षवृत्त जातें तें ०पंथ—पु १ संसारापासून विरक्त होऊन परलोकसाधनार्थ तीर्थयात्रा, अरण्यवास, तपश्चर्या इत्यादि करावें म्हणून अवलंबन करावयाचा मार्ग 'श्रीपाद श्रीवल्लभ नाम ऐसें। झाले त्रिमूर्ति ऐसे। पितयातें म्हणतसे। जाऊं उत्तरपथासि ॥' —गुच ५ ५६ २ हिमालयात बद्रिकाश्रमाजवळ एक स्थान आहे तें हा मार्ग स्वर्गाकडे जातो व मानवास तो दुर्लंघ्य आहे अशी समजूत आहे यावरून ०पंथास लागणें—मरणोन्मुख होणें ०पंथी सरदार—शिंदे होळकर कारण पेशवाईत हे उत्तरेकडे असत —ख ३२४१ ०पद—न (व्या) समासातील दुसरें शेवटचें पद ०पराई, पन्हाई—स्त्री उतार वय, वृध्दावस्था ०पक्ष—पु (कायदा) प्रतिवादी, त्याची बाजू २ (भांडणतंट्यात) विरुद्ध बाजू व तिचे जबाब—समर्थन, आरोपाचें निरसन, खंडन, पूर्वपक्ष याच्या उलट ३ (न्याय—तर्क) उपप्रमेय, गौणप्रमेय, उपनय (प्रतिज्ञा, हेतु, उदाहरण, उपनय व निगमन या न्यायशास्त्राच्या पांच अंगांपैकीं चोथें) ४ महिन्यातील दुसरा पंधरवडा, कृष्णपक्ष, वद्यपक्ष ५ (सामा) प्रत्युत्तर, पूर्वपक्षखंडन, शंकाचें समाधान ०पालवी—स्त्री (कों) ज्या ठिकाणाहून उत्तरेकडील भाग दूरवर दिसत आहे व दक्षिणेकडील बाजू टेंकडी झाडें वगैरेंनीं संरक्षित आहे अशी जागा, उत्तराभिमुख अशी, दक्षिण पालवीच्या उलट ०पूजा—स्त्री १ पूजेचा शेवटचा भाग २ एखाद्या तात्पुरत्या स्थापन केलेल्या देवतेचे विसर्जन करतेवेळीं करावयाची पूजा, विसर्जनविधि ०प्रत्युत्तर—न उत्तरावर पुन्हा उत्तर, जबाब, याप्रमाणें चाललेला वाद, वाद—प्रतिवाद ०भाग—पु पुढील, दुसरा भाग ०भोजन—न. रात्रीचें जेवण 'उत्तर भोजन अगत्य करावें '—सप्र १५ २ ०मात्रां—त्रीं क्रिवि प्रत्येक शब्दागणिक, प्रतिक्षणीं, प्रतिव्यवहारी 'तुला उत्तरमात्रा शिकविलें पाहिजे '—शाको ०मीमांसा—स्त्री बादरायणाचीं ब्रह्मसूत्रें षड्दर्शनातील एक दर्शन, वेदांत ०राग, रागिणी—पु स्त्री उत्तररात्रीं (रात्र संपावयाच्या वेळीं) गावयाचे मालकौंस वगैरे, सोहनी इत्यादि राग, रागिणी ०रात्र—स्त्री मध्यरात्रीनंतरचा काल, विभाग, पहाटेचा कालभाग; मध्यरात्र व सूर्योदय यामधील वेळ ०लोक—पु वरचा लोक, देव, ऋषि व साधू यांचें निवासस्थान ०वय—न वृद्धावस्था; म्हातारपण, उतरवराई ०वयस्क—वि वृद्ध, म्हातारा, वयातीत ०वादी—पु (कायदा) प्रतिवादी ०वेंठ—स्त्री उतारपेठ पहा 'कीं धर्मांची उत्तरवेंट। कीं सिद्धीची ओळखवट '—ज्ञ ११ 'तें यमताचें मूळ पीठ। कीं परिमळाची उत्तरवेंट।' —शिशु ६१६. ०वेदी—स्त्री यज्ञामध्यें ज्या वेदीवर मुख्य सोमादि द्रव्याचें हवन होतें ती वेदी

०व्यवस्था-स्त्री १ भविष्यकाळची तजवीज, पुढील तरतूद २ मृत्युपत्र ३ उत्तरक्रिया, और्ध्वदेहिक क्रिया त्यासंबंधी तजवीज ०संगीतपद्धति-स्त्री हिंदुस्थानी संगीतपद्धति ०साक्षी-पु प्रतिवादीपक्षातर्फे आलेला साक्षीदार ०हीन-वि निरुत्तर, उत्तर देतां येत नाहीं असा

**उत्तरण**—न १ उतरणें, वरून खालीं येणें २ नदीच्या पलीकडे जाणें, नदी ओलांडणें, पैलतीरीं जाणें [स]

**उत्तरणें**—अक्रि उत्तर देणें 'चंद्रिका खालच्या मानें उत्तरली.' –निचं ९ [उत्तर]

**उत्तरत्र**—क्रिवि १ नंतर, मागाहून, पुढें २ पलीकडे ३ भविष्यकाळात [स]

**उत्तरा**—स्त्री १ बारावें नक्षत्र, उत्तराफाल्गुनी २ उत्तर दिशा

**उत्तरांग**—पु १ शेवटचा भाग, अंग, उपसंहार, कोणत्याहि कामाच्या प्रधानभागानंतरचा भाग 'पूर्वांग पुरवलें, उत्तरांग उरवत नाहीं' २ (संगीत) रागाच्या प, ध, नी, सा, ह्या चार स्वरांचा समुदाय [स उत्तर+अंग] ०वादीराग-पु (संगीत) ज्या रागाचा वादी स्वर त्याच्या उत्तरांगामध्यें असतो असा राग ह्या वर्गांत येणाऱ्या रागाचा गानसमय रात्रीं बारा वाजल्यापासून दिवसाचे बारावाजेपर्यंत असतो

**उत्तराण**—उतरण, उतराण पहा

**उत्तराणी**—पु आषाडा [का उत्तरणी]

**उत्तराधिकारी**—पु. वारस, मनुष्याच्या मृत्यूनंतर त्याच्या जिंदगीचें स्वामित्व ज्याच्याकडे जातें तो [स]

**उत्तराफ(फा)ल्गुनी**—स्त्री बारावें नक्षत्र, उत्तरा [स]

**उत्तराभाद्रपदा**—स्त्री सव्वीसावें नक्षत्र [स]

**उत्तराभास**—पु (कायदा) अप्रस्तुत, असंबद्ध, टाळाटाळीनें दिलेलें उत्तर, खोटा जाब [स उत्तर+आभास]

**उत्तराभिमुख**—वि ज्याचें तोंड उत्तरेकडे आहे असा 'बाहेरी पद्मासन रचुनी। उत्तराभिमुख बैसोनि ॥' –ज्ञा ८ ९२ [स]

**उत्तरायण**—न (ज्यो) सूर्य किंवा इतर ग्रहनक्षत्रें यांचें उत्तरेकडे जाणें, दुसरें अयन, हा अयनकाल, मकरवृत्तापासून कर्कवृत्तापर्यंत सूर्याच्या गतीस जो सहा महिन्यांचा काळ (डिसेंबर २२ ते जून २२ किंवा माघ ते आषाढ) लागतो तो 'आणि सामासामाजीं माघु। उत्तरायण ॥' –ज्ञा ८ २२० [स उत्तर+अयन] ०पात, बिंदु-पु क्रांतिवृत्तापासून फिरणारा सूर्य ज्या संपातातून विषुवाचे उत्तरेस जातो तो पात किंवा बिंदु, वसंतसंपात, याच्या उलट दक्षिणायनपात किंवा शारदसंपात ०मार्ग-पु १ सूर्य मकरवृत्तापासून कर्कवृत्ताकडे जातो तो क्रांतिवृत्तातील मार्ग २ ब्रह्मलोकाचा मार्ग अर्चिरादि मार्ग पहा

**उत्तरारणी**—स्त्री अभिमंथन करण्याची वरची अरणी खालचीस अधरारणी म्हणतात [स उत्तर+अरणी]

**उत्तरार्ध**—पु दोन अर्धांतील दुसरा अर्ध, ग्रंथादिकाचे जे दोन भाग त्यांतील दुसरा भाग [स उत्तर+अर्ध]

**उत्तरावस्था**—स्त्री अखेरची अवस्था, वार्धक्य, ऱ्हास, नाश 'क्षीणपणाचा सुमुहूर्त। काळ आरंभ करी जेथ। ते हे उत्तरावस्था येथ।' –एभा २२ ५२४ [स उत्तर+अवस्था]

**उत्तराषाढा**—स्त्री एकविसावें नक्षत्र [स]

**उत्तरी**—स्त्री १ उत्तरक्रिया करतेसमयीं गळ्यांत जानव्यासारखें एक फडकें बांधतात तें २ अंगवस्त्र, उपरणें, ओढणी, उत्तरीय 'तिनें फाडून। आभरणें टाकिलीं बांधोनि' ३ स्नानसंध्यादि कर्मसमयीं उत्तरीयवस्त्र रामनामांकित पंचासारखें कोणी गळ्यांत घालतात तीं [स उत्तरीय]

**उत्तरीय**—न १ उपरणें, ओढणी, शेला, उपवस्त्र, अंगवस्त्र 'बहु विस्मित नृप मुनि सुर म्हणती उडवूनि उत्तरीयातें ॥' –मोभीष्म १२ १४ 'स्व उत्तरीयावर त्या समाजीं। वाळोनिया चाप त्यास मार्जी ॥' २ उत्तरी पहा [सं]

**उत्तरेकडील ढोंग**—(गति) तोतया (सदाशिवराव भाऊसाहेब) चें सांकेतिक नांव –खरे १०२६

**उत्तरोत्तर**—क्रिवि १ हळुहळु, दिवसानुदिवस, क्रमाक्रमानें, पुढें पुढें 'उत्तरोत्तर विद्या कमी होत चालली' २ अधिकाधिक 'ऐसा हा उत्तरोत्तर। ज्ञानबीजाचा विस्तार॥' –ज्ञा ४ १९२ [स उत्तरद्वि]

**उत्तंस**—वि भूषण, अलंकार, तुरा सामासशब्द–कुलोत्तंस=कुळाला भूषण, राजोत्तंस=राजश्रेष्ठ [स उत्+तंस्=शोभविणें]

**उत्तान**—वि १ उताणा, ताड वर केलेला २ उथळ ३ सरळ, स्पष्ट, गूढ नव्हे असा (श्लोकार्थ, अभिप्राय इ०) [स] ०चरण-पु उत्तानपाद याचा प्रतिशब्द, ध्रुवाचा बाप 'आणि उत्तानचरणाचिया बाळा ॥' –ज्ञा ११ १०२ ०कूर्मासन-न कुक्कुटासन घालून दोन्ही हाताची मिठी मानेंत घातली असता होणारें आसन –संयोग ३४४ ०मंडूकासन-न बेडकाप्रमाणें केलेलें आसन –संयोग ३३८ ०वंचित(संयुतहस्त)-न (नृत्य) कोंपरें व खांदे थोडे वाकडे करून दोन्ही हात निपताक करणें, मग त्याच तळहात तिरकस दिसतील अशा रीतीनें ते ठेवणें

**उत्तानार्थ**—पु १ सरळ, सहज समजणारा अर्थ, सोपा अर्थ –वि २ गूढ नसलेला, उघड, स्पष्ट (अर्थ इ०) [स उत्तान+अर्थ]

**उत्ताप**—न उजेडाची व उघडी जागा –वि उघडी, उजेडाची, छायारहित मोकळी, उन्हाची (जागा) [स उत्+ताप]

**उत्तीर्ण**—वि १ उतरून पार गेलेला (नदी, घाट, संकट इ०), कार्यातून पार पडलेला 'जें शतमखोत्तीर्णवरा। आरूढोनि असे॥' –ज्ञा १० २४० २ पास झालेला (परीक्षेत), जय मिळालेला, विजयी 'उत्तीर्ण होण्यास अवश्यक गुणसंख्या एकंदरींत शेंकडा ६०' –कलावंत खातें ४८ ३ उतराई, ऋणमुक्त

'देहूनि मन उत्तीर्ण । जालीं आजी ।' –ज्ञा १६ ३३ 'परम सात्त्विक ब्राह्मण । रुक्मिणी धरी त्याचे चरण । म्हणे जरी कृष्ण येशील घेऊन । तरी मी उत्तीर्ण नव्हे तूतें ॥' –ह २३ ८५ 'त्वा केलें उपकारासी । उत्तीर्ण नव्हे वंशोवंशीं ॥' –गुच ३० ६ [स ] **०होणें**–१ विजयी होणें, पास होणें २ मरणें 'तेथ उत्तीर्ण होईल प्राणें ॥'–ज्ञा १ २०२ ३ उतराई होणें 'उपासनेचें उत्तीर्ण व्हावें ।' –दा १५ १० ३३ **०ता–त्व**–स्त्री न ऋणमुक्त होणें, कर्जाची फेड 'मी आपुलियाचि उत्तीर्णत्वालागीं ।'–ज्ञा ८ १२१ 'आलीं मुखावाटे अमृतवचनें । उत्तीर्णता येणें नव्हे जन्में ॥'–तुगा २१८७ [स ]

**उत्तुंग**—वि फार उच [स ]

**उत्तू**—उतु पहा

**उत्तेजक**—वि चेतना, उत्तेजन देणारें, हुरूप आणणारें, प्रोत्साहक, चेव, क्षोभ, कोप आणणारें, हुषारी, तरतरी देणारें (भाषण, पेय, प्रसंग इ०) [स उत्+तिज्=तीक्ष्ण करणें] **०पदार्थ**–पु तरतरी, हुशारी आणणारे पदार्थ, द्रव्य (चहा, कॉफी, दारू इ०)

**उत्तेजन**—न १ उत्थान, जागृति, चेतना, प्रोत्साहन, उद्दीपन, स्फूर्ति, आवेश, चेव, क्षोभ येणें २ प्रलोभन, आकर्षण, उत्थानसाधन [स ]

**उत्तेजित**—वि १ उत्तेजन दिलेला, आवेश, चेतना आणलेला, हुरूप, स्फूर्ति मिळालेला २ प्रवर्तित, प्रवर्धित, गतिवाढविणारा [स ]

**उत्था**—स्त्री उत्पत्ति, जन्म, उठावणी, समासात उपयोग उ० –मायोत्थगसार (मायेपासून ज्याची उत्था झाली आहे तो), ज्वरोत्थ, अज्ञानोत्थ [स उत्+स्था, उत्थ=उत्पन्न ]

**उत्थान**—न १ उभें राहणें, उठणें २ उदय पुनरुत्थान=पुन्हां उठणें [स ]

**उत्थापक**—वि १ उभा करणारा, संस्थापन करणारा, प्रवृत्त करणारा, संस्थापक, उत्पादक २ उठविणारा उत्थापन पहा [स उत्+स्था, उत्था, उत्थापक]

**उत्थापणें**—उक्रि स्थानभ्रष्ट करणें, उठवून लावणें या व इतर अर्थी उत्थापन पहा 'असुर सुरां ते उत्थापिती । ते गान्हाणें हरिसी देती । इंद्र चंद्र प्रजापती । तेही चरफडती हरिपदा ॥'–एरुस्व १ ७९ [स उत्थापय् ]

**उत्थापन**—न १ उठविणें, उभें करणें २ (ल ) मांडवपरतणी आणणें ३ देव, मूर्ति इ०चें विसर्जन करणें, देवत्थापन ४ उत्तेजन, उत्पत्ती ५ गादी सोडून, स्वागतार्थ उभें राहणें, सामोरें जाणें (क्रि० देणें, घेणें) ६ उठविणें, समुत्थान, स्थानभ्रष्ट करणें काढून टाकणें (राज्य, नोकरी इ०तून) उत्थापनें पहा ७ (गणित) गुणाकार पदापैकी दुसरें पद, अंकाखाली अंक लिहून उत्तरी टेणें, भागणें [स ]

**उत्थापित**—वि १ उभा राहिलेला, उभारलेला, उठविलेला, स्थापलेला, कायम केलेला २ काढून टाकलेला, दूर केलेला [स.]

**उत्थित**—वि उठलेला, उभा राहिलेला, वर आलेला [स ] **०पद्मासन**–न पद्मासन घालून नंतर दोन्ही हात व हाताचीं बोटें साफ उघडून जमिनीवर टेकून, हाताच्या बोटांवर व तळहातावर सर्व भार देऊन आसन उचलून धरण्याची क्रिया – संयोग ३१८

**उत्थिति**—स्त्री १ उत्थान, उभें राहणें, वर येणें २ उभें राहण्याची, वर येण्याची स्थिति, उत्थितपणा [स ]

**उत्थितोर्ध्वपद्मासन**—न शीर्षासन करून उभ्या पायाची हळू हळू एकेक मांडी घालून तशाच स्थितींत पद्मासन करणें, यानें मान, डोकें, कोपर यांवर ताण बसतो व टोकशाचे पाटरे झालेले वेग काळे होतात संयोग ३४० [स उत्थित+ऊर्ध्व+पद्मासन ]

**उत्पत्ति**—१ स्त्री जन्म, संभव, उद्भव २ प्रादुर्भाव, उत्थान, उदय सामासशब्द–बीजोत्पत्ति, रोगोत्पत्ति म्हु० एकाचि उत्पत्ति तीच दुसऱ्याची आपत्ति, उत्पत्ति, स्थिति व संहार (लय) या तीन अवस्था प्रत्येक प्राण्याला असतात ब्रह्मा, विष्णु व महेश (शिव) या अनुक्रमें वरील तीन अवस्थांच्या अधिष्ठात्री देवता आहेत [स उत्+पद् ]

**उत्पन्न**—वि जन्मलेलें, उत्पत्ति पावलेलें, उद्भूत, तयार झालेलें –न १ फल, मिळकत, प्राप्ति (शेतकी, नोकरी, धंदा, व्यवसाय यापासून) २ नफा, खर्च वजा जाऊन शिल्लक, लाभ ३ मूळ ठिकाण, मूळ कारण [स उत्+पद्–पन्न] **उत्पन्नास येणें**–प्राप्ति होण्याच्या अवस्थेस पोंचणें, नफा, फायदा मिळू लागणें, फलदायक होणें **०भक्षी**–वि हातातोंडाशीं गाठ असलेला, रोजच्या रोज मिळवून खाणारा, आलेलें उत्पन्न लागलीच खाणारा, कांहीं शिल्लक न टाकणारा किंवा टाकण्यास असमर्थ म्हु० उत्पन्नभक्षी मध्यान्हें दरिद्री **०भोक्ता**–वि १ स्वकष्टोपार्जित संपत्तीवर निर्वाह करणारा २ हातातोंडाशीं गाठ असलेला, उत्पन्नभक्षी **०विनष्ट, विनाशी**–वि १ उत्पन्न झाल्याबरोबर नष्ट होणारा, लागलीच नाश, मृत्यु पावणारा २ क्षणभंगुर, अल्पायुषी ३ निर्जीव, निःसत्त्व

**उत्पन्नणें**—अक्रि उत्पन्न होणें, उदय पावणें 'उत्पन्नली नदी जेथें अमृतोदकें प्रवाह ।' [उत्पन्न ]

**उत्पन्का**—स्त्री (गो ) उत्कट इच्छा

**उत्पल–ळ**—न १ कमळ, राजीव, पंकज 'पूर्णीमी नीलोत्पलीं । जीवभृंगाच्या ।' –ज्ञा १७ ६ दारदुत्पलपत्राक्षी शरद्भुत्पलसुगन्धगन्धा'–भोगभा ८७] २ रत्न उपरत्न हें नील वर्णाचें असून सुरस, स्वच्छ, पारदर्शक आणि कठिण असतें [स उत्+पल (पत्)]

उत्पाटणें—सक्रि. नाहींसें करणें, नाश करणें; उपटून टाकणें. 'जे येरें भाव उत्पाटी । देवें आथि असे ।' –ज्ञा १५ २१० [सं उत्+पट्–उत्प.पु]

उत्पाटन—न. उच्चाटण; उपटणें; खणून काढणें; निर्मूलन करणें. सामासशब्द–वृक्षोत्पाटन; केशोत्पाटन; दातोत्पाटन. [सं.]

उत्पाटित—वि. उपटलेलें.

उत्पात—न. १ भयसूचक चिन्ह, शकुन, अपशकुन, भावी अरिष्टाचें सूचक चिन्ह. 'पाहुनि उत्पातातें बहु तज्ञ सर्वपराय होतात ।' –मोभीष्म १.६. 'झाले उत्पात बहुत तेव्हां चळचळ धगधरा हाले ।' –मोभीष्म १०.३८. उत्पातांचे कांहीं प्रकार–भूकंप, उल्कापात, तडित्पतन, अशनिध्वनन, वृक्षोन्मूलन वगैरे. २ अनर्थ; संकट. ३ खोड्या, दंगे; पीडा; त्रास (राजा, चोर, वैर ६० ना); उचल –पया ३१ [सं. उत्+पत्=पडणें] •प्रलय–पु. प्रलयकाला, जगाच्या अखेरीचा अनर्थ; भयंकर, सर्वव्यापी संकट [सं ]

उत्पाती—वि. १ नाश्य, खोडकर; द्वाड (मूल). २ साहसी; मोठा उद्योगी, हिय्येदार; उलाढाली करणारा (चांगल्या व वाईट अर्थी) [उत्पात]

उत्पादक—पु. १ पिता; निर्माणकर्ता; उत्पन्न करणारा. २ संस्थापक, कांहीं कार्य, गोष्ट मूळ, काढणारा, आरंभ करणारा. 'ही गोष्ट चालकांनीं व उत्पादकांनीं विसरता कामा नये.' –वि. फलदायक [सं उत्+पद्=उत्पन्न करणें ]

उत्पादणें—सक्रि. १ घडविणें; जन्मास आणणें; उत्पन्न करणें, तयार करणें, बनविणें २ प्रकट करणें. 'मिळल्या शब्दाचें उत्पादितों ज्ञान । दर्पणींचें धन उपरवार्या ।' –तुगा १५५९. [सं. उत्पादन]

उत्पादन—न १ उत्पत्ति, उत्पन्न करण्याचा व्यापार, क्रिया. २ (अर्थशास्त्र) उत्पन्न केलेला माल (कारखाने, व्यापार, शेतकी यांपासून) [सं ]

उत्पादित—वि. उत्पन्न केलेला; उत्पादिलेला; जन्मास आणलेला [सं ]

उत्पाद्य—वि उत्पन्न करण्यास योग्य, उत्पन्न करावयाचें तें. [सं ]

उत्प्राणिद—न (शाप) उज्ज व प्राण याचा संयोग (इं ) हायड्रॉक्साइड.

उत्प्रेक्षण—न दृष्टांत, उदाहरण देणें, दाखला देणें. [सं. उत्+प्र+ईक्ष्=पाहणें ]

उत्प्रेक्षणें—सक्रि (कांहीं एक गोष्ट) उत्प्रेक्षाविषय करणें; एखाद्या गोष्टीचा दाखला, उदाहरण देणें. [उत्प्रेक्षा]

उत्प्रेक्षा—स्त्री १ (साहित्य) एक अर्थालंकार उपमेयावर जणों हें उपमानच आहे अशी संभावना ज्यात केली असते तो अलंकार. स्वरूप (उत्प्रेक्षित वस्तु पदार्थ असेल तर), हेतु (क्रियेचें कारण असेल तर), व फळ (क्रियेचें फळ असेल तर), असे उत्प्रेक्षेचे तीन प्रकार आहेत. उ० 'मुलांचीं अक्षरें जणुं काय मुक्ताफळेंच.' असे बोलोनी नळें रंजविला । अंगुळीमाजी हंस बैसविला । गमे चंद्रकुसमीप हार झेला । पाठवाया युवतीस सिद्ध केला ।' –नळ ८१. २ उपमा; दृष्टांत, तुलना, दाखला देणें; कोटी करणें. 'त्या हरदासानें एका अभंगावर किती हो उत्प्रेक्षा घेतल्या ? फार चांगला वक्ता तो !' ३ कल्पना; तर्क; युक्ति. 'आइकतयां उत्प्रेक्षे सळु चढे ॥' –ज्ञा १०.२६८. [सं. उद्+प्र+ईक्ष्=पाहणें ]

उत्प्रेक्षित—वि. उत्प्रेक्षा दिलेलें; तुलना केलेलें; दाखला देऊन स्पष्ट केलेलें. [सं.]

उत्प्लवन—न. उड्डाण; उडी. 'देखें उत्प्लवनासारिखा । पक्षी फळाचि झोंबे जैसा ॥' –ज्ञा ३.४१. [सं. उत्+प्लु=उडणें]

उत्फालन—न. उडया मारण्याची क्रिया. 'मारी मूषक थोर थोर कुदुरी राहोन ते मांजरी । उत्फालेन करी करून मजला पीडा शरीरीं करी ॥' –विठ्ठलकृत रसमंजरी २. [सं. उत्+फल् ]

उत्फुल्ल–ल्लित—वि. उलगडलेलें; विस्तारलेलें, उघडलेलें; विकासलेलें; उमललेलें (पुष्प, नेत्र). [सं. उत्+फुल्ल् ]

उत्फुल्लिका—स्त्री. मुलींचा एक प्रकारचा खेळ; बसफुगडी. 'पादोपविशानां मुहुः पतनोत्पतनरूपा क्रीडा उत्फुल्लिका इति उच्यते॥' –हाल–गाथासप्तशती (मसाप २.२४२). [सं.]

उत्रापावलोक—क्रिवि (गो.) शब्दशःनिक व प्रत्येक पावलाबरोबर; हरघडी. [सं. उत्तर+पाद; प्रा पाउल; म. पाउल ]

उत्संकळ–खळ–गळ—वि. (प्र ) उच्छृंखल, उतावळा; अमर्याद, अप्रतिबद्ध, स्वैरवर्तनी (पोर, सासुरवासीण इ.) 'तंव कृष्ण म्हणती ऐसें । हें उत्संखळ बोलणें कायसें ॥' –ज्ञा ६.१६२. [सं उत्+शृंखला ]

उत्संग—पु. १ मांडी. 'संतोषा उत्संगीं । दिधलें घर ।' –ज्ञा १२.१५०. २ सान्निध्य. 'जयाचियें दिठीचिया उत्संगीं ।' –ज्ञा ९.४७६. [सं. ]

उत्संग(संयुत हस्त)—पु (नृत्य) अराल हात उताणे करून बाहु बाकविणें व उजवा अराल हात डावीकडे व डावा हात उजवीकडे ठेवणें

उत्सन्न—वि. मृत, नष्ट 'कुलघातकांच्या या वर्णसंकरकारक दोषांनीं पुरातन जातिधर्म व कुलधर्म उत्सन्न होतात.' –गीर ६१०. [सं उत्+सद् ]

उत्सर्ग—पु १ बाहेर टाकणें, टाकून देणें, त्याग; दान, अर्पण. सामासशब्द–मलोत्सर्ग, मूत्रोत्सर्ग, वृषोत्सर्ग वगैरे. 'संक्रमण उत्सर्ग । विण्मूत्राचा ।'–ज्ञा १३.११६. २ नियम, विधि, रीत. उ० उत्सर्ग शास्त्र; 'मनुष्यानें सत्य बोलावें या उत्सर्गाचा कोणेकाचा प्राणरक्षणार्थ

असत्यहि बोलावें या विशेष वचनानें बाध होतो ' ३ धर्म करणें विहीर, धर्मशाळा इ० देवास अर्पण करणें [ स उत्+सृज् =टाकणें]

**उत्सर्गत** —क्रिवि १ सामान्यत , साधारण मानानें ' उत्स र्गेन पाहिलें असता अहिंसारूप धर्म निर्दिष्ट आहे ' २ नियमानु सार [ स ]

**उत्सर्जन**—न १ टाकणें, त्याग करणें सोडून देणें उत्सर्ग अर्थ १ पहा २ वेदाध्ययन थांबविण्याच्या वेळीं करावयाचें कर्म, यज्ञोपवीत धारण करणारांचें एक प्रातिवार्षिक कर्म, श्रावणींतील एक कर्म [ स ]

**उत्सर्जित**—वि उत्सर्जन केलेला, त्याग केलला, टाकून दिलेला [ स ]

**उत्सव, उत्साव**—पु १ आनंद, आल्हाद उत्साह पहा ' या ब्राह्मणांगि आम्हा सुहृदासि पदीं बसोनि उत्सव दे।' —माशांति ४६६ २ आनंदाचा दिवस, समारंभ, सण उत्साह अर्थ ३ पहा ' आणिकी होतसे रिणवार तटा । उत्साव भारी कारणें ।' —दावि ४१४ ३ नाचरंग, खेळ, विलास [ स उत् + सु ] ०**मूर्ति**—स्त्री १ मिरवणुकींत न्यावयाची देवाची प्रतिमा, भोगमूर्ति २ केवळ शोभेचा, दिखाऊ माणूस, वस्तु ३ —वि (चर्नें) नेहमीं नटून थटून असणारा, उत्सववाला, मानाला मात्र पुढें असणारा

**उत्सादन**—न १ पतंग उडविणें ( ६४ कलांपैकीं एक ) २ नाश करणें ३ वर जाणें, चढणें ४ नांगरणें दोन—तीनदां किंवा पुरें (शेत) [ स उत्+सद् ]

**उत्सार, उत्सारण**—पुन (गणित) भाज्य संख्येपैकीं जेथ पर्यंत भागाकार झालेला आहे त्यापुढील आकडा, पुढें भागावयाचा प्रत्येक आकडा, पद [ स उत्+सृ ]

**उत्साह**—पु १ अनुकूल भाव, उल्हास, उत्सुकता २ आनंद गनाचें समाधान सामाशब्द—स्नानोत्साह दानोत्साह पुत्रोत्साह धनोत्साह मानोत्साह ३ सण, सोहळा आनंदाचा समारंभ, मंगळ प्रसंग, आल्हाददायक कार्यक्रम ( रामनवमी, शिवरात्र वगैरे प्रसंगीं करावयाचें अनुष्ठान, कथाकीर्तन ब्राह्मण भोजन इ० ) यज्ञोत्साह ' करितो उत्साह यारशा अंगण। पत्नी ब्राह्मण घरीं गेल।' —ह४ ' असा गोकुळीं झाला आनंद। उत्साह वाढ़ती सर्व।' —ह १८१४४ ४ उमेद हिंमत नेट, निकर धैर्य धमक म्हणे माझाचा उत्साहें धीवाचे आहेस।' —मामाभ १ २८ ५ बळ जोर आवेश ' ता उत्साहा न गणे। क्षत्रिय आपा।'—ज्ञ ६१ [ स उत्+सह् ] ०**वृद्धि**—स्त्री मनाचा उमेद दर्शन उत्सुकता, तत्परता, ७ म ४ थपडी गावर ' उत्साहवृद्धि न मनावी द उपासा।' [ स ] ०**भंग, नाश**—पु १ आनंदाचा विरस [illegible] २ आल्हाददायक कार्यक्रमाचा बिघाड, हयगयीनें विघ्न ०**मूर्ति**—

**उत्सवमूर्ति** पहा १ व्यवहारात पुढें असणारा, ज्याला नेहमीं पुढें करण्यात येतें असा माणूस, कारभारी, फिरता व्यापारी, प्रचारक, प्रतिनिधि ०**शक्ति**—स्त्री उमेद, आत्मविश्वास, धमक, जयाबद्दलची खात्री, युद्धोपयोगी तीन शक्तींपैकीं एक (दुसऱ्या दोन म्हणजे प्रभुशक्ति आणि मंत्रशक्ति ) [ स ]

**उत्साहवान, उत्साही**—वि १ उमेद असलेला, आनंदी, उत्साहानें काम करणारा २ तत्पर, उत्सुक, दीर्घोद्योगी [ स ]

**उत्साहित**—वि १ उत्साही, आनंदित, प्रमुदित, उत्साह पावलेला, आणलेला २ संतोषित खूप लागेला, समाधान पावलेला

**उत्सिक्त**—वि उतू गेलेला, वाहून गेलेला, भरून गेलेला [ स उत् + सिच् ]

**उत्सुक**—वि १ उत्कंठित, आतुर २ अधीर उतावीळ —**ता**—स्त्री उत्कट इच्छा

**उत्सृष्ट**—वि टाकलेले, सोडून दिलेले, त्यक्त उत्सर्जन केलेले ०**पशु**—पु देवतेप्रीत्यर्थ सोडलेला, अर्पण केलेला बैल [ स उत्+सृज् ]

**उत्सेक**—पु १ उकळून वर येणें, ऊत २ भर, वाढ ३ गर्व, ताठा [ स उत्+सिच् ]

**उत्सेदणें**—सक्रि नाश करणें, मोडणें, निरास करणें ' सांगी एक ज्ञानी म्हणविती । अद्वय पूर्ण जाणती । आणि सगुणभक्ती उत्सेदिती । ते तरेचि न तरती अभिमानें।' —नवि १२,७८ [ स उत्साद ]

**उत्स्यंदित(भौमिचारी)**—न ( नृत्य ) पाय पुढें टाकताना पायाच्या कनिष्ठिकेच्या बाजूनें वाहरवर्तुळ करणें म्हणजे मागच्या बाजूनें पाय पाठीमागें फिरून पुढें टाकणें, व आगठ्याच्या बाजूस आतवर्तुळ करणें म्हणजे बाहेरच्या बाजूनें पाय फिरवून मग मागें टाकणें [ स ]

**उत्क्षिप्त**—वि टाकून दिलेले, फेकलेले [ स उत्+क्षिप् ]

**उत्क्षिप्तशीर्ष**—न ( नृत्य ) डोकें वर करून खूप उंच पाहणें, हा अभिनय उंच गोष्टी पाहण्याच्या वेळीं करतात [ स ]

**उत्क्षेप-ण**—पुन वर उडविण्याची क्रिया वर फेकणें [ स उत्+क्षिप् ]

**उत्क्षेपणें**—सक्रि दूर फेकून देणें, वर उडविणें [ स उत्+क्षिप् ]

**उत्क्षेपमुद्रा**—स्त्री ( नृत्य ) मुष्टीने एकाच वेळीं वर दिशा दाखविणें मुद्रा वर करणें सांगाणें, तर करणें पादांनें हला [illegible] वगैरेच्या वेळीं हा अभिनय करितात [ स ]

**उथव**—स्त्री माती, पूर ' आता उथव आल्यामुळें एक टोक प डला नाहीं काय ? ' —सुर ८८ [ स उत्+स्था—स्थापित ]

**उथळ**—वि १ साधारण सखल, कमी खोल, फार खोल नस लेलें ( पात्र, नदी, तळें इ० ) २ (ल ) साधाभोळा, मोकळ्या मनाचा, निष्कपटी, भावडा ०**बुडाचा**–वि हुरळून जाणारा, अल्प सतुष्ट, भोळसर 'आमच्यातही उथळ बुडाची काही मडळी आहे ' –टि १ ३९७ **म्हृ**० उथळ पाण्याला खळखळ ( खळखळाट ) फार=ज्याच्या अगीं गुण थोडा त्याला आढ्यता जास्त असते [ स उत्+तट् किंवा स्थल, प्रा उत्थल ]

**उथळणें**—अक्रि उसळणें, उचबळून येणें, जोरानें वर येणें, उत्पन्न होणें 'अथवा उथळोनि प्रेमा । कृपिण मिळाल्या त्या रामा । ' –रास १ १२२७ मज अवाप्त कामासि सुख । त्याचे पुढेनी दख उथळलें ।'–एभा १३ ७४८ 'तेणें शातिगेची स्थिती। भरुनि उथळे अतिउनती । ' –एभा २३ ६९ [ उथळ ]

**उथळपातळ**—क्रिवि थोडेंथोडें [ उथळ ]

**उथळवट**—वि साधारण उथळ, सखल, फार खाल नसलेलें ( पाणी, जमीन ) [ उथळ ]

**उथळा**—पु ( वों ) वृक्षावर पर्जन्य पडला असता त्यावरून जे त्या पाण्याचे थेंब खालीं पडतात ते प्रत्येक

**उथळा-ळी-ळें**—पुस्त्रीन १ खावाच्या वर व खालीं बसवि ण्याकरिता तयार केलेला चौकोनी ल्हान व उच दगड किंवा लाकूड, खावाचा तळखडा, बैठक 'टेबलात बसविलेल्या उभ्या फिरत्या दांड्याच्या खालच्या बाजूस टोंक असून तें उथळ्यात फिरतें ' –पदार्थवर्णन १ ४३ २ (बाधकाम) दगडी किंवा काकरीच्या चाफा [ उत्तल किंवा उत्स्थल ]

**उथळापाठ**—वि उथळी किंवा गोडी भातजमीन जेथें आहे असें खेडें [ उथळ+स पट ]

**उथळी**—स्त्री ( वों ) विशिष्ट प्रकारचें भात पिकणारी गोडी जमीन [ उथळ ]

**उथळी**—स्त्री १ उथळा पहा २ ( माण ) रुद तोंडाची ल्हान पाटी, उपणपाटी [ उथळ ]

**उथाण**—न १ हवेचा कोंदटपणा, अभ्रें आगीं असता जी हवा होते ती, गदमद, उकाडा ( क्रि० येणें ) २ भाद्रपद महि न्यातील ऊन –शिदि ७४ [ सं उत्+स्थान ]

**उथाळा-ळी-ळें**—पुस्त्रीन उथळा पहा खावाच्या खालचा व वरचा दगड लाकूड, खावाचीं बठक, तोळबा 'गोरिया सोनकेळी । कामौनि कीनेति खाव–उथाळी ॥ '–शिशु ७६४ 'उथाळीं बैसला इन्द्रनीळे ॥ ' –मुआदि ३१ ९५ 'पद्मरागाचे ताळवे स्वयम । वरी दिव्य हिऱ्याचे खाव । निळयाचीं उथाळीं सुप्रभ । उपमा नाहीं तयातें ॥ ' –ह २ १७ [ स उत्+तल ]

**उथ्थान**—न परावर्तन, उगवणी, पतन, उत्थान पहा [ स ]

**उथ्थापना**—स्त्री उचाटण, उत्थापन पहा 'आमुची उथ्था पना न करावी ॥ ' –दाव ५ ८ [ उत्थापन ]

**उद्-त्**—एक उपसर्ग अर्थ–१ वरचढपणा, श्रेष्ठत्व, वर्चस्व उ० उत्तर, उद्गाहन, उद्धार, उद्दिष्ट २ वियोग, विभाजन, उघाड दूरी करण, अपसारण, ( पासून–मधून ) उ० उत्सर्जन, उत्क्षेपण ३ वर, ऊर्ध्व, उच उ० उत्थान, उत्तिष्ठ [ स उद्, तुल इं उप्, हि उभस्–ओस–ओइस् ]

**उद्**—न पाणी ( फक्त समासाच्या आरभीं ) [ स ]

**उदई उदय**—स्त्री वाळवी उधई पहा

**उदईक**—क्रिवि उद्या [ स उदय ]

**उदक्**—क्रिवि उत्तरेकडे, उ० उदङ्मुख, उदगयन [ स ]

**उदक**—न पाणी, जळ, नीर, अबु, गोठ्याकडे पाणी या अर्थी हाच शब्द रूढ आहे 'वरें उदक आण ' 'कन्द आता उदक पान । घोटासवें आठवे कृष्ण । '–एरुस्व ५ ६२ सामाशब्द–गगोदक, तीर्थोदक, पर्जन्योदक, सचितोदक इ० [ स उद्=वर येणें, ओलें करणें, तुल ग्री ऊदोर्, लॅ उन्द, गॉ वतो, लिथु वन्दु ०**येणें** (**डोळ्यात, नेत्रात नयनांत** )–दु ख होणें, वाईट वाटून रडणें, अश्रु येणें 'दर्शनिमित तया शयनातें । देखता उदक ये नयनातें । ' ०**सोडणें-देणें**–१ मालकी सोडणें, त्याग करणें, सोडून देणें, टाकून देणें 'गोप्रदानाबद्दल सोळा रुपयांच्या रकमेचें उदक सोडलें जाईल '–गोप्रदानाचे नियम (बडोदें) २ २ कोणत्याहि गोष्टीचा सकल्प केल्याचें द्योतक म्हणून मत्रपूर्वक पाणी सोडणें, सकल्प करणें ३ सकल्पाचें उदक सोडून जेवण्यास आरभ करणें ०**हातावर घालणें** एखाद्यास दान करणें, अर्पण करणें, दुसऱ्यास देऊन टाकणें **उदकापण्यानें करून टाकणें**–एखादें कार्य समारभ, उत्तरक्रिया अतिशय थोड्या खर्चात व गाजावाजा न करता फक्त विधीस बाध येऊ न देता उरकून टाकणें ०**घेऊन धचप** ( गो ) निघून जाणें [ वचणें=जाणें ] ०**क्रिया**–स्त्री उत्तरक्रिया, तिलाजलि, तर्पण ०**घात**–पु धधारे घालून पाणी अडवणें व अशा रीतीनें जोर उत्पन्न करून योग्य वेळीं योग्य प्रमाणात वाटल तेथें पाणी माडणें यासबधींचें ज्ञान, विद्या ६४ कलातील एक कला ०**दान**–न १ उत्तरक्रिया, तिलाजलि, तर्पण, उदकक्रिया २ पाण्याची सोय करणें (विहीर, तळें इ० बाधून) ०**मेह**–पु एक रोग, यात पाण्या सारखी पुष्कळ लघवी होते ०**वाद्य**–न १ जलतरग, जलतरगा करिता वापरावयाची भाडीं २ जलतरग तयार करणें किंवा तें वाज विण्याची कला ०**शात-शांति**–स्त्री घरात कोणी आजारी असे ल्यास अथवा काहीं अरिष्ट घडल्यास त्याच्या शात्यर्थ चार ब्राह्मण बोलावून त्याकरवीं काहीं विशिष्ट ( बौधायनसूत्रांत सागितल्याप्रमाणें ) सूक्तें पठण करावयाचा व जलसिंचन करावयाचा विधि

**उदकप्रक्रिया**—स्त्री ( शास्त्र ) पाण्याच्या साहाय्यानें विशिष्ट सयुक्त द्रव्यातील मूलद्रव्यें वगळीं करणें ( इं ) हायड्रॉलिसिस [ स ]

**उदकाकडे**—क्रिवि ( अप रूपे ) उदकडे–उदराडे–उत्काडे ( गो ) पश्चिमदिशेकडे, परसाकडे, शौचास ( पाणी पाहून त्या ठिकाणी शौचास बसतात म्हणून प्रयोग ) [ उदक+कडे ]

**उदकाडी**—स्त्री उदबत्ती, अगरबत्ती [ ऊद+काडी ]

**उदकुंभ**—पु पाणी भरलेला घट, पाण्याचा घडा, कळशी ( धार्मिक विधींत उपयोग ) 'आली पराशि युवती उदकुंभ ठेवी ' –आकृ १० [ स उद+कुंभ ] °दान–श्राद्ध–न मृताच्या अव राच्या दिवसापासून एक संवत्सरपर्यंत (अब्दपूरित श्राद्धापर्यंत) मृतास उद्देशून दररोज करावयाचें श्राद्ध यांत ब्राह्मणास उदकुंभाचें दान करितात हें श्राद्ध रोज करणें शक्य नसल्यास एकच दिवस श्राद्ध करून दररोज नुसतें उदकदान व आमान ( किंवा धान्य ) दान करतात अथवा वर्षाचें धान्य एकदमच देतात [ स ]

**उद्गयन**—न सूर्याचें उत्तरदिशेकडे जाणें उत्तरायण पहा 'उदगयन होय तोंवरि मीं शरतल्पीं असाचि राहन ' –मोभीष्म ११ १२४ [ स उदक्+अयन ]

**उद्गा, उद्गामाद्गा**—वि रागीट, मग्रूर माजोरी [ उतणें+मातणें, किंवा मातगा द्वि ]

**उद्गिर**—१ निजाम इलाख्यातील एक गाव २ लुगड्याची एक पट, तेथील लुगडी 'अक्कलकोट सोलापुर उदगिर वारिक यती त्या घनवेली । '–अमृत ४९

**उदगिरि**—स्त्री एक क्षुद्र देवता 'उदगिरि देवी म्हणे स्वामीसी । देवा तु उदयगिरिवरि पावलासी । आमुचा पूजा-मान चाल्वी जनासी । तुझ्या मननाली विश्व लोक ॥ '–सप्र ५ २३ [ उदयगिरि ]

**उदग्गोल**—पु क्रान्तिवृत्ताचा उत्तरेकडील अर्धा भाग [ स उदक्+गोल ]

**उदंड**—वि क्रिवि पुष्कळ, अनेक, भरपूर, फार (संख्या, परि माणवाचक ) 'तयाच्या ठायीं उदंड । अज्ञान असे बिनड । ' –ज्ञा १३ ६९१ 'विस्तीर्ण मस्तकीं उदंड । शिंदूर चर्चिला । ' –दा १ २ १० 'कैवल्याच्या तुम्हा घरीं । रामी हरी उदंड । ' –तुगा १४११ 'लोकानीं त्याला उदंड सांगितलें '–वाल २ ८७ [ स उद्+दंड, उदंड ]

**उदणा घालणे**—क्रि ( गो ) केळीं वगैरे पिकविण्या करिता मडक्यात ठेवून तोंडावर दुसरें लहान मडकें घालून लिंपून व ४।५ दिवस विस्तवानी आंच देऊन पिकत घालणें [ उद्+दहन ? दे उद्दाण=चुला, स्वयपाकाचा शगडी ]

**उदंत**—पु १ इत्थंभूत वार्ता साद्यन्त वृत्तांत, हकीकत 'आई किति सर्व उदंत कानीं । ' –साछ ६ ८ साम तदा त्या सकळा उदंता । ' –वारेभरतरत्न सामवारचरित्र ३७ २ क्षुद्र अन्न करणाच्या मनुष्य ३ उद्योग करून पोट भरणारा माणूस [ स उद्+अंत, उदंत ]

**उदधि**—पु समुद्र सागर 'जैसा गंगेसी उदधि । निरंतर । ' –ज्ञा २ २४१ सामासशब्द–कालोदधि, महोदधि, क्षीरोदधि इ०. [ स उद+धि ]

**उदनी**—स्त्री ( कों ) उडवीमध्यें पाणी जाऊ नये म्हणून ती वर निमूळती करीत नेतात आणि गवत किंवा पेंटा यानीं ती शिव तात असा केलेला उडवीचा निमुळता भाग 'पाऊस पडण्याची भीति असल्यामुळें उडवीला उदनी चांगली घेतली पाहिजे ' [ स उद्+नी ]

**उदप**—पु पाण्यातील जीवजंतु, पाण्यात वास करणारा प्राणी 'मग उदपासि म्हणे उदधी । तुम्ही सीत कोरावें स्वबुद्धि ॥ ' –कथा २ १४ ११६ [ स उद+प ]

**उदफाळणें**—उक्रि फाडून तुकडे करणें, चिरून, फाडून टाकणें, धुव्वा उडविणें [ स उत्स्फालन ]

**उदफूल**—न उदाचें फूल, उदाची लाही, लोहउदासलोखंडी तव्यावर आंच देऊन त्याची पचपात्रांत धरलेली वाफ ही वाफ तुरटीच्या फुलासारखी व शुभ्र असते –वगु १ ७४. [ अर ऊद= लाकूड+फूल ]

**उदबत्ती**—स्त्री उदकाडी, अगरबत्ती, ऊद, धूप व इतर कांहीं सुगंधी पदार्थ वाटून त्याचा लेप एका काडीस देतात, ही पेटविली म्हणजे सुगंधी धूर हवेंत पसरतो [ उद्+वर्ती=वात, ऊद+बत्ती ]

**उदंबर**—पु उंबर, औदुंबर 'वाढिता उदबरें सरिसें । पुरि कासी ॥ ' –ऋ ८२ [ स उदुंबर=उंबर ]

**उदमस्त–मात**—वि ( कों गो ) उन्मत्त, बेफिकीर, गर्विष्ठ, अवहेलना करणारा, माजोरी [ स उन्मत्त ]

**उदमी**—पु १ उदीम करणारा, व्यापारी, क्रयविक्रय कर णारा, दुकानदार २ उद्यमी, उद्योगी, पुढारी 'ब्राह्मणानींच उदमी व्हावें असें आम्ही म्हणत नाहीं ' –टि ४ ३२८ [ स उद्यम ] °चाल–स्त्री १ व्यापारी पद्धति २ व्यापारी लोकांची राहाणी, चालीरीती वगैरे

**उदमुक**—वि ( गो ) उन्मत्त

**उदमेख**—पु ( कों ) उद्योगीपणा, आवड, हौस, तत्परता, उत्सुकता, आतुरता ( क्रि करणें ) [ स उन्मिष्=डोळे उघडणें, उन्मेष=जागृतता ] –खी–वि उत्सुक, आतुर, आवड असलेला वगैरे –खून–क्रिवि १ मुद्दाम, नक्षून, आवर्जून २ मनाचा पूर्ण निश्चय करून, स्वत च्या आवडीनें, पूर्ण कल्पना यऊन, सहज किंवा यत्नानें याच्या उलट

**उदम्ल**—न ( रसाय ) ज्या अम्लांत प्राणवायु नसतो तें अम्ल ( इ० ) हायड्रॉसिड [ उद+अम्ल ]

**उदय**—पु १ उगवणें, क्षितिजावर येणें, दिसणें ( सूर्य, तारे, इ० ) 'अस्तास जाई उदयास येई ॥ ' 'पूर्व दिशा उदयाला भावू

आला उदयाचळा।' -पला २२ २ उदय होणें, दिसूं लागणें (शुक्र, बुध, इत्यादि ग्रह सूर्यापासून दूर झाल्यामुळें) ३ उत्पन्न होणें, प्रादुर्भाव, उद्गम, उद्भव, वर येणें, फुटणें (फुटें, अंकुर, विकार वगैरे अंगें-पुण्योदय, कामोदय, क्रोधोदय इ०) ४ उठणें, बाहेर येणें, फुटणें (घेंम, घाम, इत्यादि शरीरावर जसें-घर्मोदय) ५ उत्कर्ष, भरभराट, महत्त्व प्राप्त होणें, वर डोकें काढणें 'सादीपर्ननें आपल्या दिराचे भावी गुण व उदय जाणून त्यास टेकून घेतलें '[स उद्+इ=जाणें] **उदयास येणें**-प्रसिद्धीला येणें, अभ्युदय होणें

**उदयगिरि, उदयाचल-ळ**--पु ज्या पर्वताच्या आडून सूर्य-चंद्राचा उदय झालेला दिसतो तो (काल्पनिक) पर्वत, ज्या भागातून उदय होतो तो भाग, प्रदेश 'कां उदयाचळकुळीं। झळकता अंशुमाळी॥' -ज्ञा १८ १५३१ 'उठि लौकर घनमाळी उदयाचळीं मित्र आला।' -होला १६ [स उदय+गिरि, अचल= पर्वत]

**उदयलग्न**--न (ज्यो) उदय पावत असलेला राशि, राशीचा उदय, लग्न पहा [स]

**उदयीक**--क्रिवि उद्या [स उदय]

**उदर**--न १ पोट, कोठा, जठर 'उकार उदर विशाल।' -ज्ञा १ १९ २ पोटफुगी, विकारानें फुगलेलें पोट, पोटातील एक रोग उ० जलोदर, वातोदर, सर्पोदर, वगैरे ३ (कृषि) (पाण्याचें अजीर्ण) कादे, वगट इत्यादि भूमिगत पिकास पाणी फार झालें तर कुज येते व तो भाग कुजतो त्यास म्हणतात -कृषि १८४ ४ गर्भाशय, कूस कुक्षि 'अगा वसुदेवाचिये तपप्राप्ती। श्रीकृष्ण देवकीउदरा येती।' -एरुस्व १ १० 'धन्य धन्य ते कौसल्या सती। उदरासि आला त्रैलोक्यपति।' -सवि १८५ [स उदर, ग्रि जल्पर] **-राची खाच**-स्त्री पोट 'आपुली खाच उदराची' -सप्रामगीते १३३ **-रीं येणें**-(एखादा ग्रह जन्मराशीस येणें) यथच्छ खाण्या पिण्यास, उपभोग घण्यास मिळण्याजोगी दशा येणें (निंदाव्यंजक) **उदरीं शनी, शनैश्चर येणें**-(ज्या ) शनी जन्मराशीस येणें म्हणजे चागली दशा प्राप्त होणें, ऐश्वर्य मिळणें ०**तलधमनी**-स्त्री (शारीर) पोटाजवळची धमनी ०**तलपाद**-(प्राणि) गोगल-गाय इत्यादि पोटानें सरपटणारे प्राणी [इं गॅस्टरापोडा, ग्री गॅस्टर=पोट तुल० स जठर] ०**दरी**-स्त्री पोट, पोटाची खाच ०**निर्वाह-पूर्ति-पोषण प्रवृत्ति-वृत्ति**-पुस्त्रीन १ चरितार्थ, उपजीविका पोषण, उदरभरण क्षुधाशांति 'भिक्षा मागुनी क्षेत्राभीतरीं। उदरनिर्वाह करितसे॥' -नव १३ ६० 'उदर प्रवृत्ति कारणें। माल्या आणून विकीतसे॥' -सवि २१ १४ २ उपजीविकेचें चरितार्थाचें साधन जीवन पोटापाण्याची सोय ३ पोट भरणें, केवळ जगणें, जीव जगविणें, पोट चालविणें (सामा निंदा-व्यंजक) ०**पिशाच्च**-पु अतिशय खादाड, अधाशी, खादु

**उदरंभर-री**--वि १ पोटभरू, पोटार्थी, खादाड 'पीतो मरंद उदरंभर षट्पदाचे।' -नल ३८ 'गोमांवी लोक ईश्वरप्राप्तीची बुद्धी सोंग आणतात, पण उदरंभर मात्र असतात' २ स्वार्थसाधु, आपमतलबी 'बगेचप्रोफेसर उदरंभरी लोक आहेत' -टि २ ५१४ ३ पोट भरण्याखेरीज कांहीं न करणारा, स्वतःच्या निर्वाहाखेरीज अन्यत्र न पहाणारा (देश-समाजसेवा इ० इतर काहीं न करणा-ऱ्यास म्हणतात) ०**भरण**-न अन्न खाणें, जेवणें, भोजन उदरनिर्वाह पहा 'उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म।'

**उदर**--(नाविक) उत्तर दिशा, धुव-दिशा [स उत्तर]

**उदर**--न (नृत्य) पोटानें केलेले निरनिराळे अभिनय नृत्यामध्यें उदराच्या चार प्रकारच्या अवस्था होतात-क्षाम, खल्ल, पूर्ण व सम [स]

**उदरण**--स्त्रि ओकणें 'दुर्दाची धालकें मास्ती। तीं रचा सर्वे दुद उदरती।' -शिपु २ १३ ३० [स उद्-गॄ]

**उंदरनळी**--स्त्री (माण) मेढाच्या वरच्या बाजूस असणाऱ्या नळ्यांपैकीं प्रत्येक [उंदीर+नळी]

**उदराडखान**--स्त्री (गो) वनस्पतिविशेष उंदीरकानी पहा

**उदरसूत्र**--न (गणित) (वर्तुळाचा) व्यास, वर्तुळाच्या मध्यबिंदूतून जाणारी परिघमर्यादित रेषा [स]

**उदरी**--वि १ ज्यास उदररोग झाला आहे असा, पोट फुगलेला २ अतिशय लठ्ठ, दोंदील, पोट पुढें आलेला ३ उदराचा, उदरा-पोटासंबंधींचा [स]

**उंदरी**--स्त्री ज्यांत डोक्यावरील केंस गळून पडतात असा रोग, चाई, कातरी मनुष्येतर प्राण्यामहि हा रोग होतो (लोकर गळून पडते), मुळच्या केंसाचा भाग उंदरानें चावल्या-कुरतडल्याप्रमाणें दिसतो म्हणून हें नाव पडलें [उंदीर]

**उंदरी**--स्त्री एक परोपजीवी वनस्पति

**उदर्क**--पु पुढें होणारी गोष्ट भवितव्य भविष्य सामाशब्द-उदर्क-कार्य-वचन-सुख दुःख इ० [उद्+अर्क=सूर्य] ०**काल**-पु भविष्यकाळ ०**फल**-न परिणाम, पर्यवसान, निष्पत्ति शेवट ०**चिंतन**-न पुढें होणाऱ्या गोष्टींबद्दलचा विचार

**उदर्गत**--स्त्री (गो) उपाय, इलाज [स उद्धार+गति]

**उंदऱ्या**--स्त्री अव १ विशाखा नक्षत्र २ त्यात पडणारा पाऊस विशाखा नक्षत्राजवळ सूर्य असता पडणाऱ्या पावसामुळें उंदीर साप, वगैरे विषारी प्राणी व वनस्पती उत्पन्न होतात अशी समजूत आहे 'उंदऱ्या लागल्या-पडल्या' 'यदा उंदऱ्या कोरड्या गेल्या' ०**माजऱ्या**-स्त्री अव १ विशाखा व अनुराधा हीं दोन नक्षत्रें २ त्यात पडणारा पाऊस, विशाखा नक्षत्रामुळें जे विनाशक प्राणी, वनस्पती उत्पन्न होतात ते अनुराधा नक्षत्रानें नाहींसे होतात म्हणून एकाला उंदऱ्या व दुसऱ्याला माजऱ्या म्हणतात [उंदीर+माजर]

उदच—उदा उदो पहा १ दवीचे भक्त भिमेस निघाले म्हणजे देवीपुढे ' उद ! तुना जय हावो ' अशा अर्थाचा हा शब्द उच्चारतात [स उदय, उदयोस्तु तुल० वा उदु=पहा या अर्थी उद्गार ( दवीला नैवेद्य दाखविताना म्हणतात )] २ उजेड याअर्थी निदाव्यजक उद्गार ' मोठा उदव ( उजेड ) ! ' ०करणें–लावणें–( उप ) उजेड पाडणें, पराक्रम करणें, महत्कृत्य करणें

उदवणें—अक्रि ( उप ) उदव करणें पहा

उदवणें–विणें—उक्रि उदाच्या धुराने सुगंधित करणें, ऊद जाळणें, उदाचा वास लावणें, धुरी देणें ( केस, ताईत, पाणी वगैरे ) ' उच लुगडीं नेसायाची, घमड मोठी न्हायाची, केस पस रून उदवायाची । ' –प्रला २१७ ' चदनी चोळण्या करिती विहिणीशी उदवीती । ' –वसा ५३ [अर ऊद]

उद्वात—स्त्री ( गो ) उदबत्ती पहा [ ऊद+वर्ति ]

उदश्रु—वि रडणारा, रडका [स उद्+अश्रु]

उदा—वि ( ना ) निळसर, उदी रगाचा उदी पहा

उदाण—स्त्री ( वों ) उधाण पहा

उदाणू–नू—वि ( नदभाषा ) तीन, व्यापारी भाषेतील सांकेतिक सख्यावाचक शब्द ' मुखवदनें जया कारण । उदानु नेत्र देदीप्यमान । ' –भवि १८८९ ' मुख उदानु अगुळ ऐसी । नदभाषा सांगितली ज्यासी । ' –भवि ४२ ४५

उदात्त—वि उच्च, श्रेष्ठ, मोठा, दाता, उदार, स्पष्ट व्यक्त (स्वर) तीव्र, तीक्ष्ण (आघात), उच्च, मोठा कर्कश (आवाज) [स ]

उदान—पु १ पचप्राणवायूंपैकीं एक वायु हा कंठातून मस्तकात चढतो ' कठीं उदान गुदीं अपान । ' –दा १७ ८ १२ ऊर्ध्वमुखें कंठाकडे फुगारा । जो धरी पोटात वारा । त्या प्राणाचिया प्रकारा । उदान नामें जाणावें ॥ ' –यथादि १७ १००२ २ मृत्युसमयींचा श्वास, धाप, ऊर्ध्व ०लागणें–फार खाल्ल्यामुळें, रोगामुळें श्वासोच्छ्वास मोकळेपणानें करता न येणें, दम लागणें, श्वास कोंडणें [ स उत्=वर+अन्=श्वास घेणें ]

उदानका—पु. ( नदभाषा, कर ) पैसा पागल्याला आवारु ( दोन ) उदानके दिले ' उदाणू पहा [उदान–तीन+एका=पै–पैसा ]

उदार—वि १ मोठ्या मनाचा, कनवाळू थोर मनाचा, धर्मात्मा २ मोकळा, धीट प्रशस्त उघड्या मनाचा, सकोचित, कृपण कृपण कद्रू, अरुद याच्या उलट (माणूस भाषण स्वभाव, होडी, जागा, गाडी, खोली वगैरे) ३ सढळ, दाता खर्चिक दानशील चिक्कू कृपण याच्या उलट ' उदार तोच श्रीमत कृपण तोच दरिद्री ' म्ह० आईजीच्या जिवावर बाईजी उदार ०कर्ण–वि १ कर्णासारखा उदार दानशूर मोठा दाता २ ( उप ) कृपण व कजूष (मनुष्य) ०धोरण–न सुधारणा दिल्याचें, प्रतिपक्षावर अधिक विश्वास ठेवण्याचें, मोठ्या मनाचें धोरण ' लॉर्ड कर्झन यांच्या कारकीर्दीचें धोरण रिपन साहेबाच्या उदार धोरणाच्या अगदीं उलट झालें आहे ' –टि ३ ४० ०पक्ष–पु ( राज ) व्यापक विचाराच्या लोकांचें ( लिबरल ) मडळ, पक्ष, प्रागतिक पक्ष, हुजूर ( कॉन्झर्व्हेटिव्ह ) पक्षाच्या उलट ०मतवादी–वि सुधारणाप्रिय लोक, प्रागतिक, (इ) लिबरल ' सर्व प्रकारची चौकशी करण्याकरिता लॉर्ड डरहॅम या उदारमतवादी मुत्सद्द्याची रवानगी करण्यात आली ' –वस्व ६४ ०लक्षण–वि १ उठावदार रुबाबदार, मर्दानी ( चेहरा, लक्षणें ) २ भाग्यशाली, मोठेपणाचीं (लक्षणें,चिन्हें) ०शिक्षण–न उदारपणाचें शिक्षण, ज्यामुळें मनाचा विशेष विकास होतो व बुद्धि व्यापक होते असें शिक्षण

उदारांग—वि ( उप ) प्रशस्त शरीराचा, तुंदिलतनु, लठ्ठ, भव्य शरीराचा [ उदार+अग ]

उदाराचें पोतें—न दुसऱ्याची मालमत्ता चैनीनें व सढळ हातानें खर्च करणारा मनुष्य, हलवायाच्या घरावर तुळसीपत्र ठेवणारा

उदारीव—न उदारपणा –तुगा २२७४ (–शर)

उदावर्त—पु एक आतड्याचा रोग, पोटातील आतड्यामध्यें निरोध वायूमुळें होण्याऱ्या वेदना, रोग ( वाईट प्रकारचें अन्न सेवन केल्यामुळें हा रोग होतो ) [ स ]

उदावादा—पु पूर्णत्व, प्रकटपणा ' पैं प्रासुनि आपली मर्यादा । एक करीत नदीनदा । उगी कल्पांतीं उदावादा । एकार्णवाचा ॥ ' –ज्ञा १५ ५३२ ' तैशा चतुर्भुजीं उदावादा सगुण देखोनि गोविंदा ' –एभा ११ १४०५ –त्रिवि सढळपणें, उघडउघड ' म्हणोनि इंद्रियें तेचि सपदा । वेचिताही उदावादा । ' –ज्ञा १३ १०५ [ स उदयवादित्व ? ]

उदास—वि १ दुःखी, खिन्न, निरुत्साही, कष्टी ' झाला कठस्फोट आळविता । उदास आता न करावें । ' –तुगा ७०९ २ बेपर्वा, निष्काळजी बेफिकीर, तटस्थ ' तरि जो या देहावरी । उदासु एसिया परी । ' –ज्ञा १३ ५९३ ' का अदृष्ट जालिया उदासु । ' –ज्ञा १८ ४९६ ३ निस्पृह उपेक्षाबुद्धि, निरपेक्ष ४ विरक्त, निःसग, निर्विकार केवळ पापीहि प्रस्तावले । उदासपथ देखोनिया । –सप्र १२ १४ ५ व्यर्थ, फुकट ' तुका म्हणे माझी पुरवावी आस । विनति उदास करूं नये । ' –तुगा ८२८ ६ ओसाड, निस्तेज, निरानद भयप्रद ( भयाण जागा, गाव, घर ) –पु एक गोसाव्याचा पथ उदासी पहा [ स उद्+आस्=बसणें ०वचन–न खिन्न मनानें केलेलें भाषण ' उदासवचनें ऐकोनि सत्वरी । अश्रुपात नेत्रीं वाहती ॥ ' ०स्थिति–स्त्री निष्काळजीपणाची वृत्ति बेफिकिरी, खिन्नता

**उदासणें**—अक्रि उदास, खिन्न होणें 'मर्दी पादीं भल्लात खुण्टित गुणव्याचा जीव उदासण '-अफला ६८

**उदासन**—न उदासीनता, वेपर्वाई 'जेतुके कष्ट मज भोगलें। जे इनिप्सात साहिले ॥ तेया होउनि अधिक आहाले। उदासन तुझें ॥'-त्रिपु १ १४ ११२

**उदासनी**—स्त्री उदासपणा 'चरणीं लागली उदासनी मना ॥'-दावि २१६

**उदासी**—वि निराश, खिन्न, निष्काळजी, बेफिकीर उदास पहा 'तव करिती अरण्यवासी। त्यासी करितोगी उदासी ॥'-गुच १२६ -पु १ एक गोसाव्याचा पंथ, या पंथातील गोसावी, वैरागी २ शीखाचा एक प्रमुख पंथ नानकपुत्र श्रीचंद यास मान आहे याचे चार भेद आहेत- बाबाहसन, फूल, गोंदा व अल्मस्त सर्वांनी एक सभा असून तीस धडा आखाडा असें नाव आहे हे लोक ब्रह्मचर्य पाळतात [ उदास ]

**उदासीन**—वि १ विरक्त, वीतरागी 'उदासीन जो तापसी ब्रह्मचारी ॥'-राम ५० २ खिन्न, दुःखी ३ निष्काळजी, बेपर्वा तव नाहावें यामादिवीं। उदासीन ॥'-ज्ञा १८ १५२ ४ तटस्थ, ज्यास कोणी शत्रु किंवा मित्रहि नाहीं असा, मध्यवर्ती, मध्यस्थ 'तयें देहबुद्धीचें लक्षण। मुक्दुर्कुंद उदासीन। त्रिविध त्रिगुण करी मन। देहाभिमान उपजवी ॥'-एरुस्व १३ ५१ [ सं ]

**उदासीनता**—स्त्री वैराग्य, विरक्ति 'उदासीनता तत्त्वता सार आहे ॥'-राम ७७

**उदाहरण**—१ दाखला, दृष्टांत 'अक्षरें तिसऱ्या पादीं। उदाहरण देवर्णी।'-वृत्तदर्पण ११ २ नमुना, कित्ता ३ (गणित) सोडविण्याचा प्रश्न, (सामा) प्रश्न [ स उद्+आ+हृ ]

**उदाहृत**—वि उदाहरण, दृष्टांत देऊन सिद्ध केलेलें समजावलेलें, सांगितलेलें [ स ]

**उदाळणें**—अक्रि उसळणें, उडणें, वर येणें उधळणें पहा 'तेवी सव्हळीचिया उदरा। सरसी उदाळे चंद्रिका।'-ज्ञा १५. ४९८ [स उद्+दऱ्]

**उदित**—वि १ उदय पावलेला, वर आलेला ( ग्रह तारा इ०) 'नाना उदितें ऽिवाकरें।'-ज्ञा १७ १७८ २ फुगलेला, मोठा झालेला ३ (नशीब) उघडलेला, उत्कर्ष पावलेला, अनुकूल (दैव, भाग्य) 'कोण्या काळें होईल मेलों भाग्य उदित वो।'-तुगा ११७ ४ (मनोविकार) उत्पन्न झालेला, उठलेला, प्रबल झालेला 'परि साचोकारें उदितें। प्रेमभावें।'-ज्ञा १० ११५ ५ कृत्य करावयास निघालेला, सज्ज उद्युक्त, तयार तत्पर 'युद्धा यईल विराटदळ। म्हणोनि योद्धे उदित सकळ।'-मुविराट ६ ७४ ६ कथित, सांगितलें बोललेलें (भाषण), 'घालविलें मज रायें मानुनिया मदुदितें हिते अहितें।'-मोवन १ २० [ स उद्+इ] ०कार्यें-न आकस्मिक उद्भवलेलें, अंगावर पडलेलें कार्य ०काळ-पु भाग्याचा काळ, उत्कर्ष, भरभराट

**उदिदिन**—न (शाप) एक रासायनिक द्रव्य (इ) बेंझिडाईन यापासून रंग काढतात.

**उदिन**—न (शाप) (इ) बेंझिन उज्ज (हायड्रोजन) व कर्ब (कार्बन) यांचा संयुक्त पदार्थ

**उदिपणें**—अक्रि उगवणें, उदयास येणें, निघणें, उत्पन्न होणें 'सूर्यापासूनि प्रभा उदिपे। ते प्रभाचि सूर्य केवि म्हणिपे।'-स्वादि १४१५ [ स उद्+दीप् ]

**उदिमदार**—पु उदमी, व्यापारी तों सन्निधीं येऊनि उदिमदार।'-दावि ४०९ [स उद्यम+ फा दार्]

**उदिमी**—पु व्यापारी, उदमी पहा 'वेदशास्त्रसंपन्न झाला। त्यावरि पोट भरूं लागला। तरी तो उदिमी थोर झाला।'-एभा ११ ५४८ [ स उद्यम ]

**उदिया**—क्रिवि उद्या 'आप उदिया राहूनि येथें '-दावि ३८५

**उंदिरकानी-किनी**—उंदीरकानी पहा

**उंदिरी, उंद्री**—उंदरी पहा

**उदी**—वि उदाच्या रंगाचा, पिंगट, तपकिरी 'तेथील दगड चमत्कारीक उदी रंगाचा असे '-पाव्ह ४१ -स्त्री १ उदाची राख, पिराजवळ जाळलेल्या उदाची राख प्रसाद म्हणून घेतात 'वाटुनि प्रताप श्रद्धाउदी देऊ।'-दावि ३५३ २ उदाच्या राखेची शपथ (मुसलमान लोक घेतात) ३ उदी रंगाचें वस्त्र [अर ऊद, म ऊद ]

**उदीची**—स्त्री उत्तरदिशा 'उदीची प्रतीची तथा मुख्य प्राची। दिसे दक्षिणेमाजि विश्रांति ज्याची।' [ स ]

**उदीचीन, उदीच्य**—वि उत्तरेकडील [ स ]

**उदीत**—वि उद्युक्त उदित पहा 'गेनी करून कौरवासी। विद्याभ्यासीं उदीत्।'-मुआदि ३० १४९ [ उदित ]

**उदीम**—पु १ धामधंदा, व्यापार, व्यवहार, उद्योग 'सुम्हि कांहि उदीम न करा '-पच १ ३७ म्ह० उदीम करिता सोळावारा शेत करता डाईवर भारा=व्यापारात तोटयाला तयार असलें पाहिजे, पण शेतकीचें जर केली तर डोक्यावरचा भारा खालीं उतरणार नाहीं (त्याला तयार असा) २ (व्यापक) शेतीचें उत्पन्न, पीक, धागा ईत, मळा ३ (व) उपद्व्याप, भानगड ४ (सामा) व्यवहार काम, योजना 'मग रामासि म्हणे नारद। हा उदीम जाहला फल्द। जबुद्वीपाचा तुन्ला कंद। मृपाळाचा।'-कथा २ १४ ३७ [ स उद्यम ] ०करणें-१ व्यापार, उद्योगधंदा करणें २ (ल) व्यापारात खोट येणें, नुकसान येणें, व्यापारात फसणें ०पट्टी-स्त्री व्यापारावरील सरकारी कर *०धंदा-व्यवसाय-व्यापार-पादीम-पु (सामा) धंदा, व्यवहार, व्यापार 'उदीमधंद्याचें शिक्षण'=व्यापार-उद्योगधंद्याचें शिक्षण

**उदीमी**—पु व्यापारी 'हें टाकूनि उदिम्या तोंडावरी।' —ज्ञावि २६२. —वि व्यापारभागनर्थी ( जिन्स, माल, व्यव हार इ० ) [ उदीम ]

**उदीर**—पु चोहींम्ड आढळणारा व सर्व पिकांस त्रास देणारा एक लहान प्राणी, आखु, मूषक प्राचीन भारतीय ग्रंथकारांनी उल्लेखिलेल्या उदराच्या जाती—लालन, पुत्रक, कृष्ण, हसिर, छुछुंदर, भल्म,कषायदत, कलिंग,अजित, कपिल, कोकिल इ० घरगुती, रानटी व पिकाच्या हंगामाच्या वेळीं उत्पन्न होणारे असे उदराचे तीन प्रकार आधुनिक प्राणिशास्त्रज्ञानीं केलेले आहत रह० १ उदरास मारन साप=शत्रूची मदत घेणें धोक्याचें असत, तेव्हां अशी साप घेणें व्यर्थ आहे २ डोंगर खणून—पोखरून—उंदीर काढणें=मोठे प्रयास करून फार थोडी कार्यनिष्पत्ति होणें, अचाट परिश्रमाचें अल्प फळ ३ उंदीर गेला मस्तकास पण सावकार नाहीं झाला =मोठ्या ठिकाणीं गेला म्हणून क्षुद्र माणूस काय मोठा बनतो? ०कानी—स्त्री लहान वेल हिर्वी फुलें गुलाबी रंगाचीं असून पानें उदराच्या कानासारखीं असतात ही फार उष्ण असून चीक पाचक आहे सर्पदंशावर व पुरुषत्व यण्यास फारच गुणकारी उदराच्या विषावर ह्या वनस्पतीचा रस पोटांत घेतात [स आखु-मूषाकर्णी, गु उदरकानी, व इंदुरकाणी] ०खाद—स्त्री १ उदराचा शेतास उपद्रव 'कीडखाद गोळखाद व उंदीरखाद आसमानी सुलतानी जाहाली असता व स्वारीमुळे नुकसानी जाहाली असता चौकशी वरून मजुरा घ्यावयाची चाल आहे' —हकिगत तर्फ नाते तालुके रायगड ( मसाप २ १८३ ) २ एक सरकारी कर हा सरकारी कोठारातील धान्य उंदीर खात तेवढें नुकसान भरून काढण्याकरिता म्हणून बसवीत ०खुरी—नखी—गेळ—स्त्री न १ जनावराच्या खुराच्या वर पाठीमागें जो पुढें आलेला मांसल भाग असतो तो २ ( कांहीं ठिकाणीं ) खुराचीं दोन गळें ०घाड—स्त्री उदराचा उपद्रव, उंदिरखाद ०चिंची—कर्नाटकात गणेशचतुर्थीच्या दुसऱ्या दिवशीं येणारा शूद्रांचा सण या दिवशीं रेड्या ( गोड कडबोळीं ) तळून नैवेद्य दाखवितात व तो दुसऱ्या दिवशीं पहाटे शेताच्या सीमेवर नेऊन ठेवतात उदरानीं शेताची नासाडी क० नये म्हणून हा सण पाळतात ०वासा—पु घरातील भिंतीच्या वरील भाग आतील बाजूस उतरता असल्यास छप्पर व वासा यामध्यें उदरास फिरावयास जागा राहात म्हणून तेथें असणाऱ्या वाशास हा शब्द लावितात ही जागा बहुधा उदराचा त्रास वाचविण्यासाठीं चुन्यानें भरून काढितात ०सांध—स्त्री उंदीरवासा सुळें उदराला वावरण्यास असलेली मोकळी जागा

**उदीसर**—वि उदी, तपकिरी रंगाचें [अर उद+म सदृश]

**उदुंबर**—पु औदुंबर, उंबर, एक वृक्ष [स] ०मशक—पु अंबराातील किडे —वि या किड्याप्रमाणें गर्दी असलेलें, गबे असलेलें, बुजबुजलेलें, भरलेलें

**उदें**—न ( राजा ) पाण्यातील एक जनावर ऊद पहा

**उदेंउदें**—उद्गा उदोउदो करणें, अतिशय स्तुति करणें, जयजयकार करणें उदो व उदय पहा 'उदेउदे शब्द आरोळी हो करिं कृपा।'—भजनी बोधपर पदसंग्रह ३९ [ स उदय, म उदो ]

**उदेग**—पु उद्वेग पहा 'राजिक देविक उदेग चिंता। अन्न वस्त्र देहममता॥'—दा ११ ३ ५ 'तया लागता थोर उदेग जीवा।' —राक १.१८ [स उद्वेग अप ]

**उदेजणें**—अक्रि १ उदय पावणें, उगवणें 'जमा अनेक डोलिया दिनेश हो उदेजुनी। प्रकाशनी पदार्थ ही अपार रश्मिच्या गणीं।'—हस्तामलक ९ ( शिवरामकृत ) २ उत्पन्न होणें 'अरिष्टें उदयिजेती काळें।'—मुआदि २६ ९८ [स उद्+इ—उदय]

**उदेणें**—अक्रि ( काव्य ) १ उगवणें, उदय पावणें 'जो उदेला गावसीं खाय। दोहीतें यया॥'—ज्ञा १५ ४७३ २ उत्पन्न होणें, बाहेर निघणें 'अहा हो हें पाहा, अमृत मथिता तें विष महा, उदेलें।' 'हाणीतसे फडफडा ध्वनि हो उदेला।' —नल ९० ३ नशीब फळफळणें, उत्कर्ष पावणें 'अघटितघटणेनें दैव त्यांचें उदेलें।'—सारुह २ ११२ [स उद्+इ]

**उदेंती**—स्त्री ( गो ) उगवती, पूर्व दिशा [ उदित ]

**उदेयांचा**—क्रिवि १ उजाडताचा, सकाळचा ०विधि—पु प्रातर्विधी 'उदेयाचा विधी सारोनी।'—शिशु २३० [ उदय ]

**उदेल**—न उदाचें तेल, अर्क [ उद+एल=तेल ]

**उदेव—वो**—पु ( गो ) उदय पहा 'सुर्य उदेवो वरी तेयोनि।'—शिपु ११८५

**उदेवणें**—अक्रि ( गो ) उदय पावणें, उगवणें पहा [उदय]

**उदेसलिफ**—पु मुईकोहळा —मुग्या ११३ [ अर ]

**उदैं**—क्रिवि उद्या 'उदै करील अयोध्याप्रवेश।' —कृमुरा ७३ ९० [ उदय ]

**उदैजणें**—अक्रि उगवणें, उदय पावणें, उदेजणें पहा 'उदैजणें केतूचें जैसें।'—ज्ञा १६ ३१९ 'का विजूचें उदैजणें। तोचि अस्तु।'—भमू ४९ [स उद्+इ—अय—उदय]

**उदैणें**—अक्रि १ उदेणें, उगवणें 'तव उदैला दिनकरु।' —दाव ३१६ २ उत्पन्न होणें 'काई सायास उदैलें। तें नाण वेना॥'—शिशु ११५ [उदणें]

**उदो**—पु १ उदय तव उदो जाला दीनकरु।'—उषा २८१२ २ प्रादुर्भाव, उत्पत्ति ३ विजय, उदयोस्तु जागी हो। असा शब्द, आनंदाची आरोळी उदय, उदे उदे पहा 'प्रपंचगोंधळाचेनि हरिखें। उदो म्हणानी नाचती॥'—एरुस्व ११ ६० नाहीं जाळीत भणदी। उदो म्हणोनि आनंदी।'—तुगा १८१६ ०उदो करणें—टिमकी वाजविणें, खुशामत करणें, मोठेपणा देणें, स्तुति करणें [स उदय, का उदु=जागी हो यामधी नैवेद्याच्यावेळची हाक]

**उदो**—पु नाश 'सुखाचा उदो केला। गोंधळ घाला दरिद्रें॥'–तुगा ४०९ गोंधळ घालावयाच्या वेळीं दिवटी पाजळून तल वगैरे जाळतात व उदो उदो म्हणतात या नियम उद्देशून पेट विणें, जाळणें, नाश करणें असा अर्थ झाला असावा [ उदय ]

**उद्गत**—वि १ उगवलेला, उत्पन्न झालेला, निघालेला, उद्भूत २ वर गेलेला, चढलेला [ स उद्+गम्=जाणें ]

**उद्गदणें**—क्रि खडळणें, उसळणें, आवाज करणें [ स उद्+गद्=आवाज करणें ]

**उद्गम**—पु. उगम, मूळ, प्रारंभ, प्रादुर्भाव, जन्म, झरा (ला मेनें व शब्दश –नदी, चाल, माडण, रूढी, भाषा इ चा ) २ वर जाणें, चढणें, उडणें [ स उद्+गम=जाणें ]

**उद्गाता**—पु यज्ञातील सामगान करणारा ऋत्विज 'उद्गाता कौत्समुनी पिंगळ आध्वर्यु त्या मखीं होता।'–मोआदि ७४ [ स उद्+गै=गाणें ]

**उद्गामी**—वि वर जाणारा, चढणारा, निघणारा –स्त्री अनुमानाच्या एक भेद, दुसरा भेद अवगामी –मव्यापन १ [ स ]

**उद्गार**—पु १ उच्चार, बोलणें, तोंडातून निघालेला ध्वनि, शब्द 'साधूचे ज उद्गार त्याचीं शकुनगांठ बांधावी' २ विकार प्रदर्शन उ० क्रोधोद्गार, आनंदोद्गार, आश्चर्योद्गार वगैरे, अहाहा! वाहवा इ तोंडातून निघणारे विकाराचे ध्वनी ३ तोंडातून अगक लिप्त असा निघालेला ध्वनि, उच्चार, सहज, सुचून तोंडावाटे निघालेला विशिष्ट गोष्टीचा ज्ञापक शब्द ४ ढेंकर, ओकारी, वमन [ स उत्+गॄ ]

**उद्गारणें**—अक्रि १ उच्चारणें, बोलणें २ आवेशानें, जोरानें वाजणें, क्रोधानें बोलणें, शब्द करणें, विकारवश होऊन उद्गार काढणें [ उद्गार ]

**उद्गारवाची**—वि मनातील निरनिराळे भाव व्यक्त करण्याकरिता उच्चारलेलीं अव्ययें केवलप्रयोगी अव्ययें उ० अहाहा! अबब अरेरे! वगैरे [ स उद्गार+वच=बोलणें ]

**उद्गीरण**—न वमन, ओक, ओकारी [ स उद्+गॄ ]

**उद्गीर्ण**—वि ओकलेलें, तोंडातून बाहेर पडलेलें [स उत्+गॄ]

**उद्घाटण-न**—न १ उघडणें, खोलणें, उलगडणें, ( कपाट झाकण तसबीर, इ० ) २ फोडणें, उघडकीस आणणें, प्रसिद्ध करणें उ० मर्मोद्घाटन, गुह्योद्घाटन इ० ३ स्पष्ट करणें, विवरण करणें, चर्चा करणें [ स उद्+घट् ]

**उद्घाटित**—वि १ उघडलेला, उघड केलेला, उलगडून दाखविलेला, उद्घाटन केलेला २ स्पष्ट केलेला, विवेचिलेला [ स ]

**उद्घृष्टता**—स्त्री (संगीत) नीरस टट्घोष करणें [ स उद्+घृष् ]

**उद्घोष**—पु घोकणें, पुनः पुनः म्हणणें ( स्मरणात राहाण्याकरिता, पाठ करण्याकरिता ) २ (ल) तीच तीच गोष्ट पुन पुन्हा सांगणें, एकाच विषयावर एकसारखें बोलत राहणें ३ लोकवार्ता वदंता, लोकोक्ति, वातमी ४ दवंडी, जाहीर करणें, गर्जना ५ घोष, घोसरा, उच्चार [ स उद्+घुष्-घोष ]

**उद्दाम**—वि १ धीट, धारिष्टवान, दांडगा, साहसी २ मर्गिष्ट, उन्मत्त, मस्त, बफाम ३ जोराचा, भरजूत, टवटवीत, जोमदार (अंकुर, कलिका, पुष्प वगैरे) ४ मोठा, दमदार झळक (दागिना, रत्न वगैरे) ५ अतिशय गहिरा, तजेलेदार, चकचकीत (रंग) ६ उग्र, तीव्र (वास) ७ मोठा, पहाडी, भरदार गंभीर, घुमर (आवाज, ध्वनि) [ स उद्+दम् ] ०पणा-पु दांडगपणा, उन्मत्तपणा 'पण आमच्या मतें तें निर्भिड आहे असें म्हणण्यापेक्षा तें उद्दामपणाचें आहे असें म्हणणें अधिक योग्य होईल' –टि ३ ३५८

**उद्दित**—वि उदित, उल्हसित, शोभिवंत 'हृदयें निर्भर उद्दित। सुप्रसन्नवदन।'–दा १ २ ९ [ स उदित ]

**उद्दिष्ट**—वि १ योजलेलें, संकल्पिलेलें, मनांत ठरविलेलें, विचार करून ठाम बनविलेलें, अभिप्रेत २ विवक्षित, निर्दिष्ट, उल्लेखित, दिग्दर्शित, वर्णन केलेलें [ स उत्+दिश् ]

**उद्दिष्ट**—न ( संगीत ) इच्छित स्वराच्या प्रस्तारातील अमुक स्वरूपाच्या स्वररचनेचा प्रकार कितवा हें सांगणें [ स उत्+दिश् ]

**उद्दीपक**—वि १ पेटविणारें चेतना देणारें, प्रवर्तक, प्रोत्साहन देणारें, जागृत करणारें, मनोवृत्ति उचंबळविणारें, स्फुरण देणारें, २ (वैद्यक) उत्तेजक (द्रव्य, औषध इ०) 'रक्तचंदनादिक पदार्थ कामोद्दीपक आहेत' (इ) स्टिम्युलेटिव्ह [ स उत्+दीप् ]

**उद्दीपणें**—अक्रि चेतना होणें, प्रवर्तन होणें, प्रकाशणें 'का जागृती जव जव उद्दीप।'–ज्ञा १८ ११०४ [ स उद्दीपन ]

**उद्दीपन**—न १ प्रज्वलन, चेतविणें, पेटविणें २ प्रकाशन, प्रकाश, उजेड ३ (ल) प्रवर्तन करणें, जागृत करणें ( क्रोध, लोभ इ० विकार ) 'या चूर्णानें क्षुधेचें उद्दीपन होतें' ४ (ल) ज्यामुळें चेतना, जागृति होते असा उत्तेजक पदार्थ, उ० क्रोधोद्दीपन, कामोद्दीपन, हर्षोद्दीपन इ० ०विभाव-पु (साहित्य) साहित्यशास्त्रातील शृंगाररसाचा एक विभाव विशेष –शर

**उद्देश**—पु १ प्रयोजन, हेतु, इच्छा, मनातील कार्य, अभिप्राय आशय, मतलब 'ऐसा योगयुक्तीचा उद्देशु।'–ज्ञा ५. १६१ 'तो उद्देशु तूं नेणसीचि।'–ज्ञा ३ ३४ २ दिग्दर्शन, वर्णन, प्रकटीकरण 'उद्देशें एक दोनि। जायिजती बोलोनी।'–ज्ञा १ १०४ ३ सारांश 'म्हणोनि मागा भाव जैसे। आपुले सांगितले तुवा उद्देशें।'–ज्ञा१० १८८ [ स उद्+दिश् ] ०कारण-न (न्याय) हेतु प्रयोजन, न्यायशास्त्रातील कारणातील एक प्रकार (इ) फायनल कॉज 'प्रक्षालन हें (साबणाचें) उद्देशकारण होय'–न्यायप ७८

**उद्धृत**—वि १ पृथक् केलेला मुक्त केलेला, रक्षिलेला, वर चढविलेला, उत्कर्ष केलेला, उध्दरण पहा २ भाषांतरित, उतरून घेतलेले (वाक्य वगैरे) [स ]

**उद्बंध-न**—न टांगून देणे, लोंबकळत ठेवणे [सं उद्+बध्]

**उद्बीज**—वि एकदम उत्पन्न झालेले, आलेले (गोळ, टोळ भाड, सुरवंटांचा थवा, ढेकूण वगैरे) —न एकदम येणारा, दिसू लागणारा घोळका, थवा (सुरवंट, ढेकूण इ० चा) [व्र उद्भिज्ज]

**उद्बुद्ध**—वि १ माहिती करून दिलेला, जागृत असलेला, ज्ञान झालेला २ जागृत, उर्ज्जीवित, चेतना दिलेला, उत्तेजित ३ तात्काळ दिलेला, पुर्वसूचित, आठवण, समजावणी मिळालेला [स ]

**उद्बोध-न**—पु न. १ शिक्षण, शिक्षण, समजावणी २ सूचना, ताकीद ३ जागृति, निजून उठणे चेतना 'निराळ उद्बोधाचेनि आपणचि घडे॥'–ज्ञा ९ ९९ 'आषाढ मासीं शयन, भाद्रपदमासीं परिवर्तन, कार्तिकीं उद्बोधन। (असे विष्णु करतो)' ४ (विशेषत उद्बोध) ज्ञान, माहिती, समज, जागृति [सं उद्+बुध्]

**उद्बोधक**—वि १ सूचक, द्योतक गमक, ज्ञापक उ० दारग आल्याचे–दारीं पडलेले तृण, अनर्थाचे–उल्कापात वगैरे, राजत्वाचे छत्र, ध्वज वगैरे, ताप आल्याचे–अंग उन होणे वगैरे, मृत्यु जवळ आल्याचे–वृद्धत्व अशक्तता इ० हीं त्या त्या विषयांची उद्बोधक लक्षणें होत २ उत्तेजक, मादक, दाहक उ०–अग्नि (भिंगें), सौंदर्य (इच्छेचें, कामाचें) चावल्ल (रागा) प्रवर्तक, उद्दीपक, उत्तेजक, चैतन्यदायक [स. उद्+बुध्=जागणे]

**उद्भट**—वि १ शूर, धाडसी, बलवान्, धारिष्टवान, धैर्याचा 'राजकुमर वीर उद्भट। –सुभादि ३१.२९ २ प्रचंड, अफाट, मोठा विस्तृत आणि वाळ उद्भटें। मग उघडिला तडतडाटें।' –मुसभा ७ ७५ ३ श्रेष्ठ, उत्कृष्ट, थोर, प्रख्यात 'ते स्वगुणीं उद्भट। घडनि राज्य चोखट॥'–ज्ञा १४ २१८ ४ कठिण, कठोर खडतर 'पुराणीं उपदेश साधन उद्भट। आम्हां गोपी वाट वैकुंठींची॥' –तुगा २११९ ५ उन्मत्त उद्धट पहा [स उद्+भट]

**उद्भव**—पु १ उत्पत्ति, प्रादुर्भाव, प्रारंभ, जन्म 'भुवनाद्भवारंभस्तंभ। भवत्तम॥'–ज्ञा १८७ २ प्रकट होणे, बाहेर पडणे ३ उत्पत्ति, हेतु [सं उद्+भू]

**उद्भवणें**—अक्रि १ उत्पन्न होणे, प्रारंभ होणे, निर्माण होणे, जन्म पावणे २ प्रकट होणे (क्वचित् सकर्मक प्रयोग) [स उद्+भू]

**उद्भावन**—न १ विचार, चाळणे, सारणे २ उत्पत्ति, जन्म, उत्पादन ३ प्रकट करणे, उपस्थित करणे, प्रदर्शन ४ अनवधान, असावधान, अनास्था [स उद्+भू–भाव–भावन ]

**उद्भावणें-विणें**—क्रि १ उत्पन्न करणे, अस्तित्वात आणणे, जन्माला घालणे २ प्रकट करणे, उघड करणे [उद्+भू–भव–भाव, उद्भावन ]

**उद्भिज्ज-ज्ज-द**—न वृक्ष, वनस्पति इ० सृष्टि 'जैसीं मही ही उद्भिजें।'–ज्ञा ६.४४, –वि जमीनीत उगवणारे जमीनीतून वर येणार, अंकुर फुटणार, बाहेर पडणारे (वृक्ष, वनस्पति, इ०) [स उद्+भिद्] ०कटिबंध–पु पृथ्वीच्या ज्या भागांत वनस्पती वाढतात तो प्रदेश ०कोटि–स्त्री वनस्पतिवर्ग, प्राणिवर्गाच्या उलट 'सेंद्रियरसायनशास्त्रांत उद्भिज्ज व प्राणिज या सेंद्रियकोटींतील सर्वसाधारण पदार्थांचा समावेश होतो'–सेंपू प्रस्तावना १

**उद्भूत**—वि १ उत्पन्न झालेला, जन्मलेला २ प्रकट झालेला, निघालेला, बाहेर पडलेला, आविर्भूत [सं उद्+भू–भूत] ०उष्णता–स्त्री आपल्या स्पर्शास समजणारी उष्णता –भूगोल ३१

**उद्भेद**—पु १ फुटून बाहेर पडण्याची क्रिया (जमिनींतून अंकुर येतात त्याप्रमाणे) 'पर्जन्य पडला म्हणजे भूमींतील बीजें भूमीचा उद्भेद करून बाहेर येतात' २ विकसन, उमलणें, फुलणें, हस होणे [स. उद्+भिद्]

**उद्भ्रांत**—वि मनस्ताप पावलेला, विव्हळ, बावरलेला, गोंधळलेला, गडबडलेला [स उद्+भ्रम्]

**उद्मत**—(हप) उन्मत्त पहा [सं उन्मत्त भ्र]

**उद्यत**—वि १ तयार, सज्ज, उत्सुक, उद्युक्त, सिद्ध 'पाहिले असती उद्यत सुमायया।'–ज्ञा १ १९, २ उगारलेला, वर आलेला (सूर्य वगैरे) [स उद्+यम्–यत] ०दंड–बाहु–वि हातवर केलेला, हात उगारलेला, कडक, शिस्तीचा, कठोर (राजा, न्यायाधीश) [स ]

**उद्यम**—पु उद्योग, उद्योगधंदा, व्यापार, उदीम पहा 'जन भाग्याचिये भडसें। उद्यमाचेनि मिसें।'–ज्ञा ६ ३५४ [स उद्+यम्=प्रयत्न करणे] ०शील–वि उद्योगी, मेहनती, परिश्रम करणारा, कष्टाळु, उत्साही [स ]

**उद्यमी**—वि उद्योगी, नेहमीं कामात असलेला, मेहनती, कष्टाळु [स ]

**उद्या**—क्रिवि उद्यीक, दुसऱ्या दिवशीं [स उद्+इ, उदये–उदया–उद्या–राजवाडे–धातुमाला] ०कडे–क्रिवि उद्यां उद्यांपर्यंत 'म्हातारपुरा, बादशहाचा एक सरदार आपल्या लष्करासह चाकण–उद्याकडे ह्या बाजूनें जाणार असल्याचा सेनापतींसाहेबांना खबर लागली आहे'–स्वप १९० –चा आदितवार–कधींच येणारा दिवस=एखादी गोष्ट करावयाचें मनात नसले म्हणजे उद्याच्या आदितवारीं करू असें उत्तर धावयाचें

**उद्यान**—न बाग, बगीचा, उपवन 'नातरि उद्यानिंचा फळा। च्यूत इत्यादि रसाळा।' –ऋ ५४ 'कीं अभिनव उद्यान। विवेकतरूचें'–ज्ञा १ २८ [स उद्+या=जाणे] ०भाजन–न वनभोजन (इ) पिकनिक 'तथापि चार सहा महिन्यांतून एखाद

केलेत तरी त्याना शिष्टसंप्रदायाप्रमाणें उद्यानभोजन, खाना, चहा पार्टी वगैरे द्यावी लागत असेच ' –नवूर ७६

**उद्यापन**—न १ एखादें आरंभिलेलें व्रत संपल्यावर त्या व्रताची समाप्ति करणें, त्यासंबंधीं विधि, कर्म २ धर्मशाळा, सरोवर, अश्वत्थ इत्यादिकांचा उपयोग करावयाच्या पूर्वी करावयाचा विधि ३ (ल) गाशा गुंडाळणें, कार्यसमाप्ति, हानि, आपत्ति, अरिष्ट, संकट, कार्यनाश [स उद्+या=जाणें–यापन]

**उद्यापित**—वि योग्य विधीनें विसर्जन केलेला, विधिपूर्वक उपयोगांत आणलेला (तळें, धर्मशाळा वगैरे) [स ]

**उद्युक्त**—वि १ तयार सिद्ध सज्ज २ गढलेला, गुंतलेला [स उद्+युज्=जोडणें]

**उद्युत्कार**—वि उदय प्रकाश करणारा उद्योतकर पहा [स उद्+द्युत्=प्रकाशणें]

**उद्येल**—(कुण) उदेल पहा

**उद्योग**—पु १ काम, धंदा, नोकरी, रोजगार २ कार्य, व्यवसाय ३ खटपट, प्रयत्न, मेहनत, श्रम [स उद्+युज्=जोडणें–योग] ०चालविणें–करणें–काम हातीं घेणें कामधंदा चालविणें, सुरु करणें ०वेळ–वेळा–पुष्पी दिनमानाचे आठ भाग करून पाडलेला एक भाग हा ७॥ घटिकांचा असतो म्ह० १ उद्योगाचे घरीं ऋद्धिसिद्धि पाणी भरी=उद्योगी मनुष्यास धनप्राप्ति वगैरे होते (कों) व उद्योग आणि वैस मारया खायावर=रिकामा उद्योग उपदून काढणें

**उद्योगी**—वि १ नेहमीं कामांत गुंतलेला, गर्क असलेला २ मेहनती, कष्टाळु ३ ज्याला कामधंदा आहे असा आळशी याच्या उलट ४ (अर्थ) उपधांघी, नसतें रचाड उपस्थित करणारा 'उद्योगी माळ'

**उद्योतकर–कार–कारु**—वि पु उदयकर्ता, प्रकाशक, दीपक 'घडिलें अव्यक्ताचिया वक्षा । उद्योतकारु सूर्ये जैसा ॥ ' –अमृ ६ ७ [स उद्योत+कृ]

**उद्र**—पु ऊद, पाणमांजर, जलकुक्कुट [स ]

**उद्रस**—वि बेचव, नीरस शुष्क, शिळें, पुळचट [स उद्+रस]

**उद्राण**—न मुक्ति उद्धरण पहा पोवाडा या यात्रा उद्राण । एकल्याचा घडा पुण्य ! ' –कथा ६३ [उद्धरण अप ]

**उद्रिक्त**—वि अतिशय समृद्ध असलेले, रगड प्रमाणापेक्षा जास्त, पुष्कळ [स उद्+रिच्=अधिक असणें]

**उद्रेक**—पु १ वृद्धि, अतिशयता, वपुल्य अतिरेक २ वेग, चढ, मातता, रज, गुण (पाशवीत विकारामुळें मनुष्यनियमाना दूर टाकणारा) ३ आरंभिक ज्या लहर उमाळा (पारंभून वेग या अर्थावर प्रयोग) [स उद्+रिच्]

**उद्वर्तन**—न अप रूप–उद्वर्तन १ सुगंधि द्रव्यें लावून स्वच्छ करणें, उटणें लावणें (देवमूर्ति, शरीर इ०स), प्रक्षालन उ० करोद्वर्तन 'निर्मळा आंगोद्वर्तनें । वळावंशळे रसाएणें ॥ ' –ऋ ७७ 'क्षितिएं गोपस्त्रिया । विलेपन करिति होतिया । उद्वर्तनादि क्रिया । संपादिता । ' –रास १ २१४ २ कामावरून हाकून देणें, उच्चाटण [स उद्+वृत्]

**उद्वर्तन (ऊरु)**—न (नृत्य) नृत्यांत सुचीपाद करून मांडी वर उचलणें [स ]

**उद्वर्तनफलक**—पु तार किंवा सूत ओढण्याची पट्टी, जंत्री

**उद्वस, उद्वसु–सें, उद्वस्त**—वि १ ओस, शून्य, उजाड, निर्जन, ओसाड, उध्वस्त, रिकामा 'जगापरी उद्वस समस्त । पारुषी पडली । '–गीता २ २२७१ 'नाना उद्वसें जे वनें । '–दा ८ ५ ८ वसुधरा उद्वस आजि झाली । ' –सारुह ३ ३५ २ (राज्य) अस्ताव्यस्त, अव्यवस्थित घोटाळ्याचा, गोंधळ झालेला (व्यवहार, काम) ३ व्यर्थ, फुकट 'नातरी पाहावया दिवसु । वातीचा कीज सोमु । तेव्हढाही उद्वसु । उदयु पडे ॥ ' –अमृ ६ २९ 'शापसभा नर्मी हरिली । त्यापुढें सुरधामें उद्वस वाटलीं । ' –नं ३९ ९० [स उद्+वस्–व्यस्त]

**उद्वस्कंध**—पु सप्तस्कंधातील सूर्यमंडळापासून चंद्रमंडळापर्यंत ज्याची मर्यादा असा तिसरा स्कंध –ह्यो [स ]

**उद्वाचन–उद्वाहन**—उद्वर्तन पहा

**उद्वासन**—न १ मूर्तीत स्थापित केलेल्या देवतेचें विसर्जन, उत्थापन २ काढून टाकणें (अधिकारापासून), उच्चाटण [स उद्+वस् प्रयोजक ]

**उद्वाह**—पु विवाह, लग्न [स उद्+वह्=नेणें]

**उद्वाहित**—वि विवाहित [स ]

**उद्वाहित(कटि)**—स्त्री (नृत्य) नृत्यामध्यें दोन्ही पायाच्या चवड्यावर उभें राहिल्यानें वर उचललेली कंबरेची स्थिति, लग्नमागणार्‍याचें चालणें दाखविणें व नाचण्याचा भाव दाखविणें, अशा वेळीं हा अभिनय करतात [स ]

**उद्वाहित(जंघा)**—स्त्री (नृत्य) नृत्याच्या वेळीं मधापाद करून स्थानक घेणें वर उचलली जाते ती स्थिति

**उद्वाहित(वक्षस्थल)**—न (नृत्य) नृत्यामध्यें दोन्ही पायांच्या चवड्यावर उभें राहिलें असतां वर शरीराचा भार उचलून धरला जातो तेव्हां साहजिकच वक्षस्थळहि उचललें जातें ती स्थिति जांभई देणें विब्बोकाचा भाव वगैरेच्या वेळीं हा अभिनय करतात [स ]

**उद्विग्न**—वि उदास, खिन्न, अस्वस्थ दु म–स्कट–भयग्रस्त, त्रासलेला । ज्यास चिंताक्रांत, विवण, व्यग्र, त्रस्त, उद्वेग पावलेला [स उद्+विज्=भय पावणें]

**उद्धृत**—वि धर्मबाह्य, अशास्त्र वर्तन करणारा, मद्गल्लेला, उच्छृंखल, दैनी, अविचारी, स्वैरवर्तनाचा, निसवलेला, अगम लेला [स उद्+वृत्त]

**उद्धृत, उद्धृतांशु**—उन्मडलाशु पहा

**उद्धृत (आकाशचारी)**—न (नृत्य) पाय अर्चित करून दुसऱ्या पायात अडकवून घेऊन मग मांडीला टाच लागेल अशा प्रकारें दुसऱ्या मांडीला त्या पायानें निळखा घालणें, अशा स्थितींत शरीर वर उचलून वरच्यावर गिरकी मारणें व तो पाय खाली टेकणें (म्हणजे दुसरा पाय गिरकी घेताना फिरेल)

**उद्धृत (करण)**—न (नृत्य) हातापायासकट सर्व शरीर पुढें फेंकू। उडी मारता मारता वरच्यावर सर्व शरीरास गिरकी देणें [स]

**उद्धृत (संयुत हस्त)**—न (नृत्य) हात हसपक्ष करून वक्षिप्रदेशापासून आतील बाजूनें आरंभ करून एकमेकाला वेढा घालणें.

**उद्धृतक (अंगहार)**—पु (नृत्य) उजवा पाय नूपुर करणें व हात मकराख्य करून दोन्ही बाजूस लोंबत सोडणें, नतर दोन हातानीं विक्षिप्तकरण करून तें सूचीहस्त करणें व निक फिरविणें दोनवेळां स्वाहात करून कटिच्छिन्नकरण करणें

**उद्वेग**—पु उद्विग्नपणा, खेद, अस्वस्थता, खिन्नता, कटाळा, काळजी, भीति, दु ख यापासून त्रास 'जयासी उद्वेगु नाहीं चित्तीं।' —ज्ञा २ २९४ 'विसर कामाचा तुका म्हणे झाला। उद्वेग राहिला। जावें यावें ॥'—तुगा ७५ [स उद्+विज्=दु खी होणें]

**उद्वेगणें**—अक्रि उद्विग्न होणें, खिन्न होणें, अस्वस्थ होणें यरी म्हणे उद्वेगीज। अन्ययो काहीं दिसताहे।' —मुआदि ९ ७५ 'मज हासतील ते रात। जिहीं देखिलेति मूर्तिमत। म्हणोनि उद्वेगलें चित्त। अहाच भक्त ऐसा दिसे ॥' —तुगा ७१६ [स उद्+विज्]

**उद्वेप**—पु उपद्याप 'दहींचा सोडोनि। खटाटोप। शिरें धरिला दाघक कोप। करा मग्नुद्ध उद्वेप। लाजवस्थमाल।' —कथा ७ ८ ५

**उद्वेष्टित(अंगुलि)**—स्त्री (नृत्य) एका हातानें दुसऱ्या हाताच्या तर्जनीपासून आरभ करून त्या हाताच्या बाहेरील बाजूनें तर्जनीच्या तऱ्हाताकडील बाजूपर्यंत हात आणणें [स]

**उद्वेष्टित(बाहु)**—पु (नृत्य) बाहूचें मनगट वाटोळें फिरविणें म्हणजे सर्व बाहु फिरला जातो अशी स्थिति

**उद्स्तभाम्ल**—न (शार्प) (इ) हायड्रोब्रोमिक ॲसिड

**उधई**—स्त्री पाढरी मुगी, वाळवी या मुग्या जमिनींत वारुळें तयार करून किंवा भिंती तुळयावर घरें करून राहतात 'उपयाची खादतें शरीर। वरते उगवले तरुवर। तव्हां अस्थिमय प्राण साचार यास्तव न मरे सर्वथा।' —सवि १० ११६ [स उद्=वर+इ= जाणें, सिं उडोही, गु उधाई]

**उधट, उधंट**—वि उद्धट पहा 'उधंटेआ देवा जगद्गुरू।' —शिशु १५४ 'ज्या साधुसा वर्तती गे उँधटा।' —सारुह ७ १२८ [स उद्धत]

**उधड-डा**—वि उक्ता, विन हिशोबी, अंदाजानें 'जमादारास रागवड खर्चाबद्दल दरमहा १ रुपयाप्रमाणें उधड देण्यात यावा.' (बडोदें) पहिलवान कुस्ती नियम ८

**उधड**—पु (व) ठेका, मक्ता ॰घेणें-मक्त्यानें घेणें ॰माप-न अदाजी वजन, माप, हिशेब, उक्तें माप [स उद्+धृत, प्रा उध्दड?]

**उधडणें**—क्रि १ उसवणें, उकलणें, फोडणें २ (साल, काठ वगैर) फाडणें, चिंधड्या, चिरफळ्या करणें 'मधें उधडिला तडतडाटें।' —मुसभा ७ ५५ ३ (ल) धुडकावणें, हाकलणें, उच्चाटन करणें 'उधडिला सिंह कोल्ह्यानीं।' —समासगीति ८१ ४ (व) (चाभारी) मेलेल्या जनावराचें कातडें काढणें 'महारानीं तें जनावर उधडलें' [स उद्+धृ-प्रा उध्दडन, म उ+घड, हिं उधड़ना, म उद्धरण=उधडणें]

**उधणी, उधवणी**—स्त्री गवाक्ष, द्वार, धारें, धुराडें [स उद्+धृ]

**उधम**—न (माळवी) गडबड, कल्ला, दगा [हिं ऊधम]

**उधमणें**—अक्रि उकळी येणें, बुडबुडे येणें [स उद्+ध्मा]

**उधर**—क्रिवि (खा) सरसकट, उघड —भाने ७ १४

**उधरण**—न भेट, आहेर 'उधरण सर्वी आणि द्राक्ष फळें बहुता प्रकारें। रामापुढें ठेविताती सकळिक पवानें सारें।'—व ६२९ [स उद्+हृ, उध्दरण]

**उधरण**—उक्रि १ ओकणें, ओकारी येणें 'मळा उधरतें' २ उध्दार करणें 'जना उधरी नाथ लोकत्रयाचा।'—राम ३५ [स उद्+हृ-उध्दरण]

* **उधरागति**—स्त्री उद्धारगति, मोक्ष, मुक्ति 'नरदेही येऊन सकळ। उधरागती पावले केवळ। येथें सगयाचें मूळ। खडोन गेलें ॥' —दा १ १० २० ॰जाणें-मोक्षाप्रत जाणें, मुक्त होणें [स. उद्+धृ-उध्दार+गति]

**उधर्ता**—वि उध्दाता, उध्दारकर्ता 'भूतें भूत धर्ताचि धर्ता उधर्ता।' —राक ११ [स उद्धृ]

**उधवटा**—वि कठिण, उधट पहा 'देव्हुडिया। वेणिआ उकहैलिया। उधवटा गार्गी सुटलिया॥' —शिशु ७१६ [स उध्दत, म उधट]

**उधवणी**—उधणी पहा 'उधवणीयें जेवीं तोंड। उगळी धुवाचे उमड।' —ज्ञा १६ २९३

**उधवर्णे-विणें**—उक्रि १ उसळणें, वर येणें, जाणें, होणें, करणें 'नेदिजेचि सगुती। माथा उध।' —ज्ञा १४४९ 'मातरी

पडवानउ सांडवला । प्रत्याते पोसला । सागर शोपुनि उध वला । अवरासी ॥' -ज्ञा १९० -एभा ५ २०६ २ वाढणें 'मग तो न सारे जैसा उधवला ।' -ज्ञा ३ २०४ ३ उद्गम वणें 'तैसिया सर्वांगीं उधवती अंगिया । रोमांचिया ।' -ज्ञा ६ २६४ ४ वर जाणें, उठणें, पसरणें 'सागे भुवनत्रया माजळी । जे गगनामाजि उधवती ।' -ज्ञा ४ १७६ ५ उभें करणें, उचलून ठेवणें (जातण, पाणी इ०), नीट ठेवणें [स उद्+भू-धव]

उधवणें—उद्वणें पहा

उधळ—स्त्री अवास्तव खर्च, बहुमार खर्च, उधळणी [ म उद्+धूल ] ०खोर-पट्टया-पांच्या-माणक्या-माथळ्या-वाढ्या-वि अति खर्च करणारा, उधळ्या, बेसुमार, बेदाद, शास्ती बाहेर, निष्कारण खर्च करणारा ०ठक पु (कुर्तीनें) उजळटक पहा ०पट्टी-स्त्री १ मनस्वी खर्च, फाजील, निष्कारण व्यय २ (कुर्तीनें) सरडणी पहा (नि० काढणें) ०भवानी-मावशी-स्त्री खर्चिक स्त्री, उधळी ०माणकी-माथळ-स्त्री उधळ, उधळणी म्ह० उधळमाधळ धाल गोंधळ

उधळण-णी—स्त्री उधळणें, वर फेकणें, टाकणें, उडविणें 'जटाधारी रीळा उधळण चिताभस्म शयनीं ।' -दावि २२४ 'विभूतीनें उधळण शितिकंठ नीळा ।' -शंकराची आरती [स उद्+धूलन]

उधळणें—सक्रि १ वर फेकणें, उडवणें, पसरणें (धूळ, गुलाल, राख वगैरे) २ मारणें, मारा घालणें ३ (ल) पळवून लावणें, दाणादाण करणें, दशदिशा करणें, हाकून लावणें, पिटाळून देणें (सैन्य, गर्दी वगैरे) ४ अतिशय खर्च करणें, उधळपट्टी करणें 'हा काय पैसा उधळतोस !' ५ (सामा) नाहींसें होणें, जाणें 'अहो या लोहाचा जिनस परिसेंसीं जरि मिळे । तयाच्या स्पर्शे अखिल मग लोहत्व उधळे ।' -सारह५ ६२ -अक्रि १ दशदिशा पळणें (सैन्य, समाज वगैरे) 'शिकारीला गेलेलें स्त्रीसैन्य उधळ लेलें दिसतें ' -वाय ४ २ २ अनावर होणें, बुजून पळणें (म्यालेला घोडा, बैल वगैरे) 'घोडा माक्ला सुस्त की सारखा उधळतो ' ३ ऊगाडणें, भटकणें, फिरणें (मूल वगैरेनें) 'हा दिवसभर गावात उधळतो व रात्रीं घरीं वतो ' ४ आवेशानें एखादी क्रिया करणें (मारणें, शिव्या देणें वगैरे) ५ जोरानें बाहेर पडणें, वळावणें (एखादा रोग) ६ बुडणें अनिवात नाश होणें (पीक वगैरे) ७ पडून जाणें, नाहींसें होणें (एखादें फूल, भाडेकरी वगैरे) [स उद्+धूल्, उध्दूलन] उधळा घालणें-१ उड्या मारणें, हैदोस घालणें, दांडगाई माडणें २ पळवून लावणें, (मनानें, जादूनें वगैरे)

उधळवाफ—स्त्री १ ओल कमी झाल्यामुळें पेरण्यास अयोग्य अशी जमीनीची स्थिति, किंचित कोरडेपणा २ पेरणीचा हंगाम गेल्यानंतरचा काळ, एनवाफ, घातवाफ याच्या उलट [उधळणें+वाफ]

उधळा—पु उधळण पहा 'कनकेसहस्र क्चोळा । वीजे परागाचा उधळा ।' -शिशु ५८१.

उधळ्या—वि पुष्कळ खर्च करणारा, उडव्या पहा 'धर्म करी त्याला उधळ्या म्हणती । न केल्या सोसी पोटपोशा ॥' म्ह० (व) उधळ्याचा [illegible]

उधाइणें—न [illegible] 'म्हणोनि आळविला तव योगश । उधाइणे हा ॥' -ज्ञा ११ ४५२ [स उद्+भू]

उधांग—न (व) उमत, अवकाश 'जरा उधाग पड्द '

उधाण-न—न १ अमावास्या-पौर्णिमेला येणारी मोठी भरती, पूर्ण भरती, समा 'भरलें रतिसागरीं विपय उधान । वरू कुचवर करीं अविधान ॥ -प्रला १३६ २ (सामा) भर, ऊत 'बादशहाचा हा गळेकापू प्रकार पाहून मराठ्या दहातल्या एक्कणएक धमन्यातील रक्त सारखें उधाण घावत आहे ' -स्वप ७६ ३ पशूच्या विशणीं लिहुन येणारें कामोद्दीपन ४ तारुण्याचा भर ५ भरभराट, उत्कर्ष वगैरे [स उत्थान, प्रा उट्ठाण, सिं उथणु]

उधानाचें पाणी-न पौर्णिमा-अमावास्येस येणारी मोठी भरती

उधाणें—क्रि वहरणें, प्रफुल्ल होणें, विकसणें, बहर येणें 'जैय पत्रें प्रेमा मोददती । आनंदमकरंद उधाती ॥' -ज्ञाप्र ४१२ [उधाण]

उधानणें—अक्रि १ तारुण्याच्या भरात येणें २ भरती येणें [उधान]

उधानु—वि (नदभाषा) तीन उदात्त पहा 'उधानु काटी वरी चोपड्ची आस । नवरा राजस मिरवनसे ॥ -तुगा ४४५९ [नदभाषा]

उधार—पु १ पतीवर किंवा खात्यावर आणणें, आणलेला जिनस 'मन उधार न घालावा सनिधानाचा ।' -माए १४५ २ ऋण, कर्ज, पतीवर आणलेल्या मालाबद्दलचें येणें-देणें 'याचा घरी विधन द्दु उधार साचा ' -सारह ८ १३१ ३ बिन व्याजी कर्ज, उसनी आणलेली रक्कम वस्तु -वि अवकाशाचा, वायदाचा विलवाचा 'तारीनम्हणता उधारू । बोलीं दिसताह उदिरू ॥' -एभा २३ ९२८ समार म्हणजे सर्वच स्वार । नाहीं मरणास उधार ॥' -दा ३ ९ १ -क्रिवि पतीवर, जबाबदारीवर (देणें, घेणें आणणें वगैरे) [स उद्+आ+ऋ, किंवा उद्+धृ] म्ह० १ उधाराचें पोतें सव्वा हात रितें २ उधार आणि अधार (उधारीनें घणधात मनुष्य फसतो याअर्थी) ३ (व) उधाऱ्याचा पुधार खाल्ल्यावरालीं अधार (कोणी औदार्याच्या मोठमोठ्या बाता मारीत असल्यास त्याला म्हणतात) ०पट-पु पतीवर माल घेत ल्या गिन्हाइकाची नोंद, उधारीची यादी ०पाधार-पु पतीवर माल आणि कर्ज देणें, घेणें, उधारीचा व्यवहार [उधार द्वि] ०बोलणें-न वर वर बोलणें 'काहीं कल्पिमी स्नेहो । उधार बोलणें कृत्रिम स्नेहो ॥' -मुरुशु १२९

**उधारा**—वि. उताणा; तोंड वर केलेला.

**उधारा**—(गो.) उतारा.

**उधारी**—स्त्री. कांहीं मुदतीने पैसे देऊं करून माल नेणें, उधार करदार, उधार; उसनें; उचापत, ऋण. [उधार]

**उधावणें**—अक्रि. उद्भवणें; धावणें; जोर येणें. उधावणें पहा 'अभिरांचि विरहज्वरम् । उधावतु दिसे ॥' -शिशु ८३२. [सं. उद्+धृ-धाव्]

**उधाळा**—पु. १ खोल्यांत कांहीं उधळून गेलें असतां होणारी स्थिति; उधळणें, धुरी. 'मज गेगा पडला मोहाचा उधाळा ॥' -भाए ३८८. २ मुष्टी, रास; भस्म. 'पाणी रुपाचा उधाळा।' -भाए ३६०. [सं. उद्धूलि]

**उधाळी**—स्त्री. उडी. (क्रि० मारणें)

**उधी**—स्त्री. निर्णय. -शर.

**उधृता**—स्त्री वर धरलेली, एक खगामाचा प्रकार. -अश्वप १८५ [उद्+धृता, अप]

**उधेल**—वि गचलें, वण असलेला. ०तोंड-न. देवीचे वण असलेलें तोंड.

**उधोपानस्थ**—पु मोटीवाला. 'पायरून उधोपानस्था आणोन।' -रामदासी २ ३२.

**उध्वस्त**—वि अस्ताव्यस्त, उधळलेला; इकडेतिकडे पसरून टाकलेला, नाश केलेला [स]

**उनंत**—वि थोर, मोठा, उन्नत. 'जुन्हा लागौनी उनंत।' -उषा ८०७ [सं उन्नत]

**उननी**—न (व) आधण आलेलें पाणी [सं उष्ण+वन-वर्णी]

**उना-नी**—वि (गा) आला-ली [हिं आना]

**उनाइलें**—(मिरी) ऐकून 'तिथाव बेनीहीं आरडूलें उनाइलें शिपायाल आल्योंक .. त्यानें दोघींचें म्हणणें एकून शिपायास सांगितलें कीं ..'

**उनाड**—वि १ अनिर्बंध, भटक्या, मोकळा सुटलेला, स्वैर (मनुष्य, मूल) २ जंगली, रानटी (बैल, वनस्पति वगैरे) ३ (कों.) आळा नसलेली, स्वैर, व्यभिचारी (स्त्री) -क्रिवि. १ स्वैरतेनें, अनिर्बंधपणें, स्वच्छंदपणें (भटकणें) २ आपोआप, न लावता (उगवणें) [स. उद्+नद्, नाद्, प्रा उनाडिय=हर्षद्योतक आवाज उद्नादि;क्रा उडिग=आईबापाविरहित मुलगा] ०चाळा-पु स्वैरवर्तन, मोकळेपणा, आळसपणा, उनाडकी. ०झाड-न रानटी, जंगली झाड; तण. ०वाहुला-वि भटक्या, उनाडक्या करीत फिरणारा; स्वैर, स्वच्छंदी. ०भार्जा-स्त्री. जंगली माठ ०मैना-स्त्री स्वैरिणी स्त्री.

**उनाडकी**—स्त्री. उनाडचाळा, उडाणटप्पूपणा.

**उनाडणें**—अक्रि स्वैरपणानें फिरणें; भटक्या मारणें; मोकळा करीत फिरणें; उनाडक्या करीत राहणें. [उनाड]

**उनारणें**—सक्रि. (व.) भाजलेल्या कणसांतील दाणे चोळून काढणें.

**उनारी**—स्त्री. (व.) पेरण्याच्या वेळीं गव्हाचे किंवा ज्वारीचे दाणे चाळण्यास एका विवक्षित रमानें गोळण्याची क्रिया.

**उनिद्रिया**—वि. जागृत. 'उनिद्रियाचें पहुडणें। निरोधाचें वेल्हावणें ॥' -राज्ञा १२.६४. उन्निद्र पहा. [सं उन्निद्र]

**उनून**—वि. गरम; कुस्करून उन्ह, सूप तापलेलें, उन्हून पहा. [ऊन+ऊन] म्ह० उनून पाण्यानें घर जळत नाहीं=निंदा, अपशब्द, धाक हीं किती हि मोठीं असलीं तरी त्यामुळें कांहीं मरत नाहीं.

**उन्नत**—वि. उंच, उच्च; श्रेष्ठ [सं. उद्+नम्]

**उन्नत(पार्श्व)**—पु (नृत्य) नृत्याच्या सुरवातीस केलेल अमतो जो पार्श्वभाग वर जातो तो.

**उन्नत(मान)**—न. (नृत्य) उंचावरील पदार्थ पहात असतां होणारी मानेची स्थिति.

**उन्नत, उन्नतांश**—नपु (ज्यो) खस्थ पदार्थाचें क्षितिजापासून होणारें जें कोनात्मक अंतर तें. [सं.]

**उन्नति-ती**—स्त्री. १ उंची. २ थोरपणा, मोठेपणा; अधिकार ३ उत्साह. 'कांपरिसु जालिया हातीं। लोहालागीं मर्मसंपत्ति। चेविता ये उन्नती ॥' -ज्ञा १८.६००. ४ उदय 'दिवसाचिये उन्नती। भानु जैसा ॥' -ज्ञा १७.१३३ ५ वृद्धि; उत्कर्ष, आधिक्य. 'ते कथेची संगति। भावाची गंवति। रसाची उन्नति। म्हणिपेल पुढां' -ज्ञा ८.२१०. 'तेणहीं दोन गुण सांगती। मग एकपरी उन्नती ॥' -ज्ञा १७५७. ६ (ज्यो.) उन्नतांश पहा. ७ उद्धटपणा. [सं. उद्+नम्-नति]

**उन्नत्र**—न. उज्ज व नत्र यांचें संयुक्त द्रव्य (इं.) हायड्रोझीन.

**उन्नद्ध**—वि गर्वानें फुगलेला. 'सवंदेत जरासंध। शाल्वपौंड्क उन्नद्ध ॥' -एरुस्व ५.३७. [सं. उद्+नह्-उन्नद्ध]

**उन्नयन**—न. वर नेणें; उचलणें; दूर नेणें; तर्कविणें. [सं. उद्+नी]

**उन्नावो, उन्नाह, उन्नाहो**—पु वृद्धि, वाढ, भरती. 'काय प्रलयाबुचा उन्नाहो। बोधु मानी ॥' -ज्ञा १८.४१३. [सं. उद्+नी-नय, उन्नाह=उंची]

**उन्निद्रा**—स्त्री. जागृति [सं. उद्+निद्रा] **उन्निद्र**-वि जागा. 'उन्निद्रियाचें पहुडणें।'-ज्ञा १२.६४. **उन्निद्रित**-वि जागृत. 'उन्निद्रितें एकें निद्रितें।'-ज्ञा ११.१२८.

**उन्का**—पु रोजचा शिधा, भत्ता, अडेथ्री; रोजमुरा 'तित क्यास चार मास मिथान उन्के चालविले' -चित्रगुप्त [अर. उद्फा=शिधा, भत्ता.]

**उन्मंडल**—न विवक्षित स्थळींच्या मध्यान्हरेखापातावे क्षितिजाला त्या स्थळाचें उन्मंडल म्हणतात –सूर्य १६ [स] ०शंकु-पु सकाळीं सहा वाजता सूर्याच्या उन्नतांशाची भुजज्या

**उन्मत्त**—वि १ गर्विष्ठ, उद्धट, मस्त, माजलेला, दाडगा, रागीट २ धुंदींत असलेला, निशा चढलेला, भिनलेला, शुद्धि गेलेला (मद्य इ०च्या सेवनानें) [स] ०द्रव्य-न मर्यादि मादक पदार्थ 'का उन्मत्तद्रव्य सेविलें। तेणें अनेक भासों लागलें ॥' –दा १० ६ १५ ०भैरव-पु एक मात्रा, रसायन ०वायु-पु भ्रम, उन्मादवायु वेड, वडवड, एक वातविकार

**उन्मत्त(करण)**—न (नृत्य) उजव्या पायाचीं बोटें आकुंचित करून तो टाचवर उभा करणें, हस्तपक्ष हात फिरवून उताणे करून व बाहू पसरून ठेवणें [स]

**उन्मन**—वि १ लीन, परमेश्वरचिंतनात निमग्न, उन्मनी अवस्थेंत असलेला 'तुका म्हणे मन उन्मन जों होय। तोंवरि ह सोय विधि पाळीं।' –तुगा २७८ २ विरक्त [स उद्+मनस्]

**उन्मनी**—स्त्री जागृति, स्वप्न, सुषुप्ति आणि तुरीया याहून पलीकडील जी पाचवी अवस्था ती, ह्या अवस्थेंत वृत्ति मायेच्या उपाधीपासून मुक्त होऊन ब्रह्माच्या ठिकाणीं लीन होत, परमेश्वराच्या ठिकाणीं लय, तद्री 'उन्मनी ते निवृत्ति जाण। जेथ विरे जाणपण। विज्ञान तें।' –दा ७ ४ ५० 'कल्पनेची स्फुरी नाहीं। मन निमग्न चैतन्यडोहीं। स्वरूपावाचुनी नाठवे कांहीं। तेचि उन्मनी ॥' –निगममार ८ २६ [स उद्+मनस्]

**उन्मळण**—न उपटून पडणें, उन्मूलन 'अगवायो सुटला तणें द्रुमा। मार्गी उन्मळणें जालीं।' –ऋमुरा १४१ [स उद्+मूलन]

**उन्मळणें**—उक्रि १ उपटणें, समूळ उच्छेद करणें 'गळा बांधूनिया उखळासी दावें। उन्मळी त्या भावें विमळार्जून।' –तुगा २० २ भडभडून येणें, कळमळणें, मळमळणें [स उन्मूलन]

**उन्मळणें**—क्रि उमलणें, उघडणें, विकासणें, फुलणें उन्मिळणें पहा तिय उन्मळिता मावळे। नवलावा।' –अमृ ७ १८४

**उन्मळित**—वि उघडलेलें, विकासलेलें 'पाहिलें टाटस्थ उन्मळित लोचन।' –तुगा ११७ [स उन्मील्, उद्+मीलित]

**उन्माद**—पु १ गर्व, ताठरपणा, उध्दटपणा, माज (विद्या सर्पात्त इ० यांचें) २ धुंदी, बेशुध्दि, कैफ (मादक पदार्थामुळें येणारा) ३ भ्रम, वेड, वातविकार [स उद्+मद्=माजणें] ०वायु-पु उन्मत्तवायु पहा

**उन्मादक**—वि कैफ आणणारें, गुंगी आणणारें, मादक [स]

**उन्मादणें**—क्रि उसळणें, वर येणें, वाढणें राघवणी चुरी पुढें। पाह उन्मादती घातवेड।' –ज्ञा १३ ५६२ २ उन्माद येणें [स उन्माद]

शको १ ४९

**उन्मान**—न १ वजन करण्याची क्रिया, वजन करणें २ वजन, भार (वस्तूचें), माप ३ वजन करण्याचें प्रमाण, माप, वजनें (मण, शेर, तोळा, इ०) ४ वजन करण्याचें साधन (तराजू, काटा) [स उद्+मा=मापणें]

**उन्मिळणें**—अक्रि विकासणें, उघडणें, फुलणें उन्मळित पहा [स उन्मीलन]

**उन्मीलन**—न १ उघडणें, उमलणें, विकासणें, फुलणें 'जेथ उन्मीलन होत आहे। दिठी।' –ज्ञा ११ १४१ २ प्रगट करणें, दाखविणें, व्यक्त करणें, अनाच्छादित करणें 'जगदुन्मीलनाविरल कलिग्रिया।' –ज्ञा १८ ६ ३ ग्रहण सुटणें ४ डोळ्याची उघड झाप, लिकलिक, लुकलुक [स उद्+मील्–मीलन=मिटणें]

**उन्मीलित**—वि १ उन्मीलन झालें आहे असें, विकासलेलें, फुललेलें (फूल) २ उघडलेले (डोळे) ३ सुटलेलें (ग्रहण) [स]

**उन्मुख**—वि सज्ज, तत्पर, प्रवृत्त झालेला, तयार झालेला उ० मरणोन्मुख, विपर्योन्मुख [स उद्+मुख]

**उन्मूलन**—न उपटणें, उच्छेद, नाश [स]

**उन्मूलित**—वि उपटलेलें, नाश केलेलें [स]

**उन्मूळणें**—सक्रि मुळासकट उपटून टाकणें 'जें संसारातें उन्मूळी।' –ज्ञा १३ १७२ 'जसा उन्मुळी चडवायु वनातें।' –विकर, शुकरंभासवाद ३ [स उद्+मूल्]

**उन्मेस, उन्मेष**—पु १ डोळ्याची उघडझाप, उघडण्याची क्रिया, निमेष (मिटणें) याच्या उलट २ उघडणें, फुलणें, विकसणें (डोळे, फूल वगैरे) ३ बुध्दीचा विकास, ज्ञानप्राप्ति, ज्ञान संपादन 'तन्हीं उन्मेखाचिये पेठे। गुणा अनर्घ्यणी भरीन बुध्दीचि साटे।' –ऋ १४ 'मग नवी विरूढी फुटेल। उन्मेषाची।' –ज्ञा २ ७९ ४ ज्ञान बुध्दि, प्रकाश, जागृति 'जयाचेनि विवेक किरणासरें। उन्मेखसूर्य हातें फुगे।' –ज्ञा १६ ८ ५ तेज चमक ६ प्रकटपणा, उघडपणा 'जे निरींदी तुज निकें। तें पूसणे उन्मेखें। मनाचेनि ॥' –ज्ञा २ २८९ 'अविद्या नाशी उन्मेखु।' –अमृ ६ २० उन्मेखें-क्रिवि स्पष्टपणें, उघडपणें 'आता असोत हीं वाक्यें। सिधु कवीं उपमें नयें। हे साधितें उन्मेखें। शुध प्रती।' –कथा १ १४ ८९ उन्मखुन=सुद्दाम दाढून, बुद्ध्या, जाणून बुजून [स उन्मेष]

**उन्मेष(पुट)**—न (नत्य) नृत्यामध्यें खालच्या वरच्या पापण्या एकमेकींपासून फार दूर ठेवणें, हा अभिनय राग आला आहे असें दर्शवितो [स]

**उन्मेषलता**—स्त्री ज्ञानवेली, ज्ञानरूपी वेल 'परी हे वाळी काय गीता। जे ह मासा उन्मेषलता।' –ज्ञा १५ ५८६ [स]

**उन्ह**—न (प्र) ऊन–न्ह सुर्यप्रकाश, ऊन पहा [स उष्ण] म्ह० उन्हात गेल्याशिवाय सावलीचें सुख कळत नाहीं उन्हात

देवणें–उन्हांत तापत ठेवणें **उन्हांतील पाला होणें**–कोमेजणें, म्लान होणें, जीव सुकणें 'जाहला उन्हांतील पाला।'–सप्रामगीते ११८ **०उन्हींत**–वि (गो) उबून, ऊन, गरम, तापलेलें, लस 'गिरिजाबाईनें वऱ्हाड्यास म्हणाली कीं तानें उन्हउन्हींत थालीपीठ तयार आहे ते देऊं का?' –कोरवि ६७ **उन्हाचा कड**–पु सूर्याची प्रखर उष्णता **उन्हूं देणें**–तापू देणें

**उन्हणें**—अक्रि उन्हांत तापणें, ऊन होणें, उन्हांत ठेवणें, उन्हूं देणें या रूपानेंच क्वचित् हें क्रियापद आढळतें [स उष्ण, म ऊन]

**उन्हन, उन्हून**—वि कढत, वाफ येत असलेलें, उबून 'मेक्सिको येथील लोकांच्या देवता मांसभक्षक असल्यामुळे शरीरांतून उन्हन उन्हन ताजें मांस आणि रक्त त्यांच्या नैवेद्यांत ठेवीत' –आगर ३ १५ [स उष्ण]

**उन्हवणी, उन्हाणी**—स्त्री १ ऊन पाणी 'कुंथावयाची आर। ओवा। उन्हवणी रडवी चाळे॥' –तुगा ३२५७ २ सूर्यप्रकाशांत तापविलेलें पाणी 'माहेरिया वाटुनि उन्हाणियासि दिधलिया तु मरशिल।' –पच ३ १८ [स उष्ण+वन=पाणी]

**उन्हसाण**—न (गो) गरमपणा

**उन्हळ**—स्त्री उन्हानें लाकडात पडलेली भेग [उन्हाळणें]

**उन्हाटणें**—क्रि उन्हानें करपणें, सुकून जाणें (फळें वगैरे)

**उन्हातान्हाचा**—क्रिवि भर दोन प्रहरीं, माध्यान्हीं, ऊन कडक असतां 'एन्हां उन्हातान्हाचा जाऊं नको, अमळ शिळोपा पडला म्हणजे जा' [ऊन द्वि]

**उन्हाळ-ऊंस-वांगी**—पु उन्हाळ्याच्या दिवसात होणारा ऊस–वांगीं वगैरे माल

**उन्हाळण**—अक्रि १ उन्हापासून त्रास होणें २ ऊन लागून तडकणें (लाकूड) ३ उन्हाळे लागणें उन्हापासून एक विकार होणें [स उष्णकाळ, प्रा उन्हाल]

**उन्हाळपावसाळ**—क्रिवि (राजा) उन्हाळ्यात आणि पावसाळ्यात, बारमाही सतत वगैरे 'या विहिरीस उन्हाळ्यात पावसाळ पाणी एकसारखें असतें'

**उन्हाळभावई-ळी, उन्हाळभावी**—स्त्री (व) वैशाख वद्य अमावास्या [स उष्णकाल+भू–भावी]

**उन्हाळमैत्री**—स्त्री (व) उन्हाळ्यापुरेशी चालत्या काळापुरती मैत्री, हंगामी मित्रत्व.

**उन्हाळसावली**—स्त्री १ उन्हाळ्यात राहण्याकरितां बांधलेलें घर, उन्हाळी बंगला बारादरी २ (घाटनें) छप्पर, झोंपडी ३ उन्हापासून बचाव, आसरा

**उन्हाळा**—पु १ ज्या दिवसात ऊन कडक असतें ते दिवस फाल्गुनापासून ज्येष्ठापर्यंतचे चार महिने २ ऊष्मा, उकाडा ३ वारंवार मूत्रोत्सर्जन करावें अशी भावना (क्रि० लागणें उन्हाळ, एक रोग) ४ आईबापावांचून उघडें पडणें, निराधिनपणा, पोरकेपणा 'पोरा बाळाचा उन्हाळा झाला' ५ नाहींसें होणें, नाश पावणें, अभाव, करपणें, जळणें, खराब होणें (शेत, बाग, मळा वगैरे). 'श्रीनिधा उन्हाळा राया।' –सप्रामगीते ८१ ६ (सामा) बिनपावसाळ्याचे दिवस (आठ महिने) [स उष्णकाळ, प्रा उन्हाल, हिं उन्हारो] **०करणें**–नाश करणें, उजाड करणें 'मी म्हणतें तुमचें दारिद्र्य गेलें असेल तरी बरें पण घराचा उन्हाळा केला' –नामदेव नाटक ७६

**उन्हाळी**—स्त्री १ हवेंतील उष्णता, उन्हाळ्यातील उष्णता, उकाडा २ एक मूत्रविकार, उन्हाळे (क्रि लागणें, होणें) 'मुरडा हागवण उन्हाळे। दिशा कोंडता आदोळे।' –दा ३ ६ ३० ३ एक वनस्पति, रानटी तीळ, हिचीं फुलें लाल व पाटल्या रंगाचीं असून शेंगा चपट्या व पानें लहान व लांबट असतात काढ्याचा सर्पाकडे उपयोग होतो शिवाय मग, खोकला, विष, दमा, कफ, ज्वर, वायुनाशक वगैरे गुण यामध्यें आहेत ४ (को) उन्हाळा पहा **०पावसाळी**–स्त्री खळातील दोन पक्षांपैकीं कोणी डावाला सुरवात करावयाची हें ठरविण्यासाठीं खापरी किंवा पैसा यास एका बाजूनें थुकी लावून तो वर फेकतात त्या खापरीचें किंवा पैशाचें कोरडें अंग ती उन्हाळी व थुकी लागलेलें अंग ती पावसाळी त्यापैकीं एकानें कोणतें तरी अंग मागावयाचें व मागितलेलें अंग वर आल्यास त्यानें प्रथम खेळावयाचें असतें **०भात**–न पावसाळी भात

**उन्हाळू**—न (माळवी) उन्हाळ्यातील पीक

**उन्हाळे**—पुअव उष्णतेचा, लघ्वीचा विकार, उन्हाळी 'मुरडा हागवण उन्हाळे।' –दा ३ ६ ३० [उन्हाळा]

**उन्हाळें उन्हेरें**—न उष्ण पाण्याचा झरा [स उष्ण+आलय]

**उन्हून**—उन्हन पहा

**उन्हेंत**—न (गो) सूर्याची उष्णता, उन्ह

**उन्हारी**—स्त्री उबारा –शर.

**उप**—अ एक उपसर्ग–अर्थ १ अनुगमन उ० उपदेश, उपासना २ अधिकपणा उ० उपपदार्थ ३ हीनपणा, गौणत्व उ० उपभार्या उपपत्नी, उपपुराण ४ कमी प्रतीचा तीव्रतेचा, गुणाचा (इ) हायपो, हा अम्लात किंवा त्या रसायनात (प्राणवायूचा) कमीपणा आहे असें दाखवितो उ० नत्रस अम्ल (नायट्रस ॲसिड) पेक्षां उपनत्रस अम्ल (हायपोनायट्रस ॲसिड) हें कमी अम्लजन असतें ५ समीपता, सान्निध्य उ० उपकंठ उपनदी, उपांत्य ६ पहिलेपणा उ० उपक्रम ७ दाक्षिण्य, आदर उ० उपचर्या ८ साम्य उ० उपधातु उपव्याघ्र ९ शक्ट नाश उ० उपरति १० विकार उ० उपक्षेप ११ स्वीकार उ० उपागम, उपाकर्म १२ व्यापणें उ० उपहास १३ समूहत्व, संमेलन, गर्जन उ० उपार्जन १४ शक्ति १५ अध्ययन, अध्यापन उ० उपाध्याय १६ उद्योग १७ कडे, पर, खालीं उ० उपनयन १८ निरर्थक म्हणूनहि कधीं हा उपसर्ग लागतो जसें या उपसर्गाचे कांहीं अर्थ याचहि आहेत

**उपगत**—वि लब्ध, प्राप्त, सफल 'तेथें कष्ट केले बहुत । न होयचि याय उपगत ॥' –गुच ४५–८४ [स उप+गम्]

**उपगुरु**—पु गुरुस मदत करणारा, त्याच्या हाताखालचा, दुय्यम शिक्षक, मास्तर [सं]

**उपग्रह**—पु (ज्यो) १ मोठ्या ग्रहाभोंवतीं फिरणारा लहान ग्रह, दुय्यम ग्रह चंद्र २ राहू, केतु (इ) सॅटेलाईट

**उपघात**—पु दुर्दैवाचा फेरा, संकट, आपत्ति, अपघात 'दु मुहूर्तावर भीष म्हणजे घात उपघात सारे वाटले' [स उप+हन्–घात]

**उपचडा**—पु उमाळा, आवेग 'उपचडे सुटती तिजला बहु।' –सारुह ६ १२८ [उप+चढणें]

**उपचय**—पु १ साठा, संचय २ वाढ, वृद्धि [स उप+चि= गोळा करणें, उपचय]

**उपचार**—पु १ श्रम, उपाय, प्रयत्न 'मग नानाहेतुप्रकारें । यथाचितें उपचारें ।' –ज्ञा ४ ७१ २ पूजेंतील प्रकार उ० षोड शोपचार पहा 'ध्वजातोरणमिरवणिया । आंगोपचार पुरवणिया ।' –ज्ञा १७ २०३ ३ चिकित्सापद्धतीतील प्रकार शस्त्रोपचार पहा ४ वैद्यकीय चिकित्सा, औषधीयोजना, इलाज, उपाय 'तें उपचारा वेगा रसु पाहे । देतु वैद्यनाथु ।' –भ्र २२ ५ गौरव, आदरसत्कार, आतिथ्य, सभावना, सेवा 'उपचार करोनि मग राजाला ।' –दावि ३९२ ६ रूढी, रिवाज, चाल उ० लोकोपचार, शिष्टोपचार 'मरों टेंकला विप्र पुत्रोपचारें । हरीचें वदे नाम लोकोपचारें ।' –नामसुधा ५९ ७ शब्दाचा वाच्यार्थापासुन दूरान्वय, उपमा, रूपक इ० घाप रणें, लाक्षणिक भाषण, अलंकारिक भाषण ८ सामग्री, साधनें, साहित्य 'का वनतीं करवा आरामु । आरामींही प्रियसगमु । सगमीं आगमु । उपचाराचा ॥' –ज्ञा १८ ३४५ [स उप+चर्] ०बोल–पु ब निरर्थक भाषण, औपचारिक, तोंड दाखवें बोलणें, शिष्टाचार म्हणून वरवरचें, मनापासून नसलेलें भाषण 'उपचारबोल हा कासया वृथा।' –दावि २८६ ०भरण–न साधनसामग्री 'हवि यज्ञोपचार भरण । अज्ञानघृत ।' –ज्ञा ९ २४० ०विरुद्ध–क्रिवि शिष्टाचारा विरुद्ध रूढीविरुद्ध –नीतिशास्त्र १४७ ०हार्दें–वि क्षणिक –मनको

**उपचारणें**—सक्रि उपचार करणें 'तो तुवा उपचारिलें ।' –विपु २ २२

**उपचारिक नांव**—न व्यावहारिक नाव, टोपण नाव

**उपचित**—वि गोळा केलेलें, जमविलेलें, ढीग घातलेलें, सगृहीत, संकलित [स उप+चि]

**उपज**—पु १ उत्पन्न, निपज, पैदास, नफा, फायदा, प्राप्ति २ उत्पत्ति, जन्म, मूळ, उगम (निपजबरोबर बहुधा प्रयोग) 'त्याचा उपजनिपज समळा ठाऊक आहे' ३ (संगीत) आपल्या कल्पनायत्नानें नवीनच चमत्कारिक घतलेली तान ४ शास्त्रादि व्यवहारात आपल्या बुद्धीनें शंका, समाधान इत्यादि काढणें, नवीन कल्पना, शोध, उन्मीलन [स उप+जन्, उपज=वाढलेलें, किंवा स उत्+पद् प्रा उप्पज्ज]

**उपजंगा**—पु घोड्याच्या पायाचा रोग. –अश्वप २ ३८

**उपजणें**—अक्रि १ उत्पन्न होणें, जन्मणें, उद्भवणें 'एमा उपजे नित्य सद्भावो । तोहि आपणपाचि ।' –ज्ञा ६ ६९ 'पर्वी उपजली नदी कदि वशी क्रिमेशीगती ।' –केका ७७ २ पावुन निघणें, मिळणें, प्राप्त होणें 'श्रीरामभजनीं चैतीं प्रीत । तेजोमय शरीर दिसत । तेथें हृशगि भय उपजलें बहुत । म्हणे पद निश्चित घेईल हा ।' –सवि २१८० म्ह० उपजल्या प्राण्यास मरण हें लागलेंच आहे ' [उपज पहा]

**उपजत**—क्रिवि १ जन्मत, जन्मापासून, उ० उपजत आधळा रोगी–मुका–शाहणा लंगडा वगैरे 'माजर गाचें भय मुलामध्यें जसें स्वाभाविक, उपजत असतें ' –नीति ८४ –वि स्वाभाविक, जातीची, निसर्गत प्राप्त उ० उपजत बुद्धि–खोड–स्वभाव ०रांगणें–१ उपजल्यापासूनच रागणें २एखाद्या वस्तूची एकदम भारी किंमत सागणें ३ एखाद्या अडचणीला तोंड देण्याची आपली लायकी एकदम हमखास सागणें ०खोड–स्त्री जन्मल्यापासुन असलेला दुर्गुण खोड–व्यग (शारीरिक, मानसिक) ०गुण–पु स्वाभाविक, अगचा, जातीचा धर्म, जन्मापासूनचा गुण ०वागी–वि मूळचाच, जाती चाच घोड्यावर बसण्यात पटाईत [उपजत+हिं बाग–लगाम, बागी=स्वार, स वाजी=घोडा] ०स्वभाव, अंगस्वभाव–पु जन्मत असलेले गुणधर्म–स्वभाव, स्वाभाविक प्रवृत्ति

**उपजनिपज**—स्त्री १ जन्म आणि वाढ, उदय आणि प्रगति (व्यक्तीसबंधीं) २ आरंभ आणि शेवट, उत्पत्ति आणि लय (एखाद्या गोष्टीचा) ३ (संगीत) एक तानेचा प्रकार [उपज+ निपज]

**उपजविणें**—सक्रि उत्पन्न करणें, जन्म देणें 'उपजविला श्रवणा काजा ।' –उषा ३० 'वीर्यदानें उपजविता । अन्नदानें प्रति पाळिता । सकटीं प्राणरक्षिता । तिघे पिते बोलिजेती ।' –गुचादि १५ १५४ [उपज प्रयोजक]

**उपजा**—उवजा पहा

**उपजाऊ**—वि सुपीक, पिकाऊ [उपज]

**उपजाति**—स्त्री एक वृत्त हें इद्रवज्रा व उपेंद्रवज्रा या दोन वृत्ताच्या मिश्रणानें झालेलें आहे याच्या प्रत्येक चरणात अकरा अक्षरें असून यति पादांतीं असतो उ० 'हा बाण गेला वरती नभ्याला । धरून पृथ्वीवर आणण्याला ।' [स उप+जाति]

**उपजाति**—स्त्री पोटजाति, उपवर्ग, पोटवर्ग [स]

**उपजापक**—वि चुगल्या करणारा, मागें निंदा करणारा, लावालावी करणारा [स उप+जप्]

**उपजारीस येणें**—मरास येणें –शिरप वि ६८१ (नमको)

**उपजीवक-जीवी**—वि १ (एखाद्यावर)उपजीविका करणारा, पोट भरणारा, भरवसून भगणारा उ०कृष्योपजीवी, विद्योपजीवी 'आणि प्रश्नोपजीविये । विशेषीं लोकीं इयें । इष्टादृष्ट विजयें । होआवें जी ।' –ज्ञा १८ १८०० २ निर्वाहाचें साधन असलेलें 'हे दैवी सुरसमवी । तेय देवा गुणा येरोपजीवी ॥' –ज्ञा १६ ६७ [सं उप+जीव्]

**उपजीवन, उपजीविका**—स्त्री १ निर्वाह, पोषण, उदर निर्वाह २ जगण्याचें साधन, पोट भरण्याचा उपाय (अन, भक्ष्य) ३ आश्रय, आधार, रक्षण, पालन, धारण (शरीराचें) ४ रक्षणाचें साधन (शक्ति, अन्न इ०) [सं उप+जीव्]

**उपजीव्य**—न निर्वाहाचें साधन, आश्रय, पोषक द्रव्य, जीवन, जीवाचा आधार [सं] ०**विरोध**-पु १आश्रयदात्याशीं विरोध, पालनकर्त्याशीं वैर २ उपजीविकेचें साधन बुडणें

**उपट**—स्त्री १ अन्नाची रेलचेल, समृद्धि २ वीट, शिसारी आवडनिवृत्ति (क्रि० घेणें) ३ पुनरुत्थान उठाव, वर डोकें काढणें 'उपट खाली पतीच्या दैवानें ॥' –ममाप १ १ २ ४ दोन्ही हातात धरलेल्या सोटयाचा मार, आघात, हल्ला (क्रि० मारणें) (क्रि० घालणें) 'तों वजिराचें सामान थोडकें, त्यास याची उपट सोसेनाशी जाली ॥' –भाव ४९ ५ उसळी, उशी (चेंडूची) [सं उत्+पत्, प्रा उप्पड] ०**खाणें**-१ उलटणें (रोग इ०), जोरावणें, उलटून पुन्हा हल्ला करणें (शत्रूनें) २ चेंडू उन्हा उडणें, उशी घेणें ०**घेणें-जेवणें**-ओ पेटतों खाणें, आवडीचें खाणें

**उपटखुंटा**—पु उपटणाऱ्याचा खुंटा

**उपटजातें**—न कांहीहि हालविता-नेता येण्यासारखें जातें, जमिनींत कायम न पुरलेलें जातें

**उपटणी**—स्त्री उपटणें वेंचणें, वर काढणें (शेत, तृण, केश इ०) [उपटणें]

**उपटणें**—सक्रि १ उपटून काढणें, मुळासकट वर काढणें 'रघूनें ती बुगी सगळी उपटली' २ (एखाद्यापासून द्रव्य वगैरे) कपटानें, युक्तीनें काढणें, लाटणें, उपटणें 'मानी उपासत करून तुम पैसा उपटीत असेल' –निवि ८ - ४० ३ हिसकून घेणें, लांबविणें, चोरणें, न कळत घेणें, पळविणें उसावरील हमिणी या भामट्यानें उपटली तर नसेल?' ४ आपटून मारणें 'जें पाखिरू एकु चाउवाळा । धरोनि उपटिलें ॥' –शिशु ८६७ [सं उत्+पत्-पात, उत्पाटन] –अक्रि १ (पिंपळ वगैरे झाड वगैरे भिंतींतून) बाहेर येणें, वर येणें २ प्रगट होणें उपडान येणें, दिसू लागणें, (अमरा) सुरु होणें 'अरे बापरे! धान्वार, व्यतिपात, गव्हात, विकात, मगीआई, याराचा बृहस्पति, साडसाती सारीं एकदम उपटलीं।' –भाव८९ ३ उत्पन्न होणें, प्रादुर्भूत होणें (एखादी साथ वगैरेचा), पुन उद्भवणें (रोग) 'त्याला काल्पासून मूळव्याध उपटली आहे' ४ उडणें, आपटून वर येणें 'आपणचि चेंडु सुटे। मग आपणया उपटे ॥' –अमृ ९ ५७ ५ एखाद्यावर तुटून पडणें, रागावणें 'रयें रघू दाटी। मनें गजा उपटी।' –शिशु ८८१ 'अन्याय केला कोणी आणि मजवर का उगीच उपटतोस?'. [सं. उत्+पत्]

**उपटसरी-ळी-सुरी-ळी**—स्त्री (वों) एक वेल, उपळसरी, अनंतमूळ, श्यामा

**उपटसुंभ-भा-या-ग्या**—वि १ उडाणटप्पू, कामधदा नसलेला २ तात्पुरता, उपरि ३ हक्क नसता अधिकाराच्या जागेवर आलेला तोतया 'नुकतेच परलोकवासी झालेले साताराचे जगली महाराज याना सरकार ५०० रुपये माहेवारी पेन्शन देत होते तेव्हा तर ते उपटसुभ नव्हते ना?' –केसरी ४ (उप) अविवाहित, ब्रह्मचारी [उपट+सुंभ=शंभु अप]

**उपटमूळ**—वि १ आकस्मिक, क्रम सोडून असा 'मध्येंच उपटमुळासारखें कांहीं निर्माण झालेलें नाहीं' –गीर १६८ २ विघातक, मध्येंच लुडबुड करणारा, माडखोर, उडाणटप्पू टवाळटाळ करणारा ३ उपटसुंभ, अल्लवत्यागल्लत्या 'मरतेवेळीं एखाद्या उपटमुळास विनाकारण आपली दौलतहि त्यास देता येणार नाहीं' –टि ४ २७ ०**खांद्यावर घेणें**-मूर्खपणानें भानगडी, त्रास, लचांड पाठीमागें लावून घेणें, नसतें वेंगट मागें लावून घेणें म्ह० उपटमूळ (की) घे खांद्यावर=नसतें लचांड मागें लावून घेणें [उपटणें+मूळ]

**उपटा, उपाटा**—पु १ उचल, दुसऱ्यास फसवून पैसे उपटणें, लबाडीनें कर्ज उभारणें, ठकवाजी करून पैसा काढणें (क्रि० मारणें) २ लुबाडणें, लांबविणें, उचलेगिरी करणें, पळविणें (क्रि० देणें) [उपट]

**उपटाउपट-टी**—स्त्री १युक्तीनें जबरीनें अथवा फसवेगिरीनें इत्यादि काढणें, उपटण्याचा व्यापार [उपट द्वि]

**उपटी**—स्त्री प्रहार घाव 'कांपे हृदु आला हातुपीटीं। तो खाडेयाचा उपटी। –शिशु ४१२ [उपटणें]

**उपटीव**—वि उपटून काढलेलें (तोडून किंवा कापून न काढता काढलेलें पीक केस वगैरे) उन्मळून पडलेलें, उपटलेलें (झाड)

**उपटून खांद्यावर घेणें**—उपटमूळ पहा

**उपटूट**—क्रिवि (गों) कांठापर्यंत भरलेला

**उपट्या**—वि॰ फसव्या, निलाजरा, उचल्या, भाम!, अल्ल सादा [उपटणें]

**उपडणें**—सक्रि उपटणें पहा १ उपटणें 'आरिं ग्रावोंनि पाश। मणती याचिआ जंटे उपडा।' –शिशु ११९ 'रोंगोनि उपडिता दामणा।' –मुआदि १३ १६ २ आपटून मारणें 'मग उर्वल्गिं सडकी। इमु जैसा।' –ज्ञा १८ ७६८ –अक्रि बाहेर,

वर येणें, उन्मळून पडणें, मुळासकट उपटून पडणें 'उत्तम अधमीं संचरती । ऐसें वर्णावर्ण मिसळती । तेथ समूळ उपडती । जातिधर्म ।' –ज्ञा १ २१० [स उत्‌+पत्‌ प्रा उप्पड]

**उपडथवी**—स्त्री भोंवरा, लाटा एकमेकावर उलथून पडणें, खळखळ 'कीं बुडता भवार्णवीं । वरि न्याते उपडथवी । तेवींचि काढूळली दावी । कृपारत्नापुढें ॥' –ऋ १०१ 'मनाराचें या डोहात उपडथवी असे ।' –भा १०४ [स उत्‌+पत्‌+स्था, उपडणें+ठाव]

**उपडहंडी-हाडी**—स्त्री १ (ना) पाणी गार करण्याकरितां पडवें बांधून उलटें टांगलेलें भांडें २ उलकडहंडी पहा [उपडी+हंडी]

**उपडा-डी**—वि तोंड खालीं केलेला पालथा, अधोमुख, उताणा याच्या उलट (गो कु) उपडी म्ह० उपड्या घागरीवर पाणी व घटिक्याजवळ वहाणी (ब्य रे) [स उत्पाटित-उत्पाटिअ, प्रा उप्पाड=उपड=उपडा]

**उपडा तान्या**—पु पाळथा तान्या, खा रक्तवळ, विटाळशी असल्याचें वातरं

**उपडी माडा**—स्त्री लिहिण्याकरितां माडी दुमडून घातलेली बैठक

**उपडु**—न जागरण –शर

**उपढर**—वि १ पाल्य, फिका 'तौहि उपढर ऐसा । मज वाटतुस ॥' –ऋ ८६ २ उघडें 'माखिले तरि उपडर पडे । दुर्गंधी सुटे निकडेतिकडे ॥' –दा १५ ९ ३९ –पु १ दंभ ढोंग 'ना तें अनुरागवीण । उपरर श्रीचरणध्यान ।' –ज्ञाप्र ४११ २ दंभस्फोट ढोंगाची उघडकी 'गावापारीं भावार्थ वेंचा । अपण जगवावा तयाचा । सवत उपरर कोणाचा । पडेचि नये ॥' –दा १९ ८ २३ [स उद्‌+पटुर=पाढरा]

**उपणणी**—स्त्री धान्यातील भुसा वगैरे काढण्याकरितां धान्य वारवेंने धान्यानें उडविणें, वरून खालीं ओतणें [स उद्‌+पवन]

**उपणणें**—उक्रि १ टरफल धाण वगैरे काढण्यासाठीं धान्य वारवणें (सुपानें पाखडणें, उफळणें झडपणें किंवा फक्त नव्हे) 'कीं भूमि बीज पखरे । उपणिता राहे धनवरे ॥' –ज्ञा २ १३० 'मूस उपणु कोडें काय । हारपल दोन्ही ठाय ॥' –तुगा २९२४ 'आज सर्व धान्य उपणलें पाहिजे' २ शुद्ध, शुद्ध लेखणें, वस्तुप्रमाणें मानणें ३ विवरण, फोड करून सांगणें 'हे कथा उपणिता तुज नरे । जाण कीं अखमेतुजाचार ॥' –वामनविराट ६ ८५ [स उत्‌+पू–पवन, प्रा उप्पणण=वरून वारा देणें सिं उपिणणु गु उपिणवु]

**उपणणें**—अक्रि उत्पन्न होणें 'निगाऱ्याशी वेतयनार्था । भतीरीं उपणली अवस्था ।' –निगु ७४३ [स उत्पन्न प्रा उप्पण्ण]

**उपणवटी-पाटी-वाटी**—स्त्री उपळ सुपडी, पाटी (धान्य उपणण्याकरितां पत्राची ती) [उपणणें+पाटी]

**उपणा**—पु १ वातविकारानें हातापायास विकृति झाली असता शेकण्याकरितां वापरलेल्या निरगुडी वगैरे वनस्पतींचा पाला, नारळाचा कीस वगैरेचा पेंड (क्रि० शिजवणें, करणें, लावणें, बांधणें) २ बरोबर न शिजलेला भात (हेगाळणीकरितां वापरतात) 'भाताचा उपणा झाला' [स उत्‌+पू, प्रा उप्पण, किंवा स उत्‌+पर्ण, प्रा उप्पण्ण ?]

**उपणी, उंपणी**—स्त्री पेरणी [स वप्‌]

**उपणें उंपणें**—उक्रि पेरणें, पेरणी करणें [स वपन]

**उपणें**—न वारवलेलें, उपणलेलें धान्य [उपणणें]

**उपतप्त**—वि तापलेला, तापविलेला [स उप+तप्‌]

**उपतरणें**—(प्र) उतरणें पहा

**उपताप**—पु आग, दाहक जळणी, निर्वीर [स उप+ताप]

**उपतिष्ठणें**—अक्रि १ मनात ठिवणें, परिणामकारक होणें, वजन पडणें (उपदेशाचें) संस्कार होणें २ उपस्थित होणें, समोर येणें, हजर असणें, प्रकट होणें 'दक्षादि देवता घरीं पुष्पती वस्तुजात ॥ उपतिष्ठति न चिंतिता ऋद्धिसिद्ध ॥' ३ उभें राहणें (पापइ०) प्राप्त, साध्य होणें, फलास येणें, सत्कृत्याचें अथवा दुष्कृत्याचें फल प्राप्त होणें 'तुका म्हणे साधन सुगम गोमटें । परि उपतिष्ठे पूर्वपुण्यें ॥' –तुगा २२७७ [स उप+स्था-तिष्ठ्‌]

**उपतिष्ठित**—वि मनात भरलेला, बिंबलेला ठसलेला, रुजलेला, मनावर परिणाम झालेला (उपदेश वगैरे, शिक्षा) [स]

**उपदंश**—पु गर्मीचा विकार, एक सुवैद्यशास्त्राचा रोग [स उप+दंश्‌] –शी–वि ज्यास उपदंश झाला आहे तो

**उपदानें**—न अव भामान उदकुंभ वस्त्र, छत्र, उपानह, कमंडलु यष्टि, लोहदंड, दीप तांबूल, चंदन माला, तिळ सिद्धस्थाली ऊर्णावस्त्र व्यजन, धनु हीं उपदानें और्ध्वदेहिक कर्मात घावयाचीं असतात [स]

**उपदिशा**—स्त्री पोटदिशा, मुख्य चार, आठ किंवा दहा दिशा धरून शिवाय राहिलेल्या इतर दिशा अवांतर दिशा [स]

**उपदिष्ट**—वि १ शिकविलेलें सांगितलेलें, उपदेशिलेलें (कर्म, मंत्र इ०) २ ज्यास उपदेश दिला आहे किंवा शिकविलें आहे तो (शिष्य इ०) –न शिकविलेलें ज्ञान, उपदेश दिलेला मंत्र [स]

**उपदेव**—पु मुख्य देवताहून ज्या इतर गंधर्व, विद्याधर, अप्सरा इत्यादि देवता त्या, किरकोळ गौण देवता [स]

**उपदेश**—पु १ शिक्षण ज्ञान शिकवण, पाठ बोध २ सल्ला, मसलत युक्ति सूचना निर्देश ३ गुरुमंत्र, मंत्रदान समासशब्द–मंत्रोपदेश हितोपदेश गुरूपदेश इ० [स उप+दिश्‌=दाखविणें]

**उपदेशक, उपदेष्टा**—वि उपदेश करणारा, शिकविणारा, मत्र देणारा, सांगणारा, रहस्य देणारा (शिक्षक, गुरु, मित्र) २ (खि ) ग्रीचर या इंग्रजी शब्दाचा पर्याय, ख्रिस्ती धर्माचा उपदेश करणारा, (स्त्री ) उपदेशिका 'त्यांना दिसून आले की हा परदेशीय उपदेशक जे सांगतो ते आपल्या पवित्र ग्रथामध्येंच आहे '—ज्ञानोदय ७-५-१९१८, ११-२-१९१८ [स उप+दिश्]

**उपदेशणें**—उक्रि १ ज्ञान मत्र शिकविणें, सांगणें 'मज निजज्ञान सर्वथा। कृपा करोनि उपदेशी॥' 'जें उपदेशिला रघुनाथ। तो वृद्धाश्रित येथ अथ।' —ह १९०० २ (सामा ) माहिती, ओळख करून देणें पटविणें 'कवळ जे वदात ज्ञान। रामासि उपदेशिला ब्रह्मानदन।' ३ सल्लामसलत देणें, सूचना, ताग उपदेशणी करणें [उपदेश]

**उपदेशी**—वि १ शिकविलेला, पटविलेला २ सांग दिलेला, हितावहित सांगितलेला ३ मत्र सांगितलेला, उपदेश घेतलेला 'सत सग करिता म्हणती हा उपदेशी। येरा अभाग्यासी इ न नाही॥' —तुगा ३३४९ [उपदेश]

**उपद्रव**—पु १ पीडा, त्रास, दु ख, जाच, छळ 'त्रिविध मुख्य आधवे। उपद्रवाचे मेळावे।' —ज्ञा १३ ३४३ २ बाधा (पिशाच्चादिक), सचार 'या औषधानें जेव्हा गुण पडत नाहीं तेव्हा हा अरोग नव्हे, काहीं उपद्रव आहे ' ३ (कायदा ) अपकार, नुकसान, घाण, अडचण (इ ) न्युइसन्स ४ रोग, शारीरदोष [स उप+द्रु]

**उपद्रवी-क**—वि १ पिशाच्चबाधेसबधी (पीडा रोग ) २ रागकारक (अन्न ), अपथ्य, शरीरात विघाड करणारें न पच णारें ३ त्रासदायक, पीडाकारक, कटाळवाणा ४ अनर्थकारक, भयोत्पादक, सकटें उत्पन्न करणारी (सत्ता व्यवस्था, राज्यपद्धति, कारभार ) ५ (उपद्रवी ) ज्याला पिशाच्चबाधा झाली आहे असा

**उपद्रवी जीव**—पु उपद्रव देणारा, त्रासदायक प्राणी (ढेकूण, पिसा वगैरे )

**उपद्रष्टा**—पु १ यज्ञादि कर्मांमध्यें न्यूनाधिक कांहीं कर्म होईल तें पाहून लेखील तेथें यथास्थित करवावें म्हणून एक ऋत्विज असतो ता, यज्ञात व्यवस्था पाहणारा ऋत्विज २ (सामा ) व्यवस्थापक चौकसनीस [स उप+दृश्=पाहणें ]

**उपद्रुत**—वि उपद्रव पावलेला [स ]

**उपद्वीप**—न १ द्वीपकल्प समासारखा भाग २ लहान बेट ३ सप्तद्वीपाविरहित जीं द्वीपें सांगितलीं भारत तीं भद्राउपद्वीप पहा [स]

**उपद्व्याप**—पु १ अतिशय त्राग कष्ट परिश्रमपूर्वक प्रयत्न खटपट, रक्ताचें पाणी करणें 'सरकारदरबार पचाहत्तों इतका जेव्हा उपद्व्याप केला तेव्हा त्याजकडील रुपये उगविले ' २ पीडा, जिकीर, त्रास, छळ (क्रि० देणें ) ३ व्याप, पसाटोप, पसारा, सिद्धता, तयारी (भरा, समारभ, कारभार इ०ची ) ४ निकामा उद्योग, उलाढाल, उचापत [स उप+उद्+व्याप ]

**उपद्व्यापी**—वि १ मेहनती, खटाळू, अतिशय काम करणारा, फार खटपटी २ भोल्य, खोडकर, त्रासदायक उचापत्या, भानगडखा (मुं, वगैरे )

**उपधातु**—पु १ तांबें, सोनें, रुपें इत्यादि मुख्य सात धातूसारीज दुसर धातु—स्वर्णमाक्षिक, तारमाक्षिक, मोरचूत, कांसें, पितळ, शेंदूर, शिलाजित २ अश्मीभूत, प्रस्तरीभूत पदार्थ, खनिज द्रव्य ३ शरीरातील मुख्य धातूशिवाय बाहेर पडणारे सात धातू—दूध, रज, वसा, घाम, दात, केश, ओजस् [स उप+धातु ]

**उपधान**—न १ अर्पण करणें, देणें, पोंचविणें, नेणें (गुणधर्म स्वभाव इ ) 'साधुसमागम अत करणात विनयाचें उपधान करितो ' २ (सामा ) उपाधि, सांनिध्य यामार्गें एका व्यक्तीचे गुणधर्म दुसऱ्या व्यक्तीस प्राप्त होणें, गुणधर्माची देवघव, एका याच स्वभावगुणधर्म याची छाया दुसऱ्यावर पडणें, गुणपरावर्तन [स उप=जवळ, धा=ठेवणें ]

**उपधानासन**—न एक पाय लाब करून दुसरा पाय उशी मारखा मानेखालीं घालून निजणें —सयोग ३४७ [स, उपधान=उशी+आसन ]

**उपधान्य**—न निरखोळ व कमी महत्वाचें धान्य, गौणधान्य अटरा उपधान्यें पहा

**उपधायक**—वि देणारा, उपधान करणारा, पोंचविणारा. उ० गुणोपधायक, फलोपधायक, हितोपधायक [स ]

**उपध्मानीय**—पु अर्धविसर्गपूर्वक पकार आणि फकार, प आणि फ यापूर्वी येणारा विसर्ग [स उप+ध्मा ]

**उपध्वनि**—पु प्रतिध्वनि, मुख्य आवाजामागून निघणारा बारीक आवाज, प्रतिशब्द, पडसाद [स उप+ध्वनि ]

**उपनगर**—न शहरालगतची वसाहत, शहराच्या आसपासचा भाग (इ ) सबर्ब उ० मुंबई उपनगर (व्हिलपार्ले, अंधेरी इ० भाग ) [स उप+नगर ]

**उपनणें**—अक्रि उपजणें पहा १ उपजणें जन्मास येणें, उत्पन्न होणें तव कृपा उपनली जगन्नाथा। तें परिएसा पा।'—ऋ ३६ ता आता दमयंतीचा घरी। उपनलासे।'—शिशु १६३ वायाचि धिवसा उपनला चित्ता। —ज्ञा १६७ २ झडप घालणें, पडणें 'जयासरी हरी उपनली। चैतन्यनाशाची।'—शिशु ८३ [स उद्+पद् उत्पद प्रा उप्पज ]

**उपनणें**—सक्रि (कृषि ) नारवणें उपणणें पहा

**उपनयन**—न (गुरु ) जवळ नेणें, व्रतबंध, प्रथम यज्ञोपवीत धारण करण्याचा विधि मौंजीबंधन, जानवें घालणें, मुंज, त्रैवर्णिकास

आठव्यावर्षी वेदाधिकारास योग्य करण्यासाठीं हा संस्कार करतात, सोळा संस्कारांपैकीं एक 'या उपरी उपनयन। गुरुद्वारा गायत्री ग्रहण।' –एभा १७ २७१ [सं उप=जवळ+नी=नेणें]

**उपनाम-नांव**—न कुळाचें नाव, आडनाव, टोपणनाव, गोत्रनाम [सं]

**उपनामक**—वि उपनावाचा, टोपणनावाचा, आडनावाचा इ० 'वैशंपायनोपनामक, पंडितोपनामक, एतदुपनामक [सं]

**उपनांवाचा**—आडनावाचा पहा

**उपनाह**—न १ पोटीस –योर २ ८१ २ मलम, औषध, [सं]

**उपनिधि**—पु ठेव, दुसऱ्याजवळ विश्वासानें ठेविलेली वस्तु, संपत्ति, अनामत वस्तु [सं उप+निधि]

**उपनिषद्**—न १ गुरुचरणाजवळ बसून मिळविलेलें ज्ञान, गूढज्ञान २ वेदाच्या ब्राह्मण ग्रंथांना जोडून असणारा वेदांतपर भाग, वेदसाराचा असणारा ग्रंथ, वेदज्ञानकाण्डात्मक भाग एकंदर १०८ उपनिषदें मानितात पैकीं पुढील दहा उपनिषदें मुख्य आहेत –ईश, केन कठ, प्रश्न, मुंड, मांडुक्य, तित्तिर, ऐतरेय, छांदोग्य व बृहदारण्यक 'अतिगुह्य ज्ञान परात्पर। जें उपनिषदांचें भांडार।' –एभा १३ ७१२ 'बुडाले जाहलीं कृष्णश्रवणीं। तीं उपनिषदार्थे विरणीं। झळकताती सतेज।' –एरुस्व १५२ [सं उप+नि+सद्=जवळ बसणें]

**उपनीत**—वि व्रतबंध, मुंज झालेला, वेदाधिकारी [सं]

**उपनेत्र**—पु चष्मा, दृष्टिदोप दूर करण्यासाठीं कांच किंवा गार याचा उपयोग करून हा तयार करतात, चाळिशी, डोळ्याची आरसी 'जें न देखती नेत्र। तें देखती उपनेत्र।'–यथा ४ ३३२ 'हाय भला दृष्टार्थग्रह उपनेत्रेंचि की भला सुबळें।' –माउद्योग ३ १३ [सं]

**उपन्यसनीय**—वि प्रतिपाद्य, पुढें मांडावयाचा, विचार करावयाचा (विषय, मुद्दा वगैरे) [सं उप+न्यस्]

**उपन्यस्त**—वि १ पुढें मांडलेला, दाखविलेला, उघड केलेला, प्रतिपाद्य २ जवळ ठेवलेला [सं]

**उपन्यास**—पु १ वस्तु, मुद्दा व्यवस्थित रीतीनें पुढें ठेवणें, मांडणें, विशद करणें, प्रतिपादन, स्पष्टीकरण, समोरासमोर ठेवणें, मांडणें २ प्रस्तावना करणें, विषयप्रवेश करणें, आरंभ, सुरवात, उपक्रम 'या वादाचा आन यथें उपन्यास करण्याचें कारण इत केंच की ' –टि ४ ८३ ३ सान्निध्य, निकटता, जवळ असणें [सं]

**उपपति**—पु यार, जार, धगड, सख्या, राखा, पतीखेरीज दुसरा उपभोक्ता, व्यभिचारिणीशीं संबंध असलेला पुरुष [सं उप+पति]

**उपपत्ति**—स्त्री १ पुरावा, कार्यकारणभाव, संबंध, विषयसिद्धता, सिद्धतेचीं प्रमाणें, युक्तिवाद 'अगाधिया अनुपपत्ति। आटलिया उपपत्ति।'–ऋमृ ५.५५ 'हे केली विवंचना। उपपत्तीनीं।'–ज्ञा १८ ६२७ २ सिद्धांत, तत्त्वाचें प्रतिपादन, विशदीकरण, मीमांसा, विवेचन, शिस्तवार मांडणी, योग्य समजूत 'शिस्तवार जी मांडणी करितात तिला उपपत्ति किंवा उपपादन असें म्हणतात '–गीर २ ३ सिद्ध करून दाखविलेली गोष्ट, सप्रमाण, सयुक्तिक सिद्धि 'सुईचे बेजातून हत्ती पार गेला म्हणता हें घडेल कसें याची उपपत्ति करून द्या' ४ (गणित) उदाहरण सोडविण्याच्या रीतीचें स्पष्टीकरण ५ (भूमिति) प्रमेयसिद्धता ६ साधनें, सामग्री, साहित्य (निर्वाह, कारभार इ० चें) ७ युक्ति, कल्पना 'उपपत्ती शार्ङ्गी। दाविता जाहला।' –ज्ञा ११ ७०४ 'तेही अर्थांची उपपत्ती। एक निधिनी शुक सांग।' –एभा २ १२५ (८) धिअरी–पदार्थ (टीका–वोल्हदकरकृत) ६१ [सं उप+पद्] ०येणें–पटणें, मान्य होणें प्रतीति, अनुभव 'मज नये हे उपपत्ति। याचिलागीं।' –ज्ञा २ ४९

**उपपत्नी**—स्त्री राख, अंगवस्त्र, पत्नीखेरीज दुसरी उपभोग्य स्त्री [सं उप+पत्नी]

**उपपद**—न १ गौणपद (सामासिक शब्दांतील) उपपद समास व उपशब्द पहा २ कोणत्याहि विषयांमध्यें किंवा कलेमध्यें प्रावीण्यदर्शक संज्ञा बी ए एम् ए काव्यतीर्थ, पुराणरत्न इ० ३ पदवी, बिरुद, बहुमानदर्शक किंवा पराक्रम, विशेष कृत्यदर्शक उपनाम, टोपण नाव विक्रमादित्य, आहवमल्ल, इ० 'विलियम जो विजयी या उपपदानें प्रसिद्ध आहे '–नि ५५१ ४ इंग्रजींत नामापाठीमागें लागणारें पद उ० ए ॲन दि (द) आर्टिकल ०तत्पुरुष–पु १ जेव्हां तत्पुरुषसमासांतील दुसरें पद धातुसाधित असतें तेव्हां त्यास उपपदतत्पुरुष म्हणतात उ० कुंभकार, ग्रंथकार, गृहस्थ इ० ०धारी–वि पदवीधर, ग्रॅज्युएट 'सदरहू कॉलेजांत चालू असणारा शिक्षणक्रम किंवा त्यांतून तयार झालेले उपपदधारी लोक यांपैकीं कोणीहि अद्याप आपल्या गुणांनीं विशेष लोकमान्य झालेले आमच्या एकिवांत नाहीं '–टि २ २३३ ०समास–पु शब्दाची द्विरावृत्ति करून किंवा काहीं एक साहाय्यक शब्द घेऊन जो समास बनवितात तो उ० दगडधोंड, भाकरी तुकडा, पुस्तकबिस्तक, उपशब्द पहा

**उपपद्म(हस्त)**—पु (नृत्य) आगदयागह सर्व यारें पद्मकोशापेक्षा जास्त विरळ व जास्त वाकडीं करणें [सं]

**उपपन्न**—वि १ सिद्ध केलेलें, स्पष्ट केलेलें, ज्याची उपपत्ति आहे असें २ साधनांनीं युक्त, समृद्ध, संपन्न, श्रीमंत सधन [सं]

**उपपातक**—न दुष्कर्म, लिंगम प्रतीचें पातक, गोवध कन्याविक्रय, नास्तिक्य इत्यादि पापें, हीं एकंदर ४९ आहेत महत्पातक पहा [सं]

**उपपात्र**—न पाणी पिण्याचें लहान भांडें, पंचपात्री, फुल पात्र, पेला इ० [स.]

**उपपादक**—वि सांगणारा, दाखविणारा, सिध्द करणारा, उघड करून देणारा, स्पष्ट दर्शविणारा [स ]

**उपपादणें**—उक्रि १ उल्लेखिणें, मांडणें, विवरण करून सांगणें, स्पष्ट करणें, विवेचन करणें, शिकविणें 'भक्ति ज्ञान विरक्ति। जियें शास्त्रें उपपादिति। तियें बोलावि महति। यथार्थनादें॥' २ सिध्द करणें, स्थापित करणें [स उप+पद्=जाणें, उपपादन]

**उपपादन**—न १ मांडणी, उल्लेख, विवेचन, प्रतिपादन, उप पत्ति 'शिस्तवार जी मांडणी करितात तिला उपपत्ति किंवा उप पादन म्हणतात '–गीर ७३ २ सप्रमाणसिध्दता, स्थापना [सं ]

**उपपादित**—वि १ उपपादिलेलें, सांगितलेलें, विवेचन केलेलें, स्पष्टीकरण केलेलें २ सिद्ध केलेलें [स ]

**उपपाद्य**—वि सांगावयाचा, मांडावयाचा, स्पष्ट करावयाचा, विवेचन करावयाचा ( विषय, मुद्दा ) [स ]

**उपपुराण**—न मुख्य अठरा पुराणांशिवाय इतर जीं गौण पुराणें त्यांपैकीं प्रत्येक लघुकालिका, वृद्धकालिका, पराशर, सिंह, नारद, सनत्कुमार, सौर, दुर्वास, कपिल, मानव, विष्णुधर्मोत्तर, शैवधर्म, माहेश्वर, नंदी, कुमार, औशनस, देवी, वरुण याहून वेगळ्याहि कांहीं यादी सांपडतात अठरा उपपुराणें पहा

**उपपुर**—न उपनगर, शहराबाहेरची लहान वस्ती 'भवतिं उपपुरें। गुढ्या गोपुरें।'–भाशु १३ [स उप+पुर]

**उपप्राण**—पु शरीरांतील पंचप्राणाहून भिन्न असे दुय्यम प्रतीचे जे वायु त्यांपैकीं प्रत्येक हे पांच आहेत–नाग, कूर्म, कृकल, धन जय, देवदत्त 'प्राणचि आहले उपप्राण।'–अपरोक्षानुभव ४६ [स ]

**उपप्लव**—पु १ हाणामार, लुटालूट, जाळपोळ ( शत्रु, लुटारू वगैरेकडून होणारा) २ जुलूम, जबरदस्ती, अन्याय ( जुलमी राजा, निर्दय माणूस यांजकडून) ३ (सामा ) पीडा, उपद्रव, त्रास [स]

**उपवर्‍हें**—स्त्री (प्र ) उपबर्हे, उशी 'बाहू हे उपबर्‍हें काय करणें कशा अम्हां सद्गुणा॥'–निमा–सुभद्राचंपु ४७०, [स उपबर्ह=उशी]

**उपबाधक**—वि पीडाकारक 'याचि कारणें उपबाधका। होती तुज अनेका॥'–शुच ३ २० [स उप+बाध्]

**उपबाधा**—स्त्री पीडा, दु ख

**उपभुक्त**—वि १ उपभोग घेतलेलें, वापरलेलें, आस्वाद घेतलेलें २ अनुभवलेलें, मनास उमगलेलें, स्वत स माहीत असलेलें [स उप+भुज् ]

**उपभोक्ता**—वि १ उपभोग घेणारा, वापरणारा, मालकी हक्क गाजविणारा, २ अनुभव घेणारा, स्वत च्या अनुभवानें जाणणारा [स ]

**उपभोग**—पु १ आस्वाद, विलास, सुख भोगण्याची क्रिया, उपयोग, भोग, भोगवटा २ अनुभव, स्वत अनुभवानें मिळवि लेलें ज्ञान ( सुखदु खाचें ) ३ रतिसुख, संभोग ४ ( अर्थशास्त्र ) मालाचा खप, उठाव 'उत्पादन व उपभोग यामध्यें मोठी खिंड पडता कामा नये '–ज्ञाको (उ) १९ [स उपभुज् ]

**उपभोगणें**—उक्रि १ आस्वाद घेणें, वापरणें, उपयोग करणें, उपभोग घेणें २ अनुभव घेणें, पडताळून पहाणें, अनुभविणें ३ रतिसुख घेणें, संग करणें, संभोगणें [ उपभोग ]

**उपभोगी**—वि उपभोग घेतलेलें, आस्वाद घेतलेलें, अनुभवलेलें

**उपभोग्य**—वि १ उपभोगावयाचें, वापरावयाचें, उपभोग करावयाचें २ अनुभव घ्यावयाचें, उपभोगास योग्य असें [स ]

**उपम**—न उपमा पहा 'तयाचें उपम दिल्हें त्यानें॥'–राम दासी ८३. [स उपमा]

**उपमणें-मिणें**—सक्रि उपमा देणें, तुलना करणें, सारखेपणा दाखविणें 'अगा तुझेनि देवें। कवणासि उपमावें॥'–ऋप् ७ १०४ 'तैसें ज्ञान हें उपमिजे। नानेसींचि॥'–ज्ञा ४ १८३ 'त्यासीं उच्चैःश्रव उपमणें॥'–वेसीस्व ८ ११७ –अक्रि सारखें असणें, दिसणें, जुळणें, बरोबरी करणें [स उप+मा=मोजणें]

**उपमणें—मिणें**—क्रि उडणें, अंतरिक्षांत वर जाणें 'तेथें होमधूम प्रगटला। तो गगनमार्गेसीं उपमला॥ जैसा जणउ (जाणों) निघाला। महादेवासी॥' 'अंतरिक्षीं वीज ल्वे तैशी गगनीं उप मिली॥'–वसा २४ 'इतुकें बोलुनि नारद तत्क्षणीं गगनीं उप मला॥'–वसा ४३ [स उत्+पत्, प्रा उप्पय]

**उपमर्द-न**—पु न १ अंग चोळणें, रगडणें, दाबणें २ तुड विणें, पिळणें, त्रास देणें, पीडा करणें, जुलूम करणें ३ मानखंडना, अपमान, इज्जत घेणें ४ ( व्यापक )आडदांड, बेमुर्वत कृत्य, अविचारी आचरण [स उप+मृद्]

**उपमर्दणें**—अक्रि नाश पावणें 'तैसा माझेनि प्रसादें। जीवत्रणु जयाचा उपमर्दे॥'–ज्ञा १८ १०७० –सक्रि १ अंग चेपणें, रगडणें २ तुडविणें, पिळणें, त्रास देणें, पीडा करणें ३ अपमान करणें इज्जत अब्रू घेणें [स उप+मृद्]

**उपमा**—स्त्री १ दृष्टांत उदाहरण, तुलना, दाखला २ सादृश्य, सारखेपणा, ( प्रतिमा, चित्र मूर्ति, यांतील ) ३ उपमान, तुलने करितां घेतलेली वस्तु ४ एक अर्थालंकार–दोन वस्तूंचें साम्य–साधर्म्य जेथें वर्णिलेलें असतें तेथें हा अलंकार होतो याचे अनेक प्रकार आहेत हा अलंकार सर्व अलंकाराच्या बुडाशीं आहे ' 'जो धैर्य धरसा सहस्त्रकरसा तेजें तमा दूर सा।'–नळ १७ [न ]

**उपमातणें**—न उपमा देणें, सादृश्य दाखविणें 'भणऔनि उपमातु कमठ। अपामार्जी॥'–शिशु ३९१ [स उप+मा]

**उपमाता**—स्त्री १ दाई, अंगावर पाजणारी बाई, धात्री 'सदरील अडचण असल्यास मूल पाजण्याम उपमाता ठेवावी.'

**उपरतणें**—कि थावणें, शांत होणें, स्थिर होणें 'तया सुमार्गी इटाल। देता मरलें वस्तुजात। उपरतलें चित्त। ठाईंचा ठाईं॥' –स्वादि १२५६ [स उप+रम्]

**उपरतविणें**—कि उफराटें फिरविणें 'थालागीं त्याग सन्यास। पुगावेयानें घेउनि मीस॥ उपरतविलें दूस। गीतेचें तें॥' –राज्ञा १८८२ [स उत्+परा+वृत्-वर्त]

**उपरता**—वि क्रिवि १ वरचा, वरला, वरील 'आणीकही शास्त्र उपरता। जिया सनकादिकनामें विख्याता।' –ज्ञा १५ २०५ २ उलट, उफराटें, विपरीत 'तें विसरलासि हें उपरतें। सद्गुरु आदरिलें॥' –ज्ञा ११ ३८४ [स उपरि+त]

**उपरति**—स्त्री १ थावणें, बंद होणें, शांत होणें, खळ, खंड, उपरम २ विरक्ति, वैराग्य, विषयापासून निवृत्ति, सुखाविषयीं उदासीनता 'उपरति होऊनि चित्ता। निरवधि तल्लीनता। निरंतर॥' –ज्ञा ? १७३ [स उप+रम्]

**उपरत्न**—न मुख्य नऊ महारत्नांशिवाय इतर कांहीं रत्नें उ० सोरगटी, स्फटिक काचमणि, भीष्ममणि, मुक्ता–ज्योतिरस, राजवर्त, राजमय, ब्रह्ममय, जलकांत, हरागी, चिगवकर, सौभाग्य वर, विषहर, श्रीकांत, हंसमाली, कौस्तुभ, चिंतामणि, राजमणि, धूलीमरकत, भुजंगेशमणि, रान, सीगलमणि, स्पर्शमणि, तिचिर, शिला, कर्पूरांश्मा, शक्तिचूर्णक, नीलकंठ, गरुड, परीस, केदार, स्यमंत कमणि, केयूर इ० २५ मुख्य उपरत्नें व १०० किरकोळ रत्नें आहेत –रत्नपरीक्षा (खानेटकृत) एकंदर ८४ रत्नांपैकीं ९ महारत्नें आणि बाकीचीं ७५ उपरत्नें समजतात –जव्हेरखाना (बडोदें) १ [स]

**उपरदवडा**—पु १ वाजवीपेक्षां जास्त मागणी, फाजील हाव २ वरचढपणा, वरचष्मा, वर्चस्व 'उगिच गाल फुगवून रुसावें, आला दिवस उपरदवडा।' –प्रला १६२ ३ अधिकार सत्ता, प्रमुखत्व (क्रि० करणें, घेणें, चढवणें, चालविणें होणें, चढणें, चालणें) ४ वाजवीपेक्षां जास्त मोबदला, मागणी, थोडें देऊन फार काढण्याची प्रवृत्ति अ गळा देऊन कोहळा काढणें (क्रि० करणें) ५ एखाद्याचें बरें करू गल्यास त्यांत यश न येऊन यानें मात्र वाईट केलें असा दोष (ठपका) येणें –मनका [उपर+दवडणें] म्ह० उपरदवडा खावयावर xxx = वरचढपणा करणारा नेहमीं आपली मिजास चालवितो याअर्थी

**उपरदुवा, उपरपगडा उपरपंच उपरपंजा**—पु तिफाशी सोंगट्याच्या खेळांत मेलेली सोंगटी लावण्याएवढा दाना वर उरणारें दान उ० पंचरामधील पंच किंवा पगडा, दसदाबारा मधील दान किंवा दुवा, पंचरा, सोळा किंवा सतरामधील पंचा म्हणजे पांच, किंवा दहा इत्यादि, दुवा,पगडा, पंच, पंजा हीं खेळा तील दोन, एक, एक, पांच हीं दानें आहेत

**उपरप्यादी**—स्त्री बुद्धिबळांत एका प्याद्यानें शत्रूच्या राजास शह देऊन लागलीच दुसऱ्या प्याद्यानें प्यादेमात करणें प्यादी पहा [उपर+प्यादी]

**उपरबाहेरचा वारा**—पु (नाविक) वायव्यदिशेकडून येणारा वारा

**उपरम**—१ थावणें, बंद होणें, शेवट, विश्रांति, विराम 'कासया जयो उपरमु।' –गीता १२३४२ 'अहो ज्या सद्‍ मार्गें जनन मरणाचा उपरम' २ शांति, विरक्ति, वैराग्य 'केले होती वृथा श्रम। चित्ता उपरम न होता॥' –तुगा ३३१६ ३ आनंद, संतोष 'ऐसा ज्याच्या नामाचा महिमा। वर्णितां दव पावलें उपरमा॥' –ह १६ ८ 'असो आतां यशोदे माय। गोष्टी याच्या सांगों काय। ऐकतां चित्ता उपरम होय। प्रेम सये नावरे मज॥' –ह ७ २३७ [स उप+रम्]

**उपरमणें**—कि १ थांबणें, शांत होणें, बंद होणें, स्थिर होणें २ रममाण होणें, आनंद पावणें, संतुष्ट होणें, उपक्रीडणें, प्रफुल्लित, ताजातवाना होणें 'उपरमोनि पाहे सुंदरी। तंव अंगीं आदळला श्रीहरी॥' –एरुस्व ७६३ ३ विसावणें, विरमणें 'शिव आणि श्रीधर। ह्याचे भक्तीस उपरमति तत्पर॥' ४ मरणें, मृत्यु पावणें [स. उप+रम्]

**उपरमाडी**—स्त्री घराचा वरचा मजला, माडी, उपरखण, माडीवरची माडी 'पद्मया वैदर्भी मग उपरमाडीवरि चढे।' –सारु ७ ८४ [उपर+माडी]

**उपरवळ्या-वाळ्या**—क्रिवि १ वरून, उंच ठिकाणाहून, उंचावरून 'सफेलीवरून उपरवळ्या खंदकांत उडी टाकली' २ वर, उंच, डोक्यावर [उपरि+वरून] ०**अंवट मागणें**–कारणाशिवाय दुसऱ्याच्या भानगडींत पडणें, रस्त्यावर उपरसूळ घेणें; विकत श्राद्ध घेणें

**उपरवांयां**—क्रिवि कारणाशिवाय, जरूरीशिवाय [स उपरि+वि+इ, म उपर+वायां=व्यर्थ] ०**अरट घेणें**–कारणाशिवाय भांडणें

**उपरसाल**—स्त्री बाहेरची साल, कातडी, चामडी, अंतर सालीच्या विरुद्ध [स उपरि+छाल]

**उपरसाल**—स्त्री एक प्रकारचें भात [स उपरि+शालि, प्रा सालि, म साळि]

**उपरा**—पु (राजा) बहार मोसम, बहर

**उपरा उपरी**—क्रिवि तातडीनें, लागलीच, तावडतोब 'सिद्ध नाद वेग तैं। उपराउपरी धाविन्नें।' –एरुस्व ८२०, 'निष्काम उपवर्णें चौफेरीं। तीं जाल्हिं उपराउपरीं॥' –एभा २३३१९ [स उपरि+उपरि]

**उपराग**—पु ग्रहण 'चंद्रासि लागति कळा उपराग येता।' –नव ५ [स उप+रञ्ज्]

**उपराग, उपरागिणी**—पुस्त्री गौण राग, रागिणी 'राग उपराग भार्यासहित । सामगान एक करिती ।'—नवि १६ ६९ [स ]

**उपराटणें, उपराटा**—उफराटणें–उफराटा पहा (गोमांतकी रूपें–उपराटें, उपाटें, उपराटें) 'उपराटा मेली प्राणें ।'–गीता २१२६० 'तो उपराटा गमे ।'–गीता ११ १३७

**उपरांटणें**—उक्रि पालथें करणें, सांडणें, पाडणें, उपडून पाडणें (गाडा, गडगन इ०) [स उपरि+घट्ट–घट्ट–घट्ट–घाड–गाय–राडणें=भाकणें वगैरे]

**उपरांत, उपरांतिक**—क्रिवि १ नंतर, मागाहून 'उपरांत नगरदाकार्थी, गार्थेकार्यार्थी, मोक्षकार्यार्थी'–ज्ञानेपो ४१६ 'तो मनहर वारल्याच्या उपरांतही त्याची वरील रंगेल वृत्ति जर तशीच कायम राहिली तर या गोष्टीबद्दल त्याची मोठी तारीफ करणें रास्त होईल'–नि ९२८ –शअ शिवाय, आणखी, वर 'कस्स ! उपरांत नाहीं अगदीं हग शिवा !'–भा ८ [स उपरि अपरांतिर याप्रमाणें प्रयोग, गु गो उपरांत, हिं उपरांत]

**उपराम**—पु थांबणें, बंद होणें, विराम, विश्राम उपरम पहा [स ]

**उपराळ**—वि अधिक, फाजील, वाजवीपेक्षा जास्त [स उपरि+आलु हिं उझाल=आणखी, वर ]

**उपराळ**—स्त्री (क) ओढ्याळ्याकडची स्मशानभूमि

**उपराळणें**—अक्रि भरून वाहणें (भांडें, नदी) उ० उपराळून येणें, भरणें, चालणें [स उपरि+आलु, हिं उझाल=भरून]

**उपराळा**—पु १ दोहों बाजूस सारखें ओझें करण्याकरितां जनावराच्या पाठीवरील एका बाजूस घातलेलें (लाकडें इ० चें) वजन २ वाजवीपेक्षा अधिक सामग्री, संग्रह (माल द्रव्य वगैरेचा) राखून ठेवलेला जिन्नस खर्च भागवून उरलेला माल, द्रव्य, पदार्थ इत्यादि अडल्यास लागल्यास उपयोग करतां येईल अशी तरतूद (दारू गोळा, सैन्य इ०) ३ ठराविक वजनापेक्षा अधिक असलेला माल ४ वचस्व, वरचढपणा (वादांत, भाषणांत) ५ विकत घतलेल्या मालावर ठरलेल्या वजनापेक्षा थोडा अधिक मिळणारा माल (गुळाची ढेप लागल्याचा गठ्ठा इ०चे तोललेल्या वजनापेक्षा ओदयात अधिक वजन भरतें तें बाकी नाहीं न आवरता वतात) ६ जनावराच्या ओझ्यावर टाकलेले किरकोळ जिन्नस (कांटस्या इ०), किरकोळ वस्ती ७ भरपाउ, वनावाट, मोबदला (क्रि करणें) 'कच्च्या गड्यास कोहीं गाल्याचा शिवा वयाचा उपराळा यावा' कुवडी वेद्य –(बडोदें) १७ (इ) हॅंडीकॅप ८ एखाद्या निरा वजन करताना दुसऱ्या पारड्यात घातलेलें वजन, दडपण ९ (ल) आढापीट, खडागोप 'इनामूनाची भार–दारी गळा । मत्रापदेश भिशेचा साहळा । द्रव्यावाचऱ्याचा उपराळा । पोट भरावयाकारणें ॥'–स्वादि ३ ३ १० [ चि उपराळो=प्रत्युपकार ] [ स उपरि+आलुच्, हिं उझाल=वर, अधिक ]

**उपराळा**—पु १ आरोप, आळ, चोरी वगैरे २ कुराण, आपत्ति, निमित्त (कज्जा, युद्ध इ० स) 'आम्ही केल्या नियमाप्रमाणें ठळणें नाहीं, परंतु तुमचेपासूनच उपराळा झाला तरच आम्हाला उठणें प्राप्त' ३ (गो) तक्रार ०घेवप–नाव ठेवणें, आळ घेणें [ उपर+आळ ]

**उपराळा**—पु साहाय्य, मदत, कुमक 'आणि स्वामीसही परम असाध्य होऊन त्याचा उपराळा साधावयाचा होणार ।'–मराभा [ स उपरि+आलुच्, हिं उझाल=मदत, चित्पा उपराळा]

**उपरि**—शअ वर, उपरी पहा १ वरती, वरच्या बाजूस 'उपरि संकट साचें परतु साचें जयांत सुगमाचें ।'–नळ ३५ २ वर ३ यानंतर, यावर, अधिक, याशिवाय, जास्त, पुढील, विशेषत एतत्, किंवा तत् लागून प्रयोग, उ० एतदुपरि, तदुपरि –वि उत्तर, पुढील 'यद्वैभव खंडाच्या उपरिभागात बारावेंचे अध्याय एक ते बारापर्यंत ब्रह्मगीता'–गीर ४ [ स ]

**उपरितन**—वि वरचा [ स ]

**उपरिप्रवाहीचक्र**—न (यंत्र) वरून पाण्याचा लोंढा चाकावर पडून फिरणारें चक्र (इ) ओव्हरशॉट व्हील –ज्ञाको ए १४ [स ]

**उपरिभाग**—पु वर आलेला भाग, वरचा भाग, बाजू [स ]

**उपरिभूमि**—स्त्री १ उंचावर असलेली जागा, जमीन (माडीवरील, डोंगरावरील) २ वरची सोली, उपरि [ स ]

**उपरी**—वि १ गांवांत जमीन, वतन नाहीं असा, मिरासदार नसणारा, तात्पुरता राहणारा, स्वत ची मालकी नाहीं अशा जागीं राहणारा २ (ल) उडाणटप्पू, आगापिछा नसलेला 'एखादा उपरी पोर धरून आणून स्वर्गाचे दरवाजे मोकळे करून घेतल्याचें सुख मानून घ्यावयाचें'–टि ४ १८ म्ह० उपर आले आणि घरची झाले ३ खंडानें, कौलानें जमीन करणारा, खंडकरी, खेडूत, शेतकरी याच्या उलट, ४ वरिष्ठ, वरचा 'चित्रयास शिकारीचें सर्वाईसाठीं उपरी अधिकाऱ्याच्या परवानगीनें नेणें'–चिमा (बडोदें) २८ –क्रिवि नंतर, पुढें, वर उपरि पहा 'उपरी बाळें रामलग्ना ।' –रावि २० १३९ (पत्रावरून) आशीर्वाद उपरी, विनंती उपरी, इ० –स्त्री माडी 'गग त राघवाची उपरी । तयें देखिली राय कुमरी ॥'–कथा १ ६ ३५ –पु उचवटा 'स्वामिपुजेसि ते अवसरीं । स्थळ केलें उपरीवरी ।'–सवि १३ १३८ (गो) [स उपरि, सिं आपिरो, गु उपरी, हिं उपर ]

**उपरुद्ध**—वि अडवला केलेला, प्रतिबंध केलेला, अडविलेला [ स उप+रुध् ]

**उपरूढ**—वि उपरी, श्रेष्ठ, 'तो गोडिया पे उपरूढ व्हावियेतें ।'–भाए ७९१

**उपरें**—क्रिवि आधिक्यानें ' एऱ्हवीं दैत्यकुळ साचोकारें । परि इतुलीही सरी न लहे उपरें । ' –ज्ञा ९ ४५० –न ( कासार धंदा ) जोडाच्या भाग्याचा वरचा भाग [ स उपरि ]

**उपरोध**—पु १ प्रतिबंध, अडथळा, अडचण, जुलूम त्रास ' हेंही उपरोधें करणें । तरी आर्तभय दूर्णें । '–ज्ञा १३ २८८ 'गावा जवळ जर तुम्ही सैन्य उतरलें तर ग्रामस्थास उपरोध होईल ' २ भीड, संकोच, शरम, चोरी ' तुका म्हणे अहो रखुमादेविच्या वरा । उपरोध का धरा माझा आता । ' –तुगा १२४३ ' जें काम पडेल तें मला सांगीत जा, हे थोर यास कर्में सांगावें, असा उपरोध बाळगू नका ' ३ आग्रह, हट्ट ' बाळक स्तनपानीं उपरोधु करी ' –ज्ञा ११ ७९ ४ व्याजोक्तीचें, छद्मी भाषण, मर्मी लागल असें भाषण, टोचून बोलणें, आडून, घालून पाडून बोलणें ' उपरोधु जी सन्मुख । तुम्हीं कडु । ' –ज्ञा ११ ५४३

**उपरोधाचा, उपरोधी-क**—वि छद्मी, व्याजोक्तीचें, निंदागर्भ, उपरोधपूर्ण, वरमण्यासारखें ( भाषण, लेख ) 'साहेब पोर वेळ गुंतवून उशीर करून गेला म्हणजे त्याना पंतोजी असें यावें महाराज, बसावें, पर बोर्णो आपन यार, इ जें करितो तें उपरोधिक ' –शास्त्रीबो

**उपर्जन-ना**—स्त्री ( वों ) जमिनीची, मपत्तीची, मालमत्तेची वाढ, उत्कर्ष, भरभराट ' पंच विषयवासना । अनुक्रमें बैसे नाना । तयें स्थूल देह उपर्जना । कारण होय । ' –सिस १ १५० [ स उप+अर्जन ]

**उपल**—पु दगड, उत्पल ०प्रक्षेप—पु १ दगडमार, धोंडमार २ ( ल ) प्रतिपक्षावर मुद्दे अथवा प्रमेयाचा भडिमार करून त्यास गोंधळात टाकणें काहीं अन्यावाटेल युक्त्यांनीं खडन करणें ३ आपण पराभूत होत असता प्रतिपक्षावर जोरजोरानें तुटून पडून, असबद्ध भाषणें करून आपला पराभव लपविण्याचा प्रयत्न करणें ४ भोग आरोप करणें, आळ घालणें, अपशब्द बोलणें [ स उपल= दगड+प्रक्षेप=मारा ]

**उपलग**—वि उपयोगी [ स उप+लग् ]

**उपलट**—न ( राजा ) १ घाई, गडबड ' आजपर्यंत अशी लग्न झालेली असतील पण तीं इतक्या उपलटान झालेलीं नाहीत ' –डाक्की मूट ६० २ उपद्व्याप भानगड

**उपलब्ध**—वि सापडलेलें, मिळालेलें, प्राप्त, अर्जित [ स उप+लभ् ]

**उपलब्धि**—स्त्री १ प्राप्ति, अर्जन हस्तगत होणें स्वाधीन होणे २ ज्ञान ज्ञातता जाणता इन्द्रांची उपलब्धि ज्ञानेंद्रिया वाचून होत नाहीं ' ३ अस्तित्व, प्रत्यक्षता ' रसायनशास्त्राची उपलब्धि त्या वेळ्यात नाहीं '

**उपलभणें, उपलंभणें**—अक्रि प्राप्त होणें, मिळणें ' परी देहाचें मोटकें उमें । आणि चेतना तेथ उपलभे । '–ज्ञा १५ ३७३ [ स उप+लभ् ]

**उपलभ्य-मान**—वि १ उपलब्ध असलेलें, प्राप्त होण्यासारखें, जिवंत, हयात, ज्ञात, चालू २ साठणारें, लाभणारें, प्राप्त होणारें, फायदा–नफ्यासारखें मिळणारें [ स ]

**उपलवण-णी**—स्त्री १ मिष्ट, रुचकर पदार्थ, पक्वान्न 'नव रसाची उपलवण । '–विपू १ १६ २ विस्तार, वर्णन 'उमटनी जीव भ्रमाच्या थेगी । तयींचीं करावी उपलवणी । स्वानुभवें कीं । '–विपू ३ २ ' म्हणोनि इया वाहणी । केली म्या उपलवणी । '–ज्ञा १३ ८५० [ उप+लवण ]

**उपलवणें-विणें**—उक्रि १ प्रसार, विस्तार ' मौक्तिका चिया वेलीं फुलरिया । कीं क्षीरसागरा लहरी उपलवलिया । '–शिशु ५९० २ विवेचन, विस्तार, व्याख्यान, वर्णन करणें ' हेचि आनि भाली । प्रमेय उपलवू पुढती । परी तु प्रतीती । याचि घे पा । ' –ज्ञा १४ ८५ ३ फुरणें, उकलणें, फुलविणें विकास करणें ' साहिला चिए सेजें । बोलाचा रसु उपलविजे । ' –शिशु २४ ' जैसी चद्र मयाची घडी । उपलविली । ' –ज्ञा १० २२३ ३ व्यस्त होणें तेथें जाणो कोटी सूर्य घडी-उपलविली चोखडी । तैसी तेजपर वडी । श्यामाग चतुर्भुज । ' –स्वादि १० ३ १३ ४ प्रमत्त होणें ' तेणें हरिखें आता उपलवला निरूपील । ' –ज्ञा ६ ४८८ [ स उत्+प्लु, उप+प्लु, उत्प्लवन किंवा उपप्लवन ]

**उपलक्षण**—न १ ( साहित्य ) लक्षणा, अंशावरून संपूर्णाचा, व्यक्तीवरून वर्गाचा व वर्गावरून जातीचा निर्देश करणें उ० सोंगटी खेळू नये ' यथें सागटी हें उपलक्षण, काहींच खेळू नये असा अर्थ, तुम्ही माझे घरीं चोरी केली असतां मीं तुम्हास शिक्षा करावी कीं नाहीं ? ' या ठिकाणीं तुम्ही म्हणजे कोणीहि २ रूपकात्मक व दृष्टातपर भाषण उपमा ' तें दीपाचें उपलक्षण । निर्वातींचिया । '–ज्ञा ५ ३०८ ३ एका वस्तूचा, त्या वस्तूशीं तात्पुरत्या संबद्ध असलेल्या दुसऱ्या वस्तूवरून निर्देश उ० ज्यावर कावळा बसला आहे तें रामाचें घर, यथें कावळा हें घराचें उपलक्षण [ स ]

**उपलक्षणें**—अक्रि मनात धरून, हेतू–उद्देश धरून बोलणें, नेम ठेवून बोलणें अर्थ असणें

**उपलक्षित**—वि अप्रत्यक्ष कथित, सकल्पित, रूपकानें किंवा उपलक्षणानें सांगितलेला [ स ]

**उपलक्ष्य**—वि अनुमेय सकल्पित, गर्भितार्थ काढण्याजोगें, गृहीत मानण्यासारखें [ स ]

**उपला-ली**—पुस्त्री ( हिं ) गोवरी [ स उप+लिप् ]

**उपलाण-णा-णी-णू**—वि खोगीर नसलेल्या पाठीवरचा (घोडा) ' कीं जीव नृपाचे वारु उपलाणे । ' ज्ञा १८ ४६८ ' जैसा वारु

उपलाणी । वस्य करी अश्वमाह्णी।'—एभा २० २१६ [स उत्+पर्याण=घाड्याचा साज, खोगीर, प्रा उप्पाण ] ०वसणें—जिनाखेरीज घोड्यावरवसणें 'एक उपलाणी बैसले । पायवद सोडू विसरले । तेणें गुतोनि खालीं पडिले । पायवद धसती पाठीवरी ॥' —ज ७६ ६०

**उपलाणी**—वि १ उपरी, बाहेरचा, थोडा वेळ राहणारा 'ता मनुष्य आपल्यायेथील नाहीं, उपलाणी आहे' २ (व ) विन आधारी

**उपलाणें, उपलानें**—न विनीचें घोडदळ, घोडेस्वार, विनी हुलमार-स्वार पहा 'उपलानें निगालें वरवतु । हाटामाजि ।'—शिशु ५०३,५५१,२६९ 'धाडुनी इद्रियाचें उपलाणें । विषयाचें घाली घालणें । हारेंशी ब्रह्मचर्याते जिणें । पाचाहुनि ॥' —ज्ञाप्र ७३७ [स उत्+पर्याण=खोगीर, प्रा उप्पलाण ]

**उपलाशी**—वि (गो ) उपरी, पूर्ण लाभ न मिळणारें

**उपलिप्त**—वि लेप केलेला, लावलेला, फासलेला, माखलेला, सारवलेला, ल्पेटलेला [स उप+लिप् ]

**उपलेप-न**—पुन १ चोळणें, माखणें, लावणें, फासणें, लेप करणें २ लेप, गिलावा, गिलाव्याचा पदार्थ, (इ) प्लॅस्टर [स ]

**उपवड-ढ**—स्त्री जागृति 'नाना उपवड होता खेंवो । तुरें स्वप्नभ्रमाचा ठावो ।' —ज्ञा १५ २६४ उपवडणें पहा

**उपवढण**—अक्रि जागृत, जागें होणें 'नोहे हर्षशोकासी कारण । उपवढलिया जाण । निया परी ।'—ज्ञा १५ २९४ [स उप+वृध् ?, का उप्पवडिसु=जागें होणें, उप्पवड=जागं करण्याचें गीत ]

**उपवर्णें**—अक्रि (व ) नाहींसा होणें, गुप्त होणें 'तयल्या तेथें चाकू उपवरा ' [स उत्+च्यु=उडणें, प्रा उप्पव ? ]

**उपवन**—न १ बाग, उद्यान, बगीचा, २ (ल ) रमणीय स्थान वन याच्या उलट [स उप+वन ]

**उपवर**—वि १ लग्नास योग्य वयाची, विवाहास योग्य (मुलगी, मुलगा ) 'उपवर परी उपायचि नाहीं ।' —रामदासी २ १३६ २ विवाहाचा सामान्य काल अतिक्रमून विवाह न होता राहिलेला (मुलगा, मुलगी ) ३ ऋतुप्राप्त झालेली 'पैठणात पत्नी जाणी उपवर ' —रामदासी २ ७४ ४ समागमक्षम 'राधिकेचा मानस जाणून उपवर झाला सखा ।' —पला २ [स उप+वृ ]

**उपवस्त्र**—न १ उत्तरीय, अगवस्त्र, उपरणें, पाघरावयाचें वस्त्र २ (ल ) रखेली, राख [स उप+वस्=आच्छादन करणें ]

**उपवारा**—पु उगाडा, उवारा 'रगमाहालीं होतो उपवारा । कोणी प्रियकर आणवा राधेदाचा वारा ।' —पला ४ २६ [उवारा ]

**उपवास**—पु सबध दिवस (अहोरात्र ) भोजन न करणें उपोषण, लघन, अनाहृति, भोजनाभाव निरशन, अर्ध्या दिवसाच्या निराहारासहि हा शब्द लावितात उ० सोमवार-शनवारचा उपवास. [स उप+वस् (यज्ञ भूमीजवळ, यज्ञारभाच्या पूर्वीच्या दिवशीं सायकाळीं जाऊन नतस्य राहणें हा मूळ अर्थ ) ]

**उपवासी**—वि १ उपास केलेला, उपोषण केलेला २ भोजन न केलेला, उपाशी राहिलेला ०मरणें—भुकेनें व्याकुळ होणें, भुकेनें आसन्न मरण होणें 'वाटे जाता घडी घडी । पाहे पोह्याची गाठोडी। मनात म्हणे घरीं वाळें रोकडीं । उपवासी मरतील ॥' —ह २१ ६१

**उपवासु**—न सानिध्य, जवळ राहाणें 'उपवासु जालेया जागर । नाहीं तया ।' —ऋ ८८ [स उप+वस् ]

**उपविद्या**—स्त्री ब्रह्मज्ञानविरहित इतर भौतिक विद्या, ज्ञान, भौतिक शास्त्र, ईश्वर, धर्मशास्त्र या विरहित अभ्यास, व्यावहारिक ज्ञान [स ]

**उपविष**—न विषाचा एक गौण प्रकार, रुईचा चीक, निवडुगाचा चीक, कळलावी, कण्हेर, गुज, अफू, धोतरा, या सात उपविषाच्या जाती होत [स ]

**उपविष्ट**—वि १ (सामा ) बसलेला, स्थापन झालेला, आलेला, दाखल झालेला २ जवळ, शेजारीं बसलेला [स उप+विश् ]

**उपवीत**—न नैवर्णिकानें वापरावयाचें यज्ञोपवीत जानवें [स उप+वे=विणणें ]

**उपवृत्त**—न १ समवृत्तासीं म्हणजे कोणत्याहि स्थलाचे पूर्व आणि पश्चिम बिंदु व खस्वस्तिक यामधून जाणारें जें त्रिज्यावृत्त त्यासीं समातर असें जें लहान वृत्त तें, पूर्व पश्चिमवृत्तासीं समातर लहान वृत्त वर्तुळ २ कोणतेंहि दुय्यम वृत्त, वर्तुळ [स उप+वृत् ]

**उपवेद**—पु मुख्य चार वेदाशिवाय इतर वेद जसें—ऋग्वेदाचा आयुर्वेद (कोणाच्या मतें हा अथर्ववेदाचा उपवेद आहे), यजुर्वेदाचा धनुर्वेद सामवेदाचा गाधर्ववेद, अथर्ववेदाचा स्थापत्यवेद शिल्पशास्त्र, गौणवेद 'आयुर्वेद धनुर्वेद गाधर्व वेदमात्मन । स्थापत्यचासृजद्वेद क्रमात्पूर्वादिभिर्मुखै ।'—भागवत ३ १२ ३८ [स ]

**उपवेश-न**—पु १ (सामा ) बसणें, बसलेपणाची स्थिति २ जवळ बसणें [स उप+विश् ]

**उपशब्द**—पु शब्दाचा अर्थ विशद, विस्तृत करण्याकरिता तत्सदृश किंवा त्याच अर्थी जो दुसरा शब्द प्रतिशब्द जोडतात तो उ० पोथी-पुस्तक, लाकूड-फाटा, गवत-काडी, दगड-धोंडा, भाकरी-चिवरी वगैरे [स ]

**उपशम-शाति**—पुस्त्री १ शाति निग्रह, लय, शेवट 'नितिया मान मांडिली । उपशमाची ।'—ज्ञा ३ २५२ २ विराम थाबणें 'मागता उपशम व्याधीचा ' —गुच २ २१३ 'मागेही होय उपशाति । केवळ उरे शाति ।' ३ नाश 'आपणावर येणाऱ्या सकटाचा उपशम केवळ स्वतत्रतेनें होत नाहीं —इमू ३१० [स उप+शम् ]

**उपशमणें**—अक्रि नाहींसें होणें 'जो शरीरभावातें उपशमी। तो अभियज्ञु एथ मी मी।'—ज्ञा ८ ३७ 'कठिण काळ तुम्हा उपशमला।' —विठ्ठलकृत द्रौपदीवस्त्रहरण २१ [उप+शम्]

**उपशमन**—न १ शांति, उतार, कमी होणें, उपशम उपशम पहा 'दाविलसे स्फोटकासी। म्हणे उपशमन केंवी होय।' —गुच ५० ५५ २ उतार पाडणारें, शांत करणारें औषध, उतारा, इलाज, तोडगा 'महादेव तमोगुण। त्या तमासि उपशमन। तुझीये चरणींचे रज जाण॥' —एरुस्व ४ ५३ [स]

**उपशस्त्र**—न गौण हत्यार, मारण्याचें किरकोळ साधन 'हे उपाय केवळ उपशस्त्रवत् होत' —व्यनि ५६ [स]

**उपशाखा**—स्त्री लहान फांदी, फांदीला फुटणारी फांदी, दुय्यम, गौण शाखा। 'बीज जगाची जवळीक राहे। आणि तेंचि शाखोपशाखीं होये।' —ज्ञा ९ १०९ २ एखाद्या मुख्य खोडापासून फुटणारा अंकुर, फांदी [स]

**उपशांत**—वि शांत झालेला, थंड झालेला 'तया स्यात करण जिता। सकळकामोपशांता।' —ज्ञा ६ ८१ [स]

**उपशांति**—उपशम पहा

**उपशास्त्र**—न न्याय-मीमांसादि मुख्यशास्त्राहून इतर दुय्यम दर्जाचीं गायन, वैद्यक, वगैरे शास्त्रें किंवा त्यावरील ग्रंथ प्रत्येक [स]

**उपशिक्षक**—पु १ शिक्षकानें आपल्या साहाय्याकरिता, शिकणाचें काम करण्याकरिता अगर विद्यार्थ्यांवर नजर ठेवण्याकरिता हाताशीं घेतलेला वरच्या वर्गांतील हुशार विद्यार्थी, उपगुरु, मालचाट्या, (इ) मॉनिटर २ दुय्यम शिक्षक, मदतशिक्षक [स]

**उपश्रुति**—स्त्री १ परोक्ष किंवा भवितव्य गोष्टीविषयीं प्रश्न पाहाण्याकरिता रात्रीं हीन वर्गाच्या (चांभार, परीट इ०) घराजवळ जाऊन उभें राहिलें असता आतून साहजिक निघालेला बरावाईट शब्द, असा शब्द आपल्या गोष्टीवर प्रकाश पाडतो अशी मानण्याची पद्धति, पडताळा २ आपल्या प्रस्तुत गोष्टीसंबंधीं कोणिक अप्रस्तुत व्यक्तिमुखानें सहज निघणारा बरा-वाईट शब्द आपल्याकडे लावून घेणें 'मी लग्नाचा विचार करीत बसलों होतों तों मरशीरे, मरशीरे अशी तिकडून उपश्रुति झाली, तस्मात् यदा लग्न करूं नये' ३ लागोवागी, कर्णोपकर्णी आलेली देशांतराची अनिष्ट बातमी (भविष्यकालीन किंवा वर्तमानकालीन वाईट गोष्टीची) ४ जनवार्ता, वदंता, अफवा [स उप+श्रु=ऐकणें]

**उपश्लिष्ट**—वि १ शेजारीं ठेवलेला, जवळ असलेला, संसर्ग असलेला, चिकटलेला, उपश्लेष असलेला [स उप+श्लिष्]

**उपश्लेष**—पु सान्निध्य, जवळ असण्याची स्थिति, जवळपणा [स]

**उपष्टंभ**—पु पाया, आधार निमित्त, आश्रय [स उप+स्तम्भ्]

**उपष्टंभक**—पु आधार, धीर देणारा, आश्रय देणारा, साहाय्य करणारा, सावरणारा, हात देणारा [स]

**उपस्थीव**—क्रिवि (व) विनाकारण, विन आधारी [स उप+स्था ?]

**उपसण-णी-णें, उपसा, उपसामर**—क्रिवि उपसाउपसी वगैरे वर्णव्यत्यासानें उसपण इत्यादि शब्दापासून हे शब्द साधिले आहेत उसपणें पहा

**उपसभापति**—पु सभापतीच्या गैर हजेरींत काम करणारा, उपाध्यक्ष —सभा ७१ [स उप+सभा+पति]

**उपसमीप**—क्रिवि जवळ, सन्निध, शेजारीं 'चिंत जो उपसमीपचि वासी। राघवीं करील तो उपवासी।' [स उप+समीप]

**उपसरण**—न जवळ येणें, शेजारीं येणें, पुढें सरणें [स उप+सृ]

**उपसर्ग**—पु १ (व्या) धातूच्या मागें लागणारें अव्यय, उपपद उ० अति, अनु, उप, परा, प्रति सम् इ० २ उपद्रव, त्रास, पीडा, विघ्न 'तेंवें दैत्यीं उपसर्ग केला लोकां। रचिली द्वारका तुका म्हणे।' —तुगा ११ ३ दुश्चिन्ह, अनिष्टसूचक गोष्ट (उत्पात, उल्कापात इ०) [स उप+सृज=उत्पन्न करणें]

**उपसर्पण**—न जवळ येणें, जाणें, सान्निध्य, आगमन 'धना लागी नीचसेवन। उपसर्पण हीनाचें॥' —एरुस्व १३ ३१ [स उप+सृप्]

**उपसवें**—क्रिवि जवळ, सन्निध 'आपणवेंसे उपसवें भेटी॥' —नव १६ ४० [स उप+वस् वर्णव्यत्यय]

**उपसंहरणें**—अक्रि शांत होणें, लोपणें, नाश पावणें, संपणें ता धाप तरी उपसंहरला॥' —ज्ञा ११६१ 'जें उपसंहरूनि कीजेल गोठी। तें मीचि आहे॥' —ज्ञा ७ ३० [स उप+सम्+हृ]

**उपसंहार**—पु १ संकोच, एकत्रीकरण, गुंडाळणें, आटपणें, आवरणें 'प्रपंचाचा उपसंहार होय तेंवें आत्यंतिक।' २ सारांश, शेवट, समाप्ति ३ ग्रंथाचा शेवटचा भाग, शेवटचे शब्द, सिद्धांत लोकन 'ग्रंथाचें तात्पर्य काढणें असल्यास (एकंदर) सात गोष्टी साधनभूत असून पैकीं उपक्रमोपसंहारी म्हणजे ग्रंथाचा आरंभ आणि शेवट या पहिल्या दोन गोष्टी होत॥' —गीर २१ [स]

**उपसंहृत**—वि १ गुंडाळलेला, एकत्र केलेला २ समाप्त केलेला शेवट केलेला [स उप+सम्+हृ]

**उपसळा**—वि खोडकर, नासदायक, उपद्रव देणारें, वाईट वर्तनाचें (मूल वगैरे) [स उप+शल्य]

**उपसळो**—पु १ उपसर्ग, त्रास, उपद्रव, उद्वेग (उंदीर, मांजर, कुत्रा वगैरेपासून होणारा) २ कटकट, त्रास (मुलें वगैरेंचा), छळवाद, सतावणी, (क्रि० आणणें, देणें) [स उप+शल्य]

**उपसागर**—पु समुद्राचा जमिनींत शिरलेला मोठा व रुंद भाग, लहान समुद्र उ० बंगालचा उपसागर [स उप+सागर]

**उप(व)साण**—स्त्री (वा) कुवट वास, कुजकी घाण (क्रि० येणें, पडणें) [फा उस्त्रे-खाफ ?]

**उपसानुपसी**—स्त्री १ पदेटीवर येऊन आवशानें त्यांतून तपारी बाहेर काढणें, वरंडीवर येणें २ रिकामें करणें, बाहेर काढणें [उपसणें द्वि]

**उपसामग्री-साहित्य**—स्त्रीन किरकोळ उपकरणें, सामान, साहित्य, सामग्री, द्रव्यें वगैरे 'करावया वेगळा हवन। तेथें उप सामग्री आणून। जगन्माता देत असे॥' स्वयंपाकांतील उपसाहित्य म्हणजे तांदूळ, कणीक, साखर, मीठ, मिरची, हिंग इ० साहित्य [स]

**उपसामी**—वि साधु, विरक्त 'देव उपसामीयाचा रावो॥' –उषा १८३५ [स उपशमी]

**उपसारा**—पु १ वारा तिकडे मचार, मोकळें स्वैर वावरणें 'या घरात उपसाऱ्याला जागा नाहीं' २ प्रशस्त जागा, मोकळी जागा 'त्या घरात उपसाऱ्याची जागा नाहीं' [स उप+सृ-सार]

**उपसारा**—पु १ घरांतील किरकोळ सामान, खासाची सामग्री, पसारा २ किरकोळ कामें, थारीकसारीक कामें, अडकामें [स उप+म पसारा]

**उपसावणें, उपसाहणें**—उक्रि सोसणें, सहन करणें, पोटांत घालणें, क्षमा करणें 'परि जाणतां उपसाहावें। बाळाचें पाणिपद निहाळावें॥'–शिशु ३६५ 'आता म्हणे तयाचें वचन। उपसाहों आम्ही॥' –अमृ ७ २६९ 'ते उपसाहावा जी मुरारी।'–दाव ३८० 'तैसे मिया सद्गुरुसी कागडें। श्रीरामचंद्राचें याचिलें वडें। ते उपसाहिजो सद्गुरुदयाळें। कृपा सागरें॥'–स्वादि १० १२४ [स उप+सह्]

**उपसाहो**—पु उपसाह, सहन करण्याची क्रिया –क्रिवि सहन –शर

**उपसूचक**—पु सभेपुढें आणलेल्या ठरावामध्यें काहीं फेरफार सुचविणारा, उपसूचना मांडणारा, किरकोळ सूचना करणारा [स]

**उपसूचना**—स्त्री सभेमध्यें चर्चा चाललेल्या विषयावरील मूळ ठरावात दुरुस्ती, फेरफार किंवा तो बाजूस ठेवावा इत्यादि प्रकारची मांडलेली कल्पना [स उप+सूच्]

**उपसृतक**—न (नृत्य) पाय पुढें फेकणें व हातहि पुढें फेकणें व सर्व गात्रें मागच्या बाजूस वाकविणें [स]

**उपसेचन**—न तोंडीलावणें, तोंडीलावण्याचें साधन, पक्वान्न रुचकर करणारी वस्तु (चटणी, मसाला वगैरे) 'उपसेचन म्हणिजे साधन॥ तें तोंडी लाविता अन्न गिळे॥'–यथा ११ ४१८ [स उप+सिच्]

**उपस्कर**—पु १ एखादें कार्य पूर्ण करण्याकरिता लागणारें साहित्य, वस्तु, पदार्थ, साधन, वाव अवश्य नसलेली पण उपयोगी अगर शोभा, सौंदर्य वाढविणारी वस्तु २ तोंडी लावण्याचा पदार्थ, मसाला, मिरची, चटणी ३ गृहकृत्यास उपयोगी पडणारी कोणतीहि वस्तु (सुप, केरसुणी, मुसळ इ०) साधन साहित्य [स]

**उपस्तरण**—न (याज्ञिक) कुंडांत किंवा हवन करावयाच्या पात्रांत हविर्द्रव्य घेण्यापूर्वी त्या पात्रांत दर्भानें तूप घालणें [स]

**उपस्त्री**—स्त्री रखेली, राख, अंगवस्त्र [स]

**उपस्थ**—पुन १ स्त्री किंवा पुरुष यांचें जननेंद्रिय, लिंग योनि, मैथुनेंद्रिय पंचकर्मेंद्रियांपैकीं एक २ त्यामध्यें मारण्यानें बसावयाची जागा, गाडीवान बसण्याची जागा [स उप+स्था] ०निग्रह-पु संभोग, मैथुन न करणें, विषयोपभोगापासून अलिप्तता, ब्रह्मचर्य, विषयनिवृत्ति, असिधाराव्रत

**उपस्थान**—न १ उठणें, वर येणें, उद्भवणें, उत्पन्न होणें २ घडून येणें, घडणें (कर्म व्यवहार इ०) ३ एक प्रार्थनेचा प्रकार, पृथक् मत्रानें उपासना, प्रार्थना ४ असे गूढ मंत्र, स्तोत्र ५ उभें राहून हात जोडून, मंत्र पाठ करून देवताची स्तुति करणें [स उप+स्था]

**उपस्थापन**—न १ उपस्थित करणें, जवळ आणणें, उभें करणें, घडवून आणणें, उत्पन्न करणें, बनाव बनविणें २ पूजा, सेवा [स उप+स्था प्रयोजक]

**उपस्थापित**—वि घडलेलें, झालेलें, स्थापन केलेलें [स उप+स्था प्रयोजक]

**उपस्थित**—वि १ उद्भवलेला, उत्पन्न झालेला, प्राप्त झालेला, पोचलेला, घडलेला (प्रसंग, गोष्ट, कर्म इ०) 'आमच्या दृष्टीनें हजारों सभा दरवर्षी उपस्थित होतात'–नि २७१ २ ज्ञात, माहीत असलेला, हयात, ताजा असलेला, मलिन न झालेला, रूढ, चालू (अभ्यास, विधि) ३ प्रत्यक्ष असलेला, आलेला, हजर –स्त्री उपस्थिति पहा [स उप+स्था] ०होणें–हजर असणें, येणें (सभा इ० ला)

**उपस्थिति**—स्त्री १ जवळ असणें, हाताशीं असणें, ताजें असणें स्मरणांत असणें, तयार असणें, ताजेपणा, नवपणा, स्मरण (विशेष, अभ्यासाचें, शास्त्राचें) 'वाचलेल्या ग्रंथाची उपस्थिति चांगली राहण्यास त्याचा (प्रथमग्रहाचा) किती उपयोग आहे हें सर्वांच्या सहज लक्षात येणार आहे'–नि ५१५ २ उद्भव, विद्यमानता, अस्तित्व, उपस्थितपणा, हजर असणें, उत्पन्न होणें, चालू असणें (प्रसंग, कार्य वगैरे) 'माझे घरीं लग्नाची उपस्थिति झाली' ३ मनांत येणें, स्मरण होणें 'रोग म्हटला म्हणजे वैद्याची उपस्थिति होती' [स उप+स्था]

**उपहत**—वि १ मारलेला, इजा, जखम झालेला, नाश, नष्ट केलेला, उध्वस्त, ताडित २ निस्तेज, हतवीर्य, पीडित, दुःखी 'जैसा राजकुमर पदच्युत। सर्वथा होय उपहत।'–ज्ञा १ २७० [स उप+हन्]

**उपहति, उपहंती**—स्त्री ( काव्य ) १ निस्तेजता, अपमान, अनादर, मानहानि 'जैसी भ्रतारेंहीन वनिता। उपहति पावे सर्वथा।' –ज्ञा २ १६९ २ नाश, खालावलेली, दु खित स्थिति [स उप+हन्]

**उपहसित**—वि ज्यानें हसें, उपहास, थट्टा, फजिती झाली आहे असा, अपमानित, अनादृत, छी थू झालेला [स उप+हस्]

**उपहार**—पु १ ( उपाहार अप ) फराळाचें सामान, फराळ, भक्ष्य 'मीचि होईन सुआरु। वोगरीन उपहारु।'–ज्ञा १३ ४२१ 'उपहार कांहीं करावा।'–गुच ५३ ५७ २ देणगी, नजराणा, बक्षीस, भेट, अहेर 'वस्त्रें अलंकार सुमनें। नाना उपहार बलिदानें।' –एरुस्व ६ ८४ [स उप+आहार]

**उपहारणें**—उक्रि अर्पण करणें, देणें 'तेंचि भस्म ईश्वरासि। उपहारावें तुम्ही हर्षी।'–गुच ४० ८१ [स उप+आ+हृ]

**उपहास**—पु १ थट्टा, चेष्टा, फजिती, छी थू, निंदा, अपमान, निर्भर्त्सना 'अरोचु वादुवडु। प्राणिताएहालु। उपहासु चाडु। वर्मस्पर्शु।' –ज्ञा १३ ७७० २ उपहास होतो अशी स्थिति, उपहासास्पद अवस्था, योग्यता [स उप+हस्]

**उपहासक**—वि उपहास, थट्टा करणारा, नांवें ठेवणारा, निंदा करणारा [स उप+हस्]

**उपहासणें**—अक्रि थट्टा, चेष्टा, निंदा, फजिती, इ० करणें, हसणें, अनादर, अपमान करणें [उपहास]

**उपहासास्पद**—वि थट्टेचा विषय झालेला, थट्टेस पात्र [स उपहास+आस्पद]

**उपहास्य**—वि थट्टा करण्यास योग्य, पात्र, चेष्टा करण्या लायक, उपहासास्पद, निंद्य, तिरस्कार्य, त्याज्य –न थट्टा ( उपहास अप ) 'उपहास्य केलें समर्थाचें।' –रामदासी २ २ [स]

**उपहास्यता**—स्त्री १ (उपहास या अर्थी चुकीनें) थट्टा, चेष्टा २ ( वास्तविक अर्थ ) उपहासार्हता, निंदास्पदता [स]

**उपहित**—वि १ जवळ असलेलें, जवळ ठेवलेलें ( पदार्थ, भक्ष्य, इ० ) 'जैसें का उपहिता( अयोग )मेरेंसीं खाय।'–ज्ञा १७ ११४ २ संसर्गयुक्त, आरोपित 'तैसें उपाधी उपहित। वारोनि टाके जेथ।' –ज्ञा १५ ५११ ३ उपाधियुक्त उपाधिबद्ध. सामासशब्द–मायोपहित ( चैतन्य ) घटोपहित ( आकाश ) 'आणि द्रष्टु जो भरारु। दाविला पुढां प्रकारु। तेंचि उपहितारु। आकारु चैतन्या केला।' –ज्ञा १६ ४१ [स उप+धा=ठेवणें]

**उपहुडणें, उपहीडणें**—अक्रि झोपेतून जागे होणें उठणें 'पाहातओं पाहारा दधिमथनीं। गौळणी गातीं धीवरपाणीं। तो ध्वनि आयकोनि धरणी। रया उपहीडलें॥' –दाव ३११ [उ+पहुडणें]

**उपळ**—पु पाषाण, दगड उपल पहा 'जडा उपळा अवचटें। लागती धीचरणींशीं झटे।' –ज्ञाप्र ४०७ [स उत्पल]

**उपळ-ळी, उपळण**—स्त्री १ फार पाऊस पडल्यानें जागोजाग झरे फुटून पाणी बाहेर यावें अशी भूमीस अवस्था होते ती २ –पु असे जमिनींतून बाहेर येणारे झरे, प्रत्येक ३ (ल) घोणस किंवा फुरसें चावल्यामुळें शरीरातून रक्त वाहूं लागणें ती अवस्था. ४ ( व्यापक ) ( स्त्रियास ) विटाळ अतिशय होण्याची अवस्था, धुपणी ५ जोरानें उठणें, उत्पन्न होणें, जोर करणें ( दमा, खोकला, ताप, दुखणें, रोग, इ० ) [स उत्+प्लु]

**उपळ जमीन**—स्त्री ज्या जमिनींत पावसाचें पाणी अतिशय निरल्यामुळें जिला पाझर फुटले आहेत अशी जमीन

**उपळणें**—अक्रि १ पाणी निरून साचल्यामुळें (जमीनींतून) पाझर फुटणें, उपळी होणें २ शरीराच्या छिद्रांतून किंवा हिरड्यातून वगैरे रक्त वाहूं लागणें ३ जमीन भिजून सैल झाल्यामुळें वर उपटून येणें, उफळणें, उखडलें जाणें ( झाड वगैरे ) [उपळ]

**उपळवट-टा**—स्त्री १ पाणी फार निरल्यामुळें पाझर फुटलेली जमीन, उपळ जमीन, भिजलेली, मुरलेली जमीन २ ( ल ) ( विशेषत उपळवट ) चंगळ, गडगंज, समृद्धि (क्रि० करणें, येणें, होणें ) –वि १ उपळ असणारी, ओलाव्याची, मुरलेली ( जमीन ) २ नेहमीं पाझर असलेली ( जमीन ) [उपळ]

**उपळवणी**—न १ जमीनींतून वाहणाऱ्या पाझराचें, उपळीचें पाणी २ ( ल ) संपत्ति, मान, सन्मान, सुख इ० ( क्षणिकत्व दर्शविण्यासाठीं ) [स उत्+प्लु वन=पाणी, उपळ+वणी]

**उपळसरी, उपरसाळ**—स्त्री अनंतमूळ पहा श्यामा, इंडियन सार्सापरला, दुधाळी, उपरसाळ (चुकीनें) आस्फो, हिच्या दोन जाती आहेत–एक पांढरी व दुसरी काळी ह्र वाळसर ताबूस रंगाच्या असून पानें तरवारीच्या आकाराची, अर्धेपाट रुंद व तीन अंगुळें लांब असतात ही रक्तशोधक आहे हिला उपरसुरी, स्हान कावळी, श्वान कावळी, शेंवल अशींहि नांवें आहेत [स. उत्पल= दगड+सृ=सरणें]

**उपळी**—स्त्री झरा पाझर उपळ पहा [स उत्+प्लु]

**उपळी**—वि पाषाणमय, दगडी उपळ पहा 'अनादि सामान्य उपळीं। जवि क्षिति नद्दळीं।' –ऋ २४ [स उत्पल]

**उपळी**—स्त्री ( भा ) गाडीच्या साटीच्या दोन्हीं बाजूस समांतर असणाऱ्या दोहों पैकीं प्रत्येक

**उपज्ञा**—स्त्री मूळचें ज्ञान, उपजत बुद्धि, आद्यज्ञान [स उप+ज्ञा]

**उपाइणें**—अक्रि १ आरंभ होणें, आरंभणें, उत्पादणें, पत्नी, जवळ येणें 'आगीउठावेंड उपाइलें। अपायेचेका॥' –ज्ञा १०.८०.

अभाव 'दिवसभऱ्याच्या उभ्या पाहाऱ्यांत अग भक्न येऊन रात्री मेल केव्हा एकदां आडवी होईन अम होउन गेल' —नाटप उत्त (फाटक) २ ३ (ल) एकसारखी केलली चाकरी, सेवा, गणाया आजाऱ्याची एकसारखी केलेली सारखी शुश्रूषा ०पाऊस—पु मोठा, सरळ धारांनी पडणारा पाऊस, न राळणारा पाऊस ०बाजार—पु १ या टोंकापासुन त्या टोंकापर्यंत सर्व बाजार सगळी बाजारपेठ 'तू दिलेल्या रंगाची लोंकर उभ्या बाजारांत मिळत नाहीं' २ भरबाजार, बाजाराचा मध्य भाग, चव्हाटा 'उभ्या बाजारात कथा। हें तों नावडे पंढरीनाथा ॥' ०मार्ग—पु. १ राजरस्ता, सार्वजनिक रस्ता, रहदारीचा रस्ता, मोठा रस्ता, हमरस्ता २ या टोंकापासुन त्या टोंकापर्यंत सर्व, सगळा रस्ता ३ सरळ रस्ता, आडवा नसलेला, वाकडातिकडा नसलेला रस्ता ४ (ल) सरळ, प्रामाणिकपणाचें वर्तन शहाजोग व्यवहार **उभ्यामार्गानें जाणें, येणें**—न गरळ मार्गानें, न थांबता, वारडे तिकडे न जाता जाणें ०माल—पु तयार झालेलें, पण न कापलेलें शेतातील पीक **उभ्या मालाची पाहाणी**—स्त्री शेतातील पिकाचा अदाज म्ह० उभ्यानें यावें ओणव्यानें जावें=वेळ प्रसग पाहून वर्तन करावें, नम्रतेनें वागावें

**उभाईत**—वि (वों) समाईक, दाधाच्या मालकीचा उभागत पहा [स उभयता]

**उभाउभी**—क्रिवि त्वरेनें, धाईघाईनें, त्वरकर, तात्काळ, तावडतोब 'उभाउभी पळ। अवीं मनाचिया बळ ॥' —तुगा २४७० [उभा द्वि] ०घाईघाईनें—वरील अर्थ पहा

**उभा खडपा-सूळ**—पु. सरळ, ऐरपेत असलेला, डोंगराचा खडपा कडा, सुळका [उभा+खडपा, सुळ]

**उभाग**—वि उच्च सामान्यापेक्षा अधिक उंची असलेला, उचला उभार, अग्राविडानें चागला [उभा+अग]

**उभागत**—वि समाईक, वाटण्या न केलेलें दोन मालकांचें (शेतांतील उभें पीक इ०) उभाईत पहा [उभय+गत]

**उभार-ड**—वि उच उच वाढल्याचा (मनुष्य वगैरे), सरळ, वर वाढणारें, न पसरणारें (झाड वगैरे) [उभा]

**उभाड, उभाडाग उभाड्याचा, उभाटा**—वि वयाच्या मानानें अधिक उंच, विशेष वाढ झालेला, जोमदार, चांगला तयार, सदाक्त (मुलगा झाड इ०)

**उभार**—स्त्री १ उंची, उभट उचट आकार, डौल (पान, पागोटें इ०चा) २ उभारणी, रचना 'ब्रह्मांडपिंडउभार। पिंडब्रह्मांड सव्हार।' —दा १२५ १४ ३ बायकांच्या चोळीचे पुढील दोन तुकडे —पु १ उत्तीहद २ गर्व, ताठा —वि १ उच्च वर आलेलें भरलेलें 'उभार छाती तरतरित। झुरुप शुगानें भरी जी काता ती पाणी करते झरसरित।' —प्रग १६८ २ आडवें नसलेलें, सरळ, उचवट (पाग, पागोटें इ) [स उद्+भृ-भर, उभा+आकार]

**उभार**—पु १ उवार, ऊर, पुरता होऊन अधिक राहिलेला, अवशिष्ट पदार्थ २ घोड्याच्या तोबऱ्यांतील घाडयानें खाऊन उरलेले दाणे, चारणशक्त्या दाण्यातून पुढें दुसऱ्या वेळीं चारावयाकरिता काढून ठेवितात तो दाणा [उवार पहा]

**उभारणी**—स्त्री १ मांडणी, रचना, बांधणी, पसारा, विस्तार उभारणें पहा 'ऐसी जाली उभारणी। आतां ऐका मव्हारणी।' —दा ११ १ ११ 'विश्वाची उभारणी व सहारणी हा क्षराक्षरविचाराचा प्रमुख भाग आहे' —गीर १६६ २ उभें राहण्याची क्रिया 'थट दाटला दोघाचा। उभारणी जाहली रोमाचा।' [उभारणें]

*उभारणी*—*स्त्री उसाचा रस कढवितांना त्याला यणारी उकळी* [स उद्+भृ] **उभारणीस येणें**—तयार होण्यापर्यंत पोचणें, सिद्धसमीपावस्थेस येणें

**उभारणें**—उक्रि १ उभें करणें, रचणें, स्थापन करणें, सरळ, स्थापित बसविणें 'परी महाभूताचें दळवाडें। उभारी भलें।' —ज्ञा ५ ७८ २ चालू करणें सुरू करणें, गति देणें (धदा, काम वगैरे) स्थापना करणें 'लॉर्ड रिडिंग यानीं लष्करी कोर्टें उभारण्याची युक्ती केली' —के १० ६ ३० ३ वर आणणें, ऊर्जितावस्थेस आणणें, पुढें आणणें (व्यापार, धदा) ४ प्रवृत्त करणें, पुढें करणें ५ वर उचलणें, उंची वाढविणें (देंगण्या वस्तूची किंवा इमारतीची) ६ उत्पन्न करणें, कल्पिणें, मनाशीं बाधणें (तर्क, कल्पना, पद्धति वगैरे) 'म्हणुनी तर्क उभारिती कामिनी।' ७ (शिवण) एखादें शिवावयाचें वस्त्र तुकडे जोडून व धावदोरा घालून एकत्र करणें कच्चें काम करणें, गच्यादा रगाडा वगैरे तात्पुरता रचणें —अक्रि १ उठणें, उभें राहणें, ताठ खडा होणें, सरळ होणें 'पालविती करीं उभारूनि बाहे। कृपावता पाह मजकडे।' २ उभें राहणें, सरळ होणें (केस वगैरे) ३ वर येणें उठणें उत्पन्न होणें, बाहेर पडणें (पुठी, गळूवगैरे) 'तो तमा गिळितसा न उभारे' —गजेंद्रमोक्ष (रघुनाथ पंडित) ३७ [उभा उभार]

**उभारत**—क्रिवि १ समायिक मालमत्ता, भाडवल, मालकीची वस्तु वगैरेचे निरनिराळे मालकीचे विशिष्ट भाग प्रत्यक्ष न पाडता, एकत्रित रीतीनें २ अनिर्णित विचार चालू असताना, शेवटास गेलें नसताना निकालात न निघता 'माझी पचाईत उभारत राहिली आहे' ३ सामान्यत विशिष्टव्यक्तीस उद्देशून नसलेलें, सर्वसाधारण (भाषण) 'या गावचे लोक फार स्वाड असें मी उभारत बोललों आणि तुलाच का राग आला?' ४ पक्का ठरलेला नसताना (पगार वगैरे) दोन्ही बाजूंनीं निश्चितपणें मान्य केलेली नसताना (किंमत, अर्ज वगैरे), नक्की न तोलतां अमोज अमाप (धान्य वगैरे) 'त्या शेतातें धान्य म्या उभारत त्याचे स्वाधीन ठेवलें' उभाईत, उभागत पहा [उभार²] ०पणा—पु नि पक्षपातीपणा, निस्पृहता

**उभारस्ता**—उभामार्ग पहा

**उभारा**—पु १ उभारणी, रचना, विस्तार, माडणी 'तरी सत्यचि गा धनुर्धरा । सर्व कर्मांचा उभारा ।' –ज्ञा १८ ३०४ २ स्थिति, अस्तित्व, 'शीत उष्ण पर्जन्यधारा । अंगीं न लागती अवरा । तेवी साधूचा उभारा । द्वंद्वसभारानिर्द्वंद्व ।' –एभा ११ ५४७ ३ शरीराची ठेवण, बांधा 'अंगें सर्वांग सुकुमार । मनोहर उभारा ।' –एरुस्व १५ ५० [ उभा+कृ ] ४ पोकळ अवसान, उठावणी, आकार, डौल 'तुका म्हणे उभाऱ्यानें । खरें कोण मानि तसें ।' –तुगा ३१८६ ५ फैलाव, दरवळणें, पसरणें, प्रसार विस्तार 'जैसा कस्तुरीचा निकरा । तेंवि परिमळाचा उभारा । तैसा ज्ञानानें शिष्यवरा । जन्मलासि तूं ।' ६ चालू स्थिति, स्थिरता, अस्तित्व 'ऐश्वर्यमंीं ईश्वरा । जियेचें आंग संसारा । आपलाही उभारा । आपणचि जे ॥' –अमृ १ २९ [ सं उद्+भृ उभार ]

**उभारा**—पु १ इच्छा, प्रवृत्ति, उमाळा 'वनि व्याघ्र वृक्का दिक सारे हिंसेचा त्यजिति उभारा ।' –दप ८८४ २ उसाचा रस कढवितांना त्यास येणारी उकळी, ऊत ( क्रि० येणें ) 'रसास उभारा यतो म्हणजे रस उतू जाऊं लागतो '–कृषि ४७२ **उभारा धरणें**–युद्धाकार घेणें, उद्युक्त होणें 'परित्राणाय साधूच्या उभारा, धरी निवटाया सर्व भूमिभारा ।' –कृष्णजन्म (देवनाथ) ३८ [ उद्+भृ-भर ]

**उभारा-ला**—पु नालबंदाची ऐरण, ठोकळा [ उभार ]

**उभारिणें**—उभारणें पहा

**उभारी**—स्त्री ( व ) बैलगाडींत भरती जास्ती व्हावी म्हणून उभी लावलेली काठी खुंटाच खाचरांत कापूस वगैरे भरण्याचे वेळीं खाचराच्या मेंकावर भोंवतालीं दोन हात लांबीची उभीं दांडकीं लावतात तीं [ सं उद्+भृ-भर ]

**उभारी**—स्त्री उत्साह, नेट, जोर ( क्रि० धरणें ) 'भारी मारी भारी धडधड उभारी धरितसे ।' –द्रौपदीवस्त्रहरण ( विठ्ठल ) ४३ [ उद्+भृ-भर ]

**उभारू**—पु ( काव्य ) १ ताठा, दांडगेपणा, मगरूरी २ उभार, उभारणी, उभवणी पहा

**उभा लगाम**—पु दमानदार लगाम [ उभा+लगाम ]

**उभावणें**—उभणें, उभविणें पहा 'नीलोत्पलादिक मध्यें उभावे –सुरूलार्या भाषांतर ( हरिराज ) ८७

**उभा शिवार**—पुन कापलेलें, उभें पीक **०टाकून जाणें-पळणें**–परचक्र वगैरे आलें असता पीक काढून न घेता कांहीं बरोबर न घेता पळून जाणें [ उभा+शिवार ]

**उभासणें**—अक्रि भास होणें, दिसणें –दर (वामन–चिद्गुणा १) [ सं उद्+भास् ]

**उभासूळ**—उभा रस्ता, ध्वा पहा

**उभासोट**—वि क्रिवि अगदीं सडक उभा, उभाच्या उभा [ उभा+सोट ]

**उभाळ**—पु ( व ) ज्वाळा उबाळा अर्थ ३ पहा

**उभाळा**—पु उमाळा, उभडा पहा 'दु खाचे डोंगर उभाळा सुटला ' –एपो ३२६

**उभी**—उभा पहा **०कुडी**–स्त्री उंच, सडपातळ बांधा, उभी ठेवण 'ही गाय उभ्याकुडीची आहे '[ उभा ] **०चाकरी**–स्त्री त्रासदायक, जिकिरीची चाकरी, सेवा **०चतुर्थी-चौथ**–स्त्री. वद्यपक्षांतील चतुर्थी, संकष्ट चतुर्थी या दिवशीं सकाळपासून चंद्र उगवेपर्यंत उभें राहण्याचें कांहींचें व्रत असतें [ उभी+चतुर्थी, चौथ ] **०दुपार**–स्त्री भर दोन प्रहर, ऐन दुपारची वेळ, ऐन माध्यान्ह **०धांव**–स्त्री सरळ, वर, डोंगरावर चढणें 'उभी धाव घ्यावी गिरी तो चढावा ' –दावि १४५ **०पेठ**–स्त्री या टोंकापासून त्या टोंकापर्यंतचें सर्व शहर, बाजार, उभा बाजार पहा **०रास**–स्त्री. १ मोज-माप न करितां, न विभागतां जशीच्या तशीच ठेवलेली धान्याची रास, शेतांतून आणलेलें धान्य प्रथम तुसतें ढीग करून ठेविलेलें असतें त्यास म्हणतात २ ( ल ) सर्व मालमत्ता, कुटुंबाची अविभक्त व मोल न केलेली मालमत्ता, संपत्ति, जिंदगी. **अजमास उभी रास-गल्ला**–पिकाचा किंवा धान्याचा अंदाज. **०विळी**–स्त्री ज्या विळीचें पातें मोडतां येत नाहीं किंवा मिटतां येत नाहीं अशी विळी

**उभीं**—क्रिवि उभ्याउभ्या, घाईनें 'मनादिकें व्यापारें । साहिलीं उभीं ।' –ज्ञा १८ ७३७ [ उभा ]

**उभें**—१ उभारणी, मांडणी 'म्हणोनि समभागें शुभाशुभें । मिळोनि अनुष्ठानाचें उभें ।' –ज्ञा १८ २४७ २ वस्त्र सरासरी नुसतें गुंडाळून घ्यावें असा स्त्रियांचा वस्त्र नेसण्याचा प्रकार

**उभें**—वि उभा पहा **०काम**–न जरूरीचें, अगत्याचें, निकडीचें काम 'माझीं अगदीं उभीं कामें तीन आहेत, तेव्हां मला तुमच्या बरोबर यावयास फुरसत नाहीं ' **०कुंकू**–न वैष्णव स्त्रिया लावतात त्या पद्धतीनें, उभ्या गंधासारखें ( यवाच्या आकाराचें ) लावलेलें कुंकू **०कुंड**–न (चांभारी धंदा) चामडें भिजत ठेवण्याकरितां लागणारें रांजणाच्या आकाराचें खापराचें कुंड **०दाणें**–क्रि सर्व-समूळ नाहींसें करणें 'ते उभें खाय माती । तें परिमाचियें सती । सोनें जाल्या पुढती । न शिविजे मळें ।' –ज्ञा १८ १४०७. **०नेसणें-घेणें-लावून घेणें-लावणें**-( लुगडें, पदरणी, धोतर वगैरे )–तात्पुरतें (सरासरी दहा–अकरा हात) वस्त्र, प्रथम पदर घेऊन बाकीच्या वस्त्राच्या निऱ्या करून पायावर मधोमध धरून उजवी कडील पदराचें आणि डावीकडील पदराचें कडीं दोन टोकें घेऊन त्यांस निऱ्यांवर एक गांठ मारल्यावर शेवटच्या पदराचें टोंक धरून कासोटा घालणें, कधीं हातीं एखादें वस्त्र नेसणें, स्नान करण्याकरितां

ऱ्हानसें वस्त्र नेसणें, आडवें नेसणें याच्या उलट या दोन वाक्प्र चाराचे अर्थ कोंकण व देश या प्रांतांत परस्परविरुद्ध आहेत कोंकण प्रांतात आडवें नेसणें याचा अर्थ व्यवस्थितपणानें व पद्धतशीरपणानें नेसणें असा होतो, तर देशावर, आडवें नेसणें याचा अर्थ आड लावून घेणें, तालुरतें किंवा ऱ्हान वस्त्र नेसणें असा होतो ०पीक–न देतात तयार झालेलें पण न कापलेलें पीक 'या जागेंत उभीं पिकें असून ' –शुकराची शिकार ( बडोदें ) २० ०वर्ष–न सबंध वर्ष, आरंभापासून अखेरपर्यंत वर्ष 'उभ्या वर्षांत मी आईबापाला भेटणें नाहीं ' ०दुखणें–न आयदगात न मिळवि णारें, साधें दुखणें, किरकोळ दुखणें ०पण–न १ उभा अस लेला स्थिति २ (ल) जिवतपणा 'आता उभया उभेपण नाहीं जयाचें। मा पडिलिया गहन कवण तयाचें।'–ज्ञा ८ ६३ ०पळणें–क्रि उभ्याउभ्या, न थांबतां एकसारखें पळत जाणें ०वारें–न १ गडबड, गोंधळ, धादल, त्रेधा २ उदासीनता, औदासिन्य (क्रि० घुमणें) ०वैर–उभादावा पहा ०सुकणें–१ झाड उभ्या स्थितींत असताच वाळणें २ सर्व शरीर दु खानें, काळजीनें कृश होणें, वाळणें 'लेकुरवाचेनि दु खें। जेवि माउली उभी सुके।'–ऋ ४६

**उभेआं**—क्रिवि उभें, उभ्यानें 'तुझा लग्न लावावें श्रीचक्रधरा। उभेआं ठाकौनि।'–शिशु ७२७ [उभा]

**उभेउभ्या, उभेउभ्यांनीं**—क्रिवि तावडतोब, घाईनें, तत्पर तेनें तत्क्षणीं, लेव्हाच [उभा]

**उभेटा**—वि उभट, उभट पहा

**उभेट्या**—क्रिवि (गो) उभ्यांनीं, उभ्यानें [उभा]

**उभेणें**—अक्रि १ उभें राहणें, उभणें 'उठोनि उभेला सन्मुखी'–दावि ४०१ २ उभारणें 'रामराज्याची उभेली गुढी'–दावि १६७ [उभा]

**उभेया**—क्रिवि १ उभ्या, उभ्या स्थितींत २ (ल) जिवतपणीं 'उभेया उभपण नाहिं जेयाचें। पडिलेया गहन कवण तेयाचें॥'–राज्ञा ८ ६२

**उभैता**—वि दोघे, दोन्हीं, उभयता पहा [स उभयत]

• **उभौं**—वि दोन, दोघ 'का उभौं येकत्वीं वर्णिता॥–दावि २५७ [स]

**उभ्या उभ्या, उभ्यां उभ्यानीं**—उभेउभ्या, उभ्याघाई पहा 'त जरा बैस, मी उभ्या उभ्या जाऊन येतों' [उभा]

**उभ्याघाई**—क्रिवि १ उतावीळपणानें, अतिशय घाईनें, उत्सुकतेनें, उत्कटेनें (हाक मारणें, ओरडणें इ०) (क्रि करणें) २ मोठ्या कळकळीनें, आग्रहानें, जोरानें (धावणें, विनविणें इ०) [उभा]

**उभ्या जन्मात**—क्रिवि सबंध आयुष्यात कारकीर्दीत धूर्त राष्ट्रानें ही करामत उभ्या जन्मात एकदाच केली'–भा ३९

**उभ्यानें**—क्रिवि १ उभें राहून, तातपणानें २ अविनयानें, मूर्खपणें म्ह० उभ्यानें मुतावयाचें मग गुरुत्व काय विचारावें=आधून धुमून करावयाच्या गैरशिस्त गोष्टींबद्दल सटा विचारणें हें मूर्खपण

**उभ्या पायानें**—क्रिवि अतिशय तत्परतेनें 'शकरजी व परशुराम हे दोन महत्त्वाकांक्षी ब्राह्मण नेहमीं बाईसाहेबांच्या सेना तींत उभ्या पायानें असतात'–स्वप १३१

**उमकळणें**—सक्रि (गो कु) लोंबकळत ठेवणें, टांगणें [उत्+कल=धरणें]

**उमसा–शा**—स्त्री उत्कट इच्छा, प्रवृत्ति, आवेग 'बोलण्याची मला उमसा नव्हती' कोरकि ४६३ [स उत्+मनीषा]

**उमग**—पु १ आढळ, शोध (लपलेली, हरवलेली गोष्ट), ठावठिकाणाचें ज्ञान (क्रि पडणें, पाडणें) 'कुळींचा भाउ मग स्थिर राह घेत आसलाभा उमग।'–गोपृष्ण ८९ ६ २ समज, सम जूत उमज पहा [उद्+मज्ज्, प्रा उम्मग्ग–वर येणें, तरणें]

**उमगणें, उमगणें**—अक्रि १ आढळणें, दिसणें, सापडणें, शोध लागणें २ शोधणें, धुडाळणें, ओळखणें, समजणें 'काळातें दम णार मी उमगिनें धुंडोनिया बाळ जी॥'–आपू ९ 'हें अक्षर अमरूयाचें असें मी उमगीन' 'समुद्रावरील वाळवंटातला एखादा खडा नाहींसा झाला असता कुणाला उमगला जाणार नाहीं' –नि २८४ –अक्रि उघडकीस येणें, जाहीर होणें, गुप्त न राहणें, उलगडा होणें, प्रकाशात येणें [स उद्+मज्ज्, प्रा उम्मग्ग]

**उमगा**—वि (कना) उमगावयाची, गुपित, गुप्त (गोष्ट) [उमग]

**उमग्या**—वि उमगून काढणारा, शोधून काढणारा, धुडाळणारा [उमग]

**उमच**—स्त्री उपकाराची परत फेड, प्रत्युपकार [स उद्+मज्जन, प्रा उम्मज्ज]

**उमचणें**—अक्रि उपकारातून बाहेर पडणें, उपकाराची फेड करणें उसनें फेडणें 'हारी उमचावया। जुवारी जैसा येहाया॥' –ज्ञा १३ ५४१ 'आणि दान जया यावें। तयातें ऐसेंया पाहावें। जया घेतलें नुमचवे। कायसेनहीं॥'–ज्ञा १७ २७८ [स उद्+मज्जन]

**उमचळणें**—क्रि उन्मळणें, उपटून येणें, उलथून पडणें (झाड वगैरे) उमचटून पडणें असा सामान्यत प्रयोग [स उत्+चलन]

**उमज**—पु १ समज, समजूत, बोध, ज्ञान, उमग 'तुम्हीं बहु भले मला उमज होय ऐसें कथा'–कमा १०० 'उमज पडला भीमसेना॥'–मुआदि २९ १०५ 'पाप करू नये म्हणून म्हटलें तस्मात् पापानें नाश होतो असा उमज पडता' २ आकलन शक्ति शहाणपणा अक्कल 'कासवीचे परी पाहें दृष्टीं मज। विज्ञानी उमज धावुनिया॥'–तुगा १०८० (क्रि० दाखविणें, दावणें,

देणें ) ३ ( कु ) पहिली नागरणी, नागरणीचे जे उमज, दुरो, तास, अडास हे चार प्रकार त्यापैकीं पहिला प्रकार [ स उद्+मज्ज् ]
०समज—स्त्री वरवर, सामान्य समजूत, ज्ञान ( पक्के नव्हे )

**उमजणें**—उक्रि १ समजणें, लक्षात येणें, समजूत पटणें, माहीत होणें, 'असें उमजता भले न गुरुभाव तो टाकिती ' —केका ९७ उमजणें व समजणें यामध्यें असा फरक आहे कीं समजणें यानें केवळ सामान्य ज्ञान होतें परंतु उमजणें म्हणजे पूर्णपणें समजणें, आतील रहस्य माहीत होणें असा बोध होतो उ० हा मथळा समजला होता खरा परंतु उमगला नव्हता २ आजारातून उठणें, टवटवीत होणें ३ जागृत होणें, सावध होणें 'जया दोघामाजि येसावें । विषायें उमजलें होय निंद ॥ ' —भमृ १ १४ ४ ( गो ) मापाचा उतार पहाणें, उमजुवें [ स उन्मज्जन ]

**उमजीक**—वि १ तत्काल उमजणारा २ ( ल ) बुद्धिवान, हुषार, चलाख, तीक्ष्ण, तीव्र बुद्धीचा [ उमज ]

**उमट**—१ आटळ, शोध, थाग, प्रकटता, परिस्फुटता ( क्रि० पडणें ) २ स्पष्ट, ठळक, प्रामुख्यानें पुढें येणें, दिसणें ( अज्ञात गोष्ट ) ३ निश्चित, पूर्ण कल्पना, ज्ञान, समज (क्रि पडणें, होणें) ४ उबळ, मळमळ, उबक, आवेग (ओकारीचा वगैरे) [स उन्मथ्–उन्मट ]

**उमटणें–उमंटणें**—अक्रि १ दिसणें, आढळणें, प्रकट होणें, जाहीर होणें, उघडकीस ये 'हा राजकुमर उमटला '—उषा ४८ ४२ २ स्पष्ट होणें, स्वच्छ होणें, पूर्ण होणें (ध्वनि, आवाज वगैरे) 'शब्द ना उमटती पुढती ' —नवमागेगीतें ७२ ३ वर येण, उठून दिसणें, स्पष्ट होणें 'तैसें अवयेवु उमटले ।वाळिलें आडोनी। '—शिशु ७२० 'उमटती अगावरी काटे। ' —गीताचंद्रिका २९ ४ उत्पन्न, उद्भूत होणें, उपजणें 'ऐसी वाट पाहे कांहीं विशेष का मुळ । कांहीं कळवळ तुम्हा उमटचि ना। '—तुगा ४५० 'ऐसा हा सत्त्व गुण । देहीं उमटता आपण ।। —दा २ ७ ८ ५ (ठसा, चित्र, प्रतिबिंब इ०) वळणें, स्पष्ट दिसणें, स्वच्छ, अंकित होणें 'जेथ हें ससारचित्र उमटे '—ज्ञा ५ १०६ ६ बाहेर पडणें, येणें 'बहुमावती बाहेर सप्तयोजन, द्वार केलें उमगवया। '—पाप्र १० १४० ७ (गो) उपटणें, उपटून काढणें [ स उन्मथ्–उन्मट ]

**उमटणें**—उमटणें पहा

**उमटा**—पु ( व ) आवड, नाद ( किंचित तिरस्कारव्यंजक ) 'त्याला खाण्याचा मोठा उमगा आहे ' [ स उद्+मन्–मत प्रा उम्मत=उत्कंठा ]

**उमठणें**—उमटणें पहा

**उमडणें**—क्रि उमगणें, उत्पन्न होणें, सापडणें उमटणें पहा 'भूमंडळ जेथें उमडे । तेथें अंगें पां वाढें। '—अमृ ६ २४ [उमडणें]

**उमण**—( गो ) आमण पहा



**उमणणें**—क्रि मापणें मोजणें, उमाणणें पहा [स उद्+मा]

**उमतणें**—उक्रि ( माण ) ओतणें [ स उद्+मत् ]

**उमती**—स्त्री उमेदी, ज्वानी, तारुण्य 'छान छबेली सुरत फाकडी पुढें उमतीमधें येणारू। '—पला ४ ४० [ स उद्+मद्–मत्त, प्रा उम्मत्त ]

**उमथा**—वि ( गो ) पालथा, उपडा 'उमथ्या कळशावर पाणी ' =पालथ्या घागरीवर पाणी [ स उद्+मथ्, प्रा उम्मत्थ=अधोमुख ]

**उमदगी**—स्त्री मोठेपणा, थोरवी, मातबरी, सपन्नता [ अर उमद्‌गी ]

**उमदळणें**—अक्रि उमळणें, मळमळणें, काल्याकाल्या होणें, दवळणें ( पोटात ) 'मला उमदळतें ' 'पोटात उमदळतें ' [ स उद्+मूलन ] –सक्रि काल्वणें, ढवळणें, गढूळ करणें ( पाणी इ० ) [ स उद्+मूलन किंवा उन्मर्दन, प्रा उम्मद्दण ]

**उमदा**—वि १ थोर, श्रेष्ठ, शूर, पराक्रमी, विशालु, मोठ्या मनाचा २ भव्य, सुंदर, देखणा, पाणीदार (माणूस, वस्तु) [ अर उम्दा ]

**उमदा**—पु ( व ) जागरण, श्रम [ स उद्+मद् ]

**उमन**—स्त्री ( कु ) पहिली नागरणी उमज पहा [ स उद्+मज्ज् ]

**उमन**—पु. ( सोलं माण ) उखाणा [ स उद्+मन् ]

**उमप, उमाप**—वि पुष्कळ, अतिशय, खूब, अमोज, अगणित, 'जें एकें वळें फेडावा आहे। उमपपणाचा ॥ '—शिशु ७० 'डाहाळिया जाती उमपा। फलांही उजू ॥ ' —ज्ञा १५ १४८ [स उद्+मा ]

**उमपणें**—अक्रि वर यणें, उडणें 'मग तें निघाली तैयोत । तत्काळ उमपली गगन ॥ ' —कथा १ ६ १५९ [ स उद्+मा ]

**उमर**—उंबर पहा

**उमर, उम्मर**—स्त्री वय, आयुष्य 'बिगा शात उम्मर, नरम फार, वितावर पैठणचे नेसल्यें ' —प्रला २७९ [ अर उम्र ]

**उमरठ–ठा**—पु दाराच्या चौकटीची खालची बाजू उंबरठा उंबरा पहा [ स उंबर प्रा उम्मर ]

**उमरडणें**—क्रि १ ओलांडणें, उल्लंघन करणें, सोडणें, त्याग करणें 'स्वर्गाची आडरणी। उमरडूनि ॥ '—ज्ञा १३ १५२ —एभा १० ४ [ स उद्+मृद्, म उमरा+डाडणें ]

**उमरदराज**—पु चिरंजीव, पुत्र, मुलगा [ अर उम्र ]

**उमरा**—पु उंबरठा उंबरा पहा [ म उंबर, प्रा उम्मर ]

**उमराव**—पु सरदार, मानकरी, श्रेष्ठ जन, अंमलदार, मानसा 'राजे बाहादर उमराव हाजर स्वता आदि उमराव '—पया २६७ [ अर अमीर अ ] ०जादा–दी–पु सरदाराचा मुलगा, मुली.

उमलणें—अक्रि १ विकासणें, फुलणें 'तें उमललें अष्टदळ। ठेऊ वरी॥'—ज्ञा १७६ २ भेग पडणें, फुटणें, उकलणें ३ सैल होणें, विरघळणें (स्वच्छवरचा मळ, चुन्याची कळी, मातीचें ढेंकूळ वगैरे) 'वरचें सरकतें उमललें म्हणजे मग भाडें घासं' ४ फुगणें, लाही ज्याप्रमाणें फुलणें (भिजत घातलेलें धान्य वगैरे), ५ प्रफुल्लित होणें, उल्हासयुक्त होणें (मन वगैरे) ६ प्रकट होणें उत्पन्न होणें 'परी येकी केधवा गली। शाखाकोडी केधवा जाली। हें नणवे जेवीं उमलली। आषाढअभ्रें।'—ज्ञा १५ १२५ —उक्रि १ उचलणें, उखळणें (वाळवून घट्ट बसविलेलें शिल्याचें टोंक वगैरे) २ सुटें करणें, उघडणें, खोलणें (कोयंडयाची मिळ विलली दोन टाकें वगैरे) ३ क्षार लावून तापवून साधणें, एकत्र करणें (सोन्याच्या दागिन्याचीं टोकें) ४ सोलणें, मोकळें करणें, काढून टाकणें (धान्य भिजवून त्याचीं सालें वगैरे) [स उद्+मील-उन्मीलन, प्रा उम्मील्ण]

उमला—उवला पहा 'उमले व डोंगळे यांचें विष जालीम असतें'—प्राणिमो ११८

उमलें—न १ आधण घालून भिजत ठेवलेलें भात, जोंधळे वगैरे (लाह्या वगैरे करण्याकरिता) २ (व) सपीट, रवा वगैरे काढण्याकरिता भिजत ठेवलेले गहूं 'रव्यासाठीं उमलें कालच केलें, आज तें दळून या' [स उद्+मील्]

उमलें—न मळमळ, उमळ पहा

उमस—पु १ श्वास दम उमास-सा २ उसंत, विसावा विश्रांति, अवकाश स्वस्थता, स्वास्थ्य 'सत्व उर्मी अंत करणा सदी। उमस घवा नेदी।'—ज्ञाप्र १२५ 'मागें असतासी कळला। उमस घऊ नसता दिला।'—तुगा ४०९६ ३ स्फूर्ति, उद्भव विस्तार 'वाग्देवतची स्तुति। वाचाचि जाहली वदती। तयें द्वैता मिषें रायती। उमस चित्तीं उमसेना॥'—एभा १ २८ [स उद्+मिष्]

उमस—पु. उमज समज जाणीव 'म्हणोनि आत्मा आत्म लाभें। नादऊनि शब्द शाभे। यईल ऐसा न लभे। उमसु घेवों॥'—अमृ ६ ९४ [उमज]

उमसणें—उक्रि १ सांगणें उघड करणें, प्रकट करणें 'जीवु जावा परि तुमसें। ठेविला ठावा॥ —ज्ञा ११ ८०२ २ प्रकट होणें दिसणें माहीत होणें 'एक द्वैतासीं उमसों। नेदुनि ऐक्यासि विसकुलों॥'—अमृ २ ६९ [उमज]

उमसु-सा—पु विसावा उमस पहा 'उमसु नाहीं युद्ध सम महा॥'—कृमुरा ६९ २८

उमळ—स्त्री १ मळमळ, ओकारी वाटणें २ उमाळा पहा [स उद्+मूल]

उमळ-ट—स्त्री उपळ पहा १ पावसाचें पाणी जिरून जमिनींतून झर वाहूं लागण्याची स्थिति, उपळ २ फुलें, घोसस वगैरे चावले असतां अंगातून रक्त वाहूं लागण्याची स्थिति ३ अकाली गर्भस्राव होणें ४ उष्णता व आर्द्रता यामुळें फळें कुजून लावून रस वहावयास लागणें अशी स्थिति ५ मऊ होणें (कळीचा चुना, मातीचें ढेंकूळ इ) [स उद्+मृज्] ०पडणें—अतिशय पाऊस पडल्यामुळें पीक कुजावयास लागणें

उमळणें—क्रि उमळ यापासुन क्रियापद उपळीनें विशिष्ट होणें उमळ, उमळणें, उफटणें पहा

उमळणें—क्रि फुलणें, उमलणें (कळी वगैरे) [स उद्+मील्]

उमळणें— उक्रि (कु गो) धुणें, खळबळणें (वस्त्रें, भांडीं वगैरे) [म उद्+मल्]

उमळणें—अक्रि १ पोटातील कोंवळ्या गर्भास उष्णविकृति झाल्यामुळें तो स्रवण, पडणें २ उत्पन्न, उपटून येणें 'इया उमळती दाढा। दातासहित।'—ज्ञा १३ ५६४ 'पदस्पर्शें ज्याच्या तरुयुगुल तत्काळ उमळें।'—साह्द १ ५७ [स उद्+मूल]

उमळशीक—स्त्री (गो) उत्कंठा, आतुरता, औत्सुक्य [उमाळा, प्रा उम्मल=तृष्णा]

उमळा—वि (राजा) बुळबुळीत, गळमळीत, गळगळीत, लिबलिबीत (पातळसर अन्न, ज्यातून रस पाघळत आहे असें फळ, वगैरे) [उमळ]

उमळावण—स्त्री (राजा) मळमळ, पोटात ढवळण्याची क्रिया, तोंडास ओकारीपूर्वी पाणी सुटतें ती स्थिति (क्रि० सुटणें, येणें) [उमळ+पाणी, उमळणें प्रयोजक]

उमळी—वि स्वतंत्र, निर्बंध —ख ५३१

उमळी—स्त्री एक झुडप उवळी पहा

उमा—स्त्री पार्वती, गौरी, दुर्गा ०कांत-वर-पु उमेचा पति, शंकर, शिव 'तांडव विसरले उमाकांत। अति अद्भुत हरि-लीला।'—एरुस्व ३ १० [स उमा=पार्वती+कांत, वर=नवरा]

उमा—पु (गो) मुका, चुंबन —खिपु [ध्व का उम्मु=चुंबन]

उमा—वि (व) खडबळ, अडाणी साधा, भोळा, अशिक्षित 'आपण मराठी उमें माणूस आपणाजवळ दाखला नाहीं' [स उन्मत्त? दे उम्मइय=मूढ, अर उम्मी=अशिक्षित]

उमाट—पु उमाठा पहा 'अवनीचे उमाट ढलें।'—कृमुरा ४१ २५

उमाठ, उमेठ—वि उंच, उचवट, वर आलेली, फुगलेली. (जमीन) (पाणथळच्या उलट) [स उद्+मस्त(क)]

उमाठा—पु १ उचवटा, उंच जागा, डोंगराचा माथा 'उमाट्यावरी यतस सूर्य उग्ड्रा।' एक उमाट्याचे जागेवर उभी राहून तिनें तीन हाका मारल्या'—बाळ२ १६६ २ द्वार, उंबरठा 'एक

श्रवणाच्या राजबिदीस आले। तेथून हरिरूप निर्धारिले। एक कीर्ते नाच्या उमाठीं ठाकले। प्रेमें हरिरूप विलोकिती॥'-ह २३ २२६ २ (ल) प्रसिद्धि, (विशेषत) कुप्रसिद्धि, बोभाटा, बभ्रा, एखादी गोष्ट उघडकीस येणे (क्रि० होणें) (विरू) उमाठ्यास येणें स्पष्ट, ठळक दिसू लागणें (क्रि० पडणें, होणें) [म उद्+ मस्त(क), प्रा उम्मत्थ-उम्माथा, म उमाथा]

**उमाड**—स्त्री (वों) तुफान, वादळ, खवळणें, क्षुब्धपणा (समुद्राचा) [स उद्+मद्, उन्माद]

**उमाडा**—पु उमाळा उबळ पहा १ मळमळ, खळबळ (पोटा तील), पोटात ढवळणें २ जोराची उकळी, ऊत, उडणें (पाणी) ३ (ल) हुंदका, आवेग, उमाळा (दु ख इ० विकाराचा) [स उद्+मद्]

**उमाणणें**—उक्रि १ मोजणें, मापणें 'हा ससार उमाणिते माप। कां अष्टागसामग्रीचें दीप।'-ज्ञा ६ ४ ३ 'वारा उमाणावा वावें।' -एभा ११ १४६० 'व्यास वाल्मीकि व्यापारी। कीर्तन करूं उमाणिती।'-भवि २९ ७५ २ (ल) हिशोब दर्शे, थाशा दर्शे ३ ताडून पाहणें, तुलना करणें 'तयाची उमाणिता कीर्ति। उणीव दिसे आपाडे।'-मुआदि ११ ९३ ४ (ल) अटकळ करणें, अज मास करणें 'कीं गिरि धरूनि उमाणिती। महेंद्रमहिमा।'-ज्ञा १० २८९ [स उद्+मा-मान, प्रा उम्माण]

**उमाणा**—पु १ माप 'उमाणा घेऊनि परेशीं। सुखाडिजे।' -ज्ञा १८ ५२२ २ तुलना, बरोबरी 'चद्रासि चे उमाणें। रसज्ञीं भुरूवणें।'-ज्ञा १३ ११५७ [स उद्+मा मान, प्रा उम्माण]

**उमाणा-णें**—पुन उखाणा, हुमाणा, कोडें, कूट प्रश्न 'पुरुषे सासुनी व्याली। आपणा आपण व्याली। पोटींचे घेउनि गेली। उमाणें मासें।' -दावि ५०२ 'आतां मी पुसत तें सागार उमाणें'-निगा ९७ [हुमाणा]

**उमाणी-णीं**—स्त्रीन माप, मोजणी, झडती, अटकळ, अनु मान 'कर्ता कर्तव्या च उमाणें।'-ज्ञा १८ ५०० [स उद्+मा]

**उमानणें**—उक्रि मापणें, मोजणें, उमाणणें पहा 'आगाधा जाणिवातें उमानी'-ऋ ३ 'तैष मार्ग उमानीति खरे। खोटें म्हणति' -ऋ १२१ 'तेथा रूपाचे उमानें। कवन घे।'-शिशु ६१९ [स उद्+मा]

**उमाप**—वि अमूप, अमोज, अगणित, अतिशय 'ब्रह्मांड भरूनि उरलें घमें सौभाग्य तें उमाप तिचें।'-मोमह ५ २६ [स उद्+मा, म माप] म्ह० उमाप लगीन सावधान=द्रव्याचा अति व्यय आगर उधळेपणा या अर्थी ही म्हण योजतात

**उमापणें**—उमाणणें पहा

**उमास-सा**—पु १ मळमळ, पोटातील खळबळ, पोटात ढव ळणें, काळवणें (क्रि० येणें) २ उमाळा, आवेग, उकळी, लाट (हर्ष, शोक वगैरेचा) 'अभिमानाचे माळेविळे। महत्त्वउमासे येती चळे।'-एभा ८.३१२ ३ उद्भवण्याची स्थिति, तयारी (वादळ, रोग, गळू वगैरेची) धुमसणें, पिकणें, तयार होणें ४ खोकल्याची उबळ ५ जत वगैरे झाल्यामुळें होणारा मनद्वेष वगैरे (क्रि० येणें) [स उद्+मथ्, वे सम्मच्छिभ=व्याकुळ]

**उमास-सा**—१ श्वास, उच्छ्वास, उसासा (क्रि टाकणें) 'अपरिमित तिथेला येति तेणें उमासे'-सारह ३ ६३ 'मला उमासा टाकायाला फावत नाहीं' २ विश्रांति, उसंत, विसावा 'सैन्य पळालें दशदिशा। म्हणनी महिं महिं जगदिशा भीगें आमात माडिला कैसा। पळता उमासा घडु नेदी॥'-नै ११६३ ३ परी, बेघुंदि 'उमासा येऊनि पडिला धर्णी। परी हरीसि कोठें न दिसे पाणी॥'-महिपतिकथासारामृत २४ १९० [स उद्+मिष् प्रा उम्मिस] उमस, उमास खाणें-विश्रांति घेणें, दम टाकणें

**उमाळ**—क्रिवि अतिशय, अमोघ, अगणित, अलोट 'याज घर मागून उमाळ माळ्या पडू लागल्या'-भाव १३८ [स उद्+मा]

**उमाळा-ळी**—पुस्त्री १ मळमळ, पोटातील खळबळ, कळ-मळ, उमीळ २ हुंदका, उकळी, आवेग, उसळी, लहर (राग, प्रेम, दु ख, शोक वगैरे विकाराची) 'स्वानदाचे उमाळे देती। सारा सार विचारें तटपति।' ३ तीव्र इच्छा 'देहे खपता सर्व जाली उमाळी'-दावि १७८ ४ उकळी, फड, ऊत (पाणी, दूध वगैरे पदार्थांचा) ५ सुटका, सोडवणूक, मुक्तता, मोकळीक (एखादा धदा, कार्य वगैरेंतून) (क्रि० पडणें) ६ लाट, गर्दी, हल्ला, उठाव 'ता देखोनि यादवाचा उमाळा। एरी सिंहनादु दीन्हला॥' -शिशु १०४१, 'तेरें रुपाचे डाखळे। नाना दृष्टीचे उमाळे।' -अमृ ७१४३ ७ उद्भव, जोर, प्रभाव 'जेयांचा देखौनि उमाळा। पळे महामोहाचा पाळा।'-शिशु ३८४ 'मगोनि विषाचा उमाळा'-मुआदि ३५ १०२ [स उद् + मूल, तुल० का उम्मलु=श्वास घेण्यास येणारी अडचण, कफ] ८ (काव्य) ज्वाला, झोत, लोळ, तरग (आग, वीज वगैरेचा) 'कोटी रविराशि सज उमाळा॥ -शावि ३३५ 'जेमे कल्पांतविजूचे उमाळे।'-शावि ११२ [का उम्मळ=उष्णता] ०पडणें-अतिशय पाऊस झाल्या मुळें पिकें कुजावयास लागणें उमळ पडणें पहा उमाळीं-उमा ळीस-उमाळ्या-उमाळ्यास पडणें-येणें-उघडकीस येणें, माहीत होणें, दिसणें, आढळणें, बभ्रा होणें

**उमाळा**—वि (ना) ओंगळ, मळका, घाणेरडा [स उद्+मल्]

**उमेठा**—पु १ समुदाय, मेळावा 'उमेठ्या देवा निघनला। आठाइसीं देवा ववाळू दीवा॥'-शिशु १५३ -वि १ सामुदा यिक, एकत्र २ अतिशय पुष्कळ, उमाप 'किंबहुना सात्त्विका आठा। मानह माडला उमेठा॥'-ज्ञा १८ १६०६ [स उद्+ मित]

**उमेद्**—स्त्री १ आशा, धीर, भरवसा, खात्री, विश्वास 'त्याची उमेद अशी होती कीं,' २ आकांक्षा, हिंमत, उत्साह, धैर्य, हौस, अवसान, ईर्षा 'अब्दालीची बोलावणीं बहुत उमेद लावून गेलीं' -रा १ ३४ ३ तारुण्य, ज्वानी, वय 'आबाजी आपले उमेदीत आलियावरी ता॥ म॥ देशमुखी करावयास आले' -रा १७५ [फा उमेद, उमीद्, ओमेद] **उमेदीस येणें**-१ वयांत येणें, गणान येणें (स्त्री वगैरे) २ जोमात भरभराटीस येणें (कार्य वगैरे) ३ बहार येणें (झाडास वगैरे)

**उमेद्गी**—स्त्री उमेदवारी 'हे उमेदगीची व रयासतीची कोण वने (तऱ्हा) ते दर्यात करावी' -ख ७ ३८७ [फा उमेद्, उमेद्]

**उमेद्णी-नी**—स्त्री (कों) मळणी झाल्यावरची खळ्यातील कामें (वारवणी, मापणी, साठवणी वगैरे) [स उद+मय, किंवा उद्+मर्दन]

**उमेद्घार-द्वार**—वि पु १ धीट, आशापूर्ण, हिंमतवान निश्चयी, धीराचा २ वयात आलेला, तरुण, पूर्ण वाढ झालेला (मनुष्य, पशु झाड वगैरे) 'गडी पडला उमेदवार!' -मोर १ ३ इच्छेने गरजू, पदान्वेषी 'तुम्ही इकडील लक्ष्यांत राहून कल्याणचे उमेद्वार (हितेच्छु) असावें' -रा ८ ५ ४ अर्जदार, नोकरी मिळण्याकरितां खटपट करणारा ५ काम शिकण्यासाठीं राहिलेला, पमतवारीचा, कच्चा (नोकर) ६ परीक्षा देण्यास आलेला ७ नवशिक्या [फा उमीद्वार उमेद् उमेद्+वार]

**उमेद्वारी-द्वारी**—स्त्री १ आशावादीपणा, आकांक्षा, खात्री, निश्चय, दृढता, हिंमत विश्वास 'त्याची उमेदवारी पेशव सरकरू शहजात' -ऐपो ७७ 'त्यास स्वारी निघावयाचा मार्ग पहात आम्हीं उमेदवारीनें बसलों आहोंत' -ख ८ ४६६० २ तारुण्य, ज्वानी, पूर्ण वाढ, जोम, जोर 'हे आपले उमेद्वारींत आल्यानंतर त्यांचें लग्न केलें' -मदरु १ ११ ३ उमेदवारपणा, कच्ची पसंतीच्या अर्जीची नोकरी, उमेदवार बनून राहणें [फा उमीद्वार]

**उमेदी**—स्त्री ज्वानीचा, मनोविकाराचा भर 'शृंगार घालिता उमेदी चढ ग। खळता गनिमा येतें रडें ग॥' -प्रला १४६ उमेद पहा

**उमेराघामेरा**—वि घामानें थबथबलेला भरलेला, डबडबलेला, डवडवलेला घामाघूम [घामेरा द्वि]

**उमेळा**—वि (ना) ओंगळ, मळका, घाणेरडा [स उद्+मल्]

**उमोप**—वि अतिशय पुष्कळ-अगणित अमोज उमाप पहा 'तुझेचि करुणाभेवा मन धरी उमोपद्रवा' -केका ७० [स उद्+मा]

**उम्द्गी**—स्त्री थोरवी, मातब्बरी श्रेष्ठपण उमदगी पहा 'अमियतच्या सर्दारास दोनी सरकारच्या बुजुर्गी व उम्द्गीवर प्रतिष्ठेच व इज्जतीचे रस्म अमलात येतील' -पेश ५८ [अर उम्द्गी]

**उम्दा**—वि १ थोर, विशाल, उत्कृष्ट उमदा पहा 'दोन उम्द मनुष्य दिल्ली दोरची जाहीर करावयास रवाना करीत आहों' -पेश ६८ २ भारी, किंमतवान, बहुमोल 'तल्फ चुकवून पोशाख दिधला खूप उम्दा भर्जरी' -पग ८९ [अर उम्दा]

**उम्दान**—वि (ना) उत्तम, फक्कड [अर उम्दा]

**उम्देतुल्मुल्क**—पु दौलती(राज्या)चा स्तंभ विठ्ठल शिवदेव विंचूरकर याना दिल्लीच्या बादशहानें ही पदवी दिली होती [फा उम्दत्=स्तंभ आधार+उल्+मुल्क=राज्य]

**उम्मस**—वि (ना) हुड, आडदांड

**उम्मस**—पु उसंत, विश्रांति उमासा पहा 'रा सभपना सारिखा परी नाहीं की उम्मस।' -दावि २१४

**उम्हळ, उम्हळणें, उम्हास-ळा**—उमळ, उमळणें, उमाळ वगैरे पहा 'इर्षेच्या तापाचीं मुख्य लक्षणें वांत्या व उम्हासे हीं होत' -टि १ ५७५ 'विरह दु खाचे कितीदा उम्हाळे।' -दिक ५१

**उम्हाट**—(ना) उमाटा पहा 'तें घर उम्हाटावर आहे'

**उयला**—पु (कों) पावट्याचा सोलणा [स उद्+वल्क, तुल० का उय=धान्याचें टरफल]

**उर**—स्त्री हौस -शर (सोहि महदनु) [का उर=उतावळेपणा]

**उर**—ऊर पहा

**उरउरीत**—क्रिवि उरलेला, वेगवेगळेपणानें, अलग 'सागा यासी लोकां। उरउरीत उरला तुका॥' -तुगा ३८०७ [स उर्वरित]

**उरउळी**—स्त्री १ (कु) रोवळी (तांदूळ धुण्याची), दुरडी २ तेल घालण्याचें नरसाळें [का उरळि=वाटोळें भांडें]

**उरूक, उरका**—पु काम त्वरित करण्याचें सामर्थ्य, कौशल्य, उत्साह, आटोप आवरशक्ति 'ज्याला ज्या कामाचा उरका असेल त्याला तें काम सांगावें' [द उर=आरंभ, का उर=उतावळेपणा, तत्परपणा, प्रयत्न, किंवा का उर्कु=शक्ति पराक्रम] ॰**उरकणें**-१ काम पार पाडणें, पुरें करणें २ दुसऱ्याच्या कामात ढवळाढवळ करणें ॰**पडणें**-(कामाचा) संपविण्याची जबाबदारी अंगावर घेणें, पडणें

**उरक**—पु जोर, उत्कर्ष, जोम, उत्साह उल्हास 'भीतरिं अवस्था व्यापिलें। उरकें वागिंद्रिय कोंदलें॥' -ऋ ४२ 'तें उरके आली फळा।' -भाए ३१४ [का उर्कु=पराक्रम]

**उरकणें**—सक्रि १ पुरें करणें, पार पडणें, संपविणें, शेवटास नेणें, तडीस नेणें २ भानगडींत पडणें, ढवळाढवळ करणें 'आपण आपल्या कामात असावें लोकांची कुचंनिंदा उरकू नये' —अक्रि १ आटपणें, संपणें शेवट होणें, खलास होणें नाहींसें होणें २ (ल) मरणें ३ आटोक्यात येणें, पसंतीस येणें यथायोग्य होणें, सोपें होणें [उरक]

**उरकता मार्ग-रस्ता, उरकती वाट**—पु स्त्री लवकर मध गारी वाट (सरळ, छाया असलेली, जवळची, सोपी म्हणून)

**उरकमणें**—सक्रि स्वच्छ करणें, घासुन-पुसुन काढणें, निर्मळ करणें (भांड्यांचें सरकटें, कपड्यांची घाण वगैरे) –अक्रि विरळ होणें, घुस्में, निघून येणें (भाड्यास, वस्त्रास लागलेली, खरखड, कपड्या, घाण, मळ वगैरे)

**उरकाउरक**—स्त्री घाईघाईनें, गर्दीनें, काम सपविण्याची, आवरण्याची क्रिया, आटपाआटप, आवराआवर [उरक द्वि]

**उरकुडा**—पु (व) उकिरडा पहा [उत्+कृ]

**उरग**—पु सर्प, साप, नाग 'तरी सरोवर तरंगीं। साडिलें आकाश मेघीं। का चंदनातें उरगीं। उदयान जैसें॥' ज्ञा १७ २२५ [स उरस्=छाती+गम्=जाणें]

**उरंग-गु**—वि १ निटलेल्या रंगाचा, हीन रंगाचा २ शिळा, नाषडीचा 'ते आवडी का उरगु। आता जाली' –माए १४० [स उद्+रंग]

**उरंगणें**—अक्रि विटणें, हीनरंग होणें 'उरग ना साडे पन्हर सोनें' –दाव २९

**उरगळी**—वि ज्याच्या डोळ्यावर, उरावर व गळ्यावर मण्यासारखें चिन्ह आहे असा (घोडा) हें घोड्याचें अशुभ लक्षण होय [ऊर+गळा]

**उरगुडें-ढें**—न (का) खेड्यातलें देऊळ 'जेणें कैलास दुर्गा पाडिलें। सत्यलोकीं ठाणें घातलें। सोनकानें उरगुडें घेतलें। वैकुंठींचें॥' –शिशु १६०. [का ऊरु=गाव + गुडि = देऊळ]

**उरजणें**—अक्रि बलवान् होणें, बलिष्ठ होणें, सुस्थितींत येणें, उत्कर्ष होणें [स ऊर्ज्]

**उरजा**—स्त्री आपासना, निगा, काळजी, सुव्यवस्था (क्रि० राखणें) [स ऊर्जा]

**उरंडा**—पु ढवळा, ढीग 'पायराचे उरड यापरी। जाहाले येरमारेआतु।' शिपु २ ४२ १३० [स उ ड=ढीग, समूह]

**उरण**—पु मेंढा, बकरा 'त उमनर्तीत न उरे व्याघ्र रवे वीय लेखदि उरणीं' –मोवर्ण २८ ८३ [वे स उग=मेंढा, म उरण=मेंढा, उर्णा=लोकर]

**उरणा**—स्त्री एक वृक्ष, वल 'केळी कल्हार निर्गुडी। मालती मोगरे उरणी॥' –कथा १ १५ १४२

**उरणें**—अक्रि १ शिल्लक, बाकी राहणें, मागें राहणें पुरून राहणें, अवशिष्ट राहणें, जास्त होणें तयें लोक वचे उरती –उषा १७६७ २ शक्य होणें, परवडणें पुरवणें 'ज्या इंद्रियाम जो भाग। ता ता करी देवाभाग। ईश्वरानें केलें जग। माडितां उरेना॥' –दा १७ ५ ८ [म उत्+पृ=दलपूर प्रा च्छर–उरेर सिंधा ञ=जाणें] उरता करणें-क्रि बाकी ठेवणें, अरत पेड करणें

**उरता**—स्त्री बाकी, शिल्लक, अवशिष्ट, अंश (क्रि० राहणें, देणें, राखणें, ठेवणें, धरणें, बाळगणें) [उरणें]

**उरता**—स्त्री अरता (अप) १ भीड, मुरवत, आक्षेप 'मी कोणाशीं काहीं पण बोलू लागलों तर कोणाची उरता ठेवणार नाहीं' २ खोळंबा मानणें, उणीव भासणें 'तु माझी उरता धरू नको' =माझ्यासाठीं खोळंबू नकोस ३ अडता, सबब 'त्याच्याकडून तो माल न आल्यामुळें येणाऱ्याची उरता न सांगता बाजारांत जसा भाव असेल त्याप्रमाणें घेऊन द्यावा लागतो' –मुव्या २५१ [अरता] ०न धरणें-क्रि मान न राखणें, भीड न धरणें, वाट न पाहणें

**उरदाणा**—पु घोड्याच्या तोबऱ्यांतील शिल्लक राहिलेला हर भरा, घास [उरणें+दाणा]

**उरपणें, उरवणें, उरंजणें, उरसणें**—अक्रि उरीं फुटणें, उरीं भरणें, अति श्रम केल्यामुळें छातींत दु:ख उत्पन्न होणें (घोडा, बैल वगैरेस) [ऊर]

**उर पार्श्वार्धमंडल (संयुतहस्त)**—न (नृत्य) उजवा हात अराल व डावा हात पताक करून दोन्ही हात उराच्या जवळ आणणें व मग उजवा हात उजव्या बाजूस व डावा हात डाव्या बाजूस वर्तुलाकार करणें

**उरफाटणें, उरफाटफारफाट, उरफाटसुरफाट, उर फाटा, उरफाटासुरफाटा**—उफराटा इ० पहा

**उरफोड**—स्त्री अतिशय श्रम, अतिशय कष्ट, उरस्फोट-इ पहा [स उरस्+स्फुट्, म ऊर+फोडणें]

**उरबंद**—पु गोरबंद, घोड्याच्या गळ्यात बांधण्यासाठीं खागि रास लावलेला पट्टा [ऊर+बंद]

**उरमोडा**—पु (माण) जनावरास होणारा एक रोग, यानें जनावर छातींत आखडतें [स उरस्+मोटन, म ऊर+मोडणें]

**उरम**—न उमर' एक पदार्थ उजर' पहा कदाचित सुर मावद्दल मुद्रणदोष असावा' 'मालपुव्यादी सुरपमार (सुरपार ?= सारपारा ?)। उरम मृदु भक्षितो।' –नर ९ ११६

**उरमट-ठ**—वि उद्दाम, दांडगा, माजोरी, उद्धट, मस्त [स उन्मत्त]

**उरमटणें**—क्रि उरमट मगरूर होणें, अरेरावी दाखविणें, दिमाख मिरविणें

**उरमटाई-ठाई**—स्त्री उरमटपणा, मगरूरी, दपटाई, उद्धट पणा

**उरमाल**—पु (कों गो) रुमाल (अप) पहा

**उरलागुरला, उरसुर, उरलापुरला**—वि अवशिष्ट राहि लेला, शिल्लक, शेष [उरणें द्वि]

**उरले गट्टे**—पुअ (त) घटाट [का उरुळि, त उरुळै=गोल]

**उरवई**—स्त्री शिल्लक, बाकी, अवशेष [सं उर्वरित]

**उरवणें-विणें**—उकि बाकी ठेवणें, राहू देणें, शिल्लक ठेवणें, मागें टाकणें, बाकी राखणें, राखून ठेवणें 'तन्हि कुरुपांडवयुद्धा रंभसमय यश तिचें न तें उर्वी ॥'—मोकर्ण ८१५ 'सर्व तूप वाढू नको, थोडेंस उरव'. [स उर्वरित, तुल० का उर्विसु=वाट विणें]

**उरवळी, उरोळी**—स्त्री रोवळी, तांदूळ वगैरे धान्य धुण्या करिता वांचें किंवा धातूचें केलेलें सच्छिद्र पात्र, दुरडी [का उरल्ि=वाटोळें भांडें]

**उरवी**—स्त्री पृथ्वी [स उर्वी]

**उरशी**—स्त्री स्तनाचा प्रादुर्भाव झाला आहे अशी स्त्री, वयात आलेली स्त्री, तरुणी [स उरस्]

**उरसिज**—न स्तन, उरोज 'येथल बहुपचारें वक्ष्योरसिजासि काय बोलावा।' [स उरस्–सप्तमी एकवचन उरसि+ज]

**उरःसर**—पु उरानें सरपटणारा प्राणी, सर्प, नाग, साप उरग पहा [स उरस्+सृ]

**उरःस्थल**—न वक्षःस्थल, वक्षप्रदेश, छाती [स उरस्+स्थल]

**उरस्फोट-ड**—स्त्री १ अतिशय श्रम, कष्ट, जिवापाड मेह नत, अत्यंत नेटाचा प्रयत्न, रक्त आटविणें, आतडीं तोडणें (एखादा विषय फोडून सांगतांना), माथेफोड २ अत्यंत कळकळीची विनंति पदरीं धरिसी। किति करिसी उरस्फोड ' [स उरस्+स्फोट] ०करून घेणें–जीव तोडून सांगणें, जिवापाड मेहनतकरणें

**उरःक्षत**—पु छातींत होणारा एक रोग, एक प्रकारचा क्षय रोग यामुळें छातींत व कुशींत पीडा होते [स उरस्+क्षत]

**उरा**—पु नदीच्या पात्रांतील कमी पाणी असलेली किंवा पडलेली जमीन, उतार, भाट [स उर्वरित]

**उराउरीं**—क्रिवि (उरांला छाती लावून) झटपट, झटकन, झडकर, एकदम, तावडतोब, तत्काल 'चांग तें उराउरीं मागों।'—ज्ञा ११५४९ [उर द्वि]

**उराक, उऱ्हाक**—स्त्री (गो) स्वाद नसलेली दारू [पो उऱ्हाक, इ ॲरॅक, अर अरक]

**उराचा तट्टा-पाजरा-शिप-शिंपी**—पुरुषी भरदार, विस्तीर्ण छाती, वरवडधा ऊर पहा

**उराझुरा**—वि अग्रा राहणारा, दूरदूर असणारा, मनमोकळा वागणारा, धुटा, मातल्या गांठीचा (क्रि० वागणें) [उरणें ?सा उर+पुरणें ?]

[illegible]**र्डी**—स्त्री १(घोडयाच्या) उराला बांधावयाचा खोगि (बांडें यांच्या उलट) [उर+अर्डी=गाठ] २ एका जातीचा साप चावला असतां येणारी [illegible] उरस्]

**उराड**—न १ अतिशय वर आलेली छाती २ ऊर याचाच हीनार्थक शब्द, छाताड ३ छातीवर येणारें वजन किंवा दाब (क्रि० लागणें) ०काढून चालणें–छाती पुढें करून गर्वानें चालणें

**उराडी**—स्त्री १ भरलेली, प्रशस्त छाती, दृढ, विशाल उरो भाग २ (खाटिक) उराचें हाड, जनावराचें ऊर **उराडी भरणें**–इ० वाक्प्रचार ऊर शब्दापुढें पहावे [स उरस्]

**उराळणें, उराळ होणें**–अकि १ गाडींत मागें अतिशय भार झाल्यामुळें जू बैलाच्या मानेवरून वर तरंगणें २ गाडींत मागें फार भार होणें उलाड पहा 'बाळासाहेबाची गाडी वाटेंत उराळली'

**उराळा**—पु (व) खांबाशिवाय तयार केलेला मंडप [स ऊर्ध्व+माल्य]

**उरी**—स्त्री १ बाकी, अवशेष, शिल्लक, शेष 'जव भरली आयी उरी। यळाची ते।'—ज्ञा १८४२६ 'नायकर्मी माझें सांगितलें उरी। शरिराची उरी उरों नेदी।'—ब१३८ २ आश्रय, ठाव, ठिकाण, जागा 'तैसें तातलीये रवाडी। तुषारा उरी नाहीं।'—ज्ञाप्र ७०२ 'आम्हा अनाथा कंची उरी'—दावि१० ३ भीड, मर्यादा, मुरवत 'आपणास जें मानेना। तेथें कदापि राहावेना। उरी तोडून जावेना। कोणीएकें।'—दा १०२१४ 'आम्हा पासीं असत्य बोलता। उरी सर्वथा न ठेवीं।'—भवि ८१५८. ४ अवसान, टिकाव, धडगत, स्थिति 'एरिकेच्या निजार्थी। यादवांसि उरी नाहीं। दुधड तोडूनिया पाही। पडती ठायीं परस्परें।'—एभा ३०१४९ ५ इच्छा, हेतु 'भक्तां श्रुतेया जिविची उरी। पुरविल स्वामी।'—शिशु ११.१४९ [स. उर्वरित, म उरणें]

**उरु**—ऊरु पहा

**उरु**—वि मोठा, थोर, विशाल 'हरणार कसें म्हणशी तू हित-कर या अशाहि उवरितें।'

**उरुद्रोणी**—पु घोडयाचा एक रोग, यानें घोडयाच्या दोन्हीं पायांमध्यें सूज येते —अश्वप २२८३ [स ऊरु+द्रोणि, द्रोणी]

**उरुळी**—स्त्री रोवळी उरवळी पहा

**उरुकें**—न वेल, वेलीचा धुमारा, अंकुर 'मौक्तिकाचे मृदु वकें। तेजाचेनि उरुकें'—शिशु ४२४ [म उलुग=एक गवत, का उर्कु=पराक्रम]

**उरूज**—पु (माळवी) उन्नति, बढती, महत्त्व [स ऊर्ज्]

**उरुफ**—वि उर्फ, दुसऱ्या नांवानें माहीत असलेला, टोपण नांव असलेला, उपनांवाचा 'मुफन्तपूर महमूदयाही उरुफ करा बावधन'—इम ४८ 'नद्दीसाटुर्गे उरुफ पन्हाळा'—रा ३५४ [अर उर्फ=विख्यात, माहीत असलेला]

**उरूबरू, उरुबुरू**—क्रिवि समक्ष, प्रत्यक्ष 'उरुबरू येऊन विनंती करीन।'—रा ३१२१ 'उरुबुरू स्वामींच्या समक्ष मनचे-मनीं कुतुरतों आम्हीं'—होला ९७१३४ —स्त्री उपस्थिति, हजीरी, प्रत्यक्षत्व; समक्षता [फा रुबरू=प्रत्यक्ष]

**उरूस**—पु १ पिराचा उत्सव, ( सामा ) पुण्यतिथि, जत्रा २ लग्नातील मेजवानी म्ह० आलें उरूस तें चुकवू नये गुरस [ अर उर्स=१ देवतेस उपचारसमर्पण २ लग्नाची मेजवानी ]

**उरूसा-उरोसा**—पु ( ना व ) पडसें, सर्दी,

**उरेवकस्मोटा**—पु. ( हिं ) ( मल्लविद्या ) १ कुस्तीतील एक डाव जोडीदाराच्या एका हाताचा पंजा धरून तो झिटकून देऊन जोडीदाराच्या गळ्याच्या घाटीवर मूठ वळवून मारणें २ जोडीदाराचा एक हात आपण आपल्या हातात धरून तोच हात आपल्या हातानें जोरानें झिटकून देऊन कसोटा मारल्यासारखी हूल दाखवून जोडीदाराच्या दुसऱ्या बाजूच्या गळ्यावर आपली मूठ वळवून मारणें [ अरेब=कुशल + कसोटा, अर अरबद=युद्ध ? ]

**उरेवधोबीपछाड**—( हिं ) (मल्लविद्या) जोडीदाराचा एक हात आपल्या खांद्यावर असताना धरून आपण गुडघा देऊन ज्या मोटेतो त्याप्रमाणे जोडीदाराच्या कंबराच्या खाली आपला खांदा देऊन धुताना परीट ज्याप्रमाणें वस्त्र फिरवून टाकतो त्याप्रमाणें जोडीदाराला फिरवून टाकणें [ अरेब=कुशल, अकलवान+धोबी+पछाड=झापटी ]

**उरोगामी**—पु सरपटणारा प्राणी ( साप, वगैरे ) अशा प्राण्याचा वर्ग [ स उरस्+गम् ]

**उरोग्रह**—पु एक रोग, यकृतातील रक्त दूषित झाल्यामुळें हा होतो [ स उरस्+ग्रह ]

**उरोज**—पु स्तन 'पुढें होउनी तत्कराभोरुहातें । उरोजीं धरी गाढ रंभारु हातें । -राधाभुजग ( वामन ) ३२ [ स. उरस्+ज ]

**उरोटा**—पु १ विहिरीजवळचें पाण्याचें टाकें, द्रोण, कुंडी २ अवशिष्ट, शिलक, बाकी राहिलेलें [ स उर्वरित म उरणें ]

**०पुरोटा**—पु ( उराटयाला पुरोटा ) उणें पडेल तें पुरें करणें [ स उर्वरित+पृ ]

**उरोध**—पु उपरोध, औपरोधिक भाषण, व्याजोक्ति 'उरोधु बादुबळु । प्राणितापदाळु । उपहासु चाळु । वर्मस्पर्शु ॥' -ज्ञा १६ २७० [ उपरोध अप ]

**उरोमंडलकरण**—न (नृत्य) पाय स्वस्तिकाकार ठेवून स्तर एकमेकात गुतविणें, मग हात छातीसमोर आणून उद्वेष्टित करणें [ स उरस्+मंडल ]

**उरोमंडल(संयुत्तहस्त)**—पु ( नृत्य ) दोन्ही हात छातीसमोर आणून एका हातानें दुसऱ्या हातास तर्जनीच्या बाजूनें आरंभ करून तळहाताच्या बाहेरच्या बाजूनें आतील बाजूस विरुद्ध चाल्नी व काढणें [ स उरस्+मंडल ]

**उरोमुरो**—वि (बायकी) उरलेसुरलें 'उरोमुरो वाण्यापाशीं दूध पितो '-मुराळा पाजताना असें अंगाईगीत म्हणतात [उरो+मुरो] -न २ आहार गाणें, चारणें, लांबविणें ( क्रि० करणें ) 'या घरतूंचें यानें उरोमुरो केलें ' [ म उर्वरित, उरो द्वि ]

**उरोळी**—स्त्री शेताची हद्द दाखविण्याकरिता सरकारी अधिकाऱ्यानें शेताच्या सीमेवर घातलेला मातीचा बांध, वरवा, वरळी

**उरोळी**—स्त्री रोवळी उरवळी, उरूळी पहा

**उर्जा**—स्त्री ( प्र ) ऊर्जा, सतेजता, निगा, तजेला ( क्रि० ठेवणें राखणें ) [ स ऊर्जस् ]

**उर्जित**—वि ( प्र ) ऊर्जित बलिष्ठ, मोठा [ स ऊर्जित ]

**उर्जी**—पु (क) शेतीसंबंधी खर्च, मशागतीचा खर्च 'जमिनीबद्दल किती उर्जी आला ?' [ स ऊर्ज् ]

**उर्णनाभ ( हस्त )**—पु (नृत्य) आंगठ्यासह सर्व बोटें विरळ ठेवून पहिल्या पेरात वाकवून तीं सर्व तळहाताकडे वाकवीं करणें [ स ऊर्णनाभ=कोळी ]

**उर्णनाभि-भी**—पु कोळी, ज्याच्या बेंबींतून तंतु निघतो असा प्राणी 'नातरी उर्णनाभिका जैसा । ऊर्णा वमूनि करी फासा।' -रयोवा १० ३८६ [ स ऊर्णा+नाभि ]

**उर्णपट**—पु लोंकरीचें वस्त्र, बुरणूस 'आसन सोरठा उर्णपटीं। पुढा माचळी चौपुर्गी ' -ऋ ८० [ स ऊर्णा+पट ]

**उर्णा**—स्त्री लोंकर [ स ऊर्णा ]

**उर्ती**—स्त्री ( क ) काळजी [ स आर्ति ]

**उर्दाबेगनी**—स्त्री ( हिं ) जनानखान्यातील सशस्त्र अंगरक्षक स्त्री, ( सामा ) दासी, परिचारिका, बटीक [ तु उर्दू=सैन्य, तळ, लष्कर, बाजार+बेगम=स्त्री, तरुणी ]

**उर्दू**—१ सैन्याचा तळ, लष्कर २ एक देशी भाषा, ही मूळ लष्करातील भाषा असुन हिच्यात हिंदी, फारसी इ० अनेक भाषांचें मिश्रण आहे हिला हिंदुस्थानी भाषा असेंहि नाव आहे ३ बाजार [ तु उर्दू=सैन्य, छावणी ]

**उर्फ**—अ उपनाव, टोपण नाव, प्रसिद्धीचें नाव, अमक्या नावानें मशहूर, म्हणजे 'रघुनाथ बाजीराव उर्फ दादासाहेब ' उरूफ पहा [ अर उर्फ ]

**उर्फाटा**—उफराटा पहा

**उर्बुद रोग**—पु शरीरावर उत्पन्न होणारी गाठ, गळू, आवाळू. [ स अर्बुद ]

**उर्मट**—वि उद्दट, उरमट पहा **०पणा**—पु उद्दटपणा, अरेरावी 'सरकारी अधिकाऱ्यांना उर्मटपणा उतरेल व रयतेस कांहीं फायदा होईल ' -टि १ ५८९

**उर्मल**—पु ( कु ) रुमाल, उरमाल पहा 'माण्याक उर्मल वार ' [ रुमाल अप ]

**उर्मी**—स्त्री ऊर्मी, उमाळा, उठाव, लहर तरंग, लाट निकराचा जोर ऊर्मी पहा 'भीतरि भरलिया उर्मी । भगें आदोजी स्वामी ॥' -ऋ ४३ 'जय विषयाब्धीच्या आकल्पित । उर्माळे पेती ॥'-ज्ञा ७ ७४ 'आली उर्मी माझे।तुका म्हणे थोडें आहे॥' -तुगा ३३४० [ स ऊर्मि=लाट ]

**उलथ**—पुस्त्री एखाद्या टेकडीची, गावाची दूरची बाजू, सीमा, टोंक, दूरचा, अखेरचा, शेवटचा भाग

**उलथणी**—स्त्री उलथ, कलाटणी, उलथी पहा

**उलथणें**—क्रि फाटणें, दुभग होणें 'तो शोक सांगतां उलथे धरणी।'—राधि २४४० [स उद्+स्तृ]

**उलथणें**—न १ सराटा, कल्था, भाकरी वगैरे परतविण्यासाठीं, आटवण्याचें दूध ढवळण्यासाठीं, केलेला पितळ किंवा लोखंडाचा पसरट तोंडाचा दांडा, उलथा (व) उलथन २ (चांभारी धंदा) जोड्याचीं टोंपरें व्यवस्थित करण्यासाठीं उपयोगांत आणावयाचें लांकूड उलथा पहा [स उत्+स्थल, प्रा उत्थल्ल]

**उलथणें**—सक्रि १ उलटें करणें, उताणें करणें, खालची बाजू वर करणें उलटणें 'आकाश पडावया गडाडी। पृथ्वी उलथावया हुडहुडी॥'—एभा १७१४२ २ आतील बाजू बाहेर करणें, फिरविणें (अगरखा पागोटें ६०) ३ पुरी व्यवस्था लावणें, उरकणें, पुरें करणें, पार पाडणें, तडीस नेणें (एखादें भानगडीचें काम किंवा प्रश्न) ४ उलथेंपालथें करणें, चाळविणें खालींवर करणें, हुडकणें (एखाद्या राशींतून वगैरे), धुंडाळणें ५ उत्पन्न होणें, प्रादुर्भूत होणें 'परमतृप्ती उलथल्या पोटीं। अमृतही न लागे ओंठीं।'—एभा १२ ५११ ६ पुन्हा करणें, परत करणें 'तेंचि उलथानि ज्ञान कथ। उद्ध वासि होय सांगता।'—एभा ११ २५५ ७ खालवरकरणें (उखळांतील धान्य) —अक्रि १ उलटें होणें दुसरी बाजू वर येणें २ परतणें, पुन्हा येणें ३ (ल) आकस्मिक मृत्यु येणें, तटकर मरणें, मरून पडणें (सामा शिवी देतांना वापरतात) 'एवढा थाप्या पण पटकीनें हा हा म्हणतां उलथला' 'उलथत नाहीं मेला एकदाचा!' ४ उठणें, लोटणें 'घननीळ सांवळा। परब्रह्माचा पुतळा। पाहावेया गाओ आला। उलथोनिया॥'—शिशु ५३५ [स उद्+स्थल्, प्रा उत्थल, म उथळ वर्णव्यत्यास] ०जाणें—क्रि मरणें 'त्याचे म्हातारडे आईबाप तिकडे उलथून गेले'—नामना ११४

**उलथा**—वि उताणा, तोंड वर असलेला, पाठीवर पडलेला, पालथा याच्या उलट —पु १ कल्था, सराटा, उलथणें पहा २ उलट विरुद्ध, (बाजूचा मनुष्य) प्रतिपक्षी ३ कांडतांना उखळीच्या तळाशीं राहिलेलें धान्य उखळून वर काढण्याची क्रिया ४ (ल) उलटा सस्कार 'निद्राकाळीं सुद्धीचा माया। बैसे जागृतीचा उलथा॥'—विउ २५२ ५ (ग्राम्य) उत्तर, जबाब, टोमणा (क्रि० देणें) ६ उलट व्यत्यास, स्थिति प्रतिपक्ष, विरुद्ध मार्ग, अर्थ वस्तु 'तूं म्हणसी जे स्वप्नावस्था। ते तव जागृतीचा उलथा। तरी जागृती तत्कार्य व्यवस्था। कशी घडे।'—विउ ५ ३१ 'स्वप्न जागृतीचा पै उलथा। जागृतीमाजी इंद्रियें करिती ज्या ज्या अवस्था। तदनुसार नाना परी व्यवस्था। मनचि स्वप्नामाजीं।'—स्वादि ५२४४ [स उद्+तल्] ०जमीन—स्त्री १ (वऱ्हा) एकाच शेताचा किंवा मळ्याचा थोडा दूर असलेला भाग, पुरवणी भाग, मुख्य शेतास रान, चराऊ वगैरेचा पुरवठा करणारी पड जमीन किंवा सामान्य पडीत जमीन 'माझी उलथा जमीन येथून कोसभर आहे' २ (सामा) पडीत जमीन ०पसा—पु उताणा हात, भिक्षा मागण्याकरितां पुढें पसरलेला हात ०पालथ-था—स्त्री वि वर खालीं करणें, उलटापालट उलटापालटा पहा [स उद्+तल्, प्रा उत्थल्ल+पल्लत्थ, हिं उथलपाथल]

**उलथी**—स्त्री उलटी, कलाटणी, परिवर्तन, उलटण्याची क्रिया (क्रि खाणें, घेणें, देणें)

**उलपा-फा, उलपो**—पु (राजा.क) शिधा 'भटजींना उलपा व दक्षणा दिली' [अर उलुफा=रोजगुरा]

**उलफुली**—स्त्री (गो) टाकळ्यासारखें एक झाड, याची भाजी करतात [स उत्+पुष्प]

**उलमत**—वि उन्मत्त 'आजळ कापी अळ सारसत, अगरख चरस उलमत कस्तुरीमृग कस्तुरी नाभित लागला पगला'—एपो २४२ 'साठ काट उन्मत्त डुलतात कुंजर'—ऐपो २४३ (टीप शिवूत २२१) [स उद्+मत्त]

**उलमा**—पु विद्वान [अर उलमा, अलीम अव]

**उलमी**—स्त्री (कों) एक प्रकारची होडी

**उलव**—स्त्री (कर्ना) चाहूल, हालचाल, जाग (माणसाची वगैरे) [का उलुवु-उलिवु=आवाज]

**उलवण**—न (विणकाम) कापड विणल्यानंतर फणींत राहिलेले धागे, दोर [स उद्+वलन]

**उलवणें, उलैणें, उलौणें**—(गा) बोलणें [स उद्+लप्, प्रा उल्लव=सांगणें किंवा स उल्लपन, प्रा उल्लवण=कथा]

**उलसमार**—स्त्री (गो) जेवणानंतर येणारा आळस [स लस्=काम करणें, किंवा स अलस=आळस]

**उलसा, उलिसा, उलुसा**—वि थोडा किंचित्, दवला, इवलासा पहा उलुसि साखर खर्जुर खावें।'—मराधा २३ [स अल्पीयस्]

**उला**—पु (व) वेल, अवल (चुलीचा) वेल पहा [द उली=चुला]

**उलागीर**—वि १ प्रवासी उपऱ्या, तात्पुरता राहणारा २ अनाहून आगंतुक ३ मनानें उठविल्याशिवाय किंवा बोलाविल्या शिवाय अचानकपणें येणारें, प्रकट होणारें (भूत, पिशाच्च वगैरे) ४ बिन जरूरीचें, फाजील फाजील (सामान, वगैरे) [स उद्+लग्]

**उलाघाल-ढाल**—स्त्री १ अस्वस्थता, बेचैन (तापानें वगैरे होणारी) २ भानगड, चळवळ, सटपट, धडपड (कामधंद्याची

वळविणें ( क्रि० देणें ) उलटी ढाल पडणें २ स्वपक्ष सोडून प्रति पक्षास जाऊन मिळणें, वचनभंग करणें शब्द मोडणें, फितूर होणें, बंड करणें ०पालट-सुलट-स्त्री उलटापालट उलटासुलटा पहा ०पुलट-स्त्री उलथापालथ, फिरवाफिरव, खाली वर, इकडेतिकडे करण्याची क्रिया ०बाजी-स्त्री प्रतिकार, परत फिरविलेला डाव ०मजकूर-पु प्रत्युत्तर, परत जबाब, फेर निरोप, उलट उत्तर ०पत्र-न उत्तरादाखल लिहिलेलें पत्र ०भेट-स्त्री आपल्या भेटीस आलेल्या गृहस्थाच्या घरीं भेटावयास जाणें, भेट परत करणें, परत भेट ०मान-पु आपला ज्यानें सन्मान केला त्याचा आपण उलट सन्मान करणें, उलट मेजवानी, उलट जावसाल-जबाब वगैरे वाक्प्रचारात परत फेड असा अर्थ होतो उलट अहेर पहा ०तपासणी-स्त्री १ एखादी गोष्ट पुन्हा शोधून किंवा तपासून पाहणें विचार करणें, २ साक्षीदारास प्रतिपक्षानें विचारलेले प्रश्न ०मनसुबी-स्त्री दिलेला न्याय किंवा निकाल फिरविणें, उलट इन्साफ पहा ०लढाई-स्त्री फेर हल्ला, पराजित झाल्यावर पुन्हा केलेली उठावणी पुनरुत्थान ( पराभवानंतरचें ) ०वारा-पु विरुद्ध दिशेकडून येणारा वारा ( क्रि० वाहणें, लागणें ) ०सनद-स्त्री जुन्या सनदेवरून कायम करून पुन्हा दिलेली सनद ०हुकूम-पु १ पुन्हा केलेला पहिलाच हुकूम २ विरुद्ध हुकूम, पहिला हुकूम रद्द करणारा दुसरा हुकूम, दुसरा हुकूम ०हुंडा-पु वधूपित्यानें वराकडून घ्यावयाचें द्रव्य, शुल्क ' माझा उलटहुंडा घेण्यासाठीं वडिलांनीं मला गुहाम विक्रयाची वाटविली '-सास २ ४१७ [ उलट हिं ]

**उलटकर**—वि उलटण्यासारखा, डळमळीत, अस्थिर, कच्चा आधार असलेला ( दगड, लाकूड इ ) [ उलट ]

**उलटणी**—स्त्री पुन्हा, परत क्रिया ( करणें ), फेरतपासणी, फेर मोजणी, फेर पाहणी, उजळणी ( करणें ) [ उलटणें ]

**उलटणें**—सक्रि १ पालथें करणें, उलथणें, उपडें करणें २ ( वस्त्राची ) आतील बाजू बाहेर करणें, वळविणें उरफाटें करणें ३ एखादी गोष्ट पुन्हा करणें, पुनरावृत्ति, उजळणी करणें, तपासणें (धान्य वगैरे पुन्हा मोजणें, लेखन तपासून पाहणें, ज्ञानाची अभ्यासाची उजळणी करणें ) ४ पार पाडणें, पुरें करणें, संपविणें (एखादें काम, भानगडीचा हिशोब वगैरे) ' हें सारें लिहिणें पडलें आहे, हें उलटावयास मला दोन महिने पाहिजेत ' ५ उलगडणें, सोडविणें स्पष्ट करणें, अर्थ सांगणें(एखादा प्रश्न कोडें, स्वप्न, भास वगैरेचा) —अक्रि १ उलडणें, पालथें होणें २ मागें फिरणें, विरुद्ध दिशेनें जाणें ३ पुन्हा उचल खाणें, पुन्हा सुरू होणें ( रोग, साथ वगैरे ) ४ सपणें निघून जाणें, मागें पडणें ( हंगाम काल वय वगैरे ) उ० तिशी, चाळिशी साठी उलटणें **उलटून गोष्टी सांगणें**—जावसाल करणें, उलट उत्तर करणें, उद्धटपणें बोलणें **उलटून बोलणें**—१ पुन्हा बोलणें, परत म्हणणें २ प्रत्युत्तर करणें, उमेट पणानें उत्तर देणें.

**उलटणें**—न ( वों ) खळ्यावर नुकत्याच मळलेल्या धान्याचें अदाजानें माप करण्याकरिता योजनात ती टोपली [ उलट ]

**उलटा**—वि विपरीत, विपर्यस्त, परिवर्तित, उपडा, पालथा, विरुद्ध दिशेचा, बाजूचा, वरची बाजू खालीं असलेला, आतील बाजू बाहेर आलेला, मागील बाजू पुढें असलेला, उलट पहा —क्रिवि विरुद्ध, परत ' म्या त्याला रुपया दिल्हा त्यानें माझा उपकार मानावा परतु तो उलटा मला मारायाला पाहतो ' -मोल —पु १ तोड, क्रिया, उत्तर ( एखाद्या कोड्याचें), एखाद्या श्लोकास परत समानार्थक किंवा विरुद्ध अर्थी प्रतिश्लोक, वचन, नक्कल, प्रतिमा २ प्रत्युत्तरादाखल किंवा परतफेडीदाखल दिलेलें उत्तर, वस्तु वगैरे सामासशब्द-उलटा अहेर, उलटा दगड, उलटा निकाल, उलटा हल्ला उलट पहा ३ विष वगैरेवरील उपाय उतारा अर्थ ४ पहा [ उलट ] ०खप्पा-पु ( मल्लविद्या ) आपल्या एका हातानें जोडीदारावर तो उभा किंवा बसलेला असताना त्याच्या खांद्यावरून आपला हात आणून आपल्या हाताच्या पोट रीनें जोडीदाराच्या गळ्याची घाटी दाबून ज्या हातानें जोडीदाराच्या गळ्याची घाटी दाबतो त्या आपल्या हाताचा पंजा आपल्या दुसऱ्या हाताच्या कोपराच्या खवणींत घालून व आपल्या दुसऱ्या हाताची पोटरी जोडीदाराच्या मानेवर ठेवून त्याला घुसमटून मारणें [उलट+फा खुफ्तन्=निजणें, खफाह्=(कुस्तींत) गळा दाबणें] ०गिरा-पु ( मल्लविद्या ) आपला एक हात जोडीदाराच्या बग लेंतून बरगडीवर ठेवून बरगडीवर ठेवलेल्या हाताच्याच बाजूचा आपला पाय जोडीदाराच्या पायाच्या ढाणशिरेवर दाबून ठेवावा व आपल्या दुसऱ्या हातानें जोडीदाराच्या दुसऱ्या पायाच्या गुड घ्याच्या खवणींत धरून पाय वर उचलावा म्हणजे जोडीदार चीत होतो [उलटा+हिं गिराना=पाडणें ] ०पट-पु ( मल्लविद्या ) जोडीदारानें आपल्यास उभ्यानें खालीं धरलें असल्यास आपल्या आतील हातानें आपल्या पुढील जोडीदाराच्या पायातून गुडघ्याच्या खवणींत वाहेरून हात घालून व आपला आतील पाय जोडीदाराच्या दुसऱ्या पायाच्या गुडघ्याच्या खवणींत बाहेरून घालून आपला गुडघा जोडीदाराच्या गुडघ्याच्या खवणींत टकून गुडघ्यानें त्याच्या पायाच्या खवणींत जोरानें धक्का देऊन व हातानें जोडीदाराचा पाय वर उचलून त्यास चीत करणें [ उलटा+स पत्, हिं पटकना=पाडणें ] ०पहारा-पु विपरीत काळ, फिरलेला काळ ' कलीयुगाचा उलटा पहारा जाहल्या या काळीं । ' —मापो १०० [उलट+स प्रहर म पहारा] ०पालट-स्त्री १ विपरीत रचना, उलथापालथ, उलटसुलट करणें, अव्यवस्था २ (ल) परस्पर प्रश्नोत्तरें, उत्तरप्रत्युत्तर [उलटा हिं] ३ दुनियेची उलटापालट=जगातील, समाजातील घडामोड, मोठा खडाडाप, धाम्स, (व्यापारात) रुपयांची, पैशाची उलाढाल, पैशाची मोड, चलनी अदलाबदल —क्रिवि अव्यवस्थित

रीतीनें. [तुल० सं. उपर्यस्त+पर्यस्त; प्रा उवलत्थ-इ+पल्लत्थ-इ] ०पालटा-सुलटा-वि वरची बाजू खालीं व खालची बाजू वर असा; आंतील बाजू बाहेर व बाहेरील बाजू आत असा; मागील बाजू पुढें व पुढील बाजू मागें असा, विरुद्ध मार्गाचा किंवा दिशेचा, अस्वाभाविक; उलट्या क्रमाचा, व्युत्क्रम, वेडावाकडा, विलोमअनुलोम. ०सुलटा उभा राहणें-क्रि विरुद्ध दिशेस तोंड करून उभें राहणें. ०सुलटा पहारा-पु. दोन पहारेकरी विरुद्ध दिशास तोंडें करून उभे राहून करीत असलेला पहारा

उलटी—स्त्री १ वांती; ओकारी; वमन. २ विरुद्ध गति, अन्यावर्तन, उरफाटा प्रकार, स्थिति (क्रि० देणें; घेणें; मारणें) ३ कोलांटी उडी, उलटी उडी. 'आनंदें कल्लोळा घाळा खेळती गरूडा। देती उलटिया चपळा एकी एकीहुनी ॥' –तुगा १३३. ४ (ल) करारभंग; वचनभंग; तत्त्वाविरुद्ध आचरण; विपरीत वर्तन (क्रि० मारणें, करणें). 'म्हणुनी फिरून नानांनीं उलटी मारली केली गस्त.' –ऐपो ३९५ [उलट] ०अंबारी-स्त्री भिकेची झोळी. (अंबारी उलटी केली असतां झोळीसारखी दिसते यावरून). उलट्या अंबारींत बसणें-भिकेस लागणें; दरिद्री होणें. 'घरचा सुखी होतों पण नशिबानें उलट्या अंबारींत बसविलें.' ०उडी-उलटी अर्थ ३ पहा. ०ढाळ-उलटढाळ पहा. ०दुनिया-स्त्री. सार्वत्रिक अव्यवस्था; अराजकता; गोंधळ, बेबंदशाही; न्यायाच्या विरुद्ध पद्धति. ०पूजा-स्त्री. अपमान, मानहानि; मानखंडना; उपहास. ०बाहुली-स्त्री अदूरदृष्टिदोष, लांबचें न पाहतां येणें, डोळ्यातील एक खोड ०बुकी-स्त्री. टोलाटोला; आघातास प्रत्याघात, दसनें फेडणें ०शिवी-स्त्री. अपशब्दास प्रति अपशब्द; शिवीस शिवी, उत्तरास प्रत्युत्तर, शब्दास शब्द; खरडपट्टीची, शिवी गाळीची परत फेड ०सुलटी, उलटीसुलटी हजामत-स्त्री. १ (शब्दशः) केंसाच्या विरुद्ध दिशेनें, खालून वर केलेली हजामत २ (ल) खरडपट्टी, ताशेरा, रागानें शिवीगाळ करणें, तासडपट्टी· भोसडपट्टी; अपशब्दांनीं संभावना. ०सूज-स्त्री. शरीराच्या खालच्या बाजूकडून वरच्या बाजूस वाढत जाणारी सूज, पायाकडून वर चढणारी सूज

उलटून—क्रिवि. १ परत, प्रत्युत्तरादाखल, विरुद्ध दिशेनें. २ अनादर करून, फाजीलपणें.

उलटें—वि. उलट पहा. ०दर्शन—न. १ परत आल्यावर घेतलेली भेट; परतभेट. २ श्रेष्ठ मनुष्यानें कनिष्ठ प्रतीच्या मनुष्याच्या घरीं जाऊन त्याची घेतलेली भेट. ०दान-न. परत भेट; परत अहेर, देणगी; आपणास भेट, नजर, बक्षीस, म्हणून मिळालेल्या वस्तूबद्दल परत दिलेली भेट, बक्षीस, देणगी. ०शहाणपण-शहाणपणाच्या उलट वागणारा सल्ला, मूर्खपणाचा सल्ला. (क्रि० काढणें).
उद्+स्ते.

उला.
(इंगाम, सा

उलटणी—स्त्री. १ (शब्दशः) कलाटणी; उलटी. २ (ल) टोमणा; टोला; खोंचदार उत्तर. 'ऐसीं देतां उलटणी। कृष्ण गोपाची स्ववणी ॥' –शिशु ६८१. [उलटणें]

उलंडणें—उक्रि. १ कलंडणें; लवंडणें; पालथें करणें, 'दिव्य रत्न गोफणिलें। अहा अमृतपात्र उलंडिलें॥' –दा १९. 'तों पितर भोंवें पाहती। याणें अन्याय केला म्हणती दुग्ध उलंडिलें क्षितीं। निष्क्रोध पुत्र देखोनी॥' –दै ११ २ उलटून पडणें; उन्मळून पडणें; उपटून येणें. 'जे तुटलिया मुळ पाशीं। उलंडेल कां शाखाशीं॥' –ज्ञा १५.५०. 'तैं देखें सहोदर। जैसे उलंडले तरुवर॥' –कथा २.१२.८४. ३ वरून येणें. ४ भरून वाहणें; तुडुंब भरणें. 'दुराशेनें हृदय उलंडी.'–दी २८४. ५ (लवंडणें या अर्थी) खालीं पडणें, निजणें. 'भूमीवरी उलंडली।' –रावि १८.६. 'मूर्छना येऊनि उलंडला।' –ज्ञ १२.२४. ६ त्याग करणें; सोडणें; टाकणें. 'मलें अवघेंचि तोडा। आधीं देवाला धुंडा। आशा ममता उलंडा। ज्ञानें काळाला दंडा॥' –रावि ४८०. ७ ओलांडणें पहा. [सं उत्+लुंठ्; प्रा. उल्लुंड, किंवा सं उत्+उड्. प्रा. उम्हुट]

उलंडा—वि. (नाविक) कलथा, कलंडा; एकदम उलथणारा (इं.) क्रॅंक.

उलंडी—स्त्री. (नाविक) होडी स्थिर राहावी म्हणून तिला दोन आडवीं व एक उभें (पाण्यांतलें) अशीं लाकडें लावतात तीं, होडीच्या एका अंगास ती उलटूं नये म्हणून बावखंडाच्या टोंकास जें पाण्यांत एक लाकूड बांधतात तें. (इं.) आऊटरिगर. उडगी पहा. [उलंडणें]

उलडू—उगव –दार.

उलढाल—उलाटाल पहा.

उलणें—अक्रि. १ (शब्दशः व ल.) उकलणें, दुभंगणें, फाकणें, उतटणें; भेगा पडणें, भेगाळणें; आंतील नेटानें फाटणें (जमीन, शरीर, फळ.इ०). 'वसतें उल्हास सत्वरां। उलोनि स्वानंदधारा।'–एभा १२.१५. 'तरि हृदयभरभरा घातलें तूं दृशा न उलतास।'–मोकर्ण ३.४६. 'पिता सांगे हितावबोध। म्हणे हा सन्निपातला वृद्ध। हृदय उलें ऐसा बोले शब्द। त्याच्या भारें दु पी धरा॥'–ह २७.१३२. २ (ल) उचंबळून येणें, पाझर फुटणें, सद्गदित होणें. 'श्रीकृष्ण मथुरेसी जाईल। प्रेमाचा सागर उचंबळेल। तें कथा ऐकतां हृदय उलेल। प्रेमळ सद्भाविकांचें।' –ह १७ २१६ [सं उत्+दल्=फाडणें, दे. उग्ग=भग्न, फुटलेलें]

उलथ—उलथी पहा

उलथ—वि. स्पष्ट; उलथा अर्थ ५ पहा. 'जाणती उलथ नव्हे परिपूर्ण।'–दावि १८६.

**उलथ**—पुस्त्री एखाद्या टेकडीची, गावाची दूरची बाजू, सीमा, टोंक, दूरचा, अखेरचा, शेवटचा भाग

**उलथणी**—स्त्री उलथ, कलाटणी, उलथी पहा

**उलथणें**—क्रि फाटणें, दुभंग होणें 'तो शोक सांगता उलथे धरणी।' –रावि २४ ४० [ स उद्+तल ]

**उलथणें**—न १ सराटा, कलथा, भाकरी वगैरे परतविण्यासाठीं, आटवण्याचें दूध ढवळण्यासाठीं, केलेला पितळ किंवा लोखंडाचा पसरट तोंडाचा दांडा, उलथा (व) उलथन २ (चांभारी धंदा) जोडयाचीं टोंपरें व्यवस्थित करण्यासाठीं उपयोगांत आणावयाचें लांकूड उलथा पहा [ स उत्+तल, प्रा उत्थत्र ]

**उलथणें**—सक्रि १ उलटें करणें, उताणें करणें, खालची बाजू वर करणें उलगणें 'आकाश पडावया गडाडी। पृथ्वी उलथावया हडबडी॥' –एभा १७ १४२ २ आतील बाजू बाहेर करणें, फिरविणें (अंगरखा, पागोटें इ०) ३ पुरी व्यवस्था लावणें, उरकणें, पुरें करणें, पार पाडणें, तडीस नेणें (एखादें भानगडीचें काम किंवा प्रश्न) ४ उलथेंपालथें करणें, चाळविणें, खालींवर करणें, हुडकणें (एखाद्या राशींतून वगैरे), धुंडाळणें ५ उत्पन्न होणें, प्रादुर्भूत होणें 'परमतृप्ती उलथल्या पोटीं। अमृतही न लागे ओंठीं।' –एभा १२ ५९१ ६ पुन्हा करणें, परत करणें 'तेंचि उलथोनि ज्ञान क्य।। उद्ध व सिं होय सांगता।' –एभा ११ २५५ ७ खालवर करणें (उखळांतील धान्य) –अक्रि १ उलटें होणें दुसरी बाजू वर येणें २ परतणें, पुन्हा येणें ३ (ल) आकस्मिक मृत्यु येणें, तडकर मरणें, मरून पडणें (सामा शिवी देताना वापरतात) 'एवढा बाप्या पण पटकीनें हा हा म्हणता उलथला' 'उलथत नाहीं मेला एकदाचा!' ४ उठणें, लोटणें 'घननीळ सावळा। परब्रह्माचा पुतळा। पाहावया माझा आला। उलथोनिया॥' –शिशु ५१५ [ स उद्+तट्, प्रा उत्थल, म उथळ वर्णव्यत्यास ] ॰जाणें–क्रि मरणें 'त्याचे म्हातारडे आईबाप तिकडे उलथून गेले' –नागना ११४

**उलथा**—वि उताणा, तोंड वर असलेला, पाठीवर पडलेला पालथा याच्या उलट –पु १ कलथा, सराटा, उलथणें पहा २ उलट विरुद्ध, (बाजूचा मनुष्य) प्रतिपक्षी ३ कांडतांना उखळीच्या तळाशीं राहिलेलें धान्य उखडून वर काढण्याची क्रिया ४ (ल) उलटा सम्कार 'निद्राकाळीं बुद्धीचा माथा। बैस जागृतीचा उलथा॥' –विउ २ ५२ ५ (ग्राम्य) उत्तर, जबाब, टोमणा (क्रि० देणें) ६ उलट व्यत्यास स्थिति प्रतिपक्ष, विरुद्ध गोष्ट, अर्थ वस्तु 'तूं म्हणसी जे स्वप्नावस्था। ते तर जागृतीचा उलथा। तरी जागृती तत्कार्यें व्यवस्था। कां न घडे।' –विउ ९ ३१ 'स्वप्न जागृतीचा पै उलथा। जागृतीमाजी इंद्रियें करिता जया ज्या अवस्था। तदनुसार नाना परी व्यवस्था। नव्हती स्वप्नामाजीं।' –स्वादि ५ २ ४४ [ स उत्+तट् ] ॰जमात–स्त्री १ (कों) एकाच शेताचा किंवा मळ्याचा थोडा दूर असलेला भाग, पुरवणी भाग, मुख्य शेतास राब, कवळ वगैरेचा पुरवठा करणारी पड जमीन किंवा सामान्य पडीत जमीन 'माझी उलथा जमीन येथून कोसभर आहे' २ (सामा) पडीत जमीन ॰पसा–पु उताणा हात, भिक्षा मागण्याकरितां पुढें पसरलेला हात ॰पालथ–था–स्त्री वि वर खालीं करणें, उलटापालट उलथापालथा पहा [ स उद्+तल्, प्रा उत्थल्ल+पत्थल्ल, हिं उथलपाथल ]

**उलथी**—स्त्री उलटी, कलाटणी, परिवर्तन, उलटण्याची क्रिया (क्रि खाणें, घेणें, देणें)

**उलपा-फा, उलपो**—पु (राजा क) शिधा 'भटजींना उलपा व दक्षणा दिली' [ अर उलूफा=रोजमुरा ]

**उलफुली**—स्त्री (गो) टाकळ्यासारखें एक झाड, याची भाजी करतात [ स उत्+पुष्प ]

**उलमत**—वि. उन्मत्त 'गाजळ कापी जळ सारसत, अगरस चरख उलमत कस्तुरीमृग कस्तुरी नाभिंत लागला पगला' –ऐपो २४३ 'साठ कोट उलमत्त डुलतात कुंजर' –ऐपो २४३ (टीप शितुत ३३१) [ स उद्+मत्त ]

**उलमा**—पु विद्वान [ अर उलमा, अलीम अव ]

**उलमी**—स्त्री (कों) एक प्रकारची होडी

**उलव**—स्त्री (कर्ना) चाहूल, हालचाल, जाग (माणसाची वगैरे) [ का उलुवु–उलिवु=आवाज ]

**उलवण**—न (विणकाम) कापड विणल्यानंतर फणींत राहिलेले धागे, दोरे [ स उद्+वल्ग ]

**उलवणें, उलैणें, उलोणें**—(गा) बोलणें [ स उद्+लप्, प्रा उल्ल=सांगणें किंवा म उल्लपन, प्रा उल्लवण=स्वर ]

**उलसमार**—स्त्री (गो) नवशानंतर येणारा आळस [ म लस्=काम करणें, किंवा म अलस=आळस ]

**उलसा, उलिसा, उलुसा**—वि थोडा किंचित्, इतला, इतलासा पहा 'उलसि साखर घालुन खावरें।' –मराधा २३ [ म अल्पीयस् ]

**उला**—पु (व) वेल वावल (चुलीचा) वेल पहा [ स चुल्ली=चुला ]

**उलागॉग**—वि १ प्रवासी उपऱ्या हातुगता राहणारा २ अनाहूत आगंतुक ३ मंत्राने उठविल्याशिवाय किंवा बोलाविल्याशिवाय अचानकपणें येणारें, प्रकट होणारें (भूत, पिशाच्च वगैरे) ४ बिन जरूरीचे, फाल्तू फाजील (सामान वगैरे) [ स उद्+लग् ]

**उलाघाल-ढाल**—स्त्री १ अस्वस्थता, चैन, ताप वगैरे होणारी) २ आनंद, चळवळ, खळबळ, धडपड (काळजाची

वगैरे ) ३ खळबळ, घालमेल, भ्रांति 'सातव्या-आठव्या शतकांतील मोठी उलाढाल म्हटली म्हणून बुद्धधर्माचा ऱ्हास ' -टि ४ ११५. या व इतर अर्थी उलाघाल, उलेढालें पहा [ म उद्+घात (घातु-हन्)]

**उलाघाली-ल्या, उलाढाल्या**—वि उलाघाल करणारा, चळवळ्या, गडबड्या, खटपट्या, नान्या उठाठेवी करणारा [ म उद्+घात-घातु-हन्)]

**उलाट**—पु १ उर्मी, वाती 'पोट उसळलें उलाट जाला।' -दा ३ ६ ३१ २ उडी 'दाटे थाट उलाट घेति गगनीं थोडी तयां थाट ते ' -आसे १७ [स उद्+लुठ, प्रा उल्ल]

**उलाटयंत्र**—न तोफ उल्हाटयन्त्र पहा 'भांडयादि बहुरा उलाटयंत्र ।' -दावि ३६३ [स उल्हाटयन्त्र]

**उलाड**—वि उलार, उलटण्यासारखी, मागच्या बाजूस अधिक वजन असलेली ( गाडी )[ उलटणें, स उद्+लुट्, प्रा उल्लालिअ=वर फेंकलेली ]

**उलांडणें**—उक्रि ओलांडणें, उल्लघणें, पलीकडे जाणें 'राम राम जप जपोनि दोष खाणिला। हा महाभवाब्धिची वा उलांडिला।' -आप ८ [ ओलांडणें ]

**उलांडी**—उलडी पहा ०बाजू-स्त्री उलांडीकडील होडीची बाजू

**उलार**—( ना ) उलाड पहा

**उलाळ**—पु मोठा आवाज, उल्हाळ 'खणण खणण खणखणिती ताल मणिती मस्त दस्त कीं हस्ती ताल उलाळ उफाळती नेमें पाळिती जाणिवेंत समस्ती ' -दावि ४१७ -वि उच, वर 'आता कोण्या नृपाळें धनु करकमळें ऊर्ध्वलीनें उलाळे ।' -सीता स्वयवर (अनृत) ७८ [ध्व, उद्+लल्]

**उलाळ**—न उडी 'रतिला पाचारौनी। उलाळें घालितु।' -शिशु १०७६ [स उद्+उद् प्रा उल्लाल=उच, वर फेंकणें]

**उलाळणें**—क्रि उच्च मारणें 'काळ चळाळ उलाळत आह जेर सकळ जन रे।' -दावि १०२ [स उद्+लुट् प्रा उल्लाल=वर फेंकणें हिं उलालना]

**उलिंग-गें**—न १ नियमित काम, नेमलेलें काम, सेवा, चाकरी 'वृत्ति आणौनि उलिंगें। बोळगवीति।' -ऋ ३४ २ वेठबिगार -वि नियमित, रवाविक [ का ओलिग=सेवा, चाकरी ]

**उलिंगवाडी**—स्त्री चोरी, लुटालूट वाटमारी 'करिति उलिंगवाडी तिय तपावनीं ' -भाए ४३४ [का उलिंग=चोर]

**उलिंगी**—पु चाकर, नोकर सेवक 'कीं आरोगिता परमा नदु। उलिंगिएं लाह्याति प्रसादु।' -ऋ ७८ [का ओलिग=सेवा, चाकरी ]

**उलु-लू-क**—पु घुबड, दिवाभीत [ सं ]

**उलूक**—पु घोड्याच्या पायास होणारा एक रोग

**उलूखल**—न उखळ 'उलूखलीं दाटुनि गव्हर। दस मुसळें चेंगिती।' [वैम उदूखल, तुल० का उलखर, उरत्=स्थिर+कल्=दगड ]

**उलेढालें**—न उलाढाल, मोठमोठे वेन, मोठया प्रमाणावर खटपट, धडपड, द्रव्यार्जनार्थ केलेले अनेक तऱ्हेचे प्रयत्न, उद्योग, भानगडी, घडामोडी, उपद्व्याप, ससारांतील दगदग [उलाढाल]

**उलेमा**—पु इस्लामी पंडित, धर्मवेत्ता, आचार्य [अर उल्मा, अलीम अव ]

**उला**—स्त्री ( गो ) हाक [ स वल्=बोलणें, किंवा स उद्+लप्, प्रा उल्ल ] ०भर-क्रिवि हाकेवर

**उल्का**—स्त्री १ एकाएकीं तुटणारा, तुटलेला तारा, अशनि, आकाशातून पडणारा तारा २ सुडी, पलिता, कोलीत 'वीरांसि आज्ञा दिधली म्हणे घ्या रे उल्का।' -कमुरा ३६ १० [सं ] ०पात पु १ उल्कांचा, ताऱ्यांचा वर्षाव, तारे निखळून पडणें २ ( ल ) अनर्थ, संकट (जाळपोळ, लुटालूट इ० ) [स ]

**उल्फा**—१ उलफा पहा 'सिधे उल्फे ' -मदरु १ ८१

**उल्फा भोजन**—न लग्नानतरचें जेवण 'लग्नानतर उल्फा भोजनाचें आमत्रण येतें ' -पेरापुविवि १९१ [अर उल्फत्=मैत्री]

**उल्व**—न गर्भावरील वेष्टण, गर्भाच्छादन 'नातरी उल्वाची खोळी। गर्भस्यासी '-ज्ञा ३ २६० [ म ]

**उल्बण, उल्वाण**—न १ वातपित्तादिकाचा अतिशय क्षोभ २ ( ल ) भयंकर संकट, आपत्ति, अनर्थ (दुष्काळ, रोग, लुटालूट, परचक्र वगैरे ) 'काळगोमाचिये दृष्टी, उल्वणें अनावृष्टी। तेणें अत्युल्बणें आटे सृष्टी। पृथ्वीच्या पोटीं कांहीं नुरे।' -एभा ३ १९८ ३ सार्वत्रिक पीडा, त्रास, दुःख, आकांत [स उल्बण]

**उल्बण(सयुतहस्त)**—पु (नृत्य) हात उपपन्नक करून त्याच्या अग्रभागास तर्जनीपासून बाहेरून भ्राम विळवा घालणें व मग ते हात एकमेकांत गुतवून तसेच गुतलेले हात डोक्यावर नेणें [ म ]

**उल्मुक**—न कोलीत, पलिता, मशाल पेटलेली चूड, लाकूड, गोवरी इ० [स ]

**उल्लघ उल्लंघन**—न १ अतिक्रम, ओलांडणें, पार जाणें, पलीकडे जाणें २ नियमभंग मर्यादातिक्रम आज्ञाभंग [स उद्+लघ्]

**उल्लघणें**—उक्रि १ ओलांडणें, पलीकडे जाणें पार होणें २ मर्यादा सोडणें अतिक्रमण करणें ( मर्यादा, रीत इ० ) 'उल्लघेली लाज। तेणें गाधियेलें काज॥ -तुगा १९८८ [म उद्+लघ्]

**उल्लंघित**—वि १ ओलांडलेलें, पलीकडे गेलेलें, अतिक्रांत २ मर्यादा सोडलेला, आज्ञाभंग केलेला, नियम मोडलेला

**उल्लसणें**—क्रि १ विलसणें, प्रकाशित होणें, तेनयुक्त होणें, प्रगट होणें 'समुद्र का वायुवेशे। तरंगाकार उल्हसे।' –ज्ञा १५ ३४४ २ आनंदित होणें, प्रसन्न होणें, संतुष्ट होणें [सं उद्+लस्=प्रकाशणें, खेळणें]

**उल्लसित**—वि १ प्रफुल्लित, आनंदित, संतुष्ट, हर्षयुक्त २ सुशोभित, सतेज, प्रकाशित [सं उद्+लस्]

**उल्लाट**—वि उग्र –शूर [सं उद्+लट्]

**उल्लास**—पु (विशे) उल्हास १ उत्साह, आनंद प्रसन्नता, संतोष, सुखभाव 'भाग्य तेथ विलासु। सुख तेथें उल्लासु॥' –ज्ञा १८ १६३७ २ हौस, आनंद वाटणें, आवड असणें, गोडी लागणें 'आर्याँच शब्दाचा उल्हास। त्यात पातला फाल्गुनमास॥' [सं उद्+लस्]

**उल्लासणें**—अक्रि आनंदित होणें, संतोषणें, उल्लासयुक्त होणें 'जाला नीरश्यराभिराम निर्वटीं हर्षीद्र उल्लासला॥' –गजेंद्र मोक्ष (रघुनाथपंडित) ४९ [सं उद्+लस्]

**उल्लासी, उल्हासी**—वि आनंदी, उत्साही, प्रसन्न

**उल्लाळ–ळा, उल्हाळा**—पु १ उडी उल्लाळ पहा 'आदाळ जटिलें उल्लाळें घालितु।' घनुवाडेया पुढा॥' –शिशु ९५२ 'उल्लाळ देत करणे परी। वैकुंठ वैसाराहूनि वरी॥' –एरुस्व १७ २६ 'लवणाची मासोळी। जीवनीं घेत्ये उल्लाळा॥' २ उसळी, ऊर्मी, उमाळा 'जेथ विषयोर्मीच्या आकळिया। उल्लाळे घेती॥' –ज्ञा ७ ७५ 'एवं इंद्रियवृत्तिउल्लाळे। मोडिले गुरुवाक्य प्रतीतिबळें। निजाधिष्ठानमेळें। कळसले एकेवेळे अगाध कुंपे॥' –एभा २ ५१८ 'कर्कश शब्दाचे उल्लाळ। नादें नभ दणदणी॥' –वेमीस्व १४ ११९ ३ आनंद, उत्साह 'वत्सें आणि गोवळे। जाती परम उल्लाळें॥' –ह १० २६५ [सं उल्लोल=लाट, प्रा उल्लाल=वर फेंकणें]

**उल्लाळणें, उल्हाळणें**—अक्रि १ उड्या मारणें, उड्या मारून वर, बाहेर येणें (पाण्यांतून मासा इ०) २ नाचणें, बागडणें, आनंदित होणें 'ती माहेरीं जायला मोठी उल्हाळली' –अक्रि वर उचलले जाणें, उलटणें (मागच्या बाजूस अधिक ओझें झाल्यामुळें गाडी वगैरे) उल्लाळ जाणें–असाहि प्रयोग होता [उल्लाळ]

**उल्लाळणें**—उक्रि माखणें, लेप करणें, लावणें, 'चंदनें श्रीअंग उल्लाळिलें। वरि उष्णोदकें प्रक्षाळिलें॥' –रूक्म ५३९ [सं उद्+लालय्, प्रा उल्लाल=पीडणें, ताडणें]

**उल्लिंग**—वि नग्न [सं उद्+लिंग]

**उल्लू**—न घुबड –वि १ (ल) मूर्ख, अविचारी, मद्द गसाव, दोणा २ धुंद, गुर्मीत असलेला, कैफात असलेला ३ उतावीळ, हावरा 'उल्लू मार केंगा!'[सं उलूक=घुबड, हिं उल्लू] ०पणा–पु अविचार 'हा आपला केवळ उल्लूपणा' –चंद्रगुप्त १६९ ०बनणें–अविचारी, वेडा होणें ०मशालजी–वि उतावीळ, मूर्ख, अविचारी (मनुष्य) 'परिपदेस जाण्याकरता इचापलेल्या उल्लूमशालजींना नाचवून भागवयाचें नाहीं' –के १९ ७ ३० म्ह० उल्लूकाभाई मशालजी=घुबडाला उजेड सहन होत नाहीं तेव्हा त्याच्याशीं स्नेह अशक्य

**उल्लेख**—पु १ उच्चार, निर्देश, दिग्दर्शन, प्रस्ताव २ (लेखामध्यें) समावेश, निर्देश करणें, लिहून व्यक्त करणें [सं उद्+लिख्]

**उल्लोकित (दर्शन)**—वि (नृत्य) नृत्यामध्यें उंचावरचें पाहणें [सं उद्+लोक]

**उल्लोच**—पु चादवा, छत, पाल, मंडप [सं]

**उल्हा, उल्हाणें**—पु न (व) वेल, भवेल, वेल पहा 'उल्हा ण्यावर भाजी शिजते' [दे उल्ली=चुला]

**उल्हाट–टी**—पु स्त्री (व) उलटी, ओकारी, वांती 'भयाशीं त्याला एक उल्हाट झाला त्यात अन्नच पडलें' [सं उत्+लट्, म उलटी]

**उल्हाटयंत्र**—न तोफ, गरनाळ 'उल्हाटयंत्राचेनि मेळें। पट्चक्रपाळें भेदिलें॥' –एभा ९ १२३ 'लघु उल्हाटयंत्रें आधीं। घेऊन पुढें धावती सादी॥' –ह २२ ३३ [सं]

**उल्हाटशक्ति**—स्त्री कुंडलिनी 'तेथ उल्हाट शक्तीचेनि उभिवडें' –ज्ञा ६ २१४ [सं]

**उल्हास, उल्हासणें, उल्हासी**—उल्लास, उल्लासणें, उल्लासी पहा 'आलिंगनास ते पाणी। उल्हासती प माझे॥' –मुसभा ८ ९८ [सं] म्ह० आर्यांच उल्हास त्यात फाल्गुनमास

**उल्हाळ**—उल्लाळ पहा १ वर उडी 'मज जीवनीं मासोळी उल्हाळ घेती प्रीती करून॥' –सला ३ २ उमाळा 'त्या मुलाला पाहताच प्रेमाचा उल्हाळा आला'

**उल्हाळें**—(विणकाम) हातमागाची ओवी एके जागीं बसविण्याची खुंटी, चिटी

**उवगा**—पु वायू, वेड

**उवर्णे**—अक्रि उद्भवणें 'ऐसें बोलें सनातिलीं। तर्कें बैठी ठेली। जैसी शृंगाराची दाटि उवली। मदनमंत्रें॥' –शिशु १८६

**उवला**—वि उबा असलेला [सं युका, दे ऊका]

**उंवला**—पु (राजा) दरभर, पाकट वगैरेचा सामाणा [सं उद्+वट्]

**उवस**—(गो) दमा, उबस पहा

**उवळ, उंवळ, उंवीळ**—वि पुरता पीळ नसलेलें, पीळ उडालेलें, सुटलेलें (दोरा, सूत इ०) [सं उद्+वल्]

**उवळणें, उंवळणें**—क्रि पीळ सुटणें, उलगडणें, पीळ सैल होणें (दोरीचा वगैरे) [सं उद्+वल्]

**उवळणें**—क्रि उफणें, उवळणें पहा १ उष्णतेनें निकाव याच्या आधीं बुळबुळाया लागणें (फळ वगैरे) २ पुरतें शिवा

घोणस चावल्यामुळे शरीराच्या छिद्रांतून रक्त वहावयास लागणे ३ अर्धवट वडवलेला बैल पुन्हा वीर्ययुक्त होणे ४ उपटणे, दूर नेणे, पासर फुटणे (हृदयास) [उवळणे]

**उवळा**—वि १ उष्णतेमुळे जून होण्याच्या पूर्वीच पिकलेले (फळ), मिळमिळीत, निवळिचित, विचविलित २ निस्तेज, दुबळा निरुत्साही, मंद (भाषण, चेहरा) [उवळणे]

**उवळा, उंवळा**—वि (राजा) पुरेसा पीळ नसलेला (दोर वगैरे) [स उद्+वल्]

**उवाइणे, उवायिणे**—क्रि १ प्रसन्न होणे, मतोपित होणे, आनंद पावणे 'दसे कूर्मे नियापरी। उवाइला अवयर पसरी।' —ज्ञा ? ३५२ 'त काई पां चित्त उवाइलें। इय चोली तुंचे।' —ज्ञा ५ १६० २ शांत होणे 'क्षोभलपणें मातें। उवाइला टायीं गाजे।' —ज्ञा ६ २१५ ३ स्पष्ट करणे, विस्तारानें सांगणे 'जो सांख्यशास्त्री आह। उवाइला।' —ज्ञा १८ ५१९ 'तोंचि सामर्थीनें उवाइला।' —स्वावा १ ७६७ [स उप+दिश्, प्रा. उवइस] ४ स्थापन करणे, उभारणे 'मी कृष्णु याचि कारणे। अठरावा अध्यायो म्हणें। उवाइला बादरायणें। गीताप्रासादा।' —ज्ञा १८.३३ [स उप+इ=नाणे उपाहित—उवाइअ+ल=उवाइल —भाज १८३५]

**उवाइला-यिला**—पु अभिप्राय 'एसा श्रीगुरुचा उवायिला। निवृत्तिदासासी पातला।' —ज्ञा ५ १४१ —वि प्रशस्त, मोठा, विस्तीर्ण 'वरि आपुलिया स्मरणाची उवाइली। हींव देसीं करा साउली।' —ज्ञा ८ १३३ [स उप+इ]

**उवाय**—पु १ सुख, आनंद उवाव पहा 'जो बहुव विषयवि लासें सुखे। ता म्हणती उवायें पडिला सापें। —ज्ञा ९ ५०९ 'होऊनि यातें उवाया। केल्याचिया।' —ज्ञा १६ २७० २ उत्कर्ष, भर 'विकास वयसेचनि उवायें। सत्ताचेनि सावायें।' —ज्ञा १३ ७७१ 'आगाचिया आटणिया। काल उवाया आणिला निया। स्वसकाले प्रिया। रूढविला जैसें।' —ममृ १ ३२

**उवार**—पु (गो) पूर और (नदीचा वगैरे) 'पावसाचो उवार आयला—पावसाचा पूर आला' [स आ+पूर]

**उवारीस येणे, उवान्यास येण**—क्रि अधिक होणे, उरणे, वाऱ्यास रहाणे, पुरून उरणे वारीस यणे पहा [उरणे+येणे]

**उवाव**—पु १ आनंद, उत्साह 'फडिता धवनाचा ठावो। तू जाणे ऐसा भावो। धरू वोलण उवावो। तुवाचि आर्गी।' —ज्ञा १७१० २ उत्कर्ष प्रभार, भर, उसळी 'जे निरोधिलें च उवावो। जया सयमुचि हाय सावावो।' —ज्ञा ६ ४१६ ३ विस्तार, सामर्थ्य 'एवडा माया उवावो। करिता काण प्रस्तावा।' —ज्ञा १८ ६०० 'आणि सुखाचे घणे दणे। निजे उवाया ये यणे।' —ज्ञा १७ १३६ [स उप+इ किंवा या]

**उवाव**—पु अवकाश, वाव 'तेंव साउमा येयाग उवावो। तव याडवला आन प्रस्तावो।' —ज्ञा १६ ६२ [उ+वाव]

**उंवाळूळॅलॉ**—वि (गा) १ ओंवाळलेला २ (ल) वाईट स्वभावाचा, कोणास नको असा [ओंवाळणे]

**उवॅळ**—उवळ पहा

**उवेड-ढ**—वि १ उलगडा करणारा २ वेटा उठविणारा [स उद्+वेष्ट्, म वढणे]

**उवेडा-ढा**—पु १ वेटा उठविणे 'जे अमरावतीय आला धावा। तैं त्या एकलेनि कला उवडा।' —ज्ञा ११ ३८७ 'न कळिता रे उवेडा। केवी जाऊं पाहसी पुढां।' —एरुम्व ८ ७८. २ (ल) उलगडा, मोकळीक [स उद्+वेष्ट्, म वडा]

**उवेर-री**—स्त्री अवशिष्ट भाग, अवशेष, उर, राहिलेला भाग [स उत्+वृ—पूर, प्रा उव्वर, उव्वरित]

**उवेरा-रा**—वि उंचा असलेला (माणूस, डोकें) [स यृद्धा, प्रा ऊआ]

**उशना**—पु शुक्राचार्य दैत्यगुरु 'कवि आतु धैर्या ठाओ। उशनाकवि तो मी।' —राज्ञा १० ०७१, —एभा ११११६ [स]

**उशागति उशेगत**—स्त्री १ अंथरुणाची किंवा पलंगाची डोक्याकडची बाजू २ शेताची, मैदानाची वरची बाजू [म उद्+शीर्ष, प्रा उस्सीस+गान, गत]

**उःशाप, उदशाप, उशाप, उच्छाप**—पु शापनिवृत्ति शाप मोचन, शापाची तीव्रता कमी करणारे वचन, वर. [स उत्+शप]

**उशाळ**—पु (कर्ना) उसाच्या मळ्यातील आठ इसमावरील मुख्य [म इक्षु म ऊस]

**उशिटणे**—अक्रि उष्टे करणे, होणे 'एसें उपायी उशिटलें। काय वर्णू।' —ज्ञा १८ २२ [स उच्छिष्ट]

**उशि(सि)टा**—वि उष्टा, उच्छिष्ट 'जें काळाचा खिच उशिरा। जें आशेचा आगवठा। जन्ममरणाचा वोलिवठा। स्वभावें जें॥' —ज्ञा ८ १४४ 'तरी न०हचि उसिटी। दिठी जयाची।' —अमृ २ १५ [स उच्छिष्ट]

**उशिणी**—स्त्री उसनवारी करणे दे 'परि अनारिसें पद्मपु राणीं। कीं दहा अवताराची उणिणी। त भाप फेडाया लागुनि। कले पणें॥ —कथा ७ ५ १२८ [उसनें अप]

**उशिरा**—क्रिवि विलंबानें, दिरंगाईनें, अतिकाळीं [उशीर]

**उशिशी**—स्त्री उशी पहा 'करानी अधिधाराची उशिशी। धरपजरीं निजविली जैसीं। नेतवन दाव्यारूपें तैसीं। वन्भेंवीण॥' —ज्ञाप्र ७७२ [स उद्+शीर्ष]

**उशी, उशा**—स्त्री डोक्याखाली घ्यावयाची लहान गादी, गिरदी उसें [म उत्+शीर्ष प्रा उस्सीस] ०उशापायर्ती असणे, उभा राहणे, बसणे, लागणे—१ नेहमीं जवळ असणें,

सचिव असणें (पुढील गोष्टीसाठीं) २ (ल) सरक्षण करणें, मदत करणें, साहाय्य करणें, सेवा करणें ३ (ल) त्रास देणें, उप द्रव देणें, मार्गात येणें, आड यणें ०उशापायर्ती रडणें–एक सारखी तक्रार करणें, सतत कटकट करणें, किरकिर लावणें, त्रास देणें

**उशी**—स्त्री उसळी, उडी, चेंडू आपटला असता वर येतो ती क्रिया 'लागानि अधोदेशीं ते घेतलिया सुमनितेषु उशी।' –मोभीष्म ११ १४१. [म उत्+सृ–शी]

**उशी**—स्त्री (गो) ऊस [स इक्षु]

**उशीकांडो, उशकांडो**—न (गो) उसाचें कांडें

**उशीर**—पु १ अतिकाल, बराच वेळ २ विलंब, दिरगाई, गोळंबा, वेळ लागणें 'भोजनासी उशीर जाले तुम्हा।' –सप्र १४५ ३ अवकाश, अवधि 'अरे, अजून भोजनास किती उशीर आहे?' [स उत्+चिर] ०धरणें–क्रि थांबणें, वाट पाहणें **उशीरावर येणें–धरणें**–क्रि दिरगाई करणें, विलंब करणें, वाट पहावयास लावणें, ताटकळत ठेवणें

**उशीर**—पु एक जातीचें सुगंधी गवत (वाळा, इ०) [स ]

**उशील, उशेल**—न (राजा गा) उसाचें शेत, उसाची लागवड [स इक्षु गो उशी, म ऊस]

**उश्टर**—पु (प्र) उष्टर पहा

**उश्रम-मा**—पु १ उमासा, जोराचा श्वास, दम (क्रि० घेणें, टाकणें) २ विसावा, विश्रांति (क्रि० घेणें) [स उत्+श्रम्]

**उश्रमा**—१ पृच्छा, प्रत्युत्तर 'त्यावर बावानीं (महादजी शिंदे यांनीं) उश्रमा केली कीं' –मरित ३ ४५ २ याचना, मागणी 'उश्रमा न करी कवणापुढें' –दावि ४५६ [स उत्+स्मृ]

**उश्रमा**—पु (व) राग, दमवा, गाऱ्हाणें 'तुम्हीं त्याला आले नाहीं याबद्दल त्यांचा तुमच्यावर उश्रमा आहे'

**उश्रामा**—पु केलेल्या उपकाराची स्मृति, आदरण [स उत्+स्मृ]

**उश्राप**—पु उ शाप पहा 'उश्राप वार्टी पुन्हा आले। पूर्व देहीं' –दा ९ ८ ९ 'मागुता उश्राप दिधला' –वेगीस्व ३ ३०

**उश्वास**—पु नाकावाटे बाहेर टाकलेला श्वास, जोराचा श्वास, उसासा 'उश्वास टाकिति दृष्टतीं। मरती श्रम॥' –कथा १ ८ ७३ 'भोगिता नाहीं बायेस उणा। श्वासोनि उश्वास टाकीत।' [स उत्+श्वस्]

**उष काल**—पु पहाट, प्रभात, सूर्योदयापूर्वीच्या दोन घटका 'पदमपत्र उष कालीं ही सोबत जिया आलें।' –दाला १७ [स उषस्+काल]

**उष पान**—न उष कालीं करावयाचें उदकपान, रात्रीं निज ताना उशाशीं झाकून ठेवलेलें पाणी पहाटेस पिणें, असें पाणी पहाटे पिणें हितावह समजतात यापासुन मलशुद्धि होते हे पाणी प्यालयावर एक झोप घ्यावयाची असते [स उषस्+पान]

**उषा**—स्त्री १ सधिप्रकाश २ उष काल, प्रभात, पहाट 'उघडि नगन रम्य उषा, हसत हसत आली।' –रेंदाळकर [स ]

**उषा**—उशी अने० पहा 'साशा वेन्यावाणी पाटि लागते आणखी उषा उशोशा।' –सला ८५

**उष्णें**—क्रि अलग करणें, सोडविणें, उचकणें, उचलणें, उप टणें, बाहेर काढणें [स उत्+स्पृश]

**उष्टर**—पु उंट 'उष्टरें हशीन उचलिती' –दा १ १० ०८ [स उष्ट्र फा शुतुर किंवा उश्तुर] ०खाना–पु उंटाची पागा, शाला, उष्टखाना किंवा कारखाना, अठरा कारखान्यांपैकीं एक 'मागें उतरला उष्टरखाना' –पया ०१७ –इतिहास ऐतिहासिक ०० ०४

**उष्टवळ-ळ**—स्त्री उष्टावळ पहा

**उष्टवण, उष्टावण**—न १ लहान मुलास प्रथम अन्नप्राशन करावयाचा विधि, संस्कार (मामाकडून सोन्याच्या अंगठीनें खीर मुलाच्या तोंडास लावून हा संस्कार करितात) (गो) उष्टवणी २ उष्टें खाणें 'श्रीकृष्ण करिताहे विनती। अवघ्या शाळे परमप्रीती। उष्टा वगळावीं श्रीपती। ठायीं ठेविती निजमुद्रा।' –ह्स्व १५ ५ [स उच्छिष्ट+कृ]

**उष्टपाणी**—न उष्टें केलेलें पाणी, ज्यामध्ये उष्टी–खरकटीं भांडीं वगैरे धुतात असें पाणी, शिळें, वापरलेलें पाणी, खरकट, आसट वगैरे [स उच्छिष्ट+पानीय=पाणी]

**उष्टा**—वि १ टाकलेला, सोडलेला, त्यक्त (अन्न, भक्ष्य, इ०) २ खालेल्या अन्नातील अवशिष्ट राहिलेला भाग, पानात राहिलेले (अन्न वगैरे) 'ही उष्टी भाकरी भिकाऱ्याला दे' ३ जेवण झाल्यावर हात, तोंड धुतल्याशिवाय असलेला, खर करटा हाताचा, तोंडाचा ३ (ल) अशुद्ध विटाळ झालेला 'मी उष्टा आहे आंघोळ आटपल्यावर हीं मातीं पाहीन' ४ (ल) वापर लेलें, उपयोग केलेलें उपभुक्त (वस्त्र वस्तु इ०) 'तें धोतर त्यानें उष्टें करून आहे तू तें नाऊ नकोस' ५ दुसऱ्यानें पूर्वी उपयोग केलेलें, वापर केलें लिहिलेलें बोललेलें (भाषण वचन वगैरे) उगीं-उष्टें भाषण उष्टा माल [स उच्छिष्ट] ०होणें–क्रि पाईपाईनें थोडेसे खाणें पाणी भर न जेवणें स्त्र० उष्टया हातानें कावळा हाकीत–मरीत नाहीं=कद्रू मनुष्याबद्दल वापरतात ०उपास–पु देवळांत अथवा आप्तापुढें थोडेसे खाऊन उठणें, उपास मात्र पोटभर जेवल्याने मिळे ना, तो न मिळे पत्रावळ धरणें ०नवरी–पु विज 'वर' इक दिवस सुर्गाला स्थळ पाहून पाहून जेवणीं उष्टा नवरा

पथकरावा लागला ' ०पाणी-माणी-वि गाईच्या अमार्तील राहि लेला अवशिष्ट भाग, पानात टाकलेलें (अन्न वगैरे) उष्टे पडा [उष्ट द्वि] ०विटाळ-पु उष्टया अन्नाचा किंवा उष्ट्या मनुष्याचा विटाळ, उष्टपामुळें आलेली अशुद्धता, अपवित्रता 'उष्टया विटाळीं मन। किंवा हा पाण्याच्या हंड्याला शिवू नको '

**उष्टावणें, उष्टाविणें** —उक्रि १ उष्टें करणें, चाखून पाहणें, उष्टावण करणें २ विटाळणें

**उष्टावळ**—स्त्री पंगत जेवून उठल्यावर जें उष्टें राहतें तें, उष्टें अन्न, उष्टेंखरकटें 'जेविल ते रात मागें उष्टावळी। अवघ्या पत्रा वळी करीन झाडा ॥' –तुगा २०३० 'हा प्रभाकर म्हणून बुद्धि राजपताच्या घरच्या उष्टावळीवर वाढलेला तुम्हा सर्वांचा एक नमाचा गुलाम आहे ' –भा ८० [स उच्छिष्ट+आवलि=पंगत]

**उष्टी**—वि उष्टा पहा ०कल्पना–स्त्री नवीन नसणारी, पूर्वी कोणी काढलेली कल्पना उष्टा विचार उष्टा अर्थ ५ पहा ०पत्रावळ–स्त्री (ल) अनेकांनी उपभोगिलेली स्त्री, व्यभिचारी स्त्री, वेश्या ०स्त्री–स्त्री उपभोगिलेली स्त्री, कौमार्य नष्ट झालेली स्त्री, क्षतयोनि स्त्री ०हळद–स्त्री लग्नात वधूच्या अंगास लाविल्यानंतर राहिलेली हळद ही नंतर वराच्या अंगास लावावयास नेतात

**उष्टें**—न १ जेवून राहिलेलें अवशिष्ट अन्न, पानात, पात्रात उरलेलें अन्न खरकटें. २ ज्यात भोजन केलें आहे असें पात्र सावडीन मी उष्टीं ' –मोसभा २ ११ म्ह० तुपाच्या आशेनें उष्टें खाणें=कांहीं लाभ होईल या आशेनें वाईट काम करणें ०खरकटें–न उष्टें उष्टीं पानें, उष्टावळ ०खरकटें करणें–क्रि जेवणानंतर उष्टीं भांडीं, पानें जमीन इ० स्वच्छ करण्याचें काम करणें ०खळी–स्त्री उष्टें-खरकटें, उष्टया पत्रावळी टाकण्याची जागा, उकिरडा, कचरा टाकण्याची जागा

**उष्टेवारी**—पु (गो) उकिरडा, उष्टेखळी, केरकचरा टाकण्याची जागा [स उच्छिष्ट+?]

**उष्ट्र**—पु उंट 'वऱ्हाड सिद्ध जाहलें फार। लागले वाद्याचे गजर। उष्ट्रें घोडे रहंवर। चालिले फार तेधवां ॥' –सवि ११५८ [स उष्ट्र फा शुतुर किंवा उश्तुर] ०सेना–स्त्री सांडणीस्वार उंटावरील सैन्य ०लगुडन्याय–उंटाला मारावयाची काठी, तो स्वतःच आपल्या पाठीवर वाहून नेत असतो, यावरून ज्याचें त्याच्याच हातून शासन करविणें

**उष्ट्रासन**—न (योग) जमिनीवर उपडें निजून दोन्ही पाय ढोपरात मोडून माडीला माडी लावून खोटा कुल्याला लागतील असें करणें व दोन्ही हाताच्या चिमटीनें दोन्हा पायाचे आंगठे धरणें व खांदे जमिनीला लावून मान उचलवेल तितकी वर उचलणें –सयाग २४८ [स उष्ट्र+आसन]

**उष्ट्री**—वि उंटाचा, उंटासंबंधी (गति इ०) 'तो निघाला अश्वत्थाच्या हारीं। दासविती स्त्री नेणारी। उष्ट्री म्हणूनी हरी मयूरी। पाचारी नीरीं वारिन ॥' –ज्ञ ४०० [स उष्ट्र]

**उष्ण**—वि १ ऊन, गरम, दाहयुक्त २ ऊन, थंड न झालेलें, न निवलेला (अन्न वगैरे पदार्थ) ३ (ल) रागीट आवेशयुक्त, तडफदार स्वभावाचा, प्रखर. ४ शरीरात उष्णता उत्पन्न करणारा (गुळ, मिरीं इ० पदार्थ) ५ तिखट, जहाल दाहक (पदार्थ) –न १ ऊन, गरम हवा, ताप २ उष्ण विकृति, शरीरातील उष्णता, दाह, गर्मी, याविरुद्ध शीत [स उष्=जाळणें] ०कटिबंध–पु पृथ्वीच्या दोन्ही अयनवृत्तांमधील भाग, भूमध्यरेषेपासून दक्षिणोत्तर २३॥ अंशापर्यंतचा प्रदेश 'उष्णकटिबंधावर सूर्याचे किरण लंबरूपानें पडतात ' –मराठी ६ वें पुस्तक (१८७५) २९७ ०काल–पु उन्हाळा ०दंशी–वि उष्णता दाखविणारा (इ) थर्मोस्कोप [स उष्ण+दृश्] ०मान–न उष्णतेची तीव्रता प्रमाण, माप (इ) टेंपरेचर ०मापक–न उष्णतेची तीव्रता मोजण्याचें (उष्णतामापक) यंत्र (इ) थर्मामीटर. ०वात, वायु–पु १ उष्णतेनें पाणी गुदरणें २ अजन, कापट देका येणें ०वास–पु पंचाग्निसाधन 'उष्णवास जळवास। शीतवास अरण्यवास ॥' –दा ४११२ [स उष्ण+वस्] ०वीर्य–वि शरीरात उष्णता उत्पन्न करणारें उष्ण परिणामकारक (औषध) [स उष्ण+वीर्य]

**उष्णता, उष्णत्व**—स्त्रीन १ उष्णता, गरमपणा, उष्णपण उष्ण पहा 'उष्ण प्रकाश तो सूर्याचा। शीत प्रकाश तो चंद्राचा। उष्णत्व नस्तां द्यावाचा। घात होये ॥' –दा १६२१० २ उष्ण विकृति (शरीराची) [स उष्=जळणें] ०गतिशास्त्र–न उष्णता आणि यंत्रसिद्ध काम यासंबंधीं सबंध दाखविणारें शास्त्र (इ) थर्मोडाय नॅमिक्स ०जन्यविद्युत्–स्त्री उष्णतेपासून उत्पन्न होणारी वीज, (इ) थर्मो इलेक्ट्रिसिटी –तेचें यांत्रिक सममूल्य–न एक भाग उष्णता उत्पन्न करावयास करावें लागणारें काम किंवा श्रम, (इ) मेकॅनिकल इक्विव्हॅलंट ऑफ हीट ०द्रव–पु द्रवरूप उष्णता, (इ) कॅलॉरिक फ्लुइड ०धारणशक्ति–स्त्री उष्णता टिकून राह ण्याची शक्ति ०परिमाण–न उष्णतेचें माप, (इ) क्वांटिटी ऑफ हीट ०मान, उष्णमान–न उष्णतेची तीव्रता, (इ) टेंपरेचर ०मापक–न पदार्थातील उष्णता मोजण्याचें यंत्र, (इ) कॅलरी मीटर ०मापन–न पदार्थातील उष्णता मोजण्याची क्रिया, (इ) कॅलरीमिट्री ०यंत्र–न उष्णतेनें चालणारें इंजिन, (इ) हीट इंजिन ०वहन–न एका परमाणूची उष्णता त्याच्या अतिनिकट परमाणूस मिळण्याची क्रिया, (इ) कंडक्शन ०विसर्जन–न उष्ण पदार्थांतून उष्णता बाहेर पडून जाण्याची क्रिया, (इ) रेडिएशन ०विस्तृति–स्त्री उष्णता सर्वत्र पसरण्याची क्रिया, (इ) डिफ्यूजन ऑफ हीट उष्णतोत्पादक–वि उष्णता उत्पन्न करणारा, (इ) एक्सोथर्मिक

उष्णा, उष्णेवाण—वि उसना, उसनेवाण पहा [उष्णा अप]

उष्णावणें—अकि तापणें, गरम होणें 'ऐसेंचि चोल्या उष्णा वले' –दावि ४०८ [स उष्ण]

उष्णांशु—पु ज्याचे किरण उष्ण आहेत असा, सूर्य [स उष्ण+अंशु=किरण]

उष्णीष—न पागोटें, शिरोवेष्टण, रुमाल, मंदील [स]

उष्णेवाण—न उसनें वाण पहा

उष्णोदक—न तापलेलें पाणी, ऊन पाणी, गरम पाणी [स. उष्ण+उदक]

उष्मज—वि उष्म्यापासुन उत्पन्न झालेला (जनु, प्राणिवर्ग)

उष्मा—पु १ उष्ण, उष्णता 'का कस्तुरीसगट परिमळ। उष्मेसगट अनळ॥' –मनु १ ४२ २ उकाडा, दाह, गरमी [स उष्=जाळणें]

उस—उद्ग हाय! दु खोद्गार, एकाएकी दु ख झाल्यामुळें किंवा कळ वगैरे निघाल्यामुळें निघणारा उद्गार (क्रि० म्हणणें, करणें) [ध्व, स उत्+श्वस्, तुल० का उम=हुस्सा]

उसउस, उसउसो—पु (गो) अस्वस्थता, गडबड, धादल –वि अस्वस्थ, अस्थिर [स उत+श्वस्]

उसकटणी—स्त्री उसकटाउसकट, उचकाउचक, उसकटणें पहा

उसकटणें—क्रि १ अव्यवस्थित करणें, इकडेतिकडे टाकणें, विस्कटणें, उचकटणें (व्यवस्थित रचलेल्या वस्तू), अस्ताव्यस्त करणें, विघडविणें (घडी वगैरे) २ उलगडणें (भाग), मोकळें करणें (एखादें यत्र, घड्याळ वगैरे) ३ (विचरलेले केस, गव ताची गंजी) विस्कटणें, इकडतिकडे पसरणें [स उत्+शकल]

उसकटाउसकट—स्त्री अव्यवस्था, धडामोड, विघाड, मोडतोड, उसकटणें पहा

उसकणें—क्रि विसकटणें, अव्यवस्थित करणें 'जैसा उदक घुम साचार येथें। तो मळ उसके जयें तेथें।' –नव १२९ [स उत्+प्वक्=जाणें, हालणें, प्रा उस्सक, उत्+शकल]

उसकी—स्त्री (गो) उचकी [ध्व]

उसको, हुसको—पु (गो) हुरहुर, काळजी [स उत्+ष्वक्, प्रा उस्सक=उत्कंठित होणें]

उसंग—स्त्री (प्र) उत्सग, मांडी 'जननीया पतला उसगा' –उषा ७६३ 'उल्हासचंद्रिका सावध केली। मृणालिका उसगिनें घेतिली।' –शिशु ७०९ 'घेउनि मझानें उसगिं। आर्ती उल्हासि जिये।' –ऋ ५. [स उत्सग]

उसण, उसणा?, उसणावळ, उसन—स्त्री कमरेंत किंवा पाठींत उठणारी कळ, लचक, तिडीक (क्रि० भरणें, निघणें, नाहणें) धाको. १. ५५ [प्रा ऊसण=गतिभग] उसण उतरणें–१ मंत्र वगैरे टाकून पाठींत भरलेली लचक उतरणें २ (ल) एखाद्याचा दिमाख उतरणें, ऐट उतरणें, जिरविणें ०मारणें–(गो) लचकणें, वातानें कळ येणें [स उत्+सद्]

उसण, उसणवार, उसणवारी, उसणा, उसणें, उसणें वाण—उसना, उसनेंवाण पहा 'मुष्टिभर पोहे ●उसणे आणुनि। विप्र हातीं दतसे।' –ह २९ ४९ 'तुज्या पुत्राचा नदन। त्यासी मारिलें जैसा मत्कुण। तुजलागीं सागता न घेसी उसण। तरी मग आजा कायसा॥' –जै ८७.४६

उसणून उठणें, उसणावणें—अकि (माण व.) झोपेंतून आरडत उठणें [उसण+उठणें]

उसंत, उसंथ, उसंधि—स्त्री १ विसावा, विश्रांति, आराम. (क्रि० लाणें, घेणें) 'म्हणौनि व्यापाराहातीं। उसतु दहा ना राती।' –ज्ञा १४ २४१ २ फुरसत, रिकामा वेळ 'कदा उसत नाहीं।' –ज्ञाप्र १४२ 'त्यास बहुत रात्रीं झोप नव्हती, दिवसा उसत नाहीं' –भाव ११२ [सं विश्रान, प्रा वीसत, स. उत्+सधि]

उसंतणें—अकि आक्रमण करणें, उल्पन करणें, पलीकडे जाणें. 'चाल झाडझडा उसतूनी वाट। पाहे पाळतूनी उभा तोचि नीट वो।' –तुगा ११२. २ दूर करणें 'परी नोसतिता विनसी। मेदी नाहीं निघोमीं॥' –ज्ञा १७ ३११ ३ थारणें, बद होणें 'आग मोडा-मोडी। कार्यजाता अनावडी। तुमतें परिवडी। जाभैयाची॥' –राझा १४ १७९ ४ विसावा घेणें ५ आश्रय करणें 'भार्या म्हणे प्राणे श्वरा। उसतू नको शोकसागरा। मीं सांगेन त्या विचारा। अत्या-दरें अनुष्ठी॥' –मुआदि ३८ २? ६ शेवटास नेणें, पुरें करणें, निस्त रणें 'तुका म्हणे आपुलालें। उसतिलें ज्याणीं तें॥' –तुगा २००८. 'योगी उसतिती योगपथा।' –रास ५ ९३ [स विश्रांत, प्रा. वीसत, स उत्+सधि]

उसती—स्त्री (व) उशी 'उसती अथरुणात आहे' [स. उत्+शीर्ष]

उसनवट, उसनवारी—स्त्री उधारी, कर्ज, ऋण –वि उसन-वार, उसना दिला घतलेला, कर्जाऊ उधार उसनवट, उसनवार, उसनवारी–क्रिवि उधारानें, परत घालीनें, कर्जाऊ माघारीनें (आणणें, देणें, घेणें वगैरे) उसणाधाई, उसिणाधायीं, उसिणें धाई–क्रिवि घावाला घाव किंवा माऱ्यास मारा देऊन, समोरासमोर, उसनें न ठेवतां 'निकपरा हाणावे। उसिणाधाई जुझावें।' –ज्ञा २ १५० 'झणीं धाई वीर सद्र। हाणताती परस्परें।' –ह २४ १४ उसनी गोष्ट सांगणें–आपल्यावर जी गोष्ट करता येणें शक्य आहे ती दुसऱ्यास करावयास सांगणें

**उसना**—वि १ परत देण्याच्या बोलीनें आणलेला ( पदार्थ, वस्तु ) 'म्हणे ऊसनें आणिलें मेळऊनि '–कचेसुदा ८ २ कर्जाऊ, उधार ( व्यवहार, व्यापार ) ३ ( ल ) उदासीन, रुक्ष, मन लावून काम न करणारा, उपरा, घुमार, हलगर्जी ( नोकर, नातेवाईक वगैरे ) ४ हलगर्जीचें, वेपिकिरीचें ( काम ) ५ वरवर, दिखाऊ पणाचें, मायावीं( भाषण ) [ सं वस्न = मूल्य ]

**उसनें**—न सूड, बदला 'उसनें समाजीचें घ्यावें '–ऐपो १८ **उसनें घेणें, उगविणें, फेडणें**–सूड घेणें, बदला घेणें, परत करणें, फेड करणें **उसनेपासनें** वि उधार, कर्जाऊ, मागून आणलेलें, परत बोलीचें, उसनवार ( उसनें द्वि ) **उसनें वाण**—न १ कोणी काहीं जें केलें असेल त्याचा मोबदला देणें, प्रत्युपकार, परत भेट, परत फेड २ सूड, बदला म्हृ० उसन्यापायीं फासण्या= उसनें काढण्यापासून होणारा त्रास, जिकीर

**उसपण–णी, उसपा**—स्त्रीपु १ काढून टाकणें, बाहेर काढणें उपसणी, उपसा ( होडींतील, डबक्यातील पाणी, भांड्यातील दूध, तूप, तेल वगैरे ) २ कोरडें, रिकामें करणें ( वालडी, चमचा पळी, टोपली, हात वगैरेच्या साहाय्यानें ) ३ बाहेर काढणें, वर काढणें, मोकळें करणें, उघडें करणें ( म्यानातून तरवार, गवसणींतून, आच्छादनातून वस्तु वगैरे ) [ स उत्+सृप् ] वाक्प्रचार–१ अंगा वर उसपणें=रागावून टाकून बोलणें, धावून जाणें २ काम–धंदा उसपणें=काम धंदा उरकणें, पार पडणें, सपविणें ३ शिंग उसपणें= शिंगें उगारणें शिंगें उगारून मारावयास धावणें

**उसपणें**—सक्रि उसपाउपस करणें, काढून टाकणें, बाहेर काढणें ( भांडे वगैरेंतून वस्तु इ० )

**उसपाउसपी**—स्त्री एकदम जोरानें बाहेर काढण्याची क्रिया ( पाणी म्यानातून तरवारी वगैरे ) [ स उत्+सृप्, म उसप द्वि ]

**उसपाभर**—क्रिवि १ निष्कारण रिता व्यर्थ वरचेवर बाहेर काढणें व पुन्हां भरणें २ ( ल ) उटाठेव, रिकामी दगदग, त्रास [ उसपणें+भरणें ]

**उसबकी**—स्त्री एक प्रकारचा रस्सा करण्याचा मसाला –गृशि २ १२ [ उसबक=एक अफगाणी जात ]

**उसमणें**—क्रि स्फुदणें, हुदके देणें, हुदके देऊन रडणें [ स उत्+स्फुट ]

**उसमु**—स्त्री वाळू 'लाज्या लाह्या वीं लप्या लाल । वाळुडें तयासी वदती आरळु। सिकता वालु उरक्या उसमु वालु । नदीतीर वाळवा म्हणणें वीं ॥' –दावि ५४ [ का उसुबु=वाळू ]

**उसमट**—पु ( गो ) घुसमट पहा [ उस+मट प्रत्यय ]

**उसमटणें**—क्रि ( गो ) गुदमरणें, घुसमटणें पहा [ का उसुर, उसुरने=कष्टानें श्वास घेणें, म उस=दीर्घश्वास ]

**उसर–री**—१ स्त्री वाळविलेली भाजी, सुकविलेली भाजी ( अळू, मेथी, गाजरें इ० ) सुकलेल्या आंब्याच्या फोडी, वाळव लेल्या पालेभाजीस पळवा म्हणतात 'या आंब्याच्या उसऱ्या आहेत ' २ ( ल ) कृश, वाळलेलें शरीर 'तत्सुख हे मत्सुरा तु होतचि होती तदाधिनें उसरी ।'–मोआदि ३५ ४ 'रोग न य हा भोग लागला दह वाळून उसरी ।'–पला ७६ **उसर करणें**–क्रि वाळविणें, कृश करणें, निगा न राखून, त्रास देऊन किंवा छळ करून ( जनावर, मनुष्य यास ) कृश करणें, दुर्गत करणें [ स उष्=उष्णता देणें, जाळणें ]

**उसरत, उसरपत**—स्त्री ( गो ) उसंत, विश्रांति, विराम पण, फुरसत 'तारामनी भावें काम करी । उसरत नाहीं दिवस रातीं '' शेशा करिता शेरडारा । उसरपत नाहीं भवसागरा । माजी सुचकळ्या दंत असे ॥' [ स उत्+स्रु ]

**उसरमा**—पु उपमा पहा उसरमा मनींचा वदता नये।' –विठ्ठलकृत रसमंजरी ५०

**उसराण**—न ऊसाचें शेत, ऊस लावण्याची जमीन [ ऊस+ रान ]

**उसरी**—उशिरा पहा

**उसल**—पु ( कर्ना ) श्वास [ का उसरु=श्वास ]

**उसल उंसल**—स्त्री ( ग्रा ) उंसाची जमीन, उसाचें शेत [ स इक्षु+आलय ]

**उसवण**—उसण पहा

**उसवणी**—स्त्री शिवणकाढून टाकणें टाके उलगडणें, उसरणें [ उसवणें ]

**उसवणें, उसविणें**—उक्रि १ शिवण काढून टाकणें, टाके उलगडणें, दोरा काढणें, उघडणें (शिवण्याच्या उलट क्रिया) २ (बों) घरावरील शिरलेलें गवत काढून टाकणें [स उत्+सिव्=शिवणें] म्हृ० १ उसवलें त्यास शिवील पग निसटलें त्यास काय करील २ उसव ल्याला दोरा निसटल्याला वारा

**उसवणें**—क्रि (राजा) सुजळणें, ओसरणें [स उत्+श्वि= सुजणें, वाढणें ]

**उसवास**—उच्छ्वास पहा

**उससणें**—अक्रि १ उसासा टाकणें, श्वास टाकणें 'मग उस सौनि विरीगी । वास पाहिली ॥'–ज्ञा ११ २५३ २ वाढणें, उत्पन्न होणें निवत होणें जीवन पावणें, प्रकट होणें 'तव आयुष्यनदी उससे । देहाचि देहा ॥'–ज्ञा १७ १३२ परी तें अगो हें एसें । शावरें झाड उससे । यया महदादि भारवसें । अधोशाखा ॥ ' –ज्ञा १५ १०९ [ स उत्+श्वस् प्रा उम्सस ]

**उससा**—पु उच्छ्वास गुम्बारा, उसासा 'वागर्था पडः मिठी । उससाचिया ॥ '–ज्ञा १८ १६०५ [ स उत्+श्वस, प्रा उस्सस ]

**उसळ**—स्त्री कोणतेंहि कडधान्य ( प्रथम भिजत ठेवून ) शिजवून मसाला घालून तयार केलेलें भाजीसारखें खाद्य [का उसळि= उसळ]

**उसळणें**—उक्रि उसळ करणें [उसळ]

**उसळणें**—क्रि १ वर उडणें (तुषार, लाटा, कण), वर जाणें 'जैसीं प्रळयाचेनि समीरें। वृक्षपर्णें उसळती॥' –मुवन १० १०६ २ वर उडी मारणें, उंच जाणें 'स्वरयावरूनि बाणाघातें उसळानि पावती पतन।' –मोउद्योग १३ ११३ 'दक्षशिर गगनीं उसळलें। वीरभद्रें पायातळीं रगडिलें॥' –शिवलीलामत १३ ५८ ३ काधानें अंगावर धावून जाणें, फार रागावणें, उसडणें 'द्वार देखोनि उसळला।' –शिशु१०६७ ४ जोरानें, जल्द वाढणें (मूल, शेत, झाड वगैरे) ५ एकदम बाहेर, वर येणें ( पाण्यातून, गर्दी तून) ६ वर उडी घेणें, आपटला असता जमीनीवरून वर उडणें (चेंडू वगैरेंचीं) ७ निघणें, उत्पन्न होणें, वाहणें 'हालविती कर्णयुगुळें। तेथुनि जो का वारा उसळे॥' –गुच१ २ [स उत्+शल्=वर उडणें]

**उसळणी**—स्त्री उसळणें, उसळी पहा [उत्+शल्]

**उसळपा**—पु १ ( राजा ) सपिगाचा ओंडा, फोडलेंले जळाऊ लाकूड २ ( सामा ) ओंडा, ओंडका 'लाकडाचा मोठा उसळपा पर्वतावरून कोसळला' [स उत्+तृप्]

**उसळवट**—स्त्री क्षार, पाझर असलेली जमीन, उपळीची जमीन [रा उत्+शल्+वत्]

**उसळवाटी**—क्रिवि सळसळ आवाज करीत 'काई सागरीं या परीती। उदकें उसळवाटी करती॥' –शिशु ७४९ [स उत्+ शल्+वत्]

**उसळा**—( राजा ) उसळ पहा

**उसळी**—स्त्री १ पाण्याचे तुषार लाटा वगैरे हवेंत उडणें २ उडी, उडी ( पाण्यातून वगैरे ) ( क्रि० खाणें, मारणें ) ३ (ल ) बंधनातून जोरानें बाहेर पडण्याची क्रिया ४ (ल ) क्रोधाची लहर, रागाचा आवेश, प्रेम वगैरे विकाराची लाट, आवेग ५ जोरानें वर येण्याची किंवा उडण्याची क्रिया ( क्रि० खाणें ) उसळणें, उमाळी पहा [स उत्+शल्]

**उसां**—क्रिवि उशाला 'मोनेंच येऊनि मोक्षदानी। सत्य भामेचे शिर उचलूनी। उसां आपुली मांडी दडली। चक्रपाणि बैसला।' –ह २६ ११३ –स्त्री ( कु ) उशी, उसें, उशास ठावयाची वस्तु [स उत्+शीर्ष]

**उसाण**—न १ ( वा ) उधान, पौर्णिमेची अगर अमावास्येची समुद्रास येणारी अतिशय मोठी भरती २ महापूर ( नदीस येणार ) [रा उत्+श्रि, उच्छ्रि=वर येणें, उच्छ्रयण, प्रा उस्सयण]

**उसासर-भर**— ( कर्ना ) भरा काम, गच्च भागगर उपेठेत 'त्याच्या उशाभगीला जाऊ नका'=त्याच्याशीं भरम ठवू नको' [अर इस्तिसा=मधध तोडणें, मोकळें होणें] ०**करणें**—( माण ) व्यवस्था ठेवणें

**उसार**—पु रिकामी जागा, मोकळी जागा ( गलवत, घर यामध्यें ) [हिं उसारा=देवडी?]

**उसास**—उच्छ्वास पहा

**उसासणें**—क्रि १ उसासा टाकणें, दम घेणें 'मग देखौ भणे हो हो का उसासली। राह राह का पळिसी।' –शिशु १०६८ २ उसळणें, वर येणें 'सागरीं लहरी उसासे। उसासली ते सवेंचि नासे।' –एभा २८ २८६ ३ उमटणें, उन्नत होणें, ज्वानींत येणें, फुलणें, भरणें ( स्त्रीचे स्तन ) 'सगीन कुच भरदार सजिव सनदार गुल्मेंद उसासले।' –प्रला ११३ ४ टाकणें, त्याग करणें 'लक्ष्मी उसासिली।' –भाए १११ [स उत्+श्वस्=उल्हसित होणें, श्वास टाकणें, प्रा उस्सास]

**उसासा**—पु १ दीर्घ श्वास सुस्कारा २ विसावा, विश्रांति 'पाठीं व्याघ्रादि तामसा। योनी ता अलुमालु ऐसा। देहधाराचा उसासा। आथी जोही।' –ज्ञा १६ ४१५ ३ पाण्याच्या नळांत हवा येण्याकरिता ठेवलेलें उंच छिद्र उच्छ्वास पहा [स उत्+श्वस्, प्रा उस्सास] ०**असासा**—पु जोराचा सुस्कारा, श्वास ( क्रि० टाकणें ) [उसासा द्वि]

**उसासी**—स्त्री उशी [स उत्+शीर्ष, हिं उसीसा]

**उसाळणें**—सक्रि हर्षविणें, आनंदित करणें [उसळणें स उत्+शल्]

**उसाळा**—पु उल्हास, उत्साह, आवेश, जोर, उमाळा उसळी पहा 'तेथें ऋषिकुळ सकळ नाचती निर्मळ उछायाचेनि उसाळें' –दा ४८९ 'सद्गुरु कृपेचेनि बळें। परोक्षज्ञानाचेनि उसाळें।' –दा ५ ३ ४८ उसाळें सभामाजि दारू निघाली' –राक १८८ [स उत्+शल्]

**उसाळी**—स्त्री उडी उसळी पहा 'रोधिलें चित्त पै उसाळी। कथा सपता अवलोकीं।' –मुआदि १३ १७ 'वाम हस्त ग्रीवतळीं। दुजा सूदला पादमूळीं। गगनीं दळूनि उसाळी। धरातळीं गाळिला॥' –मुआदि ४१ १३७

**उसिंदे**—न उशें पहा 'उसिंदे लाह्यावेखाचें सायासु। तेथ सेवेंची वरणी आसु। –दाव २५३ 'तरी नव्हेचि उसिंदी। दिसी जयाची।' –अमृ २ १५

**उसित**—पक्रात घास अडकणें, अडत, उठीत पहा ( क्रि० जाणें) उचकी लागली उसित गेला। पीत उमळलें उलट जाणें।' –दा ३ ६ ३३ [स उत्+सिक्थ]

**उसिणें**—न उसें उशें पहा 'उसिणें घेतलें देवाचें। मूळ शोधिलें राक्षसांनें।' –दा १६ ६ ३१

**उसीर, उसीरु**—उशीर पहा 'आता उसीरू होईल अपडे ।' –शिशु १८५ 'आता न लावावा उसीर' –वेसीस्व ३ ५

**उसीसें**—न उसासा, श्वास, दमा 'वीं ससाराचेनि श्रमें। जे करौनि होते उसीसें।' –ऋ ६० [स उत्+श्वस्]

**उसुळवार**—वि (कों) जोरानें धावणारा, वर येणारा, वाढाव् (झाड, मूळ वगैरे) [स उत्+शल्]

**उसू**—वि (कों) सैल, फट राहिलेला, घट्ट न बसलेला, शिथिल, पोकळ (खुंटी, दादरा, दार वगैरे) [स उत्+सिव्–स्यूत]

**उसूल**—पु वसूल, जमा, उत्पन्न [अर वुसूल्]

**उसें**—न १ बिछान्याची डोक्याकडची बाजू उशागत पहा २ उशी, गिरदी, निजताना डोक्याखालीं घेतलेला आधार ३ निजलेल्या स्थितींत ठेवलेले डोकें 'उसें भुईंवर ठेवू नको, उशी वर ठेव' 'उशाखालीं हात सापडला' [स उत्+शीर्ष, प्रा उस्सीस, उच्छीर्षक–ऊसीस–उसँ–उसें–रा ग्रन्थमाला] (कोणेकाचें) **माडीचें उसें करणें**–आपल्या सरंक्षणासंबधीं सर्वस्वी एखाद्या वर विश्वास ठेवणें **०गत**–उशागत पहा

**उसेती**—स्त्री (नाविक) भरतीची वेळ [उस+यणें]

**उस्करणें**—उक्रि (ग्र) उस्तरणें, विसकटणें, अस्ताव्यस्त करणें, विखरणें 'धीण रेसभरही उस्करली नाहीं' –झाकली मूठ (हडप) १९ [स उत्+शकल]

**उस्कारा, उस्कारासस्कारा**—पु उसासा, सुस्कारा, जोराचा श्वास, दम (क्रि० टाकणें) [स उत्+श्वास, हुश्श+स कृ]

**उस्क्या**—स्त्री वाळु रेती उसवु पहा 'लाज्या लाह्या कीं केऱ्या लाळु। कानुडे तयासी वदती आरळु। सिकता वाळु उस्क्या उसवु वाळु। नदीतीरसड्या म्हणणें कीं ॥' –दावि ५४ [का उसुकु–वाळु]

**उस्तरणें**—क्रि १ घरावरील कवलें, गवत वगैरे आच्छादन काढणें, छपरावरील ओमण वगैरे काढणें २ विस्कटणें, उलगडणें, उघडें करणें ३ उसवणें, धीण काढून टाकणें, दोरा काढणें ४ नासधूस करणें, मोकळें करणें, अलग करणें, भाग वेगळे वेगळे करणें 'सारी पोथी उस्तरली पण तें पत्र कोठें सापडेना नाहीं' [स उत्+स्तृ]

**उस्तराउस्तर**—स्त्री मोठ्या प्रमाणावर व सर्वत्र उस्तरण्याची क्रिया, उलगडणें, उस्कटणें, मोकळें करणें, उघडें करणें वगैरे उलथापालथ, उस्तरणें पहा [स उत्+स्तृ]

**उस्तरें**—न (गो) ठसका, उशीत, असुत–द पहा (क्रि० जाणें) [स उत्+सिक्थ–उसित, उस्त+र]

**उस्तवारी**—स्त्री १ डागडुजी दुरुस्ती, व्यवस्था, मजबुती, पुनर्घटना 'लोकाचे कर्त्यांचा मार्ग होऊन आपली उस्तवारी होईल' –रा १२ ५१ २ उपचार, तैनात, शुश्रूषा 'जखमांची वगैरे पथ्यपाण्याची उस्तवारी बरीच आहे' –स ११ ६०१७ 'राजा राणींची उस्तवारी करितात' –प्राणिमो ११० ३ मशागत, लागवड (शेत, जमीन वगैरेची) 'जमिनीची नीट उस्तवारी ठेविल्यास ती सुधारते' –शे ३ ७ ४ (माण) उठाठेव, चौकशी [फा उस्तुवारी]

**उस्ताद, उस्तादगिरी, उस्तादी**—(हिं गु) वस्ताद पहा

**उस्तें**—न (कों) पहाटेचा किंवा सकाळचा सधिप्रकाश, झुंजुरमुंजुक [स उषा, प्रा उसा]

**उस्मरणें**—अक्रि १ सुस्कारा टाकणें, श्वास टाकणें २ हुंदके देणें, स्फुंदणें ३ धापा टाकणें [स उत्+स्मृ–स्मृणोति]

**उस्मरणें, उस्मारणें**—उक्रि १ आठवणें, आठवण करणें, स्मरण करणें, पुन्हा पुन्हा पुढें आणणें २ उल्लेख करणें, सांगणें, दिग्दर्शित करणें [स उत्+स्मृ–स्मरति]

**उस्मारा**—पु १ विश्रांति, दम, श्रमान्तरचा विसावा (क्रि० घेणें) २ दीर्घ श्वास सोडणें, सुस्कारा टाकणें (क्रि० टाकणें) [स उत्+स्मि–स्मेर?]

**उस्मस्थळ**—न (गा) बागाईत जमिनीशेजारची पडीत जमीन

**उस्मारा, उस्मा**—पु १ उपकाराचें किंवा अपकाराचें स्मरण, आठवण, जाणीव दिग्दर्शन उ० उस्मारा टाकणें, उस्मा करणें २ (सामा) उल्लेख, कथन, दिग्दर्शन [स उत्+स्मृ]

**उस्रमा**—उभ्रमा पहा

**उस्रा**—स्त्री गाय 'राखिता कळप या वनि उस्रा' –वामन विराट ८ ४८ [स]

**उस्राप**—(कुण) उशाप पहा

**उस्वास-सा**—पु उश्वास पहा 'स्वास उस्वास कोंडला। तेणें प्राणी जाजावला ॥' –दा ३ १ ३९

**उहापोह**—ऊहापोह पहा

**उहुं-हूं**—उद्गा नव्हे, नाहीं नको या अर्थी, नकारार्थी अव्यय 'उपसी परि गांभीर्यें आपण न उहू म्हणोनि त्या विटवी' –मोसभा ५.८६ [ध्व, स उत्+हुम्=असति, म हू]

**उहू**—पु १ व्यूह चिमू, कट, युक्ति बेत तर्क, कल्पना (क्रि० रचणें) 'रात्रीं जाऊन घर वेढून त्याला धरावें असा उहू रचला' २ परिस्थितीप्रमाणें मूळ सामान्य रीतीच्या वाक्यात विशेषानुराधानें केलेला फरक (उ० एकवचनाच्या ठिकाणीं अनेकवचन पुल्लिंगाच्या ठिकाणीं स्त्रीलिंग, अमुक शब्दाबद्दल विष्णु इ नाव) 'यज्ञोपवीत धारण करावें हें सामान्यवचन, येथें दोन यज्ञोपवीतें धारण करावीं असा उहू केला पाहिजे' हेतु कायम ठेवून शास्त्रवचनात जरूर तो बदल करणें ३ प्रथम उल्लेख, प्रस्तावना, परिस्फोट विषयाची मांडणी (क्रि काढणें) 'मी आपण होऊन उहू काढणार नाहीं, तुम्हीं उहू काढा म्हणजे मी मध्यस्थपणें बोलेन' [स ऊह, उह्य, व्यूह]

(दगड, उचवटा, याच याचा) (क्रि० लागणें) ०उतरणें–१ ताठ, गर्व नाहींसा करणें, नम्र करणें, खटपीण आणणें २ भिरेंग लावो, धुरीला मिळविणें, नाश करणें ३ (सरद, अपमान इ०च्या) उतारास लागणें ४ चोर, भेग

ऊंट—पुन १ उग पहा –वि २ (ल) लांबगाग्या, वारिकमान्या उंच व बिरडोळ (माणूस) म्ह० उट कोण्या वाजी बसेल वाण जाणें १=दुसऱ्याच्या सकटाला कोणी हसु नय (केव्हा हसणाऱ्यावर आपत्ति कोसळेल याचा नेम नाहीं, कदाचित् उग=सडयाचा या वक्त) [स उष्ट्र]

ऊठउठीं—क्रिवि उठाउठी पहा 'एक म्हणती ऊठउठीं। चला घेऊ हरीची भेटी। धालू हरिचरणीं दृढ मिठी। प्रेम पोटीं न समाय।' –ह १६ १८८

ऊठ-ठ—पु जोंधळ्यावरील एक रोग –दे ७ ३०

ऊठफळा—उठफळा पहा

ऊठनाउघड—स्त्री (व) पुष्कल उरण्याइतका जिनसाचा पुरवठा 'सभर आल्यानें ऊठनाउघड हाते'

ऊठपाय—क्रिवि १ एका पायावर तयार (जाण्यास, कर ण्यास), सदो उभा २ (ल) उठल्यावसल्या, सदानकदा, सारखें तेंच, फिरून फिरून 'तू ऊठपाय त्याचे घरीं का जातोस?' [उठणें+पाय]

ऊठवशी, ऊठवस, ऊठावशी—स्त्री उठणें व बसणें, वारवार उठण्यावसण्याचा व्यापार. ऊठवैस पहा (अव) उठावशा–१ शाळेंतील शिक्षेचा एक प्रकार २ (तालीम) व्यायामाचा एक प्रकार बैठका मारणें (क्रि० काढणें) [उठणें+बसणें]

ऊठवैस—स्त्री १ ऊठवशी पहा २ अस्थिरता, चचलता

ऊटी—स्त्री वाकी, उचल, उचापत –शर

ऊड—स्त्री (कों) भिंतींतील स्थान खिडक्यांच्या आतील भिंतीच्या रुंदीपर्यंतचा उतरता व पसरट होत जाणारा भाग (जास्त उजेड येण्यासाठीं ठेवलेला)

ऊड—स्त्री माया, कपट, दगा, धोका 'प्रभु सुड घडू पुढती मति ऊड करिन।' –आप ६२ [स कूट–कूड, प्रा ऊड?]

ऊडवें—न (कों) भाताच्या पेंढ्या झोडून भात काढून घत त्यावर पेंढ्या पुन्हा रचून ठेवतात तें, गजी (अव) उडवी उडवें पहा [स उटज, प्रा उडव, प्रा उड=समूह, रास, स कूट, प्रा उड वा उड्डी=ढीग]

ऊणखूण—स्त्री १ मर्म, रहस्य उणखूण पहा 'हे जिव्हा रींची उणखूण। तुज सपूर्ण सांगीतली।' –एभा ११ १५६० २ प्रचीति, वाटाघाट चर्चा 'रिघोनि सद्गुरुसी शरण। काढा शुद्ध निरूपण। यांचीं करिसी ऊणखूण। प्रत्यक्ष आना।' –दा ६ १० ५२ उणखूण पहा

ऊत—पु उतो पहा १ पदार्थ कढू लागला म्हणजे त्यांतील पाण्याचा अश, फेस वगैरे वाफेच्या जोरानें वर उचलला जाण्याची क्रिया, उकळी 'भीमाचे घरा लागति सुरभिक्षीराचियाहि ऊतातें।' –मोभीष्म ३८ २६ २ (ल) फणफणाट, झपाटा, ताठा, डौल, उन्माद (क्रि० येणें, जिरणें, निरविणें) ३ उत्कर्ष, भरभराट, मर्यादेपलीकडची स्थिति, अतिशयपणा (तारुण्याचा, संपत्तीचा, चिलमीचा इ०) 'यदा आम्हांला ऊत आला आहे' ४ उगळी, आतून वर येणें 'यमुनेच्या डोहावरी आला ऊत। काळ्या दूत धुधुकारे।' –तुगा ५१ ५ (ल) समुद्राची भरती 'ये धर्मसमुद्रीं धुव्यांचीच्या उताप्रमा, राया।'–मोभीष्म १ १८ ६ उच बळलेली मनोवृत्ति, गहिंवर, आवेग [स उत्, तु० का उद्=फुगणें, वर येणें] ०मारणें–चेव नाहींसा करों, मोडणें, फुगवटा (दुधावर आलेला) पाणी घालून नाहींसा करणें ०येणें–अंत न मावण्याइतकें पुष्कळ वाढणें 'सत्ते–जपानी युद्धाचे वेळी जपानातल्या आबाल वृद्धाच्या देशाभिमानाला खरोखरीच ऊत आलेला दिसत' –के ०मात–पु उन्माद, माज, उद्दटपणा, वफिकीरी, रागीटपणाचें कृत्य, धुंदी, उमेदपणा (क्रि० करणें, माडणें, उतरणें, जिरणें, जिरवणें [उतणें+मातणें]

ऊद—पु १ एका वृक्षाचा सुगधी चीक (धूपासाठीं जाळतात तो) विस्तवावर टाकला असता सुवास देणारा, लोबाण, धूप तुर्कस्थान, पूर्व आफ्रिका, जावा, सुमात्रा या देशात याचीं झाडें होतात हा वात, कफ, मद्धुनाशक आहे याच्या उदवत्त्या करितात उदाचे प्रकार–१ भीमसेनी २ जनार्दनी ३ लाडूवरी ४ कवड्या [अर उद] ०काडी–वत्ती–स्त्री १ उदानें माखलेली काडी उद वत्ती पहा २ (उप) योंबील (योंबील भाजला असता घाण सुटते म्हणून) उदेल, उदाचा अर्क–न पु उदाचें तेल, हें पाढऱ्या व ववड्या उदाच्या भरड कुटीपासून तयार करतात ऊदफूल–न उदाचें फूल, मडक्यात ऊद जाळतात व त्याच्या धुरापासून पर्ती करण क्रियेनें हें तयार करितात

ऊद—पु एक वृक्ष [अर]

ऊद—न वाडचोर, माजराच्या आतीचा एक प्राणी हा रात्रीं हिंडतो व तान्ह्या मुलास उचलून नेतो असा समज आहे इतर हिंस्र पशुप्रमाणें याच्या तोंडाच्या लाळेपासून जखम दूषित होण्याचा सभव असतो [स उद्र]

ऊदाईन—न (शाप) (इं) बेंझाईन हा वर्णहीन स्फटिक रूप घन असून अल्कहल किंवा ईथर यात विरघळतो याचा धूपाकडे फार उपयोग होतो [अर ऊद]

ऊदाम्ल—न (रसा) (इं) बेंझाइक ॲसिड हें मोठें शक्तिमान आहे हें पोटात गेलें असता मूत्रमार्गाच्या उतस्तवचेतील श्लेष्ममय पदार्थास रोगबीजरहित करून उत्तेजित करतें

**ऊदिन**—न (शाप) (इ) बेंझिन, हें दगडी कोळशाच्या डांबरात सापडतें त्याचा डांबरी रंग करण्याच्या कामीं उपयोग होतो

**ऊदिल अल्कहल**—न (रसा) (इ) बेंझिल अल्कोहोल हा जाई, मोगरा इ०च्या अत्तरात सापडतो यास सौम्य सुगंध येतो भानिल कर्बिनल (फेनिल कर्बिनोल)

**ऊदिल प्रायोज्जित**—न (इ) बेंझाल्डिहाइड वर्णहीन सुगंधि द्रव्य, कडू बदामाचें तेल

**ऊंधा**—वि (रा) उलटा, विरुद्ध [सु सिं ऊंधो]

**ऊन**—स्त्री लोकर 'दुलया ऊनाच्या शालजोडीच्या बजाप दार' –प्रकृतिकृत्यादर्श १ [स ऊर्णा]

**ऊन**—वि कमी, उणें, अपुरें, थोडें, न्यून उ० एकोन, अर्धोन, पाऊण [स]

**ऊन-न्ह**—न सूर्याचा ताप, तेज, किरण या प्रकाश, ओप, ओपाळी 'गम्य जसीं हित पृच्छक, सीतातेंहि कोण गा' नये ऊनीं' –मोसभा ४ १०८ –वि गरम, कढत, उष्ण [स उष्ण, प्रा उण्ह, गु उन्हु] ०**ऊन-आग**–वि १ जळजळीत, कडक, होरपळण्यासारखें, चटका बसण्यासारखें २ (ल) ताजें, गरम, उष्ण, नवें कोरें, नुकतेंच केलेलें ०**खाणें**–उनात बसणें ०**तावणें**–सूर्यकिरण जास्त प्रखर होणें ०**ताहान म्हणणें-पहाणें, मानणें**–(नकारार्थी प्रयोग) कांहीं त्रासाची वगैरे पर्वा न करता कामास लागणें, कांहीं सावली न लागता तावडतोब निघणें ०**पाऊस**–पु ऊन आणि पाऊस, नागवा पाऊस, सूर्याचें ऊन पडलें असताना पडणारा पाऊस ०**पारखा**–वि आयुष्यातील अडचणींचा अनुभव नसणारा, नाजुक, श्रीमंतींत लोळणारा ०**वारा**–पु झळई अहगी, ऊन, दाह करणारा वारा ०**वारा लागणें, सासणें**–१ (नकारार्थी प्रयोग) संसारातील अडीअडचणींना पारखा असणें २ (होकारार्थी प्रयोग) सर्व संकटांना तयार असणें, सर्व प्रकारच्या हवा, परिस्थिती सहन करणें ०**परतणें**–ऊन कमी-खालीं होणें

**ऊपाळणें**—सक्रि उपाळणें, उपटणें 'चिती येक ऊपाळती लाग वेगें' –राक २५ [उत्पाटन]

**ऊब**—स्त्री १ निर्वातस्थळाची, कोंदटपणामुळें उद्भवणारी उष्णता, गरमपणा २ शिजणाऱ्या पदार्थापासून निघणारी वाफ ३ विस्तवाची अथवा तापलेल्या पदार्थांची उष्णता, धग 'तेवींचि वन्हित्व आगीं। आणि उब उबगणे आगी।' –ज्ञा १८ २२० ४ प्राण्याच्या अंगची उष्णता ५ उष्ण हवा गरमी, उकाडा ६ (ल) विद्या, संपत्ति इ०चा गर्व, ताठा, त्यामुळें अंगीं असलेला आत्मविश्वास, धमक, भरंवसा ७ सुख, साधन, आधार 'त्याच्या जवळ पैशाची ऊब आहे' ०**जिरणें**–गोंड किंवा दरारा घेपणें, भीति कांहींशी होणें, परिचय, स्नेह होणें. ०**जिरविणें**–रग उतर विणें, नाकी तोडणें, हड्डी नरम करणें. [फा उव्वं=उष्णता, वाफ तुल० स उत्तप–उप्पभ–उव्वभ–उब]

**ऊर**—पु १ पोटावरचा आणि गळ्याखालचा पुढल्या अंगाचा भाग, छाती 'उर कुहिजल जैसें। आमुवाचेनी॥' –ज्ञा १३ ५६० 'विंधी व्याघ्र व्याघ्रा भेदी प्रहारें शिरीमुखें उर गा।' –मोभीष्म ९ २४ २ (स्त्रियांचे) स्तन, वक्षःस्थल 'दो तों तिचा उर शरीर दिसानि येता' –नळ ७०. [स उरस्, प्रा उर] म्ह० उरीं केश माथां टक्कल=एका बाजूनें मिळविणें व दुसऱ्या बाजूनें गमावणें ०**उलणें**–अतिशय दुःख होणें 'परतेल काय येवुनि हे साध्वीची उरेंचि उलतिल कीं।' –मोवन १२ ९८ ०**काढून चालणें**–ऐटींत चालणें, बेमुर्वत वागणें ०**दडपणें**–भय, लाज, मत्सर वगैरेनीं धैर्य नाहींसें होणें, उत्साह नष्ट होणें, छातीस धक्का बसणें, निराशा वाटणें ०**दबणें-बसणें**–गांगरून जाणें, भयचकित होणें उर उलणें पहा ०**दाटणें-भरणें**–(दुःख, प्रीति यामुळें) गहिंवरून येणें, छाती भरून येणें, बाध बसणें ०**पिकणें**–१ कफ दाटणें व त्यामुळें घसा बंद होणें, अति श्रमानें छातीस ताण बसणें २ (ल) त्रास, छळ होणें ०**पिकविणें**–त्रास देणें 'पदोपदीं यडनि शीणवीला। तथापि तेणें उर पीकवीला॥' –साछइ २ १४ ०**फाटणें**–अतिशय दुःख होणें, उर उलणें–दबणें पहा 'फाट उर शोकानें बहु निघ क्षतयर्में त्या बाट॥' –मोअश्व ५ ३९ ०**फुटणें**–१ (स्त्रियांना उद्देशून) स्तनाचा उद्गम होण्याच्या वयास येणें 'ती उर फुटण्याच्या वयात आली आहे' २ हृदयविकार होणें, छाती फुटून निकामी होणें (घोडा) ३ शोकानें, काळजीनें व्याकुळ होणें, उरीं फुटणें ४ (ल) हिंमत चालणें 'पुरात उडी टाकून धारेपर्यंत पोहत आला पण पुढें उर फुटेना' ०**फोडणें**–१ अतिशय श्रम करणें २ आहाराबाहेर काम करून गळाठणें, मेटाकुटीस येणें ०**बडविणें**–दुःख-शोकप्रदर्शनार्थ छातीवर हात मारणें **उरस्फोड करणें**–उर फाडणें, अतिशय श्रम करणें **उरापोटीं करणें, धरणें उरापोटावर उचलणें**–अतिशय श्रम करून काम करणें, चालविणें, उचलणें, उर फोडणें 'अहो! उरापोटीं करीन कसें तरी झालं' –एकच प्याला 'ती आपल्या मुलांना उरींपोटीं धरत' **उरावर घालणें**–(शिवी) इच्छा नसतांना एखा द्यास देणें, त्याच्यास भाग पडणें, 'गोणीभर होन ब्राह्मणाच्या उरावर घातले' –नामदेवनाटक १०५ **उरावर असणें**–एखाद्यावर अधिकार चालवणें–सत्ता असणें, एखाद्याच्या डोक्यावर असणें **उरावर घेणें**–१ अतिशय कठिण काम पार पाडण्यासाठीं अंगावर घेणें, स्वीकारणें २(ल)(शिवी–स्त्रियांच्या बाबतींत) संभोग देणें **उरावर धोंडा ठेवणें**–१ स्वतःचे मनोविकार दाबून धरणें, स्वतःवर जोर चालविणें २ एखाद्यास अतिशय कठिण काम करावयास सांगणें (पूर्वी

मोंगलाईत सरकारी वसूल करण्यासाठीं शेतकऱ्याच्या उरावर धोंडा ठेवीत असत यावरून) सक्ति करणें, 'पोथी तुमच्या उरावर धोंड ठेवली होती' '–नाकु ३ १५ **उरावर बसणें**–१ छातीवर बसणें २ (ल) टाळतां न येणारें काम अंगावर येऊन पडणें, त्या मुळें असहाय्यता येणें ३ मागें लागून निकडीनें काम करून घेणें ४ पुरुषानें एखाद्या स्त्रीवर बलात्कार करणें, संभोग करणें **उरा वर हात ठेवणें–लावणें, ठेवून–लावून–सांगणें–बोलणें**–जोरानें वचन देणें, एखाद्याबद्दल सार्थीनें मागणें 'या श्लोकाचा अर्थ मला समजला आहे, असें मी उराला हात लावून तुला सांगतों' **उराशीं धरणें**–१ आलिंगन देणें २ नम्रपणानें प्रार्थणें ३ कांहीं झालें तरी (हातीं घेतलेलें काम) शेवटास नेण्याचा निश्चय करणें, सतत (गोष्ट) स्मरणांत ठेवणें ४ स्वीकारणें, पतकरणें, आपलें म्हणणें, न सोडणें **उरावर शेगडा**–अतिशय दु:ख, विवंचना, त्रास **उराला हात लावणें**–सत्यता, आत्मविश्वास, निश्चय, धमक दाखविण्यासाठीं छातीस हात लावणें **उरास लावणें–उरीं पोटीं धरणें**–लाडावाचा करणें, मन वळविणें उराशीं धरणें पहा **उराची–शिंप–शिंपी**–स्त्री (निंदाव्यंजक) खोल छाती, छातीचा खळगा **उराचा तख्ता**–पु भरदार छाती **उराचा पाजरा–पिंजरा**–पु क्षीणतेमुळें छाती वरील सर्व हाडें दिसणें, छातीचा सापळा **उरावरचा गोहो–धगड**–पु. १ ज्या व्यक्ती–अगर वस्तुविषयीं एखाद्यास सतत भीति वाटते ती वस्तु, उरावरील दडपण, धोंड २ नवरा, जार [कों गोहो=नवरा] **उरीं डोंगर घेणें**–कठीण काम स्वीकारणें, अतिशय दगदग करणें **उरीं डोंगर पुरीं काढ्या घेणें**–(छातीवर पर्वत घेणें व नदीच्या पुरातून काटछुं ओढून काढणें) पोटासाठीं अतिशय दगदगीचे काबाडकष्ट करून सर्व तऱ्हेचे उपाय करून पाहणें **उरीं पोटीं करणें**–अतिशय श्रम करणें उरापोटीं करणें पहा **उरीं फुटणें**–ऊर फुटणें पहा 'इतका अभ्यास करून उरीं फुटायच आहे का काय?' –मी (आपटे) **उरीं भरणें**–१ दमणें 'उरीं भरली ऊरपोट। केली चळवळ झाली धावरी॥' –पला २ 'तो सक्तमजुरी करून उरीं भरला' २ स्त्रियांच्या स्तनांचा उद्गम होणें, ऊर भरणें ०**तूट**–स्त्री (उराशीं धरण्यात, मिठी मारण्यात अडथळा, प्रतिबंध, व्यत्यय यावरून) वियोग, विरह (क्रि० करणें, होणें) ०**दुखी**–स्त्री १ उरांतील दु:ख २ (ल) मत्सर हेवा ०**पाकीट**–न (क शिवण) छातीवरचा खिसा [ऊर+इं. पॉकेट=खिसा] ०**फोड**–स्त्री उरस्फोड, अतिशय दगदगीचें व संकटमय काम, श्रम उद्योग –वि असे श्रम पडणारें, फार मेहनतीचें (काम) ०**भेट**–स्त्री छातीस छाती लावणें, मिठी मारून भेटणें

**ऊर**—स्त्री १ उरलेलें, जास्त पडलेलें काम, पदार्थ, गोष्ट बाकी, शिल्लक, शेष 'इतकें आवण एवढ्या खाचरास पुरणार नाहीं असें वाटत होतें, परंतु पुरून ऊर आली' 'या तरींत (उरलेल्या कापडात) एक जाकीट बसेल' २ तूट, उणीव, उरता या अर्थी [उर्वरित स उत्+ॠ] ०**न पूर**–स्त्री उरणें न पुरणें, प्रमाणी फारसा न पुरण्याइतकें किंवा पुरून न उरण्यासारखें सामान, सामग्री, उणीव, तूट कमतरता ०**पूर**–स्त्री पुरून उरण्याइतकी सामग्री, भरपूर, समृद्धि, आधिक्य [उरणें+पुरणें] ०**सूर**–स्त्री १ शिल्लक, बाकी, अवशेष [ऊर द्वि] –वि शिल्लक, उरलेलें, राहिलेलें

**ऊर**—न पु ऊत, ओर नदीचा पूर [स पृ–पूर्, प्रा ऊर]

**ऊरु, ऊर**—न खेडेगाव ग्रामनामवाचक सामासिक शब्दां तील अन्त्य भाग म्हणून येतें उ० जसें देव+ऊर=देवूर, चंद्र+उर= चंदूर [स पुर, प्रा उर, का ऊरु]

**ऊरु**—पु स्त्री गुडघ्याच्या वरचा भाग, मांडी 'तरी ऊरु या जघनासी। जडोनि घालीं॥' –ज्ञा ६ १९१ [स] ०**कर्म**–(नृत्य) मांड्यांनीं केलेले अभिनय, नृत्यामध्यें ऊरुकर्में पांच आहेत– स्तंभन कंपन, वलन, विवर्तन, उद्वर्तन ०**उद्वृत्त भौमिचारी**–१ (नृत्य) टाच बाहेरच्या बाजूस येईल असें चवड्यावर उभें राहून व जघा वाकडी करून वरचेवर फिरविणें २ (करण) उजवा हात फिरवून मांडीच्या मागें वाकडा करून ठेवणें व पोटरी वाकडी करून वर उचलून बाजूस वळविणें, म्हणजे मांडी वर होऊन जरा वळली जाते ०**मूल–संधि**–न पु. १ मांडीचा कमरेशीं संलग्न असलेला भाग २ जांघ, वंक्षण, कटिसंधि, श्रोडसंधि ०**स्तंभ**–पु एक वातरोग, वातानें खालचें अंग जाणें, पुष्कळ दिवसाचा मांड्यांचा पक्षघात

**ऊरूफ**—ऊर्फ पहा

**ऊरूबरू**—क्रिवि समक्ष, समोर उरुबुरु पहा [फा रूबरू]

**ऊर्ज**—पु हिंमत शक्ति ताकद, तेज [स ऊर्जस्]

**ऊर्जा**—स्त्री उस्तवारी, संरक्षण 'उरजा' पहा [स ऊर्जस्]

**ऊर्जित**—न उत्कर्षाचा काल, चढती कळा, बढती, भरभराट, कल्याण [स] –वि शक्तिमान्, चढता, उत्कर्षाचा ०**कळा–काळ**–स्त्री पु भरभराटीचे दिवस

**ऊर्ण**—न लोकर, तंतु, धागा [स] ०**तंत**–पु कोळ्याच्या (किड्याच्या) जाळ्याचा धागा, 'हस्त (हत्ती) बांधीजे ऊर्णतंतें। लोभें मुग्ध भ्रमरातें' –दा २ १० १५ ०**नाभी**–पु कोळी, किडा (याच्या शरिरातून लोकरीसारखा धागा निघतो) ऊर्णनाभी पहा 'ऊर्णनाभीचा ततुसूत्रीं। जरि उचलिजत धरित्री॥' [स]

**ऊर्णा**—स्त्री १ लोकर (मेंढी, ससा, उंट इ० चे केस) २ लोकरीचें कापड (शाल घोंगडी) ३ दोन भुवयांमधील नाकाच्या मुळाशीं असलेले केस या ठिकाणीं भोंवरा असणें हें सार्वभौम त्वाचें लक्षण समजतात [स ऊर्णा]

**ऊर्ता**—स्त्री (व) वाट पाहणें, धारणें असता पहा 'माझी ऊर्ता नको, तुम्ही रत्न जुळवा' [अरता]

**ऊर्ध, ऊर्ध्व**—क्रिवि वरती, उच, वर –वि १ वरील, उचा वरचा २ (गणित) उभा, लंब (इ) व्हर्टिकल [स ऊर्ध्व] **ऊर्ध्व गति**–स्त्री वर चढणें, उंच उडणें, जाणें, आकाशात जरान्या मारग 'विचारें ऊर्ध्व चन्ती। तयासीच ऊर्ध्वगति॥' –दा १७ ३ २२ **०मुख**–वि वर तोंड करून पहाणारा –क्रिवि वर तोंड करून 'ऊर्ध्वमुखें भेद तुटतो' –दा २० ३ २२ 'चिंतुनिया चेंडू हाणे ऊर्ध्वमुखें। ठेली सकळिक पाहतचि॥' –तुगा ४२

**ऊर्ध्व**—पु १ मरण्यापूर्वी लागलेला श्वास, घरघर २ एक रोग, श्वास, दमा, छाती भरून येणें ३ राम्यस्तिक [म] **०गति**–वि उच जाणारा, उडणारा **०जानु (आकाशीचारी)**–(नृत्य) एक पाय आकुंचित करून गुडघा वक्षस्थलाइतका उच करून व दुसरा पाय समाच ठेवणें **०जानु करण**–न (नृत्य) उजवा पाय कुंचित करून गुडघा उंच करणें, डावा हात वक्षस्थलावर व उजवा हात उजव्या पायाप्रमाणें कुंचित करून वर उचलणें **०दृष्टि**–वि वर किंवा आकाशाकडे, वरच्या दिशेकडे नजर लावलेला (माणूस), वरडोळ्या, दूर दृष्टीचा, उदात्त हेतूचा, गर्विष्ठ, महत्त्वाकांक्षी, थोर मनाचा –स्त्री १ आकाशाकडे असलेली नजर २ (ल) कपट, महत्त्वाकांक्षा, अभिमान, उच्च हेतु **०देह**–पु मरणोत्तर आत्म्याला प्राप्त होणारा देह **०देहिक**–न उत्तरक्रिया और्ध्वदेहिक पहा **०नाडी**–स्त्री वर जाणारी नाडी, सुषुम्ना इडा पहा **०पंथ**–पु (काव्य) वरचा मार्ग, वरची दिशा, स्वर्गास किंवा आकाशात जाण्याचा रस्ता 'जों जों वाढे परत। मनाक नामें अद्भुत। तों ऊर्ध्वपथ आडवा येत। हनुमंतासी तेव्हां॥' **०पातन**–न पाणी अथवा इतर द्रव पदार्थ याची आंच लावून वाफ करणें व त्या वाफेचें पुन्हा द्रवपदार्थांत रूपांतर करणें, या सर्व क्रियेस ऊर्ध्वपातन क्रिया म्हणतात (इ) डिस्टिलेशन ह्या क्रियेनें पदार्थाचा अर्क काढणें **०पान**–न (साकेतिक) दारू पिणें अथवा मादक पदार्थ सेवन करणें **०पुंड**–पु कपाळी लाविलेला चंदनाचा उभा टिळा, उभें गंध 'ऊर्ध्वपुंड्र भाळ। वर्मी शोभे माळ। कांपिनें कळिकाळ तया भेणें॥' –तुगा २२१४ **०बाहु**–पु सतत वर हात ठेवणाऱ्या वैराग्याचा एक पंथ **०मस्तक**–न डोक्यावरची कवटी **०मुखी गोम**–स्त्री (घोड्याच्या अंगावरील) गोमेसारखा केसांच्या भोवऱ्याचा वर वळलेला झुबका हा अशुभकारक समजतात, याच्या उलट अधो मुखी गोम **०मूर्ध**–वि वर मुख असलेला, उच्च १ (ल) देह, शरीर २ प्रपंच जगत् **०मंडल**–न (नृत्य) दोन्ही हात वर करून वाटोळे फिरणें **०रेखा-षा**–स्त्री १ तळहातावरील किंवा तळ पायावरील वर जाणारी सरळ रेष 'ऊर्ध्वरेषा पाया असती म्हणजे राज्य किंवा तीर्थयात्रा' २(गणित) लंब रेषा, उभी रेषा **०रेतस्क**–रेता–पु हनुमान, भीष्म इ० निराश्रचारी –वि नैष्ठिक, आमरण ब्रह्मचारी, ज्याचा ऊर्ध्वेहि वीर्यपात होत नाहीं असा 'तेथ वसती रान कादिक। ऊर्ध्वरेते केवळ महायोगी।' –एभा २४ २१७ 'तो राघवप्रिय विरक्त। ऊर्ध्वरेतस्क वज्रदेही॥' 'ऊर्ध्वरेत मुनीश्वरासी।' –मुच १३ ६९ **०लोक**–पु १ स्वर्ग, इहलोक २ स्वर्गांतील अनेक लोक (चंद्रलोक, ब्रह्मलोक इ०) **०वात-वायु**–ऊर्ध्व अर्थ १ व २ पहा **०वाट**–स्त्री स्वर्गाची वाट, ऊर्ध्वपंथ 'प्राणांशीं दुजा यींच्या दाउन ऊर्ध्ववाट माघारे फिरती।'–ऐपो २६९ **०स्वस्तिक**–न उत्स्वस्तिक **०संस्थ (बाहु)**–(नृत्य) पाहणाराच्या मुखा आड न येता लोंबत सोडलेले बाहू वर नेणें

**ऊर्ध्वाधर**—वि खस्वस्तिक व अध स्वस्तिक याच्याकडे टोकें असलेला, लंब, सरळ रेषेंत उभा [ऊर्ध्व+अधर]

**ऊर्ध्वासन**—न (योग) चौन्यायशीं आसनापैकीं ताठ उभे राहणें हें एक आसन [स ऊर्ध्व+आसन]

**ऊर्ध्वी**—स्त्री ऊर्ध्वनाडी पहा 'मग ऊर्ध्वीचिया रिगानिगा। पुढती तेचि शक्ति ... गा।' –ज्ञा १८ ३३७ [स ऊर्ध्व]

**ऊर्फे**—वि नाव किंवा लोकामध्यें माहीत असलेला, प्रसिद्ध नावाचा, सामान्यत, दुसऱ्या नावाचा, टोपण नावाचा, अथवा, म्हणजे उर्फ पहा 'माहे मोहरम उर्फ चैन' –गाव 'बाळाजी जनार्दन उर्फ नाना फडनीस' [अर उर्फ्–नावाचा, प्रख्यात]

**ऊर्मि-र्मी**—पुस्त्री १ लाट, उसळी, उकळी, तरंग, ल्हर (पाण्याची) 'तुका म्हणे गंगासागरसंगमीं। अवघ्या झाल्या ऊर्मी एकमय।' –तुगा ४०१६ 'आणि ऊर्मी साह।' –तुगा २ वेग, प्रवाह ३ (ल) आकस्मिक उत्कटा, इच्छा, आग, वृत्ति (मनाची) 'कि बोधऊर्मी दारुण। सद्विवेकें आवरिजे।' [स ऊर्मि]

**ऊर्मिका**—स्त्री (लहरीप्रमाणें चमकणारी) अंगठी 'उद्योत तो उत्कट ऊर्मिकाचा।' –सारह ८ १५२ [स ऊर्मि=लाट]

**ऊर्वी**—उर्वी पहा

**ऊषर**—स्त्री खाजण, खारी जमीन [स]

**ऊष्मवर्ण ऊष्मा**—पु (व्या) श, ष स या अक्षरास ही संज्ञा त्यांच्या उच्चारावरून लावतात ह उष्म म्हणजे उष्णता उत्पन्न करणार अथवा प्रखर उच्चाराचे म्हणून याना हें नाव आहे कांही ऊष्मवर्गांत 'ह' चाहि समावेश करतात [स]

**ऊष्मा**—उष्मा पहा

**ऊस, ऊंस**—पु सासर, कान्ही, खडीसाखर, गूळ इ ज्याच्या रसापासून तयार होतात अशी एक ५–६ हात उंचीची वनस्पती, ऊस हिंदुस्थानात सर्वत्र होता याच पांढरा, तांबडा, काळा, पुण्ड्या, पट्टी वगैरे प्रकार आहेत तसेंच १ साल्या=रसाळ गाळल्या जाणारा, याच्या गुळाचा उतार कमी असतो २ काड(ट)गाळ्या=...

जाणारा, याचा पुंड चमदार व रुंदार असतो ३ रोडका=जमिनी पासून वीतभर पुढा राखून तोडतात व त्यास धुमारे फुटून होणारा, याचा पुंड चिरीचा असतो उसाचा कोणताहि भाग फुकट जात नाहीं हा समशीतोष्ण आहे रस थंड असतो वेडा ऊस म्हणून एक औषधोपयोगी प्रकार आहे २ उसाचा फड, उसें पीक 'उसांत जाऊन वाडें शोध किंवा आण ' [म इक्षु पा इक्खु उच्छु हिं ऊख ] ०म्ह १ ऊस गोड लागला म्हणून मुळासकट खावा ? =एखादी गोष्ट चांगली असली म्हणून आपल्या फायद्याकरितां तिचा हवा तसा उपयोग करावा काय? ऊस गोड पण मुळ्या खाऊ=एखादा उदार भेटला म्हणून आपण त्याला माराच लुटाइ नये ऊस मुळासकट खाल्ला तर मुळापासून दाताना त्रास होऊन रक्त येतें, त्याप्रमाणें एखादा देणारा भेटला व त्याचा फार फायदा घेतला तर तोही त्रासतो २ (व ) उसापाटीं काळून=सूर्यपोटीं शनैश्चर ३ उसांत जाऊन वाडें शोधी, किंवा आणणें **उंसातळें वाड**-१ उसाचा दांडा, वाडें २ (ल ) हुषार, होतकरू मुलगा ०**रुतविणें**-उसास रस घालणें ०**साळणें**-**साजळणें**-उसाचीं पानें-पानी सोलणें

**ऊस**—स्त्री एक प्रकारची खारी माती [म ऊष-र प्रा ऊस=खारी माती ]

**ऊसदार**—न पुढील दार, त्याच्या आसपासची जागा, दाराचा प्रदेश पसदार याच्या उलट [ उमूदार ]

**ऊह-हु**—पु १ तर्क, अजमास, अंदाज, तर्कज्ञान २ परिस्थित्यनुरूप बदल केलेला ( शास्त्रवचनात वगैरे ) ऊहू अर्थ १ पहा [स ] ०**चाळणें**-प्रतिपादन करणें 'अर्थी असत्याचा बडिवारू । सद्भावें केला जो सद्गुरु । त्यासि मिथ्या नास्तिक विचारू । एकानीं नरू ऊहु चाली । ' —गभा २३ २०७

**ऊहापोह**—पु वाटाघाट साधकबाधक विचार, शहानिशा, विचारपूर्वक करावयाची योजना, काळजीपूर्वक चर्चा, विवरण 'त्या तत्त्वाचा पूर्ण ऊहापोह करून आमच्या ऋषींनी मोक्षच निर्णय केला आहे '—टि ४ १०५ [म ऊह=तर्करूप ज्ञान+अपोह=विपरीत तर्क ]

**ऊहापोहणें**—क्रि चर्चा करणें, वाटाघाट करणें 'आता व्यापकु धीं एक दशी । हे ऊहापोही जे एमी । '—ज्ञा ६ ८९

**ऊंहूं**—उद्गा छे ! नव्हे ! नको (असंमतिदर्शक) [ध्व , ऊं+हुं=हुंकार ]

**ऊळ**—स्त्री काद्याचें रोप, पातीच्या कांद्याची गड्डी [का उळ्ळि=कांदा ]

---

# ऋ

**ऋ**—मराठी वर्णमालेंतील सातवें अक्षर हें अक्षर इ स च्या ६ व्या शतकात उष्णीषविजयधारणीच्या ताडपत्रात प्रथम आढळतें वर्तमान नागरी ऋ याच आकृतीपासून बनला आहे यानंतर १० व्या शतकातील एका नेपाळी हस्तलिखित पुस्तकात व ११ व्या शतकातील काहीं लेखात ऋ दिसतो

**ऋक्**—पु चार वेदांपैकीं पहिला वेद, ऋग्वेद —स्त्री ऋग्वेदातील ऋचा, मंत्र, सूक्तातील एक भाग ०**संहिता**—स्त्री ऋग्वेदसंहिता, ऋग्वेद ग्रंथ, ऋग्वेद पहा [स ]

**ऋग्वेद**—पु चार वेदांपैकीं पहिला वेद या वेदाचीं १० मंडलें असून तीं निरनिराळ्या ऋषींच्या नांवांवर आहेत कांहीं ऋचांचें एक सूक्त व कांहीं सूक्तांचें एक मंडल अशी याची गणना आहे याची दुसरी गणना म्हणजे आठ अष्टक व ६४ अध्याय ही होय कांहीं ऋचांचा एक वर्ग, कांहीं वर्गांचा एक अध्याय, आठ अध्यायांचा एक अष्टक व असे आठ अष्टक म्हणजे ऋग्वेद. ही विभागणी अलीकडील आहे ऋग्वेदाचीं एकंदर सूक्तें १०२८ असून एकंदर ऋचा १०५८०॥ व अक्षरसंख्या ४३२००० आहे चारी वेदात ऋग्वेद मोठा आहे ऋग्वेद हा हौत्रवेद असून यज्ञांतील होता नामक ऋत्विजानें यांतील मंत्र म्हणावयाचे असतात [स ]

**ऋग्वेदी**—पु ऋग्वेदास अनुसरणारा ब्राह्मण, ज्याच्या कुलपरंपरेंत-उपनयन, विवाहादि संस्कार ऋग्वेदातील मंत्रांनीं होतात असा ब्राह्मण, ब्राह्मणवर्गांतील एक शाखा [स ]

**ऋचा**—स्त्री १ ऋग्वेदसूक्तांतील एक मंत्र, श्लोक 'बोलती निषेधनियमें । नियां ऋचा यजु गामें । '—ज्ञा १५ १६६ २ वेदांतील मंत्र 'ऋचा श्रुति स्मृति । अभेय स्वर्ग स्तवक जाती । '—दा १० ५ ८ 'ऋचेतल्या स्वराची साथ घेत स्टेजवर नाच करतो ' —नाकु ३ १२ [स ]

**ऋजु**—वि १ सरळ, प्रत्यक्ष, उजू २ (ल ) प्रामाणिक, निष्कपटी, साधा, अकृत्रिम, सच्चा [स ]

**ऋजुभुजक्षेत्र**—न ( गणित ) बहुकोणाकृति, सरळरेषाकृति [स ऋजु+भुज+क्षेत्र ]

**ऋण**—१ कर्ज, देणें, रीण, परत द्यावयाच्या बोलीनें ( सव्याज किंवा तसेंच) घतलेलें द्रव्य, इ० २ (ल ) उपकार, माणसाला पुढील तीन ऋणें असतात असें समजलें जातें-देवऋण, ऋषिऋण, पितृऋण, कोणी मनुष्यऋण असें चौथें ऋण मानितात ऋणत्रय पहा 'हें मागें पूर्वील जुनें ऋण । दवापाशीं जाण ठेविलें होतें । '—एभा २३ ४५० 'ऋण फेडावया अवतार केला । अविनाश आला आकारासी । '—तुगा १० ३ ( अंकगणित ) वाद किंवा वजा करावयाचा अंक रकम ३ ( बीजगणित ) वजाबाकीचें चिन्ह, उणें चिन्ह, *उणी संख्या, वजा करावयाची संख्या, याच्या उलट धन* ४ ( पदार्थविज्ञान ) विजेचा एक प्रकार, (इ ) ( निगेटिव्ह ) अपसारक विद्युत् धनविद्युतच्या उलट ऋणविद्युत्, जवळ असलेल्या दोन पदार्थांपैकीं एकावर ऋणवीज असेल तर दुसऱ्यावर धनवीज उत्पन्न

होणे [ स ] ०करणें–१ कर्ज काढणें. २ कर्ज करणें ०काढणें–कर्ज काढणें ०फिटणें–कर्जमुक्त होणें, उपकाराची फेड होणें 'गेलों रणांत म्हणोनि तुमचें यांचेंहि सर्व ऋण फिटलें ।' –मोगीम ११ ७४ म्ह० १ ऋण काढून सण करणें=अनुकूलता नसताहि उसन्या पैशावर लौकिक, हौस सभाळणें २ ऋणं कृत्वा घृतं पिबेत्=प्रसिद्ध नास्तिकाग्रणी चार्वाक याच्या नावानें प्रसिद्ध असलेल्या पुढील श्लोकांत हा चरण आहे 'यावज्जीवं सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्। भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ।' ( अर्थ–जीवात जीव आहे तोंपर्यंत चैन करावी ऋण काढून तूप प्यावें कारण या देहाचा भरवसा काय? जळून गेलेला देह पुन्हा मिळत नाहीं) ०करी–वि १ कर्ज देणारा, सावकार, उत्तमर्ण २ कर्ज घेणारा, देणेदार ऋणको, अधमर्ण ३ ज्यापासून कांहीं उपयोग नाहीं पण ज्याला उगीच पोसावें लागतें असा, फुकटखाऊ माणूस, आळशी, आयतखाऊ यास निर्देशें म्हणतात ४ ज्याच्याकडून आपल्याला नेहमीं मदत होते व जो सारखा आपल्यावर कृपा करीत असतो अशा माणसास कृतज्ञतादर्शक बुद्धीनें म्हणतात ०ग्रस्त–वि कर्जबाजारी, कर्जात बुडालेला ०घातकी–वि (ना) अपमानघातकी, पण वरकेवर मागें घेणारा ०चिन्ह–न (गणित) उणें चिन्ह, (–) ऋण अर्थ ३ पहा ०त्रय–न देवऋण, पितृऋण, ऋषिऋण, ऋण अर्थ १ पहा 'मी ऋणत्रयापासून निशुद्धि। मुक्त झालों भगवता।' 'प्राचीन ग्रंथांतून ऋणत्रयाची कल्पना आढळते ' –टि ४ १८८ ०दार–वि देणेदार, ऋणकरी, ऋणकरी अर्थ २ व ३ पहा ०धन–न १ कर्जाऊ, उसना घेतलेला पैसा २ उणे अधिक चिन्ह ०ध्रुव–पु ( पदार्थ विज्ञान ) ( लोहचुंबकाच्या किंवा विजेच्या ) दोन टोकांपैकीं एक टोक ( ‑ ) निगेटिव्ह पोल, धनाग्र याच्या उलट ०पद–न वजा

ऋणाईत, ऋणाईतस्वरूपी, ऋणायतस्वरूपी, ऋणायती–तस्वरूपी–पु १ (सामा ) ऋणकरी २ कांहीं उपयोग नसता पोसावा लागणारा ऋणकरी 'उगीच ऋणायतस्वरूप्यासारखे डोक्याला हात टेकून चार चौघे येथें येतात तेथें बसूं नका ' –मोर ४ ३ देणेदार, कर्जदार 'एक म्हणे हा माझा ऋणाईत। मला आपडला येथ।' –एभा २३ ३२१ म्ह० सगळी साळ्याची, अर्धी माळ्याची धनीण तेल्याची अन् ऋणाईत ब्राह्मणाची ( बायको )

ऋणादान—न १ सावकारीचा धंदा, पैसे उसने देण्याचा व्यवसाय २ कर्जवसुली, उगाणी ३ कर्जफेड [ स ऋण+आदान ]

ऋणानुबंध—पु १ चांगलें वाईट खाद्य पूर्वजन्मांतील ऋण संबंध, इष्टानिष्ट फळ देणारा पूर्वसंबंध, प्राक्तन, योगायोग, ईश्वरी सूत्र 'हा परमेश्वराच्या घरचा ऋणानुबंध ' २ स्नेहबंधन, परोपकार, मैत्री 'जन हो ! भक्तपासुनिया सुनतु त्याला पुढींच वर्जावी। सरला ऋणानुबंधचि ईशस्मरणींच वेळ योजावी॥' –वनमाली फुट–टिक [ स ऋण+अनुबंध ]

ऋणिया—वि १ कर्जदार, देणेदार, ऋणको 'परी मेघु जे होइजेल। ऋणिया तुज॥' –ज्ञा १८ ३०१ २ धनको, सावकार. 'जैसा समर्थु आणि ऋणिया। मार्गों आला याइणिया। न लोटे तेणें प्राणिया। पड तो भोगु॥' –ज्ञा १८ २५२ [ ऋण ]

ऋणी—वि १ अपराधी २ देणेदार, ऋणको 'आम्हा तू ऋणी दासींचाचि देवा। मागावया ठेवा आलों दारा॥' –तुगा १२१९ ३ ( ल ) उपकारबद्ध, उपकृत 'त्यांचे आपण ऋणी नाहीं काय ?' –टि ४ १४८

ऋत—न सत्य, खरेपणा [ स ]

ऋतु—पु १ विशिष्ट कालावधि, हवामानाप्रमाणें मानलेला

उन्हाळा, पावसाळा, हिंवाळा 'पै ऋतुत्रय आकाशीं। धरनियाही जैसें॥'-ज्ञा १४२९१ [स] ०दर्शन-न रजोदर्शन, स्त्रियास प्रथम प्राप्त होणारा ऋतु, विटाळ, न्हाण, ऋतुप्राप्ति ०दान-न संभोग, स्त्रीसमागम ''अर्धरात्रीनंतर भार्येस ऋतुदान करावें' -मुमु १७ ०पति-पु वसंतऋतु 'जैसें ऋतुपतीचें द्वार। वनश्री निरंतर। घोळगे फळभार। लावण्येंसी।'-ज्ञा ३१०० (जुनें अप रूप ऋतिपति 'फुलवरवा ऋतिपति। बोल्हिजे वृहस्पती॥' -शिशु ५१ ०पर्याय-पु ऋतूंचें परिवर्तन, अनुक्रम, ऋतूचें पुन्हा पुन्हा येणें, ऋतूत बदल ०प्राप्ति-स्त्री रजोदर्शन, ऋतु प्राप्त होणें, न्हाण, विगाळशेपण 'मुख्य मुख्य स्मृती आणि सूत्रें हुएनमागच्या वेळीं प्रचारात असून पूज्य मानीत असत या ग्रंथातून मुलीचा लग्नाचा काळ आठ वर्षापासुन ऋतुप्राप्तीपर्यंत सांगितला आहे' -टि ४११५ ०मती-स्त्री (अप रूपें-ऋतुवती-वता-वती) १ विगळशी, प्रथम ऋतु प्राप्त झालेली कन्या न्हाणोली २ विटाळ प्राप्त झाल्यापासुन १६ दिवसपर्यंत गर्भसंभव होण्यास किंवा गर्भधारणेस योग्य स्त्री, विशेषत चवथ्या दिवशीं ती अशी अवश्य भोग्य समजतात 'मंत्र व श्राद्ध सांग होऊन ऋतुमतीची इच्छाही पूर्ण होईल'-मुमु १७ ०शांति-शांत-स्त्री प्रथम रजो दर्शनसमयीं अनिष्ट मासादिकाचें दूषित फलनाशार्थ करावयाची शांति, गर्भाधानविधि 'कारण पुढें शुनाचा अस्त आहे म्हणून कुटुंबाची ऋतुशांति करून घ्या'-कफा ९ ०संपादणें-ऋतुदान करणें, संभो गणें 'दिवस पांचवा ऋतु संपादून मग जा गुरुराशी।'-पला ९२ ०स्नाता-त-वि १ विगाळशेपणानंतर स्नान करून शुद्ध झालेली २ (चुकीनें) विटाळशी ऋतुमती, रजस्वला 'ऋतुस्नात भार्या, जिला चतुर्थ दिवस त्याच दिवशीं एकादशी आली असेल तर'-मुमु १६ ३ संभोगयोग्य, उपभोग्य 'का शुनी जशी ऋतुस्नात। तिसीं भोगूं यती श्वान बहुत'-एभा १०.५२२ [स ऋतु+स्नाता, ऋतुस्नात चुकीचा प्रयोग]

ऋतूद्भव-द्रावक-वि आर्तवजनक, ऋतु प्राप्त करून देणारें (औषध वगैरे) [स ऋतु+उद्भव]

ऋत्विज-पु यज्ञयाग, होमहवन इ० कर्मे करणारा, त्यात भाग घेणारा, यजमानानें याची योजना करावयाची असते यज्ञ यागात व होमहवनात ऋत्विग्वरण नावाचा एक विधि असतो यात यजमानानें आपल्या घरीं करावयाच्या यज्ञकर्मात विशिष्टकार्मी त्या त्या ऋत्विजाची योजना करून त्यांचें पूजन करावयाचें असतें ऋत्विज अव्यंग, तरुण असावा वगैरे लक्षणें सूत्रग्रंथातुन (आश्व लायनगृह्यसूत्र १२३) दिलीं आहेत [स ऋतु+इज्=पूजा करणें]

ऋद्धि-स्त्री १ ऐश्वर्य, संपत्ति, भरभराट, समृद्धि, लक्ष्मी 'का तपोबळें ऋद्धी। पातलिया भ्रंशे बुद्धी॥'-ज्ञा ११८८ २ ऐश्वर्याचा, भरभराटीचा काळ [स] ०सिद्धी-स्त्री अव १ गणपतीच्या दोन दासी, परिचारिका, सामान्यत ऋद्धि 'ऋद्धिसिद्धिसहित महागणपतिभ्यो नम।' (विरू) ऋद्धिसिद्धि पहा २ ऋद्धि आणि सिद्धी (अष्टमहासिद्धी), संपत्ति आणि यश

ऋषभ-१ बैल, पोळ, वसु २ (संगीत)(शुद्ध) सात स्वरांपैकी दुसरा स्वर, सा, रे, ग, पैकीं रे हा स्वर स्वरसप्तक पहा -वि श्रेष्ठ उ० पुरुषर्षभ 'व्यथा न देती पुरुषा हे जया पुरुषर्षभा।' -गीता २१५ [स]

ऋषि-पु १ तपश्चर्यादि पुण्यकर्माचे ठिकाणीं ज्याची सतत पूर्ण निष्ठा असून ज्याचीं वचनें ईश्वरवचनाप्रमाणें लोक मानतात असा साधु, ऋषींमध्यें कश्यप, अत्रि इत्यादि सात ऋषी प्रसिद्ध आहेत ऋषींमध्यें काहीं वेदमंत्रद्रष्टे (मंत्ररचना करणारे) आहेत ऋषींचे पुढील सात प्रकार आढळतात-देवर्षि, ब्रह्मर्षि, राजर्षि हे तीन मुख्य आहेत महर्षि परमर्षि, श्रुतर्षि व काण्डर्षि हे चार कोणी मानतात (सामा) तपस्वी, मुनि, योगी २ सात्त्विक माणूस, देवमाणूस, शुद्ध आचरणाचा, धार्मिक माणूस [स] म्ह० नदीचें मूळ आणि ऋषीचें कूळ पाहू नये (केवढीहि मोठी नदी असली तरी तिचा उगम एखाद्या ओहोळापासून झालेला असतो, तसेंच पुष्कळ ऋषींचा जन्म जारज किंवा हीन कुळात झाला असल्याच्या महाभारत वगैरे ग्रंथातून कथा आहेत, म्हणून त्याचें मूळ शोधूं नये, कारण तें अनादराचें कारण होतें) एखाद्या गोष्टीचा अधिक छडा लावीत न बसता चालू गोष्टीकडे लक्ष द्यावें या अर्थी उपयोग ०ऋण-न मनुष्यप्राण्याला असलेल्या ऋण त्रयापैकीं एक ऋण, दुसरीं दोन-देवऋण व पितृऋण होत ऋषितर्पण व वेदाध्ययन यानीं ऋषिऋण फिटतें ०धान्य-न मुद्दाम उठाठेव करून पिकविलेल्या धान्याशिवाय सावे, वरी, देवभात वगैरे किरकोळ धान्यापैकीं धान्य ०पंचमी-स्त्री भाद्रपद शुद्ध पंचमी, या दिवशीं अरुंधतीसह सात ऋषींची पूजा करतात हें व्रत सर्व स्त्रियानीं, विगाळशी असताना चुकून घरात काहीं वस्तूस स्पर्श झाल्यास तो दोष नाहींसा होण्यासाठीं करावयाचें असतें या दिवशीं स्त्रियानीं बैलाच्या श्रमानें तयार झालेला कोणताहि पदार्थ खावयाचा नसतो ०मार्ग-पु शास्त्रविहित आचार, वर्तन, शुद्ध, सात्त्विक वर्तन, निषिद्ध, अन्याय्य कर्मे लाभ होत असताहि सर्वथा न करणें ०मार्गी-वि शुद्ध वर्तन ठेवणारा, ऋषि मार्गानें जाणारा ०यज्ञ-पु पंचमहायज्ञापैकीं एक यज्ञ, ब्रह्मयज्ञ इतर यज्ञामध्यें प्रत्यक्ष अवदान किंवा बलिदान असतें परंतु या यज्ञात ऋषिप्रीत्यर्थ वेदाध्ययन करणें हेंच हवन होय ०संख्या, सख्याक-वि सात ही संख्या सात ऋषींवरून ही संज्ञा पडली आहे 'खदिरवृक्षाचे ऋषिसंख्याक। पळसाचे ऋषिसंख्याक। एसियां परि सम्यक। यज्ञक्रिया अवगमिजे॥'-ज्ञे ९२ ४९

ऋषेश्वराचा कारभार-पु दिरंगाईचा, गोंधळाचा, अव्यवस्थित चालणारा कारभार [ऋष्यरूप ऋषीश्वर]

ऋष्टि-स्त्री लढाईचें एक शस्त्र, तरवार किंवा भाला -हिंदव २० [स]

ऋक्ष-पु अस्वल, रीस -न एक तारकापुंज [स]

**एककरपद्धति**—स्त्री (अर्थशास्त्र) सर्व कर काढून टाकून फक्त जमिनीच्या उत्पन्नावरच कर बसविण्याचें तत्त्व, म्हणजे सर्व करांचें एकीकरण, (इं) सिंगल टॅक्स या तत्त्वाचा हेन्री जॉर्ज (१८४९–९३) या अमेरिकन अर्थशास्त्रज्ञानें प्रथम पुरस्कार केला.

**एककली-ल्ली**—वि १ हेकेखोर, संकुचित मनाचा, एकाच ठराविक मताला, सवयींना, पद्धतींना किंवा गोष्टींना अगदीं हटानें चिकटून राहणारा, प्रसंगानुसार वागण्याचें ज्ञान नसलेला, कोत्या मनाचा २ (पाठ करणें, तर्क करणें, हिशेब करणें कवन करणें इ० पैकीं) एकाच विषयाकडे स्वाभाविक कल किंवा बुद्धि असलेला, एकांगी, एकदेशीय [एक+कल]

**एककांदालसूण**—पु स्त्री एकच कुडी असलेला, एक प्रकारचा लसूण (हींत निरनिराळया कुड्या, पाकळ्या नसून, एकच गड्डा असतो) [एक+कांदा+लसूण]

**एककानी**—वि एक कानाचा असलेला (वदक) [एक+काना]

**एककामी**—वि एकच काम करण्यास लायक, हरकामीच्या उलट

**एककार**—पु १ जुळणी, जोडणी, मिसळणी २ गर्दी, गुतागुत, गोंधळ, गोल्वार एकाकार पहा —वि एकरूप, समान, एकसारखा, एकाकार 'राव रक समसमान उचनीच एककारी' —परा ६५ [शुद्ध रूप एकाकार]

**एककालिक, एककालीन**—वि समकालीन, एकाच वेळचें, एका वेळीं झालेलें आलेलें, समवयस्क, समशिक्षित, (इं) कौंटेम्पोररी [सं]

**एककाटा**—क्रिवि (नागपुरीरूप एकखटा) एकत्र, एका ठिकाणीं वस्तू आखवद, घाऊक, टोक, वट [सं एक+कृत-च]

**एकखती-खेती**—वि दुसऱ्या, विजातीय रंगाची एकेरी छडी, रेघ, सळई उठविलेला (रेशमी खण, लुगडें) [म एक+अर खत=रेघा, रेघ]

**एकखांबी**—वि १ एकाच खांबावर उभा असलेला (तंबू घर वगैरे) २ (ल) एकटाच कर्ता पुरुष असलेलें (कुटुंब, घर) [एक+खांब] म्ह० एका खांबावर द्वारकाऱ्या कुटुंबात फक्त एकच कर्ता माणूस राहिला आहे त्यास लावतात

**एकखेप**—क्रिवि एकपाळी, एकवार, पुन्हा एकदा [एक+खेप]

**एकग**—पु काठीचा खेळ 'एकग लकडी, फरीगदका, लाटीचे हात व कवाईत (विद्यार्थ्यांकडून) करून घ्यावी' —सव्या ५२

**एकगजब**—पु एकगर्दी, गोंधळ, हल्लकल्लोळ गजर पहा [एक+अर गजब्]

**एकगजर**—स्त्री एकत्रित जोराचा आवाज, शोरड, आरडाओरड, कल्ला, गल्ला [एक+गजर]

**एकगट्ट-गट्टू**—क्रिवि १ एकत्र, एका ठिकाणीं, सर्व मिळून २ एक झुंडीनें, सर्व एकत्रित होऊन, सप कमन [एक+गट]

**एकगोळी**—वि अखंडखुरी, खूर विभागले नाहींत असा (घोडा) 'त्याच्या (घोड्याच्या) पायाचा आकार मूळचाच चांगला असून एकगोळी पसरट खुराच्या योगानें पाय फार सुंदर दिसतात' —मराठी तिसरें पुस्तक (१८७३) १०६ [एक+गोळ]

**एकगोत्री**—वि सगोत्री, एकच गोत्र असलेले, परस्पर [एक+गोत्र]

**एकचएक**—वि केवळ एक, अगदीं एक, निव्वळ एक, दुसरें जोडीला नाहीं असें 'माझें एकचएक पागोटें तें तुला देऊन काय करू?' [एक द्वि]

**एकचढ**—वि वरचढ, एकाहून एक श्रेष्ठ ०एक–एकावर एक ताण 'काय एकाचढी एक कारटीं निपजलीं आहेत' —भा ४४ [एक+चढणें]

**एकचर**—वि एकलकोंडा, एकटा फिरणारा, तुटक राहणारा, याच्या उलट अनेकचर [स एक+चर]

**एकचाकी गाडी**—स्त्री एक चाक असलेली गाडी, ढकलगाडी, रस्त्यातून माल विकणाराची गाडी

**एकचार**—पु १ (गा) एकी २ (गु) संकर, मिश्रण [एक+आचार]

**एकचाल-ली**—वि १ एका चालीचा, सवयीचा, रागाचा (गाण्यात) धाटणीचा २ एकमार्गी, एखाद्या ठराविक मताला, सवयींना, पद्धतींना चिकटून बसणारा, एककली ३ सरळ, प्रामाणिक, छक्केपंजे माहीत नसणारा [एक+चाल]

**एकचित्त**—वि १ एक मताचें, एकमेकाशीं जुळणारें, सर्व संमत २ एकाग्र, सावधान, लक्षपूर्वक —न १ एकाग्र असणारें चित्त, ऐकमत्य, सर्वांची एकदम तयारी २ (ल) जेवणास बसलेली मंडळी उठताना सर्व एकदम जेऊन उठतात त्यावेळीं सर्वांचें जेवण झालें काय या अर्थी एकचित्त झालें काय? असें विचारतात 'सर्वांचें भोजन सपलें असें पाहून नैमित्तिक गोटगस्ते कामदार यानीं एकचित्त जाहल्याबद्दल हात जोडून श्रीमंतास कळविलें म्हणजे श्रीमंत स्वारी स्वाऱ्या हात धुऊन दिवानखान्याच्या बाहेर जातात —ऐराप्र २ १७ [सं एक+चित्त]

**एकछत्री**—वि एकाच राजाच्या किंवा मालकाच्या ताब्यांतील, अधिकारातील, एकतंत्री, एकसत्ताक (कारभार, राज्य इ०) ०राज्य–न १ एका सार्वभौमाच्या सत्तेखालचा अमल, प्रदेश, ज्या प्रदेशावर दुसऱ्या कोणाची सत्ता नाहीं असा प्रदेश 'हें भरतखंड इंग्लिश लोकांच्या एकछत्री राज्याखालीं आहे' —के २(१) एकजण करील ती पूर्वदिशा [स एक+छत्र]

**एकजती एकमती**—स्त्री एकमत, एकी, एकोपा (अनेक व्यक्तींमध्यें), पूर्ण मतैक्य, अविभक्तता 'एकमती असल्यावांचून

आम्ही गहाण ठेवणार नाहीं ' –क्रिवि एकमतानें, एकजुटीनें 'हा रोखा एकमती लिहून दिला सही ' जतीमती पहा [एक+जमणें,+मत]

**एकजथा**—पु एकत्व, संहति, एकोपा ( जातीचा किंवा कुळाचा ), एकजूट, एकजात –क्रिवि ( गु एकजथे ) एक गट्टा, पाऊक, ठोक [ एक+जथा ]

**एकजन्मी**—वि १ सबंध आयुष्यभर पुरणारें, अतिशय टिकाऊ पुष्कळ काळ चालणारें २ आयुष्यांत एकदाच केलेलें, ज्याची जन्मात पुनरावृत्ति होत नाहीं असें ३ जें करण्याला, पार पाडण्याला सबंध आयुष्य लागतें असें [ सं एक+जन्म ]

**एकजरा**—क्रिवि अणुमात्रहि, यत्किंचितसुद्धा 'यारा तफावत एकजरा न करणें –रा ८ १५९ [ फा यक्+झर्रा ]

**एकजात**—वि १ एकाच जातीचा, मनुष्याचा, एकसारखा 'एकजात पक्षी पानें घेऊन ये, म्हणजे हिरवें एकहि नमावें ' २ (ल) सजातीयात निर्भेळ, चांगलें, 'अरे वाण्या ! हें तूप वाईट दिसतें ? नाहीं महाराज एकजात तूप आहे ' ३ सुंदर 'मुलगी मात्र एकजात आहे ' ४ सजातीय, एकापासून उत्पन्न झालेलें ( बंधु बांधव ) –क्रिवि निव्वळ, केवळ, सर्व एकच [ सं एक+जाति ]

**एकजातीय**—वि एक प्रकारचें, तऱ्हेचें जातीचें, वर्णाचें एकजात अर्थ १ पहा

**एकजिनस-सी**—वि एकाच प्रकारचा, तऱ्हेचा, एकजात ( माल, वस्तु वगैरे ) [ एक+जिनस ]

**एकजीव**—वि पूर्ण मिसळलेलें, पूर्ण एक झालेलें (क्रि० होणें) 'नारळाचा चव उकळत्या दुधात घातला म्हणजे त्या दोहोंचा एक जीव होऊन जातो ' [ एक+जीव ]

**एकजूट**—स्त्री एकी, मिश्रण, एकोपा, एकजथा, –क्रिवि एकमतानें, एकोप्यानें [ एक+जूट ]

**एकझडपी**—वि एकच फळी किंवा झडप आहे असें ( दार, खिडकी ) [ एक+झडप ]

**एकट-एकटका**—क्रिवि एकटा, दुसरा कोणी बरोबर नसताना, एकला झालिया राज्यलोट । चोराकुलित होईल वाट । कोणी नवनावें एकट । अवघी एकवाट करावी । ' –एभा ३० ३५९ 'सदनीं एकट कनरस्ता । राघवराणी ते सीता ।' –निमा ( निर्वोट राघव ) १४ 'हिंडे मागें भ्रमोनि एकटका । ' –मोआदि ३१ ३६ [ एक+ट प्रत्यय ]

**एकटक-एकटक**—क्रिवि सतत, एकसारखें, खळ न पडता ( पाहणें, रडणें, बर्षणें ) टक पहा [ एक+टक ]

**एकटणें**—अक्रि १ एकवटणें, एकत्र करणें, वेंचणें, गोळा करणें, (फुलें, धान्य इ ) २ (व) जीव एकटणें (एकाकून येणें), कासावीस होणें, गुदमरून येणें एकटणें पहा ३ गर्दी होणें, एकत्र होणें, सरमिसळ होणें, मिसळणें [ एक+ट ]

**एकटदुकट**—क्रिवि एखाच (बहुतेक एकटा, क्वचित् दुक्का), एखादुसरा 'या वाटेनें एकटदुकट चोर फिरतात-फिरतो' [ एकटा+दुक्टा ]

**एकटप्पी-प्या**—वि एक टपाचा, आतील किंवा खालचा टप ( कल्प्त ) आणि वरील टप यापैकीं कोणता तरी एक टप असलेला ( तट्टू ) [ एक+टप ]

**एकटा**—वि एकला, दुसरा कोणी बरोबर नाहीं असा, सोबत नाहीं असा म्हृ० एकट्याची एकवाट=एकटा असला म्हणजे चाहील तो किंवा एखएक मार्गे राहता, एकटा काहींहि करण्यास स्वतंत्र असतो अशा अर्थानें [ एक+ट प्रत्यय ]

**एकटाकी**—वि १ एका आकाराचा, घाटाचा, रंगाचा, (ग्रामा.) एका स्वरूपाचा २ एकाच मनुष्यानें एकाच टाकानें लिहिलें असता सारख्या वळणाचें दिसणारें ( अक्षर ), किंवा अशा अक्षराचा ( लेख, पुस्तक) ३ एकच टाका दिलेला (द्रोण इ ) [ एक+टक ] ०मोर्तब –पु हात न उचलता लिहिलेला मोर्तब 'हा शब्द एकटाकी मोर्तबानें लिही '

**एकटांग्या**—वि ( व ) १ एक पाय असलेला, एका दिशेनें जाणारा २ ( ल ) एकाकी ( मनुष्य ) [ एक+टांग=पाय ]

**एकटादुकटा**—क्रिवि एकट्यादुक्ट्याचा, एकट्यादुक्ट्यानें अशीं रूपें आढळतात एकटदुकट पहा

**एकटा टिकोजी, एकटा प्राणी, एकटा एकखुरा**—पु १ फटिंग, एकलकोंडा, एकली, माणूसघाण्या २ ब्रह्मचारी, प्रपंच नसणारा मनुष्य

**एकटिका**—क्रिवि एकट, एकटका पहा 'तो गाता तरि एक टिका । परि स्वरें पुरता नीका ॥ ' –शिशु १६८ [ एक+ट+क ]

**एकठय, एकठाय, एकठावण एकठें**—क्रिवि (हिट कु गो ) एकाच ठिकाणीं, एका स्थळीं, एकत्र (क्रि० करणें) [ एक+ठाय–व, गु एकटु, हिं एकठा ]

**एकठोक**—क्रिवि १ सर्व एकत्र, सरसकट, एकदम २घाऊक, एकमुष्ठ, ठोकळ, किरकोळ नव्हे असें [ एक+ठोक ]

**एकडकाठी**—स्त्री (विणकाम) हातमागावरील ओव्या किंवा वह्या ज्याला टांगावयाच्या असतीं घनुकी किंवा गज, टेंकणी, कपाळ काठी [ एक+ड+काठी ]

**एकडा**—पु एक, एकाचा आकडा [ एक ]

**एकडाल तान**—स्त्री ( संगीत ) स्वरक्रमात बदल न करता मंद अथवा मध्य सप्तकातील स्वरापासून आरंभ करून निदान सात स्वरांची घेतलेली तान [ एक+डाल+तान ]

**एकडोळसा**—न ( कु ) एक जातीचा मासा [ एक+डोळा ]

**एकडोळा**—पु १ एक डोळा २ ( ल ) एकुलता एक मुलगा म्हृ० 'एक डोळा तो का डोळा म्हणावा ? '=एकच मुलगा असला तर त्याला संतति म्हणता येईल काय ? –वि एकच डोळा असलेला,

**एकडोळी करोटी-करवंटी**—स्त्री एक डोळा (भोंक) असलेली, शेंडीकडील बाजूची, करवंटी, नरोटी

**एकतंड**—क्रिवि (व) एकसारखा, सतत एकतत पहा 'एक तड पधरा दिवस ताप आला ' [म एक+तार]

**एकतंत**—क्रिवि अखंड, एकसारखा, सतत (वळ, जागा, क्रिया इ०) [एक+तन्–तनु]

**एकतंत्र**—क्रिवि एकदम, एका वेळीं, एकाच साधनानें, एक-सुत्री, एकसाधनी (अनेक गोष्टी करणें) –वि एकमताक, एक सुत्री, एकमुखी एकतंत्री पहा 'सर्व कारभार एकतंत्र करण्याची जी इच्छा कामगारांची हौस आहे '–टि १ १२२ [स एक+तंत्र]

**एकतंत्री**—वि १ एकाच सत्तेनें, साधनानें अनेक कामें पार पाडणारें, एकाच तनानें चालणारें, एका हातीं, एक मार्गी, एकतंत्र २ (ल)(चांगल्या अर्थी) सुरळीत, व्यवस्थित ३ (ल) (वाईट अर्थी) अनियंत्रित, स्वैर, जुलुमी [एक+तंत्र]

**एकतत्त्ववाद**—पु. अद्वैत, जगात एकच सत्य स्वरूप आहे, मग तें भौतिक असो अगर आध्यात्मिक असो असा सिद्धांत, प्लोटि नस, स्पिनोझा, शॉपेनहार हे एकतत्त्ववादाचे पुरस्कर्ते आहेत, याच्या विरुद्ध द्वितत्त्व-बहुतत्त्ववाद [स एक+तत्त्व+वाद]

**एकतत्त्वीं**—क्रिवि एका बाबतींत, एका गोष्टींत, एका ठिकाणीं, एका मुद्यावर (जीव धरणें, मन लावणें, अनुसंधान धरणें, चित्त देणें इ०) [एक+तत्त्व]

**एकतया**—क्रिवि एकाग्रपणें, एकचित्तानें 'त्याचीं नामें कोण कोण। तही एक एकतया।'–मुआदि १४ २५ [स]

**एकतरफा**—वि १ एक धन्याचा, राजाचा (प्रदेश) २ एका बाजूचा, पक्षपाती एकदेशीय (विधान) –क्रिवि १ एका बाजूस, एका भागीं 'एकतरफा वस्ती आहे ' 'एकतरफा फौज उभी आहे ' २ एके बाजूचा, प्रतिपक्षी हजर नसताना (न्याय) [स एक+अर तर्फ=ताल्लुका, पट्टा, फा तरफ=बाजू, दिशा]

**एकतरफी, एकतर्फी**—वि एका बाजूचा, पक्षपातीपणाचा, एकतरफा पहा ०इन्साफ-निकाल–पु प्रतिपक्षी हजर नसता किंवा त्याची बाजू पुढें न येता एका बाजूनें दिलेला निकाल सामाशब्द–एकतर्फी कज्जा-चौकशी-जामीन-पंच-पंचाईत पाटिलकी-पुरावा फैसल-बोलणें-मजकूर-मोकद्दमा-वाद-साक्ष-साक्षी-हिस्सा-इ० 'या दुसऱ्या मुद्याकडे प्रकृत निबंधात फारसें लक्ष दिलें नाहीं त्यामुळें हाडींचा लेख जरा एकतर्फी झाला आहे '–टि ४ ११७ [एक+अर तर्फ]

**एकतऱ्हा**—स्त्री एक (विचित्र, चमत्कारिक, नवीन) प्रकार, रीत, धाटणी, पद्धत 'वाल्याची एक तऱ्हा आहे ' [स एक+अर. तर्ह, फा तऱ्हा]

**एकतऱ्हेचा**—वि वेगळ्या प्रकारचा, चमत्कारिक, विचित्र, विक्षिप्त [एक+तऱ्हा]

**एकता**—स्त्री एकोपा, एकी, ऐक्य, एकरूपता, सारूप्य 'न भिन्न तनु त्या भले भजति एकता पाहुनी '–केका १०८ [स]

**एकताटी-ट्या**—वि १ एकाच ताटातील, एकाच ताटात जेवणारे २ (ल) एकाच जातीचे, समानधर्मी, समान आचाराचे

**एकताटीं जेवणें**–कि १ एकाच ताटात जेवणें, एका ठिकाणीं जेवणें २ (ल) अतीं सलोख्यानें असणें, भेदभाव न ठेवणें म्ह० एक ताटीं जेवणें आणि घास मोजणें=वरवर प्रेम दाखवून आतून मत्सर करणें [एक+ताट]

**एकतान**—वि एकाग्र, लक्षपूर्वक, एकाच गोष्टीकडे मन लागून असलेले जसें-गायनैकतान, शृगारैकतान, भजनैकतान, अध्ययनैकतान, विषयैकतान परमार्थैकतान, सत्कर्मैकतान [एक+तान]

**एकतानता, एकतानपणा**—स्त्रीपु एकाग्रता, अनन्यवृत्ति 'वेळ आपल्या गतीनें एकसारखा एकतानपणें जातच असतो '–वज्राघात ११३

**एकतार, एकतारा-री**—वि १ एका-एकेरी तारेचा, एक धाग्याचा, दोन धागे पिळून दुहेरी न केलेल्या धाग्याचा (विण लेला पितांबर, वस्त्र वगैरे) २ एका नमुन्याचें, फम्याचें, मजकुराचें, एकसारखें, एकाच प्रकारचें 'मग वैसा केला विचार। पत्रें लिहिलीं एकच तार।'–ऐपो १०६ ३ एकचएक, तेंचतेंच, कटाळ वाणें [एक+तार]

**एकतारा-री**—पुस्त्री विण्यासारखें एकतंतुवाद्य याचा भोपळा गोल व चापट असतो, दांडी कळकाची असून इच-सव्वा इंच व्यासाची व दोन तीन फूट लांबीचा गोल असते भोपळा एका बाजूनें कातडयानें मढविलेला असतो घोडी भोपळ्याच्या मध्य भागीं लावतात दांडीला एक खुंटी लावून तिला एक तार गुंडाळलेली असून ती घड्जात लावलेली असते ती घोडीवरून भोपळ्याच्या बुडाशी जो दांडीचा भाग असतो त्यास लावलेल्या बारीक खुंटीस *खिळविलात भजनी लोक, गोसावी, भिकारी, वगैरे गाताना या* वाद्याचा उपयोग करतात [स एक+तार गु एकतारु]

**एकताल**—पु एका तालाचें नाव, यात मात्रा बारा व विभाग सहा आहेत 'मंगलाचरणाला एक चीजाचा एकताल आणि भरत वाक्याला रुद्रताल हा ठरलेला '–भा ३८ [स एक+ताल]

**एकताल-ली**—वि १ (संगीत) एक तालाचा (ध्रुपद इ०) २ ज्यातून एकच नाद निघतो असें वाद्य (तास, झागट इ०)

**एकतालामण**—पु (व्यापार) एक माप या मणानें वजन सुर्ती १५४० रुपय भार असतें –मुव्या ६ [एक+ताला+मण]

**एकताळीस**—(हिं) एकचाळीस पहा

**एकतीस**—वि ३१ संख्या [स एकत्रिंशत्, प्रा एक्तीस, एक+तीस तुल० सिं एकतिह]

**एकतुक**—वि एकटा, एकला, एकाकी 'अशीग मी सतारी एक तुरा। खर्चे नाहीं केला रुका।'—पला ४ २० [एकटवा अप]

**एकतुरा**—वि सारखें, समान, सदृश 'ऐसें एकतुरें पाच मौतिक। पडती बहुवस टाक।'—ज्ञा ७ २५ [एक+तुरणें]

**एकतोंडी**—वि एका बाजूस तोंड असलेला, मोकळा असलेला, दुतोंडीच्या उलट —क्रिवि एका बाजूनें, विरुद्ध बाजूस कोणी नसताना, एकांगी (वाद, तक्रार, पुरावा, वैगैरे) **एकतोंड** करणें-तोंड देणें, समोर होणें, दजवात करणें

**एकत्र**—क्रिवि १ एका जागीं, एका ठिकाणीं, मिळून २ अवि भक्त (बधु इ० मी सरासरात), भागीदारीनें ३ एकीकडे, एका बाजूस 'एकत्र केशव वसे अपरत्र वैरी। अन्यत्र पर्वत शतक्रतु भीत मारी।'—नीतिशतक १८ [स] ०**कुटुंब**—न (कायदा) मूळ एखाद्या पुरुषापासून जो वंशविस्तार झालेला असतो त्या वंशातील पुरुष त्याच्या बायका व अविवाहित मुली असें सर्व मिळून एक बनलेलें कुटुंब ०**कुटुंबपद्धति**—स्त्री वाटणी वगैरे न करता सर्वांनीं एकत्र राहण्याची पद्धति

**एकथाट**—पु सारखी, एक प्रकारची व्यवस्था, चाल, रीत, मांडणी [एक+थाट]

**एकथोक-प**—क्रिवि १ एकदम एका वेळीं सर्व (घेणें, थोडें थोडें अनेक वार न घेता), एक रास २ घाऊक, सरसकट, उक्ता, एकठोक [एक+ठोक, एक+थाप-थोप]

**एकदट**—क्रिवि एकदम, एकमेकास लागून, एका ओळीनें, एकत्र 'तव डौंडीची घीरघटा। सनसनिती जेंगटा। वाजिताती एकदटा। एकेचि वेळें।'—शिशु ५२२ [एक+दाटणें]

**एकदंत**—पु गणपति, गजानन, विनायक 'नमन श्री एक दंता। एकपणें तूंचि आता।'—एभा १ २ 'प्रथम नमन तुज एक दंता। रंगीं रसाळ नोव्हीं कथा।'—तुगा ४१९३ [स एक+दन्त]

**एकदम**—क्रिवि १ तावडतोब, तत्क्षणीं, अकस्मात, थट विलंब न लावता, न थांबता, विसावा न घेता २ एका पर्यायात एका दमात, एका सपाट्यात, खेपेंत 'मला त्याणीं एकदम लाख रुपये दिले' ३ एका वेळीं, एकसमयावच्छेदेंकरून 'एकदम हजार गोळा उडतो असें एक यत्र करावयाचें आहे' [एक+दम, फा यक्+दम्=क्षणैक, तुल० स एकपदम्]

**एकंदर**—स्त्रीन १ एकत्र करणें, एकवट करणें, एक ठिकाणीं आणणें, बेरीज, मिळवणी २ स्नेह सोबत संगत मैत्री —वि क्रिवि १ एकत्र, जुगीत, सहवासात, मिश्रणात 'तरी वैराग्याचेनि आधारें। निर्हीं विषय दवडूनि बाहिरें। शरीरें एकदरें। करें मन।'—ज्ञा ५ १५१ 'तादूळ आणि डाळ एकदर केली म्हणजे खिचडी होते' २ एक रकमी सर्व, एकत्र करून, एकदम जसें—एकदर जमा-आवार-ताळा-पत्रक-पर्ती, एकदरीचा हिशोब—बेरीज-वही ३ सर्वांनीं मिळून, एका सपानें, एका ताफ्यात, एक वट 'सारीं ओषधें एकदर कुटून मग बाधा' ४ ठोक, एकूण, एक गठ्ठी, एक गोळा ५ पुन्हा पुन्हा करण्याचें कारण न ठेविता, एक वार, एकदाच (ताकीद, इशारा वगैरे) 'याप्रमाणें वर्तावें म्हणून त्यास एकदर ताकीद केली आहे' ६ (नकारात्मक) कधींहि नाहीं, बिलकूल, केव्हाहि अशक्य या अर्थानें 'तू माझ्या घरीं एकदर येऊ नको' =कधींहि, केव्हाहि येऊ नको —पया ४८५. —स ११७६ [स एकत्र] ०**वट**—क्रिवि सर्व मिळून एकत्र, एकरकमी, एकजिनसी रास, एक जुगीनें, मेळ्यानें, समूहानें ०**ची सरासरी**—स्त्री वरजाची सगसरी (एखाद्या मोठ्या हिशो बाच्या) ०**भाव**—पु सरासरी दर, किंमत ०**विक्री**—स्त्री घाऊक, ठोक, एकदम, एकजिनसी विक्री

**एकंदर**—न प्रत्यक्ष न होता परपरनें झालेला, अप्रत्यक्ष सबध, स्पर्श विटाळ 'या सुतक्याचें मला एकदर झालें म्हणून मी स्नान करतों' [स. एक+अतर, हिं अदर]

**एकंदरी**—स्त्री १ एकूण, बेरीज, सर्व मिळवणी, हाशील २ (गो) साराश, तात्पर्य

**एकंदरींत**—क्रिवि शेवटीं, अखेरीस, थोडक्यात, साराश

**एकदल**—वि (विरु) एकदळ एकपानाचें, एक पाकळीचें (झाड, फूल इ०) [स एक+दल]

**एकदशांश मीटर**—पु मीटरचा दहावा हिस्सा (मीटर= ३·९३७ इंच), (इ) डेसीमीटर [स एकदशांश+इ मीटर]

**एकदा-दां**—क्रिवि १ एकेकाळीं, एकेवेळीं २ एकदम, एकसमयावच्छेदेंकरून, युगपत ३ एकवार, एकवेळ, पुन्हा नाहीं अशा रीतीनें [स] **एकदाचा**—कसेंतरी, कसेंबसें, सायासानें, एकवार, फक्त एकवेळ (पुन्हा कधींहि नाहीं) (क्रि० होणें, करणें इ०) 'एक दाचें लग्न झालें म्हणजे सुटलों' 'ता एकदाचा तेथें पावला म्हणजे झालें' 'हें काम एकदाचें सपलें म्हणजे जन्माचें सार्थक झालें' 'एकदाची टाळी वाजली' [स एकधा]

**एकदाणा**—पु (तजावर) एक खड्याची नाकातील चमकी, मुगवट [एक+दाणा]

**एकदाणी**—वि सर्व दाणे एकसारखे असलेलें (धान्य) 'कुणब्या जवळील दाणा एकदाणी असता'—गागा १४६ —स्त्री सोन्याचे साधारणत चाळीस मणी सोन्याच्या कड्यानीं माळरूपानें गुंफून त्या माळेच्या दोन्ही टोकास गाफाचे तुकडे लावलेले असतात व त्याच्या शेवटीं सोन्याचे फासे असतात अशी माळ, एकेरी मण्याची माळ एक पातीचा व एक सोन्याचा मणि ओवलेली माळ [एक+दाणा]

**एकदाणें**—न एकदाणी माळ; एक प्रकारची माळ; यांत काचेच्या पोतीमध्यें मधोमध एक सोन्याचा मणी असतो. 'एकदाण्याची सरखुशी तन्हा सादर।' –अफला ५५ [एक+दाणा]

**एकदिग्गत**—वि. एकाच दिशेनें गेलेला. [सं. एक+दिक्+गत] ०समांतर रेषा–स्त्री एका बाजूकडे जाणाऱ्या समांतर रेषा

**एकदिग्गामी**—वि. एकाच दिशेनें जाणारा [सं] ०प्रेरणा–स्त्री (यंत्र.) एकाच दिशेकडे कार्य करणारी प्रेरणा, शक्ति; सरूप प्रेरणा. (इं.) लाइक फोर्सेस, याच्या उलट भिन्नदिग्गामी किंवा विरूप प्रेरणा. –यंस्थि ३४. [सं. एक+दिक्+गम्]

**एकदिन-दिवस**—क्रिवि. एके दिवशीं; कधीं तरी. 'एकदिन जानारे भाई। सबसे राम भजन करलेना ॥' [एक+दिन, दिवस]

**एकदिल-दील**—वि. एक मतांचा, एक विचारांचा (स्नेही), एकचित्त; एकनिष्ठ 'श्रीमंत व नबाव एकदील, तेव्हां हैदरखानाचा मक्कूर किती आहे.' –रा ६.२८९८. 'नऊ लाख सैन्य एकदिल घोडा शिरा। तीस हजार अबदागिरी बरोबर चाले ढिगारा ॥' –ऐपो १११ –पु स्नेह, ऐकमत्य; संतोष. 'फौजेचा एकदील करून .. पनाचें उत्तर जरवेचें आलें असता इकडूनहि सरन्जाम जावयास दिवसगत लागणार नाहीं.' –ख ११ २१०२. [फा. यक्+दिल्]

**एकदिली**—स्त्री. स्नेह, ऐकमत्य, एकदिल पहा. 'सल्दुख एक दिली आहे.' –दिमरा १.१२३ [फा. यक्+दिली]

**एकदी**—क्रिवि. (व.) परवां; नुकतेंच, एक दिवस [एक+दिन, दिवस अप]

**एकदीस**—क्रिवि. (कुण. गो) एके दिवशीं. 'एकदीस मेल्यार कोणतरी रडतलो, सदा मेल्यार कोण रडता' =कोणतीहि गोष्ट नेहमींचीच झाली म्हणजे कोणी काळजी करीत नाहीं. [एक+दिवस अप.]

**एकदुःखसुख**—वि. सुखदुःखांत वांटेकरी असणारे, समसुख दुःखी; ज्याचें सुखदुःख एक आहे असे [सं. एक+दुःख+सुख]

- **एकदुःखी**—वि. समदुःखी. [एक+दुःख]

**एकदेश**—पु. एक अंश, एक पक्ष, एक भाग. 'गळा पडति ज्याचिया तवगुणैकदेश भ्रमें। तिहीं तुजचि दाविता भजति वा! तुला संभ्रमें।' –केका ३२. [एक+देश]

**एकदेशतः**—क्रिवि. एकपक्षीं. 'वरील निरूपण केवळ एकदेशत झालें.' –नि ५२. [सं.]

**एकदेशित्व**—न मर्यादित्व; संकुचितता. 'तो मी हृदयामाजीं भरें। देहीं एकदेशित्व मज नसे। जगदाकारें मीचि भासें। जेवीं कल्लोळें विलासे सागरू ॥' –एभा २१.२८६.

**एकदेशी**—वि. १ एकाच देशाचे, समदेशी. २ पूर्णपणें लागू न पडणारें; एकांगी, मर्यादित, एकपक्षी (दृष्टांत, उपमा, तर्क इ०). 'भगा एकदेशी दृष्टांत। दृष्टांत थोर असे वर्तत ॥' –विपू ५.३८ ३ एकाच बाजूचें; एकपक्षीय (विचार, विधान इ०). ४ आपल्या विरुद्ध बाजूचें मत खोडून टाकण्याकरितां प्रथम गृहीत धरून नंतर आपलें मत सिद्ध करणारा; किंवा तें त्याचें अवलंबिलेलें (मत). ५ एककल्ली; संकुचित विचाराचा; कोणाशीं न पटणारा. (माणूस, विचार, मत). 'ऐसा अहंकाराधिरूढ। एकदेशी मूढ ॥' –ज्ञा ३.१७९. 'एकदेशी होतों अहंकारें आथिला। त्याच्या त्यागें झाला सुकाळ हा ॥' –तुगा ४०४६. ६ सार्वत्रिक, सार्वदेशीय नव्हे असा; एकाच जागेला चिकटून असलेला; अल्पव्यापी. 'सर्वव्यापक अयोध्यावासी। किंवा आहे एकदेशी। सांगे मजपाशीं निश्चयें ॥' [सं.]

**एकदेशीय**—वि. एकदेशी अगणारा.

**एकदोरी**—स्त्री. १ एकसूत्र; एकओळ. २ (ल) एकराज्य; एकअम्मल, एकसत्ता. 'राज्यात एकदोरी हलती' –वि. सरळ; सारखें. [एक+दोरी]

**एकधा**—क्रिवि. एके वेळीं; एके प्रकारानें, मार्गानें. 'एकधा दशधा विभागता। ऐक नृपनाथा सांगेन ॥' –एभा ३.१०६ [सं]

**एकधातुचलनपद्धति**—स्त्री. (अर्थशास्त्र) नाणीं पाडण्याच्या कामीं जींत एकाच धातूचा उपयोग होत असतो ती पद्धति केवळ सोनें किंवा रुपें यांचें चलन असून सोनें व रुपें यांचें एकसमयावच्छेदें चलन नसणें. [सं. एक+धातु+चलन+पद्धति]

**एकधान्य**—न. ज्यामध्यें एकाच जातीचें धान्य खाऊन रहावयाचें असें चातुर्मासांत आचरावयाचें व्रत; एकाच प्रकारच्या धान्यावर निर्वाह [सं. एक+धान्य]

**एकधारी**—वि. एका बाजूला धार असलेलें; एका बाजूनें चालणारें (हत्यार, तलवार वगैरे). ०रोखण–न (कु.) सुनाराचें एक हत्यार; रधा. [एक+धार]

**एकधान्या**—पु (सा.) एक प्रकारचा रंधा. यांत पातें डाव्या-कडेरा खेटून असतें. त्यामुळें एका बाजूस खाच पाडतां येते.

**एकधोतरी**—वि. एकच वस्त्र असलेला; वस्त्राचें दारिद्र्य असलेला. म्ह॰ एक धोत्री आणि सहा घेतरी=गरीब पण फार लबाड. (उप) गरीबाचा शिरस्ता अनेक ठिकाणीं असतो, त्याला पुष्कळ गोष्टी साध्य असतात. [एक+धोतर]

**एकधोरणी**—वि. एकच हेतु, उद्देश, धोरण असलेला. [एक+धोरण]

**एकनळा**—क्रिवि. १ लागोपाठ; खंड न पडतां; एकामागून एक (मुलगे किंवा मुली होणें) एकाआधींच मी गर्भिण। एक-नळ मुलगे झाले तीन।' –पला ४.१९. 'एकनळ्या तीन मुली झाल्या.' २ एक नाळ असलेलें जुळें (मूल) [एक+नाळ]

**एकनाड-डी**—स्त्री. मुलगा किंवा मुलगी यांच्या जन्मनक्षत्रावरून आद्य, मध्य व अंत्य अशा तीन नाडी ठरलेल्या असतात. ज्या मुलामुलींची वरीलप्रमाणें एकच नाडी असेल त्यांचा विवाह

**एकपुठा**—पु एक जमाव, एक सूत्र, एक सम्मती, एकमाची, विचाराची सहजी 'सगळ्या माणसांचा एकपुठा जमला आहे' [एक+पुठ म पुढा]

**एकपुडी**—वि एकपूड (कातडी आच्छादन), एकेरी कातडे असलेला (मृदंग, पखवाज) [स एक+पुट-पूड]

**एकपुती**—वि एकच मुलगा असलेली (स्त्री) [एक+पुत्र-पूत] म्ह० एक पुती रडे आणि सात पुती रडे (जिला एक मुलगा आहे तीहि रडते व सात मुलें असणारीहि रडते), कोणत्याहि चांगल्या वाईट स्थितींत समाधान नसणें याअर्थी योजतात

**एकपुरू**—वि (नदभाषा) अकरा 'मिरजेहून कोल्हापूरचें आहे एकपुरूआणे आहे' शिवणावळ एकपुरू आणे दिली '[ताकनिक]

**एकपेडी**—स्त्री (कु) एकदाणी, एकसर (कु अव एकपडया) -वि एकच पेड असलेली (वेणी, दोरी) [एक+पेड=पदर]

**एकपेशी-य**—वि (प्राणि) एक पेशी असणारें, एकपेशीमय (प्राणी) (इ) युनिसेल्युलर. [एक+पेशी]

**एकप्रकार-चा**—वि निराळ्या प्रकारचा, निराळ्या वर्गाचा विलक्षण, विचित्र, असन्यसामान्य एकाच तऱ्हेचा -स १८५६, ३१३९, ४१२८ .'लौकिक एक प्रकारें जाल्या उत्तम नारी' -मरि २ ९८ [एक+प्रकार]

**एकफणी**—वि एका विणीचा, एका वाणाचा, एका तऱ्हेचा (कपडा) [एक+फणी (विणकामांतील)]

**एकफरमा**—वि एका आकाराचा, ठेवणीचा, जातीचा, स्वरूपाचा (सैन्याच्या रांगा, लिहिण्यांतील अक्षरें वगैरे) -पु आकृति, आकार यांत ऐक्यता, एक स्वरुप, एक आकार [एक+इ फार्म फरमा]

**एकफसली**—वि वर्षाला एक पीक देणारी (जमीन) एक पिकी [एक+फसली]

**एकफावट**—क्रिवि (गो) एकदाचा, एकदा एकफावटी पहा [एक+पद-पाय-पावट]

**एक-च-एक-येक**—क्रिवि १ एकूणएक, सर्व 'एक-च-एक हुजूर मालूम जाहली'-रा १५ ३१ २ एकाएकी, एकदम 'त्यांनी मीरइमाम यास अजूरक येथे एक-च-येक घेऊन गाठले' -रा ५ ११४ [फा यक व यक]

**एकवर्गी**—क्रिवि एक प्रकारें 'परि तें एकवर्गी थोडें। केलिया प्रतिकारामाजि वडें॥'-ज्ञा ११ ४०४ [एक+वगा=प्रकार]

**एकवारी**—वि एकरी पन्ह्याचें एरीचें, डबल पन्ह्याचें नव्हे असें (कापड) [एक+वार-बार-वेळ, तुल० इ ब्रेड्थ]

**एकबागी**—वि मानेवर एका बाजूस भावरा असणारा (घोडा), हें घोड्याचें अशुभ लक्षण किंवा खोड म्हणून समजतात [एक+बाजू]

**एकबाट**—पु एकर, सरमेसळ, जमाव, गाठुळ, गोळ धार, मिश्रणी -क्रिवि सरमेसळीनें भेदविचाररहित, सर्व एकत्र धर्म्यास्थितमपणें [एक+वाट]

**एकबारी**—वि १ एकदांच बार, आवाज करणारा, वाजणारा (फटाका, बंदूक इ०) २ वर्षांत एकच बहर किंवा वर देणारें (फळझाड) ३ एका वरानें काढलेलें (गुलाबपाणी इ०) ४ सर्व एक रेंदीचा एकसरी पद्म (दुपटा इ०) ५ एका दमांत गाठार याचा, धरावयाचा (पदा, दौड इ०) 'घेऊयोरांपैकीं धाडव्याची तुकडी ३६ मैलांचा एकबारी पदा मारून दिल्लीजवळ येऊन धडकली'-सन १८५७ १९७ [एक+बार]

**एकबाल**—इक्बाल पहा

**एकबीच**—वि एक टाकून एक, सम उ० २,४,६,८ -संख्या ३९ ०हात-पु (कवाईत) सम अंक म्हटल्यांनीं (२, ४,६) आपला उजवा हात ताठ जमिनीशीं समांतर करून खांद्याच्या पातळीत समोर,बोटें एकमेकांशीं लागलेलीं, आंगठ्याचा अग्रभाग वर आणि करतळ जमिनीकडे अशा स्थितींत न्यावा -संख्या ४ [एक+हिं बीच]

**एकबुंदकी, एकबुंदी**—वि एका जुन्या चलनी रुपयाचें नाव, या रुपयाच्या पृष्ठभागावर एक बुंद (ठिपका) असतो [एक+बुंद]

**एकबुरजी**—वि १ एक खांबी (राहुटी, तंबू) २ (ल) एकाच माणसावर अवलंबून असणारें (काम, कारस्थान) [एक+बुरूज]

**एकबेक**—वि सम-विषम (रंग, पदें) [एक=विषम+बेक=सम]

**एकबेरजी**—स्त्री १ (हिशोब) जमाखर्चाची पहिली नोंद, याच्या उलट दुबरजी, या नोंदीवरून पुढें खातेवारी दुबरजी, तिबेरजी केली जाते उ०० एकबेरजी कलम-कारकून-रकम-लिहिणें-हिशोब २ एकनोंदी हिशोब, वारनिशी याच्या उलट दुबरजी ३ सर्व रकमांची एकूण बेरीज -वि अशा प्रकारें ठेवलेला (हिशोब, प्रकरण इ०) ०दप्तर-न १ निरनिराळ्या खात्यांचा जमाखर्च, हिशोब व नोंदणी एकत्र ठेवणारी कचेरी, खातें २ खतावणी, निरनिराळ्या खात्याच्या खतावण्यांच्या रकमांचें हिशोबी दप्तर या वरून एकंदर सरकारी जमाखर्चाच्या हिशोबाचें पत्रक तयार करता येत असे

**एकबोटीगंध**—न एका बोटानें कपाळास लावलेलें आडवें किंवा उभें गंध, याच्या उलट दुबोटी गंध [एक+बोट+गंध]

**एकभक्त**—वि १ एकाच देवाची भक्ति करणारा २ (ल) एकाच धन्याची सेवा करून राहणारा एकाचीच मनधरणी करणारा ३ एकभुक्त पहा [एक+भक्त]

**एकभाज**—वि एकदाच भाजलेलें [एक+भाजणें]

**एकभाव**—पु १ मनाची एकाग्रता, एक विचार, एक मत २ एक दर, एक ठराविक किंमत [ एक+भाव ]

**एकभुक्त-क्ति**—न स्त्री अहोरात्रात एकदाच किंवा माध्याह्नीं एकदाच जेवून राहण्याचें व्रत 'दशमीचन एकभुक्त साचार। एका दशी उपोषण हरीजागर ॥' —वि दिवसांतून एकदा जेवणारा, एकभुक्त आचरणारा [ स ]

**एकमंगल-ळ**—न अनेक जातींचे लोक एकत्र येणें, सव गोळकार, सरर, काला [ एक+मंगल ( उप ) ]

**एकमजला-ली**—वि १ एकच मजला असलेलें ( घर ) २ एकच पदर असणारें ( पातळ, लुगडें, पागोटें इ० ) [ एक+मजला ]

**एकमजली**—क्रिवि मध्यें न उतरता एकदम मुक्कामापर्यंत ( जाणें, चालणें इ० ) [ एक+मजल ]

**एकमत**—न मतैक्य, सर्वांची मतें जुळणें, अविरोध, एक विचार, अभिन्नता, एकजूट —वि एकमताचे, विचाराचे [एक+मत]

**एकमध्य**—वि ( गणित ) समकेंद्र, एककेंद्र, मध्यबिंदु एक असणारें ( इ ) कॉन्सेंट्रिक [ एक+मध्य ]

**एकमय**—वि १ सर्वव्यापी, सर्वाधिष्ठित 'ब्रह्म एकमय आहे' २ एकरूप 'तुका म्हणे गगामागरसगमीं। अवघ्या झाल्या ऊर्मि एकमय ॥' —तुगा ४०१६ ३ सर्व एक, समान ( जातीचे-प्रकारचे-गुणाने ) जसें-एकमयधर्म-आचार-स्थिति-प्रकार —क्रिवि एकत्र सव मिळून, एकजुटीनें [ स ]

**एकमुत्सद्दी**—वि थोर, अद्वितीय मुत्सद्दी, धोरणी, ज्या बद्दल दुसरा होणार नाहीं असा सर्वमान्य, अद्वितीय 'नानाफडनवीस एक मुत्सद्दी तर्क त्यानें काढिला' —ऐपो २०६ [ एक+मुत्सद्दी, अप, एक+मसुदा ]

**एकमानपद्धति**—स्त्री ( गणित ) त्रैराशिकाऐवजीं एक रीत या रीतीनें प्रथम दिलेल्या प्रमाणावरून एका वस्तूची किंमत काढून नंतर त्यावरून इष्ट राशीची किंमत काढतात, यास एकमानगणित असेंहि म्हणतात

**एकमार्गी**—वि एकाच मार्गानें, रीतीनें जाणारा, केवळ आपल्या मताप्रमाणें चालणारा, एककल्ली, एकरोखी [ एक+मार्गी ]

**एकमास-एकहाड**—वि एका हाडामासाचा, एका रक्ताचा एका कुटुंबातील एकपिंड, सपिंड, सगोत्र [ एक+मास हाड ]

**एकमाही**—वि एक महिन्याचा ( हिशोब वसूल गोनसुरा वगैरे इ० ) [ एक+माह=महिना ]

**एकमुख**—क्रिवि १ सन्मुख तो एकाती नेऊनि दत। त्यासाठीं केलें एकमुख' —ज्ञा १ १४३ २ तत्पर 'माझ्या भजनीं एकमुख। मानिया निजभावें अभिलाषिक ॥' —ज्ञा १३ ७४८ —वि एक विचाराचे, एक बुद्धीचे एक [ एक+मुख ]

**एकमुखी**—वि १ एका तोंडाचा, एका तोंडाच्या, मुखाचा, बाहुग ( दत्तमूर्ति, मुखवटा, रुद्राक्ष वगैरे ) २ एकमताचा, एक जातीय ३ एकतत्री, एकाच अधिकाऱ्याच्या हातीं असणारी (सत्ता) 'सध्या हिंदुस्थानात एकमुखीराज्यपद्धति प्रचलित आहे' —के १ १२ ३० ४ एकाच्याच तत्रानें चालणारा, ज्याला एकच वरिष्ठ आहे असा [एक+मुख] ॰रुद्राक्ष-पु १ ज्याला एकच तोंड आहे असा रुद्राक्ष २ (ल) एकतत्री, जो एकाकडून माहिती, सूचना, सल्ला वगैरे घेतो असा मनुष्य, राजा, न्यायाधीश, अधिकारी वगैरे 'सरकारी शाळांच्या एकमुखी रुद्राक्षानें रात्रें शिक्षणक्रम सुरू ठेवणें बरोबर नाहीं' —नि ? ३१

**एकमुठाण**—न एकी, जूट, कट, संघ [ एक+मुठाण ]

**एकमुठी-मूठ-मुठीचा**—वि १ एकाच्याच सत्तेखालीं असणारा ( राजाच्या, मंत्र्याच्या, मालकाच्या वगैरे ), एकमुखी २ एका विचारानें-पक्षाचे, एकमत झालेले **एकमुठी चालणें**—क्रि एक मतानें, एकत्र जाणें, वागणें [ एक+मुष्टि-मूठ ]

**एकमुठी-मूठ**—क्रिवि १ एका मुठीनें, एका हातानें, एका वेळीं 'एका मुठीनें त्या हजार रुपये दिले' —मोल २ कामाच्या किंवा व्यवहाराच्या एका वेळीं, एका उरकात, एका झट क्यात [ एक+मूठ ]

**एकमुळा**—वि ( गा ) एकुलता, एकलकोंडा, एकटा 'एक मुळो आस दुसरो कोणीच नाका'=एक मुळा आहे, दुसरा कोणीच नको [ एक+मूळ ]

**एकमुळी**—स्त्री १ एकच मुळी, एकच रोपटें, मुळ्यांत एकच मूल निवत राहिलें म्हणजे त्याला म्हणतात ( कि० राहणें ) २ ( शेतकरी लोकांत ) गावातील एक धान्याचें पीक, धान, लागवड, धानकीचा एकच उद्योग 'एकमुळी मुळाली म्हणून गाव उजाड झाला' —वि आपल्याखेरीज दुसऱ्या धान्याला जमिनीत जागा न देणारें ( जोंधळा, गहू इ० पीक ) [ एक+मुळी ]

**एकमूल्य**—वि ( रसायन ) सत्तम उत्सर्जनांतून एक द्रव्य पर माणु नि मारित केल्यानंतर राहणारा सयुक्तमूलक ( इ ) मानाॅव्हॅलंट सानाड 'सतृत उत्सर्जनांतून हज्जाचा एक परमाणु काढला असल्यास त्याचा एक अवयव असतृप्त राहतो व त्याला एकमूल्य म्हणता येतें' —रसा क १३०

**एकमेक**—वि परस्पर अन्योन्य 'एकमेकानें सांगितें ग्रु निया निघती' —मुवन ४ १९१ [ एक द्वि, प्रा एक्कमेक्क ]

**एकमेक, एकमेकांशीं, एकमेकांत**—क्रिवि परस्परामध्यें, एकमेकांवरगवर आपापसात, आपापसामध्यें, तुम्हामध्यें, त्यांच्या मध्यें

**एकमेरी**—स्त्री ( गा ) मेळ जन [ एक+मन ]

**एकमेव**—वि एकच एक, केवळ एक [ स ]

**एक-येकमेळ**—पु मिळणी, ऐक्य, सख्य, एकवाक्यता —वि एकवट, एकत्र 'प्रत्य बन्हिदुख तराक्ष। कीं दृष्टवाल्मीक ऐक मेळ।' —मुआदि ० १५ [ एक+मेळ ]

**एकमेळणी, एकमेळीं**—क्रिवि. सर्व मिळून; एकत्र; एक जुटीनें; समुदायानें. 'सच्चिदानंद एकमेळीं। तेचि त्रिवळी स्थळीं।' —एरुस्व १.६१. [एक+मेळ-णी]

**एकमेळा**—वि. (गो.) एकलगी; एकवटी. [एक+मेळ]

**एकमोडी**—वि. एकमार्गी; एकछंदी; एका प्रकारचा; एका स्वरूपाचा, जातीचा. [एक+मोड]

**एकमोल**—न (कों.) एकमंगल, मेकर; गोमफळा [ए+मोळा]

**एकमोली**—वि. एकसारखी किमत असणारा (पदार्थ) [एक+मोल, सं. मूल्य]

**एकयोनि**—वि. एकाच आईपासुन जन्मलेले; सहोदर; सोदर. सख्खे भाऊ [सं. एक+योनि]

**एकर**—पु (गणित) जमीन मोजण्याचें एक विशिष्ट माप इंग्रजी मापानें ४८४० चौरस 'यार्ड म्हणजे एक एकर, ८५ एकर म्हणजे १०० बिघे जमीन. —राको २२. १ आणा = ७५६२६ चौरस यार्ड, १२१ चौरस यार्ड किंवा मोठा आणे=एक गुंठा, ४० गुंठे किंवा ६४० आणे=एक एकर. [सं. अजक्ष= अंगण, परसूं आवार, प्राकार; ग्री. अग्रॉस; लॅ. अगेर; जुनें इं अकेर; जुनें फ्रें एकर]

**एकरकम**—स्त्री. निरनिराळ्या बाबींची एकत्र बेरीज [एक+रकम]

**एकरकम-रकमी**—क्रिवि. एकदम, एका रकमेनें; एकमुठी, एकठोक 'एकरकमी पुष्कळ पैसा मिळण्यास देशांतरीं फिरल्या शिवाय इलाज नाहीं.' —भाग्र ९. [एक+रकम]

**एकरंग-रंगी**—वि. १ एकाच रंगाचा, सर्वत्र, दोहों अंगांस एक रंग असणारा (पागोटें, सखलाद इ०) २ अंगावर एकच रंग असलेला, दुसऱ्या कोणत्याहि रंगाचे ठिपके वगैरे नसलेला, निर्भेळ रंगाचा (घोडा), असा घोडा कुलक्षणी, अशुभलक्षणी समजतात. ०**पाठीवर शुभ्र**–रंग कोणता तरी एक असुन पाठीवरमात्र पांढरा रंग असणारा (घोडा), हें अशुभ लक्षण होय. —स्त्री १ सोंगट्यांच्या तिफाशी खेळांतील डाव प्रतिपक्ष्याची सही होण्यापूर्वी आपली सही होउन डाव बसुन पक्क्या सोंगट्या उडून गेल्या व नंतर कच्च्या सोंगट्या उडून जाण्यापूर्वी प्रतिपक्ष्याची सही झाल्यास त्यास एकरंगी असें म्हणतात. २ सख्य, स्नेह, अविरोध, 'नवाब सवसूफ व रावपंतप्रधान याची रदीमापासोन दोस्ती व एकरंगी, जुदागी नाहीं' —रा १९ ८. 'पुनर्भेटपर्यंत एकरंग केले' —ऐटि २.८०. [एक+रंग, फा. यक्+रंगी]

**एकरदन**—पु (एकदात असलेला) एकदंत, गणपति 'उठोनि वेगी एकरदन। दिधले सकळांसी दर्शन।' —गणपतीची भूपाळी ६. [सं एक+रदन=दात]

**एकरस**—वि. एकाच गोष्टीत सुख मानणारें, पावणारें, एक विकाराचें; एका भावनेचें; समरस. —पु १ एकात्मता. २ (ल.) परब्रह्म. 'भेदु लाजोनि अखंडी। एकरसीं देत बुडी।' —अमृ १.९. [एक+रस]

**एकराजक**—वि. एकराज्य; एकतंत्री, एकाच्याच सत्तेखालीं असणारें; स्वसत्ताक (राज्यपद्धति) (इं.) ऑटोक्रसी. 'सर्वांच्या तोंडीं लोकसत्ताक संस्थान चांगलें कीं एकराजक चांगलें हा वाद सुरू झाला.' —नि ८३. [सं.]

**एकराज्य**—न. एकसत्ता; एकतंत्री-मुखी कारभार; एकाच्या हातीं असलेली अनियंत्रित सत्ता; एकछत्री राज्य. 'जाहलें सकळीक एकराज्य.' [एक+राज्य]

**एकरात्र**—क्रिवि. १ एका रात्रीचा काल; चार प्रहर; सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत. २ सबंध दिवस, अहोरात्र, चोवीस तास व्यापून. [एक+रात्र]

**एकराशि-रास**—वि. १ एक राशि ज्यांची आहे ते. २ (ल.) एका गुणाचे, जातीचे व पक्षाचे; सारख्या मानाचे, एकसारखे. 'वायरोपासून नमीपर्यंत एकरास.' —फाटक, नाटयछटा ३. ३ एकाच राशींतील, संघातील, समूहांतील (धान्य, पदार्थ, इ०), एकजात [सं. एक+राशि]

**एकराष्ट्र**—न. लोकांत एकी, एकोपा असलेलें राष्ट्र, देश; अनेक विभाग मिळून झालेला देश, राष्ट्र. 'इंग्रजी राज्याखालीं हिंदुस्थानांतील भिन्नभिन्न जाती एकवट करून त्यांस एकराष्ट्राचें स्वरूप आणण्यास ज्या कल्पनांची आणि साधनांची आवश्यकता आहे ...' —टि १.२५१. 'छप्पन देश मोडून त्यांचा एकजीव अथवा एकराष्ट्र होण्याचा समय आला आहे'. —टि १.४७५ [एक+राष्ट्र]

**एकराष्ट्रीयत्व**—न. सर्व राष्ट्र (त्यांतील सर्व लोक) एक आहे अशी भावना; राष्ट्राभिमान, राष्ट्रभक्ति, (इं.) नॅशनॅलिटी. 'एकराष्ट्रीयत्वाची भावना राष्ट्रांत निर्माण झाल्यास स्वातंत्र्य काय लांब आहे?' —टिसू ३८. [एक+राष्ट्र]

**एकरूप**—वि एका रूपाचें, आकाराचें; सदृश; समरूप, अविभक्त; न बदलणारें; अविकारी 'जयजय देवैकरूप। अतिहृत कंदर्पदर्प।' —ज्ञा १८ ८. —क्रिवि १ एकसारख्या पद्धतीनें, बदल न करितां; सारखें 'मी एकरूप दहा रोज अनुष्ठानाला बसलो.' २ (नकारात्मक प्रयोग) केव्हांहि नाहीं; कधींहि नाहीं; कोणत्याहि प्रकारें नाहीं 'तूं एकरूप त्याच्या घरीं जाऊं नको.' 'मी एकरूप यावयाचा नाहीं.' [एक+रूप]

**एकरोखी**—वि. (अप रूप) एकरोहखी. १ एकछंदी, एकमार्गी; एकाच विषयाकडे चित्ताचा, मनाचा कल असणारा. २ एकाच (वरच्या) बाजूला वेलबुट्टी वगैरे भरतकाम केलेलें

अह अंगें (चीज, वस्त्र) ०शिवार-न गावाच्या एका बाजूस असलेल्या जमिनी [एक+शीव]

**एकल**—वि १ एकला, एकटा 'एथ एकलेआ चालता। भय नाहीं सर्वथा।'—ऋ ७ २ (चेंडुलाचा खेळ) एकया अर्थानें [स ] ०काजा, कांजा-खाजी-पु एक (गाट्या-चेंडुलाचा खेळ) एक गोटी दुसरीस मारताना मोजण्याच्या कामीं एक या मध्ये वदल योजतात [एकल+खाजा ?]

**एकलकोंडा-कोंड्या, -कोट -टिका -टुका -टुरा-निपटा**—वि एकांतप्रिय, माणूसघाण्या, समाजात न मिसळणारा, मनमिळाऊ नसणारा (हा शब्द निंदाव्यंजक असा वापरतात) म्ह० एकलकोंडा चारा राज्या

**एकलग**—वि क्रिवि १ एकीकडे, बाजूस असणारें, सलग याच्या उलट (घर, झाड इ०) [एकल+ग] २ सलग, एकसारखें चिकटून असादि अर्थ होतो [एक+लागणें]

**एकलगी**—वि एका लगीवर उभारलेलें, एकपाखी (घर), याच्या उलट दुलगी, दुपाखी [एक+लग]

**एकलगी (पेंच)**—स्त्री (मल्लविद्या) जोडीदाराच्या दडावरून आपला हात घालून जोडीवाल्याचा हात आपल्या पाठीवर दाबून धरून जोडीवाल्याचा हात ज्या बाजूने दाबून धरला असेल त्याच आपल्या पायानें जोडीदाराच्या पिंडरीस आपल्या पिंडरीनें व पायाच्या चौड्यानें धरून आपली मान जोडीदाराकडे वळवून त्यास चीत करणें फारसी भाषेत पिंडरीला लग म्हणतात व हा डाव पिंडरीनें करावयाचा असल्यानें यास एकलगी हें नाव पडलें आहे [एक+फा लग=पिंडरी] ०ची सवारी, एकलंगी-स्त्री (मल्लविद्या) आपल्या एका पायानें जोडीदाराच्या पायात बाहेरून पाय घालून जोडीदाराच्या गुडघ्याच्या वाटीजवळ मांडीकडील बाजूस पाय घालून तोच आपला पाय आपल्या दुसऱ्या पायाच्या गुडघ्याच्या खवणींत घालून ज्या आपल्या गुडघ्याच्या खवणींत आपल्या पायाचा पंजा घातला आहे, त्या आपल्या पायाचा पंजा जोडीदाराच्या मानेखेर टाचेकडील बाजूस घालून जोडीदारास चीत करणें

**एकलपायी**—वि जोडीदार, मदतनीस नसलेला एकटा [एकल+पाय]

**एकलहरा**—वि एक विशिष्ट सापाची जात, हा चावल्यास फक्त एक लहर यऊन मृत्यु येतो 'मेघ दुजर जदिल एकलहरी। आज्ञा होता पती कुमारी। टाळ मृदंग वाजता कुसरी। रागोध्दार वर्णिनी पैं।'—ह ३४ १४९ [एक+लहर]

**एकलक्षी**—वि ज्यासवधीं आदर किंवा चाही हेतु आहे अशी एकच वस्तु डोळ्यापुढें ठेवणारा, एकधोरणी एकमार्गी [एक+लक्ष्य]

**एकला**—वि एकटा, एकल पहा [स एकल, प्रा एगल्ल] म्ह० 'एकल्याची एक वाट'

**एकलाधी**—स्त्री ऐक्य, एकमत, एकबुद्धि 'मग अहंकारामि एकलाधी। करूनि जीवितावधी। वहाविले बुद्धि। चराचर।'—ज्ञा १३ ८९ [एकला+धी, किंवा एक+लावणें]

**एकलिंग**—न भोंवतालीं पाच कोसाच्या मर्यादेंत कोठेंहि दुसरें शिवस्थान नाहीं असें शिवस्थान, हें विशेषप्रतीचें सिद्धि स्थान समजलें जातें [एक+लिंग] ०जी-पु मेवाडात उदयपूर शहरा पासून एक मैलावर असलेलें एक देवस्थान, हें देवस्थान मेवाडांत फार प्रसिद्ध आहे रजपूतलोक भेटीच्या वेळीं 'जय एकलिंगजी' म्हणून रामराम करतात

**एकलोंब्या**—वि एकच लोंबी असलेला (एक भाताचा, साळीचा प्रकार) [एक+लोंबी]

**एकलोता-ती**—वि १ एकुलता-ती 'का एकलोतिया बाळ का—। वरि पडोनि ठाके अविरा॥'—ज्ञा १३ ५०२ २ एकपुती, एक पोर असलेली 'गुरु वेहुताची माय। परि एकलोति होऊनि ठाये॥'—ज्ञा १३ ४०९ [एक+लता, हिं एकलौता]

**एकवंक**—न एकनिश्चय, एकवाक्यता 'याचेनि एकवंकें। जगासि वाडु॥'—ज्ञा १३ १६ [एक+वच्-वाक्]

**एकवंकी**—स्त्री एकरूपता, भेदरहितता, सारखेपणा, एकत्व, तादात्म्य 'मन एकवंकी याची स्थिति। आवडतु असे॥'—ज्ञा ४ १२ 'न साहे वियोग तुम्हा उभयता। देवा आणि भक्ता एकवंकी॥'—निगा १८०

**एकवंकी**—स्त्री पायातील एक दागिना 'निजपदिचेनि ओलें। गानें पीका निगाळें। तें एकवंकी सातिलें। श्रीचरण क्षेत्रीं॥'—ऋ ८७ [एक+वाक=वांकी, रा वक, प्रा वक]

**एकवचन**—न १एकच बोलणें, न फिरणारें वचन २(व्या) नामाच्या ज्या रूपावरून त्याच्या एकत्वाचा बोध होतो किंवा ज्या नामावरून एकच वस्तूचा बोध होतो तें **एकवचनात बोलणें**—अनादरानें, एकेरी बोलणें, अरेतुरे करणें, म्हणणें [स ]

**एकवचन-नी**—वि १(व्या) पदार्थाचें एकत्व दाखविणारा, एकवचनात असणारा २ वचनाचा धड, बोलल्याप्रमाणें करणारा, सत्यप्रतिज्ञ राम एकवचनी, एकबाणी होता' [एक+वचन]

**एकवट**—क्रिवि एकत्र, एका ठिकाणीं संयुक्त, सर्व मिळून, यमिश्र, एकदर रथ जोडिले एकवट। वरि चढले वीर उद्भट।'—एरुस्व ८ १४ तिसऱ्या हत्ती राजाच्या कारकीर्दीच्या अखेरी पासून सुमारें तरील दोन भाषा एकवट होऊन हल्ली जीस दमेची म्हणतात ती बनत चालली '—नि ५५२ [स एक+वृत्त प्रा वट तुल० का अन्दु=मिळणी] **एकवटणें**-अक्रि एकत्र होणें, गोळा होणें, मिसळणें, मिळणें 'हे तिन्ही (अकार, उकार, मकार) एकवटले। तय शब्दब्रह्म कवळलें॥'—ज्ञा १ २० 'दीपीं दीपू एकवटला। मिळणीं एकचि होऊनि ठेला॥'—एभा १० ३६३

'सप्तकोटि मंत्र पाहीं। एकवटले वाणाचे ठायीं॥' -मकि. १ गोळा करणें, एकत्र करणें; जमविणें. २ मिसळणें; काला करणें. [ सं. एकवृत्-वर्त्-होणें ]

**एकवटा**—पु. १ एकवटलेली स्थिति, अवस्था; संयुक्तपणा. २ एकजूट, संघ, एकोपा; एकी; मिलाफ. ३ (विणू.) एकवट्याचा जिनस, माल, घाऊक घेतलेला माल; एकवट्याचा जिनस; ठोक घेतलेला जिनस. [ एकवट ]

**एकवडा-ढा**—वि. १ एकटा, एकला. 'मग नेणें बहु थोडें। न पाहे मागें पुढें। मार्गामार्गे येकवडें। करीत चाले॥' -ज्ञा १८ ६२५. २ (गो.) एकेरी. ३ एकत्र केलेला. एकवट पहा.

**एकवत**—न. (बायकी) एकभुक्त; उपवास. 'भूक नाहीं म्हणून एकवत.' [ सं. एकव्रत, अप. ]

**एकवत**—क्रिवि. एकत्र. 'कोठें नेणों हा फावला एकांत। सदा विरकिल भोवतीं बहुत। दोघे एकवत बोलावया मात। नाहीं लाज धरिली दिला हात वो॥' -तुगा १११. [ सं. एक+वृत्; म. एकवट ]

**एकवद**—न एकवाक्यता; ऐक्यता; एकवत् 'एन्हवीं मध्य ऊर्ध्व अध। हे नाहीं जेथ भेद। अद्वयासि एकवद। जया ठायीं॥' -ज्ञा १५७३. [ सं. एक+वद्; एकवत् ]

**एकवर्ण**—पु वर्णसंकर; जातिभेद न पाळणें; सवगोलंकार [ सं ]

**एकवर्ण-र्णी**—वि. एकरंगी; एकरंगाचा (बैल, गाय, पक्षी वगैरे) [ सं ]

**एकवर्णसमीकरण**—न. १ (बीजगणित). ज्या समीकरणात एक अव्यक्त पद असतें तें. जसें-क्ष+अ=३ व. याच्या उलट अनेकवर्णसमीकरण -समी. प्रस्तावना ३. २ ज्यात अव्यक्त पदांचे प्रथमघात मात्र येतात तें. -बीजगणित ( जर्व्हिसकृत आ. २ ) १४८. (इं.) सिंपल इक्वेशन [ सं. ]

**एकवंशता**—स्त्री. सपिंडता; सहजातसंबंध [ एक+वंश ]

**एकवशी-वशास**—एकोशी, एकोशास पहा.

**एकवसा**—पु. १ एकिकडील जागा; एकांत स्थळ, आडजागा. २ एकोसा पहा. [ सं. एक+वस् ]

**एकवस्त्र,एकवस्त्रपरिधान,एकवस्त्रस्नान**—न. तीर्थाच्या ठिकाणीं नवरा व बायको यांनीं एकच वस्त्र नेसून किंवा दोघांनीं तेंच तेंच वस्त्र नेसून करावयाचें स्नान. हें फक्त तीर्थाच्या ठिकाणीं पुण्यकारक आहे, इतर ठिकाणीं पाप होय. [ सं. ]

**एकवळा**—पु १ एकोपा; ऐक्य, संघ; जमाव. 'ना तरी अवे सेव्या दिवसीं। भेटली चिंवे दोनी जैसीं। रेवीं एकवळा रसीं। केला एथ।' -ज्ञा ११.५. 'बोधचंद्राचिया कळा। बिजुरलिया येकवळा। हृदयपुनीव उीळा। वरी जयाची॥' -अमृ २.७ २ मैत्री; स्नेह. [ एक+वळणें ]

**एकवाक्यता**—स्त्री. १ एकमत; एकार्थ, एक निष्कर्ष ( निरनिराळ्या पुस्तकांचा, वचनांचा, विधानाचा ); ऐकमत्य. 'तुम्ही बोलतां एक आणि तुमचा वकील बोलतो एक, तें तें मिळत नाहीं, याजकरिता तुमची व त्याची एकवाक्यता करून मग बोला म्हणजे काय तें सांगेन' २ ऐक्य; मेळ, जूट. 'सर्व लोकांची सर्व बाबतींत, सर्व विचारांची एकवाक्यता होणें कधींहि शक्य नाहीं' -टि ३. २४६. 'ह्या.. निर्देशांची...एकवाक्यता करून काय निष्पन्न होतें हें पाहणें अगत्याचें आहे.' -मसाप २.१२२. [ सं. ]

**एकवाट-वाटी**—वि.क्रि. १ एकवट; एकत्र; संयुक्त, समरस. 'तयांमार्गें कुंजरथाट। गळां सांखळ्या एकवाट॥' -एरुस्व ६. ५३. 'दृश्य द्रष्टा आणि दृष्टी। देखतां तिन्ही एकवाटी॥' -एभा २.३५८. २ एकदम. 'तैसें तें (सैन्य) घनदाट। उठावलें एकवाट॥' -ज्ञा १८९. [ एकवट ]

**एकवाढ**—स्त्री जेवणाराच्या पानांत एकदम सर्व जिन्नस एकसमयावच्छेदेंकरून वाढून ठेवणें. [ एक+वाढणें ]

**एकवार**—क्रिवि. एकदां, एक वेळ. [ सं. एक+वार ]

**एकवार्षिक**—वि. वर्षांतून एकदाच होणारी (वनस्पति, पीक, वस्तु इ०) [ सं. एक+वर्ष ]

**एकविचार**—पु एकमत; ठाम, निश्चित मत; निश्चय. [ सं. एक+विचार ]

**एकविध**—क्रिवि. १ एकाच तऱ्हेचा; एकाच प्रकारचा. २ (ल.) एकनिष्ठ (भक्त); सरळ; साधा. 'एकविध आम्ही न धरूं पालट। न संडूं हे वाट सापडली।' -तुगा ७५१. ०भाव-पु (काव्य) एकमत; एक विचार; एकभाव; ऐक्य, एकोपा. [ सं. एक+विधा ]

**एकविधा**—क्रिवि. एका प्रकारानें; एका रीतीनें. [ सं एक+विधा ]

**एकविधाभक्ति**—स्त्री एकाच देवतेवर असलेली श्रद्धा, भक्ति; एकाच ईश्वराची पूजा. [ सं. एक+विधा+भक्ति ]

**एकविसणी**—वि. एकदांच तापवून निवविलेलें; चुलीवरून खालीं काढून निवूं दिलेलें (पाणी). [ एक+विसण ]

**एकवीस**—वि. २१ संख्या. [ सं. एकविंशति; प्रा. एगवीसा; हिं. एक्कीस. ]

**एकवृंतगतफलद्वयन्याय**—पु (एका देंठाला दोन फळें) एका धोंड्यानें दोन पक्षी मारणें या अर्थी, किंवा एका प्रयत्नांत दोन कार्यें करणें या अर्थी योजतात. [ सं एक+वृंत=देंठ+गत+फल+न्याय ]

**एकवेळ-ळां**—क्रिवि. १ एकदां; एकवार २ एकदम; एकाच वेळीं. [ सं एक+वेला ]

**एकवेळ**—स्त्री. दिवसाच्या दोन (सकाळ, दुपार) भागांपैकीं एक. सकाळ किंवा दुपार. [ सं. एक+वेला ]

**एकव्यसनी**—वि एक मताचे; सारख्याच सवयी असलेले, एक राहणीचे (लोक वगैरे) [सं. एक+व्यसन]

**एकशफ**—वि. अखंडखुरी; एकगेंठी, खुराला भेग नसलेला (घोडा, गाढव इ०). [एक+शफ]

**एकशय्या**—स्त्री १ एकाच अंथरुणावर निजणें, इतका परिचय २ (ल) अति स्नेह; दाट मैत्री, प्रेमाचें संघटन. [एक+शय्या]

**एकशरीर**—वि एका रक्ताचा, मासाचा, हाडाचा; सपिंड, सगोत्र [एक+शरीर]

**एकशिंगा**—वि. (गो) एक शिंग असलेला (पशु) [सं एक+शृंग]

**एकशिवडा**—वि. (गो) काटकुळा, सडपातळ, शिडशिडीत (मनुष्य) 'तें चेडु बरें दिसना, एकशिवडें आग'=ती मुलगी चांगली दिसत नाहीं, शिडशिडीत आहे [एक+शिवडा=नारळीतील एक शाखा]

**एकशिसाल**—स्त्री (गो.) डोक्याचा एक भाग दुखणें, अर्धशिशी [रा एक+शीर्ष+ल]

**एकशीरफाल्त**—वि (गो) शीघ्रकोपी. [एक+शिर+पो. फाल्त=उणें, इं फॉल्ट=दोष]

**एकशेंगकापशी**—स्त्री. देवकापशीचें झाड, याच्या बोंडांत एकच बी असते

**एकशेज**—क्रिवि एका ओळीनें, रांगेनें, एक दंडाळी (बसणें, मांडणें, वगैरे) [एक+शेज]

**एकशेवडी**—वि (कों.) सरळ सोट, विन फांद्याचें (झाड) [एक+शिवडा]

**एकशौक्तिक**—न. मोतीं तयार करणारें एकशिंपली कालव, हीं गोड्या पाण्यांत सापडतात [स एक+शुक्ति=शिंप]

**एकश्चित्त**—वि एकचित्त, सावधान, एकाग्र [स. एक+चित्त]

**एकसडी**—वि एकदाच सडलेले, कांडलेले (तांदूळ.) [एक+सडणें]

**एकसडी**—वि. एकदेंठी, एकच दाहाचा, खादी वगणारा (हरभरा, तूर, मेथीची भाजी वगैरे) [एक+स. सद=तुटक करणें, प्रा सड]

**एकसत्ताक**—वि एकाच्याच हातीं सर्व सत्ता असलेलें (राज्य), एकतन्त्र, एकचालक याच्या उलट लोकसत्ताक 'एकसत्ताक राज्य असल्यास अप्रिय कायद्याच्या योगानें असंतोषजन्य बंड उत्पन्न होण्याचा संभव असतो' -नि ४.९३. [स]

**एकसंध-संधी**—वि जोड किंवा सांधा नसणारें, तुकडा न पडलेले, अखंड, बिनजोडी (भांडें, नाव, दगड, फळी, वस्त्र इ०). [एक+संधि]

**एकसंधा**—क्रिवि ? रविवार. [फा. यक्+शंब; तुल० सं. एक+शंपा=वीज, एक+क्षपा=रात्र, पहिली रात्र ]

**एकसमयावच्छेदेंकरून**—क्रिवि एकदम; एकाचवेळीं, एकाच वेळीं, युगपत् (हे शास्त्रस्थेनिमित्ताशी भारा प्रतिशब्द मराठींत अलीकडे रूढ आहे) [एक+समय+अवच्छेद+करून]

**एकसर**—पु (वायकी) एक राणी, एकपत्नी; एक पदरी माळ. एकदाणी पदा [सं.]

**एकसर-रां-रीं-रें**—क्रिवि १ एका ओळीत, रांगेत, ओघानें; 'पळते जाहले एकसरें।' -राशि २७९७. २ (ल) एकदम; एकवेळीं, एकाएकीं 'होंक दिधली महावीरीं। बाण सुटे एकसरीं। यादवसैन्याचा महागिरी। शरधारीं सांवरेळा।' -पदरथ ८.४५. 'तुटे संशयाचें मूळ। येकसरां।' -ज्ञा १.१२८ 'जाणोनीयां भरें। जोहरी तिहि अर्से। ना ऊँ आपणानि आपें एकसरें। सांवळा कृष्ण।' -रास १ १७८. -वि. एकसारखा; [illegible], निर्मळ. 'तें ब्राह्मण एकसर सारिखे। मानुस मैंत कुरें।' -शिशु २०४. 'ह्येही देहतुळी एकसरी।' -ज्ञा १०२१. 'एवापरी वस्तु भरु। वांचोनि नाहीं एकसरु। निर्वाहो जया।' -ज्ञा ११ ८१३. [सं एक+सर, प्रा. एक्कसरिअ, तुल० फा. यक्+सर]

**एकसरणें**—अक्रि १ अनुसरणें; मिळून येणें. 'रिता भरता पुढें। नाहीं आणी जेथें सांकडें। तिथ कांतेचेनि पाडें। एकसरला जो।' -ज्ञा ११६०९ २ एकवटणें, एकत्र होणें. 'सारामा भवे प्रभु तो एकसरोनि सर्वे बोपानें। [illegible] शारदीय वेगित अत्यंत मस्त जो पानें।' -मोभीष्म १.५० ३ मर्यादित होणें; चाटीमाणें पळणें, पाय काढणें -विदि २७२. [एकसर]

**एकसष्ट, एकसट**—वि ६१ संख्या [सं. एकषष्ठि; प्रा. एगसट्ठी]

**एकसहा, एकसा, एकसाहा**—क्रिवि एकसारखा; [illegible]; सर्वांग 'तुम्ही तीर्थ। शरा पेंढे धरतुर्षी। एकसा गरडी नाग कुंभ।' -तुगा २६१ -वि समान, सारखा, एकाच प्रकारचा, जातीचा. [सं एक+सदृ. फा यकसान, हिं अ एकसा]

**एकसांगी**—स्त्री एकदां, एक एक वेळ सांगणें, आज्ञा इ०. [एक+सांगणें]

**एकसांज**—क्रिवि एकवेळ, एकदा (दिवसांतून). 'मी एक सांज जेवतों'-एकाच वेळां -स्त्री. एकवेळ दूर करी (गार्वीनें) 'गार्वीनें एकसांज धरली' किंवा 'सांज एक सांडिली आहे.' [एक+सांज]

**एकसाथ**—क्रिवि. (कर्नाटक) एकदम, एकत्र [illegible] क्यांक[illegible]ला हा हुकूम आहे 'एकसाथ [illegible] [illegible]' -[illegible] ११८. [हिं एक+साथ]

**एकसारखा**—वि सदृश, एकमेकाप्रमाणें ( रूप, आकार, गुण वगैरे ) असणारें –क्रिवि १ अखंड, न थांबता, सतत, एकसा, एकाच प्रकारें 'सकाळपासून एकसारखा बोलतो आहे' २ एकाच प्रमाणें, 'या औषधाला एकसारखें पथ्य केलें पाहिजे' [ एक+सदृश, प्रा सारिक्ख, म सारिखा ]

**एकसाली**—वि एक वर्षाचा, एकवर्ष जगणारा, एक वर्षा मधली [ एक+साल ]

**एकसाक्षिक**—वि एक साक्षीदार असलेला, एकानें पाहिलेला [ स ]

**एकसुईचा**—वि देठा, धुडगा, देठ डोल वगैरे एकाच प्रकारचें असणारें ( नारळ, सुपारी, गहू तांदूळ, मका वगैरे पीक ), एका जातीचा, एकसारखा, एकसाहा [ एक+सुई ]

**एकसुती**—क्रिवि एका प्रकारें, एकसारखा, एकतानी, पूर्वी प्रमाणें, अखंड [ स एक+सूत्र ]

**एकसुरा**—वि एकलिंग, एकटा, कुढ्या, घरदार नसणारा एकल-कोंडा [ एक+सुर ]

**एकसुरी**—वि एकच सुराचा, कंटाळवाणा, एकाचएक तोच तोच, ज्याच्यें कधीं फरक होत नाहीं असा ( इ ) मोनॉटोनस 'यशवंताला या एकसुरी जीवनाचा कंटाळा आला'–ह्याकाप ४१ [ एक+सुर ]

**एकसूत**—न एक राग, पद्धत, व्यवस्था, रीत वगैरे, एक मसाला, एक फरमा [ एक+सूत ]

**एकसूर**—वि एकसुरी पहा [ एक+सुर ]

**एकसैंपाक**—पु (बायकी) १ दिवसाचा एकच, एकदाच स्वयंपाक २ सर्व घराचा एक स्वयंपाक [ एक+स्वयंपाक ]

**एकसाय**—एकम्हा पहा

**एकसोय**—वि ( व ) एका बाजूस, व्यवस्थित, नीट, सायी स्वर [ एक+सोय ]

**एकसोस**—पु जीव, श्वास कोंडणें, आवाज बंद होणें, (एकाएका जोराच्या आवेगामुळें) ०धरणें–वठ दाटणें, गहिंवरणें, बोलता न येणें, सद्गदित होणें [ स एक+श्वस् ]

**एकस्थान**—न १ पहिलें स्थान (संख्यावाचनातील, एक, दह शत वगैरेपैकीं ) रकमेंतील उजवेकडील पहिलें स्थान हें एक स्थान असतें २ एकमूल्य, एकप्रमाण मूलमान (इ) युनिट स्टॅंडर्ड 'पाणी एकस्थानीं कल्पून म्हणजे विवक्षित आकारमानाच्या पाण्याचें वजन एक असें धरून तेवढ्याच आकाराच्या दुसऱ्या पदार्थाचें वजन त्याच्या विशिष्ट आहे हें काढितात'–पदार्थव ११२० [ स ]

**एकहस्ती–हाती**—वि एकाच्याच हातानें बनलेलें पार पाड लेलें, आपल्याच एकतंत्री, एकसूत्री ( कारभार, वहिवाट, काम इ० ) [ एक+हात ]

**एकहरी–हारी**—वि ( क्वचित ) एकेरी, (इं )सिंगल, उ० एकहरी कतार=फौंगे सिंगल फाइल'–सन्या ३४ [ एक+हार, हिं एकहरा ]

**एकळी**—स्त्री एक ( हातानेंसारखें ) कातरी झुडूप

**एक्का**—पु १ ( पत्ते, गंजीफा ) एक संख्येचा, एक-ठिपका असलेला पत्ता, एक्का, एकस्या २ ( ल ) श्रेष्ठ पुढारी, माणूस, सर्वांत अधिक कर्तबगार ३ ( वाद्य ) एक ताल, ठेका ४ एकी, सख्य 'दक्षणेचे सर्व दौलतदार यांचा एका जाला हें वर्तमान इंग्रज समजताच बहुत विचारांत पडून गर्द आहेत'–रा १९१० [ स एक ]

**एकाएकी**—वि एक, भेदरहित 'मी तू म्हणतां वेगळे न होंं। मुळींचे आहों एकाएकी ॥'–निगा १७८ [स एक–एकक]

**एकाएकीं**—क्रिवि एकदम, अनुचित, अकस्मात 'मी तयासि गंभ्या दूरी। एकाएकीं यईल हाडकरी॥'–कथा १४५५ [ स एकक, तुल फा यकायक ]

**एकाकार**—न १ मिश्रण, सरमिसळ, मिसळ, खिचडी, एक रास २ गोंधळ, गर्दी, बाजार ३ गोलकार, एकरूपता, संकर ( निरनिराळ्या जातींच्या, दर्जांच्या लोकांचा ) ४ ऐक्य, एका इति 'मोहुनिया नामरूपमुद्रा। जीव आणिशी एकाकारा।' –एभा १९८ –वि १ सारखा कल, ओढा, प्रवृत्ति असलेलें (मन, धारणा इ०) २ एका आकाराचें, रूपाचें, घडणीचें 'जीव शिव एकाकार। तैसे मिनले दोन्ही अधर॥'–एरुस्व १५७ ३ एकाग्र, दृढ, एकनिष्ठ, स्थिर, निश्चल ( मन ) [ स एक+आकार ]

**एकाकी**—वि १ एकटा, एकला 'जैसें का स्वप्न मोहा। तो एकाकी देखे बहुवा।'–ज्ञा १४ ८७ 'एकाकी दु:ख न लोटे। सवें तें सहपरिवार॥'–विक १५, २ ( बीजगणित ) एकपदी ३ ( शाप ) अविभक्त, सलग (वनस्पतिशास्त्र) असंयुक्त, निर्भेळ ( रसायनशास्त्र ) (इ) सिंपल [ स एकाकिन् ] ०पदार्थ–पु ( पदार्थविज्ञान ) मूलद्रव्य ( इ ) एलेमेंट

**एकाकीं**—क्रिवि एकाएकीं, अकस्मात्, एकदम 'तिसरे मजल्यावरुनि धाकटी उडी कारंज्यावरि। एकाकीं हालचाल न होतां गेलि वार्ता दुरवरी॥–ऐपो ३०८ [ एकाएकीं ]

**एकाखडी**—वि वर्णमालेंतील एकएक अक्षर प्रत्येक चरणाच्या आरंभीं घेऊन केलेलें काव्य ( जसें–कक, खख, गग ) 'एकाखडी बोला कशि गत झाली बाजीरा । कक काशीबाई गहिंवरे। खख खबर गेली पुनिया रे॥'–ऐपो ९२ [ एक+अक्षर ]

**एकांग**—न एक अंग, अवयव –वि एकांगी पहा ०झुंज–स्त्री द्वंद्वयुद्ध दोघांचें युद्ध 'एकांग झुंजें झुंजती। एकमेका निकरेंसीं॥'–मुआदि ४४ ७२ ०वीर–पु १ अनुयायी सैन्य किंवा कोणी मदत नसलेला, मदतीची अपेक्षा न करणारा, कोठल्याहि

सैन्यपथकात सामील नसलेला, एकाडा वीर, काश्मिरातील राज तरंगिणींत 'एकांगवीर' या लढाऊ कामगाराचें वर्णन येतें, एकाड्या पहा 'सनद्ध करिता दळभार। येथें लागेल उशीर। मी एकला एकांगवीर। भीमकी घेऊनि येईन॥'-एरुस्व ५१ २ (ल) वादात कोणाची मदत न घेता एकट्याच स्वसमर्थन करणारा 'पाचही दर्शनाशीं झुजार। हा वेदांतासि साजे बडिवार। जो एकांगवीर। ख्यातिवादिया॥'-विपू ७ १४ ३ (सामा) कोणाच्या मदतीची अपेक्षा न करणारा, धाडसी, उत्साही माणूस [म]

**एकांगी**—वि १ एकाच बाजूस सुंदर रंग, वेलबुट्टी वगैरे असलेलें (चीट, रेशीम, मखमल, कापड इ०) २ एकटाच पुरेसा (पलग, चटई इ०) ३ एकच गुण, बुद्धि, व्यवहार, ज्ञान इ० असलेला, एकदेशी ४ (राजा) कृश, सडपातळ, बारीक [स एक+अंग] •रवण-पु एक बाजू चांगली असणारा, उलटसुलट बाजू असणारा चोळखण (उ० मुगयाचा खण) •घर-न एकाच बाजूस उताराचें छप्पर असलेलें घर, एकवई, एकपाखी घर •झाड-न एका बाजूस वाढणारें, फुलणारें झाड •पान-न एकाच बाजूस चांगलें असणारें (विशेषत केळीचें किंवा विड्याचें) पान (दुसरी बाजू सुरकुतलेली किंवा इतरप्रकारें चांगली नसलेलें) •भांडण-न ज्यात एकच पक्ष भांडत आहे असें भांडण, भांडणातील एका बाजूचीच कैफीयत

**एकांगी**—स्त्री द्वंद्वयुद्ध, पृथक् युद्ध 'समागमें दहापधरा तोफा घेऊन आपली फौज सोडून एकांगीस यावें याजप्रमाणें बाहर आले'-भाब १३४ 'कोणाच्या डेन्यात शिरोन मारामार केली, कोणाशीं एकांगी करून पराभविलें'-मराभा ४ [एक+अंग]

**एकांगुळ**—वि एक डोळा गारोळा आणि एक पाढरा असणारा (घोडा), एक मडलिया (फा) हुकीर ही एक घोड्याची खोड आहे -अश्वप १९४ [एक+अंग]

**एकाग्र**—वि एकतान, एकलय, एकाकडेच ओढलें गेलेलें (मन, अंत करण), एकाच विषयाला वाहिलेलें, अचचल, स्थिर [स]

**एकघायीं**—क्रिवि एका घावात, एका दाटक्यात, एका वेळीं, एका तडाख्यात [एक+घाय-व]

**एकाचीएक**—वि एकमत, एकदिल (अनेक व्यक्तींच्या समूहाबद्दल योजतात)

**एकाटणें**—अक्रि (व) एकवटणें, एकहाणें **एकाटून येणें**-(जीव) कासावीस होणें एकाएकीं जीव एकाटून आला' [एकट]

**एकाड-ढ**—वि (वों) विचित्र, विलक्षण, चमत्कारिक, स्वच्छंदी, एकवल्ली [एक+अडणें', एकाड²]

**एकाडेपणा**—पु अलगपणा, एकलकोंडेपणा, फटकून वागणें 'मुंबईच्या नेमस्त प्रातिक कमिटीच्या एकाडेपणाचा तीव्र निषेध करून काँग्रेसचें द्वार सर्व राजकीय पक्षास यामुळें मोकळें झालें' -टि ३ ३३१

**एकाड्या**—पु. १ ज्याचें अड विभागलेलें न दिसता एकच दिसतें किंवा ज्याचें अड एका बाजूस लोंबत असतें असा घोडा, असें अड असणें ही एक घोड्याची खोड समजतात -अश्वप १९६. [एक+अड] २ एकांगवीर पहा कोणत्याहि पलटणीला जमा नसून स्वतंत्रपणें लढणारा, स्वतंत्र शिलेदार, शूर, धाडसी पुरुष, (इ) कॅव्हॅलिअर 'एकाड्या शिलेदाराची स्वतःची जमात नसते व हा कोणाच्या ताब्यात नसतो, वाटेल त्या जातीचा पण फार धाडशी व शूर असून त्याला सालीना ३०० ते २००० रु पर्यंत वेतन व उत्तम कामगिरी केल्यास क्वचित पालखी व अब्दागिरीचा मान मिळे प्रत्येक पथकात अथवा पागेंत त्याच्या त्याच्या मानानें त्याची १० ते १०० पर्यंत तरवा असे अत्यंत आणीबाणीच्या वेळीं हा पुढें होई हाच पुढें वहती मिळवून पागा अथवा पथकी होई'-मैद्य-मध्य भारत १ २ १२७, -हरिवश बखर ३१ 'नित्य नो गणतीस लागली एकाडे देशावरले'-ऐपो २१६ 'सरंजामी सरकारी एकाडे ठक्क ठक्क मागें उरले'-प्रला १२५ ३ एकटाच काम पार पाडणारा, दुसऱ्या कोणाची मदत न घेणारा (हरदास, गवई इ०). [स एक+अड, तुल० तेलगु एकाडमु=एकटा, अपेट]

**एकांत**—पु. १ खाजगी जागा, कोणाचा उपद्रव होणार नाहीं असें स्थळ, निवात स्थान 'बहुतकरूनि एकांतें बैसिजे गा।'-ज्ञा ६ १८० २ निश्चित स्थान, कायम स्थान 'जें आकाराचा प्रांतु। जें मोक्षाचा एकांतु।'-ज्ञा ६ ३२१ ३ खाजगी मसलत, खलबत, एकीकडे विचार, गुजगोष्ट, लोकांनी याच्या उलट [स एक+अंत] •करणें-१ खलबत, गुजगोष्टी करणें 'नलें तुजशीं एकांत काय केला'-नल ११७ २ एकातात, एकमेकाच्या सहवासात असणें, अगदीं सलगी करणें, एखाद्याजवळ एकटें राहणें (निंदाव्यजक) 'तुशिलेनें कीचकाशीं एकान्त केला व तर्थे ती त्याच्या अगदीं जवळ बसली'-सुदे २३० •कोठडी-स्त्री १ एकीकडची, निर्जन खोली (तुरुंगातील तळघर वगैरे) २ अंधारी, अधाऱ्या कोठडींत कोंडण्याची शिक्षा, एकात तुरुंगवास

**एकांतर**—वि एक सोडून एक असें, एक दिवसाआड (ज्वर) -न एक दिवसाआड जेवण्याचें व्रत धरणें पारणें 'अथवा एका तरा कुच्छी। चांद्रायणें मासोपवासी। शोषीति गा धातुरासी। करिती तपें।'-ज्ञा १७ ३६४ [स एक+अंतर]

**एका तागडीचीं पारडीं**—न अ (वाक्य) सारख्या तोलाच्या, गुणदोषाच्या (चोराच्या, लबाडाच्या, सारख्याच्या) जोडीला म्हणतात, समदुर्गुणी माणसें (निंदाव्यंजक) [एक+तागडी+पारडें]

**एका ताटांतला**—वि एकाच ताटात बसून जेवणारा, एकाच अनाचा (मित्र, सोबती) एका ताटीं जेवणें, एकताटी पहा [एक+ताट]

**एकांतिक**—वि परब्रह्मीं लीन, ब्रह्मरत [सं एक+अतिक] ०धर्म-पु भागवत धर्म 'हा भागवत किंवा नारायणीय धर्म त्यासच सात्वत किंवा एकांतिक धर्म अशीं दुसरीं नावें आहेत' –गीर १०

**एकांतींलोकांतीं**—क्रिवि खाजगी व सार्वजनिक रीतीनें गुप्त आणि प्रकट, क्वचित् एकांतलोकांत असाहि प्रयोग करतात ०सांगणें-एकीकडे व प्रसिद्धपणें, चारचौघात सांगणें [एकांत+लोकांत]

**एकात्मता**—स्त्री एकपणा, एकरूपता, तादात्म्य 'उदकपणें पाहुता। तरंगाची एकात्मता। न मोडेचि जैसी॥' –ज्ञा १८ ११७१ [स एक+आत्मता]

**एकात्मवाद, एकात्मकेश्वरवाद**—पु एका परमात्म्यानेंच सर्व विश्व व्यापिलें आहे त्यावाचून अन्य कांही नाहीं असें मत, अद्वैतवाद, (इं) युनिटेरिआनिझम् [स एक+आत्मन्+वाद]

**एकांना-तरा**—वि एकदिवसाआड येणारा (ज्वर) एकां तर पहा [स एकांतर]–क्रिवि एकदिवसाआड ०आड-एकां आड–क्रिवि एक दिवस आड, एक दिवस सोडून [एकांतर+आड]

**एकाद-दा**—वि एखाद-दा पहा ०दुकलो-(गो) एखाद दुसरा [एकाद+दुकल]

**एकादश**—वि १ अकरा (११) संख्या २ अकरावा. 'आता यावरी एकादशी। कथा आहे दोन्ही रसीं।' –ज्ञा ११ १ ३ भागवताचा अकरावा स्कंध 'करतळामळ वोणी एकादश केला। –मुक्तेश्वरकृत एकनाथाची आरती ३ [स]०स्थानीं असणें–अति शय स्नेहभावानें असणें जीवश्चकंठश्च असणें अकरावा पहा ०रुद्र–पु शिवस्वरूप अकरा देव अकरा रुद्र पहा या अकरा रुद्रदेवतांचीं साधारण नावें अशीं–वीरभद्र, शंभु गिरीश, अजैकपाद, अहिर्बुध्न्य, पिनाकी, अपराजित, भुवनाधीश्वर, कपाली, स्थाणु व भव

**एकादशी**—स्त्री दर पंधरवड्यातील प्रतिपदेपासून अकरावी तिथि हिचे स्मार्त आणि भागवत असे दोन प्रकार आहेत ज्यावेळीं दोन दिवस एकादशी असते त्यावेळीं पहिली स्मार्त व दुसरी भागवत असें धरितात दर महिन्यातील शुक्ल आणि कृष्ण पक्षातील एकादशींचीं जीं निरनिराळीं नावें आहेत तीं अनुक्रमें पुढील प्रमाणें–चैत्र–कामदा, पापमोचनी, वैशाख–मोहिनी, वरूथिनी, ज्येष्ठ–निर्जला, अपरा, आषाढ–शयनी, योगिनी, श्रावण–पुत्रदा, कामिका, भाद्रपद परिवर्तिनी, अजा, अश्विन–पाशांकुशा, इंदिरा, कार्तिक–प्रबोधिनी, रमा, मार्गशीर्ष–मोक्षदा, फलदा, पौष–प्रजावर्धिनी, सफला, माघ जयदा, षट्‌तिला, फाल्गुन–आमलकी, विजया [स] म्ह० एका दशीच्या घरीं शिवरात्र–जेव्हा एका संकटामागून दुसरें येतें, किंवा एका कंगालाजवळ दुसरा कंगाल भिक्षा मागतो तेव्हां ही म्हण योजतात ०वात–स्त्री चार बोटाच्या रुंदीवर २५० पेरें घेऊन (५०० मुठींची) कापसाची एक वात तयार करतात अशा दोन वाती आषाढी एकादशीपासून एक वर्षभर दर एकादशीस लावतात.

**एकानएक-नेक**—क्रिवि झाडून सर्व एकुनएक पहा

**एकानुसंधानी**—वि एक अनुसंधान, ध्येय, उद्देश असणारा, एकावधानी, एकदृष्टी, एकदर्शी [स एक+अनु+संधान]

**एकान्न**—न १ एक जेवण, दिवसातून एकच वेळ जेवून राहणें 'मला आज पंधरा दिवस एकान्न चाललें आहे त्यामुळें उष्ण झालें' २ एक धान्य, कोणत्या तरी एका धान्यावर राहणें ३ (क) एकत्र जेवणखाण करणें [स एक+अन्न]

**एकापक्ष-पक्षीं**—क्रिवि एका अर्थी, एकपक्षीं पहा [एकपक्षीं अप]

**एकापा(फा)सोळींचा**—वि लुकडा, रोड, अशक्त याच्या उलट दुहिरी हाडाचा, रगरहाडाचा [एक+पा(फा)सोळी]

**एकामी-मे**—क्रिवि १ विराम न घेता, इतर कांहीं न करिता, सर्व उरकून, आटपून, एका झटक्यात, दुसरीकडे न वळतां (उर कणें, सुरू करणें, करणें) 'भोजन आटोपून एकामींच निघावें म्हणजे वाटेनें मध्यें अनारवयाग नलगे' २ एकदाच, पुनरावृत्तीची वेळ येणार नाहीं अशाप्रकारें (जाणें, करणें) ३ एकदम, सर्व मिळून, एकत्र, एकेवेळीं, युगपत्, (येणें, जाणें, करणें) 'सर्पेंति एकामेंचि प्राणहर प्रखरतैक्ष्ण्य गर्वी।' –मोकर्ण (पराडकर प्रत) १९ २१ [एक+काम]

**एकायतन**—न १ एक स्थान, एक ठिकाण, अधिष्ठान, आश्रय स्थान (ल) ब्रह्म 'जे वयोतजाचिया राशीं। कां एकायतन ज्ञानाशी।' –ज्ञा ८६२ [स एक+आयतन]

**एकार**—पु (व) रस्त्याची (दुसरीपेक्षां) उंच भरणारी बाजू, एका बाजूस उचवटा असणारा भमा रस्ता 'एकारावर गाडी कलंडेल बघ!'–वि (व) १ (ओझ्यामुळें) एका बाजूस कललेला, खचलेला २ एकवडी (माणुस) [स एकीड, एक+धार] ०जाणें-होणें–कलणें एकीकडे खचणें, खालीं येणें (जनावराच्या पाठीवरील ओझें गलथत, होडी), झोंक जाणें, पुढें येणें ०बसणें–१ कलून, रेलून बसणें २ (ल) अलग राहणें, बाजूस राहाणें, एकीकडे बसणें.

**एकारणें**—अक्रि १ (ओझें अधिक झाल्यामुळें) एकीकडे झुकणें, कलणें, दबणें, एक अंग खालीं येणें (गोणी, पडवी, गन बत यांचें) २ गुंतागुंत होणें सर्व एक होणें, एकवटणें (दारी इ०) ३ एकीकडे पुरणें, खालीं येणें, लोंबणें, जाडें होणें (कृपण इ०) –सक्रि एकत्र करणें, रास करणें, गोळा करणें [एकार]

**एकारत-थ**—(गो ) एकारती पहा

**एकारती**—स्त्री एका वातीचें, आरतीचें निरांजन याच्या उलट पचारती [ स एक+आरति ]

**एकारी**—स्त्री (व ) एक चाकोरी खोल असलेला रस्ता एकार पहा

**एकार्णव**—पु (एक समुद्र) कल्पांतीचा जलप्रलय, प्रलयकाळीं सर्वत्र पाणीचपाणी होऊन झालेला महासमुद्र 'जा एकार्णवातील जिरली । जेविचा तेथें ।' –ज्ञा १० २७१ 'जेवीं त्या एकार्णव जीवनीं । क्रीडे हरि मीन होउनी । त्येवीं तू निगमागम जीवनी । मत्स्य होऊनी पोहसी ।' –न १ ३९ [ स ]

**एकावन-न्न**—वि ५१ संख्या [स एकपंचाशत्, प्रा एा पनास ]

**एकावली**—स्त्री १ एक अर्थालंकार, पदांची श्रेणी, यांत पहिल्या वस्तूशीं दुसऱ्या वस्तूचा, दुसरीशीं तिसरीचा असा साखळीप्रमाणें विशेषणरूप संबंध असतो 'राज्यांत समृद्ध पुरें उच पुरांतिल गृहें, गृहांत जन–। उद्योगशील सार, उद्योग स्तुत्य अति विपुल धन ॥' ( यांत राज्य, पुरें, गृहें, जन, उद्योग आणि धन असा सहा पदार्थांची एक श्रेणी दिसते ) –अर्थालंकाराचें निरूपण १७९ २ एकावळी पहा. 'नवरत्नांचें दवाचें पदक आणखी एका वरी कोठें आहेत ?' –नाना ८३ [स ]

**एकावळी**—स्त्री एक गळ्यातील अलंकार एकपदरी माळ, कंठा, हार 'जेय अहंकारा उसी जाहली । एकावळीचीं काटली । दोरी जैसी ।' –ज्ञा १३ ५३० 'वरी पीतवर्णाची चोळी । त्या वरी रत्नहार एकावळी ।' –कथा २ ११ ९८ [ स एक+आवलि ]

**एकांशिक, एकांशी**—वि एका भागासबंधी, एकांगी, मर्यादित स्वरूपाचा, विशिष्ट विषयापुरता, संकुचित [ स एक+अंश ]

**एकांशीं**—क्रिवि कांहींसे, एका रीतीनें, एका बाजूनें, एका बाबतींत [ एक+अंश ]

**एकासरें**—क्रिवि एका पद्धतीनें, वृत्तीनें एकसरें पहा 'तुका म्हणे तरें । भवसिंधु एकासरें ॥' –तुगा १२०० [ एक+सर ]

**एकाह**—पु एक सबंध दिवस, चोवीस तास [ स एक+अहन् ]

**एकाहत्तर**—वि ७१ संख्या, एकात्तर [ स एकसप्तति प्रा एकसत्तरि, एहत्तरि, सिं एकहत्तरि ]

**एकाहार**—पु एकवेळ पक्षि एकत्र उडणारे अशीं एक हारा । पर्वो पाहें ।'–ज्ञा १८ २९१ पाठभेदी एका हारा । एका गाथा ।' –अमृ १ ? [ एक+हार ]

**एकाहिक**—वि एकाहिक पहा [ स एक+आहिक ]

**एकाहीदोयीं**—क्रिवि एका स्थळीं, एका प्रकारें एकाशीं

**एकाक्ष**—वि एक डोळ्याचा, एकडोळ्या, एका डोळ्यानें आपला –पु कावळा, शुक्राचार्य [ स ]

**एकाक्षर-री**—वि एका अक्षराचा, एक अक्षर असलेला, उ० एकाक्षरी कोश [ स ]

**एकिहेळां**—क्रिवि १ एक वेळ, एकदा 'तें एकिहेळा घे पा आघवें ।' –ज्ञा ९ २९९ २ एकदम, अकस्मात् 'हें लटिकें केवीं म्हणिजे । एकिहेळा ।' –ज्ञा ४ ३९ [ एक+हेळा, तुल० प्रा हेला= शीघ्रता ]

**एकी**—स्त्री १ ऐक्य, सख्य, मैत्री, स्नेह, गट्टी, एकमेळ, एकदिल २ अभेद, अद्वैत, अभिन्नता ( हेतु भाव, हित, उद्योग यासबंधीं ) ३ (एकीबेकी खेळांत) विषम संख्या 'एकी का बेकी ?' ४ स्त्री, मुलीं, स्तुतक, शाळांतून विद्यार्थी लघ्वीला जाताना परवानगी मागताना ( एकबोट दाखवून ) म्हणतात गुजरातेंतहि या व वरील प्रथानें रूढ आहे [ तुल० का एककुक्षरन रहणें, वारवार लघ्वी-परसाकडेस होणें ] ५ एक यांचें अनेक वचन एकी म्हणती काय झालें ?' –राजवाडे ग्रथमाला [ स एक, प्रा एकी ]

**एकीं**—क्रिवि एकानें गुणून, उ० एक एकीं एक, पाच एकीं पाच, असें पाढ्यात म्हणतात

**एकीकडचा-कडील**—वि एका बाजूचा, दिशेचा, भागाचा वगैरे [ एक+कड ]

**एकीकडून-कडणें-कडनें**—क्रिवि १ एका बाजूनें, दिशेनें, भागानें, एका बाजूस अगास, भागास 'यदा एकीकडून भावे आले' २ एकदम सर्व मिळून, एकंदर सगळे 'तुम्ही सगळे एकीकडून शिव्या देऊ लागला तर ' [ एक+कड+हून ]

**एकीकडे-कडेस**—क्रिवि १ अनेक कडा, बाजू यांतून एका ठायीं, एका अर्थी २ एका बाजूस, एकीकडून अर्थ १ पहा ३ बाजूस, वहिवाटीच्या रस्त्यापासून दूर, लांब, पलीकडे ४ ( ल ) प्रस्तुत भाषणादींचा प्रस्तावबस, त्यापासून अलग, दूर 'मी बोलला तें एकीकडेच राहिलें, आपलेंच तुणतुणें पुढें आणतो '

**एकीकरण**—न १ संमिश्रण, मळ्स्रण, मिश्रण, एक करणें, मिसळ करणें २ अभेद अद्वैत एकाकार, ऐक्य, ऐक्य [ स ]

**एकीकाष्ठा**—क्रिवि एकसारखें तौलनिक पद्धतीनें विचार करून, पराकाष्ठेनें विचारपूर्वक तात्त्विकदृष्ट्या 'तेणें हृदय का द्रवे । या शब्दीं दशा बापडी । पाहतां एकी काष्ठा । स्फूर्तिमात्र तो ।' –अमृ ७ १४४ [ स एक+काष्ठा =दिशा सीमा ]

**एकीन**—स्त्री खात्री, हमी व-यांनीही तसदी होईल हे एकीन समजून । –रा १५ १०२ [ अर यकीन ]

**एकीबेका**—स्त्री १ यासंबंधी मुलांचा एक समविषम खेळ एकाचा हात मुठीत पैसे वगैरे धरून दुसऱ्यास ते सम आहेत कीं विषम आहेत असे विचारतात त्यानें सांगितलें (आधून पाहत) तें खरें ठरले तर मुठीतील सर्व पैसे १० रुपये जुवारानें, गाडें खाण्याचा दुसऱ्यापासून जिंकून आणाया घ्यायाचे, गुजरातेंतहि हा

रेळ आहे 'एकीवरी पोरा सांग दाहकरी' -मज ११४ २ जूटपूट, समेट आणि माडण [एक+भव्=होन] म्ह० एकीत जय, भेदीत क्षय

**एकीभवन**—न सकलन, संमिश्रण, एकीकरण [स एक+भवन]

**एकीय**—मि एकटा, एकला, एकासवधी [स]

**एकीसवा**—क्रिवि १ एकसारखा, एकत्र २ एकदाचाच, एकीकडे 'सकळही तुम्हीं व्हा गे एकीसवा। तुका म्हणे जीवा धीर नाहीं।' -तुगा ? [एक+साह, म गर्ने]

**एकुण, एकुणएक**—एकूण, एकूण एक पहा

**एकुणअशीं-ऐशीं**—मि ७९ संख्या [स एकोनाशीति, प्रा एगूणासी, म एक+उणा+ऐशीं]

**एकुणचाळीस**—वि ३९ संख्या [स एकोनचत्वारिंशत्, प्रा एगूणचत्ताल म एक+उणा+चाळीस]

**एकुणतीस**—वि २९ संख्या [स एकोनत्रिंशत्, प्रा एगूण तीस, एक+उणा+तीस]

**एकुणनव्वद**—वि ८९ संख्या [स एकोननवति, प्रा एगूण णउइ, गो एकुणनव, एक+उणा+नव्वद]

**एकुणपन्नास-पन्नास**—वि ४९ संख्या [स एकोनपंचाशत् प्रा एगूणपन्नास, म एक+उणा+पन्नास]

**एकुणवीस, एकुणीस, एकोणीस**—वि १९ संख्या [स एकोनविंशति प्रा एगूणवीस, म एक+उणा+वीस]

**एकुणशंभर**—वि (क) ९९ संख्या [एक+उणा+शंभर]

**एकुणसत्तर, एकुणहत्तर**—वि ६९ संख्या, एकुणसत्तर [स एकोनसप्तति, प्रा एगूणसत्तर म एक+उणा+सत्तर]

**एकुणसाठ**—वि ५९ संख्या [स एकोनषष्टि, प्रा एगूण सट्ठि म एक+उणा+साठ]

**एकुणात-नात एकुणाहात**—स्त्री १ हिशेब पुरा केल्यावरची, अखेरची एकूण रकम, हिशेबी अखेरी रकम शिल्लक 'शवटीं एकुणात दत जावी' -खानगी खातें अमलदाराचे अधिकार (बडोदें) १८५ २ या पुऱ्या केलेल्या रकमेवर मालकानें करावयाची सही किंवा रेघ, लेख ३ या सहीवर एक विशिष्ट खूण म्हणून काढतात ती U— अशी रेघ रेघ पहा ४ (ल) भाषणातील प्रमाणभूत सार, सारसिद्धांत, तात्पर्य [एकूण]

**एकुणेर**—एकुनपर पहा

**एकुणेशी**—एकुणअशी पहा

**एकु(कु)न(ण)एक**—क्रिवि १ एकच, तेंच तें, सर्व सारें एकच २ प्रत्येक, कोणी न वगळतां सवजण [एकुण+एक, एक+अनु+एक ?]

**एकुनपर-येर, एकुनेर**—क्रिवि १ (कुण) परस्पर, एक मेक 'लोक पुसती एकुमेराला।' -ऐपा १३० २ एकुलएक पहा [एक+अनु+येर, एकूण]

**एकुलता, एकुलताएक**—वि एकटाच, एकचएक, जो नाहींसा झाला असतां दुसरा मुलीच नाहीं असा [एकल+एक]

**एकूण-न**—क्रिवि १ तर मग, असें आहे तर, सारांश, एक दरीत 'एकूण त्या मुलीच्या भाच्याला राज्यावर बसविण्या करितां तु आला नीचपणा केलाय काय?' -चंद्रगुप्त १०९ २ सर्व मिळून एकदर गट्ट्या किंवा बेरीज 'पाचा जणांनी पाच पाच रुपये दिल्हे एकूण पंचवीस झाले' -भाल ३ अहल (वाल्याचा निर्णय काढून आलेलें मत म्हणून), पक्षा, वस्तादूर, उ० एकुण ख्याड-लुच्चा-मादा-हरामी-मूर्त [म एक+अनु] ०एक-क्रिवि एकुन एक पहा ०जमा-बेरीज-स्त्री (अनेक रकमांची) एकदर बेरीज, एकदर रकम वाटणखार-एकूण क्षेत्रफळ सारखेंच (टाकी कमी करून म्हणे त्याप्रमाणानें वाढविली किंवा म्हणी कमी करून लांबी त्या मानानें वाढविली तरी क्षेत्रफळ सारखेंच राहणार यावरून)=एकूण एकच-एकीकडे कमी तर दुसरीकडे जास्त तेव्हा एकदर बरोबरी

**एके**—अ एकवेळा एकानें मुगावयाचें असतांना योजावयाचें अव्यय उ० तीन एके तीन

**एके**—एकचें अनेकवचन, एकी अर्थ ५ पहा

**एकेक**—एकएक पहा [स]

**एकेचाळ-चाळीस,एकेताळ ताळीस**—वि ४१ संख्या [स एकचत्वारिंशत्, प्रा एगचत्ताल हिं एकतालीस]

**एकेठाय**—क्रि वि (कु) एका ठिकाणीं, एके जागीं, एकत्र, एकाठायीं [एक+ठाय]

**एकेरा-री**— वि १ दुहेरी, घडीचा किंवा पिळलेला नव्हे असा, एकपदरी (कापड, कागद, सूत वगैरेला लावितात), विरळ विणीचें (सूणा) उ० 'एकेरी फुलें गुफून केलेली माळ ती एकेरी माळ' २ पोता, बारीक, दुबळा (गाण्याच्या कामीं गळा, आवाज वगैरे) ३ एकवचनी, अरेतुरे असा (उल्लेख, संबोधन) 'तू मला शिवकुमारी या एकेरी नावानें हाक मार पडे।' -विवि ८ ? ३० 'थोरास एकेरी शब्द बोलू नये' ४ एकाएक, स्वतंत्र दोन दोन तीन तीन अशा प्रकारें संवद नव्हे असा **एकेरीवर येणें**-१ अरेतुरे म्हणणें, एकेरी नावानें संबोधणें (अनादरयुक्त) २ (ल) चिरडीस जाणें, चिडणें

**एकेरापट**—पु (मल्लविद्या) एक पेंच, जोडीदाराच्या एका पायास गुडघ्याच्या ल्हवणींत हात घालून उचलून आपलें डोकें जोडी दाराच्या बगलेजवळ छातीस दाबून जोडीदारास चीत करणें [हिं एक्का=जमिनीवर जोरानें आपटणें]

**एकेराहुलकस**—पु (मल्लविद्या) एक पेंच आपण आपल्या जोडीदारास खालीं आणून त्याची मान आपल्या छातीनें दाबून

आपला एक हात जोडीदाराच्या बगलेंत घालून आपल्या दुसऱ्या हाताचें कोपर जोडीदाराच्या बाहेरील मुडघ्यावर ठेवून आपल्या दोन्ही हातास मिठी घालावी व त्या बाजूचा आपला हात जोडीदाराच्या मुडघ्यावर ठेविला असेल त्या बाजूचा आपला पाय जोडीदाराच्या गुडघ्यापासून घोट्यापर्यंत तटवावा व जोडीदाराच्या बगलेंतून घातलेल्या हातानें झटका देऊन जोडीदारास चीत करावा [ हिं हूल=धक्का+कस=जोर, हूल्कस=जोरानें धक्का देणें ]

**एकेरी ईंजन**—न (यंत्र) एक पचपात्र असलेलें वाफेचें इंजन [ इ सिंगल सिलेंडर एन्जिन ]

**एकेरी इष्टराशि-राशिक**—पु स्त्री न इष्टराशि, इष्टकर्म पहा

**एकेरी कारकून**—पु हलक्या दर्जाचा कारकून, याला शिपाई, प्यादे इ० नेमणूक नसते, यानें काम निव्वळ कारकुनीपलीकडे कांहीं नसतें, (गिराव्यनक) धोपटमार्गी [ एक+कारकून ]

**एकेरी वहिवाट**—स्त्री (जमाखर्च) एकदांच नोंद करणें दुबरनीच्या उलट [ एकेरी+वहिवाट ]

**एकेरीसरकत**—स्त्री (अंकगणित) एकपाती, एकभागी, एकेरी प्रमाणभाग, वाटणी दुहेरीसरकतच्या उलट (इ) सिंगल फेलोशिप [ एकेरी+सरकत ]

**एकेरी होन**—पु एक नाणें, होनाचा एक प्रकार होन पहा

**एकेहत्तर-हात्तर**—एकाहत्तर पहा

**एकैक**—वि एकएक, एकेक 'एकैके वेळे जातें दुखणें। तें आम्ही केलें पुसवणें ॥' –शिशु ८१६ [ स ]

**एकापकी**—क्रिवि एकाएकी पहा

**एकोटणें**—उ कि एकवटणें पहा

**एकोटा**—अ कि एकवटा पहा

**एकोटी**—स्त्री (खा) भाकरी भाजण्यासाठीं तव्याप्रमाणें उपयोगांत आणावयाची वाटोळी मातीची खापरी [ एकवटी ]

**एकोत्तरा**—पु एकोत्रा पहा 'जें एकोत्तरयाचिया वाडी। जळतिये आगी घालिती उडी।' –ज्ञा ९ ५४ [ स एक+उत्तर ]

**एकोत्तरावा**—वि एक अधिक, भिन्न, वेगळा 'सहस्त्ररी वाढिया। आहाति सहस्त्रार्जुना राया। तरी तो काय तिया। एकोत्तरावा।' –अमृ ७ १४० [ स एक+उत्तर ]

**एकोत्रा**—पु दर महा दर शेकडा एक रुपया व्याज असा व्याजाचा दर [ स एक+उत्तर, सिं एकोतर म एकोत्तरा ]

**एकोत्री-एकोत्रें**—स्त्री न उजळणीचा एक प्रकार मुळाक्षरांच्या वर्णांचा पाढा ७० अक्षरे अक्षर एकरीसारखें [ एकोत्तर ]

**एकोदर**—वि सोदर एका आईचीं, एकाच उदरांतून उत्पन्न झालेलीं (मुलें) 'कच बोले आदरें। तुम्ही आम्ही एकोदरें।' –पाप्र ५ ९९ [ एक+उदर ]

**एकोदरशें, एकोदरशें, एकोद्दर्शें**—वि एकशें एक (१०१), हुंडी लेख वगैरेंतून हा शब्द येतो 'अश्वपति नरपति राजे हाती। एकोदर्शें राणी तया वर्णूं नाहीं मिती।' –वसा १३ 'त्याचे एकोदरशें झालेच!' –भा १० [ स एक+उत्तर+शत, एकोत्तर+शें ]

**एकोद्दिष्ट**—न १ मृताच्या उत्तरक्रियेंत सपिंडी (नयीस उद्देशून) श्राद्ध होण्यापूर्वी अकराव्या दिवशीं करावयाचें श्राद्ध २ फुलता, आज इ० निपुत्रिक मृत झाले असल्यास केवळ त्यानाच उद्देशून (म्हणजे त्रयीचा उद्देश न करता) हें श्राद्ध केलें जातें म्हणून एकोद्दिष्ट हें नाव यास आहे –धर्मसिंधु एकोत्तिष्ठ असाहि शब्द रूढ आहे [ स एक+उद्दिष्ट ]

**एकोपा-या**—पु एकी, एकमत, जूट, संघटना 'राष्ट्राच्या अभ्युदयाकरितां एकोप्यानें प्रयत्न करण्याची जरूरी आहे' –टि ३ २४६ [ एक+उप ?, स एकात्मता एकाप्पआ–एकापा–एकोपा –भाअ १८३४ ]

**एकोशास, एकोशी एकोस**—क्रिवि (कों) एकीकडे, आडवळणीं, एकांतीं, रस्त्यापासून बाजूला (गाव वगैरे) [ स एक+वश ]

**एकोसा**—पु जनावराच्या मांचलास होणारा एक रोग

**एंकोळ**—पुस्त्री एक मोठें सरळ वाढणारें झुडुप

**एकोळा**—वि एकसमूह, एकवट एकोळा करोनि लागु वळावीरा।' –भाऐ १० ३ ११४ [ एक+काल, एक+वळणें ]

**एक्कडेन**—क्रिवि (गो) एकीकडे, एकत्र [ एकीकडे, वा ईकडे, म इकडे, एकवट ]

**एक्कलकोंडा**—एकलकोंडा पहा

**एक्का**—पु (कों) तबल्यावरील एक ठेका

**एक्का**—पु १ (व ना) एक दिवस अहोरात्र भजन, भजनसप्ता, खंड न पाडता एक दिवस अहोरात्र करावयाचें नाम स्मरण, भजन 'काल एक्क्याची समाप्ति झाली' २ एकी, जूट, एकमत एकविचार 'पुढें स्वराज्यामध्यें असून एका नसून वेबंदी झाली होती' –यापा १४ [ स एक प्रा एक्क ]

**एक्का, एक्क्या**—पु १ पत्त्यांतील पानांपैकीं ज्यावर एक चिन्ह आहे असें पान (पत्ते–गंजिफांत प्रत्येक रंगाचा एक एक्का असतो) हें पान सर्वांत भारी मानण्यांत येतें एका पहा 'एक्का म्हणे राजाशाही मागतो'' –क २६ ७ ३० २ (ल) अद्वितीय, श्रेष्ठ माणूस [ स एक प्रा एक्क ]

**एक्का, यक्का, येक्का**—पु एक बैलाची (क्वचित् घोड्याची) गाडी, बैलगाडी, छकडा (हिंदी येथील) भीमक लोक प्रात काळीं मोठाले बैलाच रथ किंवा येक्के यांत बसून यमुना स्नानास जातात' –तीर्थयात्राप्रबंध ६९ [ स एक, प्रा एक्क, पा एक्का, अ एक्का, गु एक्को ]

**एक्झेक्यूटर**—पु (कायदा) मयताने आपल्या मृत्युपत्राप्रमाणे आपल्या इस्टेटीची व्यवस्था करण्याकरता नेमलेला व्यवस्थापक, यथावर्णीतमनगार (कोर्टाकडून नेमल्या जागाच्या व्यवस्थापकाला ॲडमिनिस्ट्रेटर म्हणतात) [इ]

**एक्झेक्युटिव्ह**—क्रिवि कार्यकारी, विधायक शासनाचकी ०इंजिनिअर-पु सडका, इमारती, पाटबंधारे वगैरे (पी डब्ल्यु डी) कामावरचा एक वरिष्ठ अधिकारी ०कौन्सिल-न कार्यकारीमंडळ, कारभारीमंडळ [इ]

**एक्बार**—स्त्री वातमीपत्र, अखबार पहा -दिमरा १ १६४ [फा अख्बार]

**एक्बालपन्हा**—वि दैववान, नशीबवान [फा इक्बाल्+पनाह्]

**एक्यायशी, एक्यायशी**—वि ८१ संख्या [स एकाशीति, प्रा एक्कासीइ, सिं एकासी]

**एक्याण्णव**—वि ९१ संख्या [स एकनवति, प्रा एक्काणउय, सिं एकानवे]

**एक्या माळेचे मणी**—वाक्प्र (शब्दश एका माळेतील एकसारखे मणी) एका जातीचे, धर्माचे, स्वभावाचे, पेशाचे वगैरे सदृश अशा अनेक व्यक्ती, समानधर्मी म्हृ० एक्या माळेचे मणी ओवायला नाहीं कोणी

**एक्रार**—पु करार, कबुली, इकरार 'ठेरो स्पष्टवादे पुसता मुल्जीम होऊन एकार केला '-रा २० ६५ [अर इकार]

**एक्लेसिया**—स्त्री (सि) समूह अथवा संघ (इस्राएल अथवा ख्रिस्ती लोकाचा), (ख) उपासनेची बैठक (आ) स्थानिक संघ, (इ) ख्रिस्ती महामंडळ, सार्वत्रिक ख्रिस्तीमंडळी 'ख्रिस्ताने जर एक्लेसिया स्थापिली तर ख्रिस्तापूर्वी एक्लेसिया नव्हती काय?' -ईवि १-५ १२३ साम्रा १०२ ११८ [इ एक्लेसिया, ग्री एक्=बाहेर+कॅलेओ=मी बाहेर बोलावतो]

**एक्स-ऑफिशिओ**—विक्रि अधिकारपरत्वें हुद्याच्या नात्याने, (सभासद एखाद्या कमिटीचा) [इ]

**एक्सप्रेस**—वि तावडतोबीचा, घाईचा, निकडीचा उ० एक्सप्रेस टेलेग्रॅम=जरूरीची तार, एक्सप्रेस ट्रेन=दौडगाडी, जलद गाडी (मधील थोड्या स्टेशनावर थांबून लवकर पोचणारी आगगाडी), याच्या उलट पॅसेंजर ट्रेन) [इ]

**एक्सरसाइझ**—पु १ धडा, पाठ, अभ्यास २ व्यायाम, कसरत, मेहनत ३ अभ्यासाची वही, टिपणवही, एक्सरसाईज बुक [इ]

**एक्स-रे**—पु (पदार्थ) क्ष-किरण रॉन्टजेन किरण (प्रो रॉन्टजेनने १८९५ त हे शोधून काढले), विद्युज्जन्य प्रकाश किरण या किरणामुळे अपारदर्शक वस्तूतील अतर्भाग दिसतात. रोग्याच्या शरीरातील बिघाड यानीं अजमावतो [इ एक्स अननोन+रे=किरण]

**एक्समाईज**—पु १ देशातील मालावर तो तयार होत असताना किंवा तयार होऊन देशात विकण्यापूर्वी बसविलेला सरकारी जकात, असल्या जकातीचे खाते २ अबकारी खाते [इ]

**एक्सान, एक्सा, एक्सू**—वि एकनिष्ठ, एकसारखे 'धन्याशीं एकसान चाकरी केली हे मुख्य पदरीं आहे' -म १ ४०५ 'जमाना एकसा नाहीं' -रा ५ ८५ 'खानाजाद नौकर एकसू' [फा यक्सान, फा यक्+सू=बाजू]

**एखत्यार-री**—अख्त्यार-री पहा

**एखरा**—पु बाळंतिणीचे घर, तालीमखाना

**एखाद-दा**—वि १ कोणीतरी, कोणीएक अमुक, विशिष्ट नव्हे तो, एखादा-दी 'सुवर्णी नव्हता स्वर्ग, असता एक दे' 'आपल्या करिताम पर एखादे दुर्गे घेईल' २ (अध्याहार होऊन) एखाद्या वेळीं, एखाद्या प्रकारे 'एखाद्यान जाऊ नको, एखादा दुख होईल' [स एक+भवे हिं एक+आधा, तुल० व एकआध]

**एखादुसरा**—वि कोणी एखादा (क्वचित आढळला तर), एकदोन आणखी, कदाचित एक जास्त (आतापावेतों सांगितल्यापेक्षा) [एखादा+दुसरा]

**एखलास-सी**—पु स्त्री स्नेह आदर, यगानगत, पहा, मैत्री इख्लास पहा -खरिका एखलासीचा -रा १० १६७ [फा यख्लास, अर इख्लास]

**एगणें**—उ क्रि वेंघणें पहा

**एगरट**—वि (व) अक्कलशून्य [एगर+ट वेंगळ-वेंधळ]

**एगान**—स्त्री (जरतार धंदा) एकेरी तार, एकाच तारेस पीळ दिल्या आल्यास तीस म्हणतात, [फा यगान=एकी, तुल० स एक]

**एगानगत**—स्त्री ऐक्य, स्नेह 'दुनियाईत दोहीं दौल्तींची एगानगत मशहूर' -रा ५ ३१ [फा यगानगत्]

**एगेजमेंट**—स्त्री १ सक्त, वारी, ठराव, वायदा २ लग्न करण्याचे वचन, लग्नाचा ठराव [इ]

**एग्झिबिशन**—न प्रदर्शन, देखावा, मांडणी (वस्तूंची इ०) [इ]

**एग्यु एग्यु-फीव्हर**—पु (इ) मलेरियाचा ताप, हिंवताप, हुडहुडी, थंडी [इ एग्यु=हींव+फीव्हर=ताप] **एग्युमिक्श्चर**—न (मिक्श्चर=मिश्रण-औषध) हिंवतापावरचे औषध

**एजंट**—पु (इ) १ (व्यापार) गुमास्ता, अडत्या २ (कायदा) प्रतिनिधि, मुखत्यार, वकील गुमास्ता, मुनीम ३ (राजकीय) पोलिटिकल एजंट, संस्थानावर देखरेख ठेवणारा (वरिष्ठ सरकारचा) अधिकारी उ० मध्यहिंदुस्थानातील संस्थानाचा एजट, राजपुताना संस्थानाचा एजट

**एजंटी**—स्त्री १ (इ) एजन्सी याला प्रतिशब्द, एजटपणा, गुमास्तेगिरी, वकिलात २ एजटाची कचेरी, हद्द 'जाय एजंटित दाद मागण्या तों घर मागें पडे -विविधज्ञ १ १ ३५ ३ अडतीचें काम, असें काम करणारी संस्था ४ मध्यस्थी, दलाली [इ एजट]

**एजन्सी**—स्त्री (इ) एजंटी पहा

**एजा करणें**—अक्रि १ ये जा म्हणणें, खरेतुरे असें एकवचनी संबोधणें 'घरातील कर्ती माणसें सोडून बाकीच्यांना होता होईल तों एजा करण्याचाहि मोरभटाचा परिपाठ होता' -हाकाथ ३४ [ये+जा] २ हलपाट घालणें, जाणें येणें ठेवणें [येणें+जाणें]

**एंजिन, एंजिनियर, एंजिनियरिंग**—इजन, इजिनियर, इजिनियरिंग पहा

**एजोव**—पु (खि) वनस्पतिविशेष, जुन्या कराराच्या काळीं याच्या डाहाळ्याचा उपयोग शुद्धीकरणाच्या विधीमध्यें रक्त किंवा पाणी शिंपडण्याकरिता करीत असत (इ) हिसप 'एजोवानें स्वच्छ करा मज निर्मल तें मी होईनहो' -उस १८४ [हिब्रू]

**एट-ठ, एटण-ठण, एट(ट)णें, एटाळी, एटाळणें** इ०—वट-ठ, वेटण=वेठण वेटणें-ठणें, वेटाळी, वेटाळणें पहा

**एटक**—न गाडीची साटी आणि जुं यांना जोडणारा दांडा

**एटोळ**—क्रिवि (व) इतका वेळ, वाहूळ एवढवळ, एटोळ पहा 'एटोळ तू कोठें होतास?' [स इयत्वेला, म एवढा+वळ वाहूळ]

**एठ-ठा यठ**—क्रिवि (वों कुण) येथें, या ठिकाणीं 'सत्य मणे यादवराओ। एठ हाचि उपाओ॥' -शिशु ७४१ [स इत्य, प्रा एत्थ, कुण हय, म येथें]

**एड**—स्त्री टाच, मंद्रेन, घोड्याला मारण्याकरिता टाचेच्या मागच्या बाजूस लावलेली दातेरी (क्रि देणें) [हिं एडी=टाच, तुल० सिं अडी हणणु=टाच मारणें]

**एडका**—पु १ मेंढ्याची एक जात, याला शिंगें येतात तीं मजबूत असून त्यास टक्कर देऊन लढण्याला शिकवितात 'एडका मदन तो केवळ पंचानन॥' भज १९२ 'हजारों एडक दवाग देऊन तो संतोष पावला काय?' -वालाक १४ २ गुग्या पकडण्यासाठीं चुलींत वागोळी खळी करून तींत बसणारा किडा, याला मोर असेंहि म्हणतात [स एडक प्रा आइ=डोळी]

**एडगुळवेडगुळ**—वि (व) आवडधोवड 'हें चित्र एड गुळवडगुळ दिसतें' [वेडगुळ द्वि वडगुळ-देंगळ-वेन्ध?]

**एडटा**—क्रिवि (चि) इतक्यात, एव्हाना एवढ्या वेळात [स इयत्वेला, म इतला, एतला]

**एडिटर**—पु (इ) संपादक, संपादकीय मजकूर तयार करणारा छापावयाचे लेख तपासून प्रसिद्ध करणारा, वर्तमानपत्र आणि मासिक किंवा एखादें नियतकालिक यातील मजकूर तपासून प्रसिद्ध करणारा, त्यातील लेखाची जबाबदारी घेणारा [इ एडिटर]

**एडी**—स्त्री (व) टाच एड पहा 'बूट एडीवर फाटला' [हिं एडी, सिं अडी]

**एंडी**—स्त्री (गो) पोत्यासारखें एक मासे धरण्याचें जाळें

**ए डी सी**—वरिष्ठाच्या (विशेषत राजे, गव्हर्नर वगैरेंच्या) तैनातीस असणारा लष्करी अधिकारी (हा अधिकारी खाशाच्या सर्व सुखसोयीकडे लक्ष देऊन त्याची बडदास्त ठेवितो), शरीर संरक्षक, अगरक्षक [सज्ञा, इ एड-डी-कॅपचा संक्षेप]

**एडु(डू)क**—पु हाडें, दात, केंस वगैरे काहीं स्मारक पुरून झाल्यावर त्यावर उभारलेला मनोरा किंवा इमारत, स्तूप, डागोबा बुद्धाच्या अवशेषाचीं अशीं एडुकस्थानें असतात 'एडुकचिन्हा पृथिवी न देवगृहभूषिता' -गीर ५५६ (महाभारत वनपर्व १९०-६७) [स, लॅ ईदिस=देवस्थान, इ एडिफिस]

**एढवळ, एढाळ, एढोळां**—क्रिवि आतापावेतों, एवढा वेळ वाहूळ एटोळ पहा [एवढा+वेळ, वाहूळ, स इयत्वेला]

**एढा**—क्रिवि (राजा) येथें एठ-ठा पहा

**एढाढी**—क्रिवि (राजा.) येथून

**एण-णी**—पु स्त्री हरिण, मृग [स]

**एणाक**—पु चद्र ज्यावर हरिणाचें चिन्ह आहे तो, मृगलांछन 'होता द्रोण कृपाङ्ग्ययुक्त सह तो एणाक तारागणीं।' -वामन-विराट ५ १३ [स एण=हरिण+अंक=चिन्ह]

**एणाक्षी**—स्त्री मृगनयना, हरणासारखे डोळे असणारी सुंदर स्त्री [स एण+अक्षिन्]

**एणें**—सना तृतीया १ येणें, यानें 'तें एणें घरातु मारिली। पूतना भणौनि॥' -शिशु ८६६ 'कवितों सर्वपद जप्य महामंत्र मी तुम्हा एणें। वश होईल देवे जेवि मधुरगीत मोहितें एणें' -मोअनु शासन ५ १३ २ या, अशा उ० एणेंकरून, एणेंपरी, एणेंप्रमाणें वगैरे रूपें होतात 'एणेंपरी परिसताच तया अनन्या।' -नउ १२१ [जुनें रूप]

**एतत्-एतद्**—सना हा ही, हें पुढीलप्रमाणें समासांत हा शब्द येतो एतदतिरिक्त (एतत्+अतिरिक्त)=याहून वेगळा, याहून वरचढ एतदतर्गत=यांत समाविष्ट झालेलें, यांतील, याचें एतत्-कृत=यानें केलेलें एतदर्थ=याकरितां, म्हणून एतदर्थक=या अर्थाचा, एतदनतर=यानतर एतदनुरूप=याप्रकारें, याप्रमाणें एतदवधि=येथ पर्यंत इतकें एतदारभ्य=यापुढें वगैरे [स]

**एतद्देशीय**—वि या देशांतील, या देशांत, येथील लोकां-कडून होणारीं (पुस्तकें हत्यारें कामें वगैरे) 'एतद्देशीय प्रजावर साहेबमजकुरानीं जो टीकालेख लिहिला' -टि २ १९१ -पु युरोपियनेतर, नेटिव्ह, देशी लोक, हिंदी लोक 'त्याची (एग्लो-इंडियन साहेबाची) अशी खात्री होती कीं एतद्देशीयाचीं मनें

शको १ ५५

सुशिक्षित झाल्यामुळे इलंडास आपला माथा मुंडाळावा लागला तर त्याचा देश त्यास परत झाल्यास इग्लंडची कीर्तीच होणारी आहे ' –टि १ ४४० [ सं एतत्+देशाय ]

**एतपर्यंत, एतपावेतों**—एथपर्यंत, एथपावेतों पहा

**एतां**—क्रिवि येता, येताना 'तुमतें एता देखिलें।' –शिशु १२५. [ यर्गे याचें एगें असें जुनें रूप ]

**एतां**—क्रिवि ( राजा ) आता

**एतादृश**—वि यासारखा, असा [ स ]

**एतावत्**—वि इतका, एवढा उ० एतावत्काल, एतावत्प्रमाण [ स ]

**एतावता**—क्रिवि १ म्हणून, एकदरीत, यामुळे, इतक्यानें, देवबळानें 'एतावता निष्पन्न काय होतें कीं, औरस पुत्र नसल्यास स्वर्गप्राप्तीसाठीं दत्तकपुत्र घेण्याची जरूर नाहीं ' –टि ४ १५. २ तथापि, असें आहे तरी, अद्याप 'त्यानें आदरातिथ्य केलें, गोड बोलला, एतावता त्याचे मनातील द्वेष गेला असें म्हणू नका ' [ स एतावत् ]

**एतावधि**—क्रिवि एथपर्यंत, एथपावेतों, होताहोईतों, एवढा, इतका [ स एतदवधि अप ]

**एतुला**—वि इतला, एवढा, इतका, असा ' लाडका करिसि याम एतुला।' –आकृ २८ [ स इयत्, एतावत्+ल, प्रा एत्तुल ]

**एथचा-ला, एथील**—वि या जागेचा, भागाचा, प्रांताचा, दिशाचा वगैरे, येथील [स अत्र, प्रा एत्थ, गो एथ]

**एथपर्यंत-पावेतों-वर-वरी, एथोर**—क्रिवि हा पावेतों, या( वेळ किंवा जागे )पर्यंत, हा काळ पावेतों, एवढा वेळ, एढोळ [एथ यास प्रत्यय लागून]

**एथून, एथोन**—क्रिवि या पुढें, या स्थळापासून किंवा काळापासून पुढें, अशिष्ट रूप एथनें [ एथ+हून, प्रा एत्तहि ]

**एथें**—क्रिवि १ या ठिकाणीं, या जागीं येथें पहा 'महाराजांनीं आता एथेंच बसुनराहावें '–कम ४ १११ २ (एखाद्याच्या) घरीं, राहण्याच्या जागेत असे–त्याच्या एथें, माझ्या एथें वाक्प्रचार–( गो ) एथनानी तेथना=इकडेहि नाहीं व तिकडेहि नाहीं [ स अत्र, प्रा एत्थ, व एथा ]

**एदगिरी**—वि एदगीर गावचें( दोला, धोतरजोडा इ० वस्त्र ) [ एदगीर=नागपुर जवळचें एक गाव –मोल उदगीर? ]

**एदेन, आदान(बाग)**—पु (ख्रि) पवित्र शास्त्रांत वर्णिलेल्या प्रमाणें मानवांचे मूळ पूर्वज आदाम व हव्वा यास ज्या बागेत ठेविलें होतें त्या बागेचें नाव, आनंदोद्यान, नंदनवन ' . परमेश्वर देवानें त्यांस एदेन बागेतून काढून लाविलें '–उत्प ३ २३ [हिब्रू एदम=आनंद किंवा सुख, इ इडन]

**एदो**—वि (गो) एवढा ०वेळ–एदोळ–एदोय–क्रिवि.(गो) एवढावेळ, सर्वा एथ सकाळीं=एवढ्या सकाळीं [स इयत्+वेला, म एवढा+वेळ]

**एधवळा, एधोळ, एधोळां**—क्रिवि (कुण वऱ्हाडी रूपें एधाळा, एधाळून) एव्हाना, इतका वेळ, एवढा वेळपर्यंत, एढवळ एढोळ, यावेळीं, एवढ्यावेळीं 'एधाळून त(तर) आमचा सैपाक ( स्वयपाकही ) होत असते (असतो) ' 'एधाळा काय काम आहे गा तुह ( तुझें ) ' [ एवढा+वेळ ]

**एधवां**—क्रिवि ( काव्य ) आतां, यावेळीं [ स अत्र, प्रा एत्थ, म तेधवा–तदा ]

**एधष्ट**—क्रिवि पाहिजे तितकें, यथेष्ट, भरपूर, पुरेपूर [ स यथेष्ट अप ]

**एनकेनप्रकारें, एनतेनप्रकारें**—क्रिवि कोणत्यातरी प्रकारानें, कशामुळें तरी, कसेंतरी, कसेंहि [ स येनकेनप्रकारेण ]

**एनॅमल**—न काचमिना, धातूवर काचेचा मुलामा देण्याची क्रिया, काचवण, काचमिन्याप्रमाणें चकाकणारा पृष्ठभाग [ इ ]

**एनातीमामूल**—स्त्री दराविक देणगी इनायत पहा [ फा अर इनायत्+मामूल ]

**एनिमा**—पु बस्ती, बस्तीचें औषध किंवा पिचकारी, शौच विर्धीचें एक साधन [ इ ]

**एन्ना**—क्रिवि (गो) एव्हा, इतक्यात [ एव्हाना ? स एना=नतर, त्यावेळीं ]

**एन्काबूचान**—पु. रत्नाला कातून बहिर्वक्र आकार देतात तो ( बहिर्वक्र रत्नाचा आकार हा शब्द काबुचानला प्रतिशब्द म्हणून वापरला आहे –खावग)[इ एन्+में काबुचान=न कातलेला हिरा]

**एन्सायक्लोपीडिया**—पु ज्ञानकोश, विश्वकोश विश्वज्ञान संग्रह यात जगातील ज्ञानाच्या सर्व शाखांची माहिती अकारविल्हानें दिलेली असते [ इ ]

**एन्हा घेणें**—अक्रि ( व ) हिसका घेणें, व्यर्थ श्रांत येणें [ स एनस्=दु ख ]

**एपिफनी**—स्त्री (ख्रि) १ ( विदेशी लोकांसमोर ) ख्रिस्ताचें प्रकट होणें, आविर्भवन. २ ख्रिस्त दर्शनोत्सव, हा जानेवारीच्या ६ व्या तारखेला करतात 'वरील सार प्रार्थना, पत्र व शुभवर्तमान हीं एपिफनीपर्यंत प्रतिदिवशीं वाचावीं '–साधा ४२ [इ ग्री एपि=वर+फायनो=मी प्रगट करतों ]

**एप्रिल**—पु इग्रजी वर्षाचा चवथा महिना ( हा मराठी चैत्र–वैशाखाच्या सुमारास येतो ) [ इ ]

**एबनी**—न आबनूस पहा [ इ ]

**एम्**—पु छापील मजकुराची ओळ मोजण्याचें प्रमाण ( इग्रजी एम् अक्षरास जी समचौरस जागा लागते त्या जागेचें माप धरून,

एमूनें ओळ मोजण्यांत येते ) एका इंचात पायका टाइपाचे सहा एम् बसतात. मजकूर ( टाइप ) जुळण्याचा भावदि एमवरुन ठरलेला असतो एका रुपयास १४००–२४०० एम् ( ल्हानमोठ्या टाईपा-प्रमाणें ) पर्यंत दर असतो [ इं ]

परु—वि १ येर, याशिवाय, दुसरें, इतर ( विशिष्ट सांगितल्यानंतर राहिलेले ), अन्य, भिन्न ' एर परिवारु अपारु। तो कवनु जाणे।' –शिशु ५२ २ ( ल ) गौण, किरकोळ, सटरफटर [ स. अपर, अवर, प्रा येर ]

पर-री-रू—सर्व तो, ती, हा, ही ' मग एरी कानिआ पर राली '–शिशु १७५ ' सीता म्हणे लक्ष्मणा भाव। एरू म्हणे राक्षसी भाव।' [ स अपर, प्रा येर ]

परका—स्त्री ( खान ) तंबाखूची जुडी –भाइस ७ १ ४ [ स एरका=तृणविशेष, मोथा ]

परका, परिका—स्त्री एक प्रकारचें गवत, लव्हाळा, मोथा ' ब्रह्मशापाची एरिका। तीरीं निपाली होती देखा। ते मुर्शी घेऊनि क्रोधतवका। एकमेका हाणिती। '–एभा ३० १४६ [ स एरक-का ]

परकान—पु घोड्याचा एक रोग, यास पिळा असेंहि म्हण तात, हा रोग खोकल्यापासून होत असून यानें शरीर पिवळें होतें –अश्वप २ ३३०

परझार-झार-धार—स्त्री येरझार पहा

परंड—पु एक औषधी झाड, याच्या मोगली व सुरती (तांबडा व पांढरा) अशा दोन जाती आहेत सुरती एरंडाच्या बियांचें (एरंड्याचें) तेल काढितात तें उत्तम रेचक असून बहुतेक रोगांवर आरंभी रेचक म्हणून देतात सर्पदंशावर पानाचा चार चमचे रस, चमचाभर पाणी घालून द्यावा व दंशावर पाला वाटून लावावा –वगु १ ७६ मोगली एरंड शेताच्या कुंपणास लावतात त्याच्या बियांतहि तेल असतें पण त्याचा फारसा उपयोग करीत नाहींत म्ह० १ ओसाड गावीं एरंड वळी २ थोर ( उंच ) वाढला एरंड तर काय होईल इक्षुदंड ३ एरंडाचें गुऱ्हाळ=निरर्थक, कंटाळवाणें भाषण, निष्फळ उद्योग ( ऊंस चरकांत घातला तर गोड रस तरी मिळतो पण एरंडापासून न पिण्याजोगा निरुपयोगी पदार्थ निघेल, ऊस आणि एरंड दिस ण्यात सारखे म्हणून ही तुलना ) ४ निरस्त पादपे देशे एरंडोऽपि द्रुमायते=( झाड नसणाऱ्या प्रदेशात एरंडच श्रेष्ठ ) मावदया गावात गाढवी सवाष्ण याप्रमाणें अर्थ [ स एरंड, गु एरंडो, हिं अरंड व भेरंडा, का एरड्ड आडलके ] ०मूळ–न सुरती एरंडाचें मूळ, मुळी, ही औषधी असते ०फाकडी–स्त्री ( माळवी ) पोपई नागपुराकडे एरणपपई असें पाईला नाव आहे

परडवेरड—वि (ना) वेडौल, प्रमाणशीर नसणारा [ वेरड द्वि ]

परडां—नम ( कु ) एका जातीचे मासे.

परंडी—स्त्री १ सुरती एरंडाचें झाड, एरंडाची एक वेगळी जात २ एरंडाची बी हें एक गळिताच्या मुख्य धान्यांपैकीं आहे याच्या तेलाचा उपयोग दिव्याकडे व औषधाकडे आहेच पण त्यापेक्षा यंत्रांना ओंगण म्हणून विशेष होतो [ स एरंड ]

परंडे—न एक हलकें रेशीम ( सोंवळ्याच्या वस्त्रांसाठीं ), टसर रेशीम [ स एरंड ] ( रेशमाचे किडे एरंडाचीं पानें खातात यावरून )

परंडेल—न एरंड्यांपासून काढलेलें तेल [ एरंड+तैल ]

परंड्यासाप—पु सापाची एक जात एरंडीच्या बीवर जसे ठिपके असतात तसे ठिपके या सापावर असतात म्हणून यास हें नाव आहे

परमीठ—न नेहमींचें खाण्याचें मीठ, समुद्रमीठ ( शेंदेलोण वगैरे खनिज नव्हे ) [ एर=इतर, एरवींचें+मीठ ]

परयण—स्त्री ( प्रभु लोकांत ) वरातींत लागणारी रोवळी, डाल [ ऐरणी ]

परवां-व्हां—क्रिवि तेरवा किंवा तेरवाच्या पुढचा दिवस, चालू दिवसापासून मागें किंवा पुढें चवथ्या दिवशीं ( कोणी पाचवा दिवस समजतात ), कोणी तेरवा म्हणजेच एरवा मानतात ( परवा या प्रमाणेंच हें रूप बनलेलें आहे ) [ स अपरश्वस्, गो एरवा=तेरवा ]

परवीं, परव्हीं, परी, पऱ्हवीं, पऱ्हीं—क्रिवि १ उगीच, सहज, कारणाशिवाय २ सहजासहजीं, अचानक, प्रमादिंगा ३ नाहीतर, किंवा ' ऐसें वदता कापाल। एऱ्हवीं पुढें पळाल '–शिशु ४८४ ' माझा पैसा दे एरवीं मी तुझे पराहून जाणार नाहीं ' ४ इतर वावतींत, हें सोडून ' त्या पंडितास वक्तृत्व मात्र नाहीं एरवीं बरा आहे ' [ स एर+वा,वी, प्रत्यय ] म्ह० एरव्ही करियें= विनाकारण, व्यर्थ फुकट केलेली ( खटपट, काम )

परशेर—वि असातसा, फालतू, निरुपयोगी, सामान्य (माणूस, गोष्ट ) [ एर द्वि ]

परांस—पु ( गो ) दाय, रिक्थ, वारसा, जमीनजुमला ' जाव्याक एरांस दिला '=जावयाला जमीन-जुमला दिला [ गो वरीस=वारसा, इ इन्हेरिटन्स ]

परिंग—स्त्री कानांतील एक लोलकासारखा दागिना, डूल, कर्ण भूषण ( अव एरिंग्ज ) [ इ इअर=कान+रिंग=अंगठी, वेढें ]

परीकडे—क्रिवि इकडे, तिकडे, दुसरीकडे ' एरीकडे थीचक पाणी। कांई वरितें जाले '–शिशु ८५२ [ एरी+कडे=दुसरीकडे ]

परीमोहरें—क्रिवि उलट बाजूस, दुसऱ्या तोंडाकडे ' जसी ते शुकाचेनि आभमोरें। नलिका भोंविन्नली एरी माहरें। '–ज्ञा ६ ७६ [ एरी+मोहरा=मुख ]

परू—एर पहा ' एरू भंगें काई तू जालासी। मातें दखत सेओ पळतीं कैसी। '–शिशु ८८९ ' सीता म्हणे लक्ष्मणा भाव। एरू म्हणे राक्षसी भाव।'

**एरुणेर**—एवुमाएर पहा. [ एरुणेर अप ]

**एल**—पु एक जातीचा मासा; याला शाम किंवा पाय असे आपल्या इकडील नाव आहे. पण एल हा सापाप्रमाणें गोड्या पाण्यांत अंडीं घालीत नाहीं हा सर्पाकृति असतो. [ इं ईल ]

**एलकाक्रीडित(भौमिचारी)**—न (नृत्य.) पायाच्या अग्र तलावर नीट उभें राहून व उंच उडी मारून पुन्हां अग्रच्या तसें उभें राहणें, अशी क्रिया वारंवार करणें. [ सं एलका=एडका, मेंढा ]

**एलकाविणें**—उक्रि. हेंदणें, घर पेंजें, ओढणें (विहिरीतून किंवा यग्रावरून पाणी वगैरे) [ हेलावणें ]

**एलकी**—स्त्री. (ग्रा.) चमक, उसण (क्रि० भरणें).

**एलगार**—पु निकराचा हल्ला, निश्चयपूर्वक जोराचा प्रयत्न, चढाई, दौड. 'दर्यांतून आरमार व खुश्कीनें लष्कर पाठवून चौतर्फा एल्गार करून श्वासोश्वास घेऊं न देता त्यांणें आक्रमिली स्थळें ... ' –मराआ ६. [फा. येल्गार, एल्यार, इल्गार=मोहीम, तुर्की ईल्गार]

**एलची, एलाची**—स्त्री वेलची, वेलदोडयाचे दाणे, वेलदोडा. [ सं एला, एलीका, गु एलची, ते. एलकि; फा. यालक्कि; पं इलायच, हिं इलायची ]

**एलची, येलची**—वि. (व ना.) व्रात्य, खोडकर; फाजील, पाणचट [ स एला–( एलायति )=विलास, क्रीडा करणें, खोडयाळ असणें, गु एलफेल=शिवराळ, असभ्य ]

**एलटी, एलाटी**—स्त्री. (विणकाम) चाळ्याच्या (वहीच्या) खालवरच्या दोन पट्या. (या चाळयांतून ताण्याचे दोरे आतात). [ वेळटी, वेळ्–काठी ]

**एलणें, एलावणें**—अक्रि (व) १ चेष्टा करणें, नखरे करणें 'तो एलायला लागला' २ स्वैर वागणें 'कामून एलते'=कां म्हणून स्वैर वागतोस ? [ सं एलायति ]

**एलदोडा**—पु एलची पहा [ एल+दोडा ]

**एलपाड्या**—वि (ना) नाना तऱ्हा करणारा, नखऱ्या, चेष्टा करणारा [ एलणें ]

**एला**—स्त्री. वेलदोडा, वेलदोड्याचा दाणा किंवा झाड, वेलदोड्यात एला आणि एलची असे दोन विरळोळ भेद आहेत एला म्हणजे मोठ्या बीचा वेलदोडा [ सं. एला, गो एद् ]

**एला**—पु एक झाड, लॅ टर्मिनालिया मिटिडा

**एलापों, एलाफा**—पु (गो) एक तांदुळाचें पक्वान्न, घारगा

**एलें**—न. (नागर, कुळव किंवा पाभर यांची) दाडी व जोखड यांना एकत्र बांधावयाची कातड्याची वादी ही कोडक्यांतून ओवलेली असते [ सं वल्ली, प्रा वेली, वेल ]

**एल्ची**—पु वकील, हेरीव 'घाइमज्जुराम तोफा–तायफ देऊन एल्चीची रुखसत करणार आहे. '–ख्रिमरा २ ५ [तुर्की ईल्ची]

**एवं**—उभ. याप्रमाणें; याप्रकारें; असें 'एवं थितिया मातें सुरें।' –ज्ञा ९.३३०. [सं ] ०गुणविशिष्ट–वि. असा गुणाचा, अशा गुणांनी भरलेला (निंदाव्यंजक) ०विध–वि. या प्रकारचा 'जी एवंविधा तूतें। मी देखतसें हें निरुतें। '–ज्ञा ११.३१२. [सं]

**एवंच**—क्रिवि. सारांश; एकूण, तात्पर्य, मथितार्थ असा कीं, मिळून, एकंदरीत. [ सं एवम्+च ]

**एवढा**—वि १ इतका मोठा; इतक्या आकाराचा, परिमाणाचा. २ इतका पहा. (एवढा, जेवढा, तेवढा, केवढा, वगैरे शब्दांचा वर्ग आणि इतका, जितका, तितका, कितका वगैरे शब्दांचा वर्ग यात फरक असा कीं पहिला आकार, गुण, परिमाण दाखवितो. तर दुसरा संख्यापरिमाण दर्शवितो. तथापि बोलण्यात इतर शब्दांप्रमाणें या संबंधांतहि ढिलेपणानें हा भेद पाळला जात नाहीं) (व्याप्र.) एवढ्याचें एवढें करून सांगणें=फुगवून, तिखटमीठ लावून सांगणें एवढ्यानें=इतक्या मोठ्यानें, जोरानें किंवा मोठा आवाज करून, दणदिशी [ सं. इयत, प्रा. एवड; सिं वड्डो ] ०वेळ–वेळ–क्रिवि हा वेळ पावेतों, हा सारा वेळ, इतक्या उशीरां [ एवढा+वेळ ]

**एवाडी**—वि. एका पायाग अखिर (पांचरा) पाय पुढला आहे असा (घोडा) हें घोड्याचें अशुभ लक्षण आहे [ एक–एव ]

**एवाळें**—न. (गो) पाणसाप, वयाळें; हेवाळें. [ स. व्याल, प्रा. वयाळें ]

**एवि–वीं**—क्रिवि अर्थे, याप्रमाणें 'मार्कंडराय ऋषि एवि बोल्ली।'–वसा ११. [सं एवम्] ०तेवीं–क्रिवि कोणत्याहि प्रकारें; कसेंहि झालें तरी, काहीं असलें तरी (होऊं नये झालें, आतां जसें होईल तसें होऊ दे असा भाव) 'एवीतरी वाघ खातो मग पडून फळ काय, त्याचे अंगावर जावें.' म्ह० एवींतेवीं गर गो देवी= कसेंहिकरून हे देवी पुरी कर (आशा, इच्छा, काम, इ.), याचना, प्रार्थना. [ सं. एव तु एव ]

**एवीच, एव्याच**—क्रिवि (कों) मुकाट्यानें, स्तब्धतेनें; उगाच, उगीच (पाहणें, लक्ष देणें.) 'आपुलाले तुम्ही पुगा। सेवा एव्याच सरिसा। स्थिरावरया जैसा। काय जाणों विचार॥' –तुगा ३३६१. [ सं एवम् ]

**एव्हडा**—एवढा पहा.

**एव्हां**—क्रिवि आताच्या आतांच, आतां, यावेळीं, तूर्त, यासमयीं (आता पेक्षां हा शब्द जोरदार आहे) ०एव्हां–क्रिवि. (राजा) सुमार हा वेळ, या घटकेला (मागें) 'काल आपण तेथून एव्हांएव्हां निघालों नाहीं कां ?'

**एव्हांना**—क्रिवि हा वेळ पावेतों. आतापावेतों

**एव्हांशीं**—क्रिवि एव्हां, आता, या घटकेला, आतांच, इतक्यांत 'खबरदार मला एव्हांशींच आपली म्हणाल तर !' –वाय ४.३.

**एशोल**—न (व ना) खाण्याचें तेल, गोडें तेल ( अळशी+ तेल )

**एषादिक**—सना विशिष्ट लोक दर्शविण्याराठीं व्याजोक्तीनें हे सर्व लोक, हे मोठे लोक, शिष्ट, अस्मादिक प्रमाणें रूप ( स एष +आदि+क ]

**एष्य**—वि १ आगामी, भावी २ (ज्यो ) अनुपभुक्त, जीवून अद्यापि ग्रह गेला नाहीं अशी ( रास ) याच्या उलट गत [ स इ=जाणें ]

**एस, एसकर**—वेस, वेसकर पहा

**एसणा-ना**—वि असा, असला, इतका, एवढा 'तव वल्मिटु बोल्लिा । एसना तु जुझारू भला ॥' –शिशु ९१९ 'आपुलेआ पाडाचें पातिजे । तेतेंसीं एसनें कीजे ।' –शिशु ६७३ 'एसणी आर्मी असता मौढी ।' –गीता १ १४७२ [ स अदस्–एष ]

**एसवा**—वेसवा पहा

**एसूर**—स्त्री ( माण ) मिरच्यांची वादा घालून केलेली पूड, काळें तिखट [ का एसर=शिजणाऱ्या भाजी–आमटींतील पाणी, मिरच्यांचें पाणी ]

**एहंकी, एहेंकी**—क्रिवि (भिल्ली) असें, याप्रमाणें 'लोक मान भाल्यो साम्यो एहकी आखताहा!' =लोक मला आळशी साम्या असें म्हणतात ) –भिल्लीभाषा ३० [ स एव+कीं, किंवा एतत्– एष प्रा एह+कीं तुल०– का एहगे=कसें, कोणत्या प्रकारें, ]

**एहसान**—स्त्री १ कृपा, उपकार, इहसान पहा 'इतके दिवस परभारें दौलतीवर एहसान होत गेली' –रा ५ ३१ 'लुगडें आणलें तर आपल्या बायकोला आणलें, त्याचें माझ्यावर काय एहसान केलें?' २ (व ) साऱ्याची माफी [ फा , अर इहसान ] ॰मंद– वि कृतज्ञ आभारी 'पातशाहा आपला एहसान्मद होऊन पात शाहीचा बदोबस्त आपले हातून करून घई ऐशी कारस्तीं जी होईल ती करावीच करावी' –ऐच ११५ [ फा ]

**एहीं**—सना –तृत्व यानीं, ह्यानीं 'एहीं रजओं सकळैकु लोकु।' –दाव १४ [ 'ए' ला विभक्तिप्रत्यय लागून ]

**एहेंडें**—क्रिवि (भिल्ली) याप्रमाणें, अशी एहकी पहा 'थाय इ बोरें एहेंडें काहा ?' =थाई हीं बोरें अशी का ? –भिल्ली भाषा २७

**एहेंतेहें**—क्रिवि (भिल्ली) इकडेतिकडे यथें तेथें 'आज एहेंतेहें फिरतो' आणि इकडे तिकडे भटकलो=भिल्ली भाषा ३६

**एळ**—वेळ पहा

**एळ**—स्त्री (गो ) समुद्रकाठ [ स वला=समुद्रकिनारा ]

**एळ**—(गो ) वेलदोडा एला एरा पहा

**एळकोट, एळकोटमे८—**—पु १ ( खडोबाचे भक्त देवापुढची तळी उचलताना किंवा भिक्षा मागताना एळकोट किंवा एलकोट मल्हार असें ओरडतात, त्यावरून ) एक सुटीनें प्रयत्न, निकराचा प्रयत्न 'आधीं होता वाघ्या । दैवयोगें झाला पाग्या । त्याचा एळकोट राहीना मूळस्वभाव जाईना' २ ( निंदाव्यजक ) गोंधळ, गडबड, अव्यवस्था 'दहा घरचीं दहा माणसें आलीं तेव्हा त्यानीं साऱ्याच कामाचा एळकोट करून टाकला' [ का एलु (=सात )+ कोट (=कोट सख्या किंवा तट खडोबाचें सैन्य सात कोटी असेल किंवा त्याच्या किल्ल्याचे सात तट असतील ]

**एळकोटमल्हार**—पु नाश, उचलबांगडी 'मी इकडे जयवंत रावाचा एळकोट मल्हार करतो' –चंद्रग्रहण नाटक ६१

**एळणी**—स्त्री (व ) मातीचें भाडें ( थाळी, पाटीसारखें ) 'एळणींत तूप घ्यावें' [ वेळणी ]

**एळव**—उद्गा (तजावरी ) कटाळा, नापसति दर्शविणारा उद्गार –पु अमगळ काम [ तामीळ एळवु ]

**एळवणी**—स्त्री ( माण ) आमटी अळवणी पहा

**एळा**—एला पहा

**एळिया, एळया** (बोळ )—पु एक औषध, बोळाचा एक प्रकार, काळाबोळ [ सं एलीयक, हिं एलवा, एलुआ ]

---

# ऐ

**ऐ**—मराठी वर्णमालेतील बारावा स्वर अक्षरविकास– 'ए' च्या डोक्यावर आडवी रेघ प्रथम इ सनाच्या २ऱ्या शतकातील लेखात दिसून येते 'ए'ला दिलेली मात्रा प्रथम वरीच मोठी असे पुढें दहाव्या शतकानतर हल्लींचा ऐ तयार झाला –ओझा

**ऐ**—उद्गा अगआई! दु ख, शोक याचा उद्गार अइ पहा 'मज इररिवु ऐ जहर कदरकरी ल्हर आगलि बाई धराधरा।' –राला? –नामजोशीकोश

**ऐकणा**—वि ऐकणारा, ज्यास चागलें ऐकू येतें असा, कानाचा घड 'कान वचन मीचि श्रोता । मीचि जाण शब्दार्थता । ऐकणाहि मज परता । नाहीं तत्वता श्रवणाचा ॥' –एभा १३ ३४५ [ऐकणें]

**ऐकणें**—उक्रि १ कानानीं शब्द, ध्वनि जाणणें, समजणें, कान देणें, श्रवण करणें आइकणें पहा २ लक्षपूर्वक ऐकणें, काळजीनें श्रवण करणें, अवधान ठेवणें ३ लक्ष देणें, मान्य करणें ( एखादी सांगितलेली गोष्ट ), ध्यान ठेवणें, नीट चित्त देणें, बरहुकूम वागणें, आज्ञा पाळणें [ स आकर्णनु म आइकणें, आयकणें ] म्ह० ऐकावें जनाचें करावें मनाचें=कोणतीहि गोष्ट करण्यापूर्वी सर्वांचा विचार अवश्य घ्यावा, मग आपणास योग्य वाटेल तें करावें

**ऐकतखेंवो**—क्रिवि ऐकण्याबरोबर, एकताक्षणीं 'जयाची मोटीचि ऐकतखेंवो । आपणा ससार होय वावो ॥' –ज्ञा १० १६७ [ ऐकत+खेंवो, स क्षण ]

ऐकभट्टी—स्त्री (विनोदानें) ऐकण्याचें काम, कर्णद्वारें ग्रहण करणें (याच्या उलट अभ्यासानें ग्रहण करणें), ऐकण्याचा अभ्यास, ऐकीव अभ्यास 'कोणी उपजत गवई असतो कोणी सहवासानें शिकून असतो, कोणी अशा पैकभट्टीचा गवई असतो' [ऐकणें+भट्टी]

ऐकमत्य—न सर्वांचें एक मत असणें, मतांचें, विचारांचें, आवडी नावडींचें एकस्वरूप, एकीकरण, एकवाक्यता, एकी, एकोपा 'राष्ट्रीय सभेत एकमत्य होण्यापूर्वी प्रत्येक प्रांतात, प्रत्येक जिल्ह्यात, प्रत्येक खेड्यात तें झालें पाहिजे' –म्सु ४० [स]

ऐकवणी—स्त्री १ ऐकायला लावणें, कबूल करावयास लावणें २ विवरण, विवेचन, फोड (क्रि० करणें) [एकविणें]

ऐकविणें—उक्रि (ऐकणें प्रयोजक) ऐकावयास लावणें

ऐकाहिक—वि १ एका दिवसाचें, उरवण्यास एक दिवस लागणारें (काम) २ एकच दिवस पाळावयाचा (उपास वगैरे) ३ एकच दिवस टिकणारें, क्षणिक, क्षणभगुर ४ दररोज येणारा, रोज थोडाबहुत असणारा, सान्निपातिक (ज्वर, वगैरे) [स एक+आह्निक (अहन्)]

ऐकीव—वि १ ऐकलेलें, ऐकून माहीत झालेलें, दुसऱ्याकडून समजलेलें २ (ल) प्रत्यक्ष पुरावा, साधन नसणारें, कमी विश्वासार्ह [ऐकणें]

ऐक्य—न १ एकरूपता, एकपणा, एकी, अद्वैत २ एकदिल, एकचित्त एकभाव, मिलाफ, जूट (उद्देश, स्वभाव, इच्छा वगैरेंचा) एकमत्य ३ (तत्त्व) ऐक्यमन, ऐक्यज्ञान, जीवात्मा व परमात्मा यांचें अद्वैत असतें असें मत, सृष्टि व परमेश्वर यांची एकरूपता, ईश्वरमयत्ववाद ४ (वदांत) ब्रह्म, अद्वैत 'ऐक्य जीव तो ब्रह्मांश। जेथें विदब्रह्माइ निरास।' –दा ११ १ ३५ ५ (गणित) बेरीज, जमा, रास [स] ऐक्यास येणें—एकत्र होणें, सम्मीलन होणें, परस्पर जुळणें 'कीं वेदांतशास्त्रींच्या श्रुती। ऐक्यास येती परस्परें॥' ०भाव—पु एकरूपता अद्वैतता ब्रह्मस्वरूपता 'अथवा ऐक्यभावाचेनि पैसें। तुज मानूनि आत्मा ऐसें॥' –ज्ञा १६ ७१

ऐक्यता—स्त्री ऐक्य अर्थ १,२ पहा 'ऐक्यता नाहीं म्हणजे इंग्रजी राज्यास त्यापासून कांहीं भय नाहीं' –टि २ १५

ऐक्याकार—वि एकाकार, एकरूप पहा 'दुजे शिळेवरी रेखीं मनार दोहींस करी ऐक्याकार।' –शावि २३ १५६ ?

ऐगूबैगू—पु भव अलवतेगलवते एवतेगेवत, कोणी तरी माणसें

ऐचण ऐंचण, ऐतण—स्त्री (व ऐचण) १ पडझड, अडचण, २ ओढाताण, गर्दी ३ अडचणीची, गर्दीची अवस्था जागा ४ गवत, रान, झाडझुडूप माजलेली जागा 'त्या पडक्या जागेवर ऐचण फार आहे' [अडचण–अड्चण; आड+तृण–अतण–ऐतण]

ऐचेआ—वि (गो) आजचा; विद्यमान, चालू 'जे येती वरुषेंवेरी। यवेया आटविलें समारी। ते ऐचेआ दिवसा गिवुरी। दाविले तुवां' –ख्रिपु २ २ १५९ [आजच्या अप]

ऐच्छिक—वि १ इच्छिलेलें, इष्ट 'ऐच्छिक पदार्थ मिळाला म्हणजे फार संतोष होतो' २ मर्जीवर ठेवलेलें, पाहिजे तें, मर्जीनुसार 'साधूची ऐच्छिक प्रवृत्ति ऐच्छिक निवृत्ति' ३ स्वच्छंदी, अविचारी, बेलगाम, उच्छृंखल 'ऐच्छिक व्यवहार करू नये शास्त्रानुरूप वर्तावें' ४ नियमबद्ध नसलेलें, मर्जीनुरूप, वाटेल तसें, कांहीं तरी, लहरी, अशास्त्रीय 'हा ऐच्छिक प्रयोग आहे यास शास्त्रप्रमाण काढें' ५ हेतुपुरःसर, बुद्धिपुरःसर केलेलें, पूर्वयोजनेनुसार, योजून केलेलें, जाणूनबुजून केलेले 'ऐच्छिक पापाचें प्रायश्चित मोठें' [म] ०विषय–पु परीक्षेकरिता नेमिलेल्या दोन किंवा अधिक विषयांपैकीं इच्छेनें घेतलेला विषय 'एम ए च्या परीक्षेत देशी भाषा या विषयाची निदान ऐच्छिक म्हणून तरी गणना करण्यांत आली' –केले १ ९२

ऐट–टा–टी, ऐटबाज ऐटबाजी–अयट–टा–टी, अयटबाज–बाजी पहा [हिं एठ=अक्कड]

ऐणी—आयणी पहा 'कामधेनु आणि चिंतामणी। हींही पुरवू न सक्ती ऐणी।' –विपू १ ७८

ऐणुर्द—वि (गो) किंचित् अळणी [अळणा अप]

ऐतखाऊ ऐतगड्डू–मारा, ऐता, ऐतोजी, ऐतोळा—आयताजी, आयतगड्डू, आयतमार, आयतोबा, आयतोळा पहा

ऐतरेय—पु एक वैदिक ऋषि, इतरा नांवाच्या स्त्रीचा मुलगा ०आरण्यक–न ऋग्वेदाच्या शाकलशाखेचें आरण्यक याचे पाच भाग असून यांत कांहीं अध्यात्म व बराचसा होत्रविषय आहे ०उपनिषद्–न ऐतरेय आरण्यकाच्या दुसऱ्या भागातील कांहीं भाग यांत अध्यात्मविषयाचें विवेचन आहे ०ब्राह्मण–न ऋग्वेदाचा ब्राह्मण ग्रंथ याचे ४० अध्याय असून पांच पांच अध्यायांची एक अशा आठ पंचिका आहेत यज्ञांत होता नामक ऋत्विजानें करावयाच्या होत्रकर्मांविषयींचें विवेचन यांत आलें आहे या ग्रंथाचें कर्तृत्व ऐतरेय ऋषीकडे आहे

ऐतवार—पु आदित्वार, रविवार सूर्याचा वार [स आदित्य+वार]

ऐता–ती–तें, ऐताजी—आयता पहा

ऐता—सना (कुण) तो–ती–तें, हा–ही–हें, हा येथें! हा एक! हेंध (तो–ती–तें) आहे! [आह+तो, हा+तो, स अा+दत ?]

ऐतिह्य—न लोकपरंपरेचा प्रवाह परंपरा, परंपरागत गोष्ट, लोककथा दंतकथा 'या वडाच्या झाडावर महाराक्षस आहे असें ऐतिह्य एकतों' [स]

**ऐती, ऐतिका**—(गो) तयारी आयती पहा 'तेयें होमाची ऐती करिती।'—वसा २१ 'प्रधानेसी म्हणे इओसे। याचि मधिरी नेइजे। भोजनाची ऐतिका करविजे। तेया वारणें'—शिपु १ १४ ११

**ऐतुलें**—वि इतुके, एवढें इतका, इतुला पहा ऐतुलें शाइकोनि नीगालें, —उपा ५७४८ [स एतावत्]

**ऐदान, आयदान**—न (कर्ना) भाडें, आयदाण पहा

**ऐदी**—वि आळशी, जड, मद, सुस्त, अजागळ, अव्यवस्थित, जडभरत, खुशालचेंडू 'ऐदी होण्याची चटक मलाही थोडीशी लाव शील तर बरें होईल'—वाय २१ [स अ+यत्=प्रयत्न करणें]

**ऐद्र**—पु १ (ज्यो) सत्तावीस योगांपैकीं सव्वीसावा योग २ (रासायनिक) एक मूलद्रव्य (इ) इरिडियम —वि इद्रासबधीं (आयुध, अस्त्र इ०) [स] ०जाल—न इद्रजाल, जादुगिरी ०जालिक—पु जादूचे खेळ करणारा, गारुडी—वि जादूसबधी, इद्रजालासबधीं [स]

**ऐद्रस्थान**—न (नृत्य) दोन्ही पाय वाकडे करून आडवे ठेवणें, व यात अतर चार ताल ठेवणें, वयर गुडघ्याच्या रेषेत येईल इतकी वाकविणें, हत्तीसारख्या प्राण्यावर चढणें वगैरे गोष्टींची सूचना या स्थानात उभें राहण्यानें होते

**ऐद्राग्न**—वि (इद्र व अग्नि, इद्राग्नी) देवतासबधीं (हवि, पुरो डाश, ऋचा इ) [स]

**ऐद्रीयक**—वि इद्रियग्राह्य, इद्रियांनीं जाणण्याजोगा, इद्रिय सवेद्य, इद्रियासबधीं [स]

**ऐन**—१ एक वृक्ष, झाड अइन पहा २ चायली वर्नेणुक अइन पहा

**ऐन**—अ (दुसरें रूप ऐन) १ जोर दाखविण्यासाठीं या उप पदाचा उपयोग करितात अचूकपणा पूर्णता, अतिशयितता वगैरे अर्थ हा शब्द लागल्यापासून होतात जसें ०उन्हाळा-पाव साळा-हिवाळा—पु उन्हाळ्या पावसाळ्याचा अगदीं भर ०दोन प्रहर—पु अगदीं दुपार ०वेळ—स्त्री अगदीं बराबर योग्य वेळ ०सोदा—अट्टल लुच्चा, त्वाड हरामी, ऐन अ‍ट्टल ०भर—पु मध्य मध्यावस्था अगदीं भरभराटीची अवस्था (ऐश्वर्य, आरोग्य तारुण्य, कीर्ति इ० जसें —ऐन दौलत, ऐन जवानी, ऐन ऐश्वर्य ऐन अमदानी, ऐन हगाम) ०घाई—स्त्री घाईचा गडबडीचा कळस परमा वस्था ०मारामारी—लढाईचा अतिशय जोर किंवा लढाईचा अतिशय भर

**ऐन**—अ प्रधान, मुख्य, मूळ आरभींचें मूलभूत वगैरे अर्थ ऐन हें उपपद शब्दास लागल्यास होतात जसें— ०कर्ज—न ऐन कर्ज हजार रुपये व्याज शभर रुपये मिळून अकराशें रुपये' 'या शेतात ऐन पीक दोन खडी पिकतें, त्यात खर्च जाऊन एक खडी पदरीं पडते' ०कारभारी—पु वरिष्ठ (व्यवस्थापक, मत्री, कोठारी, घटक इ०) ०किंमत—स्त्री मूळ किंमत ०खर्च—पु मुख्य खर्च, अवातर सोडून (जसें—घोड्याचा सामान वगैरे शिवाय खर्च, मेजवानीचा ऐन खर्च म्हणजे फक्त खाण्यापिण्याचा खर्च—रोषनाई वगैरे शिवाय) ०गल्ला—पु १ पाहणी करून ठरविलेला धान्याचा गल्ला, अदाजी पीक २ पाहणी करून ठरविलेला सारा ०जमा—स्त्री १ ठरलेला किंवा नेहमींचा वसूल, सारा, अवातर सोडून मुख्य वसूल, याच्या उलट खेरीज जमा, शिवाय जमा, कमाविस जमा २ गुळचा, नेहमींचा वसूल (एखाद्या वर्षी कमजास्त झालेला नव्हे असा) ०दस्त—मुख्य, नेहमींचा सारा (शेतावरचा वगैरे) याच्या उलट सवाई वर्ताळा, बावती वगैरे ०नख्द (नकद, नगद, नक्त)—स्त्री पैशाच्या रूपानें येणारा सारा किंवा ऐनजिनसी साऱ्याची पैदास किंमत ०काळी—स्त्री जमिनीवरील सारा, कर [ऐन+ काळी=शेत जमीन] ०जिन्नस—पु १ जमिनीचें धान्यादि उत्पन्न, याच्या उलट नक्त सारा, उत्पन्न विकून पैसा केलेला नव्हे तर जसाच्या तसाच सरकारात भरावयाचा शेतातील माल सामासान—ऐन जिनस धारा, ऐन जिनस वसूल २ (ल) खुद्द, जातीनें 'तरी ऐन जिन्नस पदाजी यादवाचे दोघे बेटे एकोजी व कुसाजी गनिमा- कडे आहेती'—रा १५ १ ०जिन्नसी—वि १ प्रत्यक्ष मालाच्या रूपात एन जिनसासबधीं (धारा, वसूल, जकात वगैरे) 'स्वराज्यातील नेमणुकीचा बहुतेक भाग ऐनजिन्नसी मिळत असल्यामुळें ' —गागा १४३ २ त्याच जातीचें, प्रकारचें (धान्य कापड, दागिना वगैरे शब्दांबरोबर योजतात) ३ खुद्द, ऐनजिन्नस अर्थ २ पहा —क्रिवि मुद्देमालासह प्रत्यक्ष कृति करीत असता 'ऐनजिन्नसी चोर पकडला' ०फाजील—जमाबदी हिशोबातील एक सदर यात शेतकी किंवा बागाईत खेरीज येणारें जादा उत्पन्न येतें जसें— आबराई, खजुर बाडी, पाणभरा जमीन, कुरण वगैरेचें उत्पन्न ०मोकासा—चौथाईतील सरकाराची नेमणूकवजा चौथ पहा ०वसूली—स्त्री रोख वसुली, निव्वळ—ठास—रोख उत्पन्न

**ऐन**—न (जुनें रूप ऐन) १ (कर्ना र्ने) मुद्दल, मूळरकम, भाडवल म्ह० व्याजास सोकला ऐनास मुकला २ मूळचा ठरलेला शेतसारा साठ लाखाची वरीज चैन व इजाफा मिळोन सिद्ध केली'—रा ७५३ [ऐन]

**ऐनक**—पु चष्मा, डाव्यारा लावावयाची आरसी [अर ऐनक]

**ऐनपैन, पणपैण**—स्त्री निर्वाळा दणें, खात्रीपूर्वक सागणें (क्रि० करणें धारणें, पडणें) [ऐन+पैन]

**ऐनबाफ**—स्त्री पेरणीचा हगाम, ऐनवेळ, पेरणीचा नक्की हगाम—भर

**ऐनवेळ**—स्त्री अगदीं आणीबाणीचा प्रसग, मोक्याची वेळ

**ऐनवेळीं**—क्रिवि अगदीं वेळेवर, अगदीं आणीबाणीच्या प्रसगीं

**ऐनसादडा**—पु एक झाड अइन पहा

ऐना—पु १ आरसा; आरसा. 'ऐना निर्दितमे निर्नावित.' –दावि २६१. २ (ल.) शोभादायक वस्तु; अलंकरण; भूषण. 'कश्यपवस्ता करून निघे निज मंदिरचा ऐना.' –प्रला १२३. ३ विशेषतः अव.–ऐने; चष्मा; उपनेत्र; डोळ्याची आरशी. [फा.]

ऐनानी—स्त्री. मूळ ठेविलेल्या दंतवल्याचा प्रकार; ऐन–ऐन आकार. [फा.]

ऐने(ना)महाल—पु. आरसेमहाल; आंतून सर्व बाजूंनी आरशांनी मढविलेला दिवाणखाना. 'ऐनामाहल जो रत्नखचित.' –दावि ३५८. 'त्याचप्रमाणें ती मुमानजीवरोबर नागोजीच्या गर्दीत त्याच्या मागे ऐनेमहालांत आली.' –स्वप ३९३. [फा.]

ऐनेर–रें—न. एक लहान मुलांचा रोग; यानें गर्भिणी आईचें स्तनपान करणाऱ्या मुलाला श्वास, अग्निमांद्य, ओकारी, ग्लानी, शोष, अरुचि, भेरी इत्यादि हीं लक्षणें होतात, पोट मोठें होतें. यास वैद्यकांत पारिगर्भिक असें म्हणतात. यावर अग्निदीपकक्रिया करावी. आयेरें पहा. [आई+न्यारें]

ऐनेरणें, ऐनरणें—आयनेरणें पहा.

ऐनेराजमहेल—पु. (बडोदें) राजवाडादर्पण; या नांवाच्या पुस्तकांत बडोदें राजदरबारांत होणाऱ्या सर्व प्रकारच्या नैमित्तिक कृत्यांची सविस्तर माहिती दिलेली आहे. [ऐने+राजमहाल]

ऐपत—स्त्री. संपन्नता; आर्थिक सामर्थ्य, शक्ति, योग्यता, साधन, मालमत्ता, पैसाअडका. [अर. आफियत्] ०दार, ऐपती–वि ऐपत असणारा; सांपत्तिकदृष्ट्या समर्थ; पैसेवाला.

ऐपत—स्त्री. (गो.) टांक.

ऐब—पु व्यंग; दोष; चूक; खोड; अपूर्णता. अयब पहा. 'नाक लागलें तर फारसा ऐब दिसणार नाहीं.' –ख ८.९५०५. 'त्याच्या चेहऱ्यांत कांहीं ऐब नव्हता.' –कोरकि ३१. [अर. अयब, आइब्] ०लागणें–कि. कमीपणा येणें. ०दार–वि. चुकीचा; दोषी; उणीव असणारा; दोषसंबंधी.

ऐयतेगैयते, ऐयूगैयू, ऐयोगैयो—वि. साळकोजी माळकोजी, रस्तेकार; कोणीतरी; ज्यांचा कांहीं संबंध नाहीं असे. ऐयूगैयू पहा.

ऐबी—वि. १ (ना.) खोडकर; मस्त. २ (कु.) ओशाळा; भिंधा. [ऐब; हिं. ऐबी; अर. अयब, आइब्]

ऐयट, ऐयटबाज, ऐयटबाजी—अयट पहा.

ऐयाल–ळ—अयाळ पहा.

ऐय्या—स्त्री.अया पहा. [तुल० कर्ना० अय्या=आजी,म्हातारी स्त्री]

ऐरण—स्त्री. सोनार, लोहार वगैरेंचें एक हत्यार; घडकाम करण्याचें साधन. यावर धातूचे जिन्नस ठोकून त्यांस पाहिजे तो आकार देतात. सामान्यतः आठ ते दहा घेर वजनाचा, ... ईंचाचा, वर ... चौकोनी असून खालीं निरुं ... ठोकळा एका लाकडी लांबट ठोकळ्यांत बस...

...वरच्या बाजूस एक इंच जाडीचा पोलादी भाग असतो. 'दैवें ऐरणीवरी घन। तैसें हाणितीं उत्तमन॥' –कथा १.१३.५८. [सं. अरणि, अधरणी; प्रा. अहिरिणी; सिं. अहरणी, तुल० सं. अधरणी] ०मारणें–कि. (सोनारी) ऐरणीला ठोकून ठोकून गुळगुळीतपणा आलेला असतो तो घालविण्यासाठीं कुरंडाचा चुरा हातोड्यानें ऐरणीवर घासणें.

ऐरण—स्त्री. (कों.) शेताच्या बांधावर असणारा, हद्द दाखविणारा मातीचा ढीग. अरणी पहा.

ऐरण, ऐरीण—स्त्री. १ हरण; नरेवळ. २ आयरणी; सोनामुखीची एक जात. [सं. अरणि; हिं. अरनि; गु अरणि]

ऐरणमेरण—स्त्री. एक वनस्पति; हिचीं पानें यकृताच्या आकाराचीं असून त्यांचा यकृतविकारावर उपयोग होतो.

ऐरणी—स्त्री. ऐरण पहा. 'सुर्पाची जे वाकुडी फणी। तेचि विटाळया ऐरणी। कातरी केलिया जोडोनि। सर्पाच्याच॥' –कथा ३.१७.१२.

ऐरणी, ऐरिणी—स्त्री. लग्नांत वरातीच्या पूर्वी वेळूच्या परडींत (सालींत) कणकीचे दिवे लावून त्यांत उमामहेश्वराची पूजा करून तें पात्र वरमातेस दान करतात. 'भीमकें माहिलें विदान। सव ऐरणी संपादन। कृष्णासी वंशपात्रदान। विधिविधान वेदोक्त॥' –एरुस्व १६.१५८. २ अग्निपात्र. 'विरहा नवें तावली। चंद्रकळा होवो भुळभुळी। ते ऐरणी करतळी। घेईन मी॥' –शिशु १९६. [सं. अरणि] ०दान–न. लग्नांत वंशवृद्धीसाठीं वधूपक्षाकडून वरमातेस वंशपात्राचें (सालीचें) जें दान देतात तें. ०पूजन–न. ऐरणीदान करण्यापूर्वी वंशपात्राचें (सालीचें) करावयाचें पूजन.

ऐरा—अहिरा पहा.

ऐराण—हैराण पहा.

ऐरावण—पु इंद्राचा हत्ती, ऐरावत. [सं.] –वि. (गो.) (ल) अतिशय मोठा; अगडबंब.

ऐरावत—पु. (विशे.) ऐरावती; इंद्राचा हत्ती; समुद्रमंथनापासून काढलेल्या चौदा रत्नांपैकीं एक. 'अर्जुना मी गा ऐरावतु। पयोराशी सुरमथितु॥' –ज्ञा १०.२३८. [सं.] म्ह० कोठें इंद्राचा ऐरावत कोठें शामभटाची तट्टाणी=एक अतिशय थोर आणि दुसरी अतिशय क्षुद्र अशा दोन गोष्टींचा विरोध दाखवावयाचा असल्यास या म्हणीचा उपयोग करतात. ऐरावतीलक्ष्मी–स्त्री. गजांत लक्ष्मी; हत्ती बाळगण्याइतकी श्रीमंती. 'मदमत्त झालेल्या दीपिंदानें एखादे वेळीं क्वचित प्राणनाश केला म्हणून ... ऐरावती लक्ष्मीचा अनादर करणें योग्य नाहीं.' किरकोळ लेख संग्रह (विष्णुशास्त्री चिपळूणकर).

...—वि १ अशक्त, मूर्ख, मंद, जड (माणूस); हलकी; २ अलबेलागलबला, क्षुल्लक; कोणीतरी. 'कीर्तीचे ...चें नाहीं केलें.' ...७९. [गैरी–द्वि]

ऐरिणी, ऐरीण—स्त्राल. ऐरणी पहा.

ऐल, ऐला, ऐलाड, ऐलाडी, ऐली—वि. अलीकडचा; अलीकडला. 'उतराचिये सांगडी । ठाके ते ऐलीच थडी ॥' –ज्ञा १८.२५५. 'पाहेचि ना तो नाहीं बुडाला । कोरडा आला ऐल तीरा ।' –एभा २८.३२५.-क्रिवि. १ या बाजूला; अलीकडे. 'प्रवृत्ति मागौति मोहरे । समाधि ऐलाडी उतरे ।' –ज्ञा ६.१९१. २ आधीं; अगोदर; पूर्वी. 'तेवि तो यदुनाथ । केवळ श्रीकृष्णप्रीत्यर्थ । सांडूनि काळ नियत । ऐलाडचि उदेला ॥' –रास १.१०७. [सं. आदिम; प्रा. आइल्ल] ऐलकांठ, ऐलतीर,ऐलथड–पु न.स्त्री. अलीकडचा कांठ; जवळचा कांठ; पैलथडी याच्या उलट. 'शोभा समुद्र हेलावे पोटीं। चक्षु पोहणार उठाउठी । ऐलकांठीं बुबकले ॥' –मुसभा २.७७. 'असो आतां त्या अवसरीं । क्षीरसागरीच्या ऐलतीरीं । बध्दांजलि करूनि निर्धारी । सुरवर उभे ठाकले ॥' –ह २.६०.

ऐलपैल—क्रिवि. या व त्या बाजूस; जवळच्या व दूरच्या दोन्ही कांठावर; अलीकडे पलीकडे. 'या नदीचे ऐलपैल वस्ती आहे.' [ऐल+पैल] –वि. (अलीकडचा व पलीकडचा) इतर; अवातर; किरकोळ; मिश्र; सटरफटर; क्षुल्लक (वस्तु, काम, शब्द, मनुष्य इ०). 'आम्हास संसारखर्चापेक्षां ऐलपैल खर्च फार लागतो.'

ऐलफैल—स्त्री. १ बंड; उठाव; बेमानपणाचें, आज्ञा मोडण्याचें कृत्य. २ खोड्या; उपद्याप; बेमुर्वत वर्तन; उद्दाम भाषण. (क्रि० करणें; बोलणें). [फैल द्वि; अर. फियल=कर्म]

ऐलान—पु. (माळवी) शासन; कायदा; वटहुकूम. (इं.) ऑर्डिनन्स. [हिं.]

ऐलीकडचा, ऐलीकडला, ऐलीकडून, ऐलीकडे—अलीकडचा, अलीकडील पहा. 'जेवीं वसंता ऐलीकडी । वृक्षांसि होय पानझडी ॥' –एभा ३.१५५. 'नाणावें पैलाड येतां हि जीव। ऐलिकडे वट्यां न्यावें घरा ।' –दावि १४८.

ऐवज—पु. १ मालमत्ता; संपत्ति; इस्टेट; रोकड किंवा माल. 'पांडुरंग आणितां ध्यानांत । तों ऐवज आटविला मनांत ।' २ सुस्थिति; टिकाऊपणा; भक्कमपणा; दमदारपणा. ३ तत्वांश; सामर्थ्य; उत्साह; उमेद; पाणी. ४ किंमत; मूल्य (कोणत्याहि वस्तूची पैशाच्या रूपांत). ५ रोख वसुली; रोख उत्पन्न; जमा. [फा. इवझ्=बदल] ०दार-दीर–वि. समर्थ; उपयुक्त; चांगल्या स्थितींत असणारा; कार्योपयोगी (वस्तु, पदार्थ, पशु वगैरे). ०मोबदला–पु. १ एखाद्याच्या मालकीची वस्तु दुसऱ्याच्या ताब्यांत त्याच्या वस्तुबद्दल असणें; ऐवजानी अदलाबदल असणें. २ देवघेव; मोबदला देणें. (क्रि० करणें). ३ठेवीवर पैसा दस्तवार काढणें; गहाणवजे. (क्रि० करणें; देणें; ठेवणें; याच्या उलट हाता-वर आणणें; काढणें; येणें). ०मोबदल्याचें लिहिणें-हिशेबाचें एक खातें; ठेवी ठेवल्याचें व पैसे उगने आगरयाचे हिशेब ठेवणें; निरनिराळ्या प्रकारच्या वसुलीपोटीं, ठेवपोटीं, कर्जपोटीं दिल्या-घेतलेल्या रकमांचा हिशेब ठेवणें; निरनिराळ्या प्रकारच्या मालवस्तूंचा रीतसर हिशेब ठेवणें. 'ऐवजमोबदल्याचें लिहिणें महाकठीण यांत जो कारकून पार पडेल तो लेखणीचा धड.'

ऐवजीं—शअ. बदली; जागीं; मोबदला. 'हे रुपये मुद्दलांत धरूं कीं व्याजाऐवजीं धरूं?' [फा. इव; सिं. एवजी]

ऐवट—वि. १ मठ्ठ, जड (दागिने वगैरे); अवजड; मोठा अवाढव्य; भजस (झाड, खांब, इमारत वगैरे); जाड; दणकट; ओबडधोबड (कापड वगैरे). हा शब्द पुष्कळ वेळां फार व्यापक अर्थानेंहि योजलेला दिसून येतो. जसें- भगडबंड, धोराड माणसांना; असभ्य, ग्राम्य, असंस्कृत भाषणाला; विविध प्रकारच्या व्यापक कामाला; दिखाऊ मोठ्या वस्तूंना हें विशेषण लावलेलें आढळतें. २ जड; मंद; मूर्ख; बेडौल; ओबडधोबड (माणूस). [अर. बेवट?]

ऐंश—न. (गो.) आमिष. 'ऐंशाचेया आसा । मिनु शोंबिनला जैसा ।' –शिशु १.१७.३७. [सं. आमिष]

ऐशानी—स्त्री. ईशान्य दिशा. [सं.]

ऐशआराम-ऐशाराम-मी—पुस्त्री. चैन; सुख आणि स्वास्थ्य; वैषयिक सुखोपभोग; करमणूक; विलास; मनोरंजन. [अर. ऐश्+फा. आराम्]

ऐशी—उद्गा. आनंदोद्गार. भले शाबास! वाहवा! छान! [अशी, असा.]

ऐशी—वि. १ अशी; यासारखी. २ (ल.) अतिशय; फार (निंदाव्यंजक). 'तो येऊं दे तर खरा, त्याची ऐशी पूजा करतों!' [अशी]

ऐशीं—वि. ८० संख्या. [सं. अशीति; प्रा. असीइ; सिं. असी] ०म्ह १ ऐशीं तेथें पंचायशी=थोडें जास्त झालें तरी हरकत नाहीं या अर्थी. २ ऐशीं तेथें पंच्यायशी, कर ग रांडे पुरणपोळ्या–उधळ्या माणसास लावतात.

ऐश्वर—वि. ईश्वरी; दैवी; ईश्वरासंबंधीं. 'ऐश्वरकळा साजती। पाहून शत्रु लाजती ।' –ऐपो ३१८. [सं.]

ऐश्वर्य—न. वैभव; प्रतिष्ठा; सत्ता; इच्छित प्राप्तीचें सामर्थ्य. 'आइका यश श्री औदार्य । ज्ञान वैराग्य ऐश्वर्य ।' –ज्ञा ६.३७. 'ऐश्वर्य म्हणजे जें जें इच्छील तें तें प्राप्त करून घेण्याचें योग-सामर्थ्य.' –गीर १६४. २ प्रभुपणा; प्रमुत्व; वर्चस्व. 'गुज ईश्वरेश्वराचिया ठायीं । ऐश्वर्य केलें ।' –ज्ञा ११.५९६. ३ ईश्वरी अंश, गुण, सामर्थ्य. 'हा आमुचा ऐश्वर्य योगु । तुवां देखिला कीं चांगु ।' –ज्ञा ९.८७. ४ (सामा.) समृद्धि; श्रीमंती. [सं.] ०पीठ–न. ऐश्वर्यस्थान, संपत्तीचें, वैभवाचें माहेरघर. 'की ऐश्वर्यपीठींची देवी सुंदर.' ०योग–पु. ईश्वरी सामर्थ्य; वैभव. ऐश्वर्य अर्थ ३ पहा.

**ऐना**—पु १ आयना; आरसा. 'ऐना निंदितसे निर्नासिक.' –दावि २६३. २ (ल.) शोभादायक वस्तु; अलंकरण; भूषण. 'कम्यरयस्ता करून निघे निज मंदिरचा ऐना.' –प्रला १२३. ३ विशेषतः अव.–ऐने; चष्मा; उपनेत्र; डोळ्याची आरसी. [फा.]

**ऐनाती**—स्त्री. मूळ ठरविलेल्या शेतसाऱ्याचा प्रकार; ऐन-यैन आकार. [फा.]

**ऐने(ना)महाल**—पु आरसेमहाल; आंतून सर्व बाजूंनीं आरशांनीं मढविलेला दिवाणखाना. 'ऐनामाहल जो रत्नखचित.' –दावि ३५८. 'त्याचप्रमाणें ती सुमानजीवरोबर नागोजीच्या गढींत त्याच्या खास ऐनेमहालांत आली.' -स्वप ३९३. [फा.]

**ऐनेर-रें**—न. एक लहान मुलांचा रोग; यानें गर्भिणी आईचें स्तनपान करणाऱ्या मुलाला श्वास, अभिमांद्य, ओकारी, ग्लानी, खोकला, अरुचि, मेरी येणें हीं लक्षणें होतात, पोट मोठें होतें. याला वैद्यकांत पारिगर्भिक असें म्हणतात, यावर अग्निदीपकक्रिया करावी. आयनेरें पहा. [आई+न्यारें]

**ऐनेरणें, ऐनरणें**—आयनेरणें पहा.

**ऐनेराजमेहेल**—पु. (बडोदें) राजवाडादर्पण; या नांवाच्या पुस्तकांत बडोदें राजघराण्यांत होणाऱ्या सर्व प्रकारच्या नैमित्तिक कृत्याची सविस्तर माहिती दिलेली आहे. [ऐने+राजमहाल]

**ऐपत**—स्त्री. संपन्नता; आर्थिक सामर्थ्य, शक्ति, योग्यता, साधन; मालमत्ता; पैसाअडका. [अर. आफियत्] ०दार, ऐपती–वि. ऐपत असणारा, सांपत्तिकदृष्ट्या समर्थ; पैसेवाला.

**ऐपत**—स्त्री. (गो.) टाक.

**ऐब**—पु व्यंग; दोष; चूक; खोड; अपूर्णता. अयब पहा. 'नाक लागलें तर फारसा ऐब दिसणार नाहीं.' –ख ८.१५०५. 'त्याच्या चेहऱ्यांत कांहीं ऐब नव्हता.' –चोरकि ३१. [अर. अयब, आइब्] ०लागणें–क्रि. कमीपणा येणें. ०दार–वि. चुकीचा; दोषी; उणीव असणारा; दोषसंबंधीं.

**ऐबतेगैबते, ऐबूगैबू, ऐबोगैबो**—वि. साळकोजी माळकोजी; सटरफटर; कोणीतरी; ज्यांचा कांहीं संबंध नाहीं असे. ऐबूगैबू पहा.

**ऐबी**—वि. १ (ना.) खोडकर; खोड्या. २ (कु.) ओशाळा, भिषा. [ऐब; हिं. ऐबी; अर. अयब, आइब्]

**ऐयट, ऐयटबाज, ऐटबाजी**—अयट पहा.

**ऐयाल-ळ**—अयाळ पहा.

**ऐय्या**—स्त्री. अया पहा. [तुल० हिं. अय्या=आजी, म्हातारी स्त्री]

**ऐरण**—स्त्री. सोनार, लोहार वगैरेंचें एक हत्यार; घडकाम करण्याचें साधन. यावर धातूचे जिन्नस ठोकून त्यांस पाहिजे तो आकार देतात. सामान्यतः आठ ते दहा शेर वजनाचा व पांच इंच लांबीरुंदीचा, वर इंच चौकोनी असून खालीं निमुळता असलेला लोखंडी ठोकळा एका लाकडी लांबट ठोकळ्यांत बसविलेला असतो. यास वरच्या बाजूस एक इंच जाडीचा पोलादी भाग असतो. 'जैसे ऐरणीवरी घण । तैसे हाणिती उराणपण ॥' –कथा १.१३.९८. [सं. अरणि, अधरिणी; प्रा. अहिरिणी; सिं. अहरणी, तुल० सं. अधरारणी] ०गारणें–क्रि. (सोनारी) ऐरणीला ठोकून ठोकून गुळगुळीतपणा आलेला असतो तो घालविण्यासाठीं कुरंदाचा चुरा हातोड्यानें ऐरणीवर घासणें.

**ऐरण**—स्त्री. (वांई) शेताच्या बांधावर असणारा, हद्द दाखविणारा मातीचा ढीग. अरणी पहा.

**ऐरण, ऐरीण**—स्त्री. १ इरण; नवेल. २ आयरणी; सोनामुखीची एक जात. [सं. अरणि; हिं अरणि, गु. अरणि]

**ऐरणमेरण**—स्त्री. एक वनस्पति; हिची पानें यकृताच्या आकाराचीं असून त्यांचा यकृतविकारावर उपयोग होतो.

**ऐरणी**—स्त्री. ऐरण पहा. 'सर्पाची जे थाकली फणी। तेचि पिढावया ऐरणी। कातरी केलिया जोडोनि। सर्पाच्याच ॥' –कथा ३.१७.१२.

**ऐरणी, ऐरिणी**—स्त्री. लग्नांत वरातीच्या पूर्वी वेळूच्या परडींत (झालींत) कणकीचे दिवे लावून त्यांत उमामहेश्वराची पूजा करून तें पात्र वरमातेस दान करतात. 'भीमकें मांडिलें विदान। भव ऐरणी संपादन। कृष्णासी वंशपात्रदान। विधिविधान वेदोक्त ॥' –एरुस्व १६.१५८. २ अग्निपात्र. 'विरहा नलें तातली। चंद्रकळा होऊे चुळचुळी। ते ऐरणी करतळी। घेईन मी ॥' –शिशु १९६. [सं. अरणि] ०दान–न. लग्नांत वंशवृद्धीसाठीं वधूपक्षाकडून वरमातेस वंशपात्राचें (झालीचें) जें दान देतात तें. ०पूजन–न. ऐरणीदान करण्यापूर्वी वंशपात्राचें (झालीचें) करावयाचें पूजन.

**ऐरा**—अहिरा पहा.

**ऐरांण**—हैराण पहा.

**ऐरायण**—पु. इंद्राचा हत्ती, ऐरावत. [सं.] –वि. (गो.) (ल.) अतिशय मोठा; अगडबंब.

**ऐरावत**—पु. (विशे.) ऐरावती, इंद्राचा हत्ती; समुद्रमंथपासून काढलेल्या चौदा रत्नांपैकीं एक. 'अर्जुना मी गा ऐरावतु। पयोराशी सुरमथितु ॥' –ज्ञा १०.२२८. [सं.] म्ह० कोठें इंद्राचा ऐरावत कोठें शामभटाची तट्टाणी=एक अतिशय थोर आणि दुसरी अतिशय क्षुद्र अशा दोन गोष्टींचा विरोध दाखवावयाचा असल्यास या म्हणीचा उपयोग करतात. ऐरावतीलक्ष्मी–स्त्री. गजांत लक्ष्मी; हत्ती बाळगण्याइतकी श्रीमंती. 'मदमत्त झालेल्या द्वीपेंद्रानें एखादे वेळीं क्वचित प्राणनाश केला म्हणून ... ऐरावती लक्ष्मीचा अनादर करणें योग्य नाहीं.' किरकोळ लेख संग्रह (विष्णु शास्त्री चिपळूणकर).

**ऐरगैरी**—वि. १ अशक्त; मूर्ख, मंद; जड (माणूस); हलकी; क्षुद्र, (वस्तू). २ अल्पत्यागलपला, क्षुद्र; कोणीतरी. 'कीर्तीचे चौघडे पोवाडे ऐऱ्यागैऱ्याचें नाहीं केले.' –पापो ७६ [गैरी–द्वि]

